**बाबर** (१५२६–१५३० इ.) मोगल वंशातील हा पहिला बादशहा दौलतखान लोदी आणि इब्राहिम लोदी या दोघांचा पराभव करून मेवाडचा राणा सांगा याच्याशी त्याने युद्ध सुरू केले. राणा सांगापुढे त्याचा टिकाव लागेना. पानीपतच्या संग्राम भूमीवर बरेच दिवस हे युद्ध चालले होते. बाबर ईश्वरभक्त होता. या युद्धात यश मिळावे म्हणून त्याने परमेश्वराची प्रार्थना केली व प्रायश्चित्त म्हणून दारू पिण्याचा त्याने पूर्णपणे त्याग केला. राणा सांगा हा मोठा पराक्रमी योद्धा होता. मोठ्या कुशलतेने तो युद्ध करीत होता. तथापि त्याच्या सैन्यातील आपापसातील फुटीमुळे, बाबराच्या विशाल सेनेपुढे त्याचा टिकाव लागू शकला नाही. बाबराने या विजयानंतर आपली पावले चंदेरीकडे वळविली चंदेरीचा राजा त्यावेळी तेथे नव्हता, त्यामुळे त्याच्या राणीनेच हाती समशेर घेऊन चंडिकेप्रमाणे ती बाबराच्या सैन्यावर तुटून पडली आणि त्याच्या सैन्याचा संहार केला. तिची युद्ध कुशलता व धैर्य वीरता पाहून बाबराने युद्ध बंद केले व "भारतीय स्त्रिया किती पराक्रमी व देशभक्त असतात हे तुम्ही आज मला दाखवून दिलेत. आजपासून तुम्ही मला स्वतःच्या मुलीसारख्या आहात. स्वतंत्रपणे राज्य करा. माझ्या गरजेची जरूर पडताच अवश्य कळवा. मी सर्वतो प्रकारे सहाय्य करीन." असे त्याने चंदेरीच्या राणीला वचन दिले. बाबर खूप शक्तिवान होता. चूक कबूल करणाऱ्या अपराध्यांना तो क्षमा करीत असे. तो धर्मात्मा व अहिंसा प्रेमी होता. एकदा त्याचा मुलगा आजारी पडला. पुष्कळ उपाय करूनही जेव्हा बरे वाटेना तेव्हा बाबराने हुमायुनच्या पलंगाभोवती तीन प्रदक्षिणा घेऊन परमेश्वराची प्रार्थना केली. हुमायून आजारातून मुक्त झाला पण बाबरावर मात्र मृत्यू ओढवला. बाबर स्वत. विद्वान होता. त्याने बाबरनामा, तुर्की दिवाण इत्यादि अनेक ग्रंथ लिहिले. तो विद्वानांचा मान ठेवीत असे. अहिंसा धर्माचा, त्याचप्रमाणे इतर धर्मांना तो किती आदर ठेवीत असे हे त्याने हुमायूनच्या नावे लिहिलेल्या मृत्युपत्रावरूनच दिसून येते. तो म्हणतो, 'बाळ, भारतात अनेक धर्मानुयायी लोक राहतात. त्या सर्वांचा सत्कार ठेवणे हे तुझे कर्तव्य आहे. गोवधबंदी केल्याशिवाय तुला भारतीयांची मने काबीज करता येणार नाहीत. असे केलेस तरच या देशातील लोक तुझ्याशी निष्ठेने वागतील.'

महाचंद्र नावाचे एक मोठे जैन कवि बाबराच्या काळी होते. बाबर त्यांना खूप मान देत असे. त्याकाळी या कवीने सोळावे तीर्थंकर श्री शांतिनाथ भगवंतावर ५५ हजार ३०० श्लोक प्रमाण ग्रंथरचना केली आहे. आज देखील ती दिल्लीच्या धर्मपुरा जैन मंदिरात सुरक्षित आहे.[1]

साहू साधनप्रसाद नावाचे एक जैन शेठ या काळी असून बाबरावर त्यांचा खूप प्रभाव होता. बाबराच्या आज्ञेने त्यांनी एक दिगंबर जैन मंदीर बांधल्याची माहिती मिळते.

सेठ तोसडराय यांचे ज्येष्ठ पुत्र, सेठ नमीदास यांनी बाबराच्या राज्यात सोने, हिरे, माणकाच्या ऋषभदेव, शीतलनाथ, विमलनाथ, नेमिनाथ आणि पार्श्वनाथ इत्यादि जैन तीर्थंकरांच्या प्रतिमा तयार करवून त्यांची जैन मंदिरात प्रतिष्ठापना केली. पंचकल्याणिक उत्सव व पूजा करविल्या. बाजारातून विशाल रथोत्सव काढले.

यशकीर्ती हे या काळातील एक मोठे जैन त्यागी होते. त्यांनी बाबराचा मंत्री हेमराज याच्या अनुरोधाने पांडवपुराण व हरिवंशपुराण यांची रचना केली[2]

राणा सांगा यांच्यावर जैनाचार्य धर्मसूरीचा मोठा प्रभाव होता. वाजत-गाजत हत्ती, घोडे यांच्या मिरवणुकीने त्यांचे स्वागत केले जाई त्याच्या उपदेशाने राजाने मद्यमासाचा कायमचा त्याग केला. जैन मंदिराना मोठमोठी दाने दिली. हा एक फार मोठा पराक्रमी राणा होता त्याने मोठमोठी युद्धे जिंकली. युद्धात छातीवर ऐंशी घाव झाले. एक हात तुटला, एक डोळा फुटला, तरी देखील बाबराचे आक्रमण होताच हातात तलवार घेऊन त्याने मोगल सैन्यास पळता भुई थोडी केली राणा सांगा, मासत्यागी व अहिंसाधर्मी होता तरी देखील देशसेवेसाठी त्याची तलवार नेहमीच उघडी राही. त्याचे नाव ऐकताच तातारी सैन्याचा थरकाप उडत असे. बाबराला एकदा

१. दिल्ली जैन डिरेक्टरी, पृ. ८ २ प्रशस्तिसंग्रह (सोलापूर) द्वितीय भाग प्रस्तावना पृ. १७




त्याने अरूंद रस्त्यामध्ये अडविले.[1] तथापि बाबराची यावेळी लाचारी पाहून राजपूतानी बाबराच्या सैन्याला पिटाळून लावले. मनात आणले असते तर बाबराला यावेळी पूर्णपणे ठार करता आले असते, पण त्यानी यावेळी बाबराला सोडून दिले. बाबराने मिळालेल्या संधीचा फायदा घेण्याचे ठरविले व पुनश्च सैन्य गोळा करून, राणा सांगा बेसावध अवस्थेत असताना त्याच्यावर आक्रमण केले, त्यामुळे राणा सांगाला पुन्हा शस्त्र हाती घेणे भाग पडले. राणा सांगाच्या सैन्यातील काही लोक फुटून बाबराला जाऊन मिळाले. आपल्याच लोकांचा विश्वासघातकीपणा पाहून राणा सांगा घाबरले नाहीत, मंत्र्यानीही यावेळी राणा सांगाना युद्ध न करण्याचा सल्ला दिला. तथापि राणाना हा निर्णय मान्य झाला नाही. हे पाहून त्याच्या दुराचारी मंत्र्यानी त्याला विष घातले[2] व अशा प्रकारे भारतात मोगल राज्याची स्थापना झाली.

'तारणस्वामी' यांचे वडील दिल्ली सम्राट बहलोलखान लोदीचे उच्चाधिकारी होते. त्यांनी अनेक धार्मिक ग्रंथाची रचना केली. बाबराच्या राज्यात जैन धर्माचा मोठा प्रचार त्यांनी केला. त्यांच्या प्रचारामुळेच लक्षावधी हिंदु व मुसलमान जैन झाले.

गुरुनानक देव हे देखील बाबराच्या काळीच असून शीखांचे पहिले धर्मगुरु होत. ते अहिंसेचे थोर प्रचारक असून ते म्हणतात–

"जे रत लगे कपडे, जाम हो पलीन । जो रत पीवे मानुषा, तिन क्या नर्गल चित्त ॥"

असे म्हणूनच ते थांबत नाहीत, ते म्हणतात ६८ तीर्थांची यात्रा केल्याने देखील अहिंसा व दया यापासून मिळणारे पुण्य लाभत नाही.

"अडसठ तीरथ सफल पुन, जीवन दयाप्रधान । जिसन् देवे दयाकर सोई पुरुष सुजान !!"

(मांझ महल्ला ५ बारहमाह माघमाह)

जनावरानाही माणसाप्रमाणे प्राण आणि आत्मा आहे. म्हणून त्याना मारणे, कष्ट देणे योग्य नव्हे. जनावरांना ते आपल्या पुत्राप्रमाणे मानीत.

किया बकरी किया गाये किया अपना जामा । सबका लहू एक हैं गुरु नानकके फरमाया ॥

सारांशाने बाबराच्या कारकीर्दीत इस्लाम धर्माला राजमान्यता असली तरी, जैनधर्माला समाजात मान्यवर स्थान असलेले व समाजात जैनधर्म प्रगतिशील अवस्थेत असल्याचे दिसते. मुघल राजे जैन धर्मीयाना, त्यांच्या आचारविचारांना, प्रसाराला प्रत्यक्ष मदत करीत नसले तरी विरोध करीत होते असे दिसत नाही

**हुमायून** ( १५३०–१५४० ) याच्या राज्यामध्ये जैनांच्या धार्मिक कार्याना किंवा आचार-विचाराना कोणतीही अडकाठी नव्हती. पुष्कळशी जैन मंदिरे या काळात बांधली गेली. नग्न दिगंबर साधूच्या विहाराला कोणतीही बाधा नव्हती. मोठ्या उत्साहाने रथयात्रा होत असत. यांना जीवहिंसा व पशुबलि पसंत नव्हती[3]. जैनग्रंथाचेही लेखन या काळात होत होते. 'सेठका कूचा' दिल्ली दिगंबर जैन मंदिरात नंबर ३५६।२ ला गुटका ( हस्तलिखित वही ) आहे ती हुमायुनाच्या राज्यात पौष शु॥ ३ वि. सं. १५९२ मध्ये दिल्लीजवळील सोनीपत जिल्हा करनाल येथे लिहिली गेली[4]. याच्याच कारकीर्दीत सन १५३३ मध्ये धर्मदास नावाच्या श्रावकाने धनदत्तचरित्राची रचना केली[5]. मलयकीर्तीने सोळावे तीर्थंकर श्रीशांतिनाथाची विशाल मूर्ति निर्माण करविली[6].

१. साप्ताहिक 'हिंदू' जालंदर बलिदान अंक २३ जून १९६३ पृ. ४७
२. विशेष माहितीसाठी पहा– Jain Artiquary भाग १२ पृ. ५९–६१.
३. Romance of low ( Bombay Hunranitarian League ) Page 27.
४. विशेष माहितीसाठी पहा 'सन्मति संदेश' दिल्ली फेब्रुवारी १९६७ पृ. ३५.    ५. भट्टारक संप्रदाय पृ. २४१.
६. भट्टारक संप्रदाय (सोलापूर) पृ. २५६.

श्वेतांबर जैनाचार्य पद्मसुंदर यांचे गुरु मदमेरु यांचा हुमायुनाने मोठा सन्मान केला होता. त्यांनी हुमायुनाच्या राज्यात अनेक ग्रंथ रचले.

गुजरातच्या बहादुरशहाने चंद्रगिरीवर आक्रमण केले. तेथील राणीने आक्रमणास मोठ्या शौर्याने तोंड दिले व मदतीसाठी हुमायूनकडे राखी पाठविली. त्यावेळी हुमायून बंगाल प्रांतात शेरशहाबरोबर युद्ध करीत होता. राखी पोहचताच 'आपल्या वडीलांनी चंद्रगिरीच्या राणीला आपली पुत्री मानली' असल्याची हुमायुनला आठवण झाली. आपली बहीण सहकार्याची अपेक्षा करीत आहे हे लक्षात येताच शेरखानासारख्या भयानक शत्रूशी तोंड देण्यास थोड्याशा सैन्यासह सेनापती हैदर मिर्झा यास सोडून स्वतः हुमायून राणीच्या मदतीला निघाला. पावसाळ्याचे दिवस, अडचणीचा व दीर्घ अंतराचा प्रवास यामुळे त्याला पोहचण्यास अवधि लागला. तेवढ्यात बहादुरशहाने चंद्रगिरीवर विजय मिळविला. राणीने शिलरक्षणार्थ अनेक वीर स्त्रियासह 'स्वतःस जाळून घेतले. ही गोष्ट समजताच आपल्या हिंदु भगिनीला आपण वाचवू शकलो नाहीत, या गोष्टीचे हुमायूनला अतिशय दुःख वाटले. युद्ध करुन त्याने बहादुरशहाला हाकलले. चंद्रगिरीला स्वतंत्र करुन, राणीच्या वारसदाराला गादीवर बसविले.

हुमायून दिलेल्या वचनाला जागणारा व दयाळू होता. एकदा शेरशहासूरीने त्याला घेरले. स्वतःचा जीव वाचविण्यासाठी हुमायूनाने आपला घोडा गंगेच्या पाण्यातच टाकला. पाणी अधिक असल्यामुळे तो बुडणारच होता, पण एका भिस्त्याने त्याला वाचविले. उपकाराची परतफेड म्हणून हुमायूनने त्याला एक दिवस दिल्लीचे राज्य दिले. भिस्त्याने कातडी शिक्का चालू केला. हुमायूनने ते सर्व शिक्के चांदी सोने देऊन घेतले. हुमायून गोमास भक्षण करीत नसे. एके दिवशी एका नवीन नोकराकडून त्याच्या ताटात गोमांस वाढले गेले. हुमायूनने त्या दिवशी जेवण केले नाही. तो उपवाशी राहिला. नौकराला दंड देण्यात आला. सारांश बाबरानंतर मोगलांच्या सत्तेवर आलेल्या हुमायून बादशहानीही सर्व धर्मांच्या बाबतीत दयाळू दृष्टीकोन स्वीकारल्याने या काळात जैनधर्म समाजात मान्यवर स्थितीत प्रगतिशील असलेला दिसतो. इतकेच नव्हे तर या काळात जैन साहित्यातही मोठ्या प्रमाणात प्रगति झालेली दिसते. जैनधर्माच्या मंदीर बांधणीस किंवा प्रतिमा प्रस्थापनेलाही कोणताही विरोध बादशहाकडून करण्यात आलेला दिसत नाही.

**शेरशहासूरी**– (१५४०–१५५५ इ.) याचे मूळ नाव फरीद, एकदा जंगलातून जात असता एका सिंहाने त्याच्यावर हल्ला केला, पण शेरशहाने मोठ्या हिमतीने व कुशलतेने त्याच्यावर विजय मिळविला. तेव्हापासून तो शेरखान म्हणून ओळखला जाऊ लागला आणि बादशहा झाल्यानंतर लोक त्यास शेरशाह म्हणू लागले. ज्या गावी चोरी, डाका, दरोडा पडे, त्या गावच्या प्रमुखाला व शासनाधिकाऱ्याला अपराध्याप्रमाणे दंड देण्यास त्यानी सुरुवात केल्याने त्याच्या राज्यात चोरी वगैरे गुन्हे अतिशय कमी घडत. कलकत्ता ते पेशावर राजरस्ता बांधणी, सडकेच्या दोन्ही बाजूला झाडे, पाणपोया इत्यादी अनेक लोकोपयोगी सोयी त्यांनी केल्या. हा एक फार मोठा दानशूर होता, पावणेदोन लक्ष सुवर्णमुद्रा तो दरवर्षी मंदिरे, मशिदी शाळाना देत असे. त्याच्या राज्यात जाती-पातीचा भेदभाव नव्हता. हिंदु व जैन मोठमोठ्या अधिकाऱ्याच्या जागेवर नेमलेले होते. राजा तोडरमल जैन होता. तो उत्तम प्रकारे अहिंसा धर्माचे पालन करीत होता

शेरशाहसूरीच्या कारकिर्दीत जैनधर्माची प्रगति मोठ्या प्रमाणात झालेली होती. या काळात श्रीचंद्र, माणिकचंद्र, देवाचार्य, क्षेमकीर्ती इत्यादि अनेक प्रसिद्ध दिगंबर त्यागी व सत्पुरुष झाले. राजाकडून त्यांचा उत्तम मान राखला जाई या काळात भारतात आलेल्या बर्निअर Bernier व टॉव्हरनिअर Tavernier यांनी आपल्या प्रवास वृत्तात भारतात ठिकठिकाणी नग्न जैन साधू मोठ्या प्रमाणात फिरत असल्याची माहिती दिली आहे. या नग्न साधूचे दर्शन फक्त पुरुषच करीत असे नसून, नवयुवक व अत्यंत सुंदर अशा तरुणी देखील मोठ्या भक्तीने व श्रद्धेने करीत असत जैन मुनींनी आपली मने व इंद्रिये यांच्यावर पूर्णपणे विजय मिळविलेला होता.




त्यामुळेच कोणाशीही चर्चा करताना त्याच्या मनात विकार उत्पन्न होत नसे.[1] खुद्द शेरशाहाचा उच्च अधिकारी मलिक मोहम्मद जायसी याने आपल्या पद्मावत (२-६०) नावाच्या ग्रंथात जैन साधू इतर साधूहून अधिक सत्कार योग्य असल्याचा उल्लेख केला आहे. सम्राट सिकंदरसूरिने जैन गुरु विशालकीर्तीचा सन्मान केला[2] मार्कोपोलो (Marcopolo) म्हणतो, "काही योगी परिपूर्ण नग्न रहात असत. कारण जन्मताना ते नग्न जन्मले आणि संसारी वस्तूचा स्वीकार करू इच्छित नव्हते शेरशहासूरिने राज्यातील बहुसंख्य लोकात धर्माविषयी आदर निर्माण करणे हे शासनाचे प्रमुख कर्तव्य मानले होते. म्हणून त्याने आपल्या राज्यात गोवधबंदी केलेली असून, या नियमाविरुद्ध जो वागेल त्याला कठोर दंड देण्यात येईल असा जाहीरनामा काढलेला होता

**अकबर बादशाहा** (१५५६–१६०५) शेरशाहाच्या ताकदीपुढे एकदा हुमायूनला पळ काढावा लागला होता. जोधपूरचे राजे मालदेव यांच्याकडे त्याने मदत मागितली; पण शेरशाहाच्या भीतीने त्याने मदत केली नाही. हुमायूनची बेगम हमीदाखातून गर्भवती होती. तिला प्रसूतीतून मुक्त होईपर्यंत कोणी तरी आश्रय द्यावा म्हणून त्याने अनेक राजांना विनंती केली, पण कोणीही तयार झाले नाही. शेवटी हुमायून बेगमला घेऊन अमरकोट (सिंध प्रांत) ला पोहचला. तेथील राजा जैन होता. प्रथम तीर्थंकर ऋषभदेवापासून तेथे जैनधर्मी राजांचा व जैन धर्माचा प्रभाव होता. मोहमद बिन कासिमच्या वेळी ताहेरसेन हा तेथील राजा होता. त्याला हुमायूनने विनंती केली. या जैन राजाने शरणागतास नकार न देता पूर्णपणे सहकार्य केले, आश्रय दिला. त्याने हमीदाखातूनला आपल्या महालात ठेवून घेतले. तेथील अहिंसा प्रेमाचा, मांस त्यागाचा व शुद्ध आचार–विचारादि संस्काराचा बेगमेवर प्रभाव पडला. मातेच्या संस्काराचा, विचाराचा गर्भात असलेल्या अकबरावरही परिणाम झाला. अहिंसा सिद्धांत व जैन गुरुविषयी पुढील काळात अकबराच्या मनात दृढ विश्वास उत्पन्न झाला. त्याने मांसाहार पूर्णपणे त्याग केला. जैनांचे पवित्र पर्व व सण यांच्या निमित्ताने जवळ जवळ वर्षातून सहा महिने आपल्या राज्यात प्राणीवधास त्याने बंदी घातली होती व त्याविरुद्ध आचरण करणारास तो कठोर शासन करीत असे.

'हीरविजयसूरि' हे या काळातील एक मोठे संत होते. प्रा. रामस्वामी अय्यंगार यांच्या मते, "अकबर जैन धर्मावर श्रद्धा बाळगून होता. हीरविजयसूरीची प्रसिद्धी त्याच्या कानावर पडली. लगेच त्याने साहबसिंह नावाच्या गुजरातच्या सुभेदाराला पत्र लिहिले व सूरिंना बोलावणे पाठविले. राज्यातून अनेक प्रकारच्या वाहनांची सोय असतानाही मुनिराज गुजरातमधून आग्र्यापर्यंत चालत आले. अकबराने त्यांचे मोठ्या राजकीय थाटात भव्य स्वागत केले[3] व मुनींना त्याने जगद्गुरु अशी पदवी दिली[4]. काही इतिहासकारांच्या मते या मुनीच्या प्रभावाने अकबराने यावेळी जैनधर्माची दीक्षा घेऊन तो जैनधर्मी बनला[5].

'शांतिचंद्र' या जैन मुनीचा अकबरावर फार मोठा प्रभाव होता. त्यानी ईदच्या अगोदर एक दिवस अकबराला कळविले की, 'आज मी येथून जाणार आहे. अकबराने कारण विचारले, मुनिराज म्हणाले की, 'उद्या येथे हजारो लाखो जीवांची हत्या होईल. त्यांनी कुराणातील बोधपर वाक्ये काढून ही हत्या कशी अयोग्य आहे हे अकबराला दाखवून दिले. त्यात 'बळी दिलेल्या प्राण्यांचे मास देवाला पोहचत नाही, भाजी भाकरी खाल्ल्यानेच रोजा घडतो' हे दाखविले[6]. अकबराने मौलवीला बोलावून विचारले, तथापि मौलवी समाधानकारक उत्तर देऊ शकले नाहीत. तेव्हा, 'ईदच्या दिवशी माझ्या राज्यात कोणत्याही प्राण्याची हत्या केली जाऊ नये.' असे अकबरानी जाहीर केले[7] सन १५८७ मध्ये जीवहिंसा बंदी केल्याचे त्याने शांतिचंद्राना कळविले[8].

---

१. *Dr. Berniers Travels in Muoghal Empire P. 317.*

२. Salator, Karnatak Historical Review IV P. 78-81.

३. अकबर और जैनधर्म पृ. ५०. ४. सूरीश्वर और सम्राट पृ. १४४.

५ 'अकबर और जैन धर्म' (श्री आत्मानंद जैन ट्रस्ट सोसायटी अंबाला शहर) पृ. ८-१०.

६. Bhandarkar Commemoration Vol I P. 26. ७ कुराण शरीफ पारा १९ ८. हम गुरा एक ५ प्रायन ३८.






भानुचंद्र हेही याकाळातील मोठे प्रसिद्ध आचार्य होते. त्यांच्यावर अकबराची फार मोठी निष्ठा होती. एके दिवशी अकबराचे फार डोके दुखू लागले. पुष्कळ उपाय केले तथापि आराम वाटेना. तेव्हा अकबराने भानुचंद्राना बोलाविले व डोके थांबविण्याविषयी त्यांना विनंती केली. आचार्यांनी आपण वैद्य नसल्याचे अकबराला सांगितले. तथापि अकबराने आपण वैद्य नसला तरी सत्यवादी आहात. आपल्या मुखातून बाहेर पडलेला शब्द खोटा असणार नाही, फक्त आपण 'माझी डोकेदुखी थांबो' इतकेच म्हणावे. आचार्यांनी 'आपली डोकेदुखी निश्चित थांबेल' असे म्हटले व अकबराची दृढ श्रद्धा व भानुचंद्राचे शब्द यामुळे त्याची डोकेदुखी पूर्णपणे थांबली. या आनंदाप्रित्यर्थ दरबारी लोकानी बळी देण्यासाठी ५०० गायी आणल्या, तथापि अकबराला ही बातमी लागताच 'माझे दुःख मिटले या आनंदात दुसऱ्याचा जीव घ्यावा असा कुठला न्याय?' अशी स्पष्ट शब्दात जाणीव देऊन सर्व गायींची मुक्तता केली.

विजयसिंहसूरि हेही या काळातील प्रसिद्ध जैन पंडित होते. अकबरांनी यांना बोलावून घेतले व 'ईश्वर सृष्टीचा कर्ता–हर्ता आहे की नाही.' या विषयावर ३६३ विद्वानांशी वादविवाद घडवून आपला विजयसिंहसूरींच्या 'युक्तिसंगत तर्कवादाने' प्रभावित होऊन अकबरानी त्यांना 'सवाई' ही पदवी अर्पण केली.

अबुल फजल हा या काळातील अरबी व फारसी भाषेचा प्रगाढ पंडित होता. त्याचप्रमाणे हिंदी व संस्कृत भाषावरही त्याचे प्रभुत्व उत्तम होते. जैन ग्रंथाचा व जैन तत्त्वज्ञानाचा त्याने किती सखोल अभ्यास केलेला होता हे त्यानी लिहिलेल्या 'आइन-ए-अकबरी' या ग्रंथावरून दिसून येते. जैनधर्माचे सिद्धांत आणि त्याचे महत्त्व तसेच त्यांची आवश्यकता दाखविण्यासाठी त्याने आपल्या पुस्तकाची सुमारे ५० पाने खर्ची घातलेली आहेत[१]. त्यात त्याने अकबरावर दिगंबर जैन मुनीचा फार मोठा प्रभाव होता हे दाखवून दिले आहे[२]. तो म्हणतो अकबराने आपल्या आज्ञेने काश्मीरमध्ये मासेमारीला बंदी केली. जैन तीर्थक्षेत्रावरील यात्रा कर रद्द केली. दशलक्षण, अठाईद्वीप इत्यादी जैन पर्व तसेच प्रत्येक पंचमी चतुर्दशी इत्यादी जैनानी मानलेल्या पवित्र दिवशी हिंसा कायद्याने बंद केली. अशा प्रकारे जवळ जवळ सहा महिने हिंसा बंद करण्यात आलेली होती[३]. अकबराने मांसाहार वर्ज्य केला होता. तो म्हणत असे, 'माणसाने आपल्या पोटाला जनावराची कबर बनविणे योग्य नाही. जीवहिंसा करणारे कसाई वगैरे गावाबाहेर राहतात तर मांसभक्षकाना लोकवस्तीत राहण्याचा काय अधिकार आहे? ज्याना मांसत्याग करणे शक्य नाही त्यांनी माझ्या शरीराचे मांस खावे. सर्वांना पुरेल इतके माझे शरीर मोठे होते, मी स्वतः मांसाचा त्याग करतो[४].

टोडरमल हेही याकाळातील एक प्रसिद्ध पुरुष होत. यांचा जन्म उत्तर प्रदेशातील सीतापुर जिल्ह्याजवळील लहरपुर या गावी झाला. हे मोठे धर्मात्मा व अहिंसा धर्माचे पालन करणारे असले तरी तलवार धारण करणारे होते. त्यानी बसविलेल्या शेतसाराविषयक नियमांचाच मोगल व इंग्रजांनी उपयोग केला. आजही हेच नियम अस्तित्वात असलेल्या साराविषयक नियमात अंतर्भूत असलेले दिसतात. देवपूजा केल्याशिवाय ते कोणतेही काम करीत नसत. डॉ. कस्तुरचंद कासलीवाल आणि पंडित अनुपचंद न्यायतीर्थ यांच्या शब्दात टोडरमल जैनधर्मानुयायी होते[५] त्याचा मुलगा राखीदास हाही जैन होता. अतिशयक्षेत्र महावीरजी येथून प्रकाशित 'राजस्थानातील जैनशास्त्र भांडारातील ग्रंथसूचीच्या चौथ्या भागाच्या भूमिकेत दिगंबर जैन मंदीर पाटोदीच्या शास्त्रभांडारातील नयविलासकृत ज्ञानराशीच्या टीकेच्या प्रशस्तीत लिहिले आहे की, ही टीका मोगल सम्राट अकबराचा राजमंत्री टोडरमल यांचा मुलगा राखीदास याच्या शिक्षणासाठी लिहीली गेली.' यावरून राजा

१. Ayna-i-Akabari Vol III. P-330. २. अनुवाद 'हिंदी जैन संदेश शोधांक' १०, १०, ६३ पृ २१८-२३३.
३. Ayna-i-Akabari Vol III (Lacknow) P. 519. ४. S. N. Banarji's Religion of Akabar, P-81.
५ For details 'Jain Antiquary Vol' XII P. 57.

टोडरमलप्रमाणेच राखीदास हा देखिल जैनधर्मीच होता हे सिद्ध होते[१]. टोडरमल हे जैन कवि राजमल यांचेही मोठे सहाय्यक होते.[२]

'बीरबल' याचा तर अकबराच्या दरबारातील विद्वानामध्ये समावेश केलेला होता. बीरबल बुद्धिमान व हजरजबाबी असल्याचे अनेक कथावरून दिसून येते. तो बुडिया तालुक्यातील जगाधरी गावचा निवासी होता. तो देखील जैन असल्याची माहिती मिळते.

सांभरचा राजा भारमल हा जैनधर्मी होता. त्याने लक्षावधि सोन्याची नाणी दान केली व जैन धर्माच्या प्रभावनेसाठी त्याने असंख्य पैसा खर्च केला. त्याची स्वत:ची टाकसाळ असून अकबराचा मुकुटधारी राजकुमार सलीम याला भेटण्यासाठी हा अकबाराच्या दरबारी जात असे. त्याची दररोजची प्राप्ती एक लक्ष सोन्याची असे व त्यातील पन्नास हजार मोहरा तो दररोज अकबराच्या खजिन्यात जमा करीत असे. अकबराप्रमाणेच या राजाला सम्मान असून, अकबरावरही त्याचा चांगलाच वचक होता. स्वत:बरोबरच अकबराकडून जैन धर्माच्या प्रभावनेची अनेक कामे त्याने करवून घेतली[३].

राजमल हा या काळातील प्रसिद्ध जैन महाकवि होता. त्याने अकबरासाठी अध्यात्मिक ग्रंथ लिहिले. त्याच्या प्रभावानेच अकबराच्या जीवनात फार मोठा बदल घडवून आणला गेला. अकबर आपले जीवन जैन सिद्धांताप्रमाणे व्यतीत करण्याचा प्रयत्न करू लागला.

पंडित बनारसीदास हेही अकबराच्या दरबारातील प्रसिद्ध महाकवि होते. त्यानी समयसार नाटकासारखे महान आध्यात्मिक ग्रंथ लिहिले. ते पगडचा विकण्याचा धंदा करीत. रुपयामागे फक्त एक आणाच लाभ घ्यावयाचा त्याहून अधिक लाभ घ्यावयाचा नाही व रोज फक्त एक रुपयाच मिळवावयाचा. त्याहून अधिक मिळवावयाचे नाही अशी त्यांची प्रतिज्ञा होती. त्यांच्या व्रताची परीक्षा घेण्याचे ठरवून अकबराने, ' उद्या सर्व दरबारी लोकांनी पगडचा बांधूनच यावे ' असा हुकूम दिला. पंडितजी देवपूजा वगैरे आटोपल्यानंतर दहा वाजता दुकान उघडीत आणि चार वाजता दुकान बंद करीत असत. त्यामुळे त्या दिवशी सुरुवातीलाच मोठी गर्दी जमली. सोळा आण्याचा लाभ होताच पंडितजी दुकान बंद करू लागले. तथापि लोकांनी आग्रह सुरू केला, ' उद्या पगडीशिवाय दरबारात जाता येणार नाही, आपण वाटेल ती किंमत घ्या, पण पगडचा द्या ' अशी त्यांनी पंडितजीना विनंती केली. तेव्हा त्यांनी कसलाही लाभ न घेताच पगडचा विकल्या. दुसऱ्या दिवशी हजारो पगडचा पाहून अकबर म्हणाला, ' काल पं. बनारसीदासाना पुष्कळच लाभ झालेला दिसतो, ' लोकांनी उत्तर दिले, ' सोळा पगडचा विकल्यानंतर पंडितजीनी कोणताही फायदा न घेता मूळ किमतीलाच पगडचा विकल्या. पंडितजीची समाधानी वृत्ती व परिग्रहपरिमाण व्रताविषयीची आस्था पाहून अकबराला अत्यंत आश्चर्य वाटले. अकबराच्या दरबारी कविसमेलन होते, एकदा ' सो आस करो सु अकबरकी ' अशी समस्या दिली गेली. बनारसीदासांनी आपली समस्यापूर्ती म्हणून दाखविली—

" जिया बहुत वेश धरे जगमें, छवि भा गई आज दिगंबर की ।
जब चिंतामणी घरमे प्रकटो, तब कौन जरुरत अडम्बर की ।।
जिन तारणतरण सेय लियो, परवाहन की सुज बनर की ।
जिन आस नही परमेश्वर की, सो आस करे सु अकबर की ।।

शेवटची ओळ ऐकताच सगळचा दरबारात हळहळ माजली. सगळचांना खात्री होती की, आता पंडिताना मोठा दंड होईल. पण पंडितजीची सत्यता व निर्भिडता पाहून अकबराला फार आनंद वाटला. तो म्हणाला,

१. सन्मति संदेश दिल्ली (फेब्रुवारी १९६३) पृ. २३-२४. २. सन्मति संदेश दिल्ली (फेब्रुवारी १९६३) पृ. २४-२५.
३. Todarmal under the Imperial service of Akbar was Digambar Jain. He patronised Jain poet Rajmal.. Jambu Swamicharit (Bombay) P. 7-8.



'जी इच्छा असेल ते मागा.' बनारसीदास म्हणाले, 'माझ्याजवळ जे आहे त्यातच मी समाधानी आहे.' अकबराने फारच आग्रह धरला, तेव्हा पंडितजी म्हणाले, 'कृपया माझ्यावरील दरबारात हजर राहण्याचे बंधन काढून घ्यावे.' अकबर म्हणाला, 'मोठमोठे लोक माझ्या दरबारात येऊ इच्छितात.' पंडितजी म्हणाले, 'त्याना इंद्रिय सुख हवे. मला अध्यात्मिक सुख हवे, इथे आल्यास त्यात व्यत्यय येतो.' दरबारातील अकबरासह सर्व लोक आश्चर्यचकित झाले. अकबर म्हणाला, 'तुमच्या इच्छेप्रमाणे तुमच्यावर कसलेही बंधन राहणार नाही, असे असले तरी सवडीनुसार आपण दरबारात येत चला.'

शेठ शांतिदास अकबराच्या काळातील अहमदनगरचे मोठे नगरशेठ होते. त्याने अकबराच्या परवानगीने कोटयावधि रुपये खर्चून अनेक जैन मंदिरे बांधली. बाजारातून रथोत्सवाच्या मोठमोठ्या मिरवणुका काढल्या. अकबरावर त्यांचा फार मोठा प्रभाव होता.

गोस्वामी तुलसीदास हे या काळातील प्रसिद्ध लेखक होत. पं. बनारसीदासांची आध्यात्मिक प्रशंसा ऐकून ते त्याना भेटण्यास गेले आणि स्वलिखित रामायणाची एक प्रत भेट म्हणून दिली. पं. बनारसीदासानी भगवान पार्श्वनाथ स्तुतीची एक प्रत त्यांना दिली. या स्तुतीचा पं. तुलसीदासावर चांगलाच प्रभाव पडला. पं. बनारसी-दासांच्या आत्मबलाचाच प्रभाव गोस्वामीच्या पुढील श्लोकात दिसून येतो—

दया धर्मका मूल है, पापमूल अभिमान । तुलसी दया न छोडीये, जबतक घटमे प्राण ॥

जैनांच्या कर्मसिद्धांताचे वर्णन करताना गोस्वामी म्हणतात—

सकल पदारथ है, जगमाही, कर्महीन नर पावत नाही ।

रहीम हाही या काळातील एक महाकवी होता. अरबी, फारसीप्रमाणेच तो हिंदी व संस्कृत भाषांचाही विद्वान होता. यांच्यावरही पंडित बनारसीदासांचा प्रभाव पडला. त्यामुळे पुष्कळसे आध्यात्मिक दोहे त्यांनी लिहीले. पंडित रूपचंद देखील अकबराच्या काळातील एक प्रसिद्ध जैन कवि होता.

कबीरसाहब देखील अकबरांच्या समकालीन होता. जैन सिद्धांतांचा त्यांच्यावर फार मोठा प्रभाव असल्याचे त्यांच्या पुढील पद्यावरून दिसून येते—

१) दुर्बलको न सताइये, जा की मोठी हाय । मुई खालकी स्वाससे, लोह भस्म हो जाय ॥ (अहिंसा)

२) कबिरा तेरी झोपडी है गठ कटोंके पास । जैसा करे वैसा भरे, तू क्यो हुआ उदास ॥ (कर्मसिद्धांत)

सहारनबीर हा अकबराचा खजिनदार होता. तो धर्माने जैन होता. त्याची सेवा व प्रामाणिकपणा पाहून अकबराने त्याला बरीच मोठी जमीन बक्षीस म्हणून दिली. त्या जागेवर त्याने गाव वसविले. त्याच्या नावावरून त्या गावाला सहारनपुर या नावाने ओळखले जाऊ लागले [१] सहारनबीर जिनेंद्र भगवंताच्या भक्त होता, म्हणून त्यानी सहारनपुरामध्ये १२ जैनमंदिरे बांधल्याची माहिती मिळते.

'ब्रह्म गुलाल' हा या काळातील जैनधर्मी बहुरूपी होता. सर्व जगात तो त्याच्या कार्याबद्दल प्रसिद्ध होता. चंदावरचा राजा कीर्ती सिंधु याने एकदा त्यास सिंहाचे रूप घेण्यास सांगितले. तो म्हणाला, 'या रूपात माणसाची देखील प्राणी-हत्येची भीती आहे' राजाने त्याला तीन खून माफ असल्याचे आश्वासन दिले. ब्रह्मगुलालाने असा

१. The city of Saharanpur was founded by a Digambar Jain. Shri Saharanbir singha who got the locality in Jagir from Akabar His son Guiabrai migrated to Delhi, when he built a Jain temple in kucha sukhanand. C. L. No. 280 in the list of Mahammadan and Hindu Monuments quoted in Ratandeep Kiran II ( Rajeshwarbhawan, Green park ) vol I P. 50.




कांही सिंहवेष धारण केला की, त्याला खरा सिंह समजून लोक भिऊन पळू लागले. राजकुमार म्हणाला, 'अरे हा सिंह कसला ! तो कोणाला खात तर नाही. कोल्हा आहे कोल्हा.' तलवारीच्या घावाहूनही शब्दाचा घाव अधिक परिणामकारी असतो. ब्रह्मगुलालाने राजकुमारावर असा काही झपाटा टाकला की, 'एका झपाटयातच राजकुमार मरण पावला.' राजाला दुःख झाले. तथापि तीन खून माफीचे त्याने आश्वासन दिलेले असल्याने तो गप्प बसला. पुन्हा एकदा त्याला दिगंबर नग्न मुनीचे रूप धारण करण्यास सांगितले ब्रह्मगुलालाने असा वेष धारण केला की त्याचे वैराग्य व उपदेश याचा श्रोत्यावर फार मोठा प्रभाव पडला आता ब्रह्मगुलालाने वनाची वाट धरली. लोकांना हेही त्याचे सोंगच वाटले. ब्रह्मगुलालाने उत्तर दिले की मुनिवेष एकदा धारण केल्यानंतर तो सोडून द्यावयाचा नसतो. घरादाराला ब्रह्मगुलालाने कायमचा रामराम ठोकल्याचे पाहून राजाच्या मनात देखील वैराग्य उत्पन्न झाले. तो देखील मुनी बनून ब्रह्मगुलालाप्रमाणे तपश्चर्या करू लागला.

'मन्नादाई' नावाच्या या काळातील जैनधर्मी स्त्रीने महाराणा उदयसिंहाचे प्राण वाचविण्यासाठी आपल्या प्राणाहून प्रिय अशा एकुलत्या एका मुलाचे बलिदान दिले असल्याची माहिती मिळते. याचवेळी 'आशाशाह' नावाचा एक जैनधर्मी राजा होता. आपले प्राण संकटात घालून त्याने उदयसिंहाला आधार दिला आणि वनवीरासारख्या शक्तिशाली क्रूर सम्राटाशी भयंकर युद्ध करून उदयसिंहाला सिंहासनारूढ केले.

भामाशाह हा अहिंसा धर्माचा अनुयायी महान योद्धा होता. महाराणा प्रतापासारख्या प्रतापी राजाने त्याला आपला सेनापती बनविले होते. या देशभक्त जैनाने देशरक्षणासाठी आपली अपरंपार संपत्ती महाराणा प्रतापाच्या चरणी अर्पण केली. महाराणा उदयसिंह, महाराणा प्रताप इत्यादी किती तरी जैन धर्मावर प्रेम करणारे अकबराच्या काळी होऊन गेले. यांच्या कारकीर्दीत अनेक जिनमंदिरे बांधण्यात आली. जैनधर्म या काळात समाजात मान्यवर धर्म असून जैन साहित्याचीही या काळात राजांच्या उदार आश्रयामुळे मोठ्या प्रमाणात प्रगति झाली.

जैनधर्माविषयी अकबराची किती समन्वयदृष्टि होती याची माहिती अकबराच्या आज्ञापत्रावरून देता येते. १५ जून १५८४ रोजी जैनाचार्य हीरविजय यांच्याकडे सोपविलेल्या आज्ञापत्रात म्हटले आहे की, १) बहुभाग जैन वस्ती असलेल्या गावी भाद्रपद महिन्यात होणाऱ्या पर्युषण पर्वात कोणीही कसल्याही पशूंची हत्या करू नये.' २) १५९२ च्या आज्ञापत्राने अकबराने जैनांची तीर्थस्थाने जैनांच्या स्वाधीन केली व जैन तीर्थस्थानावर प्राणी हिंसा घडू नये हे स्पष्ट केले. ३) ५–६–१५९३ रोजी काढलेल्या आज्ञापत्रात मोराची हिंसा करू नये व शिकार खेळू नये अशी आज्ञा दिलेली दिसते.

महावीर निर्वाणोत्सव साजरा करण्यासाठी दिवाळीच्या दिवशी आपल्या किल्ल्याच्या उंच स्तंभावर चढून ज्यात अडीच मण तेल मावेल असा प्रचंड दिवा अकबर स्वतः आपल्या हस्ते लावीत असे व आपला प्रणाम करीत असे. या पवित्र दिवशी गोरगरीबांना तो मिठाई व गरम कपडे वाटत असे नंतर गावभर दीपोत्सव साजरा केला जात असे.[१]

श्री. वी. ए. स्मिथ यानी आपल्या 'जैन टीचर ऑफ अकबर' या पुस्तकाच्या पहिल्या भागातच पृष्ठ ३८६ वर लिहीले आहे की, "खरोखर कित्येक वर्षे जैन साधूनी आपल्या धर्माची शिकवण दिली. त्या शिक्षण संस्कारामुळेच अकबराच्या हातून जैनधर्माची प्रभावना घडून आली आणि अकबर जैन बनला असे लोक समजू लागले. पोर्तुगीज पादरी, Pinheiro हा अकबर बादशहाच्या कारकिर्दीत भारतात आला होता. अकबराचे वागणे आणि त्याचे हुकूम पाहून त्याने आपल्या बादशहाला दि. ३ सप्टेंबर १५९५ ला एक पत्र लिहून कळविले की, अकबर जैनधर्मानुयायी होता. "He (Akbar) follows Jainism."

१ बनारसी विलास (बंबई संस्करण) प्रस्तावना




मोगल साम्राज्याच्या इतिहासात अकबराची कारकीर्द ही सर्वांगीण दृष्टिकोणातून अतिशय महत्त्वाची कारकीर्द होय. अकबराने स्वीकारलेल्या समन्वयाच्या व परधर्मसहिष्णुततेच्या धोरणामुळे या काळात जैनधर्माच्या साहित्यात, आचारविचारात सर्वांगीण प्रगति झालेली दिसते. जैनधर्मीय राजाना व आचार्याना समाजात तसेच राजकीय जीवनातही आदराचे व मानाचे स्थान असलेले दिसते. या आचार्यांच्या विचारांचा प्रभाव सम्राट अकबर बादशहावरही झालेला दिसतो.

**जहांगीर** (१६०५ ते १६२७) बादशाह अकबरानंतर राज्यसत्तेवर आलेला हा बादशाहा होय. जैन साधूचा हा फार मोठ्या प्रमाणात सत्कार करीत असे. श्री जिनसिंह या जैनाचार्यांचे ज्ञान व चारित्र्याचा त्याच्यावर चांगलाच प्रभाव पडलेला होता आणि जहांगिराने त्याना 'युगप्रधान' (जगातील सर्वश्रेष्ठ) अशी पदवी अर्पण केली होती[१]. जहांगीर बादशहाने हरिविजयसूरि, श्री विजयसेन आणि श्री जिनचंद्र या जैनाचार्यांचा फार मोठा सन्मान केला होता[२]. जैन तीर्थक्षेत्रे आणि त्याच्या आसपास कोणीही जीवहिंसा करू नये, असा सार्वजनिक हुकूम त्याने काढलेला होता[३]. जैनांच्या दशलक्षण पर्वात लागोपाठ दहा दिवसपर्यंत संपूर्ण राज्यात सर्व प्रकारच्या जीवहिंसेवर बंदी घालण्यात आलेली होती[४]. जैनांचे सण व पवित्र धर्मदिनी हत्या बंद ठेवण्याचा हुकूम जहांगीराने इ. स. १६०८ ला पंडित विवेकहर्षाला दिला होता[५]. जहांगीर अतिशय दयाळु आणि अहिंसाप्रेमी होता[६]. अकबर बादशहानी पशुवध बंदीचे जितके दिवस ठरविले होते त्यात जहांगीर बादशहाने भर घातली.

पंडित बनारसीदास हे या काळातील एक अध्यात्मिक जैन कवि होते. एकदा एका दरबाऱ्याने जहांगिराकडे तक्रार केली की, बनारसीदास नमस्कार करीत नाहीत. जहांगीर बादशहाने त्यांना नमस्कार करण्यास सांगितले, तेव्हा बनारसीदास म्हणाले—

जाके परभाव आगे भागे पर- भाव सब । नगर नवल सुख सागर की सीम है ॥
संवरका रूप धेरे, साधे शिव-राह ऐसो । ज्ञानी पातशाह ताको मेरी तसलीम है ॥

हा दोहा ऐकून, जहांगिराला फारच आनंद झाला. तो म्हणाला, 'आपको मुझे नमस्कार, वंदना या तसलीम करनेकी आवश्यकता नहीं ।'[७]

'भगवतीदास' हे जहांगिराच्या कारकीर्दीतील सुप्रसिद्ध कवि होते. ते बुडिया जिल्ह्यातील अम्बाला गावचे रहिवासी व दिल्लीतील श्री महेंद्रसेनाचे शिष्य होते. जहांगिराच्या काळी त्यांनी संस्कृत आणि हिंदी भाषेत अनेक ग्रंथाची रचना केली[८].

'हीरानद' हे या काळातील दिल्ली जवळील जहानाबादचे निवासी जैन विद्वान होते. जहांगीर बादशहाच्या कारकीर्दीत त्यांनी पंचास्तिकाय टीका लिहीली, तसेच समवसरण स्तोत्र, द्रव्यसंग्रह आणि एकीभावना इत्यादी अनेक रचना केल्या[९].

---



१. New Indian Antiquary Vol. I P. 520.
२. जे. के. नरीमन, सपादक 'बवई क्रानिकल' उर्दु दैनिक मिलाप कृपण नं. ऑगस्ट १९२५ पृ. २२.
३-४-५ Jahangir forbidden hunting, fishing, and slautering other, animals during the ten days of paryushan in his reign Alfred Master g. c. s. Vir Nirvan Day in London (w j. m.) P. 4
६. 'कल्याण' गोरखपुर १९४५ पृ. २०४, २२५, २२६.
७. सन्मति संदेश, जानेवारी १९६७ पृ. ३२. ८. दिल्ली जैन डायरेक्टरी, पृ. १०.
९. विशेष माहितीसाठी पहा— सन्मति संदेश (मे १९६६) पृ. २९.






'सेठ शांतिदास' या काळातील प्रसिद्ध व्यक्तीने शत्रुंजय क्षेत्रावर श्री शांतिनाथ तीर्थंकरांचे विशाल मंदीर बांधले[1]. अहमदाबाद गॅझेटमध्ये दिलेल्या माहितीवरून हे ऐतिहासिक मंदिर असल्याचे स्पष्ट होते[2].

जहांगिराच्या कारकीर्दीत त्याच्या साम्राज्यात पुष्कळशी जैन मंदिरे बांधली गेली. ही गोष्ट ऐतिहासिक पुराव्यासह सिद्ध झाली आहे. लाहोर येथील श्री शांतिनाथ तीर्थंकारांचे मंदिर तर फारच सुरेख आहे. ते पाहून जहांगीर बादशहाही त्या मंदिरावर आकृष्ट झाला होता. जहांगिराच्या कारकीर्दीत अनेक प्रसिद्ध ग्रंथ व त्यांच्यावर टीका लिहिल्या गेल्या. नग्न जैन मुनींचा विहार निरनिराळ्या प्रदेशातून या काळात मुक्तपणे होत होता. रथयात्राही मोठ्या उत्सवाने व उत्स्फूर्ततेने होत असत. जहांगीर बादशहानी या धर्माला प्रत्यक्षपणे पाठिंबा दिलेला नसला तरी, या धर्माकडे तो समन्वयाच्या दृष्टीने पहात असल्याने या काळात जैन धर्माचा सर्वांगीण दृष्टीने प्रसार झालेला आपणास दिसून येतो. जैन मंदिरेही या काळात मोठ्या प्रमाणात बांधली गेली, साहित्य निर्मितीही प्रचंड प्रमाणात झालेली दिसते.

शहाजहान (१६२७-१६५८) जहांगिरानंतर मुघलांच्या सत्तेवर आलेला हा बादशाहा जैनांच्या सत्यता, प्रामाणिकपणा व अहिंसक आचाराने चांगलाच प्रभावित झाला होता. हिसार (पंजाब) येथील जैन सेठ दीपचंद यांना त्याने दिल्लीला बोलावले. राहण्यासाठी त्यांना चार पाच बिघे जमीन, पोषाख, शाल बिधी वगैरे वस्तु त्यांना दान केल्या व त्यांचा यथोचित सत्कार केला. तसेच त्यांना आपल्या राज्याचा प्रमुख खजिनदार बनविले. सेठजीने जैन मंदीर बांधण्याची परवानगी मागितली तेव्हा मंदिरासाठी मोफत जमीन देऊन मंदिराच्या बांधकामात त्यांनी सेठजींना मोठे सहकार्य केले शहाजहान बादशहाचा एक सेनापती जैन होता. युद्धप्रसंगी तो भगवंताची मूर्ती आपले जवळ बाळगीत असे व फौजेचे कार्य सुरू होण्यापूर्वी मूर्तीची पूजा करीत असे. त्याच्या असामान्य शौर्याने प्रसन्न होऊन शहाजहानने लाल किल्ल्यासमोर स्वतः त्यास जमीन देऊन तेविसावे तीर्थंकर पार्श्वनाथ यांचे मंदीर बांधण्याची आज्ञा केली. ते मंदिरच आज लालमंदिर म्हणून ओळखले जाते. मंदिर पाहण्याजोगे असून प्रशस्त आहे.

शहाजहान देखील महाकवी पंडित बनारसीदास यांचा फार सन्मान करीत असे[3]. त्याच्या कारकीर्दीतच शालिवाहन नावाच्या एका जैन विद्वानाने आग्रा येथे हरिवंशपुराणाची रचना केली[4]. त्याच्या राज्यातच दिल्ली दरवाज्याजवळ दिगंबर जैन मंदिर बांधण्यात आले[5]. इ. स. १६३५ मध्ये जैन महाकवि पंडित रूपचंद यांनी पाठ समवसरणाची रचना केली होती[6]. शहाजहानचे पाचहजारी उमराव आणि जाफरखानचे दिवाण (मंत्री) अभयराज हेही जैन होते. त्यांचा मुलगा जगजीवन हा एक महाकवी होता. त्याने अनेक ग्रंथ आणि कविता लिहिल्या आहेत[7].

शहाजहानच्या कारकीर्दीत अनेक दिगंबर जैन नग्न साधु विनाअटकाव राज्यात कोठेही विहार करीत होते[8]. श्री. जी. के. नरीमन, संपादक 'बंबई क्रॉनिकल' यांच्या मते शहाजहानने अकबर आणि जहांगिरापेक्षा अधिक उपयोगी असे जीवहिंसा रोकण्याविषयी व जैनधर्माची प्रभावना घडण्यास उपयुक्त असे हुकूम जाहीर केले होते[9].

---

१. Epigraphica India Vol. II.
२. *According to Ahmadabad Gazattee Vol. III 1879, this Jain temple of Shantidas is Historical* one, most beautiful of worthseeing–Bombay ke Jain Smarak, P. 43
३. बनारसी विलास (बंबई संस्करण) प्रस्तावना. ४. जैन सिद्धांत भास्कर वर्ष ६ पृ. १२६.
५. Delhi Jain Directory (Jain Sabha Delhi) P. 10.
६. *List of Mohemadan of Hindu Monuments vol I.* ७. *जैन ग्रंथ प्रशस्ति संग्रह पृ. १५.*
८. वीर दिल्ली (१-२-१९३२) अंक १ पृ. १५५.
९. उर्दू दैनिक मिलाप ऑगस्ट १९३९ पृ. ३६.

सेठ शांतिदासानी अहमदाबाद येथे इ. स. १६३८ मध्ये कोट्यावधी रुपये खर्चून भगवंताचे सुंदर व विशाल मंदिर बांधविले. या मंदिरालाच हल्ली चिंतामणी मंदिर असे म्हणतात[१].

इ. स. १६४६ साली औरंगजेब राजकुमार असताना त्याने या ऐतिहासिक मंदिराला मशिदीचे रूप दिले. जैन लोकांनी शहाजहान बादशहाकडे तक्रार केली. तेव्हा शहाजहान औरंगजेबावर रागवला आणि त्याच्या या कृत्याची त्याने निंदा केली व परत पहिल्याप्रमाणेच आकर्षक जिनमंदिर बनविण्याची आज्ञा दिली. इतकेच नव्हे तर त्यासाठी लागणारा सर्व खर्च सरकारी खजिन्यातून करण्यात आला. स्वतःच्या हुकूमानेच त्यांनी या मंदिरामध्ये भगवान पार्श्वनाथाची मूर्ती विराजमान करविली[२].

'राजा जुंझारसिंग' हा शहाजहानच्या काळी बुंदेलखंडाचा राजा होता. तो जैनधर्मी असून मोठा नावाजलेला वीर योद्धा होता. त्याच्या शौर्यावर खूष होऊन शहाजहानने त्याला दक्षिणेचा शासक बनविले व तसे त्यास लेखी अधिकारपत्रही दिले होते. हा राजा न्यायदानाबाबतीत अत्यंत प्रसिद्ध असून त्याच्या न्यायदानाच्या कार्यावर प्रजा अपरंपार खूष होती. प्रजेला जास्तीत जास्त सुखी ठेवण्याच्या दृष्टीने तो निरनिराळे प्रयत्न करीत असे[३].

आग्रा येथील ताजमहाल शहाजहानने बांधला असे समजले जाते. तथापि काही विद्वानांनी नवीन संशोधनाच्या आधाराने तो रजपूत राजांचा महाल होता हे दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे.

शहाजहान बादशहाच्या काळातही धर्माबाबतीत समन्वयतेचे धोरण स्वीकारलेले असल्याने जैन धर्माची प्रगति झालेली दिसते. त्यामुळेच या जैन साहित्य, वास्तुकला इत्यादी क्षेत्रातही या काळात असामान्य प्रगति झालेली दिसते. जैन तत्वज्ञानाचा प्रभाव शहाजहान बादशहावरही पडलेला होता.

औरंगजेब (१६५८–१७०७) हा शहाजहाननंतर गादीवर आला. हा अत्यंत कट्टर धर्माभिमानी होता. या कट्टरपणामुळे इस्लाम धर्माची खरी सेवा करण्याऐवजी त्याने आपले राज्यच दुबळे बनविले. तरीही त्याची सत्यनिष्ठा, प्रामाणिकपणा व चारित्र्यबळ या गुणामुळे या भयानक काळीही जैनधर्म समाजात वाढतच राहिला[४]. डॉ. बर्नियर औरंगजेबाच्या काळात भारतात आला होता. तो म्हणतो की, "मी नग्न मुनींना मोठमोठ्या शहरी विहार करताना पाहिले, स्त्रिया व मुली देखील कमलाही संकोच न बाळगता त्याचे दर्शन घेत असत[५]."

'सेठ शांतिदास जौहरी' हे या काळातील एक अत्यंत श्रद्धाळू जिनेंद्रभक्त होते. ते अहमदनगर येथे रहात असत. औरंगजेबाने त्यांना आपले दरबारी बनविले होते[६]. 'अरुणमणिजी' नावाच्या प्रसिद्ध विद्वानांनी इ. स. १६५९ साली औरंगजेबाच्या काळातच 'अजितनाथ पुराण' नावाच्या महान ग्रंथाची रचना केली. (श्लोक ४०–४१) 'जगतराम' हा थोर विद्वान जैन कवि या काळातच होऊन गेला. त्यानेही अनेक अध्यात्मिक

---

१. Archaeological survey of India Report Vol. XVI.

२. Bombay Prant ke Smarak P. 6. ३. नौविधि (प्रेमचंद) सरस्वती प्रेस, वाराणसी पृ. ३.

४. Although Aurangzeb was famous for his despotism the profound learning & vigarous feelings to do good to mankind at large, the Jain saints so much affected the heart of the despotic emperor that he was inclined to entertain & honour their chiefs.

५. I have seen them (Naked Saints) walk, start naked through a large town, women & girls looking at them without any more emotion, females often bring them alms with devotion. – Dr. Bernier's travels the Mughal empire P. 317.

६. Aurangzeb appointed 'Jobari Shantidas Jain, a Jewellar of Gujarat as one of his Darabari. – Dev Jainis naus. P. 67.




ग्रंथाची रचना केल्याची माहिती मिळते[१]. पंडित बनारसीदासांचाही औरगजेबाने सत्कार केला होता. यानीही या काळात अनेक जैन अध्यात्मिक ग्रंथांची रचना केली.

पंडित विनोदीलाल यांनी औरंगजेबाच्या कारकीर्दीतच वि. सं. १७४६ साली जैन मुनी श्री विश्वभूषण यांच्या भक्तामराची संस्कृत टीका लिहिली. त्या टीकेत त्यांनी 'चक्षु वैसत्यं' हकीकत लिहिली आहे की, औरंगजेबाच्या राज्यात जैनांना जिनेंद्रमूर्तीच्या पूजादिकाचे पूर्ण स्वातंत्र्य होते[२].

औरंगजेबाच्या काळी सन १६८९ साली चांदखेडी जिल्हा कोटा, (राजस्थान) येथे भ. महावीरांचे मंदिर बांधण्यात आले. पंचकल्याणिक पूजा झाली. यावेळी रथोत्सवही मोठ्या उत्साहाने साजरा करण्यात येऊन मूर्तीची स्थापना करण्यात आली[३]. प्रो. रामस्वामी अय्यंगार यांच्या शब्दात असे म्हणता येईल की, 'जैनांचे चरित्र, त्याग, विद्या आणि ज्ञान इतके उज्वल होते की, त्यांनी अल्लाउद्दीन खिलजी किंवा औरंगजेब यासारख्या कट्टर मुसलमान बादशहाकडूनही सन्मान प्राप्त केला[४].'

दिल्ली येथील लालकिल्ल्यासमोरील जैन लालमंदिरातील नगारखान्यात नेहमी नगारा वाजत असे. त्याविषयी शहाजहान बादशहाने तक्रार केली नाही तथापि औरंगजेब कट्टर होता. त्यानी नगाऱ्याच्या आवाजामुळे सरकारी कामात व्यत्यय येतो या सबबीवर नगारा बंद करण्याचा हुकूम दिला. त्याच्या हुकूमाप्रमाणे नगारा कोणी वाजविला ना ी पण नगाऱ्याचा आवाज मात्र पूर्वीप्रमाणे येतच राहिला. ही बातमी समजताच स्वतः औरंगजेब मंदिरात आला व आपल्या डोळ्यानी पाहून नगारा कोणीही न वाजविता वाजतच आहे याची खात्री करून घेतली व आश्चर्यचकितच झाला. त्याने तावडतोब नगाऱ्यावरील बंदी हुकूम काढून घेतला व जैन मंदिरात नगारा वाजविण्यास परवानगी दिली[५].

औरंगजेब उत्कृष्ट राज्यकर्ता, प्रचंड साम्राज्याचा सम्राट व मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध असला तरी इस्लाम धर्माच्या प्रसाराचे त्याने स्वीकारलेले धोरण त्याच्या कार्यास व मोगल राजवटीस काळीमा लावणारे ठरले. या काळात अनेक रजपूत, शीख इत्यादी हिंदु सरदाराना बाटवून मुस्लीम करण्याचे प्रयत्न औरंजेबाने केले. गुरु अर्जुनदेव, गुरु तेजबहाद्दूर यांनी तर आपल्या धर्मरक्षणार्थ देहत्यागही स्वीकारला. अनेक हिंदु, बौद्ध व जैन मंदिराची या काळात नासधूस करण्यात आली, त्याचे मशिदीत रूपातर करण्यात आले. त्यामुळेच सर्वसामान्य समाजाच्या मनात मुस्लीम धर्माविषयी तसेच मोगल राज्यकर्त्याविषयी घृणा निर्माण झाली. औरंगजेबाने स्वीकारलेल्या धर्मद्वेष्टचा धोरणामुळे या काळात जैनधर्माने आपले अस्तित्व कायम टिकविण्याच्या दृष्टीने प्रयत्न केले. तथापि या काळात जैन साहित्य, कला इत्यादी विविध क्षेत्रामध्ये फारशी प्रगति झाली नाही.

बहादूरशहा ( १७०७–१७१२ ) औरंगजेबानंतर मोगल घराण्याच्या सत्तेवर बहादूरशहा हा सम्राट म्हणून आला. याच्या कारकिर्दीत अनेक जैन मंदिरे बांधण्यात आली. रथोत्सव साजरे केले जैनांच्या धर्मकार्यात या काळात कोणताही अडथळा किंवा विघ्न आले नाही. बहादूरशहानंतर एक वर्षाच्या काळासाठी सत्तेवर आलेल्या जहांदरशहा यानेही जैनधर्माच्या प्रसाराला किंवा धर्मकार्याला विरोध केलेला दिसत नाही

---

१. अनेकांत (१९६४) पृ. १३३. २. विनोदी लालकृत भक्तामर स्तोत्र श्लोक ३९, ४०, ४२.

३. Jainism in Rajasthan P. 36.

४. Jainacharyas by their charactor, attainment & scholarship commended the respect of even Mohamadan sovereigns like Allauddin Khilji and Aurangzeb Badashah. (Aurangzeb) studies in South India Jainism Vol. II P. 132. ५. नवभारत टाईम्स दिल्ली ता. १०–८–१९५९ पृ ३.



फरुखबहादूर ( १७१३ ते १७१८ ) या मोगल बादशहाचे राजकीय खजिनदार घासिराम नावाचे जैन गृहस्थ होते. त्यांनी दिल्लीमध्ये जैन धर्माची प्रभावना केली. रामचंद्र छावडा यांनी या काळातच दिल्ली येथे एक जैन मंदिर बांधले.

मोहम्मदशहा ( १७१९ ते १७४८ ) हा अहिंसक असून जैनांचा फार मोठ्या प्रमाणावर आदर ठेवीत असल्याची माहिती मिळते. याच्या कारकिर्दीतच १७४६ साली जैन विद्वान पंडित रामचंद्र याने आदि (ऋषभदेव) पुराणाची प्रतिलिपी तयार केली. ती आज देखिल दिल्लीच्या धर्मपुरा पंचायत दिगंबर जैन मंदिरात सुरक्षित आहे. मोहम्मदशहाचे राजकीय खजिनदार हिसार ( पंजाब ) चे राजे हरसुखलाल यांनी धर्मपुरा येथे एक अत्यंत सुंदर असे जैन मंदिर बांधविले. त्या मंदिरातील वेदीसमोरील सिंहयुगलाचे जडाऊ काम आग्र्याच्या ताजमहालापेक्षा सूक्ष्म व उत्तम असे आहे. सिंहाच्या मिशीचे केस वेगवेगळ्या दगडांनी अंकित करण्याचे कार्य निःसंदेह अत्युत्तम आहे. राजा हरसुखराम आणि त्यांचे पुत्र सुगनचंद यांनी अनेक ठिकाणी सुमारे ५७ जिनमंदिरे बनविली[१].

मोहम्मदाच्या सहारनपुर येथील स्थानीय नवाब सध्यान मोहल्यात मशीद बनवीत होता, त्याला अडविले तरी तो ऐकेना हे पाहून त्या मोहल्यातील लोक बादशहाला जाऊन भेटले. लोकांचे म्हणणे ऐकून घेऊन मोहम्मद बादशहानी मशिदीच्या जागी भगवान पार्श्वनाथांचे मंदीर सरकारी खर्चाने बांधण्याचा हुकूम दिला. आजही संध्यान मोहल्यातील हे मंदीर प्रेक्षणीय असून बांधकामाच्या दृष्टीने अप्रतिम आहे[२].

'छत्रसाल' हा बुंदेलखंडातील या काळातला एक जैन राजा होता. तो बलाढ्य योद्धा असूनही अहिंसा तत्वाचा प्रेमी होता. वयाच्या ९५ व्या वर्षीही, मोहम्मदाने त्याला म्हातारा समजून केलेल्या स्वारीला त्याने शौर्याने तोंड दिले. जैन सम्राट देशसंरक्षणाच्या कामी दुर्लक्ष कसे करणार ! तो आजारी असतानाही दंड ठोकून रणांगणात उडी घेतली व तरुणांना लाजवील अशा असामान्य शौर्याने युद्ध केले. मोगल सम्राटाचा सेनापती मुहम्मदखान रणांगणावरुन पळून जाऊ लागला. त्याचा पाठलाग करुन वीर छत्रसालाने त्यास घेरले, 'पुन्हा कधीही तुमच्या राज्यात आक्रमण करणार नाही' असे वचन घेऊनच त्याला संधि करण्यास भाग पाडले[३].

अहमदशाह (१७४८ ते १७५४) अहमदशाहाच्या कारकीर्दीत अनेक जैन मंदिरे बांधण्यात आली. दिल्ली वगैरे अनेक ठिकाणी या काळात रथोत्सव साजरे झाले[४].

आलमगिर द्वितीय (१७५४ ते १७५७) याच्या कारकीर्दीत इराणचा कोटयाधीश व्यापारी सिंध येथे आला होता तेथे जैन मुनी अभयचंदजी यांची त्याच्याशी भेट झाली. मुनींचे चरित्र व उपदेश यांनी प्रभावित होऊन त्याने आपल्या कोटयावधि रुपयाची संपत्ती गोरगरिबांना वाटून तो जैन धर्मानुयायी बनला. जैन शास्त्रांच्या स्वाध्यायामुळे सत्य म्हणजे काय याचे त्यास परिपूर्ण ज्ञान झाले. संपूर्ण संन्यासी वस्तूंचा त्याग करुन तो नग्न दिगंबर जैन साधू बनला. आलमगिर बादशहाने त्यास आज्ञा केली की, 'जैनधर्म सोडून तू परत इस्लाम धर्माचा स्वीकार कर नाही तर जिवंतपणीच तुझ्या अंगावरील कातडी सोलली जाईल.' त्याने उत्तर दिले की, 'एक दिवस शरीर नष्ट होणारच आहे. मग त्याचा मोह कशाला, अनादिकाळापासून शरीरामागून शरीरे मिळत आलेलीच आहेत. जन्म-मरण आणि शारीरिक बंधनातून सुटका होऊन मी कधी मुक्त होईन ? असा दिवस केव्हा तरी पहावयास मिळेल या भावनेनी मी जैन धर्माचा स्वीकार केला आहे. पवित्र व अविनाशी सुखाच्या साधनाला मी कसे सोडू. आलमगिराच्या रागाचा पारा चढला व जिवतपणीच त्याची कातडी सोलण्याची त्याने आज्ञा दिली. खाटीक त्याच्या शरीरावरील कातडे सोलीत होता तथापि धन्य तो संयमी की त्याच्या चेहऱ्यावर स्मितहास्य दिसत होते[५].

---

१. विशेष माहितीसाठी पहा अनेकांत एप्रिल १९३९. २ विशेष माहितीसाठी पहा सन्मति संदेश मे १९६०.
३. धर्मयुग (बंबई) १८ एप्रिल १९६५, पृ. ५०. ४. दिल्ली रथयात्रा.
५. श्री विश्वमर पाडे संपादक, 'विश्ववाणी' अलाहाबाद, सन्मति संदेश (एप्रिल १९६३) पृ. ५-६.

 

अभयचंद्र हे या काळातीलच एक प्रसिद्ध जैनाचार्य होते. त्याच्या वाणीमध्ये अशी काही जादू भरलेली होती की ऐकणारा प्रभावित होऊन सहजगत्या जैन धर्माचा स्वीकार करीत असे एक यहुदी आपला आत्मा शरीराहून वेगळा आहे हे समजल्यानंतर कोट्यावधी रुपयाच्या मालमत्तेचा व सुख साधनाचा त्याग करून स्वेच्छेने साधु वनला. त्याने आपल्या जीवनाचे वलिदान केले पण जैनधर्म सोडला नाही अशा प्रकारची अटळ श्रद्धा निर्माण करण्याची ताकद आचार्यांच्या वाणीमध्ये होती. गहन तत्वज्ञानाचा प्रसार करून जैनधर्माचा प्रसार करण्याचे व अटळ श्रद्धा ठेवणारा समाज निर्माण करण्याचे कार्य अभयचंद्रानी केले.

## दक्षिण भारतातील जैनधर्म–

भगवान ऋषभदेवापासून ते भगवान महावीरापर्यंतच्या चोवीस तीर्थंकरांची जन्मभूमी उत्तर हिंदुस्थान असली तरी त्या तीर्थंकरांचा विहार दक्षिण भारतातही झालेला होता. दक्षिण भारतात जैनधर्माच्या प्रसाराला निश्चितपणे केव्हापासून सुरुवात झाली, ही गोष्ट स्पष्ट नसली तरी, उपलब्ध ऐतिहासिक साधनानुसार अंतिम श्रुतकेवली भद्रबाहूच्या दक्षिणेतील प्रवेशानंतरच दक्षिण भारतात जैनधर्माचा प्रसार झाला असावा असे दिसते.

दक्षिणेतील साहित्य, शिलालेख, दंतकथानुसार चंद्रगुप्त मौर्याच्या काळात उत्तर भारतात बारा वर्षाचा भयंकर दुष्काळ पडल्यामुळे भद्रबाहु श्रुतकेवली आपल्या बारा हजार मुनींच्या संघाबरोबर दक्षिण भारतात आले. चंद्रगुप्त मौर्यही त्यांचेबरोबरच होता. श्रवणबेळगोळ येथे पोहचल्यानंतर भद्रबाहूंना आपला अंत समीप आल्याची जाणीव झाल्याने त्यांनी आपल्या संघाला चोल, पांड्य इत्यादींच्या प्रदेशात पुढे जाण्याचा आदेश दिला व स्वतः श्रवणबेळगोळमधील एका डोंगरावर, ज्याला कटवप्र म्हणतात, तेथे राहिले. आपला शिष्य चंद्रगुप्ताबरोबरच त्यांनी तेथे आपला अंतिम कालखंड व्यतीत केला व समाधिपूर्वक शरीराचा त्याग केला. चंद्रगुप्त मौर्य हा जैन होता व तो भद्रबाहुबरोबर दक्षिणेत आला असल्याचे निरनिराळ्या इतिहास साधनांच्या आधारे, लुईस राईस, महामहोपाध्याय आर. नरसिंहाचार्य, थॉमस, डॉ. पटीट, डॉ. स्मिथ इत्यादि विचारवंतानी स्पष्ट केले आहे[1]. सामान्यतः भद्रबाहुबरोबरच दक्षिण भारतात जैन धर्माची सुरुवात मानली जात असली तरी, काही विद्वानांच्या मते दक्षिण भारतात या अगोदरच्या काळापासून जैनधर्म अस्तित्वात होता. आपल्या मताच्या पुष्टयर्थ त्यांनी खालील मुद्दे दिले आहेत.

१) एवढ्या मोठ्या संख्येच्या साधूंच्या संघाला दक्षिणेत घेऊन जाण्याच्या अगोदर तेथे आपले यथोचित स्वागत होईल असा विश्वास त्याना असावा. जैन साधूंचा आहारविधि सोपा नसल्याने तो कोणत्याही अजैन माणसाला करता येणे अशक्य होते. यावरून कर्नाटक व तामिळनाडूच्या प्रदेशात भद्रबाहूंच्या आगमना अगोदर निश्चितपणे जैन समाज अस्तित्वात असावा[६].

२) श्रीलंकेचा राजा धंतुसेणच्या कारकीर्दीत लिहिलेल्या बौद्ध ग्रंथ महावंशामध्ये इ. स. पू. ५४३ पासून इ. स. ३०१ पर्यंतची माहिती आहे. त्यात अनुराधापुरच्या राजधानीचे वर्णन आहे. त्यात शहरात एक गिरी नावाची इमारत निर्ग्रंथासाठी असून त्यात बरेच निर्ग्रंथ रहात असल्याची माहिती आढळते. राजाने निर्ग्रंथासाठी एक मंदीर बांधल्याचीही माहिती मिळते[७]. यावरून इ. स. पू. ६ व्या शतकात 'श्रीलंका' मध्ये जैन धर्माचा प्रसार दिसतो. दक्षिण भारताच्या प्रदेशाशिवाय श्रीलंकामध्ये एकदम जैनधर्माचा प्रसार होणे अशक्य आहे.

---

१. लुईस राईस– म्हैसूर अँन्ड कुर्ग फ्रॉम द इन्स्क्रिप्शन्स, पृ. २-१०.
२. नरसिंहाचार्य– इन्स्क्रिप्शन्स ऍट श्रवणबेळगोळ, पृ. ३६-४०.
३. थॉमस– द जर्नल ऑफ द रॉयल एशियाटिक सोसायटी, १९०१.
४. डॉ. स्मिथ– अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया, पृ. ७५-७६.
५. डॉ. पटीट– एपिग्राफिक इंडिया जि. ३, पृ. १७१ व 'इंडियन ऍंटिक्वेरी' जि. २१, पृ. १५६.
६. डॉ. ए. एन. उपाध्ये 'प्रवचनसार प्रस्तावना'. ७. स्टडीज इन साऊथ इंडियन जैनिसम, पृ. ३१.

३) तमिळ प्रदेशात प्राचीनतम ब्राह्मी शिलालेख मदुरा व रामवाड जिल्ह्यात मिळाले आहेत. डॉ. सी. नारायणराव यांच्या मते या शिलालेखाचा संबंध जैन धर्माशी आहे. ज्या ठिकाणी हा शिलालेख मिळाला आहे त्याच्या शेजारीच जैन मंदिराचे भग्नावशेष व जैन तीर्थंकरांच्या मूर्ती आढळतात, ज्या मूर्तीवर सापाचा फणा किंवा तीन छत्र आहेत[1].

यावरून असे दिसते की, जैन धर्माने इ. स. पू. चौथ्या शतकातच श्रीलंका व तमिळ येथील समाजाच्या सामाजिक व धार्मिक जीवनात प्रभाव पाडलेला होता. कुरळ व तोलकाप्पियम् या प्राचीन तमिळ ग्रंथात आढळणाऱ्या जैन विचारावरून विद्वानांचे मत आहे की, वैदिक धर्माच्या प्रभावाच्या अगोदरच तमिळमध्ये जैन धर्माचा प्रभाव होता. नाळदियार हा किंवदंतीच्या मते पांड्य राजाच्या इच्छेविरुद्ध पांड्य देश सोडून जाणाऱ्या आठ हजार जैन मुनींची संयुक्त रचना आहे.

भगवान महावीरांनी स्वतः कलिंग देशामध्ये विहार करून जैनधर्माचा प्रसार केला होता. त्यामुळे कलिंग जैन धर्माचे प्रमुख केंद्र होते. याची माहिती महाराजा खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखावरूनही मिळते. या शिलालेखानुसार इ. स. पूर्व ४२४ च्या सुमारास मगध सम्राट नंदाने कलिंगला जिंकून तेथून जैन मूर्ती मगधाला नेल्या. याच मूर्ती मगधावर स्वारी करून खारवेलानी परत मिळविल्या. त्यावर स्व. काशीप्रसाद जायस्वाल यांनी लिहिले आहे की, 'जैन धर्माचा प्रवेश कलिंगच्या प्रदेशात शिशुनागवंशीय राजा नंदवर्धनाच्या काळातच झालेला होता. खारवेलाच्या पूर्वीही उदयगिरी पर्वतावर अर्हंताची मंदिरे होती, कारण त्यांचा उल्लेख खारवेलाच्या आलेखात आला आहे[2]. यावरून स्पष्ट होते की, खारवेलाच्या अगोदरपासूनच कित्येक शतके अगोदर या प्रदेशात जैनधर्म, राष्ट्रधर्म म्हणून स्थापन झाला होता. कलिंगला आंध्रची सरहद्द लागूनच असल्याने भगवान महावीरांच्या काळातच कलिंगहून आंध्रमध्ये जैन धर्माचा प्रसार झालेला असावा. तेथून तमिळ प्रदेशात जैन धर्माचा प्रसार झाला. तेथून जैन धर्माचा तमिळ प्रदेशाच्या दक्षिण भागात प्रसार होऊन तो धर्म सिलोनमध्ये पुढील काळात प्रसारीत झाला असावा. या घटना इसवी सनपूर्व पाचव्या किंवा चौथ्या शतकात घडलेल्या असाव्यात.

तमिळमधून इ. स. पू. तिसऱ्या शतकात जैन धर्माचा प्रसार कर्नाटकमध्ये झाला असावा. भद्रबाहूंचा शिष्य परिवार विशाखाचार्यांच्या नेतृत्वाखाली आपल्या गुरुंच्या अंतिम आदेशाप्रमाणे या प्रदेशात धर्म प्रसाराचे कार्य करीत असावा. यावरून स्पष्ट आहे की, 'भद्रबाहूवरोबरच जैन धर्माचा प्रसार दक्षिणेत झालेला नसावा तर त्यामुळे जैन धर्माच्या प्रचार व प्रसाराला बळ मिळाले व दक्षिण भारत पुढील काळात जैन धर्माचे प्रमुख केंद्र बनले. या भागातील अनेक राजघराण्यानी व राज्यकर्त्यांनी या धर्माला संरक्षण दिले व जनतेने या धर्माचा स्वीकार केला.

## आंध्र प्रदेशातील जैनधर्म–

आधुनिक साधनांच्या आधारे हे सर्वमान्य आहे की, 'आंध्र प्रदेशात जैन धर्म मौर्य काळाच्या पूर्वीपासून अस्तित्वात होता. या प्रदेशात बौद्ध संस्कृतीचा प्रभाव पडण्याच्या अगोदरपासून येथे जैन धर्म समाजमान्य होता. अशोकाने अहिंसा तत्वाचा स्वीकार करण्याच्या किंवा युद्ध त्यागाची घोषणा करण्याअगोदरच या प्रदेशात जैन धर्माचे तत्त्वज्ञान रुजले होते असे खारवेलाच्या आलेखावरून दिसून येते. खारवेलाच्या शिलालेखात दिलेल्या माहितीप्रमाणे नंद राजानी कलिंगहून जैन मूर्ती नेल्या त्यावरून तो जैन असावा, तसेच कलिंगमध्येही जैन धर्माला त्यावेळी महत्वाचे स्थान असावे. श्री पी बी. देसाई यांनी लिहिले आहे की, 'मार्कण्डेय पुराणाच्या तेलगू अनुवादानुसार आंध्र प्रदेशातील चार क्षत्रियवंश नंदवंशीय होते. नंद कलिंगवर राज्य करीत होते व जैन धर्माचे अनुयायी होते.

१ विशेष माहितीसाठी पहा– जैनिझम इन साऊथ इंडिया, पृ. २९ ते ३४.
२. जर्नल-ऑफ-बिहार-उडिसा रिसर्च सोसायटी, पृ ४४८.




यावरूनही जैन धर्माची या प्रदेशातील प्राचीनता स्पष्ट होते. या प्रदेशात जैन गुरूंची वस्ती होती. त्यानी जंगले साफ केली व आपली वसतिस्थाने निर्माण केली. प्रारंभी ही वसतिस्थाने छोटया छोटया ग्रामाच्या स्वरूपात असून त्यांना पल्ली म्हणत. पुढील काळात जैन धर्माच्या या अनुयायांनी अशी अनेक ग्रामे वसविली व तीच ग्रामे पुढे कसब्यात रूपांतरित झाली, त्यांनाच वस्ती म्हटले जात होते असे दिसते.

जैन धर्माच्या आंध्रमधील प्रवेशावरोवर तेथील तेलगू साहित्यावरही त्या धर्माचा प्रभाव पडलेला जाणवतो. तेलगु साहित्यामध्ये तीन चार ग्रंथ असे आहेत की, ज्याना जैन कलाकृती मानले जाते. सर्वात प्राचीन ग्रंथ म्हणजे नन्नय भट्टाचा महाभारत होय. हा ग्रंथ पूर्वीय चालुक्य राजा राजराज द्वितीय यांच्या आश्रयामुळे ११ व्या शतकाच्या मध्यामध्ये रचला गेला असावा. राजराज द्वितीयच्या काळात आंध्र प्रदेशात हिंदुधर्माच्या प्रसाराची मोठी लाट उसळली. त्यामुळे जैन धर्माचे पतन झाले. नन्नय भट्टाचा महाभारत जैन ग्रंथ नसला तरी नन्नयने चम्पू काव्याची शैली अवलंबिलेली दिसते, तसेच कन्नड जैन कवीचा अविष्कार या ग्रंथावरही आढळतो. यावरुन इ. स. ९ वे व १० वे शतकात या प्रदेशातील साहित्यावर जैन धर्माचा प्रभाव आढळतो.

आंध्र प्रदेशात मिळालेली उत्खलित साधनें व इतर अनेक भग्न अवशेष तेथील जैन धर्माचे प्राचीनत्व सिद्ध करतात. कुडुपह (Cuddapah) जिल्ह्यातील दानवुलपाडु (Danavulapadu) हे जैन धर्माचे एक महत्वाचे केंद्र होते. सन १९०३ मध्ये येथे भारत सरकारच्या पुरातत्व विभागाने उत्खनन केले. उत्खननात सापडलेल्या एका स्तंभावर जैन तीर्थंकर व जैन शासन देवतांच्या मूर्ती आढळल्या. त्यातील काही मूर्तींवर आठव्या किंवा नवव्या शतकातील लेखही आढळतात. येथें उत्खननात एक विटानी बांधलेली खोली मिळाली, ज्यात पार्श्वनाथ तीर्थंकारांची मूर्ती आढळली. खोलीच्या विटाही मोठ्या आकाराच्या असून, त्या कृष्णा जिल्ह्यातील विटांच्या प्रमाणाशी मिळत्या-जुळत्या आहेत. आंध्र प्रदेशातील काही नाणीही या उत्खननात मिळाली. उपलब्ध वस्तूवरून हे स्थान कमीतकमी तिसऱ्या शतकापासून जैन धर्माचे प्रमुख केंद्र असावे.

गंजम जिल्हा सध्या ओरिसात आहे. पूर्वीपासूनच हा जिल्हा आंध्र प्रदेशाचा उत्तरीय सीमांत प्रदेश होय. या जिल्ह्यातील शैलाद नावाच्या ठिकाणी डोंगरावर एका गुंफेत जैन तीर्थंकरांच्या मूर्ती आढळल्या आहेत. गुंफेच्या बाहेर भगवान महावीरांची मूर्ती आहे. जयति नावाच्या ठिकाणी दोन लहान जैन मंदिरांचे अवशेष मिळाले आहेत. मामिडीवाड, येथेही दोन जैन मंदिरे आढळतात. माचवरम् गावाच्या पश्चिमेस असलेल्या तलावाच्या काठावर दोन जैन मूर्ती आहेत. टाटिपाक, पोट्टगी, नंदपुरम् इत्यादी गावामधूनही छोटी मंदिरे व मूर्ती आढळून येतात. विजगापट्टम् जिल्ह्यातील धर्मवरम् नावाच्या ठिकाणी कायोत्सर्ग मुद्रेतील एक सहा फूट उंचीची मूर्ती जमिनीत अर्धा भाग गाडलेल्या अवस्थेत आढळते. या मूर्तीला 'संन्यासी अय्या' म्हणतात. संतानेच्छू स्त्रिया या मूर्तीची पूजा करतात. गोदावरी जिल्ह्यातील अरियवरम्, नेडुलूरु, आत्रेयपुरम्, कजलूरु, जन्नूरु, द्राक्षाराम इत्यादी गावांमध्ये जैन मूर्ती व मंदिरे आढळतात. नेल्लोर जिल्ह्यातील आत्मकुरु कसब्याच्या पश्चिमेस एका पहाडावर एक तीर्थंकराची प्रतिमा आढळते. कर्नूल जिल्ह्यातील याचवरम् व नायकल्लू या गावामध्ये जैन धर्माचे अवशेष मिळतात.

आंध्र प्रदेशातील जैन धर्माच्या प्रसाराची माहिती मिळविण्यास हाथीगुंफा येथील महाराजा खारवेलाचा शिलालेखही उपयुक्त आहे. खारवेल जैनधर्माचा महान् अनुयायी होता. इसवी सनपूर्व पहिल्या शतकातील या शिलालेखात जैन धर्माच्या प्रसारार्थ खारवेलाने केलेल्या कार्याची माहिती दिलेली आहे. या शिलालेखावरून स्पष्ट आहे की, कलिंगच्या दक्षिण भागात जैन धर्माचा प्रसार पूर्वीपासूनच होता व हा प्रदेश आंध्रच्या उत्तर सीमेला जोडणारा आहे. आंध्रमधील इ. स. पू. ६ व्या शतकापासून ते इ. स. पू. २ ऱ्या शतकापर्यंत जैन धर्माच्या स्थितीची काहीही निश्चित माहिती मिळत नाही. तथापि अनुमान करणे शक्य आहे की, महाराजा खारवेल






जैन धर्माचा संरक्षक असल्याने, या काळात आंध्रमध्ये जैनधर्म प्रसाराला चालना मिळाली असावी. त्याच्या सहकार्याने व प्रेरणेने जैन धर्म प्रसारकांनी आंध्रमध्ये निरनिराळ्या ठिकाणी जाऊन जैनधर्म प्रसाराचे कार्य केले असावे. कारण याच शिलालेखात खारवेलानी कुमारी पर्वतावर जैन गुरूंचे सम्मेलन भरविल्याची माहिती मिळते. यावेळीही सरहद्दीजवळच्या प्रदेशात धर्म प्रसाराचे प्रोत्साहन प्रचारकाना मिळाले असावे. या शिलालेखाच्या आधारावरून आंध्र प्रदेशात कलिंग देशातूनच जैन धर्माचा प्रसार झालेला असावा असे दिसते.

यानंतरच्या काळातील आंध्रमधील जैन धर्माच्या प्रसाराचे चित्र फारसे सुस्पष्ट होत नाही, कारण आंध्रमध्ये या नंतरच्या काळात धार्मिक व राजकीय जीवनात मोठ्या प्रमाणात परिवर्तन झालेले दिसते.

सातवाहन घराण्यातील राजानी इ. स. पू. तिसऱ्या शतकापासून ते इ. स. तिसऱ्या शतकापर्यंत आंध्रच्या काही भागावर राज्य केले. सातवाहन राजे बौद्ध व हिंदु धर्माचे आश्रयदाते होते. त्यानंतर इक्ष्वाकू वंशातील राजांचे या प्रदेशावर राज्य होते. तेही बौद्ध धर्माचेच उपासक होते. यानंतर सत्तेवर आलेल्या पल्लव राज्यांनी हिंदु धर्माला नुसता राजाश्रयच दिला नाही, तर या धर्माच्या प्रसाराचे विविध प्रयत्न केले. अशा प्रकारे इ. सनाच्या सातव्या–आठव्या शतकापर्यंत जैन धर्माला राजा किंवा त्यांच्या अधिकाऱ्याकडून कोणतेही महकार्य मिळाले नाही. या काळातही आंध्र प्रदेशात काही ठिकाणी आजीवकांची संख्या लक्षात घेण्याजोगी होतीच. जैन धर्म प्रसाराचे त्याचे कार्य थोडचा थोडचा प्रमाणात चालूच होते. कर्नाटकामध्ये चालुक्य घराण्याची स्थापना झाल्यानंतर, त्यांच्या जैन धर्माच्या राजाश्रयामुळे आंध्र प्रदेशातही काही प्रमाणात जैनधर्म प्रगतीला सुरुवात झालेली दिसते.

पूर्वीय चालुक्य वंशाच्या राजांनी जैन धर्माला प्रथमपासूनच संरक्षण दिले. पश्चिमीय चालुक्यवंशीय राजा पुलकेशी दुसरा याचा लहान बंधु विष्णुवर्धन याने सातव्या शतकाच्या प्रथम चरणामध्ये आंध्र प्रदेशात आपल्या वंशाची स्थापना केली. कुब्ज विष्णुवर्धनाची राणी अय्यण महादेवीने वेंजवाडाच्या नदुम्बी वस्ती नावाच्या जैन मंदिराला एक गाव दान दिल्याची माहिती मिळते. पूर्वेकडील चालुक्य वंशाच्या राजाकडून भौतिक सहाय्यता मिळाल्याने जैन धर्माला आपला प्रभाव व शक्ति संगठित करता आली. या वंशाचा एक शासक विजयादित्य सहावा उपनाम अम्म द्वितीय, हा जैन धर्माचा उदार आश्रयदाता होता. त्याने इ. स. ९७० पर्यंत राज्य केले. त्याचे तीन ताम्रपट प्रकाशित आहेत. त्यात जिन मंदिराला केलेल्या दानाची माहिती दिली आहे. या राजाने दिलेल्या यलिमपुंडी आज्ञापत्रानुसार, कटकराज दुर्गराजानी धरमपुरी गावाच्या दक्षिणेला एक जैन मंदीर बांधल्याची माहिती मिळते. दुर्गराज हा राज्यातील एक प्रमुख अधिकारी होता. कटकराज या त्याच्या पदवीवरून तो राजकीय हालचालींचा प्रमुख असावा असे दिसते. या मंदिराचे नावही कटकाभरण जिनानंद ठेवण्यात आले. दुर्गराजाच्या प्रार्थनेनुसार राजाने या मंदिरासाठी म्हणून मलिमपुंड हे गावही दान दिले. जिनालय यापनिय संघ, मंडुकगण, नंदीगच्छच्या जिननंदीचे प्रशिष्य, तसेच दिवाकर सेनाचे शिष्य मंदिराच्या देखरेखीचे काम पहात असल्याची माहिती मिळते.

कलुचुम्बुरु ताम्रपटात सर्व लोकाश्रय जिनभवन नावाच्या मंदिराच्या संबंधित भोजन गृहाच्या व्यवस्थेसाठी कलुचुम्बुरु गाव दान दिल्याची माहिती आढळते. याच राजाच्या मछलीपट्टमच्या दानपत्रात जैनधर्म विषयक उत्कृष्ट माहिती आहे. त्यात जैन धर्माचा उपासक असलेल्या एका मांडलिक कुटुंबाच्या व गुरूच्या परंपरेचा उल्लेख दिलेला आहे. ग्रेव्यगोत्र व त्रिनयन कुळाचा वंशज नरवाहन प्रथम, पूर्वीय चालुक्य राजाचा मोठा अधिकारी होता. त्याचा पुत्र मेलपराज व सून मेंडाम्बा जैन धर्माचे उत्साही अनुयायी होते. मेलपराजाचे पुत्र भीम व नरवाहन द्वितीय हेही जैन धर्माचे कट्टर अनुयायी होते. त्यांच्या गुरूचे नाव जयदेव होते. श्रावक–श्राविका, क्षपणक, क्षुल्लिका इत्यादींचे सम्मान भीम व नरवाहन द्वितीय यांचेकडून होत असे. गुरूच्या व आचार्यांच्या प्रेरणेमुळेच त्यानी वेंजवाडा येथे दोन जैन मंदिरे बांधली. या मंदिराला राजा अम्म द्वितीय याने पेडु गाडिदिपर्रु नावाचे गाव दान केल्याची माहिती मिळते




विजगापट्टन जिल्ह्यातील रामतीर्थ नावाच्या ठिकाणी दुर्गपंचगुंफाच्या दारावर एक शिलालेख खोदलेला आहे. तो शिलालेख विक्रमादित्यच्या (१०११–२२) राज्यकाळातील आहे. त्यात लिहिले आहे की त्याचे धर्मगुरु चित्रकाल योगी सिद्धान्त देवानी जे देशीगणाचे होते, राम कुंडाची मोठ्या भक्तीने पूजा केली. यावरून एक गोष्ट प्रथमतः स्पष्ट होते की, 'राजाने जैन धर्माचा अंगिकार करून, जैन गुरूला आपला आध्यात्मिक मार्गदर्शक बनविले होते.' दुसरा मुद्दा म्हणजे रामतीर्थ हे जैनांचे पवित्र स्थान होते. इतर साधनांच्या सहाय्याने ही माहिती मिळते की हे स्थान प्राचीन काळापासूनच जैन धर्माचे प्रभावशाली केंद्र व तीर्थक्षेत्र होते. इ. स. पहिल्या शतकात हे स्थान बौद्ध धर्माच्या अधिकारात होते. बौद्ध धर्माच्या पतन काळात जैनानी हे क्षेत्र आपल्या ताब्यात घेऊन त्याला धर्मस्थान बनविले असावे.

वरंगळच्या काकतीय राजानीही जैन धर्माला सहाय्य केले असावे. कारण वरंगळपासून जवळच अन्मकोंड पहाडावर पद्माक्षीचे मंदीर आहे. या मंदिराच्या समोरच एका स्तंभावर चारही बाजूला चार मूर्ती खोदलेल्या आहेत व एक शिलालेखही आहे. शिलालेखाचा काळ इ. स. ११९७ असून, तो पश्चिमीय चालुक्य राजा विक्रमादित्य सहाव्याच्या कारकीर्दीतील आहे. महामंडलेश्वर काकति प्रोल हा या राजाचा मांडलिक असून त्याच्या मंत्र्याची पत्नी मैलम हिने अन्मकोंड पहाडावरील जैन मंदीर बांधले व त्यासाठी भूमिदान केले.

अनंतपुर जिल्ह्यातील ताडपत्रीय शिलालेखावरून स्पष्ट होते की, 'येथे जैन मंदिरे असून, जैन गुरूची एक प्रभावशाली परंपरा चालू होती. शिलालेखाचा काळ ११९८ असून त्यात उदयादित्य नावाच्या मांडलिकाने मेघचंद्राला भूमिदान करण्याचा उल्लेख आहे. मेघचंद्र हा चंद्रनाथ पार्श्वनाथ वस्तीचा पुरोहित होता. मेघचंद्राच्या गुरूचे नाव भानुकीर्ति व प्रगुरूचे नाव बाहुबली होते.

कृष्णा जिल्ह्यात १२१३–१४ च्या सुमारास छेब्रोलु येथे मिळालेल्या शिलालेखात अनंतनाथ जिन मंदिराचा उल्लेख आहे. यावरून स्पष्ट आहे की तेराव्या शतकाच्या प्रारंभी येथे जिन मंदिर व जिन मंदिराचा उपासना करणारा जैन समाज अस्तित्वात होता. हंपीच्या संग्रहालयात असलेल्या जिन मूर्तीच्या खालील शिलालेखात कंडनब्रोलु नावाच्या नगरामध्ये एक चैत्यालय निर्मितीचा उल्लेख आहे. हा शिलालेख इ.स. १३१५ चा असून, विजयनगर राजा हरिहर दुसरा याच्या कारकीर्दीतील आहे. कर्नूलचेच प्राचीन नाव कंडनब्रोलु असावे व ही मूर्ति तेथीलच असावी. तथापि नंतरच्या काळात मूर्ति नष्ट झाली व केवळ त्याच्या खाली पाषाणच शिल्लक राहिला. यावरूनही आंध्र प्रदेशात जैन धर्म दीर्घकाळपर्यंत अस्तित्वात असल्याची माहिती मिळते.

यानंतरच्या काळात आंध्र प्रदेशात जैन धर्माच्या विनाशाची चिन्हे आढळतात. श्रीशैल येथे मिळालेल्या इ. स. १५१२ शिलालेखात लिंग नायर वीरशैवाच्या धार्मिक कृत्याचे वर्णन आहे. त्यात त्याने श्वेतांबर जैनांच्या हत्येचा गौरवाने उल्लेख केला आहे. यावरून स्पष्ट होते की, असामान्य प्रतिकूल परिस्थितीतही आंध्र प्रदेशात मुख्यतः श्रीशैल प्रदेशात जैन धर्म १६ व्या शतकापर्यंत अस्तित्वात होता व आंध्र प्रदेशातील जैन धर्माच्या विनाशाला इतर धर्मियानी केलेला अन्यायकारक अत्याचार हेच महत्वाचे कारण होते.

सामान्यतः वरवर पहाता आंध्र प्रदेशात जैन धर्माच्या अस्तित्वाचे कोणतेही मोठे चिन्ह मिळत नाही. कारण त्या प्रदेशात जैन धर्माचे महत्वपूर्ण व फार मोठे प्रभावशील अस्तित्व नव्हते. कर्नाटकमधील श्रवणबेळगोळप्रमाणे किंवा तमिळनाडूमधील कांचीप्रमाणे या प्रदेशात जैनाचे फार मोठ्या प्रमाणावरील कोणतेही प्रसिद्ध पवित्र स्थान नव्हते. कन्नड व तमिळ साहित्याप्रमाणे तेलगु साहित्यात जैनाची कोणतीही महान साहित्यकृती आढळत नाही. तथापि वस्तुस्थिती या प्रकारची असली तरी उपलब्ध झालेल्या विविध इतिहास साधनामधून व शिलालेखामधून या भागातील जैनांच्या असामान्य प्रभावाचे संपूर्ण ज्ञान होऊ शकते. आंध्र प्रदेशात जैन धर्माचा प्रवेश बौद्ध धर्माच्या अगोदर सुमारे इ. स. पू. सहाव्या शतकाच्या अगोदर झालेला दिसतो. बौद्ध धर्माबरोबर जैन धर्माला




संघर्ष द्यावा लागला व हा संघर्ष देऊनही जैन धर्माने या प्रदेशात आपले अस्तित्व कायम टिकविले. आंध्र प्रदेशातील मोठ्या भागात या धर्माचा प्रसार असून, त्या धर्माच्या तत्वांनी समाज प्रभावित झालेला होता. समाजातील मान्यवर वर्ग, राजे, सामंत इत्यादीनी या धर्माचा स्वीकार केल्याची व या धर्माच्या प्रसाराला मदत केल्याची माहिती मिळते. बौद्ध, हिंदु धर्माचा, धर्म प्रसारकांचा विरोध सहन करून, काही काळ याच धर्मांना राजाश्रय असतानाही जैन धर्माच्या अनुयायानी, प्रचारकानी, आपल्या असीम व अतुलनीय उत्साह शक्तीच्या जोरावर या विरोधाला तोंड देऊनही जैन धर्माचे त्या प्रदेशातील अस्तित्व कायम टिकविले. जैन धर्माला समाजात माननीय आदरणीय स्थान मिळवून दिले. त्यांच्या या प्रयत्नानेच समाजात दीर्घकाळ जैनधर्म अस्तित्वात असलेला दिसतो.

## तमिळ प्रदेशातील जैनधर्म—

दक्षिण भारतातील जैनधर्माची माहिती देण्यास अनेक शिलालेख उपयुक्त असले तरी, बहुतांशी शिलालेख मध्यकाळाशी संबंधित आहेत. त्यामुळेच दक्षिण भारतातील जैन धर्माच्या प्रसाराची माहिती मिळविण्यास तमिळ साहित्य हाच एकमेव व महत्वाचा ऐतिहासिक पुरावा आहे. कोणत्याही देशाचे साहित्य तत्कालीन समाज जीवनाचे अभिव्यंजन करणारे असते. त्यामुळे उपलब्ध तमिळ साहित्याच्या आधाराने तत्कालीन दक्षिण भारतातील जैन समाजाच्या सर्वांगिण जीवनाची, तसेच या प्रदेशातील जैन धर्माच्या प्रसाराची माहिती मिळू शकते. म्हणूनच दक्षिण भारतातील जैन धर्माच्या प्रसाराची व समाजामधील या धर्माच्या प्रभावाची माहिती मिळविण्यास तमिळ साहित्य हे सर्वांत महत्वाचे साधन आहे. संपूर्ण तमिळ साहित्याचे तीन काळात विभाजन करण्यात येते. १) संगमकाळ, २) शैवनायनार काळ, ३) अलवरांचा काळ किंवा आधुनिक काळ. तमिळ विद्वानांच्या मतानुसार संगम काळाचेही प्रथम, मध्यम व अल्प असे तीन विभाग पाडण्यात येतात. तथापि यांच्या इसवी सनाबद्दल विद्वानामध्ये अनेक मतभेद आहेत.

'तोलकाप्पिय' हा प्राचीन तामिळ वैयाकरणी सामान्यत: इ. स. पू. ३५० च्या उत्तरार्धातील मानला जातो. इंद्रच्या संस्कृत व्याकरणामध्येही याचा उल्लेख आला आहे.[1] श्री. एस. वैयापुरि पिल्ले यांच्या मते तोलकाप्पिय जैनधर्मानुयायी होता. या संबंधात त्यांची युक्ति अशी आहे की, तोलकाप्पियचा समकालीन, 'पतपारनार' यानी तोलकाप्पिय यांना महान व प्रख्यात 'पडिमइ' म्हटले आहे. पडिमइ हा प्राकृत पडिया शब्दापासून बनलेला आहे. पडिया (प्रतिमा) हा जैन शब्द आहे व तो जैनाचाराच्या नियमांचा सूचक आहे. तमिळ साहित्यातील दुसरा महत्वपूर्ण ग्रंथ तिरुवल्लवर रचित 'कुरल' होय. या ग्रंथाच्या रचनेचा काळ, धर्म इत्यादीबद्दल अनेक मते आहेत. तमिळ साहित्याच्या परंपरेनुसार कुरल ही वल्लुवरची कृती मानली जाते. तथापि त्यातील अनेक पुराव्यावरून त्यांचा निर्माता जैन होता असे दिसते. स्व. प्रो. शेषगिरी शास्त्रीच्या मते, वल्लुवर हा अर्हताचा अनुयायी होता. जैन साधु एलाचार्य कुरलचे रचयिता होते अशीही एक परंपरा प्रचलित आहे. स्व. प्रो. ए. चक्रवर्तीचे मत आहे की, जैनधर्माचे प्रमुख आचार्य कुंदकुद हेच एलाचार्य होत[2] भद्रबाहूच्या दक्षिण भारतातील प्रवेशावरून स्पष्ट आहे की, इ. सनाच्या प्रारंभापर्यंत जैनधर्म भारतात पसरलेला होता. या धर्माचा जनतेमध्ये विशेष प्रसार करण्यासाठी तेथील स्थानिक भाषेतच जैनधर्म साहित्य रचना करणे आवश्यक होते. त्यामुळेच या भावनेने तमिळमध्ये [कुरलसारख्या नीतीधर्मविषयक ग्रंथाची कुंदकुंदासारख्या विद्वानाकडून रचना होणे शक्य आहे. त्याच उद्देशानी त्यांनी त्या ग्रंथाला तामिळवासी वल्लुअरच्या तर्फे त्याच्या कृतीच्या स्वरूपात पुढे आणले हे यथार्थ वाटते. कुरल साहित्यात नुसत्या दक्षिण भारतीय संस्कृतीची सर्वोत्कृष्ट तत्त्वेच संग्रहीत नाहीत तर कौटिल्याच्या अर्थशास्त्राप्रमाणे प्रतिभेचे जाज्वल्यकणही यात आढळतात. त्यामुळे प्राकृत किंवा संस्कृत साहित्याचा

---

१. मॅक्डोनल–हिस्ट्री ऑफ संस्कृत लिटरेचर. पृ. ११.

२. कुदकुदकृत पचस्तिकायच्या इंग्रजी अनुवादच्या प्रस्तावनेवरून.




सखोल अभ्यास नसणाऱ्या वल्लुअरनी या ग्रंथाची रचना करणे अशक्य वाटते. आचार्य कुंदकुंदच या ग्रंथाचे निर्मिते असणे शक्य आहे. यावरून स्पष्ट आहे की, जैनगुरु दक्षिण भारतात इ. स. पूर्व काळातच पोहचलेले असून, तमिळ भाषेच्या द्वारे आपल्या धर्माच्या प्रसाराला त्यांनी सुरुवात केली. हलके हलके जैन धर्माने द्रविडांच्या हृदयाची पकड घेतली व त्यांनी दक्षिण भारताच्या प्रमुख धर्मामध्ये भाग घेतला. हिंदु धर्माचा विरोध असतानाही त्यांनी दक्षिणी भाषांना प्रोत्साहन दिले व त्या भाषेमधून आपल्या धर्माचा प्रसार केला. द्रविड साहित्य अभिवर्धित केले. त्यामुळे फेजरनी लिहिले आहे की, जैनांच्या या क्रियाशीलतेमुळेच दक्षिणेत नवविचार व साहित्य नवीन रूप व भावांनी परिपूर्ण झाले.

कुरल साहित्यानंतरचा कालखंड हा तमिळ साहित्याचा समृद्धीचा कालखंड मानला जातो. हा काळ बौद्धिक दृष्टीने जैनांच्या प्राबल्याचा काळ होय. या काळातच इ. स. च्या दुसऱ्या शतकात तमिळचा प्रसिद्ध ग्रंथ शिलप्पदिकारम्‌ची रचना झाली. या ग्रंथाचा रचयिता 'इलंगोवाडिगल' हा चेन राजकुमार शेंगोट्टुवक्का बंधू व बहुधा जैन धर्माचा अनुयायी असावा. शिलप्पदिकारम् व मणिमेखले या ग्रंथात तत्कालीन समाजजीवनाची माहिती मिळते. यावरून या काळात तमिळ प्रदेशात धार्मिक सहनशीलता अस्तित्वात असून जैनधर्माचा प्रचार राजघराण्यापर्यंत झाला होता असे दिसते. या दोन्ही काळामध्ये वर्णन केलेल्या जैन आचार–विचार व जैन विद्याकेंद्राच्या माहितीवरून जैन धर्माचा तमिळ प्रदेशात मोठ्या प्रमाणात प्रभाव पडला होता असे दिसते. या काव्यावरून आढळते की, या प्रदेशातील चोल व पांड्य राजवंशातील राजांनी जैन व बौद्ध या दोन्ही धर्मांना राजाश्रय दिलेला होता. निर्ग्रन्थ साधारणतः ग्रामाच्या बाहेर वसति करून रहात असत. त्यांच्या वसतिस्थानाचे दरवाजे उंच व लाल रंगाचे असत. त्यांच्या चारही बाजूस उद्यान असे. जैनांची मंदिरे प्रायः अशा ठिकाणी असत की जेथे तीन रस्ते एकत्र येऊन मिळत. येथे उंच व्यासपीठही बांधलेले असून, जैन मुनी या व्यासपीठावरून सिद्धांताचे निरूपण करीत असत. साधूंच्या निवासस्थानाशेजारीच आर्यिकांचेही निवासस्थान असे. यावरून स्पष्ट होते की तमिळ समाजातील स्त्रियांवरही जैन आर्यिकांचा मोठ्या प्रमाणात प्रभाव पडलेला होता. चोलांची राजधानी उरेयुर मध्येही जैन वसतिस्थाने होती. तथापि जैन धर्माचे मुख्य केंद्र मदुरा होते. मदुरा पांड्यराज्याची राजधानी होती.

इ. स. दुसरे शतक जैनधर्माच्या तमिळ प्रदेशातील इतिहासाच्या दृष्टीने महत्वाचे आहे. कारण या शतकात तमिळमध्ये जैन धर्माचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर झाला. आचार्य कुंदकुंदाचार्यासारख्या महान आचार्यांचा या प्रदेशात प्रवेश व कर्नाटकमध्ये दुसऱ्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत राज्यकारभार करणाऱ्या गंगवंशाचा उदय ही दोन कारणे या दृष्टीने महत्वाची होत. या घराण्याने जैनधर्माला राजाश्रय दिलेला होता. या घराण्यातील राजाच्या सहकार्यामुळे व राजाश्रयामुळे तमिळ प्रदेशातही या काळात मोठ्या प्रमाणात प्रगति झालेली दिसते. तमिळ प्रदेशातील धार्मिक स्थितीच्या अभ्यासावरून दिसून येते की, दुसऱ्या शतकापासून ते सातव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत येथील समाजात जैन धर्म हा मान्यवर धर्म होता. इ. स. च्या चौथ्या व पाचव्या शतकामध्ये ज्यावेळी जैनधर्माला विरोध वाढत गेला त्यावेळी जैनांनी एक पृथक संघाची स्थापना केली. दिगंबर जैन ग्रंथ दर्शनसार (वि. सं. ९९०) मध्ये लिहिले आहे की, विक्रम संवत ५२६ (इ. स. ४७०) मध्ये मथुरेत पूज्यपादाचे शिष्य वज्रनंदीनी द्रविड संघाची स्थापना केली. पांड्य राजाच्या सहकार्याशिवाय अशा प्रकारे पृथक व स्वयंभू संघाची स्थापना होणे शक्य नव्हते. वेल्विकुडी येथील ताम्रपट व पेरिय पुराणम् याच्यात दक्षिण भारतातील चेर, चोल, पांड्य वगैरे राजांचा कलभ्र नावाच्या राजांनी पराभव करून या प्रदेशावर आपली सत्ता प्रस्थापित केली. कलभ्र या घराण्याचा उल्लेख इतरत्र कोठेही मिळत नसल्याने श्री. आयंगारच्या मते हे घराणे द्रविडेच असावे व कर्नाटकच्या प्रदेशातील असावे. यांनी जैन धर्माचा स्वीकार केल्याने जैनधर्माचा प्रसार व प्रभाव पुढील काळात मोठ्या प्रमाणात वाढलेला दिसतो. याच सुमारास जैनांनी आपल्या प्रसिद्ध 'नालदियार' ग्रंथाची

रचना केली. त्यात कलभ्र जैन होते व त्यांनी तमिळ साहित्याला मोठ्या प्रमाणात संरक्षण दिले अशी माहिती मिळते.

'नालडियार' नावाच्या काव्यात चारशे चतुष्पदी पद्यांची रचना असून त्यात धार्मिक व प्रबोधक उपदेशांचे वर्णन दिलेले आहे. परंपरेनुसार यातील प्रत्येक पद्य एक एक जैन मुनीची रचना असावी असे मानले जाते. श्री. अय्यंगारांच्या मते, 'नालडियार' काव्याची रचना मगम संघाच्या स्थापनेनंतर झालेली असावी. या काव्याच्या रचनेच्या सुमारास जैन व ब्राह्मण संप्रदायातील परस्पर विरोध दिवसेंदिवस तीव्र व स्पष्ट होऊ लागला होता. २४३ नंबरच्या पद्यामध्ये या विरोधाचे स्पष्टपणे चित्रण केले आहे. हा काळ कलभ्रांच्या संक्रमणाचा काळ होता. सारांशाने तमिळ साहित्याच्या आधाराने जैन धर्म व इतिहासाच्या दृष्टीने खालील गोष्टी स्पष्ट होतात. इ. स. पू. पहिल्या शतकाच्या अगोदर दक्षिण भारतात जैन धर्म समाजात मान्यवर धर्म असून, जैन मुनि, साधु या प्रदेशात स्थायी स्वरूपात निवास करू लागले होते. तमिळ साहित्याचा उच्चतम काळ हा जैन धर्माच्या प्रधानतेचा काळ होय[१]. इ. स. पाचव्या शतकानंतर जैन धर्म दक्षिण भारतात प्रभावशाली व शक्तिशाली धर्म बनला व काही पांड्यराजानी या धर्माला राजधर्म बनविले.

जैन धर्माच्या दृष्टीने ही गौरवपूर्ण गोष्ट आहे की, तमिळ प्रदेशात राज्य करणाऱ्या बऱ्याच राजानी व राजवंशानी जैनधर्माला संरक्षण दिले. या धर्माच्या प्रगतीसाठी, प्रसारासाठी निरनिराळे प्रयत्न केले. पल्लव घराण्यातील राजा शिवस्कंदवर्मन आगमाचे टीकाकार जैनगुरू बप्पदेव यांचा शिष्य होता. सिंहवर्मन द्वितीय जैनधर्म व जैनगुरूंचा आश्रयदाता होता. जैनाचार्य सर्वनंदीनी आपला प्राकृत लोकविभाग ग्रंथ याच काळात लिहिला. राजा महेंद्रवर्मन प्रथम जैनधर्माचा अनुयायी असून, कित्येक जैन मंदिरे व गुंफा त्यानी बांधल्या. या जैन गुफामधून भित्तीचित्रेही मिळाली आहेत. चैत्यालयाच्या निर्मितीमुळे त्याला चैत्यकन्दर्प ही पदवी होती. कांची येथे जैन साधु, मठ, देवालये असल्याची माहिती ह्युएनत्संगनी दिली आहे. या काळातील मिळणाऱ्या पुरातत्त्वीय अवशेषावरून, जैनगुरु व संघाच्या अस्तित्वावरून व पल्लव मांडलिकांची जैन धर्म विषयक आस्थेवरून पल्लवांच्या राज्यात जैन बहुसंख्याक होते असे दर्शविते.

## पांड्य राजे

पांड्य राजांची मदुरा राजधानी, जैनांचे एक प्रसिद्ध शिक्षण केंद्र होते. एलाचार्य (कुंदकुंद) इत्यादी जैनगुरू संगम साहित्याच्या प्रवृत्तिचे नेते होते. कुंदकुंदानंतर बलाकपिच्छ, समंतभद्र इत्यादी आचार्यांनी द्रविड देशात जैनधर्माचे पोषण केले. पाचव्या शतकापासून ते सातव्या शतकापर्यंत पांड्य देशात जैनधर्माचा अत्युत्कर्ष झाला. वज्रनंदि, गुणनंदि, वक्रग्रीव, पात्रकेसरी, सुमतिदेव, श्रीवर्धदेव इत्यादी जैनाचार्यांनी द्रविड संघाला सजीव शक्ति दिली. या विद्वानांनी अनेक ग्रंथाचे संस्कृत, प्राकृत, तमिळ भाषेत लेखन केले व आपल्या भक्ताकडून, शिष्यांकडून करवून घेतले. या संघाच्या कार्यामुळेच सहाव्या शतकाच्या शेवटी कडुंग नावाच्या राजानी पांड्य देशाच्या राज शक्तीचे पुनरुत्थान केले. हा स्वत जैनधर्मीय असून याचे पुढील चार वंशजही जैन होते. यानंतरच्या काळात मारवर्मन कुलशेखर (१२६९-१३११) राजाच्या कारकिर्दीत या धर्माचे पुनरुत्थान झाले. मार्कोपोलो या प्रवाशाने पांड्य देशात या काळात अनेक जैन व जैन मठ असल्याची माहिती दिली आहे. १३१० च्या अल्लाउद्दीन खिलजीच्या मदुरेवरील आक्रमणानंतर पांड्य राज्याचा शेवट झाला.

## चोल राज्ये

इ. स. १०७४ चोलराजा अधिराजेंद्रचा पुतण्या कोलुत्तुग चालुक्याने चोल व चालुक्य घराण्याची एकत्र सत्ता स्थापन केली. ११२३ पर्यंत त्याने राज्य केले. हा जैनधर्माचा अनुयायी होता. त्याने राजेंद्र चोलानी नष्ट केलेल्या




जिनमंदिराचा जीर्णोद्धार केला. त्याच्या आश्रयाला अनेक जैन विद्वान असून त्यांनी अनेक ग्रंथांची रचना केली होती. या राजानी आपल्या राज्यात निषिद्ध पदार्थांची आयात बंद केली होती प्राचीन भारतातील चारित्र्यवान राजात त्याचा समावेश होतो. त्याचा पुत्र अकलक याच्या दरबारी अनेक विद्वान व गुणी लोकाचा समावेश होता. चौल साम्राज्यात जैन संस्कृती उन्नत अवस्थेत होती. हिंदु धर्माबरोबरच सद्भावपूर्वक लोककल्याणार्थ जैन धर्मही प्रयत्नशील होता.

चौल राज घराण्यातील राजाची जैन समाज व जैन धर्म यांच्याकडे मोठया आस्थेने पाहण्याची भूमिका होती असे दिसते. चौल शासन पद्धतीच्या वर्णनात आपणास अशा गावाचा उल्लेख मिळतो की, जेथे जैन धर्माचे अनुयायी रहात असत व त्यांचा प्रबंधही चौल राजाकडून केला जात असे सामान्यत: जैन धर्म उपासक व ब्राह्मण धर्म उपासक यांच्यात फारशी भिन्नता किंवा वेगळेपण समाजात अस्तित्वात नव्हते. जैन ग्रामांची सुरक्षा चौल शासन संस्थेमार्फतच केली जात होती, राजकीय आदेशामध्ये जैन ग्राम किंवा दान इत्यादी बाबींचा विशिष्ट स्वरूपात उल्लेख केला जात होता. राजराय प्रथमच्या मोठ्या बहिणीने राज्यातील निरनिराळ्या भागात जैन मंदिराची स्थापना करून जैन धर्माची किर्ती उज्वल केली. चौल राजाच्या माडलिकापैकी काही मांडलिक हे जैन धर्माचे उत्साही अनुयायी होते. त्यात लाटराज वीर चौल व त्याची राणी लाट महादेवी याची नावे उल्लेखनीय आहेत. पंचपाडवमलै येथील एका शिलालेखात तिरुपनमलैच्या देवतांना या राजा व राणीने दान दिल्याचा उल्लेख आढळतो.

## चेर राजे

तिरुमलै येथील एका शिलालेखात लिहिले आहे की, चेर राजे जैन धर्माचे अनुयायी होते. विडुगाडल्लगीयपेरुमालच्या कार्यावरून माहिती मिळते की, त्याने पवित्र पर्वतावर ज्या यक्ष आणि यक्षिणीच्या मूर्तीचा पुनरुद्धार केला, त्या मूर्ति त्याचेच पूर्वज इलिनी यांनी स्थापित केलेल्या होत्या. राजकीय अधिकाऱ्याच्या पत्नीही जैन धर्माच्या संरक्षक होत्या.

चेर घराण्यातील सम्राट सेंगुत्थवन स्वत: जैन होता. त्याचा बंधु राजकुमार शल्लिवलवन याने जैन दीक्षा घेऊन मुनिव्रत स्विकारले होते. तमिळ भाषेतील सुप्रसिद्ध प्राचीन महाकाव्य शिलप्पदिकरमची रचना याच राजर्षीने केली होती.

उपर्युक्त घराण्यातील राजाच्या राजाश्रयामुळेच जैन धर्म दक्षिण भारतातील निरनिराळ्या भागात मोठ्या प्रमाणात व प्रभावित स्थितीत प्रस्थापित झाला. जैन धर्माला येथील समाजात मान्यवर धर्माचे स्थान मिळालेच, त्याचबरोबर जैन मंदिरे, मठ, गुंफा इत्यादीचीही मोठ्या प्रमाणात निर्मिती झालेली दिसते. सामान्यत: या प्रदेशात हिंदु धर्माच्या बरोबरच या धर्माला आदरणीय स्थान प्राप्त झालेले दिसते.

## पल्लव घराणे

*प्राचीन काळात कांची व कांचीचा प्रदेश हे जैन धर्माचे प्रमुख केंद्र होते. ही पल्लव राजांची राजधानी* होती. प्रारंभीच्या जैन राजानी जैन धर्माला नुसते क्रियात्मक सहकार्यच केले नाही, तर काही पल्लव राजानी जैन धर्माचा स्वीकारही केला, महेंद्र वर्मा सुरुवातीला जैन धर्माचा कट्टर अनुयायी होता. त्यानतर त्याला संत अप्परनी जैन धर्माची दीक्षा दिली. कांचीच्या जवळच दोन मैलावर तिरुपरुतिकुन्नु येथे दोन जैन मंदिरे होती. त्यापैकी एक भगवान वर्धमान महावीराचे व दुसरे भगवान ऋषभनाथांचे होते. ही दोन्ही मंदिरे वामन मल्लिषेणाच्या प्रेरणेनी महेंद्र वर्मा यानी बांधलेली होती. हे शहर जिनकांची म्हणूनही ओळखिले जाते आजही तेथे विशाल जैन मंदीर आहे. हे मंदीर स्थापत्यकलेच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. येथे तीर्थंकारांच्या बऱ्याचशा मूर्ति सुरक्षित आहेत. तेथे मुख्य मूर्ति वर्धमान महावीर तीर्थंकाराची असून, 'त्रैलोक्यनाथ स्वामी' म्हणून ही मूर्ति येथे ओळखिली जाते. येथील

मंदिरात एकंदर सतरा शिलालेख मिळाले असून, त्यांच्या आधाराने मंदिराच्या इतिहासावर प्रकाश टाकता येतो. हे शिलालेख १२ ते १६ व्या शतकातील असून, मंदिराला राजांनी दिलेल्या विविध दानांची माहिती त्यात आढळते.

अनेक शतके कांची हे बौद्धधर्माचे महान केंद्र होते. तथापि पाचव्या शतकात बौद्ध धर्माचे पतन झाल्यानंतर जैन धर्मानी त्वरीत आपल्या धर्माचा आसपासच्या प्रदेशात विस्तार केला व कांची शहर जैनांचे महत्त्वाचे केंद्र बनविले. सहाव्या व सातव्या शतकांत या प्रदेशात जैन धर्माची स्थिती उत्तम होती. चिनी प्रवासी युआनच्वांगने ६४० इ. स. मध्ये कांची शहर पाहिले होते. आपल्या प्रवासवृत्तात त्याने लिहिले आहे की, कांची शहरात जैन लोकांचे प्रमाण अधिक आहे. कांचीच्या आसपासच्या शहरांची स्थितीही प्राधान्याने अशीच आहे. कांचीवरम् तालुक्यातही आर्पवरम् येथे आदिभट्टारकाचे एक जिनमंदीर आहे. मागरल मध्येही एक जिनमंदीर आहे व आर्पपेरम्बाक्कम् व सिनार येथेही खंडित जैन मूर्ति आहेत, या अवशेषावरून कांचीवरम् मध्येही समाजात जैनांची संख्या प्राधान्याने असावी असे दिसते. आरकाटपासून चार मैल अंतरावर पंचपांडवमलै नावाचा डोंगर असून, त्यावर एक स्वाभाविक व दुसरी कृत्रिम अशा दोन गुंफा आहेत. त्यातही शिलालेख व जैन मूर्ति आहेत. हे शिलालेख बहुधा पल्लवराजा नंदिवर्मा (७१०–७७९) व चोलराजा राजराम (९८४–८५) यांच्या कारकिर्दीतील असावेत. या शिलालेखावरून, या पर्वताचा पूर्वीच्या जैन परंपरावरोबर काही विशिष्ट संबंध असावा. तसेच आसपास राहणारा जैन समाज या ठिकाणाला जैनांचे पवित्र क्षेत्र मानीत असावा असे दिसते.

पंचपांडवमलैच्या उत्तरेला काही मैलावर एक पर्वत असून, त्यावरही जिनमूर्ति व शिलालेखांकित प्राकृतिक गुंफा आहे. त्यातील एक लेख पञ्चमीत्र जंगराजा राजमल्लचा असावा, त्यात राजा राजमल्लनी हा प्रदेश जिंकून, या पर्वतावर गुंफामंदीर बांधल्याचा उल्लेख आढळतो इतर शिलालेखात अज्जनंदि भट्टारक, भावनंदि भट्टारकाचे शिष्य देवसेन, इत्यादींचे उल्लेख आढळतात. या शिलालेखाचा काळ सामान्यतः इ. स. ९ व १० वे शतक मानला जातो.

पोळूरच्या शेजारीच दहा मैलावर तिरुमलै गावाच्या गावाच्या शेजारी पर्वत आहे. या गावात अजूनही जैनांची वस्ती असून, त्यांच्याकडे त्रैलोक्यचूडामणि, तत्वार्थसूत्र, सत्याचार धर्म, श्री पुराण इत्यादी ताडपत्रावर लिहिलेले ग्रंथ आहेत. या पर्वतावर अनेक शिलालेख मिळाले असून, निरनिराळ्या ठिकाणी हे खोदलेले आहेत. यातील सर्वांत प्राचीन इ. स. ९१० च्या शिलालेखात चोल राजा परांतकचा प्रथमच उल्लेख आला आहे. दुसरा सामान्यतः इ. स ९५७ च्या शिलालेखात राष्ट्रकूट राजा कृष्ण तीसरा याची पत्नी गंगमा देवीच्या एका सेवकाने दीपदान केल्याचा उल्लेख आहे. या शिलालेखावरून स्पष्ट दिसते की, राष्ट्रकूट राजा कृष्ण तीसरा याने तमिळ देशाच्या राजावर आक्रमण केले होते व उत्तर आरकाट जिल्ह्यात झालेल्या युद्धात चोल राजाचा इ. स. ९४७ च्या सुमारास पराभव केला असावा. त्याचवेळी या सेवकानी दीपदान केलेले असावे. तिरुमलै पर्वतावरील इ. स. १०२३ व १०२४ च्या शिलालेखात अनुक्रमे पहिल्यात प्रसंगवश पल्लव राजाची पत्नी सिन्नवईनी केलेल्या दीपदानाचा उल्लेख आहे. तर दुसऱ्या शिलालेखात श्री. कुंदवई जिनालयातील देवतांना भेट दिल्याचा उल्लेख आहे. कुंदवई ही चोलवंशातील राजकुमारी व प्रसिद्ध चोल राजा राजराम प्रथम याची मोठी बहीण होती. या मंदीराची निर्मितीही तिने केली असे मानतात. तिने दक्षिण आरकाट जिल्ह्यात दादापुर येथे व त्रिचनापल्ली जिल्ह्यातील तिरुमलवाडी येथे जिन मंदिरे बांधल्याची माहिती मिळते.

उत्तर आरकाट जिल्ह्यात वडी-वाग दोन असी ठिकाणे आहेत जी पूर्वी जैन धर्माची केंद्रे समजली जात होती. तेथेही पर्वत शिलालेख व गुफा आहेत त्यातील दोन शिलालेख पल्लवराजा नंदीवर्मा व चोलराजा आदित्य प्रथमच्या काळातील आहेत. गुंफेच्या समोर मंडप बांधलेला आहे. त्यावरून स्पष्ट होते की, मध्यकाळात हे ठिकाण जैन साधु व आर्यिकाचे निवासस्थान असावे. कनकगिरी पर्वतावर आदिनाथ तीर्थंकराचे विशाल जिनालय आहे, ज्याची आजही पूजा चालते. येथे तीर्थंकरांच्या मूर्तिबरोबरच इतरही मूर्ती आहेत. पौन्नुरमध्ये आजही जैन धर्माचे




अवशेष सुरक्षित आहेत. त्यामुळे हे स्थान जैनाचे प्राचीन काळापासून प्रभावी केंद्र असावे. पोन्नुर शेजारीच तीन मैलावर असलेल्या निलगिरी पर्वतावर हेलाचार्यांची मूर्ति आहे. कनकगिरी येथील आदिनाथ मंदिराच्या महामंडपात दोन शिलालेख आहेत. त्यावरूनही या मंदिराचा इतिहास समजतो त्यातील प्राचीन शिलालेख पांड्य राजा त्रिभुवन चक्रवर्ती विक्रम यांच्या कारकीर्दीतील आहेत. त्यात लिहिले आहे की, "स्वर्णपूर कनकगिरीच्या जैनाना हेलाचार्यांच्या साप्ताहिक पूजेच्या वेळी, रविवारी आदिनाथ मंदिरातून पार्श्वनाथ व ज्वालामालिनीच्या मूर्ति निलगिरी पर्वतावर न्याव्या लागत असत. प्रचलित दंतकथेनुसार हेलाचार्यांच्या शिष्येला ब्रह्मराक्षस त्रास देत असे. त्यामुळे हेलाचार्यांनी निलगिरी पर्वतावर ज्वालामालिनीची प्रतिष्ठापना केली. इंद्रनंदीनी राष्ट्रकूट राजा कृष्णराज तिसरा याच्या सहकार्याने इ. स. ९३९ मध्ये "ज्वालामालिनी कल्प" ची रचना केली. त्यात त्यांनी हेलाचार्यांचे वर्णन दिले आहे. त्यामुळेच हेलाचार्यांच्या ऐतिहासिकतेबद्दल संशय रहात नाही.

दक्षिण आरकाट जिल्ह्यातील पाटलीपुत्र गावही जैन गुरूंचे प्रमुख केंद्र होते. दिगंबर जैन ग्रंथ संस्कृत 'लोक विभाग' मध्ये सिंहसूरीनी लिहिले आहे की, मुनि सर्वनंदीनी इ. ४५८ मध्ये पाटलिका ग्रामात या शास्त्राची रचना केली. बहुधा पाटलिका हेच पाटलीपुत्र असावे. इ. स. पू. पहिल्या शतकापासून येथे द्रविड संघ असावा. पेरियपुराणानुसार ७ व्या शतकात येथे एक विशाल जैन मठ होता. आसपासच्या प्रदेशातील जैन समाज व उपलब्ध पुरातनीय सामग्री यावरून या प्रदेशावर जैनांचे धार्मिक आधिपत्य असावे असे दिसते. सध्याच्या काळातही तामिळवासी जैन उत्तर आरकाट, दक्षिण आरकाट व चिंगलपुर जिल्ह्यात अस्तित्वात असलेले दिसतात. गुरु भट्टारकाचे मुख्य निवासस्थानही जिंजी तालुक्यातील चित्तापूर नावाच्या ठिकाणी आहे. हा मठ श्रवणबेळगोळ येथील जैन मठाशी संबंधित आहे. चित्तापूर येथे मल्लिनाथ व पार्श्वनाथ यांची दोन जैन मंदिरे आहेत. पुदुकोट्टा-मधील सित्तन्नवासल या ठिकाणाने इ. स. पू. ३ ऱ्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंत जैन धर्म प्रसाराचे कार्य केले. येथे प्राकृतिक गुंफा आहेत. मूर्ति, मंदिरे व तमिळ वा ब्राह्मी अक्षरात लिहिलेले शिलालेख आहेत. येथील उत्खननातही जैन धर्माचे अनेक अवशेष प्राप्त झाले आहेत. पर्वताच्या लांब रांगेलाच सित्तन्नवासल नाव आहे. सित्तन्नवासल म्हणजे सिद्ध वा जैन साधूंचे निवासस्थान. पर्वतावरील गुफामध्ये डोंगर खोदून सतरा शयनस्थाने तक्क्यासह बनविलेली आहेत. सर्वात मोठ्या शय्येवर इ. स. पू. दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकातील ब्राह्मी लिपीतील शिलालेख खोदलेला आहे. उरलेल्या शयनस्थानाच्या बाजूला लहान शिलालेख खोदलेले आहेत. त्यात त्या शय्येवर निवास करणाऱ्या जैन साधूंची नावे दिलेली आहेत.

सित्तन्नवासल येथील दुसरी उल्लेखनीय वस्तु म्हणजे एक डोंगर खोदून तयार केलेले जैन मंदीर होय. पल्लवराजा महेंद्रवर्मा प्रथमनी हे मंदिर बांधले असावे. या मंदिरातील चित्रकला प्रेक्षणीय आहे आज छताच्या खालच्या व स्तंभाच्या वरील भागातच ही चित्रकला राहिलेली असली तरी, असे स्पष्टपणे जाणवते की, प्राचीन काळी हे मंदिर संपूर्णपणे विविध प्रकारच्या चित्रकृतींनी भरलेले असावे. येथील चित्रकलेत जैन कलेच्या विविध रूपाचे दर्शन घडते. श्री. पी. बी. देसाईनी लिहिले आहे की, "सित्तन्नवासलची चित्रकला भारत महाद्विप व श्रीलंका येथील चित्रकलेच्या परंपरेतील एक वैशिष्ठ्यांची निर्मिती आहे. अजंठा व बाघच्या गुफा व श्रीलंका येथील चित्रकृतींच्या बरोबर या चित्रकलेची तुलना योग्य आहे. या सर्व चित्रकृती चौथ्या शतकापासून सातव्या शतका-पर्यंतच्या आहेत. सित्तन्नवासल येथील चित्रकृती दक्षिण भारतीय चित्रकलेचा प्राचीनतम नमुना आहेत. जैन दृष्टीकोनातून तर ही चित्रकला प्राचीन जैन चित्रकलेचे अनुपम उदाहरण आहे.

नारट्टामलै नावाच्या पर्वतावर मिळालेल्या जैन अवशेषावरून दिसते की, "प्राचीन काळात हे जैन साधूंचे वसतिस्थान होते व महान साधु येथे तपस्या करीत असावेत. त्यांनी धर्मप्रचारासाठी येथे मठाचीही स्थापना केली होती. त्यामुळे काही काळानंतर हे स्थान जैन धर्माचे प्रमुख केंद्र बनले. आलरुट्टीमलै नावाच्या पहाडावरही सित्तन्नवासलप्रमाणेच प्राकृतिक गुफा आहेत व तेथे पर्वत खोदून अनेक जैन मूर्ति तयार केलेल्या आहेत. मारवर्मा

सुंदर नावाच्या पांडय राजाच्या कारकिर्दीतील एक त्रुटित शिलालेखही येथे आहे. जैन धर्माच्या संस्था असल्यामुळे या पर्वताला आलरट्टीमले नाव दिले गेले. शेजारीच वोम्ममले 'मूर्तीचा पर्वत' नावाचा पर्वत आहे. तेनीमले नावाच्या पर्वतावरही आन्दारमदम– "प्रमुख धर्मगुरूंचा मठ" नावाची गुंफा आहे. गुंफेच्या समोरच ८ व्या शतकातील तमिळमध्ये एक शिलालेख खोदलेला आहे. त्यात पर्वतावर तपस्या करणाऱ्या मलयध्वज नावाच्या साधूच्या व्यवस्थेसाठी भूमिदान केल्याचा उल्लेख आढळतो. गुंफेच्या शेजारीच एका खडकावर एक मूर्ती कोरलेली आहे. बहुधा ती महावीरांची असावी, पर्वतावर यक्षिणीच्या अनेक मूर्ति आढळतात. चेट्टीपेट्टी नावाच्या ठिकाणीही अनेक जैन अवशेष मिळाले आहेत. त्या शेजारील समणरकुंडु नावाच्या पर्वतावर उत्खननात नवव्या व दहाव्या शतकातील चौल शैलीवर आधारित दोन मंदिरे मिळाली आहेत. तीर्थंकर व इतरही अनेक मूर्ति व चोलराज राजरामच्या काळातील शिलालेख मिळाला आहे. शिलालेखात दयापाल व वदिराज यांच्या गुरु जैनाचार्य मतिसागरांचा उल्लेख आहे.

मदुरा जिल्ह्यातील इतर अवशेषांशिवाय, पर्वत खोदून शय्या बनविलेल्या व ब्राह्मी शिलालेख असलेल्या प्राकृतिक गुंफा, पर्वत खोदून बनविलेल्या जैन देवता व गुरूंच्या मूर्ती व तमिळ शिलालेख हे अवशेष महत्त्वाचे आहेत. पांडय राजांच्या संरक्षणामुळे मदुरा जैन धर्माचे प्रमुख केंद्र बनले होते. मदुरा शहर व शेजारचे असमले, नागमले, पशुमले इत्यादी पर्वतावर जैन धर्माचा प्रभाव होता व तेथे जैन साधु व आर्यिकांचा निवास होता. मदुरा शहराजवळच अन्नेमले पर्वत आहे. तेथे प्राकृतिक गुंफेमध्ये जिन व शासन देवतांच्या मूर्ती आहेत. मूर्ति प्रभावक आहेत. त्यात एक यक्षिणीची मूर्ति आहे. तिचा उजवा पाय खाली लटकत आहे व डावा पाय मुडपलेला आहे. उजव्या हातात फळ व डावा हात पोटात ठेवलेला आहे. ही भगवान महावीरांची सिद्धायिका यक्षिणी असावी असे वाटते. येथील तमिळ शिलालेखात अज्जनंदीचा उल्लेख आहे. या गुंफेला लोक अजूनही 'समरणकोविल' जैन साधूंचे मंदीर असे म्हणतात. त्यामुळेच अन्नेमले जैनांचे प्रसिद्ध स्थान असावे. मदुरेच्या उत्तर–पश्चिमेला १२ मैलावर पर्वतांची श्रेणी आहे. त्यास अल्गरमले म्हणतात. त्यात विशाल गुंफा असून शय्या बनविलेल्या आहेत व डोक्याकडील बाजूला एक ब्राह्मी आलेख आहे. शेजारीच सिद्धासन घातलेल्या जैन साधूची मूर्ति खोदलेली आहे. शिलालेखात यास अज्जनंदीची कृती म्हटले आहे. बहुधा ती अज्जनंदीच्या गुरूची मूर्ति असावी. मदुरा तालुक्यातील कीलक्कुडी गावाजवळ काही पर्वत आहेत. त्यास डम्मणामले म्हणतात. तेथे 'सेट्टीपोडवु' नावाची गुंफा आहे. तिच्या प्रवेशद्वाराच्या वरील छतावर पाच मूर्ति व तमिळ लेख आहे. त्यातही पहिली व शेवटची मूर्ति अप्रतिम आहे. मूर्ति बहुधा यक्षणीची असावी. गुंफेच्या प्रवेशद्वाराच्या डाव्या बाजूला महावीर तीर्थंकराची विशाल मूर्ति पत्थरात खोदून बनविली आहे शेजारच्या आलेखात अभिनंदन भट्टारकाने मूर्ति निर्माण केली आहे असे म्हटले आहे. गुफेच्या वर चढण्याच्या रस्त्यावर पेच्चीपल्लम् नावाचे ठिकाण आहे. तेथे तीन मूर्ती पद्मासनमध्ये अतिशय कुशलतेने कोरलेल्या आहेत. या मूर्तीवर सापाचा फणा आहे यावरून त्या पार्श्वनाथाच्या मूर्ती असाव्यात. मूर्तीखालील तमिळ शिलालेखात, एकामध्ये अज्जनंदिची माता गुणमतियारचा निर्देश आहे. तीनमध्ये कुरडी तिरुक्काटाम्बली आश्रमाचे अधिकारी गुणसेन देव यांचा उल्लेख आहे. तिरुमंगलम् तालुक्यातील कुप्पालनट्टम् जवळ पोयगइमले येथील पर्वतावरील गुहेच्या प्रवेशद्वारावरही तीर्थंकरांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत. मेलूर तालुक्यातील कीलल्लवु व करंगाल क्कुडी येथील पर्वतावरही जैन मूर्ति आहेत. पलनी तालुक्यातील एवरमले येथील गुहेत अनेक शिलालेख असून त्यात अज्जनंदी, इंद्रसेन, मल्लिपेपा, पेरियार व पार्श्वपदारचा उल्लेख आहे.

मदुरा प्रदेशातील पुरातत्वीय अवशेषावरून एक गोष्ट प्राधान्याने जाणवते, ती म्हणजे अज्जनंदीचे व्यक्तित्व व जैन धर्माच्या अभ्युदयासाठी त्यांनी केलेले असामान्य कार्य. अज्जनंदी हे आर्यनंदीचे प्राकृत रूप आहे. आर्यनंदीनी उत्तर आरकाट जिल्ह्यातील वल्लीमले येथे व मदुरा जिल्ह्यातील अन्नैमले, ऐवरमले अलगरमले, करंगालक्कुडी इत्यादी ठिकाणी जैन मूर्तीची निर्मिती केली. दक्षिणेकडील तिन्नेवल्ली जिल्ह्यातील इरवाडी येथेही




त्यांनी जैन मूर्ति निर्माण केल्याची माहिती मिळते सातव्या शतकाच्या उत्तरार्धात तमिळमध्ये जैन धर्माच्या विरुद्ध वातावरण निर्माण होऊन जैन धर्माचा प्रभाव क्षीण होऊ लागला. त्यावेळी सवध देशात भ्रमण करून, जैन धर्माच्या प्रभावाची पुन: स्थापना करण्यासाठी आर्यनंदीनी जैन मूर्तींची ठिकठिकाणी प्रस्थापना केली.

कल्युगुमलै पर्वतावरील खोदून बनविलेली जैन मूर्ति तमिळ देशातील जैन धर्माच्या अनुयायांचा धार्मिक उत्साह व कला प्रेमाचाच परिपाक होय. दक्षिण भारतातील जैन संस्कृतीचे हे एक अनुपम स्मारक आहे. या सर्व मूर्तींच्या खाली शिलालेख आहेत व त्यात मूर्तिनिर्मात्याचा उल्लेख आहे. हे मूर्तिनिर्माते विविध ठिकाणचे निवासी आहेत. यावरून हे ठिकाण या विभागातील जैनधर्माचे एक प्रसिद्ध केंद्र असावे. शिलालेखात अनेक गुरु व आर्यिकांचा उल्लेख आहे. त्यातील आर्यिकांच्या नावाची संख्या अधिक असून त्या विविध ठिकाणच्या निवासी दिसतात. शिलालेखाच्या लेखन पद्धतीवरून शिलालेख इ. स. १० व ११ व्या शतकातील असावेत असे दिसते. त्रिचनापल्ली, त्रावणकोर इत्यादी ठिकाणीही जैन धर्माचे अस्तित्व दाखविणारे अनेक अवशेष उपलब्ध आहे. जिनालये, जैन मूर्ति व शिलालेखाच्या आधारावरून या प्रदेशातही जैन धर्माचा प्रसार झालेला होता असे दिसते.

उपर्युक्त पुरातत्त्वीय उपलब्ध अवशेषावरून तमिळ प्रदेशातील जैन धर्माच्या काही वैशिष्ट्यपूर्ण बाबीवर प्रकाश टाकता येतो. जैन धर्माचे सर्व प्राचीन अवशेष पर्वतावरच आढळतात; कारण की, जैन साधु नगरवासी नव्हते. शहराच्या बाहेर राहणे ते पसंत करीत. त्यामुळे पर्वतावर, प्राकृतिक गुहामध्ये जनकोलाहलापासून दूर, जैन साधु रहात असत. त्यांच्या निवासामुळेच गृहस्थाश्रमी या ठिकाणाला पूज्य स्थान मानीत. तेथे जैन मंदिरे, मूर्तींची निर्मिती होई व त्याच्या प्रबंध व पूजा इत्यादीसाठी विविध प्रकारे दान देण्यात येई. या पर्वतावरील जैन पवित्र स्थानांनी जैन धर्माच्या प्रसाराने समाजाला प्रभावित करण्याचे महत्वाचे कार्य केले. सर्वात विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे तमिळमधील यक्षी संस्कृतीचे सार्वजनिक महत्त्व होय. जैन मूर्ति कलेच्या दृष्टीने यक्षीला स्वतंत्र महत्वपूर्ण स्थान नसून तिला जिनदेवाची सेवक मानले आहे. तथापि तमिळमध्ये यक्षीला स्वतंत्र स्थान दिलेले असून काही वेळा जिनेंद्रतुल्य मानलेले आहे. शिलपदिकारम्‌मधील उल्लेखानुसार तमिळ प्रदेशातील यक्षि संस्कृतीचा उदयकाल इ. स. दुसरे शतक असले तरी शिलालेखात यासंबंधी पुरावे इ. स. ८ व्या शतकापासून मिळतात. शिलपदिकारम् व संगम काळातील साहित्यावरून तमिळ प्रदेशात जैन धर्माला सुरुवातीपासूनच शैव व वैष्णव धर्माशी संघर्ष द्यावा लागला असे दिसते. या धर्मात शिवपत्नी पार्वती व विष्णूपत्नी लक्ष्मीच्या पूजेला महत्व दिलेले आहे. तीर्थंकाराबरोबर कोणीही स्त्री प्रतिमाचा संबंध नाही. तथापि जैन धर्माच्या प्रचारक गुरूंनी हिंदु धर्माशी स्पर्धा करताना व आपल्या धर्माला सर्वजनप्रिय बनविण्यात या प्रदेशात अनेक आपत्तीबरोबर संघर्ष देणे भाग पडले. त्यामुळे सर्वसामान्य लोकांच्या हृदयातील भक्ति जैनधर्माकडे आकृष्ट करण्यासाठी आपल्या धर्मातही यक्षीच्या पूजेला विशेष महत्व देणे भाग पडले. त्यामुळेच तमिळ प्रदेशात जैनधर्माचा प्रभाव दीर्घकाळ व लोकप्रिय अवस्थेत राहू शकला.

जैन मूर्तींच्या अभ्यासावरून आढळले की, यक्षीला महत्व देण्याकरिता प्रथम तिला जिनमूर्तीच्या बरोबर बसविण्यात आले, तिची लज्जित मूर्ति जिनमूर्तीच्या उजव्या बाजूला बसविण्यात आली. तिला दयाळू दाखविण्यासाठी तिच्या एका हातात फळ व बालक दाखविण्यात आले व तिची भयानकता व उग्रता स्पष्ट करण्यासाठी तिच्या हातात शस्त्र देण्यात आले. या सर्व वस्तूनी परिपूर्ण अशी यक्षीची मूर्ति या प्रदेशात आढळते. काही ठिकाणी यक्षीची मूर्ति बैठकीवर तर काही ठिकाणी स्वतंत्र मंदिरात असून, मंदिराच्या व्यवस्थेसाठी दान दिल्याचीही माहिती मिळते. श्री. पी. बी. देसाई यांच्या मते, तमिळ प्रदेशात नेमिनाथ तीर्थंकाराची यक्षिणी अंबिकेला सर्वश्रेष्ठ स्थान दिलेले आहे. दुसरे महत्वपूर्ण स्थान भ. महावीरांची यक्षिणी सिद्धायिका हिला दिले आहे.









ज्वालामालिनी ही यक्षिणी असली तरी तिचा मंत्र-तंत्राशी जास्त संबंध आहे. तिचा अविष्कार पोन्नूरच्या हेलाचार्यांनी केला असे मानतात. त्या काळात सर्वसामान्य समाजात जादू-टोणा, तंत्र-मंत्र इत्यादीना विशेष महत्व होते. त्यामुळे जैन आचार्यांनीही त्या विषयाचा अभ्यास केला व प्राविण्यही मिळविले. तंत्र-मंत्राचा समाजावरील परिणामाचा लाभ उडविण्यासाठी या यक्षिणीचा उपयोग केला गेला असावा. तमिळ देशातील कानाकोपऱ्यात जैन धर्माच्या सिद्धांताचा प्रसार करण्याचे श्रेय कर्तव्यदक्ष जैन साधूंना आहे. ज्यांनी आपल्या निर्दोष आचार व अविच्छिन्न सदुपदेशांनी सर्वसामान्य जनता व विशिष्ट वर्गाला आकृष्ट केले. तमिळमधील शिलालेखात अनेक साधूंचा उल्लेख आला आहे व उल्लेख न आलेले कितीतरी साधु असण्याची शक्यता आहे. या साधूची निरनिराळी धर्मस्थाने, शिक्षणसंस्था व निवासस्थानांशी संबंध होता व हे निरनिराळ्या साधु संघाचे सभासद होते. तथापि साधुबरोबर त्यांच्या संघाचा निर्देश करण्याची पद्धत येथे आढळत नाही. धार्मिक किंवा जैन साध्वि स्त्रियांचे संघ हे तमिळचे वैशिष्ट्य होय. या साध्वि साधुप्रमाणेच सामाजिक व धार्मिक कार्यातही भाग घेत असत. त्या आपल्या अनुयायांचे नियमन करीत व वसतिस्थानी त्यांना सन्माननीय पद मिळत होते. तमिळ प्रदेशातील शिलालेखात या प्रदेशातील जैन स्त्री केवळ गृहस्थाश्रमी किंवा साध्वीच्या रूपातच जैन धर्माची अनुयायी नव्हती तर गुरु व आचार्याच्या स्वरूपात धार्मिक प्रवृत्तीचे संचलन करीत होती अशी माहिती मिळते. जैन साध्वीच्या स्वतंत्र संस्था असून, त्यापैकी काही धर्माधिकारी होत्या. याना कुरट्टियार म्हणतात. अशी माहिती मिळते. या कुरट्टियार श्राविका, आर्यिका यांच्यापेक्षा भिन्न होत्या [१]

तमिळ प्रदेशात जैन धर्माच्या प्रभावाला व प्रसाराला वैशिष्ट्यपूर्ण स्थान असलेले दिसते. जैन समाज साहित्य व कलांचा प्रेमी असल्याने तमिळ साहित्याच्या भांडारात त्याची देणगी असामान्य आहे.[२] कुरल व नालडियार साहित्यासारखे प्रचंड साहित्याची त्यांनी निर्मिती केली. त्यांनी संस्कृतमधून घेतलेल्या शब्दांचे तमिळच्या नियमानुसार परिवर्तन केले. तमिळ प्रदेशात अहिंसा तत्वाचा प्रसार ही जैनांची दुसरी देणगी होय. जैनांच्या अहिंसेच्या प्रभावामुळे या प्रदेशात यज्ञात होणारी हिंसा पूर्णपणे बंद झाली. दक्षिण भारतात मोठ्या प्रमाणात मूर्तिपूजा व मंदिराची निर्मिती करणे हेही जैन धर्माचेच योगदान होय. जैन लोक तीर्थंकाराची मूर्ति तयार करीत व त्या मूर्तिची मोठ्या आकर्षक स्वरूपात, विशाल मंदिरातून पूजा करीत असत. सर्वसामान्य समाजावर मूर्ति पूजेच्या या प्रभावक व आकर्षक शैलीचा परिणाम होऊन, अनुकरण झालेले दिसते. जैन सिद्धांताचा प्रसार करण्यासाठी, सर्वसामान्य प्रभावित करण्यासाठी निरनिराळी प्रसिद्ध शिक्षण केंद्रे, शिक्षण संस्था स्थापन केलेल्या दिसतात. सामान्यतः तमिळ प्रदेशातील जैन इतिहासाकडे पाहिल्यास सर्वसामान्य समाजात जैनधर्म लोकप्रिय होताच, त्याचबरोबर निरनिराळ्या राजघराण्यातूनही जैनधर्माला आदराचे व मानाचे स्थान मिळालेले दिसते तमिळ साहित्य, कला इत्यादी विविध क्षेत्रात या धर्माने महत्वाचे स्थान मिळविलेले दिसते. मध्यंतरीच्या काळात वैदिक धर्म व बौद्ध धर्म इत्यादीबरोबर झालेल्या संघर्षातही जैन धर्मानी या प्रदेशात आपले अस्तित्व कायम टिकविले.

### कर्नाटकमधील जैन धर्म

दक्षिण भारताच्या जैन धर्माच्या इतिहासात कर्नाटकमधील जैन धर्माच्या प्रसाराला व प्रभावाला महत्वाचे स्थान आहे. कर्नाटक हे जैन धर्माचे खरे गृह होय. जैन धर्माचा उदय व ऱ्हास या दोन्हीही अवस्थामध्ये या प्रदेशातील समाजानी जैन धर्माचे स्नेहपूर्वक आदरातिथ्य केलेले दिसते कर्नाटकच्या प्रदेशात हलके हलके एक प्रभावशाली धर्म बनून, राजवंशाच्या भाग्याचे सूत्रही या धर्माने आपल्या हातात ठेवले या घटनेला जैन धर्माची आतंरिक योग्यता हे एकच कारण कारणीभूत नाही तर जैन गुरूनी नुसताच उपदेश किंवा धर्मप्रचाराचे कार्य न






करता राजकीय जीवनात भाग घेऊन राज्याची निर्मिती केली हे या प्रभावाचे प्रमुख कारण होय. त्याच्या या कार्याचे फळ म्हणूनच चार प्रसिद्ध राजवंशानी जैन धर्माच्या अभ्युदयात क्रियात्मक सहकार्य केले राज्यकर्त्यांच्या या सक्रीय सहकार्यामुळेच त्याचे मंत्रिगण, सेनापती, सामंत इत्यादींनी जैन धर्माचा स्वीकार केला. त्यामुळेच जैन धर्माला समाजाचे सर्वांगीण सहकार्य मिळाले.

## गंग राजवंश

जैन धर्माची सर्वप्रथम राजनैतिक कृती म्हणजे दक्षिण भारतातील गंग राजवंश होय. गंगवंश प्राचीन आहे. त्याचा संबंध इक्ष्वाकू वंशाशी लावला जातो. पूर्वी हा वंश उत्तर हिंदुस्थानात होता. इ. स. दुसऱ्या शतकाच्या सुमारास या वंशातील दोन राजकुमार दक्षिण भारतात आले. दडिग व माधव या राजकुमारांची पेरूर नावाच्या ठिकाणी, जैनाचार्य सिंहनंदीची भेट झाली. सिंहनंदीनी त्याना शासकीय कार्याची माहिती दिली. एक दगडी स्तंभ साम्राज्यदेवीच्या प्रवेशमार्गात रोवलेला होता. सिंहनंदीच्या आज्ञेने माधवने तो स्तंभ नष्ट केला. सिंहनंदीनी त्याला एका राज्याचे शासक बनविले.

म्हैसूर राज्यातील कल्लूरगुड्डच्या सिद्धेश्वर मंदिराच्या भिंतीवर इ. स. ११२२ च्या सुमाराचा शिलालेख मिळाला असून त्यात माहिती दिली आहे की, "पद्मनाम राजावर उज्जयनीच्या महिपालनी आक्रमण केले तेव्हा त्याने आपल्या दडिग व माधव नावाच्या दोन पुत्राना दक्षिणेत पाठविले. ते फिरत फिरत दक्षिणेतील पेरूर नावाच्या ठिकाणी पोहोचले. तेथे तलावात नित्य चैत्यालय पाहून त्यानी त्यास तीन प्रदक्षिणा घातल्या व तेथील आचार्य सिंहनंदीना वंदन करून आपल्या दक्षिणेत येण्याचे कारण स्पष्ट केले. सिंहनंदीनी त्यांना सहकार्य दिले. त्याच्या भक्तीने प्रसन्न होऊन देवी पद्मावती प्रकट झाली व तिने त्याना तलवार व राज्य बक्षिस दिले. जेव्हा त्यानी संपूर्ण राज्यावर आपले प्रभुत्व प्रस्थापित केले, त्यावेळी सिंहनंदीनी त्याना पुढील आज्ञा दिली– 'जर तुम्ही आपल्या वचनाची पूर्ति केली नाहीत, जैन शासनाला सहकार्य दिले नाही, दुसऱ्याच्या स्त्रीचे अपहरण केले, मद्यमांस सेवन, केले, नीच लोकांच्या संगतीत राहिलात, आवश्यक असूनही दुसऱ्याला दान न दिले, युद्धात शत्रूला पाठ दाखविली तर तुमचा वंश नष्ट होईल.' त्याच शिलालेखात सिंहनंदीद्वारा दिल्या गेलेल्या राज्यविस्ताराचे वर्णन आहे. नंदगिरी येथे यांचा किल्ला होता, कुवलाल ही राजधानी होती व ९६ हजार देशांवर या राज्याचे अधिपत्य होते. जिनेंद्रदेव यांची मुख्य देवता होती व युद्धात विजय यांचा साथीदार होता. जैन धर्माला राजधर्माचे स्थान देऊन दडिग व माधव मोठ्या गौरवाने पृथ्वीचे शासन करीत होते. इ. स. ११२९ च्या दुसऱ्या शिलालेखात लिहिले आहे की, सिंहनंदी मुनींनी आपल्या शिष्यांना अर्हंत भगवानाची ध्यानरूपी तीक्ष्ण तलवार प्रदान केली होती. त्याच्या सहकार्यानेच घातिककर्मरूपी शत्रूसैन्याच्या पर्वतमाला त्यांनी नष्ट केल्या. अकराव्या शतकाच्या शेवटी गंगवंशाचा शेवट झाला. स्मिथनी लिहिले आहे की, "गंगवंशाने दुसऱ्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत म्हैसूरमधील विस्तारित प्रदेशावर राज्य केले व सदैव चाललेल्या मध्यकालीन युद्धात त्यांनी भाग घेतला. लुई राइसने लिहिले आहे की, गंगवंश हा दक्षिण भारतातील प्रमुख जैन वंश होता. सिंहनंदीच्या काळात जैनमताचा प्रभाव समाजात मोठ्या प्रमाणात निर्माण झालेला असावा, त्यामुळेच सिंहनंदीनी पुरस्कृत केलेल्या गंग शासनाचा स्वीकार सर्वसामान्य लोकांनी केला. सिंहनंदीनी कर्नाटकात प्रस्थापित असलेल्या बौद्ध धर्माला विरोध करून गंगवंशाची स्थापना करविली असावी. गंगवंशीय सत्ताधीशांनी सुरवातीपासूनच जैन धर्माला राजाश्रय दिलेला दिसतो. चौथ्या शतकापासून ते बाराव्या शतकापर्यंत आढळणाऱ्या शिलालेखात गंग राजानी जैन मंदिरांची निर्मिती केली. जैन मूर्तींची प्रतिष्ठापना केली. जैन साधूच्या निवासस्थानासाठी गुफा बनविल्या. जैन आचार्यांना दान दिले, इत्यादींची माहिती मिळते.




मारसिंहच्या कुडलूर ताम्रपत्राच्या आधारे गंगवंशाच्या धार्मिक धोरणावर प्रकाश टाकता येतो. त्यात लिहिले आहे की, गंगराजा कोंगुलीवर्मा प्रथम याने अर्हंत भट्टारकांच्या सिद्धांताचा पक्ष घेऊन शक्ति प्राप्त केली व



सिहनंदी आचार्यांच्या कृपेमुळे त्यांना साहस व असंदर्भित प्राप्त झाली. विष्णु गोप नावाच्या राजानी जैन धर्माचा त्याग करून वैष्णव धर्माचा स्वीकार केला असे काही दानपत्राच्या आधारावर म्हटले जाते, तथापि श्री. राइसच्या मते हे दोन्ही दानपत्र संदिग्ध आहेत. या दानपत्रात यांनी ब्राह्मणाना दान दिल्याची माहिती मिळत असली तरी, त्यावरून राजधर्मात बदल झालेला होता असे निश्चितपणे म्हणता येणार नाही. या उलट नंतरच्या काळातील गंगराजेही जैन धर्माचे पालन करताना दिसतात. राजा तडंगल माधव व त्याचा पुत्र अविनीत यांनी जैन धर्माचे राजधर्म म्हणून पालन केले. इतकेच नव्हे तर जैन मंदिरे, मूलसंघ इत्यादींना त्यानी दान दिल्याचीही माहिती मिळते. लुईस राईसनी लिहिले आहे की, प्रसिद्ध जैन व्याकरणकार पूज्यपाद हा दुर्विनीतचा गुरु होता. होन्नुरु येथे मिळालेल्या ताम्रपटाच्या आधारानेही ही गोष्ट स्पष्ट करता येते. याबद्दल काही इतिहासकारांनी शंका घेतलेल्या असल्या तरी पूज्यपाद हे प्रसिद्ध वैयाकरणी होते. त्यांनी जैनेंद्र व्याकरणाची रचना केली. त्यामुळे त्यांनी शब्दावतार नामक न्यास लिहिणे शक्य आहे. या उलट दुर्विनित ताम्रपटात दिलेल्या माहितीवरून व्याकरणकार वाटत नाही. म्हणूनच श्री. सालेतोरनी लिहिले आहे की, दुर्विनित पक्का जैन होता. त्यानी किरातार्जुनीयवर संस्कृत टीका लिहिली. गुणाढ्यच्या बृहत्कथाचे संस्कृतमध्ये रुपांतर केले. त्यामुळेच आपल्या गुरुच्या प्रति आदरभाव व्यक्त करण्यासाठी त्यांनी पूज्यपादाच्या शब्दावताराला कन्नडमध्ये रुपांतरीत केले असावे.

दुर्विनीतचा मुलगा पुष्कर याने जैन धर्माला राजाश्रय देऊन आपल्या घराण्याची परंपरा पुढे चालविली, पुष्करचा मुलगा श्रीविक्रम व श्रीविक्रमचा मुलगा भूविक्रम यांनीही जैन धर्माला राजाश्रय दिला. भूविक्रमला 'राजश्रीवल्लभ' अशी पदवी दिलेली होती. त्यानंतर सत्तेवर आलेल्या श्रीपुरुष नावाच्या राजाच्या दानपत्रात अनेक जैन गुरुंचा उल्लेख आहे. श्रीपुरुषाचा मुलगा शिवमारदेव द्वितीयची शिलालेखात प्रशंसा केलेली आहे त्याने जैन मंदिराची निर्मिती केली. तो स्वतः जैन असून चंद्रसेनाचार्यांच्या जैन मंदिराच्या सेवेसाठी केल्लिपुसुगर गावाची काही भूमि या राजाने प्रदान केली होती. त्यानी श्रवणबेळगोळच्या छोट्या पर्वतावर एक वस्ती बनविली होती. श्रीपुरुषाचे पुत्र शिवमार द्वितीय व दुग्गमार हे दोघेही जैन धर्माच्या बाबतीत अभिरुची बाळगणारे राजे होते. दुग्गमार राजानेही जैन मंदिरांना दान दिले. शिवमार द्वितीयचा कालखंड हा गंगवंशाच्या दृष्टीने निश्चितच दुर्भाग्यपूर्ण कालखंड होता. त्याच्या कारकीर्दीत राष्ट्रकूटानी गंगवाडीवर आक्रमण करून त्याला तीन वेळा आपले कैदी बनविले. शेवटी राष्ट्रकूटांचा मांडलिक राजा म्हणून राज्य करण्याची त्याला परवानगी मिळाली.

कर्नाटकमधील शिलालेखानुसार श्रीपुरुषचा पौत्र राचमल्ल प्रथम यानी उत्तरीय अर्काट जिल्ह्यातील वंदेवश तालुक्यात एक जैन गुंफा निर्माण केली त्याचा पुत्र एरेयंग नीतीमार्गी परम जैन असून त्यानी कलियुगातील अस्पर्श वस्तूपासून स्वत:ला अलिप्त ठेवले. बत्तुग गंग हा राचमल्ल तृतीयचा भाऊ व उत्तराधिकारी होता. राष्ट्रकूट राजा कृष्ण तृतीयचा हा मांडलिक होता त्यानी अनेक जैन मंदिरांना दान दिले. त्यानंतर ९६१ ते ९७४ या काळात राज्य करणारा व जैन धर्माच्या प्रसाराच्या दृष्टीने महत्त्वाचा गंगराजा मारसिंह गादीवर आला. निरनिराळ्या शिलालेखात त्याला सत्यवाक्य कोंगुणि वर्मा, धर्ममहा राजाधिराज, गंग चूडामणि, चलदुत्तरंग, मांडलिक त्रिनेत्र, गंगविद्याधर, गंगकदर्प, गंगवज्र व गंगसिंह इत्यादी बिरुदावल्या लावल्या आहेत. श्रवणबेळगोळच्या ब्रह्मदेव स्तंभावर स्याद्वाद सिद्धांतासाठी मारसिंहानी केलेल्या कार्याचे विस्तृत वर्णन केले आहे आपले सैनिकी कार्य केल्यानंतर त्यानी जिनेंद्र देवाच्या सिद्धांताला सुनियोजित केले अनेक ठिकाणी मानस्तंभाची निर्मिती केली. लेख क्र. १४९ अनुसार त्यानी पुलगिरे नावाच्या ठिकाणी एक जिनमंदिर बांधले जे त्याच्याच नावावर 'गंग कंदर्प जिनेंद्र मंदिर' म्हणून ओळखले जाते. लेख क्र. १५२ अनुसार त्यानी अनेक पुण्यकार्ये केली व जैन धर्माच्या उत्थापनात मोठे महत्त्वाचे कार्य केले. शेवटी लिहिले आहे की, त्याने राज्यत्याग करून बंकापूर येथे अजितसेन भट्टारकाच्या उपस्थितीत सल्लेखना व्रत धारण केले.




मारसिंहाची परोपकारिता केवळ अनेक ठिकाणी जिनालयाच्या निर्मितीपर्यंतच मर्यादित नाही तर, त्यांनी अनेक विद्वानाना सहकार्य केले. विद्वानामध्ये व्याकरणकार, प्रसिद्ध तत्त्वज्ञ व कवीचा समावेश होता. मारसिंहाचा पुत्र राचमल्ल चतुर्थ यानी श्रवणबेळगोळ निवासी अनंतवीर्यला पेर्गदूर नावाच्या गावाचे व इतरही काही दान दिल्याची माहिती मिळते. मारसिंह व त्याचा पुत्र राचमल्ल चतुर्थ याचा मंत्री व सेनापती प्रसिद्ध चामुंडराय हा होता, राचमल्ल चतुर्थच्या कारकिर्दीतच सेनापती चामुंडरायनी श्रवणबेळगोळ या पवित्र स्थानी गोमटेश्वर बाहुबलीच्या उत्तुंगमूर्तीची स्थापना केली. मारसिंहाप्रमाणे चामुंडरायही अजितसेन भट्टारकाचा शिष्य होता. गोम्मटसारादी ग्रंथाचे कर्ते आचार्य नेमिचंद्र हे त्यांचे दुसरे गुरु होते कानडीतील महाकवी रन्न चामुंडरायाच्या दरबारातच प्रसिद्धिला आला चामुंडराय स्वतः कुशल लेखक होता.

गंग घराण्यातला शेवटचा प्रमुख राजा रक्कस गंग पेमनिडि राचमल्ल पंचम होय. ९८४ इ. स. मध्ये हा राज्यसिंहासनावर बसला व त्याने पतनोन्मुख गंग राज्याला वाचविण्याचे व्यर्थ प्रयत्न केले. त्याचे गुरु द्रविड संघाचे विजयदेव भट्टारक हे होते. इ. स. १०२५ मध्ये या घराण्याच्या राजसत्तेचा अंत झाला असला, तरी छोटया छोटया प्रमाणात या घराण्याचे अस्तित्व बराच काळ होते.

गंग वंशातील राजे प्रथमपासूनच जैन धर्माचे उपासक व संरक्षक होते. आपल्या उदारतेबरोबरच ते अन्य धर्मानाही संरक्षण प्रदान करीत होते. परधर्मसहिष्णुता हे त्यांचे वैशिष्ठचच होय. या वंशातील निरनिराळ्या सत्ताधिशानी स्वतः जैन धर्माचे पालन केलेच, त्याचबरोबर जैन धर्माला राजधर्माचे स्थान दिले. त्यामुळेच या काळात कर्नाटकच्या प्रदेशात जैन धर्माला एक प्रभावी धर्माचे स्वरूप प्राप्त झाले. जैन साहित्य, कला इत्यादी विविध क्षेत्रात असामान्य प्रगति झाली. म्हणूनच *'गंग राजसत्तेचा काळ हा जैन धर्माचा सुवर्ण युगाचा कालखंड'* मानला जातो.

## गंग काळातील साहित्य

गंग राजानी जैन धर्माला दिलेल्या आश्रयामुळे या काळात जैन धर्माचे साहित्यही मोठ्या प्रमाणात निर्माण झाले.

जैन तर्कशास्त्रावरील लेखकामध्ये अकलंकदेवानंतर विद्यानंदीचे स्थान महत्त्वाचे आहे. *'आत्मपरीक्षा'* हा आपला ग्रंथ त्यांनी सत्यवाक्य ( राजमल्ल द्वितीय ) राजाकरिता लिहिला. यावरून हा ग्रंथ नवव्या शतकात लिहिला गेला हे निश्चित होते. 'तत्त्वार्थश्लोकवार्तिक' हा त्यांचा प्रसिद्ध ग्रंथ असून तत्त्वार्थसूत्रावर लिहिलेली ही श्लोकबद्ध टीका आहे. वार्तिकाच्या पद्धतीला अनुसरून या श्लोकांचे विवरणही स्वत. आचार्यानीच दिले आहे. यातील अर्धा अधिक भाग पहिल्या अध्यायाच्या विवरणाला दिलेला असून, त्यात जीव तत्त्वाच्या स्वरूपाविषयी असलेल्या वादविवादांचे उत्तम परीक्षण केले आहे विशेषतः बौद्ध तत्त्वज्ञानाचे खडन करण्याची दृष्टि यात प्रमुख आहे. 'अष्टसहस्री' हा विद्यानंदीचा दुसरा ग्रंथ समंतभद्रांच्या आप्तमीमांसेवर अकलंकदेव यानी अष्टशती टीका लिहिली होती. तिचे विवरण या अष्टसहस्रीत समाविष्ट होते. कारण यात प्राय सर्व जैनेतर मतांचे समालोचन जैन दृष्टीने केले आहे. आत्मपरीक्षा या ग्रंथात 'मोक्षमार्गस्यनेतारं' इत्यादी मंगलाचरणाचा आधार घेऊन धर्म-मार्गाचा उपदेशक पुरुष कसा असतो ते तर्कशास्त्रदृष्ट्या दर्शविले आहे जैनेतर तत्त्वज्ञांच्या ईश्वरविषयक कल्पनाचे खंडन हा या ग्रंथाचा मुख्य उद्देश्य आहे. याशिवाय पत्रपरीक्षा, सत्यशासनपरीक्षा, समंतभद्राच्या युक्त्यानुशासना-वरील टीका श्रीपुरपार्श्वनाथस्तोत्र, विद्यानंदमहोदय इत्यादी त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.




भारतीय स्थापत्य कलेत प्रसिद्ध आहेत. जैनांनी श्रवणबेळगोळ, कारकल व वेणूर येथे बाहुबलीच्या विशाल मूर्ती बनविल्या. या मूर्तीची काही वैशिष्ठ्ये आहेत. या मूर्ती नग्न उत्तराभिमुख माधवी वेलीनी पाय व हात वेष्ठित आहेत. त्या एका आदर्श साधूच्या प्रतिकृती आहेत जो ध्यानात मग्न आहे व पृथ्वीवर उगवलेल्या लतांनी आपल्या आलिंगनानी त्याला बद्ध केले आहे. त्याला गोमटेश्वर म्हणतात.

मूडबिद्रीची वस्ती महत्त्वाची आहे. पाहताच वाटते की, ही वस्ती लाकडाची बनविलेली असावी. डॉ. फर्ग्यूसन हे मान्यवर कलाभिज्ञ म्हणतात, " मूडबिद्रीचे मंदिर विविधता व सुंदरतेच्या दृष्टीने परिपूर्ण आहे. त्यापेक्षा उत्कृष्ट कोठेही असणार नाही. त्याची बनावट ऐच्छिक आहे व रचना सुंदरतेच्या दृष्टीने एक स्तंभ दुसऱ्यापेक्षा भिन्न आहे. " जैन स्थापत्य कलेतील स्तंभ ही दुसरी विशेषता होय. स्तंभ दोन प्रकारचे आहेत, एक ब्रह्मस्तंभ व दुसरे मानस्तंभ. तिसरे वैशिष्ठ्य मूडबिद्रीजवळ आढळणाऱ्या गुरूंच्या समाध्या होत. काही समाध्या तीनपासून पाच ते सात मजली उंच आहेत. या प्रकारच्या समाध्या भारतात अन्यत्र कोठेही पहावयास मिळत नाहीत. मध्यकालीन भारताला कला क्षेत्रातील जैनांचे हे अनुपम योगदान आहे

विजयनगर साम्राज्याच्या काळात जैनधर्म मोठ्या प्रमाणात प्रचलित होता याचे श्रेय जैन गुरूला आहे. दिल्लीच्या बादशहाच्या दरबारात सिंहकीर्ति, विशालकीर्ति व विद्यानंद यानी जैनधर्माचा प्रसार केला. सिंहकीर्तीनी सुलतान मुंहमद तुघलकाच्या दरबारात बुद्धांना पराभूत केले. विशालकीर्तीनी सिकंदर सुरिमाणकडून सम्मान प्राप्त केला. विद्यानंदीनी अनेक सम्मान प्राप्त केले होते. चौदाव्या शतकात बाहुबली पंडिताने धर्मनाथ पुराण, केशववर्णीयाने गोम्मटसारावर कर्नाटक वृत्ति, अमितगतिने श्रावकाचार व सारत्रयावर टीका, अभिनव श्रुतभूतिने मल्लिषेणाच्या सज्जनचित्तवल्लभवर टीका, आयतवर्मानी कन्नडमध्ये रत्नकरंडक, चंद्रकीर्तिने परमागतसार इत्यादींची रचना केली. १४२४ मध्ये भास्करनी जिवधर चरितची रचना केली. कल्याणकीर्तिने ज्ञानचंद्राभ्युदय, कामनकथे, अनुप्रेक्षा, जिनस्तुती व तत्त्वभेदाष्टकची रचना केली. त्यानी लिहिले आहे की, मी राजा पांडचच्या प्रेरणेने ज्ञानचंद्राभ्युदय व कामनकथेची रचना केली. याच सुमाराला जिनदेवण्णने श्रेणिकचरित, विजयण्णने द्वादशानुप्रेक्षा, विद्यानंदीने प्रायश्चित्त नामक कन्नड टीका. बोम्मरसच्या शिष्यानी सनत्कुमार चरित जीवधर चरिते यशकीर्तिने धर्मशर्माभ्युदयवर टीका लिहिली. साल्वने भारत, शारदा विलास, नेमीश्वर चरीत व दोड्डमने चंद्रप्रभ चरिताची रचना केली.

मूडबिद्रीच्या रत्नाकर वर्णीने दहा हजार पद्यात त्रिलोक शतकाची रचना केली. नेमण्णने ज्ञानभास्कर चरिताची रचना केली. बाहुबलीने नागकुमार चरित लिहिले. १६ व्या शतकात ही अनेक जैन ग्रंथकार झाले. श्रुतकीर्तीने विजयकुमारी चरित व दोड्डणाकने चंद्रप्रभ षट्पदीची रचना केली. सतराव्या शतकात पंचबाणने भुजबली चरित लिहिले. त्यात श्रवणबेळगोळ व कारकलच्या गोम्मटस्वामी मस्तकाभिषेकचे वर्णन आहे. देवरसने गुरुदत्त चरित लिहिले[१].

जैनांनी केवळ धर्म व साहित्य हाच आपला विषय मानला नाही, तर औषधि विज्ञानावरही लेखन केले. भंगराज प्रथमने "खगेंद्रमणिदर्पण" श्रीधरदेवनी "वैद्यामृत" बाचरसने "अश्ववैद्य" पद्मरसनी, "हयसार समुच्चय" इत्यादी ग्रंथांची रचना केली[२].

अशा प्रकारे विजयनगर साम्राज्याच्या काळात राजे, मांडलिक, शासकीय अधिकारी व नागरिक इत्यादींनी दिलेल्या सहकार्याने जैनधर्माचा सर्वांगीण विकास झालेला दिसतो. या काळात या सहकार्यामुळेच अनेक जैन मंदिरे बांधली गेली. मूर्तीची स्थापना झाली. जैनाचार्यांनी साहित्य क्षेत्रात असामान्य कार्य केले व कला साहित्य इत्यादी क्षेत्रात देदिप्यमान कार्य करून जैनांनी विजयनगर साम्राज्याला परिपूर्ण केले.

## दक्षिण भारतातील प्रसिद्ध जैन स्थाने–

दक्षिण भारतात सुरुवातीपासूनच जैन धर्माचा प्रभाव मोठ्या प्रमाणात होता. श्रवणबेळगोळ, पोदनपुर, कोप्पल, पुन्नाड, हनमोगे, तल्काद, हुमच, बल्लिगामे कण्टूर व बनवासी इत्यादी या प्रदेशातील जैनांची प्रसिद्ध केंद्रे होती. ही ठिकाणे तीर्थस्थाने म्हणूनही प्रसिद्ध आहेत. त्यातील श्रवणबेळगोळ व कोप्पल ही महातीर्थे समजली जातात.

श्रुतकेवली भद्रबाहूचा श्रवणबेळगोळशी संबंध आहे. येथेच त्यांनी समाधिमरण स्वीकारले. इ.स. ६०० चा एक शिलालेख चंद्रगिरी पर्वतावर असून त्यात ही सर्व माहिती दिलेली आहे. त्याच्या पुढे विंध्यगिरी पर्वतावर चामुंडरायांनी स्थापन केलेली गोमटेश्वराची उत्तुंग मूर्ती आहे. भगवान ऋषभदेवाचे पुत्र भरताने आपला लहान बंधु बाहुबलीची ५२५ धनुष्य उंचीची मूर्ती पोदनपुर येथे स्थापन केली होती. त्याच्या स्मृतिप्रित्यर्थ चामुंडरायने श्रवणबेळगोळ येथे बाहुबलीची उत्तुंग मूर्ती स्थापन केली होती.

श्रवणबेळगोळ नंतर दुसऱ्या क्रमांकाचे महत्त्वाचे महातीर्थ कोप्पल होय. जे सध्या कोप्पळ या नावाने प्रसिद्ध आहे. सातव्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत हे ठिकाण जैन धर्माचे महान केंद्र म्हणून प्रसिद्ध होते. शिमोगा जिल्ह्यातील मिळालेल्या एका शिलालेखानुसार हे ठिकाण जैनधर्माच्या सर्व तीर्थस्थानामधील अग्रगण्य होते. तेथे अनेक जैन मंदिरे होती. दंतकथेनुसार त्यांची संख्या ७२२ होती. येथे निरनिराळ्या ठिकाणचे साधु व गृहस्थ धार्मिक कृत्य करण्यासाठी येत होते. कोप्पळशी संबंधित पालकीगुंडु पहाडावर अशोकाच्या शिलालेखाजवळ दोन चरणचिन्ह असून त्याखाली पूर्वीच्या कन्नडमधील दोन ओळीचा एक शिलालेख आहे. त्यात लिहिले आहे की, चावय्यनी जटासिंहनंदीच्या चरणचिन्हांना अंकित केले आहे. हे जटासिंहनंदी वरांग चरित्राचे कर्ते होत. शासक व अधिकारी येथे जिनमंदिराची निर्मिती करीत होते असे दिसते. सध्या जेथे व्यंकटेश मंदिर आहे, ते प्रथमतः जैन मंदिर असावे, कारण त्याच्या स्तंभावर अनेक जैन मूर्ती कोरलेल्या आहेत.

येडतोरे तालुक्यातील चिक्क हनमोगेही जैनधर्माचे केंद्र होते. तेथे ६४ जिनमंदिरे होती. सध्या सर्व नष्ट झाली आहेत. नगर तालुक्यातील पवित्र तीर्थ म्हणजे हल्लीच्या नगरच्या उत्तरेस बावीस मैलावर पोम्बुच्च नावाचे स्थान हे होय, ज्याला सध्या 'हुमच' म्हणतात. नवव्या व दहाव्या शताब्दीतील हे जैनधर्माचे एक प्रमुख केंद्र होते. तेथील सर्वात प्राचीन मंदिर इ. स. ८७८ मध्ये बनविण्यात आले आजही तेथील विशाल मठ, पार्श्वनाथ व पद्मावतीचे मंदिर अत्युत्तम अवस्थेत आहे.

११ व्या शतकात बल्लिगामे जैनधर्माचे प्रमुख केंद्र होते. राजा विक्रमादित्य सहावा याने येथील चालुक्य गंग पेरम्माडि जिनालयाला दान दिले होते. होयसळ राजा वीर बल्लाळच्या अधिकाऱ्यानीही काही गावे दान दिली होती. हे दान मल्लिकामोद शांतिनाथ भगवानाच्या पूजेसाठी दिलेले होते. सध्या तेथे खंडित जैन मूर्तीशिवाय अन्य कोणतेही अवशेष नाही.

हैद्राबाद प्रदेशात उल्लेखनीय म्हणजे पुरातत्त्वीय जैन गुंफा होत. वेरुळच्या जैन गुफा ज्या पहाडावर आहेत, त्याला चारणाद्रि किंवा चारण मुनींचा पर्वत असे म्हणतात. शिलालेखावरून वेरुळच्या गुंफा मंदिराचा काळ ८ ते १३ व्या शतकापर्यंत मानला जातो. जैन गुफात पार्श्वनाथ तीर्थंकराची विशाल मूर्ती आहे. त्याच्याखाली इ. स. १२३४–३५ चा शिलालेख आहे.

उस्मानाबादजवळ प्रसिद्ध सात गुंफा आहेत. त्यातील चार जैन गुफा आहेत या इ. स. पू. ५ व्या शतकातील असाव्यात, कारण 'करकंडु चरित' मध्ये लिहिले आहे की, अंग देशाचा राजा करकंडु तेरपुरला आला व तेथे त्याने दोन गुंफा पाहिल्या. बौद्ध व जैन दोघांनाही हे मान्य आहे. या गुफामध्ये महावीर तीर्थंकरांची मूर्ती नाही. यावरून या गुंफा निश्चितपणे इ. स. पू. ५ व्या शतकातील असाव्यात असे म्हणता येते.

विजापूर जिल्ह्यातील होनवाड नावाचे ठिकाण ११ व्या शतकाच्या मध्यापासून त्रिभुवन तिलक जिनालयामुळे प्रसिद्ध आहे. हे मदिर शातिनाथ भगवानाचे होते त्याच्या शेजारीच पार्श्वनाथ व सुपार्श्वनाथाची जिनालये होती. हे मंदिर चाकिराजाच्या धार्मिक उत्साहामुळे बनविले होते. सोमेश्वर प्रथमची राणी केतलदेवीचा चाकिराज हा एक अधिकारी होता व जैनधर्माचा अनुयायी होता.

बेळगाव जिल्हा व त्याचा आसपासचा प्रदेश शिलाहार व रट्ट वंशाच्या शासकांच्या ताब्यात होता व हे राजे जैनधर्मीय होते. खानापुर तालुक्यातील हलसी नावाचे ठिकाण जैनधर्माचे केंद्र होते. याचे पूर्वीचे नाव पलासिका असून तेथे मिळालेल्या अनेक ताम्रपटात जिन स्तुती असून, जैन मंदिराना दान दिल्याचा उल्लेख आहे. रविवर्मा आपल्या पूर्वजापेक्षाही जास्त जैनधर्मानुयायी असून, त्याने जैनधर्म महोत्सव करण्यासाठी साधूना आहार देण्याविषयी आज्ञा काढल्या होत्या.

सौदत्तीचे पूर्वीचे नाव सौगन्धवर्ती होते. नवव्या शतकापासून हे स्थान हळके हळके जैनाचे महान् केंद्र बनण्यास सुरुवात झाली. येथील रट्टवंश पूर्वीपासूनच जैनधर्मानुयायी होता. महासामन्त पृथ्वीराय हा इन्द्रकीर्तीचा शिष्य होता. त्याने एक जिनालय निर्माण करून त्याला भूमि प्रदान केली होती. इंद्रकीर्तीचे पूर्वज कारेयगणाचे होते, यावरून सौदत्ती नवव्या शतकापासून यापनीय संघाचे प्रमुख केंद्र होते. शांतिवर्मा या कल्याणीच्या चालुक्याच्या माडलीकाने सौदत्तीला एक जिनालय बाधून त्याच्या प्रबंधासाठी भूमिदान केली होती. रविचंद स्वामी, अर्हनंदी, शुभचंद्र, सिद्धांतदेव, मौनिदेव व प्रभाचंद्र या इतर गुरूंचाही येथे असल्याचा उल्लेख मिळतो. रट्टवंशातील निरनिराळचा राजांनी या मंदिराचे संरक्षण करून निरनिराळचा दानाच्या स्वरूपाने त्या मंदिराचा योग्य प्रबंध केल्याची माहिती मिळते.

गोकाक तालुक्यातील कोण्णूर गाव जैनधर्माचे प्रमुख स्थान होते. हा गाव रट्ट साम्राज्यात समाविष्ट असून, येथे मिळालेल्या शिलालेखात रट्टराजाद्वारे जैनधर्म व त्यांचा गुरूना दिलेल्या संरक्षणाची माहिती आढळते. कलहोसी येथे मिळालेल्या शिलालेखात जैनांच्या द्वारे केलेल्या कार्याचे विवरण आहे.

सौदत्ती तालुक्यातील हुली या गावी यापनीय संघाच्या दोन विभिन्न संघाचे आचार्य राहात होते. तेरदाल रट्टवंशीय शासक समृद्ध, श्रीमंत व व्यापारी याच्या सहकार्याने ११ व्या व १२ व्या शतकातील प्रसिद्ध केंद्र बनले होते. येथील गोंक राजा जैनधर्मीय होता. गोंकनी तेरदाल येथे नेमिनाथाचे मंदिर बांधले व साधूना आहार देण्यासाठी भूदान केले. निंबदेव हा जैनधर्मीय असून, त्याने प्रथम कोल्हापुरात रूपनारायण जिनमदिर वस्तीची निर्मिती करून आपले धर्मप्रेम स्पष्ट केले. ११३५ मध्ये पार्श्वनाथाचे मंदिर बांधले.

कोल्हापूर प्राचीन काळापासूनच जैनधर्माचे केंद्र होते व आजपर्यंतही ते कायम आहे. जैन समाजाच्या चार मुख्य मठामध्ये त्याचे नाव आहे. येथील १७७४ च्या एका शिलालेखात भट्टारकाचा उल्लेख असून, त्यांना दिल्ली, करवीर (कोल्हापूर) जिनकांची व पेनुगोंडचे सिंहासनाधीश्वर म्हटले आहे.

धारवाड जिल्ह्यातील गदग तालुक्यात मुलगुद प्राचीन काळापासून जैनधर्माचे प्रसिद्ध केंद्र आहे. राष्ट्रकूट राजा कृष्ण द्वितीयने ९०२–०३ मध्ये एक उत्तुग जिनालय बांधले व त्याचा पुत्र अरसार्यंनी त्याच्या प्रबंधाची व्यवस्था केली. हे दान चंद्रिकावाटच्या कनकसेनानी दिले होते. कनकसेन वीरसेनाचे शिष्य व वीरसेन कुमारसेनाचे शिष्य होते. चामुंडरायाच्या पुराणाच्या प्रारंभी कुमारसेनाचा उल्लेख आहे. १२–१३ व्या शतकात धारवाड तालुक्यातील मंगुंडी नावाचे स्थान जैनधर्माचे प्रमुख केंद्र होते. येथे एक जिनालय असून यापनीय संघाच्या ताब्यात होते.

मद्रासमधील अदोनी तालुका पूर्वीपासूनच जैनधर्माने प्रभावित होता. येथे मिळणारे जैनावशेष उल्लेखनीय आहेत. अदोनीच्या वारविरल पहाडावर गुंफा खोदून बनविलेले एक मंदिर आहे. त्यात तीर्थंकरांच्या मूर्ती आहेत. या तालुक्यात मिळालेल्या शिलालेखात राणी चंद्रामध्ये हिने नंदवर येथे एक जैन मंदिर बांधल्याची माहिती दिली आहे. त्याच्या प्रबंधनार्थ तिने दानही दिले होते.

हदगल्ली तालुक्यातील कोगली प्राचीन काळापासूनच जैनधर्माचे प्रमुख स्थान आहे. तैलप द्वितीयच्या काळातील शिलालेखात येथील मंदिराला भूमिदान दिल्याची माहिती आढळते. मंदिरातील स्तंभलेखात पार्श्वनाथाच्या पूजेसाठी प्रतिदिन दान देणाऱ्या व्यक्तींची नावे आहेत. त्यात समाजातील सर्व वर्णांचे लोक आहेत.

याशिवाय नंदि, वेवरु, कोंडकुंडे, मडक शिरा, अमरापुरम्, पारसिवम्, हल्ळी, यम्प, कलसतवाडु, चामुंडा नावाचा पर्वत इत्यादी दक्षिणभारतातील जैनांची प्रसिद्ध तीर्थे होती व आहेत. अर्थात् याशिवायही अनेक महत्त्वाची व प्रसिद्ध तीर्थस्थाने आहेत. तथापि विस्तारभयास्तव त्यांचे विश्लेषण दिले नाही. इतिहास साधनांच्या आधाराने उपर्युक्त तीर्थांचे वर्णन केले असून त्यांचे प्राचीनत्व दाखविले आहे.[1]

## बृहत्तर भारत–

प्राचीन काळापासून मौर्य काळ ते गुप्तकाळापर्यंतच्या प्राचीन भारतीय इतिहासाकडे दृष्टिक्षेप टाकल्यास त्यावेळी भारतीय प्रदेशाबरोबरच अफगाणिस्तान (कपिशा) गांधार, बलुचिस्तान, काश्मीर, तिबेट, नेपाळ, भूतान, ब्रह्मदेश व लंका इत्यादि प्रदेशही भारतीय संस्कृतीच्या प्रसाराचे क्षेत्र मानले जात होते. याशिवायही मध्य एशियातील काशगर, खोतान, यास्कंद येथे भारतीय सत्ता स्थापन झालेली होती. जावा, बाली, बोर्निओ इत्यादि द्विपामध्ये भारतीय राजकीय सत्तेची स्थापना झालेली होती. आग्नेय आशियातील राज्ये ही भारतीय राज्यांच्या मानाने मागासलेली होती. या प्रदेशात राहणाऱ्या समाजाला सुसंस्कृत बनविण्याचे कार्य भारतीय संस्कृतीने व समाजाने केले. इतकेच नव्हे तर रोम, इराण इत्यादि देशात भारतीय संस्कृतीचा अभूतपूर्व प्रसार झाला. संपूर्ण जगासाठी भारतातील धर्म, संस्कृति, विद्या इत्यादींनी प्रकाशस्तंभाचे कार्य केले. दूरदूरच्या देशातील शेकडो विद्यार्थी भारतीय विश्वविद्यालयामध्ये विद्यासंपादनार्थ येऊ लागले. तसेच भारतीय व्यापारी, साहसी वीर, विद्वान व धर्मोपदेशक निरनिराळ्या देशामध्ये समुद्र मार्ग व खुष्कीच्या मार्गाने जात येत असत. अशा प्रकारे त्यांनी भारतीय व्यापार, व्यवसाय, धन-समृद्धि, शक्ति व प्रभावाची वृद्धि करून बृहत्तर भारताची निर्मिती केली.

इ. स. पू ६ व्या शतकापासून मुसलमान आक्रमणापर्यंत जवळ जवळ दीड हजार वर्षांच्या काळात भारतात ब्राह्मण, जैन, बौद्ध हे तीन प्रमुख धर्म होते. ज्या व्यापारी, साहसी वीर, धर्मोपदेशकांनी बृहत्तर भारताची निर्मिती, विकास व सरक्षण केले, त्यात या तीनही धर्मांचे लोक होते. भारताचा प्रभाव ज्याच्या देशात आढळतो तेथे या तिन्ही धर्मांच्या विचाराचा तत्वज्ञानाचा प्रसार व प्रभाव आढळतो. मध्यंतरीच्या जैनधर्मशास्त्र, पुराणे इत्यादींच्या धार्मिक प्रतिबंधामुळे बृहत्तर भारतात बौद्धधर्माचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाला. तथापि चिनी यात्रेकरूनी दिलेल्या माहितीनुसार, या प्रदेशात जैन निर्ग्रन्थ साधूंचे अस्तित्व कायम असलेले दिसते. जैन मूर्ती व जैन अवशेषही अनेक ठिकाणी आढळतात अनेक पुरातत्वीयांच्या मते जैनधर्म प्राचीनकाळात या प्रदेशात पसरलेला असावा. तिबेट, अफगाणिस्थान, गांधार, इराण, मध्य एशिया या प्रदेशात जैनधर्माच्या अस्तित्वाच्या काही खुणा आढळतातच. जैनांच्या लहान वस्त्याही मध्यकाळात तेथे होत्या.

सिंहलद्वीप किंवा लंकेमध्ये भरत चक्रवर्तीने जैनधर्म व श्रमण संस्कृतीचा प्रसार केल्याची माहिती मिळते. जैन अनुश्रुत्यनुसार लंकेचा राजा रावण व त्याचा वंश जैनधर्मी होता. करकंडूनेही लंकेची यात्रा केली होती. इ. स. पू. ४ थ्या शतकात लंकेचा राजा पांडुकाभय याने आपल्या अनुराधापुर या राजधानीत जैन विहार व भव्य जैन मंदिराची स्थापना केली. अशोकाच्या काळात लंकेत बौद्धधर्माचा मोठ्या प्रमाणात प्रसार झाला. जैन पुराण व कथा ग्रंथात सिंहलद्वीप व रत्नद्वीप इत्यादि द्वीपामध्ये जैन व्यापाऱ्यांनी व्यापारार्थ गेल्याची सिंहलद्वीपातील राजांचे भारतीय राजाबरोबर परस्पर संबंध असल्याची माहिती दिलेली आहे. इ. स. ७ व्या ८ व्या शतकात जैनधर्म व जैनीयांचे अस्तित्व सिंहलद्वीपामध्ये होते याचे स्पष्ट पुरावे मिळतात. मध्यकाळाच्या सुरुवातीला आचार्य यश:किर्तीचा तत्कालीन राजानी यथोचित सन्मान केला अशी माहिती देणारा शिलालेखही मिळतो. तमिळनाडूच्या प्रदेशा-प्रमाणेच लंकेबरोबरही जैनांचा संबंध असलेला दिसतो.

पूर्वेकडील मलाया, ब्रह्मदेश, सयाम, कंबोडिया, चंपा, श्रीविजय इत्यादी बेटाबरोबर व्यापार करण्यात जैनधर्मीय व्यापारी असल्याची माहिती जैन साहित्यात आढळते. जैन ब्रह्मचारी, श्रावक इत्यादींनीही या प्रदेशात जैनधर्माचा प्रसार केला. पुढील काळात या प्रदेशाचे संपूर्ण भारतीयीकरण झाले. मंदिरे, शिल्प, मूर्ती भारतीय कलेच्या धर्तीवर बांधण्यात आला, भारतीय साहित्य, सामाजिक नियम व संस्था इत्यादींचाही येथील समाज-जीवनावर परिणाम झाला. या साधनांचा जैन दृष्टिकोनातून विचार केल्यास अनेक साधने त्या प्रदेशातील जैन संस्कृतीच्या प्रभावाची माहिती देतात. कांबुज, चंपा येथील प्राथमिक भारतीय राजवंशाचे मूळ नाग-नागी संबंधात मिळते. कंबोडियात भारतीय संस्कृतीची स्थापना करणाऱ्या कौंडिण्यचे उल्लेख जैन साहित्य, इतिहास व अनुश्रुतीत मिळतात. बृहत्तर भारतातील या सर्व देशात मद्यमांस व पशुबळी इत्यादींचा अभाव आढळतो. देव किंवा बुद्ध यासाठी जिन शब्दाचा वापर, अनेक मूर्तीचे तीर्थंकाराच्या मूर्तीशी असणारे साधर्म्य, शिलालेखात पार्श्वनाथ तीर्थंकराचा उल्लेख व अध्यात्मिक विचारांचा प्रयोग, त्या देशातील प्रचलित रामायण महाभारताच्या कथेचे जैन रामायण महाभारत कथेशी असणारे साम्यत्व, स्त्रियांना विशेषाधिकार देण्यात जैन नीतीचा प्रभाव, कार्तिक मासात मानला जाणारा वर्षारंभ इत्यादी गोष्टी येथील जैनधर्माचे अस्तित्व दर्शवितात. समाजात सन्माननीय बौद्ध भिक्षु, शिवाचार्य किंवा ब्राह्मण व पंडित हे तीन वर्ग होते. तिसरा पंडित वर्ग बहुधा जैन असावा. उपर्युक्त मुद्यांचे संशोधनात्मक दृष्टीने विश्लेषण केल्यास बृहत्तर भारतातील जैनधर्माच्या प्रभावाची माहिती मिळू शकते. सामान्यत: भारतीय धर्म व संस्कृतीने बृहत्तर भारतातील निरनिराळ्या समाजघटकांना सर्वांगीण प्रगत करण्याचे जे कार्य केले त्यात जैनधर्मीयांचा निश्चितपणे समान वाटा आहे.

## आधुनिक काळ–

आधुनिक काळातही जैन धर्माने भारतीय संस्कृतीत आपले स्थान कायम टिकविले आहे, जैन समाज भारतीय समाजजीवनाशी एकरूप झालेला आहे. भारतात ब्रिटिश सत्ता स्थापन झाल्यानंतर या पारतंत्र्याच्या जोखडातून भारतीय समाजाची सुटका करण्याचे, भारताला स्वातंत्र्य मिळवून देण्याचे जे प्रयत्न करण्यात आले, त्यात जैन समाजही समाविष्ट होता. कित्येकदा या राष्ट्रीय कार्यात या समाजातील काही पुरुषांनी आत्मार्पणही स्विकारलेले आहे. स्वातंत्र्योत्तर काळात भारतीय समाज सर्वांगिण क्षेत्रात जी प्रगति करीत आहे त्यात सहभागी होण्याचे, कित्येकदा अग्रेसर बनण्याचे कार्यही हा समाज करीत आहे म्हणूनच आज भारतात राजकीय, औद्योगिक, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रात या समाजातील काही व्यक्ती चमकताना दिसतात भारताला त्याचे पूर्वापार जगाला आध्यात्मिक क्षेत्रात नेतृत्व करण्याचे स्थान मिळावे अशी आजही या समाजाची अपेक्षा आहे. आध्यात्मिक क्षेत्रात जगाचे नेतृत्व करीत असताना भारताने वैज्ञानिक, औद्योगिक क्षेत्रातही जगाच्या मागे राहू नये, जगाची बरोबरी करण्याचा प्रयत्न करावा अशी या समाजाची इच्छा आहे. त्यासाठी भारताला सर्वांगिण

क्षेत्रात परिपूर्ण बनविण्याच्या कार्यात प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष स्वरूपात मदत करण्याचे कार्य हा समाज करीत आहे. म्हणून राजकीय क्षेत्राबरोबर औद्योगिक क्षेत्रही परिपूर्ण करण्याचे कार्य हा समाज करीत आहे. सामाजिक व शैक्षणिक संस्थांची स्थापना करून समाजाची प्रगति घडवून आणण्याचा उच्च ध्येयाने हा समाज कटीबद्ध झाला आहे. या विविध क्षेत्रात कार्य करणाऱ्या मान्यवर व्यक्तींचा व त्यांच्या कार्यांचा परिचय या ग्रंथाच्या शेवटच्या भागात आम्ही करून देणारच आहोत.

'इतिहास' अर्घ्य ही जैन समाजाच्या पराक्रमाची गाथा आहे. यात सत्ताधीश, त्यांच्या पत्नी, मांडलीक राजे या जैन धर्मीयांनी भारतीय संस्कृतीला किंवा समाजाला काय योगदान केले हे सांगण्याचा प्रयत्न केला आहे. ही गाथा गाताना, या धर्माने जैन समाजाच्या व इतर भारतीय समाजाच्या प्रगतीसाठी काय कार्य केले हे सांगण्याचा प्रयत्न केला आहे, त्यामुळेच यात जैन धर्माने केलेल्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक इत्यादी विविध क्षेत्रातील कर्तृत्वाचा समावेश झालेला आहे. जैन धर्माचे योगदान स्पष्ट करीत असताना भारतातील इतर कोणत्याही धर्मावर किंवा पंथावर टीका करण्याचा प्रयत्न या ठिकाणी केलेला नाही. या उलट 'समन्वयता व परधर्मसहिष्णुतता' हे वैशिष्टय असलेल्या भारतीय संस्कृतीतील, अनेकांतवादाच्या दृष्टीने जगाकडे पाहणाऱ्या जैन धर्माचे अस्तित्व कसे सहकार्यात्मक व समन्वयात्मक होते हे दाखविण्याचा हा एक प्रयत्न होता. भविष्यकाळातील समाजाला जैन धर्माची ऐतिहासिक परंपरा माहित व्हावी व ऐतिहासिक ग्रंथाचे लेखन होताना या 'इतिहाससिद्ध' धर्माचे अस्तित्व व महत्त्व त्यात विसरले जाऊ नये ही या अर्घ्य लेखनामागील प्रामाणिक प्रेरणा आहे. ही प्रामाणिक प्रेरणा सफल झाल्याचा आत्मसमाधानाचा आनंद लेखनसमाप्तीसमयी निश्चितपणे मिळत आहे. आत्मसमाधान यथार्थ असल्याची पावती सूज्ञ वाचक देतील यात संदेह नाही.'

# जैन आचार्य

## ◎ अर्घ्य ४ ◎

या खंडाचे लेखन करताना जैन आचार्यांची संपूर्ण माहिती, त्यांचा काळ व त्यानी साहित्यक्षेत्रात घातलेली भर यांची माहिती दिलेली आहे. भारतीय विचारवंताच्या व ज्ञानाच्या क्षेत्रात मार्गदर्शन करणाऱ्या विद्वानाच्या मालिकेत, जैन आचार्यांचे स्थान कसे उच्च आहे हे साधार स्पष्ट केले आहे. जैन आचार्यांनी साहित्यक्षेत्रात निर्माण केलेल्या नवनवीन साहित्य परपरांची माहिती येथे दिली असून, भारतीय साहित्यामध्येही या जैनाचार्यांच्या कार्याला कसे महत्त्वपूर्ण स्थान आहे हे स्पष्ट केले आहे.

# जैनाचार्य

भारतीय जैन साहित्याला जीवदान देण्याचे अतिमहान कार्य जैनाचार्यांनी केलेले दिसून येते. या आचार्यांनी जर विविध ग्रंथ संपत्तीची रचना अथवा साभाळ केला नसता तर, आज जे जैन साहित्य उपलब्ध आहे, ते राहिले असते किंवा नाही याविषयी शंका वाटते. जैनाचार्यांनी जैन परपरा टिकवून धरण्यामध्ये आपल्या प्राणाची आहुति देखील दिलेली दिसून येते. तपाचरणासाठी व ज्ञानार्जनासाठी त्याना सतत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी विहार करावा लागला. वाटेतील अनेक संकटाना तोंड द्यावे लागले. इतर दार्शनिकाच्या मताचे खंडन व स्वमत प्रतिपादन करण्यासाठी त्यांना आपली अभ्यासुवृत्ति सतत जागृत ठेवावी लागली. ज्ञानग्रहणाची ही पूर्वीच्या आचार्यांची चिकाटी पाहून आजचे विद्वान् आश्चर्यचकित होतील यात काहीच शका नाही.

'आचार्य देवो भव' या वचनानुसार आचार्यांचे स्थान देवासमान असल्याचे सहज सिद्ध होते प्राचीन काळी गुरु-शिष्याचा संबंध अतिशय जवळचा असून, शिक्षणासाठी शिष्याला गुरूच्या गृहीच रहावे लागत असे याची उदाहरणे आपणाला महाभारत रामायणातून देखील पाहावयास मिळतात. जैन आचार्य अथवा साधू मात्र शिष्यांच्यासह एके ठिकाणी निवास न करता सतत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी विहार करीत असत. सर्व साधारण जनाना हितोपदेश करण्याचे महान कार्य करण्यात ते सतत मग्न होते.

तत्कालीन आचार्य तसेच शिष्य यांचे संबंध कसे होते, ते एकमेकांबरोबर कसे आदबीने वागत याविषयीची माहिती आपणाला आगमसाहित्यातील व इतर काही जैन ग्रंथातून पाहावयास मिळते. खरे आचार्य अथवा गुरु हे रत्नत्रय संपन्न असल्यामुळे पवित्र असतात. योग्य शिष्यावर प्रेम करणारे ते सर्व जीवांचे कल्याण करु इच्छिणारे असतात. ते स्वतः आचार-विचारांचे योग्य पालन करुन संसाररूपी समुद्रातून स्वतः पार होतात व इतरांनाही तारून नेतात.

जैनाचार्य सतत एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी विहार करीत असल्यामुळे त्याच्या जन्मस्थानाविषयी, कालाविषयी अथवा कुलाविषयी माहिती एकत्रित करणे फार दुरापास्त होते. याशिवाय ते स्वतः प्रसिद्धी पराङ्मुख राहाण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळे त्यांच्या स्वतःच्या ग्रथातून देखील त्यांची माहिती मिळत नाही अशावेळी आपणाला त्याचे जन्मस्थान, काल व कुल वगैरे बाबीविषयी माहिती मिळविण्यासाठी तत्कालीन साहित्य, त्यात आलेला त्यांच्याविषयीचा उल्लेख, राजाश्रय, शिलालेखादि बाबीचा आधार घ्यावा लागतो. या सर्वाधारे देखील त्यांची वरील बाबीविषयी निश्चित माहिती मिळेलच असे नाही.

प्रस्तुत आचार्य खंडात आचार्य परंपरेविषयी माहिती देऊन एकूण महत्त्वाच्या अशा पंधरा आचार्यांची माहिती एकत्रित करण्यात आली आहे. दिगंबर आगम साहित्य निर्मितीपासून सुरवात करून जैन साहित्य निर्मितीत ज्या ज्या आचार्यांनी महान योगदान दिले आहे, जे जास्तीत जास्त लोकप्रिय व प्रसिद्ध आहेत असे हे निवडक आचार्य घेतले आहेत. अर्थातच या आचार्यांच्या जन्मस्थान, काल, गुरुपरंपरा, शिष्यपरंपरा व कुलपरंपरा या बाबीविषयीची निर्णायक माहिती देणे काही ठिकाणी कठीण झाले आहे. अशाठिकाणी विविध विद्वानांची मते व ग्रंथाधार देऊन जास्तीजास्त उचित व आधुनिक माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. या कामी जैनेंद्रसिद्धांतकोश, जैन साहित्य आणि इतिहास यांवर प्रकाश टाकणाऱ्या महत्त्वपूर्ण काही ग्रंथाचा व मराठी, इंग्रजी, गुजराती ग्रंथाचा उपयोग केला आहे.

मूळ वाचक यातील काही उल्लेखाशी सहमत न होण्याचीही शक्यता आहे. परंतु तरीसुद्धा फारसा मतभेद उरेल असे वाटत नाही. आचार्य परंपरेतील महान आचार्यांची सर्व बाजूंनी उचित व योग्य माहिती मिळविण्याचा व ती वाचकापुढे ठेवण्याचा हा अल्पसा प्रयत्न आहे एवढेच.

**जैन परंपरेतील आचार्यांचे स्वरूप–**

जैन परंपरेनुसार आचार्य परंपरेला अत्यंत मोलाचे स्थान देण्यात आले आहे. ही आचार्य परंपरा अगदी पूर्वीपासून चालत आलेली असून, आजसुद्धा ती पुढे चालू असल्याचे दिसून येते. जैनधर्मविषयक सर्व साहित्य सांभाळून ठेवण्याचे महान श्रेय आचार्य परंपरेलाच द्यावे लागते. अत्यंत कठिण अवस्थेत देखील नानाप्रकारे ही साहित्य संपदा जपून ठेवण्यामध्ये आचार्य परंपरेचा सिंहाचा वाटा असल्याचे दिसून येते आणि म्हणूनच पंच नमस्कारातील तिसरा व चौथा नमस्कार, या महान आचार्यांच्या व उपाध्यायांच्या पदकमली अर्पण करण्यात आलेला दिसतो.

शब्द शास्त्राच्या विद्वानानी आचार्याचा शब्दार्थ 'आचारवान' असा दिला आहे. 'आचार ग्राह्यत्याचिनोत्यर्थान् आचिनोति वुद्धिमिति वा ।' अर्थात् जो दुसऱ्याना आचारशील बनवितो, शास्त्रातील योग्य अर्थाचे अनुशीलन करतो, तसेच आचार व शास्त्र यांच्या ज्ञानाद्वारे बुद्धि परिमार्जित करतो तोच आचार्य म्हणविला जातो. आचार्य संघाचा संचालक मानला जात असून, तो कुशल, लोकव्यवहारज्ञ, दूरदर्शी आणि निपुण असावा. या त्याच्या गुणामुळे संघामध्ये गोंधळ माजत नाही. संघाचा आचार्य कसा असावा याविषयी आगमामध्ये खालीलप्रमाणे विवेचन केले आहे–

पयवण–जलहि–जलोयर–ण्हायामल–वुद्धि–सुद्ध छावासो । मेरुव्व णिप्पकंपो सूरो पंचणणो वज्जो ॥
देस–कुल–जाइसुद्धो सोमंगो संग–भंग–उम्मुक्को । गयणव्व णिरुवलेवो आयरियो एरिसो होइ ॥
संगह–णिग्गह कुसलो सुत्तत्थ विसारओ पहियकित्ती । सारण–वारण–साहण–किरियुज्जुत्तो हु आयरियो ॥[1]

प्रवचनरूपी समुद्रातील जलात स्नान करण्यामुळे अर्थात् परमागमाच्या पूर्ण अध्ययनाने आणि अनुभवाने ज्याची बुद्धि निर्मल झाली आहे, जो निर्दोष पद्धतीने सहा आवश्यकाचे पालन करतो, जो मेरुप्रमाणे निष्कम्प आहे, शूर-वीर आहे, सिंहाप्रमाणे निर्भय आहे, श्रेष्ठ आहे, देश, कुल व जातीने शुद्ध आहे, सौम्य मूर्ती आहे, अंतरंग व बहिरंग दोन्ही प्रकारानी परिग्रह संगापासून उन्मुक्त आहे, आकाशाप्रमाणे निर्लेप आहे, तोच महापुरुष आचार्य होतो. (शिवाय) जो संघाचा संग्रह अर्थात् दीक्षा देण्यात, प्रायश्चित्त दंड देण्यात कुशल आहे, सूत्र व अर्थ विचारण्यात प्रवीण आहे, ज्याची कीर्ति सर्वत्र पसरली आहे व जो आचरण, निषेध तसेच व्रतांचे संरक्षण इत्यादि क्रियात मग्न असतो, अशीच व्यक्ति आचार्य होण्यास योग्य आहे.

**आचार्य प्रकार–** शास्त्रामध्ये आचार्याचे अनेक प्रकार सांगितले आहेत. राजप्रश्नीय सूत्रात तीन प्रकारचे आचार्य सांगितले आहेत. 'तओ आयरिया पण्णत्ता कलायरिए, धम्मायरिए, सिप्पायरिए अर्थात् कलाचार्य, शिल्पाचार्य व धर्माचार्य हे तीन प्रकार असून, धर्माचार्याचे काही प्रकार सांगितले आहेत.

आचार्यांचे ज्ञान, उपशम, वैराग्य इत्यादि गुणाच्या अपेक्षेने चार प्रकार सांगितले आहेत– १) आवळ्याच्या गोड फळाप्रमाणे, २) द्राक्षाच्या गोड फळाप्रमाणे असणारे, ३) खिरीप्रमाणे, ४) उसाच्या तुकड्याप्रमाणे (स्थानांग ४/३/३२०) आचार्यांचे हे भेद उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत.

---

१. मुनिद्वय अभिनन्दन ग्रंथ पृ ऋ. ५५

१) पद्प्रज्ञक गाथादिरूप सूत्रधारी व विशिष्ट क्रियाहीन असणारे २) ज्ञान अधिक नसताना सुद्धा वाणी चातुर्याने मुग्धजनाना प्रभावित करणारे ३) स्व-समय व पर-समय जाणणारे तसेच क्रियादि गुणांनी युक्त असणारे ४) आगमात वर्णित आचार्यांप्रमाणे गुणांनी युक्त असणारे

**आचार्य महति**– चौथ्या प्रकारच्या आचार्यांचे वर्णन करीत असताना 'दशवैकालिक' सूत्रात म्हटले आहे–

जहा निसते तवणच्चिमाली, पभासई केवल भारह तु ।
एवायरिओ सुयसील-बुद्धिए विरायइ सुरमज्झे व इंदो ॥

ज्याप्रमाणे रात्रीच्या अंधःकाराचा नाश करून तप्त-किरणयुक्त सूर्य दिवसा एकटाच साऱ्या भरत क्षेत्राला प्रकाशित करतो, त्याचप्रमाणे आचार्य सुद्धा साऱ्या संघाला आपल्या तेजस्वी प्रकाशाने सदैव प्रकाशित करतो व इंद्र ज्याप्रमाणे देवामध्ये विराजित असतो त्याप्रमाणे तो आपल्या श्रुत, शील, बुद्धि यांच्या साह्याने संघात विराजमान होतो. पुनः 'दशवैकालिक' मध्ये म्हटले आहे– 'ज्याप्रमाणे शरद् पौर्णिमेतील चंद्रमा, २८ नक्षत्र ८८ ग्रह आणि ६६९७५ कोटी तारकांच्या परिवाराने वेढलेला निर्मल मेघरहित आकाशात शोभायमान होतो, त्याप्रमाणे गणाचा स्वामी-संघपति आपल्या संघातील साधूमध्ये शोभायमान होतो.

शरद् पौर्णिमेतील चंद्रम्याच्या बाबतीत असे म्हटले जाते की, तो अमृताचा वर्षाव करतो. म्हणूनच त्याला अमृतवर्षी असे म्हटले आहे. त्याच्या अमृतमयी किरणांच्या संपर्काने जंगलात उत्पन्न होणाऱ्या अनेक औषधी अमृताने परिपूर्ण होऊन महान गुणशाली होतात. आजसुद्धा अनेक अनुभवी व प्राचीन वैद्य या अमृतवर्षी चंद्रम्याच्या प्रकाशात आपल्या औषधी ठेवतात की, जेणे करून त्या औषधीवर अमृताचा प्रभाव पडून त्या अधिक गुणकारी व लाभकारी ठरतात म्हणूनच त्या चंद्रम्याला औषधीश्वर असेही म्हटले आहे. याप्रमाणे अमृतवर्षी चंद्रमा ज्याप्रमाणे आपल्या सर्व परिवारासह गगनमंडळात शोभा प्राप्त करतो, त्याप्रमाणे सर्वगुण सपन्न आचार्य देखील मुनि मंडळाची शोभा वर्धित करतात.

तो चंद्रमा ज्याप्रमाणे शीतल आहे, अमृत वर्षाव करणारा आहे, आनंदोत्पत्ती करणारा आहे, प्रकाशमान आहे, म्हणूनच त्याला जगदानन्ददायक म्हटले आहे व संपूर्ण संसार त्याला पाहून आपला दाह करून शांतीचा अनुभव घेतो; त्याचप्रमाणे श्रावक-श्राविका व साधू, साध्वीरूप चतुर्विध संघाचा स्वामी आचार्य म्हणविला जातो.

निशीथभाष्यामध्ये आचार्याला 'रागद्दोस विमुक्को सीयघरसमोय आयरिओ' अर्थात रागद्वेषरहित समतायुक्त आचार्य शीतगृह समान असल्याचे म्हटले आहे. अशा आचार्यांची सेवा समस्त श्रमण संघाकडून केली जाते.

**आचार्यांचे छत्तीस गुण**– साधूच्यापेक्षा आचार्यांचे स्थान निश्चितपणे वरचे मानले आहे यात शका नाही. कारण संघाची सर्व व्यवस्था व उन्नती ही आचार्यावर अवलंबून असते. आचार्य सर्वप्रकारे योग्य नसेल तर, संघही योग्य होऊ शकणार नाही. साधूंच्यापेक्षा आचार्यांना उच्च स्थान देत असताना, साधूच्यापेक्षा काही अधिक गुणांची अपेक्षा देखील शास्त्रकारांनी ठेवली आहे. म्हणूनच शास्त्रकारांच्या मते आचार्य साधूच्या साधारण गुणापेक्षा विशिष्ट अशा ३६ गुणांचा धारक असणे आवश्यक आहे. प्रवचन सारोद्धार (७२) मध्ये म्हटल्याप्रमाणे–

छत्तीस गुण समग्गो णिच्च आयरइ पच आयार । सिस्साणुग्गहकुसलो भणिओ सो सूरी परमेट्ठी ॥

जो छत्तीस गुणांनी युक्त, पाच आचाराचे नित्य आचरण करतो आणि शिष्यावर अनुग्रह करण्यात कुशल असेल, तो आचार्य श्रेष्ठ मानला जात असे.

अष्टावाचारवत्त्वाद्यास्तपांसि द्वादशस्थिती । कल्पादशाऽऽवश्यकानि षट्त्रिंशद गुणा गणैः ॥

आचारवत्त्व आदि आठ गुण, अनशनादि बारा तप, आचेलक्य इत्यादि दशकल्प आणि सामायिकादि सहा आवश्यक हे आचार्यांचे छत्तीस गुण मानले जातात. आगमानुसार असे म्हटले जाते की, जो आचार्य या छत्तीस गुणांचे पालन करीत नाही, तो स्वतः धर्मापासून भ्रष्ट होतो व इतरांनाही धर्मापासून भ्रष्ट करतो. आचार्यांच्या काही अन्य गुणांचे देखील कथन केले आहे.

पंचिंदिय-संवरणो तह णवविहबंभचेरगुत्तिधरो । चउविहकसायमुक्को इह अट्ठारस गुणेहिं संजुत्तो ॥

सर्वप्रथम आचार्याने पाचही इंद्रियांचे दमन केले पाहिजे. एवढेच नव्हे तर, सर्वेंद्रिय वश केली पाहिजेत. पाच इंद्रियांचे २३ विषय आणि ४० विकार सांगितले आहेत. जे या विषय, विकारांपासून दूर गेले आहेत त्यांना आचार्य म्हटले जाते. याशिवाय ब्रह्मचर्य, गुप्तीधारी, विविध प्रकारच्या कषायापासून रहित व नानाविध गुणांनी युक्त अशा महान व्यक्तिलाच आचार्य म्हणावे.

भ. महावीराच्यानंतर आपणाला आचार्यांची परंपरा व्यवस्थित प्रकारे मिळू शकते. या परंपरेचा उल्लेख आपणाला विविध प्रकारच्या पट्टावलीमधून देखील मिळतो. भ. महावीरानंतर क्रमशः गौतम, लोहार्य आणि जंबूस्वामी हे सर्वश्रुत जाणणारे व शेवटी केवलज्ञानी झाले. त्यानंतर क्रमशः विष्णु, नंदिमित्र, अपराजित, गोवर्धन आणि भद्रबाहु हे पाच श्रुतकेवली झाले. त्यानंतर विशाखाचार्य, प्रोष्ठिल, क्षत्रिय, जय, नाग, सिद्धार्थ, धृतिषेण, विजय, बुद्धिल, गंगदेव व धर्मसेन हे ११ दशपूर्वधारी झाले. त्यानंतर नक्षत्र, जयपाल, पांडु, ध्रुवसेन आणि कंस हे पाच एकादशांगधारी झाले आणि त्यानंतर सुभद्र, यशोभद्र, यशोबाहु आणि लोहार्य हे चार आचार्य आचारांग-धारी झाले. बाकीचे एकदेशश्रुतज्ञाते झाले. यानंतर सर्व अंग व पूर्वांचे एकदेश ज्ञान आचार्य परंपरेने धरसेनाचार्यांना प्राप्त झाले. त्यांनी हे ज्ञान आपले शिष्य आचार्य पुष्पदंत व भूतबलि या आचार्यांना दिले. ही परंपरा आ. कुंदकुंद, उमास्वामी, समंतभद्र, यतिवृषभ, रविषेण, विद्यानंद, अमृतचंद्र, नेमिचंद्र, हेमचंद्र, भट्टाकलंक यांनी चालविलेली दिसते.

सर्व आचार्यांची माहिती या एकाच ठिकाणी देणे शक्य होणार नाही, तसेच ते उचित ठरणार नाही. म्हणून सामान्यतः पुढील फक्त १५ आचार्यांची माहिती प्रस्तुत खंडात देण्याचा प्रयत्न केला आहे. ते आचार्य पुढीलप्रमाणे—

१) आ. कुंदकुंद २) आ. अमृतचंद्रसूरि ३) आ. जिनसेन ४) आ. उमास्वामी ५) आ. पूज्यपाद ६) आ. भूतबलि, पुष्पदंत ७) आ यतिवृषभाचार्य ८) आ. नेमिचंद्राचार्य ९) आ. भट्टाकलंक १०) आ. सिद्धसेन दिवाकर ११) आ. विद्यानंद १२) आ. हेमचंद्र १३) आ. कार्तिकेय १४) आ. रविषेण १५) आ. समंतभद्र.

## आचार्य पुष्पदंत व भूतबलि

आ. पुष्पदंत व भूतबलि हे दोन्ही आचार्य समकालीन होते. या दोन महान् आचार्यांनीच षट्खंडागम ग्रंथाची रचना केली. षट्खंडागम या महान् ग्रंथात या दोन्ही आचार्यांच्या पितृकुल, मातृकुल अथवा गुरुविषयक परंपरेविषयी काही निश्चित माहिती मिळू शकत नाही. आ. वीरसेनाने षड्खंडागमवर लिहिलेल्या धवला टीकेत या दोन्ही आचार्यांची अल्पशी माहिती दिली आहे

आ धरसेन हे षट्खंडागम ग्रंथातील विषयाचे ज्ञाते असून ते सौराष्ट्र देशातील गिरनारमधील चंद्रगुहेत ध्यान करीत होते. नंदिसंघाच्या प्राकृत पट्टावलीनुसार ते आचारांगाचे पूर्ण ज्ञाते असून, धवला टीकेनुसार ते अंग आणि पूर्व यातील काही भाग जाणत असावेत. अर्थात् यावरून ते एक महान् विद्वान् होते हे सिद्ध होते. त्यांच्या पश्चात् श्रुतज्ञानाचा लोप होईल, या भितीने त्यांनी आंध्रदेशातील महिमा नगरीच्या मुनिसंमेलनाला पत्र लिहिले. महिमा नगरीच्या यतिसंघाला हे पत्र मिळताच श्रुतज्ञानाची जपणूक केली पाहिजे, हे जाणून तेथून आपल्या

संघातील स्मरणशील, विनयशील व कलापारगत असे दोन साधु पाठविले ते दोन साधु म्हणजेच पुष्पदंत व भूतबलि होत.

आ. पुष्पदंत व भूतबलि गिरिनगराला पोहचताच, धरसेनाचार्यांनी त्याची परीक्षा घेतली. त्यांनी एकाला अधिकाक्षरी व दुसऱ्याला हीनाक्षरी विद्या कथन करून, ती षष्ठ उपवासांनी सिद्ध करण्यास सांगितली. जेव्हा विद्या प्रकट झाली, त्यावेळी एक मोठ्या दातांची व दुसरी एक डोळ्याच्या स्वरूपात प्रगट झाली. विद्येचे हे स्वरुप पाहताच, चतुर साधकांनी मंत्रात काहीतरी त्रुटि असल्याचे जाणले. त्यांनी त्या विद्येची पुनः आराधना केली. त्यावेळी त्या विद्यादेवी सौम्य स्वरूपात प्रगट झाल्या. त्यांच्या या कुशलतेवरून ते दोघेही सिद्धान्त शिकण्यास पात्र असल्याचे धरसेनाचार्यांनी जाणले आणि क्रमाने त्यांना सर्व सिद्धात शिकविले. हा श्रुताभ्यास आषाढ शुद्ध एकादशीला संपला. त्याचवेळी भूतांनी पुष्प, शंख, तूर्य इत्यादींची पूजा केली. यावरून आ. धरसेनांनी त्याचे नाव भूतबलि ठेवले. दुसऱ्याची दंतपंक्ति अस्ताव्यस्त होती, ती भूतांनी व्यवस्थित केली. यावरून दुसऱ्याचे नाव पुष्पदंत ठेवले. हे दोन पुष्पदंत व भूतबलि आचार्य म्हणजेच षट्खंडागमाचे कर्ते होत.

सिद्धातअध्ययन पुरे होताच व वर्षाकाल जवळ येत असल्याचे जाणून, धरसेनाचार्यांनी आपल्या दोन्ही शिष्यांना निरोप दिला. धरसेनाचार्यांनी या दोन शिष्यांना त्वरित निरोप का दिला असावा ते समजत नाही. इंद्रनदीकृत श्रुतावतार व विबुध श्रीधरकृत श्रुतावतारानुसार धरसेनांना त्यांचा मृत्यु जवळ आला आहे व त्यांची अवस्था भूतबलि पुष्पदंत यांना पाहवणार नाही, म्हणून पाठविले असावे. त्याचबरोबर श्रुतज्ञानाचा त्वरीत प्रसार व्हावा या तीव्र अपेक्षेने त्यांनी या दोन आचार्यांना पाठवून दिले असावे. यापुढे धरसेनांचे कोणतेच कार्य आपणाला दिसून येत नाही.

भूतबलि पुष्पदंत हे दोन्ही साधू पुढे अंकुलेश्वर येथे आले. तेथे चातुर्मास केला. तो संपल्यावर पुष्पदंत मुनि वनवास येथे गेले. तेथे त्यांनी जिनपालित यांना दीक्षा दिली व 'बीसदी' सूत्रांची रचना करून त्यांना शिकवून भूतबलीजवळ पाठविले. भूतबलीनी पुष्पदंताचे आयुष्य थोडे शिल्लक राहिलेले ओळखून पुढील ग्रंथरचना केली. याप्रमाणे पुष्पदंत भूतबलीनी 'षट्खंडागम' नामक सिद्धांत ग्रंथ लिहिले आणि हे 'षट्खंडागम' लिपीबद्ध करून ज्येष्ठ शु॥ पंचमीला त्याची शास्त्रपूजा केली. ही तिथी जैनांची श्रुतपंचमी म्हणून ओळखली जाते.

## गुरु-शिष्य परंपरा–

आ. पुष्पदंत व भूतबलि यांचे शिक्षागुरु धरसेनाचार्य असून त्याच्या दीक्षा गुरूविषयीची माहिती मिळत नाही. धरसेनापूर्वी तीन केवली, पाच श्रुतकेवली, ११ दशपूर्वी, पाच एकादशांगधारी व चार आचारांगधारी आचार्य होऊन गेले. यांच्यानंतर समस्त अंगाचे आणि एकदेश पूर्वाचे ज्ञान आचार्य परंपरेने धरसेनाचार्यांना प्राप्त झाले होते. धरसेनापासूनच पुष्पदंत, भूतबलीने ज्ञानप्राप्ती केल्याचा आपणाला स्पष्ट उल्लेख मिळतो. पुष्पदताने वनवास येथे जिनपालिताला दीक्षा दिली व बीसदी सूत्रांची रचना करून त्याला शिकविले अर्थात् जिनपालिताचा दीक्षा व शिक्षागुरु म्हणून पुष्पदंताचाच उल्लेख करावा लागेल.

याशिवाय श्रवणबेळगोळ येथील शिलालेख नं. १०५ मध्ये पुष्पदंत आणि भूतबलिला स्पष्ट स्वरूपात संघकर्ता अर्हद्बलीचे शिष्य म्हटले आहे [१] आ. भूतबलि व पुष्पदत यांच्या गुरु-शिष्य परंपरेबाबत यापेक्षा अधिक काही निश्चितपणे सांगता येत नाही. धवलाकाराने आपल्या टीकेतील मंगलाचरणात प्रथम भूतबलीला नमस्कार केला आहे नंदीसंघाच्या पट्टावलीत देखील स्पष्टपणे भूतबलीला पूर्वपट्टाधिकारी म्हटले आहे. यावरून पुष्पदतापेक्षा भूतबलि आचार्य ज्येष्ठ असावेत हे स्पष्ट होते.

---

१. यः पुष्पदन्तेन च भूतबल्याख्येनापि शिष्यद्वितयेन रेजे । फलप्रदानाय जगज्जनानां प्राप्तोऽङ्कुराभ्यामिव कल्पभूजः ॥
अर्हद्बलिस्संघचतुर्विधं स कोण्डकुन्दान्वयमूलसंघम् । कालस्वभावादिह जायमान द्वेषेतराल्पीकरणाय चक्रे ॥

आचार्य भूतबलि व पुष्पदंत याच्या कालाविषयी नंदी आम्नायची पट्टावली प्रामाणिक मानली तर माघनंदी, धरसेन, भूतबलि, पुष्पदंत इ. आचार्यांचा काल वीर निर्वाणानंतर ६१४ ते ६८३ हा असावा. नंदीसंघाच्या प्राकृत पट्टावलीनुसार व बृहट्टिपणाच्या संकेतानुसार देखील सर्वसाधारण हाच काळ गृहित धरला जातो.

**जीवन कथा–**

विबुध श्रीधराने आपल्या श्रुतावतारमध्ये भविष्यवाणीच्या स्वरुपात आ. पुष्पदंत व भूतबलीविषयी एक वेगळेच कथानक दिले आहे

या भरतक्षेत्रात वागिदेश असून त्यात वसुंधरा नावाची नगरी होती. तेथील राजा नरवाहन व राणी सुरुपा यांना पुत्र नसल्यामुळे राजा उदास होता. तेव्हा सुबुद्धि नावाच्या व्यापाऱ्याने त्यांना पद्मावती देवीची पूजा करण्याचा उपदेश दिला. देवीची पूजा करण्यामुळे त्यांना पुत्रप्राप्ती झाली. त्याचे नाव पद्म ठेवले. नतर राजाने सहस्त्रकूट चैत्यालय तयार करून प्रतिवर्षी यात्रा करु लागला. व्यापाऱ्यांनी देखील अनेक जिनमंदिरे बांधली. त्याचवेळी वसंत ऋतूत सर्व संघ एकत्र येऊन आणि राजा सेठजीबरोबर जिनपूजा करून रथ चालवू लागला. राजाने आपल्या प्रियमित्र मगधस्वामीला मुनींद्र झाल्याचे पाहून सुबुद्धिबरोबर वैराग्य धारण करून, दीक्षा धारण केली. त्याचवेळी एक प्रेषित आला. त्याने जिनदेवाला नमस्कार करून, धरसेन गुरुची वंदना करून तेथे त्याना पत्र दिले. त्यानुसार धरसेन हे नरवाहन व सुबुद्धि यांनी शास्त्राभ्यासाचे पठण, श्रवण व चिंतन करवून आषाढ शुक्ल एकादशीला शास्त्र समविले. त्यातील एकाचा धरसेनांनी भूत रात्रीला बलिविधी केला व दुसऱ्याच्या चार दातांना सुंदर बनविले. म्हणून भूतबलीच्या प्रभावाने नरवाहन मुनीचे नाव भूतबलि आणि चार दात सारखे झाल्यामुळे सुबुद्धि मुनीचे नाव पुष्पदंत ठेवले हेच ते भूतबलि-पुष्पदत आचार्य असावेत. परंतु प्रस्तुत कथा कल्पित वाटते.

**षट्खंडागम ग्रंथपरिचय–**

'तन्मुनिद्वयं अंकुलेश्वरपुरे गत्वा मत्वा षडंगरचनां कृत्वा शास्त्रेषु लिखाप्य'....

या विबुध श्रीधरकृत श्रुतावतारातील उद्धरणानुसार पुष्पदंत भूतबलीनीच षट्खंडागमाची रचना अंकुलेश्वरात केली असावी हे स्पष्ट होते. षट्खंडागम ग्रंथाला धवलाकाराने आपल्या ग्रंथाच्या उत्थानिकेत 'खंडसिद्धांत' असे म्हटले आहे. या ग्रंथाच्या खंडांची संख्या एकूण सहा असल्यामुळे त्याला 'षट्खंडसिद्धांत' नावाने देखील संबोधिले आहे. श्रुतावतार कर्ता इंद्रनन्दीने याला 'षट्खंडागम' असेच म्हटले आहे. अर्थात् ग्रंथाच्या सर्वांगाचे अवलोकन केले असता 'षट्खंडागम' हेच नाव उचित वाटते.

षट्खंडागमात एकूण ६ खंड आहेत ते पुढीलप्रमाणे– १) जीवट्ठाण २) खुद्दाबंध ३) बंधस्वामित्वविचय ४) वेदना ५) वर्गणा ६) महाबंध

**१) जीवट्ठाण–** या प्रथम खंडात सत्, संख्या, क्षेत्र, स्पर्शन, काल, अंतर, भाव, अल्पबहुत्व हे आठ अनुयोगद्वार असून प्रकृति, जघन्य स्थिति, उत्कृष्ठ स्थिति, गति-आगति इत्यादी ९ चूलिका आहेत. या ग्रंथात १८ हजार पद आहेत

**२) खुद्दाबंध–** याला क्षुल्लकबंध असेही म्हटले आहे यात ११ अधिकार आहेत. स्वामित्व, काल, अंतर, भंगविचय, द्रव्यप्रमाणानुगम, क्षेत्रानुगम, स्पर्शनानुगम, नाना जीव-काल, नाना जीव-अंतर, भागाभागानुगम, अल्पबहुत्वानुगम इत्यादी. यात कर्मबंध करणाऱ्या जीवाचे, कर्मबंधाच्या प्रकारासहित वर्णन केले आहे.

**३) बंधस्वामित्वविचय–** या खडात कोणत्या प्रकृतीचा कोणत्या जीवाला किती बध होतो, कोणाला होत नाही, बंधरूप प्रकृति किती आहेत, इत्यादी कर्मासबधी विपयांचे विवेचन जीवाच्या दृष्टीने केले आहे.

**४) वेदना–** या खंडात मगलाचरण पुन: घेतले आहे कृति आणि वेदना हे अनुयोगद्वार याच खडाच्या अंतर्गत येतात. परंतु वेदना कथानकाची प्रधानता अधिक असल्यामुळे या खडाला वेदना खड म्हटले आहे. कृतीचे नाम, स्थापना, द्रव्य, गणना, ग्रंथ, करण, भाव हे सात प्रकार असून वेदनेचे निक्षेप नय, नाम, द्रव्य, क्षेत्र, काल, भाव, प्रत्यय इ. १६ अधिकाराद्वारे वर्णन केले आहे.

**५) वर्गणा–** या खंडात बधनीय अतर्गत वर्गणा अधिकाराशिवाय स्पर्श, कर्म, प्रकृति आणि बंधनाचा प्रथम भेद 'बध' या अनुयोगद्वाराचा अंतर्भाव केला आहे. यात एकूण २३ वर्गणाचे वर्णन आहे.

**६) महाबंध–** यात एकूण तीस हजार सूत्रे असून, यात प्रकृतिबंध, अनुभागबंध व प्रदेशबंध या बंधांचे विस्ताराने वर्णन केले आहे.

वरील सहा खडांनी 'पट्खंडागम' युक्त असून अनेकविध गोष्टीचे त्यात सूक्ष्मपणे विवेचन केले आहे. अर्थात् पुष्पदंत-भूतबलि आचार्यांनी हे एक महान् कार्य केले हे अमान्य करता येणार नाही.

'पट्खंडागम' ग्रंथावर एकूण चार ते पाच टीका लिहिल्या असल्याचे म्हटले आहे–

**१) कुंदकुंदरचित परिकर्म टीका–** ही पट्खंडागमावरील प्रथम टीका असून, पहिल्या तीन खंडावर ती लिहिली आहे. या टीकेत एकूण १२ हजार श्लोक आहेत. परंतु ही अस्तित्वात नसल्याचे प्रखरतेने आढळते.

**२) शामकुंडकृत पद्धती–** या टीकेचा उल्लेख इंद्रनंदीने केला असून, त्याचा कर्ता शामकुड आहे. ही टीका शेवटचा ६ वा खंड सोडून प्रथम पाच खंडावर लिहिली आहे. ही टीका पद्धतीरूपाने लिहिली आहे. या टीकेत १२ हजार श्लोक असून ती संस्कृत, प्राकृत, कानडी या तीन भाषांनी मिश्रित आहे ही टीकादेखील उपलब्ध नाही.

**३) चूडामणिकर्ता तुम्बुलूराचार्य–** या टीकेचे कर्ते 'तुम्बुलूर' असून ते 'तुम्बुलूर' नावाच्या एका सुदर गावात राहात होते. यानी सहावा खंड सोडून दोन्ही सिद्धांतावर टीका लिहिली असून, तिचे नाव 'चूडामणि' होते. ती ८४ हजार श्लोकांनी युक्त असावी.

**४) समंतभद्रस्वामीकृत टीका–** इंद्रनंदीने यांना 'तार्किकार्क' म्हटले आहे. त्यानी दोन्ही सिद्धांताचा अभ्यास करून पट्खंडाच्या ५ व्या खडावर ४८ हजार श्लोकांनी युक्त टीका रचली. या टीकेची भाषा अत्यत सुंदर, मृदु आणि सस्कृत असावी.

**५) वीरसेनाचार्यकृत धवला टीका–** धवला टीकेच्या शेवटी आपणाला ९ गाथा पहावयास मिळतात. त्या गाथानुसार 'धवला' टीकेचे कर्ते आ. वीरसेन असावेत. ते सिद्धांत, छद, ज्योतिष, व्याकरण, प्रमाण, न्याय व शास्त्र इत्यादीत निपुण असून, भट्टारक पदाने विभूषित होते. नरेंद्रचूडामणीच्या राज्यात राहून त्यानी ही टीका लिहिली असावी. ही एक अत्यंत महत्त्वपूर्ण टीका समजली जाते. ही टीका कार्तिक महिन्यातील धवलपक्ष त्रयोदशीला समाप्त झाली. म्हणूनच या टीकेचे नाव 'धवला' ठेवले असावे वीरसेनाच्या हातून अपुरा राहिलेला भाग जिनसेनांनी पूर्ण केला.

पट्खंडागमवरील विविध प्रकारच्या टीका आणि त्यात असणारा महान विषय यावरूनच या ग्रंथाची महती आपणाला समजते. अर्थात् धरसेनाचार्याकडून विद्या प्राप्त करून पुष्पदत व भूतबलि या गुणज्ञ आचार्यांनी या महान् ग्रंथाची रचना केली व मुमुक्षु लोकावर फार मोठे उपकार केले. हे कदापि विसरता येणार नाही.

# आचार्य कुंदकुंद

प्राकृत भाषेचे महान् विद्वान्, जैनसाहित्य व संस्कृतीचे पुरस्कर्ते आणि सिद्धांत साहित्याचे एक प्रमुख आचार्य म्हणून कुंदकुंदाचे नाव अत्यंत प्रसिद्ध आहे. आचार्य कुंदकुंद हे मूलसंघातील नंदिगणाचे प्रमुख आचार्य होते. द्रवीड गण व सेनागणातील आचार्य व दिगंबर साधू आपणास कुंदकुंदान्वयाचे म्हणवून घेतात. मंगलकार्याला शुभारंभ करीत असताना 'मंगलं कुंदकुंदाद्यो' म्हणून त्याचे नामस्मरण केले जाते. त्यांचा नामोल्लेख मंगल स्वरूपाचा मानला जात असून, भ. महावीर व गौतम गणधर यानंतर त्याचे मंगलमय नाव घेतले जाते. हे आपणाला खालील श्लोकावरून दिसून येते—

मंगलं भगवान् वीरो मंगलं गौतमो गणी ।
मंगलं कुंदकुदार्यो जैनधर्मोस्तु मंगलं ॥

**जीवन कथा—**

आ. कुंदकुंदाच्या जीवनाविषयीच्या प्रमुख तीन कथा पाहावयास मिळतात— १) प्रो. चक्रवर्ती यानी पंचास्तिकाय ग्रंथाच्या प्रस्तावनेत पुण्याश्रव कथेवरून दिलेली कथा. २) पंडित नाथूराम प्रेमी यांनी 'ज्ञानप्रबोध' ग्रंथाद्वारे दिलेली कथा. ३) ब्रह्मनेमिदत्ताच्या 'आराधना कथाकोष' मध्ये शास्त्रदानाच्या फलाविषयी दिलेली कथा. या तीन कथामध्ये कुंदकुंदाच्या जन्माविषयी व जीवनाविषयी वेगवेगळी माहिती दिली आहे. पंडित नाथुराम प्रेमी यांनी ज्ञानप्रबोध ग्रंथाद्वारे दिलेली कथा कुंदकुंदाच्या जीवनाशी अधिक मिळती जुळती वाटते.

माळव देशात वारापूर नगरात कुमुदचंद्र राजा राज्य करीत होता. त्याच्या राणीचे नाव कुमुदचंद्रिका. त्याच्या राज्यात कुंद नावाचा वैश्य व्यापारी रहात होता. त्याच्या पत्नीचे नाव कुंदलता. त्यांना एक पुत्र झाला त्याचेच नाव 'कुंदकुंद' होय.

एकदा 'जिनचंद्र' आचार्य त्या नगरात आले आचार्यांच्या उपदेशाचा कुंदकुंदांच्या मनावर परिणाम झाला व तो त्यांचा शिष्य बनला मुनिश्वरांनी कुंदकुंदास वयाच्या ३३ व्या वर्षीच मुनिदीक्षा देऊन आचार्यपद देखील दिले.

कुंदकुंदाच्याविषयी एक मान्यता प्रचलित आहे ती अशी— एकदा आगमात शंका निर्माण झाली. तेव्हा त्यानी विदेह क्षेत्रातील भ. सीमंधर स्वामींचे स्मरण केले. स्वामीनी दिव्यध्वनी सुरू असतानाच 'सद्धर्मवृद्धिरस्तु' असा कुंदकुंदाना आशिर्वाद दिला दोन चारणमुनींच्या सहाय्याने ते विदेह क्षेत्रात गेले. तेथे त्यांच्या सर्व शंकाचे समाधान झाले. तीर्थयात्रा करीत ते भरतक्षेत्रात आले. तेथे सातशे स्त्री-पुरुषांना दीक्षा दिली. श्वेतांबरावरोवर वादविवाद झाला. शेवटी ब्राह्मी देवतेने दिगंबर निर्ग्रंथ मार्गच खरा मार्ग आहे हे मान्य केले

जयसेनाचार्याने पंचास्तिकाय टीकेत कुंदकुंदाला कुमारनंदी सिद्धांत देवाचा शिष्य मानले आहे, तर श्रमणबेलगोल शिलालेखात व विद्यानंदीच्या 'प्रमाण परीक्षा' ग्रंथात कुमारनंदी कुंदकुंदाचार्यांचे गुरु असल्याचे सांगितले आहे. नंदीसंघाच्या पट्टावलीमध्ये जिनचंद्रालाच कुंदकुंदाचे गुरु म्हटले आहे. परंतु या गुरु शिष्य परंपरेबाबत समर्थक पुरावा मिळत नाही उलट कुंदकुंदाचार्यांनी 'बोधपाहुड' ग्रंथाच्या शेवटी स्वतःला गुरु भद्रबाहूचे शिष्य म्हणवून घेतले आहे. तसेच त्याचे शिष्य राजा शिवकुमार यांच्या विनतीवरून त्यांनी 'समयसार' इत्यादी ग्रंथाची रचना केली असावी.

इ स. १३८६ च्या विजयनगरच्या शिलालेखात व नंदिसंघाच्या पट्टावलीमध्ये आचार्य कुंदकुंदाचे पद्मनंदि, कुंदकुंद, वक्रग्रीव, एलाचार्य व गृध्रपिच्छ इत्यादि परंपरागत पाच नावे आढळतात. कुंदकुंदाचे दीक्षेच्या वेळचे नाव मात्र पद्मनंदि असावे. याविषयीची माहिती देवसेनाचार्यांनी 'दर्शनसार' ग्रंथात दिली आहे.




आचार्यांच्या कालाविषयी प. नाथुराम प्रेमी, डॉ. पाठक, डॉ. चक्रवर्ती, आचार्य जुगलकिशोर मुख्तार इ. विद्वानांनी आपापली मते मांडली आहेत या सर्व विद्वानाच्या मताचे अवलोकन करून डॉ. ए. एन. उपाध्ये यानी आ. कुंदकुंदाचा काळ इ. स. पूर्व पहिल्या शतकाच्या उत्तरार्धात व इ. स. पहिल्या शतकाच्या पूर्वार्धात मानला आहे. सर्वसाधारणपणे कुंदकुंदाचा काल वि. स. दुसरे शतक मानला जातो.

**ग्रंथसंपत्ती–**

आचार्य कुंदकुंदाचे विचार जैन सिद्धांत व जैन दर्शनाचे आधारभूत मानले जातात त्यांच्याशी तन्मय झाल्याशिवाय जैन आचार विचाराचे यथार्थ स्वरूप समजू शकत नाही. दिगंबर जैन साहित्यामध्ये षट्खंडागम–धवल–महाधवल–जयधवल यानंतर आचार्य कुंदकुंदाच्या साहित्याचे परंपरागत प्राचीनता व प्रमाणता या दृष्टीने फार महत्त्वाचे स्थान समजले जाते. वैदिक धर्मात उपनिषदाचे जे स्थान आहे तेच जैन साहित्यात आचार्य कुंदकुंद याच्या साहित्याचे आहे. यांच्या प्राभृत आदि ग्रंथास ' जैन–उपनिषद ' म्हटले तर अतिशयोक्ति ठरणार नाही.

आ. कुंदकुंद आध्यात्मतत्वाचे पुरस्कर्ते होते. ' समयसार ' ग्रंथात आत्मतत्वाचे केलेले विवेचन सर्व जैन वाङ्मयात उत्कृष्ट ठरले आहे. जैन तत्वज्ञानाच्या अभ्यासकांना ते मननीय आहे. ' द्रव्य-गुण-पर्याय यांचे स्पष्टीकरण करून त्यांनी जीवाचे मूळ शुद्ध स्वरुप काय आहे. यावर चांगला प्रकाश पाडला आहे. कर्माच्या संयोगात जीवाचे जे नानाविध रूप आहे ते जीवाचे शुद्ध स्वरूप नाही. ध्रुव स्वभावाची जाणीव, रुचि त्यामध्ये निरंतर स्थिरवृत्ती हाच संसारातून मुक्त होण्याचा मार्ग आहे. त्याशिवाय दुसरा मार्ग नाही.' असे कुंदकुदाचार्यांनी प्रतिपादले आहे.

आ. कुंदकुंदाची ग्रथसंपत्ती फार विशाल व महत्वपूर्ण असून ती प्रमाणभूत मानली जाते. सामान्य लोकांना सहज समजावा म्हणून त्यांनी आपला उपदेश अर्धमागधी–प्राकृत भाषेतून सागितला. जैन साहित्याची आगम प्रणाली प्रामुख्याने दोन प्रकारची आढळून येते. १) प्रथम श्रुतस्कंध, २) द्वितीय श्रुतस्कंध.

प्रथम श्रुतस्कंधामध्ये– प्रथमानुयोग (चरित्र पुराणे), चरणानुयोग (आचार संहिता) यांचे वर्णन आहे. द्वितीय श्रुतस्कंधात प्रामुख्याने द्रव्यानुयोग, समयसार, प्रवचनसार इत्यादी ग्रंथाचा समावेश होतो.

आ. कुंदकुदाच्या नावाने अनेक ग्रंथ असल्याचे दिसतात. परंतु त्यापैकी पुष्कळशा ग्रंथाची फक्त नावेच उपलब्ध आहेत. आचार्य कुंदकुंदानी ' धवला टीका ' ग्रंथावर देखील ' परिकर्मसूत्र ' टीका रचली आहे, परन्तु टीकाकाराचा प्रत्यक्ष नामोल्लेख नसल्यामुळे त्याविषयी विद्वानांचे एकमत नाही. त्यांनी आपल्या ग्रंथसंपत्तीला ' पाहुड ' (प्राभृत) असे म्हटले असून, मोक्षलक्ष्मीसाठी अर्पण केलेली ही भेट आहे असा त्या ' पाहुड ' शब्दाचा संकेतार्थ सूचित केला आहे. त्याचे साहित्यिक ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेत–

**१) चौऱ्याऐंशी पाहूड–** या ग्रथात कुदकुंदाचार्यांनी ८४ प्रकरणाचा उल्लेख केला आहे असे समजतात पण आज तो ग्रथ तर राहोच त्याची ८४ नावेही उपलब्ध नाहीत. अष्टपाहुडाची नावे उपलब्ध असून ती अनुक्रमे १) दंसण पाहुड, २) चरित्र पाहुड, ३) सुत्तपाहुड, ४) बोधिपाहुड, ५) भावपाहुड, ६) मोक्षपाहुड, ७) शीलपाहुड, ८) लिंगपाहुड अशी त्यांची नावे आहेत. नावाप्रमाणेच त्यामध्ये विषयाचे विवेचन केले आहे

**२) षट्खंडागम टीका–** कुदकुदानी षट्खडागम ग्रथावर ' परिकर्म ' नावाची टीका लिहिली विबुध श्रीधर याचे मते या ग्रंथाचा कर्ता कुंदकुदाचार्यांचा शिष्य कुंदकीर्ति हा असावा.

**३) दशभक्ति–** प्रचलित दशभक्ति पाठ किंवा क्रियाकलाप ग्रथ दैनंदिन, पाक्षिक, सांवत्सरिक प्रतिक्रमणेच्या अपेक्षेने अत्यंत महत्त्वाचा समजला जातो. यातील भक्तीची प्राकृत रचना आचार्य कुदकुंद यांनी केली असून संस्कृत भक्तीची रचना आचार्य ' पूज्यपाद ' यांनी केली आहे.








१) सिद्धभक्ति– चिरंतन अबाधित सुखाचे वर्णन.

२) श्रुतभक्ति– ११ अंगे व १४ पूर्व यांचे सविस्तर वर्णन.

३) चारित्रभक्ति– मुनींच्या २८ मूलगुण व उत्तर गुणांचे वर्णन.

४) योगिभक्ति– योगी-मुनि-तपस्वी यांच्या तपाचे व सिद्धांताचे वर्णन.

५) आचार्यभक्ति– दर्शनाचार इ. ५ प्रकारच्या आचारांचे वर्णन.

६) निर्वाणभक्ति– दुसरे नाव निर्वाणकांड. यामध्ये कोणत्या निर्वाणक्षेत्री किती मुनि मोक्षास गेले याचे वर्णन.

७) पंचमहा गुरुभक्ति– यात पाच परमेष्ठींची स्तुति केली आहे.

८) शांतिभक्ति– या भक्तीत श्री शांतीनाथ तीर्थंकरांची स्तुति केली आहे.

९) नंदीश्वर भक्ति– या भक्तीत नंदीश्वर द्वीपातील अकृत्रिम चैत्यालयाचे वर्णन करून त्याची स्तुती केली आहे.

१०) समाधिभक्ति– समाधियोगाचे वर्णन.

बारस अणुवेक्खा– अनुप्रेक्षांच्या शेवटच्या गाथेत कुंदकुंदांनी आपला उल्लेख केला आहे.

१) अनित्य, २) अशरण, ३) संसार, ४) एकत्व, ५) अन्यत्व, ६) अशुचित्व, ७) आस्रव, ८) संवर, ९) निर्जरा, १०) लोक, ११) बोधिदुर्लभ, १२) धर्म. इ. बारा अनुप्रेक्षा असून त्यांचे निश्चयनय व व्यवहार-नयाच्या दृष्टिकोणातून विवेचन केले आहे.

**५) पंचास्तिकाय–** यात जीव, अजीव, धर्म, अधर्म, आकाश या पंचास्तिकायांचे वर्णन केले आहे. गुण, पर्याय, ध्रौव्य यांचा संबंध स्पष्ट केला असून, शेवटी चूलिकेत मोक्षमार्गाचे वर्णन केले आहे. त्याचप्रमाणे सम्यक्दर्शनाच्या प्रकरणात सप्ततत्वाचे कथन, व्यवहार व निश्चय मोक्षमार्गाचे सरळ, सुंदर, निरूपण या ग्रंथामध्ये आढळते. त्यात अमृतचंद्राचार्यानुसार १७३ व आ. जयसेनानुसार १८१ गाथा असून प्रथमतः पीठिका व अंती चूलिका आहे. इतर काही आचार्यांच्या गाथा यात समाविष्ट केल्या असाव्यात.

**६) रयणसार–** या ग्रंथात एकूण १६२ श्लोक आहेत. त्यामध्ये काही अपभ्रंश गाथा प्रक्षिप्त स्वरूपात आढळून येतात. गृहस्थी व मुनी यांचे वर्णन यात केले आहे. शैली व भाषा कुंदकुंदांना अनुरूप नसल्याचे विद्वानांचे मत आहे. हा ग्रंथ कुंदकुंदाचा नसावा असे डॉ. उपाध्येसह अनेकांचे मत आहे.

**७) नियमसार–** हा ग्रंथ १८७ गाथांनी युक्त आहे. सम्यग्दर्शनचारित्र हा नियमाने मोक्षमार्ग आहे. त्याचे कथन या ग्रंथामध्ये असल्यामुळे त्याला नियमसार नाव दिले आहे. समयसारातील प्रतिपाद्य विषय वेगळ्या दृष्टिकोणाने समोर ठेवला आहे. व्यवहारचरित्र, आलोचना, प्रत्याख्यान, सामायिक आवश्यक आदींचे विवरण निश्चयनयाच्या प्रधानतेने केले आहे. ज्ञानत्व, सर्वज्ञत्व याचे निरूपण करून दर्शन ज्ञानासंबंधीचा महत्वाचा ऊहापोह केला आहे. कारणानेच कार्याची सिद्धी होते हे स्पष्ट करून जसे मुख तसे त्याचे प्रतिबिंब, जसा गुणस्वभाव तसा त्याचा पर्याय असतो. आत्म्याचे शुद्ध स्वरुप जाणल्यानेच मोक्षप्राप्ती होते. हे प्रतिपादन केले आहे.

**८) प्रवचनसार–** हा ग्रंथ ज्ञानाधिकार, ज्ञेयाधिकार व चारित्राधिकार या तीन भागात विभागला आहे. प्रथम ज्ञानाधिकारामध्ये आत्म्याचा ज्ञान स्वभाव आणि सुख स्वरूपाचे निरूपण असून अंती ज्ञानानंदरूप आत्म्याच्या प्राप्तीचा मार्ग सांगितला आहे. दुसऱ्या ज्ञेयतत्त्वाधिकारामध्ये पहिल्या २२ गाथेमध्ये सत्ता, द्रव्यगुणपर्यायादिकांचे सामान्य ज्ञेयतत्वाचे निरूपण आहे. तिसऱ्या अधिकारामध्ये श्रमणांच्या चरित्र चित्रणाचे वर्णन केले आहे. शेवटी सम्यग्दर्शन, ज्ञान, चारित्र यांचा मौलिक ऊहापोह असून मोक्षमार्गाचे सुंदर विवेचन केले आहे. 'चारित्तं खलु धम्मो'




जयधवला टीकेत यतिवृषभाला वृत्तिसूत्रकर्ता म्हटले असून त्याच्याकडून वर मागितला आहे " सो वित्ति-सुत्तकत्ता जइवसहो मे वर देइ । " तसेच यतिवृषभाला आर्यमंक्षुचा शिष्य व नागहस्तीचा अंतेवासी म्हटले आहे.

धवला टीकेत यतिवृषभाच्या मतांचा अनेक ठिकाणी उल्लेख केला असून तिलोय–पण्णत्तीचा देखील उल्लेख करून त्यातील अनेक गाथा उद्धृत केल्या आहेत.

' तिलोयपण्णत्ती'च्या ७७ व्या गाथेनुसार हा ग्रंथ आठ हजार श्लोकांनी युक्त असावा आणि पूर्वार्धानुसार असे समजते की, हे प्रमाण चूर्णि आणि करणस्वरूपाएवढेच आहे. इंद्रनंदीने चूर्णिसूत्रांचे प्रमाण सहा हजार श्लोक इतके सांगितले आहे. म्हणून करणस्वरूपाचे प्रमाण एवढेच असावे. यतिवृषभाचा करणसूत्र हा गणितासंबंधी एखादा ग्रंथ असावा. डॉ. हिरालालजीच्या मतानुसार करणसूत्र म्हणजे गणिताचा 'फार्म्यूला' तिलोयपण्णत्तीमध्ये आपणाला काही करणगाथा सापडतात.

आ. यतिवृषभाविषयी दिलेल्या दोन गाथानुसार यतिवृषभाचार्य धर्मपाठकांच्या मध्ये श्रेष्ठ होते आणि चूर्णिसूत्रावरून ते एक प्रगल्भ आणि प्रौढ सूत्रकार असल्याचे दिसते. शिवाय जैनशास्त्रांच्या विषय अभ्यासावरून त्याचे विस्तृत व गाढ अध्ययन आपल्या दृष्टोत्पत्तीस येते. आ. यतिवृषभ ग्रंथरचना करीत असताना त्यांच्या समोर ' लोकविनिश्चय ', लोकविभागसारखे ग्रंथ असावेत. त्यांनी आता उपलब्ध नसलेल्या अनेक प्राचीन ग्रंथांचा आपल्या ग्रंथात उल्लेख केला आहे. आपल्या 'तिलोयपण्णत्ति' ग्रंथाची रचना प्राचीन ग्रंथांच्या आधाराने तसेच आचार्य परंपरेने केली असावी. तत्कालीन विषयांचे सूक्ष्मज्ञान त्यांना होते हे येथे स्पष्ट होते. प्रवचनवात्सल्यानेच त्यांनी चूर्णिसूत्रांची रचना केली असावी.

**काल–**

चूर्णिसूत्रकार व तिलोयपण्णत्तीचे कत यतिवृषभाचार्य यांच्या काळाविषयी निश्चित माहिती सांगणे अत्यंत कठिण आहे. तरीसुद्धा 'तिलोकपण्णत्ति' हा ग्रंथ सर्वनंदीच्या 'लोकविभाग' ग्रंथानंतरचा असावा. तिलोयपण्णत्तीमध्ये लोकविभाग ग्रंथाचा पाच वेळा उल्लेख आला आहे. 'लोकविभाग' ग्रंथ सर्वनंदीचाच असेल तर त्याची रचना श. संवत ३८० मध्ये झाली असावी. तिलोयपण्णत्तीच्या कालगणनेनुसार कल्कि राजाचा मृत्यु वीरनिर्वाणानंतर एक हजार वर्षांनी झाला. कल्कीच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र अजितंजय याचा देखील उल्लेख मिळतो. म्हणून साधारण श. सं. ४०० (वि. सं. ५३५) नंतर तिलोकपण्णत्तीची रचना झाली असावी. अर्थात् सर्वनंदीच्या लोकविभाग ग्रंथानंतर २० वर्षांनी ही रचना झाली असावी.[1]

श्वेताम्बराचार्य जिनभद्रगणि क्षमाश्रमणाने आपल्या विशेषावश्यक भाषाची रचना वि. सं. ६६६ मध्ये केली. त्यांनी यतिवृषभाच्या चूर्णिसूत्राचा 'केचित्' म्हणून उल्लेख केला आहे. यावरून यतिवृषभ वि स. ६६६ च्या पूर्वी होऊन गेले असावेत. अर्थात् वि. सं. ५३५ आणि ६६६ च्या दरम्यान त्याचा काल निश्चित करावा लागेल.[2]

याशिवाय डॉ. हिरालाल जैन व डॉ. ओ. अेन. उपाध्ये यांच्या मते त्रिलोकप्रज्ञप्तीची रचना सर्वनंदीच्या लोकविभाग ग्रंथाच्या नंतर तथा वीरसेनकृत धवलाच्या पूर्वी शके ३८० ते ७३८ च्या मध्यतरास झाली असावी.[3]

**आ. यतिवृषभाची गुरुपरंपरा–**

आ. यतिवृषभांची गुरुपरंपरा देखील आपणाला निश्चितपणे सांगता येत नाही. कषायप्राभृत अध्ययनाची आचार्य परंपरा सांगताना श्रुतावतार कर्ता इंद्रनंदीने दोन गाथा उद्धृत केल्या आहेत. त्या गाथेनुसार आ. यतिवृषभानी नागहस्ति आणि आर्यमंक्षूच्या (कषायप्राभृत) सूत्रांचे अध्ययन करून शास्त्रार्थांत निपुणता प्राप्त केली होती. येथे

१, २ जैन साहित्य और इतिहास–नाथूराम प्रेमी पृ. नं. ९–१०. ३. तिलोय-पण्णत्ति– डॉ. हिरालाल जैन, डॉ. ए. एन्. उपाध्ये (जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापुर) भाग नं. २ पृ. नं. २०.

'यतिवृषभ' शब्दावर श्लेष असल्याचे समजले जाते. तरी मुद्दा त्याच कषायप्राभृतावर वृत्तिरूपाने त्यांनी चूर्णिसूत्रांची रचना केली. ती ६ हजार श्लोक प्रमाण इतकी असावी. ही गोष्ट इंद्रनंदीद्वारेच नाही तर स्वतः जयधवला टीकेद्वारे सिद्ध झाली आहे. यतिवृषभ आर्यमंक्षु व नागहस्ति यांचे साक्षात् शिष्य असून त्यांचा आशीर्वाद धवलाकाराने घेतलेला दिसतो. वीरसेन व जयसेनकृत जयधवला टीकेत यतिवृषभांच्या चूर्णिसूत्राचा उल्लेख मिश्ररूपाने आलेला आढळतो.

कषायपाहुड चूर्णीचा अथवा 'तिलोय-पण्णत्ति' ग्रंथाचा कर्ता कोण याविषयी सखोल व व्यवस्थित माहिती मिळत नाही. 'तिलोयपण्णत्ति' मध्ये श्लेषरूपाने जी गाथा पाहावयास मिळते त्याप्रमाणे एक गाथा जयधवलामध्येही आहे. या दोन गाथेत कषायप्राभृत गाथांचा कर्ता गुणधर आचार्य असल्याचा उल्लेख अन्तर्निहित असावा. यतिवृषभाचा गुणधरांच्याविषयी मोठा आदरभाव असल्याचाही उल्लेख मिळतो. त्या दोघांच्यातील संबंध आपणाला समजत नाही. ते समकालीन असल्याचेही कोठे दिसून येत नाही. वीरसेनाच्या मतानुसार यतिवृषभ आर्यमंक्षूचे शिष्य व नागहस्तीचे अंतेवासी असावेत. अर्थात् यावरून नागहस्तीचे ते साक्षात् शिष्य अथवा समकालीन असावेत.

**जीवनकथा–**

हरिषेणाच्या बृहत्कथाकोशाच्या १५६ व्या गाथेत आणि नेमिदत्ताच्या आराधना कथाकोशाच्या ८१ व्या कथेत यतिवृषभाच्या समाधिमरणाविषयी माहिती मिळते. अर्थात् हे यतिवृषभ 'तिलोयपण्णत्ति' कर्ते यतिवृषभच आहेत की, अन्य कोणी हा वादग्रस्त प्रश्न आहे.

'राजा जयसेन प्रथम बौद्ध भिक्षु शिवगुप्ताचा शिष्य होता. एके वेळी यतिवृषभ आपल्या संघासह श्रावस्ती नगरीला आले. त्याचा उपदेश ऐकून जयसेनाला जैनधर्माविषयी श्रद्धा उत्पन्न झाली हे शिवगुप्ताला बरे वाटले नाही. त्याने शेजारील बौद्ध राजा सुमतीला भडकविले आणि त्याने जयसेनाला पत्र पाठविले की, तू पुनः बौद्ध धर्म स्वीकारावा. परंतु जयसेनाने ते ऐकले नाही. तेव्हा सुमतीने येऊन श्रावस्तीला घेरले. त्याने सैन्याला उद्देशून म्हटले की, माझ्या सेनेत जयसेनाला कोणी मारणारा आहे काय ? त्यावेळी अहिमारक नावाच्या बुद्धोपासकाने ते काम स्वीकारले आणि त्याने कपटाने यतिवृषभाजवळ जिनदीक्षा घेतली व तो त्यांच्याबरोबर राहू लागला. दुसऱ्या दिवशी राजा जयसेन जेव्हा जिनमंदिरात यतिवृषभ व नवीन मुनीला वंदना करण्यासाठी आला असता मस्तक झुकवून चरण वंदना करताच अहिमारकाने त्याचा शिरच्छेद केला. यतिवृषभ आश्चर्यचकित झाले. तात्काळ त्यांनी विचार केला की, हा घात आत्मघाताशिवाय शांत होणार नाही. त्यांनी राजाच्या रक्ताने तेथील भिंतीवर लिहिले की, 'मुनीवेषात हे जे वाईट कर्म केले आहे ते धुऊन काढण्याचा दुसरा मार्ग नाही' असे म्हणून त्यांनी त्याचवेळी तलवारीने आपला वध करून घेतला.

हे यतिवृषभ कदाचित दुसरे असतील, पण 'दुठुपरीसहवसहं' हे विशेषण त्यांच्या कठिण परीषहांच्या कडे मन आकर्षित करून घेते. याविषयी सखोलतेने पाहणे अत्यावश्यक आहे.[1]

**तिलोयपण्णत्ति ग्रंथपरिचय–**

तिलोयपण्णत्ति हा करणानुयोगातील एक प्रमुख ग्रंथ असून, भारतीय साहित्याचा हा एक प्राचीन ग्रंथ मानावा लागेल. या ग्रंथाची भाषा प्राकृत असून यातील मुख्य विषय 'विश्वरचना लोकस्वरूप' हा आहे. प्रसंगानुसार या ग्रंथात धर्म व संस्कृतीविषयी संबंध असणाऱ्या अन्य विचारांची चर्चा देखील केली आहे. या ग्रंथात तीन लोकाचे वर्णन विस्तृतपणे केले असून ते ९ महाधिकारात विभाजित केले आहे.

---

१. जैन साहित्य और इतिहास– नाथूराम प्रेमी पृ. न. २१.

 

१) सामान्य लोकाचे स्वरूप २) नारकलोक ३) भवनवासी लोक ४) मनुष्यलोक ५) तिर्यग्लोक ६) व्यन्तरलोक ७) ज्योतिर्लोक ८) देवलोक ९) सिद्धलोक

'तिलोयपण्णत्ति 'मध्ये प्रामुख्याने जैन भूगोल आणि खगोल यांचे विवेचन केले आहे. पण त्याचबरोबर जैन सिद्धांत, पुराण तथा इतिहास इत्यादि विपयावर देखील लक्ष केंद्रित केलेले दिसते.

सामान्य लोक महाधिकारात २८३ पद्ये आणि ३ गद्य भाग आहेत. प्रथम पाच गाथात पाच श्रेष्ठ गुरूंना नमस्कार करून त्रिलोकप्रज्ञप्तीचा विषय सांगितला आहे. त्यानंतर ज्ञानाला प्रमाण, ज्ञात्याच्या अभिप्रायाला नय आणि जीवादि पदार्थाच्या व्यवहार उपायाला निक्षेप म्हटले आहे. उपमानाचे आठ प्रकार सांगून पुढे परमाणूचे स्वरूप सांगितले आहे. योजनांचे प्रमाण सांगून सहा द्रव्यांनी व्याप्त लोकाचे अधः, ऊर्ध्व व तिर्यक् असे तीन प्रकार सागून त्यांच्या विस्ताराविपयी चर्चा केली आहे.

नारकलोक महाधिकारात ३६७ पद्यें आहेत. त्यात त्रसनालिकेचा निर्देश करून रत्नप्रभादि सात नरकाविपयी माहिती दिली आहे. या नरकातील नारकीयांची संख्या देखील सांगितली आहे. नरकातून निघालेले जीव कर्मभूमीतील गर्भज, संज्ञी, पर्याप्त, तिर्यंच व मनुष्य होतात. नारकी जीव वलदेव अथवा चक्रवर्ती होत नाही. संख्यात वर्षाचे व विविध पशुयोनीत जाणारे जीव पुनः नरकात उत्पन्न होतात. कपायांच्यामुळे नरकबंध होतो. नारकी जीवाना कृष्ण, नील, कापोत या लेश्या प्राप्त होतात. त्यानंतर नारकीयांचे जन्मस्थान, आकार, विस्तार याविपयी गाहिती देखील त्यानी दिली आहे.

भवनलोक महाधिकारात २४३ पद्यें आहेत. यात भवनवासी देवांचे निवासक्षेत्र, त्यांचे भेद, चिह्ने, भवनसंख्या, इंद्राचे प्रमाण, नाम, त्यांचे भवन, अल्पर्द्धिक, महर्द्धिक, मध्यमर्द्धिक भवनवासी देवांच्या भवनांचे वर्णन व सम्यग्दर्शनग्रहणाचे कारण सांगितले आहे. तीर्थंकर, संघ तथा आगमग्रंथादि विपयांचे प्रतिकूल आचरण करणारे दुर्विनयी मायाचारी जीव किल्विप देवात उत्पन्न होतात तर क्रोध, मान, माया, लोभ यात आसक्त राहणारे व वैरभाव स्वीकारणारे जीव असुर म्हणून जन्मतात. विविध देवदेवतासह जिनप्रतिमांचे दर्शन करून सुखांचा उपभोग घेतात.

नरलोक महाधिकारात मनुष्य लोकाचा निर्देश, जंबूद्वीप, लवणसमुद्र, धातकिखंड, कालोद समुद्र, पुष्करार्ध द्वीप, या द्वीपातून स्थित मनुष्यांचे भेद, संख्या, गुणस्थानादि आयुर्बन्धाचा परिणाम, योनि, सुख, मोक्षाला जाणाऱ्या जीवांचे प्रमाण, अशा अनेकविध १६ अधिकारांचे वर्णन आहे. या महाधिकाराची समस्त पद्यसंख्या २९६१ इतकी आहे. मध्यंतरी थोडा गद्यभागही आला आहे.

तिर्यग्लोक महाधिकारात ३२१ पद्यें आहेत. यात गद्य भागच अधिक आहे या महाधिकारात १६ उपाधिकाराद्वारे तिर्यग्लोकाचे विस्तृत वर्णन केले आहे. स्थावरलोकाचे प्रमाण सागताना आकाशात जेथपर्यंत धर्म व अधर्म द्रव्य निमित्ताने होणारी जीव आणि पुद्गल गति व स्थिती शक्य आहे तो सर्व स्थावरलोक आहे. त्यांच्या मध्यात सुमेरू पर्वताच्या मुळापासून एक लाख योजन उंच आणि एक राजू लांब रुंद तिर्यक् त्रसलोक आहेत. त्यानंतर द्वीपसमुद्रातील विस्तारयुक्त असणाऱ्या जंबूद्वीपाचे वर्णन असून इतर अनेक द्वीपाचेही वर्णन केले आहे. नंदीश्वर द्वीपात अंजनगिरि, दधिमुख, रतिकर पर्वत असून, त्या पर्वताच्या सर्व शिखरावर रत्नमय जिनभवने आहेत. भवनवासी इ. चारी प्रकारचे देव तेथे जाऊन अष्टद्रव्यानी पूजा करून जिनेंद्राची स्तुति गातात. तेथे सौधर्म, ऐशान, सानत्कुमार, माहेन्द्र, शुक्रेन्द्र, आरणेन्द्र इत्यादी १६ देवेंद्र आपापल्या वाहनावर आरूढ होऊन जातात.

व्यन्तरलोक महाधिकारात १०३ पद्ये आहेत. यात १७ उपअधिकारा द्वारा व्यंतरदेवाचे निवासक्षेत्र, त्यांचे प्रकार, चिह्न, कुलभेद, नावे, आहार, उच्छ्वास, अवधिज्ञान गुणस्थानादि विकल्पाची माहिती देऊन इतर माहिती भवनवासी देवाप्रमाणेच सांगितली आहे.

ज्योतिर्लोक—

महाधिकारात ६१९ पद्ये आहेत. यात ज्योतिषी देवांचे निवासस्थान, त्यांचे प्रकार, संख्या, परिणाम, चर ज्योतिष्कायांची गति, अचर ज्योतिष्कांयाचे स्वरूप, आयु, आहार, उच्छ्वास, अवधिज्ञान, शक्ति, एकसमयात जीवांची उत्पत्ति व मरण, आयुर्बन्धक भाव इत्यादि सांगून १७ उपअधिकाराद्वारा ज्योतिषी देवांचे विस्तृत विवेचन केले आहे.

सुरलोक महाधिकारात ७०३ पद्ये आहेत. यात वैमानिक देवांचे निवासक्षेत्र, विन्यास, प्रकार, नाव, सीमा, विमानसंख्या, इंद्रविभूति, आयु, जन्म, मरण, अंतर आहार, उच्छ्वास, आयुर्बंधकभाव, देवाचे स्वरूप, गुणस्थानादिक, सम्यक्त्वग्रहणाचे कारण, आगमन, अवधिज्ञान, शक्ति व योनि या साधारणपणे २१ उपअधिकाराद्वारे वैमानिक देवांचे विस्ताराने वर्णन केले आहे.

सिद्धलोक महाधिकारात सिद्धांचे क्षेत्र, त्यांची संख्या, अवगाहना आणि सुखाचे वर्णन करून, ज्या भावनेने सिद्धत्व प्राप्त होते तिचे कथन केले आहे. या प्रकारच्या पुष्कळ गाथा समयसार, प्रवचनसार आणि पंचास्तिकाय मध्येही दिसतात.

त्रिलोकप्रज्ञप्ति ग्रंथातील विषयाशी साम्य धारण करणारे आपणाला कुंदकुंदाचे पंचास्तिकाय, प्रवचनसार समयसार, वट्टकेराचार्यकृत मूलाचार, भगवती आराधना, लोकविभाग, पुन्नाटसंघीय जिनसेन सूरिकृत हरिवंश पुराण, नेमिचंद्र सिद्धांतचक्रवर्तीद्वारा रचित त्रिलोकसार, पद्मनंदिविरचित जंबूदीवपण्णत्ति, जिनभद्रगणि क्षमाश्रमण लिखित बृहत्क्षेत्रसमास, श्वेतांबर संप्रदायाचे नेमिचंद्रसूरिनिर्मित प्रवचनसारोद्धार इत्यादि ग्रंथ आढळतात.

आ. यतिवृषभद्वारा रचित 'त्रिलोकप्रज्ञप्ति' ग्रंथ प्राचीनता व प्रामाणिकता याकडे लक्ष वेधून घेणारा आहे. संपूर्ण ग्रंथ प्राकृत भाषेत असून करणानुयोगासत्ता व तीन लोकातील समस्त विषयांचे स्पष्टीकरण करणारा एक अतिशय महत्त्वपूर्ण ग्रंथ, म्हणून त्याचे वर्णन करावे लागेल. या विशाल रचनेत अनेक रोचक गोष्टीसंबंधीचे परिच्छेद आले असून जैन सिद्धांत आणि साहित्य याचेही वर्णन आले आहे. या ग्रंथात 'करणगाथा' अर्थात् गणितविषयक सूत्रांची माहिती आली असून तिचे सखोल अध्ययन करणे आवश्यक आहे. १८ श्रेणींची गणना व महाराज इ. पदवीनुसार आपणाला प्राचीन भारताच्या राजांचा क्रम तथा त्यांच्या वैभवाविषयी माहिती मिळते. परमाणु, पुद्गल अंगुल यांच्याद्वारे कालमापनाच्या ज्ञानाला सुव्यवस्थितपणा आणण्याचा प्रयत्न केलेला दिसतो.

चतुर्थ महाधिकारात शलाकापुरुषांचे अधिक रोचक वर्णन आले आहे. तसेच वर्णन कमी अधिक विस्ताराने आपणाला हरिवंशपुराण, महापुराण, प्राकृत महापुरुषचरित, तिसट्ठि-महापुरिसगुणालंकार, त्रिषष्टि-शलाकापुरुषचरित, तामिळ श्रीपुराण इत्यादि ग्रंथातून पाहावयास मिळते. तीर्थंकरांच्या चरित्रातून समवसरणरचना, ऋद्धि, चक्रवर्तीची विजययात्रा वगैरे धार्मिक गोष्टीचे विस्तृत विवेचन मिळते.

महावीर स्वामीनंतरची परंपरा जैनधार्मिक साहित्य इतिहासालाच नव्हे तर भारतीय इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. कारण त्यातून अनेक राजाचे, राजवंशाचे व त्याच्या कालगणनेचे उल्लेख मिळतात. त्रिलोकप्रज्ञप्तीनुसार महावीर निर्वाणापासून शकराजापर्यंतच्या कालाचा विचार केला गेला आहे. पालक, पुष्यमित्र, वसुमित्र, गन्धर्व, नरवाहन, कल्कि इत्यादि राजाचा उल्लेख इतिहासोपयोगी आहे

विविध क्षेत्र, तेथील नद्या, पर्वत, मनुष्याचे वर्णन जैन भूगोल साहित्याच्या पृष्ठभूमीला उचित असून त्याचेही सूक्ष्म अध्ययन करणे आवश्यक आहे. सिद्धाचे वर्णन, आत्मचिंतनाचे उपाय इत्यादि जैन विचारधारेची प्राचीन संपत्ती आहे.

यतिवृषभाचार्यरचित 'तिलोयपण्णत्ति' हा प्राचीन, प्रामाणिक, ऐतिहासिक, भौगोलिक, ज्योतिष्क-विषयक माहिती देणारा अत्यंत मौलिक ग्रंथ आहे हे अमान्य करता येणार नाही.

# आ. सिद्धसेन दिवाकर

आ. सिद्धसेन दिवाकर एक प्रभावशाली आचार्य होऊन गेले ते एक महान् तार्किक होते त्यांना दिगंबर आणि श्वेतांबर दोन्ही संप्रदायात मान्यता मिळालेली होती. आ. सिद्धसेन दिवाकर 'न्यायावतार' कर्ता सिद्धसेन यांच्याहून भिन्न आहेत याचा काल साधारणपणे विक्रम संवत ५ वे शतक मानला जातो. यानी 'सन्मतितर्क' हा प्रसिद्ध ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ जैनदर्शन आणि न्यायविषयक एक प्राचीन व महत्त्वपूर्ण ग्रंथ मानला जातो. यात नयवादाने विवेचन करून अनेकांत वादाची स्थापना केली आहे. सिद्धसेन दिवाकराना दिगंबराचार्यांनी महान कवि व प्रभावशाली तार्किक मानून पुष्कळ ठिकाणी त्यांची पद्ये उद्धृत केली आहेत.

भगवज्जिनसेनाचार्यांनी आदिपुराणातील प्रथम पर्वात फारच आदराने त्याचे स्मरण केले आहे.

कवय: सिद्धसेनाद्या वयं च कवयो मता: । मणय. पद्मरागाद्या ननु काचोऽपि मेचक. ।। ३९ ।।
प्रवादिकरियूथानां केशरी नयकेशर. । सिद्धसेनकविर्जीयाद्विकल्पनखरांकुर ।। ४० ।।

अर्थात् प्रतिवादीरूपी हत्तींच्या समूहासमोर हे नयविकल्परूप तीक्ष्ण नख धारण करणारे सिद्धसेन आचार्य सिंहासारखे समजले गेले आहेत. श्वेतांबर संप्रदायात त्यांना 'दिवाकर' हे विशेषण लावले जाते.

याशिवाय आ. सिद्धसेन दिवाकर यांची स्तुति, जिनसेनाचार्य यांनी 'हरिवंशपुराणात', श्रीकल्याणकीर्ति यानी 'यशोधरचरितात', श्रीहरिभद्रसूरींनी 'पंचवस्तुक' आणि श्रीहेमचंद्राचार्य यांनी 'अयोगव्यवच्छेदिकेत' केली आहे.

पं. जुगलकिशोर मुख्तार यानी 'जैन साहित्य और इतिहास पर विशद प्रकाश' या ग्रंथातील पृ. नं. ५०१ ते ५८५ पर्यंत 'सन्मतिसूत्र और सिद्धसेन' या लेखात आ. सिद्धसेनाविषयी बरीचशी माहिती दिली आहे.

जैन आचार्य परंपरेत सिद्धसेन नावाचे अनेक आचार्य आणि प्रखर तार्किक विद्वान होऊन गेले आहेत. 'सन्मतितर्क' या महत्त्वपूर्ण ग्रंथाचे कर्ते सिद्धसेन आहेत हे नक्की आहे, पण हे सिद्धसेन नेमके कोणते, याविषयी काही माहिती मिळू शकत नाही. ते नक्की कोणत्या संप्रदायाचे होते ? त्याचे गुरु कोण ? त्यांच्या इतर ग्रंथकृति कोणत्या ? अथवा त्यांचा काल कोणता ? या बाबीच्याविषयी निर्णायक माहिती उपलब्ध नाही या गोष्टी म्हणजे एक वादाचाच विषय होऊन बसला आहे. न्यायावतार तथा सन्मतितर्क ग्रंथ लिहिणारे एकच सिद्धसेन आहेत, अशी काही ठिकाणी कल्पना केली आहे. आणि त्याबाबत अधिकच गोंधळ उडाला आहे श्वेतांबर, दिगंबरांनी अनेक ग्रंथ सिद्धसेनाच्या नावावर चढविले आहेत जे उत्तरावर्ती सिद्धसेनांनी लिहिलेले आहेत– १) जीवकल्पचूर्णि, २) तत्त्वार्थाधिगमटीका, ३) प्रवचनसारोद्धारवृत्ति, ४) एकविंशतिस्थानप्रकरणं ५) शक्रस्तव इ. परंतु काही ग्रंथ असे आहेत की, त्यातून सिद्धसेनाचा उल्लेख मिळतो परंतु ते ग्रंथ आज उपलब्ध नाहीत उदा.–१) बृहत्-षड्दर्शनसमुच्चय, २) विषोग्रग्रहशमनविधि, ३) नीतिसारपुराण इ जे ग्रंथ उपलब्ध नाहीत त्याच्याविषयी विचार करण्यात काही अर्थ नाही वरील आठ ग्रंथाशिवाय आणखी चार ग्रंथ आहेत १) द्विात्रिंशद्द्वात्रिंशिका २) सन्मतिसूत्र, ३) न्यायावतार, ४) कल्याणमंदिर इ. कल्याणमंदिर ही कृति श्वेतांबरसंप्रदायानुसार सिद्धसेन-दिवाकराचीच मानली जाते. परंतु दिगंबर परंपरेनुसार व स्तोत्रातील अंतिम पद्यात सूचित केल्याप्रमाणे ही कृति कुमुदचंद्राचार्यांची मानली जाते. या बाबतीत श्वेतांबरांचे असे म्हणणे आहे की, सिद्धसेनाचे दीक्षेवेळचे नाव कुमुदचंद्र होते. आचार्यपदाचे वेळी त्यांना त्याचे पूर्वनाव सिद्धसेन हेच दिले आहे परंतु श्वेतांबर विद्वान पं. सुखलालजी व बेचरदासजी यानी ह्या बाबतीत अमान्यता दर्शविली आहे

पं. सुखलालजींनी द्वात्रिंशिका, न्यायावतार आणि सन्मतिसूत्र या एकाच कर्त्याच्या ग्रंथकृती असल्याचे मानले आहे, परंतु तसा प्रत्यक्ष पुरावा दिला नाही. यावरून असे सिद्ध होते की, एक 'सन्मतिसूत्र' ग्रंथ सोडून बाकी ज्या सर्व ग्रंथांचा उल्लेख आला आहे ते सिद्धसेन दिवाकराचेच आहेत असे निश्चितपणे म्हणता येणार नाही.

काल–

सिद्धसेनाच्या काळाविषयी देखिल विशेष माहिती मिळत नाही. जुगलकिशोर यांनी अंतरपरीक्षणाच्या साहाय्याने हा कालनिर्णय ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यासाठी सिद्धसेनाच्या साहित्याच्या पाहणीद्वारे बाह्य प्रभाव तथा उल्लेखविशेष, ग्रंथातील विविध वाक्ये व त्याच ग्रंथात उल्लेखित विषयाचा अन्यत्र दिसणारा पडसाद, टीका-प्रटीका, परमतखंडन पद्धति अथवा स्वमतमंडन पद्धति त्या व्यतिरिक्त इतर ग्रंथकाराने सिद्धसेना-विषयीचे त्यांच्या ग्रंथातून काढलेले उद्गार इ. वाचींच्या साह्याने कालनिर्णय देण्याविषयीचा फार मोठा प्रयत्न केला आहे[1]

पं. सुखलालजींनी सन्मतिकार सिद्धसेनाचा काळ वि. सं. ५ वे शतक व वि. सं. २ रे शतक मानला आहे. त्यासाठी त्यांनी पूज्यपाद व निर्युक्तिकार भद्रबाहू यांच्या कालाविषयी थोडा विचार केला आहे. परन्तु पं. जुगल-किशोर यांच्या मते तो उचित नाही. तसेच सन्मतिकार सिद्धसेनाचा काळ वि. संवत दुसरे शतक मानणे तर अगदीच अनुचित असल्याचेही सांगितले आहे.

म्हणून पं. जुगोलकिशोर मुख्तार यांनी आ सिद्धसेन दिवाकराचा काल वि. सं. ६ व्या शतकाच्या उत्तरार्धात किंवा ७ व्या शतकाच्या उत्तरार्धातला असावा असे मानले असून, त्याला सबळ पुरावे देखील दिले आहेत. जोपर्यंत याशिवाय दुसरा कोणता सबळ पुरावा मिळत नाही तोपर्यंत हा काल मानावयास हरकत नाही.

जैन लक्षणावलीत आ सिद्धसेनाचा काल वि. सं. ६ किंवा ७ वे शतक मानला आहे.[2]

भारतीय ज्ञानपीठ प्रकाशनद्वारा प्रकाशित 'जैनेंद्र सिद्धांत कोश' मध्ये आ. सिद्धसेन दिवाकराचा काल इ. स. ५५० इतका दिला असून, ते श्वेतांबराचार्य होते असे म्हटले आहे.[3] त्यांचे ग्रंथ संस्कृत भाषेत असून ते 'सन्मतितर्क'चे कर्ते असल्याचेही म्हटले आहे.

तसे पाहता न्यायावतार ग्रंथाचे कर्ते सिद्धसेन श्वेतांबर मानले असून, सन्मतिसूत्रकर्ते दिगंबर सिद्धसेन मानले आहेत. परंतु न्यायावतार कर्ता सिद्धसेन याविषयीची दिगंबर संप्रदायात देखील विशेष माहिती मिळत नाही. उलट श्वेतांबर परंपरेतील अनेक न्यायविषयक टीका-टिप्पणीमधून त्यांचा उल्लेख मिळू शकतो. अशा प्रकारे श्वेतांबरीय सिद्धसेन व दिगंबरीय सिद्धसेन असे प्रमुख दोन सिद्धसेन मानले असून, ते एकमेकापासून थोड्या फार फरकाने भिन्न तथा अभिन्न देखील मानले आहेत.[4] या दोन्ही सिद्धसेनांचा प्रश्न थोडा वादग्रस्त जरी असला तरी त्यांच्या कृती अथवा ग्रंथरचना अत्यंत उपयोगी व महत्त्वपूर्ण आहेत. त्यांचे सूक्ष्म अवलोकन करणे आपले आद्य कर्तव्य ठरते.

ग्रंथरचना–

आ. सिद्धसेन दिवाकर यांनी विविध प्रकारची ग्रंथरचना केली. त्यातील बऱ्याच ग्रंथात त्यांचे नाव आले असून, ते ग्रंथ मात्र आज उपलब्ध नाहीत. ते एक महान् तार्किक होऊन गेले. त्यांनी कांही द्वात्रिंशिकांची रचना केली असून, स्तोत्र रचना केली असल्याचेही दिसून येते.

---

१. जैन साहित्य और इतिहास पर विशद प्रकाश– नाथूराम प्रेमी पृ. न. ५४४ ते ५४८.

२. जैन लक्षणावली (पारिभाषिक शब्द कोश) बालचंद्र सिद्धांत शास्त्री पृ. नं. ४५.

३ भारतीय ज्ञानपीठ प्रकाशन 'जैनेंद्र सिद्धांत कोश' पृ. न. ३३६.

४. जैन साहित्य और इतिहास पर विशद प्रकाश– प जुगलकिशोर मुख्तार पृ. नं ५८५.

आ. सिद्धसेनांची 'सन्मतिसूत्र' हीच एक ग्रंथरचना अत्यंत महत्त्वाची समजली जाते. श्वेतांबर सम्प्रदायात हा ग्रंथ 'सन्मतितर्क' 'सम्मतितर्कप्रकरण' व 'सम्मतिप्रकरण' या नावानी ओळखला जातो हा ग्रंथ म्हणजे जैन वाङ्मयातील एक अमोल ग्रंथरत्न समजला जातो. तो पूर्णत. प्राकृत भाषेत आहे

दिगंबर परंपरेच्या धवलादि प्राचीन ग्रंथात या ग्रथाला सन्मतिसूत्र (सम्मइसुत्त) नावाने सबोधिले आहे आणि हे नाव 'सन्मतिप्रकरण' या नावाला अधिक जवळचे आहे. कारण यातील बहुतेक प्रत्येक गाथेत एक सूत्र आहे. अथवा अनेक सूत्रवाक्यासहित आहेत. पं. सुखलाल यांच्या मते देखील संपूर्ण सन्मतिग्रंथ 'सूत्रग्रथ' असून प्रत्येक गाथेला सूत्र म्हटले आहे.

'सन्मतिसूत्र' ग्रंथाची गणना जैनपरपरेतील प्रभावी दर्शनग्रंथात केली जाते. श्वेतांबर सम्प्रदायातील जीतकल्पचूर्णि, श्रीचन्दसूरिरचित 'विषमपदव्याख्या' टीका, श्रीअलंकदेवकृत 'सिद्धिविनिश्चय' इ. महत्त्वाच्या दर्शनग्रंथात 'सन्मतिसूत्र' ग्रंथाचा उल्लेख केला जातो. 'सन्मतिसूत्रा' सारख्या शास्त्रांचे अध्ययन करण्यामुळे साधूचे असलेले दोष धुवून जातात. त्याला प्रायश्चित्ताची गरज नसते असे म्हटल्याचे दिसून येते.

'सन्मतितर्क' ग्रंथ तीन कांडानी युक्त असून त्यात अनुक्रमे ५४+४३+७०=१६७ इतक्या गाथा आहेत. ग्रंथाच्या विभाजनालाच कांड असे म्हटले आहे. प्रथम काडाला काही हस्तलिखित प्रतीत व मुद्रितप्रतीत 'नयकाण्ड' असे म्हटले आहे. कारण हा सारा कांड नयाविषयीच सांगितलेला आहे. त्यात द्रव्यार्थिक तथा पर्यायार्थिक या दोन नयाना मूलाधार मानून इतर नय या नयांचे प्रकार असल्याचे सागितले आहेत. या काडात नयाचे सुंदर निरूपण केले आहे. दुसऱ्या काडाला जीवकांड असे म्हटले आहे. पं. बेचरदासजी यांच्या मते हे नामाभिधान योग्य नाही. त्यांच्या मते या कांडाला ज्ञानकांड अथवा ज्ञेयकांड असे नाव उचित आहे. कारण या कांडात त्यांच्या मतानुसार जीवतत्त्वाची चर्चा नसून पूर्णतः ज्ञानचर्चा आहे. या कांडातील ज्ञानचर्चा प्रमुख असली तरी, दर्शनचर्चा देखील या कांडात केली आहे आणि त्यानेच सुरुवात आहे. तसेच ज्ञान आणि दर्शन दोन्ही जीवद्रव्याचें पर्याय आहेत. जीवद्रव्याहून त्याचे भिन्न अस्तित्व नाही आणि म्हणूनच याला जीवद्रव्याची चर्चा असे त्यांनी म्हटले आहे. परंतु पं. जुगलकिशोर मुख्तार यांच्या मते ग्रंथाच्या शेवटी येणाऱ्या विषयचर्चेवरून देखील त्या ग्रंथाला तेच नाव देण्याची परंपरा दिसून येते. अर्थात ग्रंथाच्या शेवटी जीवद्रव्याची चर्चा आली आहे. म्हणून कांडाला जीवकांड हे नाव अनुचित नाही असे त्याचे मत आहे.

तिसऱ्या कांडाला काही नाव दिलेले आढळून येत नाही. डॉ. पी. एल. वैद्य यांनी या काडाला 'अनेकांतवादकांड' असे नाव दिले आहे. या कांडातील अंतिम विषयविवेचनावरून हें नाव योग्य आहे. हा कांड अनेकांत दृष्टिने युक्त असून सामान्य व विशेष प्रकारे विवेचन केले आहे. म्हणून या काडाचे दुसरे नाव सामान्य 'विशेष कांड' अथवा 'द्रव्यपर्यायकांड' असेही ठेवता येईल. पं. सुखलालजीनी या कांडाला 'ज्ञेयकाड' म्हटले आहे. या ग्रंथाची गाथा संख्या १६७ असली तरी बेचरदासजी ती १६६ इतकी मानतात कारण तिसऱ्या कांडातील शेवटची गाथा प्रक्षिप्त गाथा वाटते.

'सन्मतिसूत्र' ग्रंथात अगदी सुरुवातीलाच द्रव्यार्थिक व पर्यायार्थिक या दोन नयाचे विवेचन आले आहे. त्यामुळे नयवादावर चांगलाच प्रकाश पडला आहे. नयाविषयी थोडी फार माहिती खालीलप्रमाणे दिसते—

प्रथम कांडांत दोन्ही नयांना सामान्य विशेष विषयांना मिश्रित दाखवून त्याच्या मिश्रत्वाच्या चर्चेचा शेवट करताना म्हटले आहे—

दव्वट्ठिओ त्ति तम्हा णत्थि णओ नियमसुद्धजाईओ ।
ण य पज्जवट्ठिओ णाम कोइ भयणाय उ विसेसो ।। ९ ।।




अर्थात् द्रव्यार्थिक नयात द्रव्य मुख्य व सामान्य असते आणि पर्यायविशेष गौण असतो आणि पर्यायार्थिक नयात विशेष मुख्य तथा सामान्य गौण असते. त्यानंतर पर्यायार्थिकनयाच्या दृष्टीने द्रव्यार्थिक नयाचे वक्तव्य नियमाने अयोग्य आहे आणि त्याचप्रमाणे द्रव्यार्थिकनयाच्या दृष्टीने पर्यायार्थिक नयाचे वक्तव्य ( विशेष ) अयोग्य आहे. पर्यायार्थिक नयाच्या दृष्टीने सर्व पदार्थ नियमाने उत्पन्न होतात आणि नाश पावतात. द्रव्यार्थिक नयाच्या दृष्टीने पदार्थ उत्पन्नही होत नाही अथवा नाशही पावत नाही. द्रव्य पर्यायाशिवाय आणि पर्याय द्रव्या- (ध्रौव्य) शिवाय असू शकत नाही. उत्पाद, व्यय, ध्रौव्य ही तिन्ही सत्द्रव्याची लक्षणे आहेत. कुंदकुंदाचार्यांनी म्हटलेच आहे–

पज्जयविजुदं दव्वं दव्वविजुत्ता य पज्जया णत्थि । दोण्हं अणण्णभूदं भावं समणा परूविंति (पंचास्तिकाय) ॥

या विवेचनानंतर दुसऱ्या विभागात द्रव्यार्थिक नय व पर्यायार्थिक नय हे दोन्ही परस्परांना कसे पूरक आहेत हे दाखवून दिले आहे अर्थात् दोन्ही नयातील कोणताही एक नय जेव्हा दुसऱ्या नयाची अपेक्षा न करता आपल्या विषयाला सत्यरूप प्रतिपादनाचाच आग्रह धरतो त्यावेळी तो मिथ्यानय ठरतो या प्रकारचे वर्णन सन्मतिसूत्रात आ. सिद्धसेन दिवाकर यांनी १० ते १८ गाथामार्फत दाखवून दिले आहे या गाथाच्या नंतर उत्तरावर्ती नयांची चर्चा करताना त्यांना दैनिक मूलनयाप्रमाणेच दुर्णय तथा सुनय म्हटले आहे आणि कोणत्याही एका नयाचा आधार घेतल्याने संसार, सुख, दुःख, बंध अथवा मोक्ष यांचे यथार्थ निरूपण करता येणार नाही हे स्पष्ट केले आहे. सर्व नयाच्या मिथ्या अथवा सम्यक् स्वरूपाला स्पष्ट करताना ते म्हणतात–

तम्हा सव्वे वि णया मिच्छादिट्ठी सपक्खपडिबद्धा ।
अण्णोण्णणिस्सिआ उण हवंति सम्मत्तसब्भावा ॥ २१ ॥

म्हणून मूल नय असो अथवा त्यानंतरचे नय ( गुणार्थिक ) असोत जे एकमात्र आपल्याच पक्षाला स्पष्ट करू इच्छितात ते मिथ्यादृष्टि आहेत परन्तु जे नय परस्पराच्या साह्याने वस्तूचे निरूपण करतात ते नय सम्यक्दृष्टि आहेत.

तिसऱ्या कांडात नयवादाची चर्चा एका वेगळ्याच प्रकारे करून नयवादाचे परिशुद्ध आणि अपरिशुद्ध असे भेद सांगितले आहेत. याच कांडात आ. सिद्धसेनांनी गुणार्थिकनयाची कल्पना स्वतःच करून त्याचे निरसन देखील केले आहे. या नयवादांच्या स्वरूपनिर्देशानानतर त्यांनी सांगितले आहे की, जितक्या वचनपद्धति आहेत तितक्या नयवादपद्धति आहेत. व जितके नयवाद आहेत तितकीच जैनेतरनयपद्धति आहे. या वचनानंतर आ. सिद्धसेनांनी जैनेतरदर्शनातील नयपद्धति सांगितली आहे कपिलाच्या सांख्य दर्शनात द्रव्यार्थिक नयाला मानले आहे बुद्धदर्शनात परिशुद्ध पर्यायनयाला महत्त्व दिले आहे. कणादाने आपल्या वैशेषिकदर्शनात दोन्ही नयांना मान्यता दिली आहे. याविषयीची व्यवस्थित माहिती गाथा नं ४६ ते ४९ मध्ये दिली आहे. अर्थात वरील दर्शनात सांगितलेल्या नयात एकान्तीपणा आहे. स्याद्वाद-अस्याद्वाद या दोन्ही दृष्टींने हे सर्व एकत्र आले तर ते अनेकांतात समाविष्ट होऊन जातील व सर्वोत्तम सम्यग्दर्शनाची प्राप्ति होईल.

आ. सिद्धसेनानी परपक्ष मताची व्यवस्थित मांडणी करून पुनः त्याचे खंडन केले आहे आणि जैनदर्शनानुसार वापरली गेलेली नयपद्धतीच योग्य आहे असे पुन:पुन आवर्जून सांगितले आहे कारण जैनदर्शनात स्याद्वादन्यायाद्वारे समन्वयाची दृष्टि समोर ठेवून 'समन्वय' हेच मुख्य तत्त्व मानले आहे. म्हणून मिथ्यादर्शने विरोध विसरून जैनदर्शनात समाविष्ट होतात. सर्वांना एकत्रित करण्याचे हे महान् कार्य अनेकांतवादामुळेच केले जाते म्हणून त्याचा महिमा फार मोठा आहे. अमृतचंद्रसूरी व समंतभद्र यांनी देखील याच मताला पाठिंबा दिला आहे.








ग्रंथाच्या शेवटी आ. सिद्धसेन दिवाकरानी जिनशासनाचे तथा पद्धतीचे स्मरण केले आहे. 'सन्मतिसूत्र' ग्रंथात नयविषयक गोष्टींचे प्रतिपादन त्यांनी प्रभावीपणे केले आहे, म्हणूनच इतर प्रभावी दार्शनिक ग्रंथात याची गणना केली जाते. जैनदर्शनाचा अभ्यास करणाऱ्यांना तो अत्यंत उपयोगी तर आहेच, पण जैनेतर दर्शनातील वाचकांना देखील दोन्हीतील भेद समजण्यासाठी अत्यंत उपयोगी असा हा ग्रंथ असून पठन, मनन करण्यासही सुंदर आहे.

## आचार्य भट्टाकलंक

आ. भट्टाकलंक यांचे स्थान जैनवाङ्मयांत अनुपमेय असे आहे. त्यांनी जैन न्यायास चांगले स्वरूप दिले. ते प्रकांड पंडित धुरंधर शास्त्रार्थी व उत्कृष्ट विचारक होते. बौद्धांच्या बरोबर त्यांचा खूप संघर्ष झाला. त्यांची सर्व ग्रंथरचना अतिगहन व विद्वान् दार्शनिकांना देखील समजण्यास कठिण अशी आहे. परंतु जैनन्यायास यथास्थित स्वरूप देणारे आ. अकलंकासारखे विद्वान क्वचितच पाहावयास मिळतील. त्यांनी जैन न्यायास जें स्वरूप दिले त्यावरच, पुढच्या जैन ग्रंथकारांनी आपली न्यायग्रंथरचना केली. आ. भट्टाकलंक दिगंबरसंप्रदायाचे अनुयायी असून देखील, श्वेतांबर संप्रदायातील विद्वानांची देखिल त्यांना पूर्णतः मान्यता आहे. अनेक विद्वानांनी त्यांना आदराने नमस्कार केला आहे. व जैन न्यायाविषयी त्यांनी प्रतिपादित केलेल्या मताचा दोन्ही संप्रदायांनी कसलाही भेदभाव न करता स्पष्ट स्वीकार केला आहे. त्यांना जैन न्यायाचे 'सर्जन' असे म्हटले आहे. त्यांच्या नावावरूनच श्लेषात्मकरीत्या जैनन्यायास 'अकलंकन्याय' असे म्हटले आहे. स्वामी समंतभद्र आणि सिद्धसेनानंतर यानीच जैनवाङ्मय समृद्ध केले. भारतीय साहित्यरूपी आकाशात चमकणाऱ्या ताऱ्यांपैकी हे एक विद्वान असल्याचे समजले जाते आणि म्हणूनच आचार्य भट्टाकलंक यांचे नाव ऐकताच जैन धर्मियांचे मस्तक श्रद्धेने नत होते.

आ. भट्टाकलंक यानी आपल्या असामान्य बुद्धीने व प्रकांड पांडित्याच्या आधारें अष्टशती, प्रमाणसंग्रह, न्यायविनिश्चय, लघीयस्त्रयी, तत्वार्थराजवार्तिक, सिद्धिविनिश्चयसारख्या महान् ग्रंथांची रचना केली हे सर्व ग्रंथ समजण्यास अतिकठिण असून, त्यातील भाषाशैली गंभीर व गहन आहे.

भट्टाकलंक हे एक महान् आचार्य जरी होऊन गेले असले तरी, त्यांच्या जीवनगाथेविषयीची माहिती मात्र उपलब्ध नाही. जी माहिती आहे ती नसल्याप्रमाणेच आहे. त्यांच्या अमर साहित्यकृती ह्याच आज त्यांच्या नावाच्या, व्यक्तित्वाच्या व महान् पांडित्याच्या साक्षी आहेत. आचार्यांनी देखील स्वत:चे जन्मस्थान, पितृकुल, मातृकुल अथवा कार्य याविषयी कोठे माहिती दिली नाही. यावरून प्रसिद्धिपराङ्मुखता तथा विनयशीलता हेच त्यांचे गुण प्रकट होतात.

आ. अकलंकानंतर अकलंक नावाचे अनेक विद्वान होऊन गेले आहेत. उदा—अकलंक त्रैविद्य (इ. स. १२ वे शतक), अकलंक पंडित (इ. स. ११००), अलंकारसंहिता व श्रावकप्रायश्चित्तकर्ता अकलंक भट्टारक (इ. स. १३११), परमागमसारकर्ता अकलंक, विवेकमंजरीकर्ता अकलंक (इ. स. ११९२), विद्यानुवाद मंत्रशास्त्रकर्ता भट्ट अकलंक, विद्याविनोदकर्ता अकलंक व अकलंकप्रतिष्ठा पाठरचिता अकलंक इत्यादी यातील अकलंक ही एकच कोणी तरी व्यक्ति असण्याची देखील शक्यता आहे परंतु सद्यस्थितीत ते स्पष्ट करून दाखविण्यास योग्य पुरावा मिळत नाही. प्रसिद्ध आद्य अकलंक आचार्यांना 'देव' या शब्दाने संबोधिले असून, भट्ट कुमारिल, भट्ट प्रभाकर यांच्या नावाप्रमाणेच 'भट्ट' ही अकलंकाची पदवी असावी.

**जन्मभूमि व पितृकुल—**

आ. भट्टाकलंक यांच्या जीवनाविषयी आपणाला प्रभाचंद्ररचित कथाकोष, ब्रह्मचारी नेमिदत्तकृत कथाकोष व कानडी भाषेच्या 'राजावली' कथेत माहिती मिळते. प्रभाचंद्रकृत कथाकोष व नेमिदत्ताचा कथाकोष यात कसलाही भेद नाही. कारण नेमिदत्ताने प्रभाचंद्राच्या गद्यकथाकोशाचाच पद्यानुवाद केला आहे.





कथाकोशानुसार आ. अकलंक यांची जन्मभूमि मान्यखेट होती. तेथील राजा शुभतुंगाचे मंत्री पुरुषोत्तमाचे ते सुपुत्र होते. परंतु राजवलीकथेनुसार ते कांची येथील जिनदास नावाच्या ब्राह्मणाचे पुत्र होते. अकलंकांच्या तत्वार्थराजवर्तिकात एक श्लोक पाहावयास मिळतो त्यात त्यांना लघुहव्व राजाचा पुत्र असे म्हटले आहे.

जीयाच्चिरमकलङ्कब्रह्मा लघुहव्वनृपतिवरतनयः । अनवरतनिखिलविद्वज्जननुतविद्यः प्रशस्तजनहृद्यः ॥

प्रस्तुतचा श्लोक स्वतः ग्रंथकाराने लिहिलेला वाटत नाही. कारण त्याचा दुसऱ्या कोणत्या ग्रंथात उल्लेख मिळत नाही. तरीसुद्धा कथेच्या अनुरोधाने या श्लोकाला महत्त्व देणे उचित ठरते.

आ. अकलंक हे दक्षिण भारतातील रहिवासी असावेत यात शंका नाही. कारण 'लघुहव्व' हे नाव चिवट, नम्र या नावाप्रमाणेच दक्षिण भारतातील असावे हे सिद्ध होते. परंतु त्यांना कांचीनिवासी जिनदास ब्राह्मणाचे पुत्र अथवा पुरुषोत्तम नावाने संबोधिले आहे ते अयोग्य वाटते. परंतु ते राजपुत्र असून त्यांच्या पित्याचे नाव 'लघुहव्व' होते हे योग्य वाटते.[1]

राजावली कथेनुसार कांची नावाचे नगर इतिहास प्रसिद्ध आहे. ही द्रविडदेशाची राजधानी होती. प्राचीन काळापासून हे एक विद्येचे महान् केंद्र मानले गेले आहे. याला दक्षिण भारताची काशी असे म्हणतात एके काळी स्वामी समंतभद्रांनी येथेच आपली विज्ञानरुपी तुतारी फुंकली होती. पल्लव राजवंशाच्या वेळी येथे बौद्ध धर्माचा प्रसार अतिजोरात चालला होता. दिङ्नाग व धर्मकीर्ति हे बौद्धधर्म प्रचारक कांचीच्या आसपासचे रहिवासी असून त्यांनी तेथेच बौद्ध दर्शनाचा अभ्यास केला होता. या सर्व गोष्टींचे अवलोकन करता अकलंकाचे पिता लघुहव्व द्रविड देशातीलच कोणत्या तरी एका तालुक्याचे प्रमुख असावेत आणि अकलंकांचा जन्म कांची नगराच्या आसपासच झाला असावा. तेथे पल्लव तसेच त्यांच्या धर्मानुयायांची बौद्धधर्मविषयक चर्चा चालत असे. या वातावरणातच वाढलेल्या आ. अकलंकांच्या बाबतीत इतर सर्व घटना घडल्या असाव्यात. या गोष्टींचे समर्थन केवळ कथेद्वारेच नाही तर शिलालेख व इतर ग्रंथकारांच्या उल्लेखावरुन देखील होऊ शकते.

### बाल्यकाल आणि शिक्षण–

बौद्धाप्रमाणेच जैनराजांनी ठिकठिकाणी विद्येची विद्यापीठे उभारली असावीत, परंतु इतिहासात त्याचा उल्लेख मिळत नाही. बहुधा जैन आचार्य संसारापासून विरक्त होऊन आसपासच्या जंगलात रहात असावेत व ज्यांना आपल्या संततीला ज्ञान देण्याची इच्छा आहे, ते या जंगलातील साधूंच्याकडे त्यांना सुपूर्त करीत असावेत. आ. अकलक यांचे धार्मिक शिक्षण अशाच प्रकारे झाले असावे.

कथाकोशामधील कथेनुसार एकदा 'अष्टाह्निका' पर्व चालू असताना, अकलंकाचे माता-पिता त्यांना व त्यांच्या धाकट्या निकलंक भावाला घेऊन तेथे गेले. धर्मोपदेश श्रवण केल्यावर माता-पित्यांनी आठ दिवसासाठी ब्रह्मचर्य व्रत धारण केले. पुत्रांना देखील ते काही दिवसासाठी दिले. पुढे हे दोन्ही भाऊ वयात येताच पित्याने त्यांचा विवाह करण्याचे ठरविले परंतु त्या दोघांनी विवाह करण्याचे नाकारले व घरचे सर्व कामकाज सोडून देऊन ते विद्याभ्यास करू लागले. राइस यांच्या मते ज्यावेळी कांची येथे बौद्धधर्मियांनी जैन धर्म प्रसाराला आळा घातला होता, त्यावेळी ब्राह्मण जिनदास व पत्नी जिनमति याच्या पोटी अकलंक व निष्कलंक हे दोन पुत्र जन्मास आले. त्यावेळी जैनधर्माचे शिक्षण देणारे कोणी नव्हते, त्यामुळे या दोघा भावांनी भगवद्दास नावाच्या बौद्ध गुरुजवळ गुप्तरीतीने शिक्षण घेतले असावे.

---

१. माणिकचन्द्र दि. जैन ग्रंथमाला द्वारा संपादित व पं. महेंद्रकुमार न्यायशास्त्री द्वारा लिखित 'न्यायकुमुदचन्द्र' पृ. नं. २६–२७.




अकलंकाच्या जन्मस्थानाविषयी व पितृकुलाविषयी निश्चित माहिती मिळत नसली तरी, पित्याबरोबर महान् मुनीजवळ जाणे, ब्रह्मचर्य व्रत स्वीकारणे, विवाहास अमान्यता देणे व आजन्म ब्रह्मचर्य व्रत पाळून विद्याभ्यास करणे इ. गोष्टी या आचार्यांच्या बाबतीत सत्य वाटू लागतात. कारण अकलकासारख्या महान् तार्किक व प्रकांड पंडिताच्या बाबतीत हे अशक्य आहे असे म्हणण्याचे कोणाचे सहसा साहस होणार नाही. कारण महापुरुषाच्या पदी विराजमान होण्यास अशा अद्भुत घटना आवश्यक असतात, याची साक्ष इतिहास देखील देत आहे. अर्थात् आ. अकलंक हे एक राजपुत्र असून सुद्धा महान् तार्किक व विद्याव्यासंगी होते. त्यांचा विद्याभ्यास क्षत्रियोचित शस्त्रवीरतेचा मार्ग सोडून तो ब्राह्मणोचित शास्त्रवीरतेनुसार झाला असावा असे दिसते.

## विद्यार्थिजीवन व त्यांतील संकटे–

आ. अकळंकाविषयीच्या सांगितल्या जाणाऱ्या कथांचे अवलोकन केले तर, अकलंक आपल्या निष्कलंक भावाबरोबर राहात असून गुप्तरीत्या बौद्धमठात विद्याभ्यास करीत होते व ही गोष्ट बौद्ध गुरूला समजताच त्याना शोधून काढणे, दोघे भाऊ पळून जाणे, अकलंकाच्या जीविताचे संरक्षण पण निष्कलंकाचा बौद्ध सैनिकाद्वारे वध होणे हीच कथा थोड्याफार फरकाने पाहावयास मिळते.

कथाकोश ग्रंथात त्यांची पुढीलप्रमाणे एक कथा सांगितली आहे– 'मान्यखेट' नगरात कोणी बौद्ध विद्वान् नाही हे जाणून, त्यांनी बौद्ध धर्माचा अभ्यास करण्यासाठी विदेश यात्रा केली पुढे ते एका बौद्धभिक्षुजवळ अज्ञातस्वरूपात राहून विद्याभ्यास करू लागले. एकदा दिङ्नाग एक ग्रंथ शिकवित होते. अनेकाताचे त्यांनी खंडन करण्यासाठी पूर्वपक्षात सप्तभंगीनयाचे स्पष्टीकरण त्यांनी केले. परंतु ते त्यांना व्यवस्थित समजले नाही. त्यावेळी पाठ बंद करून ते निघून गेले. त्यावेळी अकलंकांनी तो पाठ शुद्ध केला. अर्थात् हे जैनविद्याभ्यासूशिवाय शक्य नाही, हे त्यानी ओळखले. त्यांनी एक जैनमूर्ति तयार करून ती ओलांडण्याविषयी सर्व शिष्याना आज्ञा दिली. सर्वांनी ती ओलांडली. अकलंकांनी मूर्तीवर एक धागा ठेवून ती मूर्ति ओलांडली. परतु आचार्याना यात सफलता मिळाली नाही. त्यावेळी त्यांनी सर्व शिष्य झोपले असता सर्व शिष्यांच्याजवळ एकेक सैनिक उभा केला व रात्रीच्या वेळी जमिनीवर अति जोरात भांडी आपटून मोठा आवाज केला. सर्व विद्यार्थी जागे झाले. त्यावेळी अकलक व निष्कलंक देखील पंचनमस्कार मंत्राचा जप करीत जागृत झाले. सैनिकांनी ते ओळखले. आता आपले जीवंत राहणे शक्य नाही हे पाहून दोघा बंधूनी तेथून पलायन केले. आपणाला मारावयास घोडेस्वार येताहेत, हे पाहून व निष्कलंकाने अकलंकाचे पांडित्य व विद्वत्ता पाहून हा जिवंत राहिला तर, जैनधर्मावर महान् उपकार होतील हे जाणून, त्याना जवळच्याच तळ्यामध्ये बुडी मारण्यास सांगितले. अकलंकाने त्याला मान्यता दिली. पण बौद्ध सैनिकांच्याकडून निष्कलंक ठार झाला. नतर तळ्यातून अकलंक बाहेर पडून पुढील आक्रमण करू लागले

भगवद्दास यांच्या मठात हे दोन्ही भाऊ एकत्र आले. तत्कालीन गोष्टीविषयी राइस यानी त्याच्याविषयी पुढील कथा सांगितली आहे– 'अकलंक हे इतके विद्वान् कसे म्हणून बौद्ध गुरूने बुद्धाचा दात त्याच्या छातीवर ठेवला त्यावेळी ते एकदम 'जिनसिद्ध' म्हणत उभे राहिले व गुरूला हे जैन असल्याचे समजले '

दुसऱ्या एका कथेनुसार 'अकलकाचे गुरु जेव्हा पाठ शिकवित असताना थोडा वेळ बाहेर गेले त्यावेळी अकलंकाने एका हस्तलिखित पुस्तकात 'सम्यग्दर्शनज्ञानचारित्राणि मोक्षमार्गः' असे लिहिले. अधिक चौकशी अंती हे जैन असल्याचे समजले व त्या दोघाना ठार करण्याविषयी निश्चय केला. आपणाला मृत्यु आला तरी चालेल पण अकलक मरता कामा नये म्हणून, त्याला एका धोब्याच्या गाठोड्यात लपविण्यात आले पुढे ते दीक्षा घेऊन सुधापूर येथे देशीयगणाचे मुख्य आचार्य झाले.'

या विविध कथावरून आ अकलंकाच्या जीवनाविषयी काही तरी विशेष घडले आहे हे निश्चित. परतु याला ऐतिहासिक गोष्टीचा निश्चित पुरावा मिळू शकत नाही. आ. भट्टाकलक हे तीक्ष्ण बुद्धीचे असून ज्ञानार्य ते

बौद्ध व जैन मठातून भटकत होते हे स्पष्ट होते. अर्थात तत्कालीन बौद्ध व जैनपरंपरेत विद्वान् आचार्यांची कमतरता असल्याचे दिसून येते.

बौद्ध भिक्षू व आ. अकलंक यांच्यात शास्त्रार्थाविषयी बराच वेळ चर्चा होऊन अकलंकांनी त्यांचा पराजय केलेला दिसतो. श्रवणबेळगोळच्या व विंध्यगिरीच्या शिलालेखातून त्यांची माहिती मिळते. अनेक ग्रंथकारांनी देखिल त्यांचे स्मरण केलेले आढळते. याशिवाय महाकवि वादिराजसूरिंनी (श. सं. ९४८) पार्श्वनाथचरित्रामध्ये त्यांचा उल्लेख केला असून पांडवपुराण व हनुमच्चरित या ग्रंथातही आ. अकलंक यांचा उल्लेख आढळतो. त्यांना अनेक विद्वानांनी विविध प्रकारच्या विशेषणांनी देखिल विभूषित केले आहे. वादिराज या महाकवींनी 'तार्किकलोकमस्तकमणि', प्रभाचंद्राने 'इतरमतावलम्बीवादिदन्ती', लघुसमंतभद्रांनी 'सकलतार्किकचूडामणि-मरीचिमेचकितचरणनखकिरणो भगवान् भट्टाकलङ्कदेवः' असे म्हणून त्यांच्या तार्किकांच्या अगाध बुद्धीविषयी श्रद्धा प्रकट केली आहे. स्याद्वादरत्नाकररचयिता श्वेतांबराचार्य देवसूरींनी त्यांना 'प्रकटिततीर्थान्तरीयकलङ्कोऽकलङ्कः' तर पद्मप्रभमलधारिदेवाने त्यांना 'तर्काब्जार्क' (तर्करूपी कमलाला विकसित करणारे सूर्य) असे म्हटले आहे.

या सर्व उल्लेखावरून आ. अकलंकदेव हे तत्कालीन एक विशिष्ट विद्वान् आणि सर्वेतर परमताचे खंडन करण्यात प्रभावी तार्किक तथा गाढे पंडित होते ही गोष्ट स्पष्ट होते.

**ग्रंथरचना–**

आ. भट्टाकलंक यांची अगाध विद्वत्ता, प्रौढ तार्किकता तथा लेखनशैली इत्यादि विषयांची माहिती करून घ्यावयाची असेल तर, त्यांच्या साहित्यरूपी समोदात निमग्न होण्याचा प्रयत्न करणे अत्यावश्यक आहे. त्यांचे लेखन गद्य असो या पद्य, ते सूत्रांच्याप्रमाणे अतिसंक्षिप्त असून गहन व अर्थबहुलतेने युक्त आहे. कमी शब्दात जास्त सांगणे ही त्यांची विशेषता आहे. स्वतःच्या ग्रंथावर स्वतः भाष्य लिहिले आहे, पण ते इतके कठिण आणि जटिल आहे की, व्याख्याकारांना देखील कधी कधी माघार घ्यावी लागली आहे. आ. भट्टाकलंक यांच्या साहित्यावर टीका लिहिणारे अनंतवीर्य आणि स्याद्वादविद्यापति विद्यानंदी हे दोन महान् आचार्य होऊन गेले. अनंतवीर्य यांच्यामुळेच आ. प्रभाचंद्र व वादिराज यांना आपली ग्रंथरचना करणे सुलभ झाल्याचे त्यांनी स्वतः मान्य केले आहे

आ. अकलंकदेवांची ग्रंथरचना दोन प्रकारची आहे: एक पूर्ववर्ती आचार्यांच्या ग्रंथावर लिहिलेले महाभाष्य आणि स्वतंत्र ग्रंथरचना. प्रथम प्रकारच्या रचनेत तत्त्वार्थराजवार्तिक व अष्टशती हे दोन ग्रंथ येत असून दुसऱ्या प्रकारच्या रचनेत लघीयस्त्रय, न्यायविनिश्चय, सिद्धिविनिश्चय, प्रमाणसंग्रह, स्वरूपसंबोधन, बृहत्त्रय, न्यायचूलिका, अकलंकस्तोत्र, अकलंकप्रायश्चित्त आणि अकलंकप्रतिष्ठापाठ या दहा ग्रंथाचा समावेश होतो. यातील प्रमुख ग्रंथाच्याविषयी संक्षिप्त परिचय खालीलप्रमाणे आहे–

१ तत्त्वार्थराजवार्तिक– उमास्वातींनी लिहिलेल्या तत्त्वार्थसूत्रावरील ही टीका आहे. अर्थात् ती दिगंबर पाठानुसार लिहिली आहे सप्ततत्त्वाचे विवेचन असल्यामुळे या सूत्रग्रंथाला 'तत्त्वार्थ' असे म्हटले आहे. महान् व गांभीर्याच्या दृष्टीने या ग्रंथाला 'तत्त्वार्थराज' या आदरणीय नावाने संबोधिले आहे. तत्त्वार्थसूत्रावरील उपलब्ध आद्य टीका, पूज्यपादलिखित सर्वार्थसिद्धि ही आहे. तत्त्वार्थसूत्र हा मूलग्रंथ १० अध्यायात विभक्त असून, राजवार्तिकात देखील तो दहा अध्यायात विभागला आहे. या ग्रंथाची शैली अतिप्रौढ आणि गहन आहे. या ग्रंथात आ. अकलंक दार्शनिक, सैद्धांतिक व महान् व्याकरणकार या तीन रूपात प्रगट झालेले दिसतात. त्यांचे सर्वांगीण पांडित्य याच ग्रंथावरून प्रकट होते. या ग्रंथाची विशेषता म्हणजे, जैन दर्शनाचा प्राण असलेल्या अनेकांतवादाला या ग्रंथात अधिक व्यापकरूप दिले आहे. सर्ववादाचे निराकरण या ग्रंथात केले आहे. प्रत्येक सूत्राच्या व्याख्यानशैलीतून दार्शनिक दृष्टिकोण प्रकट होतो. अन्यत्र अनुपलब्ध असणाऱ्या बऱ्याच गोष्टींचे विवेचन प्रस्तुत






ग्रंथात मिळते. प्रथम अध्यायात सांख्य, वैशेषिक आणि बौद्ध याच्या मोक्षाचे विवेचन केले आहे दुसऱ्या आध्यायाच्या दरम्यान विविध शरीराचे, तुलनात्मक विवेचन आहे. तिसऱ्या अध्यायात अधोलोक व मध्यलोक यांचे विस्तृत वर्णन केले असून चौथ्या अध्यायाच्या दरम्यान स्वर्ग लोकाचे पूर्ण विवेचन केले आहे. पाचव्या अध्यायात षट् द्रव्याचे विवेचन केले असून सहाव्या अध्यायात विविध कर्मांचा आस्रव व त्याचा विविध परिणाम सांगितला आहे. सातव्या अध्यायात जैनगृहस्थाचे आचारकथन केले असून, आठव्या अध्यायात कर्मसिद्धांत मांडला आहे. नवव्या अध्यायात जैनमुनिआचारकथन केले असून, दहाव्या अध्यायात मोक्षाचे विवेचन केले आहे. अन्यमतांच्या विवेचनासाठी पतंजलीचे महाभाष्य, वैशेषिक सूत्र, न्यायसूत्र, वसुबंधूचा अभिधर्मकोश इत्यादि ग्रंथातील उद्धरणे उद्धृत केली आहेत. श्वेतांबर विषयक सूत्रपाठाचे ठिकठिकाणी स्पष्टीकरण केले आहे.

२. अष्टशती– स्वामी समंतभद्राच्या आप्तमीमांसानामक प्रकरणावरील हे भाष्य आहे. यात ८०० श्लोक आहेत यामुळेच या ग्रंथाला अष्टशती असे म्हटले आहे. स्वामी विद्यानंदींनी देखील अष्टसहस्री ग्रंथात 'अष्टशती'चा उल्लेख केला आहे विद्यानंदींनी या ग्रंथाची रचना केली नसती तर, या अष्टशतीतील रहस्य तसेच राहिले असते. गहनता, गंभीरता, सक्षिप्तता व अर्थगाभीर्याच्या दृष्टीने या ग्रंथाची बरोबरी करणारा अन्य कोणता ग्रंथ दार्शनिक क्षेत्रात दिसून येत नाही, असे असून सुद्धा या ग्रंथाची भाषा अत्यंत सुबोध व रुचिपूर्ण आहे. सर्व दर्शने अनेकान्तवाद व एकांतवाद या दोन वादात विभाजित केली जातात त्यातील जैनदर्शन अनेकांतवादी असून बाकी एकांतवादी मानली आहेत. एकांतवादीची यात टीका केली असून शेवटी प्रमाण, फल, स्याद्वाद आणि नय याची चर्चा केली आहे. तसेच मीमासक, चार्वाक यांच्या बरोबरच बौद्ध दर्शनावर टीका केली आहे. दिङ्नाग व धर्मकीर्ति यांच्या विवेचनावरही टीकेची झोड उठवलेली आहे. साधारणपणे ९९ व्या कारिकेमध्ये सृष्टिकर्त्या ईश्वरवादावर टीका केली आहे.

लघीयस्त्रय– यात एकूण ७८ कारिका आहेत. हा ग्रंथ प्रत्यक्ष परिच्छेद, विषय परिच्छेद, परोक्ष परिच्छेद, आगम परिच्छेद, नयप्रवेश आणि प्रवचन प्रवेश इत्यादी महा परिच्छेदात विभागला आहे. यात प्रत्यक्ष, परोक्ष प्रमाण, त्याचे विषय, भेदयुक्त नय, निक्षेप इत्यादीचे विवेचन केले आहे. या ग्रथावर स्वत. अकलंकदेवरचित विवृत्ति, आ. प्रभाचद्रद्वारारचित न्यायकुमुदचंद्र व अभयचंद्रसूरिकृत तात्पर्यवृत्ति टीका आहे. या ग्रंथाची रचना अष्टशती ग्रंथाला मिळतीजुळती आहे.

न्यायविनिश्चय– या ग्रंथात एकूण प्रत्यक्षप्रस्ताव, अनुमानप्रस्ताव व प्रवचनप्रस्ताव ही तीन प्रकरणे आहेत. नावानुसार या ग्रंथात प्रत्यक्ष, अनुमान व प्रवचन प्रमाणांचे विवेचन केले आहे. समस्त कारिकाची संख्या ४८० आहे. प्रथम प्रस्तावात बौद्ध विकल्प लक्षण, विज्ञानवाद, नैरात्म्यवाद, परमाणुवाद यावर टीका केली आहे. तसेच सांख्य व नैयायिकाच्या मतांचे प्रत्यक्ष खंडन केले आहे. दुसऱ्या प्रस्तावात साध्य, साधन, हेत्वाभास प्रत्यभिज्ञा तर्क, जाति व वाद इत्यादी गोष्टीचे सुदर विवेचन केले आहे. जीवस्वरूपाच्या चैतन्याबाबत चार्वाक व वैशेषिक मतांचे खंडन केले आहे. तिसऱ्या प्रस्तावात मोक्ष व सर्वज्ञाचे विवेचन करून बौद्धांच्या करुणावत्व, सर्वज्ञत्व व चतुरार्यसत्य इत्यादी गोष्टीचा उपहास केला आहे सप्तभंगीनयाद्वारे सर्व गोष्टीचे विवेचन करून ग्रंथसमाप्ति करण्यात आली आहे. या ग्रथाची रचना अष्टशती, प्रमाणसंग्रह या ग्रंथाच्या अगोदर झाली असावी या ग्रथाची भाषाशैली इतर ग्रंथाशी मिळतीजुळती आहे.




सिद्धिविनिश्चय– या ग्रंथात एकूण १२ प्रस्ताव आहेत. ते पुढील प्रमाणे– प्रत्यक्षसिद्धि, सविकल्पसिद्धि, प्रमाणान्तरसिद्धि, जीवसिद्धि, जल्पसिद्धि, हेतुलक्षणसिद्धि, शास्त्रार्थसिद्धि, सर्वज्ञसिद्धि, शब्दसिद्धि, अर्थनयसिद्धि, शब्दनयसिद्धि व निक्षेपसिद्धि इत्यादि यावर अनंतवीर्यद्वारा रचित टीका आहे. तत्वार्थटीका, न्यायकुमुदचंद्र, प्रमाण-मीमांसा, स्याद्वादमंजरी इत्यादि ग्रंथात या ग्रंथातील उद्धरणे उद्धृत केली आहेत.

प्रमाणसंग्रह– या ग्रंथात प्रत्यक्ष, स्मृति इत्यादि भेदांनी युक्त परोक्ष, अनुमान व त्याचे अवयव, हेतू, हेत्वाभास, वाद, सर्वज्ञता आणि सप्तभंगी इत्यादि विषयाचे स्पष्टीकरण केले आहे. यातील कारिकांची संख्या ८७½ इतकी आहे. यावर एक स्वोपज्ञ विवृत्ति असून कारिकांच्या अर्थाला पूरक आहे. या ग्रंथाची रचना बहुधा न्यायविनिश्चय ग्रंथानंतर झाली असावी. हा ग्रंथ गद्यपद्यानी युक्त आहे. या ग्रंथाची भाषा जटिल आहे. प्रमेयप्रमाणांचा संग्रह करणारा या ग्रंथासारखा दुसरा ग्रंथ नसावा. कदाचित् ही अकलंकाची अंतिम रचना असावी. यात एकूण ९ प्रस्ताव आहेत.

बृहत्त्रय– लघीयस्त्रय ग्रंथाच्या नावापासून या ग्रंथाची उत्पत्ति झाली असावी. हा ग्रंथ सध्या तरी अनुपलब्ध आहे अकलंकाच्या लघीयस्त्रय ग्रंथाशिवाय सिद्धिविनिश्चय, न्यायविनिश्चय आणि प्रमाणसंग्रह या ग्रंथरचना अधिक महत्त्वपूर्ण आहेत. या ग्रंथाच्या अस्तित्वाविषयी अजून माहिती उपलब्ध झाली नाही.

अकलङ्कस्तोत्र– या स्तोत्रात १२ शार्दूलविक्रीडीत व ४ स्रग्धरा छंद आहेत. यात महादेव, शंकर, विष्णु, बुद्ध इत्यादी नामधारी देवताविषयी जे कांहीं सांगितले आहे त्याची टीका करून निष्कलंक, वीतराग, परमात्मा, बुद्ध, वर्धमान, ब्रह्मा, केशव, शिव इत्यादी नावांनी जिनेश्वरांना संबोधिले आहे. यातील ११ व १२ पद्याच्या अंतिम चरणात नग्नतेचे वैशिष्टय विशद केले आहे.

आ. अकलंकांच्या या प्रमुख ग्रंथाशिवाय आणखीही काही ग्रंथ असावेत परंतु त्यांची विशेष माहिती मिळत नाही. खरोखर एवढी महान् ग्रंथरचना करणारे आ. अकलंक हे केवढे महान् विद्वान् असावेत याची कल्पनाच करवत नाही.

काल–

आ. अकलंकांच्या काळाविषयी देखील बराच मतभेद आहे. अकलंक मान्यखेट राजा शुभतुंग मंत्र्याचे सुपुत्र असल्याचे बहुधा मान्य केले गेले आहे. राष्ट्रकूटवंशी राजांच्यात 'शुभतुंग' ही पदवी मानली जाते. परंतु त्यावेळी राष्ट्रकूटांची राजधानी मान्यखेट ही नव्हती. तरीसुद्धा याच आधारावर डॉ. के. बी. पाठक यानी अकलंकाला प्रथम कृष्णराजाच्या समकालीन मानले आहे. डॉ. विद्याभूषण यांनी पाठकांच्याच मताचे अनुकरण करून अकलंकाचा काल इ. स. ७५० च्या दरम्यान निश्चित केला आहे. पं. नाथूराम प्रेमी यानी वरील मतांचाच आधार घेऊन आ. अकलंकांचा काल वि. स ८१० ते ८३२ इतका मानला आहे सेवा मंदिरद्वारा प्रकाशित 'जैन लक्षणावली' ग्रंथात अकलंकाचा काल इ स. ७२० ते ७८० (वि.सं. ७७७ ते ८३७) दिला आहे.[1] भारतीय ज्ञानपीठ प्रकाशनद्वारा संपादित 'जैनेन्द्रसिद्धान्तकोश' मध्ये आ. अकलंकाचा काल इ. स. ६६० ते ६८० इतका दिला आहे.[2] वरील सर्व गोष्टीचा विचार करता आ भट्टाकलंक हे इ.स. ७ ते ८ या शतकात होऊन गेले असावेत.

आ. अकलंकांच्या व्यक्तित्वाचे अवलोकन केले तर, जैनन्याय साहित्यातील ते एक असामान्य विद्वान् होऊन गेले यात कसलीच शंका नाही. ते तर्कप्रधान व विचारप्रधान होते. तसेच स्वतः अल्पभाषी आणि सतत विचार करणारे विद्वान होते. जसजसे ते वयस्कर होत गेले, तसतसे त्यांचे साहित्य विकसित होत गेलेले दिसते. त्यांनी जणू 'गागरमें सागर' या उक्तीप्रमाणेच आपली ग्रंथरचना केली आहे. अर्थात् थोड्या शब्दात विपुल असे तत्त्वज्ञान सांगितले आहे. त्यांची ग्रंथरचना चिंतनीय व संशोधनीय आहे. त्यातील एकही शब्द व्यर्थ वापरलेला दिसून येत नाही. ते शुद्ध दार्शनिक नव्हते तर मोठे विनोदी व उपहासात्मकरित्या लिहिण्यात कुशल विद्वान होते. त्यांच्या साहित्यरूपी वनात विहार करणाऱ्या व्यक्तीला प्रथम अत्यंत कष्टाने थकवा येतो तर, नंतर दार्शनिक उपहासाच्या पुटामुळे त्यांचा थकवा दूर होऊन मेंदूला तजेलपणा प्राप्त होतो.

---

१. जैन लक्षणावली पृ नं ४७. २ जैनेन्द्र सिद्धान्तकोश पृ. न. ३३६.

आ. अकलकांनी अशा एका कालात जन्म घेतला की, जेव्हा सगळीकडे बौद्धदर्शनाचा पूर्णतः प्रभाव पडला होता व इतर दार्शनिक पूर्णत' त्यामुळे त्रस्त झाले होते. परंतु अशा वेळी ज्ञानाची तीव्र इच्छा बाळगून त्यानी जैनधर्माचे वर्चस्व प्रकट केले. बौद्ध दर्शनासह सर्व दार्शनिकांच्या मताचे खंडन करून, स्वमताचे व्यवस्थित प्रतिपादन केले. स्वत.च्या ग्रंथरचनेतून त्यांनी इतर दार्शनिकांना कधी शिवीगाळ केली नाही उलट उपहासात्मक शब्दांनी आपले विचार प्रकट केले आहेत. त्यांचा याबाबत व्यक्तिगत अथवा दार्शनिक द्वेष नव्हता, तर दर्शनातील सिद्धांताविषयी मतभेद होता. त्याचा आत्मविश्वास, प्रभावीपणा व वैचारिकता इत्यादि त्यांचे सद्गुण वाखाणण्यासारखे आहेत. त्यांच्या असामान्य ग्रंथरचनेवरूनच त्यांचे असामान्य व्यक्तित्व प्रगट होते.

## आचार्य रविषेण

आचार्य रविषेणांनी 'पद्मपुराण' ग्रंथाची रचना केली. या ग्रंथाला 'पद्मचरित' या नावाने देखील संबोधिले आहे. हा ग्रंथ संस्कृतमधील प्रसिद्ध ग्रंथ असून, त्याचा हिन्दी अनुवाद उत्तर भारतातील जैनांच्या घरोघरी नित्य वाचला जातो. आ. रविषेणांनी या ग्रंथाची रचना भ. महावीर निर्वाणनंतर १२०३ वर्षांनी केली. ज्याप्रमाणे विमलसूरींचा 'पउमचरिउ' ग्रंथ प्राकृत जैन कथा साहित्याचा एक प्राचीन ग्रंथ मानला जातो, त्याचप्रमाणे रविषेणानी लिहिलेला 'पद्मपुराण' ग्रंथ संस्कृत जैन साहित्याचा प्राचीन व प्रमुख ग्रंथ समजला जातो.

आ. रविषेण अर्हन्मुनीचे प्रशिष्य असून, लक्ष्मणसेनाचे शिष्य होते. अर्हन्मुनीचे गुरु दिवाकर यति असून गुरु इंद्र होते.

आसीदिन्द्रगुरोर्दिवाकरयतिः शिष्योऽस्य चार्हन्मुनिः । तस्माल्लक्ष्मणसेनसन्मुनिरदः शिष्यो रविस्तत्स्मृतः ॥

रविषेणाने आपल्या संघाचा गण गच्छाचा अथवा ठिकाणाचा कसलाच उल्लेख केला नाही. परंतु सेनान्त नावावरुन ते बहुतेक सेनसंघाचे असावेत. यांची संपूर्ण गुरुपरंपरा इंद्रसेन, दिवाकरसेन, अर्हत्सेन आणि लक्ष्मणसेन असावी.

उद्द्योतनसूरीने वि. सं. ८३५ मध्ये लिहिलेल्या आपल्या 'कुवलयमाला' ग्रंथात विमलसूरीच्या पउमचरिउ व रविषेणाच्या पद्मचरित्राबरोबरच जटिलमुनीच्या वरांगचरिताची स्तुति केली आहे. यावरून असे दिसते की, उद्योतनसूरीला वरील ग्रंथाविषयी माहिती असावी.

पुन्नाटसंघीय जिनसेनाने वि. सं. ८४० मध्ये लिहिलेल्या आपल्या हरिवंश पुराणात उद्द्योतनसूरीनतर ५ वर्षांनी तयार झालेल्या रविषेणाच्या पद्मचरित्राची प्रशंसा केली आहे. अपभ्रंश भाषा कवि धवलाने रविषेणाचा उल्लेख करून त्याच्यानंतर जटिलमुनीचा उल्लेख केला आहे. यावरून जटासिंहनंदीचा 'वरांगचरित' ग्रंथ रविषेणाच्या पद्मचरित्रानंतरचा असावा.

जैन लक्षणावलीत (जैन पारिभाषिक शब्द कोश) संपादक बालचंद्र सिद्धांतशास्त्री यांनी रविषेणाने पद्मपुराण ग्रंथाची रचना साधारणपणे वि. सं. ७३३ मध्ये केली असल्याचा उल्लेख केला आहे.[१]

भारतीय ज्ञानपीठ प्रकाशन द्वारा संपादित जैनेंद्र सिद्धांत कोशात रविषेणाचा काळ इ. स. ६४३ ते ६८३ दिला असून, ते सेनसंघाचे असल्याचाही उल्लेख केला आहे. याच ग्रंथात (पृ. नं. ३४७) सेनसंघाविषयीची माहिती दिली आहे. सेनसंघाची स्थापना अर्हद्बलिद्वारा वीरनिर्वाण सं. ५९३ मध्ये झाली. सेनसंघाच्या गुर्वावलीत रविषेणाचा काल निश्चित इ. स. ६४३ ते ६८३ (वि. सं. ७०० ते ७४०) दिला असून इंद्रसेन, दिवाकरसेन, अर्हत्सेन,

१. जैन लक्षणावली (जैन पारिभाषिक शब्दकोश) पृ. न. ४८.

लक्ष्मणसेन यांचा काल त्यांच्या कालावरून निश्चित करण्यात आला आहे.[1] रविषेणांच्या स्थल कालाविषयी यापेक्षा अधिक माहिती मिळत नाही.

## पद्मपुराण : ग्रंथपरिचय--

आ. रविषेणरचित पद्मपुराण हा एक महान् ग्रंथ आहे. तो दिगंबर संस्कृत साहित्यातील एक जुना ग्रंथ मानला जातो, या ग्रंथात प्रभु रामचंद्राच्या जीवनाविषयी विस्तृत विवेचन केले आहे. खरोखर रामाची ही कथा इतकी रोचक आहे की, तिचा बहुतेक सर्व संप्रदायानी थोडया फार फरकाने स्वीकार केला आहे. हा ग्रंथ विविध घटना व विषयानुसार १२३ पर्वात विभागला गेला आहे. यातील कथेचे नायक आठवे बलभद्र पद्म (राम) व लक्ष्मण आहेत. सर्वसाधारण लोकांचे हे दोघेही श्रद्धास्थान आहेत.

रामाचा देहवर्ण तरुण सूर्याप्रमाणे होता. त्याचे विशाल वक्षःस्थल लक्ष्मीने आलिंगिल्याप्रमाणे सुंदर दिसत होते. त्याचे डोळे कमलाप्रमाणे होते. म्हणून दशरथ राजा व अपराजिता (कौसल्या) यांनी त्यांचे नाव 'पद्म' असे ठेवले होते. याच रामाच्या पवित्र चरित्राला 'रामायण' असे म्हणतात. अर्थात् रामाच्या जन्मापासून त्याच्या मुक्तिपर्यंतच्या सर्व जीवनविषयक गोष्टींचा खुलासा या ग्रंथात आढळतो.

खरोखर रामायण हे एक आदर्श काव्य आहे. ते अतिलोकप्रिय असून सीताहरण करणाऱ्या रावणाला देहांताची शिक्षा देऊन, अबला स्त्रीची सुटका करून, मनुष्य जातीला व स्वतःच्या राजघराण्याला रामाने विजय मिळवून दिला. त्यामुळे समाजाच्या सर्व थरातील लोक या रामायणावर अत्यंत श्रद्धा ठेवतात. हे अमान्य करता येणार नाही. आदर्श पिता, आदर्श माता, आदर्श पुत्र, आदर्श सेवक या सर्वांपासून समाजाला संस्कृतीचा एक वारसा मिळाला आहे.

रविषेणांनी पद्मपुराणातील रामकथा अहिंसेला धरून लिहिली आहे. त्यातील राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, मारुति ही सर्व पात्रे अहिंसावादी असून जैनधर्माची पुरस्कर्ती असल्याची दाखविली आहेत. यज्ञातील पशुहत्या संपुष्टात आणण्याचे महान् कार्य जैनधर्माने केले यात शंका नाही. आ. रविषेण एक महान् प्रतिभाशाली कवि होऊन गेले. त्यांनी मूळ रामायणाचा आधार घेतला असला तरी, त्यात बराच बदल केला आहे. हा बदल सुकीर्तीच्या साह्याने त्यांनी सात अधिकाराद्वारे दाखविला आहे. पहिल्या पर्वातील जिनेंद्राच्या स्तुतीपासून १२३ व्या पर्वातील बलभद्रांना स्वर्ग व मोक्षप्राप्ति, येथपर्यंतचे सर्व थोर पुरुष, त्यांची दैनंदिनी, रावणाचे चरित्र, त्याचा मंदोदरीशी विवाह, 'परस्त्रीचे सेवन करणार नाही' ही प्रतिज्ञा, हनुमान जन्म, हनुमान-अनंगपुष्पा विवाह, अनेक चक्रवर्तींच्या कथा, व अध्यात्मिक विवेचने या ग्रंथात आली आहेत.

पद्मपुराणाची रचना पूर्णतः जैन धर्माला अनुसरून रविषेणांनी केली आहे. त्यात अहिंसाव्रत, मोक्षप्राप्ति यांना विशेष महत्त्व असून परिव्राजक, श्रमण, क्षपक, साधु जीवन इत्यादी बाबींचे विवेचन केले आहे रावणाला विविध विद्यांची प्राप्ति झाली होती व तो एक बलाढ्य, महान् ऐश्वर्यशाली, पराक्रमी राजा असल्याचेही सांगितले आहे

पवनंजयाची पत्नी अंजना व तिची सखी वसंतमाला या दोघी गुहेत राहिल्याचा एक सुंदर प्रसंग दाखविला आहे. तेथेच अंजनेला पुत्र झाला विमानातून जात असताना तो शिळेवर पडला म्हणूनच त्याचे नाव श्रीशैल व हनुमान असे ठेवले हा हनुमान् म्हणजेच मारुति होय त्याने अनेक स्त्रियांशी विवाह केला होता.

पद्मपुराणातील राम-लक्ष्मण कथा २१ व्या पर्वात सुरू झाली आहे राम हा जैनांचा आठवा बलभद्र व लक्ष्मण हा आठवा नारायण मानला जातो. दशरथाने अपराजिता, सुमित्रा, सुप्रभा या तीन लावण्यवती

---

१. जैनेंद्र सिद्धांत कोश (भारतीय ज्ञानपीठ प्रकाशन) पृ. न ३३६.




राजकन्यांच्याबरोबर विवाह केला होता. अपराजितेचे सारथ्य दशरथाला आवडले व त्याबद्दल मागेल ते वर देण्याचे वचनही त्याने अपराजितेला (कैकेयीला) दिले.

पुढे २७ व्या पर्वात सीता-जन्माची कथा आली असून ती तारुण्यात आल्यावर तिचा विवाह रामाबरोबर करण्याचे ठरविले. राम देखील विविध कलांनी निपुण होऊन तारुण्यात आल्यावर आपल्या बाहू सामर्थ्याने त्याने बर्बर, म्लेच्छ यांचा पराभव केला आणि पुढे रामसीतेचा विवाह थाटाने साजरा केला.

३२ व्या पर्वात कैकेयीने दशरथाला राहिलेला वर मागितला. त्यात भरताला गादीवर बसवून, रामाला वनवासास पाठवावे असे सांगितले. दशरथाला ते मान्य करावे लागले. राम-सीता-लक्ष्मण वनवासास निघाले. दशरथ राजपुत्र रामाशिवाय दु.खी होऊन राहिला.

राम, सीता, लक्ष्मण दंडकारण्यात जटायुपक्ष्यासह राहू लागले. या निवासातच खरदूषण व शम्बूकाला लक्ष्मणाने मारले. त्याचवेळी रावणाने सिंहनाद केला. काही तरी अपशकुन आहे, हे जाणून राम लक्ष्मणाच्या मदतीस धावला. इकडे कुटीत सीतामाई एकटीच होती. ही संधी साधून रावणाने सीतेचे हरण केले. वाटेत जटायुबरोबर त्याला युद्ध करावे लागेल. जटायूने आराम मरण पत्करले. रामाने त्याला णमोकार मंत्र सांगितला व जटायु गतप्राण झाला. लक्ष्मण रामाकडे पोहचताच तो सिंहनाद रामाचा नव्हता हे जाणून व सीता एकटीच राहिल्याचे पाहून रामाला खेद झाला. परत येऊन पाहतो तर सीता कुटीत नव्हती. राम सीतेच्या विरहाने वेडे होऊन रानावनातून भटकू लागले.

रावणाने सीतेला पळवून नेऊन लंकेतील 'गीर्वाण – रमण' उपवनात ठेवले व तिच्याभोवती कडक पहारा ठेवला. 'रामाची वार्ता समजल्याशिवाय अन्नग्रहण करणार नाही अशी सीतेने प्रतिज्ञा केली होती. अनंतवीर्य मुनीजवळ केलेल्या प्रतिज्ञेनुसार रावण सीतेवर कसलीच जबरदस्ती करू शकत नव्हता.

सीतेची सुटका करण्याची शपथ सुग्रीवाने जिनमंदिरात घेतली. रावण रहात असलेली लंका नगरी एक दिव्य नगरी होती. त्याच नगरीत सीतामाई आक्रोश करीत होती. रामाने मारुतीला तिकडे पाठविण्याचे ठरवून त्याच्याजवळ ओळख म्हणून स्वत.च्या हातातील अंगठी दिली. सीतेजवळ जाऊन मारुतीने रामाचा वृत्तांत सांगितला आणि परत आपली ओळख रामाला पटावी म्हणून चुडामणी रत्न दिला.

सीतेच्या सुटकेचा जोरदार प्रयत्न सुरू झाला. राम व रावणाचे सैन्य समोरासमोर लढाईस उभे ठाकले. वीर योद्धयाची भाषणे झाली. त्याचवेळी रावणाला अपशकुन होऊ लागले. भालू नावाचे पक्षी आकाशातून विहार करीत असताना रोदन करू लागले. गिधाडांचा समूह पंख पसरून नभात विहार करताना जणू गगळीकडे अंधार पसरला पुढे नल, नील, मारुती याची युद्धे झाली. रामचंद्र–कुंभकर्ण, रावण विभीषण एकमेकाना भिडले रावणाने शस्त्राने लक्ष्मणावर प्रहार केला तो निश्चेष्ट होऊन जमिनीवर पडला. तेथे विशल्या नामक एक अद्भुत स्त्री आली. तिने लक्ष्मणाच्या अंगाला चंदनाचा लेप लावला तो शुद्धिवर आला व लक्ष्मण–विशल्या विवाह झाला. मंदोदरी युद्ध न करण्याबाबत पुनः पुनः रावणाची विनवणी करीत असताना त्याने ऐकले नाही व राम–लक्ष्मण याना ठार मारण्याची त्याने प्रतिज्ञा केली. पण त्या विनवणीचा काही उपयोग झाला नाही.

मयाशी मारुतीचे युद्ध चालू असताना रावण 'मया'च्या मदतीला धावून आला लक्ष्मणाने त्याला अडविले. रावणाने त्याच्यावर 'चक्ररत्न' फेकले पण लक्ष्मणाने ते झेलले व रावणाच्या अंगावर त्याने तेच चक्र आवेगाने फेकले. रावण तात्काळ गतप्राण होऊन धरणीवर पडला.

मृत रावणाचा देह पाहून मंदोदरी, बिभीषण, भामंडल व इतर सर्व वीर शोक करू लागले. कारण रावण विद्वान, बलाढ्य, पराक्रमी, व्रतपालन करणारा होता. एक सीता–हरणाचे डागाळलेले पृष्ठ सोडले तर

रावणाचा संपूर्णग्रंथ चारित्र्यपूर्ण व शुद्ध होता. रावण मृत झाला, वैर संपले, इंद्रजित विरक्त झाला. अनेक लोक मुनि झाले. बाकीचे केवली झाले. मंदोदरी व इतर स्त्रियांना विरक्ति उत्पन्न झाली.

रामाने सीतेचा शोध केला. दोघे एकमेकांना मिळाली. देवांनी त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली. त्यांचे राज्यवैभव त्यांना मिळाले. भरताचे मन त्यावेळी विरक्तिकडे वळले. रामाने हवे असणारे मथुरेचे राज्य शत्रुघ्नाला दिले. ९५ पर्वात सीतेला चांगली वाईट काही स्वप्ने पडली. तिने जिनेंद्रपूजा केली. तिला डोहाळे लागले. परंतु ती गरोदर आहे हे पाहताच लोकांच्या मनात तिच्या चारित्र्याविषयी शंका निर्माण झाली. रामानेही ते मान्य केले व तिला वनात सोडून देण्याची आज्ञा सारथ्याला दिली. सीता मुरनदीच्या किनारी अरण्यात पोहचली. तिला दुःखावेग आवरत नव्हता. तरीसुद्धा ती म्हणाली 'हे पतिराज माझ्याकडून काही दोष घडला असेल तर त्याची मला क्षमा करा अथवा प्रायश्चित्त द्या पण जिनधर्मावर अढळ श्रद्धा ठेवा.

दिवसेंदिवस सीतेचा गर्भ वाढू लागला. ती प्रसूत झाली. तिला लव, अंकुश दोन पुत्र झाले. त्यांनी राम-लक्ष्मणांशी वयात येताच युद्ध करून त्यांना जर्जर केले. नारदाकडून ही मुले आपलीच असल्याचे रामाला समजले, बिभीषणाने रामाला सीतेचा स्वीकार करण्याची विनंती केली, पण 'सीता अग्निदिव्य करून निर्मळ असल्याचे सिद्ध करून दाखवील तर तिचा मी स्वीकार करेन' असे रामाने सांगितले.

सीतेने धगधगत्या अग्नीकुंडात उडी टाकली, पण अग्नीचे पाणी झाले. सीता महापतिव्रता असल्याचे सर्वांना समजले व रामाने तिचा स्वीकार केला.

रामाने सीतेचा स्वीकार केला. परंतु सीतेने रामास वैराग्यपर उत्तर दिले व ती विरक्त झाली. या ठिकाणी सकलभूषण केवलीचा धर्मोपदेश, नरक दुःख वर्णन, संसारी जीवाचे भेद-प्रभेद, औदारिकादि देहांचे वर्णन, ज्योतिर्लोक, स्वर्ग, ग्रैवेयक, अनुदिश, पंचानुत्तर मुक्तांच्या सुखाचे वर्णन व मोहाने प्राप्त होणाऱ्या अनेकविध गोष्टींचे विवेचन या ठिकाणी केले आहे. ते ऐकून श्रीरामचंद्रांना केवलोत्पत्ति झाली. त्यांनी पुढे २५ वर्षे उपदेश केला व मुक्त झाले.

शेवटी आ. रविषेणांनी पुनः जिनांना वंदन करून, आपल्या या महानकथेची समाप्ति केली. या ग्रंथातील ही कथा अति मनोरंजक असून 'सीताशुद्धि' प्रकरण तर आपले मन पूर्णतः वेधून घेते व ही महान कथा घरोघरी ऐकावयास मिळते.

स्वयंभू कवीनी 'पउमचरिउ'मध्ये रविषेणाचार्याविषयी उल्लेख केला आहे. त्याचा मतितार्थ असा-

'ही रामकथारूपी नदी भ. महावीरांच्या मुखपर्वतापासून निघाली. या वाहाणाऱ्या नदीला गणधरांनी पाहिले. गौतमगणधरांनी व गुणालंकृत धर्माचार्यांनीही ती पाहिली. नंतर प्रभव मुनिराजांनी तिचे अवलोकन केले. पुनः त्या रामकथारूपी नदीला अनुत्तरवादी कीर्तिधर व रविषेण या आचार्यांनी पाहिले व स्वयंभूदेव कवींनी आपल्या बुद्धिने या रामकथारूपी नदीत अवगाहन केले.

कवि धवलाने देखील वरांगचरित्रात पद्मपुराणकर्ते रविषेणाचार्यांचे स्मरण केले आहे.

इतिहासकार नाथूराम प्रेमी यांच्या मते विमलसूरीचा 'पउमचरिउ' हा ग्रंथ रविषेणांच्या पद्मपुराणा अगोदरचा असून रविषेणाचार्यांनी पउमचरिउ या प्राकृत रामायणाचा संस्कृत अनुवाद केला आहे. त्याची कारणे म्हणजे दोन्ही ग्रंथातील कथानक सारखे असून, नाव देखील एकच आहे. पर्व अथवा उद्देश्य अंतापर्यंतची पात्रांची व ठिकाणांची नावे सारखीच आहेत. प्रत्येक पर्वात दोघांनीही छंद बदलले आहेत. त्याशिवाय पउमचरिउमधील प्रत्येक पद्याच्या शेवटी 'विमल' व पद्मपुराणाच्या प्रत्येक पद्याच्या शेवटी 'रवि' शब्द आले आहेत. पद्मपुराणात




काही काही ठिकाणी प्राकृत गाथांचा शब्दशः संस्कृत अनुवाद दिसतो. उदा.— पउमचरिउमधील दुसऱ्या उद्देशातील १०७ ते ११८ गाथा पद्मपुराणात २३० ते २४८ मध्ये अनुवादित केल्या असल्याचे दिसते.[१]

पं. नाथूराम प्रेमी यांचे वरील म्हणणे बरोबर असल्याचे जरी गृहीत धरले, तरीसुद्धा कथानकात रोचकता आणण्याची पराकाष्टा आ. रविषेणानी केलेली दिसून येते. त्यांनी पद्मपुराणात सांगितलेली ही रामकथा म्हणजे हिमकंदरापासून वहात येणारी एखादी मंदाकिनीच होय. आ. रविषेणांनी प्रसंग येताच अथवा अवधी मिळताच विद्याधर लोक अंजना पवनंजय हनुमान, सुकोशल इ. पात्रांचे जे रेखाटन केले आहे त्यामुळे ग्रंथसौंदर्यात अधिकच भर पडली आहे. एवढेच नव्हे तर मनोरंजन करणारा हा ग्रंथ एकदा वाचावयास घेतला तर वाचकाला तो लवकर बाजूला करावयास वाटत नाही.

आ. रविषेणांनी लिहिलेल्या पद्मपुराणाची भाषा प्रसाद गुणांनी ओतप्रोत भरली असून, अत्यंत मनोहरण करणारी आहे वन, नदी, सेना, युद्ध इत्यादींचे वर्णन करताना तर कवि आपले देहभान विसरून बसला आहे. चित्रकूट, पर्वत, गंगा नदी व वसंतऋतूचे वर्णन ज्या कौशल्याने आ. रविषेणांनी केले आहे तसे कौशल्य अथवा ती प्रतिभा इतर महाकाव्यातून देखील आपणास पाहावयास मिळत नाही. अर्थात आ. रविषेणानी संस्कृत प्राकृत या दोन्ही भाषेवर प्रभुत्व प्राप्त केल्याचे दिसते. या महान आचार्यांने 'पद्मपुराण' सारखा महान ग्रंथ लिहून स्वत.ची कीर्ति अजरामर करून ठेवली आहे, यात शंका नाही.

# आ. अमृतचंद्र सूरि

आचार्य कुंदकुंदाच्या नंतर आध्यात्मिक विद्वान् साहित्यिक म्हणून अमृतचंद्र सूरीचे नाव घेतले जाते. आचार्य कुंदकुंदाच्या आध्यात्मिक साहित्यावर टीका लिहिणारे अमृतचंद्र हे प्रथम आचार्य होत. अमृतचंद्र सूरीच्या गुरू-शिष्य परंपरेविषयी अथवा काळाविषयी निश्चित माहिती मिळू शकत नाही. आपल्या एका ग्रंथाच्या शेवटी त्यानी म्हटले आहे की, 'वर्णानी पदें तयार होतात. पदांनी वाक्यें आणि वाक्यांनी पवित्र शास्त्र तयार होते. आपण स्वतः निमित्त मात्र आहोत-[२] अन्य ग्रथातून देखील त्यांनी आपली माहिती न देता प्रसिद्धि पराङमुख राहण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे त्यांनी लिहिलेल्या प्रशस्तीमध्ये सुद्धा त्यांचा उल्लेख आढळत नाही.

आचार्य अमृतचंद्र सूरी आध्यात्मिक संत होते. कारण त्यानी आचार्य कुंदकुंदविरचित प्रवचनसार, पचास्तिकाय व समयप्राभृत यासारख्या आध्यात्मिक ग्रंथावर अत्यत महत्त्वपूर्ण टीका लिहिल्या याशिवाय ते एकान्त मार्गाचे पथिक नसून अनेकातवादाचे भक्त व प्रबल समर्थक होते. कारण काही ठिकाणी त्यानी मगलस्वरूप भ जिनेंद्राची ज्ञानज्योत सदैव तेवत राहण्याची भावना प्रकट केली असून अनेकांतवादाला नमस्कार केला आहे अनेकातवादाला परमागमाचे बीज मानून एकान्तवादाचा समन्वय करणारे म्हटले आहे. अनेकांतवादाचे विवेचन करताना भाषा पांडित्यपूर्ण झाली असून काही ठिकाणी कठिण वाटते. उमास्वातीच्या तत्त्वार्थसूत्राच्या केलेल्या पद्यानुवादावरून त्याची रचनाशैली अत्यंत प्रगल्भ आणि चित्ताकर्षक वाटते. आत्म-ख्याति टीकेपासून अलग मानला तर 'समयसार-कलश' हा त्यांचा एक स्वतंत्र ग्रंथ होऊ शकेल.

**जीवनकालविषयक माहिती —**

आचार्य अमृतचंद्र सूरीच्या जीवनकालाविषयी निर्णायक माहिती मिळत नाही. जो काही माहिती उपलब्ध आहे ती खालीलप्रमाणे—

---

१. जैन साहित्य और इतिहास— नाथूराम प्रेमी पृ न १०२ ते १०३.

२ वर्णैः कृतानि चित्रैः पदानि तु पदैः कृतानि वाक्यानि । वाक्यैः कृतं पवित्रं शास्त्रमिदं न पुनरस्माभिः ॥ पु. सि.





आशाधराने आपल्या अनगार धर्मामृताच्या भव्य कुमुदचंद्रिका टीकेत अमृतचंद्राला दोन ठिकाणी 'ठक्कुर' या नावाने संबोधिले आहे.

एतच्च विस्तरेण ठक्कुरामृतचंद्रसूरिविरचितसमयसारटीकायां द्रष्टव्यम् पृ. ५८८

अर्थात् ठक्कुर आणि ठाकूर एकार्थवाची शब्द आहे. कुठल्याहि वर्णातील अथवा जातीतील जहागीरदारांना ठाकूर असे म्हणतात. काही ब्राह्मणांना देखील 'ठक्कुर' म्हटले आहे. उदा. मैथिल कोकिल विद्यापति गहड्वाल-मधील दानपत्रातून ठक्कुर आणि राउल ब्राह्मणांची चर्चा पाहावयास मिळते.[1] काही ठिकाणी 'ठक्कुर' ही उपाधि देखिल दिलेली दिसून येते. अर्थात् अमृतचंद्र सूरींचे दुसरे नाव 'ठक्कुर' असून कदाचित् ठाकुर हे आडनाव असावे.

आ. शुभचंद्राने आपल्या ज्ञानार्णव (पृ. १७७) मध्ये पुरुषार्थ-सिध्युपायाचे 'मिथ्यात्ववेदरागा' इ. पद्यात 'उक्तं च' रूपात उद्धृत केले आहे. यावरून अमृतचंद्र शुभचंद्राच्या अगोदर होऊन गेल्याचे मानले आहे व पद्मप्रभ मलधारिदेवाने शुभचंद्राच्या 'ज्ञानार्णव' मधील एक श्लोक दिला आहे. यावरून शुभचंद्र पद्मप्रभाच्या अगोदरचे असावेत. पद्मप्रभाचा काल, विक्रम संवत बाराव्या शतकाचा उत्तरार्ध व तेराव्या शतकाच्या पूर्वार्ध मानला आहे यावरून अमृतचंद्राचा काळ विक्रम संवत बाराव्या शतकाच्या नंतरचा मानता येत नाही.

अपभ्रंश भाषेतील 'प्रद्युम्न चरित'[2] या ग्रंथावरून अमृतचंद्राविषयी काही माहिती मिळते. अमृतचंद्र मलधारि माधवचंद्राचे शिष्य असून विहार करीत बामणवाडा नावाच्या नगरात आले होते व त्यांच्याच प्रेरणेने सिद्दकवीने प्रद्युम्नचरित्राची रचना केली[3]. बामणवाडचा राजा गुहिलवंशी क्षत्रिय असून मालव नरेश वल्लाळाचा मांडलिक होता. या वल्लाळाच्या चालुक्य कुमारपालने पराजय केला होता. कुमारपालाची कारकीर्द विक्रम संवत १२२९ पर्यंत मानली आहे. म्हणून प्रद्युम्नचरित्राचा रचनाकाळ आणि आ. अमृतचंद्राचा काळ या दरम्यान ठरविता येतो.

पं. परमानंदजी शास्त्री (अनेकांत ८ अंक ४५) यांच्या मते जयसेनाच्या 'धर्मरत्नाकरात' 'पुरुषार्थ सिद्धचुपाय' मधील ५९ पद्य उधृत केल्याचे दिसते. जयसेनाने आपला हा ग्रंथ विक्रम संवत १०५५ मध्ये तयार केला. असे त्याच्या प्रशस्तीतील शेवटच्या पद्यावरून दिसून येते. म्हणून अमृतचंद्राला कुमारपाल कालीन मानणे युक्त नाही. वि. सं. १०५५ पूर्वी अमृतचंद्राचार्य नक्की असावेत.

भावसेनाचा शिष्य जयसेन हा लाड-बागड संघाचा होता व प्रद्युम्नचरित्राचा कर्ता महासेन याच संघाचा असून जयसेनाचा प्रशिष्य होता. तो परमार राजा मुंज आणि सिंधलाच्या समकालीन होता. त्यांच्याशी देखील अमृतचंद्राचा संबंध यथायोग्य बसतो.

डॉ. अे. अेन. उपाध्ये यांच्या मते अमृतचंद्र सूरीचे नाव बहुधा कोणत्याही शिलालेखात सापडत नाही. अमृतचंद्राने काही उतारे सिद्धसेनापासून घेतले आहेत. म्हणून त्यांचा काल ७ व्या शतकाच्या अगोदरचा नसावा. अमृतचंद्रापूर्वीच्या दोन शतकात तो होऊन गेला असावा. असेच अमृतचंद्राने केवलज्ञानाविषयी लिहिताना कुमारील भट्टाच्या दृष्टिकोनाचाही विचार केला आहे कुमारील भट्ट ७ व्या शतकाच्या सुरवातीस असावेत. जयसेन व पुष्पदंत यांच्या काल विचारानुसार अमृतचंद्र ७ ते १२ व्या शतकात होऊन गेले असावेत. याशिवाय त्यांनी नेमिचंद्राने लिहिलेल्या गोम्मटसार (इ. स १० वे शतक) मधील गाथाचा देखील उल्लेख केला आहे.

---

१. ए. ग्रा. इ. पृ. ३५३.

१. मोहनलालजी देसाई 'आत्मानंद जैन शताब्दि स्मारक ग्रंथ' (सन १९३६)

२. ता मलधारी देव........तुहु तुरिय कहइ पज्जुण्णचरिउ.

संदर्भ ग्रंथ- १. प्रवचनसार-डॉ. अे. अेन. उपाध्ये २) जैन साहित्य और इतिहास-नाथूराम प्रेमी श्री १०८ चारित्रचक्रवर्ती आचार्य शांतिसागर स्मृतिग्रंथ ४) समयसार-श्री प. धन्यकुमार भोरे.




द्वादसी गाथेत काष्ठासंघ, मूलसघ आणि नि.पिच्छिक (माथु) सघाचा उल्लेख आहे परतु त्यानुसार देखील अमृतचंद्राच्या कालनिर्णयाविषयी विशेष मदत मिळू शकत नाही. १) वरील विवेचनावरून अमृतचंद्राचा काळ १० वे शतकच असावा. अर्थात हे मत निर्णायक मानता येणार नाही. मात्र अमृतचंद्र हे एक महान टीकाकर्ते व अध्यात्मशास्त्राचे भोक्ते होते यात शका नाही.

**ग्रंथसंपत्ती–**

आ. अमृतचंद्र सूरीनी विविध प्रकारची साहित्यरचना करून कुंदकुदांनी सागितलेले आध्यात्मिक ज्ञान आपल्या ग्रंथ व टीकाद्वारे सुलभ केले व सर्वसामान्य लोकापर्यंत पोहचविण्याचे महान कार्य केले. त्यांचे एकूण सहा ग्रंथ उपलब्ध असून ते सर्व संस्कृत भाषेत आहेत.

१ पुरुषार्थसिद्धयुपाय २ तत्वार्थसार ३ लघुतत्वस्फोट किंवा शक्तिमणितकोश ४ समयसाराची आत्मख्याति टीका. ५ प्रवचनसार टीका. ६ पचास्तिकाय टीका.

**१ पुरुषार्थ सिद्धयुपाय–** आ. अमृतचंद्राचा पुरुषार्थ सिद्धयुपाय हा आचारविषयक अद्‌भुत ग्रंथ आहे. मनुष्याचा पुरुषार्थ कोणता व त्याची सिद्धी कोणत्या उपायाने होते या गोष्टीचे हृदयगम वर्णन केले आहे. आचार्य अमृतचंद्रांची ही स्वतंत्र कृति आहे. आपल्या महान पुरुषार्थाद्वारे जैन आगम महोदधीचे मंथन करून अमृतरूपाने जे काही प्राप्त केले ते आपल्या या ग्रथात अत्यंत चित्ताकर्षक, सरळ तसेच प्रसादगुण भाषेत एकत्रित केले आहे. हिंसा म्हणजे काय व अहिंसा म्हणजे काय याचे विविध दृष्टिकोनातून फार सुदर वर्णन प्रस्तुत ग्रंथात केले आहे. या ग्रंथात एकूण २२६ श्लोक असून ते सर्व आर्या छंदात आहेत. हा ग्रंथ खालील एकूण सहा भागात विभागला आहे–

१ ग्रंथपीठिका (श्लोक १ ते १९) मंगल, तत्वमूल कार्यकारण भाव यांचे वर्णन.
२ सम्यग्दर्शनाधिकार– (श्लोक २० ते ३०) स्वरूप व आठ अंगाचे निश्चयव्यवहार कथन.
३ सम्यग्ज्ञानाधिकार– (श्लोक ३१ ते ३६) सम्यग्दर्शनापासून कार्यकारणसंबंधापर्यंतचे कथन.
४ सम्यक्चारित्राधिकार– (श्लोक ३७ ते १७४) १२ व्रतांची अहिंसा व पोषकता वर्णन.
५ सल्लेखनाधिकार– (श्लोक १७५ ते १९६) यात व्रताचाराचेही वर्णन आहे.
६ सकलचारित्राधिकार– (श्लोक १९७ ते २२६) यात रत्नत्रय धर्माची निर्दोषता प्रयत्नपूर्वक सिद्ध केली आहे.

प्रस्तुत ग्रंथात 'पुरुष' शब्दाचा अर्थ 'चिदात्मा' असा असून तो स्पर्श इत्यादीपासून रहित असतो. आपल्या ज्ञानादि पर्यायात तो तन्मय असतो. तसेच उत्पाद, व्यय, ध्रौव्य या द्रव्याच्या दुसऱ्या लक्षणानी युक्त असतो. चिदात्मा ज्ञानचेतना, कर्मचेतना व कर्मफलचेतनांनी युक्त असतो. विकाररहित राहून स्थिर ज्ञायकरूप व चैतन्यरूपाने युक्त होणे हीच खरी पुरुषार्थ सिद्धी आहे श्रावक व्याख्यानात मोक्षमार्ग रत्नत्रयात्मक सागितला असून यथाशक्ति त्याची उपासना करणे हे श्रावकाचे आद्य कर्तव्य आहे. सम्यग्दर्शनाप्रमाणेच या ग्रंथात सम्यग्ज्ञानाची आठ अगे सांगितली आहेत त्याचे स्वरूप मननीय आहे. सम्यक्चरित्राधिकारात हिंसा व अहिंसा याचे सुंदर विवेचन केले आहे. असत्याचे चार प्रकार सागितले असून बाह्य तप व अभ्यतर तपाबरोबर सूक्ष्म तत्वांचेही सुंदर वर्णन केले आहे. विवेकापासून अमृतस्वरूप आचारसाराचा रसास्वाद घेणे हा अंतरात्म्याचा परम पुरुषार्थ आहे. त्याच्याद्वारे परमात्मपदाची व शाश्वत स्वरूपाची प्राप्ती होते. आ. अमृतचंद्रांच्या 'पुरुषार्थसिद्धयुपाय' ग्रंथाला उपासक श्रावकांची 'आचारसंहिता' असे म्हटले तरी अतिशयोक्ति होणार नाही.

---

१. ३८ द्वादसी गाथाचे एक लहानसे प्रकरण असून मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटीच्या लायब्ररीमध्ये जो हस्तलिखीत ग्रथाचा सग्रह आहे त्यात याची सस्कृत टीकासहित प्रति ( नं. १६१० ) देखील आहे.

सर्वशास्त्रविदो धीराः सर्वसत्वहितङ्कराः । रागद्वेषविनिर्मुक्ता गुरवो गरिमान्विताः ॥

२ तत्वार्थसार– जैन आगम ग्रंथात तत्वार्थसूत्र चे स्थान अतिशय महत्वपूर्ण आहे. तो ग्रंथ संक्षिप्त असून देखील तात्त्विकदृष्टया अत्यंत गंभीर व विशाल आहे. त्यावर सर्वार्थसिद्धी, तत्वार्थवार्तिक व श्लोकवार्तिक इ. टीका ग्रंथांची रचना झाली. प्रस्तुत तत्वार्थसार हा ग्रंथ त्याचीच एक पद्यात्मक स्वतंत्र व्याख्या असून तो अनुष्टुप छंदात लिहिला आहे. दिगंबर श्वेतांबर दोन्ही संप्रदाय या ग्रंथाला मानतात. या ग्रंथाचे विभाजन खालील आठ अधिकारात केले आहे–

१. सप्ततत्वपीठिका– ( श्लोक ५४ ) सम्यग्दर्शन, ज्ञान व चारित्र स्वरूप मोक्षमार्ग याचे विवेचन.

२. जीवतत्त्ववर्णन– ( श्लोक २३८ ) यात जीव लक्षण, जीवांचे विविध प्रकार, त्यांचे आयुष्य, त्यांच्या शुभाशुभ कर्मानुसार मिळणारी स्थाने, इत्यादींचे विस्तृत विवेचन केले आहे.

३. अजीवतत्ववर्णन– ( श्लोक ७७ ) धर्म, अधर्म, आकाश, काल व पुद्गल ही पाच अजीव तत्वे असून जीवासहित ती सहा द्रव्ये मानली आहेत. प्रसंगानुसार काल आणि पुद्गल द्रव्य यांचे भेदोपभेद सांगितले आहेत.

४. आस्रव तत्ववर्णन– ( श्लोक १०५ ) योगाद्वारे कर्मांचा आस्रव होतो ; या योगालाच आस्रव असे म्हटले आहे. शरीर, वचन आणि मनक्रिया यांचेच नाव 'योग' आहे. शुभ अशुभ कर्मानुसार हा कमी अधिक प्रमाणात असतो.

५. बंधतत्व वर्णन– ( श्लोक ५४ ) यात सर्वप्रथम मिथ्यात्व, असंयम, प्रमाद, कषाय आणि योग ह्या पाच बंध कारणांचा उल्लेख करून क्रमाने त्याचे विवेचन केले आहे.

६. संवरतत्व– ( श्लोक ५२ ) गुप्ति, समिती, धर्म, परिषहजय, तप, अनुप्रेक्षा आणि चारित्र या कारणांनी आस्रवाचा जो निरोध होतो त्याला 'संवर' म्हणतात. त्याचे क्रमाने वर्णन केले आहे.

७. निर्जरातत्व– ( श्लोक ६० ) कृतकर्मांपासून आत्म्याचे दूर होणे याला निर्जरा म्हणतात. तिचे विपाकजा आणि अविपाकजा असे दोन प्रकार आहेत.

८. मोक्षतत्व– ( श्लोक ५५ ) बंध कारणांचा अभाव (संवर) व पूर्वबद्ध कर्मांची निर्जरा झाल्यावर संपूर्ण कर्मांचा नाश होणे यालाच मोक्ष म्हणतात.

तत्वार्थसूत्राप्रमाणे तत्वार्थसाराचे १० अध्याय नसून नऊ अध्याय आहेत. पहिल्या अध्यायात सप्ततत्वांची पीठिका असून अंतिम अध्याय सारांशरूप आहे. मधील सात अध्यायात क्रमशः सात तत्वांचे सुंदर, सुगम आणि सुस्पष्ट विवेचन आले आहे जैन धर्मामृतातील ७ व्या अध्यायापासून १३ व्या अध्यायापर्यंतचे सर्व श्लोक तत्वार्थसारातून घेतले आहेत

३. लघुतत्वस्फोट किंवा शक्तिमणितकोश– आ. अमृतचंद्राची ही श्रेष्ठ कृति आजपर्यंत दिगंबर पयाला[1] अज्ञात होती. सद्भाग्याने या ग्रंथाची एक ताडपत्रीय प्रत अहमदाबादमधील श्वेतांबर जैन मंदिराच्या 'डेला' भंडारात असल्याचे मुनिराज श्री पुण्यविजय यांनी सांगितले आहे.[2] यथावकाश हा ग्रंथ अहमदाबादमधील लालभाई दलपतभाई विद्यामंदिराकडून प्रकाशित होईल.

'लघुतत्वस्फोट' ग्रंथात ६२५ श्लोक आहेत. संपूर्ण ग्रंथ हा एक महान स्तोत्र आहे. या ग्रंथाद्वारे आचार्यांनी जैन तत्वाचे व व विशेषतः अनेकान्ताचे रसपूर्ण विवेचन केले आहे. यातील भाषा पांडित्यपूर्ण असून थोडी कठीण आहे. या ग्रंथाच्या प्रारंभी जिननामावली दिली असून यात कौशल्याने २४ तीर्थंकरांची नावें गुंफली आहेत.

---

१. ( आ ज्ञानसागर स्मृतिग्रंथ पृष्ठ २२३ ) २. आचार्य श्री अमृतचंद्रविरचित श्री जिननामावली– डॉ. पद्मनाभ श्रीवर्मा जैनी

सत्–असत्, द्वैत–अद्वैत, नित्य–अनित्य इ. द्वंद्वात्मक गोष्टींना एकत्र करून अनेकांतवादात्मक सत्द्रव्याचे स्पष्टीकरण जिननामावलीत केले आहे.

४. आत्मख्याति टीका– ( समयसार कलश ) वरील तीन ग्रंथांशिवाय प्रवचनसार, पंचास्तिकाय व समयसार या रत्नत्रयीवर अनुक्रमे तत्वदीपिका, तत्वप्रदीपिका व आत्मख्याति ह्या सुंदर टीका लिहिल्या आहेत. या सर्व टीका संस्कृतमधून लिहिल्या आहेत. प्राकृत भाषेचाही त्यांचा अभ्यास असून प्राकृतमध्ये त्यांनी काही गाथांची रचना केलेली असावी.

कुठल्याही ग्रंथाचा आधार न घेता व आत्मख्याति टीकेपासून वेगळा मानला तर 'समयसार कलश' हा त्यांचा स्वतंत्र ग्रंथ आहे.[1] शुभचंद्राने त्यावर टीका लिहिली आहे.

**अमृतचंद्राची भाषाशैली–**

महान ग्रंथकार व टीकाकार या नात्याने आ. अमृतचंद्रांचे स्थान अत्यंत महत्वाचे आहे. त्यांची भाषा सरळ, सुंदर, प्रसाद गुणांनी युक्त असून पांडित्यपूर्ण आहे. काही ठिकाणी आकलन होण्यास थोडी कठीण आहे. तत्वज्ञानविषयक विवेचन सखोलपणे केले आहे. त्यांची अनेकांतवादाविषयीची उत्सुकता फार मोठी आणि महत्वाची दिसते. त्याविषयी त्यांच्या ग्रंथातून अथवा जिननामावलीतून आपणाला माहिती मिळते. श्वेतांबर–दिगंबर दोन्ही पंथाच्या कार्याविषयी त्यांना माहिती दिसते. जैन तत्वज्ञानातील काही ठराविक व अर्थपूर्ण शब्दांची चर्चा त्यांनी अगदी सहज व सुलभतेने केली आहे.

आ. अमृतचंद्र लेखकापेक्षा कविस्वरूपातच अधिक प्रभावी होते हे त्यांच्या ग्रंथ व टीकांचे अवलोकन केले असता दिसून येते. 'समयसार कलश' हा ग्रंथ रसपूर्ण व गेय गाथांनी युक्त आहे. भाषावैशिष्ठ्याकडे मन आकर्षित करण्याचा प्रयत्न त्यांनी ठिकठिकाणी केलेला दिसतो. अर्थातच या महान ग्रंथकर्त्याच्या भाषाशैलीचा प्रभाव त्यांच्या नंतरच्या जयसेन व पद्मप्रभदेव यांच्यावर झालेला दिसतो.

आ. अमृतचंद्राचे तत्वविवेचन लोकविलक्षण व अद्भुत गोष्टींनी युक्त आहे. तसेच त्यांच्या ग्रंथाची प्रशस्ती त्यांच्या आत्मउच्चतेची द्योतक आहे. संस्कृत भाषाशास्त्र आणि व्याकरण यावर त्यांचा पूर्ण अधिकार असून त्यांची टीका म्हणजे आदर्श टीकेचा एक उत्कृष्ट नमूना आहे असे सर्वच संस्कृततज्ञ आजसुद्धा मानतात. न्यायविषय विवेचन शास्त्रातील पद्धतीने प्रतिज्ञा हेतुपूर्वक त्यांनी केले आहे. त्यामुळे संपूर्ण विवेचनास तार्किकतेची आधारशिला प्राप्त झाली आहे. शांतरसाच्या मदतीने आध्यात्माचा महान आशय या श्रेष्ठ आचार्यांच्या लेखणीतून अपूर्वपणे उतरला आहे. तत्वज्ञानमहाभंडारातील अफाट संपत्ती त्यांनी सर्वसामान्य लोकांसाठी उपलब्ध करून त्यांच्यावर अनंत उपकार केले आहेत.

## आ. जिनसेन

आ. जिनसेन हे 'आदिपुराण' या महाग्रंथाचे कर्ते असून हरिवंशपुराणकर्ते आ. जिनसेन यांच्यापेक्षा भिन्न आहेत. आ. जिनसेन हे आ. वीरसेनाचे शिष्य असून आर्यनंदीचे प्रशिष्य होते. शिवाय ते 'पंचस्तूप' संघाचे असून त्याच संघाचे नाव पुढे 'सेनसंघ' झाले. उलट आचार्य जिनसेन हे कीर्तिषेणाचे शिष्य व जिनसेनाचे प्रशिष्य असून 'पुन्नाट' संघाचे आचार्य होते.[1] आ. हरिवंश जिनसेनाचा काल साधारणपणे इ. स. ७९० ते ८५० असून पुन्नाटसंघीय आ. जिनसेन यांचा काळ इ. स. ७८३ इतका आहे.[3] या ठिकाणी पंचस्तूपसंघीय आ. भ. जिनसेन (आदिपुराणकर्ते) यांची अधिक माहिती देण्यात येत आहे

१. जैन धर्मामृत – पं. हिरालाल जैन पृष्ठ– १५ २ जैन साहित्य और इतिहास–नाथूराम प्रेमी पृ. ११४
३. प्रमुख प्राचीन जैन ग्रंथकर्ता और उनके ग्रंथ–डॉ. ज्योति प्रसाद जैन

संसाराब्धौ निमग्नानां कर्मपादःप्रपूधिते । भविनां भव्यचित्तानां तरण्डं गुरवो मताः ॥



आ. जिनसेन हे महान विद्वान असून जैन सिद्धांताचे प्रकांड पंडित होते. त्यांनी आपले गुरु आ. वीरसेन यांनी लिहिलेल्या धवला व जयधवला टीका पूर्ण करून जैन समाजावर महान उपकार केले आहेत. आदिपुराण व पार्श्वाभ्युदय हे दोन महाग्रंथ लिहून जैन साहित्यात मोलाची भर घातली आहे. त्याचा आदिपुराण हा एक अतिश्रेष्ठ ग्रंथ असून प्रथमानुयोगातील ते महाकाव्य आहे.[1] हा ग्रंथ लिहिताना आ. जिनसेन यांचा मधेच स्वर्गवास झाला. पुढे तो ग्रंथ त्यांचेच शिष्य आ. गुणभद्र यांनी पुरा केला.

आ. जिनसेनांनी स्वतःला 'अविद्धकर्ण' असे म्हटले आहे. त्यावरून त्यांनी बालवयातच दीक्षा घेतली असावी असे दिसते. ते एक महान कवि होते. आपल्या तारुण्यावस्थेत त्यांनी कालीदासाच्या 'मेघदूत' काव्याला अंतर्भूत करून 'पार्श्वाभ्युदय' नावाचे सुंदर काव्य रचले.

आ. जिनसेन यांनी पार्श्वाभ्युदयाची रचना करीत असताना मेघदूताच्या एका ठिकाणी एक चरण व काही ठिकाणी दोन चरण घेऊन पार्श्वाभ्युदयाची रचना केली आहे.

'जयधवल' टीकेच्या प्रशस्तिमध्ये आ. 'जिनसेनांनी' स्वतःचा परिचय मोठ्या सुंदर व अलंकारिक शैलीत दिला आहे. त्याचा सारांश असा 'आ. जिनसेनांचे दोन्ही कर्ण अविद्ध असून सुद्धा ते ज्ञानशलाकेने वेधले होते. अर्थात कर्णवेध संस्कारापूर्वीच त्यांनी दीक्षा घेतली होती.

लहानपणापासून अखंडित व कठोर ब्रह्मचर्य व्रताचे पालन केले होते. त्यांचे हे व्रत पाहून सरस्वती जणु चित्रात रेखाटल्याप्रमाणे मंत्रमुग्ध झाली होती. स्वतः फार सुंदर अथवा फार चतुर असून सुद्धा अनन्यशरण होऊन त्यांनी सरस्वती देवीची सेवा केली होती. शरीर कृश असून सुद्धा तपाने युक्त असलेले ते कृश नव्हते शारिरीक कृशत्वापेक्षा गुणानी कृश होणे खरे 'कृशत्व' आहे. सांख्य वगैरे शास्त्रांचे अधिक चिंतन न करता देखील ते आध्यात्म विद्यासागराच्या पैलतीरी पोहचले होते. म्हणूनच तत्वदर्शनकारांनी त्यांना 'ज्ञानमयोपिंड' अथवा 'ज्ञानशरीरी' म्हणून गौरविले आहे.

## कुल परंपरा–

वंश दोन प्रकारचा असतो? लौकिकवंश आणि पारमार्थिक वंश. लौकिक वंशाचा संबंध योनीबरोबर असून पारमार्थिक वंशाचा संबंध विद्येबरोबर असतो.

आचार्य जिनसेन व गुणभद्र यांच्या वंश परंपरेविषयी त्यांच्या स्वतःच्या ग्रंथ प्रशस्तिमध्ये अथवा नंतरच्या आचार्यांच्या ग्रंथप्रशस्तिमध्ये काही माहिती मिळू शकत नाही अर्थातच गृहस्थावस्थेचे स्मरण करण्याची मुनि जनांना काय आवश्यकता आहे? तथापि आधुनिक ऐतिहासिक दृष्टिकोनातून या गोष्टीचा विचार करणे आवश्यक आहे.

भट्टाकलंकदेवाप्रमाणे राजाश्रित अशा एखाद्या उच्च ब्राह्मणकुलामध्ये या महात्म्याचा जन्म झाला असावा. जैन ब्राह्मण (उपाध्याय) किंवा चतुर्थ अथवा पंचम जातीपैकी त्यांनी कोणत्या तरी एका जातीला पावन केले असावे कारण ज्या प्रांतात ते रहात होते व ज्या ठिकाणी त्यांचा जन्म झाला होता त्यावेळी तेथे जैन धर्माचे पालन केले जात होते.

भ. महावीर निर्वाणास गेल्यावर सुमारे ७०० वर्षांनी मूलसंघामध्ये नंदिसंघ, देवसंघ, सेनसंघ व सिंहसंघ असे चार भेद निर्माण झाले. आ. जिनसेन व गुणभद्र यांनी सेनसंघाची दीक्षा घेतली असावी, परंतु सेनसंघाची एखादी पट्टावली उपलब्ध नसल्यामुळे आ. जिनसेनाचार्यांच्यापर्यंत यथायोग्य गुरुपरंपरा देता येत नाही.

१ प्रशस्ति संग्रह–संपादक श्री. कस्तुरचंद्र कासलीवाल पृ. १०

तथापि 'विक्रातकौरवीय' नाटकामध्ये हस्तिमल्ल कवीच्या प्रशस्तिनुसार भ. जिनसेन हे स्वामी समन्तभद्राचार्यांच्याच वंशात होऊन गेले असावेत. परंतु ते कोणत्या गणाचे अथवा गच्छाचे होते याची निश्चित माहिती मिळत नाही.

**गुरू– शिष्य परंपरा–**

आ. वीरसेन, जिनसेन व गुणभद्र याची पूर्वपरंपरागत माहिती आर्य चंद्रसेनापर्यंत मिळते. अर्थात चंद्रसेनाचे शिष्य आर्यनंदी असून, त्याच्यानंतर वीरसेन, जिनसेन, गुणभद्र, लोकसेन अशी त्यांची शिष्यपरंपरा मिळते. वीरसेनाचे आ. जिनसेनाच्या शिवाय दशरथगुरू, विनयसेन, श्रीपाल, पद्मसेन व देवसेन हे शिष्य असावेत. विनयसेनाच्या विनंतीवरूनच जिनसेनाचार्यांनी पार्श्वाभ्युदय काव्याची रचना केली. याच विनयसेनाचे कुमारसेन हे *शिष्य असून त्यांना 'काष्ठासंघ प्रवर्तक' मानले जाते असे देवसेनाचार्याने आपल्या 'दर्शनसार' मध्ये लिहिले* आहे. जयधवल टीकेत श्रीपाल, पद्मसेन आणि देवसेन या तीन विद्वानांचा उल्लेख असून ते आ. जिनसेनांचे सहपाठी असावेत. जिनसेनाचार्यानंतर विनयसेन आचार्य झाले असावेत. विनयसेनाचा उल्लेख पार्श्वाभ्युदयकाव्यामध्येही केला आहे. गुणभद्रस्वामीनंतर बहुतेक त्याचे पट्टशिष्य लोकसेन यांनी आचार्यपद सुशोभित केले असावे.

*वरील विवेचनावरून आपले आ. जिनसेन हे वीरसेनाचे शिष्य असून त्याचे शिष्य उत्तरपुराणकर्ते* आ. गुणभद्र होत, हे अगदी स्पष्ट होते.

**जन्म स्थान–**

चारित्र मलिन होऊ नये म्हणून दिगंबर मुनी सदैव एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी विहार करतात. आपल्या उपदेशाने जगाचे कल्याण करीत असतात. जिनसेनाचार्य व गुणभद्र हे देखील एकाच ठिकाणी रहात नव्हते. तथापि त्यांचा बहुतेक काल कर्नाटक व महाराष्ट्र प्रांतातच गेला असावा. गुणभद्राचार्यांनी उत्तरपुराणाची समाप्ति बंकापुरात केली. आजमितीस बंकापूर हा धारवाड प्रांतातच एक कसबा (बंकुर–कर्नाटक) आहे. तसेच विनयसेनमुनीच्या प्रेरणेवरून जिनसेनाचार्यांनी आपले पार्श्वाभ्युदयकाव्य 'मान्यखेट' येथे लिहिले. ही अमोघवर्ष राजाची राजधानी होती.

मान्यखेट ही बलात्कार गणाची गादी असावी. तेथे सेनसंघाचे आचार्य जास्त दिसतात. त्याचबरोबर इतर संघाचेही आचार्य आढळतात. देवसंघाचे आचार्य अकलंकदेवभट्ट व त्याचे शिष्य प्रभाचंद्र, विद्यानंदी हे आचार्य देखील मान्यखेट नगरातच होऊन गेले.

थोडक्यात आ. जिनसेन व गुणभद्र यांनी ज्या ठिकाणी राहून ग्रंथरचना केली ते 'मान्यखेट' नगर एके काळी भगवती जिनवाणीचे क्रीडामंदिर होते.

**आ. जिनसेनांचा काळ–**

आ. जिनसेनांचा अगदी अचूक काळ सांगण्याकरिता तशी निश्चित साधने उपलब्ध नाहीत. तरीसुद्धा हरिवंशपुराण कर्त्याने ग्रंथारंभीच आदिपुराणकार जिनसेनस्वामीची प्रशसा केली आहे. हरिवंशपुराण कर्त्याच्या उल्लेखाचा विचार करता आ. जिनसेनांचा जन्म साधारणपणे वि. स. ८१० मध्ये झाला असावा व सर्व साधारणपणे वि. सं. ९०५ मध्ये ते स्वर्गवासी झाले असावेत.

**ग्रंथसंपत्ती–**

गुणभद्राचार्याने उत्तरपुराणाच्या प्रशस्तिमध्ये लिहिले आहे– 'हिमालयापासून गंगेचा, सर्वज्ञाच्या मुखातून सर्वशास्त्ररूप दिव्यध्वनीचा (दिव्य) आणि उदयाचलाच्या तटापासून दैदीप्यमान सूर्याचा उदय होतो,

त्याचप्रमाणे आ. वीरसेनांच्या पासून आ. जिनसेनांचा उदय झाला. अर्थातच वीरसेनांच्या या महान शिष्याकडून महानग्रंथांची रचना व्हावी हे अनुचित नाही. आ. जिनसेनांनी पुढील ग्रंथांची रचना केली.

१. पार्श्वाभ्युदय २. आदिपुराण ३. वर्धमानपुराण ४. पार्श्वस्तुती ५. जयधवल टीका ६. द्रोपदिबंध

## १. पार्श्वाभ्युदय–

हे ३३४ मन्दाक्रान्ता वृत्तांचे एक खंडकाव्य आहे. संस्कृत साहित्यात त्याने आपले एक विशिष्ट स्थान प्राप्त केले आहे. संस्कृत साहित्यात कालिदासाचे 'मेघदूत' नावाचे खंडकाव्य आहे. या काव्याच्या समस्या-पूर्तीरूपानेच पार्श्वाभ्युदय हे काव्य लिहिले गेले. काही ठिकाणी मेघदूतातील एक–दोन पदे घेऊन श्लोक रचना केली आहे. अशा प्रकारे संपूर्ण 'मेघदूत' काव्य 'पार्श्वाभ्युदय' काव्यात विलीन झाले आहे. समस्यापूर्तिद्वारा मेघदूतावर रचलेला 'पार्श्वाभ्युदय' ग्रंथ सर्वात प्रथम स्वतंत्र ग्रंथ आहे. या ग्रंथाची भाषा व शैली अत्यंत मनोहर आहे.

या ग्रंथाची मध्यवर्ती कल्पना अगदी थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे– 'श्री पार्श्वनाथ भगवान दीक्षाकल्याणानंतर योग धारण करतात. तेथून त्यांचा पूर्वभवातील विरोधी कमठाचा जीव संवर नावाचा ज्योतिष्क देव होतो आणि अवधिज्ञानाने त्यांना आपला वैरी समजून पुष्कळ दु:ख देऊ लागतो.'

तसे पाहता कालिदासाचे 'मेघदूत' काव्य वेगळे आणि 'पार्श्वाभ्युदय' काव्य वेगळे असे असले तरी त्याच शब्दांनी आ. जिनसेनांनी वेगळे कथानक सांगितले आहे. खरोखरच कवीचे हे एक महान कौशल्य आहे. कथा उपकथानकांनी युक्त असून देखील 'पार्श्वाभ्युदय' काव्यात कुठेही नीरसता उत्पन्न झालेली नाही. ह्या काव्याची रचना आ. जिनसेनांनी आपल्या सहपाठी असलेल्या विनयसेनाच्या प्रेरणेवरूनच केली आहे. 'पार्श्वाभ्युदय' काव्याच्या निर्मितीविषयी अनेक कथा देखील सांगितल्या जातात.

## २. आदिपुराण–

'आदिपुराण' हा महापुराणाचा प्रथमखंड आहे. आदिपुराणालाच 'पूर्वपुराण' असेही म्हटले आहे. *त्याच्या द्वितीय खंडाला 'उत्तरपुराण' असे म्हटले आहे. आदिपुराणात ४७ पर्व आहेत. त्यापैकी ४२ पर्व आणि* ४३ व्या पर्वातील पहिले तीन श्लोक जिनसेनाचार्यांनी रचलेले आहेत. बाकीचे पाच पर्व आणि उत्तरपुराण आ. जिनसेनाचार्यांचे शिष्य गुणभद्राचार्य यांनी रचलेले आहेत.

'आदिपुराण' हा केवळ पुराण ग्रंथ नसून तो काव्यग्रंथही आहे. एवढेच नव्हे तर त्याला महाकाव्य देखील म्हटले जाते. संस्कृत साहित्यातील हे एक अनुपम रत्न आहे. या ग्रंथात एकही विषय अथवा रस असा नाही की ज्याला ह्या काव्याने स्पर्श केला नाही.

आ. जिनसेनांनी आदिपुराणात आदिपुरुष भगवान वृषभदेव आणि त्यांचे ज्येष्ठ पुत्र सम्राट भरत चक्रवर्ती यांचे चरित्रवर्णन केले आहे. हे दोघे आदिपुराणातील मुख्य नायक आहेत. यांच्याशी संबंधित अशा अनेक महापुरुषांच्या गोष्टींचा देखील अंतर्भाव यात आहे. प्रत्येक कथानायकाचे चरित्र अत्यंत बहारदार मांडले आहे. निसर्ग वर्णनात तर कवीचा हातखंडा दिसतो. तसेच शृंगार, राजवैभव, वीरता, वैराग्य इत्यादींचे वर्णन देखील अप्रतिम झाले आहे. भगवंताचे स्तवन करताना आचार्य जिनसेन इतके तन्मय झालेले दिसतात की, वेळेचे भानही रहात नाही. ते नानाविध नावांनी भगवंतांचे गुणगान गातात. त्यांनी लिहिलेले समवसरणाचे वर्णन वाचणाऱ्याला आणि ऐकणाऱ्याला प्रत्यक्ष समवसरणात वावरत असल्याचा भास होतो. आदिपुराणात ६७ छंदाचा समावेश आहे. त्यात एकूण १०९७९ पद्ये आहेत. अनुष्टुप छंदाचा अपेक्षेने ही श्लोकांची संख्या ११४२९ इतकी आहे.




१. सिद्धसेन, २. समन्तभद्र, ३. श्रीदत्त, ४. प्रभाचंद्र, ५. शिवकोटी, ६. जटाचार्य, ७. काणभिक्षु. ८. देव (देवनन्दि), ९. भट्टाकलंक, १०. श्रीपाल, ११. पात्रकेसरी, १२. वादिसिंह, १३. वीरसेन, १४. जयसेन, १५. कविपरमेश्वर इ.

खरोखरच आ. भ. जिनसेनांचा आदिपुराण हा फक्त पुराणग्रंथ नसून ते महाकाव्य आहे, धर्मकथा आहे. धर्मशास्त्र आहे, राजनीतिशास्त्र आहे, आचारशास्त्र आहे. तसेच युगाच्या प्रारंभीचा एक महान इतिहास आहे. जिनसेनाचार्य व गुणभद्राचार्य यांनी या महापुराणात जी काव्य कुशलता दाखविली आहे ती अन्य कवींनी हेवा करण्यासारखी आहे.

'आदिपुराण' सुभाषितांचे महान भंडार आहे. ज्याप्रमाणे पुष्कळ अमूल्य रत्नांचे उत्पत्तीस्थान समुद्र आहे त्याचप्रमाणे सूक्ति रत्नाचे महापुराण हे एक महान भंडार आहे.

आदिपुराणाच्या उत्थानिकेत जिनसेनाने आपल्या पूर्वीच्या सुप्रसिद्ध कवींचा व विद्वानांचा उल्लेख आवर्जून केला आहे.

## आचार्य विद्यानंदी

आ. विद्यानंदी हे तत्कालीन अतिसमर्थ विद्वान होते. त्यांचा काल साधारणपणे इ. स. ९ वे शतक मानला जातो. अर्थात जैन परंपरेत विद्यानंद नावाचे अनेक विद्वान होऊन गेले. प्रस्तुत ठिकाणी तत्वार्थ श्लोकवार्तिक, अष्टसहस्त्री, आप्तपरीक्षा इत्यादीचे कर्ते, सुप्रसिद्ध एवं उच्च कोटीचे दार्शनिक, न्याय ग्रंथाचे प्रणेते, तार्किक चूडामणि आ. विद्यानंदीची माहिती देण्यात आली आहे.

आ. विद्यानंदांनी अकलंकदेवांच्या अष्टशतीवर अष्टसहस्त्री नावाचा महान ग्रंथ लिहिला. तो समजावून घेण्यास चांगल्या चांगल्या विद्वानांना कष्ट सहस्त्रीचा अनुभव येतो यात शंका नाही. आ. विद्यानदी सर्व शास्त्रात चांगले पारंगत होते. त्यांचे विशाल पांडित्य, सूक्ष्म प्रज्ञा, विलक्षण प्रतिभा, गंभीर विचारसरणी, अद्‌भुत अध्ययनशीलता व तर्क करण्याची अपूर्व पद्धती अत्यंत वाखाणण्यासारखी आहे.

तत्कालीन जैनेतर पंडीतांनी व विद्वानांनी जैनदर्शनावर मोठ्या प्रमाणात टीका करण्यास सुरुवात केली होती. विशेषतः मीमासक कुमारिलभट्ट वगैरे विद्वानानी त्यात पुढाकार घेतला होता. त्यांना जणु प्रत्युत्तर म्हणूनच की काय, विद्यानंदीने कुमारिलभट्टाच्या श्लोकवार्तिकाप्रमाणेच आपल्याही तत्वार्थश्लोकवार्तिकाची रचना केली. या टीकेद्वारेच त्यानी मीमांसक दर्शनाचे अति सुदर प्रकारे खंडन केले. इतर विद्वानांची बरोबरी करून व त्याच्या मतांचे खंडन करून स्वमतप्रतिपादनाचे कार्य विद्यानंदीनी केले. असे कार्य इतरत्र क्वचितच पहावयास मिळते.

**जन्मस्थान–**

आ. विद्यानंदीनी आपल्या जीवन कालाविषयी एकत्रित माहिती दिल्याचे दिसून येत नाही. ती जाणून घेण्यासाठी आपणाला विद्यानंदीच्या नंतरच्या ग्रथकाराकडून त्यांचा केलेला उल्लेख, तथा विद्यानदीनी स्वतःच्या ग्रंथातून दिलेली सक्षिप्त माहिती पाहावी लागते.

आ. विद्यानदीनी आपल्या युक्त्यनुशासनालकार, प्रमाण–परीक्षा, अष्टसहस्री इत्यादी ग्रंथाच्या सुरुवातीस अथवा शेवटी दिलेल्या प्रशस्तीमधून त्यांची आपणाला माहिती मिळते. या प्रशस्तीच्यामध्ये विद्यानंदीनी आपल्या समकालीन शिवमार द्वितीय (इ. स. ८१०) आणि रायमल्ल सत्यवाक्य (इ. स. ८१६) या गंग राजांचा उल्लेख केला आहे गग राजांचे राज्य सध्याच्या म्हैसूर प्रांतातील 'गगवाडी' नावाच्या प्रदेशात होते. त्यांचा

राज्यकाल साधारणपणे इ. स. ४ थ्या शतकापासून ११ व्या शतकापर्यंत मानला जातो. आठव्या शतकातील श्रीपुरुष (शिवमार द्वितियाचे पूर्वाधिकारी) यांच्या कारकीर्दीत ते राज्य चांगल्या प्रकारे भरभराटीस आले होते. शिलालेख आणि दानपत्र यांच्यावरून जैनधर्माचा या राज्याशी अत्यंत घनिष्ठ संबंध असल्याचे दिसून येते. असे म्हटले जाते की, 'जैनाचार्य सिंहनंदीने ह्या राज्य स्थापनेसाठी खूप मदत केली होती आणि आ. पूज्यपाद देवनंदी याच राज्यातील गंग नरेश दुर्विनीताचे राजगुरु होते. अशा प्रकारच्या जिनशासन व जैनाचार्य भक्तांच्या राज्यात राहून आ. विद्यानंदींनी आपली ग्रंथरचना पुरी केली असावी यात आश्चर्य नाही.' सरस्वती आणि लक्ष्मी यांचा सममसंयोग व आचार्य विद्यानंदींच्या ग्रंथोत्पत्तीस कारणीभूत ठरला असावा. राजाश्रय मिळाल्यामुळेच त्याना आपल्या विद्वतेचा भरपूर फायदा करून घेता आला आणि निर्विघ्नपणे अति विशाल परंतु मौल्यवान ग्रंथाची रचना केली.

आ. विद्यानंदींच्या या प्रशस्तीच्यावरून गंग राजाची राज्यभूमी 'गंगवाडी' हे साहित्यक तसेच जैनशासनाच्या प्रचाराचे ठिकाण असावे हे सिद्ध होते आणि गंगवाडी हेच आ. विद्यानंदीचे जन्मस्थान असावे. कारण त्यांचे सर्व जीवन याच ठिकाणी व्यतीत झाल्याचे दिसते.

काल–

आ. विद्यानंदींनी आपल्या विविध ग्रंथातून दिलेल्या प्रशस्तीच्या साह्याने आ. विद्यानंदी हे गंग नरेश दुसरा शिवमार आणि प्रथम राजमल्ल सत्यवाक्य याचे समकालीन असावेत हे स्पष्ट होते विद्यानंदींचा काल देखील या राजांच्या दरम्यानच असावा. अर्थात इ. स. ७७५ ते ८४० हा त्यांचा सर्वसाधारण काल मानावयास हरकत नाही.

## आ. विद्यानंदींचे साधुजीवन व चारित्र पालन–

आ. विद्यानंदींनी चारित्रा सबधी एखादी ग्रंथ रचना केली नसली तरी, त्यांच्या तत्वार्थश्लोकवार्तिक आणि अष्टसहस्री या ग्रंथांच्या गत व्याख्यानाद्वारा त्यांच्या निर्दोष व दृढ चारित्र पालनाविषयीची माहिती मिळते.

तत्वार्थश्लोकवार्तिक मधील सहाव्या अध्यायातील ११ व्या सूत्राच्या व्याख्यानात जेव्हा त्यानी पूर्व परपरागत दुःख शोक इत्यादी असातावेदनीयरूप पापास्रवांच्या कारणांचे समर्थन केले, त्यावेळी त्याना एक प्रश्न विचारण्यात आला की, जैन साधू जे काय–क्लेश, अनशन, आतापन इत्यादी कठीण तपांचे तपाचरण करतात त्याच्यापासून आवश्य दुःख सहन करावे लागते. आणि अशा स्थितीमध्ये त्यांच्या बाबत देखील असाता वेदनीयरूप पापास्रव होतो म्हणून कायक्लेशादी तपाचा उपदेश करणे उचित नव्हे आणि जर तो उचित असेल तर दुःखादिला पापास्रवाचे कारण सांगणे विसगत आहे.

प्रस्तुत प्रश्नाचे उत्तर विद्यानंदींनी पूज्यपाद, अकलंकदेव इत्यादी पूर्वजांच्याप्रमाणे अगदी स्पष्टपणे व उचित प्रकारे दिले आहे. त्यांच्यामते कायक्लेशादि तपाचरणापासून जैन साधूना द्वेषादि कषायरूप परिणाम उत्पन्न होत नाहीत. परंतु त्यातच त्याना खरा आनंद मिळतो ज्याना त्या तपाचरणापासून क्लेश होतो, आणि त्यात आनंद मानीत नाहीत, त्याच्याबाबत दुःखादीचा पापास्रव होतो. जर असे घडले नाही तर, स्वर्ग आणि मोक्षाची जितकी साधने आहेत ती सर्व दुःखरूप मानावी लागतील व इतर साधूच्या बाबत देखील पापास्रव होईल म्हणून सक्लेश परिणाम युक्त दुःख इत्यादीच पापास्रवाची कारणे आहेत.[1]

---

१. ब्र. प. चन्दाबाई अभिनन्दन ग्रंथ– आचार्य विद्यानंद और उनकी तर्क शैली – न्यायाचार्य दरबारीलाल कोठीया पृ. न. २९१.




याचप्रमाणे तत्त्वार्थसूत्र ग्रंथातील ७ व्या अध्यायातील १७ व्या सूत्राचे विश्लेपण करताना त्यांनी नग्न दिगंबरत्वाचे जोरदार समर्थन केले आहे आणि वस्त्रादि ग्रहणाचा पूर्णत निषेध केला आहे.

वरील दृढ आणि युक्तिपूर्ण विचारावरून आ विद्यानंदी चारित्र पालन, अनशनादि तप, नग्नता, आचरण इत्यादी गोष्टीत किती सावधान आणि विवेकपूर्ण होते याची कल्पना येते 'आप्तपरीक्षा' ग्रंथाच्या टीका प्रशस्तिमध्ये विद्यानंदीनी स्वतःला सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्ररूपी अलकारानी विभूपित असल्याचे म्हटले आहे.

'स जयतु विद्यानन्दो रत्नत्रय–भूरि–भूपण. सततम् । तत्त्वार्थार्णवतरणे सदुपाय. प्रकटितो येन ॥ ३ ॥

आ. विद्यानंदीनतर दोनशे वर्षांनी होऊन गेलेल्या ११ व्या शतकातील प्रभावशाली विद्वान स्याद्वाद–विद्यापति वादिराजसूरीने देखील 'न्याय विनिश्चय विवरण' ग्रंथात एके ठिकाणी 'अनवद्यचरण' (निर्दोप चारित्र्य पालन) या गौरवपूर्ण विशेषणाने त्याना सबोधिले आहे. यावरून विद्यानंदीचे मुनीसंघामध्ये असाधारण तसेच सन्मानयुक्त स्थान असून त्यांना आचार्य मानले जात असावे यात सदेह नाही.

### आ. विद्यानंदींची गुणवत्ता–

आ. विद्यानंदी उच्च चारित्रधारक तपस्वी असून, भारतीय समस्त दर्शनांचे गाढे विद्वान होते ते वैशेपिक न्याय, मीमांसा, चार्वाक, सांख्य आणि बौद्ध इत्यादीच्या तत्वाना जेव्हा आपल्या दार्शनिक ग्रंथात पूर्वपक्षाच्या रूपाने ठेवतात अथवा त्यांचे समालोचन करतात, तेव्हा त्यांची अगाध विद्वत्ता, पूर्ण अध्ययन व विशाल पांडित्य याविपयी माहिती मिळते. त्यांचा तर्कपूर्ण उत्तरपक्ष आणि सूक्ष्म व गंभीर ज्ञान भाडारामुळे भारतीय दार्शनिकाची मान उंचावली गेली आहे. जैन शास्त्रातील विपुल उद्धरणावरून त्यांचा जैन शास्त्राभ्यास किती दांडगा होता हे लक्षात येते. आगम ग्रंथ व पूर्ववर्ती दार्शनिक ग्रथांचे त्यांनी जे मर्मोध्ययन केले आहे, ते त्यांच्या विशाल प्रतिभेचे प्रतीक आहे. त्यांच्या सूक्ष्म प्रतिभेचे एक उदाहरण पुढीलप्रमाणे आहे–

आचार्यमूर्धन्य श्री गृद्धपिच्छ यांनी द्रव्याचे लक्षण सांगताना 'जे गुण आणि पर्याययुक्त आहे ते द्रव्य आहे, असे सांगितले. यावर अशी शंका घेण्यात आली की 'गुण' ही संज्ञा इतर दार्शनिकांची आहे, जैनांची नाही, जैन दर्शनाप्रमाणे वस्तु द्रव्य आणि पर्यायरूपच मानली आहे. त्यामुळे ती द्रव्यार्थिक व पर्यायार्थिक नयांनी युक्त असल्याचाच उपदेश करण्यात येतो. जर वस्तु गुणयुक्त असे मानले तर गुणार्थिक हा तिसरा नय देखील मानला पाहिजे.

वरील शंकेचे समाधान सिद्धसेन व अकलंक या आचार्यांनी देखील केले आहे.

प्रस्तूत प्रश्नाचे उत्तर आ. विद्यानंदीनी आपल्या विलक्षण व सुक्ष्म बुद्धिने अगदी यथायोग्य दिले आहे त्यांच्या मते वस्तु दोन प्रकारच्या अनेकान्त रूपांनी युक्त आहे– १. सहानेकान्त २. क्रमानेकान्त. सहानेकान्ताचे ज्ञान मिटविण्यासाठी गुणयुक्त व क्रमानेकान्त सिद्धिसाठी पर्याययुक्ताला द्रव्य म्हटले आहे म्हणून गुण तथा पर्याय दोन्ही शब्दांचा द्रव्यलक्षणात समावेश करणे योग्य आहे.

आ. विद्यानंदीच्या या विश्लेपणावरूनच त्यांच्या सूक्ष्म प्रज्ञा व तीक्ष्ण बुद्धिची आपणाला कल्पना येते.

आ. विद्यानंदी तीक्ष्ण बुद्धिचे पडित असून, उदार मतवादी होते अकलकदेव, माणिक्यनंदी व अनन्तवीर्य इत्यादी विद्वानांनी प्रत्यभिज्ञेचे अनेक भेद सांगितले आहेत, परतु विद्यानदीनी त्याचे फक्त दोनच यथायोग्य भेद सांगितले आहेत. त्याच्या मते ब्राह्मणत्व अथवा चाडालत्व इत्यादी जाति, सम्यग्दर्शनादि गुण तसेच मिथ्यात्वादी दोप यानी युक्त आहेत. नित्य अशी कोणतीच जात नाही. जे त्यांना अनादि, नित्य सर्वगत आणि अमूर्त स्वभावाने युक्त मानतात, ते प्रत्यक्ष व अनुमान यानी युक्त आहेत. अशा प्रकारे त्यानी आपली उच्च विचारसरणी इतरांच्या पुढे ठेवून, जंन तर्कग्रथांना देखील ही एक उदारतेची अमोल देणगी बहाल केली आहे.







विद्यानंदी अत्यंत प्रामाणिक आणि श्रेष्ठतम व्याख्याकार होते. त्यांनी आपल्या ग्रंथात स्वामी समंतभद्र, अकलंकदेव इत्यादींची पद अथवा वाक्ये मोठ्या प्रामाणिकपणे व विनम्रपणे उधृत केली आहेत. हा देखील एक मनाचा मोठेपणाच मानावा लागेल.

खरोखर विद्यानंदीसारखा प्रतिभावान तार्किक, त्यांच्यानंतर भारतीय वाङ्मयात अथवा कमीत कमी जैन परंपरेत तरी दिसून येत नाही. त्यांचे महान ग्रंथ माणिक्यनंदी, वादिराज, प्रभाचंद्र, अभयदेव, देवसूरि, हेमचंद्र लघुसमन्तभद्र, अभिनव धर्मभूषण, उपाध्याय यशोविजय इत्यादी तार्किकांना मार्गदर्शक ठरले आहेत. माणिक्यनंदीवर विद्यानंदींचा वराचसा प्रभाव पडलेला त्यांच्या ग्रंथावरून दिसून येतो. वादिराजसूरिने एके ठिकाणी उल्लेख केला आहे की, विद्यानंदींनी जर अकलंकदेवाच्या वाङ्मय रहस्याचे उद्घाटन केले नसते तर ते कोणी समजावून घेतले असते ? विद्यानंदींनी आपल्या अष्टसहस्री द्वारा अकलंकाच्या अष्टशतीचे फार सुंदर स्पष्टिकरण केले आहे. विद्यानंदीच्या उत्तरावर्ती अनेक लेखकांनी विद्यानंदीच्या ग्रंथातील उद्धरणाद्वारे स्वतःचे ग्रंथ विभूषित केले आहेत व विद्यानंदींचा गौरव केला आहे. विद्यानंदींना आपल्या लिखाणाचा स्वाभिमान असलेला दिसतो. ते म्हणतात 'हजार शास्त्रांचे श्रवण करण्यापेक्षा एका अष्टसहस्रीचे श्रवण केले तर, सर्व सिद्धांतांचे ज्ञान होऊ शकेल'[१] त्याविषयी म्हटले आहे–

> श्रोतव्याष्टसहस्री श्रुतैःकिमन्यैः सहस्रसंख्यानैः ।
> विज्ञायतेययैव स्वसमय परसमय सद्भावाः ॥

वरील विवेचनावरून आ. विद्यानंदी हे उच्च कोटीचे अत्यंत प्रभावशाली दार्शनिक तसेच महान तार्किक विद्वान होते हे सिद्ध होते. त्यांची महान ग्रंथरचना तर भारतीय दर्शन साहित्यरूपी आकाशातील देदिप्यमान नक्षत्रच होय.

**ग्रंथरचना–**

आ. विद्यानंदींनी लिहिलेले एकूण ९ ग्रंथ आहेत. यात तीन टीका ग्रंथ असून इतर ६ ग्रंथ स्वतंत्र व मौल्यवान आहेत.

१. विद्यानंद महोदय, २. तत्वार्थश्लोकवर्तिक, ३. अष्टसहस्री, ४. युक्त्यानुशासनालंकार, ५. आप्त-परीक्षा ६. प्रमाण परीक्षा, ७. पत्र परीक्षा, ८ सत्यशासन परीक्षा, ९. श्रीपुरपार्श्वनाथ स्तोत्र.

**१. विद्यानन्द महोदय–** ही आ. विद्यानंदींनी प्रथम रचना असावी. कारण नंतरच्या सर्व ग्रंथातून तिचा उल्लेख मिळतो व 'विद्यानन्द महोदय' ग्रंथ विस्ताराने पाहणे आवश्यक असल्याची सूचनाही दिली आहे; परंतु दुर्दैवाने हा ग्रंथ आज उपलब्ध नाही. इ. स १३ व्या शतकापर्यंत या ग्रंथाची माहिती मिळते. विद्यानंदी नंतरच्या ४०० वर्षांनी झालेल्या वादीदेवसूरीने आपल्या 'स्याद्वाद रत्नाकर' ग्रंथात नामपूर्वक त्यातील ओळ दिली आहे. म्हणूनच १३ व्या शतकापर्यंत या ग्रंथाचे अस्तित्व सिद्ध होते. या ग्रंथाचा शोध करणे आज अगत्याचे आहे.

**२. तत्वार्थश्लोकवर्तिक–** ही आचार्य उमास्वातींनी रचलेल्या तत्वार्थसूत्रावर लिहिलेली पांडित्यपूर्ण विशाल टीका आहे. जैन वाङ्मयील उपलब्ध कृतींच्या मध्ये ही एक अजोड कृती आहे आणि तत्वार्थसूत्रावरील प्रथम श्रेणीतील टीका आहे. कुमारिल भट्टाने जैमिनीसूत्रावर मीमांसा श्लोकवर्तिक टीका लिहिली. विद्यानंदीने त्याचे उत्तर म्हणून टीका लिहिली आहे.

**३. अष्टसहस्री–** हा स्वामी समंतभद्राच्या देवागम (आप्त-मीमांसा) स्तोत्रावर रचलेली एक महत्वपूर्ण टीका आहे. भट्टाकलंक देवाने 'देवागम' ग्रंथावर लिहिलेल्या 'अष्टशती' टीकेला आपल्या या

१. ब्र प. चन्दाबाई अभिनन्दन ग्रंथ 'आचार्य विद्यानन्द और उनकी तर्क शैली' – न्यायाचार्य दरबारीलाल कोठीया.




'अष्टसहस्री' टीकेत सामावण्याचा प्रयत्न आ. विद्यानंदीनी करून त्यातील प्रत्येक पद वाक्य इत्यादीचे हृदयस्पर्शी मर्माध्ययन केले आहे. ही टीका अति सुंदर पण तितकीच गहन आहे. ती समजावून घेताना अनेक मोठमोठ्या विद्वानांना देखील महापरिश्रम घ्यावे लागतात.

**४. युक्त्यानुशासनालंकार–** ही देखील आ. समंतभद्रांच्या तर्कगर्भ 'युक्त्यानुशासन' स्तोत्रावर लिहिलेली मध्यम परिणामी सुंदर व विशद टीका आहे.

**५. आप्त-परीक्षा–** ( सोपज्ञ टीकासहित ) स्वामी समंतभद्रांनी ज्याप्रमाणे 'मोक्षमार्गस्य नेतारम' या तत्वार्थसूत्रातील पद्य मंगलाचरणावर व्याख्यान रूपात आप्तमीमांसा लिहिली आहे, त्याचप्रमाणे आ. विद्यानंदीनी त्याच पद्याच्या व्याख्यान रूपात आप्त-परीक्षा रचली आहे आणि तिच्याबरोबर सोपज्ञ टीका लिहिली आहे. तिच्यात ईश्वर, कपिल, सुगत व ब्रह्म यांच्याशिवाय अर्हन्त जिनाला आप्त सिद्ध मानले आहे. ही रचना मोठी बोधकारक व महत्वपूर्ण आहे.

**६. प्रमाण परीक्षा–** या ग्रंथात अन्य दार्शनिकांच्या प्रमाण स्वरूपावर टीका करून जैन दर्शन मान्य प्रमाणाचे स्वरूप, संख्या, विषय आणि फलाचे वर्णन केले आहे.

**७. पत्रपरीक्षा–** ही विद्यानंदीची गद्य-पद्यात्मक लहान तर्करचना आहे. यात जैन मतानुसार अनुमान प्रयोगाची रचना केली आहे. अन्य मान्यतांच्या मधील दोषस्थाने दाखविली आहेत.

**८. सत्यशासन परीक्षा–** ही विद्यानंदीची अंतिम रचना असावी. कारण ही अपूर्ण आहे. तिच्यात पुरुषाद्वैतादि १२ मतांची परीक्षा करण्याची प्रतीज्ञा केली आहे. परंतु तिच्यात ९ मतांची पूर्णतः व प्रभाकर शासनाची अपुरी परीक्षा मिळते. ही कृती देखील तर्कांनी परिपूर्ण असून पुष्कळ विस्तृत आहे.

**९. श्रीपुर पार्श्वनाथ स्तोत्र–** हे स्तोत्र श्रीपुरच्या पार्श्वनाथाला अनुलक्षून रचले आहे. हा विद्यानंदीचा एक भक्तिपूर्ण स्तोत्र ग्रंथ आहे. कपिलादिकावर टीका करून पार्श्वनाथाला आप्तसिद्ध मानले आहे. यात एकूण ३० पद्ये आहेत. २९ पद्यात तर ग्रंथ विषयाचे प्रतिपादन केले आहे. शेवटचे पद्य सारांश रूपाने घेतले आहे. समंतभद्रांच्या 'देवागम' सूत्राप्रमाणे हे तर्कपूर्ण सुंदर स्तोत्र आहे.

## आ. विद्यानंदींची तर्कशैली–

आ. विद्यानंदीचे सर्व ग्रंथ दार्शनिक एवं न्यायविषयक आहेत. त्यांची अद्‌भुत तर्कशैली, सूक्ष्म आणि तीक्ष्ण तर्कांनी भरलेली असून इतकी प्रसादपूर्ण आणि प्रवाहगुणांनी युक्त आहे की, वाचक तिच्यावर मुग्ध होऊन जातात. आ. विद्यानंदीच्या तर्कशैलीबाबत प्रसिद्ध दार्शनिक स्वर्गीय पं. अंबादास शास्त्रीनी म्हटले आहे की, 'विद्यानंदीची असाधारण तर्कपद्धति व गहन विचार करण्याची प्रवृत्ती अत्यंत प्रशंसनीय आहे. त्यांनी ईश्वर कर्तृत्वाची जशी विशद, सबल व तर्कपूर्ण आलोचना केली आहे तशी अन्यत्र क्वचितच पाहावयास मिळते. ईश्वर-विषयक विवेचन भरपूर केले आहे. निष्पक्ष व्यक्ति निःसंदेह विद्यानंदीची प्रशंसा करेल यात शंका नाही',[१]

जैन तार्किक पं. सुखलालजी लिहितात– 'तत्वार्थ श्लोकवर्तिक' टीकेत मीमांसक दर्शनाचे खंडन जितके परीपूर्ण केले आहे तसे तत्वार्थसूत्राच्या अन्य कोणत्याही टीकेत दिसत नाही. सर्वार्थसिद्धि व राजवार्तिक इत्यादी टीकेतील कोणतेही मुख्य विषय विद्यानंदीच्या तत्वार्थ श्लोकवर्तिकातून सुटले नाहीत. अनेक गोष्टींची चर्चा अगदी नाविन्याने केली आहे. राजवर्तिकात दार्शनिक अभ्यासाची विशालता आहे तर श्लोक वर्तिकात विशालतेबरोबर

१. शास्त्रीजींचे एक मौलिक भाषण. न्यायालंकार पं. वंशीधर इंदोर द्वारा प्रसारित.
२. तत्वार्थसूत्र सविवेचनची प्रस्तावना पृ. ९२.

सूक्ष्मतादेखील ओतप्रोत भरलेली आहे. समग्र जैन वाङमयात ज्या थोड्याफार महत्त्वपूर्ण साहित्यकृती उपलब्ध आहेत, त्यामध्ये ' राजवर्तिक ' आणि ' श्लोकवर्तिक ' यांचे उच्च स्थान आहे.

न्यायाचार्य पं. महेंद्रकुमारजी, प्रोफेसर ( बौद्धदर्शन हिंदू विश्वविद्यालय बनारस ) हे विद्यानंदींच्या तर्कशैलीची प्रशंसा करताना लिहितात[1]. विद्यानंदी, अतुल पांडित्य, हृदयस्पर्शी विवेचन-सूक्ष्मता सरवोलता, याबरोबरच पदार्थ स्पष्टिकरण व प्रसन्न भाषेत गुंफलेले युक्तिजाल यांची तर्कग्रंथाच्या अभ्यासकाला जाणीव होते. त्यांचे प्रमाणपरीक्षा, पत्रपरीक्षा आणि आप्तपरीक्षा इत्यादी ग्रंथ आपापल्या विषयात बेजोड निबंध ठरले आहेत. विद्यानंदींचे हे व इतर सर्व ग्रंथ दिगंबर, श्वेतांबर न्यायग्रंथाचे आधारभूत ग्रंथ ठरले आहेत. तर जैन न्याय कोषागारातून विद्यानंदींचे ग्रंथ अलग केले तर ते कोषागार निष्प्रभ ठरेल.

वरील विद्वानांच्या विवेचनावरून विद्यानंदी हे किती तीक्ष्ण बुद्धीचे, तर्क निष्णात व प्रमेय प्रतिपादन-शैलीत कुशल होते हे स्पष्ट होते.

कुमारिल भट्ट, प्रभाकर धर्मकीर्ति, प्रज्ञाकर इत्यादि मीमांसक व बौद्ध दार्शनिकांनी जैन दर्शनावर जे प्रचंड आक्षेप व आक्रमण केले आहे त्या सर्वांना विद्यानंदींनी आपल्या संतुलित व गंभीर तर्कशैलीने मर्मस्पर्शी उत्तरे दिली आहेत. कुमारिल आणि धर्मकीर्तिसारखे महान ग्रंथकार परपक्षखंडन करीत असताना, काही काही ठिकाणी आपला तोल गमावून बसले आहेत आणि इतर दार्शनिकांना त्यानी उन्मत्त, अज्ञानी, अश्लील वक्ता इत्यादी वाईट शब्दांची त्यांच्यावर खैरात केली आहे परंतु सूक्ष्म विचारी विद्यानंदींच्या तर्कशास्त्रात अशा गोष्टी दिसत नाहीत. पुष्कळ तार्किकाबरोबर तुलना केली असता विद्यानंदींचा हा एक विशेष गुणच म्हणावा लागेल.

विद्यानंदींनी आपल्या तत्वार्थ श्लोकवार्तिक व अष्टसहस्त्री इत्यादी ग्रंथातून महान व कठीण विषयांची चर्चा करून, जणु इतर विद्वानांना एक सुंदर ज्ञान भांडारच अर्पण केले आहे. त्यातून इतरांना आदर्श पद्धती देण्याचाही प्रयत्न केला आहे. याच कारणामुळे उत्तरवर्ती जैन तार्किकाच्या तर्कशैलीवर त्याचा मोठा प्रभाव पडलेला दिसतो. म्हणूनच आ विद्यानंदी व त्यांची ग्रंथरचना हे दोन्ही ही जैन वाङमयाला गौरवास्पद आहेत.

## आ. नेमिचंद्र

आचार्य नेमिचंद्र सिद्धांत चक्रवर्ती वि. संवत ११ व्या शतकात होऊन गेले. ते जैन सिद्धांत साहित्याचे एक महान पंडित होते. आ. अभयनंदिपासूनच ' सिद्धांत चक्रवर्ती ' ही पदवी चालत आली असून ती आ. नेमिचंद्रांना मिळाली असावी. ते स्वत. लिहितात—

> जइ चक्केण य चक्की छह खंडं साहिय अविग्घेण ।
> तह मइचक्केण मया छह खंडं साहियं सम्मं ॥ ३९७ ( गो. ळ. )

अर्थात 'ज्याप्रमाणे चक्ररूपी सम्राट आपल्या चक्रवर्ती अस्त्राने भारताच्या सहा खंडांना स्ववश करतो, त्याचप्रमाणे मी (नेमिचंद्राने) आपल्या बुद्धिरूपी चक्राने आद्य सिद्धांत ग्रंथाचे सहा खंड म्हणजे षट-खंड-आगमाची साधना केली.'

आ. नेमिचंद्र सिद्धांत चक्रवर्ती नंदीसंघ देशीय गणाचे आचार्य होते तत्कालीन राजा श्री राजमल्लदेव, चामुंडराय, श्री. राजाभोज हे त्यांचे परमशिष्य होते अर्थात दक्षिणेतील गंगवंशियांचा राज्यकाल हा जैन संस्कृतीत एक सुवर्णकाल मानला जातो.[२] इ स दुसऱ्या शतकापासून इ स. अकराव्या शतकापर्यंत गगवंशियांचा

१. पहा अनेकान्त वर्ष ३ किरण ११.

राजाश्रय जैन धर्माला मिळालेला दिसून येतो. गंगराजा मारसिंह व चामुंडराय हे जिनधर्माचे अनुयायी असून श्रवणबेळगोळ येथील गोमटेश्वराच्या महामूर्तीने चामुंडरायाची कीर्ति अजरामर करून ठेवली आहे. चामुडराय प्रसिद्ध रणयोद्धा होता, त्याचप्रमाणे महान धर्मवीर देखील होता. मारसिंह गंगराजा हा तत्कालीन एक उत्कृष्ठ राज्यशासक, व्याकरण, तर्क, तत्वज्ञानादी विषयात निष्णात व पंडित होता. राजा मारसिंह व चामुडराय या महान भक्तावर अनुग्रह करण्यासाठीच आ. नेमिचद्रानी आपली ग्रंथरचना केली.

जैना आचार्य परंपरेत नेमिचंद्र नावाचे विविध आचार्य होऊन गेलेले दिसतात. त्यातील नेमिचंद्र सिद्धांतिदेव आणि नेमिचंद्र सिद्धांत चक्रवर्ती नावाचे दोन प्रमुख आचार्य मानले जातात. त्यातील नेमिचद्र सिद्धांति-देव यांनी 'बृहदद्रव्यसंग्रह' या ग्रंथाची रचना केल्याचे मानतात, तर नेमिचंद्र सिद्धांत चक्रवर्तीने 'गोम्मटसार' या ग्रंथाची रचना केल्याचे मानले जाते. अर्थात हे दोन्ही आचार्य एकमेकाहून भिन्न आहेत की सारखेच आहेत, याविषयी निर्णायक माहिती मिळू शकत नाही. 'जैन साहित्य और इतिहास' मध्ये नाथुराम प्रेमी यांनी सिद्धांत चक्रवर्तीच्या गोम्मटसार आणि त्रिलोकसार या दोनच रचना उपलब्ध असल्याचा निर्वाळा दिला, तर इतिहासवेत्ते श्री पं. जुगलकिशोर मुख्तार यांनी 'पुरातन वाक्य सूचि' ग्रंथाच्या प्रस्तावनेत दोन्ही नेमिचंद्र नावाचे आचार्य भिन्न असल्याचे सांगितले आहे. या शिवाय या दोन्ही आचार्यांच्या भिन्नतेविषयीची काही कारणे 'बृहदद्रव्यसंग्रह' भाषानुवादक श्री. अजितकुमार जैन यांनी आपल्या ग्रंथ प्रस्तावनेत दिली आहे.[1]

सन्मति ज्ञान प्रसारक मंडळ सोलापूर यांनी 'द्रव्यसंग्रह' ग्रंथ नेमिचंद्र सिद्धांत चक्रवर्ती यांनीच लिहिल्याचे सांगितले आहे.[2] ब्र. लाडमल जैन[3] संपादित 'बृहदद्रव्यसंग्रह' या ग्रंथाचे कर्ते श्री. नेमिचंद्राचार्य सिद्धांतिदेव मानले आहेत.

भारतीय ज्ञानपीठ प्रकाशनातर्फे प्रसिद्ध केलेल्या 'जैनेंद्र सिद्धान्त कोश' ( पृ. नं. ६२९ ) मध्ये नेमिचंद्र सिद्धांत चक्रवर्तीविषयी पुढीलप्रमाणे माहित्ती दिली आहे. 'हे अभयनंदि सिद्धांत चक्रवर्तीचे शिष्य होते. आचार्य इंद्रनदि व वीरनंदी यांना त्यांनी आपल्या वडीलबंधूप्रमाणे असल्यामुळे गुरूवत् मानले होते. त्यांनी आ. कनकनंदीचा देखील विनयसहित उल्लेख केला आहे. मंत्री चामुंडरायासाठी त्यांनी 'गोम्मटसार' ग्रंथाची रचना केली. त्यांनी चामुंडरायाची बरीच प्रशंसाही केली आहे आहे. राजा भोजाविषयी राजा श्रीपालाच्या निमित्ताने त्यांनीच 'द्रव्यसंग्रह' ग्रंथाची रचना केली.[4] या म्हणण्यावरोबरच लगेच खाली म्हटले आहे की, 'काही विद्वानांच्या मतानुसार द्रव्यसंग्रहाचा कर्ता नेमिचंद्र गोम्मटसाराच्या कर्त्याहून भिन्न आहे. परंतु ही गोष्ट निश्चित नाही '

प्रस्तुत ठिकाणी आ. नेमिचंद्र सिद्धांत चक्रवर्ती यांचाच विचार करण्यात आला आहे.

### गुरू-शिष्य परंपरा–

आ. नेमिचंद्र सिद्धात चक्रवर्तीची गुरू-शिष्य परंपरा अगदी स्पष्टपणे समजून यते. कारण त्यानी आपल्या ग्रंथातून आपल्या गुरूंना वंदन केले आहे. चामुंडरायाच्यावेळी मोठमोठे विद्वान होऊन गेले, त्यातील अजितसेन हे एक चामुडरायाचे गुरु असावेत. त्यांना 'भुवन गुरु' म्हटले आहे. दुसरे अभयनदी नावाचे आचार्य असून त्याचे वीरनदी, इंद्रनदी आणि नेमिचंद्र हे शिष्य होत. अर्थात नेमिचंद्रानी अभयनंदीलाच आपले गुरु मानले आहे. वीरनदी व इंद्रनंदी यांना ज्येष्ठ बंधूप्रमाणे मानून गुरूवत् नमस्कार केला आहे.

इदि णेमिचंदमुणिणाणप्पसुदेणभयणदिवच्छेण । रइयो तिलोयसारो खमतु त बहु सुदाइरिमा ।। (त्रि. सा.)
णमिऊण अभयणंदि सुदसागरपार गिंदणदि गुरूं । वरवीरणंदिणाहं पयडीणं पच्चयं वोच्छं ।। ७८५ ।। क. का.

१. पहा बृहदद्रव्यसग्रह– श्री ब्रह्मदेव विरचित टीका भाषानुवादक अजितकुमार जैन शास्त्री दिल्ली पृ. न. उ. च.
२. सन्मति ज्ञान प्रसारक मडळ सोलापूर– 'द्रव्यसग्रह' नेमिचद्राचार्यकृत (१९९८) पृ. न. १.
३. बृहद्द्रव्यसग्रह– ब्र. लाडमल जैन पृ. न. ६–७. ४. जैनेन्द्र सिद्धान्त कोश-जिनेंद्र वर्णी–भारतीय ज्ञानपीठ प्रकाशन पृ. न. ६२९.

## कसायपाहुड (कषायप्राभृत)

षट्खंडागमाप्रमाणेच कषायप्राभृत द्वादशांगाचेच एक महत्त्वपूर्ण अंग मानले जाते. या ग्रंथाचा उद्धार पाचव्या ज्ञानप्रवादपूर्वातील दहाव्या वावीतील तिसऱ्या पेज्जदोसपाहुड पासून केला आहे. म्हणूनच कषायप्राभृताला 'पेज्जदोसपाहुड' असेही म्हटले जाते. पेज्ज (प्रेयस्) याचा अर्थ राग व दोषाचा अर्थ द्वेष असा होतो. हे दोन्ही कषायस्वरूपच आहेत. म्हणून उक्त दोन्ही नावे सारख्या अर्थाचे सूचक आहेत. याचा रचनाकाल विक्रम प्रथम शतकाचा पूर्व मानला जातो. या मूल सिद्धांत ग्रंथाची रचना आ. गणधर (ई. ५७ ते १५६) यांनी केली.

प्रस्तुत ग्रंथात क्रोधादि कषायांची राग-द्वेष-परिणति आणि त्यांची प्रकृति, स्थिति, अनुभाग व प्रदेशगत वैशिष्ट्ये इत्यादींचे स्पष्टीकरण केले आहे. *कषायप्राभृताची रचना २३३ गाथा सूत्रांच्यामध्ये केली आहे.* ही सूत्रे अत्यंत संक्षिप्त आणि गूढार्थाने युक्त आहेत. गुणधर आचार्यांनी कषाय प्राभृताची रचना करून आचार्य नागहस्ती *व आर्यमंक्षु यांना त्यांचे स्पष्टीकरण करविले. त्यांच्याजवळ या ग्रंथाचे अध्ययन करून आचार्य यतिवृषभानी* जवळपास इ. स. ६ व्या शतकात सहा हजार श्लोकप्रमाण असलेल्या चूर्णी-सूत्रांची प्राकृतमध्ये रचना केली. *त्यानतर आचार्य यतिवृषभापासून चूर्णी सूत्रांचे अध्ययन करून उच्चारणाचार्यांनी त्यावर १२००० श्लोकप्रमाण असलेल्या* उच्चारण सूत्रांची विस्तृत रचना केली. उच्चारणार्यांची ही टीका मात्र अनुपलब्ध आहे. मूल गाथासूत्र व यतिवृषभांच्या चूर्णी सूत्रावरून वीरसेनांनी सन ८७४ मध्ये २००० श्लोकप्रमाण जयधवला नावाची अधूरी टीका लिहिली. ती त्यांचे शिष्य व राष्ट्रकूट राजा अमोघवर्षाचे गुरु जिनसेनाचार्यांनी (इ. ८०० ते ८४३) मध्ये ४०,००० श्लोकांनी पूर्ण केली. या ग्रंथावर वरीलप्रमाणे अनेक प्रकारच्या टीका लिहिल्या गेल्या आहेत.

कषायप्राभृत ग्रंथ १५ अधिकारामध्ये विभाजित केला आहे. पहिला अधिकार पेज्जदोषविभक्तिविषयी आहे. नंतरच्या चौदा अधिकारांची नावे पुढीलप्रमाणे आहेत–स्थितिविभक्ति, अनुभागविभक्ति, प्रदेशविभक्ति, बंधक, वेदक, उपयोग, चतुःस्थान, व्यंजन, दर्शनमोहोपशामना, दर्शनमोहक्षपणा, संयमासंयमलब्धि, संयमलब्धि, चारित्र-मोहोपशामना, चारित्रमोहक्षपना. यातील प्रारंभीच्या आठ अधिकारामध्ये संसाराला कारणीभूत असणाऱ्या मोहनीयकर्माच्या अवस्थाचे वर्णन असून, अंतिम सात अधिकारामध्ये आत्मपरिणामाचा विकास शिथिल करणाऱ्या मोहनीय कर्माच्या विविध अवस्थांचे वर्णन केले आहे.

कषायप्राभृतमधील पहिल्या खंडात पेज्जदोषविभक्ति नामक अधिकाराचे वर्णन आहे. यामध्ये श्रुतज्ञानाचे भेद, अंगबाह्य व अंगप्रविष्ठ यांचे भेद, केवलीचा आहार विचार, विपुलाचलावर भ. महावीरांच्याद्वारे धर्मतीर्थाचे स्पष्टीकरण, आचारांग इत्यादि ११ अंगाच्या विषयाचे कथन, दिव्यध्वनीचे स्वरूप, तीनशे त्रेसष्ठ मताचा उल्लेख, १४ पूर्वांच्या विषयाची माहिती, नयाचे विवेचन कषायसंबंधी विचार इत्यादींचे वर्णन केले आहे. दुसऱ्या खंडात प्रकृतिविभक्तीचे विवेचन आहे. प्रकृतिविभक्तीचे दोन भेद आहेत– मूलप्रकृतिविभक्ति आणि उत्तरप्रकृतिविभक्ति, यांचे वर्णन आहे. मूलप्रकृतीपासून येथे मोहनीयकर्म आणि उत्तरप्रकृतीपासून मोहनीय कर्माच्या उत्तरप्रकृति दिल्या आहेत. मूलप्रकृतिविभक्ति वर्णनासाठी यतिवृषभाने ८ आणि जयधवलाकाराने १७ अनुयोगद्वार ठेवले आहेत. उत्तरप्रकृतिविभक्तीचे दोन भेद आहेत– एकैकउत्तरप्रकृतिविभक्ति आणि प्रकृतिस्थानउत्तरप्रकृतिविभक्ति. पहिल्या भागात मोहनीय कर्माच्या २८ प्रकृतीचे वेगवेगळे विवेचन केले असून, दुसऱ्या भागात मोहनीय कर्माच्या १५ प्रकृति स्थानांचे कथन आहे अनेक अनुयोगद्वाराच्या साह्याने याचे कथन केले आहे. कषायप्राभृतमधील तिसऱ्या खंडात स्थितिविभक्तीचे विवेचन आहे. स्थितिविभक्तीचे दोन भेद आहेत– मूलप्रकृतिस्थितिविभक्ति आणि उत्तरप्रकृति-स्थितिविभक्ति. यांचे सर्वविभक्ति, नोसर्वविभक्ति, उत्कृष्टविभक्ति, अनुत्कृष्टविभक्ति इत्यादि २४ अनुयोगद्वारांच्या साह्याने स्पष्टीकरण दिले आहे. चौथ्या खंडात स्थितिविभक्तिअधिकार नावाच्या शेष भागाचे विवेचन केले आहे. *येथे भुजगार, पदनिक्षेप, वृद्धि आणि स्थितिसत्कर्मस्थान अधिकाराच्या साह्याने विषय विवेचन केले आहे.*

कषायप्राभृतच्या ५ व्या खंडात अनुभागविभक्तीचे विवेचन आहे. या अधिकाराचे दोन भेद आहेत– मूलप्रकृति-अनुभागविभक्ति व उत्तरप्रकृतिअनुभागविभक्ति. आचार्य वीरसेनांनी मूलप्रकृतिअनुभागप्रकृतीचे विशेष स्पष्टीकरण संज्ञा, सर्वानुभागविभक्ति, नोसर्वानुभागविभक्ति, उत्कृष्ठानुभागविभक्ति, अनुत्कृष्ठानुभागविभक्ति, इत्यादि २३ अनुयोगद्वारांच्या आधाराने केले आहे. याचप्रकारे उत्तरप्रकृतिअनुभागविभक्तीमध्ये सर्वानुभागविभक्ति, नोसर्वानुभागविभक्ति, उत्कृष्टअनुभागविभक्ति, अनुत्कृष्ठअनुभागविभक्ति इत्यादि अनुयोगद्वारांचे साह्य घेऊन विषयाचे विवेचन केले आहे.

# जैन दिगंबर आगम साहित्य

आचार्य परंपरेने आलेल्या मूल सिद्धांतांना 'आगम' असे म्हणतात. मूलतः जैन आगम साहित्य अत्यंत विस्तृत आहे. परंतु कालदोषानुसार यातील बराचसा भाग नष्ट झाला आहे. आगमाची सार्थकता त्याच्या शब्द-रचनेवरूनच नव्हे तर, त्यातील भाव प्रतिपादनामुळे आहे. म्हणून शब्दरचनेला उपचार मात्र आगम असे म्हटले आहे. त्यातील भाव तथा अर्थ ग्रहण करण्यासाठी पाच प्रकारे याचा अर्थ लावण्याच्या पद्धती सांगितली आहे. ती म्हणजे– शब्दार्थ, नयार्थ, मतार्थ, आगमार्थ व भावार्थ. शब्दाचा अर्थ क्षेत्र कालानुसार जरी बदलत असला तरी, भावार्थ मात्र तोच राहतो. म्हणून शब्द बदलले तरी आगमाला अनादि म्हटले आहे. आगम हे पक्षपातविरहित वीतरागी मुनी तथा गुरूंच्याद्वारे प्रदिपादित असल्यामुळे आगमाला प्रमाण मानले आहे. शब्दरचनेच्या दृष्टीने आगम पौरुषेय आहेत. परंतु अनादिगत भावाच्या अपेक्षेने अपौरुषेय आहेत. आगमाची रचना प्रामुख्याने जास्ती-जास्त सूत्रामध्ये करण्यात आली आहे. लहानशा सूत्रात शेकडो मणी गुंफावेत, त्याप्रमाणे थोडया शब्दात खूप अर्थ सामावता आला म्हणजे ते सूत्र बनते. सूत्राची व्याख्याच मुळी 'सूत्र म्हणजे थोडयाशा शब्दात विपुल अर्थानें भरलेले लहानसे वचन होय'. तत्कालीन गणधरांनी ही बाब लक्षात ठेवून आगमाची रचना सूत्रात केली. पुढे पुढे तर गद्यात किंवा पद्यात थोडक्यात व्यक्त केलेला धार्मिक विषय ज्या आगमग्रंथात एकत्रित केला त्यांनाच जैनांनी सूत्र ही संज्ञा दिली. आगमातील अर्थ समजावा म्हणून, अल्पबुद्धि लोकांच्यासाठी आचार्यांनी या आगम सूत्रावर टीका लिहिल्या आहेत.

आगमाच्या सामान्य लक्षणाविषयीची माहिती आपणाला विविध ग्रंथातून मिळते. नियमसार मूल टीकेनुसार, 'भगवानांच्या मुखातून निघालेली वाणी जी, पूर्व दोषविरहित आणि शुद्ध आहे; त्याला आगम म्हटले आहे.'[1] रत्नकरण्ड श्रावकाचारानुसार 'जे आप्ताकडून सांगितले जाते; वादी, प्रतिवादी यांना खंडन करण्यास कठीण असते, वस्तुस्वरूपाचा उपदेश ज्यात केलेला असतो, सर्व जीवांचे हित करणारे व मिथ्यामार्गाचे खंडन करणारे जे शास्त्र आहे त्याला सत्यार्थ शास्त्र (आगम) म्हटले आहे.[2] राजवार्तिकानुसार 'ज्यांचे सर्व दोष क्षीण झाले आहेत, अशा प्रत्यक्ष ज्ञानीद्वारा रचित सूत्रांना आगम म्हटले आहे.[3]" परीक्षामुखानुसार 'आप्तवचनादीपासून होणाऱ्या पदार्थांच्या ज्ञानाला आगम म्हणतात'. पंचास्तिकायनुसार, 'वीतराग सर्वज्ञ देवाद्वारे सांगितलेले षड्द्रव्य, सप्ततत्त्व, सम्यकश्रद्धान, ज्ञान, व्रतादीचे अनुष्ठान, रूप, चारित्र या प्रकारच्या भेदरत्नत्रयाचे स्वरूप ज्यामध्ये प्रतिपादन केले आहे त्याला आगम म्हटले आहे. थोडक्यात न्यायदीपिकानुसार 'आप्तवाक्यनिबन्धनमर्थज्ञानमागमः' अर्थात अप्तादिवचनापासून होणाऱ्या पदार्थाच्या ज्ञानाला आगम असे म्हटले आहे.

आगमांना 'अनादि' म्हटले असून त्याविषयीची माहिती आपणाला जंबूदीवपण्णत्तिसंग्रहामध्ये मिळते. 'पूर्व व अंग रूपभेदामध्ये विभक्त असलेले हे श्रुतज्ञान' देवेंद्र व असुरेंद्र यांच्याकडून पूजित, अनंत सुख व मोक्ष फलाने युक्त, कर्म पटलरूपी मल नष्ट करणारे, पुण्य, पवित्र, शिव, भद्र, अनंत अर्थांनी युक्त, दिव्य, नित्य,

१. नियमसार मूल टीका श्लोक ८, २. रत्नकरण्ड श्रावकाचार श्लोक ९, ३. राजवार्तिक ।।१२।७।५४।८.




अनुत्तर, विमल, संशयरूपी अंधाराला नष्ट करणारे, पुष्कळ प्रकार व गुणांनी युक्त, स्वर्गाची शिढी, मोक्षाचे मुख्य द्वार, निर्मलबुद्धि व सर्वांच्या मुखातून निघालेले, पूर्वापर विरोध दोषाने रहित, विशुद्ध, अक्षय आणि अनादि निधन सांगितले आहे.' राग द्वेषी आणि अज्ञानी मनुष्यापासून उत्पन्न आगमाला आगमाभास म्हणतात.

विविध अंगानी व गुणानी युक्त असलेल्या या आगम सूत्रांची रचना महावीराच्यानंतर त्यांच्या गणधरांनी केली. त्यांचा काळ इ. स. ५ वे शतक इतका मानला जातो. या आगमाची रचना त्यांनी अत्यंत कठीण परिस्थिती-मध्ये मोठ्या परिश्रमाने केली. ही रचना बहुधा अर्धमागधी भाषेत आहे. आगम साहित्य जैन संस्कृति व इतिहास यांचे आधारस्तंभ आहे. या साहित्यात जैन मुनीचे आचार, विचार, विहार, भिक्षाग्रहण, व्रत, नियम, सिद्धांत, परमतखंडन, स्वमत प्रदिपादन इत्यादि विषयांचे विवेचन केले आहे. प्रसंगानुरूप त्यासाठी कथा, चरित्र, उपमा, रूपक दृष्टांत यांचाही वापर केला आहे. धार्मिकदृष्टचा हे साहित्य अत्यंत महत्त्वाचे आहे. जैन आगम साहित्य म्हणजे, जैनधर्मरूपी वृक्षाचे जणु मूळ आहे. या आगम ज्ञानाशिवाय जैनधर्माच्या स्वरूपाचे सांगोपाग ज्ञान होऊच शकणार नाही. म्हणूनच आगमसाहित्याला अत्यंत मानाचे आणि महत्त्वाचे स्थान जैन साहित्यात दिले आहे

## महावीरपूर्व उपलब्ध साहित्य--

जैन आगम साहित्याला 'श्रुतज्ञान' किंवा 'सिद्धांत' या नावांनी संबोधिले जाते. हे सर्व ज्ञान जैनागमात किंवा जैन सिद्धांतशास्त्रात सामावले आहे. आगमाची प्राचीनता तसेच प्रमाणता यांचा विचार करीत असताना श्वेतांबर व दिगंबर या दोन्ही पंथाकडून वेगवेगळचा परंपरा सांगण्यात आल्या आहेत. अर्थातच जैन आगम साहित्याविषयी दोन्ही संप्रदायामध्ये प्रथम मान्यता असली तरी मतभेद आहेत.

प्रथम तीर्थंकर भगवान ऋषभदेवांनी १४ पूर्वग्रंथ व ११ अंगग्रंथामध्ये आपला सद्धर्म हितोपदेशिला अंतिम २४ वे तीर्थंकर भगवान महावीरांनी आपल्या ११ गणधरांना मूळ सिद्धांताचा उपदेश केला. १४ पूर्वग्रंथ १२ व्या दृष्टिवाद अंगात एकत्रित केले होते. हळूहळू कालदोषानुसार हे पूर्वग्रंथ नष्ट होत गेले. आज दृष्टिवाद अस्तित्वात नाही. आज जे आगम ग्रंथ अस्तित्वात असल्याचे दिसतात ते भगवान महावीरानतर रचण्यात आले आहेत. याच ठिकाणी महावीर पूर्वकालीन काही साहित्य उपलब्ध असावे की नसावे असा प्रश्न आपल्यापुढे उभा राहतो.

वरील प्रश्नाचे उत्तर आपणाला होकारात्मक व नकारात्मक दोन्ही प्रकारे द्यावे लागते. कारण साहित्याचे अंतरंग पहात असताना आपणाला त्यामध्ये दोन तत्त्वमूल्याचा अंतर्भाव झालेला दिसतो. एक म्हणजे त्याचे शाब्दिक व रचनात्मक स्वरूप आणि दुसरे म्हणजे अर्थात्मक व विचारात्मक स्वरूप. या दोन्ही मूल्यांना जैन परंपरेनुसार द्रव्यश्रुत व भावश्रुत असे म्हणतात. द्रव्यश्रुतरूपाने महावीर पूर्वकालीन साहित्य उपलब्ध नसल्याचे आढळून येते, परंतु भावश्रुताच्या अपेक्षेने जैन श्रुतांगातील काही रचना महावीर पूर्वकालीन श्रमण परंपरेमध्ये प्रचलित होती असे मानले आहे यामुळे त्या विभागाला 'पूर्वश्रुत' असे म्हणतात. द्वादशांग आगमातील बारावा आगमग्रंथ दृष्टिवाद होय. यामध्ये चौदा पूर्वांचा समावेश आहे. या चौदा पूर्वांमध्ये महावीर पूर्वकालीन अनेक विचारप्रवाह, मतमतांतरे व ज्ञान-विज्ञान याचे संकलन महावीर शिष्य गौतमाने केले होते. हे ज्ञान हल्ली अस्तित्वात अथवा उपलब्ध नाही. मात्र चौदा पूर्वांची नावे आणि नावावरून त्यात कथन केलेल्या विषयाची माहिती मात्र आपणाला मिळू शकते.

---

१. जम्बूदीवपण्णत्तिसंगहो– १३।८०–८३.

कषायप्राभृतच्या ५ व्या खंडात अनुभागविभक्तीचे विवेचन आहे. या अधिकाराचे दोन भेद आहेत– मूलप्रकृति-अनुभागविभक्ति व उत्तरप्रकृतिअनुभागविभक्ति. आचार्य वीरसेनानी मूलप्रकृतिअनुभागप्रकृतीचे विशेष स्पष्टीकरण संज्ञा, सर्वानुभागविभक्ति, नोसर्वानुभागविभक्ति, उत्कृष्टानुभागविभक्ति, अनुत्कृष्टानुभागविभक्ति, इत्यादि २३ अनुयोगद्वारांच्या आधाराने केले आहे. याचप्रकारे उत्तरप्रकृतिअनुभागविभक्तीमध्ये सर्वानुभागविभक्ति, नोसर्वानुभागविभक्ति, उत्कृष्टअनुभागविभक्ति, अनुत्कृष्टअनुभागविभक्ति इत्यादि अनुयोगद्वारांचे साह्य घेऊन विषयाचे विवेचन केले आहे.

# जैन दिगंबर आगम साहित्य

आचार्य परंपरेने आलेल्या मूल सिद्धांतांना 'आगम' असे म्हणतात. मूलतः जैन आगम साहित्य अत्यंत विस्तृत आहे. परंतु कालदोषानुसार यातील बराचसा भाग नष्ट झाला आहे. आगमाची सार्थकता त्याच्या शब्द-रचनेवरूनच नव्हे तर, त्यातील भाव प्रतिपादनामुळे आहे. म्हणून शब्दरचनेला उपचार मात्र आगम असे म्हटले आहे. त्यातील भाव तथा अर्थ ग्रहण करण्यासाठी पाच प्रकारे याचा अर्थ लावण्याच्या पद्धती सांगितली आहे. ती म्हणजे– शब्दार्थ, नयार्थ, मतार्थ, आगमार्थ व भावार्थ. शब्दाचा अर्थ क्षेत्र कालानुसार जरी बदलत असला तरी, भावार्थ मात्र तोच राहतो. म्हणून शब्द बदलले तरी आगमाला अनादि म्हटले आहे. आगम हे पक्षपातविरहित वीतरागी मुनी तथा गुरूंच्याद्वारे प्रदिपादित असल्यामुळे आगमाला प्रमाण मानले आहे. शब्दरचनेच्या दृष्टीने आगम पौरुषेय आहेत. परंतु अनादिगत भावाच्या अपेक्षेने अपौरुषेय आहेत. आगमाची रचना प्रामुख्याने जास्ती-जास्त सूत्रामध्ये करण्यात आली आहे. लहानशा सूत्रात शेकडो मणी गुंफावेत, त्याप्रमाणे थोड्या शब्दात खूप अर्थ सामावता आला म्हणजे ते सूत्र बनते. सूत्राची व्याख्याच मुळी 'सूत्र म्हणजे थोड्याशा शब्दात विपुल अर्थाने भरलेले लहानसे वचन होय'. तत्कालीन गणधरांनी ही बाब लक्षात ठेवून आगमाची रचना सूत्रात केली. पुढे पुढे तर गद्यात किंवा पद्यात थोडक्यात व्यक्त केलेला धार्मिक विषय ज्या आगमग्रंथात एकत्रित केला त्यांनाच जैनांनी सूत्र ही संज्ञा दिली. आगमातील अर्थ समजावा म्हणून, अल्पबुद्धि लोकांच्यासाठी आचार्यांनी या आगम सूत्रावर टीका लिहिल्या आहेत.

*आगमाच्या सामान्य लक्षणाविषयीची माहिती आपणाला विविध ग्रंथातून* मिळते. नियमसार मूल टीकेनुसार, 'भगवानांच्या मुखातून निघालेली वाणी जी, पूर्व दोषविरहित आणि शुद्ध आहे; त्याला आगम म्हटले आहे.[1] रत्नकरण्ड श्रावकाचारानुसार 'जे आप्ताकडून सांगितले जाते; वादी, प्रतिवादी यांना खंडन करण्यास कठीण असते, वस्तुस्वरूपाचा उपदेश ज्यात केलेला असतो, सर्व जीवांचे हित करणारे व मिथ्यामार्गाचे खंडन करणारे जे शास्त्र आहे त्याला सत्यार्थ शास्त्र (आगम) म्हटले आहे.[2] राजवार्तिकानुसार 'ज्यांचे सर्व दोष क्षीण झाले आहेत, अशा प्रत्यक्ष ज्ञानीद्वारा रचित सूत्रांना आगम म्हटले आहे.[3]" परीक्षामुखानुसार 'आप्तवचनादीपासून होणाऱ्या पदार्थाच्या ज्ञानाला आगम म्हणतात'. पंचास्तिकायनुसार, 'वीतराग सर्वज्ञ देवाद्वारे सांगितलेले षड्द्रव्य, सप्ततत्त्व, सम्यक्श्रद्धान, ज्ञान, व्रतादींचे अनुष्ठान, रूप, चारित्र या प्रकारच्या भेदरत्नत्रयाचे स्वरूप ज्यामध्ये प्रतिपादन केले आहे त्याला आगम म्हटले आहे. थोडक्यात न्यायदीपिकानुसार 'आप्तवाक्यनिबन्धनमर्थज्ञानमागमः' अर्थात अप्तादिवचनापासून होणाऱ्या पदार्थाच्या ज्ञानाला आगम असे म्हटले आहे.

आगमांना 'अनादि' म्हटले असून त्याविषयीची माहिती आपणाला जंबूदीवपण्णत्तिसंग्रहामध्ये मिळते. 'पूर्व व अंग रूपभेदामध्ये विभक्त असलेले हे श्रुतज्ञान' देवेंद्र व असुरेंद्र यांच्याकडून पूजित, अनंत सुख व मोक्ष फलाने युक्त, कर्म पटलरूपी मल नष्ट करणारे, पुण्य, पवित्र, शिव, भद्र, अनंत अर्थानी युक्त, दिव्य, नित्य,

१. नियमसार मूल टीका श्लोक ८, २. रत्नकरण्ड श्रावकाचार श्लोक ९, ३. राजवार्तिक १।१२।७।५४।८.




अनुत्तर, विमल, संशयरूपी अंधाराला नष्ट करणारे, पुष्कळ प्रकार व गुणांनी युक्त, स्वर्गाची शिढी, मोक्षाचे मुख्य द्वार, निर्मलबुद्धि व सर्वांच्या मुखातून निघालेले, पूर्वापर विरोध दोषाने रहित, विशुद्ध, अक्षय आणि अनादि निधन सांगितले आहे.[1] राग द्वेषी आणि अज्ञानी मनुष्यापासून उत्पन्न आगमाला आगमाभास म्हणतात.

विविध अंगानी व गुणांनी युक्त असलेल्या या आगम सूत्राची रचना महावीरांच्यानंतर त्यांच्या गणधरानी केली. त्यांचा काळ इ. स. ५ वे शतक इतका मानला जातो. या आगमाची रचना त्यानी अत्यत कठीण परिस्थिती- मध्ये मोठया परिश्रमाने केली. ही रचना बहुधा अर्धमागधी भाषेत आहे. आगम साहित्य जैन संस्कृति व इतिहास यांचे आधारस्तंभ आहे. या साहित्यात जैन मुनींचे आचार, विचार, विहार, भिक्षाग्रहण, व्रत, नियम, सिद्धांत, परमतखंडन, स्वमत प्रदिपादन इत्यादि विषयाचे विवेचन केले आहे. प्रसंगानुरूप त्यासाठी कथा, चरित्र, उपमा, रूपक दृष्टांत यांचाही वापर केला आहे. धार्मिकदृष्टया हे साहित्य अत्यंत महत्त्वाचे आहे. जैन आगम साहित्य म्हणजे, जैनधर्मरूपी वृक्षाचे जणु मूळ आहे. या आगम ज्ञानाशिवाय जैनधर्माच्या स्वरूपाचे सांगोपांग ज्ञान होऊच शकणार नाही. म्हणूनच आगमसाहित्याला अत्यंत मानाचे आणि महत्त्वाचे स्थान जैन साहित्यात दिले आहे.

## महावीरपूर्व उपलब्ध साहित्य-

जैन आगम साहित्याला 'श्रुतज्ञान' किंवा 'सिद्धांत' या नावांनी संबोधिले जाते. हे सर्व ज्ञान जैनागमात किंवा जैन सिद्धांतशास्त्रात सामावले आहे. आगमाची प्राचीनता तसेच प्रमाणता यांचा विचार करीत असताना श्वेतांबर व दिगंबर या दोन्ही पंथाकडून वेगवेगळया परंपरा सांगण्यात आल्या आहेत. अर्थातच जैन आगम साहित्याविषयी दोन्ही संप्रदायामध्ये प्रथम मान्यता असली तरी मतभेद आहेत.

प्रथम तीर्थंकर भगवान ऋषभदेवांनी १४ पूर्वग्रंथ व ११ अंगग्रंथामध्ये आपला सद्धर्म हितोपदेशिला अंतिम २४ वे तीर्थंकर भगवान महावीरांनी आपल्या ११ गणधरांना मूळ सिद्धांताचा उपदेश केला. १४ पूर्वग्रंथ १२ व्या दृष्टिवाद अंगात एकत्रित केले होते. हळूहळू कालदोषानुसार हे पूर्वग्रंथ नष्ट होत गेले. आज दृष्टिवाद अस्तित्वात नाही. आज जे आगम ग्रंथ अस्तित्वात असल्याचे दिसतात ते भगवान महावीरानंतर रचण्यात आले आहेत. याच ठिकाणी महावीर पूर्वकालीन काही साहित्य उपलब्ध असावे की नसावे असा प्रश्न आपल्यापुढे उभा राहतो.

वरील प्रश्नाचे उत्तर आपणाला होकारात्मक व नकारात्मक दोन्ही प्रकारे द्यावे लागते. कारण साहित्याचे अंतरंग पहात असताना आपणाला त्यामध्ये दोन तत्त्वमूल्यांचा अंतर्भाव झालेला दिसतो. एक म्हणजे त्याचे शाब्दिक व रचनात्मक स्वरूप आणि दुसरे म्हणजे अर्थात्मक व विचारात्मक स्वरूप या दोन्ही मूल्यांना जैन परंपरेनुसार द्रव्यश्रुत व भावश्रुत असे म्हणतात. द्रव्यश्रुतरूपाने महावीर पूर्वकालीन साहित्य उपलब्ध नसल्याचे आढळून येते, परंतु भावश्रुताच्या अपेक्षेने जैन श्रुतागातील काही रचना महावीर पूर्वकालीन श्रमण परंपरेमध्ये प्रचलित होती असे मानले आहे. यामुळे त्या विभागाला 'पूर्वश्रुत' असे म्हणतात. द्वादशांग आगमातील बारावा आगमग्रंथ दृष्टिवाद होय. यामध्ये चौदा पूर्वांचा समावेश आहे. या चौदा पूर्वांमध्ये महावीर पूर्वकालीन अनेक विचारप्रवाह, मतमतांतरे व ज्ञान-विज्ञान यांचे संकलन महावीर शिष्य गौतमाने केले होते. हे ज्ञान हल्ली अस्तित्वात अथवा उपलब्ध नाही. मात्र चौदा पूर्वांची नावे आणि नावावरून त्यात कथन केलेल्या विषयाची माहिती मात्र आपणाला मिळू शकते.

---

१. जंबूदीवपण्णत्तिसंगहो- १३।८०-८३.

चौदा पूर्वग्रंथाची नावे पुढीलप्रमाणे आहेत– १) उत्पाद, २) अग्रायणीय, ३) वीर्यानुवाद, ४) अस्ति-नास्तिप्रवाद, ५) ज्ञानप्रवाद, ६) सत्यप्रवाद, ७) आत्मप्रवाद, ८) कर्मप्रवाद, ९) प्रत्याख्यान, १०) विद्यानुवाद, ११) कल्याणवाद, १२) प्राणावाय, १३) क्रियाविशाल, १४) लोकबिंदूसार क्रमशः यात वर्णन केलेले विषय पुढीलप्रमाणे दिसून येतात.

१. उत्पाद– हा प्रथम पूर्वग्रंथ मानला जात असून, यामध्ये जीव, काल, पुद्‌गल इत्यादि द्रव्याची उत्पत्ति, विनाश व ध्रुवता यासंबंधी विचार केला आहे.

२. अग्रायणीय– यामध्ये जीव, काल, पुद्‌गल यांची माहिती त्यांच्या विविध अवस्थांची संख्या, परिणाम यांचा विचार केला आहे.

३. वीर्यानुवाद– या पूर्वात क्षेत्र, काल इत्यादीच्या अपेक्षेने द्रव्यांचे वीर्य अर्थात सामर्थ्य हा विषय सांगितला आहे.

४. अस्ति-नास्तिप्रवाद– यात लौकिक वस्तूंच्या अस्तित्व-नास्तित्वाचे विवेचन विविध प्रकारे केले आहे.

५. ज्ञानप्रवाद– या पाचव्या पूर्वात मति, श्रुति, अवधि, मन.पर्यय इत्यादि ज्ञानाचे भेद-प्रभेद यासंबंधी प्रतिपादन केले आहे.

६. सत्यप्रवाद– यामध्ये वचनाच्या अपेक्षेने सत्यासत्याचे विवरण व वक्त्याच्या मानसिक परिस्थितीचे आणि त्याप्रमाणे असत्याच्या स्वरूपांचे विवेचन आहे.

७. आत्मप्रवाद– या पूर्वात आत्म्याचे स्वरूप, त्याची व्यापकता, ज्ञातृभाव व भोक्तृत्वासंबंधी स्पष्टीकरण केले आहे.

८. कर्मप्रवाद– यामध्ये नानाविध प्रकारच्या कर्माची प्रकृति, स्थिति, शान्ति व परिणाम इत्यादींचे विवेचन आहे.

९. प्रत्याख्यान– यात परिग्रह-त्याग, उपवासादि विधि, मन-वचन, काय संबंधी विशुद्धि इत्यादि आचार नियमांचा निर्णय आहे.

१०. विद्यानुवाद– या दहाव्या पूर्वग्रंथात विविध प्रकारच्या विद्या, उपविद्या यासंबंधी माहिती आहे. शिवाय यामध्ये अंगुष्ठ, प्रसेन इ. ७०० अल्पविद्या, रोहिणी इ ५०० महाविद्या व अंतरिक्ष, भौम, अंग, स्वर, स्वप्न, लक्षण आणि छिन्न अशा आठ महानिमित्ताने भविष्य जाणण्याच्या विधीचे वर्णन आहे.

११. कल्याणप्रवाद– सूर्य, चंद्र, नक्षत्र व तारागण यांच्या नाना प्रकारच्या गतीच्या निरीक्षणावरून शकुनाचा विचार यात केला आहे. शिवाय बलदेव, वासुदेव, चक्रवर्ती इत्यादि महापुरुषाच्या गर्भावतरण प्रसंगी उत्पन्न होणारी लक्षणे व कल्याणासंबंधीचे कथन आहे. या शकुन व शुभाशुभ लक्षणांच्या निमित्ताने भविष्यकाळी घडणाऱ्या घटनांचे कथन 'अबंध्य' अर्थात अवश्यभावी मानले आहे. अर्थात कल्याणप्रवादाला श्वेतांबर परंपरे-नुसार 'अवध्य' या नावाने संबोधिले होते.

१२. प्राणावाय– हा आयुर्वेदविषयक ग्रंथ मानला जात असून, कायचिकित्सा शास्त्राचे प्रतिपादन व शरीर धारणेच्या दृष्टीने प्राण, अपान इत्यादि वायूंच्या कार्याचे प्रतिपादन या पूर्वग्रंथात आहे.

१३. क्रियाविशाल– या तेराव्या पूर्वग्रंथामध्ये लेखन, गणित, संगीत, वाद्य इत्यादि बहात्तर कला स्त्रियांचे चौसष्ट गुण व शिल्प यांची माहिती दिली असून ग्रंथ रचनेसंबंधी गुण व छंद इत्यादींचे स्पष्टीकरण यात आहे.






१४ लोक बिंदुसार- या चौदाव्या आणि शेवटच्या पूर्व ग्रंथामध्ये श्रेष्ठ क्रिया व व्यवहार आणि त्या निमित्ताने मोक्षप्राप्ती यासंबंधी विचार केला आहे. यावरून असे स्पष्ट होते की, या पूर्वनामक ग्रंथामध्ये केवळ धार्मिक, दार्शनिक, नैतिक विचाराचेच संकलन नसून, तत्कालीन कला, ज्योतिष, आयुर्वेद इत्यादि विज्ञाने व फल-ज्योतिष शकुनशास्त्र, मंत्रतंत्र इत्यादि विषयांचाही समावेश करण्यात आला आहे. या विविध प्रकारच्या संग्रहामुळेच या ग्रंथ संग्रहाना प्राचीन भारतीय ज्ञानकोष असे म्हटले तर अयोग्य ठरणार नाही.

वर उल्लेखिलेले पूर्व-साहित्य दुर्भाग्याने सुरक्षित राहू शकले नाही. तरीसुद्धा नंतरच्या साहित्यामध्ये ठिकठिकाणी यांचा उल्लेख मिळतो. त्यातील विषयांचे वर सांगितल्याप्रमाणे कोठे कोठे विवेचन आढळते. अशा प्रकारे महावीर निर्वाणानंतर १६२ वर्षांनी हे पूर्वग्रंथ हळूहळू नष्ट झाले. वरील सर्व पूर्वांचे ज्ञान असणारे अंतिम श्रुतकेवली भद्रबाहू होते. त्यानतर १८१ वर्षांच्या कालावधीमध्ये झालेल्या विशाखाचार्यापासून धर्मसेन-पर्यंतच्या आचार्यांना १४ पैकी पहिल्या १० पूर्वाचे ज्ञान होते त्यानंतर पूर्वग्रंथ ज्ञाते कोणीही झाले नाहीत. षट्खंडागमातील वेदना खंडाच्या सुरुवातीला दशपूर्वज्ञाते व चौदा पूर्वज्ञाते असलेल्या मुनींना नमस्कार केला आहे. वीर-निर्वाणानंतर सुमारे ७०० वर्षांनी झालेल्या आचार्य धरसेन यांना दुसऱ्या पूर्वातील काही अधिकारांचे विशेष ज्ञान होते. ते गिरिनार येथील चंद्रगुफेमध्ये रहात असत. त्यांनीच पुढे आचार्य पुष्पदंत व भूतबलि यांच्या साह्याने षट्खंडागमाची सूत्ररूप रचना केली.

## प्राकृत भाषा

### प्राकृत भाषेचा सामान्य परिचय-

प्राचीन भारतीय भाषा आणि आधुनिक भारतीय आर्यभाषा या दोहोंच्या मधील भाषाविषयक ऐतिहासिक भूमिकेला आपण 'प्राकृत' असे म्हणू शकतो. प्राकृत भाषा ही पूर्वकालापासून आर्यांची एक बोली भाषा म्हणून सुद्धा ओळखली जाते. अर्थात् प्राकृत म्हणजे नक्की कोणती भाषा असावी अथवा कोणत्या भाषेला प्राकृत भाषा म्हणावे याविषयी व्याकरणकारात तथा विद्वानाच्यामध्ये मतभेद आहेत. पाश्चात्य विद्वानांनी प्राकृत शब्दाचा वापर पुढीलप्रमाणे केलेला दिसतो- १. प्राकृत म्हणजे त्या विशेष भाषा ज्यांना भारत वर्षात प्राकृत शब्दाने उल्लेख केला आहे. उदा- महाराष्ट्री अथवा संस्कृत नाटकातील प्राकृत भाग. २. प्राकृत म्हणजे भारतीय मध्ययुगाची भाषा. ३. साहित्यिक आणि शिष्ट भाषापासून भिन्न लोकभाषा. या शेवटच्या मतावरून काही लेखक प्राकृतचे तीन विभाग पाडतात. १. प्रथम, २. द्वितीय, ३. तृतीय प्राकृत. या तिन्ही उल्लेखावरून एक महत्त्वाची बाब स्पष्ट होते ती अशी की, प्राकृत ही लोकभाषा असो अथवा साहित्यिक भाषा असो ती भारतीय भाषा साहित्याची एक आवश्यक बाब ठरली होती. प्राचीनतम वेदभाषा आणि वर्तमान नवीन आर्यभाषा या दोहोंच्या-मधील भाषा इतिहासाच्या अवस्थेलाच आपण प्राकृत म्हणू. भारतीय आर्यभाषेचे विभाजन प्राचीन, मध्ययुगीन व आर्वाचीन अशा तीन भागात करता येते. यातील मध्ययुगाचे प्रतिनिधित्व प्राकृत भाषेला देण्यात येते.[1]

इ. स. पूर्व ६०० ते इ. स. १००० पर्यंत भारतीय आर्यभाषा विविध प्राकृत तथा त्यानंतर अपभ्रंश स्वरूपात राहून पुढे तीच प्राकृत आधुनिक भारतीय आर्यभाषांची जननी झाली.[2] या १६०० वर्षांचा काल आपणाला खालील तीन पर्वात विभाजित करता येईल.

१. प्रथम पर्व यात २०० इ. सनापूर्वीचे प्रारंभिक परिवर्तन व २०० इ. सनापूर्वीपासून २०० इ. स. पर्यंतचा समावेश होईल.

---

१. डॉ. सरयूप्रसाद अग्रवाल-हिंदी साहित्यकोश पृ. ४९२.

२ डॉ. उदयनारायण तिवारी-हिंदी भाषा का उद्गम और विकास पृ. ६०.

२. २०० इ. सनापासून ६०० इ. सनापर्यंतचे द्वितीय पर्व.

३. ६०० इ. सनापासून १००० वर्षापर्यंतचे तृतीय पर्व.

प्रथम पर्वामध्ये पाली आणि अशोकाचे शिलालेख यांचा समावेश होतो. पालीला आजकाल प्राचीन प्राकृत मानले असून, प्राकृतपासून भिन्न मानले आहे. प्राकृत व्याकरणकारांनी प्राकृतचे व्याकरण सांगत असताना पालीचा विचार केलेला दिसत नाही. द्वितीय पर्वात साहित्यिक प्राकृताचा समावेश करण्यात आला असून, तृतीय पर्वात अपभ्रंश भाषेचा विकास झाल्याचे मानले जाते. प्राकृत साहित्याचा हा अंतिम काल होय.

## प्राकृतची उत्पत्ति–

प्राकृत व्याकरणकारांनी प्राकृत शब्दाची उत्पत्ति 'प्रकृति' शब्दाचा अर्थ 'संस्कृत' असे मानून, प्राकृत भाषेची उत्पत्ति संस्कृतपासून झाल्याचे मानले आहे. संस्कृतच्या काही अलंकार–शास्त्राच्या टीकाकर्त्यांनी तद्भव आणि तत्सम शब्दात स्थित असणाऱ्या 'तत्' शब्दाचा संबंध संस्कृतशी लावून याच मताचे अनुकरण केले आहे. याविषयीची व्याकरणकारांची मते खालीलप्रमाणे दिसून येतात.

| | |
|---|---|
| १. प्रकृतिः संस्कृतं तत्र भवं तत आगतं वा प्राकृतम् । | ( हेमचंद्र 'प्रा. व्या.' ) |
| २. प्रकृतिः संस्कृतं तत्र भवं प्राकृतमुच्यते । | ( मार्कण्डेय 'प्राकृत सर्वस्वम्' ) |
| ३. प्रकृतिः संस्कृतम् तत्र भवत्वात् प्राकृतम् स्मृतम् । | ( प्राकृत चंद्रिका ) |
| ४. प्रकृतेः संस्कृतप्यास्तु विकृतिः प्रकृति मता । | ( षड्भाषा चंद्रिका ) |
| ५. प्राकृतस्य तु सर्वमेव संस्कृतं योनिः । | ( प्राकृत संजीवनी ) |
| ६. प्रकृतेर् आगतं प्राकृतम् । प्रकृतिः संस्कृतम् । | ( दशरूपक टीका ) |

या विविध व्याकरणकारांच्या मतानुसार प्राकृतही संस्कृतपासून उत्पन्न झाल्याचे सांगितले आहे. अर्थात् साहित्यात सुरक्षित असलेल्या प्राकृतचे जे रूप पाहावयास मिळते, यावरून प्राकृत ही संस्कृतची कन्या असल्याप्रमाणे वाटते. प्राकृतमधील ९५% शब्द संस्कृतशी मिळते जुळते आहेत. हिचा धातुकोश तर पूर्णतः संस्कृतवत् असून व्याकरण देखील संस्कृतसारखे आहे. अपभ्रंशादि भाषामध्ये ज्याप्रमाणे संस्कृतपासून स्वतंत्रपणे विभिन्नता आढळते त्याप्रमाणे प्राकृतमध्ये आढळत नाही साहित्यिक प्राकृत तर संस्कृतची सेविका असल्याप्रमाणे वाटते. म्हणूनच प्राकृतमध्ये तद्भव शब्द जास्त असून देशी शब्दाची कमतरता आहे.

परंतु भाषाशास्त्राच्या दृष्टीने वरील मत सुसगत वाटत नाही. हे मत अप्रामाणिक आणि विरुद्ध वाटते. कारण 'प्राकृत' या शब्दाचा अर्थ जो 'संस्कृत' असा केला आहे, तो अर्थ संस्कृतच्या कोणत्याही कोशामध्ये सापडू शकत नाही आणि जोपर्यंत प्राकृतचा अर्थ संस्कृत असा मिळू शकत नाही तोपर्यंत वरील मत ग्राह्य धरणे उचित ठरणार नाही. एवढेच नव्हे तर संस्कृत–प्राकृतमध्ये कार्य–कारण–भाव मुळीच दिसत नाही.[1]

या उलट प्राकृत हा शब्द 'प्रकृति' या शब्दापासून तयार झाला आहे. 'प्रकृति' याचा अर्थ नैसर्गिक, स्वाभाविक असाही होतो. काही विद्वानांनी 'प्रकृति' शब्दाचा अर्थ मूळ धर्म, मूळ स्थिति, मूळ स्वभाव, मूळ स्वरूप तथा मूळ कारण असा सांगितला आहे. या शिवाय 'प्रकृति' शब्दाचा 'जनसाधारण' असाही एक अर्थ घेतला आहे. म्हणूनच हरिगोविंददास शेठ यांनी 'प्राकृत्या स्वभावेन सिद्धं प्राकृतम्' अथवा 'प्रकृतीनां साधारणजनानाम् इदं प्राकृतम्' असा प्राकृतचा अर्थ केला आहे. काव्यालंकार टीकाकार नमिसाधूने देखील म्हटले आहे–

१. बेचरदास दोशी–जिनागम कथा संग्रह भूमिका पृ ४–५.




'प्राकृतेति । सकलजगज्जन्तूना व्याकरणादिभिरनाहितसंस्कारः सहजो वचन व्यापार' प्रकृतिः तत्र भवः सेव वा प्राकृतम् ।'[१]

वरील मतावरून स्पष्ट होते की प्राकृत म्हणजे स्वभावसिद्ध बोली भाषा असून तिच्यावर संस्कृतीचा संस्कार तथा व्याकरणाचे नियंत्रण झालेले नसते. प्राकृतचा एक अर्थ 'प्रजा' असा करून प्राकृत म्हणजे प्रजेची भाषा असेही म्हटले आहे. या उलट संस्कृत भाषा देवांची, पंडिताची, सुसंस्कृत लोकांची व व्याकरणाने शुद्ध असलेली भाषा मानली जात असून तिचा वापर राजदरबार, यज्ञशाळा या ठिकाणी केला जात असे. थोडक्यात आतापर्यंतच्या विवेचनावरून प्राकृत ही संस्कृतपासून उत्पन्न झाली असावी असा एक मत–प्रवाह दिसतो तर, दुसऱ्या मतप्रवाहानुसार प्राकृत ही सर्वसाधारण जनांची भाषा होय असे दिसते.

संस्कृतपासून प्राकृतची उत्पत्ती झाली असावी या प्रथम मतप्रवाहाचे खंडन आपणाला आणखी एक प्रकारे करता येते ते असे की इतिहास आणि भाषाशास्त्रानुसार कोणत्याही साहित्यिक भाषेचा विकास हा जनभाषेपासून होत असतो. परंतु जेव्हा जनभाषा लिहिली जाऊ लागते तेव्हा ती हळूहळू स्थिर होत जाते. ती संस्कृति, शासन, धर्म, ज्ञान, विज्ञान आणि कला यांचे वाहक बनण्यासाठी कोणत्या ना कोणत्या साहित्यिक भाषेचा आधार घेत असते. तिचे शब्दभांडार उच्च व समृद्ध होऊन व्याकरणगतरूप व्यवस्थित होते. परंतु पुनः तत्कालीन बोली भाषा व्याकरण नियमांची पर्वा न करता पुढे जाते. तिच्यात काही परिवर्तन, मिश्रण आणि विकार संभवतात व त्याच भाषेचे साहित्यिक रूप जनसाधारण लोकांना समजण्यास कठिण होते. जेव्हा साहित्यिक भाषेचा प्रभाव शिक्षित वर्गापर्यंतच मर्यादित राहतो तेव्हा साहित्यकार लोकप्रियतेच्या इच्छेने अथवा स्वत:च्या प्रभुत्वाचा पगडा पाडण्यासाठी तत्कालीन जनभाषेत लिहू लागतात. ती जनभाषा देखील पुनः साहित्यिक भाषा बनून व्याकरणांच्या नियमांनी जखडली जाते आणि क्रमशः दोहोत शैली, व्याकरण, शब्दभांडार, उच्चारण इत्यादीमध्ये फरक पडत जातो. अशा प्रकारचे हे रहाटगाडगे पूर्वीपासून चालत आलेले आहे. कोणत्याही सभ्य देशात कोणत्याही काळी बोली भाषा आणि साहित्यिक भाषा अशी भाषेची दोन रूपे संभवतात.[२] थोडक्यात प्राकृत बोली भाषेपासूनच संस्कृतला सुव्यवस्थित रूप प्राप्त झाले असावे किंवा 'संस्कृत प्राकृत भाषा एकमेकापासून वेगळ्या असून त्या एकाच काळी प्रचलित असाव्यात.' असे डॉ. गुणे यांचे मत आहे. अर्थातच हे मत अधिक ग्राह्य वाटते.

### प्राकृत भाषेचा विकास–

प्राकृत भाषेचा विकास आणि विस्तार पहात असताना आपणाला त्याविषयी काही विद्वानाची, व्याकरणकारांची, कवि-महाकवींची मते पडताळून पहावी लागतील. पिशेल या विद्वानाच्या मते काही व्याकरणकारानी प्राकृत शब्दाचे विश्लेषण प्राक्+कृत अर्थात् 'प्रथम तयार झालेली (भाषा)' असे म्हणून प्राकृतला संस्कृतपेक्षाही प्राचीन भाषा मानले आहे. आपल्या नैसर्गिक स्वरूपात ही भाषा वैदिक कालापूर्वीही अस्तित्वात होती. वैदिक भाषेला त्या काळी प्रचलित असणाऱ्या प्राकृत बोलीचे साहित्यिक रूप मानले जाते.[३] सर्व प्राकृत भाषांचे वैदिक व्याकरण आणि शब्दाचे अनेकविध ठिकाणी जे साम्य आहे ते संस्कृतमध्ये पाहावयास मिळत नाही. वैदिक संस्कृत आणि शिलालेखी प्राकृत *या दोन्ही भाषा जणु जुळ्या बहिणी आहेत. कारण त्या दोघींचा विकास वैदिक* युगातील बोलीभाषा व लोकभाषा याच्यापासून झाला आहे[४] ज्यावेळी लौकिक संस्कृत भाषा प्रचलित होती त्यावेळी साधारण लोकाची बोलीभाषा देखील विद्यमान होती. ही गोष्ट आपणाला काही संस्कृत नाटकातील प्राकृतभाषी पात्रांच्या उल्लेखावरून दिसून येते. मग असा प्रश्न उद्भवतो की, वैदिक संस्कृत आणि लौकिक संस्कृत




---

१. हरिगोविंददास सेठ–पाइअ सद्दमहण्णवो–भूमिका पृ. ४.
२. डॉ. हरदेव बाहरी– प्राकृत और उसका साहित्य
३. सरयूप्रसाद अग्रवाल– हिन्दी साहित्य कोश पृ. ४९२
४. वि. जे. चौकसी– कम्परेटिव प्राकृत ग्रामर पृ. ६




या दोन्ही तत्कालीन प्राकृत भाषापासून उत्पन्न झाल्या असाव्यात काय? आजकालच्या भाषा विद्वानांच्या मते तरी याच सिद्धांताला अधिक ग्राह्य मानल्याचे दिसते.

'गउडवहो' या प्राकृत महाकाव्याचा कवि (८ वे शतक) वाक्पतिराज हा देखील वरील मत आपल्या काव्यातील ९३ व्या गाथेवरून स्पष्ट करतो. तो म्हणतो–

सयलाओ इमं वाया विसंति एत्तोणेंति वायाओ । एंति समुद्दं चिय णेंति सायराओ च्चिय जलाइं ॥

अर्थात सर्व भाषा प्राकृत भाषेत प्रवेश करतात. या प्राकृत भाषेपासून पुनः सर्व उत्पन्न होतात सागरात पाणी प्रवेश करून पुनः सागरातूनच वाष्परूपाने ते बाहेर पडते.

प्राकृतपासून संस्कृतचा विकास झाला नाही, ही मान्यता आज मान्य झाली आहे. प्राकृत भाषा ही वास्तविक कृत्रिम आणि काव्याची भाषा वाटू लागण्याचे कारण असे की, कवींनी या भाषेला हवी तशी वाकवून तिचा काव्यात वापर केला आहे. परंतु पुढे हीच भाषा राजनीतीक अथवा धार्मिक इतिहासाच्या परंपरेमुळे ती साहित्यिक भाषा बनली. होस्फर, लास्सन, भांडारकर, याकोबोई इत्यादि विद्वान प्राकृतची उत्पत्ति संस्कृतपासून मानतात परंतु तसे मानणे भ्रमयुक्त ठरेल. प्राकृतचे मूळ संस्कृत नसल्याचे पिशेल या विद्वानाने सप्रमाण सिद्ध करून दाखविले आहे.

भाषा विकासाच्या दृष्टीने प्राकृतचा संकुचित अर्थच घेतला जातो. कारण इ. स. ६०० पूर्व पासून १००० इसवी सनापर्यंत सर्व भाषांना प्राकृत म्हणूनच संबोधिले आहे. या कालातील भाषांचे प्रारंभिक प्राकृत, मध्यकालीन प्राकृत आणि उत्तरकालीन प्राकृत असे तीन विभाग पाडले गेले आहेत. आरंभीच्या प्राकृतमध्ये पाली आणि शिलालेखी प्राकृत येतात, मध्यकालीन प्राकृतमध्ये महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, अर्धमागधी, पैशाची या भाषांचा समावेश होतो तर उत्तरकालीन प्राकृतमध्ये नागर, उपनागर व्राचड या अपभ्रंश भाषाची गणना केली जाते.

प्राचीन काळामध्ये संस्कृतचा प्रभाव अधिक होता. परंतु नंतर असा एक काळ आला की, संस्कृतचा वापर सर्वसामान्य लोकात राहिला नाही. सर्वप्रथम अशोकाच्या शिलालेखात व शिक्क्यामधून संस्कृत भिन्न प्राकृतचे स्वरूप आपणास पाहावयास मिळते आणि त्याचबरोबर धार्मिक ग्रंथातून पाली आणि अर्धमागधी प्राकृत साहित्य संपन्न झाल्याचे दिसते. तत्कालीन सामाजिक, राजनीतीक, धार्मिक वादींचे तितके प्राकृतशी साम्य धारण करणारे नाही. कारण त्याकाली प्राकृत भाषा जनसाधारण लोकांची होती, परंतु संस्कृत जनतेची भाषा राहिली नव्हती.

**प्राकृतचे भेद–**

प्राकृत भाषेला जसजसे साहित्यिक रूप प्राप्त होऊ लागले तसतशी या भाषेतील ग्रंथरचना देखील वाढू लागली. साहित्यातील विविध अंगाबरोबरच या भाषेचे व्याकरण देखील लिहिले जाऊ लागले. प्राचीन व्याकरणकारांच्याकडून वेळोवेळी प्राकृत भाषेचे व्याकरण लिहिले गेले. यातील काही महत्त्वाचे व्याकरण ग्रंथ आपणाला पुढीलप्रमाणे आढळतात. १. प्राकृत प्रकाश – वररुचि, २. प्राकृत लक्षण – चंड, ३. प्राकृत व्याकरण – हेमचंद्र, ४. प्राकृत संजीवनी – वसंतराज, ५. प्राकृत कामधेनु – लंकेश्वर, ६. प्राकृत कल्पतरु – रामतर्कवागीश, ७. प्राकृतमंजरी – कात्यायन, ८. प्राकृत सर्वस्व – मार्कण्डेय, ९. प्राकृत व्याकरण – शुभचंद्र, १०. संक्षिप्तसार प्राकृतवाद – क्रुमदीश्वर इत्यादि.

या विविध व्याकरणकारांनी प्राकृत भाषेचे भेद आपापल्या ग्रंथातून उल्लेखित केले आहेत. प्राचीन प्राकृत व्याकरणकार वररुचीने आपल्या प्राकृत–प्रकाश व्याकरणामध्ये महाराष्ट्री, पैशाची, मागधी आणि शौरसेनी यांचा उल्लेख केला आहे. हेमचंद्राने या चार भाषांच्याशिवाय चूलिका, पैशाचिक, आर्षअर्धमागधी आणि अपभ्रंशाचा

उल्लेख केला आहे. त्रिविक्रम, लक्ष्मीधर, सिंहराज, नरसिंह यानी हेमचंद्राचेच अनुकरण केले आहे. त्रिविक्रमाशिवाय इतरांनी शौरसेनी, मागधी, पैशाची, चूलिका, पैशाची आणि अपभ्रंश भाषा यांनाच षड्भाषा असे म्हटले आहे. मार्कण्डेयाने या सहा भाषांच्या ठिकाणी सोळा भाषांचा उल्लेख केला आहे. त्याच्या मतानुसार प्राकृतचे भाषा, विभाषा, अपभ्रंश आणि पैशाच या चार भागात विभाजन केले आहे. भाषा विभागात महाराष्ट्री, शौरसेनी, प्राच्या, आवंति, मागधी, दाक्षिणात्य व बाह्लीकी; विभाषामध्ये शाकारी, चांडाळी, शाबरी, आभीरीकी, ढक्की इत्यादीचा समावेश आहे. अपभ्रंश भाषेत नागर, उपनागर, व्राचड व पैशाची मध्ये कैकय, शौरसेन आणि पांचाल इत्यादि भाषांची गणना केली आहे. रामतर्कवागीश व पुरुषोत्तम यांनी मार्कण्डेयाच्याच मताला मान्यता दिली आहे.

प्राकृत भाषेचे विविध व्याकरणकारांनी सांगितलेले हे वर्गीकरण तितकेसे स्पष्ट तथा उचित वाटत नाही. प्राचीन प्राकृत, मध्यवर्ती प्राकृत व आर्वाचीन प्राकृत असे कालभेदानुसार केलेले वर्गीकरणही परिपूर्ण वाटत नाही. म्हणून प्राकृतचे सुव्यवस्थित विभाजन आपणाला पुढीलप्रमाणे करता येईल.

१. **शिलालेखी प्राकृत**— अशोककालीन शिलालेख व ताम्रपटात आढळणारी प्राकृत.

२. **धार्मिक प्राकृत**— बौद्ध धार्मिक प्राकृत, पाली, जैनांची अर्धमागधी, याशिवाय जैन महाराष्ट्री तथा जैन शौरसेनी या भाषांचा समावेश होतो.

३. **व्याकरणकारांची प्राकृत**— वररुचि तथा भरतापासून मार्कण्डेय, रामतर्कवागीश या व्याकरणकारांनी उल्लेखिलेल्या प्राकृत भाषा तथा विभाषा.

४. **साहित्यिक प्राकृत**— यात महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, पैशाची व अपभ्रंश साहित्यिक भाषांचा समावेश होतो.

५. **नाटकीय प्राकृत**— भास अश्वघोषापासून नंतरच्या नाटककारापर्यंतची भाषा यात प्राच्या, आवंती, ढक्की, शकारी, चांडाळी यांचा समावेश होतो.

६. **व्यावहारिक तथा मिश्र संस्कृत**— संस्कृतचे प्रकृतीभूतरूप उदा.— महाभारत पुराणांची व्यावहारिक संस्कृत बौद्धांची मिश्र संस्कृत तसेच बौद्ध मिश्र संस्कृत व जैनांचे काही ग्रंथ.

स्थूलमानाने प्राकृत भाषांचे सहा प्रमुख प्रकार पाडले आहेत. *१. मागधी (अर्धमागधी) प्राकृत, २. महाराष्ट्री प्राकृत, ३. शौरसेनी प्राकृत, ४. पैशाची प्राकृत, ५. चूलिका पैशाची प्राकृत, ६. अपभ्रंश प्राकृत.*

जैन आगम व आगमेतर साहित्याशी निगडित असणाऱ्या अशा अर्धमागधी, महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी व अपभ्रंश याच भाषांचा याठिकाणी सविस्तरपणे विचार करण्यात आला आहे. इतर भाषांची सविस्तर माहिती याठिकाणी देणे उचित ठरणार नाही.

## अर्धमागधी

जैन आगमाची भाषा अर्धमागधी भाषा म्हणून ओळखली जाते. समवायांगसूत्र, व्याख्याप्रज्ञप्ति सूत्र, औपपातिक सूत्र या प्राचीन जैन ग्रंथांची भाषा अर्धमागधी भाषा असल्याचे दिसते. बौद्धानी त्रिपिटकाच्या भाषेला ज्याप्रमाणे 'पाली' म्हटले आहे, तसेच प्राचीन जैन आगम ग्रंथातील भाषा 'अर्धमागधी' असल्याचे मानले आहे. भ. महावीरांनी आपला हितोपदेश याच अर्धमागधी भाषेत दिला आणि त्यांच्या गणधरांनी याच भाषेद्वारे सूत्र ग्रंथांची रचना केली.[1] अर्धमागधी भाषेला आर्ष अर्थात् 'ऋषीची भाषा' असे म्हटले आहे. हेमचंद्राने आपल्या प्राकृत व्याकरणात आर्ष भाषेचा उल्लेख करुन, व्याकरणाचे सर्व नियम आर्ष भाषेला लागू नाहीत, कारण तिच्यात

१. " अत्थं भासइ अरिहा, सुत्तं गथंति गणहरा निउणं " (आवश्यकनिर्युक्ति)

अनेक अपवाद असल्याचे सांगितले आहे. त्रिविक्रमाने प्राकृत शब्दानुशासनमध्ये आर्ष व देशी भाषा या रूढीगत असून त्यांना व्याकरणाची आवश्यकता नसल्याचे म्हटले आहे. रुद्रटाच्या काव्यालंकारावर टीका लिहीत असताना नमिसाधूने आर्ष भाषेला अर्धमागधी म्हणून ती देवांची भाषा असल्याचे सांगितले आहे. तसेच आबालवृद्धापासून अशिक्षित लोकांसहित सर्वांना आपला हितोपदेश समजावा म्हणून या भाषेचा स्वीकार केला असावा. एवढेच नव्हे तर आर्य, अनार्य, पशु, पक्षी यांच्यापर्यंत ही भाषा समजू शकते, पोहचू शकते. म्हणूनच तिचा वापर भगवंतांनी केला असावा. यावरून हे सिद्ध होते की, बौद्धांनी मागधी भाषेला सर्व भाषाचे मूळ मानले आहे त्याचप्रमाणे जैनांनी अर्धमागधीला व व्याकरणकारांनी आर्ष भाषेला मूळ भाषा म्हणून स्वीकृती दिली आहे. या अर्धमागधी-पासून काही अन्य भाषा अथवा बोली भाषा यांचा उद्‌गम झाला असावा.

अर्धमागधी भाषा प्रामुख्याने मगध आणि शूरसेन यांच्यामधील प्रदेशात बोलली जात होती. तिचा काल इ. स. २ रे शतक मानला जातो. काहींच्या मते अर्धमागधीत मागधीची वैशिष्ठ्ये अधिक आढळतात, ती मागधाच्या अर्ध्या भागात बोलली जात होती, म्हणून तिला अर्धमागधी म्हटले असावे. काही विद्वानांच्या मतानुसार अवध व भोजपुर या प्रदेशाची तत्कालीन भाषा अर्धमागधी होती.

भरताने नाटचशास्त्रात (१७.४८) मागधी, अवंती, प्राच्या, शौरसेनी, बाल्हीका, दाक्षिणात्या या भाषांच्या बरोबर अर्धमागधी भाषेला सात भाषेत असल्याचे मानले आहे. निशीथचूर्णीकाराने १८ भाषेत अर्धमागधीचा समावेश केला आहे. हेमचंद्राने जैन आगमाची भाषा अर्धमागधी असल्याचे मानले असले तरी, तिच्यात वेगळी वैशिष्ठ्ये सांगितली नाहीत. मार्कण्डेयाच्या मतानुसार शौरसेनीजवळ असल्यामुळे हिला अर्धमागधी म्हटले असावे. काही संस्कृत नाटकातून नोकर, राजपुत्र, श्रेष्ठी इत्यादि पात्रे अर्धमागधी भाषा बोलत असताना दिसतात. या भाषेची काही ठळक वैशिष्ठ्ये खालीलप्रमाणे–

दोन स्वरातील मध्य असंयुक्त 'क' च्या ठिकाणी 'ग' चा व अनेक त चा य होताना दिसतो. उदा.– प्रकल्प–पगप्प, आकाश–आकास, श्रावक–सावग, लोक–लोग, आकृति–आगई इत्यादि. काही ठिकाणी दोन स्वरातील असंयुक्त ग कायम राहतो. काही ठिकाणी त्याचा क व ग होतो, काही ठिकाणी च व ज च्या ठिकाणी त झालेला दिसतो. नाराच–नारात, प्रवचन–पावतण इत्यादि. काही ठिकाणी त तसाच राहताना दिसतो तर काही ठिकाणी 'द' चा त होताना दिसतो. याशिवाय काही शब्दात बऱ्याच ठिकाणी 'न' चा ण झाला असला तरी पुन: 'न' तसाच राहिलेलाही दिसतो. अर्धमागधीत मागधीप्रमाणे विसर्गाऐवजी 'ए' होतो. दंत्य व्यंजनाच्या जागी मूर्धन्य ध्वनि वापरण्याची प्रवृत्ति या भाषेत अधिक दिसते. याशिवाय अर्धमागधीची अनेक सूक्ष्म लक्षणे आहेत त्या सर्वांचा येथे विचार करणे उचित ठरणार नाही.

सारांशाने असे म्हणता येईल की, अर्धमागधीचा उगम इ. स. २ च्या शतकात झाला असून, भगवान महावीरांनी आपला हितोपदेश सर्वसामान्य जनांना कळावा म्हणून तिचा उपयोग केलेला दिसतो. याच भाषेला विविध वाचनामधून ग्रांथिक स्वरूप प्राप्त झाले असावे

**शौरसेनी–**

मथुरेच्या आसपासच्या भागाला शूरसेन म्हणत होते या शूरसेन प्रांताची भाषा म्हणजेच शौरसेनी भाषा होय. अर्थात् शौरसेनी भाषा मध्यप्रदेशाची भाषा असावी. ऐतिहासिकदृष्टचा शौरसेनी उत्तरकालीन वैदिक भाषा, संस्कृत व साहित्यिक पाली यांची उत्तराधिकारणी असावी शौरसेनी भाषेचा उल्लेख भरताने ( इ. स. ३ रे शतक ) आपल्या नाटचशास्त्रात केला असून ही भाषा महिला, सखी याच्यासाठी उपयुक्त असल्याचे म्हटले आहे. हेमचंद्राने आर्ष प्राकृत नंतर शौरसेनीचा उल्लेख केला असून, त्यानंतर मागधी व पैशाची यांचा उल्लेख

केला आहे. साहित्यदर्पणात सुशिक्षित स्त्रिया, बालक, नपुसक, ज्योतिषी, रोगी यांचीही भाषा असल्याचे म्हटले आहे. मार्कण्डेयाने प्राकृत सर्वस्वमध्ये शौरसेनीपासूनच प्राच्य भाषांचा उद्‌भव सांगितला आहे. लक्ष्मीधराने षड्भाषाचंद्रिकेत तर वररुचीने प्राकृत भाषेत या शौरसेनी भाषेचा उल्लेख केला आहे. वररुचीने शौरसेनीच्या काही नियमांचा उल्लेख करून इतर नियम महाराष्ट्रीप्रमाणे जाणावेत असे म्हटले आहे.

शौरसेनीचे लौकिक साहित्य केवळ नाटकातून पाहावयास मिळते ही दुर्भाग्याची गोष्ट म्हणावी लागेल' शौरसेनी ही प्रामुख्याने दिगंबर जैन आगम ग्रंथाची भाषा असून तिचा वापर जास्तीत जास्त पद्यात्मक स्वरूपात झाला आहे. पिशेल यांनी याच दिगंबर जैन आगम भाषेला जैन शौरसेनी असे म्हटले आहे. हर्मन जेकोबी यांनी या भाषेला *'क्लासिकल पूर्व' म्हटले आहे. अश्वघोषाने ( इ. स. प्रथम शतक ), भासाने ( इ. स. ३ रे शतक )* संस्कृत नाटकात शौरसेनीचा पद्यासाठी उपयोग केलेला दिसतो. शुद्रकाच्या मृच्छकटिकात व मुद्राराक्षसमध्ये तसेच राजशेखराच्या कर्पूरमंजरीत शौरसेनीचे स्वरूप पाहावयास मिळते. संस्कृतपासून शौरसेनी अधिक प्रभावित असल्यामुळे तिच्यात प्राचीन कृत्रिम रूपांची अधिकता दिसते.

शौरसेनी भाषेची काही ठळक वैशिष्ठ्ये आपणास पाहावयास मिळतात ती अशी– शौरसेनीत त च्या ठिकाणी द व थ च्या ठिकाणी ध झालेला दिसतो. ( भवति–भोदि ) र्य च्या ठिकाणी य्य आणि ज्ज होतो उदा.– आर्य–अय्य, अज्ज; सूर्य=सुय्य, सुज्ज. पंचमीच्या वचनात दो व दु या प्रत्ययांचा वापर केलेला आढळतो. ति व ते प्रत्ययस्थानी दि व दे होतो. उदा.– हसदि, हसदे, रमदि, रमते इत्यादि. त्वा प्रत्ययाच्या ठिकाणी इअ, दूण आणि त्ता होतात जसे पठित्वा–पढिअ, पढिदूण, पढित्ता इत्यादि. याशिवाय आणखी काही सूक्ष्म नियम देखील पाहावयास मिळतात.

थोडक्यात शौरसेनीचा उगम इ. स. प्रथम शतकात झाला असून, ती दिगंबर जैन आगम साहित्याची भाषा असल्याचे दिसते. दिगंबराचे प्रवचनासार, नियमसार, रयणसार, पंचास्तिकाय, द्रव्यसग्रहादि ग्रंथ याच भाषेत आहेत. अनेक संस्कृत नाटकातून काही गौण पात्रांच्यासाठी या भाषेचा वापर केला असून, तिचे पद्यात्मक स्वरूप पाहावयास मिळते.

**मागधी–**

मागधी ही मगध अर्थात् बिहार राज्याची भाषा होती. अर्धमागधी, शौरसेनी, महाराष्ट्रीप्रमाणे मागधी भाषेत स्वतंत्रपणे ग्रंथरचना झालेली आढळून येत नाही. मात्र संस्कृत नाटकातून मागधीचा वापर अधिक प्रमाणात केलेला आढळतो. भ. बुद्धानी आपला उपदेश याच भाषेत दिल्याचे मानले आहे. मागधीच्या प्राचीन रूपाचे नाव पाली आहे. अशोकाच्या काळी ही देशभाषा असावी. अशोक शिलालेखात हिची उदाहरणे पहावयास मिळतात.

व्याकरणकाराच्या मागधीविषयी बराच मतभेद आढळतो. मार्कण्डेयाच्या मतानुसार ही राक्षस, भिक्षु, क्षपणक व चेट याची भाषा आहे तर, भरताच्या मतानुसार ती अंतपुररक्षक, अश्वरक्षक, आपत्तिग्रस्त नामक याची भाषा असावी. शूद्रकाच्या मृच्छकटिकात संवाहक, शकार, दास, वसंतसेनचा नोकर, वर्धमानक, रोहसेनादि पात्रे *मागधी भाषेत बोलत असताना आढळतात.* मुद्राराक्षसात जैन साधू, दूत, चाडाल तर शकुंतला नाटकात प्रहरी, धीवर तसेच शकुंतलेचा छोटा पुत्र सर्वदमन हे मागधीत बोलतात. याशिवाय वेणीसंहार, ललित विग्नहराज इत्यादि नाटकातील काही पात्रे मागधीत बोलतात.

वररूचि हेमचंद्र यांनी मागधी नियमांचे वर्णन करून बाकीचे शौरसेनीप्रमाणे असल्याचे म्हटले आहे. पुरुषोत्तमाने मागधी भाषेतच शाकारी, चांडाळी व शावरी भाषा समाविष्ट केल्या आहेत. पिशल यांच्या मतानुसार मागधी ही खास एक भाषा नसून तिच्या बोली भाषा भिन्न भिन्न ठिकाणी प्रचलित होत्या.

मागधी ही प्रथम शतकातील भाषा मानली असून तिचे काही ठळक वैशिष्टचे पुढीलप्रमाणे दिसतात. १. र च्या ठिकाणी सर्वत्र ल झालेला दिसतो उदा. :– नर-नल कर-कल, २ श, ष आणि स यांच्या ठिकाणी तालव्य 'श' होतो उदा. :– शोभण-शोहण, पुरुष-पुलिश, सारस-शालश इत्यादि. ३ संयुक्त ष व स च्या ठिकाणी दन्त्य सकार होतो. उदा. :– शुष्क-शुस्क, कष्ट-कस्ट, बृहस्पति-बृहस्पदि. ४ ट्ट व ष्ट च्या ठिकाणी स्ट होतो. ५ स्थ, र्थ च्या ठिकाणी 'स्त' होतो. ६ ज, द्य, य यांच्याऐवजी 'य' होतो, वगैरे.

सारांशाने मागधीचे प्राचीन रूप अशोक शिलालेखात पाहावयास मिळत असून, या भाषेत स्वतंत्र ग्रंथरचना नाही. अनेक संस्कृत नाटककारानी आपल्या नाटकातून गौण पात्रांच्यासाठी या भाषेचा वापर केला आहे.

## महाराष्ट्री–

प्राकृत काव्याची भाषा महाराष्ट्री भाषा म्हणून ओळखली जाते. ती महाराष्ट्रात प्रचलित असल्यामुळे तिचे महाराष्ट्री असे नाव पडले आहे. सेतुबंध, गाथासप्तशती, गउडवहो, कुमारपालचरितसारखे ग्रंथ या महाराष्ट्री भाषेची उत्कृष्ट उदाहरणे आहेत. भरताने आपल्या नाटचशास्त्रात या भाषेचा उल्लेख केला नाही. अश्वघोष भास यांच्या नाटकातून महाराष्ट्रीचा उपयोग केला आहे. वररूचीने शौरसेनीची लक्षणे सांगून 'शेषं महाराष्ट्रीवत्' असे म्हटले आहे. महाकवि दंडीने काव्यादर्श मध्ये महाराष्ट्रीची उत्कृष्टता प्रकट केली आहे.

महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः । सागरः सूक्ति रत्नानां सेतुबन्धादि यन्मयम् ॥

संस्कृत नाटकात सर्वप्रथम कालीदासाने आपल्या अभिज्ञान शाकुंतल नाटकात या भाषेचा वापर केला आहे. ध्वनिपरिवर्तनाच्या दृष्टीने महाराष्ट्री प्राकृत अति समृद्ध आहे असे डॉ. पिशल यांचे मत आहे. पद्यासाठी महाराष्ट्री प्राकृत भाषा प्रसिद्ध आहे. नाटकातील उच्च स्त्रिया शौरसेनीमध्ये बोलत असल्या तरी, गीत महाराष्ट्रीमध्ये गात असताना दिसतात. अधिकाधिक लालित्यासाठी ही भाषा श्रुति मधुर बनलेली दिसते. हालाची सत्तसई, जयवल्लभाचे वज्जालग्ग इत्यादि महाराष्ट्री प्राकृतमधील सर्वोत्कृष्ट मुक्तक काव्य आहे. हरमन जॅकोबी यांनी सेतुबंधादि ग्रंथातील भाषेला जैन महाराष्ट्री असे म्हटले आहे. डॉ. मनमोहन घोष यांच्या मते महाराष्ट्री ही शौरसेनीची उत्तरकालीन अवस्था असावी. हॉर्नळे यांच्या मते महाराष्ट्राचा अर्थ 'महान राष्ट्र' असा असून विशाल राष्ट्राची जो भाषा ती महाराष्ट्री असे म्हटले आहे.

महाराष्ट्री भाषेची काही ठळक लक्षणे पुढीलप्रमाणे आढळतात– १ क, ग, च, ज, त, द, प, य, व यांचा प्रामुख्याने लोप होतो. २ ख, घ, ध, थ, फ व भ याच्या ठिकाणी 'ह' चा उपयोग होतो. ३ श, ष चा सर्वत्र 'स' होतो इत्यादि.

थोडक्यात महाराष्ट्री ही प्राकृतमधील एक उत्कृष्ट भाषा असून प्राकृत काव्य व मुक्तकासाठी तिचा वापर केला आहे. महाराष्ट्री भाषेचे गुणगान अनेक व्याकरणकार विद्वानांनी गायिले आहे.

## अपभ्रंश भाषा

अपभ्रंश ही मध्यभारतीय आर्यभाषा विकासातील अंतिम अवस्था मानली जाते. मध्ययुगीन भारतीय आर्यभाषा व आधुनिक आर्यभाषा यांच्यामधील दुवा म्हणजेच अपभ्रंश भाषा मानली जाते. हिंदी, बंगाली, मराठी, गुजराथी इत्यादि भाषामधील ती प्रमुख पार्श्वभूमी आहे. बहुतेक आधुनिक आर्यभाषांना या अपभ्रंशाच्या स्थितीतून बाहेर पडावे लागले आहे. आधुनिक आर्यभाषा अर्थात गुजराथी, मराठी, हिंदी, पंजाबी, बंगाली, सिंधी, आसामी, उडिया इत्यादि भाषांची अपभ्रंश भाषा ही जननी आहे. या सर्व भाषांचा अभ्यास करण्यासाठी या अवस्थेचा




अभ्यास करणे आवश्यक आहे, तसे पाहता अपभ्रंश या शब्दाचा वापर भाषा विशेषत्वाच्या दृष्टीने सदैव कोठेच केलेला दिसून येत नाही. इसवी सन दुसऱ्या शतकापूर्वी या शब्दाचा विभिन्न अर्थात् वापर केलेला आढळून येतो. प्राकृतची अंतिम अवस्था व साहित्याची एक प्रमुख भाषा म्हणून येथे अपभ्रंश भाषेचा विचार विस्ताराने केला आहे

## अपभ्रंश शब्दाचा वापर–

अपभ्रंश शब्दाचा अर्थ साधारणपणे भ्रष्ट, च्युत, स्खलित, विकृत अथवा अशुद्ध असा करण्यात येतो. भाषेच्या सामान्य मानदंडानुसार तो शब्दरूपापासून बाजूला आहे ते अपभ्रंश होय. या शब्दाचा विविध अर्थाने केलेला वापर आपणाला विविध ग्रथकाराच्या ग्रंथातून देखील पाहावयास मिळतो. सर्वप्रथम अपभ्रंश शब्दांचा वापर पतंजलिपूर्व ( इ. स. पूर्व २-३ शतक ) काही शताब्दीमध्ये पाहावयास मिळतो. महाभाष्यकार पतंजलीने स्वत. अपभ्रंश शब्दाचा वापर केला आहे. भरताने नाटचशास्त्रात संस्कृत, प्राकृत व देशभाषा म्हणून या भाषेचा उल्लेख केला आहे. तसे पाहता भरताच्या काळी अपभ्रंश भाषेला विशेष महत्व प्राप्त झालेले दिसून येत नाही. मात्र भरताने नाटककारासाठी विभिन्न प्रदेशातील विभिन्न पात्रांची भाषा कोणती आहे याची माहिती दिली आहे. गंगा व सागर यामधील भाषा ' एकार बहुला ' असून, हिमालय सिंधू व सोवीर प्रदेशाची भाषा ' उकार बहुला ' अर्थात अपभ्रंश असावी. विंध्य व सागर यांच्या मध्यातील ' नकार बहुला ' भाषा होती. तर चर्मवती व अर्बुदतटीय प्रदेशातील भाषा 'टकार बहुला' होती.[1] दंडीच्या मतानुसार आभीरादि भाषा अपभ्रंश भाषा म्हणविली जात होती. सुमारे ६ व्या शतकात अपभ्रंश भाषेचा विशेष रूपाने उल्लेख केलेला आढळून येतो. आचार्य भामहाने अपभ्रंश शब्दाचा वापर काव्योपयोगी भाषा तथा काव्याचे एक विशेषरूप म्हणून केला आहे. चंडाने 'प्राकृतलक्षण' या ग्रंथात अपभ्रंश शब्दाचा वापर केला आहे. दंडीने आपल्या ' काव्यादर्श ' मध्ये भाषेचे संस्कृत, प्राकृत अपभ्रंश व मिश्रित असे चार भेद सांगितले आहेत. कुवलयमाला कर्ता उद्योतनसूरि यांनी अपभ्रंश भाषेची मुक्तकंठाने स्तुति केली आहे. रूद्रटाने ' काव्यालंकार ' ग्रंथात भाषा संस्कृत, प्राकृत, मागधी, शौरसेनी, पैशाची व अंतिम अपभ्रंश या सहा भागात विभाजित केले आहे. याशिवाय पुष्पदंताने महापुराणात, राजशेखराने ' काव्य मीमासा' मध्ये, रुद्रटाने 'काव्यालंकारात,' भोजराजाने 'सरस्वती कंठाभरणात' या भाषेचा उल्लेख केला आहे. यांच्याशिवाय मम्मट, पृथ्वीधर, मार्कंडेय, रससर्वस्वकार, विष्णूधर्मोत्तरकर्ता, हेमचंद्र, नारायण, अमरचंद, लक्ष्मीधर, नाटचदर्पणकार, पिशेल, ग्रियर्सन, सुनीतिकुमार चटर्जी व मुनि जिनविजय या विद्वानांनी अपभ्रंश भाषेविषयी आपले मौलिक विचार मांडले आहेत.

## अपभ्रंश भाषेचा विकास–

अपभ्रंश भाषेचा विकास नक्की केव्हापासून सुरू झाला हे सांगणे कठीण आहे. ढोला–मारू रा दूहा संपादकानुसार अपभ्रंश भाषेचा काळ विक्रम दुसऱ्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंत मानला जातो. श्यामसुंदरदास यांच्या मते अपभ्रंशाची बीजे इ. स. पूर्व दुसऱ्या शतकात दिसत असून ती प्राकृतमध्ये उपलब्ध होती. मात्र १२ व्या शतकाच्या मध्यंतरामध्ये अपभ्रंशाचा अस्त व आधुनिक भाषाचा उदय झाल्याचे ते मानतात. देवेंद्रकुमार याच्या मतानुसार इ. स ३ ऱ्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंत अपभ्रंशाचा काळ मानण्यात आला आहे. महाकवि कालिदासाच्या *विक्रमोर्वशीय या नाटकातील चतुर्थ अंकात अपभ्रंश दोहे पहावयास मिळतात.* परंतु त्यांच्या प्रामाणिकतेविषयी विद्वानांच्यात मतभेद आहेत. एस. पी. पंडित, ज्यूल ब्लाक, हर्मन जेकोबी हे ही गोष्ट अमान्य करतात तर, डॉ ए. एन. उपाध्ये, डॉ. तगारे त्याची प्रामाणिकता सिद्ध करतात. सुनीतिकुमार चटर्जी यांनी अपभ्रंशाचा काळ इ. स. ४०० ते १००० इ. स. इतका मानला आहे. याशिवाय डॉ. धीरेंद्र वर्मा, डॉ.

---

१. भरत नाटचशास्त्र गाथा ५८ ते ६२.

उदयनारायण तिवारी, डॉ. हजारी प्रसाद इत्यादि विद्वान अपभ्रंशाचा उदयकाळ ५ ते ६ व्या शतकापासून मानतात. गुलेरी हा काल विक्रम ७ व्या शतकापासून ११ व्या शतकापर्यंत मानतात तर राहुलजी सहाव्या शतकाला प्राकृत आणि अपभ्रंशाची सीमा रेखा मानतात.

वरील सर्व विद्वानाच्या मनांचा निष्कर्ष आपणाला थोडक्यात असा काढता येईल की अपभ्रंशाचा प्रारंभकाळ चौथे शतक असून पाचव्या शतकात या भाषेचा वापर काव्य भाषा म्हणून होऊ लागला होता. सहाव्या शतकात या भाषेला शिष्ट समाजात आदराचे स्थान मिळू लागले होते. धरसेनाचा वल्लभीचा शिलालेख याचा दाखला म्हणून घेता येईल. त्यानंतर ६ ते १२ शतकापर्यंत या भाषेला उत्तम प्रकारचा साहित्यिक दर्जा प्राप्त झाला होता. साधारणपणे १३ व्या शतकात मात्र हीच अपभ्रंश भाषा वेगवेगळ्या देशीभाषेत परिणत झाली.

राजशेखराने आपल्या 'काव्य मीमांसा' ग्रंथात अपभ्रंश भाषेचे विस्तार क्षेत्र संपूर्ण मरुभूमि, टक्क आणि भादानक हा प्रदेश सांगितला आहे.[1] यावरून राजशेखराच्या काळी अपभ्रंश भाषेचा प्रसार राजस्थान, पंजाब, सौराष्ट्र, गुजरात व संबंध पश्चिमोत्तर भागात झालेला दिसून येतो. सुमारे ९ व्या शतकात या भाषेचा प्रचार हिमालयाच्या पायथ्यापासून गोदावरीपर्यंत व सिंधपासून ब्रह्मपुत्र नदीपर्यंत झालेला दिसतो. राहुल यांच्या मते सरहपा व सवरपा हे बिहार-बंगालचे रहिवासी असून, अब्दुर्रहमान याचा जन्म तेथे झाला होता. स्वयंभू व कनकामर हे बहुधा अवधी व बुंदेली क्षेत्रातील होते. हेमचंद्र व सोमप्रभ हे गुजराथमधील रसिक व आश्रयदाते. यांच्यामुळे मान्यखेट ( मालखेड दक्षिण हैद्राबाद ) पर्यंत अपभ्रंश ग्रंथकार पसरले होते. यावरून अपभ्रंश भाषेचा विस्तार हिमालयापासून गोदावरी व सिंधूपासून ब्रह्मपुत्रेपर्यंत झाला होता हे स्पष्ट दिसते.

### अपभ्रंश भाषेचे भेद—

आजकाल अपभ्रंश भाषेच्या भेदाविषयी अनेक मतमतांतरे पडलेली आपणाला आढळून येतात. परंतु प्राचीन व्याकरण ग्रंथातून मात्र असा फरक आढळत नाही. त्यानंतर रुद्रटाने 'काव्यालंकारात' देश भेदानुसार अपभ्रंशाचे भेद दाखविले आहेत. अपभ्रंशाचे विभाजन उत्तरवर्ती नमिसाधु, रामचंद्र, गुणचंद्र, पुरुषोत्तम, रायतर्क वागीश, क्रमदीश्वर, शारदातनय इत्यादींनी केले आहे. १२ व्या शतकातील नमिसाधूने अपभ्रंशाचे उपनागर, आभीर, ग्राम्य असे तीन भेद केले आहेत. पुरुषोत्तमाने नागरक, व्राचड आणि उपनागरक असे भेद केले असून, १३ व्या शतकातील शारदातनयाने नागरक, उपनागरक आणि ग्राम्य असे तीन भाग कल्पिले आहेत. १७ व्या शतकातील मार्कण्डेय याने नागर, उपनागर व व्राचड असेच तीन भागात विभाजन केले आहे.

वरीलप्रमाणे अपभ्रंशाचे विविध प्रकारे विभाजन केलेले दिसून तर येतेच. परंतु त्याचबरोबर अपभ्रंश या शब्दाला प्राकृत-अपभ्रंश ग्रंथातून अवब्भंस, अवहंस, अवहत्थ, अवहट्ट, अवहट या विविध नावानी संबोधिले आहे. या अपभ्रंश शब्दाचा उल्लेख विद्यापतीने कीर्तिलता काव्यात, वंशीधराने प्राकृत पैंगल टीकेत, संदेश रासकात अब्दुर्रहमानाने, कुवलयमालेत उद्योतनसूरिने वेगवेगळ्या स्वरूपात केलेला दिसून येतो. नामवरसिंह यांच्यामते 'अवहत्थ, अवहंस, अवहट' इत्यादि अपभ्रंश तथा अपभ्रष्टाचे तद्भव रूप आहे.

### अपभ्रंश भाषेची ठळक वैशिष्ट्ये—

१. अपभ्रंश भाषेचे प्रथम आणि ठळक वैशिष्ट्य तथा लक्षण म्हणजे अकारान्त शब्दात जेथे प्रथमेत संस्कृतमध्ये विसर्ग व प्राकृतात ओ येतो तसेच दोन्हीत द्वितीय विभक्तीमध्ये जेथे अं येतो, अपभ्रंशामध्ये त्या सर्वांच्या ऐवजी 'उ' येतो. उदा.— रामु वणु इत्यादि. म्हणूनच नमिसाधूने या भाषेला उकारबहुला भाषा म्हणून संबोधिले आहे.

---

१. राजशेखर काव्यमीमांसा पृ. १२४.




धर्मवृद्धि, धर्ममार्गातील विविध संकटे यासबधीच्या कथा आहेत. खरोखरच कथासाहित्यातील हे एक अमूल्य असे रत्न आहे.

**२. तिलकमंजरी–** उपमितिभवप्रपंचा कथेनंतर संस्कृतमधील तिलकमंजरी कथेचा उल्लेख करण्यात येतो. या कथेची रचना धनपाल याने केली आहे. ग्रंथाचा रचनाकाल सुमारे इ. स. ९७० इतका मानला जातो. यात तिलकमंजरी विषयीची माहिती आहे. या कथाग्रंथाची भाषा सरळ, ओघवती, गुरस व ओजपूर्ण आहे.

**३. कथारत्नाकर–** हेमविजयगणि यांनी या ग्रंथाची रचना केली असून, त्याचा रचनाकाल इ. स. १६५७ मानला जातो. यातील काही कथा काल्पनिक आहेत. ही कृति संस्कृतमध्ये असून नैतिकतेच्या दृष्टीने अत्यंत महत्वाची अशी आहे. यात संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, पुरातन हिंदी व प्राचीन गुजराथीमधील उद्धरणांचा समावेश आहे.

**४. रत्नचूडकथा–** या कथेत अनीतपूरचा अन्यायी राजा व दुर्बुद्धि मंत्री याचा वृत्तात आहे. त्या नगरीत चोर व धूर्त याच्याशिवाय इतरांना स्थान नसल्याचे दिसून येते. धार्मिक व्यक्तींना मज्जाव होता. या मूळ कथानकात अनेक उपाख्यानांचा समावेश केला आहे. रोहक आपल्या विलक्षण बुद्धिचातुर्याने अवघड कार्य कसे सुलभ करतो याचे सुंदर विवेचन आहे. परदेशगमन करणाऱ्या रत्नचूड याला त्याच्या वडिलांनी दिलेला उपदेश देखील यात सुदररीत्या ग्रथित केला आहे.

**५. व्रतकथाकोष–** हा ग्रंथ श्रुतसागर यांनी लिहिला आहे. यात व्रतविषयक कथांचे संकलन करण्यात आले आहे. ही ग्रंथरचना इ. स. १६ व्या शतकातील असावी.

**६. अघटकुमारकथा–** याची रचना जिनकीर्ति यांनी केली असून, चंपकश्रेष्ठि कथानकाप्रमाणेच पथाच्या प्रयोगाने नायकाचा मृत्यू कसा टळू शकला याचे वर्णन आहे. याचा चार्लस क्राउस याने जर्मन अनुवाद देखील केला आहे. याची दोन पद्यमय संस्करणे देखील आहेत. रचनाकालाविषयी निश्चित माहिती मिळत नसून अंदाजे रचनाकाल १५–१६ वे शतक असावा.

**७. कामघटकथा–** या कथेला 'पापवुद्धि–धर्मबुद्धि' या दुसऱ्या नावाने देखील संबोधिले आहे. याची रचना जयविजयशिष्य मानविजय यांनी केली आहे. यातील कथानक तथा पात्रादि उपमितिभवप्रपंचाप्रमाणेच आहेत. राजा व मंत्री मुनि उपदेशावरुन कसे जागृत होतात व दीक्षाग्रहण करतात याचे यात सुंदर विवेचन आहे.

या उपर्युक्त कथाग्रंथाच्याशिवाय अंबडचरित्र, पाल गोपाल कथानक, महाबलसुदरीकथा, चंपकश्रेष्ठि कथानक इत्यादि संस्कृत कथा प्रसिद्ध आहेत.

**संस्कृत कथाकोष–**

संस्कृत कथाकोष हे कथासाहित्याचे महत्त्वाचे अग असून अनेक लघुकथासंग्रहाचा त्यात समावेश करण्यात आला आहे. विविध स्त्री–पुरुषांची वर्णने केली आहेत. या विभागामध्ये आपणाला हरिषेणाचा कथाकोष, धर्मपरीक्षा, कथाकोष, अंतरकथासंग्रह, सम्यक्त्व कौमुदी यांचा समावेश करता येईल

**१. कथाकोष–** हा कथाकोष एक अतिप्राचीन असा कथाग्रंथ मानला जात असून, त्याची रचना हरिषेण यांनी शके ८५३ मध्ये केली आहे. हा कथाग्रंथ संपूर्ण संस्कृतमय आहे. यात एकूण १५७ कथा असून त्यात चाणक्य, शकटाल, भद्रबाहू, वररूची, स्वामि कार्तिकेय या ऐतिहासिक पुरुषाची चरित्रे वर्णिली आहेत. या ग्रंथात काही प्राकृत शब्दांचाही वापर करण्यात आला आहे. बहुधा हा ग्रंथ या लेखकाने एखाद्या प्राकृत ग्रंथावरूनच लिहिला असावा. स्वतः लेखकाने या कथाग्रंथाला आराधनोद्धृत असे म्हटले आहे. आ. जिनसेनाप्रमाणेच हरिषेण पुन्नाट संघीय असून दोघांनाही आपली ग्रंथरचना वर्धमानपुरामध्ये केली असावी. या कथाग्रंथालाच बृहद् कथाकोष असे म्हटले आहे.

२. धर्मपरीक्षा– या ग्रंथाचा मूलाधार हरिभद्रसूरिकृत प्राकृत धूर्ताख्यान हा कथाग्रंथ असून त्याची रचना अमितगति यांनी केली आहे या ग्रंथात स्वतंत्र अत्यंत मौलिक अशीही अनेक कथानके आहेत. अन्य धर्मातील पौराणिक कथाची असत्यता, कृत्रिमता, असंभावना तथा असंबद्धता दाखविण्याचे कार्य या कथेंकडून करण्यात आले आहे. यात प्रामुख्याने मूर्खपणा व धूर्तपणा याविषयीची अनेक कथानके असून, सर्वात शेवटी खऱ्या धर्माची सत्यता पटवून देणे हाच मुख्य उद्देश आहे.

३. कथाकोष, आराधनाकथाकोष, पुण्याश्रवकथाकोष– या तिन्ही संस्कृत कथाग्रंथांची रचना अनुक्रमे प्रभाचंद्र, नेमिदत्त व रामचंद्र मुमुक्षु यांनी केली आहे. कथाकोषात भद्रबाहू, चंद्रगुप्त, समंतभद्र, अकलंक यांची चरित्रे आहेत नेमिचंद्राचा आराधना–कथाकोष हा पद्यमय असून प्रभाचंद्राच्या ग्रंथाचेच विस्तृतीकरण आहे.

४. कथासंग्रह ( अंतरकथाकोष )– याची रचना राजशेखर मलधारी यांनी केली आहे. आगम टीकाग्रंथांच्या आधारे याची रचना करण्यात आली आहे. यातील काही कथा सुरस व सुगम अशा संस्कृतमध्ये लिहिल्या गेल्या आहेत. या कथामधून संस्कृत, प्राकृत अपभ्रंशमधील उद्धरणांचा समावेश आहे. कथा–उपकथा या रचना शैलीमुळे या ग्रंथाला अंतरकथाकोष असे म्हटले आहे. यातील आठ कथा फुल्ले याने इटालियन भाषेत अनुवादित केल्या असून, एका कथेचा अनुवाद 'जजमेंट ऑफ सालोमन' या नावाने टेसिटोरी याने केला आहे.

५. सम्यक्त्व-कौमुदी– हा लहान कथांचा कोष असून अर्हद्दास श्रेष्ठी स्वत.ला सम्यक्त्वाची कशी प्राप्त झाली हे आपल्या आठ पत्नींना सांगत असतो. त्यानंतर त्या पत्नी आपापला अनुभव पतीला कथन करीत असतात. या संवादामध्ये विविध इतर कथानके गुंफली आहेत. या ग्रंथाच्या लेखकाविषयी निश्चित माहिती नसून सम्यक्त्व कौमुदी नावाचे अनेक ग्रंथ आहेत. त्यांचे जिनहर्षगणि, गुणाकरसूरि, मल्लिभूषण, सोमदेवसूरि, शुभचंद्र, वत्सराज, धर्मकीर्ति, मंगरस, वादिभूषण तथा यशःकीर्ति इत्यादि विविध लेखक आहेत.

६. दान कल्पद्रुम– याची रचना जिनकीर्ति यांनी केली आहे. या कथाग्रंथाचा रचनाकाल साधारणपणे १५ वे शतक मानला जातो. हा संस्कृत पद्यरूप ग्रंथ असून त्यात दानमहिमेचे वर्णन केले आहे. यात रोचक व विनोदपूर्ण लहान लहान कथांचा संग्रह आहे. उदयधर्माने लिहिलेला धर्मकल्पद्रुम हा एक मध्यम कथाग्रंथ आहे.

या विवेचन केलेल्या संस्कृत कथाकोषाशिवाय आपणाला ' पंचशती प्रबोध ' हा शुभशीलगणी याचा ६०० धार्मिक कथांनी युक्त ग्रंथ आढळतो.

## अपभ्रंश कथा साहित्य

अपभ्रंश कथा साहित्य समृद्ध आहे. अपभ्रंश साहित्यात काव्यांची तथा प्रबंध काव्याची रेलचेल अधिक असली तरी, त्यामानाने कथासाहित्य देखील अधिक संपन्न असल्याचे दिसते. कथा शब्दासाठी अपभ्रंशमध्ये 'कहा' शब्दाचा वापर केलेला आढळून येतो. कथा हे साहित्याचे अविभाज्य अंग असून ते आबालवृद्धांच्या आवडीचे असते. *काव्यसाहित्यापेक्षा कथासाहित्य अगोदर अस्तित्वात आल्याचे* आपणाला दिसून येते. कथा या शब्दासाठी पूर्वी 'आख्यान' या शब्दाचा वापर केलेला आढळतो आख्यान शब्दाचा सामान्य अर्थ 'वृत्त' अथवा 'विवरण' असा केला जातो. प्राकृत कथा साहित्य विभागात याविषयीचे अधिक विवेचन करण्यात आलेच आहे.

अपभ्रंश कथा साहित्याचे आपणाला तीन भागात विभाजन करता येईल. १. व्रतकथा तथा लघुकथा, २. बृहद्कथा, ३. कथाकाव्य.

अपभ्रंशमध्ये व्रतकथांची रचना अधिकाधिक झाली असून, या कथामधून धार्मिक माहात्म्य वर्णिले आहे. व्रताविषयीचे अधिक विवेचन करून त्याचेही माहात्म्य कथन करण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. ज्या कथानून

व्रतविषयक माहिती नाही, त्या कथा धार्मिक भावनानी प्रेरित शुद्ध उपदेशात्मक कथा असल्याच्या दिसून येतात माणिकचंदरचित 'सत्तवसणकहा' एक अशी कथा आहे की, ज्या कथेमध्ये सात व्यसनांचे ( जुगार, मदिरापान, वेश्यागमन, मास भक्षण, चोरी, शिकार व परस्त्रीगमन ) वर्णन केले असून, त्यांचा त्याग करण्यासाठी उपदेशरूपी कथादृष्टांताचे साह्य घेतले आहे. या कथा संधिबद्ध व संधिमुक्त या दोन्ही शैलीत आहेत. व्रतकथा बहुधा अधिकाधिक दोन संधीनी युक्त असतात. काही कथा याला अपवादात्मकही असतात. ब्रह्म साधारणकृत कोकीलापंचमी, मुकुटमप्तमी, क्षीरद्वादशी, रविवासर, त्रिकालचडवीसी, पुष्पांजली, निदु:खसप्तमी, निर्झरपंचमी या कथा ५ कडवकांनी युक्त आहेत. पं. रइधूकृत 'अणथमीकहा' चार कडवकांनी युक्त आहे. याशिवाय हरिचंदाची अणथमीकहा, विमलकीर्तिची सुखवइविहाणकहा, सुगंधदहमीकहा, देवनंदिरचित रोहिणीविहाणकहा, विनयचंद्रकृत णिज्झरपंचमीविहाणकहा इत्यादि कथा त्याहूनही मोठ्या असल्याच्या दिसतात.

बृहद्कथा साहित्य विभागात मोठ्या कथा रचनाकृतीचा समावेश केलेला दिसून येतो. या प्रकारात 'कथाकोष' या रचनेचा समावेश होत असून त्यात धार्मिक कथांचे संकलन करण्यात आले आहे. हा एक संग्रहात्मक ग्रंथ असून, काव्यरूपाने मुक्त आहे. श्रीचंद्रकृत 'कहाकोसु' ही रचना ५३ संधीनी युक्त असून तो एक कथाचाच कोष आहे. पं. रइधूरचित 'पुण्णासवकहाकोसु' ही रचना देखील अशाच प्रकारची आहे. याशिवाय अन्यही काही कथाकोष आहेत. त्यात संस्कृत–अपभ्रंश तथा अपभ्रंश हिंदी कथासंग्रह असल्याचे दिसतात.

तिसऱ्या प्रकारात काव्यकथा असून यात काव्य आणि कथा याचे सुंदर, कलात्मक मीलन झाले आहे. यातील वर्ण्यविषय लोककथा हा असला तरी, त्यातील नायक जन जीवनाचा एक विशिष्ठ पैलू आहे. इतरांना तो आदर्श आहे. त्याचे मोठेपण त्याला जन्मत: प्राप्त झालेले नसून ते त्याला विविध व मोठ्या संकटाशी टक्कर देऊन प्राप्त झाले आहे. अशा प्रकारच्या कथासाहित्यात सर्वात प्रथम आपणाला 'भविष्यदत्तकथा' या कथेचा समावेश करता येईल. ही 'पंचमीव्रतकथा' या नांवाने देखील संबोधिली जाते. विबुध श्रीधरकृत 'भविसयत्तकहा' हा देखील त्यादृष्टीने एक महत्त्वाचा कथाग्रंथ आहे. लाखू विरचित 'जिणयत्तकहा' सिद्धसेनकृत 'विलासवईकहा' इत्यादी रचना अपभ्रंश कथासाहित्यातील कलात्मक सौंदर्याच्या दृष्टीने अत्यंत महत्वाच्या आहेत. त्यांची माहिती पुढीलप्रमाणे आहे.

**१. भविसयत्तकहा–** या कथाग्रंथाची रचना धनपाल या कवीने केली असून अपभ्रंश कथा साहित्यातील हे एक मौल्यवान कथारत्न मानले जाते. हे काव्य २२ संधीमध्ये विभागले गेले असून, त्यात श्रुतपंचमी व्रताच्या फलवर्णन स्वरूपात भविष्यदत्ताची कथा सांगितली आहे. म्हणून हिला श्रुतपंचमीकथा असेही म्हटले आहे या कथेचे जेकोबी यानी जर्मन भाषेत प्रकाशन केले आहे. प्रथम प्रथम या कथाग्रंथाकडे फक्त भाषेच्या दृष्टीने पाहिले जात होते. परंतु आता काव्य-कला, लोक तत्त्व, देशी शब्द, भाषा या दृष्टीनेही ही रचना अत्यंत महत्त्वाची समजली जाते. या ग्रंथाची रचना १३–१४ व्या शतकाच्या दरम्यान झाली असून कवि धनपाल हे स्वत दिगंबर सम्प्रदायाचे अनुयायी होते.

साहित्यिकदृष्टया या कथेचे अवलोकन करीत असताना आपणाला असे दिसून येते की, भविसयत्तकहा ही अपभ्रंश कथासाहित्यातील एक अत्यंत यथार्थ व करुण कहानी आहे. कथाकाराने त्यातील घटनांचे व पात्रांचे चित्रण सुंदर केले आहे या कथानकात काही ठिकाणी मात्र अतिरंजितता दाखविलेली दिसून येते. या ग्रंथात जनबोली भाषेचे स्वरुपही दिसून येते. तसे पाहता ग्रंथाची भाषा साधी, सरळ, कृदंत शब्दरूपानी युक्त असल्याचे दिसते.

**विलासवईकहा–**

विलासवई कथाग्रंथाची रचना श्वेतांबर जैन मुनि सिद्धसेनसूरि यांनी केली असून त्यांचे उपनाम साधारण असल्याचे म्हटले आहे. अर्थात हे गृहस्थावस्थेतील नाव असून मुनि अवस्थेतील नाव सिद्धसेनसूरि आहे. या

रचनाकृतीचा काल वि. सं. ११२३ इतका मानला जातो. या कथेला हरिभद्रसूरिकृत समराइच्चकहा आधारभूत असून कवीने स्वतः याविषयी कबुली दिली आहे. यात सनत्कुमार व विलासवती यांच्या प्रेमाची चर्चा केली असून शेवटी सनत्कुमाराला कसे वैराग्य उत्पन्न होते याचे वर्णन केले आहे.

या ग्रंथात नैसर्गिक सौंदर्याचे सुंदर वर्णन असून नायिका प्राप्तीसाठी नायकाने केलेल्या धाडसांचेही सुंदर वर्णन करण्यात आले आहे. कथेची सुरवात वर्णनात्मक दृष्टीने न होता एकाएकी झालेली दिसते. औत्सुक्य व कुतुहल यांनी ती परिपूर्ण आहे. कथेचा प्रवाह सतत व सारखेपणाने वहात जाणारा असून त्यात दुर्मिळता नाही. ग्रंथारंभी चोवीस तीर्थंकर, सज्जन–दुर्जन वर्णन आलेले दिसते. सुंदर व कथानकाच्या दृष्टीने या कथेचे स्थान काही वेगळेच आहे. नगरवर्णन, वस्तुवर्णन, सरोवर वर्णन, राजमंदिर वर्णन, युद्ध व यात्रा वर्णन, प्रकृति वर्णन, उद्यान वर्णन, समुद्र वर्णन, गंगा वर्णन, वसंत वर्णन या विविध वर्णनानी ही कथा विभूषित झाली आहे.

## जिणयत्तकहा–

पं. लाखू यांनी ही कथा लिहिली असून, अपभ्रंश कथा काव्यातील एक उत्तम रचना मानली जाते. यात कथा व काव्य यांचा सुंदर संगम झाला आहे. या कवीचा जन्म जैसवाल या वंशात झाला असून लाखू नावाच्या दोन कवींचा उल्लेख मिळतो. कथेचा रचनाकाल वि. सं. १२७५ मानला जातो. यात जिनदत्ताच्या विलासी जीवनाचे प्रथम वर्णन करून, त्याने पुनः कशी दीक्षा घेतली याचे वर्णन केले आहे.

या ग्रंथारंभी कवीने २४ तीर्थंकराचे स्मरण करून त्यानंतर कालीदास, श्रीहर्ष, व्यास, द्रोण, बाण, पुष्पदंत, अकलंक या कवींचा आदराने उल्लेख केला आहे. त्यानंतर कवीने आत्मविनय प्रकट केला आहे. कवीने आपल्या ग्रंथात वस्तुवर्णन, नगरवर्णन, वरात वर्णन, विवाहवर्णन, बाजारवर्णन, समुद्रवर्णन, रूपवर्णन, संयोग व वियोगवर्णन अशा विविध वर्णनांनी कथेला सर्वांग परिपूर्ण बनविले आहे. रतिभाव हा प्रमुख आहे. कथेची भाषा प्रभावपूर्ण असून प्रसंगानुरूप तिच्यात रस, अलंकार, छंद, संवाद यांचा वापर केला आहे.

असे हे अपभ्रंश कथासाहित्य विविधतेने नटलेले व विभूषित झालेले दिसून येते.

## उपसंहार–

जैन कथासाहित्याच्या वरील सर्व विवेचनावरून आपणाला असे दिसून येईल की, कथा या गद्याप्रमाणे पद्यात देखील लिहिल्या जात होत्या. या कथा संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश शौरसेनी, पैशाची इत्यादि विविध भाषेतून लिहिलेल्या दिसतात. प्राकृत कथासाहित्यातील लेखकांचा दृष्टिकोन सदैव विशाल असलेला आपणाला दिसून येतो. त्यांनी धर्मकथेत शृंगाररसाचा जरी जास्तीतजास्त उपयोग करून घेतला तरी आत्मकल्याण हा त्यातील सर्वात प्रमुख असा शेवटचा हेतु आहे. या कथाकारांचा दृष्टिकोन वैराग्यपूर्ण जरी दिसत असला तरी आपल्या कथेतून त्यांनी विविध रसांचा उपयोग करून घेतला आहे. त्यांनी लोकाभिरुचि डोळ्यासमोर ठेवूनच विविध बोली भाषेतून कथासाहित्याची निर्मिती केली. त्यात त्यांनी मदनउत्सव, वसंतक्रीडा, साहसपूर्ण घटना, प्रेमानुराग, हास्यविनोद व विविध प्रसंग यांचा समावेश केला आहे. प्राकृत तथा जैनकथेची रचनाशैली अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. एका मुख्य कथेतून इतर अनेक उपकथानकाची उत्पत्ति होणे ही तिची विशेषता आहे. कथांच्यामधून संपूर्णपणे चरित्राचा विकास झाला आहे.

विविध प्रकारच्या कामकथा वाचून व ऐकून लोक एकांतामध्ये अशा कथाचा आनंद उपभोगत असतात. तापाने फणफणणाऱ्या रोग्याला ज्याप्रमाणे साखर, गूळ इ. गोड पदार्थदेखील कडू लागतात, त्याप्रमाणे फक्त धर्मकथा ऐकणाम अथवा वाचण्यास त्याला गोडी वाटत नाही. औषध पिण्यास नाकारणाऱ्या रोग्याला त्याला आवडणाऱ्या वस्तूतून औषध दिले जाते. त्याचप्रमाणे लोकांना आवडणाऱ्या कामकथा तथा शृंगार कथांच्याद्वारे






प्राकृतधर्मकथा लिहिल्या असून त्या सर्वसामान्य लोकांना पटण्या–रूचण्याइतपत मधुरमय करून ठेवल्या आहेत. या प्रेमकथा मादक असून शृंगाररसपरिपूर्ण जरी असल्या तरी तितक्याच संसारक्षम आहेत. प्रेमाख्यान देखील धार्मिक तत्त्वाच्या साह्यानेच कथन केले आहे. म्हणूनच या विविध गोष्टींनी युक्त असलेले प्राकृतकथासाहित्य हे सर्वांगपरिपूर्ण आहे ही गोष्ट निर्विवाद आहे.

जैन कथासाहित्य इतके विशाल आहे की, त्याचा संपूर्ण आढावा एकाच ठिकाणी घेणे अत्यंत कठीण आहे. खरे पाहता या जैन कथासाहित्यातील लोकसंस्कृती, त्यातील अध्यात्मवाद, या कथामधून चित्रित झालेले सामाजिक जीवन, त्यातील आकर्षक सुभाषित रचना, जैन कथेतील महिला जीवन, जैन कथेतील ऐतिहासिकता तथा पौराणिकता, जैन कथेतील अलौकिक तत्त्व, जैन कथेतील लोक विश्वास, जैन कथेतील विविध पात्र, जैन कथेतील यतार्थ व आदर्शवाद जैन कथेतील निसर्गचित्रण, त्यांची रचना प्रक्रिया, साहित्यिक सौंदर्य, समुद्र यात्रा, जैन कथेतील सौन्दर्यबोध, जैन कथेतील न्याय व्यवस्था इत्यादि कितीतरी विभागावर स्वतंत्रपणे लेखन करता येईल. हे लेखन सूक्ष्मपणे अभ्यासू दृष्टीने करणे अत्यंत आवश्यक आहे. थोडक्यात भारतीय कथा साहित्यात जैन कथा-साहित्याचा फार मोठा वाटा असून, या कथा साहित्याची छाप भारतीय कथा साहित्यावर पडली आहे. एवढेच नव्हे तर या कथासाहित्याद्वारे भारतीय जनजीवनाचे व रीतिरिवाजांचे यथायोग्य चित्रण रेखाटण्यात आले आहे. आणि म्हणूनच काही परकीय विद्वानांनीदेखील जैन कथासाहित्यावर अनेक स्तुतिसुमने उधळली आहेत.

## संस्कृत नाटकातील प्राकृत

प्राकृत साहित्यात काव्याच्या दृष्टीने पाहता, नाटक साहित्य अत्यंत अल्प आहे. अनेकविध संदर्भावरून प्राकृतमध्ये नाटकसाहित्यच कमी असलेले आढळते. नाट्याचार्यांनी दहा प्रकारची रूपके व १८ प्रकारची उपरूपके मानली आहेत. अर्थात् त्यातील भाण, डिम, विथी, त्रोटक इ. शब्दच मुळी प्राकृत असल्याचे दिसतात. सट्टकाची संपूर्ण रचनाच प्राकृतात असते. प्राकृतापेक्षा संस्कृतला अधिक राजाश्रय मिळाला व संस्कृत साहित्याचे अधिक काळजीपूर्वक संरक्षण करण्यात आले. तितकेसे संरक्षण प्राकृतला मिळाले नाही. शिवाय प्राकृत नाटके बरीचशी संस्कृत भाषेत रूपांतरित झाली असावीत. उदा.– मृच्छकटिक, त्रिपुरदाह, रत्नावली, विद्धशालभंजिका, विक्रमोर्वशीय, रैवत मदनिका, विलासवती इ.

प्राकृतचा प्रथम नाटकीय प्रयोग संस्कृत नाटकातच मिळतो. या नाटकामधून ठराविक पात्रांच्या ठराविक अशाच आहेत. उच्च वर्गातील पुरुष, स्त्रिया, राणी, राजा, राजपुत्र इ. पात्रे संस्कृत भाषेत बोलत विदूषक, अनार्य, अप्सरा इ. स्त्री पात्र प्राकृत भाषा बोलत. प्राकृतचा प्रथम नाटकीय प्रयोग अश्वघोषाच्या साहित्यकृतीतून

---

**संदर्भग्रंथाची यादी–**


१. प्राकृत साहित्य का इतिहास– जगदीशचंद्र जैन
२. जैन कथाओं का सांस्कृतिक अध्ययन– श्रीचद्र जैन.
३. भारतीय सस्कृति मे जैनधर्म का योगदान– डॉ. हिरालाल जैन.
४. जैनधर्म– पं. कैलाशचद्र शास्त्री.
५. नायाधम्म कहा.
६. जैन रामायण.
७. जैन साहित्य और इतिहास– पं. नाथूराम प्रेमी.
८. हिस्ट्री आफ इंडियन लिट्रेचर भाग ३ विन्टरनीज इ.









पाहावयास मिळतो. यात मागधी, अर्धमागधी आणि शौरसेनोची प्राचीन रूपे पाहावयास मिळतात. भासाच्या नाटकातील अविमारक आणि चारुदत्त इ. पात्रांची प्राकृत हीच प्रमुख भाषा आहे. प्रसिद्ध नाटककार कालिदास यांच्याही काही नाटकातील पात्रे प्राकृत भाषा बोलताना दिसतात. उदा. अभिज्ञानशाकुंतल इ. याशिवाय मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय, श्रीहर्षाचे प्रियदर्शिका, रत्नावली, नागानंद तसेच विशाखदत्ताच्या मुद्राराक्षस इत्यादि नाटकातून प्राकृतभाषा आढळते. अर्थात् बऱ्याच संस्कृत नाटकात प्राकृत भाषेचा उपयोग केलेला दिसतो. कधी कधी नाटककार संस्कृत भाषेत लिहून प्राकृतमध्ये त्याचा अनुवाद करण्याचा प्रयत्न करीत असावेत असेही दिसते.

संस्कृत नाटकातील प्राकृत भाषेविषयीचा अधिक विचार करता आपणाला दिसून येईल की, इ. स. प्रथम शतकाच्या दरम्यान अश्वघोषाने शारिपुत्रप्रकरण व अन्य दोन नाटकाची रचना केली. या नाटकातून दुष्टलोक मागधी, गणिका व विदूषक शौरसेनी तथा अर्धमागधी बोलताना आढळतात. या नाटकातील प्राकृत भाषा अशोककालीन शिलालेखातील भाषेशी मिळती जुळती आहे. उत्तरकालीन प्राकृत भाषांच्या माहितीसाठी या भाषांचा बराचसा उपयोग होतो.

अश्वघोषानंतर भास ( इ. स. ३५० ) यांनी लिहिलेली अविमारक व चारुदत्त ही नाटके प्राकृत भाषेच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची आहेत. अविमारकात अविमारक व कुरंगी यांची प्रेमकथा आहे. चारुदत्त नाटकात चारुदत्त व वसंतसेना यांच्या प्रेमाचे मार्मिक चित्रण आहे. या दोन्ही नाटकातील पद्यविभागात शौरसेनी भाषेची अधिकता असून मागधीचेही रूप पहावयास मिळते. अविमारकमधील विदूषकाची शौरसेनी भाषा त्या दृष्टीने लक्ष आकर्षित करून घेणारी आहे.

भासानंतर होऊन गेलेल्या शूद्रकाने ( ५ वे शतक ) मृच्छकटिक नाटकात तर प्राकृत भाषांचा यथेच्छ वापर केला आहे. प्राकृत भाषा अध्ययनाच्या दृष्टीने हे अत्यंत महत्त्वाचे असे नाटक आहे. यात एकूण ३० पात्रे असून त्यातील सूत्रधार, नटी, रदनिका, मदनिका, वसंतसेना, कर्णपूरक, श्रेष्ठी इत्यादि १२ पात्रे शौरसेनी भाषा बोलतात. वीर चंदनक अवंती, विदूषक प्राच्य, संवाहक, कुंभीलक, वर्धमानक, भिक्षु इत्यादि मागधी व इतर काही माथुर, शकारादि मागधीत बोलतात. साधारणपणे शौरसेनी व मागधीचा वापर यात अधिक आहे.

महाकवि कालीदास ( इ. स. ४ थे शतक ) यानेही आपल्या नाटकात प्राकृतचा वापर केला आहे. गद्यासाठी शौरसेनी व पद्यासाठी महाराष्ट्रीचा वापर केला आहे. राजाचा मेव्हणा शौरसेनीत, इतर स्त्रिया, बालक महाराष्ट्रीत, कर्मचारी वर्ग मागधीत बोलताना दिसतो.

श्रीहर्ष ( इ. स. ६०० ते ६४८ ) याच्या प्रियदर्शिका, रत्नावली, नागानंद इत्यादि नाटकात प्राकृत भाषांचा भरपूर प्रमाणात उपयोग करण्यात आला आहे. स्त्रीपात्र व विदूषक प्राकृतमध्ये बोलचाल करताना आढळतात. या नाटकातून पद्यासाठी महाराष्ट्रीचा व शौरसेनीचा वापर केला आहे. प्रियदर्शिकेत वासवदत्ता, चेटी, कांचनमाला, मनोरमा व विदूषक प्राकृतात बोलतात. उपर्युक्त विविध नाटकाशिवाय भवभूतीच्या मालतीमाधव, महावीर चरित या नाटकातून, विशाखादत्ताच्या मुद्राराक्षस नाटकात, भट्टनारायणाच्या वेणीसंहार नाटकात, सोमदेव रचित ललित विग्रहराज, महादेव कविरचित अद्भुतदर्पण, रामपाणि वादाच्या लीलावती नाटकातून आपणाला प्राकृतमधील विविध भाषाचा वापर केलेला दिसून येतो [1]

थोडक्यात संस्कृतमधील बहुतेक सर्व महान् नाटककारानी आपापल्या ग्रंथातून विविध प्राकृत भाषांचा वापर केलेला दिसून येतो. उच्च पात्राच्या तोंडी संस्कृत तर इतर गौण पात्रांच्या तोंडी या प्राकृत भाषांचा वापर करून आपापल्या नाटकातील सौंदर्यात अधिकाधिक भर घालण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. या सर्व नाटकातील प्राकृत भाषा अभ्यासाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाच्या आहेत.

१ प्राकृत साहित्य का इतिहास– जगदीशचंद्र जैन पृ. नं ६१४-६२७.

# संस्कृतमधील प्राकृत नाटक साहित्य

संस्कृत भाषेमध्ये लिहिलेले काही प्राकृत नाटक साहित्य आपणाला पहावयास मिळते. परंतु हे साहित्य तितकेसे समृद्ध असल्याचे दिसून येत नाही. कारण साहित्यातील नाटक हे अंग थोडे हास्य, विनोदाचे, उपहासाचे, व्यंगात्मक दृष्टीचे तसेच मनोरंजनार्थ लिहिले गेले असून, अशा प्रकारच्या नाटच कलाकृतीतून तथा विनोदातून आनंद मिळविणे त्यांच्याशी समरस होणे जैन मुनींना निषिद्ध होते आणि म्हणूनच त्यांच्या हातून नाटक साहित्याची निर्मिती व्हावयास पाहिजे तेवढी होऊ शकली नाही.

संस्कृतमधील हम्मीर-मदमर्दन, मोहराज-पराजय, हस्तिमल्लाची विक्रांत कौरव, सुभद्रा व प्रबोध चंद्रोदय, मुद्रित कुमुदचंद्र इत्यादि नाटके महत्त्वाची आहेत. त्यांची माहिती खालीलप्रमाणे–

१. **मोहराज-पराजय**– या नाटकाची रचना यशःपाल याने सुमारे १३ व्या शतकात केली आहे. कुमारपाल राजाने धर्मपरिवर्तनपूर्वक केलेला जैन धर्माचा स्वीकार, कृपासुंदरीबरोबर त्याचा झालेला विवाह, याशिवाय संपूर्ण राज्यात केलेली अहिंसेची घोषणा, निपुत्रिकाची संपत्ती चोरली असता त्याचा निषेध करणे इत्यादि प्रसंग आकर्षकरीत्या दाखविले आहेत. यात प्रामुख्याने विशिष्ट भावात्मक पात्राशिवाय राजा कुमारपाल ही एक ऐतिहासिक भूमिका मानली आहे. या राजाच्या विवाहाचे वेळी स्वतः हेमचंद्रांनी पुरोहिताची जबाबदारी स्वीकारल्याचे दाखविले आहे. हे एक ऐतिहासिक व धार्मिकदृष्ट्या महत्त्वाचे नाटक आहे.

२. **हम्मीर-मदमर्दन**– या नाटकाचा कर्ता वीरसूरीचे शिष्य जयसिंहसूरि असून, त्यांनी याची रचना इ. स. १२८६ पूर्वी केली असावी. या नाटकात राजा वीरधवलाने हम्मीर या म्लेच्छ राजाचा पराभव कसा केला याचे दिग्दर्शन केले असून, वस्तुपाल व तेजपाल या मंत्र्याच्या चारित्र्यांचेही वर्णन केले आहे. या नाटकातील राजकीय घटना मुद्राराक्षस नाटकाप्रमाणेच आहेत.

३. **हस्तिमल्लाची नाटके**– हस्तिमल्ल यांनी एकूण चार नाटकांची रचना केली. ती म्हणजे विक्रांत-कौरव, सुभद्रा, मैथिलीकल्याण, अजनापवनंजय इत्यादि. यातील विक्रांतकौरव हे नाटक अतिप्रसिद्ध असून या नाटकात इतर जैन काव्याचा तथा लेखक विद्वानांचा उल्लेख मिळतो. हस्तिमल्ल हे मूलतः वत्सगोत्रीय ब्राह्मण होते. परंतु त्यांच्या वडीलांनी जैन धर्माचा स्वीकार केला होता. या चार नाटकातील पहिली दोन नाटके महाभारतावर आधारित असून नंतरची दोन रामायणावर आधारित आहेत. या नाटकातील कथानक गुणभद्राच्या उत्तरपुराणानुसार घेतलेले आहे. या चार नाटकाशिवाय हस्तिमल्ल यांनी आणखी उदयनराज, भरतराज, अर्जुनराज, मेघेश्वर ही चार नाटके लिहिली असावीत. हस्तिमल्लांची ही विविध नाटके प्राकृत नाटक साहित्याच्या दृष्टीने महत्त्वाची मानली जातात.

४. **प्रबुद्ध रौहिणेय**– रामभद्ररचित या नाटकात एकूण ६ अंक आहेत. त्यात नायकाच्या चौर्यप्रवृत्तीचे वर्णन करून उपदेश ग्रहणानंतर त्याच्या दीक्षा ग्रहणाबद्दलची माहिती दिली आहे. चौहान राजा समरसिंह याने बांधलेल्या ऋषभनाथ मंदिरात या नाटकाचा नाटचप्रयोग करण्यात आल्याचे सांगितले आहे.

५. **प्रबोध चंद्रोदय**– या नाटच ग्रंथामध्ये भावमय पात्रांची रचना करून नाटचरचना केलेली दिसून येते. प्रबोध, विद्या, विवेक अशी ही विविध भावमय पात्राची यथास्थित रचना करण्यात आली आहे. याचे कर्ते मुनिसुंदरशिष्य रत्नशेखरसूरि असून याचा रचनाकाल निश्चित नाही.

वर वर्णन केलेल्या संस्कृतमधील प्राकृत साहित्याशिवाय आणखी काही नाटक ग्रंथ आपणाला आढळतात रामचंद्रसूरि (१३ वे शतक) यांनी शंभर नाटकाची रचना केल्याचे सांगितले जाते. त्यातील निर्भय-भीम-व्यायोग,




नलविलास, कौमुदी-मित्रानंद रोहिणीमृगांक व वनमाला ही प्रसिद्ध आहेत. पद्मचंद्रशिष्य यशश्चंद्ररचित 'मुद्रित– कुमुदचंद्र' हे नाटक ५ अंकी असून धार्मिक व ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे आहे.

सारांशरूपाने आपणाला असे म्हणता येईल की, साहित्याच्या काव्य, चरित्र, कथा यांच्यामानाने संस्कृत-मधील प्राकृत नाटक साहित्य तितकेसे प्रौढ, विस्तृत तसेच सखोल असल्याचे दिसून येत नाही.

## प्राकृत नाटक साहित्य–

प्राकृतमध्ये 'नाटक' या शब्दासाठी 'सट्टक' या शब्दाचा उपयोग केलेला दिसतो. परंतु तसे पाहता सट्टक आणि नाटकामध्ये बराच भेद देखील दिसून येतो. सट्टकात नृत्य हे आवश्यक असते. नाटकात त्याची तितकीशी जरूरी भासत नाही, ते नसले तरी चालते. द्रविड भाषेत आट्ट, अट्ट याचा अर्थ नृत्य अथवा अभिनय असा केला आहे. सट्टक हा शब्द स + आट + क = खेळ असा तयार झाला आहे. अर्थातच हा संस्कृतजन्य शब्द वाटत नाही. इ. स. पूर्व २०० च्या सुमारास काही शिलालेखात 'शाडिक' नावाच्या एका लोकनृत्याचा उल्लेख मिळतो. त्याच्याशी मिळता जुळता असाच हा सट्टक प्रकार असावा. अनेक विद्वानांच्या मते सट्टक हा प्रकार अति प्राचीन असून, त्यापासूनच संस्कृत नाटिकेचा विकास झाला असावा. कारण नाटिकेची आणि सट्टकाची लक्षणे एकमेकांना बरीचशी मिळती जुळती अशी आहेत. सट्टकाविषयीची माहिती आपणाला पुढीलप्रमाणे पहावयास मिळते.

## सट्टक प्रकार–

सट्टक हा उपरूपकाचा प्रकार असून त्याची संपूर्ण रचना प्राकृतात असते. कर्पूरमंजरी सट्टककर्ता कवि राजशेखर सट्टकाची व्याख्या खालीलप्रमाणे करतो–

सो सट्टओ त्ति भणइ दूरं जो णाडिआइ अणुहरइ । किं उण पवेसविक्खम्भङ्काइं केवलं ण दीसन्ति ।।

अर्थात् सट्टक त्याला म्हणतात जे 'दूरूनच' नाटिकेचे अनुकरण करते, ज्यात अंक, प्रवेशक आणि विष्कम्भक इत्यादि नसतात त्याला सट्टक असे म्हणतात.

सट्टकात अंकानाच जवनिका असे म्हणतात. त्यात संधिसुद्धा नसतात. त्यात प्रमुख रस शृंगार असतो. अन्य रस गौण असतात रौद्र रस सट्टकात नसतो. वीर, भयानक, बीभत्स रसांचा देखील उपयोग अतिअल्पप्रमाणात केला जातो. मात्र अद्भूत रस त्यात आवश्यक असतो. सट्टकाची कथा कल्पित असून नायक राजा असतो. तो उच्चकुलोत्पन्न, धीरोदात्त व पराक्रमी असतो. नायिका देखील कुलशीलवान असून गुणवती असते. सट्टकात स्त्रीपात्रे अधिक असून त्यात देवी, महाराणी आणि दूती अथवा दासी असतात. नायक-नायिकेबरोबर राणीच्या संमतीने विवाह करतो. तत्पूर्वी राणी, राजा व नायिका यांच्या प्रेमाविषयी साशंक राहते. शेवटी नायिकेच्या प्राप्तीमुळे राजाला चक्रवर्तीपदाची प्राप्ति होते. सट्टकात नृत्य आवश्यक असते. विद्वानांच्या मते सट्टक हा अत्यंत प्राचीन असा नाटक प्रकार असावा. संस्कृतात नाटिकेचा विकास सट्टक प्रकारामुळेच झाला असावा. प्राकृतमध्ये आपणाला आता अस्तित्वात असलेली सहा नाटके पहावयास मिळतात.

१. राजशेखरकृत कर्पूरमंजरी २. नयचंद्रकृत रंभामंजरी ३. रुद्रदासकृत चंद्रलेखा ४. मार्कंडेयकृत विलासवती ५. विश्वेश्वरकृत शृंगारमंजरी ६. घनश्यामकृत आनंदसुंदरी.

**१. राजशेखरकृत कर्पूरमंजरी–** राजशेखर हा महान् कवि इ. स. ९०० च्या सुमारास होऊन गेला. महाराष्ट्र चूडामणी कविराज राजशेखराने बालरामायण, कर्पूरमंजरी, विद्धशालभंजिका या नाट्यकृतींबरोबरच काव्यमीमांसा हा काव्यशास्त्र ग्रंथ लिहिला. महेंद्रपाल राजा व कुंतलदेशाची राजकन्या कर्पूरमंजरी यांचा विवाह हाच ह्या सट्टकाचा प्रमुख विषय आहे. नायिकेच्या प्राप्तीनेच राजाला चक्रवर्तीपदाची प्राप्ति होते. प्राकृत





भाषाशैलीच्या दृष्टीने हे एक प्रमुख सट्टक मानले जाते नतरच्या सट्टक कर्त्यांना या कर्पूरमजरी सट्टकाचा बराचसा उपयोग झालेला दिसून येतो.

**२. नयचंद्रकृत रंभामंजरी–** *नयचंद्राचा काळ साधारणपणे १५ वे शतक मानला जातो.* लाट देशातील मदनवर्मा राजाची सुंदर कन्या रंभामंजरी हिचे हंसराजाशी लग्न होत असताना, तिच्या शिव नावाच्या मामाने तिला बनारसमध्ये जैतेंद्र राजाच्या दरबारात आणले. त्याने चक्रवर्ती होण्याकरिता सात राण्या असूनही रंभामंजरीशी विवाह केला. राजा तिच्याबरोबर प्रणयक्रिडेत पुढे दंग होऊन जातो. हे सट्टक शृंगाररसाने परिपूर्ण भरून गेले आहे. *अधूनमधून मराठी श्लोकांचा वापरही केला आहे.*

**३. रुद्रदासकृत चंद्रलेखा–** रुद्रदास हा महान् सट्टककार अंदाजे १७ व्या शतकाच्या क्षुद्र अशा पारशव वंशातील होता. त्याने राजा मानवेदाच्या आश्रयाखाली चंद्रलेखा हे सट्टक लिहिले. अंगाधिपति चंद्रवर्म्याची चंद्रलेखा ही सुंदर कन्या असून तिचा विवाह मानवेद राजाबरोबर होतो. राजाला चक्रवर्ती पदाची प्राप्ति होते. या सट्टकात शृंगाररसाबरोबरच अद्भुत रसाचाही बराचसा वापर केला आहे.

**४. मार्कंडेयकृत विलासवती–** १७ व्या शतकातील मुकुंददेव राजाच्या कारकीर्दीत प्राकृतसर्वस्व व्याकरण लिहिणाऱ्या मार्कंडेय कवीने हे विलासवती नाटक लिहिले असावे. परंतु दुर्दैवाने ते आज उपलब्ध नाही. खरोखर महान् व्याकरणकार असलेल्या या लेखकाचे हे नाटक प्राकृत भाषारचनेच्या तथा शैलीच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वपूर्ण ठरले असते यात कसलीच शंका नाही.

**५. विश्वेश्वरकृत शृंगारमंजरी–** हा १८ व्या शतकाच्या पूर्वार्धातील एक महान् सट्टककार होऊन गेला. हा लक्ष्मीधराचा सुपुत्र असून त्याचाच शिष्य होता. या महान् सट्टककाराने जवळ जवळ वीस ग्रंथांची रचना केली असावी. परंतु ती सध्या उपलब्ध नाहीत. शृंगारमंजरी हेच एक प्रमुख असलेले नाटक आपणास पहावयास मिळते. या सट्टकात राजा चंद्रशेखर व नायिका शृंगारमंजरी ह्यांच्या विवाहाचा प्रमुख विषय असून या सट्टकातील राणी रूपलेखा त्या दोघांच्या प्रेमाविषयी सदैव साशंक राहते. अर्थात् सवतीदुःख नको म्हणून ती नायिकेला वरचेवर बंदिवासात ठेवते. पण एका भविष्यवाणीने नायिकेची सुटका करून ती स्वत:च राजा व नायिका यांचा गंधर्व-पद्धतीने विवाह करण्यास मान्यता देते. शृंगारमंजरीची प्राप्ति होताच राजाला चक्रवर्ती पदाची प्राप्ति होते. हे सट्टक शृंगार व अद्भुत रसांनी युक्त आहे.

**६. घनश्यामरचित आनंदसुंदरी–** हा १७ व्या शतकाच्या मध्यंतरास होऊन गेला असून, घनश्याम सट्टककर्त्याने संस्कृत, प्राकृत, मराठी इत्यादि भाषामधून महान् ग्रंथ रचना केली असावी शिखंडचंद्र राजा व आनंदसुंदरी यांचे प्रेम हाच सट्टकाचा मुख्य विषय आहे. तिच्यामुळेच राजाला चक्रवर्तीपण प्राप्त होते. इतर सट्टकाप्रमाणेच या सट्टकाची रचना आहे.

अशा प्रकारे प्राकृत साहित्यात सट्टक साहित्याची रचना अतिअल्प असल्याची आपणाला दिसून येते. अर्थात् सट्टक साहित्य प्राकृत भाषा वैशिष्ठ्यांच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे असून ते फार अपुरे आहे. अजूनही ह्या साहित्याचे संशोधन होणे अत्यावश्यक आहे.

## प्राकृतमधील निबंध साहित्य

प्राकृतमधील निबंध साहित्यात प्रामुख्याने धार्मिक आणि दार्शनिक विषयांची चर्चा मिळते. निबंधाचा आरंभ निर्युक्तीपासून झालेला दिसून येतो. निर्युक्ति ही सिद्धांत साहित्याची संक्षिप्त आणि छंदोबद्ध व्याख्या आहे. भद्रबाहू यानी (इ. स. पूर्व ३६५) सिद्धांत साहित्यावर अनेक निर्युक्ति लिहिल्या आहेत. यातील बऱ्याचशा

निर्युक्ति आज उपलब्ध आहेत. यांच्यापासून टीका आणि चूर्णि यांची रचना झाली आणि या सर्वांच्या साह्यानेच पुढे विशाल व महान असे टीका साहित्य विकसित झाले. नंतर याचा संस्कृतवर देखील प्रभाव पडला. जैन आचार्यांच्या देखील बहुतेक टीका व वृत्ति संस्कृतमध्येच आहेत. प्राकृतमध्ये देवेंद्रकृत 'उत्तराध्ययन' वरील 'सुखबोधा' टीका शीलांकाच्या वृत्ति व जिनप्रभसूरिकृत 'तीर्थकल्प' (इ. स. १३३१) इ. ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

सैद्धांतिक ग्रंथात शिवशर्मकृत 'कर्मप्रकृति', चन्द्रर्षिकृत 'पंचसंग्रह', सिद्धसेनकृत 'सम्मतितर्क' आणि आठ हरिभद्रकृत असलेले अनेक धर्म ग्रंथ गंभीर अध्ययनास अत्यंत उपयोगी आहेत.

या टीका ग्रंथाखेरीज जैन महाराष्ट्री भाषेत प्रकरण, संग्रहणी, क्षेत्रसमास, कर्मग्रंथ, जीवविचार, नवतत्त्व, समाचारी, विधिप्रबंध इत्यादि अनेक प्रकारचे ग्रंथ लिहिले गेले आहेत. यासिवाय धर्मसंग्रहणी, व्याकरणसूत्र, विशेषावश्यक, प्रवचनसारोद्धार, उपदेशपर टीका, उपदेशरहस्य इत्यादि ग्रंथात मध्ययुग आणि उत्तरयुगातील महाराष्ट्री गद्य पद्याचे रूप अत्यंत सुरक्षित आहे. याचे अधिक विवेचन येथे देणे अनावश्यक आहे.

दिगंबर जैन साहित्याची भाषा शौरसेनी असून तिचे प्राचीनरूप भूतबलिकृत षट्खंडागम सूत्रात उपलब्ध आहे. यातील मुख्य विषय 'कर्मसिद्धांत' हा आहे. गुणधर आचार्यांचा 'कषायप्राभृत' देखील प्रसिद्ध सूत्रग्रंथ आहे. या दोन्ही ग्रंथावर अनेक टीका लिहिल्या गेल्या आहेत. यांचा रचनाकाल साधारणपणे विक्रमसंवत् दुसरे शतक मानला जातो. या ग्रंथरचनेशिवाय पुष्कळशी रचना पद्यात देखील आहे. शिवार्यकृत 'मूलाराधना' ग्रंथात तप, ज्ञान, चरित्र, दर्शन इत्यादि अनेक विषयांचे विवेचन केले आहे. आ. कुंदकुंदाचार्यांनी ८४ पाहुडाची रचना केली होती. प्रवचनसार, समयसार, नियमसार इ. त्यांचे १२–१३ ग्रंथ सध्या उपलब्ध असून, त्यातून आध्यात्माची सखोल चर्चा केली आहे. दिगंबर जैन संप्रदायात त्यांचे मानाचे स्थान आहे. याच प्रकारे वट्टकेरकृत मूलाचार, वसुनंदिरचित श्रावकाचार, देवसेनकृत दर्शनसार व आराधनासार, शांतिसूरिरचित जीवविचार इत्यादि अनेक ग्रंथ आहेत. या निबंध ग्रंथ साहित्यातून साहित्यिकता जरी विशेष प्रकारे आढळत नसली तरी, त्यात संशोधकांना पारिभाषिक शब्दावली, धर्म-दर्शन-नीति तसेच समाज संस्कृति आणि इतिहास याची खूप माहिती मिळते. अर्थात् प्राकृत साहित्यात निबंध साहित्य भरपूर असून त्याचा पूर्णतः एक वेगळा भाग तयार करणे आवश्यक असून, त्या दृष्टीने अध्ययन व अध्यापन करणेही तितकेच महत्त्वाचे आहे.

## बहुभाषिक जैन साहित्य

### जैन साहित्याचा दृष्टिकोन–

विविधता व प्राचीनत्व हे भारतीय संस्कृतीचे वैशिष्ठ्य आहे. विविध धर्म, विविध भाषा, विविध पंथ यांची समन्वयता भारतीय संस्कृतीत असली तरी प्रत्येक धर्माचे अस्तित्व स्वतंत्र आहे. जैनधर्म हा भारतीय संस्कृतीचा एक वैशिष्ठ्यपूर्ण पैलू आहे. या धर्माच्या तत्त्वज्ञानाला, आचारविचाराला व साहित्याला भारतीय संस्कृतीत महत्त्वपूर्ण स्थान आहे.

जैनधर्माची दृष्टी विश्वव्यापी व अनेकान्तात्मक आहे. जीवनाच्या सगळ्या गरजा व भावना याकडे लक्ष देणारी आहे. त्याचप्रमाणे या धर्माने निर्माण केलेले साहित्यही विश्वव्यापी व अनेक प्रकारचे आहे. हे साहित्य केवळ पारमार्थिक किंवा धार्मिक नसून लौकिक व व्यावहारिक बाबींनी नटलेले आहे. त्याचा दृष्टिकोन दार्शनिक असूनही त्याबरोबरच तो वैज्ञानिकही आहे. साहित्याचे असे एकही क्षेत्र नाही की ज्या क्षेत्रात किंवा प्रकारात जैन साहित्य निर्माण झालेले नाही.

### विश्वभारती साहित्य–

विविध विषयांनी परिपूर्ण असलेल्या या जैन साहित्यात न्याय, दर्शन, योग, आचार, पुराण, इतिहास, कथा, आख्यान, नीतिशास्त्र, व्याकरण, भूगोल, ज्योतिष, गणित, मंत्र, तंत्र, शकुन, आयुर्वेद, प्राणीविद्या, वनस्पतिशास्त्र, कृषिविद्या, वास्तुकला, मूर्तिकला, चित्रकला, संगीत इत्यादि विषयांचा समावेश आहे. म्हणूनच जैन साहित्याला 'विश्वभारती-साहित्य' म्हणून संबोधणे यथार्थ ठरते. मौलिक रचनेबरोबरच जैन साहित्यात टीका, वृत्ती, चूर्णी, भाष्य, वार्तिक देखील भरपूर आहेत. गाथा, श्लोक, सूत्र या संपूर्ण भारतीय लेखन–पद्धतीचा अंगिकार जैन साहित्याने केला आहे.

जैनधर्म जगाचे कल्याण करणारा आणि प्राणीमात्रांचा उद्धार करणारा आहे. त्याचप्रमाणे त्याच्या साहित्य निर्मितीची भाषा विश्वव्यापक होत गेली आहे. या धर्माने एखाद्या विशिष्ट भाषेचा मोह कधीच धरलेला नाही. जनसामान्याच्या बोली भाषेलाच तो आपल्या संदेशाचे माध्यम बनवीत आला आहे. ज्या ज्या देशात या धर्माने पदार्पण केले, तेथील प्रचलित भाषेतच ज्ञानदान करण्याचे महत्त्वपूर्ण कार्य जैन साहित्याने केले आहे. म्हणून संस्कृत, प्राकृत, मागधी, अर्धमागधी, शौरसेनी, महाराष्ट्री, गुजराथी, राजस्थानी, हिन्दी, तामिळ, तेलगू, कानडी वगैरे भारताच्या विविध प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या व पूर्वी बोलल्या जात असलेल्या भाषांमधून या साहित्याची निर्मिती झालेली आहे.

जैन धर्माचे विचार त्या समाजात पसरविण्यासाठी, जैन साहित्याने निरनिराळ्या बोली भाषांचा केलेला स्वीकार या साहित्याचे मूलभूत श्रेष्ठत्व सिद्ध करतो. कोणत्याही एका भाषेचा स्वीकार करून सर्वसामान्य समाजाला ज्ञानदानापासून अंधःकारात ठेवणे हा मार्ग जैन साहित्याने कधीच स्वीकारला नाही. या उलट ज्ञानाची सर्व क्षेत्रे सर्वांना खुली ठेवण्याचे आदर्श धोरण जैन साहित्याने स्वीकारले. इतकेच नव्हे तर जैन धर्माने या विविध भाषामधून प्रथमतः साहित्य निर्माण करण्याचे मौल्यवान कार्य केले आहे. म्हणूनच काही भाषांची जडण घडण झाली, विकास झाला. या कारणामुळेच भारतातील 'बहुभाषिक जैन साहित्या'मध्येही एकतेचे सूत्र, एकात्मतेचा विचार प्राधान्याने जाणवतो.

## हिंदी जैन साहित्य–

हिंदी भाषेची उत्पत्ति अपभ्रंश प्राकृतपासून झाल्याचे आता सर्वमान्य झाले आहे. केवळ हिंदीचीच नव्हे तर मराठी, गुजराथी, राजस्थानी, सिंधी इत्यादि भाषांची ती जन्मदात्री असल्याचे मानण्यात आले आहे यावरून अपभ्रंश भाषा तत्कालीन देशव्यापी भाषा असल्याचे आढळून येते. ही भाषा सर्वत्र त्यावेळी देशभाषेच्या स्वरूपातच प्रचलित असलेली दिसून येते. त्याचप्रमाणे भारतीय भाषा इतिहासात तिचे एक वैशिष्ठ्यपूर्ण असे स्थान आहे कारण प्राचीन भारतीय आर्यभाषा व अर्वाचीन भारतीय आर्यभाषा यामधील अपभ्रंश भाषा हा सर्वात महत्त्वाचा दुवा मानला जातो. १२–१३ व्या शतकापूर्वीचा हिंदी भाषेचा इतिहास तितकासा प्रकाशित नव्हता. तो प्रकाशित करण्यात अपभ्रंश भाषेने फार महत्वाची कामगिरी बजावली आहे. अपभ्रंश साहित्य अधिकाधिक प्रकाशित आणण्याचे श्रेय मध्यप्रांताच्या वाट्याला जाते. भारतीय इतिहास तज्ञ श्रीकाशीप्रसाद जयसवाल यांनी 'पुरानी हिंदी का जन्मकाल' या शीर्षकाच्या लेखात म्हटले आहे की, 'अपभ्रंश भाषा मध्यप्रदेशातील पवित्र जैन मंदिररूपी वृक्षरूपाने मुफलित झाली असून हिंदी भाषा प्राकृतपासून विक्रम शतक १० मध्ये विलग झाली असावी.' अनेक भाषांची जन्मदाती असल्यामुळे अपभ्रंश भाषेचे महत्व कोणालाच नाकारता येणार नाही.

अपभ्रंश भाषेपासूनच हिंदीची उत्पत्ति झाल्याचे मानल्यामुळे अपभ्रंश भाषेचा सखोल अभ्यास तथा अवलोकन करणे अत्यावश्यक आहे. अपभ्रंश भाषेतील यशोधर–चरित, नागकुमार–चरित, करकण्डु–चरित, सावयधम्म दोहा आणि पाहुड दोहादि जैनग्रंथ कारंजामधून प्रकाशित झाले आहेत. या सर्व संपादनाचे श्रेय




'भास्कर'चे संपादक डॉ. हीरालाल जैन यांनी दिले तर अयोग्य ठरणार नाही. दुसरी आनंदाची गोष्ट अशी की, त्रिपिटकाचार्य श्रीराहुल सांस्कृतायन यांनी देखील बौद्ध साहित्यातील काही अपभ्रंश ग्रंथाचा शोध लावला आहे. हे ग्रंथ त्यांना नेपाळ व तिबेट देशातून प्राप्त झाले आहेत. ब्राह्मण साहित्यातून अपभ्रंश भाषेचा तितकासा आदर केलेला दिसत नाही. परंतु तरीसुद्धा सर्वथा या भाषेतील ग्रंथाचा अनादरही केला नाही.

अशा प्रकारे जैन, बौद्ध, हिंदू या सर्व धर्मीयांच्या लेखक तथा कवींनी या भाषेचा वापर केला असला तरी, या अपभ्रंश भाषेचा विशेष सन्मान व प्रचार जैन साहित्यातच झालेला दिसून येतो. अपभ्रंश निर्मित जैन साहित्य फक्त विशालच नाही तर ते अधिक महत्त्वाचे आहे. भाषा विज्ञानाच्या दृष्टीने यात काही विशेषता अशा दिसून येतात की, अन्य साहित्यातून त्या क्वचितच आढळतात. हिंदीची उत्पत्ति, क्रमिक विकास व ज्ञान प्राप्ति करून घेण्यासाठी हिंदी जैन साहित्याचा अभ्यास तथा मनन करणे अत्यावश्यक आहे. परंतु दुर्दैव असे की हिंदी जैनेतर विद्वानांनी इकडे बरेच दुर्लक्ष केलेले दिसून येते. विविध प्रकारच्या उच्च मासिक पत्रातून कथा, कहानी लिहित असताना जैन साहित्याचा आवश्यक उल्लेख केलेला दिसून येतो. परंतु इतरत्र मात्र त्याची पूर्णतः अवहेलना केलेली दिसून येते.

कोणत्याही साहित्याचे गंभीर तथा सखोल अध्ययन केल्याशिवाय त्याला पूर्णता प्राप्त होत नाही. शिवाय कोणतेही साहित्य हे कोणत्याही संप्रदायाची पैत्रिक संपत्ति असू शकत नाही. ते साहित्य विश्वमात्राचे सर्वस्व असते. समालोचक साहित्यरूपी न्यायांचा न्यायाधीश असतो. त्याला पक्षपात तथा सांप्रदायिकता यापासून दूर राहणे जरूरीचे आहे. आणि अशा प्रकारच्या त्याच्या आचरणामुळेच काय तो न्याय असा निकाल लागू शकतो. याबाबत कन्नड आणि तेलगु विद्वानांचे स्वागत करणे आद्यकर्तव्य ठरते. कारण या विद्वानांनी या विविध भाषेतील साहित्य उदार अंतःकरणाने प्रकाशित केलेले दिसून येते.

महत्त्वाची बाब अशी की संस्कृत व प्राकृत जैन साहित्याने भारत वर्षाच्या इतिहास निर्मितीमध्ये जितकी मदत केली आहे, त्याचप्रमाणे हिंदी जैन साहित्याने देखील याबाबतीत खूप मदत केलेली दिसून येते. जैन विद्वानांचे लक्ष सदैव इतिहासाकडे अधिक प्रमाणात असलेले दिसून येते. बहुतेक जैन लेखकांनी आपल्या ग्रंथाच्या सुरुवातीस किंवा शेवटी स्वकालीन शासक, राजा, आश्रयदाता, तथा गुरु परंपरा यांचा उल्लेख केलेला दिसून येतो. एवढेच नव्हे तर, काही काही ग्रंथातून त्याविषयीच्या विस्तृत अशा प्रशस्ति दिल्याच्याही दिसून येतात.

दुसरी महत्त्वाची बाब अशी की, आजपर्यंत हिंदी साहित्यात पद्यग्रंथांची प्रधानता अधिक असल्याचे दिसून येते. त्या मानाने मात्र गद्यग्रंथाची कमतरता असल्याचे आढळते. परंतु यामध्ये हिंदी जैन साहित्याची विशेषता अशी की, यात गद्यग्रंथ विपुल प्रमाणात आहेत. हे ग्रंथ हिंदी गद्य भाषेचा विकास क्रमशः समजावून घेण्यासाठी साधनभूत ठरतात. १६ व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंत हिंदी गद्य ग्रंथ जैन साहित्यात आढळून येतात. पं. हेमराज रचित पचास्तिकाय, प्रवचनसारवरील वचनिका, पांडे रायमल्लजीकृत समयसारची बालबोध टीका आणि पर्वतधर्मार्थीची समाधितंत्र वचनिका इत्यादि ग्रंथ हिंदी गद्य साहित्याचे ठळकपणे निदर्शन करू शकतील. विशेषतः पं. बनारसीदास यांचे अर्धकथानक केवळ हिंदी साहित्याचेच नव्हे तर, संपूर्ण भारतीय साहित्याचे एक उत्कृष्ट आत्मकथानक तथा जीवन चरित असल्याचे दिसून येईल.

आजवर जे हिंदी जैन साहित्य उपलब्ध आहे ते आपणाला दोन भागात विभाजित करता येईल. १. श्वेतांबर हिंदी साहित्य व २. दिगंबर हिंदी साहित्य. श्वेतांबर जैन साहित्यात कथाग्रंथ अधिक असून सैद्धांतिक ग्रंथाची कमतरता असल्याचे दिसून येते. उलट दिगंबर साहित्यात जितके कथाग्रंथ आहेत तितकेच सैद्धांतिक ग्रंथही आहेत. सर्वार्थसिद्धि, राजवार्तिक, गोम्मटसार, प्रवचनसार, समयसार, पचास्तिकायासारखे महत्त्वपूर्ण व सखोल सैद्धांतिक ग्रंथाच्या वचनिका (हिंदी टीका) दिगंबर साहित्यात उपलब्ध आहेत. एवढेच नव्हे तर,

परीक्षामुख, आप्तमिमांसा, न्यायदीपिका इत्यादि न्यायग्रंथांचे हिंदी अनुवाद देखील उपलब्ध आहेत. याशिवाय इतरही काही ग्रंथाचे हिंदी अनुवाद केलेले दिसून येतात. दिगंबरांनी संस्कृत तथा प्राकृत साहित्यामधील प्रत्येक विषयावर काही ना काही अवश्य लिहिले आहे. या दिगंबर हिंदी साहित्याच्या आधारे देखील एखाद्याला दिगंबर सांप्रदायाची माहिती मिळू शकेल. याचे ज्वलंत उदाहरण म्हणजे संस्कृतचे ज्ञान नसणारे शेकडो जैनी गोम्मटसारादि ग्रंथाची गंभीर तथा सखोल चर्चा करू शकतात. श्वेतांबर सांप्रदायात ही प्रवृत्ति कमी प्रमाणात असल्याचे आढळून येते.

दिगंबर सांप्रदायात सैद्धांतिक व इतर ग्रंथाचा अनुवाद फक्त हिंदी भाषेतच नव्हे तर कन्नड, तामिळ, तेलगु इत्यादि अन्य प्रांतिय भाषामधून झालेला दिसून येतो. दिगंबर जैन ग्रंथकर्त्यांनी या गोष्टीला जैन धर्माचा प्रसार करण्याचे एक प्रमुख कारण मानले आहे. हिंदी जैन ग्रंथांचा प्रचार गुजराथ व दक्षिण प्रांतात देखील बराच झालेला दिसून येतो. कारण दाक्षिणात्य जैनी देखील गोम्मटसारादि कठीण सिद्धांत ग्रंथातील तत्त्वांचा अभ्यास हिंदी टीकेद्वारे करून तो समजावून घेण्यात सफल झालेले दिसतात. यावरून हे स्पष्ट होते की, दक्षिणेमध्ये हिंदी साहित्याचा अधिकाधिक प्रचार करण्याचे कार्य हिंदी जैन साहित्यानेच केले आहे. कन्नड आणि तामिळ साहित्याप्रमाणेच हिंदीत देखील गृहस्थवासीयांनी अनेक ग्रंथांची रचना केली आहे. त्यातही दिगंबर श्रावकांनी या बाबतीत खूपच मदत केलेली दिसते.

हिंदी जैन साहित्याचे विभाजन आपणाला एकूण चार भागात करता येईल. १. सैद्धांतिक ग्रंथ, २. पुराण चरित्रादि ग्रंथ, ३. पूजा–पाठ, ४. भजन पद इत्यादि. दिगंबर जैन समाजात काही शतकापर्यंत पूजा–पाठाची परंपरा रूढ असल्यामुळे हिंदी जैन साहित्यात आपणाला अधिकाधिक पूजा–पाठविषयक पुस्तकाची अधिकता दिसून येते. याचे प्रमुख कारण म्हणजे तत्कालीन भक्तिकालाचा प्रभाव होय.

हिंदी जैन साहित्याची विचारधारा शांतरसप्रधान आहे. यातील प्रत्येक ग्रंथात मधुर अमृताचा प्रवाह सतत वहात असताना दिसतो. या साहित्यात शृंगारादि साहित्याची रचना त्या मानाने अजिबात झाली नाही. निवृत्ति–प्रधान असलेल्या जैन धर्मात ही गोष्ट घडणे म्हणजे विशेष महत्वाचे नाही. तरीसुद्धा संस्कृत, प्राकृत साहित्यात जैनरचित ग्रंथामध्ये शृंगाररसाची अधिकता आढळते. या बाबीविषयी जैन विद्वानांना त्याचे विशेष वाटत नव्हते. एवढेच नव्हे तर विषय–विरक्त जिनसेनासारख्या आचार्यांनी देखील शृंगाररसाने युक्त अशा काव्य ग्रंथांची रचना केलेली दिसून येते. यावरून असे दिसून येते की, संस्कृत–प्राकृत भाषा कवींचा उद्देश धर्म व साहित्य यांचे रक्षण करण्याचा असून, हिंदी कवींचा उद्देश जैनधर्माचा प्रचार तथा रक्षण करणे हा होता. प्रामुख्याने इतरेजनाची मने आकर्षित करून घेण्यासाठी या आचार्यांनी आपल्या ग्रंथरचना शृंगारादि रसांनी परिपूर्ण केलेल्या दिसतात. परंतु त्याचबरोबर त्यांनी आपला मूळ हेतू अर्थात् निवृत्तिमार्ग सोडलेला दिसत नाही. आपल्या ग्रंथात तीर्थंकरादि महापुरुषांना नायक मानून, नश्वर सांसारिक विषयांचा सुखाभास सिद्ध करून शेवटी निवृत्ति मार्गाचीच प्रधानता दाखविली आहे.

हिंदी जैन साहित्यात प्रत्यक्ष आध्यात्मिक ग्रंथरचना केलेले देखील अनेक कवि आहेत. १० व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंत जवळजवळ ५०० संत तथा कवींनी आत्मा, परमात्मा, जगत एवं त्यांची स्थिति या विषयावर लिखाण केले आहे. या लिखाणाद्वारे भव्य प्राण्यांना सन्मार्ग दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. यांनी प्रथम ज्ञानी लोकांच्या मार्गाचे अनुकरण केले व त्यानंतर आत्मचिंतन व मनन करून आपले विचार साहित्यात उतरविले. यात द्वैताची भावना अजिबात नाही. विविध रूपकांच्या साह्याने या आध्यात्मिक कवींनी आपली वर्णने हृदयस्पर्शी बनविली आहेत. या आध्यात्मिक कवींच्यामध्ये आपणाला छीहल, पांडे राजमल, रूपचंद, बनारसीदास, जगजीवन, द्यानतराय, भूधरदास, हेमराज, बुधजन छत्रपति यांच्याशिवाय हंसराय, पारस, चंद्रविजय, जिनदास, अचलकीर्ति, हरिचंद्र, दीपचंद, माल, यशोविजय, वृन्दावन, बुलाकीदास, दौलतराय यांचाही समावेश करता येईल.

छीहल कवि राजस्थानी विद्वान् असून त्यांनी बावनी, पंथीगीत, उदरगीत, मनगीत या काव्यांची रचना केली. डॉ. रामकुमार वर्मा व आचार्य रामचंद्र शुक्ल यांनी देखील त्यांच्या भाषाशैलीची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. पांडे राजमल आध्यात्मशास्त्राचे प्रमुख प्रवक्ते असून त्यांनी जंबूस्वामीचरित्र, लाटीसंहिता, अध्यात्मकमल-मार्तण्ड, छंदोविद्या, पंचाध्यायी, तत्त्वार्थसूत्र वचनिका व समयसार कलश वचनिका या कृतींची रचना केली आहे.

प. रूपचंद हे १७ व्या शतकात होऊन गेले. त्यांच्या काव्यातून तर जणु अध्यात्मरूपी सरिताच वहात असताना दिसून येते. कवीवर बनारसीदासांनी यांना आपले गुरु मानले आहे. रूपचंदानी परमार्थ दोहाशतक, परमार्थगीत, अध्यात्मदोहा, अध्यात्मसवैया, परमार्थ हिंडोलना, खटोलनागीत इत्यादि गीतांची रचना केली असून ती आध्यात्मिक रसाने ओतप्रोत भरली आहेत

पं. बनारसीदास १७ व्या शतकातील हिंदी जैन साहित्यातील एक सुप्रसिद्ध कवी मानले जातात. त्यांना काव्य प्रतिभा सहज सुलभपणे प्राप्त झाली होती. यांचा विवाह वयाच्या ११ व्या वर्षी झाला. विवाहाच्या दिवशीच आपल्या आजीचा स्वर्गवास, वहिणीचा जन्म व विवाह या तीन घटना त्यांनी पाहिल्या. घरातील सर्व जबाबदारी सांभाळून समर्थपणे त्यांनी आपले लेखन कार्य केले. त्यांची 'नवरस रचना' ही प्रथम कृति असून ती शृंगारिक होती. पुढे ती बनारसीदासांनी गोमती नदीला कायमची भेट म्हणून देऊन टाकली. नंतर त्यांच्या जीवनात खूपच बदल झाला. पुढे त्यांनी नाममाला शब्दकोश, समयसार हे आध्यात्मिक नाटक, बनारसीविलास या स्फुट रचनेबरोबरच अध्यात्मगीत, नवरत्न कवित्त, ज्ञानपच्चीसी, अध्यात्मबत्तीसी, कर्मछत्तीसी, अध्यात्महिंडोलना, मोक्षपैडी, अध्यात्मफाग इत्यादि कृतींची रचना केली. बनारसीदासांचे 'अर्धकथानक' हिंदी भाषेचे प्रथम आत्मचरित्र आहे. आपल्या सर्व काव्यातून त्यांनी आत्मा–अनात्मा यांच्या वास्तविक रूपाचे दर्शन घडविण्याचा प्रयत्न केला आहे.

द्यानतराय यांनी पद, भजन, पूजा, स्तोत्र यांच्या रचना केल्या. धर्मविलासामध्ये यांच्या सर्व रचनांचा संग्रह करण्यात आला आहे. कवी भूधरदासांनी ६८ पेक्षा अधिक पदाची रचना केली असून जैन शतक, पार्श्वपुराण, पुराण सुंदर काव्य या तीन महत्त्वाच्या ग्रंथाचीही रचना केली आहे. हेमराजानी सीतपर चौरासी बोल, प्रवचनसार भाषा, गोम्मटसार कर्मकाण्ड, पंचास्तिकाय भाषा, परमात्मप्रकाश भाषा, नयचक्र भाषा, गणितसार, बावनी, भक्तामर स्तोत्र, साधुकी आरती, सुगंधी दशमी कथा, दोहाशतक जीवसमास या हिंदी ग्रंथांची रचना केली आहे.

गद्यलेखक तथा टीकाकारामध्ये टोडरमलजी सर्वप्रधान आहेत. त्यांच्याशिवाय जयचंद, हेमराज, आत्माराम इत्यादि चांगले लेखक असून सदासुख, भागचंद, दौलतराम, जगजीवन इत्यादि मध्यम श्रेणीचे लेखक आहेत. श्वेतांबरांच्यामध्ये आत्मारामजी सोडून इतर कोणी प्रभुत्वशाली गद्य लेखक दिसून येत नाहीत.

हिंदी जैन साहित्यातील मध्यकालीन व तदनंतरच्या साहित्यावर दृष्टीक्षेप टाकल्यानंतर हिंदी जैन साहित्याच्या अगदी प्रारंभिक काळाचे अवलोकन करणे अगत्याचे ठरते. स्वर्गीय श्रीकाशीप्रसाद जायसवाल यांच्या मते प्राचीन हिंदीचा जन्मकाल हा १० व्या शतकापूर्वी म्हणजे ७-८ व्या शतकातील असावा. परंतु बाबू शामसुदरदास तथा पं. रामचंद्रजी शुक्ल यानी 'हिंदी साहित्य का इतिहास' मध्ये हिंदी साहित्याचा विकास काल इ. स. १२ व्या शतकाचा मध्यभाग मानला आहे. हिंदीचा जन्मकाल जरी ६ वे किंवा ७ वे शतक मानला असला तरी १२–१३ व्या शतकापासूनच हिंदी साहित्याची शृंखला व्यवस्थितरित्या जोडता येते. प्राचीन हिंदीचा जन्मकाल १० व्या शतकापूर्वीचा मानला असला तरी १२ व्या शतकानंतरच हिंदीला पूर्णत्त्व प्राप्त झालेले दिसते.[१]

१ जैन सिद्धांत भास्कर – मुजवली शास्त्री पृ. नं. २०५.




हिंदी साहित्याची प्रारंभिक रचना खऱ्या अर्थाने जैन कवींनीच केली आहे अर्थात् ही प्रारंभिक रचना राजाश्रयाच्या आधारे केली नसून धर्माश्रय तथा धर्मप्रचार या हेतूनी केली आहे बौद्ध तथा जैनांनी स्वधर्म प्रचारासाठी लोकभाषेचे माध्यम वापरलेले दिसून येते. पाली, प्राकृत, अपभ्रंश इत्यादि बोली भाषांचा स्वीकार सर्वात प्रथम यांनीच केलेला दिसून येतो. हिंदीचा प्रारंभिक काल शालिभद्रसूरीच्या 'भरतेश्वर बाहुबली रास' (इ. स. ११८४) यापासून परावर्तित झालेला दिसून येतो. या रचनेनंतर प्रामुख्याने 'चदनबाला–रास, जीवदया–रास, स्थूलिभद्र–रास, रेवंतगिरी–रास, नेमिनाथ–रास, कच्छुली–रास, पट्टाभिषेक–रास, पंचपांडव चरित–रास इत्यादि ग्रंथाची रचना झालेली दिसून येते. या सर्व ग्रथाचे कर्ते जैन मुनीच असल्याचे दिसतात. त्यांनी काव्यात्मक माध्यमाद्वारे कोणत्या ना कोणत्या महापुरुषाचे वर्णन करून आदर्श प्रस्थापनेचा प्रयत्न केला आहे. कबीर, सूरदास, तुलसी यांच्याप्रमाणे त्यांचे काव्य देखील सांप्रदायिक प्रभावापासून मुक्त झाले नसले तरी त्यात साहित्यिकतेचा अभाव मात्र नाही. सूर, कबीर, तुलसी यांच्या रचनेइतकेच त्यांचे स्थान महत्त्वाचे आहे. या कवीच्या ग्रंथकृतीतून पूर्णत. शांत रसाचा प्रादुर्भाव झालेला आहे. पृष्ठभूमीच्या स्वरूपात वीर, शृंगार तथा करुण रसांना स्थान दिले असले तरी अंतिम तत्त्व निवृत्ति असल्याचे पुनः पुनः कथन केले आहे. त्यांची शैली प्रायः प्रबंधात्मक असून छंद योजनेत विविधतेचा अभाव आहे. काव्यशास्त्रीय रूढी, परंपरागत नियमांचा प्रभाव या काव्यांच्यावर कमी असलेला दिसून येतो. वस्तुतः या रचना आपल्या काव्य–रूप तसेच शैलीच्या दृष्टीने हिंदी साहित्याच्या विकासाची प्रारंभिक अवस्था असल्याचे सूचित करतात.

हिंदी साहित्याचे प्रारंभिक युग इ. स. ११८४ पासून १३५० इतके मानले जाते. या संपूर्ण युगात जैन कवींनीच आपल्या श्रेष्ठ, सखोल, गंभीर व महत्त्वपूर्ण रचना तथा ग्रंथनिर्मिती केल्याचे दिसते यावरून या प्रारंभिक हिंदी युगाला आपण 'जैन युग' असे नाव दिले तरी अतिशयोक्तीचे ठरणार नाही.

अशा प्रकारे हिंदी जैन साहित्य समृद्ध करण्यामध्ये विविध जैन कवींनी व लेखकांनी आपले महान् योगदान दिले आहे. आजकाल या साहित्याकडे विशेष लक्ष दिलेले दिसून येत नाही. त्यासाठी धनिक वर्गाने पुढे येऊन मुक्त हस्ताने दान देऊन या साहित्याचे संशोधन, संपादन तथा संगठन करणे जरूरीचे नव्हे अत्यावश्यक आहे.

## मराठी जैन साहित्य

जैन आचार्यांनी व विद्वानांनी प्राकृत, संस्कृत, अपभ्रंश भाषामधून ग्रथरचना करून भारतीय साहित्यात मोलाची भर घातलेली दिसून येते या प्राकृत भाषेशिवाय कन्नड, तामिळ, तेलगु, गुजराथी, राजस्थानी, हिंदी इत्यादि भाषेतूनही त्यांनी ग्रंथरचना केली आहे. कन्नड भाषेत जैनानी निर्माण केलेल्या साहित्याला तर, 'जैन युग' असे म्हटले आहे. या विविध भाषेतील साहित्य रचनेप्रमाणेच काही जैन विद्वानानी जैन संस्कृतीची माहिती व्हावी म्हणून मराठी भाषेत ग्रंथरचना केल्याचेही दिसते. परंतु या मराठी जैन साहित्याची व्हावी तशी वाढ अथवा समृद्धि झालेली आज तरी दिसत नाही. अगदी मोजक्याच लेखकांनी अशा प्रकारची मराठी जैन साहित्य रचना केलेली दिसून येईल

मराठी जैन साहित्याची वाढ न होण्याची प्रमुख दोन कारणे आपणाला सांगता येतील– १. उत्तरेकडील हिंदी तर दक्षिणेकडील कानडी भाषाचा जैनावर अत्याधिक प्रभाव पडला होता. २. तत्कालीन महाराष्ट्रातील भागवत संप्रदायाचा जैनावर पडलेला प्रभाव. उत्तरेकडील हिंदीचा प्रभाव जैनावर इतका पडलेला दिसून येतो की, त्यानी संस्कृत, प्राकृत ग्रंथावर हिंदीतून टीका लिहिल्या आणि यांचाच अत्याधिक प्रसार होऊन ठिकठिकाणी याच हिंदी ग्रथाचा वापर होऊ लागला. त्याचप्रमाणे भागवत संप्रदायाने स्वीकारलेल्या मराठीचा प्रभाव तत्कालीन

सर्वसाधारण जनावर प्रभावीपणे पडला होता. कारण ही तत्कालीन मराठी भाषा या लोकांना समजण्यास तसेच आकलन होण्यास सोपी होती. जे मराठी जैन लेखक होते त्यांच्यावरही या संप्रदायाचा प्रभाव सहजासहजी पडला आणि या सर्व गोष्टीचे पर्यावसन मराठी जैन साहित्य कमी प्रमाणात उपलब्ध होण्यावर झाला.

मराठी भाषेच्या उत्पत्तीविषयी खोलवर मीमांसा करण्याचा प्रयत्न केला तर आपणाला असे दिसून येईल की मराठी ही महाराष्ट्राची भाषा असून ती एक प्रादेशिक भाषा आहे. परंतु या प्रादेशिक मराठी भाषेची उत्पत्ति कशी व केव्हा झाली हे मात्र निश्चितपणे अजूनही भाषाशास्त्रज्ञ सांगू शकले नाहीत. " मराठी भाषेचा उद्गम आणि विकास " या आपल्या ग्रंथात प्रा. कृ. पा. कुलकर्णी यानी नमूद केले आहे की, हिंदीसंबंधी जो नियम देशभाषांच्या संशोधनाच्या जोरावर झाला, तोच गुजराती व मराठी यासंबंधीच्या जैनांच्या धर्मवाङमयाच्या संशोधनाच्या बळावर आवश्य मांडता येईल.

जैनाचे धर्मवाङमय त्या त्या प्रादेशिक भाषेत तयार झाले आहे. उपलब्ध जैन ग्रंथाची भाषा अर्धमागधी प्राकृत शौरसेनी असल्याचे दिसून येते. या प्राकृत भाषेचा व मराठीचा अत्यंत घनिष्ठ असा संबंध आहे. कुवलयमाला ग्रंथकर्ते उद्योतनसूरीनी ( इ स ७७८ ) एकूण १८ भाषांचा उल्लेख केला आहे. त्यात मरहट्ठ ( महाराष्ट्र–मराठी ) भाषेचाही उल्लेख आढळतो. 'दड मडह सामलगे सहिरे अहिमाण–कलहसिले दिन्नले गहिल्ले उल्लविरे तहय मरहट्ठे ' या वाक्यावरून मराठी माणूस व मराठी भाषा यांची चागल्या प्रकारे माहिती मिळते. वळकट, ठेंगणा, श्यामलांगी, काटक, अभिमानी, कलहप्रिय दिले, घेतले असे बोलणाऱ्या मराठी माणसाचे सुंदर चित्रण उद्योतनसूरींनी केले आहे. या मराठी माणसाच्या चित्रणाबरोबरच तत्कालीन मराठी भाषा व्यवहारात चांगलीच रूढ असल्याचे समजते.

मराठी शिक्याचे पहिले वाक्य श्रवणबेळगोळच्या इ. स. ९८३ मधील शिलालेखात मिळते. 'श्री चामुंडराजे करवियले । गंगराजे सुत्ताले करवियले ।' यातील चामुडराजा व गंगराजे हे दोघेही जैन होते. त्यांचा काळ साधारणपणे ८–९ वे शतक मानला जातो. वरील वाक्यावरून मराठी भाषा ९ व्या शतकात रूढ असून लिपिबद्ध झाल्याचे दिसून येते. कुंदकुंद समंतभद्रादि आचार्यांनी अनेक प्राकृत ग्रंथांची रचना केली असली तरी, या प्राकृत ग्रंथातून त्यांनी कोठे मराठीचा उपयोग केलेला दिसत नाही. इ. स. ६८३ पासूनच्या काही शिलालेखात मात्र काही मराठी शब्द आढळतात. ज्ञानकोषकार केतकर हे प्राकृत भाषेचा उल्लेख जैन महाराष्ट्री असा करून मराठीवर या भाषेचे बरेच ऋण असल्याचे सांगितले आहे. डॉ. तुळपुळे यांच्या मते ' महाराष्ट्री म्हणजे मुख्य प्राकृत असून या जैन महाराष्ट्रातून मराठीचा उद्गम झाला असावा. ' या मताला अनेक विद्वानांनी समंति दिल्याचेही दिसते.

मराठी ही महाराष्ट्राची भाषा असून, या महाराष्ट्रात जैन समाजाचा इतिहास देखील प्राचीन असल्याचे काही उदाहरणावरून सांगितले जाते. स्वामी समंतभद्रांनी जेथे आपला विजय प्रकट केला ते करहाटक ( कराड जि. सातारा ) व अर्हद्बलि आचार्यांनी जेथे साधू संघाचे समेलन बोलावले होते ते महिमा नगर ( महिमान गड, जि. सातारा ), काष्ठा संघाची सुरुवात जेथे झाली ते नदीतट नगर ( सातारा ), तसेच अपभ्रंश धर्म परीक्षेचे रचना स्थान झालेले अचलपूर ही सर्व ठिकाणे महाराष्ट्रातीलच आहेत आणि याच महाराष्ट्रातील जैन विद्वानांनी मराठी जैन साहित्य समृद्ध करण्यास हातभार लावलेला दिसतो.

मराठी जैन साहित्याचे अवलोकन केले असता, आपणाला मराठी जैन साहित्य १५ शतकापूर्वी जास्त प्रमाणात उपलब्ध असल्याचे दिसून येत नाही. १५ व्या शतकापासून पुढे मात्र जैन साहित्याची सरिता प्रवाहित झालेली दिसते. मराठी जैन साहित्य रचनेत ज्यांनी ज्यांनी आपले योगदान केले आहे त्यांची संक्षिप्तरित्या माहिती देण्याचा प्रयत्न येथे करण्यात आला आहे.

सर्वात प्राचीन समजला जाणारा मराठी जैन ग्रंथ म्हणजे 'सुदर्शन चरित्र' होय कारंजाचे पट्टाधीश धर्मचंद यांचा शिष्य वीरदास याने शके १५४९ मध्ये या ग्रंथाची रचना केली वीरदासालाच 'पार्श्वकीर्ति' या दुसऱ्या नावानेही संबोधिले आहे. हे नाव दीक्षेनतरचे असावे. या ग्रंथात एकूण २५ प्रसंग कथन केले असून त्याची ओवीसंख्या १६४५ इतकी असावी. भ. महावीराच्या काळी झालेला राजगृहाचा श्रेष्ठी सुदर्शन याची नमस्कार मंत्राचे माहात्म्य दर्शविणारी ही कथा संस्कृतवरून अनुवादित केली आहे. ग्रंथारंभी लेखकाने म्हटले आहे–

पूर्वे शास्त्रीचा विश्वासु । मऱ्हाठिया केला प्रवासु ॥ सुगम बोलता देशभासु ।
देहपासु तोडित । सुदर्शनाचे चरित्र । त्रैलोक्यपावन जी पवित्र ॥

यातील रत्नत्रयाचे विस्तृत वर्णन १५ ते १७ व्या प्रसंगात वर्णिले आहे.

या मराठी जैन कवीशिवाय इतर काही ग्रंथकारांची माहिती मिळते ती पुढीलप्रमाणे आहे–

१. **गुणदासकीर्ति–** प्राचीन मराठी जैन लेखकात गुणदास या लेखकाची गणना केली जाते. ते मूलसघ बलात्कारगण भट्टारक सकलकीर्तीचे शिष्य भट्टारक भुवनकीर्तीचे शिष्य होते. यावरून ते १५ व्या शतकात होऊन गेले असावेत हे निश्चितपणे समजते. याचा 'धर्मामृत' हा महत्त्वाचा ग्रंथ समजला जातो. त्याचे जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर येथून प्रकाशन करण्यात आले आहे. हा ग्रंथ गद्यात्मक असून त्यात गृहस्थांच्या आचार धर्माचे वर्णन केले आहे. यातील विविध सामाजिक, सांप्रदायिक, साहित्यिक तथा पौराणिक उल्लेख अत्यंत महत्त्वाचे आहेत. एवढेच नव्हे तर या ग्रंथातून महाराष्ट्रीय जैन जनजीवनाचे दर्शन आपणाला घडते त्यांच्या पद्मपुराण या दुसऱ्या ग्रंथात रामकथेचे विस्तृत वर्णन केले आहे. हा ग्रंथ जयचंद्र श्रावणे, वर्धा यांच्याकडून १८०८ मध्ये प्रकाशित करण्यात आला आहे. अर्थात् हा ग्रंथ अपूर्ण आहे. त्यातील द्वादशानुप्रेक्षा हे प्रकरण स्वतंत्रपणे प्रसिद्ध करण्यात आले आहे. नेमिनाथांच्या जीवन कथेवर गुणकीर्तीने तीन गीते लिहीली आहेत. तसेच रुक्मिणी स्वयंवर नावाचाही एक ग्रंथ लिहिला आहे.

२. **गुणदास–** गुणदास हे सकलकीर्ति, भुवनकीर्ति यांचे शिष्य असलेल्या ब्रह्मजिनदासाचे शिष्य होते. यावरून ते १५ व्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेले असावेत. याचे 'श्रेणिक चरित्र' काव्यदृष्टया अत्यंत रोचक तथा रसपूर्ण आहे श्रेणिक व पुत्र अभयकुमार यांच्या चातुर्यविषयक कथा यात अत्यत सुंदर रितीने वर्णियत्या आहेत. रामचंद्राच्या विवाह प्रसगाचे तसेच जिनदेव प्रार्थनारूपाने अन्य गीत गुणदासाने लिहिले आहे. ही दोन्ही गीते सन्मति मासिक वर्ष १९५६ मध्ये प्रकाशित केली आहेत.

३. **जिनदास–** हे मूलसंघ बलात्कारगण उज्जंतकीर्ति आचार्यांचे शिष्य होते. सकलकीर्ति व भुवनकीर्ति याचा गुरूरूपाने जिनदासांनी उल्लेख केला आहे. यावरून हे देखील १५ व्या शतकातील उत्तरार्धात होऊन गेले असावेत. यांनीच देवगिरी ( वर्तमान दौलताबाद किल्ला जि. औरंगाबाद ) येथे हरिवंश पुराणाची रचना केली तो अपुरा असला तरी साहित्यिकदृष्टया अत्यंत मोलाचा आहे.

४. **मेघराज–** हे ब्रह्म शांतिदासाचे शिष्य होते हे निश्चितपणे १६ व्या शतकाच्या प्रारंभी होऊन गेले असावेत. यांनी 'जसोधर रास' नावाचे सुंदर काव्य लिहिले. ते जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर येथून १९५८ मध्ये प्रकाशित झाले आहे. 'पार्श्वनाथ भवांतर' ही त्याची छोटी रचना आहे. यानी गुजराथीत एक तीर्थवंदना देखील लिहिली आहे.

५. **सूरिजन–** हे मेघराजचे गुरुबंधू होते. यांनी 'परमहस कथा' नावाचे रूपक काव्य गद्य पद्य मिश्रित चंपूशैलीत लिहीले. दान, तप, शील, भावना या त्यांच्या अन्य रचना आहेत.

६. **कामराज–** हे देखील मेघराजाचे गुरुबंधू होते. यांनी 'सुदर्शन चरित' नावाचे सुंदर काव्य लिहीले. त्याचबरोबर त्यात गृहस्थांच्या आचार धर्माचे सुंदर वर्णन केले आहे. 'चैतन्य फाग' हे कामराजाचे छोटेसे गीत आहे.




७. नागो आया– हे कारंजा येथील भट्टारक मणिसेनाचे शिष्य होते. ते १६ व्या शतकाच्या मध्यंतरात होऊन गेले. यांनी 'यशोधर महाराज चरित्र' लिहीले.

८. अभयकीर्ति– हे मूलसंघ बलात्कारगण अजितकीर्ति आचार्य यांचे शिष्य होते. त्यांनी १५३५ मध्ये 'आदित्यव्रत कथा' तसेच १५३८ मध्ये 'अनंतव्रत कथा' यांची रचना केली.

९. वीरदास– हे कारंजा भट्टारक धर्मचंद्राचे शिष्य होते. यांचे दीक्षेनंतरचे नाव पार्श्वकीर्ति होते. यांनी १५४९ मध्ये 'सुदर्शन चरित' लिहीले. नेमिनाथ विषयक एक गीत व बावन अक्षरी शैलीचे एक छोटे प्रकरण या त्यांच्या अन्य रचना आहेत. 'सन्मति' वर्ष १९५९-६० मधून त्या प्रकाशित झाल्या आहेत.

१०. गंगादास– हे देशील कारंजा येथील भट्टारक धर्मचंद्राचे शिष्य होते. यांनी शके १६१२ मध्ये पार्श्वनाथ भवान्तर हे गीत लिहीले आहे. त्यांनी शके १६१५ मध्ये गुजराथीत आदितवार व्रत कथा लिहीली आहे.

११. महीचंद्र– हे मूलसंघ बलात्कारगणाचे भट्टारक होते. त्यांनी शके १६१८ मध्ये आदिनाथ पुराणाची रचना केली. नेमिनाथ भवांतर, आदिनाथ आरती, अष्टान्हिका व्रत कथा इत्यादि त्यांच्या छोटया रचना महिचंद्रानी लिहिल्या आहेत.

१२. महाकीर्ति– हे महिचंद्र भट्टारकाचे शिष्य होते. यांनी 'शीलपताका' नावाचे काव्य लिहीले. पतिकडून उपेक्षित झालेली एक तरुणी आपल्या चतुराईने, सौंदर्याने व पति भक्तिच्याद्वारे पुन: पतीचे प्रेम प्राप्त करते अशी याची थोडक्यात कथा आहे.

१३ पुण्यसागर– हे भट्टारक अजितकीर्तीचे शिष्य होते. हे १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेले. गुणकीर्तीचा अपुरा ग्रंथ पद्मपुराण तथा जिनदासांचा अपुरा ग्रंथ हरिवंश पुराण यांनी पूर्ण केले. आदित्यव्रत कथाही यांची दुसरी रचना आहे.

१४. गुणनंदि– हे १७ व्या शतकातील लेखक होते. यांनी यशोधर चरित्राची रचना केली.

१५. जिनसागर– हे कारंजा भट्टारक देवेंद्रकीर्तीचे शिष्य होते. यांनी शके १६५६ मध्ये 'जीवंधर पुराण' लिहिले. या रचनाची संख्या ३० असून त्या छोटया आहेत. त्यात सहा व्रतकथा, तीन अन्यकथा, चार पूजापाठ, सात स्तोत्रे, सात आरत्या आणि तीन अन्य स्फुट रचना आहेत. या रचनांचा काल शके १६४६ ते १६६० पर्यंतचा असावा.

१६. महतिसागर– हे कारजा भट्टारक देवेंद्रकीर्तीचे शिष्य होते. आदिनाथ पंच कल्याणिक कथा, रविवार व्रत कथा या छोटया रचनेशिवाय यांनी काही पदांची रचना केली आहे. यांचा काल शके १८ व्या उत्तरार्धात मानला जातो.

१७. रत्नकीर्ति– हे कारंजा भट्टारक सिद्धसेनाचे शिष्य होते. त्यांनी सन १८१३ मध्ये 'उपदेश रत्नमाला' ची रचना केली. भट्टारक सकल भूषणाची संस्कृत रचना 'षट्कर्मोपदेश रत्नमाला' चे हे रूपांतर आहे.

१८ दयासागर– हे १९ व्या शतकातील लेखक आहेत. धर्मामृत पुराणात त्यांनी सम्यग्दर्शनविषयी आठ कथा सांगितल्या आहेत. 'हनुमान पुराण' ही त्यांची दुसरी रचना आहे.

आधुनिक १९ व २० व्या शतकात मराठी जैन साहित्याचे लेखनकार्य, संपादनकार्य अधिक जोरात चालू असून नवनवीन ग्रंथांची त्यात भर पडत आहे या ग्रंथाबरोबरच अनेक मासिके, साप्ताहिके व वृत्तपत्रे यातूनही जैन मराठी साहित्याचे संकलन चालू झाले आहे. शेठ हिरालाल नेमचंद शहा यांनी 'जैनबोधक' साप्ताहिक सुरू

करून जैन जागृतीच्या एका नवीन पर्वाला सुरुवात केली तेच कार्य पुढे पं. कल्लप्पा निटवे, रावजी सखाराम दोशी यांनी चालू ठेवले होते व वर्धमानशास्त्री व सौ कुमुदिनीबाई दोशी यांनी चालू ठेवलेले दिसते. प्रसिद्ध वकील दिवाणबहाद्दूर लट्ठे यांनी 'प्रगति जिनविजय' साप्ताहिक सुरू केले तर, माणिकचंद भिसीकर यांनी 'सन्मति' मासिकाचे संपादक कार्य करून या कार्याला हातभार लावलेला दिसतो. याशिवाय श्रेणिक अन्नदाते याचे 'तीर्थंकर' पाक्षिक, !' पंडिता सुमतिबाई शहा' यांच्या सपादकत्वाखाली श्राविका सस्थानगरद्वारा प्रसिद्ध होणारे 'श्राविका मासिक' व साप्ताहिके यांच्याद्वारे जैन जागृतीचे कार्य व्यवस्थितरित्या होत असलेले दिसते.

**पद्मश्री पंडिता सुमतिबाई शहा–** जैन मराठी साहित्याच्या क्षेत्रात आधुनिक काळात जे लेखक व लेखिकांनी कार्य केले आहे, त्यात प. पं. सुमतिबाई शहांचे नाव सर्वप्रथम घ्यावे लागेल. श्राविका संस्थेतील विविध विभागाची खंबीरपणे जबाबदारी संभाळीत असतानाच त्यानी केलेल्या प्रदीर्घ वाचन व व्यासंगातून अनमोल साहित्याची निर्मिती केली आहे. त्यांच्या विविध प्रकारच्या साहित्यातून त्यांच्या आत्मिक उन्नतीचे तात्त्विक विचारांच्या बैठकीचे व मानसिक सामर्थ्याचे दर्शन होते. त्यांनी छहढाला, श्री आदिगीता महाकाव्य, २४ तीर्थंकर स्तुती, *भावपल्लवी, समयसार, हृदगंध, भावगीता, षट्खंडागम, रामायण, सुवर्णरेखा, हे गीत जीवनाचे* इत्यादी अनेक ग्रंथांचे लेखन व संपादन केलेले आहे. त्यापैकी स्थळाअभावी काही ग्रंथाची थोडक्यात माहिती पुढीलप्रमाणे होय–

**१. षट्खंडागम–** वि. सं. पहिल्या शतकात आचार्य पुष्पदंत व आ. भूतबलि यानी रचलेल्या ग्रंथाला दिगंबर जैन साहित्यात द्रव्यानुयोगातील एक अतिशय महत्त्वपूर्ण ग्रंथ म्हणून मानण्यात येते. हा ग्रंथ एकूण सहा विभागात विभागला आहे. "प्राण्याला त्याच्या कर्मानुसार बरे वाईट फळ भोगावे लागते. शुभ अथवा अशुभ कर्मानुसार त्याला बंध होत असतो. जीव स्वत. कर्माचा कर्ता व भोक्ता असतो. जीवाला तपाचरणाने कर्मबंध रोखता येतो. आत्मअभिलाषी भव्य जीव शरीर व आत्मा यांचा अनुभव घेऊन दुसऱ्याच्या विषयी राग अथवा द्वेष धारण करीत नाही व उत्तम पदाची प्राप्ती कशा करून घेतो." याची माहिती या ग्रथात आहे.

मूळचा अर्धमागधी व ताडपत्रावर लिहिलेल्या या ग्रंथाच्या सहा हजार श्लोकांचे सुरस व सुबोध हिंदीत रूपांतर करण्याचे कार्य प. पं. सुमतिबाई शहा यांनी केले. खरे तर या पवित्र ग्रंथाचे दर्शनही स्त्रियांनी घेऊ नये असे काही कर्मठांचे मत होते. त्यामुळे या ग्रंथाचे केवळ दर्शनच नव्हे तर, परिशीलन करून त्याचे सुबोध हिंदीत रूपांतर करून प्रसिद्ध करण्याचे कार्य एका स्त्रीने केले हे पाहून कर्मठांनी गहजब केला तथापि आचार्य शातिसागरासारख्या महान संतांचा या कार्याला पाठिंबा व प्रेरणा असल्याने कर्मठांचे चालू शकले नाही. ६००० श्लोकांच्या या सुरस हिंदी रूपांतरावरून त्याच्या विद्वत्तेचे व या ग्रंथाच्या त्यांच्या मतांवरील प्रभावाचे दर्शन होते. या ग्रंथाचे श्री श्रुतभांडार व ग्रंथ प्रकाशन समिती, फलटण याच्यातर्फे १९६५ साली प्रकाशन झाले.

**२. श्री आदिगीता–** १९७० साली प. पं सुमतिबाई शहा यानी श्री आदिगीता हे महाकाव्य लिहून प्रसिद्ध केले. 'श्री आदिगीता' हे महाकाव्य कवयित्रीच्या महान् प्रतिभेची साक्ष आहे. महान् कवि प. डॉ. द रा. बेंद्रे आपल्या श्री आदिगीतेच्या प्रस्तावनेत लिहीतात. "जवळ जवळ २५० पानाच्या या काव्याला कोणी महाकाव्य म्हणो, न म्हणो, पण त्यात महावस्तु आहे. महद्वाणी आहे, सत्य आहे, सामर्थ्य आहे, साधन आहे आणि सिद्धीही पण आहे. फारच खडतर तपस्या या काव्याने पूर्ण केली आहे. यात सिद्ध आहेत, आदिजिन आहेत. भरत चक्रवर्ती आहे, बाहुबली आहे, राम आहे, कृष्ण आहे, कौरव-पांडव आहेत, नेमिनाथ आहेत आणि अखेर चोवीस तीर्थंकर स्तुती आणि चोवीसावे तीर्थंकर महावीर आहेत आणि अशा या महान् चरित्र नायकाच्या जीवनातून वाहणारी गंगा समकालीन गांधीच्या सत्य अहिंसेला पोटी पचवून महाराष्ट्राला साजेल अशा टणत्काराच्या क्षात्रवृत्तीनही आहे. आदि-गीतेतील चरित्रपाक, तत्वपाक व गीतपाक हा जैनीय दर्शन सरणीला धरून सुद्धा इतर तत्त्वज्ञानी मधुर संवाद करीत आहे."

हे चौदा खंडाचे काव्य एकेक खंडातून पाय काढीत एक अखंड चिंतनयात्रा करीत आहे. वृत्त सुटसुटीत आहे. वाक्य सरणी सुललित असून काही तरी हितगुज आपल्यासीच कुजबुजत वाटचाल करणाऱ्या ध्यानी चिंतकांची आठवण करून देत आहे. या काव्यात ऐहिक व पारमार्थिक यांच्या तोंड मिळवणीचे साहित्य आहे. धर्मकामांच्या त्रितापातून मुक्तीभक्तीचा पथ धीराप्रमाणे धरा म्हणणाऱ्या सात्विक जीवांना गंभीरपणाचा अनुभव आणून देणारे बोल या काव्यात पदोपदी आहेत. हे एक महा मननीय काव्य आहे. आदिगीता या काव्यात महान् गुण आहेत हे पुन: पुन: वाचणाऱ्याच्या लक्षात येईल. खटकतील अशी स्थळे आहेत पण तो खटका काव्य कौशल्याचा आहे. हे विचारमंथनाच्या विमर्शानंतर लक्षात येईल.

आदिगीता हे काव्य गंगोघाप्रमाणे पल्ला लांब पण विस्तार थोडा असून पावित्र्यात बिलकूल कमी दर्जाचे नसलेले हे कृतिरत्न कौतुकास्पद आहे. आदिगीतेचे एक महाव्यापक लक्षण म्हणजे त्यातील भरतकाम, भरतखंड येथील भरत चक्रवर्ती, श्रीरामाचा भाऊ भरत, श्रीकृष्णाने सेवा क्षेत्र भरतरूळ आणि या सर्वांचा कथाकल्लाप म्हणजे भरताचार्यांचे नाट्य कौशल्य हे लक्षण मनात भरताच भाव-राग-ताल यांच्या सहकार्याने संगीत निर्माण होते असे म्हटलेल्याची आठवण होते. आदिगीतेतील भरीवपणा, हा गायत्रीचा द्रष्टा, विश्वामित्र, यांचे अनुयायी वैदिक भरत, पचजन यांचा एक नवीनच प्रपंच सद्य कालीन भारतात प्रकट केला जात आहे असे वाटते.

कवयित्रीने स्वत:स " आजच्या गणराज्यातील मीहि एक जन " " जनासारिखे मलाहि मन पण " असे म्हटले आहे हे त्यांच्या शालीनतेप्रमाणे आत्मविश्वासाचेही प्रतीक होते. या काव्यात स्वराज्य, नवजीवन लोकशक्ती प्रजा अशा शब्दांची पेरणी जशी समकालीनत्व दर्शन घडविते. त्याचप्रमाणे त्यात प्रतिपादलेली समर संस्कृती व ब्रह्मा-विष्णू-महेश समन्वयबुद्धि हे कवयित्रीच्या हृदय संस्काराचे पापुद्रे त्यांच्या सुकुमारतेनेही सुंदर वाटतात. काव्य कुठे मंद गतीने तर कुठे अतिवेगाने वाहते. जैन संस्कृती ही मृत्युंजय आहे हे उठावदारपणे सांगणे हेही या काव्याचे विशेष लक्षण आहे असे म्हणता येईल. आदिगीता अस्सल काव्य आहे आणि त्यात गीतेचा गुण तुडुंब भरला आहे. मला स्वत:ला या महाकाव्याने भारून टाकले आहे हे मला प्रामाणिकपणे कबूल केलेच पाहिजे.

आदिगीता हा काव्यग्रंथ रचून विदुषीरत्न कविवर्मा पं. सुमतिबाई शहा यांनी खरोखरच अखिल महाराष्ट्रातील काव्यरसिक व तत्वपिपासूंना एक चांगलीच बौद्धिक मेजवानी दिली ही गोष्ट या ग्रंथाचे प्रथम वाचन केल्यानंतर लक्षात आल्यावाचून रहात नाही. या ग्रंथाची निर्मिती अखंड निरंतर वाहणाऱ्या विचार प्रवाहातून झालेली आहे हे निश्चितच. भगवान् श्रीकृष्णाने गीतेमार्फत भारतीय संस्कृतीला जी बहुमोल देणगी दिली तिला अनेक वर्षांपासून बहुसमाज आपला अमोल निधि म्हणून जोपासत आहे. हिंदु धर्मातील धार्मिक व दार्शनिक विचारांना त्यामुळे मोठे बळ मिळाले. भगवत्गीतेचे पठण-पाठण आज पण सर्वत्र नित्य नियमाने होत आहे अशाच पद्धतीचा आदिगीता हा महत्वपूर्ण विचार आहे तसे बघितले तर जैन संस्कृतीमध्ये वैचारिक व सैद्धांतिक ग्रंथ कमी नाहीत. पण तत्त्वज्ञान हा विषयच मूलत: गहन आहे. त्यातूनच पुन्हा सूत्रबद्धपणे मांडल्यास अधिकच गहन व गूढ असतो. म्हणून जनमनाचे अनुरंजन करण्याचे कार्य या गीतमय ग्रंथाने केले आहे हे नि:संशय. असा हा ग्रंथ आजपर्यंत उपलब्ध नव्हता. तो आज प्रकाशित झाला आहे. काव्य प्रांतात हा नावारूपास प्राप्त होईल हे तेवढेच खरे विचारांचा अपूर्व प्रवाह हृदयी होता, म्हणूनच ही आदिगीता त्यांना स्फुरली. सामाजिक व शैक्षणिक कार्याला आपले संपूर्ण जीवन अर्पून त्यांनी आपला साहित्यिक परिमल काव्यरसिकांना दिला, त्याच्या पाठीशी अनुभवांचे अखंड विश्व उभे आहे.

प्रस्तुत आदिगीतेमध्ये एकूण चौदा खंड केलेले आहेत. या चौदा खंडात पं. सुमतिबाई शहा यांच्या काव्यप्रतिभेने भारताच्या प्राचीन संस्कृतीतील ठळक चरित्र वाङ्मय ग्रथित केले आहे. त्यांनी भगवान आदिनाथाच्या चरित्रातून, कधी भरतेश्वराच्या भोगवादी जीवनातून, कधी रामचंद्राच्या आदर्श रामराज्यातून

नि कधी भगवान् कृष्ण व कौरव-पाडवांच्या युद्धभूमिकेतून आपली गीतगंगा मोठ्या डौलाने संथपणे प्रवाहित केली आहे. आपल्या अमरवाणीने ज्यांनी सर्व प्राण्यांचा उद्धार केला व वेळोवेळी सद्धर्माचे पुनरुज्जीवन करून आत्मकल्याणाचा मार्ग जगाला दाखवून दिला, त्या वृषभ तीर्थंकरांच्या वदनेतून 'आदिगीता' या सरितेचा आरंभ होऊन ती जगाला अन्याय, हिंसा व भ्रष्टाचार यापासून सोडविणाऱ्या महावीर या अंतिम तीर्थंकरापर्यंत प्रवाहित केली. *आदिगीतेचा प्रवास हजारो मैलाचा जरी असला तरी सकृतदर्शनी वाचक त्यात* इतका तद्रूप होतो की, त्याला क्षणभर का होईना हे दुःख विश्व विसरल्यासारखे होते व तो दिव्य आत्मानंदामध्ये विभोर होऊन मयूराप्रमाणे नाचू लागतो. आदिगीता हा स्वच्छंद काव्यफल पक्तीने बहरलेला अशोकवृक्ष आहे. त्यांचा काव्यदृष्टीने विचार केला तर प्रासादिक सुगम व सरस असा आढळेल. आत्मजागृती करवून मानवाला अंतिम सत्यापर्यंत नेणे हे त्याचे लक्ष्य आहे. आदिगीतेतील रस शांत आहे. कवयित्रीची करुणार्द्र, हृद्द व विश्वकल्याणाची तळमळ सर्वत्र व्याप्त होत आहे. म्हणून काव्यदृष्ट्या भावपक्ष व कलापक्ष हा चांगला झाला आहे. गहन विचाराची मांडणी ही जनसामान्याला कळेल अशी आहे. म्हणून आदिगीता हे काव्यरत्न भावाभिव्यक्तीच्या दृष्टीने श्रेष्ठ असे झाले आहे. निश्चितच कवयित्रीच्या या उत्स्फूर्त प्रयासाला संपूर्ण महाराष्ट्रातच नव्हे तर, पर प्रांतात देखील प्रतिसाद मिळेल व त्याची अन्य भाषेतही पण भाषांतरे होतील अशी खात्री आहे. कविवर्या पं. सुमतिबाई शहा यांनी हा मौलिक ग्रंथ समाजास दिला म्हणून त्याचे अभिनंदन करावे तितके थोडेच आहे. त्यांच्या या विशाल साहित्य सेवेकडे पाहिल्यास कोणाही गुणग्राही माणसाचे मस्तक झुकल्याशिवाय राहाणार नाही.

३) **हृदगंध–** या वरील दोन ग्रंथाशिवाय त्यांनी हृदगंध हे गीतांजली सदृश्य गद्यकाव्य लिहिलेल्या असून त्यात त्यांच्या विचारांच्या गांभीर्यतेचे, सखोल व्यासंगाचे व हृदयाच्या विशालतेचे दर्शन होते. त्यांनी या ग्रंथात जीवनानुभुतीतून व अनेक सद्ग्रंथाच्या वाचन मननातून जे हृद्भाव हृदयात तरंगले तेच प्रामाणिकपणे मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

४) **भावपल्लवी–** या ग्रंथात भगवंताचे स्तवन असून, पावित्र्य, औदार्य, समाधान, शुचिता, सेवा, सुश्रूषा, सौख्य, उपासना, क्षमा, मानवता, वात्सल्य इत्यादि भावनांचे चिंतनात्मक मौलिक विचार मांडले आहेत. यावरून त्यांच्या चिंतन व मनन पद्धतीची विचारांच्या सखोलतेची व सुदृढतेची जाणीव होते.

५) **समयसार–** या ग्रंथात भारतीय तत्त्वज्ञ व महान् आचार्य श्री. कुंदकुंद यांच्या 'समयसार' या ग्रंथाचे स्वैर विवेचन केले आहे. या ग्रंथातील कर्ममुक्तीच्या मार्गाचे लेखिकेने उत्कृष्ट विवेचन केले आहे.

६) **रामायण–** भारतीय वाचकाच्या समोर जैन वाङ्मयातील कथा सुरेख पद्धतीने मांडण्याचा प्रयत्न लेखिकेने केला आहे. त्या म्हणतात, 'श्रीरामाची कथा ही जीवनाची व्यथा दूर करणारी संजीवनी आहे असे मला वाटत आले आहे. जीवनात यशस्वी होण्यास तिचा उपयोग होईल असे काही तरी या पवित्र जीवनात आहे. म्हणूनच एवढा प्रपंच करावा लागला आहे.'

७) **हे गीत जीवनाचे–** पं. सुमतिबाई शहा यांनी 'गीत जीवनाचे' असे नाव देऊन आपले आत्मचरित्र लिहिले आहे. श्रीमती सुमतिबाईंचे जीवन भर्तृहरीच्या 'एके सत्पुरुषाः परार्थ घटकः स्वार्थं परित्यज्यये' या सत्पुरुषाच्या व्याख्येचे चालते बोलते उदाहरण आहे. स्वार्थाचा संपूर्णतया त्याग करून दुसऱ्याच्या कल्याणासाठी झिजणे, त्याशिवाय त्याच्या जीवनात शोधूनही दुसरे काही आढळणार नाही. *या त्यांच्या आत्मचरित्रात त्यांच्या* परोपकाराची कथा आली आहे. त्यांनी आपण या लोकोत्तर तपश्चर्येला का लागलो व ती करताना आलेल्या अडचणींना तोंड देत देत एवढे कार्य कसे करू शकलो याचा इतिहास दिला आहे.

याशिवाय पं. सुमतिबाईंनी सुवर्णरेखा (गद्यकाव्य) भावगीता (श्री कुंदकुंदाचार्यांच्या नियमसार ग्रंथाचे स्वैर भाषांतर) ज्ञानगीता (ज्या निषधासारखा चिंतनपर स्वतंत्र अमोल ग्रंथ) असे निरनिराळे ग्रंथ लिहिले आहे. या पूर्णार्घ्य ग्रंथाच्याही प्रेरक, प्रमुख संपादक त्याच आहेत.

प. पू. सुमतिबाई शहाप्रमाणेच विद्युल्लताबाई शहा यांनी श्राविकाश्रमतर्फे प्रकाशित होणाऱ्या 'श्राविका' मासिकातून अनेक विषयावर सखोल लेखन केले आहे. श्राविका प्रकाशन तर्फे प्रकाशित झालेल्या 'जीवनज्योत' (स्व. पूज्य राजुलमति अम्मा यांचे जीवनचरित्र) या ग्रंथाचे त्यांनी लेखन केले असून, श्राविका प्रकाशनातर्फे प्रकाशित झालेल्या 'संस्कृती गंगा' 'भाग्योदय' इत्यादि ग्रंथात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. विचारप्रवर्तक लेख लालित्यपूर्ण शैलीत मांडणे हे त्यांच्या लेखनाचे खास वैशिष्ट्य म्हणून सांगता येते.

प्राकृत साहित्यातील महान् विद्वान डॉ. ए. एन्. उपाध्ये यांनी अनेक मराठी जैन ग्रंथ निर्मितीमध्ये साहाय्य केले असून जैनदर्शन, वाङ्मयादि विषयावर मराठीतून अनेक लेख प्रसिद्ध केले आहेत. जीवराज ग्रंथमाला चालक न्यायतीर्थ भिसीकर यांनी अनेक मराठी जैन ग्रंथ लिहून व भाषांतरित करून आपले पूर्ण आयुष्य या कामी खर्ची घातलेले दिसते. पं. जिनदासशास्त्री फडकुले यांनी तर रविषेणाच्या पद्मपुराणाचे पूर्णत: मराठी भाषांतर करून मराठी जैन साहित्यात एक नवीनच दालन उघडले आहे. त्यांनी क्षु. आदिसागरचे ग्रंथ मराठी आदि २०० हून अधिक ग्रंथ लिहीले आहेत. गद्य-पद्य रामायण महाकाव्याचे लेखन हे त्यांचे खास वैशिष्ट्य होय. त्यांच्याशिवाय जंबुकुमारशास्त्री, वर्धमानशास्त्री इत्यादींनीही या कामी साहाय्य केलेले दिसते.

प्रा. सुमेरचंद जैन यांनी तर शंभराहून अधिक मराठी जैन ग्रंथांचे संपादन करून अधिकाधिक जैन मराठी साहित्य समाजासमोर आणण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. सोलापुरात राहून आपल्या वाणी, लेखणी व कृतीच्या सहाय्याने ते देश विदेशापर्यंत पोहोचले आहेत. साहित्यिक क्षेत्रातील त्यांचे कार्य असामान्य आहे. अमरकोश (हिन्दी-मराठी, मराठी-हिन्दी) धर्मचिंतनिका, भ. महावीरांचे तत्त्वज्ञान, अमरकथा भाग १ ते ४, द्रव्यसंग्रह, सुलभ जैन धर्म व भ. महावीर स्मृतिग्रंथ हे यांचे महत्त्वपूर्ण साहित्य होय. याशिवाय प्रचंड बाल्वाङ्मय नाट्य कादंबऱ्याचेही त्यांनी लेखन केले आहे. प्रा. सुभाषचंद्र अक्कोळे यांनी तर 'प्राचीन मराठी जैन साहित्य' यावर प्रबंध लिहून डॉक्टरेट पदवी मिळविलेली आहे.

डॉ. संगवे, डॉ. विद्याधर जोहरापूरकर, डॉ. लोखंडे यांनी जैनजागृतीचे काम आपापल्या विविध ग्रंथ संपादनाद्वारे व लेखाद्वारे केलेले दिसते. याच्याशिवाय प्रा. जी. के. पाटील, प्रा. सोमाज, प्रा. एम. एस. रणदिवे, प्रा. गजानन भिडे, प्रा. ए. एम. मोरे, प्रा. आ. भा. मोनटक्के, प्रा. जयकुमार आळंदकर, प्रा. व्ही. एस. जैन आदींनी विविध प्रकारची ग्रंथसंपदा व जैन दर्शन, साहित्य, कला यावर अनेक लेख लिहून प्रसिद्ध केलेले दिसतात. या विविध लेखांच्याद्वारे जैन धर्माचे यथार्थ ज्ञान करवून देण्याच्या प्रयत्नाबरोबरच जैन धर्माकडे आधुनिकतेच्या दृष्टीने पाहण्याचा दृष्टीकोन धर्मीयांना दिलेला दिसतो. कवि जयकुमार क्षीरसागर, विद्युल्लता शहा, वासंतीबाई शहा, विशल्यादेवी गंगवाल, सौ. सुरेखा शहा आदि मंडळी जैन मराठी साहित्य निर्मितीच्या कार्यात मग्न असलेली दिसतात. या वर उल्लेखित नावांच्याशिवाय इतरही अनेक लेखक, लेखिका, कवि, कवयित्री आहेत. त्यांच्याकडूनही जैनधर्माची साहित्यरूपाने यथार्थ सेवा चालू आहे. या सर्वांचाच या एकाच ठिकाणी उल्लेख करणे शक्य नाही.

मराठी जैनेतर विद्वानांच्या माहितीसाठी म्हणून जीवराज ग्रंथमाला, सोलापूर या महान संस्थेतून प्रकाशित करण्यात आलेले मराठी जैन साहित्याची यादी येथे देण्यात येत आहे

१. **रत्नकरण्ड श्रावकाचार–** पं. सदासुखजी विरचित वृहद् हिंदी वचनिकेचा सुबोध मराठी अनुवाद. अनुवादक ब्र. जीवराज गौतमचंद दोशी.

२. **महामानव सुदर्शन–** आ. सकलकीर्तींच्या सुदर्शनचरित्राचा मराठीत अनुवाद. ले. श्री. सुभाषचंद्र अक्कोळे

३ **कुंदकुंदाचे रत्नत्रय–** समयसार, प्रवचनसार, पंचास्तिकाय ह्या ग्रंथातील गोपालदासजी पटेल यांच्या मूळ गुजराथी पुस्तकाचा मराठी अनुवाद. लेखक प्रा. आ. भा. मोनटक्के.




४. आर्यादशभक्ति– पूज्यपादकृत संस्कृत दशभक्तीचा मराठीत आर्याबद्ध अनुवाद.

५. नित्यनैमित्तिक जैनाचार– गृहस्थाच्या क्रियाकर्मांची शास्त्रोक्त माहिती– सं प फडकुले.

६. जीवंधर चरित्र– वादीभसिंहसूरिकृत 'क्षत्रचूडामणि' या अलौकिक काव्यावर आधारलेली संपूर्ण कथा. ले. प्रा. जयकुमार आळंदकर.

७. पांडवकथा– आ. शुभचंद्राच्या संस्कृत ग्रंथावरून कौरव–पाडवकथा. लेखक सुभाषचंद्र अक्कोळे,

८. अंतिम उपदेश– आचार्य शांतिसागर महाराज यांचा उपदेश.

९. रत्नाची पारख– सत्यघोष या पौराणिक कथेवर आधारित स्त्री विरहित शालोपयोगी नाटिका.

१०. सम्यक्त्व कौमुदी कथा– मूळ संस्कृताधारे लेखक सुभाषचंद्र अक्कोळे.

११. भ. नेमिनाथ चरित्र– २२ व्या तीर्थंकराची जीवनकथा.

१२. भ. ऋषभदेव- पं. कैलाशचंद्र विरचित मूळ हिंदी ग्रंथाचा अनुवाद. ले. जयकुमार आळंदकर.

१३. जसोधर रास– मेघराजकृत मराठी ओवीबद्ध काव्य शतक १६ वे

१४. जिनसागर यांची समग्र कविता– रविवार, निर्दोषसप्तमी, सुगंधदशमी, पंचमेरूपूजा, नंदीश्वरपूजा, अनेक स्तोत्रे व आरत्या यांचा संग्रह. सं. डॉ. विद्याधर जोहरापूरकर.

१५. जीवंधर पुराण– जिनसागरकृत मराठी ओवी.

१६. धर्मामृत– गुणकीर्तिरचित १५ व्या शतकातील महाराष्ट्राच्या समाज जीवनावर प्रकाश टाकणारा मराठी गद्य ग्रंथ.

१७. परमहंस कथा– पं. सूरिजनकृत मराठी गद्यपद्यमिश्र आध्यात्मिक रूपकथन.

१८. चक्रवर्ती सुभौम– भट्टारक रत्नचंद्र संस्कृत ग्रंथाद्वारे लिहिलेले ८ व्या चक्रवर्तीचे चरित्र. लेखक प्रा. सुभाषचंद्र अक्कोळे.

१९. जैनधर्म– पं. कैलाशचंद्र शास्त्री यांच्या हिंदी ग्रंथाचा मराठी अनुवाद. प्राचार्य प्रेमचंद देवचंद शहा.

२०. श्रेणिक चरित्र– ब्रह्मगुणदास विरचित मराठी ग्रंथ सं. अक्कोळे.

२१. भ. पार्श्वनाथ व भ. महावीर यांची चरित्रे– भाषांतरित लेखक स्व शेठ हिराचद नेमचद दोशी

२२. पवनपुत्र हनुमान– हनुमान जीवनचरित्र. लेखक गजकुमार शहा.

२३. श्री. यशोधर चरित्र– संस्कृतातील प्रसिद्ध चंपूकाव्य. ले. स्व. हिराचद नेमचंद शहा

२४. कुमार प्रीतिकर– लेखक आदिनाथकुमार बेडगे.

२५. भारतीय जैन सम्राट– प्रा. व्ही. एस. जैन.

याशिवाय वीर वरांग, प्रद्युम्नचरित्र, स्वयंभूस्तोत्र, ज्ञानार्णव, धवल षट्खंडागम भाग २, समाधिशतक, श्रेयोमार्ग, दशलक्षणधर्म, धर्मरत्नाकर, वर्धमान चरित्र वगैरे विविध ग्रंथ लवकरच जीवराज ग्रंथमाला, सोलापूर येथून प्रसिद्ध होत आहेत. याशिवाय विविध प्रांतातून मराठी जैन साहित्य उपलब्ध आहे.

सर्व लहान–सहान ग्रंथाचा येथे उल्लेख करणे शक्य नाही. तथापि महत्वाच्या ग्रंथाचा आढावा येथे घेण्यात आला आहे. मराठीशिवाय इतर भाषी जैन विद्वानांना या साहित्याचा लाभ होऊ शकेल, यात शंका नाही.










प. पं. सुमतिबाई शहाप्रमाणेच विद्युल्लताबाई शहा यांनी श्राविकाश्रमतर्फे प्रकाशित होणाऱ्या 'श्राविका' मासिकातून अनेक विषयावर सखोल लेखन केले आहे. श्राविका प्रकाशन तर्फे प्रकाशित झालेल्या 'जीवनज्योत' (स्व. पूज्य राजुलमति अम्मा यांचे जीवनचरित्र) या ग्रंथाचे त्यांनी लेखन केले असून, श्राविका प्रकाशनातर्फे प्रकाशित झालेल्या 'संस्कृती गंगा' 'भाग्योदय' इत्यादि ग्रंथात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. विचारप्रवर्तक लेख लालित्यपूर्ण शैलीत मांडणे हे त्यांच्या लेखनाचे खास वैशिष्ट्य म्हणून सांगता येते.

प्राकृत साहित्यातील महान् विद्वान डॉ. ए. एन्. उपाध्ये यांनी अनेक मराठी जैन ग्रंथ निर्मितीमध्ये साहाय्य केले असून जैनदर्शन, वाङमयादि विषयावर मराठीतून अनेक लेख प्रसिद्ध केले आहेत. जीवराज ग्रंथमाला चालक न्यायतीर्थ भिसीकर यांनी अनेक मराठी जैन ग्रंथ लिहून व भाषांतरित करून आपले पूर्ण आयुष्य या कामी खर्ची घातलेले दिसते. पं. जिनदासशास्त्री फडकुले यांनी तर रविषेणाच्या पद्मपुराणाचे पूर्णतः मराठी भाषांतर करून मराठी जैन साहित्यात एक नवीनच दालन उघडले आहे. त्यांनी क्षु. आदिसागरसे ग्रंथ मराठी आदि २०० हून अधिक ग्रंथ लिहीले आहेत. गद्य-पद्य रामायण महाकाव्याचे लेखन हे त्यांचे खास वैशिष्ट्य होय. त्याच्याशिवाय जंबुकुमारशास्त्री, वर्धमानशास्त्री इत्यादींनीही या कामी साहाय्य केलेले दिसते.

प्रा. सुमेरचंद जैन यांनी तर शंभराहून अधिक मराठी जैन ग्रंथाचे संपादन करून अधिकाधिक जैन मराठी साहित्य समाजासमोर आणण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. सोलापुरात राहून आपल्या वाणी, लेखणी व कृतीच्या सहाय्याने ते देश विदेशापर्यंत पोहोचले आहेत. साहित्यिक क्षेत्रातील त्यांचे कार्य असामान्य आहे. अमरकोश (हिन्दी-मराठी, मराठी-हिन्दी) धर्मचिंतनिका, भ. महावीराचे तत्त्वज्ञान, अमरकथा भाग १ ते ४, द्रव्यसंग्रह, सुलभ जैन धर्म व भ. महावीर स्मृतिग्रंथ हे यांचे महत्त्वपूर्ण साहित्य होय. याशिवाय प्रचंड बाल्वाङमय नाट्य कादंबऱ्याचेही त्यांनी लेखन केले आहे. प्रा. सुभाषचंद्र अक्कोळे यांनी तर 'प्राचीन मराठी जैन साहित्य' यावर प्रबंध लिहून डॉक्टरेट पदवी मिळविलेली आहे.

डॉ. संगवे, डॉ. विद्याधर जोहरापूरकर, डॉ. लोखंडे यांनी जैनजागृतीचे काम आपापल्या विविध ग्रंथ संपादनाद्वारे व लेखाद्वारे केलेले दिसते. यांच्याशिवाय प्रा. जी. के. पाटील, प्रा. भोमाज, प्रा. एम. एस. रणदिवे, प्रा. गजानन भिडे, प्रा. ए. एस. मोरे, प्रा. आ. भा. सोनटक्के, प्रा. जयकुमार आळंदकर, प्रा. व्ही. एस. जैन आदींनी विविध प्रकारची ग्रंथसंपदा व जैन दर्शन, साहित्य, कला यावर अनेक लेख लिहून प्रसिद्ध केलेले दिसतात. या विविध लेखाच्याद्वारे जैन धर्माचे यथार्थ ज्ञान करवून देण्याच्या प्रयत्नाबरोबरच जैन धर्माकडे आधुनिकतेच्या दृष्टीने पाहण्याचा दृष्टीकोन धर्मीयांना दिलेला दिसतो. कवि जयकुमार क्षीरसागर, विद्युल्लता शहा, वासंतीबाई शहा, विशल्यादेवी गंगवाल, सौ सुरेखा शहा आदि मंडळी जैन मराठी साहित्य निर्मितीच्या कार्यात मग्न असलेली दिसतात. या वर उल्लेखित नावांच्याशिवाय इतरही अनेक लेखक, लेखिका, कवि, कवयित्री आहेत. त्यांच्याकडूनही जैनधर्माची साहित्यरूपाने यथार्थ सेवा चालू आहे. या सर्वांचाच या एकाच ठिकाणी उल्लेख करणे शक्य नाही.

मराठी जैनेतर विद्वानाच्या माहितीसाठी म्हणून जीवराज ग्रंथमाला, सोलापूर या महान संस्थेतून प्रकाशित करण्यात आलेले मराठी जैन साहित्याची यादी येथे देण्यात येत आहे

१. **रत्नकरण्ड श्रावकाचार–** प. सदासुखजी विरचित वृहद् हिंदी वचनिकेचा सुबोध मराठी अनुवाद. अनुवादक ब्र. जीवराज गौतमचंद दोशी.

२. **महामानव सुदर्शन–** आ. सकलकीर्तीच्या सुदर्शनचरित्राचा मराठीत अनुवाद. ले. श्री सुभाषचंद्र अक्कोळे

३ **कुंदकुंदाचे रत्नत्रय–** समयसार, प्रवचनसार, पंचास्तिकाय ह्या ग्रंथातील गोपालदासजी पटेल यांच्या मूळ गुजराथी पुस्तकाचा मराठी अनुवाद. लेखक प्रा. आ. भा सोनटक्के.




जातो. या छंदावरूनन या ग्रथाचे नाव कुरल असे पडले आहे. या सपूर्ण ग्रथामध्ये अहिंसा या सर्वोच्च तत्त्वाची स्तुती करण्यात आली आहे. तमिळवासी या ग्रथाला वेद तथा ईश्वरीय ग्रंथ मानतात. जैन परपरेनुसार या ग्रथाचे कर्ते आ. कुंदकुद तथा एलाचार्य अमल्याचे मानले आहे. या ग्रथात अहिंसेशी सबधित असलेल्या अरम (धर्म), पोरुल (अर्थ), इनवम (काम) या तीन विषयाचे प्रामुख्याने विवेचन केले आहे. जैनाच्या 'अहिंसा परमो धर्मः' या सिद्धांतानुसार सहस्र यज्ञ व प्राणीवध करण्यापेक्षा त्यापासून अलिप्त राहणे श्रेयस्कर आहे. श्री एरियल याच्या मते 'या ग्रथाचे सर्वात महत्त्वाचे वैशिष्ट्य असे की, या ग्रथाच्या रचनाकर्त्याने जाति, धर्म, सप्रदायाचा विचार न करता अखिल मानव जातीला उपदेश करण्याचा प्रयत्न केला आहे. विचार, भाषा, कविता, अध्यात्मिकता व चिंतन यावर त्याचे पूर्ण प्रभुत्व आहे.' सर्व विदेशी भाषामधून या ग्रथाचा अनुवाद झाला आहे. ख्रिश्चन देखील कुरल काव्य आपले असल्याचे सांगतात.

### ३. नालडियार–

नालडियार हा देखील कुरलप्रमाणे एक सैद्धांतिक ग्रंथ असून कुरल व नालडियार हे दोन्ही ग्रंथ परस्पर टीकेचे कार्य करीत असताना दिसतात. तथापि या दोन्ही ग्रंथाकडून तमिळ जनतेच्या नैतिक व सामाजिक स्थितीवर प्रकाश टाकता येतो. या ग्रथातील छंदावरूनच या ग्रंथाचे नांव नालडियार असे पडले आहे. यात ४० अध्याय असून त्यात ४०० पद्य आहेत. कुरल नंतर याच ग्रंथाचा क्रम लागतो. या ग्रंथात मनुष्य तृष्णेला कारणीभूत असणाऱ्या संसारिक सुखांची अनित्यता आणि निःसारता दाखवून संत जीवनावर विशेष जोर दिला आहे. या ग्रंथाचे रचनाकर्ते मदुरेतील जैन असावेत. या ग्रंथात सर्वोत्तम नैतिक विचाराचे संगठन केले आहे. तमिळ साहित्य परंपरेच्या माहितीसाठी कुरल आणि नालडियार हे दोन्ही ग्रंथ अत्यंत महत्त्वाचे आहेत.

### ४. शिलप्पादिकारम्–

या ग्रंथाची रचना राजा चेर लादनाच्या कनिष्ठ इलंगोबाडिगल् पुत्राने केली आहे. तमिळ मधला हा देखील एक उपयुक्त असा ग्रंथ आहे. या ग्रंथामध्ये पांडव राजाच्या राजधानीचे वर्णन असून पुढे कण्णकीची कथा सांगून तिच्या स्मृति मंदिराचे वर्णन केले आहे. प्रामुख्याने पुहार, मदुरा व वनजी या तीन राजधानीचे वर्णन आहे

या 'ग्रथातील वर्णविषय अत्यंत हृदयस्पर्शी असून, लेखकाने तो अत्यंत जिव्हाळ्याने मांडला आहे. या ग्रंथातील नायिका कण्णकी चोल राजाची राजधानी पुहारमधील एका वणिकाची कन्या असून, तिचा विवाह त्याच नगरातील कोवलन या वणिकपुत्राशी झाला होता. एकदा कोवलन हा माधवी नर्तकीवर फिदा होऊन त्याने आपली सर्व संपत्ति गमावली आणि रिक्त हस्ताने घरी आला. कण्णकीने त्याची विचारपूस केली झाल्या गोष्टीबद्दल खेद न मानता पुनः व्यापारासाठी त्याला उत्तेजन दिले. त्यासाठी शिल्लक राहिलेले दागिने तिने त्याला दिले. ते विकण्याचा निश्चय करून तो पांड्य राजाच्या मदुरा राजधानीत पोहचला. वाटेत त्याना जैन साध्वी कीर्ती भेटली ती देखील त्यांच्याबरोबर निघाली. आपल्या पत्नीच्या पायातील नुपूर (शिलप्पादिकारम्) विकण्यासाठी कोवलन बाहेर पडला. वाटेत एक सुवर्णकार भेटला. तो नुपूर राजाला विकावयाचा आहे असे ढोंग करून तो राजाजवळ गेला व हा नुपूर राणीचा असल्याचे सांगितले. राजा क्रुद्ध झाला. त्वरित कोवलनला ठार मारण्याचा आदेश देण्यात आला. त्याला ठार मारल्याचे कण्णकीने ऐकताच ती आपला दुसरा नुपूर घेऊन राजाजवळ हजर झाली. तो पाहताच राजाला कृतकर्माचा पश्चाताप झाला व त्याने आपलाही प्राणत्याग केला त्याच वेळी क्रोधाविष्ट कण्णकीने त्या नगरीला अग्निकडून भस्मसात होण्याचा शाप दिला आणि आपले डावे स्तन कापून नगरीकडे टाकले. नगरी जळून भस्मसात झाली. कण्णकी स्वर्गात आपल्या पतीला भेटली. पुढच्या विभागात तिच्या स्मृति मंदिराचे वर्णन करून ग्रंथकर्त्याने आपल्या ग्रंथाची समाप्ति केली आहे.








# तामिळ जैन साहित्य

कोणत्याही देशाचे साहित्य त्या देशातील जनतेच्या आचार, विचाराचे तथा जीवनाचे निदर्शक असते. तमिळ साहित्य या गोष्टीला अपवादात्मक नाही या साहित्याच्या अध्ययनाने दक्षिण भारतातील इतिहासाची बरीच माहिती मिळते. एवढेच नव्हे तर दक्षिण भारतातील जैन धर्माची पूर्वस्थिति जाणण्यासाठी साहित्य हाच एक महत्वाचा आधार व पुरावा आहे. सर्वसामान्यपणे तामिळ साहित्याचा आढावा घेतला असता, हे साहित्य अधिकाधिक जैन धर्मामुळे व संस्कृतीमुळे प्रभावित झालेले दिसून येते. जैन धर्माची प्रभावना उत्तरेकडे झाली असून या धर्माचा संबंध आर्य संस्कृतीशी असलेला दिसून येतो. उत्तरेकडून जैन दक्षिणेकडे केव्हा आले व त्यांचा तामिळनाडशी कसा संबंध आला हा एक वादातीत प्रश्न आहे.[1]

उपलब्ध ऐतिहासिक साधनावरून उत्तर हिंदुस्थानात पडलेल्या मोठ्या दुष्काळाच्या वेळी अंतिम श्रुतकेवलि भद्रबाहू आपला शिष्य चंद्रगुप्त मौर्य व संघासह दक्षिण भारतात आल्याची माहिती मिळते. तथापि त्या अगोदरच दक्षिण भारतामध्ये जैन धर्माचा प्रसार झालेला असावा. भ. महावीराचा विहार कलिंगमध्ये झालेला दिसून येतो. यावरून सामान्यत. कलिंगमधून जैन धर्माचा प्रसार आंध्रमध्ये व तेथून तामिळ प्रदेशात झालेला असावा. सुमारे इ. स. पूर्व ४-५ शतकात ही घटना घडली असावी असे मानले जाते.

सर्वसाधारणपणे तमिळ साहित्याचे विभाजन तीन कालामध्ये करण्यात आले आहे. १. संगमकाल २. शैवनायनार आणि ३. वैष्णव अलवारांचा काल तथा आधुनिक काल. या विविध कालातील प्रकाशित साहित्यामुळे तमिळ राज्यातील जैनाच्या जीवनावर प्रकाश टाकता येतो. संगम कालाचे प्रथम, मध्य आणि अंतिम अशा तीन कालामध्ये विभाजन केले असून, त्याच्या कालाविषयी व इतिहासासंबंधी मतभेद आहेत.

जैन ग्रंथकारानी प्रथमपासूनच तमिळ देशाच्या साहित्यिक विधीमध्ये भाग घेतलेला दिसून येतो. संगम साहित्याची रचना तथा प्रस्थापना हीच मुळी जैन आचार्यांची देणगी असल्याचे म्हटले जाते. कारण जैन धर्माची साधू संस्था, संघ, गण याच्यामध्ये प्रारंभापासूनच फार मोठी सुव्यवस्था असल्याचे दिसून येते. याच व्यवस्थेचा उपयोग जैनाचार्यांनी संगम रचनेसाठी केला असावा. संघ आणि संगम या नावात देखील साम्य आढळते.

तमिळ भाषेत जैनाचार्यांनी अनेक महत्वाच्या ग्रंथाची रचना करून ठेवली आहे. त्यातील महत्वपूर्ण ग्रंथाची माहिती येथे देण्यात आली आहे.

**१. तोलकाप्पियम–**

तमिळ भाषेतील हा सर्वात प्राचीन व्याकरण ग्रंथ आहे ही रचना जैन किंवा बौद्ध विद्वानाची असावी असा मतभेद आहे. परंतु या ग्रंथावरील टिकाकाराने 'पाडिमयोन' या शब्दाचा उल्लेख केला असून, त्याचा अर्थ तपस्या करणारा असा घेतला आहे. यावरून हा ग्रंथ बहुधा जैन आचार्याचाच असावा. या ग्रंथात तीन मोठे अध्याय असून त्यात ९ विभाग आहेत. जीवाच्या विभाजनाविषयीची या ग्रंथात सुंदर माहिती आहे. जीव विभागाची ही कल्पना बहुतेक जैन ग्रंथातून आढळते. हा ग्रंथ द्वितीय संगम कालातील मानला जात असून, इतर सर्व तमिळ जैन साहित्य अंतिम अथवा तृतीय संगमकालाचे असल्याचे मानले जाते. हा एक व्याकरण ग्रंथ असला तरी या ग्रंथात सामाजिक चालीरिती, रूढीचेही दिग्दर्शन केले आहे.

**२. कुरल–**

कुरल हा एक नीति ग्रंथ असून, तमिळ भाषी लोकात प्रचारासाठी म्हणून या ग्रंथाची रचना झाली असावी या ग्रंथाची रचना 'कुरलवेण बो' या छंदात केली असून तमिळ साहित्याचा तो एक खास छंद मानला

१ श्री जैन सिद्धांत भास्कर सप्टेंबर १९३८ पृ न.३५

९. चूलामणि–

याची रचना जैन कवि तोला मोलित्तेवर यांनी केली असून, ते कारवेट नगराधिपति विजयाच्या आश्रित होते. जिनसेन रचित महापुराणातील एका कथेच्या आधारे या ग्रंथाची रचना करण्यात आली आहे, कथेचा नायक तिविहन असून तो नऊ वासुदेवापैकी एक आहे. या ग्रंथाचे काव्यसौंदर्य चिंतामणि ग्रंथाप्रमाणे असून, त्यात एकूण १२ सर्ग व २१३१ पद्ये आहेत.

१०. उदयन–

यात वत्सदेशराजा उदयन याची कथा असून, महामहोपाध्याय स्वामीनाथन यांनी त्याचे संपादन केले आहे. याला बृहत्कथा अथवा पेरूनकथै असेही म्हटले जाते. यात एकूण ६ अध्याय असून ते उदयण राजाच्या जीवनाशी संबंधित आहेत. या राजाने राज्याचा त्याग करून त्याने शेवटी मुनि दीक्षा घेतल्याचे सांगितले आहे.

११. मेरूमंदर पुराण–

तमिळ भाषेतील हा एक महान ग्रंथ आहे. उत्तम साहित्यिक शैलीच्या दृष्टीने त्याचे महत्व अनन्यसाधारण आहे. मेरू आणि मंदर यांच्या पौराणिक कथेवर या ग्रंथाची रचना केली आहे. मेरू व मंदर युवराजांच्या कथावरून याला मेरूमंदर पुराण असे म्हटले आहे. या कथेचे वर्णन महापुराणात आले असून, विमलनाथ तीर्थंकरकालीन ही घटना घडल्याचे सांगितले आहे. जैन धर्मातील महत्वाच्या सिद्धाताचे देखील यात वर्णन आहे. यात ३० अध्याय असून, १०४५ पद्य आहेत. प्रो. चक्रवर्तींनी हा ग्रंथ प्रकाशित केला आहे.

१२. श्रीपुराण–

तमिळ जैनात हा ग्रंथ प्रसिद्ध असून त्याची रचना तमिल-संस्कृत मिश्रित आहेत. यात ६३ शलाका पुरुषांचे वर्णन असून या ग्रंथाच्या कर्त्याविषयी काही माहिती मिळू शकत नाही.

१३. कलिंगत्तुप्परनि–

या काव्यामध्ये चोलराजा कुलोत्तुंग व कलिंगराजा यांच्या सेनेमध्ये झालेल्या युद्धाचे वर्णन केले आहे. हे युद्ध कलिंगमध्ये झाले होते.

या विविध विषयावरील रचनेशिवाय छंदशास्त्र व व्याकरणशास्त्रावर देखील जैनांच्या अनेक कृति आहेत.

१४. याप्परूंगलक्कारिकै–

अमृतसागरद्वारारचित तमिळ छंदशास्त्रावरील हा एक उत्कृष्ठ ग्रंथ आहे. हा ग्रंथ सुमारे एक हजार वर्षापूर्वीचा प्राचीन असल्याचे मानले जाते. यातील मंगलाचरणात अर्हंत परमेष्ठीची स्तुति आहे. यावरून तो जैन ग्रंथकाराकडून रचला गेला असावा हे निश्चित. संस्कृत ग्रथाधारे याची रचना केली असून, त्यावर गुणसागररचित टीका आहे. छंद तथा पद्यरचनासंबंधी या ग्रंथाला प्रमाण मानण्यात येते.

१५. नेमिनाथम्–

हा तामिळ व्याकरणग्रंथ असून त्याची रचना गुणवर पंडिताने मलयपूर येथे केली आहे. तेथे नेमिनाथाचे मंदिर असल्यामुळे या ग्रंथाला नेमिनाथम् हे नाव दिले आहे प्रारंभिक व्याकरण ग्रंथ विस्तृत व समजण्यासाठी कष्टदायक असून दुर्मिळ होते. म्हणूनच गुणवर पंडिताने या व्याकरण ग्रंथाची रचना केली. ही रचना वेणवा छंदात आहे.




एका नर्तकीपायी सर्वस्व गमावून वसणारा कोवलन व पुनः त्यालाच हितोपदेश करून सन्मार्ग दाखविणारी नव्हे, सौभाग्यामाठी सर्वस्व अर्पण करणारी कण्णकी यांची ही कथा सामाजिक स्थितीचे, जीवनाचे व रूढी परंपरांचे दिग्दर्शन करणारी एक अति उत्कृष्ट कलाकृति समजावी लागेल यात शंका नाही.

५. चिंतामणि–

या ग्रंथाची रचना तिरुत्तक्क देव यांनी केली असून ते संस्कृत मधील एक प्रकांड पंडित होते. तमिळ साहित्यातील चिंतामणि हा एक सर्वोत्कृष्ट ग्रंथ मानला जातो. संस्कृतमधील सर्व महत्त्वाच्या बाबींचा यात उल्लेख केला असून, संगमकालीन कवितांचा उल्लेख देखील यात आहे. या ग्रंथात राजा जीवक याचा जीवनवृत्तांत कथन करून प्रसंगानुरूप धार्मिक उपदेश करण्याचा प्रयत्न केला आहे. जैन धर्मातील प्रमुख सिद्धांताचेही यात वर्णन आहे. संस्कृतमधील गद्यकाव्य चिंतामणि व क्षत्रचूडामणि या ग्रंथरचनेसाठी चिंतामणि ग्रंथाचा आधार घेतला असावा. चिंतामणिला तमिळ साहित्याचा 'मास्टरपीस' मानले जाते. शैव विद्वानांनी या ग्रंथाची स्तुती केली आहे. या ग्रंथाविषयी ईर्षा निर्माण होऊन शैव विद्वान सेक्किलारने पेरिय पुराणाची रचना केली. परंतु त्याचा कसलाही परिणाम चिंतामणि ग्रंथावर होऊ शकला नाही.

६. नरिविरुत्तम–

या ग्रंथाची रचना तिरुत्तक्क यानेच केली असून त्यात एकूण ५० पद्य आहेत. हितोपदेशरूपी एका कथेच्या आधारे या ग्रंथात जैन धर्माच्या सर्व सिद्धांताचे संकलन केले आहे. या ग्रंथाची शैली अत्यंत आकर्षक असून आबालवृद्धांच्या आवडीची आहे. मनुष्याच्या अमर्याद इच्छा क्षणभंगुर संपत्ति व असार संसाराचे यात वर्णन केले आहे. 'जीवो जीवस्य जीवनम्' तत्त्वाच्या आधारे या काव्यातील कथा वर्णिली असून त्याचा दुष्परिणाम कथिला आहे. तमिळमधील हे एक बृहद्काव्य असून, त्याशिवाय इतर नीलकेशी, चूडामणि, यशोधर काव्यियम्, नागकुमार काव्यियम व उदयणन कथा ही पाच लघु काव्ये जैन मुनिरचित असावीत.

७. नीलकेशी–

नीलकेशि ग्रंथाचा कर्ता कोण असावा त्या विषयीची माहिती मिळत नाही. हा भारतीय दर्शनाशी संबंधित असा एक तर्कपूर्ण ग्रंथ आहे. यावर वामन मुनि रचित एक समय दिवाकर नावाची उत्कृष्ट टीका आहे. या वामन मुनिने मेरू मंदिर पुराण या ग्रंथाची देखील रचना केली असावी नीलकेशी ग्रंथाची रचना बौद्ध कुंडलकेशी याच्या विरोधासाठी केली असून त्याच्या सर्व दार्शनिक मतांचे यात खंडन करण्यात आले आहे. दार्शनिकदृष्ट्या या ग्रंथाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे यात एकूण दहा अध्याय असून 'धर्मन् उरैचउक्कम्' या प्रथम अध्यायात नीलकेशीने अहिंसा धर्माचा स्वीकार केल्याचे वर्णन आहे. दुसऱ्या 'कुण्डलकेशिवादचरुक्कम्' मध्ये बुद्ध धर्म प्रतिनिधी कुडकेशीबरोबर नीलकेशीच्या झालेल्या वादविवादाचे वर्णन केले आहे. तिसऱ्या अध्यायात अर्हच्चंद्राच्याबरोबर झालेला विवाद व त्याचा पराजय याची माहिती असून, चौथ्या 'मोक्कलवादचरुक्कम्' अध्यायात मोक्कल बौद्ध गुरुबरोबर झालेला संवाद वर्णिला आहे 'बुद्धवादचरुक्कम्' या पाचव्या अध्यायात नीलकेशी व बुद्ध भेटीचे वर्णन आहे राहिलेल्या पाच अध्यायात अनुक्रमे आजीवक धर्म वर्णन, सांख्य सिद्धांत समीक्षा, वैशेषिक दर्शन विचार, वैदिक कर्मकांड व जडतत्त्ववाद तथा भूतवादादिचा विचार केला आहे तमिळ साहित्यातील हा एक प्राचीन ग्रंथ असून त्यात एकूण ८९४ पद्य आहेत व्याकरण, म्हणी, वाक्प्रचाराच्या दृष्टीनेही हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.




८. यशोधरकाव्य–

या ग्रंथाचे कर्ते जैन मुनि असून त्याच्याविषयीची विशेष माहिती मिळत नाही. याची कथा संस्कृतमधील यशस्तिलकचंपू तथा यशोधरचरित्रादिमध्ये वर्णिली आहे टी वेंकटरमन आयंगारने या ग्रंथाचे प्रकाशन केले आहे.




९. चूलामणि–

याची रचना जैन कवि तोला मोलित्तेवर यांनी केली असून, ते कारवेट नगराधिपति विजयाच्या आश्रित होते. जिनसेन रचित महापुराणातील एका कथेच्या आधारे या ग्रंथाची रचना करण्यात आली आहे, कथेचा नायक तिविहन असून तो नऊ वासुदेवापैकी एक आहे. या ग्रंथाचे काव्यसौंदर्य चिंतामणि ग्रंथाप्रमाणे असून, त्यात एकूण १२ सर्ग व २१३१ पद्ये आहेत.

१०. उदयन–

यात वत्सदेशराजा उदयन याची कथा असून, महामहोपाध्याय स्वामीनाथन यांनी त्याचे संपादन केले आहे. *याला बृहत्कथा अथवा पेरूनकथं असेही म्हटले जाते. यात एकूण ६ अध्याय असून ते उदयण राजाच्या* जीवनाशी संबंधित आहेत. या राजाने राज्याचा त्याग करून त्याने शेवटी मुनि दीक्षा घेतल्याचे सांगितले आहे.

११. मेरूमंदर पुराण–

तमिळ भाषेतील हा एक महान ग्रंथ आहे. उत्तम साहित्यिक शैलीच्या दृष्टीने त्याचे महत्व अनन्यसाधारण आहे. मेरू आणि मंदर यांच्या पौराणिक कथेवर या ग्रंथाची रचना केली आहे. मेरू व मंदर युवराजाच्या कथावरून याला मेरूमंदर पुराण असे म्हटले आहे. या कथेचे वर्णन महापुराणात आले असून, *विमलनाथ तीर्थंकरकालीन ही घटना घडल्याचे सांगितले आहे. जैन धर्मातील महत्वाच्या सिद्धांताचे देखील यात* वर्णन आहे. यात ३० अध्याय असून, १०४५ पद्य आहेत. प्रो. चक्रवर्तीनी हा ग्रंथ प्रकाशित केला आहे.

१२. श्रीपुराण–

तमिळ जैनात हा ग्रंथ प्रसिद्ध असून त्याची रचना तमिल-संस्कृत मिश्रित आहेत. यात ६३ शलाका पुरुषांचे वर्णन असून या ग्रंथाच्या कर्त्याविषयी काही माहिती मिळू शकत नाही.

१३. कलिंगत्तुप्परनि–

या काव्यामध्ये चोलराजा कुलोत्तुग व कलिंगराजा यांच्या सेनेमध्ये झालेल्या युद्धाचे वर्णन केले आहे. हे युद्ध कलिंगमध्ये झाले होते.

या विविध विषयावरील रचनेशिवाय छंदशास्त्र व व्याकरणशास्त्रावर देखील जैनांच्या अनेक कृति आहेत.

१४. याप्परूंगलम्कारिकै–

अमृतसागरद्वाररचित तमिळ छंदशास्त्रावरील हा एक उत्कृष्ठ ग्रंथ आहे. हा ग्रंथ सुमारे एक हजार वर्षापूर्वीचा प्राचीन असल्याचे मानले जाते. यातील मंगलाचरणात अर्हंत परमेष्ठीची स्तुति आहे. यावरून तो जैन ग्रंथकाराकडून रचला गेला असावा हे निश्चित. संस्कृत ग्रंथाधारे याची रचना केली असून, त्यावर गुणसागररचित टीका आहे. छंद तथा पद्यरचनासबंधी या ग्रंथाला प्रमाण मानण्यात येते.

१५. नेमिनाथम्–

हा तामिळ व्याकरणग्रंथ असून त्याची रचना गुणवर पंडिताने मलयपूर येथे केली आहे. तेथे नेमिनाथाचे मंदिर असल्यामुळे या ग्रंथाला नेमिनाथम् हे नाव दिले आहे. प्रारंभिक व्याकरण ग्रंथ विस्तृत व समजण्यासाठी कष्टदायक असून दुर्मिळ होते. म्हणूनच गुणवर पंडिताने या व्याकरण ग्रंथाची रचना केली. ही रचना वेणवा छंदात आहे.

१६. नन्नू लू–

तमिळ व्याकरणावरील हा दुसरा एक ग्रंथ असून, हा सर्वाधिक प्रिय होता. शिमगंग नामनाच्या विनंतीवरून बावनंदि मुनीने या ग्रंथाची रचना केली होती. ते तमिळ व्याकरणातच नव्हे तर जैनेंद्र व्याकरणात देखील तरबेज होते. यावर अनेक टीका असून मल्लिनाथाची टीका प्रमुख आहे.

१७. कोष साहित्य–

तमिळ कोष साहित्यालाही जैन आचार्यांनी महान देणगी दिल्याचे दिसून येते. तमिळमध्ये दिवाकर निघण्टु, पिंगल निघण्टु व चूडामणि निघण्टु हे तीन प्रमुख कोषग्रंथ असून, त्यांची रचना अनुक्रमे दिवाकर मुनि, पिंगल व मंडल पुरुष यांनी केली आहे. हे तिघेही जैन ग्रंथकार असल्याचे मानले जाते. दिवाकररचित निघण्टु अनुपलब्ध असून इतर दोन उपलब्ध आहेत. त्यातील शेवटचा चूडामणि निघण्टु अधिक प्रसिद्ध आहे.

१८. प्रकीर्ण ग्रंथ–

'तिरुनूरन्तदि' व 'तिरुक्कलम्बगम्' हे दोन महत्त्वाचे प्रकीर्ण ग्रंथ असून त्याची लोकप्रियताही अधिक होती.

तिरुनूरन्तदि–

या ग्रंथाची रचना अलवार याने केली असून त्याने जैन धर्माचा स्वीकार केला होता. हा भक्तिरसाचा सुंदर ग्रंथ आहे. अन्तादि ही एक विशिष्ठ रचना असून त्यात पूर्व पद्याचा अंतिम शब्द दुसऱ्या पद्याचा प्रमुख तथा मुख्य शब्द झालेला दिसून येतो. अंतादिचा अर्थ अंत आणि आदि असा होतो. यात पद्यांची एक ओळ शब्दविशेषाने परस्पर संबंधित असून पूर्व पद्यात अंतिम शब्द असून नंतरच्या पद्यात पहिला असतो. तिरुनूरन्तदि ही १०० पद्यांची दुसरी एक रचना आहे.[1]

तिरुक्कलम्बगम–

हा देखील भक्तिरसाने युक्त असा महत्वाचा ग्रंथ असून त्याची रचना उदीचिदेव याने केली आहे. ते अपरगई नामक स्थानाचे निवासी होते. कलंबगम्‌चा अर्थ लघु कविताचा संग्रह ज्यात अनेक छंद पद्य असतात. हा ग्रंथ फक्त भक्तिरसानेच युक्त नसून सैद्धांतिक दृष्टयाही महत्वाचा आहे.

उपर्युक्त ग्रंथाशिवाय ऐंचूवडि हा गणितविषयक व जिनेंद्रमौलि हा ज्योतिषविषयक असे महत्वाचे दोन ग्रंथ आहेत. या ग्रंथाशिवाय जैन आचार्यांनी तमिळमध्ये विद्याविषयक, मंत्रविषयक व इतरही विषयावर देखील ग्रंथरचना केली आहे. तमिळ साहित्यात महान व मौल्यवान ग्रंथरचना करण्याचे बरेचसे श्रेय जैन मुनीना तथा ग्रंथकारांना मिळाल्याचे स्पष्ट दिसून येते. थोडक्यात तमिळ जैन साहित्य तमिळ प्रदेशातील चालिरुढी, परंपरा, सामाजिक दर्शन व संस्कृति या दृष्टीने अत्यंत महत्वाचे असून तमिळ प्रदेशाचा इतिहास समजाऊन घेण्यासाठी या साहित्याचे महत्त्व अनन्यसाधारण आहे हे कदापि नाकारता येणार नाही.

---

१. मदुरा तमिळ संगमद्वारा संपादित

## तेलगु जैन साहित्य

दक्षिण भारतात जैन धर्माचा प्रसार तथा प्रवेश इतिहासाच्या प्रारंभकाळीच झालेला होता आणि त्या विभागातील तमिळ व कन्नड दोन्ही साहित्य जैन धर्माने प्रभावित झालेले होते. या दोन्ही भाषेतील विशाल साहित्याचे आपण अवलोकन केले तर, ही गोष्ट त्वरित लक्षात येते. यावरून तेलगु साहित्यावर देखील जैन धर्माचा प्रभाव पडला असावा, असे म्हटले तर अयोग्य ठरणार नाही. कारण तमिळ कर्नाटक यांच्यापेक्षा जैनांचा प्रवेश आंध्र प्रदेशात झाला असला पाहिजे. परंतु या ठिकाणी आपणाला विपरीत अवस्था असल्याचे दिसून येते.

मराठी जैन साहित्य, हिंदी जैन साहित्य, कन्नड जैन साहित्य व तमिळ जैन साहित्याप्रमाणे तेलगु जैन साहित्याविषयीची विपुल माहिती मिळत नाही. तेलगु जैन साहित्य अगदी त्रोटक प्रमाणात असून, त्या विषयीची सखोल माहिती अद्याप तरी उपलब्ध नाही.

विशाल व विस्तृत अशा तेलगु साहित्यात केवळ तीन चारच असे ग्रंथ आहेत की जे उत्तरकालीन समजले जातात या ग्रंथाच्यामध्ये सर्वात प्राचीन व सर्वात महत्वाचा असा नन्नय भट्टाचा महाभारत हा ग्रंथ आहे. या ग्रंथाची रचना द्वितीय चालुक्य राजा राजराज याच्या कारकीर्दीत करण्यात आली. ही रचना सुमारे ११ व्या शतकाच्या मध्यभागात करण्यात आली असावी. राजराज द्वितीयाच्या काळी आंध्र देशात हिंदू धर्म समर्थनार्थ एक मोठे आदोलन झाले. त्यातच जैन धर्माचे पतन झाले. ब्राह्मण धर्म समर्थकांनी त्याचा पूर्णत: नायनाट करण्याचा प्रयत्न केला.

स्वतः नन्नय भट्टाने आपल्या ग्रंथात पूर्ववर्ती ग्रंथकाराचा उल्लेख केलेला नाही. त्याबाबत, बरीचशी मूकता पाळण्यात आली आहे. यावरूनच हे सिद्ध होते की, ते सर्व जैन असले पाहिजेत. नन्नय भट्टाच्या शैलीवरून देखील जैन धर्माच्या प्रभावाची आपणाला माहिती मिळू शकते. नन्नय भट्टाने आपल्या महाभारत ग्रंथात शुद्ध चंपू शैलीचे अनुकरण केले आहे. या शैलीची स्फूर्ति त्याला कन्नड जैन कवीच्याकडून मिळाली असावी. नन्नय कर्नाटक साहित्यिकांच्या प्रति ऋणी असल्याचा दिसून येतो. कर्नाटक साहित्य व आंध्र साहित्य याच्या संबंधाविषयीची दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, नन्नय भट्टापूर्वी एक शतक होऊन गेलेल्या पंप व नागवर्मा इत्यादि महान कन्नड साहित्यिक तेलगु देशातून आले असावेत. आणि याचमुळे विद्वान लोक देखील तेलगु साहित्यातील जैन कालाविषयी विश्वासू असल्याचे दिसतात. हा काळ साधारणपणे ९ ते १० वे शतक असावा ही माहिती आपणाला तेलगु शिलालेखावरून मिळू शकले.

या ग्रंथाशिवाय इतर ग्रंथांची माहिती उपलब्ध नाही. थोडक्यात तेलगु जैन साहित्य अल्पांशाने उपलब्ध असून त्याच्याविषयी अधिक सखोलपणे माहिती मिळविणे आवश्यक आहे.

## कन्नड जैन साहित्य

प्राचीन कन्नड साहित्यातून आपणाला कन्नड साहित्याचे सार्वभौलिक सुदर दर्शन घडते. कन्नडमधील प्राचीन साहित्य आज देखील अगदी नावीन्यपूर्ण असलेले दिसून येते. या प्राचीन साहित्यात गंभीरता, चिंतनशीलता व प्रसन्नता असल्याचे आढळून येते. या साहित्याने कावेरीपासून गोदावरीपर्यंतचा सुरम्य भाग व्यापून टाकला आहे. कन्नड साहित्याची प्रेरणाच अशी आहे की, तिच्यामुळे सर्वांगात चेतना भरून जाते, आत्मा डोलू लागतो तर मन गाऊ लागते. सहज स्वाभाविक काव्याची रचना करण्यामध्ये कन्नड प्रदेश तरबेज आहे. म्हटलेच आहे– 'कुरितोददेयुं काव्य प्रयोग परिणत मतिगल' अर्थातच ज्या साहित्याचा प्राचीन इतिहास इतका सुदर आहे, त्याचे वर्तमान स्वरूप निश्चितपणे सौंदर्यपूर्ण असणार. कन्नड काव्य साहित्य, वीर रसाने परिपूर्ण भरून उरले आहे. याच

## १६. नन्नू लू–

तमिळ व्याकरणावरील हा दुसरा एक ग्रंथ असून, हा सर्वाधिक प्रिय होता. शिमगंग सामंताच्या विनंतीवरून बावनंदि मुनीने या ग्रंथाची रचना केली होती. ते तमिळ व्याकरणातच नव्हे तर जैनेंद्र व्याकरणात देखील तरबेज होते. यावर अनेक टीका असून मल्लिनाथाची टीका प्रमुख आहे.

## १७. कोष साहित्य–

तमिळ कोष साहित्यालाही जैन आचार्यांनी महान देणगी दिल्याचे दिसून येते. तमिळमध्ये दिवाकर निघण्टु, पिंगल निघण्टु व चूडामणि निघण्टु हे तीन प्रमुख कोषग्रंथ असून, त्यांची रचना अनुक्रमे दिवाकर मुनि, पिंगल व मंडल पुरुष यांनी केली आहे. हे तिघेही जैन ग्रंथकार असल्याचे मानले जाते. दिवाकररचित निघण्टु अनुपलब्ध असून इतर दोन उपलब्ध आहेत. त्यातील शेवटचा चूडामणि निघण्टु अधिक प्रसिद्ध आहे.

## १८. प्रकीर्ण ग्रंथ–

'तिरुनूरन्तदि' व 'तिरुक्कलम्बगम्' हे दोन महत्वाचे प्रकीर्ण ग्रंथ असून त्याची लोकप्रियताही अधिक होती.

### तिरुनूरन्तदि–

या ग्रंथाची रचना अव्वार याने केली असून त्याने जैन धर्माचा स्वीकार केला होता. हा भक्तिरसाचा सुंदर ग्रंथ आहे. अन्तादि ही एक विशिष्ठ रचना असून त्यात पूर्व पद्याचा अंतिम शब्द दुसऱ्या पद्याचा प्रमुख तथा मुख्य शब्द झालेला दिसून येतो. अंतादिचा अर्थ अंत आणि आदि असा होता. यात पद्याची एक ओळ शब्दविशेषाने परस्पर संबंधित असून पूर्व पद्यात अंतिम शब्द असून नंतरच्या पद्यात पहिला असतो. तिरुनूरन्तदि ही १०० पद्याची दुसरी एक रचना आहे.[1]

### तिरुक्कलम्बगम–

हा देखील भक्तिरसाने युक्त असा महत्वाचा ग्रंथ असून त्याची रचना उदीचिदेव याने केली आहे. ते अपरगई नामक स्थानाचे निवासी होते. कलंबगम्चा अर्थ लघु कवितांचा संग्रह ज्यात अनेक छंद पद्य असतात. हा ग्रंथ फक्त भक्तिरसानेच युक्त नसून सैद्धांतिक दृष्टचाही महत्वाचा आहे.

उपर्युक्त ग्रंथाशिवाय ऐचूवडि हा गणितविषयक व जिनेंद्रमौलि हा ज्योतिषविषयक असे महत्वाचे दोन ग्रंथ आहेत. या ग्रंथाशिवाय जैन आचार्यांनी तमिळमध्ये विद्याविषयक, मंत्रविषयक व इतरही विषयावर देखील ग्रंथरचना केली आहे. तमिळ साहित्यात महान व मौल्यवान ग्रंथरचना करण्याचे बरेचसे श्रेय जैन मुनींना तथा ग्रंथकारांना मिळाल्याचे स्पष्ट दिसून येते. थोडक्यात तमिळ जैन साहित्य तमिळ प्रदेशातील चालिरुढी, परंपरा, सामाजिक दर्शन व संस्कृति या दृष्टीने अत्यंत महत्वाचे असून तमिळ प्रदेशाचा इतिहास समजाऊन घेण्यासाठी या साहित्याचे महत्त्व अनन्यसाधारण आहे हे कदापि नाकारता येणार नाही.

---

१. मदुरा तमिळ संगमद्वारा संपादित.

## तेलगु जैन साहित्य

दक्षिण भारतात जैन धर्माचा प्रसार तथा प्रवेश इतिहासाच्या प्रारंभकाळीच झालेला होता. आणि त्या विभागातील तमिळ व कन्नड दोन्ही साहित्य जैन धर्माने प्रभावित झालेले होते. या दोन्ही भाषेतील विशाल साहित्याचे आपण अवलोकन केले तर, ही गोष्ट त्वरित लक्षात येते. यावरून तेलगु साहित्यावर देखील जैन धर्माचा प्रभाव पडला असावा, असे म्हटले तर अयोग्य ठरणार नाही. कारण तमिळ कर्नाटक याच्यापेक्षा जैनांचा प्रवेश आंध्र प्रदेशात झाला असला पाहिजे. परंतु या ठिकाणी आपणाला विपरीत अवस्था असल्याचे दिसून येते.

मराठी जैन साहित्य, हिंदी जैन साहित्य, कन्नड जैन साहित्य व तमिळ जैन साहित्याप्रमाणे तेलगु जैन साहित्याविषयीची विपुल माहिती मिळत नाही. तेलगु जैन साहित्य अगदी त्रोटक प्रमाणात असून, त्या विषयीची सखोल माहिती अद्याप तरी उपलब्ध नाही.

विशाल व विस्तृत अशा तेलगु साहित्यात केवळ तीन चारच असे ग्रंथ आहेत की जे उत्तरकालीन समजले जातात. या ग्रंथाच्यामध्ये सर्वात प्राचीन व सर्वात महत्त्वाचा असा नन्नय भट्टाचा महाभारत हा ग्रंथ आहे. या ग्रंथाची रचना द्वितीय चालुक्य राजा राजराज याच्या कारकीर्दीत करण्यात आली. ही रचना सुमारे ११ व्या शतकाच्या मध्यभागात करण्यात आली असावी. राजराज द्वितीयाच्या काळी आंध्र देशात हिंदू धर्म समर्थनार्थ एक मोठे आंदोलन झाले. त्यातच जैन धर्माचे पतन झाले. ब्राह्मण धर्म समर्थकानी त्याचा पूर्णतः नायनाट करण्याचा प्रयत्न केला.

स्वतः नन्नय भट्टाने आपल्या ग्रंथात पूर्ववर्ती ग्रंथकारांचा उल्लेख केलेला नाही. त्याबाबत बरीचशी मूकता पाळण्यात आली आहे. यावरूनच हे सिद्ध होते की, ते सर्व जैन असले पाहिजेत. नन्नय भट्टाच्या शैलीवरून देखील जैन धर्माच्या प्रभावाची आपणाला माहिती मिळू शकते. नन्नय भट्टाने आपल्या महाभारत ग्रंथात शुद्ध चंपू शैलीचे अनुकरण केले आहे. या शैलीची स्फूर्ति त्याला कन्नड जैन कवींच्याकडून मिळाली असावी. नन्नय कर्नाटक साहित्यिकांच्या प्रति ऋणी असल्याचा दिसून येतो. कर्नाटक साहित्य व आंध्र साहित्य यांच्या संबंधाविषयीची दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, नन्नय भट्टापूर्वी एक शतक होऊन गेलेल्या पंप व नागवर्मा इत्यादि महान कन्नड साहित्यिक तेलगु देशातून आले असावेत. आणि याचमुळे विद्वान लोक देखील तेलगु साहित्यातील जैन कालाविषयी विश्वासू असल्याचे दिसतात. हा काळ साधारणपणे ९ ते १० वे शतक असावा ही माहिती आपणाला तेलगु शिलालेखावरून मिळू शकते.

या ग्रंथाशिवाय इतर ग्रंथांची माहिती उपलब्ध नाही. थोडक्यात तेलगु जैन साहित्य अल्पांशाने उपलब्ध असून त्याच्याविषयी अधिक सखोलपणे माहिती मिळविणे आवश्यक आहे.

## कन्नड जैन साहित्य

प्राचीन कन्नड साहित्यातून आपणाला कन्नड साहित्याचे सार्वमौलिक सुंदर दर्शन घडते. कन्नडमधील प्राचीन साहित्य आज देखील अगदी नावीन्यपूर्ण असलेले दिसून येते. या प्राचीन साहित्यात गंभीरता, चिंतनशीलता व प्रसन्नता असल्याचे आढळून येते. या साहित्याने कावेरीपासून गोदावरीपर्यंतचा सुरम्य भाग व्यापून टाकला आहे. कन्नड साहित्याची प्रेरणाच अशी आहे की, तिच्यामुळे सर्वांगात चेतना भरून जाते, आत्मा डोलू लागतो तर मन गाऊ लागते. सहज स्वाभाविक काव्याची रचना करण्यामध्ये कन्नड प्रदेश तरबेज आहे. म्हटलेच आहे– 'कुरितोददेयु काव्य प्रयोग परिणत मतिगल' अर्थातच ज्या साहित्याचा प्राचीन इतिहास इतका सुंदर आहे, त्याचे वर्तमान स्वरूप निश्चितपणे सौंदर्यपूर्ण असणार. कन्नड काव्य साहित्य, वीर रसाने परिपूर्ण भरून उरले आहे. याच




## ४. जैन साहित्यात सामाजिक जीवनाचा मार्ग–

वैयक्तिक व सामाजिक जीवनातील मांगल्याच्या आराधनेसाठी जैन साहित्य, सदाचाराचा मार्ग स्वीकारते. निष्पाप आचरणाला महत्त्व देते. शिद्धीसाठी सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या रत्नत्रयाची आराधना मान्य करते. जीवाच्या अंतर्गत भावनाच बाह्याचाराचा आधार असल्याने त्या भावना निरामय झाल्याशिवाय त्याचा आचार सुखप्रवर्तक होणार नाही. व्यक्तीचा आचार समाज व्यवस्थेला व शांततेला पूरक, पोषक असल्याशिवाय सामाजिक स्वास्थ्य टिकणार नाही. कृत्रिम उपाय चिरकालीन शांतता प्रस्थापित करू शकणार नाहीत, त्यासाठी मनःप्रवृत्तीच निष्पाप निरामय व शांत होणे आवश्यक आहे. अशा प्रकारच्या शांत मनःस्थितीच्या आराधनेसाठी परस्पर मैत्रीभाव, गुण व गुणी जनासंबंधी आदरभाव, दुःखिताबद्दल कारुण्यभाव, समता इत्यादि सार्वकालिक मानवी गुणांची कास धरावी लागते. हा एक मानसिक संस्कार आहे. याच संस्काराचे परिशीलन, परामर्ष, प्रतिष्ठा व आराधना हाच जैन साहित्याचा स्थायीभाव आहे. ह्याच संस्कारयुक्त जीवनधारेची जोपासना करणाऱ्या सर्वोदय तीर्थाची स्थापना केवळ तत्कालीन समाजशांतीसाठीच नव्हे तर विश्वशांतीसाठी केली आहे. अशा मानवी गुणाव्यतिरिक्त देश कितीही वैभवसंपन्न, शास्त्रसंपन्न, शस्त्रसंपन्न, गतिमान, कृतिशील, बुद्धिवादी, सामर्थ्यशाली असला तरी, तो समाधानी असणार नाही. अशांतीने पेटलेल्या द्वेषाग्नीच्या खाईत होरपळल्याशिवाय राहाणार नाही. हा द्वेषाग्नी विझविण्यासाठी प्रशमरसप्रधान साहित्यजलाचा वर्षाव आवश्यक आहे. मानवी गुणांची जोपासना हे साहित्याचे संस्कारिक अंग आहे. ही संस्कारमयता नष्ट होऊन चालणार नाही. मानव सुखी होणार नाही. हा शांतरस साहित्यातून वगळला तर साहित्य आंतर्बाह्य शुष्क होऊन तेही पेटल्याशिवाय राहाणार नाही. ही आग विझविण्यास केवळ राजकीय दिखाऊ संघटना परिणामकारी होणार नाही. नीतितत्त्वे व मानवी मूल्ये अस्थिर होतील. त्यांची शुष्क प्रतिष्ठा केली तरी तेथे शांतरसाचा निर्मळ झरा वाहणार नाही. बाह्य उपकरणांनी केवळ पाट तयार करता येईल तेथे जीवंत झरा कसा पाझरत राहणार ? हा रस मनातूनच झरत राहिला पाहिजे आणि अशा रसमय मनाची जोपासना साहित्याशिवाय अन्यत्र करणे शक्य नाही. हीन साहित्याची खरी गरज आहे. ही गरज भागविण्याच्या तिच्या सामर्थ्यामुळेच त्याचे महत्त्व सिद्ध होते. ही सामाजिक गरज जैन साहित्याने भागविली आहे आणि इतःपर भागविण्यास समर्थ आहे. कारण त्यातील मूलतत्त्व जीवनाशी अधिक प्रामाणिक आहे.

## ५, जैन साहित्याची आत्मिक प्रतिष्ठा–

जैन साहित्यात आत्मनिष्ठ सौंदर्याची प्रतिष्ठा आहे. अंतरंग सुंदर असल्याशिवाय जीवनातील व्यवहारात सौंदर्याचा आविष्कार होणार नाही. चित्तसौंदर्यरूपी मुळाशिवाय आणि संस्काररूपी वर्षावाशिवाय सौंदर्यवृक्षाला बहार नाही. बाह्य सौंदर्य मूर्त होण्यासाठीच आंतरिक सौंदर्याची निष्ठा जैन साहित्याने बाळगली आहे. मधुर फळाच्या अपेक्षेने काटेरी विषवल्लीची जोपासना करून हेतू सिद्ध होणार नाही. जैन साहित्याची ही अंतर्गत चेतना ज्याच्या भौतिक दृष्टीला पेलत नाही त्याला त्या साहित्याचा आस्वाद घेता येत नाही. रसास्वादन न घेताच त्यावर काही जण जहरी टीका करतात. त्यांना त्यातील जागतिक जीवनाची निष्ठा कळत नाही. म्हणून त्या साहित्याला पारलौकिक किंवा परके मानून ते स्वतः वंचित राहतात. जैन साहित्य सामाजिक जीवनाची आणि ऐहिक भावनांची कदर करीत नाही असे मुळीच नाही. मात्र ते फक्त तेच व तेवढेच करून थांबत नाही हे खरे आहे. ते अंतरंग कसे आहे आणि कसे असावे या दोन्ही अंगाचा परामर्ष घेते एवढेच. ते अर्धे नाही की अर्धवट नाही ते अंतरंग सौंदर्याला बाह्य सौंदर्याच्या मदतीनेच साकार करते. शरीराशिवाय मनाला व आत्म्याला दुसरा आधार नाही देहाशिवाय जीवतत्त्वाला या जगात अस्तित्वच उरणार नाही. हे जितके खरे तितकेच आंतरिक सत्याशिवाय शरीरही जीवंत राहू शकत नाही हे देखील सत्यच आहे. केवळ शरीर हे जीवन तत्त्व नव्हे. शरीराला चेतना प्राप्त करून देणाऱ्या सत्यतत्त्वाला विसरून चालत नाही. शरीर व जीवाचा जो संबंध आहे तोच संबंध







साहित्याचा व अंतिम सत्याचा आहे सनातन शिवत्व हे अंतिम सत्य म्हणून साहित्य सत्य, शिव व सुंदर असे त्रिगुणात्मक असते. जीवन जितके भौतिक आहे तितकेच आतरिक आहे त्यामुळेच जैन साहित्यात आंतरिक सौंदर्य आढळते. त्यातील परमतत्त्व लौकिक जीवनाला मुळीच विरोध करीत नाही उलट ते पूरकच ठरते. कलात्मक सौंदर्याला ते बाधक नाही की बाह्य सौंदर्याविषयी उदासीनही नाही.

## ६. जैन साहित्याची विविधता–

कांही विचारवंताच्या मते आत्मविचार व ऐहिक विचार मूलतः आत्यंतिक वेगळे असून ते एकत्र असणे शक्य नाही. ते एकमेकाला मारकच ठरतात. परंतु ही विचारधारा वस्तुनिष्ठही नाही व आत्मनिष्ठही नाही. मूलगामी नव्हे की पुरोगामी नव्हे. हा एक कलेचा मानदंडच नव्हे. कला जीवनमय आहे आणि जीवन उभयधर्मी आहे. एकांगी जीवन जिवंत राहणार नाही. जीवरहित शरीराला प्रेत म्हणतात. तसेच साहित्यही द्विगुणात्मक आहे. खऱ्या अर्थाने जीवनाशी ते एकनिष्ठ आहे. म्हणूनच साहित्याला दोन्ही गुणांची निष्ठा पल्लवित करावयाची असते. त्यासाठीच जैन साहित्यातील मोहर दोन प्रकारे बहरलेला असतो. ही विविधता विचारपूर्वक समजून घेतली पाहिजे. नाहीतर आपण आपल्याच छायेचा तिरस्कार करण्यासारखे होईल. कला ही सौंदर्यात्मक असूनही शिवत्त्वाने प्रेरित आहे. रसायनाप्रमाणे इंद्रियाना व स्वास्थ्य सुखालाही अभीष्ट आहे. रसायन रसाळ असावे, ते शुष्क असू नये. त्याप्रमाणे कला रूक्ष असू नये. ती ललित असावी. परंतु त्यात केवळ लौल्य असल्यास ती 'विषमिश्रित अन्नाप्रमाणे सुंदर असूनही स्वास्थ्यदायक होणार नाही आणि सत्यही ठरणार नाही. म्हणून जैन साहित्यकलेचे स्वरूप यथार्थपणे समजून घेणे आवश्यक आहे. त्याला दोन अंगे आहेत. म्हणून त्यातील आनंद संमिश्र ठरत नाही. कारण त्या एकाच वस्तूच्या दोन बाजू आहेत. त्याच्या स्वरूपात द्वैतभाव नाही. त्याच्या आस्वादनात एकतानता आहे, तल्लीनता आहे. ती कला गुणमय आहे. त्यातील कलातत्त्व व सौंदर्यबोध साधक आहेत, उपादेय आहेत. जैन आध्यात्मिक शास्त्रे सिद्धांतरूप असल्याने या ठिकाणी त्यांचा विचार कर्तव्य नाही. हा फक्त साहित्याचा, काव्याचा आणि त्यातील सौंदर्याचा परामर्श आहे.

जैन संस्कृती कला आणि साहित्य यांचा इतिहास पाहता असे स्पष्ट दिसते की, या परंपरेतील कलाकार केवळ शुद्ध तत्त्वामध्ये विलीन होत नाहीत, जागतिक जीवनाशी उदासीन राहत नाहीत. त्याचप्रमाणे केवळ बाह्य सौंदर्याच्या लोलुपतेने लुप्तप्रायही होत नाहीत. म्हणून त्यांची परंपरा अतूट राहिली आहे. त्यांची कलावस्तु जगप्रसिद्ध आहे. जैन शिल्पकला, मूर्तीकला, वास्तुकला, काष्ठमूर्ती, रत्नमूर्ती, स्तंभ, स्तूप व मंदिर व परिसरात्मक धर्मायतने, समवसरणाची प्रतिकृती, आराधकांचे भावचित्रण, यक्ष-यक्षणींचे ऐहिक वैभव व भोगविलास इत्यादि अभिजात कलात्मक वस्तु जगप्रसिद्ध आहेत. ते जीवनव्यापी व सर्वस्पर्शी आहेत. त्यात कोणतेही वैगुण्य नाही. त्यातील सौंदर्यरसाला सीमा नाही. त्यातील प्रकृतीप्रेम सहजगम्य आहे प्राकृतिक सौंदर्याची उपेक्षा केल्याचा आक्षेप करण्यास कुणाचीही जीभ उचलणार नाही. सिद्धहस्त कलाकारानी फक्त चेतनात्मक आविष्कार केला नाही, केवळ तात्विक उद्बोधनाला वाहून घेतले नाही. अमूर्त तत्त्वाला साकार करीत असतानाच पार्थिव तत्त्वाला असा काही घाट दिला आहे की, तेथे सौंदर्याने स्वतःहून जन्म घेतला. तो थाटमाट पाहून प्रेक्षकाचे भान हरपते. अशा अप्रतिम सौंदर्याचीही त्यांनी मनःपूर्वक आराधना केली आहे. कलेची जिवंत प्रतिमा आत्मसात केली आहे. त्याचा आस्वाद रसिकतेने यथेच्छ घेतला आहे. ते केवळ सौंदर्याचे व कलेचे पुजारीच बनले नाहीत तर, त्यातील रसतत्त्वामध्ये स्वतः विलीन पावले. स्वतःचे अस्तित्व विसरून शुद्ध कलारूप बनले सौंदर्याच्या प्राचीन परंपरेचा ओघ वाहता ठेवून त्याला नवा ढंग प्राप्त करून दिला. मानवाला अशी सौंदर्यदृष्टी प्रदान केली की, कोणत्याही पार्थिव वस्तूमधील सौंदर्यबोध स्वीकारण्यास तो पात्र ठरेल आणि सौंदर्यवस्तूमुळे नव्हे तर, भावसौंदर्याने प्रेरित होऊन आंतरिक शिवत्वाला उद्दीपित करण्यास समर्थ बनविले. केवळ बाह्य सौंदर्य पराधीन असते. पराधीनतेत प्रतिबंध असतो म्हणून सौंदर्यस्वादनाचा विघात होतो उलट भावसौंदर्य स्वाधीन असून, सत्य व शिवतत्वापर्यंत




पोहचविण्यास समर्थ असतो. खरे सौंदर्य चेतनात्मक असून शाश्वतही आहे. चंद्रकला जशी प्रकाशमय असते तशी कला चैतन्यस्वरूपी आहे. ती आनंदाची छटा आहे. आनंद प्रकाशरूप आहे. या प्रकाशज्योतीने लोलुपता, चंचलता इत्यादि तमोगुण नष्ट होतात. तेथेच मंगलमय शिवत्वाची प्रचीति येते. जैन साहित्याचे कलात्मक स्वरूप हे असे आहे त्यामुळेच जैन साहित्यामध्ये प्राणप्रतिष्ठा आढळते. कारण धर्मच अधर्माचा, अशुभाचा, असत्याचा आणि रसभंगाचाही परिहार करण्यास समर्थ असतो व रसिकाला शुद्ध तत्वापर्यंत पोहचवितो. आनंदाचा आविष्कार करणे हा धर्माचा गुण आहे. धर्म आनंदाला मारक नव्हे तर साधक व पूरक आहे. धर्मामुळे जीव आपल्यातच रममाण होतो. त्याची धावपळ संपते. संक्लेशभाव नष्ट होतो. स्वगुणामध्ये रमण्यात कोणताही व्याघात निर्माण होत नाही. त्या अंतर्गत आनंदरसाला अंत नाही. हीच आत्म्याची आनंददशा आहे आणि खऱ्या कलेचे लक्ष्य हेच आहे.

विश्रांतिर्यस्य सम्भोगे सा कला ना कला मता । लीयते परमानंदे ययात्मा सा परा कला ॥

१) कला--

व्यवहारात कला शब्दाचा अर्थ फारच व्यापक आहे. पुष्कळवेळा त्यात असुंदर व अनैतिक अशी काही जीवनाशी असंगत बाबीचाही समावेश करण्यात येतो. कलेची परिभाषा कवितेच्या व्याख्येइतकीच शब्दातीत आहे. कला भावात्मक असून त्याचा बोध मनानेच घ्यावा लागतो कला कल्पनेत जन्मते, रसाने वहरते आणि वस्तूमध्ये साकार होते. म्हणून कोणतीही वस्तु कलाक्षेत्राच्या बाहेर नाही. कोणतीही वस्तु केवळ वस्तु म्हणून सुंदर किंवा असुंदर असत नाही. सौंदर्य हा मनाचा विषय असल्याने त्याच्या आस्वादनासाठी केवळ रसिकता व ग्रहणात्मकता पात्रता उपयुक्त असते. प्रत्येक व्यक्तीची रसेच्छा व रसानुभूती वेगळी असते. विविध कलांचा प्रत्यय येण्यासाठी रसस्वादनाची क्षमता व त्याची कक्षा प्रभावी असावी लागते कलाकाराची प्रतिभा अनुभवण्यासाठी रसिकाची आभा उत्तेजित होणे आवश्यक आहे. अशा चेतनेच्या प्रकाशाशिवाय कला व कलासौंदर्य प्रतिभासित होत नाही.

उपकरणानुसारी सौंदर्य क्षणिक असून आत्मवर्ती सौंदर्य मात्र स्थायी असते आणि कला या दोहोंच्या परिसरात वावरते. त्याचे निश्चित स्वरूप शब्दांकित करणे कठीण आहे. तरीपण आंतरिक रसपूर्ण अशा अमूर्त भावांना बाह्य उपादानाच्या मदतीने साकार करणे म्हणजेच कलेचा आविष्कार होय. इतके सांगणेही कलानुभूतीला प्रेरक ठरणे शक्य आहे. अंतरातील रसानुभूतीचा एक अविष्कारात्मक प्रवाह म्हणजे कला. त्यात सत्तत्त्वाची अभिव्यक्ति असून, ती जीवनदायी शुभ असावी ही अपेक्षा असते. थोडक्यात ज्या उपादानाने सौंदर्याची अनुभूती मिळून चेतना उत्तेजित होते ती कलावस्तु होय. ज्यामुळे मनातील तरल भावनामध्ये जीवनदायी तरंग उमटतात व त्यातून एक संगीतमय अवस्था निर्माण होते ती कला. बाह्य उपादानाच्या अंतरंगातच कलेचे उगमस्थान आहे. कलेचा बाह्याकारी बोध वस्तुनिष्ठ आहे. आकार धारण करणे कलेचा सहजभाव असल्याने मूर्त वस्तूच तिचे अधिष्ठान आहे. कला सौंदर्यान्वयीच असते, सौंदर्यनिरपेक्ष कला ग्राह्य नव्हे. जिच्याशी रसिकाचा कोणत्याही प्रकारे प्रयोजनगत संबंध नसतो तीच सुंदर वस्तु होय. कला अशा सहज सौंदर्याची जननी आहे.

सौंदर्य आणि कला भिन्न असूनही त्यांना परस्पराहून भिन्न करता येत नाही. त्यांचा अन्वयी संबंध इतका घनिष्ठ असतो की त्यांचे अस्तित्व भिन्न भिन्न भासत नाही कलेतच सौंदर्याचा बोध होतो आणि कला सौंदर्यव्याप्त आहे. कलात्मक सौंदर्याने भारून टाकल्यास कोणतीही वस्तु नयनरम्य इंद्रियाकर्षक मनोज्ञ करता येते. मात्र सौंदर्याचा संबंध आनंदाशी निगडित आहे तर आनंद भद्रात्मक व शिवस्वरूपी आहे. विकार पूर्तीला किंवा वासनाच्या प्रेरणेला तत्त्वतः आनंद मानता येत नाही. बुभुक्षा ही क्षुब्धावस्था असून ती मनाची व्यग्रता वाढविते आणि कधी कधी इंद्रियांनाही विकल करते. तो प्रशमभाव नव्हे. म्हणून खरा आनंद प्राप्त होत नाही.








सौंदर्यबोध होण्यास इंद्रियांच्या क्षमतेची व मनाच्या तरलतेची गरज आहे परंतु अशावेळी प्रेरणा वासनामूलक असेल तर आनंदाचा भंग होतो. त्यातील रस फार लवकर आटतो. इंद्रियातीत सौंदर्याचे अधिष्ठान मन आहे. मन मतींद्रिय आहे. त्याला केवळ भावरसाची अनुभूती पर्याप्त आहे. आनंद हा मानसिक भोग आहे. जैन कलेतील व जैन साहित्यातील आनंद याच स्वरूपाचा आहे. त्यातील सौंदर्याचा आविष्कार याच वर्गातील आहे. तेथील स्थायीभाव प्रशमरस आहे. या स्तरावर कला उंचावते म्हणूनच केवळ ती उपेक्षणीय नव्हे. जर साहित्याची अंतिम मर्यादा शिवत्त्व असेल तर ती मर्यादा गाठणे ही गुणवत्ता आहे हीच श्रेष्ठता जैन साहित्याने गाठलेली आहे. उपादान कला सौंदर्याचा आधार असून, बाह्येंद्रिये ही ज्ञेय साधने आहेत. म्हणून ती दोन्ही पार्थिव असून नाशवंत आहेत. म्हणून अशा प्रकारचा बाह्य सौंदर्याचा आविष्कार शिवत्त्वापर्यंतचा आंतरिक पल्ला गाठू शकत नाही, तो अपुरा पडतो. हा गुणस्वरूपी आंतरिक पल्ला गाठण्यासाठी अतींद्रिय रसात्मकताच प्रभावी ठरते. शिवतत्त्व केवळ प्रकाशमय आहे. त्यातील आनंद चेतनामय आहे. ती चित्तावस्था ज्ञानमय असते. त्या ज्ञानाची प्राप्ति केवळ सत्य तत्त्वानेच होते. मात्र कलात्मक सौंदर्याने ऐंद्रियिक संतोष मिळतो. जैन साहित्यातील आनंद या संतोष भावाच्याही पुढची स्थिती आहे. तो आनंद परमतत्त्वाचा शोधक आहे. म्हणूनच तो आनंद प्रवृत्तीपर नसून निवृत्तीमूलक आहे. या प्रकारच्या आनंद मार्गानेच शिवत्वाची संभवनीय ठरते. कारण या आनंदाचा आधार सत्य तत्त्व आहे आणि सत्याला सोडून शिवप्राप्ति होत नाही. जोपर्यंत जागतिक जीवनाची सामान्य मर्यादा संपत नाही तोपर्यंत कलात्मक सौंदर्य मुळीच उपेक्षणीय नाही. पण केवळ कलात्मक सौंदर्याची उपासना म्हणजे साहित्याची पूर्ति नव्हे. तो केवळ आरंभ आहे. आवश्यक त्या तीनही बाजू लाभल्याने जैन साहित्याची आकृति पूर्णाकार झाली आहे साहित्यमूर्ती द्रव्यगुणांनी व भावगुणानी मंडित झाली आहे. कलात्मक सौंदर्य, सत्यतत्त्व व शिवत्त्व या तिन्ही प्रांतातून वहात असल्याने त्या साहित्यगंगेला मांगल्याचा लाभ झाला आहे. तिची पूर्तता झाली असून, ही त्रिपथगा अनंततत्त्वाच्या अंतराशयात विलीन होते. म्हणून तिचा स्तर उंचावला आहे. जैन साहित्याचे हे गुणवैशिष्ट्य आहे, अवगुण नव्हे !

मनामध्ये रसानुभूतीची पूर्तता ज्या प्रमाणात होते तेवढ्याच प्रमाणात सौंदर्यबोध होत राहतो. ही रसज्ञता प्रतिभेप्रमाणेच दैवी गुण आहे. दिव्यत्त्वाचे वरदान आहे. यामुळेच दिव्यरसाची प्रचिती येते. म्हणूनच कलावस्तूपासून होणारा सौंदर्याचा बोध सर्वत्र एकसारखा असत नाही. सर्व रसिकामध्येही समसमान आढळत नाही. ज्याची अनुभूती अधिक तरल व संवेदनाक्षम होईल त्याला कलासौंदर्याचा बोध अधिक सूक्ष्म होतो. यामुळेच कला ही सामान्य वस्तु नव्हे. कल्पनेतील बहुलता कला प्रांतातील स्वाभाविक गुण आहे. कलेचा संबंध तेजोमय ज्ञानापेक्षा भावपूर्ण मनाशी जास्त आहे. सौंदर्यानुभूतीचा आधार भावनाच आहे. मनातील विचार अनेकविध असतात. या विचारमंथनामुळेच तत्त्वाच्या अवबोधाला आरंभ होतो. विवेकानुसार तत्त्वाचे स्वरूप द्विधा प्रत्ययास येते. यातील तर्कसंगतीमुळेच सत्य व असत्य यातील रहस्य उमजू लागते. मात्र कलासौंदर्य तथ्य व अतथ्याच्या संघर्षातून पार पडले तरी सत्य तत्त्वाचा शोध घेऊ शकत नाही. याच्या क्षमतेची सीमा या प्रांताच्या अगोदरच संपलेली असते आणि तेथेच सामान्य साहित्याची कक्षा संपते. जैन साहित्याची दौड सीमेच्या पलीकडेही सुरूच असते. सत्य आणि शिवत्व या दोन उच्च तत्त्वांचा बोध घेतल्याशिवाय ते थांबत नाही. म्हणून जैन साहित्याचे कलाकार व मूर्तिकार बहुतेक ज्ञानी मुनीच आहेत. सामान्यांचा हा आवाका नव्हे. ह्याच ज्ञानी मुनींनी साहित्यातील सौंदर्याच्या कोंदणात सत्याची स्थापना करून तेथे शिवत्त्वाची प्राणप्रतिष्ठा केली आहे. ते साहित्य कलेमध्ये केवळ तथ्यात्मक सौंदर्याची उपासना करीत नाहीत तर सत्य तत्त्वाचा शोध घेतात कारण तथ्याचा संभव वस्तूच्या पोटी होतो तर सत्य चेतनस्वरूपी असते. सत्य तत्त्वाचे अत्युच्च स्वरूप म्हणजेच शिवत्व होय.

२) **आनंद**– उपभोगाच्या अभावी इंद्रियांचा क्षोभ होतो. जीवन तापदायक वाटते. दाह वाढतो आणि भूक लागली की ती क्षुब्धता त्या काळापुरती कमी होते. व्यग्रता कमी होते. पण शांति नावाचा गुण याहून वेगळा

आहे. प्रशमभाव स्थायी असेल तर वरील दाह तितका तापदायक वाटत नाही. चित्त होरपळून जात नाही. ते त्या क्षुब्धतेवर विजय मिळविण्याचा प्रयत्न करते. ही एक साधना आहे. ती साध्य झाल्यावर क्षुब्धतेचा उद्रेकच कमी करता येतो किंवा तो आपल्या ताब्यात ठेवता येतो. देहधर्मावर मनाचे राज्य चालते. पण त्यालाही मर्यादा असते. वासनावर व त्यांच्या उद्रेकावर पूर्ण विजय मिळवावयाचा असेल तर तपश्चर्येचा मार्ग स्वीकारावा लागतो. तपश्चर्येमुळे वासनांचा क्षय होतो. वासनांच्या अभावी मनात शांत रस अखंडित राहतो. त्याला खंड न पडू देणे हे त्या तपाच्या बळावर अवलंबून असते. हा शांतभाव भोगनिरपेक्ष असतो. भोगवस्तूच्या प्राप्तीवर किंवा अप्राप्तीवर तो अवलंबून असत नाही. कारण वासनेचा अभाव असतो. उद्रेकाचा प्रश्नच निर्माण होत नाही. हाच समभाव होय. राग व द्वेष या दोन पारड्या नष्ट झाल्याने मनातील समभाव संतुलित राहतो. तो कुणीकडेही ढळत नाही. चलभाव निर्माण होत नाही. आवेगाचे नावही उरत नाही. त्यामुळे चित्त स्वतत्त्वामध्येच आनंदते. त्याची अवस्था आनंदमय बनते. त्या निरागस चेतोवृत्तीमध्ये आनंद वास करतो. त्याचे अधिष्ठान स्वतःवरच अवलंबून असते. ते केवळ तत्त्वमय उरते. यालाच सत्यस्थिती म्हणतात. या चिरंतन सत्याचा शोध लागला की, खऱ्या आनंदाचा अनुभव येतो अन्यथा नाही.

वासनातृप्ती मात्र क्षणिक असते. ती निरागस असत नाही, ती भोगवस्तूवर अवलंबून असते. अवलंबन ढळले की तृप्तीही कोलमडते. तो आधारही निश्चित स्वरूपाचा नसतो आणि प्राप्त किंवा अप्राप्त कोणतीही वस्तु आनंद धर्मात्मक नाहीच. म्हणून ती आनंद देऊ शकत नाही. केवळ निमित्त मात्र ठरते. क्षुधिताला अन्न हवे असते हे अगदी खरे आहे. पण त्याच्या अतिप्रमाणाने इंद्रिये अधिकच अशांत होतात, हेही तितकेच खरे आहे. कारण आनंद हा अन्नाचा खरा गुणच नव्हे. गुणाचा अतिरेक होत नसतो. गुणाच्या वाढीने विकृति निर्माण होत नाही. विकृति विकारानुसारी असते. तर सत्य गुण स्वरूपी असते. म्हणून आनंद हा गुण असून तो सत्स्वरूपी आहे. ते तत्त्व आहे. म्हणूनच सत्यही आहे. सत्याश्रित आनंदच स्वाभाविक आहे. तो जीवाचा सहजभाव आहे. केवळ आत्मानंदच अमर आहे. जैन साहित्याचा कल याच प्रकारच्या आनंदाकडे झुकत असतो. दीर्घकालीन साधना व तपश्चर्या यामुळे अशा गुणस्वरूपी आनंदाची उपलब्धि होते. जैन साहित्यही अशा प्रकारची साधना आहे. पार्थिव मजेसाठी साहित्याचा जन्म झाला नाही. साहित्य परंपरेचा इतिहास याचीच ग्वाही देतो. ही साधना ज्याना जमत नाही त्यांना या कलेतील सौंदर्यबोध दुर्लभ होतो. हे खरे असले तरी असे स्थूलवाचक जैन साहित्याचे रसिकच ठरत नसल्याने ते त्या आनंदाचे गमक ठरत नाहीत. ते या साहित्य मंदिराची पायरी चढूच शकत नाही. परंतु गुणी रसिकाला तेथे आनंदाचा अखंड झरा आढळल्याशिवाय राहणार नाही. निरामय आनंद हाच जैन साहित्याचा मूलाधार आहे तेथे आमिषाला अजिबात वाव नाही. निरामिष बनल्याशिवाय तेथे प्रवेशच मिळत नाही.

निरागस आनंदाच्या अनुभवासाठी कलावस्तूही निरामिष व पवित्रच असणे आवश्यक आहे. कलावस्तु सामिष असली तर भोगवृत्तीला प्रेरणा मिळते, वासना जागृत होतात, क्षोभ उत्पन्न होतो, तो वाढत राहतो. हेच दुष्टचक्र टाळण्याचा प्रयत्न जैन साहित्यात केलेला असतो. म्हणून त्यातील भोग त्यागरूप परिणमतो. जैन साहित्यातील पार्थिव वीराग्रणी नायकसुद्धा शेवटी त्यागमार्ग का स्वीकारतो याचे उत्तर आनंदाच्या लक्षणामध्येच सापडते. त्याचे भोगापासून त्यागापर्यंतचे सर्व परिवर्तन आनंदासाठीच असते तो नायक पळवाट मुळीच स्वीकारीत नाही. परंतु त्याला आनंदाचे तत्त्वदर्शन झाल्याने त्याच्या आनंदाची दिशा आपोआप बदलते. त्याचा आचार मार्गही उन्नत होतो. भोगानंदापेक्षा त्यागानंदाची अनुभूती किती श्रेष्ठ आहे, 'न हि भोगो भाग्यं, भाग्यं विषयेषु वैराग्यं' हे तत्त्व त्याला मनोमनी पटते. म्हणून तो पार्थिव वैभवाचा त्याग करतो आणि आनंद तत्त्वाचा स्वीकार करतो. मनस्वी आनंद पावतो. ती प्रतिक्रिया अगर प्रतिकूल क्रिया नसून ती त्याच्या साधनेची सिद्धी असते. मात्र ज्यांना ह्या दृष्टीचा लाभ झालेला नसतो ते विपरीत भासते. रसभंग वाटतो !! हा प्रकाश व अंधार यातील भेद आहे. अंधार कधीच प्रकाशरूप बनत नाही. ज्ञानातच खरा आनंद असतो. ज्ञानालाच वंदी म्हणतात.






या साहित्याचा कलाकारही ज्ञानीच असतो. तो सामान्य शिल्पकाराप्रमाणे शिल्पवस्तूतून छन्नीच्या मदतीने द्रव्यमूर्ति तयार करीत नाही. त्याची कला भावमय असते. त्याच्या प्रभावाने वाचक स्वतःच आनदमय बनतो. ह्या भावमूर्तीची निर्मितीच त्या मुनीच्या कलेची सिद्धी असते. त्या मूर्तीला आनंदरसाचा अभिषेक करावा लागत नाही. कारण ती मूर्तीच अमृतमय-आनंदमय असते. तेथे कलाकार, कलावस्तु व आनंद एकाकार होतात. मूर्तिकार, शिल्पवस्तु व दृश्यमूर्ती यासारखा भेद तेथे उतरत नाही. त्यातील जग द्रव्यमय उरत नाहीच. त्या विश्वातील तत्त्व एकाकार असते, एकरूप असते. म्हणून त्याने साकार केलेली साहित्यमूर्ती ज्ञानप्रद असूनही आनदकारी असते. त्यातील आनंद स्वात्मप्रत्ययकारी असतो. जिवंत झाल्याप्रमाणे तो स्वयंस्फूर्त असतो. विषयानंदाप्रमाणे वस्तुनिष्ठ नसतो किंवा केवळ कल्पनाधिष्ठित नसतो आणि व्यक्तिनिष्ठही नसतो.

ॲरिस्टॉटलच्या मतानेही उच्च व आदर्श आनंद व्यक्तीच्या अतीतच असतो. तो सार्वकालिक व सार्वत्रिक असतो. कॉट, हेगले इत्यादि जर्मन तत्त्वज्ञांच्या म्हणण्याप्रमाणे देखील कलाद्वारे मिळणारा आनंद निरपेक्ष असतो. जेव्हा जीवन सत्य तत्त्वाशी तन्मय पावते, वाणी आणि वर्तनामध्ये सुसंगती निर्माण होते, तेव्हाच कलात्मक उपकरणापासून मिळणारा उच्च कोटीचा आनंद अनुभवता येतो. चित्तवृत्ति अंतर्मुख होऊन त्यांचा स्तर समुन्नत झाल्याशिवाय अशा निरामय आनंदाचा उदय होत नाही. भारतीय दार्शनिक विचारही याच परंपरेला पुष्ठी देतात. भारतीय चित्रकला व काव्यकला देखील अशा सत्याश्रित आनंदरसाने तुडुंब भरलेली असते. त्या त्या कालातील परिस्थितीचे परीक्षण करून पूर्व ऋषींनी आपले विचार समाजासमोर मांडलेले आहेत. आपली सांस्कृतिक नीतिपरंपरा आणि कालमानाप्रमाणे घडून आलेली सामाजिक परिवर्तने यांच्या अभ्यासानेही याच प्रकारच्या आनंदरसाची सिद्धी होते.

## ३) रस–

रसाचा परामर्ष घेतल्याशिवाय आनंदतत्त्वाची समस्या उकलत नाही. मानवाची उन्नती व अवनतीही घडविण्यामध्ये रसविचाराला व रसानुभूतीला फार मोठे स्थान आहे. आपली परिस्थिती बहुतेक अंशाने रसाशीच निगडित असते. आपल्या सर्व अनुभूतींचे महाद्वार रस आहे. रस दुःखस्वरूपी आहे की सुखस्वरूपी आहे हा प्रश्न मोठ्या गुंतागुंतीचा आहे. रसाच्या स्वरूपासंबंधी समालोचन करीत असताना, विचारवंतामध्ये प्राचीन काळापासून मतभेद दिसून येतो. दुःखद स्थितीमधील करूण रस रसिकांच्या मनात दुःखानुभूतीचा प्रेरक ठरतो की सुखानुभूतीचा हा प्रश्न खरोखरच विवाद्य आहे. तरीपण रसामध्ये तादात्म्यभाव निर्माण करण्याची शक्ति अत्यत प्रभावी आहे. तद्रूप अवस्थेत मन रमते त्यामुळे त्या रतावस्थेत रतिभाव असलाच पाहिजे. रतिभाव किंवा रतावस्था-तल्लीनता ही कलापोषक आहे. जेथे तल्लीनता नाही ती कला खरी कला नव्हे. आणि जर कला आनंदोत्पादक आहे तर रसही आनंदाला पोषक असलाच पाहिजे. रमणे हा मनाचा धर्म आहे. ते जेथे रमते तेथे रतिभावाची उत्पत्ती किंवा अरतिभावाचा परिहार असलाच पाहिजे. यासबंधी सखोल चर्चा हा स्वतंत्र विषय होईल.

विश्वातील प्रत्येक वस्तु रसोत्पादक आहे. म्हणून ती सौन्दर्यान्वयीही आहे आणि त्यात आनंद देण्याची शक्ति आहे. भिन्न भिन्न पदार्थामध्येही आनंद देण्याची पात्रता आहे. परंतु तो अनुभवण्याची क्षमता मात्र प्रत्येक व्यक्तीची वेगवेगळी आहे. साधारणपणे सामान्य जनता प्रत्येक वस्तूतून रस शोषून घेण्यास अक्षमच असते. रसिकाला बलवत्तर झाल्याशिवाय रसोत्पत्ति होत नाही, आनंदाचा लाभ मिळत नाही. त्यासाठी अनुकूल रसप्रवृत्ती, प्रेरणा आणि रसोपभोग क्षमता आवश्यक असते. ही क्षमता आवश्यक तत्त्वांच्या अभ्यासाने साध्य होते आणि ग्रहणशील अनुभूतीने वाढते. आनंदमय चित्तवृत्तीत रसांचा सचय होतो. अशी पात्रता ज्यांच्याजवळ नाही असा मनुष्य ज्या वस्तूमध्ये रमू शकत नाही, जेथे तो आनंदित होत नाही ती वस्तु त्याला सुंदर भासत नाही.

कारण आनंद हा चेतोगुण आहे, वस्तुधर्म नव्हे. म्हणून असा सामान्य रसिक भोगप्रवृत्तीला मात्र वळी पडलेला असल्याने त्याची धाव योग्य पदार्थाकडेच असते. भोगप्रवृत्ति वासनामूलक असल्याने स्वतःच्या भोगवासनेला अनुसरूनच तो प्राप्त वस्तूंतील रस ग्रहण करतो व वासनाचा क्षोभ कमी करण्याचा लहान-मोठा प्रयत्न करतो. त्यामुळे त्याच्या वासनेला अनुरूप असलेलीच वस्तु सुंदर वाटते. ही वासना प्रत्येकी वेगवेगळी असल्याने सुंदर वस्तूसबंधी प्रत्येकाची कल्पना वेगवेगळी असते. शिवाय वासनेचा क्षोभ कमी होताच तीच वस्तु त्याला रसहीन व विरूप वाटते. लवकरच तो रसाला वंचित होतो. त्याला 'तथ्य' यथार्थाने सापडलेलेच नसते. सत्याचा अवलंब केल्याशिवाय तथ्याचा बोध होत नाही. म्हणूनच सत्याधिष्ठित रसाचा परामर्ष घ्यावा लागतो आणि त्यासाठी वस्तूच्या अंतर्गत स्वरूपापर्यंत पोहोचण्याची दृष्टि अपेक्षित असते. त्याची उपेक्षा केली की, आपलीच उपेक्षा होते.

हा दृष्टिकोणातील फरक महत्त्वाचा असतो. त्यावरूनच यथार्थतेची कल्पना येते. तथ्यातथ्याचा निर्णय होतो. या दृष्टिकोणात जितके अंतर असेल, तितके सौन्दर्याबाबत मतभेद संभवतात. म्हणून एकाला एखादी वस्तु सुंदर वाटली तर ती दुसऱ्याला वाटेल असे नाही. पुष्कळांच्या दृष्टीने उपेक्षित असलेली वस्तूही दुसऱ्यालाही अत्यंत आकर्षक वाटते. तो त्यात तल्लीनता पावतो व रसाशयात डुबत राहून आनंदित होतो. म्हणून सुंदर व असुंदर हा भाव रसवृत्तीच्या दृष्टिकोणावर अवलंबून आहे. यामुळेच असीम निळवंती व नानारूपधारी मेघालय, शांत सरोवर व लाटांनी उफाळणारा सागर, कमळाच्या पानावरील स्पंदनरहित हंसयुगुल व गगनाच्या शिरोबिंदूचा वेध घेणारा गरूड, ध्यानमग्न मुनी व नृत्यतल्लीन रमणी, फुलानी बहरलेली बाग व खंडकामधील अस्ताव्यस्त भग्नावशेष, वैभवशाली अलंकारप्रिय देवता व रजोजल्लिक त्यागमूर्ति दिगंबर या सर्व वस्तु कलामय व अप्रतिम सुंदर अथवा विपरीत भासणे सहज शक्य आहे. तो रसिकाच्या व्यक्तित्त्वावर अवलंबून असून त्यातील सीमांकन त्याच्याच गुणवत्तेवर आधारित आहे.

शिवाय सौंदर्य आणि रस यांच्या अनुभवातील आनंद हा मनातील प्रशमगुणावर व त्याच्या तत्कालीन अवस्थेवर अवलंबून असतो. भोगनिरपेक्षता ज्या प्रमाणात असेल त्याच प्रमाणात आनंद स्वभावरूप परिणत होण्यास मदत होईल. स्वाभाविक आनंदातच तथ्याचा बोध होतो. आनंद प्रशमावस्थेतच रुजतो व बहरतो. क्षुब्धावस्थेत आनंद गढूळ होतो, परिणामकारी होत नाही. ही क्षुब्धावस्था भोगकांक्षेच्या प्रमाणात निर्माण होते. मालकी हक्काची आवश्यकता वाटते. पण उपभोगाच्यास हव्या असलेल्या प्रत्येक वस्तूवर मालकी प्रस्थापित करणे कसे शक्य आहे? काही प्रमाणात शक्यता असली तरी, त्यातही पुनः व्यग्रता निर्माण होते आणि मर्यादा बंधनकारक ठरतात. कालक्षेप सर मुळीच टाळता येत नाही संरक्षणार्थ यातायात करावी लागते. शिवाय कालपरिणीतीस तोंड द्यावे लागते. ते कालपरिवर्तन इष्टच असेल याची खात्री नाही. एकूण रसभग रसव्याघाताची परंपराच पत्करावी लागते. यासाठीच जैन साहित्यात भोगनिष्ठ आनंदाला फार महत्व दिलेले नसते. आनंद रसानुसारी व गुणस्वरूप असल्याने त्यासाठी निराळा प्रयत्न करण्याचे कारणच उरत नाही उलट सावलीच्या मागे धावण्याप्रमाणे भोगाच्या मागे लागल्यास त्याची प्राप्ती होत नाही, फक्त फजिती होते गुण आत्म्याचा धर्म असल्याने खरा आनंद आनंदस्वरूपातच असतो. त्याचा शोध वस्तूमध्ये घेऊन उपयोग होत नाही. आत्मगुणाचा विकास ज्या प्रमाणात होईल त्या प्रमाणात आनंदगुणाचा अनुभव आपोआप मिळत राहतो. तो आनंद गुणस्वरूपी असल्याने शुद्ध असतो, भोगनिरपेक्ष असतो, निर्विकल्प असतो. ज्ञानीना त्याचा अनुभव सदैव मिळतो. सविकल्प किंवा वस्तुजन्य रस आनंदजनक असतो हे खरे परंतु तो साधनरूप असतो. साधनाला साध्य मानून फासात अडकणे योग्य नव्हे. तरी पण वर्तमानकालीन काही विद्वान देखील साध्याकडे दुर्लक्ष करतात आणि साधनांच्या झगमगाटाने दिपून जातात. कृत्रिमतेचा परिहार करण्यात आपले सामर्थ्य पणाला लावणे कर्तव्य ठरते परंतु त्यासाठी आत्मगुणांना सत्यस्वरूपाला विसरून जाणे उचित नव्हे.

या जगात आढळणाऱ्या आनंद मार्गाचा परामर्ष घेताना विचारवंतानीही आत्मानद, रसानद आणि विषयानंद असे तीन प्रकार सांगितले आहेत. यातील आत्मानंद सर्वोत्कृष्ट होय. आत्मानंदाबरोबरच इतर प्रकारांची अनुभूती सहज शक्य आहे. त्यातूनही विषयानंद अगदी स्थूल असून, वस्तुनिष्ठ आहे. रसानंद अलौकिक आहे. वस्तूशिवायही तो उपभोगता येतो. तो चेतोगुण आहे, तरल आहे. वस्तुमर्यादा त्याला सीमित नाहीत. वस्तूनिरपेक्षता स्थूल बंधनांचा व मर्यादाचा प्रांत ओलांडून असीम बनते. मनोमय होऊन निराकार होत जाते. तरी पण मन काही स्वयंसिद्ध नाही की स्वयंपूर्णही नाही. मानसिक मर्यादा रसानंदाला लागू होतात. मनोभंग झाला की या आनंदाचाही भंग होतो. मनःपरिवर्तन झाले की, रसाचेही परिवर्तन घडते. या उलट आत्मानंद अभंग आहे, परिवर्तनरहित आहे. ध्रुवधर्मी आहे, अनंत आहे, तत्वस्वरूप आहे, गुणमय आहे. ती एक सिद्धी आहे. स्वरूपाची प्राप्ती आहे. आत्माच सर्व प्रकारच्या आनंदाचा जनक आहे. तो स्वयंसिद्ध आहे. चित्ताचेही अधिष्ठान आत्माच आहे. चित्ताला स्वतंत्र अस्तित्व नाही. ते अंतिम सत्य नव्हे, आणि विषय तर वस्तुनिष्ठ असून परतत्व आहे, स्वतत्व नव्हे. त्याचा संबंध मायापूर्वक जडतो. माया मोहाधिष्ठित असते. हे दोन्ही प्रकार विकारी आहेत. त्याचा परिणाम आत्मगुणावरच आधारित असतो. असा हा सर्वश्रेष्ठ आत्मिक आनंदच जैन साहित्याचे एकमेव आकर्षण आहे. आनद परम रस आहे. हा रस केवळ स्वानुभूतिगम्य आहे. चर्चातीत आहे.

शिल्प, चित्र, नृत्य, काव्य, संगीत इत्यादि ललितकलांचा एकमेव उद्देश्य रस आहे. कलावस्तूच्या अंतरंग निरीक्षणाने रसिकांच्या मनात अनुभूतीचा उदय होतो. भावसृष्टी निर्माण होते. भावना व कल्पना यांच्या आधारे कलाकार सौंदर्य सृष्टीला जन्म देण्यास प्रवृत्त होतो. अशी नवसृष्टीच जननी असते. तेथेच आनंद लाभतो. त्याच्या आविष्काराची भाषा, हावभाव, रंग योजना, काव्य, कुंचला, शिल्प इत्यादिक तदनुसार गोष्टी माध्यम म्हणून उपयुक्त ठरतात. या निमित्ताप्रमाणे उपादानही बहुविध असते. त्याच्या रससिद्धीत मात्र पुष्कळच साम्य असते. म्हणून शिल्पकार, साहित्यकार, चित्रकार यांचा भिन्न भिन्न उल्लेख न करता फक्त कलाकार म्हणून त्याचा स्वीकार होत असतो. कलाकार हा शब्द व्यापक असून भावप्रधान जीवनाचा आविष्कार करणाऱ्या सर्वांचा त्यात अंतर्भाव होतो. भावसृष्टी निर्माण करीत असताना त्याची मनःस्थिति किती समुन्नत होते. याचे ज्ञान त्याच्या कलाकृतीशी एकरूप झाल्याशिवाय होत नाही. रसिकाची क्षमता ती समुन्नतीची पातळी गाठण्यास पात्र असली पाहिजे. इतर जीवनबाह्य परिस्थितीला बळी पडत असल्याने अस्थिर होते. उच्च पातळीवर स्थिरावू शकत नाही. कलाकाराचे जीवन मात्र भावसृष्टीत रमते, उंचावते आणि तथ्याचा व तत्वगुणाचा आश्रय घेऊन स्थिरावते, अविचल होते. अलिकडच्या उद्योगप्रधान जीवनात गतीचा वेग वाढला आहे. सामाजिक वातावरण व राजकीय स्थितीमुळे विचारांचा गोंधळ होतो. रससृष्टी विविध मार्ग अनुसरते. बदलती परिस्थिति, समाजाचे स्वरूप, कालपरिवर्तन या गोष्टी वैचारिक मनःस्थितीवरही परिणाम करतात. जीवनाचा आदर करण्यासाठी कालानुसार परिवर्तन पोषकच ठरते. बदलत्या जीवनाच्या गरजा लक्षात घेतल्यानेच नवी वाटचाल सुखदायक होते. म्हणून कला प्रयोगात्मकही आहे. कलावस्तू व त्याचे आविष्कारात्मक स्वरूप यामध्ये बदल होत असतो. मात्र आनद भावस्वरूप असल्याने चिरस्थायीच असतो. द्रव्यरूप बदलूनही भावरूप नित्यच राहते. पात्राच्या आकाराला अनुसरूनच पाण्याच्या दृश्य अविष्कारामध्ये पुष्कळच विविधता येते. तरी त्याच्या रसवत्तेत फरक पडत नाही. तथ्य तेच उरते.

कल्पनावैचित्र्य, उक्तीवैचित्र्य आणि उपकरणवैचित्र्य कलेला साकार करीत असतात. म्हणून कलेच्या आविष्कारात वैचित्र्य उद्भवते. कल्पना मानसिक चित्रांची मालिकाच असते. या मानस चित्रांची समुचित मांडणी करण्याची स्वाभाविक प्रवृत्ति कलाकारामध्ये जन्मते. कल्पनांचा उद्देश मात्र सौंदर्यनिर्मिती हाच असतो. कल्पकता उद्देश्यविरहित नसते. मात्र प्रत्येक कल्पना सुदर असतेच असे नाही. कल्पना दुर्बलही असू शकते आणि विनाशकही असू शकते. अशा रसभंजक कल्पनांचा अनादरच होत असतो. अशा दक्षतेमुळे कलेला वा कलात्मक

कल्पनाविलासाला दोष देणे ठीक नव्हे, कलाकाराची कल्पकता तथ्यपूर्ण व रसदायक असावी. यासाठी कलासमीक्षकांनी रसानुकूल कल्पनातरंगांचाच कलेत समावेश केलेला आहे. रसविद्यातही दूषणीयच ठरतात.

कलाकार पार्थिव उपादानांच्या माध्यमातून भावसृष्टी व आनंदरसाची अभिव्यक्ति निर्माण करतो. हा आनंद इंद्रिय व्यापारापेक्षा, इंद्रियतुष्टीपेक्षा फारच भिन्न असतो. लालित्यपूर्ण सौंदर्यानुभूती व्यक्त करण्याचा प्रयत्न पूर्णपणे प्रकृतीला अनुसरूनच असतो असे नाही. कारण रसमय कलांचा आविष्कार व उपादानांचा आकार यामध्ये पुष्कळच फरक आहे. कलांचे कार्य रस उद्दीपन आहे. वस्तूंना आकार देणे नव्हे. कलाकारांनी घडविलेला पार्थिव आकार हा सौंदर्याला साकार करण्याचाच प्रयत्न असतो. तो भावसृष्टीचा जनक आहे. त्याचे खरे कार्य निराकार असते. निराकार तत्त्वाला आकार देणे कलाकाराला शक्य नसते. ते त्याच्या आवाक्याच्या बाहेर आहे. तरीही कलावस्तूचे रूप रसनिर्मितीला कारण आहे. म्हणून जैन साहित्यात रूपालाही महत्त्वाचे स्थान आहे. रस निर्माण करण्याच्या मार्गाने अंतस्थ सौंदर्याचा आविष्कार करण्याचा उद्देश अगदी स्पष्ट आहे. हा उद्देश जैन शिल्पकलेत मूर्त स्वरूपात दृग्गोचर होतो. शुद्ध आत्म्याचे वीतराग स्वरूप गुणमय असल्याने त्याला आकारबद्ध करणे अशक्यच. तरीपण प्रतीकाच्याद्वारे त्या महान् गुणाची प्रतीती आल्याशिवाय रहात नाही. मूर्तीच्या मुखाच्या आविष्कारावरून सौम्यभावाची कल्पना दर्शकाच्या मनात तरळून गेल्याशिवाय रहात नाही. त्या आकाराधिष्ठित भावतरंगाच्या प्रभावाने रसिक मुग्ध होतच असतो. जैन परंपरेतील सर्व कला विभागावर हा रससिद्धांत अधिष्ठित आहे. जैन महंतांनी मात्र या उत्पादनाश्रित सौंदर्याला साध्य कधीच मानले नाही. केवळ एक साधन म्हणून त्याचा आपल्या अंतिम ध्येयासाठी उपयोग करून घेतला आहे. परंतु ज्यांना या दृष्टिकोणाची विस्मृती झाली त्यांनीच उपेक्षा केली आहे.

४. सौंदर्य–

वरील विवेचनावरून स्पष्ट आहे की, कलेमध्ये सौंदर्याची अपेक्षा असते. कलेचा आत्मा आकलण्यासाठी सौंदर्याचे विवेचन आवश्यक आहे. सुंदरतेचा भाव शब्दांकित करणे अधिक कठीण आहे. आंतरिक प्रभा, अपार्थिव अशा परम तत्वाचा, परमस्वरूप नसलेल्या उपादानाच्याद्वारे केलेला पार्थिव विश्वातील आविष्कार, मरणाधीन संसारातील अमर भाववैभव, अनंतत्वाचे मर्यादित रूप, अनंत रूपात्मक विश्वातील चेतनातत्वाची झलक इत्यादि अनेक प्रकारच्या पदावलीतून सौंदर्यभाव व्यक्त करण्याचा प्रयत्न करीत असतात. ज्यांची विचारपद्धति केवळ वैज्ञानिक असते ते जरा पुढे जाऊन म्हणतात की, आंतरस्वरूपी आरशामध्ये बाह्य पदार्थाची जी छटा उमटते त्या उपादानाच्या आधाराने सौंदर्य भावनेचा जन्म होतो. कला वस्तूचे महत्व अशा सूक्ष्म व तरल भावनेलाच कळते. तीच सौंदर्याची आराधना करते. सौंदर्य त्या भावस्थितीवरच अधिष्ठित होते. सौंदर्याच्या परिमापेमध्ये अशी ही विविधता निर्माण होणे सहज शक्य आहे. विविधताच तरलतेचे बोधचिन्ह आहे. सौंदर्याची शब्दचोकट निश्चित आकार धरू शकत नाही. कारण मूलतः हाच तो निराकार भाव आहे. त्याचे अस्तित्व मात्र भावमय आहे. त्याचा भोग रसप्रद आहे. सौंदर्य भावस्वरूप असल्याने मूर्त शब्द त्याला आकार देऊ शकत नाहीत. आत्म्याने शरीरधारण केले तरी ते शीर्ण होतेच. तशाच या सर्व व्याख्या विशीर्ण होतात. आत्मा जसा तत्वतः चेतनास्वरूपी आहे तसे सौंदर्य केवळ भावात्मक आहे.

वाचार्थवैचित्र्य, पदलालित्य किंवा अलंकारात्मक काव्यमय आविष्कार यांच्या गुणवत्तेनुसार नव रसाची उत्पत्ति होऊ शकते. त्या रसतरंगामुळे भावबिम्बामध्ये वलय उमटतात. त्याचबरोबर तेथे कृती, विकृती व विचारही उद्भवतात. परंतु तथ्याचे निरूपण, शास्त्रीय समीक्षण, हेतुपूर्ण विवेचन, विचाराचा ऊहापोह आणि सिद्धान्ताची मांडणी या मार्गाने सत्यतत्वाची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी काव्यकला प्रभावी ठरत नाही. सत्य तत्वतःच सीमारहित असल्याने हे जमत नसते. रसमयता, सुख आणि आनंद या रूपानेच सौंदर्याच्या अनुभवाची प्रचिती

यते ज्ञानेंद्रियाप्रमाणेच सौंदर्य ही एक नैसर्गिक देणगी आहे. ही ज्ञानेंद्रियेंचे अनुभूतीचे माध्यम होत. तेथे अंतरंगात तरंग उमटत राहातात आणि ती अनुभवात्मक अंतःस्थिति रमणीय भासते. 'पदे पदे यन्नवतामुपेति तदेव रूपं रमणीयतायाः' या उक्तीत ह्याच अभिप्राय असावा. A thing of beauty is a joy for ever. Its loveliness increases, it will never pass into nothingness.

या कीट्सच्या विधानाचेही अंतरंग तेच. असामान्य कलावस्तु पाहताच मनामध्ये आपोआपच अनुभूतिगम्य तरंग उमटतात. तीच सौंदर्याची छटा होय. ती इंद्रियानी जाणता येते. त्यामुळे मनामध्ये जे एक तेजोमय भामडळ निर्माण होते तेच सौंदर्य. म्हणूनच इंद्रियाबरोबरच मनातील चेतना उल्हासित होत नसेल तर सौंदर्याची खरी प्रचीति येत नाही. बाह्येंद्रिय कॅमेऱ्याच्या लेन्सप्रमाणे असतात तर अंतरंग छटाग्राही फिल्मप्रमाणे कलावस्तु व किरणशलाका इत्यादि उपादाने महत्वाची असून किरणांच्या कोनाप्रमाणे दृष्टिकोणही तेथें महत्वाचा असतो. सौंदर्य एक प्रकारची सार्वजनिक व सार्वकालिक प्रीति होय. सुंदर वस्तु एक असली तरी, सौंदर्याचा आस्वाद घेणारे रसिक अनेक असू शकतात. अनेकात्मक उपभोगामुळेही सौंदर्य संपत नाही, किंवा हीन होत नाही. जेथें रसमयता संतुष्टते तेथें सौंदर्याची प्रचीति येते. रसात्मक वृत्ती कितीही पोसवली तरी त्यात सुंदर वस्तूचा प्रत्यक्ष भोग नसतो म्हणून सौंदर्यगुणाला अगर सुंदर वस्तूलाही व्यय नाही. विनियोगाने धनाचा व्यय होतो म्हणून त्याला निधन संभवते. सौंदर्याचे तसे नाही. रसिकांचा अंत झाला तरी सौंदर्याचा अंत होत नाही. ते एक अक्षय निधान आहे. केवळ त्याच्या अस्तित्वाने रसिकाच्या मनाला प्रसन्नता लाभते. ही प्रसन्नता मोबदला नव्हे. त्यासाठी कशाचाही नाश होत नाही. रसिक मनाची पूर्ती करूनही जे स्वतः पूर्ण स्वरूपात शिल्लक उरते तेच सौंदर्य. म्हणून सौंदर्य ही सार्वजनिक आणि सार्वकालिक प्रीति आहे असे म्हणण्यास हरकत नाही. सर्वांना सुखावूनही ते सुखरूप असते. या दृष्टीने सौंदर्य सामान्य भोग नव्हे तर तो एक आतरिक अनुभव आहे.

ज्याना सौंदर्याची भूक आहे असे भोगी पुष्कळ आढळतात. पण ते बुडबुड्याप्रमाणे फक्त वाह्यागावर तरळत असतात. रसज्ञतेचा वेध घेत नाहीत. त्याना रससागराचे अंतरंग कधीच गाठता येत नाही. त्याचे गांभीर्यही कळत नाही. त्यांच्या जवळ सौंदर्याची रसिकता नसून केवळ भोगाची भूक असते. म्हणून ते भुकेकंगालच राहतात, नाही तर सुंदर वस्तूवर हल्ला चढवून घात करतात. या उलट सुंदर वस्तू लुटण्यापेक्षा सौंदर्यरसाचा अनुभव घेणे ज्यांना जमते ते सौंदर्याचे उपासक होतात. कॅमेरा सृष्टिसौंदर्याची छटा आपल्या अंत.पटावर उमटवून घेतो. ती सृष्टीच पळवून नेत नाही. रसज्ञही सुदर वस्तूच्या उपादानाने व सान्निध्याने आपल्या अंतरंगात भावतरगाना जन्म देऊ शकतो व त्यातच तो रंगतो. त्याची सौंदर्यप्रीति निःस्वार्थ असते. बुभुक्षिताची भोगक्रिया स्वार्थमूलक असते. तो रसाचा अनुभव घेण्यास अपात्र असल्याने वस्तूचाच भोग घेण्यास धजावतो. त्याचा संयम सुटतो. क्षोभ वाढतो आणि तो सौंदर्यसृष्टीला घातक ठरतो. सौंदर्याचा खरा उपासक मात्र रसग्रहण करण्यास समर्थ असल्याने सुदर वस्तुविषयी आचारनियम पाळतो संयमित राहतो. म्हणून तो उपासक बनतो.

सौंदर्याचा आस्वाद पूर्ण रूपाने घेण्यासाठी संयमित वृत्तीची गरज असते. ती नसल्यास तो उपासक न बनता संहारक होतो. उपासनाच रसिकाला संयमित करते. म्हणून तो सुख पावतो. सुखमयता त्याला न्यावयाची असेल तर, त्याची स्थापना संयमामध्ये केली पाहिजे. सौंदर्यभोग ही सुखावस्था आहे सुखावस्था अविचल ठेवावयाची असेल तर, क्षोभाला स्थान देऊ नये. विकारातून लालसा जन्मते. लालसेची परिणती म्हणजेच क्षोभ होय. क्षोभ एकदा भडकल्यावर दावाग्नीप्रमाणे स्वत.सह सर्वांचा दाह करतो. वऱ्यावाईटाची केवळ राख उरते. हा सर्वनाश टाळावयाचा असेल तर, भोगलालसा आवरलीच पाहिजे. क्षोभ नष्ट झाल्याशिवाय अंतरंगात शांतरसाचे तरंग उमटतच नाहीत. रसिकता स्थिरावत नाही. चित्तवृत्ति स्थिरावल्याशिवाय सौंदर्याचा बोध होत नाही. चित्तावस्था स्थिर, शांत व शुद्ध होण्यासाठी संयमाची आवश्यकता आहे. असंयत कल्पनातून सौंदर्यसृष्टीची शक्यताच नाही आणि सौंदर्यसृष्टीशिवाय साहित्य ते काय ?

जैन साहित्यात सौंदर्याचा बोध पदोपदी होत राहतो. त्या रसात्मक आनंदाचा फायदा वाचकाला निश्चित मिळतो. प्रशमगुण वाढीस लागून त्याचेही अंतरंग शुद्ध होते. सर्वांचेच कलामय जीवन साकल्याने सफल होते. व्यवहारी जीवनातील व्यग्रता नष्ट होते. मानवाला आतरदृष्टी प्राप्त होते. रसिकाचे भावजीवन आनंदमय होते. वैफल्याच्या अभावी सामाजिक जीवन शांतपणे गुखावते. दयादिक मानवी भावनांचे पोषण होते. हा मानवी मनावरील दृश्य परिणाम मानण्याच्या दृष्टीने कमी मोलाचा नव्हे !

परीशिष्ट

# श्वेतांबर जैन आगम साहित्य

## श्वेतांबर आगमाची भाषा–

तत्कालीन सर्वसामान्य जनापर्यंत आपला हितोपदेश पोहोचावा म्हणून भ. महावीरांनी आपला उपदेश अर्धमागधी भाषेमध्ये दिला त्या उपदेशाच्या आधारे गणधरांनी आगमांची रचना केली असे श्वेतांबर जैन मानतात. समवायांग, व्याख्याप्रज्ञप्ति व प्रज्ञापना इत्यादि सूत्रामध्ये आगमाची भाषा अर्धमागधी असल्याचे म्हटले आहे. हेमचंद्राने या भाषेला आर्ष प्राकृत तथा प्राचीन प्राकृत असे नाव दिले असून या भाषेलाच प्राचीन सूत्रांची भाषा मानली आहे रुद्रटाच्या काव्यालंकारावर टीका लिहीत असताना नमिसाधूनी आर्षभाषेस अर्धमागधी मानून ती देवांची भाषा म्हणून म्हटले आहे.[1] शिवाय तीर्थंकरांच्या ३४ अतिशयामध्ये भाषातिशयाचा समावेश होतो. ते अर्धमागधीत प्रवचन देतात, त्यावेळी ती भाषा समवसरण सभेतील श्रोत्यांची जी भाषा असेल त्यात परिणत होत असते[2] असे म्हटले जाते.

'अत्थं भासइ अरहा, सुत्तं गंथति गणहरा निउण' याप्रमाणे गणधराकडून संग्रहीत केलेली जैन आगमाची भाषा महावीरनिर्वाणानंतर जवळ जवळ १००० वर्षांनी वर्तमान स्वरूपात आलेली दिसते. दीर्घकालामध्ये वेळोवेळी आगमांच्या ज्या वाचन झाल्या त्यामध्ये आगमग्रंथात निश्चितपणे बदल झाला असला पाहिजे. आगम टीकाकारांचे या बाबीकडे लक्ष गेलेले, त्याच्या विवेचनातील पाठांतरावरून दिसून येते. उदाहरणार्थ– राजप्रश्नीयच्या टीकाकाराने मूळ पाठापेक्षा कितो तरी भिन्न पाठांतरे उद्धृत केली आहेत. त्याच्या प्राकृत व्याकरणरूपात देखील विविधता दिसून येते. अभयदेव आणि मलयगिरी या टीकाकाराच्या टीकेत देखील भाषाविषयक असलेला फरक स्पष्ट दिसून येतो जैन आगमनांची अर्धमागधी भाषा व बौद्धसूत्रांची पाली भाषा एकाच प्रदेशातील व एकाच कालातील असून दोन्हीमध्ये बराच फरक असलेला दिसतो. अर्थात् त्यावेळी सर्वात महत्त्वाची बाब अशी की, संस्कृत भाषा ही केवळ सुशिक्षिताची भाषा म्हणूनच गणली जात असे. सर्वसामान्याना ती शिकण्यास तथा आकलन करण्यासही कठिण होती. मात्र अर्धमागधी, पाली वगैरे भाषा बाल, वृद्ध, स्त्री, पुरुष तसेच अशिक्षित लोक देखील समजू शकत होते. हेच गम्य जाणून महावीरानी आणि बुद्धांनी आपापला उपदेश तत्कालिन देशी भाषेत अर्थात् अर्धमागधी व पाली या भाषेमधून दिला

## आगमांचे महत्त्व–

प्राचीन साहित्य म्हणून आगमांचे महत्त्व फार मोठे आहे महावीरांच्या नतर १००० वर्षांच्या दीर्घकालावधीमध्ये बरेच आगम साहित्य नष्ट झाले होते. दृष्टिवाद नावाचे बारावे अग लुप्त झाले होते. दोगिद्धदसा, दीहदसा, बंधदसा पण्हवागरण यांच्यासह कालिक व उत्कालिक श्रुताचाही बराचसा भाग नष्ट झाला होता.

१. आरिमवयणे सिद्ध देवाण अद्धमागहा वाणी ।

२. भगव च ण अद्धमागहीए भासाए धम्ममाइक्खइ । सा वि य ण अद्धमागही भासा भासिज्जमाणी, तेसिं सव्वेसिं आरियमणारियाण दुप्पयचउप्पयमियपसुपक्खिसरिसिवाण अप्पप्पणो हियसिवसुहभासत्ताए परिणमइ । ( समवायाङ्ग ३४ )

आचारांग सूत्रातील महापरिण्णा अध्याय तसेच महानिशीथ व दहा प्रकीर्णकामधील बराचसा भाग विस्मृत झाला होता. जंबुद्वीपप्रज्ञप्ति, प्रश्नव्याकरण, अन्तकृद्दशा, अनुत्तरोपपातिकभाषा, सूर्यप्रज्ञप्ति ज्ञातृधर्मकथा विपाकसूत्र वगैरे ग्रंथांच्या परिमाणामध्ये बराचसा ऱ्हास झाला होता. तात्पर्य असे की, अनेक सूत्रे नाहीशी झाली होती. वृद्ध संप्रदाय व परंपरा नष्ट झाल्या होत्या. तसेच विविध वाचनांच्यामुळे ग्रंथातून इतकी विविधता आली होती की, त्यातील सूत्रांचे स्पष्टीकरण करणे कठिण होते.

आगम साहित्याला या विविध स्थित्यंतरातून जावे लागले तरी, त्या साहित्याचा जो भाग शिल्लक राहिला आहे तो कोणत्याही प्रकारे उपेक्षणीय नाही. या विशाल साहित्यात प्राचीन जैन परंपरा, आख्यायिका, लोककथा, तत्कालीन रीति-रिवाज, धर्मोपदेशाची पद्धति, आचार-विचार, संयमपालनविषयक पद्धति इत्यादि विविध विषयांची माहिती आली आहे. तसेच या साहित्याचे अध्ययन करण्याने तत्कालीन सामाजिक, धार्मिक, राजनैतिक अवस्थांच्यावर प्रकाश पडतो व जैनधर्म विकासाची तुटलेली शृंखला देखील जोडता येते. आगम साहित्यातील काही ग्रंथांचे अवलोकन केले तरी या विविध गोष्टींविषयी आपणाला माहिती मिळू शकते.

**द्वादशांग–** द्वादशांगाला जैन शास्त्रातील सर्वात प्राचीन अंगग्रंथ मानले आहे. 'दुवालसंगं वा प्रवचन वेदो' प्रमाणे या ग्रंथाला वेद असेही म्हटले आहे. अशा प्रकारची १२ अंगे होती. म्हणूनच त्याला द्वादशांग असे म्हटले जात असे. शिवाय याला गणिपिटक या नावाने देखील संबोधिले आहे. भ. महावीरांच्यानंतर त्यांच्या मुनिसंघाचे प्रमुखपद पहिले गणधर इंद्रभूति गौतम व पाचवे गणधर सुधर्मास्वामी व जंबूस्वामी या तीन आचार्यांच्याकडे क्रमशः आले. हे तिघेही 'केवली' व 'सर्वज्ञ' होते. सर्व मुनीसंघावर त्यांचा केवल अधिकार होता. त्यांची आज्ञा सर्वमान्य मानली जात असे. या तीन आचार्यांचा काळ महावीर निर्वाणानंतर सुमारे ६२ वर्षापर्यंतचा मानला जातो.

जंबूस्वामीच्या निर्वाणानंतर १०० वर्षामध्ये विष्णु, नंदिमित्र, अपराजित, गोवर्धन व भद्रबाहु हे पाच श्रुतकेवली झाले. यांना महावीरांचा सर्व उपदेश पाठ होता. ते सर्व श्रुतज्ञानाचे धारक होते. दिगंबर परंपरेतील पहिल्या चार श्रुतकेवलीविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही. तीर्थंकरांच्या उपदेशाचे संकलन त्यांचे प्रमुख शिष्य गणधर करतात. महावीरांच्या संघात हे कार्य करणारे अकरा गणधर होते. त्यातील पहिले गौतम इंद्रभूति व पाचवे सुधर्मास्वामी यांनी बारा ग्रंथाच्या रूपात हे संकलन केले आहे. त्यांना अंग म्हणतात. गणधरांनी संकलित केलेले वाङमय म्हणूनही या ग्रंथांना 'द्वादशांग गणिपिटक' असे नाव मिळाले. गणधरांनी संकलित केलेले हे ग्रंथ सुमारे एक हजार वर्षापर्यंत केवळ आचार्यांच्या उपदेशाच्या परंपरेने अस्तित्वात राहिले. अक्षरबद्ध पुस्तकांच्या रूपात त्यांची रचना झाली नाही.

द्वादशांग बहुधा महावीरांचे गणधर सुधर्मास्वामीरचित मानले जाते. बाराव्या अंगाचे नाव दृष्टिवाद आहे. त्यात १४ पूर्वांचा समावेश आहे. ते लुप्त झाल्यामुळे आजकाल त्यातील ११ अंगेच उपलब्ध आहेत.

**आगमांचा काल–**

आगमांचा काल निश्चितपणे सांगणे कठिण आहे. महावीरांनी आपल्या गणधरांना आगम सिद्धांताचा उपदेश दिला. परंतु आगमातील कोणता भाग निश्चितरूपाने उपदेशात्मक आहे आणि कोणता नाही हे सांगणे कठिण आहे. तरीसुद्धा त्यातील काही भाग महावीरकालीन मानणे अगदीच अनुचित ठरणार नाही. त्यानंतर मात्र पुष्कळशा मौलिक आधाराच्या साह्याने व देशकाल परिस्थित्यनुसार आगमाचा भाग तयार करण्यात आला असावा. शिवाय आगमाचे आलोचनात्मक परिक्षण न झाल्यामुळे कालविषयक अनुमान करण्याविषयी अधिकच कठीणता उत्पन्न होते. वस्तुतः आगमाचा काल ठरविण्यासाठी प्रत्येक आगमातील प्रतिपाद्य विषय व त्याची वर्णनशैली यांचा तुलनात्मक अभ्यास करणे आवश्यक आहे. आगमाचे अंतिम संकलन इ. स. ५ व्या शतकात

निश्चितपणे करण्यात आले म्हणून आगमाचा अंतिमकाल हाच स्वीकारला पाहिजे. या साहित्यात सामान्यपणे अंग, मूलमूत्र, छेदसूत्र विषय आणि भाषेच्या दृष्टीने प्राचीन आहेत. त्यानंतर, उपांग, प्रकीर्णक नंदी व अनुयोगद्वार यांचा उल्लेख करणे आवश्यक आहे. इ. स. १७ व्या शतकापर्यंत या विविध ग्रंथावर विविध टीकादि लिहिण्यात आल्या.

**श्वेतांबरमान्य आगम साहित्य–**

डॉ. बुटलर यांनी आपल्या यादीनुसार आगमाचे सुव्यवस्थित असे सहा विभाग पाडले आहेत.

१. अंग (१२) आयारंग, सूयगडंग, ठाणांग, समवायांग, वियाहपण्णत्ति (भगवती), नामाधम्मकहाओ, उवासगदसाओ, अंतगडदसाओ, अणुत्तरोववाइयदसाओ, पण्हवागरणाइं, विवागसुय, दिट्ठिवाय (अनुपलब्ध).

२. उपांग (१२) ओववाइय, रायपसेणइय, जीवाभिगम, पन्नवणा, सुरियपण्णत्ति, जंबुद्दीवपण्णत्ति, चन्दपण्णत्ति, निरयावलियाओ, कप्पवडंसियाओ, पुप्फियाओ, पुप्फचूलियाओ, वण्हिदसाओ.

३. प्रकीर्ण (१०) चउसरण, आउरपच्चक्खाण, महापच्चक्खाण, भत्तपरिण्णा, तंदुलवयालिय, संथारग, गच्छायार, गणिविज्जा, देविंदत्थय, मरणसमाही.

४. छेदसूत्र (६) निसहि, महानिसहि, ववहार, दसासुयक्खंध, कप्प, पंचकप्प (जीयकप्प).

५. मूलसूत्र (४) उत्तरज्झयण, दसवेयालिय, आवस्सय, पिंडनिज्जुत्ति.

६. निनावी विभाग (२) नंदि व अणुयोगद्वार.

ही सर्व मिळून आगमांची संख्या जवळपास ४६ इतकी आहे. तसे पाहता या उपर्युक्त सर्व ग्रंथांना श्वेतांबर व दिगंबर आगम म्हणतात. फरक एवढाच की दिगंबर संप्रदायानुसार कालदोषामुळे हे आगम नष्ट झाले. परंतु याउलट श्वेतांबर संप्रदाय या ग्रंथांना मान्यता देतो. या ग्रंथाचे विवेचन पुढीलप्रमाणे करण्यात आले आहे.

१. आचारांग (आयारंग)– जैन आगम साहित्यात आचारांग सूत्राचे स्थान महत्वपूर्ण आहे. त्याला अंगाचे सार असेही म्हटले जाते या ग्रंथाला सामायिक या नावाने देखील संबोधिले आहे. निर्ग्रंथ व निर्ग्रंथिनीच्या आचार-विचाराविषयी माहिती दिली आहे. हा ग्रंथ दोन श्रुतस्कंधात विभागला आहे. पहिल्या श्रुतस्कंधामध्ये अध्ययने व उद्देशके असे उपविभाग असून दुसऱ्या श्रुतस्कंधाची विभागणी चूलिका आणि अध्ययनांमध्ये केली आहे. पहिल्या श्रुतस्कंधात ९ अध्याय व ४४ उद्देशके आहेत. दुसऱ्या स्कंधात तीन चूलिका असून १६ अध्ययने आहेत. भाषा, शैली व विषय या दृष्टीने प्रथम श्रुतस्कंध अधिक प्राचीन वाटतो. यातील बरीचशी रचना गद्यात्मक असून मधूनमधून पद्याचा वापर केला आहे. महापरिज्ञा नावाच्या सातव्या अध्यायाचा पाठ मात्र दुर्मिळ आहे अर्धमागधी प्राकृत भाषेचे स्वरूप समजण्याच्या दृष्टीने हा ग्रंथ अत्यंत महत्वाचा आहे. 'सुत्ता अमुणी, सया मुणीणो जागरति' सारख्या अनेक महत्वपूर्ण वाक्यांची रचना वरचेवर या ग्रंथात करण्यात आली आहे. गतप्रत्यागत सूत्रांचा भरणा तर या ग्रंथात खूप आढळतो. उपधान नावाच्या ९ अध्यायामध्ये महावीराच्या तपश्चर्येचे अत्यंत मार्मिक असे वर्णन केले आहे. दुसऱ्या श्रुतस्कंधात श्रमणांचा भिक्षाविधि, आहार पाण शुद्धि, शय्या ग्रहण, विहार, चातुर्मास, भाषा, वस्त्र, पात्र, उपकरण व्रत, व्रत-भावना इत्यादिसह विविध नियम-उपनियमांचे वर्णन या ग्रंथात केले आहे.

२. सूत्रकृतांग (सूयगडंग)– सूत्रकृतांगाला सूतगड, सुत्तकड, सूयगडं नावांनी ओळखले जाते. स्वसमय आणि परसमय यातील भेद या ग्रंथात सांगितल्यामुळे त्याला सूत्रकृतांग नावाने ओळखले जाते. या ग्रंथाची विभागणी दोन श्रुतस्कंधात झाली असून अनुक्रमे त्यात १६ व ७ इतकी अध्ययने आहेत. पहिला श्रुतस्कंध बहुधा पद्यमय असून दुसरा गद्य व पद्यमय आहे. या ग्रंथात विविध छंदाचा उपयोग केला आहे. यामध्ये जैन दर्शनाशिवाय

क्रियावाद, अक्रियावाद, नियतिवाद, अज्ञानवाद, जगत्कर्तृत्ववाद इत्यादि गोष्टीचे विवेचन केले आहे. यामध्ये परिषहजय, नरकातील दुःख, उत्तम साधूचे लक्षण, श्रमण, भिक्षुक, निर्ग्रंथ इत्यादि शब्दाची उत्पत्ति उत्तम उदाहरणानी व रूपकानी स्पष्ट केली आहे. दुसऱ्या श्रुतस्कंधामध्ये जीव-शरीराची एकरूपता, ईश्वर कर्तृत्व व नियतिवाद इत्यादि मतांचे खंडन केले आहे. पाप-पुण्यासंबंधी विवेचन केले आहे. गोशालक, शाक्यभिक्षु इत्यादि तपस्वींच्या बरोबर झालेला वाद या ग्रंथात एकत्रित करण्यात आला आहे. प्राचीनमते व वाद यांच्या अभ्यासाच्या दृष्टीने हा ग्रंथ अत्यंत महत्वाचा आहे. भाषेच्या दृष्टीनेही हा ग्रंथ बराच प्राचीन ठरतो.

**३. स्थानांग (ठाणांग)**– या ग्रंथात इतर आगम ग्रंथाप्रमाणे उपदेश दिला नसून जैन सिद्धांताप्रमाणे वस्तूंची संख्या दिली आहे. या ग्रंथातील सूत्रांची संख्या एक हजारापेक्षा जास्त असून या ग्रंथाची रचना वेगळीच आहे. त्यात जीवक्रिया व अजीवक्रिया यांचा उल्लेख केला असून योग्य ठिकाणी ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद या तीन वेदाचा उल्लेख केला आहे. धर्म, अर्थ, काम हे कथांचे तीन प्रकार सांगितले आहेत. त्याचप्रमाणे वृक्षभेद, पुरुषभेद, धर्मभेद देखील कथन केले आहेत. आजीविकांच्या तपाचे प्रकार कथन केले आहेत गुरु व शिष्यातील संबंध सांगितला आहे. संगीत शास्त्राचे संपूर्ण निरूपण करून बोलीभाषा संस्कृत व प्राकृत मानली आहे. या श्रुतांगामध्ये विविध विषयाचे ज्ञान आपणाला मिळू शकते. म्हणूनच हा ग्रंथ एक महत्वाचा ग्रंथ मानला जातो.

**४. समवायांग**– या ग्रंथात एका वस्तूपासून कोटी संख्येपर्यंतच्या वस्तूचा संग्रह (समवाय) केला आहे. बारा अंग व चौदा पूर्वांगातील विषयाचे वर्णन तसेच ब्राह्मी इत्यादि १८ लिपीचा व नंदिसूत्राचा या ग्रंथात उल्लेख करण्यात आला आहे. यात २७५ इतकी सूत्रसंख्या आहे. वस्तूंच्या भेद-प्रभेदाचे वर्णन केले आहे. आत्मा एक आहे, लोक एक आहे, धर्म व अधर्म एकेक आहेत. अशा क्रमाने २, ३, ४ अशी वस्तूंची गणना न करता १७८ व्या सूत्रामध्ये ती १०० पर्यंत, १९१ व्या सूत्रात १०,००० पर्यंत तर २०८ व्या सूत्रात ती संख्या दश लक्षापर्यंत जाऊन पोहचली आहे. या ग्रंथात १२ अंग ग्रंथातील विषयासंबंधी संक्षिप्त परिचय दिला आहे. पुढे तीर्थंकर, चक्रवर्ती, बलदेव, वासुदेव, प्रतिवासुदेव याच्याविषयी विविध माहिती देऊन फक्त ५४ शलाका पुरुष असल्याचीच माहिती दिली आहे. सूत्र नं. १५० मध्ये गणित, रूप, नाटच, संगीत इत्यादि ७२ कलेची नावे दिली आहेत. जैन सिद्धांत, इतिहास व परंपरा यांच्या दृष्टीने हा ग्रंथ महत्वाचा आहे

**५. व्याख्याप्रज्ञप्ति (वियाहपण्णत्ति)**– या ग्रंथाला भगवतीसूत्र या दुसऱ्या नावाने देखील ओळखले जाते. जीवादि पदार्थांच्या व्याख्याचे स्पष्टीकरण या ग्रंथात असल्यामुळे या ग्रंथाला व्याख्याप्रज्ञप्ति असे म्हटले आहे. यात गौतम गणधरानी विविध प्रश्न विचारले असून श्रमण भ. महावीर यानी त्याची उत्तरे दिली आहेत या ग्रंथात एकूण ४१ शतके असून प्रत्येक शतकात उद्देशके आहेत. या ग्रंथात आलेले मंखलिगोशालाचे चरित्र उल्लेखनीय आहे. या संपूर्ण ग्रंथाचे विभाजन सूत्रक्रमाने देखील केले असून सूत्र संख्या ८६७ आहे. अन्य श्रुतांगापेक्षा हा ग्रंथ फार विशाल आहे. टीकाकार अभयदेवाने या ग्रंथातील प्रश्नोत्तरांची संख्या ३६००० इतकी दिली आहे. प्रश्नोत्तरांचे स्वरूप काही ठिकाणी अत्यंत लघुस्वरूपी आहे. उदा.– ज्ञानाचे फळ काय ? विज्ञान; विज्ञानाचे फळ कोणते ? प्रत्याख्यान; प्रत्याख्यानाचे फळ काय ? संयम; इत्यादि. मंखलिगोशालाचे चरित्र सांगण्यासाठी २५ वे शतक संपूर्ण खर्ची घातले आहे. या ग्रथातील काळाच्या घटना, व्यक्ति यांचे इतके विस्तृत विवेचन केले आहे की, या रचनेला 'जैन कोष' असे म्हटले तर अयोग्य ठरणार नाही. महावीराच्या जीवनाशिवाय त्याचे शिष्य, श्रमण, अनुयायी यांचीही माहिती मिळते ऐतिहासिक दृष्टीने ही माहिती अत्यत उपयुक्त ठरते. वैशाली येथील महाशिलाकंटक व रथमुसल संग्राम या दोन महायुद्धाचे वर्णन राजकीय व ऐतिहासिक दृष्टीने अपूर्व आहे. या रचनेत वनस्पती शास्त्राविषयी देखील माहिती दिली आहे.

**६. ज्ञातृधर्मकथा (नायाधम्मकहाओ)**– याची णाहधम्मकहा व णाणधम्मकहा अशी दुसरी नावे देखील आढळतात. या ग्रंथात उदाहरणासहित धर्मकथांचे वर्णन मिळते. म्हणून याला नामाधम्मकहाओ असे नाव दिले

आहे. ज्ञातृधर्मकथा जैन आगमातील एक प्राचीन ग्रंथ आहे. याची वर्णनशैली एका विशिष्ट प्रकारची आहे. उदाहरणे, दृष्टांत व लोककथा याच्याद्वारे प्रभावशाली व मनोरंजक असे वर्णन केले आहे. मात्र या ग्रंथात पुनरुक्तीचा दोष जास्त प्रमाणात आढळतो. या ग्रंथाचे दोन श्रुतस्कंध असून पहिल्यात १९ अध्याय आहेत तर दुसऱ्यात दहा वर्ग असून प्रतिवर्गामध्ये अनेक अध्ययने आहेत. या रचनेत मेघकुमारचे सुंदर कथानक दिले असून तो मुनिधर्मामध्ये कसा स्थिर होतो याचे विवेचन केले आहे. त्याचप्रमाणे भोपळयाचा व कासवाचा दृष्टांत देऊन मानवी जीवनातील महान व गूढ तत्वांचे स्पष्टीकरण सहज व सुलभपणे केले आहे. माकंदिपुत्र कथा व रोहणीज्ञात हे तर अति उत्कृष्टपणे मांडले आहेत. दुसऱ्या स्कंधात प्रामुख्याने स्वर्गीय स्त्रियाची व राजकुमारांची माहिती दिली आहे. भाषाशैली व वर्णनशैली या दृष्टीनेही हा ग्रंथ महत्वाचा आहे. यातील विविध प्रकारच्या कथामधून शेवटी जैन धर्माचे प्रभुत्व दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

**७. उपासकाध्ययन (उवासगदसाओ)**– या ग्रंथात नावाप्रमाणेच १० अध्याय असून त्यातून महावीरांच्या १० उपासकांच्या आचारांचे वर्णन केले आहे. म्हणूनच त्याला उवासगदसाओ असे म्हटले आहे. परंतु या ग्रंथातील वर्णनामध्ये विविधता फारच कमी आहे. अर्थातच या ग्रंथात देखील पुनरुक्तीचा दोष आढळतो. या ग्रंथात क्रमशः आनंद, कामदेव, चुलनीप्रिय, सुरादेव, चुल्लशतक, कुंडकोलिम, सद्दालपुत्र, महाशतक, नंदिनीप्रिय व सालीहीप्रिय या दहा उपासकाच्या कथा आहेत. या विविध कथांच्या साह्याने जैन गृहस्थांचे धार्मिक नियम सांगितले आहेत. उपासकाना धर्मपालन करीत असताना कोणकोणत्या संकटाना तोंड द्यावे लागते याचे सुंदर विवेचन केले आहे. पहिल्या आनंद उपासकाच्या कथेतच पाच अणुव्रते, तीन गुणव्रते व चार शिक्षाव्रते अशा १२ व्रतांचे सूक्ष्मपणे विवेचन केले असून त्यांच्या अतिचारांचे स्वरूप देखील विस्ताराने सांगितले आहे. मंखलिगोशालकाच्या नियतिवादाचेही प्ररूपण या रचनेत केले आहे. या ग्रंथातील शेवटच्या बारा गाथामध्ये वरील दहा कथानकाचा सारांशाने उल्लेख केला आहे.

**८. अंतकृद्दशा (अंतगडदसाओ)**– संसाराचा अंत करणाऱ्या केवलींचे कथन या रचनेतून केल्यामुळे याला अंतकृद्दशा असे म्हटले आहे. यात अर्हंताच्या कथा आहेत. या श्रुतांगात ८ वर्ग असून त्यात अनेक अध्ययने आहेत. यात कोणतेही कथानक पूर्णत्वाने सांगितले गेले नाही. अपूर्ण भाग दुसरीकडील वर्णनाद्वारे पुरा करून घेण्याची सूचना मात्र दिली आहे. या रचनेत स्वप्नदर्शन, पुत्रजन्म, बालपण, शिक्षण, यौवन पाणिग्रहण, विवाह, प्रसाद, सुखोपभोग वगैरे गोष्टीचे वर्णन केले असून ते अपुरे आहे. हा ग्रंथ उवासगदसाओप्रमाणे १० अध्ययनांचा असावा, परंतु पुढे तो विकसित होऊन त्याला सध्याचे स्वरूप प्राप्त झाले असावे.

**९. अनुत्तररोपपातिकदशा (अणुत्तरोवाइयदसाओ)**– अनुत्तर विमानात उत्पन्न होणाऱ्या विशिष्ट पुरुषांचे वर्णन या अंगात आल्यामुळे त्याला अनुत्तररोपपातिक असे म्हटले आहे. उपासकदशा अथवा अंतकृद्दशा रचनेप्रमाणे यात १० अध्याय असावेत. परंतु आता केवळ तीन वर्गच शिल्लक राहिले आहेत. यात अनुक्रमे १०, १३ व १० अशी अध्ययने आहेत. चरित्रांचा उल्लेख केवळ सूचनारूपानेच आला आहे. एकूण ३२ अनुत्तरविमानगामी पुरुषापैकी पहिल्या तेवीसांचा जन्म श्रेणिक व त्याच्या धारिणी, चेलना व नंदा या तीन राण्यांच्या पोटी झाला. धन्यकुमाराची कठोर तपश्चर्या त्यामुळे त्याच्या शरीराची झालेली क्षीणता यासंबंधीचे मार्मिक विवेचन पहिल्या अध्ययनात आले आहे.

**१०. प्रश्नव्याकरण (पण्ह-वागरण)**– याला पण्हवागरणदसा तथा वागरणदसा अशी दुसरी दोन नावे दिली जातात. प्रश्नांची उत्तरे (वागरण) या रूपाने असल्यामुळे याला पण्हवागरण असे म्हटले आहे. स्थानांग व नंदिसूत्रात या आगमग्रंथाचा उल्लेख केलेला आढळतो. या श्रुतांगाचे दोन खंड आहेत. पहिल्या खंडामध्ये पाच आस्रवाद्वारे तर दुसऱ्यात पाच संवरद्वारांचे वर्णन आहे. या ग्रंथात पाच व्रतांचे वर्णन व्यवस्थितरूपाने दिलेले

आढळते. विषयवर्णनावरून या ग्रंथाच्या नावाविषयी विशेष स्पष्टीकरण मिळत नाही. मूलतः यामध्ये स्वसमय व परसमय यांना समंत अशा नाना विद्या-मंत्र इत्यादींचे प्रश्नोत्तररूपाने विवेचन केले होते. परंतु असे विषय सध्या या ग्रंथामध्ये आढळत नाहीत.

**११. विपाकसूत्र ( विवागसुयं )–** पाप आणि पुण्य यांच्या विपाकाचे वर्णन प्रस्तुत ग्रंथात असल्याने त्याला विपाकसूत्र असे म्हटले आहे. स्थानांगसूत्रात याला 'कम्मविवायदसाओ' असे म्हटले आहे. स्थानांगसूत्र, अंतगडदसाओ याप्रमाणे प्रस्तुत ग्रंथात १० अध्याय असावयास हवे होते. परंतु त्यात २० अध्याय आहेत. यात प्रमुख दोन श्रुतस्कंध असून पहिला दुःख विपाकासंबंधी तर दुसरा दुःखविपाकासंबंधी आहे. शुभाशुभ कर्मानुसार जीवाला बरे-वाईट फळ कसे मिळते याचे विवेचन यात केले आहे. कर्मसिद्धांताच्या दृष्टीने हा ग्रंथ उपयोगी आहे. यात विविध रोग, त्यावरील औषधोपचार, गरोदर स्त्रियांचे डोहाळे, वेश्यांची प्रलोभने व मांसादि विषयींची वर्णने आहेत. प्राचीनकालच्या रूढी, अंधविश्वास व परंपरा याविषयीची माहिती या ग्रंथातून मिळते.

**१२. दृष्टिवाद ( दिट्ठिवाय )–** दृष्टिवाद द्वादशांगातील १२ वे आणि शेवटचे अंग आहे. विभिन्न मतमतांतराचे वर्णन यात असल्यामुळे त्याला दृष्टिवाद असे म्हटले आहे. विशेषनिशीथचूर्णिप्रमाणे या सूत्रात द्रव्यानुयोग, चरणानुयोग, धर्मानुयोग आणि गणितानुयोग यांचे कथन यात असल्यामुळे त्याला उत्तम-श्रुत असे म्हटले आहे. हा श्रुतांग मात्र सध्या उपलब्ध नाही. समवायांगाला अनुसरून याचे पाच विभाग होतात– १. परिकर्म, २. सूत्र, ३. पूर्वगत, ४. अनुयोग, ५. चूलिका. या पाचही विभागांचे पुनः नानाविध भेद असल्याचे उल्लेख मिळतात. या ग्रंथात लिपिविज्ञान व गणित त्याचप्रमाणे नय व चतुर्नय यांचे विवेचन असावे. यात चक्रवर्ती, बलदेव, वासुदेव यांच्या चरित्रांचाही समावेश केला गेला असावा. म्हणूनच याला प्राचीन जैनपुराण म्हणणे ही शक्य आहे. दिगंबर जैन परंपरेनुसार चूलिकांचे पाच भेद सांगितले आहेत. जलगत, स्थलगत, मायागत, रूपगत व आकाशगत या नावावरून असे वाटते की, त्यातील विषय इंद्रजाल, मंत्रतंत्रात्मक असावा. परंतु जैनधर्माच्या तात्त्विक व समीक्षात्मक स्वरूपापुढे तो फार काळ टिकून राहिला असावा.

**१२ उपांग ग्रंथ–**

**१. औपपातिक ( ओववाइय )–** देव नारकी यांचे जन्म ( उपपात ) अथवा गमन या उपांगात वर्णिले आहे. म्हणून याला औपपातिक असे म्हटले आहे. यात विविध विचार, भावना व मृत जीवांचा पुनर्जन्म कसा होतो याचे स्पष्टीकरण उदाहरणासहित केले आहे. या ग्रंथात नगर, चैत्य, राजे व राणी इत्यादिकांची वर्णने पूर्णपणे पहावयास मिळतात हीच या ग्रंथाची विशेषता आहे. अशा प्रकारची वर्णने बहुधा इतर ग्रंथातून गाळून टाकण्यात आली आहेत. महावीरांनी गौतमगणधरांच्या प्रश्नांची उत्तरे देत असताना दंडाचे प्रकार, विधवा, व्रती, साधु, तापसी, श्रमण, ब्राह्मण, क्षत्रिय, परिव्राजक इत्यादींचेही विवेचन केले आहे. याच ग्रंथात जन्मसंस्कार व ७२ कलांचा देखील उल्लेख केला आहे. सर्वात शेवटी सिद्धशिलेचे वर्णन केले आहे.

**२. राय-पसेणियं ( राजप्रश्नीय )–** राजप्रश्नीय रचनेची गणना प्राचीन आगम साहित्यात केली जाते. याचे दोन भाग असून त्यात २१७ सूत्र आहेत. मलयगिरीने यावर टीका लिहिली आहे. यातील मुख्य विषय म्हणजे राजा पएसीने विचारलेल्या प्रश्नांची केशी मुनीने दिलेली उत्तरे हा आहे. या ग्रंथाचा नायक इतिहास प्रसिद्ध कोशलचा प्रसेनजित असावा. ग्रंथाच्या पहिल्या भागामध्ये सूर्याभदेवाचे वर्णन आहे, दुसऱ्यामध्ये त्याच्याच पूर्वजन्माचा वृत्तांत आहे. आत्म्याचे अस्तित्व, त्याचे स्वरूप भौतिकवाद याविषयीचे नानाविध प्रश्न राजाकडून केशीला विचारण्यात आले आहेत. केशी मुनीच्या उपदेशाने तो शेवटी सम्यग्दृष्टि बनला व त्या प्रभावाने दुसऱ्या जन्मामध्ये महावैभवशाली सूर्याभदेव झाला. हा ग्रंथ जडवाद व अध्यात्मवाद यांच्या दृष्टीने महत्त्वाचा असून त्यातील रचनाशैली देखील सुंदर आहे.

३. जीवाजीवाभिगम— नंदिसूत्रात या ग्रंथाची गणना उत्कालिक सूत्रात केली आहे. यात गौतम गणधर व भ. महावीर यांच्या प्रश्नोत्तररूपाने जीव व अजीव यांच्या भेद प्रभेदाविषयी चर्चा केली आहे. या उपांगात २० उद्देश होते. परंतु सध्या उपलब्ध प्रतीमध्ये ९ प्रकरणे असून त्यात २७२ सूत्रे आहेत. तिसऱ्या प्रकरणात द्वीप व सागरांचे वर्णन केले आहे. प्रसंगानुरूप लोकोत्सव, अलंकार, मिष्टान्न इत्यादींची वर्णने आहेत. सामाजिक जीवनाच्या दृष्टीने हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

४. पण्णवणा (प्रज्ञापना)— या ग्रंथाचा कर्ता वाचकवंशीय पूर्वधारी आर्यश्याम ( इ. स. २ रे शतक ) मानला जातो. या चौथ्या उपांगात ३६ परिच्छेद आहेत. त्यामध्ये यथाक्रम प्रज्ञापना, स्थान, बहुवक्तव्य, स्थिति त्याचप्रमाणे कषाय, लेश्या, कर्म, उपयोग, वेदना, समुद्घात इत्यादि जीवासंबंधी चर्चा आहे. जैन दर्शनाच्या दृष्टीने हा ग्रंथ अतिउपयुक्त असा आहे. अंगग्रंथात जे स्थान भगवतीसूत्राला आहे तेच स्थान उपांगात प्रज्ञापना ग्रंथाला आहे. या उपांगाला जैन सिद्धांताचा ज्ञानकोष म्हटले तरी अतिशयोक्ति ठरणार नाही.

५. सूर्यप्रज्ञप्ति (सूरियपन्नत्ति)— या ग्रंथात सूर्य, चंद्र आणि नक्षत्र याच्या गतीचे सविस्तर वर्णन केले आहे. या उपांगात २० पाहुड व १०८ इतकी सूत्रे आहेत. भद्रबाहूने या ग्रंथावर निर्युक्ति लिहिली होती. पण ती सध्या उपलब्ध नाही. मलयगिरीने देखील या ग्रंथावर टीका लिहिली आहे. प्राचीन भारतीय ज्योतिषशास्त्राचा अभ्यास करण्याच्या दृष्टीने हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

६ जंबूद्वीप–पन्नत्ति (जंबूदीवपण्णत्ति)— या उपांगाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन विभाग आहेत. पूर्वार्धातील पहिल्या चार परिच्छेदामधून जंबूद्वीप व भरतक्षेत्र आणि त्यातील पर्वत, नद्या इत्यादींचे वर्णन केले असून त्याचप्रमाणे उत्सर्पिणी–अवसर्पिणी कालविभाग आणि कुलकर, तीर्थंकर, चक्रवर्ती यासंबंधीची वर्णने आहेत. मलयगिरीने यावर टीका लिहिली. पण ती अस्तित्वात नाही. या टीकेशिवाय दुसऱ्या अनेक टीका प्रस्तुत ग्रंथावर लिहिल्या गेल्या आहेत.

७. चंद्रप्रज्ञप्ति (चंदपण्णत्ति)— चंद्रप्रज्ञप्तितीतील विषय सूर्यप्रज्ञप्तिला अगदी मिळताजुळता असा आहे. यात २० पाहुड असून चंद्राचे परिभ्रमण अधिक विस्ताराने सांगितले आहे. हे वर्णन इंद्रभूति गौतम व महावीर यांच्या प्रश्नोत्तर रूपाने सांगितले गेले आहे. मधून मधून अन्य मान्यतांचा उल्लेख केला आहे. यावर मलयगिरीने टीका लिहिली आहे. श्री अमोलक यानी या ग्रंथाचा हिंदी अनुवाद केला आहे. स्थानांगामध्ये या ग्रंथाला अंगबाह्य श्रुत असे म्हटले आहे.

८. कल्पिका (कप्पिया)— या ग्रंथात पाच उपांगे आहेत. १. निरयावलिया २. कप्पवडंसिया ३. पुप्फिया ४. पुप्फचुलिका ५. वण्हिदसा. श्री चंद्रसूरीने या ग्रंथावर टीका लिहिली आहे. या उपांगात आठ अध्ययने आहेत. यामध्ये कुणिक अज्ञात शत्रूने आपला पिता श्रेणिक बिंबिसार यास तुरुंगात टाकणे, श्रेणिकाची आत्महत्या, कुणिक आणि वैशाली नरेश चेटक याच्यातील युद्ध इत्यादि गोष्टींचे वर्णन केले आहे. मगधाच्या प्राचीन इतिहासाची माहिती या ग्रंथाच्या साह्याने आपणास मिळू शकते.

९. कल्पावतंसिका (कप्पावंडसियाओ)— या ९ व्या उपांगामध्ये १० अध्ययने आहेत. विमानवासी देवाचे वर्णन यात आहे. आपल्या सत्कर्मामुळे स्वर्गाला गेलेल्या श्रेणिकाच्या दहा नातवांच्या कथा यात आहेत.

१०. पुष्पिका (पुप्फिया)— या उपांगात १० अध्ययने आहेत. पहिल्या व दुसऱ्या अध्ययनात चंद्र व सूर्याचे वर्णन आहे. तिसऱ्या अध्ययनात सोमिल ब्राह्मणाची कथा आहे. या ब्राह्मणाने वानप्रस्थ तपस्याची दीक्षा घेतली होती. तो आपले बाहू वर करून व मुख सूर्याकडे करून तप करीत असे. पुढे चौथ्या अध्यायात सुभद्रा आर्यिकेची कथा सांगितली आहे विविध प्रकारच्या कथारूपाने हे उपांग अधिक आकर्षक बनविण्याचा प्रयत्न केला आहे.

११. पुष्पचूला (पुप्फचूला)– यात श्री, ह्री, धृति इत्यादि १० अध्ययन आहेत. यामध्ये धर्मसाधना करुन स्वर्गाला गेलेल्या व तेथे देवता बनल्यावर आपापल्या स्वर्गीय विमानासह या मर्त्यभूमीवर भ. महावीरांच्या वंदनेसाठी आलेल्या स्त्री-पुरुषांच्या कथा आहेत.

१२. वृष्णिदशा (वण्हिदसाओ)– या शेवटच्या बाराव्या उपांगामध्ये बारा अध्ययने आहेत. त्यामध्ये द्वारवतीचा राजा कृष्ण वसुदेव, अरिष्टनेमि या बावीसाव्या तीर्थंकराचा रैवतक पर्वतावरील विहार आणि वृष्णिवंशीय १२ राजकुमाराची मुनिदीक्षा यासंबंधीचे वर्णन केले आहे. या ग्रंथाचे मूलतः नाव अंधकवृष्णिदशा असे असावे.

दहा प्रकीर्णक ग्रंथ–

भाष्यकारांच्या मते तीर्थंकरानी जो उपदेश दिला, त्या उपदेशाद्वारे श्रमणानी जे निरनिराळे ग्रंथ लिहिले त्या ग्रंथाना प्रकीर्णके असे म्हणतात. महावीर कालीन प्रकीर्णकांची संख्या १४००० इतकी सांगितली आहे. वल्लभी परिषदेमध्ये आगम म्हणून ज्याचा स्वीकार करण्यात आला आहे त्या प्रकीर्णकांची संख्या दहा आहे. १. चतुःशरण (चउसरण) २. आतुरप्रत्याख्यान (आउरपच्चक्खाण) ३. महाप्रत्याख्यान (महापच्चक्खाण) ४. भक्तपरिज्ञा (भत्तपइण्णा) ५. तंदुलवैचारिक (तंदुलवेयालिय) ६. संस्तारक (संथारग) ७. गच्छाचार (गच्छायार) ८. गणिविद्या (गणिविज्जा) ९. देवेंद्रस्तव (देविंदथव) १०. मरणसमाधि (मरणसमाहि). यातील बहुतेक सर्व ग्रंथ पद्यमय आहेत.

१. चतुःशरण– याला 'कुसलाणुबंधि' असेही म्हटले आहे. या ग्रंथात एकूण ६३ गाथा आहेत. या ग्रंथात प्रारंभी सहा आवश्यक क्रियांचा उल्लेख करून नंतर अरहंत, सिद्ध, साधू व जिनधर्म या चार तत्वाना शरणस्थान मानून पाप व पुण्य यांच्याविषयी अनुक्रमे निंदा व अनुराग भावना प्रकट केली आहे. ही ग्रंथरचना वीरभद्राने केली असल्याचे मानले जाते. या ग्रंथावर भुवनतुंग याची टीका आहे.

२. आतुरप्रत्याख्यान– याला वृहदातुरप्रत्याख्यान असे दुसरे नाव आहे. यात ७० गाथा आहेत. १० गाथेनंतर काही भाग गद्य आहे. यात बालमरण व पंडितमरण यातील फरक स्पष्ट केला असून प्रत्याख्यान अर्थात परित्यागालाच मोक्षप्राप्तीचे साधन म्हटले आहे. याचा कर्ता वीरभद्र असावा. या ग्रंथावर भुवनतुंगाची टीका आणि गुणरत्नाची अवचूरि आहे.

३. महाप्रत्याख्यान– यात १४२ गाथा असून त्यातील काही अनुष्टुप छंदात आहेत. यात दुराचारीची निंदा केली आहे. शिवाय एकत्व भावना, मायेचा त्याग, संसार परिभ्रमण, पंडितमरण, पुद्गलापासून अतृप्ति, पाच महाव्रते, दुष्कृत निंदा, वैराग्याचे कारण, आराधना इत्यादि विषयांचे विवेचन प्रस्तुत ग्रंथात केले आहे. प्रत्याख्यान पालनामुळे सिद्धि प्राप्त होते असे कथन केले आहे.

४. भक्तपरिज्ञा– यात एकूण १७२ गाथा आहेत. भक्तपरिज्ञा, इंगिनी व पादोपगमन या समाधि-मरणाच्या भेदाचे स्वरूप सांगितले आहे. दर्शन हे प्रमुख सांगितले असून, दर्शनापासून भ्रष्ट होणाऱ्याला निर्वाणाची प्राप्ति होत नाही. अत्यंत घोर कष्टाच्या साह्याने सिद्धि मिळविणाऱ्याच्या बाबतीत अनेक दृष्टान्त दिले आहेत. मनाला माकडाची उपमा दिली आहे. माकड ज्याप्रमाणे क्षणभर देखील शांतपणे बसत नाही, त्याप्रमाणे मन देखील सदैव कोणत्या ना कोणत्या विचारात गढून गेलेले दिसते. स्त्रियाना नागीनीची उपमा देऊन तिला अविश्वासाची भूमि, शोकाची नदी, पापाची गुंफा, कपटाची कुटी व दुःखाची खाण या विविध विशेषणानी संबोधिले आहे. या प्रकीर्णकाचा कर्ता वीरभद्रच असल्याचे मानले जाते.

५. तंदुलवेचारिक (तंदुलवैचारिक)– या ग्रंथात १२३ गाथा असून त्या गद्य-पद्यमिश्रित आहेत. मधून मधून सूत्रांचा वापर केलेला आहे. यामध्ये जीवाची गर्भावस्था, आहार-विधि, बालजीवन, क्रीडा इत्यादि जीवनावस्थांचे वर्णन महावीर व गौतम यांच्यातील प्रश्नोत्तर रूपाने दिले आहे. योग्य प्रसंगी शरीरातील अंगोपांग, त्यांची अशुचिता, स्त्रियांची प्रकृति त्यापासून निर्माण होणारे धोके यांचे सविस्तर वर्णन केले आहे. यातील साहित्यिक भाषा संस्कृत काव्यग्रंथाचे स्मरण करविते. पुरुषाच्या सदाचरणाचा घात करणारी स्त्री आहे म्हणून तिला अनेक विविध प्रकारची वाईट विशेषणे दिली आहेत. विजय विमल यांनी या ग्रंथावर टीका लिहिली आहे.

६. संस्तारक– यात एकूण १२३ गाथा असून अंतसमयी मुनींनी ग्रहण करावयाच्या तृणासनाचा विधि यात सांगितला आहे. त्या तृणासनावर अविचल स्थिर राहून पंडितमरण साधल्याने मुनी सद्‌गतीला जातो. सुबंधु, चाणक्य इत्यादि नावांचा उल्लेख अशा प्रसंगाच्या दृष्टांतासाठी केला आहे.

७. गच्छाचार– यात एकूण १३७ गाथा असून त्यातील काही अनुष्टुप छंदात आहेत तर काही आर्या छंदात आहेत. महानिशीथ बृहत्कल्प व व्यवहार सूत्र यांच्या साह्याने साधू-साध्वींच्या हितार्थ या ग्रंथाची रचना करण्यात आली आहे. आर्यिकांचा संघातील निवास, संघविनय व संघातील नियम, उपनियम पालन करण्याचा विधि समजावून सांगितला आहे. आपापल्या कामवासनेच्या जागृतीपासून स्वतःचा बचाव करण्यावर अधिक भर दिला आहे. म्हणूनच साधूला बाला, वृद्धा, दुहिता, भगिनी यांच्या शरीराला स्पर्श करण्याचा देखील निषेध करण्यात आला आहे.

८. गणिविद्या– या ग्रंथात ८६ गाथा असून त्यात दिवस, तिथि, नक्षत्र, योग, करण, मुहूर्त इत्यादि गोष्टींचा ज्योतिष पद्धतीने विचार केला आहे. यामध्ये 'होरा' शब्द देखील आला आहे.

९. देवेन्द्रस्तव– या प्रकीर्णकात एकूण ३०७ गाथा आहेत. यात कोणी श्रावक चोवीस तीर्थंकराना वंदन करून महावीरांचे स्तवन केले आहे. या प्रसंगी श्रावक पत्नी पतीला इंद्र इत्यादि विषयांची माहिती विचारते. या प्रश्नाचे उत्तर म्हणून श्रावकाने कल्प व कल्पातीत देवांचे वर्णन केले आहे. या प्रकीर्णकाचे कर्ते वीरभद्र मानले जातात.

१०. मरणसमाधि– मरणसमाधि हे प्रकीर्णक सर्व प्रकीर्णकात मोठे आहे. यात ६६३ गाथा आहेत. त्यातून आराधना, आराधक, आलोचन, संलेखन, क्षमापण इत्यादि १४ प्रकारे समाधिमरणाचा विधि समजावून सांगितला आहे. परिषह सहन कसे करावेत, हे विविध प्रकारच्या दृष्टांतानी कथन केले आहे. शेवटी १२ भावनांचे स्पष्टीकरण केले आहे. या सर्व दहा प्रकीर्णकांचा विचार केला तर आपणाला असे दिसून येते की, मुख्यतः मुनींना त्यांच्या अंतकाळी, मन धर्मभावनेत स्थिर ठेवून आकुलतारहित देहविसर्जन करण्याचा विधि मार्ग स्पष्ट करून सांगितला आहे.

या दहा प्रकीर्णकाशिवाय इतर अनेक प्रकीर्णकांची रचना झाली. यात ऋषिभाषित, तीर्थोद्‌गार, अजीवकल्प, सिद्धपाहुड, आराधनापताका, द्विपसागरप्रज्ञप्ति, जोतिषकरंडक, अंगविद्या, योनिपाहुड इत्यादि प्रमुख प्रकीर्णके आहेत.

सहा छेदसूत्र–

१. निशीथ (णिसीह) २. महानिशीथ (महाणिसीह) ३. व्यवहार (विवहार) ४. दशाश्रुतस्कंध (दससुयक्खंद) ५. कप्प (बृहत्कल्प) ६. पचकल्प (पंचकप्प) ही सहा छेदसूत्रे आहेत.

छेदसूत्रांच्यामध्ये जैन आगमाचा अतिप्राचीन भाग असल्यामुळे ती अत्यंत महत्वाची आहेत. या छेदसूत्र ग्रंथातून निर्ग्रंथ व निर्ग्रंथिका यांच्या प्रायश्चित्तांच्या विधीविषयी माहिती दिली आहे. चरित्र शुद्धता राखण्याविषयी






यात कथन केले असल्यामुळे याला उत्तमश्रुत असे म्हटले आहे. जैन भिक्षूच्या आचार-विचार व नियमाविषयीचे विवेचन देखील प्रस्तुत सूत्रातून केले आहे. या छेदसूत्राची तुलना बौद्धांच्या विनयपिटकावरोबर केली जाते. छेदसूत्रांच्या अतिगंभीर ज्ञानप्राप्तीशिवाय कोणतेही आचार्य आपल्या संप्रदायासह तथा शिष्यासह गावोगाव विहार करण्यासाठी बाहेर पडू शकत नाहीत. निशीथ भाष्यकर्त्याने छेदसूत्रांचे रहस्य सांगताना म्हटले आहे– 'ज्याप्रमाणे मातीच्या कच्च्या घड्यात ठेवलेले पाणी घड्याला नष्ट करते त्याचप्रमाणे या सूत्रामधून प्रतिपादित सिद्धाताचे रहस्य, अल्पबुद्धि मनुष्याच्या नाशाला कारणीभूत होते. छेदसूत्र ग्रंथातील शैली संक्षिप्त आहे. सहा छेदसूत्रांची माहिती पुढीलप्रमाणे आहे–

**१. निशीथ–** सर्व छेदसूत्रात निशीथाचे स्थान सर्वोच्च असून सर्वात मोठे आहे. याला आचारांगाचेच एक अंग मानले आहे. याला निशीथचूला अध्ययन तथा आचारप्रकल्प या नावानी देखील संबोधिले आहे. यातील विविध रहस्य, विद्या, मंत्र, योग इत्यादि लोकांच्या समोर प्रकट होऊ नये म्हणून गुप्तपणे (रात्री) त्याचे वाचन केले जात असे. जर एखादा निर्ग्रंथ निशीथसूत्र विसरून गेला तर, आयुष्यभर त्याला आचार्यपद मिळत नसे. या सूत्रात निर्ग्रंथ व निर्ग्रंथिका यांच्या आचार-विचारांची तथा प्रायश्चितांची माहिती देण्यात आली आहे निशीथाचे कर्ते भद्रबाहु असल्याचे मानण्यात आले आहे या छेदसूत्रात २० उद्देश्यक आहेत. या छेदसूत्रावर अनेक टीका, तथा निर्युक्ति लिहिल्या गेल्या आहेत.

**२. महानिशीथ–** छेदसूत्र ग्रंथांच्यामध्ये महानिशीथाला कधी क्रमानुसार दुसरे तर कधी सहावे स्थान देण्यात येते. याला समस्त प्रवचनाचे श्रेष्ठ सार असे म्हटले आहे. निशीथाला लघुनिशीथ असे म्हटले आहे तर या ग्रंथाला महानिशीथ म्हटले आहे. अर्थात ही गोष्ट तशी पाहता उलट झालेली दिसते. आ. सिद्धसेन, वृद्धवादि, यक्षसेन, देवगुप्त, यशवर्धन, रविगुप्त, नेमिचंद्र व जिनदासगणि यानी बहुमान्यता दिली आहे. भाषा व विषय या दृष्टीने प्रस्तुत सूत्राची गणना प्राचीन आगमात केली जात नाही. यात तंत्रविषयक तसेच जैन आगमाशिवाय अन्य ग्रंथांचाही उल्लेख मिळतो. महानिशीथमध्ये सहा अध्याय आणि दोन चूलिका आहेत. यात नवकारमंत्र, उपधान, दया, अनुकंपा या अधिकाराचे विवेचन केले असून पापी कृत्यांची निंदा केली आहे.

**३. व्यवहार–** या ग्रंथाचे कर्ते श्रुतकेवली भद्रबाहु होते. त्यांनी या सूत्रावर निर्युक्ति देखील लिहिली आहे. व्यवहारसूत्र निशीथपेक्षा लहान व बृहत्कल्पपेक्षा मोठे आहे. यात दहा उद्देश्यक आहेत. पहिल्या उद्देशकात ३४ सूत्र असून दुसऱ्यात ३० सूत्र आहेत. ग्रंथारंभी प्रमादाची कारणे सांगितली असून त्यावद्दल प्रायश्चितही सांगितले आहे. भिक्षाविहार कसा करावा याविषयी माहिती दिली आहे. एकूण सूत्रसंख्या जवळजवळ २६१ इतकी आहे. या ग्रंथात प्रामुख्याने साधूंनी आपला व्यवहार किंवा क्रियाकर्म इत्यादि कसे ठेवावे, याविषयी विस्ताराने माहिती दिली आहे.

**४. दशाश्रुतस्कंध (दससुयखंद)–** याला आचारदशा तथा ब्रह्मसूत्र या नावाने देखील ओळखले जाते. यात १० अध्ययने आहेत. ती पुढीलप्रमाणे आहेत– असमाधिस्थान, सबल, आसनादी, आठ प्रकारची गणिसपदा, दहा प्रकारचे चित्तसमाधिस्थाने, ११ उपासक प्रतिमा, १२ भिक्षूप्रतिमा, पर्युषणकल्प, तीस मोहनीय स्थाने आणि आयतिस्थान इ. यातील आठवे जे पर्युषणकल्प आहे, तेच कल्पसूत्राच्या स्वरूपात वेगळे करण्यात आले आहे. याचे कर्ते भद्रबाहुस्वामी मानले जातात. त्यांनी प्रथम भ. महावीराची स्तुति केली आहे व नंतर विषय कथनाला सुरुवात केली आहे.

**५. कल्प (बृहत्कल्प)–** याला कल्पाध्ययन असेही म्हटले आहे. जैन श्रमणांच्या प्राचीन आचारशास्त्रांचे हे महाशास्त्र आहे. याची भाषा बरीचशी प्राचीन आहे. यात साधू-साध्वी यांना योग्य-अयोग्य गोष्टींचे विवेचन केले आहे. त्यांच्या स्थान, पात्र, वस्त्रादिविषयी माहिती दिली आहे. साधूनी भिक्षा कशी घ्यावी, अहिंसेपासून दूर

 



कसे रहावे, सदाचरण कसे ठेवावे यांची माहिती दिली आहे. या छेदसूत्रावर आचार्य भद्रबाहु विरचित निर्युक्ति आणि आचार्य संघदासगणि रचित लघुटीका आहे. बृहद् भाष्य देखील यावर लिहिले असून त्यातील बराचसा भाग अनुपलब्ध आहे. याची सर्व श्लोकसंख्या ६४९० इतकी आहे. यात अनेक महत्वपूर्ण विषयांचे विवेचन केले आहे. त्यावर मलयगिरीने एक टीका रचली आहे. त्यानंतर त्या टीकेची पूर्ती आचार्य क्षेमकीर्ति यानी केली. या ग्रंथात विविध दोषानुसार प्रायश्चितांचे सुंदर वर्णन केले आहे.



६. जीतकल्पसूत्र– यात एकूण १०३ गाथा असून या गाथांच्याद्वारे जैन श्रमणांच्या आचारांचे वर्णन करून दहा प्रकारच्या प्रायश्चित्ताचे वर्णन केले आहे. याचे कर्ते जिनभद्रगणि क्षमाश्रमण असून त्यांचा काल वि. सं. ६४५ इतका मानला जातो. जिनभद्रगणींनी यावर टीकाही लिहिली आहे. सिद्धसेन आचार्यांनी यावर चूर्णि लिहिली आहे. या छेदसूत्रात प्रायश्चितांचे माहात्म्य सांगितले असून त्याचे आलोचना, प्रतिक्रमण, विवेक, तप, छेद, मूल इ. दहा प्रकार सांगितले आहेत. यतिजीतकल्प आणि श्राद्धजीतकल्प या छेदसूत्राच्या अंतर्गत मानले जातात. यतिजीतकल्पमध्ये यतीचा आचार सांगितला आहे. याचे कर्ते सोमप्रभसूरि आहेत. श्राद्धजीतकल्पमध्ये श्रावकांचे आचार सांगितले असून याचे रचनाकर्ते धर्मघोष आहेत. सोमतिलकाने यावर वृत्ति लिहिली आहे.

या सर्व छेदसूत्रांचे आपण अवलोकन केले तर आपणाला असे दिसून येते की, त्यामधून जैन मुनींची बाह्य व अभ्यंतर धर्मसाधना व तिचे विविध स्वरूप यासंबंधी सविस्तर वर्णन केले आहे. यामध्ये विशिष्ठ नियमांचा भंग झाल्यावर उचित अशा प्रायश्चितांचे वर्णन केले आहे. प्रसंगानुरूप विविध तीर्थंकर, गणधर यांच्याशी संबंधित घटनांचाही उल्लेख केला आहे. या सर्व छेदसूत्रात 'कल्पसूत्र' विशेष प्रसिद्ध आहे. याचा अभ्यास आजतागायत मुनींच्यामध्ये अखंडितपणे केला जात आहे. मुनींचे सामूहिक व वैयक्तिक जीवनाविषयीचा अभ्यास करण्याच्या दृष्टीने हे अत्यंत महत्वाचे सूत्र आहे.

**चार मूलसूत्र–**

१. उत्तरज्झयण (उत्तराध्ययन) २. आवस्सय (आवश्यक) ३. दसवेआलिअ (दशवैकालिक) ४. पिंडनिज्जुत्ति (पिंडनिर्युक्ति) ही चार मूलसूत्रे आहेत.

मूलसूत्राची व्याख्या प्राचीन काळी कोणत्याही मुनीने दिलेली आढळून येत नाही अथवा प्राचीन कोणत्याही आगम ग्रंथात त्याविषयी उल्लेख आलेला नाही. सर्वसाधारणपणे 'मूल' हा शब्द प्रारंभीच्या किंवा प्रमुख ग्रंथांना उद्देशून वापरला गेला असावा. कदाचित् भ. महावीराचे मूळ शब्द (प्रवचने) यात समाविष्ठ करण्यात आली आहेत म्हणून त्यांना मूलसूत्रे असे म्हटले असावे. एका लहानशा सूत्रात शेकडो मणी गुंफावेत त्याप्रमाणे थोडया शब्दात खूप अर्थ सामावता आला म्हणजे ते सूत्र बनते. अर्थात् सूत्र म्हणजे 'थोड्याशा शब्दात विपुल अर्थाने भरलेले लहानसे वचन होय.' जैन व बौद्धांनी 'सूत्र' हा शब्द विस्तृत अर्थाने वापरला आहे. त्यांच्या मते 'गद्यात किंवा पद्यात थोडक्यात व्यक्त केलेला धार्मिक विषय,' तसेच जैनांनी आगम ग्रंथांना सूत्र हीच संज्ञा दिली आहे.

मूलसूत्र ग्रंथातून साधू जीवनाच्या मूलभूत नियमाचा उपदेश दिला आहे. म्हणूनच या ग्रंथांना मूलसूत्र असे म्हटले आहे आगमात मूलसूत्राचे स्थान अत्यंत महत्त्वाचे असे आहे. यातील उत्तराध्ययन आणि दशवैकालिक ही सूत्रे अगदी प्राचीनतम सूत्रामध्ये गणली जातात आणि यांची तुलना सुत्तनिपात, धम्मपद इत्यादि प्राचीन बौद्धसूत्रांच्या बरोबर केली जाते.

चार मूलसूत्रांची माहिती पुढीलप्रमाणे आहे–

**१. उत्तराध्ययनसूत्र–** चार मूलसूत्र ग्रथात उत्तराध्ययनसूत्राचे स्थान सर्वात प्रथम आहे. याचा रचनाकाल भ. महावीर निर्वाणापासून जवळ जवळ १००० वर्षे इतका मानला जातो कारण या ग्रंथात एकूण ३६ अध्याय एकत्रित करण्यात आले असून या ग्रंथाचा कर्ता कोणी एकटा नाही. धार्मिक काव्याच्या दृष्टीने हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा आहे. यात उपमा, दृष्टांत, विविध संवाद यांच्याद्वारे काव्यमय मार्मिक भाषेत त्याग, वैराग्य आणि संयम यांचा उपदेश केला आहे. डॉ. विंटरनीज यांनी या काव्याची तुलना महाभारत धम्मपद आणि सुत्तनिपात इत्यादि बरोबर केली आहे. संसाराचा त्याग करून नुकतेच त्यागी जीवन स्वीकारलेल्या तरुण मुनीला त्याचे प्रमुख कर्तव्यकर्म शिकविणे, नियम व उदाहरणे देऊन तपस्वी जीवनाची स्तुति करणे, त्याच्या पवित्र व अध्यात्मिक जीवनात येणाऱ्या धोक्याची सूचना देणे आणि तात्त्विक माहिती देणे हाच या उत्तराध्ययनसूत्राचा प्रमुख उद्देश दिसतो.

उत्तराध्ययनातील विविध अध्यायातून निरनिराळे विषय हाताळले आहेत. मुनीने आचार्याशी विनयाने कसे वागावे, मोक्षप्राप्तीसाठी काय काय करावे, त्याचप्रमाणे पापी मुनी कसा आचरण करतो याचे विवेचन केले आहे. धर्मोपदेशाचे श्रवण करणे, संयम व श्रद्धा यांचे पालन करणे, २२ परिषहावर विजय मिळविणे इत्यादि गोष्टीचेही विवेचन केले आहे. कपिलमुनी, हरिकेशी, चांडाळमुनी, नमीराजर्षी, चित्रसंभूत, इषुकार, संयती, मृगापुत्र, समुद्रपाल, रथनेमि इत्यादीच्या कथा सांगून मुनिधर्माचे महत्त्व विषद केले आहे. महावीरांचे ज्येष्ठ गणधर इंद्रभूती गौतम व केशीकुमार श्रमण याच्यातील संवादावरून चातुर्याम धर्म, पंचमहाव्रते, सचेल अचेलादि यांचे स्पष्टीकरण केले आहे. जीव, अजीव, समिती, गुप्ति, कर्मप्रकृति, लेश्या, परिषह, सल्लेखना, तपश्चरण इत्यादि विविध गोष्टींचे प्रस्तुत उत्तराध्ययन मूलसूत्रात विवेचन केले आहे.

या मूलसूत्रावर नेमिचंद्राचार्यविरचित 'सुखबोधा' नावाची टीका असून आचार्य भद्रबाहु (द्वितीय) यांची निर्युक्ति आहे. तसेच शांतिसूरि ( वि. सं. ११ वे शतक ) शिष्याहिता नावाचीही टीका आहे.

**२. आवश्यकसूत्र–** यात प्रतिदिवशी केल्या जाणाऱ्या दैनंदिन क्रियांचे स्पष्टीकरण करण्यात आले आहे. अशा सहा प्रकारच्या क्रिया आहेत– सामायिक, चतुर्विंशतिस्तव, वंदना, प्रतिक्रमण, कायोत्सर्ग, प्रत्याख्यान इत्यादि. हा ग्रंथ या नावांच्याच सहा अध्यायात विभागला गेला आहे. यावर भद्रबाहूची निर्युक्ति आहे. जिनभद्रगणीने यावर विशेषावश्यक भाष्याची रचना केली आहे. हरिभद्रसूरीने यावर शिष्याहिता नावाची टीका लिहिली आहे. पहिल्या आवश्यकामध्ये सामायिकाचे वर्णन केले असून मन, वचन, कायद्वारे स्वतःचा देखील त्याग करीत आहे असे सांगितले आहे. तर दुसऱ्या-तिसऱ्या आवश्यकामध्ये चोवीस तीर्थंकरांची स्तुति केली आहे. चौथ्यात प्रतिक्रमणाचा उल्लेख करून शुभयोग धारण करण्याविषयी सांगितले आहे. पाचव्या आणि सहाव्या आवश्यकामध्ये अनुक्रमे कायोत्सर्ग ध्यानाचे महत्त्व व प्रत्याख्यान याची माहिती देऊन त्यात अशन, पान, खाद्य आणि स्वाद्य यांचा त्याग करण्याविषयी सांगितले आहे.

**३. दशवैकालिकसूत्र–** या मूलसूत्राचे रचनाकार आचार्य शय्यंभव आहेत. त्याचे अध्ययन सध्यासमयी केले जाते व त्यात एकूण १० अध्याय असल्यामुळेच या ग्रंथाला दशवैकालिक असे नाव दिले आहे. आ. शय्यंभव प्रथम ब्राह्मण होते. नंतर त्यांनी जैन धर्माची दीक्षा घेतली होती. त्यांना दीक्षेनंतर मणग नावाचा एक पुत्र झाला. आपला पुत्र मणग हा सहा महिन्यानंतर मृत्यु पावणार आहे हे जाणूनच त्यांनी या ग्रंथाची रचना केली. भद्रबाहु आणि हरिभद्रसूरि यांनी या ग्रंथावर टीका लिहिली असून अगस्त्यसिंह व जिनदासगणि यांनी चूर्णि लिहिल्या






कसे रहावे, सदाचरण कसे ठेवावे यांची माहिती दिली आहे. या छेदसूत्रावर आचार्य भद्रबाहु विरचित निर्युक्ति आणि आचार्य संघदासगणि रचित लघुटीका आहे. बृहद् भाष्य देखील यावर लिहिले असून त्यातील बराचसा भाग अनुपलब्ध आहे. याची सर्व श्लोकसंख्या ६४९० इतकी आहे. यात अनेक महत्वपूर्ण विषयांचे विवेचन केले आहे. त्यावर मलयगिरीने एक टीका रचली आहे. त्यानंतर त्या टीकेची पूर्ती आचार्य क्षेमकीर्ति यानी केली. या ग्रंथात विविध दोषानुसार प्रायश्चितांचे सुंदर वर्णन केले आहे.

६. जीतकल्पसूत्र– यात एकूण १०३ गाथा असून या गाथांच्याद्वारे जैन श्रमणांच्या आचाराचे वर्णन करून दहा प्रकारच्या प्रायश्चितांचे वर्णन केले आहे. याचे कर्ते जिनभद्रगणि क्षमाश्रमण असून त्यांचा काल वि. सं. ६४५ इतका मानला जातो. जिनभद्रगणींनी यावर टीकाही लिहिली आहे. सिद्धसेन आचार्यांनी यावर चूर्णि लिहिली आहे. या छेदसूत्रात प्रायश्चितांचे माहात्म्य सांगितले असून त्याचे आलोचना, प्रतिक्रमण, विवेक, तप, छेद, मूल इ. दहा प्रकार सांगितले आहेत. यतिजीतकल्प आणि श्राद्धजीतकल्प या छेदसूत्राच्या अंतर्गत मानले जातात. यतिजीतकल्पमध्ये यतीचा आचार सांगितला आहे. याचे कर्ते सोमप्रभसूरि आहेत. श्राद्धजीतकल्पमध्ये श्रावकांचे आचार सांगितले असून याचे रचनाकर्ते धर्मघोष आहेत. सोमतिलकाने यावर वृत्ति लिहिली आहे.

या सर्व छेदसूत्रांचे आपण अवलोकन केले तर आपणाला असे दिसून येते की, त्यामधून जैन मुनीची बाह्य व अभ्यंतर धर्मसाधना व तिचे विविध स्वरूप यासंबंधी सविस्तर वर्णन केले आहे. यामध्ये विशिष्ठ नियमांचा भंग झाल्यावर उचित अशा प्रायश्चितांचे वर्णन केले आहे. प्रसंगानुरूप विविध तीर्थंकर, गणधर यांच्याशी संबंधित घटनांचाही उल्लेख केला आहे. या सर्व छेदसूत्रात 'कल्पसूत्र' विशेष प्रसिद्ध आहे. याचा अभ्यास आजतागायत मुनींच्यामध्ये अखंडितपणे केला जात आहे. मुनींचे सामूहिक व वैयक्तिक जीवनाविषयीचा अभ्यास करण्याच्या दृष्टीने हे अत्यंत महत्त्वाचे सूत्र आहे.

चार मूलसूत्र–

१. उत्तरज्झयण ( उत्तराध्ययन ) २. आवस्सय ( आवश्यक ) ३. दसवेआलिअ ( दशवैकालिक ) ४. पिंडनिज्जुत्ति ( पिंडनिर्युक्ति ) ही चार मूलसूत्रे आहेत.

मूलसूत्राची व्याख्या प्राचीन काळी कोणत्याही मुनीने दिलेली आढळून येत नाही अथवा प्राचीन कोणत्याही आगम ग्रंथात त्याविषयी उल्लेख आलेला नाही. सर्वसाधारणपणे 'मूल' हा शब्द प्रारंभीच्या किंवा प्रमुख ग्रंथांना उद्देशून वापरला गेला असावा. कदाचित् भ. महावीरांचे मूळ शब्द (प्रवचने) यात समाविष्ठ करण्यात आली आहेत म्हणून त्यांना मूलसूत्र असे म्हटले असावे. एका लहानशा सूत्रात शेकडो मणी गुंफावेत त्याप्रमाणे थोड्या शब्दात खूप अर्थ सामावता आला म्हणजे ते सूत्र बनते. अर्थात् सूत्र म्हणजे 'थोड्याशा शब्दात विपुल अर्थाने भरलेले लहानसे वचन होय.' जैन व बौद्धांनी 'सूत्र' हा शब्द विस्तृत अर्थाने वापरला आहे. त्यांच्या मते 'गद्यात किंवा पद्यात थोडक्यात व्यक्त केलेला धार्मिक विषय,' तसेच जैनांनी आगम ग्रंथांना सूत्र हीच संज्ञा दिली आहे.




मूलसूत्र ग्रंथातून साधू जीवनाच्या मूलभूत नियमांचा उपदेश दिला आहे. म्हणूनच या ग्रंथांना मूलसूत्र असे म्हटले आहे. आगमात मूलसूत्राचे स्थान अत्यंत महत्त्वाचे असे आहे. यातील उत्तराध्ययन आणि दशवैकालिक ही सूत्रे अगदी प्राचीनतम सूत्रामध्ये गणली जातात आणि यांची तुलना सुत्तनिपात, धम्मपद इत्यादि प्राचीन बौद्धसूत्राच्या बरोबर केली जाते.




परिशिष्ट क्रमांक २

# जैन लोकगीते

जैन साहित्याच्या विविध शाखाविषयी बऱ्याच विद्वानांनी लेखकांनी बरेचसे लिखाण केले आहे. एवढेच नव्हे तर संस्कृत, अपभ्रंश, कन्नड, तामिळ, तेलगु, मराठी, गुजराथी व हिन्दी या विविध भाषेतील जैन साहित्यावर देखील अधिक भर देण्यात येत असून, त्या त्या भाषेतील साहित्य प्रकट झाले आहे तथा होऊ पहात आहे. बरेचसे मराठी जैन साहित्य देखील उजेडात आले आहे. परंतु मराठी लोकगीतांचा विभाग मात्र फारच दुर्लक्षित राहिला आहे. मराठी लोकगीते तथा लोककथा हा भाग अद्यापपर्यंत अप्रकाशित राहिला असून, त्यावर भर देणे अत्यावश्यक आहे. मराठवाड्यातील जैन लोकगीताचे संकलन कै. नांदापूरकर यानी केले असून, महाराष्ट्राच्या सर्व प्रदेशातील जैन लोकगीतांचे व लोककथांचे संकलन करून ते प्रकाशात आणणे आवश्यक आहे. खेड्यापाड्यातून भ. जिनेंद्राच्या पूजेसाठी, भक्तीसाठी तथा अनेक धार्मिक उत्सवासाठी जैन समाजातील अनेक अज्ञात कवि तथा कवयित्रींच्या कडून अशा लोकगीतांचा वापर केला जातो. मराठी भाषेतील लोकगीताचे संकलन जसे डॉ. सरोजनी बाबर यानी करुन, मराठी साहित्याला एक नवीन देणगी बहाल केली त्याचप्रमाणे जैन लोकगीते आणि लोककथा याचे संकलन करून मराठी जैन साहित्यात एक नवीन दालन उघडणे सहज शक्य आहे.

मराठी जैन लोकगीतामधून आपणाला समाजाच्या विविध अंगाचे स्वरूप पाहावयास मिळते. लोकगीते ही पूर्णतः धार्मिक तत्त्वावर आधारित नसून या विविध लोकगीतातून जैन समाजाचे रीतिरिवाज, चालीरूढी, परंपरा दिसून येतात. काही लोकगीतातून आचारधर्म, पर्व-उत्सव यांचे वर्णन आढळून येते, तर काही लोकगीतातून तीर्थक्षेत्रे यात्रा याविषयीची माहिती मिळते. तसे पाहता लोकगीते म्हणजे स्त्रियाचे एक अमोल असे धन आहे. लोकगीतातून जास्तीतजास्त स्त्रीजीवनाविषयीची माहिती मिळते. कारण हा लोकगीतांचा वारसा पुरुषाच्या पेक्षा जास्त प्रमाणात नव्हे पूर्णतः स्त्रियांच्याकडूनच चालत आला आहे.

भारतीय स्त्रीजीवनाचे वैशिष्ट्य काही आगळेच आहे. इतर देशातील स्त्रीजीवनाशी त्याची तुलना केली असता, भारतीय स्त्रीजीवन निश्चितपणे अति श्रद्धाशील आणि निष्ठावान असल्याचे दिसून येईल. कारण या भारतीय स्त्रीच्या समोर रामायण महाभारतातील सीता, द्रौपदीसारख्या शीलवान स्त्रियांची चरित्रे सतत डोळ्यासमोर असलेली दिसून येतात. स्त्रीजीवनाचे विविध पैलू घडविण्याचे महान कार्य या पुराणादि साहित्याने पार पाडले आहे तरीसुद्धा स्त्रीजीवनाचे खरेखुरे प्रतिबिंब या सर्व साहित्यापेक्षा लोकगीतात अधिक स्पष्टपणे उमटलेले आढळून येते. अशा आदर्श भारतीय स्त्रीजीवनात जैन स्त्री तरी कशी बरे मागे राहील ?

जैन गृहिणीची नित्य दिनचर्या चालू असताना देखील त्यातील थोडा का होईना वेळ काढून तो धर्माचरणात व्यतीत केल्याशिवाय राहणार नाही. एवढेच नव्हे तर या स्त्रियांच्या दिनचर्येची सुरुवातच मुळी तीर्थंकरांच्या नामस्मरणाने होत असते. सकाळी उठताच ती गुणगुणू लागते—

दिवस निघुनी म्हणते जिनजिन,<br>मग प्रपचाचं काम आटपीन ।

परंतु केवळ नामस्मरणाने तिचे समाधान होऊ शकत नाही. भगवंताचे दर्शन उरकूनच पुढील कामात मग्न व्हावे असे तिला मनोमन वाटते व ती स्वतः जिन भगवंताच्या पूजेची तयारी करू लागते व इतरांनाही बरोबर घेते.

आहेत. जर्मन विद्वान् वाल्टर शूब्रिंग तथा लायमेन यांनी या मूलसूत्राची भूमिका जर्मन अनुवादासह हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. पिशल या विद्वानांनी भाषाशास्त्राचे अध्ययन करण्याच्या दृष्टीने हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा असल्याचे सांगितले आहे. या ग्रंथात पुढील दहा अध्यायांचा समावेश करण्यात आला आहे. द्रुमपुष्पिका, श्रामण्यपूर्विका, क्षुल्लिकाचारकथा, षड्जीवनिकाय, पिण्डैषणा, महाचारकथा, वाक्यशुद्धि, आचारप्रणिधि, विनय-समाधि, सभिक्षु इ. मुनींच्या आचार-विचारांचेच यात कथन केले आहे.

४. पिंडनिर्युक्ति– मूलसूत्र ग्रंथांच्यामध्ये या सूत्राचे स्थान चौथे आहे. पिंड याचा अर्थ भोजन. पिंडनिरूपण, उद्गम दोष, उत्पादन दोष, तसेच एषणा दोषांचे यात विवेचन केले आहे. दशवैकालिकमधील पिण्डेषणा हा पाचवा अध्याय असून त्यावर आचार्य भद्रबाहु यांनी विस्तृत निर्युक्ति रचली आहे. ती अतिविस्तृत असल्यानेच तो एक स्वतंत्र ग्रंथ मानण्यात आला आहे. साधु आहार कशा प्रकारचा असावा याविषयी सांगताना आहारविषयक १६ उद्गम, १६ उत्पादन, १० ग्रहणैषणा, १ संयोजन, १ प्रमाण, १ धूम १ अंगार या ४६ दोषांची चर्चा केली आहे. त्या अतिरिक्त इतर ज्या सहा कारणांनी भोजन करू नये त्या कारणांचेही स्पष्टीकरण केले आहे. निर्युक्तीची गाथासंख्या ६७१ इतकी आहे. यावर आचार्य मलयगिरीने टीका लिहिली आहे.

थोडक्यात या चार मूलसूत्र ग्रंथांच्या साह्याने जैनधर्माचे मूलसिद्धांत, मौलिक विचार भावना व साधना याविषयीचे प्रतिपादन केले आहे. उत्तराध्ययन व दशवैकालिक ही सूत्रे अत्यंत महत्त्वाची असून ती लोकप्रिय व प्रचलित आहेत. सिद्धांत, भाषा व साहित्य यांच्या दृष्टीने त्यात विशेषता आढळते.

**दोन चूलिका सूत्रे–**

१. नंदिसूत्र २. अनुयोगद्वार.

१. नंदिसूत्र– हे चूलिकासूत्र मानले जाते. याची रचना देववाचक गणि ( वि. स. ५२३ पूर्वी ) यांनी केली आहे. यावर आचार्य जिनदासगणि यांनी चूर्णि लिहिली आहे. यावर हरिभद्रसूरि व आचार्य मलयगिरी यांच्या टीका आहेत. प्रस्तुत ग्रंथात मंगलाचरणानंतर २४ तीर्थंकरांची वंदना करून अंतिम तीर्थंकर महावीर स्वामी यांच्या बारा गणधरांचा उल्लेख केला आहे. त्यानतर सुधर्मास्वामीपासून दुष्यगणिपर्यंत स्थविरावलीच्या शिष्यपरंपरेचा उल्लेख केला आहे. पुढे आभिनिबोधिका इत्यादि पाच ज्ञानाचे सविस्तर वर्णन केले आहे. त्यानंतर गमिक–आगमिक, अंगप्रविष्ट–अंगबाह्य तसेच कालिक–उत्कालिक इत्यादि श्रुतांगांचे भेद-उपभेद सांगितले आहेत. यामध्ये भारत, रामायण, कौटिल्य, पातंजल इत्यादि शास्त्रपुराणे, वेद त्याचप्रमाणे ७२ कला यांचा उल्लेख करून त्याचा अभ्यास मुनींना वर्ज्य सांगितला आहे

२. अनुयोगद्वार– हे सुद्धा एक चूलिका सूत्र आहे याचा प्रणेता बहुधा आर्यरक्षित स्थविर मानला जातो. आर्यरक्षित आर्यवज्राच्या समकालीन होता प्रस्तुत ग्रंथरचनाकाल ( विक्रम ११४–२७ ) च्या आसपास मानला जातो. या ग्रंथाच्या प्रारंभी पाच ज्ञानाचा निर्देश करून श्रुतज्ञानाचा उपदेश केला आहे. पुढे प्रश्नोत्तररूपाने अंगप्रविष्ट इत्यादींचा निर्देश करून उत्कालिक श्रुतात आवश्यक व्यतिरिक्तांचा उद्देश सांगितला आहे. प्रसंगानुरूप भाव, सात स्वर, नऊ रस व द्रव्य क्षेत्रादींचे विवेचन केले आहे. यावर जिनदास गणि महत्तर रचित चूर्णि असून हरिभद्रसूरि व मलधारगच्छीय हेमचंद्ररचित टीका आहेत.

नंदिसूत्र तथा अनुयोगद्वार या दोन्ही चूलिका सूत्राची आगमातील ग्रंथाशी तुलना केली असता ती फारच अर्वाचीन असल्याची दिसतात. विविध प्रकारच्या माहितीच्या दृष्टीने मात्र ती अत्यंत महत्त्वाची आहेत.

मन गुंतवून ठेवण्याचा उपदेश करतात. महान मुनिवर्यांनी हे सर्व असाध्य ते साध्य करून घेतल्याचे पाहून श्रावकांना अचंबा वाटतो. ते म्हणतात–

मुनीमहाराजांची दीक्षा कठीण आहे फार ।
उम्याने घेते आहार ।।

भगवान महावीरांची कैवल्य मूर्ति तथा ज्ञानज्योत पाहताच मन कसे उचंबळून येते. फक्त त्यांच्या नामस्मरणाने देखील मुक्ति पदाची प्राप्ति होऊ शकते. हा दृढ आत्मविश्वास खालील ओळीतून प्रकट झालेला दिसेल–

कैवल्याची ज्ञानज्योत तू ।
तेजःपुंज रवि तू ।।
तव तेजाने त्रैलोक्य न्हाले ।
चमचम लखलखले ।।

शिवाय– मुक्तिची चैतन्यमूर्ति ।
अरिहंत सिद्ध प्रभू तू ।।
तव स्मरणाने अनंत ज्योति ।
मुक्ति पदा जाती मुक्ति पदा जाती ।।

भगवान महावीरांचे नाव घेताच पापाचा भार हालका होऊन आत्मा मुक्तिपदाला कसा जातो याचे सुंदर विवेचन केले असून सम्यग्ज्ञान, सम्यग्दर्शन व सम्यक्चारित्र या तीन रत्नत्रयांचा मार्ग त्यांनी कसा दाखविला आहे त्याचे सुंदर विवेचन केले आहे.

महावीरांचा नाव घेता पापभार हलका होई ।
आत्मा तुमचा हलका होऊनी मुक्ति पदाला ग जाई ।।

तसेच– सम्यग्दर्शन, ज्ञानचारित्र मुक्तात्म्यांची आहे शिडी ।
मार्ग दाऊनी मुक्त जाहले महावीर स्वामी ।।

वर उल्लेख केलेल्या सर्व कडवकातून आपणाला धार्मिक जीवनाविषयीची माहिती मिळते. जैनांचा मुख्य देव म्हणजे महावीर स्वामी, महावीर स्वामीचा हितोपदेश म्हणजेच आत्मशुद्धीचे खरे औषध. त्या उपदेशानुसार जो आचरण करेल त्याची लवकरात लवकर आत्मशुद्धि होऊन तो मोक्षप्राप्तीला योग्य ठरेल. सकाळी उठल्यापासून संध्याकाळपर्यंत व जीवनाच्या सुरुवातीपासून शेवटपर्यंत सम्यक्दर्शनचारित्र यांचे जो आचरण करेल त्याला त्वरित सुखशांती प्राप्त होईल. थोडक्यात भ. महावीर स्वामीच्या नामोच्चरणाने अनेक दु:खांचा नाश होऊन सुखप्राप्तीचा मार्ग कसा मोकळा होईल याविषयीचे विवेचन प्रस्तुत ठिकाणी करण्यात आले आहे.

या धार्मिक लोकगीताशिवाय आपणाला अनेक इतर प्रकारची लोकगीते तथा ग्रामीणगीते पाहावयास मिळतात. लग्नाच्या वेळी नवरदेव–नवरी याना हळद इत्यादी लावण्यापूर्वी ती देवाला वहावी. याच लग्नाच्या वेळी रुसून बसलेली विहिण काही केल्या आपल्या रुसवा सोडत नाही. तिचा रुसवा काढण्यासाठी इतरांची दमछाट झाली आहे तसेच नवऱ्या मुलाला हुंडा इत्यादि देऊन देखील तो सोन्याच्या समयीसाठी हातातील आंगठीसाठी गळ्यातील सोनेरी हारासाठी रुसला आहे. या जावईबुवाचा रुसवा काढत असताना देखील सासऱ्याच्या नाकी दम आला आहे. स्वत:च्या पोटची पोर देऊन जावयाचा रुसवा काढणारा तो शेवटी दीनपणे उभा राहिला आहे.

सकाळी उठुनि अष्टद्रव्य तबकात ।
चला जिनमंदिरात दर्शनाला ।।
गुलाबाची फुलं धुवूनि तबकं भरा ।
जिनालयी पूजा करा भक्ति भावे ।।

त्या महान भगवंताची स्तुति ही स्त्री आपल्या गीतातून करीत असते. भगवंताचा महिमा किती महान आहे व तो गाता गाता विद्वान देखील कसे थकून गेले आहेत.

वीराच्या रे वीरा रवीच्या रे रविराजा
माझा नमस्कार तुला त्रिलोकाच्या त्रिलोकराजा ।
मोठं मोठं पंडित गुण गाता थकलेलं
इंदू म्हणे तुज वीरा गुण गाऊ वाटयेलं ।।

ही स्त्री ज्या मंदिरात पूजा करण्यासाठी गेलेली असते ते मंदीर तरी किती सुंदर ! सर्वत्र स्वच्छता टापटीप, प्रभू चरणावर वाहिलेल्या जाई जुई व मोगरा तथा गुलाबादि फुलांचा वास दरवळत आहे. कापराच्या सुगंधाने अवघे वातावरण सुगंधित करून टाकले आहे. घंटानाद होत आहे. झोपेतून उशीरा उठलेल्या स्त्रियांची भगवंत पूजेसाठी एकच धाई उडालेली आहे. ती सकाळची वेळ धर्मकार्य करण्यास अत्यत महत्त्वाची असून स्त्रियांनी कोणती दक्षता घ्यावी याचेही सुंदर विवेचन करण्यात आले आहे.

मंदिराले जाता कुणाशी बोलू नये
वेळ धरमाची आहे ।
मंदिराले जाता कुणाशी बोलू नये
मनाचे सोडू नये णमोकार मंत्र ।।

णमोकार मंत्राची महति तर सर्व जैन धार्मिकांच्याकडून गायिली जाते. परंतु स्त्रीच्या दृष्टीने तो णमोकार मत्र म्हणजे एक अमूल्य निधि असून आत्मा शुद्धीचे रामबाण औषध आहे. ती म्हणते–

पंच ग णमोकार साखरीचा रवा ।
याने माझा जिव्हाळा शुद्ध झाला ।।
पंच ग णमोकार साखरीची पुडी ।
याने माझी कुडी शुद्ध झाली ।।

या णमोकार मंत्राचे चिंतन केले असता, स्वर्गप्राप्ति सहज सुलभ होते, संकटाचे निवारण होते व आत्मशुद्धीची महान देणगी देखील या णमोकार मंत्राने प्राप्त होते. या देवदर्शनाबरोबरच त्या स्त्रीच्या हृदयात गुरुदर्शन, गुरुउपदेश, शास्त्रप्रवचन यांच्याविषयी देखील अधिक जिव्हाळा आहे. काही लोक तर या गुरूंच्या दर्शनासाठी इतके आतुर झाले आहेत की, ते कित्येक अंतर पुढे चालत गेलेले आहे. काही जण तर अक्षरशः लोटांगणे घालीत आहेत.

गुरु आले म्हणती । राहिले कोसामानी ।
शिष्य जाती लोटांगणी ।।

संपूर्ण संसाराचा त्याग करून रानावनात तपश्चर्या करीत राहणे, पंचेंद्रियावर तावा मिळविणे हे किती कठीण कर्म ! परंतु ते देखील हे जैन मुनिवर्य यथास्थित पार पाडतात. ज्ञानाची प्राप्ती होताच ते इतर श्रावकजनाना हितोपदेश देतात व यथाशक्ति अहिंसादि कर्मापासून दूर राहण्यास विनवून शास्त्र प्रवचनादि मध्ये

मन गुतवून ठेवण्याचा उपदेश करतात. महान मुनिवर्यांनी हे सर्व असाध्य ते साध्य करून घेतल्याचे पाहून श्रावकांना अचंबा वाटतो. ते म्हणतात–

मुनीमहाराजांची दीक्षा कठीण आहे फार ।
उभ्याने घेते आहार ।।

भगवान महावीरांची कैवल्य मूर्ति तथा ज्ञानज्योत पाहताच मन कसे उचंबळून येते. फक्त त्यांच्या नामस्मरणाने देखील मुक्ति पदाची प्राप्ति होऊ शकते. हा दृढ आत्मविश्वास खालील ओळीतून प्रकट झालेला दिसेल–

कैवल्याची ज्ञानज्योत तू ।
तेजःपुंज रवि तू ।।
तव तेजाने त्रैलोक्य म्हाले ।
चमचम लखलखले ।।

शिवाय– मुक्तिची चैतन्यमूर्ति ।
अरिहंत सिद्ध प्रभू तू ।।
तव स्मरणाने अनंत ज्योति ।
मुक्ति पदा जाती मुक्ति पदा जाती ।।

भगवान महावीरांचे नाव घेताच पापाचा भार हालका होऊन आत्मा मुक्तिपदाला कसा जातो याचे सुंदर विवेचन केले असून सम्यग्ज्ञान, सम्यग्दर्शन व सम्यक्चारित्र या तीन रत्नत्रयांचा मार्ग त्यांनी कसा दाखविला आहे त्याचे सुंदर विवेचन केले आहे.

महावीरांचा नाव घेता पापभार हलका होई ।
आत्मा तुमचा हलका होऊनी मुक्ति पदाला ग जाई ।।

तसेच– *सम्यग्दर्शन, ज्ञानचारित्र मुक्तात्म्याची आहे शिडी ।*
मार्ग दाऊनी मुक्त जाहले महावीर स्वामी ।।

वर उल्लेख केलेल्या सर्व कडवकातून आपणाला धार्मिक जीवनाविषयीची माहिती मिळते. जैनाचा मुख्य देव म्हणजे महावीर स्वामी, महावीर स्वामीचा हितोपदेश म्हणजेच आत्मशुद्धीचे खरे औषध. त्या उपदेशानुसार जो आचरण करेल त्याची लवकरात लवकर आत्मशुद्धि होऊन तो मोक्षप्राप्तीला योग्य ठरेल. सकाळी उठल्यापासून संध्याकाळपर्यंत व जीवनाच्या सुरुवातीपासून शेवटपर्यंत सम्यक्दर्शनचारित्र यांचे जो आचरण करेल त्याला त्वरित सुखशांती प्राप्त होईल. थोडक्यात भ. महावीर स्वामीच्या नामोच्चरणाने अनेक दुःखांचा नाश होऊन सुखप्राप्तीचा मार्ग कसा मोकळा होईल याविषयीचे विवेचन प्रस्तुत ठिकाणी करण्यात आले आहे.

या धार्मिक लोकगीताशिवाय आपणाला अनेक इतर प्रकारची लोकगीते तथा ग्रामीणगीते पाहावयास मिळतात. लग्नाच्या वेळी नवरदेव–नवरी याना हळद इत्यादी लावण्यापूर्वी ती देवाला वहावी. याच लग्नाच्या वेळी रुसून बसलेली विहिण काही केल्या आपल्या रुसवा सोडत नाही. तिचा रुसवा काढण्यासाठी इतरांची दमछाट झाली आहे. तसेच नवऱ्या मुलाला हुंडा इत्यादि देऊन देखील तो सोन्याच्या समयीसाठी हातातील आगठीसाठी गळयातील सोनेरी हारासाठी रुसला आहे. या जावईबुवाचा रुसवा काढत असताना देखील सासऱ्याच्या नाकी दम आला आहे. स्वतःच्या पोटची पोर देऊन जावयाचा रुसवा काढणारा तो शेवटी दीनपणे उभा राहिला आहे.

रूसला जावई असा सोन्याच्या समईला
तार केलीया केलीया मुंबईला ।
रूसला जावई सोन्याच्या मुदीसाठी
दिली म्हवर म्हवर उजव्या हाती ।

तसेच– नवरीचा बाई बाप पैसा खर्चितो पाण्यावाणि
उभा राहिला राहिला दीनवाणि ।

प्रस्तुत ओळीतून आपणाला सामाजिक जीवनाचे सुदर चित्रण पाहावयास मिळते. आजकालच्या या हुंडा पद्धतीने मुलीच्या बापाला किती त्रास पडतो याची जावईबापूना कल्पना नसते. तो बिचारा स्वतःचे भले व्हावे म्हणून वाटेल तो अपमान सहन करतो. उलट वरमाई, विहिण इत्यादि जावईबापूकडील मंडळी मजेत राहून त्याला अधिक छळण्याचा प्रयत्न करतात. अर्थात समाजातील ही एक वाईट प्रथा असून ती मोडून काढणे आवश्यक आहे. या ठिकाणी सामाजिक व्यंगाचे वर्णन आपणास पाहावयास मिळते.

लग्नातच नवरी मुलीकडून नवऱ्याला रुखवत दिला जातो. त्या रुखवताच्या वेळी एकमेकावर कडाडून हल्ला करण्याची संधी आपोआप मिळते.

बारा पायल्याच्या पोळ्या
इन म्हणती शिळ्या ।
बारा पायल्याच्या केल्या तेलच्या
इनं म्हणती कालच्या ।

तसेच– आला आला रूखवत रूखवतावर दोऱ्याची आटी
नवरदेव रूसला फटफटीसाठी ।
आला आला रूखवत रूखवतावर लसूण
फटफट कुठली जा कैकाडचाच्या गाढवावर बसून ।
आला आला रूखवत रूखवतावर वेगडी पान
नवरी दिली छान पण नवरदेव दिसतो ध्यान ।
आला आला रूखवत रूखवतावर तुरी
नवरी दिसते बरी पण नांदल तवा खरी ।

लग्नाच्यावेळी या रूखवत प्रकरणावरून एकमेकांची उणीदुणी काढण्याची संधी नवरा नवरीच्या दोन्ही बाजूना मिळते. अर्थात गोड शब्दानी कानउघाडणी करण्याचा प्रयत्न यातून केलेला दिसतो. या रूखवताच्या वेळीच दोन्ही पक्षात एखाद्यावेळी भांडणे होऊन अनर्थ होण्याचाही धोका संभवतो तरी या जुन्या चालीरूढीना आता धक्का देऊन नवीन व चागल्या रूढीचे स्वागत करणे आज अत्यावश्यक आहे.

नुकतेच लग्न झाल्यावर प्रथमच सासरी पाठवित असताना मातापित्याच्या हृदयाला कोण यातना होत असतील ? त्यांचे अतरमन किती टाहो फोडीत असेल ? ते द्रवल्याशिवाय कसे बरे राहू शकेल ? पोटचा गोळा दुसऱ्याच्या पदरात टाकून देताना त्याना किती अपार दुःख होत असेल ? त्यावेळी ते मातापिता स्वतःचे दुःख न दाखविता लाडक्या लेकीला आनंदाने निरोप देत असतात व ती डोळ्याआड होताच डोळ्यातील अश्रूना वाट करून देतात. माहेराहून सासरी जाणाऱ्या आपल्या त्या लेकीला ते विविध गोष्टी समजावून सांगतात तथा उपदेश करतात.

कोकरू वेडे माझे कालची सात पोर
माडवात झाली थोर कुलवधू ।
माझ्या लाडक्या ग लेकी धरू नको फार हेका
ससार हा बहू वाका ।। रणांगण ।।

तसेच– कामधाम करताना तुझी विसर बदवी
नको माजवू यादवी स्वप्नातही ।

जगाचे भयाण स्वरूप व कार्य स्वतःच्या लेकीला समजावून सांगताना ती माता म्हणते–

पाठी नाही असतो, डोळे कान भितीचे उघडे ।
जगाला या दोन तोंडे ठेव ध्यानी ।।
सासु-सासऱ्यांची माया छाया शिरी आपोआप
दोघांचेही मायबाप एक आता ।।

प्रस्तुतच्या मातापित्तरांच्या उपदेशावरून त्यांच्या हृदयाचा भाबडेपणा, पण नितीमत्तेची त्यांना असलेली चाड आणि त्यासाठी रात्रंदिवस झटणारे त्यांचे वेडे मन यांची आपणाला कल्पना येते.

कुटुंबामध्ये बहिण-भावाचे प्रेम हे सर्वात सात्विक आणि तितकेच निर्मल मानले जाते. बहिणीवर कोणतेही संकट आले तरी त्याचे निवारण त्या भावाकडून करण्यात येते. तो भाऊ म्हणजे बहिणीचा लहानपणीचा सोबती असतो. त्याच्यासाठी ती आपला जीव देखील ओवाळून टाकायला मागे पुढे पहात नाही. रक्षाबंधन, भाऊबीज या सणांच्या वेळी डोळ्यात तेल घालून ती त्याची वाट पहात असते. त्या बंधूराजाला मी काय करू आणि काय नको याचे तिला भानच रहात नाही.

दसऱ्यापासून दिवाळी नित्य रोज
बंधू माझ्या राजसाची वाट पहाते नित्य
दिवाळीला बंधू आला त्याला पाट टाकिते चंदनाचा
आज पाडवा दिवस आला बाई सोन्याचा

दिवाळीला आलेला आपला प्रिय बंधू जेव्हा परत त्याच्या गावी परतू लागतो त्यावेळी तिच्या हृदयातील भावना आवरून धरणे तिला शक्य होत नाही. हुंदक्यावर हुंदके देत ती आपला निरोप मातेला व भावंडाना देत असते.

आईला सांग सख्या तुझी लेक आहे सुखी
पण घडीघडी आठवते तुझी मायेची मूर्ती
धाकट्या भैनी भावांची माया माझ्या अतरात
प्रेमाने फुललेला दिसे पारिजात मला परसात

थोडक्यात समाजातील बहिण–भावाचे प्रेम किती शुद्ध पवित्र व तन्मयतेचे असून, एकाच मातेच्या पोटी जन्म घेतलेले ते स्वतःच्या कुल गौरवासाठी कसे झटतात, याचे वर्णन केले आहे. अर्थातच कुलाची शान राखणे हे बहिण भाऊ या दोघांचेही आद्य कर्तव्य आहे.

पति–पत्नि हे समाजातील दोन अविभाज्य घटक आहेत. पत्नि आपल्या अंतःकरणापासून आपल्या पतिवर प्रेम करते. ती पतीवरील प्रेम आपल्या भाळावरील कुकवाने प्रकट करते. पति म्हणजे पत्नीचा प्राण. तसेच पति-पत्नि म्हणजे एकाच रथाची दोन चाके. अथवा एकाच नाण्याच्या दोन बाजू. त्या दोघाना एकमेकांचा

आधार घेऊन संसाररूपी गाडा हाकावा लागतो. तो हाकत असताना कधी कधी संकटे उभी राहतात. पण त्यांना न भिता त्या दोघांनी मिळून संकटावर मात करावी. स्वदेहाच्या सावलीप्रमाणे एकमेकांची साथ सोडू नये. पत्नि आपल्या पतीवरील प्रेम प्रकट करताना म्हणते–

आयुष्य मी चिंतीते माझ्या कपाळीच्या कुंकवाला ।
देवराया पतीदेवाला आयु शंभरावरी घाला ।।
आयुष्य मी चिंतिते माझ्या हिरव्या साडीला
माझ्या कुंकवाच्या धन्याना मंगळसूत्राच्या जोडीला ।
फुलामंदी फूल, फूल जाईच चांगलं
पतिदेव म्हणूनि मला ते ग लाभलं
अखंड सौभाग्याचा ठेवा जपीन मी पती माझा
जपण्यासाठी अरिहंता आशीर्वाद हवा मला तुझा ।।

अर्थात पति-पत्नीच्या या प्रेमामध्ये किती तरी गोडवा आहे. स्वतःचा पति आयुष्यमान व्हावा, त्याचे सानिध्य सतत आपणाला लाभावे म्हणून त्या पत्नीची केवढी खटपट ! केवढी तळमळ ! ! सौभाग्याचा हा अखंड ठेवा सांभाळण्यासाठी ती परमेश्वराजवळ त्याचा आशिर्वाद मागत आहे. केवढा हा निस्वार्थिपणा, केवढा उदारपणा व केवढा त्याग ! भारतीय सस्कृतीचे हे केवढे मोठे द्योतक !

अशा प्रकारे सर्व वर्णनातून प्रामुख्याने सामाजिक, धार्मिक तथा नैतिक स्थितीचे वर्णन करण्यात आले आहे. जैन लोकगीतातील धार्मिकता ही इतर भावाच्यापेक्षा अधिक प्रभावी असून, शेवटी सुखाचा मार्ग तथा मोक्षप्राप्त व्हावा हीच विनंती पुनःपुनः प्रभूचरणी केलेली दिसून येते.

खरोखर या विविध विषयावरील ग्रामीण लोकगीते व लोककथामधून सामाजिक जीवनाचे चित्रण अत्यंत सुंदरपणे रेखाटण्यात आले आहे. लोकगीते म्हणजे समाजाचा जणु आरसा आहे. या लोकगीतारूपी आरशात पाहताच समाजजीवनाचे मुख दृष्टीस पडते. अजूनही ग्रामीण भागात अशा प्रकारची अनेक लोकगीते आहेत. त्या सर्वांचे संकलन करून ती प्रकाशात आणणे अत्यावश्यक आहे. कारण कोणतेही साहित्य हे त्या त्या कालाचे प्रतिनिधीत्त्व करीत असते. या प्रतिनिधीत्वाचे अचूक दर्शन लोकगीताशिवाय तितक्या उत्कटतेने इतर साहित्यातून होऊ शकत नाही.

पुढे इंदूमति मोतिलाल परवत (करकंब) यांनी काही स्वतः रचलेली काही लोकगीते तथा ग्रामीण गीते देण्यात आली आहेत.

आवंदा आलीरं आलीरं जयंती महावीरांची
करूं साजरीरं पंचवीस हज्जारावी ।। धृ ।।

आवंदा आलीरं जयंती महावीरांची
मेघ राजाची किरपा झाली हो झाली । दुष्काळाची ती छाया गेली
धार झरली रं झर झर अमृत खाली । धरती न्हाली रं न्हाली रं आनंदुनी
नद्या नाल्याना आली भरती । जाती भिजूनी शेती माती
पाटापाटान पाजी पानी ऽऽऽ पीक येईल र ऽऽऽ येईल मोत्यावानी
पीक येईल रं ऽ येईल मोत्यावानी ऽऽऽ आवंदा आलीरं आलीरं
जयंती महावीरांची ।। १ ।।

शाळु हरभरा पिकं डुलं हो डुलं । गहूं बाजरी भरपूर आल
झेप घेत्याती पाखर त्यावर भरारी । शाळु हरभरा खाण्या गहू बाजरी
शेतामंदील रास मोत्याची । आनुं भरून मनामनाची
नावं घेऊनी महावीरांची । खाऊं प्वाटभर भाकर आनंदानी
खाऊं प्वाटभर भाकर आनंदाची ऽऽऽ आवंदा आलीरं आलीरं जयंती महावीरांची
करूं साजरी रं पंचवीस हज्जारावी ।। २ ।।

## जात्यावरील ओव्या

शिखरजीच्या पाडावरी अशी उगवली जाईजुई, आम्ही वंदना केल्या पायी ।।
शिखरजीच्या पाडावरी असं उगवलं सोनं, आम्ही वंदना केल्या तीन ।।
शिखरजीची वाट अवघड सांगत्याती, फुलं सोन्याची वाहत्याती ।।
शिखरजीची यात्रा पुण्यवानान केली, पशू योनी चुकविली ।।
शिखरजीला जायला एकीचा नाही लाग, चौकी भिल्लाची जागोजाग ।।
मुक्तागिरीला जाण्याची मला बाई मोठी हौस, प्रभूंच्या पाडावरी पडे केशरी पाऊस ।।
पावापुरीच्या तळ्यामदी राजहंस पोहत्याती, अश्विन अवसेला छत्रं त्रिविध फिरत्याती ।।
पहाटेच्या पान्यामंदी चौघडा वाजतो, महावीर स्वामीजीना निर्वाण लाडू चढतो ।।
चल सये पहाया जाऊ पावापुरीचं तळं, तीथं बावन्न चैताळ ।।
हात मी जोडीते जुन्या अवघड गडाला, गोमटस्वामी महाराज उभे अवघड पाडाला ।।
काय मी सांगु बाई माझ्या स्वप्नांची मात, सोन्याच्या सिंहासनी मी ग देखीले नेमीनाथ ।।
कैलास गिरीवरी जाऊ आपण दर्शनाला, आदिनाथ भगवंत तिथं गेलेत मोक्षाला ।।
देवा मंदी देव शिखरजी केवढा, तिथं पापा-पुण्यांचा निवाडा ।।
जाई जुईची फुलं एरंडाच्या पानात, महावीर भगवंत सखा तेरच्या रानात ।।
चल सये पहावया जाऊ तेरच्या किल्ला, महावीर स्वामी महाराजांनी चिच बनी डेरा दिला,
सभा मंडप जाईचा चिच बनी डेरा दिला ।।
चैत्र तेरशीच्या रात्री कुंडलपुरी का झळकली, जगन्माता त्रिशला राणी धर्मभास्कर प्रसवली ।।
उजेड पडयेला चंद्र सूर्य फिकटलं, महावीर माझं बाळ इंद्रानी लक्षनयनी देखिलं ।।
मेरुगिरीवरूनी दुधाची वाहे नदी, तानुल्या महावीराला नाहू घातलं इंद्रानी ।।
बाळ लेण्याला इंद्रानी रत्न माणिक जडविलं, चंद्रहाराच्या तेजानं तेज त्येचं फिकटलं ।।
इंद्राच्या ऐरावता हर्ष माईना मनात, अंबारी मुक्तीकांत चाले घेऊनी ठेक्यात ।।
वसईला जाता एक पायरी चुकली, देवमाझ्या वीर प्रभूला चंद्रहाराला मी दिपयेली ।।
चल सये पहावया अंतरिक्ष पारसनाथ, शिरपूरामंदी देव अधर शोभत तेथ ।।
आदल्या जन्माचा वैर कमठानं साधीला, सखा माझा पारस पद्मावतीनं तारीला ।।
प्रभूंच्या वरी छाया धरी धरणेंद्र करूनी फणा, डोईवरी घेई पद्मीणी पारस प्रभूना ।।
शिखरजीची वाट विंचवाची वेदना, ऐशी जाती जड पहिली जिन राजाची वंदना ।।
कुंथलगिरीवरी गवडी आहेत कारागीरी, मुक्त झालेत पाडावरी देशभूषण कुलभूषण
मुक्त झालेत पाडावरी ।।
कुंथलगिरीवरी सभामंडप जाईचे, पुत्र विमलबाईचे देशभूषण कुलभूषण पुत्र विमलबाईचे ।।
कुंथलगिरीच्या पाडावरी श्रावक झेंडे करी, देशकुलभूषणाचे शिखर डोंगराच्या वरी ।।

कुंथलगिरीच्या पाडावरी पानां पानांना ताकीत, रथ निघतो रंगीत ॥
अरिहंताच्या देवळात कुणी चढविला वेलदोडा, नित्य वाजतो चौघडा ॥
भोळं माझं पनं भक्ती माझी थोडी, इंदु, विनविते जिनां संकटाला घाल उडी ॥
हात मी जोडीते तुम्या मंदिराच्या कोणी, नेत्र उघड राजा दोन्ही
अरिहंता देवा माझ्या कान उघड राजा दोन्ही ॥
जाईच्या फुलांचा वास सुटला सुंदर, घराशेजारी मंदीर माझ्या अरिहंत देवाचे
घराशेजारी मंदीर ॥
जाईच्या फुलांचा मी ग करीते उगा निगा, हार मी गुंफीते वीर प्रभूच्या गळ्याजोगा ॥
अरिहंताच्या देवळात चांदी सोन्यांच्या घंगाळा, वीर माझ्या प्रभुला नित्य दुधाच्या आंघोळा ॥
अरिहंताच्या देवळात शांत जळतो नंदादीप, सांगती त्रैलोक्याला शांती ठेवावी त्रैलोक्यात ॥
देव अरिहंताचं नांव सोन्याची साखळी, वाट मोक्षाची मोकळी ॥
शिखरजीच्या वाटेवरी लाविले आंवळे, वीस जिनेश्वर माझे मोक्षा गेलेत सांवळे ॥
हात मी जोडिते शेजीच्या दारातुनी, महावीरस्वामी मला पावले तेर तुनी ॥
तेरला बाई गेले गवळ्या घरी झाली दाटी, दूध घेते मी अभिषेका साठी ॥
शिखरजी पाडावरी उधळती लाल माती, रथा मागे बगीयेती माता माझ्या
पद्मोणीची रथामागे बगी येती ॥
अखंड तांदूळ माझ्या ग मुठीला, वीरप्रभूंच्या जाते मी ग दर्शनाला ॥
चल सये पहावया जाऊं रामटेकची वसई, राज्य करत्याती तिथं माझं शांतीनाथ देसाई ॥
अरिहंताच्या देवळात समई जळती अत्तराची, वीरप्रभूंची माझ्या बैठक चातुराची ॥
अरिहंताच्या देवळात ध्वज खावाला घेते टेका, महावीर भगवंत कधी भेटेल प्राणसखा ॥
समवशरणाची शोभा वर्णू मी किती किती, माझ्या प्रभूंच्या सभेला स्वर्गातूनी देव येती ॥
समवशरणामंदी नारायण द्वारपाल, महावीर वाणीचा गणधर अर्थ बोल ॥
समवशरणामंदी नवल घडे बाई, एक कुंडीमंदी गाय-सिहीण पाणी पिई ॥
प्रेमाचा पान्हा पाजी गाय माऊली छाव्याला, सिहीण पान्हा पाजी गाईच्या लेकराला ॥
हात जोडूनी विनंती करिते मी महावीराला, जन्म मृत्यूच्या फेऱ्यातूनी देई मुक्ती इंदुमतीला ॥

## लग्नातील लोकगीते

लग्नाची ग लगन चिट्ठी आली शिखरजीच्या पाडावरी स्वार झालेत झालेत ग घोड्यावरी
अरिहंत भगवत स्वार झालेत घोड्यावरी ॥
लग्नाची लगीन चिट्ठी आधी अरिहंत देवायाला, मग सोयऱ्याच्या, सोयऱ्याच्या गावाला ॥
लग्नाची लगीन चिट्ठी मी ग ठेविते मदिरात, येती लग्नाला लग्नाला अरिहंत ॥
हिरवं पातळ पद्मावतीला नेसवा, कोठी शेजारी बसवा ॥
हिरव्या बांगड्या पद्मावतीला आधी घाला, मग घालाव्या घालाव्या नवरीला ॥
हळद निघाली आधि अरिहंत देवायाला, मग लावावी लावावी नवरीला ॥
शेवंतीच्या फुलांचा हार घालावा अरिहंताला, मग घालावा नवरा नवरीला ॥
लगीन उतरलं अमं मदिरा शेजारी, पाया पडती नवरा नवरी अरिहंत देवाच्या ॥
मांडवाच्या दारी वाजंत्री वाजत्याती, देव अरिहंता अक्षता टाकत्याती ॥
मांडवाच्या दारी आयाराची सोळा ताटं, पातळाचेया जरी काठ ॥

मांडवाच्या ग दारी आमारावरी नथ, जुन्या सोयन्याची सोयन्याची रीत ॥
मांडगवाच्या दारी घागर सांडली तुपायाची, नव नवरीच्या नवरीच्या बापायाची ॥
मांडगवाच्या दारी असा लाविला बाई चांफा, उन लागत लागत वरबापा ॥
मांडगवाच्या दारी अशी लावीली जाई जुई, उन लागत लागत वरमाई ॥
मांडगवाच्या दारी दुरडी सुकली पावायाची, विहीण रूसली रूसली मानायाची ॥
गाडयाच्या मागं गाडया, मधली गाडी ती उभी करा, वरमाईचीया या वटी भरा ॥
गाडयाच्या मागं गाडया, मधली गाडी ती उभी करा, वरमाईला माईला चुडा भरा ॥
पाहुणे आले म्हणू ? काय पाहाता वतनाला, द्यावी मुलगी मुलगी रतनाला ॥
पाहुणे आले म्हणू ? काय पहाता वाडा हुंडा, नवरा अंगठी अंगठी वरला खडा ॥
नवऱ्या परास, आहे नवरी किती गोरी, हिला हळद हळद लावा थोडी ॥
नवरीचा बाप हुंडा मोजीता चुकला, चंद्रहाराला हाराला दीपयेला ॥
नवरीचा बाई बाप पैसा खर्चीतो पाण्यावाणी, उभा राहीला राहीला दीनवाणी ॥
आईबापाचे बाई कष्ट, कष्ट करूनी गेले वाया, लेक देऊनी पडा पाया ॥
रूसला जावई असा सोन्याच्या समईला, तार केलीया केलीया मुंबईला ॥
रूसला जावई सोन्याच्या मुदीसाठी, दिली म्हवर म्हवर उजव्या हाती ॥
रूसला जावई चढना पायरी, कंठी मागतो मागतो दुहेरी ॥
थोरांचा नवरा असा जाईल झाडीतून, सया पहारयात माडीतून ॥
मोत्याची मंडवळी अशी ठेविते परातीत, चला बांधीते बांधीते मंडपात
राजसा बंधुराया तुला बांधीते मंडपात ॥
मोत्याची मंडवळी अशी ठेविते कापसात, नवरा व्हायाचा व्हायाचा वैशाखात ॥
मोत्याची मंडवळी अशी ठेविते तबकात, चल बांधीते वरातीत राजस बंधुराया
चल बांधीते वरातीत ॥
मांडगवाच्या दारी ब्राम्हण करीतो सावधान, नवरी जिंकीतो राजाराम ॥
मांडगवाच्या दारी नवरी कांपती दंड भुजा, तिच्या पाठीशी पाठीशी मामा उभा ॥
मांडगवाच्या दारी नवरी कांपती दंडात, जीरे साखर तोंडात ॥
वरात निघायाली घोडयावरी नवरानवरी, लाजुनी चूर होई चवथीची चंद्रकोरी ॥
चांदण्या रात्रीची अशी वरात शोभा देती, नवरी अंजनी झोपी जाती ॥
नवरा नवरी दारात, नारळ ओवाळी सामुबाई, माप लवंडूनी येई घरची लक्ष्मीबाई ॥
दारात पाऊल अडले नवरीचे, बावऱ्या नजरेचे कांठ पाण्यानं भरले ॥
माझ्या घरच्या लक्ष्मी नको होऊ तू बावरी, नको आणू तू डोळा पाणी होईन मी ग तुझी आई ॥
तुझ्या ग पाऊलानं घर माझं भरलं, दारावर चढव मांडवी फुलवेल ॥
तुझ्या ग स्वागताला दारी उभा सोनचाफा, हंसुनी बोलाविती वाडयाचा कडा कडा ॥
कर आनंदी आनंदान संसार सुखाचा, कधी नाही दिसणार, तुला वारा दुःखाचा ॥
मायेची पाखर घालीन मी तुझ्यावर, जशी घालीते मी, माझ्या लेकीवर ॥
तुझी होईन मी ग आई, तुला घेईन संभाळुन, सांभाळ तु हे घरकुल, धर्म आपुला समजून ॥
कर संसार नेटका, अरिहंताला स्मरून, मुला बाळा शिकव तू महावीराचो शिकवण ॥
कर सर्वाना तू सुखी, सर्वांचे जिंकुनी मन, सासू नव्हे आई म्हणून सांगते मी शिकवण ॥
दोन्ही कुलांचा उद्धार कर तू ग लेको बाई, नाव लौकिकाला चढव सांगते मी तुझी आई ॥

## वहीण भावंडाचे प्रेम

पोटीच्या परास, पाटीची मला गोडी, बंधु माझा भाऊराया, बाळपणाची माझ्या जोडी ॥
पोटीच्या परास, पाटीची आगत, बंधु माझा भाऊराया, बाळपणाची सोबत ॥
पाठीचा बंधुराया, जातो वहीणीच्या गावा, अंगात अगरखा, वटन मागतो नटाया ॥
बारीक माझा गळा, वाऱ्याने ऐकु गेला, बंधु माझ्या राजसाने, घोडा मैदानी उभा केला ॥
दुरूनी ओळखिते, त्याच्या टोपीचा नंबर, बंधु माझ्या राजसाचं, रूप सावळं सुंदर ॥
दसऱ्यापासुनी, दिवाळी नित्य रोज, बंधु माझ्या राजसाची वाट पहाते नित्य रोज ॥
दिवाळीला बंधु आला, त्याला पाट टाकीते चंदनाचा, आज पाडवा दिवस आला बाई सोन्याचा ॥
बंधुच्या भोजनाला, चार प्रकार केले लाडू, सख्या माझ्या राजसा, तुला वासुदी कोठं वाढू ॥
जिलेबी मी केली, भिजवुनी तुपात, आवडीने खा तू सख्या चांदीच्या ताटात ॥
रांगोळी मी काढीते कमळा कमळांची, हाऊस मी करीते लाडक्या बंधवाची ॥
उदवत्या लाविते, भोजना तिनसे साठ, बंधुरायानं शालु दिला, त्याचं चकाकत जरीकाठ ॥
असा दिवाळीचा दिवा, ठेविते मी आड भिंती, भाऊबीजे दिशी वहीण भावाला ओवाळीते ॥
सरली दिपवाळी, भाऊ जाया निघाला, मायेच्या वहीणीचा पदर पाण्यान भिजयेला ॥
बोले बंधु सखा, का ग भैनी डोळं लाल, येईन मी ग म्होरल्या सन, पूस् बधु आधी डोळं ॥
आईला सांग सख्या तुझी लेक आहे सुखी, पन घडी घडी आठवते तुझी मायेची मूर्ती ॥
धाकल्या भैनी भावांची माया माझ्या अंतरात, प्रेमाने फुललेला दिसे पारीजात मला परसात ॥

## रूखवतातील हास्य विनोद

### भाग १ ला

आला आला रूखवत रूखवतावर कांदा, रूखवत आणणाराला खांबाला बांधा ॥
आला आला रूखवत रूखवतावर टाकली परात, विहिण गमावली घरात
पण सकाळी उठून धावली केरात ॥
मांडवाच्या दारी गच खोलगे, विहीणीच्या वेंबीत तीन मण हुलगे ॥
आला आला रूखवत रूखवतावर टाकले तांदूळ, नवरीच्या कुरवलीच्या मागे डुकरांचा गोंधूळ ॥
आला आला रूखवत रूखवतावर टाकल पाव, तीच्या माग डुकुराचा गोंदूळ, तुला ग काय ठाव ॥
आला आला रूखवत रूखवतावर हारला, विहीणी बाईच्या गळ्यात खेटराच्या माळा ॥
आला आला रूखवत रूखवतावर जात, विहीणीच्या वेंबीत मुंगुस पाणी पितं
तर तीन कोस ऐकुं जातं ॥
आला आला रूखवत मांडवाच्या दारी, रूखवतावर कुंकवाचा पुडा, इन मागते चिंतामणी घोडा ॥
चिंतामणी घोड्याची चाल हालकी, इन मागते पालखी ॥
पालखीला चांदीचा खिळा, इन मागते सागवाणी झोपाळा ॥
झोपाळ्याला लावले मोती, इन मागते अंबारीचा हत्ती ॥
अंबारीच्या हत्तीला रेशमाचा कोरडा, इन मागती कोरडा हुरडा ॥
मांडवाच्या दारी शिंद्यपाची पाटी, इनीच्या कपाळाला पडली आठी ॥
आता ही आठी कशानं काढू, बारा भुयाची पालखी धाडू ॥
इन म्हनते मला कशाला पालखी, मी तुळशीच्या फुलावानी हालकी ॥

इनीनं सहज दिली पालखीला मांडी, तर मोडली पालखीची दांडी,
ती निऊन तोलली तर भरली सव्वा खडी ॥
इन आली झडाझडा, वाट नाही बुरूज फोडा ॥

### भाग २ रा

इन बाईला तोंड धुवायला द्या ताब्या, तांब्या पुरना द्या चरवी ! चरवी पुरना द्या हांडा
हांडा पुरना रांजन मांडा ॥
इनबाईला दात टोकराया द्या काडी, काडी पुरना द्या वासा । वासा पुरना तुळई तासा ॥
बारा पायल्याच्या केल्या रोट्या, इन म्हनती लहान मोठ्या ॥
बारा पायल्याच्या केल्या तेलच्या, इन म्हनती कालच्या ॥
बारा पायलीच्या केल्या पोळ्या, इन म्हनती नग शिळ्या ॥
बारा पायलीच्या केल्या वड्या, इनीच्या भाव वंदनी थोड्या ॥
बारा पायलीच्या केल्या शेवाया, इनीच्या भाव बंधनी नेवया ॥
बारा पायलीची केली खीर, इनीला निघना दम धीर ॥
बारा पायल्याचा केला भात, इन धुइना हात ॥
बारा पायल्याचं केलं माडगं, इन म्हनती माजं जेंवण लई दांडगं ॥
तीन खणाची केली चोळी, अद्धर्या खणाची लावली ठुशी,
इनीवाय इनीवाय झाली खुशी तर या मांडवापाशी ॥
आला आला रूखवत रूखवतावर सांगली, दिली असती मोटार पन वाट न्हाई चागली ॥
आला आला रूखवत रूखवतावर पेरू, मोटार द्यावयाची होती आमी कसं बी करू ॥
आला आला रूखवत रूखवतावर दोऱ्याची आटी, नवरदेव रुसला फटफटी साठी ॥
आला आला रूखवत रूखवतावर लसूण, फट फट कुठली जा कैकाडाच्या गाढवावर बसून ॥
आला आला रूखवत रूखवतावर वेगडाचं पान, नवरी दिली छान पण नवरदेव दिसतो ध्यान ॥
आला आला रूखवत रूखवतावर तुरी, नवरी दिसते बरी पण नांदल तवा खरी ॥

**मुलीची पाठवणी**

### माझ्या लाडक्याग लेकी

माझ्या लाडक्या ग लेकी, येग जरा ऐक ऐक, येग जरा टेक टेक दिवापाशी ॥ धृ
माझ्या लाडक्या ग लेकी, सांज वात लाव, घेग उखाण्यात नांव ॥ जावयाचे ॥
कोकरू वेडे माझे कालची सान पोर, मांडवात झाली थोर ॥ कुलवधू ॥
माझ्या लाडक्या ग लेकी, नये धरू फार हेका, संसार हा बहू बाका ॥ रणांगण ॥
माझ्या लाडक्या ग लेकी, जरी झाला हिरमोड, मानुनिया घ्यावे गोड ॥ घरी दारी ॥
माझ्या लाडक्या ग लेकी, सांगु किती आणीक कसे, आज्या पणजांचे ठसे ॥ मनावर ॥
माझ्या लाडक्या ग लेकी, नये करू दुरूत्तर, तुझ्या प्रेमाचे अत्तर ॥ दरवळू दे ॥
संभाळून रहायचे ओळखून ग पायरी, जप आपुली कोयरी ॥ जिवप्राण ॥
काम धाम करिताना तुझी विसर पदवी, नको गाजवू यादवी ॥ स्वप्नातही ॥
भावा वहिणीच्या परी, दीर नणंदाना मान, वाग फुलू दे ग छान ॥ संसाराची ॥
उणे दुणे ऐकताना, नको पाणी काढू बाई, रागावत होती आई ॥ माहेरीही ॥

पाठीनाही असती डोळे, कान भितीचे उघडे, जगाला या दोन तोंडे ॥ ठेव ध्यानीं ॥
लाडक्या ग लेकी तुला, नये कांही कमी पडू, आयुष्याची गोड कडू ॥ घोट घेता ॥
खास तुझ्या माणसाचे, संभाळ हो तन मन, प्रणयाचे सिंहासन ॥ एकमेका ॥
माझ्या लाडक्या ग लेकी ? वसुंधरा चांदण्याने, हिरकणी कोंदणाने ॥ शोभे बाई ॥
सासु सासऱ्यांची माया, छाया शिरी आपोआप, दोघांचेही मायबाप ॥ एक आता ॥

## पत्नीचे पतीवरील प्रेम कपाळीच्या कुंकवाने प्रकट केले आहे

अरिहंतदेवा तुम्हा, सोन्याचं कमळ, हळदीवरी कुंकू, कर पतीदेवाच सांभाळ ॥
अरिहंत देवावरी इंद्र ढाळीती चवऱ्या, दर्शन घेण्यासाठी जोडीने मी चढीते पायऱ्या ॥
शिखरजी करायाची, संगे घेऊनी पतीराज, वंदना करीता, मिळे त्रिलोकीय राज ॥
पुष्पाचं गाठोडं, बांधीते मी आनंदानं, देव माझ्या अरिहंताचं पूजन करीते जोडीनं ॥
अरिहंताच्या देवळात, मीग गेले सभागती, चढविलं नारळ, संग घेऊनी ग पती ॥
अरिहंताच्या देवळात, मीग गेले दर्शनाला, हळदीग वरी कुंकू, हळदी कुंकाचा लाभ झाला ॥
अरिहंताच्या देवळात उभी होते मी एकाकोनी, मला प्रसाद आले दोन्ही, हळदी वरी कुंकू मला प्रसाद आले दोन्ही ॥
अरिहंताच्या देवळात मीग गेले सभागती, माता माझी ती पद्मावती, करंडी ग कुंकू लेती उरलेल मला देती ॥
आयुष्य मी चिंतीते माझ्या कपाळीच्या कुंकवाला, देवराया पतीदेवाला आयु शंभरावरी घाला ॥
आयुष्य मी चिंतीते माझ्या हिरव्या साडीला, माझ्या कुंकवाच्या धन्याला, मंगळसूत्राच्या जोडीला ॥
आयुष्य मी चिंतीते मणी डोरलं कानी फुलं, हळदीवरी कुंकू माझ्या कपाळी चंद्रफुल ॥
माय माऊली परीस सासुबाईचं उपकार, पती देव मला दिलं गळ्यांचा चंद्रहार ॥
फुलामंदी फुल फुल जाईच चांगल, पतीदेव म्हनुनी मला ते ग लाभलं, ॥
लाखातलं भाग्य, मला बाई लाभलं जपीन मी ग त्याला, मोल देऊनी अनमोल ॥
अखंड सौभाग्याचा ठेवा जपीन मी पती माझा, जपण्यासाठी अरिहंता, आशिर्वाद द्यावा मला तुझा ॥

## विहीण

अहो अहो विहीणी बाई, मी तर कांही मागत नाही ॥
मी तर मागते थोड, थोड जावयाच्या कंठीकडं ॥
कंठी कड्याची हौस मोठी नवरीला चिचपेटी ॥
चिचपेटीच्या कड्या रुद, नवरीला बाजु बद ॥
बाजु बदाला गोंडे लाल, नवरीला हिरवी शाल ॥
हिरव्या शालीच्या दशा काळ्या, नवरीला वेल वाळ्या ॥
वेलवाळ्याचे मोती खोटे, जावयाचे हत्ती मोठे ॥
हत्तीवरी अंबारी, नवरा नवरी चालले घरी ॥
बाप पहातो दारातूनी, आई पहाते खिडकीतूनी ॥
भाऊ पहातो परसातूनी, ज्याची होती त्याने नेली, आईची माया व्यर्थ गेली ॥

## लगीन घाई

तोरण बांधीयले स्वागता गणराज, मंदाताईच्या लग्नाचा माडव गोरेंवाज ॥
सांडगे पापडात रमल्या डाळी, साळी, कौतुक करायला जमली उभी आळी ॥
पाखडाग बायानो तांदूळ पाखडा, मंदाताईना आमुच्या नवरा मिळाला फाकडा ॥
वळाग भावजयानो लग्नाचे गव्हले वळा, नवरीच्या अंगावर चढू द्या सोनकळा ॥
किती व्हायचे ग काम फेण्या मालत्या बोटवे, मंदाची हृदयी आनदाचे ताटवे ॥
घाई कराग बायानो दिस राहिलेत थोडे, मंदाला आमुच्या कुणी केलेग वेडे ॥
अंगणी उडे घूम उठबस पाहुण्यांची, थट्टा गोड चाललेली प्रेमळ मेहुण्यांचा ॥
केळीच्या पिपाणीत रंगवल्या करवल्या, स्वप्नांत सनईच्या मंदाताई हरवल्या ॥
केतकीच्या हातामधे भरला लगीन चुडा, मंडवळी बांधावी गोऱ्या गोऱ्या भाळा ॥

## विहीणी बाईचा रूसवा

रूसली विहीण घेईना खांडपान, सर्वांना मागती आपुला पहीला मान ॥
रूसली विहीण येईना जेवायला, पाय धुयाला घंगाळ, चौरंग आणा बसायाला ॥
रूसली विहीण, धुईना हात पाय, हात जोडूनी विनवी नवऱ्या मुलीची माय ॥
उठा उठा विहीणीबाई नका तुम्ही रूसूं, पायघड्या घालीन, लागा वधु हाता हसूं ॥
पंचपक्वान्न करीन तुम्हाला भोजनाला, चंदनाचा पाट चांदीच ताट देईन भोजनाला ॥
उदवत्या रांगोळ्यांची करीन मी आरास, सोन्यांच्या तांब्यावरी देईन सोन्याचा गल्लास ॥
पोट झांकणीला घेईन हज्जाराची पैठणी, उशीर कित्ती झाला उठा उठा विहीणी ॥
करीन सारा मान पान, कुठ नाही पडू द्यायची उण, सर्व द्याया पाहीजे माता पित्यान
जीवाचं करून रान ॥
जावयाना देईन नवरत्नांचा रत्नहार पन माझा संभाळा काळजाचा चंद्रहार ॥
विहीणीबाई विनविते संभाळा माझी सरी, तुमच्या पोपटवर माझ्या मैनला घाला न्हचारी ॥
इवायाला करीते सांजा जावयाला तूप ताजं, विहीणीबाई सागते तिथ काळीज दिलं माजं ॥
हुड माझी लाडकी लेक चुकलं जर तिचं कांही, तीला संभाळुनी घ्यावं हीच विनंती विहीणीबाई ॥
कामाचं, धर्माचं शिक्षण मी हो दिलं छान, संसार नेटका करील सर्वांची मन राखून ॥
हाताचा पाळणा दिव्याचा मी करून दिवा, बारा वर्स संभाळला माझ्या काळजाचा ठेवा ॥
इतकीदी होता माझा आता व झाला तुमचा, सोन्यासाठी चिंधी जपा तुकडा माझ्या काळजाचा ॥
बायकांचा जलम माय बापा माया लावायाचा, मायेचे पाश तोडून दोन कुळा उद्धारायचा ॥
शालीनता नम्रता शिकविली रत्नत्रयाचा साज दिला, शील भरजरी अलंकार
नटविली लाडक्या लेकीला ॥
लाडकी माझी देताना माझ्या डोळ्यांना लागे धार, दर सनाला माहेरी धाडा
येवढा तरी करा उपकार ॥
दर सनाला विहीणीबाई माझा वयास अडल, लाडकी लेक सोडून गोड मला कसा खावबेल ? ॥
लाडक्या माझ्या लेकीला माया लावाल ममतेन, असं मला वाटतं तुमच्या प्रेमाच्या नजरेनं ॥
उठा उठा विहीणीबाई सारी पंगत खोळंबली, बसा चवरंगावरी पाय धुते मी घंगाळी ॥
चला आनंदाने जेऊ या घेऊनी नांव अरिहंताच, होईल कल्याण नांव घेता अरिहंताच ॥
अरिहंताच्या किरपेमुळं दोन्ही कुल एक झाली, तुमच्या घरी देऊन लेक माझी भाग्य झाली ॥
दोन्ही कुलाच नांव उजवील लेक माझी, स्मरूनी अरिहंताला करील ससार भोळी माझी ॥

## डोहाळे

नवीन तऱ्हेचे नवीन डोहाळे कथिले सितेला,
राम पुसितो सितेला काय हवे तुजला, लहान वदन तव दिसते कांती आज काल मजला ॥
मम मातेची कुरकुर घरची नच माये तुजला, हवेगिर मी बंगला ठरवितो पहिल्या तारखेला ॥
लाईट विजेची टेलीफोनाची शोभा मग त्याला, नवीन तऱ्हेचे नवीन डोहाळे कथिले भगिनीला ॥
सर्जन डॉक्टर आणूनि तुजला आजच दाखवितो, हवा बदलण्या हवे असेल तर सुट्टी मग घेतो ॥
केली परिक्षा सर्व रितीने मालती बाईची, घाबरण्याचे कारण नाही गोष्ट आनंदाची ॥
थर्मा लाऊनि नित्य पाहात जा नाजूक तनयेला, हवा बदलण्या घेऊनि जावे नैनीतालेला ॥
नित्य सकाळी फळे देत जा डोळे दुखण्याला, साज सकाळी चहा देत जा मधल्या वेळेला ॥
अन्नाचा तो स्पर्श नसे तो दूधच पिण्याला, नाना तऱ्हेचे फळे देत जा बिस्किट खाण्याला ॥
तारीख तेथे बंगला ठरवूनी जाऊनि ती राहाती, दिवसा दिवस आराम पडला लाली तव कांती ॥
मास पाचवा लागे आता आनंदित होती, येण्याचा तो विचार करती आपल्या गावासी ॥
माधव मालती हर्ष भराती भेटती सर्वांना, काय आवडे सांगे प्रिये मग पूरविन हौसेने ॥
लाडकी पुन्हा ती मंजूळ वाणी बोलती पतिला, बारीक हलका बल मोत्याचा शालू गडे आणवा ॥
मोत्याचा मग गजरा करावा मोस्व मधी भरावा, गळचा आवडे मोहन माळ प्रियकर हो मजला ॥
आले मेव्हणे रमेशराव ते भगिनीस नेण्याला, वृद्ध पित्याला आई बापाला नच पुसिती त्यांना ॥
सेकंडक्लासचे तिकिट काढूनी बसविले मालतीला, सागे घडोघडी समजाऊनि पत्रच लिहीण्याला ॥
नऊ मास ते पूर्णच झाले प्रसूत ति झाली, नर्स मेळाची गर्दी झाली तेथे बहु जमली ॥
रत्न पुत्र ते पाहूनि नयनी हर्ष बहु झाला, बोलाविती वृद्ध पित्याला यावे बारशाला ॥
कांतकुमार नांव ठेविले पाळणा हालविला ॥

## ग्रामीण गीते

वीराच्या रे वीर वीरा, रवीच्यारे रवीराजा । माझा नमस्कार तुला, त्रिलोकाच्या त्रिलोकराजा ॥
मोठं मोठं पंडीत, गुण गाता थकयेलं । इंदु म्हणे तुज वीरा, गुण गाऊ वाटयेलं ॥
पच वीस हज्जाराबी, जयंती ही महावीराची । करा साजरी आनंदाची, सधी मोशाला जायायाची ॥
सारी पिरती नटयेली, नवा साज लेवुयानी । स्वागत ग करतुया, कोकीळ कुहू करुयानी ॥
वृक्षराजांची वृक्षवल्ली, फळा फुल्यानी लवडली । बाळ माझ्या महावीरा, जनु पहान्या थवकली ॥
झाला आनंदी आनंद, आनद पोटात माईना । वारा धावतुया सैरावैरा, आनंदाची वार्ता देन्या ॥
तेजःपुंज रवी पाही, तेज वीराचं तेजःपुंज । डोळं गेल दिपुयानी, तेच तेजं बघुयानी ॥
लख्ख परकास पडयेला, पिरमीच्या कोना कोनी । न्हाऊनिया निघायाली, आनंदानी धरनी ॥
कुंडल ग पुरीकंदी, चैताच्या ग तेरशीला । पिरतिमीचा लाल माझा, महावीर जल्मला ॥
त्रिशलेच्या महालामंदी, चंद्र बाई उगवला । चंदेरी ग चांदण्यात, चंद्रहार चमकला ॥
पिता सिद्धारथ राजा, माता त्रिशलादेवी रानी । जलम देऊनी महावीरा, धन्य झाली त्रिभुवनी ॥
हरसुनी पाही त्रिशला, काळजाच्या घडयाला । चुंबं चुंबुनी ग चुंबी, पिरतीमिच्या लालाला ॥
राजा पाही पुत्रमुख, सान्या पिरती पिचं मुख । बघुन हुइना समाधान, म्हनुन चुंबी तिनदा मुख ॥
राजा बाई वाटी होत, कुनी हत्तीवरून साखयेर । लेजीम ग खेळुयानी, नाचत्याती पोरं ठोरं ॥
हसुनीया हंसवी हीरा, राजसीचा राजहंस । सांगे जगाला मंदी, पोहे मनीचा राजहंस ॥

धडुनिया पाही इद्र, अमरपुरीत अमृतलाल । त्रिशलेच्या कुळी मंदी, त्येला घावला माझा लाल ॥
लाल माझा पाहुयानी, डोळ त्येचं दिपयेल । समाधान हुइना म्हनुन, लक्ष नयन लावियलं ॥
चुंबुनी ग चुबुयानी, आंगी खांदी खेळविला । आनंदुनी इंद्रराजा, घुगुरू बांधुनी नाचयेला ॥
ऐरावत नटयेला, बाळ नेण्या अंबारीत । डुलत चाले गजराज, कसा ऐटीत ठेवयायात ॥
गेरूगीरी बाळ नेला, पांडुशिला निजविला । क्षीर नीर जल दधिने, बाळ न्हाहु घातीयला ॥
दुधाची ग वाहे नदी, बाळाच्या ग अगावरी । बाळ माझा भोळा नाही, वीर ठरला जगामंदी ॥
इवल्याश्या मुट्टी मंदी, विश्वाची ग सारी दावतो । शक्ती मागे वावे भक्ती, मिळविण्या बाई मुक्ती ॥
अगडचा ग टोपड्याला, रत्न लाविल नीलमणी । बाळाला ग बाळ लेणं, घाली हौसन इंद्रायणी ॥
दंडात ग बाजुबंद, कानात ग लाल डूल । परी त्याच्या मंदी शोभे, माझं गुलाबाच फूल ॥
हाता मंदी मनगटी, पाया मंदी वाजं वाळं । घुंगुराच्या नादामंदी, बाळ माझं खेळ खेळ ॥
अविनाशी खेळ पाही, इंद्र इंद्राणी कौतुकानं । दृष्ट हुइल म्हनुनशानी, तिन झाकीला पदरानं ॥
बाळाला ग बाळलेणं, टोपड्याला पिंपळपान । घालुनि ग सजविल, छकुल माझं गोरपान ॥
नवरत्नाचा बाई हार, गळ्या मंदी शोभा देतो । पन् इंद्राचा इंद्र राजा, चंद्रहाराला दिपयेतो ॥
सोनीयाचा पाळयेणा, रत्नांचा ग खेळयेणा । आतमंदी निजविला, बाळ माझा देखयेणा ॥
महावीर नाव ठिवुनी, निजविलं त्रिशला कुशी । चमचम चमकली, तवा कुंडल नगयेरी ॥
त्रिशलेच्या महालामंदी, लख्ख परकाश पडयेला । रवी भास्कर वीर राजांचं, तेज बघुनी फिकटला ॥
महावीरांची जयंती आली, उठा बायानुं घाला सडा । गुढ्या तोरणं बांधुयानी, तुमी वाजवा चवघडा ॥
बाळाच्या ग स्वागताला, वसुंधरा नटयेली । तानावरी तान घेऊनी, पाखरं गाऊ लागयेली ॥
नवं लुगडं नेसुयानी, दागदागिनं घालुयानी । नटुन सजुन या ग तुमी, वीर पहान्यां मिळुयानी ॥
सोनीयाचा पाळयेणा, मोत्यानं ग गुंफियला । रेशमाची लाल दोरी, त्रिशला हलवी त्रैलोक्याला ॥
मऊ शय्यी बाळा निजवुं, रूप देखणं चला पाहुं । फुलं बाळावरी उधळुं, नाना रंगी गीत गाऊं ॥
तेजाळ ग बाळायाला, नका बघुं हावऱ्यावानी । तेजं तेचं बघुयानी, डोळं जात्यालं दिपुयानी ॥
राजपिंड राजसाला, नका बघु निरखुनी । दृष्ट हुइल म्हनुनशान, डोळं घ्या ग झाकुयानी ॥
दृष्ट मी ग काढीते, मीठ म्हवरी मिरची । दृष्ट का ग लागयेली, चंद्रहाराला कुणायाची ॥
दृष्ट मी ग काढीते, विस बदाचा एक वाफा । सिद्धारथ, महावीर, दृष्ट झालीया बाप-लेका ॥
सोन्याची ग अगयेठी, गोऱ्या हाताला दिसयेना । गोऱ्या माझ्या गोरट्याला, दृष्ट झाल्याली सोसयेना ॥
चुंब चुंबुनी ग बाळा, नका करूं बेजायार । सानुलं ग सोनुलं ग, सुकल माझं सुकुमार ॥
विश्वाचा ग पाळयेणा, चांदोबाचा खेळयेणा । आत खेळे विश्वशांती, विश्वाचा ग विश्वराणा ॥
वसुंधरा हळुं हलवी, झुलवी झुला निशाराणी । निर्झरणी गाई गाणी, सगे घेऊनी उषाराणी ॥
हळु हळु द्या ग झोका, तीन लोकीच्या राजायाला । महावीर बाळायाला, मुक्तीरमेच्या कांतायाला ॥
आया बायानु या ग तुम्ही, वटी भरा त्रिशलेची । आंबा, केळी, सिताफळ, भरा खणा नारळाची ॥
वर्धमान महावीर, सन्मती ग अतीवीर । त्रिशलेच्या हुकुमापरमान, नांव ठेवु या ग वीर ॥
प्रभात ग फेरीमंदी, वीर जय जयकार करा । जय जयकार करूनिया, चुकवा चौऱ्यांशीचा फेरा ॥
सत्य अहिंसेचा संदेश, देतो प्रभु जगामंदी । वीर संदेश ठेवा मनी, इसरू नका त्याला कंदी ॥
हेवा दावा नका करू, नका दुखवुं कुनाचं मन । धरा तुमी ध्यानामंदी, महावीरांची शिकवण ॥
करा जीवावरी पिरत, नका मारू कुना जीव । अपुला तसा त्येचा जीव, हेच ध्यानी धरायावं ॥
अभिमान नका करू, कुलाचा अन् रूपायाचा । धनाचा अन् विद्येचा, सांगे माझा वीर राजा ॥
पैसा आडका सोनं नानं, जमीन जुमला पोरं बाळं । नाटक याचा चालतसे, तीन दिवसाचा बाई खेळं ॥

एकल्यानं यायचं, एकल्यानं जायाचं । सर्व सोडून जायाचं, म्हनून नांव घ्या ग महावीरांचं ॥
महावीरांचं नांव घेता, पापभार हलका होई । आत्मा तुमचा हलका होऊनी, मुक्तीपदाला ग जाई ॥
तिर्थंकर चक्रवर्ती, राजे आणि महाराजे । संसार सोडुनी घेतली दिक्षा, सार्थक करण्या जलमाचे ॥
सम्यक्‌दर्शन ज्ञानचारीत, मुक्त होण्याची आहे शिडी । मार्ग दावुनी मुक्त झाले, माझे महावीर स्वामी ॥
कुनी करलं जगामंदी, महावीर स्वमीचं स्मरयेणं । आपोआप त्येच चुकल, जगामंदील येणं जाणं ॥
किती किती गुण लिहूं ? लिहीता लिहीता सरत न्हाई । समिंदराची केली शाई, पिरतीमिचा कागुद पुरत न्हाई
गुण तुझं लिहुन लिहुन, हात मझं थकयेलं । ज्ञान शक्ती भक्ती देई, आणि मुक्ती इंदु बोलं ॥
किती किती तुला बघु ?; बघुन समाधान हुईना । तुजं रूपं बघण्या वीरा, दोन डोळ पुरयेना ॥
किती किती गुण गाऊ ? गाता गाता सरयेना । इंदु म्हणे द्यावा थारा, महावीरा तुमच्या चरना ॥

## श्री १००८ प्रभू महावीरांचा पाळणा

### " भरा ग सुवासिनी ओटी "

( चाल— ब्रह्मा, विष्णू आणि महेश्वर )

कुंडलपुरी महावीर जन्मले त्रिशलेच्या पोटी, भरा ग सुवासिनी ओटी ॥ धृ
अमरपुरीचा साज हरपला, धुडिती सुरगण अमरपुरीला,
त्रिशलेने तो शोधुनि दिधला जन-पुजेसाठी, भरा ग सुवासिनी ओटी ॥ १
माता त्रिशला, नृप सिद्धार्थ, जीवन झाले त्याचे सार्थ ।
हिंदोळ्यामधि निजवुनि प्रभुला, पुण्य भरा गाठी ॥ भरा ग ॥ २
चला चला ग मेरु गिरीवर, स्यापन करू प्रभु पाडुशिलेवर, ।
आनंदाने अभिषेकही करु, पापराशी पळती ॥ भरा ग ॥ ३
हर्ष भरे बाळाला झुलवु, नयन मनोहर स्वरूप पाहू ।
गीत गाऊनी प्रमुदित होऊ, दिव्य सुखासाठी ॥ भरा ग ॥ ४
मृदु शय्येवर बाळा निजवू, सुमन सुगंधे प्रभुला रिझवू ।
महावीर शुभ नाव ही ठेवू, करू नका दाटी ॥ भरा ग ॥ ५
महावीर पाळणा म्हणाया, पापाच्या राशी टाळाया ।
'इंदु म्हणे सर्वांना या या' प्रभू बघण्यासाठी ॥ भरा ग ॥ ६
कुंडलपुरी महावीर जन्मले, त्रिशलेच्या पोटी, भरा ग सुवासिनी ओटी ॥

नमस्तुते नमस्तुते महावीर नाथा अनाथाच्या नाथा
त्रिवार वंदन करितो आम्ही, पदी ठेऊनी माथा, पदी ठेऊनी माथा ॥ नमस्तुते ॥ धृ
कैवल्याची ज्ञानज्योत तू, तेज पुंज रवी तू, तव तेजाने त्रिलोक न्हाले
चमचम लखलखले, वंदे जिनवरम् त्रयगुण भूपितं, नमस्तुते नमस्तुते नमस्तुते ॥ १
मुक्तीची चैतन्यमुर्ती अरिहंत, सिद्ध प्रभु तू, तव स्मरणाने अनंत ज्योती
मुक्तीपदा जाती, मुक्तीपदा जाती, वंदे जिनवरम्, त्रयगुणभूपितं, नमस्तुते नमस्तुते ॥ २
जाई जुई मचकुंद बकुली, गुलाब शेवंती तशी मालती
घेऊनी हाती, अर्पू पदांवरती, वंदे जिनवरम् त्रयगुणभूपितं, नमस्तुते नमस्तुते ॥ ३
मोक्षलक्ष्मी ही तुझीच रूपे, तुलाच शोभविती, तुजसम द्यावी मजसी मुक्ती
विनवी इंदुमती, विनवी इंदुमती, वंदे जिनवरम्, त्रयगुणभूपितं ॥ ४
नमस्तुते, नमस्तुते महावीर नाथा अनाथाच्या नाथा, त्रिवार वंदन करितो आम्ही पदि ठेऊनी माथा

## तुझे रूप पहाण्यासाठी शतनेत्र लाभू दे रेऽऽऽ

( चाल :– तुझे गीत गाण्यासाठी सूर लावूं दे रे )

तुझे रूप पहाण्यासाठी शत नेत्र लाभु देरे, तुझे रूप पहाण्यासाठी ।।
तेज.पुंज तव किरणांनी नयन दीपती हे, साठवू स्वरूप कसे हृदय मंदीरा रे
लक्ष लक्ष नयनागधुनी तुला पाहूं देऽऽरेऽऽऽ, तुझे रूप पहाण्यासाठी ।।
अनंत शक्ती अनंत ज्ञानी, अनंताच्या नाथा, "महावीर" देवा नाथा, अनाथाच्या नाथा
जोडुनी करकमली माथा, तव पदी ठेवू दे रेऽऽऽ, तुझे रूप पहाण्यासाठी ।।
अनंत जन्मी अनंत दु.खे, भोगीली अनंत, नच उपमा त्या दुःखा ते अनंतात नाथ,
विंदु विंदु चैतन्याचा तुला वाहूं दे रे, तुझे रूप पहाण्यासाठी ।।
अंत रंग तव तेजाने, लख्ख उजळूं देऽऽऽ, रोम रोमी स्वर लहरी ही स्वतन गाऊं देऽऽरेऽऽऽ
चिंतनात तव तेजाच्या मला न्हाऊं दे रेऽऽऽ तुझे रूप पहाण्यासाठी ।।
एक एक आयुष्याचा क्षण वेचिताना, आणि ज्ञान होण्यासाठी ज्योत जागताना
आत्म ज्योत तव ज्योती सम मुक्त होऊ देऽऽरेऽऽ, तुझे रूप पहाण्यासाठी शत नेत्र लाभू दे रे ।।
तुझे रूप पहाण्यासाठी ।।

## महावीर जन्मास आला

कशी सांगु मी सांगु तुम्हाला आज महावीर जन्मास आला ।
रत्ने उधळू चला फुले वेचू चला हार गुंफुनी वाळ सजविण्याला, आज महावीर जन्मास आला ।।
तेरशीच्या राती ग, त्रिशलेच्या पोटी, वीर प्रभु जन्मले, निजवुनी झुल्यात
झोका देऊ तालात घुंगुर छुम छुमले, कशी सागु मी सागु तुम्हाला ।।
नयन रम्य मुरती भान हरपे पाहुनी, चुंब चुंबनी तृप्ती न होई
नाव ठेवू महावीर, वर्धमान अती वीर, वीराला नावे किती ।।
वसुंधरा नटली ग नवा साज ल्याली, फळा फुलांनी डंवरली
मोदे हंसुनी नाचुनी गाऊनी, कोकील करी कुजनाला, आज महावीर जन्मास आला ।।



# आधुनिक विज्ञान व जैनधर्म

## अर्घ्य ६ वा

या खंडात जैन धर्माची वैज्ञानिकता स्पष्ट केलेली आहे. जैन धर्माने नुसतेच तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातच असामान्यस्थान मिळविले असे नाही तर, आधिभौतिकेबरोबरच भौतिक ज्ञानाविषयीही मूलभूत सिद्धांत मांडण्याचे कार्य केलेले आहे. या खंडात जैनधर्माने सांगितलेले मूलभूत विचार, आधुनिक काळातील पदार्थविज्ञान, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, गणितशास्त्र, शरीरशास्त्र, जीवशास्त्र इत्यादी प्रगत विषयांतील मूलभूत सिद्धांताप्रमाणेच कसे यथार्थ असल्याचे दिसते हे तुलनात्मक-दृष्ट्या दाखविले आहे. याशिवाय जैनधर्माने कांही शास्त्रांच्या बाबतीत आधुनिक संशोधनापेक्षाही कशी प्रगत माहिती दिली आहे हेही या खंडात स्पष्ट केले आहे. या खंडाच्या वाचनाने 'जैनधर्म हा एक आचार-प्रणालीला किंवा तत्त्वज्ञानालाच महत्त्व देणारा धर्म नव्हता तर त्यातील प्रत्येक आचार व विचार विज्ञाना-धिष्ठित होता' असे दिसून येईल. आधुनिक समाजशास्त्रांतर्गत कांही शास्त्राच्या बाबतीतही जैनधर्माचे कार्य कसे मूलभूत होते हे वाचकांना या खंडातील 'जैन राज्यशास्त्र, जैन भूगोल, जैन आयुर्वेद' इत्यादी लेखांचे वाचन केल्यानंतर जाणवेल.

# पदार्थ विज्ञान व जैन धर्म

आजचे युग विज्ञानयुग आहे. मनुष्य प्रत्येक गोष्ट विज्ञानाच्या कसोटीला उतरते किंवा नाही हे पहातो. त्याला 'जैन दर्शन' देखील अर्थातच अपवाद नाही. एके काळी दर्शन आणि विज्ञान परस्पर विरुद्ध आहेत अशी समजूत होती. पण त्याचे मूळ कारण अज्ञान होते. आज हा विरोध कमी होत आहे. Science is blind without religion and religion is lame without Science ( विज्ञान हे धर्माच्या अभावी आंधळे आणि धर्म विज्ञानाच्या अभावी लंगडे आहे ).

'दर्शन' आणि 'विज्ञान' या दोघांचे ध्येय एकच. ते म्हणजे सत्याचा शोध घेते. थोडा फरक आहे तो असा की, दर्शन आपले तत्व त्रिकालाबाधित मानते, तर विज्ञान प्रयोगाद्वारे जे सिद्ध होईल ते सत्य मानते. प्रयोगावस्था ही केव्हाही अपूर्णच असू शकेल. पण याचा अर्थ असा नव्हे अपूर्ण रहातात म्हणून प्रयोग करूच नयेत. विज्ञानाच्या इतिहासात कांही वेळा परस्पर विरोध आढळून येतो. टॉलेमी या शास्त्रज्ञाने खगोलाविषयी जे सिद्धांत मांडले ते कोपरनिकस या शास्त्रज्ञाने मोडले ( असत्य सिद्ध केले ). प्रो. आइन्स्टाइनने सापेक्षवादाने त्यालाही वेगळीच दिशा दिली. न्यूटनचे गुरुत्वाकर्षण देखील सापेक्षवादापुढे निष्प्रभ ठरले. डॉ. ए डब्ल्यू. बॅरट हा शास्त्रज्ञ स्पष्ट म्हणतो की, "Science is a series of approximotuous to the truth; at no stage do we claim to have reached finality; any theory is liable to revision in the light of new facts."[1] हे खरेही आहे कारण सर्वांगीण सत्याची अनुभूति सर्वज्ञ आत्म्यासच शक्य आहे. एक वैज्ञानिक दर्शनावर त्याच अंशापर्यंत विश्वास ठेवील जितक्या अंशापर्यंत दर्शन प्रयोगसिद्ध असेल. पूर्वीपेक्षा आज भौतिकता वाढलेली दिसते. त्यामुळे दर्शनावर असावी अशी श्रद्धा दिसत नाही. कारण भौतिकता बाह्य वस्तुत केन्द्रित झाली आहे तर दर्शन आत्मतत्त्वप्रधान आहे. थोडासा विरोधाभास सोडला तर विज्ञानाची जी प्रगति आहे ती दर्शनाला पूरकच आहे असे म्हणावे लागेल. कारण शास्त्रज्ञांनी प्रयोगाद्वारे सिद्ध केले. तत्त्वदर्शन साहित्याशी पडताळून पाहिल्यावर बरोबर वाटते. जैन दर्शनाशी असे अनेक शोध बरोबर उतरतात. फरक एवढाच की, विज्ञानाने सिद्ध केल्यावर मग आपण म्हणतो, "हे आमच्या दर्शनशास्त्रात आहे." वास्तविक दर्शन साहित्याप्रमाणे विज्ञानाने प्रयोग करावेत आणि सत्याची खात्री करून घ्यावी. पण जैन दर्शनाचा तौलनिक अभ्यास जगापुढे येईल तेव्हां ना ?

हे कांही जरी असले तरी सद्यःस्थिति जेम्से जीन्सच्या शब्दात अशी आहे, "The border land territory between physics and philosophy which used to seem so dull but suddenly becomes so interesting and important through recent development of theoretical Physics.[2] ( Physics & Philosophy, Foreword.)

जैनाचार्यांनी साहित्याच्या सर्व क्षेत्रात प्रचंड ग्रंथ निर्मिती केली आहे; त्यावरूनच आपण म्हणू शकतो, "Jainism then, is the scientific religion discussed and disclosed by man for the benefit of man and the advantage of all other living beings."- जीवन आणि विश्व यांच्या अनंत रहस्याचे विवेचन जैनाचार्यांनी वैज्ञानिक पृष्ठभूमीवर केलेले आहे. विज्ञान, रसायन, जीवशास्त्र, ज्योतिर्विज्ञान, गणित, काव्य, व्याकरण इत्यादि सर्व क्षेत्रात सुसंबद्ध व विपुल ग्रंथरचना आहे.

११ अंग व १४ पूर्व ज्ञानाचा महासागर आहे. विद्यानुवाद पूर्वात व्यजन, अग, स्वर, भौम, छिन्न, अन्तरिक्ष, लक्षण व स्वप्न यांचे सविस्तर वर्णन आहे. परिकर्ममध्ये चंद्र, सूर्य, नक्षत्र इ. संबंधी; कल्याणवाद पूर्वामध्ये चान्द्र नक्षत्र, सौर नक्षत्र, मुहूर्त इ. संबंधी; प्रश्न व्याकरण अंगामध्ये मुष्ठिकाज्ञान प्रश्न, मूक प्रश्न इ.

1. Cosmalogy old & New Prologue Pr. III २. जैनदर्शन और आधुनिक विज्ञान मुनि नगराजजी पृ. ९७.




संबंधी आणि प्राणवाद पूर्वामध्ये अष्टांग आयुर्वेदाचे विस्ताराने वर्णन आहे. सर्व परिचित तत्वार्थ सूत्रच पाहिल्यास वरील विधानाची सत्यता पटण्यासारखी आहे.

पूज्य स्वामी समन्तभद्र, पूज्यपाद, गोम्मटदेव, सिद्ध नागार्जुन, उग्रादित्य कीर्तिवर्य, गंगराज, अभिनवचन्द्र, देवेन्द्रमुनि, अमृतनन्दि आदि आचार्यांनी, रसायन, शरीर आणि वैद्यक विषयावर ग्रंथरचना केली.

श्री चन्द्रसेन, श्रीधर, भट्टवोसरि, ऋषिपुत्र, दुर्ग देव, कालकाचार्य, उदयप्रभदेव, मल्लिषेण, पद्मप्रभसूरि, नरचन्द, महेन्द्रसूरि इ. नी ज्योतिष, सामुद्रिकशास्त्र, हस्तरेषा, रमलशास्त्र, गणित, मन्त्रशास्त्र इ. विविध विषयावर विपुल ग्रंथरचना केली.

काव्यशास्त्र निर्मितीवर जैनाचार्य खूपच आघाडीवर आहेत. गणितशास्त्र तर इतके प्रगल्भ आहे की, जगाचे गणित संपते तेव्हा जैनाचे सुरू होते असे म्हटले तरी गैर होणार नाही.

सारांश जैनाचार्यांनी साहित्याच्या सर्व क्षेत्रात विपुल, सुसबद्ध ग्रंथरचना केली आहे एवढे मात्र निश्चित. ही जैनाचार्यांची ग्रंथरचना वैज्ञानिक पृष्ठभूमीवर कितपत सत्य उतरते हे सिद्ध करण्याचा अत्यल्प प्रयत्न या लघुकाय लेखाद्वारे केला आहे.

अविरत सुखाच्या शोधात गुंतलेल्या मानवाने जरी विज्ञानाच्या सहाय्याने सुख समृद्धीची साधन सामुग्री गोळा केली तरी खऱ्या अर्थाने सुख मिळाले नाही. म्हणूनच पश्चिमी राष्ट्रे साधन सामुग्रीच्या गोंगाटाने उबगून गेली आहेत आणि अध्यात्माकडे आकर्षित झाली आहेत. विज्ञानाकडून दर्शनाकडे आलेला माणूस साहजिकच दर्शनात वैज्ञानिक सत्यता आहे का ? हे पडताळून पहाण्याचा प्रयत्न करतो आणि ती सत्यता आढळली की, मग त्याची श्रद्धा दृढ होते आणि त्याला सुखाचा शोध लागतो.

'विज्ञानं कार्मणे ज्ञाने' अशी आचार्य हेमचन्द्र यांनी व्याख्या केली आहे. सक्रिय ज्ञान (Practical knowledge) म्हणजे विज्ञान– Science is an organised knowledge अशी व्याख्या प्रो. स्पेन्सर याने केली आहे.

स्थानांगसूत्रामध्ये भ. महावीर आणि मुमुक्षु यांच्यातील संवाद दिला आहे–

से णं भन्ते ! सवणे किं फले ! णाण फले । से णं भन्ते ! णाणे किं फले ! विणाणाणा फले ॥

मुमुक्षु :– भगवन्, श्रवणाचे फळ काय आहे ?

भ. महावीर :– श्रवणाने ज्ञानाची प्राप्ती होते.

मुमुक्षु :– भगवन्, ज्ञानाचे फळ काय आहे ?

भ. महावीर :– ज्ञानाचे फळ विज्ञान आहे.

सारांश ग्राह्य, अग्राह्य, हेय, उपादेय काय आहे हे ज्यामुळे समजते ते विज्ञान. नव युगा (विज्ञान युग)– मध्ये जरी मनुष्याना दर्शन साहित्यात वैज्ञानिक तथ्य अत्यल्प प्रमाणात आहे असे वाटते तरी, दर्शन साहित्यातच अधिक वैज्ञानिक तथ्य आहे हेच विज्ञानाने सिद्ध केले आहे. निदान जैन दर्शनसाहित्यासंबंधाने हे विधान पूर्णपणे सुसंगत व सत्य आहे. म्हणूनच दर्शन व विज्ञान याचा समन्वय जिथे जिथे होतो ती ती स्थळे शोधून काढण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखात केला आहे.

**जैन दर्शनातील परमाणुवाद व आधुनिक विज्ञान**– न हि अणोः अल्पीयान् अन्यः अस्ति । (सर्वार्थ सिद्धिः) अर्थात् अणुपेक्षा सूक्ष्म कांहीही नाही. पाश्चात्य देशात असे समजतात की, डेमोक्रेटस् ( इ. स. पू. ४६०–३७० ) याने प्रथम अणु-परमाणूंची कल्पना जगासमोर ठेवली. पण भारतात फार पर्वीपासूनच तत्संबंधी सिद्धांत मांडले आहेत. जैन दर्शनाचा अणु-परमाणुविषयी सुसंबद्ध व विस्तृत सिद्धांत मांडण्यात पहिला क्रमांक लागतो. ऐतिहासिक








दृष्टीने सुद्धा जैनधर्म, वैदिक व बौद्ध धर्माहून प्राचीन आहे. (It is older than Hinduism or Budhism-A History of philosophical system) त्यामुळे त्या धर्माचे सिद्धांत देखील तितकेच प्राचीन आहेत. विषयाच्या सुरुवातीलाच अणूचे स्वरूप सांगितले आहे. प्रत्येक वस्तूचे मूळ परमाणू आहे. राजवार्तिक ग्रंथात परमाणूचे स्वरूप सांगितले ते असे– 'सौक्ष्म्याद्य: आत्ममध्या: आत्मांताश्च' (५-२५-१) 'सूक्ष्मतेमुळे तो (परमाणु) स्वतःच आदि, स्वतःच मध्य आणि स्वतःच अन्त आहे.' अनेक आचार्यांनी वेगवेगळया शब्दात परमाणूचे स्वरूप सांगितले आहे. त्या सर्वांचा परामर्श येथे घेणे शक्य नाही. परमाणु (Atom) हा पुद्गलाचा (Matter or energy) अविभाज्य, अछेद्य, अभेद्य, अदाह्य व अग्राह्य घटक आहे. कोणत्याच उपायानी त्याचे भाग होऊ शकत नाही. परमाणूला लांबी, रुंदी व जाडी नाही. सर्वार्थसिद्धि ग्रंथात पूज्यपाद आचार्य म्हणतात, ज्याला आदि, मध्य, अन्त नाही, जो इन्द्रिय ग्राह्य नाही, जो अविभागी आहे तो परमाणु जाणावा (सूत्र-२५) पंचास्तिकायसार ग्रंथातील गाथा ८८ पहा–

एक रस, वर्ण, गंध, द्विस्पर्श शब्दक्कारणमशब्दम् । स्कंधातरितं, द्रव्यं परमाणु तं विजानीहि ॥

(ज्यामध्ये एक वर्ण, एक गंध, एक रस, दोन स्पर्श असतात; जो शब्दाचे कारण होऊ शकतो पण स्वतः शब्द असत नाही, स्कंधापासून वेगळा असतो तो परमाणु होय.)

भगवती सूत्रामध्ये परमाणु ४ (चार) प्रकारचे सांगितले आहेत–

१) द्रव्य परमाणु– Primary unit of mass at matter.
२) क्षेत्र परमाणु– Primary unit of space.
३) काळ परमाणु– Primary unit of Time.
४) भाव परमाणु– Primary unit of strength or degree.

भगवती शतकामध्ये परमाणूची परिभाषा खालील श्लोकाद्वारे समजावून सांगितली आहे–

कारणमेव तदन्त्यं सूक्ष्मो नित्यश्च भवति परमाणू । एकरस गंध वर्णो द्विस्पर्श: कार्यलिंगश्च ॥

(परमाणु, स्कन्ध-पुद्गल निर्माण करण्यामध्ये अन्त्य कारण आहे. तो सूक्ष्मतम आहे, भूतकाळात होता, वर्तमानकाळी आहे आणि भविष्यकाळीही रहाणार आहे. तो एक रसयुक्त, एक गन्धयुक्त, एक वर्णयुक्त, दोन स्पर्शयुक्त आहे आणि कार्यलिंग आहे.) कार्यलिंग म्हणजे जो डोळे किंवा इतर पार्थिव साधनानी न दिसू शकणारा आहे.

**स्कंध** (Malecab) **कसे होतात–** परमाणु हा पदार्थाचा मूळ घटक आहे हे आपण मागेच पाहिले. त्यापासून स्कंध व स्कंधापासून वस्तु-पदार्थ तयार होतात. संक्षेपाने विश्लेषण असे– परमाणुमध्ये स्निग्ध, रुक्ष गुण असतात म्हणून ते परमाणु परस्पर बद्ध होतात. या दोन्ही प्रकारच्या संयोगाने उदासीन परमाणु (Neutral Atom) तयार होतात. (स्निग्धरूक्षत्वात् बंधः– त-सूत्र). स्निग्ध परमाणु स्निग्ध परमाणूशी आणि रुक्ष परमाणु रुक्ष परमाणूशी तीन गुणांशापासून अनंत गुणाशापर्यंत तरतमतेच्या अपेक्षेने बद्ध होतात. स्निग्ध आणि रुक्ष परमाणूंचा बंध कुठल्याही परिस्थितीत घडून येतो. एक गुण स्निग्ध आणि एक गुण रूक्ष परमाणूंचा बंध होत नाही. जैन दर्शनकारांनी स्निग्धत्व आणि रूक्षत्वाला बंधाचे कारण मानले आहे तर वैज्ञानिकानी घन विद्युत् Positive Charge आणि ऋण विद्युत् Negative charge या दोन स्वभावाना बंधाचे कारण मानले आहे. वैज्ञानिकानी देखील स्निग्धत्व आणि रूक्षत्व गुण प्रत्येक परमाणूत मानला आहे. फक्त शब्द भेद आहे. स्निग्धत्व म्हणजे घन विद्युत् Positive charge आणि रूक्षत्व म्हणजे ऋण विद्युत् Negative charge. सारांश दोघांच्याही म्हणण्यातील आशय एकच आहे.





आता पंचास्तिकाय ग्रंथातील केलेले वर्गीकरण पहा–

खंधा य खंददेसा खंधपदेसा य होंति परमाणु । इतिते चदुव्वियप्पा पुग्गलकाया मुणेयव्वा ॥
खंधं सयलसमत्थं तस्स दु अद्धं भणंति देसोत्ति । अद्धद्धं च पदेसो परमाणु चेव अविमागी ॥

पुद्गल अस्तिकामाचे चार भेद आहेत– १) स्कंध २) स्कन्धदेश ३) स्कन्ध प्रदेश व ४) परमाणु. (पुद्गलाविषयी पहिल्या तीन प्रकाराविषयी विचार करू– तूर्त परमाणूविषयी विचार करू)

परमाणूचा आकार गोम्मटसारामध्ये पट्कोनी पोकळ (Hexagonal) सांगितला आहे. सद्य.स्थितीत शास्त्रज्ञांनी विपुल साधन सामुग्री असताना परमाणु पाहिलेला नाही. वैज्ञानिकांनी जी कल्पना परमाणूंच्या आकारासंबंधाने केली आहे त्यानुसार परमाणु रेल्वेच्या नकाशाप्रमाणे (एखाद्या देशाच्या नकाशामध्ये रेल्वेमार्ग दाखवावा त्याप्रमाणे) आहे. परमाणु तर बाजूलाच राहू द्या, स्कन्ध किती सूक्ष्म आहे याची कल्पना येण्यासाठी खालील प्रयोग घ्यानात घ्यावा लागेल. स्कंधाचा व्यास एक दश लक्षांश इंच समजतात. एक पाण्याचा थेंब ⅛ इंच असतो. तो जर पाच कोटी पट मोठा कल्पिला तर त्याचा व्यास एक हजार मैल होईल. त्यात पाण्याचे स्कंध एक इंच व्यासाचे असतील आणि जर तो बिंदु पृथ्वी एवढा समजला तर व्यास संत्र्या एवढा होईल. परमाणु व स्कंध किती सूक्ष्म आहे याची कल्पना येण्यासाठी अजून कांही उदाहरणे दिल्यास वावगे होणार नाही. पहिले उदाहरण असे की, एक औंस (अर्धा छटाक) पाण्यातील स्कंध मोजण्यास (एका सेकंदास पाच याप्रमाणे मोजले तर) जगातील तीन अरब लोकांना ४० लाख वर्षे लागतील. उदा. दुसरे असे की ४० हजार शंख हायड्रोजनच्या परमाणूचे वजन फक्त खसखशी इतके होऊ शकेल. उदा. तिसरे असे की हायड्रोजनचे २५ कोटी परमाणु एकापुढे एक चिकटून सरळ रेषेत मांडले तर त्या रेषेची लांबी फक्त एक इंच होईल. उदा. चौथे असे की एक केस उपटल्यानंतर त्याच्या तळाशी जो रक्ताचा कण असेल तो सात फूट मोठा आहे अशी कल्पना केली तर त्यातील एका परमाणूचा व्यास $\frac{१}{१०००}$ इंच असेल उदा. पाचवे असे की एक घन इंच हवेत ४४२४०००००००००००००००० (प्रो. ॲन्ड्रेड याचा तर्क)[1] उदाहरणातील तर्कांच्या आधारे केलेली असोत पण हेही तितकेच खरे की, आधुनिक वैज्ञानिक ज्याला सध्या परमाणु म्हणतात तो परमाणु, परमाणु नसून स्कंध आहे. म्हणजे जैनाचार्यांनी वर्णिलेला परमाणु अद्यापही वैज्ञानिकांना कळाला नाही.

परमाणूच्या आकारासंबंधी कांही आचार्यांची मते पाहू म्हणजे अधिक कल्पना येईल.

श्री वीरनन्दि आचार्यांनी आचारसार ग्रंथात सांगितले–

अणुश्चपुद्गलोऽभेद्यावयवः प्रचय शक्तितः । कायश्च स्कन्धभेदोत्थश्चतुरस्रस्त्वतीन्द्रियः ॥

यावरून परमाणूचा आकार 'चतुरस्र' आहे. म्हणजे समघन (Cub) आहे. जिनसेन आचार्यांनी आदिपुराणात म्हटले आहे, 'अणवः कार्यलिंगा स्युः द्विस्पर्शा परिमण्डलाः'। २४-१४८ म्हणजे परमाणु गोलाकार (Spherical) आहे.

आ. श्री वीरसेनाचे मत आधुनिक विज्ञानाशी जुळते तर इलेक्ट्रॉन, प्रोटॉन, न्यूट्रॉन, पॉजिट्रॉन इ. मूलभूत कण (Fundamental Particle) जवळ जवळ गोलाकार मानले आहेत. जरी परमाणु Ultimate Atom वैज्ञानिकांना अजून कळाला नाही, तरी फोटॉन, ग्रेविटॉन इ. परमाणु (जैन साहित्याप्रमाणे स्कंध) गोलाकारच मानले आहेत.

**परमाणूची रचना**– फार पूर्वी परमाणु Billiard ball सारखा कठिण, अभेद्य मानीत. पण प्रो. रदरफोर्ड याने तो सिद्धांत चूक ठरवला. पुष्कळ प्रयोग करून त्याने सिद्ध केले की, परमाणूच्या मध्यभागी Positive electricity–

1. Cosmology Old and New.

Proton ( घन विद्युत् कण ) असतात आणि Negative Electricity-Electron ( ऋण विद्युत् कण ) त्या भोवती फिरत असतात.[1] त्यांच्या फिरण्याची गति एका सेकंदास १३०० मैल इतकी असते. प्रोटॉन म्हणजे स्निग्धकण व इलेक्ट्रॉन म्हणजे रूक्ष कण-प्रोटॉनपासून इलेक्ट्रॉन किती अंतरावर फिरत असतात त्याची कल्पना येण्यासाठी Proton चा व्यास १ मिलीमिटर मानला तर त्यापासून १०० मिटर (एक लाख पट) अंतराने Electrons फिरत असतात. दोन्हीमधील जागा पोकळ असते. परमाणूच्या रचनेबाबत वैज्ञानिक जैनाचार्यांशी सहमत आहेत. थोडक्यात परमाणु स्निग्ध आणि रूक्ष कणांनी बनलेला आहे आणि सर्वात विशेष म्हणजे तो पोकळ आहे. जैनाचार्यांनी परमाणूची पूर्ण कल्पना होती.

**सूक्ष्मपरिणामावगाहनशक्ति–** पूर्वी आपण Proton भोवती Electron फिरत असतात व त्यामध्ये पोकळी असते हे वाचले. सर्वात विशेष हे कि ज्या आकाश प्रदेशात एक परमाणु रहातो त्याच आकाश प्रदेशात दुसरा परमाणु स्वतंत्र राहू शकतो आणि त्याच आकाश प्रदेशात अनत प्रदेशी स्कंध राहू शकतो. प्रदेश संहार विसर्पाभ्याम् प्रदीपवत् हीच परमाणूची सूक्ष्मपरिणामावगाहन शक्ति–सर्वार्थसिद्धिग्रंथात सू. प. ग्रा. शक्तिविषयी शंका निर्माण करून त्याचे समाधान केले आहे. पूज्यपाद आचार्य म्हणतात– "सूक्ष्मपरिणामावगाहनशक्तियोगात्परमाण्वादयो हि सूक्ष्मभावेन परिणता एकैकस्मिन्नप्याकाशप्रदेशेऽनन्तानन्तानामवस्थानं न विरुद्धयते ।। ५–१० ।। या शक्तीस आधुनिक विज्ञान "Subtlety and accomodating power of molecules" म्हणते– सूक्ष्मपरिणामावगाहन–शक्तीच्या संबंधाने प्रो. एडिंग्टन ( Eddington ) म्हणतो, "If we eliminate all the unfilled space in a mans body and collect the neuclere and electrons into one mass, the man would be reduced to a speck just visible with a magnifying glass"[2] जर मनुष्याच्या शरीरातील पोकळ जागा बाहेर-बाजूला काढली आणि केवळ Proton व Electron एकत्र केले तर माणूस एका सूक्ष्म ठिपक्या एवढा दिसेल, जो ठिपका केवळ विशिष्ठ काचे (दुर्बिण) तूनच दिसेल. Dr. M. N. Shah म्हणतात, An innumerable number of atoms in a suolle state can occupy one unit of space (Predisa) परमाणूचा सर्वभार केंद्रस्थळी (Neuclic) असतो आणि या केंद्रिकरणामुळे पदार्थ वजनदार होतो त्यास Nuclear Matter म्हणतात. पाणी, चांदी, सोने, प्लॅटिनम एकापेक्षा एक सघन आहेत. एक घन इंच वज्र ( Nuclear matter ? ) छोटया डबीत वसू शकेल पण त्याचे वजन ५० टन ( १४०० मण ) असेल. कांही तान्यामध्ये तेवढ्याच तुकड्याचे वजन ६२० टन असेल. जैन पुराणातून 'नारायण शिले' चे वर्णन येते ती अशाच प्रकारची असेल काय ?

**परमाणूची गति–** परमाणूची उत्कृष्ट गति किती आहे याविषयी भगवतीसूत्रामध्ये म्हटले आहे, 'परमाणु पोग्गलं भन्ते । लोगस्सपुर च्छि मिल्लाओ चरिमंताओ पच्चच्छि मिल्लं चरिमंतं एग समयेण गच्छइ.......' साराश परमाणु एका समयात कमीत कमी आकाशाचा एक प्रदेश आणि जास्तीत जास्त चौदा रज्जू प्रमाण संपूर्ण विश्वभर जगाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत गमन करतो. 'रज्जू' आणि 'समय' या दोन्हीची कल्पना येण्यासाठी अधिक स्पष्टिकरण येथे देत आहे. Von Glassnapp या शास्त्रज्ञाने केलेली व्याख्या– Raju (=chain, a liner astrophysical measure), is according to Colebrook, the distance which a Deva (god) flies in six months at the rate of 20,57,152 yojanas in on ksana (Instant of time=$\frac{1}{4}$ second) पंडीत माधवाचार्य ( अनेकात, अंक !, ३ ) म्हणतात, "एक हजार भार (१००० तोळे) का लोहेका गोला इन्द्रलोकसे नीचे गिरकर ६ मासमें जितनी दूर पहुंचे, उस संपूर्ण लम्बाईको एक राजू कहते हैं।"[3] आता 'समया' ची कल्पना येण्यासाठी कांही स्पष्टीकरण देत आहे. प्रो. पी. डब्ल्यू. ब्रीजमन ( नोबेल पारितोषिक विजेता १९४६ ) म्हणतो– "We cannot think of an interval of time as the sum of moments without duration." वैज्ञानिकांनी अणूचा

---

१. जैन दर्शन और विज्ञान-प्रो. जी. आर. जैनाचे आभारे.  2 Cosmology Old and New.
3 Cosmology Old and New page No. 91

शोध लावला (Polonium-212) जे एका सेकंदाच्या एक लक्षांक इतका वेळच राहू शकतात. व्यवहार कालाचे प्रमाणे जैन शास्त्रात खालीलप्रमाणे आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| कोष्टक– | ६० प्रति विपलांश | = | १ प्रति विपल |
| | ६० प्रति विपल | = | १ विपल |
| | ६० विपल | = | १ पल |
| | ६० पल | = | १ घटका ( २४ मिनिटे ) |

( १ मिनिट = ५८०००० प्रति विपलांश. )

प्रो. जी. आर. जैन म्हणतात– "The Jain unit of time (Samaya) is smaller still."

येथपर्यंत आपण परमाणूचा विचार केला. आता केवळ शास्त्रज्ञांनी मानलेले हायड्रोजनच्या परमाणूंची आकडेवारी पहा.

हैड्रोजन परमाणूचा व्यास– $\frac{१}{(२००,०००,०००)}$ इंच.

वजन– $\frac{१६४}{१००,०००,०००,०००,०००,०००,००० ०००,०}$ ग्राम.

इलेक्ट्रॉन व्यास : $\frac{१}{५००,०००,०००,०००,०}$

गति : प्रति सेकंदास १३०० मैल.

वजन : $\frac{१}{२०००}$ ( हायड्रोजन परमाणु वजनाच्या )

प्रोटॉन : व्यास = इलेक्ट्रॉनच्या दहापट.

वजन = जवळ जवळ परमाणु इतके.

समारोप– ॲरिस्टॉटल व कांट यांनी असे मानले होते की, हे विश्व पदार्थांनी पूर्ण भरलेले आहे, तर डाल्टन याने असे मानले होते की पदार्थांचे सर्वांत सूक्ष्म कण म्हणजे परमाणु, ते अविभाज्य असतात. हे म्हणजे रदरफोर्ड या शास्त्रज्ञाने चूक ठरवले व Electra Proton ची कल्पना पुढे आणली. आज वैज्ञानिक त्या परमाणूच्या जवळ येऊन पोहोचत आहे, ज्याची कल्पना जैनाचार्यांनी अनेक शतकापूर्वी जगापुढे मांडली जी वर दिलेली आहे. आज जरी शास्त्रज्ञाना 'अणु-परमाणु' खऱ्या अर्थाने कळाला नाही, तरी भविष्यकाळात तो कळेल असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

पुद्‌गल ( Matter and Energy )– जीव आणि पुद्‌गल या दोन्हींनी मिळून हे सर्व विश्व भरलेले आहे पैकी पुद्‌गलाचा आपणास आता विचार करावयाचा आहे. पुद्‌गलाविषयी जैन शास्त्रात अनेक व्याख्या आढळतात. त्या सर्वच येथे देणे शक्य नाही. म्हणून थोडक्यात आपण पुद्‌गलाची व्याख्या पाहू– 'पूरयन्ति गलयन्ति इति पुद्‌गलाः' अर्थात् पुद्‌गल त्यास म्हणतात ज्यामध्ये पूरण आणि गलन स्वभाव आहे. पुद्‌गल हा जैन पारिभाषिक शब्द आहे. दुसऱ्या कोणत्याही दर्शनात या शब्दाचा उल्लेख आढळत नाही. बौद्ध दर्शनात हा शब्द आढळतो पण थोड्या वेगळ्या अर्थाने. व्युत्पत्तिदृष्ट्याही हा शब्द सिद्ध होतो. 'पूरणात् पुत् गलयतीति गलः' अर्थात् पूरण स्वभावामुळे "पुत्" आणि गलन स्वभावामुळे "गल्" या दोन अवयवाच्या संयोगाने पुद्‌गल हा शब्द बनला आहे. अजून २-३ व्याख्या पाहू. राजवार्तिक ग्रंथात 'पुरणगलनान्वर्थसंज्ञत्वात् पुद्‌गलाः' अशी व्याख्या केली आहे.

'पूरणात् गलनात् च पुद्गलाः' (तत्त्वार्थ भाष्य); 'पूरणात् गलनात् इति पुद्गला' (गायकोष); स्पर्श रस गंधवर्णवन्तः पुद्गलाः (त. सूत्र) अशा अनेक व्याख्या देता येतील. शब्द भेद वाटत असला तरी अर्थभेद नाही. पुद्गलाच्या पूरण गलन स्वभावामुळे नवीन पर्याय निर्माण होतात. पूरण स्वभावास Combination आणि गलन स्वभावास Disintigration किंवा Dissociation असे म्हणू शकतो. पुद्गलाच्या मिलन (Combination) स्वभावाचा अर्थ असा की, एक स्कंध Moalecule दुसऱ्या स्निग्ध-रूक्ष गुणयुक्त स्कंधाशी मिळू शकतो आणि गलन स्वभावाचा अर्थ असा की, एका स्कंधातून कांही स्निग्ध रूक्ष गुणयुक्त भाग वेगळा होऊ शकतो. पुद्गल हा शब्द पूर्ण वैज्ञानिक आहे.

एकोणिसाव्या शतकापर्यंत वैज्ञानिकांचे मत असे होते की, या जगतील मूलद्रव्ये (Eloments) अपरिवर्तनीय (Unchangeable किंवा Nontransferable) आहेत. म्हणजे एक तत्व दुसऱ्या तत्वात परिवर्तित होऊ शकत नाही. पण रेडिओ सक्रियते (Radioactivity) मुळे हे सिद्ध झाले की, तत्त्व परिवर्तित होऊ शकते. या शोधाचे श्रेय लॉर्ड रदर फोर्ड (Rutherford) या शास्त्रज्ञाकडे जाते. मागील शतकात बरेच शास्त्रज्ञ अंतिम कणा (Ultimate Particle) च्या शोधात गुंतले होते. त्याला (अंतिम कणाला) Quark अशी संज्ञा शास्त्रज्ञांनी दिली आहे. म्युरि गेल मॅन आणि रिचर्ड फेनिमन तसेच आईरन क्यूरी आणि जोलियेट, आणि रदरफोर्ड हे मुख्य होते. क्यूरी व जॉलियट यांनी Radio activity चा शोध लावून हे सिद्ध केले की, अॅल्युमिनियमचे गंधकात, गंधकाचे सिलिकनमध्ये, मॅग्नेशियर सिलीकनमध्ये इ. परिवर्तित होऊ शकतात.

Radio Activity **रेडियो सक्रियता**- आपण नेहमी ऐकतो त्या रेडिओशी याचा संबंध नाही. मूळ शब्द Radiation Activity असा आहे. Radiation म्हणजे विकरण-सहज किंवा कृत्रिम रूपाने जेव्हा परमाणूचे मूल भूतकण इलेक्ट्रॉन आणि प्रोटॉन वेगळे होतात आणि बॉम्बसारखा प्रचंड आवाज होतो आणि लगेच प्रचंड ज्योत निर्माण होऊन ती पुढे पुढे सरकत जाते (म्हणजे गामा किरणांचे विकरण होते.) या विकरणाला Radio Activity म्हणतात. गामा किरणे X-Ray किरणापेक्षा एक हजार पटीने सूक्ष्म असतात आणि हाडातून सुद्धा आरपार जाऊ शकतात. रेडिओ क्रिया निसर्गामध्ये स्वभावतः घडलेली दिसून येते. उदा.-

युरेनियम, रेडियम आणि लीड (शिसे) ही तिन्ही द्रव्ये एकमेकापासून भिन्न आहेत. रेडियमची किंमत एका तोळ्यास सुमारे तीन लाख रुपये आहे तर शिसे केवळ दहा रुपये किलो. युरेनियममधून अल्फा, गामा, बीटा ही किरणे सारखी (सतत) निघत असतात. दोन अरब वर्षांनी युरेनियमचे रेडियममध्ये (कांही भागाचे) परिवर्तन होते. रेडियममध्ये अल्फा इ. किरणे सतत निघत असतात. सहा हजार वर्षांनी रेडियमचा अर्धा भाग शिशा (Raed) मध्ये रूपांतरित होतो. पुद्गलाच्या गलन स्वभावाचे किती सुंदर उदाहरण आहे ते! अशा तऱ्हेचे परिवर्तन इतर मौलिक तत्त्वात देखील प्रयोगाद्वारे घडवून आणता येते. बेंजामिन (Benjamin) या वैज्ञानिकाने पाऱ्याचे रूपांतर सोन्यात करून दाखविले. (१९४१ इ. स.) पाऱ्याचा अणु वजनाने २०० अंशाचा असतो. एक अंश वजनाच्या विद्युत प्रोटॉनच्या सहाय्याने पाऱ्याच्या अणूत स्फोट घडविला. त्यामुळे प्रोटॉन पाऱ्यात एकजीव झाला आणि त्याचे वजन २०१ अंश झाले. त्यावेळी आपोआपच एकजीव झालेल्या मूळ धुळीतून अल्फाबिंदु निघून गेला. त्याचे वजन चार अंश होते. म्हणजे आता १९७ अंश शिल्लक राहिले. हेच सोने. हे संपूर्ण विश्व (Universe) सहा द्रव्यांनी भरलेले-निर्मित आहे. ती अशी-

१) जीव- Soul, substance possessing consciousness.
२) पुद्गल- Matter and energy.
३) धर्म- Medium of motion for souls, matter & energies.
४) अधर्म- Medium of rent of souls, matter & energy.

५) आकाश– Space medium of location of soul etc.

६) काल– Time.

जैन दर्शनाने पुद्गल द्रव्य स्वतंत्र मानले.

पुद्गल द्रव्याचे गुणधर्म– स्पर्शरसगन्धवर्णवन्तः पुद्गलाः – पुद्गल द्रव्यामध्ये स्पर्श, रस, गन्ध, वर्ण हे गुणधर्म असतात. स्पर्श आठ प्रकारचा. रस पाच प्रकारचा. गन्ध दोन प्रकारचा व वर्ण पाच प्रकारचा आहे. अनेक शास्त्रातून याविषयी सविस्तर वर्णन आले आहे.

स्पर्श– Touch मृदु, कठिण, गुरु, लघु, शीत, उष्ण, स्निग्ध, रूक्ष असा आठ प्रकारचा स्पर्श आहे. आधुनिक विज्ञान चार भागात विभागणी करते 1. Scale of Hardness (मृदु कठिण) 2. Density (गुरुलघु) 3. Temperature (शीत, उष्ण) 4. Crystalleine Structure (स्निग्ध, रूक्ष). मृदु कठिण गुणधर्म वाढत्या क्रमाने टाल्क, (अभ्रक) जिप्सम् कार्लसिट, फ्लोअरस्पार Flowerspar, Apatite, Orthoclase Felspar ( d ), Quartz ( d ) Topaz ( d ) Corundum ( d ) आणि Diamond (हिरा) असा क्रम वैज्ञानिकांनी लावला आहे (Mohs' scale of hardness प्रमाणे), वरील प्रमाणे क्रम विशिष्ट साधनांनी Crystals निश्चित करून केला आहे.

रस–Taste तिक्त (Bitter), कडु (Sour), खारट (Acidic) गोड (Sweet), आणि तुरट (Astringent) असा पाच प्रकारचा रस आहे. डॉ. हेवर हा शास्त्रज्ञ रसाविषयी म्हणतो, "We Taste with the minute projections that can be seen with a lens on the surface of the tongue—— Four tastes can be distinguished–salt sweet, sour and bitter——" आता शास्त्रज्ञ विविध चवींचे कारण शोधीत आहेत. विशेष म्हणजे जे. जे. मी हा शास्त्रज्ञ म्हणतो, "In taste there are only five classes–sweet, bitter, salt, sour & insipid."[1] यावरून जैनाचार्यांनी केलेले पृथक्करण किती यथास्थित अचूक आहे हे कळते.

गंध–(Smell) सुगंध आणि दुर्गंध असा दोन प्रकारचा गंध आहे. गंध नाकाद्वारे विशिष्ट पेशीच्या सहाय्याने घतला जातो. वेगवेगळ्या प्राण्यामध्ये या पेशीचे वेगवेगळे क्षेत्र आहे. इलेक्ट्रो–ओल्फॅक्टरी Electro-Olefactory नावाचे एक यंत्र आहे जे गंधाविषयी अधिक संवेदनक्षम आहे. या यंत्राद्वारे अग्नीचा गंधहि ओळखला जातो आणि धोक्याची सूचना मिळते.[2]

वर्ण– Colour निळा (Blue), पिवळा (Yellow), पांढरा (White) आणि लाल (Red) असे मूळ पाच रंग आहेत. मिश्रणाने हजारो रंग होतात. ए. डब्ल्यू. वरटन हा शास्त्रज्ञ म्हणतो. "As the temperature of the body is raised, it emits first of all infra-red radiation, then red light, then yellow light and finally white light. If we could obtain higher temperature in the laboratory, we could make bodies blue hot——" म्हणजेच पदार्थ जसजसा तापवावा तसतसे त्यातून अनुक्रमे लाल, पिवळे, श्वेत व निळे किरण निघतात. यावरून जैनाचार्यांचे पृथक्करण किती योग्य आहे हे कळते. हे पाच वर्ण प्राकृतिक आहेत. Optical Society af America या संस्थेने वर्णासंबंधी दिलेला निर्णय पहा. "Colour is a general term of all sensations arising from the activity of retina and its attached nervous mechanism. It may be examplified by the enumeration of characteristic instances such as red, yellow, blue, black and white"[3] श्रीमती इलफोर्ड या स्त्री वैज्ञानिकेने अंधारात फोटोग्राफिक प्लेटस् तयार केल्या. अत्यंत कमी उष्णतामानात (525° C) क्रमाक्रमाने उष्णता वाढवल्यानंतर प्लेटस् अनुक्रमे प्रथम काळ्या प्लेटस् होत्या; लाल, पिवळ्या, पांढऱ्या व शेवटी निळ्या दिसल्या. सारांश मूलभूत वर्ण पृथक्करणाशी विज्ञान सहमत आहे.

---

1. Taste and chemical constitution-A. J. Mee. २. श्री. एस्. बी. किरमाने यांचा निबंध (१९३५) ३. दर्शन और विज्ञान श्री. गोपीलाल जैन पृ. ६.




पुद्गलाचे पृथक्करण :– पुद्गलाचे सहा प्रकारात जैनाचार्यांनी पृथक्करण केले आहे. ते अत्यंत शास्त्रशुद्ध आहे. पहा–

स्थूल-थूलं, थूलं, थूल-सुहुमं च, सुहुम-थूलं च । सुहुमं अइ सुहुम इदि धरादिय होदि छब्भेयं ॥
भूपव्वदमादीया भणिदा अइथूल थूलमिदि खंधा । थूला इदि विण्णेया सप्पीजलतेलमादीया ॥
छायातवमादीयाथूलेदरखंदमिदि वियाणाहि । सुहुम-थूलेदि भणिया खंधा चउरक्खविसया य ॥
सुहुमा हवंति खंधा पावोग्गा कम्मवग्गणस्सपुणो । तव्विवरीया खंधा अइसुहुमा इदि परूवेंदि ॥ (नियमसार)

१) स्थूलस्थूल– (Solids) लाकूड, दगड, पृथ्वी, पर्वत इ. या वर्गात येतात.

२) स्थूल– (Liquids) तेल, पाणी इ. या वर्गात येतात.

३) स्थूल सूक्ष्म– (Visible energies) छाया, प्रकाश, अंधःकार इ.

४) सूक्ष्म-स्थूल– (Ultra-visible but intrasensual matters) या प्रकारात असे पदार्थ येतात जे आपण नेत्रेन्द्रियाने पाहू शकत नाहीत पण इतर इन्द्रियांनी जाणू शकतो. उदा.–हायड्रोजन इ. वायू, ध्वनि Sound energy इ.

५) सूक्ष्म– Ultra visible matter (Fine matters which is responsible for thought activities and is beyond sense perception) कार्माणवर्गणा या प्रकारात मोडतात. असे सूक्ष्म स्कन्ध जे आमच्या विचारशक्तीसाठी आवश्यक आहेत. आमचे विचार व भावना यांचा प्रभाव याचेवर पडतो, तसेच यांचा प्रभाव जीव द्रव्य आणि अन्य पुद्गल द्रव्यावर पडतो.

६) सूक्ष्म-सूक्ष्म– (Extra fine-ultravisible matters) या वर्गात सूक्ष्मतम स्कंध येतात. हे स्कंध डोळ्याना दिसत नाहीत. उदा.– विद्युताणु (electrons), पोजिट्रॉन्स्, न्यूट्रॉन्स वगैरे. वैज्ञानिक प्रथम पदार्थाचे तीन प्रकार मानीत १) Solids (घन), २) Liquids (द्रव), ३) Gases (वायू) पण इलेक्ट्रॉन इ. चा शोध लागल्यावर त्याना कळून चुकले की, वायूपेक्षाही सूक्ष्म पदार्थ आहेत. विज्ञानाची अशी देखील मान्यता आहे की, पदार्थ एका प्रकारातून दुसऱ्या प्रकारात (घन, द्रव्य, द्रव स्वरूपात इ.) बदलू, परिवर्तित होऊ शकतात. (याची पुन्हा चर्चा येणारच आहे.) शक्ति आणि पदार्थ समान आहेत का ? अभिन्न आहेत का ? शक्ति (Energy) जैनाचार्यांनी स्थूल सूक्ष्म या प्रकाराच्या म्हटल्या आहेत. या शक्तीना जैनाचार्य पदार्थापासून अभिन्न मानतात. Principle of Eclivalance between mass & energy हा अलबर्ट आइनस्टाइनचा सिद्धांत नवीन जरी असला तरी, अनेक शतकापूर्वी हाच सिद्धांत जैनाचार्यांनी लिहून ठेवला आहे. सध्या प्रचारात असलेले प्रयोगसिद्ध सूत्र असे. Energy = Mass X (Velocity of light)² = ($E = MC^2$). दुसऱ्या प्रायोगिक शब्दात असे प्रगट करता येईल की, ३००० टन कोळसा जाळल्याने जेवढी शक्ती उत्पन्न होते तेवढीच शक्ती एक ग्राम पदार्थापासून प्राप्त होऊ शकते जेंव्हा तो पदार्थ आपल्या स्थूल रूपाला नष्ट करून शक्तीच्या रूपात परिवर्तित होतो. प्रो. जी. आर जैन म्हणतात, " जो बात सेकडो वर्षोसे जैन शास्त्रोंमे छिपी पडी थी, उसीको आइन्स्टाइनने एक गणितके सूत्र रूपमे दुनियाके सामने रक्खी ।" शक्तीना (विद्युत् इ. ना) वजन असू शकते का ? या प्रश्नाला न्यूटन व गॅलिलियो यांनी नकारात्मक उत्तर दिले असले तरी नतर का होईना $E = mc^2$ हे सूत्र शास्त्रज्ञांनी जगासमोर ठेवले. प्रो. मॅक्स बॉर्न हा शास्त्रज्ञ म्हणतो, "According to theory (theory of relativity) mass and energy are essentially the same." दुसऱ्या शब्दात असे म्हणता येईल की, Energy and mass are Just different names for the same thing ज्या दिशेने बंदुकीतून गोळी सुटते त्याच्या विरुद्ध दिशेने बंदूक मागे सरते. प्रकाशही निर्माण होतो. याचाच अर्थ प्रकाशाला वजन असते. मायक्रोफोनचे उदाहरण घ्या. स्टुडिओमध्ये तो नायकाच्या डोक्यावर असतो. मायक्रोफोन ध्वनि लहरीचे परिवर्तन विद्युत् प्रवाहात करतो. हा प्रवाह एका विशिष्ट लॅपद्वारे प्रकाशात परिवर्तित करतात.

हा प्रकाश फिल्मवर पडतो आणि रेकॉर्ड (Sound record) तयार होते. बदल लक्षात ठेवण्यासारखा आहे. ध्वनीचे रूपांतर विद्युत्‌मध्ये आणि विद्युत् प्रकाशामध्ये परिवर्तित झाली. आपण रेकॉर्ड ऐकतो त्यावेळी हा क्रम उलट असतो.

हायड्रेजन परमाणूचे वजन १.००८ आहे. त्याचे चार परमाणू एकत्र येतात त्यावेळी हेलियमचा एक परमाणु बनतो. हेलियमच्या परमाणूचे वजन चार आहे. पण हैड्रोजनच्या चार परमाणूचे वजन ४.०३२ होईल. मग .०३२ हे वजन गेले कुठे ? प्रो. बीथे (अमेरिका) याने असे सिद्ध केले की, .०३२ वजनाचे रूपांतर शक्तीमध्ये झाले. हेच कारण आहे की, सूर्याचे तपमान कायम आहे.

**पुद्गलाचे पर्याय**– जैनाचार्यांनी खालीलप्रमाणे पर्याय मानले आहेत. 'शब्द बंध-सौक्ष्म्य स्थौल्य-संस्थान-भेद-तमच्छायातपोद्योतवन्तश्च' (त-सूत्र– ५।२४) तसेच 'द्रव्यसंग्रह' मध्ये आ. नेमिचन्द्र म्हणतात–

सद्दो बंधो सुहुमो थूलो संठाण–भेद–तम–छाया ।
अज्जोदादवसहिया पुग्गल दव्वस्स पज्जा या ॥

पुद्गल द्रव्याचे १ **शब्द** (Sound), २ **बंध** (Union), ३ **सौक्ष्म्य** (Fineness), ४ **स्थौल्य** (Grossness), ५ **संस्थान** (Figure), ६ **भेद** (Divisibility), ७ **तम** (Darkness), ८ **छाया** (Shade or image), ९ **आताप** (Sunshine), **उद्योत** (Moonlight) असे दहा पर्याय मानले आहेत.

**शब्द** (Sound)- पं. गोपीलाल जैन 'अमर-शास्त्री'-सागर (म. प्र.) हे म्हणतात, "शब्दसंबंधी जिन-सिद्धान्तोकी स्थापना जैनाचार्योंने सदियोंसे पहले की थी । उन्ही का पुन:स्थापन और विस्तार आज के वैज्ञानिकोंने किया है ।" ध्वनि, टेपरेकार्ड किंवा ग्रामोफोनमध्ये बंदिस्त करू शकतो फोनद्वारे ग्रहण करू शकतो. वायरलेसद्वारे बाहेर पाठवू शकतो. हाच शब्द पुनश्च प्रतिध्वनित केला जातो. ज्यावेळी हा वेगात फिरतो त्यावेळी अनुवाद नलिकेद्वारे ग्रहण केला जातो. मूर्तिक कर्णेन्द्रियसुद्धा त्यास ग्रहण करतात. लाउडस्पीकर, रेडिओ इ. यंत्रातील Technic पाहिल्यास वरील विधान सत्य आहे हे पटते, कारण वैज्ञानिकांनी मांडलेले सिद्धांत जैनाचार्यांनी मांडलेल्या सिद्धांताप्रमाणेच आहेत.

शब्दाचे स्वरूप– एका स्कंधाचा दुसऱ्या स्कंधावर आघात झाल्याने जो ध्वनि निर्माण होतो त्यास शब्द म्हणतात– पहा.

सद्दो खंधप्पभावो खंधो परमाणुसंगसंघादो । पुट्ठेसु तेसु जायदि सद्दो उप्पादगो णियदो ॥
– पंचास्तिकाय

सहन्यमानानां भिद्यमानानां ध्वनिरूप: परिणाम: शब्द: । – श्री जैन सिद्धांतदीपिका

विद्यमान अणूंचा ध्वनिरूप परिणाम शब्द आहे, शब्द अरूपी, अभौतिक किंवा वैशेषिक मानतात त्याप्रमाणे आकाशाचा गुणधर्म नाही, कारण तो श्रोत्रेंद्रियाचा विषय आहे. जे काही इंद्रिय ग्राह्य आहे ते समूर्त आहे आणि पौद्गलिक आहे.

शब्दाचे वर्गीकरण कसे केले आहे ते पहा–

शब्दो द्वेधा भाषा लक्षण विपरितत्वात् । भाषात्मक उभयथा अक्षरीकृतेतरविकल्पात ॥
अभाषात्मको द्वेधा, प्रयोगविस्रसानिमित्तत्वात् । (तत्र वैस्रसिको बळाहकादि–प्रभवः) ॥
प्रयोगश्चतुर्धा, ततविततघनसौषिरभेदात् । – त. राजवर्तिक

थोडक्यात शब्दाचे वर्गीकरण खालील आलेखावरून स्पष्ट होईल




१) **भाषात्मक**– मानव, पशु, पक्षी इ. च्या बोलण्याचा ध्वनि.

२) **अभाषात्मक**– प्रकृतिजन्य तसेच वाद्यादिकांनी निर्माण होणाऱ्या ध्वनि. हे दोन भेद आधुनिक विज्ञानाला जसेच्या तसे मान्य आहेत. विज्ञानाने Musical Sound भाषात्मक Noises अभाषात्मक असे दोन भेद मानलेले आहेत. इतकेच नव्हे तर भाषात्मक शब्दाचे प्रकार देखील वैज्ञानिकांनी जैनाचार्यांप्रमाणेच मानलेले आहेत.

३) **अक्षरात्मक**– अशा ध्वनि ज्या अक्षरबद्ध केल्या जाऊ शकतात.

४) **अनक्षरात्मक**– या वर्गात रडणे, ओरडणे, पशु पक्ष्यांचे ओरडणे इ. येतात. या ध्वनी अक्षरात्मक केल्या जाऊ शकत नाहीत.

५) **प्रायोगिक**– वाद्य यंत्रांनी उत्पन्न होणारे ध्वनि.

६) **वैस्रसिक**– मेघगर्जना इ. प्राकृतिक कारणांनी उत्पन्न होणारे ध्वनि.

७) **तत**– तबला, मृदंग इ. पासून निघणारे ध्वनि.
(चर्मतननिमित्त पुष्करभेरीदर्दुरादिप्रभवस्तत: )

८) **वितत**– वीणा इ. पासून निघणारे ध्वनि.
(तंत्रीकृतवीणासुघोषादिसमुद्भवो वितत: )

९) **घन**– ताल, घंटा इ. पासून निघणारे ध्वनि.
(तालघंटालालनाद्यभिघातजो घन: )

१०) **सौषिर**– बांसरी, शंख इ. पासून निघणारे ध्वनि.
(वंशशंखादिनिमित्त: सौषिर: )

**शब्दाची गति**– जैनशास्त्राप्रमाणे परमाणूची उत्कृष्ट गति चौदा राजू आहे. शब्द पुद्गलत्व आहे. तेव्हां आघाताने निर्माण झालेला शब्द संपूर्ण लोकाकाशात एका समयात पसरतो. हवेच्या सहाय्याने अनुप्रस्थ व अनुवंर्य तरंगामध्ये शब्द गमन करतो. पण विज्ञान शब्दाची गति ताशी ११०० मैल मानते.

**थोडासा फरक** – शब्दाचे स्वरूपासंबंधाने जैनाचार्य आणि विज्ञान याच्या मान्यतेमध्ये थोडा फरक आहे तो असा– जैनाचार्य शब्दास पुद्गल मानतात तर वैज्ञानिक केवळ शक्ति (Energy) मानतात. शब्दाची गति तीव्र गतीने लोकान्तापर्यंत आहे तर विज्ञान तासी ११०० मैल मानते जैनाचार्य शब्दाला स्कंधप्रभव मानतात तर वैज्ञानिक शब्दाला केवळ तरंग स्वरूपाचा मानतात.

**समन्वय**– जरी वैज्ञानिक केवळ शब्दाला Energy मानीत असले तरी, तेच आता Matter & energy अभिन्न मानीत आहेत. गति जरी ११०० मैल मानीत असले तरी श्रोत्रेंद्रियाच्या आधारानेच मानीत असावेत पण माणसाचे कर्णेन्द्रिय शब्दाची गति दाखविणारे यंत्र नव्हे. वैज्ञानिक शब्दाला तरंग स्वरूपाचा वजनयुक्त मानीत असले तरी त्यांनी शब्दास Matter म्हणून अजून मानले नाही.

**शब्द किती काळ टिकतो**– उत्पन्न झालेला शब्द जसा लोकाकाशात व्यापतो तसाच तो अनंत काळापर्यंत टिकतो अशी जैनाचार्यांची मान्यता आहे. कारण सर्वथैव नाश कशाचाच होत नाही, परिवर्तन होते. शब्दाचे परिवर्तन होईल पण नाश नाही जर्मन शास्त्रज्ञांना ३०० वर्षापूर्वीचे शब्द रेकॉर्ड करण्यात यश मिळाले आहे म्हणे. याचाच अर्थ लोकाकाशात शब्द अनंत काळापर्यंत रहात असतात. रेडिओ, ट्रान्सिस्टर, टेलीग्राम, टेलिफोन, टेलीप्रिंटर, वायरलेस, ग्रामोफोन, टेपरेकॉर्डर इ. चा शोध म्हणजे शब्दाची शक्ति आणि गति हेच असावे. आधुनिक भौतिक शास्त्राची अशी मान्यता आहे की, Nothing new is created, nothing is destroyed, only modifications appear. Nothing comes out of nothing, nothing altogether goes out of existence but only substance are modified.[1] (नवीन कांही उत्पन्न होत नाही आणि अस्तित्वात असलेल्या कोणत्याही वस्तूचा नाशही होत नाही पण त्याचे पर्याय बदलतात, शून्यातून कांहीही उत्पन्न होत नाही आणि कोणत्याही पदार्थाचा पूर्ण अभावही होत नाही. पदार्थामध्ये केवळ परिवर्तन घडत असते.)

**बन्ध**– दोन किंवा दोनहून अधिक परमाणूंचा बंध होतो, तसेच दोन किंवा दोनहून अधिक स्कंधाचा, एक वा एकाहून अधिक परमाणूंचा, एक वा एकापेक्षा अधिक स्कंधाशी बंध होतो. पुद्गल परमाणूचा जीवाशी बंध होतो.

कारण पुद्गल द्रव्य सक्रिय आहे. त्यामुळे तुटणे, फुटणे इ. स्वाभाविक आहे. केवळ निमित्ताची अपेक्षा असते. जैनाचार्यांनी बंध प्रक्रियेचे इतके सविस्तर व सूक्ष्म वर्णन केले आहे की, तितके जगात कोणीच केलेले नाही. आज जरी वैज्ञानिक सिद्ध करू शकले नाहीत तरी भविष्य काळात सिद्ध करतील असे समजावयास हरकत नाही. विस्तार भयास्तव कर्मबंधाचे सविस्तर वर्णन येथे केले नाही.

**सूक्ष्मता**– याचे दोन प्रकार आहेत १) अन्त्य सूक्ष्मता, २) आपेक्षिक सूक्ष्मता.
**स्थूलता**– याचेही दोन प्रकार आहेत. १) अन्त्य स्थूलता, २) आपेक्षिक स्थूलता.
**संस्थान**– याचे उत्कर, चूर्ण, खंड, चूर्णिका व अणुचटन असे ६ भेद आहेत.
**भेद**– स्कंधांचे विघटन होणे यास भेद म्हणतात. याचे वर्णन अणु परमाणु प्रकरणामध्ये आले आहे.

**तम (अंधःकार)**– 'तमोदृष्टि प्रतिबंधकारण प्रकाश विरोधी । (स सिद्धि) जो पहाण्यास बाधक असून प्रकाशाचा विरोधी आहे तो अंधःकार अशी व्याख्या केलेली आहे. काही विचारवंत तत्वज्ञ अंधःकार हा स्वतंत्र पुद्गल द्रव्याचा प्रकार मानीत नाहीत. त्याच्या मते प्रकाशाचा अभाव म्हणजेच अंधःकार आहे. पण वैज्ञानिक मात्र आता स्वतंत्र द्रव्य मानू लागले आहेत. कारण वैज्ञानिकांना असे आढळून आले आहे की, अंधःकारातसुद्धा Infra Red Rays चे अस्तित्व असते.[2] वर्ण प्रकरणात आपण पाहिले आहे की, कमी उष्णतामानात काळा रंग असतो. जसजसे तपमान वाढवावे तसतसा रंग बदलतो. तर इन्फ्रा नावाची लाल किरणे अंधारातसुद्धा अस्तित्वात

१. दर्शन और विज्ञानके आलोकमें पुद्गल द्रव्य, ले. श्री. मोतीलाल शास्त्री जैन. 2. Cosmology old and new P. 128




असतात. मिस्ट्रेस इल्फोर्ड या वैज्ञानिकेला Drapes point, 525°c इतक्या कमी उष्णतामानात रंग काळा असतो आणि त्यापासून इन्फ्रा रेड रेज् निघतात असे आढळून आले [१] विशिष्ट अशा फोटोग्राफिक प्लेटस्‌वरून हे सिद्ध झाले आहे. म्हणजेच अंधाराला वेगळे अस्तित्व आहे हे वैज्ञानिकांना मान्य आहे. केवळ प्रकाशाचा अभाव म्हणजे अंधःकार नव्हे.

छाया– (Shadow)- जैनसाहित्यात छाया हा सुद्धा एक स्वतंत्र पदार्थ मानलेला आहे. 'छाया प्रकाशावरणनिमित्ता' अशी व्याख्या सर्वार्थसिद्धि ग्रंथामध्ये केली आहे. म्हणजे प्रकाशावर आवरण पडले की, छाया निर्माण होते. प्रकाशमार्गामध्ये अपारदर्शक (opeque bodies) पदार्थ येणे आवरण आहे. स्थूल-सूक्ष्म या पुद्‌गल प्रकारात छाया येते.

छायेचे प्रकार दोन– "सा द्वेधा, वर्णादि विकारपरिणता प्रतिबिम्बमात्रात्मिका चेत्ति।" प्रकाश मार्गात आरसा-दर्पण Mirror आणि भिंग Lense (अंतर्गोल किंवा बहिर्गोल) येणे हे सुद्धा एक प्रकारचे आवरण आहे, आणि त्यामुळे वास्तविक आणि अवास्तविक प्रतिबिंब होतात. असे प्रतिबिम्ब दोन प्रकारचे आहेत. १) वर्णादि-विकारपरिणत व २) प्रतिबिम्बमात्रात्मिका. पहिल्या प्रकारात वैज्ञानिकांनी मान्य केलेले ते वास्तविक प्रतिबिम्ब येऊ शकतात, जे विपर्यस्त (Inverted) होतात आणि त्यांचे प्रमाण (Size) बदलते. प्रत्यक्ष प्रकाश किरण मिळाल्याने-मिलनाने-असे प्रतिबिंब होतात आणि प्रकाश पौद्‌गलिक असल्यामुळे असे प्रतिबिंबसुद्धा पौद्‌गलिकच आहेत. दुसऱ्या प्रकारात वैज्ञानिकांनी मान्य केलेले अवास्तविक प्रतिबिम्ब (Virtual Images) येतात. यात केवळ प्रतिबिंबच असते. प्रकाश किरणांच्या मिलनाने हे प्रतिबिंब बनते.

वरील प्रकारावरून हे निश्चित होते की, शक्ति (Energy) चे परिवर्तन छाया (Shadows) आणि वास्तविक (Real) व अवास्तविक (Virtual) प्रतिबिंब (Images) यामध्ये होते. गणना यंत्र (Counting machine) सर्वांच्या परिचयाचे आहे. त्या यंत्राचा उपयोग जर व्यतिकरण पट्ट्या (Interference bands- काचेच्या काळ्या पट्ट्या) वर केला तर *त्या काळ्या पट्टी (Dark band) मधून प्रकाश विद्युत रितीने (photo electrically)* विद्युत् अणु (electrons) बाहेर पडत असतात हे सिद्ध झाले आहे. सारांश काळी पट्टी केवळ प्रकाशाचा अभाव नाही तर ती शक्ति (Energy) रूप आहे तसेच पट्टीरूपाने जी छाया आहे ती सुद्धा energy च आहे.

*वरील विवरणावरून एक गोष्ट सिद्ध होऊ शकते की, छाया energy असल्यामुळे ती पुद्‌गल आहे आणि* तिचा सर्वथैव नाश होऊ शकणार नाही. याचाच अर्थ छाया अनादिकालापर्यंत आकाशात रहाते आणि पुन्हा त्याच छायेचे फोटो काढता येतील. कॅमेऱ्या समोरून माणूस सरकल्यावर फोटो काढता येत नाही हे आज पटत असले तरी त्या माणसाची छाया तो बाजूला सरकल्यावर सुद्धा तिथेच असली पाहिजे आणि म्हणूनच पुन्हा (माणसाच्या अभावात) फोटो काढता येणे शक्य आहे.

प्रकाश– सूर्याचा प्रकाश आतप म्हणवला जातो तर चद्राच्या प्रकाशाला उद्योत म्हणतात यांना अनुक्रमे Heat Rays आणि Light Energy म्हणतात. वर वर पहाता हे पृथक्करण विशेष वाटत नाही पण सूक्ष्म रितीने विचार केल्यास हे पृथक्करण पूर्णपणे वैज्ञानिक आहे हे पटेल. प्रकाश निरंतर गतिशील आहे हे वैज्ञानिकांनी मान्य केले आहे. इतकेच नव्हे तर प्रकाशाला वजन असते हे देखील प्रयोग सिद्ध झाले आहे. एका चौरस मैल पृथ्वीवर सूर्यापासून एक मिनिटाला अर्धा छटाक प्रकाश पडतो हे शास्त्रज्ञानी सिद्ध केले आहे. प्रकाशाची गति प्रति सेकंदास १८६००० आहे आणि प्रकाश निरंतर गतिशील आहे हे विज्ञानाने सिद्ध केले आहे.

वर्गणा– एका दुसऱ्या अपेक्षेने जैनाचार्यांनी तेवीस प्रकार पुद्‌गलाचे मानले आहेत. त्यातील १ आहार, २ तैजस, ३ भाषा, ४ मन व ५ कार्माण या वर्गणाचा विचार आता करावयाचा आहे.

ढोवळमानाने वर्गणाचे स्वरूप समजण्यासाठी गोम्मटसारातील या दोन गाथा पहा-

आहार वग्गणादो तिण्णि सरीराणि होंति अस्सामो । णिस्सासोवि य तेजोवग्गणखंधादु तेजंगं ॥ ६०६ ॥
भासमणवग्गणादो कमेण भासा मणं च कम्मादो । अट्ठविह कम्मदव्वं होदित्ति जिणेहि णिद्दिट्ठं ॥ ६०७ ॥

सारांश तेविस प्रकारच्या वर्गणापैकी आहार वर्गणांनी औदारिक, वैक्रियिक, आहारक ही तीन शरीरे आणि स्वासोच्छ्वास बनतात, तैजसवर्गणानी तैजस शरीर बनते, भाषा वर्गणानी चार प्रकारचे वचन, मनोवर्गणानी हृदयस्थानात अष्टदळ कमळरूप द्रव्यमन आणि कार्माण वर्गणानी आठ प्रकारचे कर्म बनते असे जिनेन्द्रदेवानी सांगितले आहे,

१) **आहार वर्गणा-** या वर्गणानी पृथ्वी, जल, वायु व वनस्पति काय जीवांचे शरीर बनते व त्याचे पोषण व रक्षण होते. मनुष्य व तिर्यंच यांचे औदारिक; देव व नारकी यांचे वैक्रियिक; विशेष ऋद्धिधारी मुनीचे आहारक शरीर असते. वैज्ञानिकाना जी मौलि ( ९२ अथवा १०३ ) सापडली त्या सर्वांचा घटक प्रोटॉन असतो. इलेक्ट्रॉन त्याच्या साहचर्याने रहातो. हा प्रोट्रॉन आहार वर्गणेत मोडतो. विश्वातील दिसणारी सर्व द्रव्ये ( तैजस वर्गणेशिवाय ) आहार वर्गणेत येतात.

तैजस वर्गणा- या वर्गणा समजावून घेण्यासाठी तत्वार्थ सूत्रातील खालील सूत्रे पहा- पर परं सूक्ष्मम् । प्रदेशतो ऽसंख्येयगुणं प्राक्तैजसात् । अनंतगुणे परे । अप्रतिघाते । अनादि संबंधे च । सर्वस्य ।

उत्तरोत्तर ही शरीरे सूक्ष्म आहेत. बहुधा तेज, किरण, कांति, विद्युत् प्रकाश, उष्णता, छाया इ. तैजस शरीराचे असावेत. वैज्ञानिकानी क्षकिरण, अल्फा किरण, लेसर किरण, गामा किरण, अणु विद्युत इ. चा शोध लावला आहे. प्रयोग करताना शास्त्रज्ञाना असे आढळून आले की, काही किरणे अति कठिण धातूमधून देखील सरळ आरपार जातात. त्याना गॅमा किरण म्हणतात. कारण औदारिक, वैक्रियिक, आहारक, तैजस व कार्माण हे क्रमाने सूक्ष्म सूक्ष्म आहेत. 'अनंत गुणे परे' या सूत्रावरून तैजस व कार्माण शरीराचे प्रदेश संख्येत अनंतपटीने वाढ होते आणि 'अप्रतिघाते' सूत्रावरून गॅमा किरण तैजस वर्गणेचे आहेत हे स्पष्ट होते. तैजस शरीराचे कार्य पृथ्वी, जल, अग्नी, वायु व वनस्पति या पंच स्थावर व द्वीन्द्रियादि त्रस जीवाच्या शरीराला कांति देणे हे आहे.

३) **भाषा वर्गणा-** शब्दापासून भाषा होते. कुणि कुणि शब्द-भाषा हा आकाशाचा गुण मानतात पण ते बरोबर नाही. कारण शब्द गतिमान असतात ते साठविले जाऊ शकतात आणि अडविले जाऊ शकतात. आकाशात हे गुण नाहीत. शब्दाविषयी मागे आपण विचार केलेला आहे. थोडक्यात असे की, शब्द, भाषा, ध्वनि, आवाज हे भाषा वर्गणेत येतात. वैज्ञानिकानी हे सिद्ध केले आहे की, ध्वनिलहरी या वायुलहरी, प्रकाश किरण यापेक्षा वेगळ्या आहेत. ध्वनि हा वायु व प्रकाश यापेक्षा वेगळा आहे. कारण वायु आहार वर्गणेत व प्रकाश तैजस वर्गणेत मोडतो. शास्त्रज्ञानी असे सिद्ध केले आहे की, ध्वनीचा वेग दर सेकंदास ३३२ ते ५००० मिटर आहे. तरी पण हे बरोबर वाटत नाही. कारण शुद्ध पुद्गलाणू एका समयात १४ राजू इतके अंतर जातो. साधनांच्या अभावी कदाचित् ध्वनि लहरीचा वेग मोजता आला नाही तरी एवढे निश्चित सागता येईल की, ध्वनि लहरीचा वेग खूप आहे. कारण टेलिफोन, रेडिओ, टेलिव्हिजन यांच्या माध्यमातून शेकडो मैल दूरचे आपण तावडतोब ऐकतो.

४) **मनोवर्गणा-** मतिज्ञान व श्रुतज्ञान यांच्या कक्षेत आधुनिक विज्ञान येते. आणि त्या दोन्ही ज्ञानाने संज्ञीजीवाचे मन प्रत्यक्ष पाहिले जाऊ शकत नाही मन हे मनोवर्गणेपासून बनते म्हणून मनोवर्गणा पुद्गल आहे. सर्वानाच मन असत नाही. काही पंचेंद्रिय जीवाना ते असते. मन.पर्यय ज्ञानाचा विषय पुद्गलांचे सूक्ष्म पर्याय




जाणणे हा आहे. अवधि ज्ञानाने देखील पुद्गल द्रव्याच्या अवस्थांचेच ज्ञान होते. 'रूपिष्ववधेः' आणि 'तदनन्तभागे मनःपर्ययस्य।' या दोन सूत्राद्वारे मन.पर्यय ज्ञानाचा विषय अत्यंत सूक्ष्म असल्याची कल्पना येईल. आधुनिक वैज्ञानिकाना शरीरातील मन शोधून काढता आले नाही.

५) **कार्माण वर्गणा–** वरील चारही वर्गणेपेक्षाही ही वर्गणा अत्यत सूक्ष्म आहे. कार्माण शरीर हे अत्यंत सूक्ष्म असते असे जैनाचार्यांनी वर्णन केले आहे. ही वर्गणा अजून शास्त्रज्ञाना कळाली नाही. कारण त्या आधीचीच मनोवर्गणा शोधून काढता आली नाही तर कार्माण वर्गणेचा विचारच शास्त्रज्ञाच्या डोक्यात कसा येणार ? प्राणी मरणानंतर दुसरा जन्म धारण करतो त्यावेळी, एक, दोन किंवा तीन मोडे घेईपर्यंत जीव अनाहारक असतो.* त्यावेळी देखील कार्माण वर्गणाच त्याचे (जीवाबरोबर) बरोबर असतात. या वर्गणाविषयी अंशतः ज्ञान विशेष अवधिज्ञानधारक जीव आणि मन.पर्याय ज्ञानधारक मुनींना असते व पूर्ण ज्ञान केवलज्ञानी जीवाना असते. कर्म सिद्धांतामध्ये थोडा विचार याविषयी करावयाचा आहे. तूर्त एवढे पुरे.

**धर्म द्रव्य–** (Medium of motion for soul and matter) धर्म द्रव्याचे बाबतीत शास्त्रज्ञ, वैज्ञानिक यांचा काय दृष्टिकोन आहे हे पहाण्याआधी जैनाचार्यांनी त्याचे स्वरूप कसे सांगितले आहे ते पाहू. 'गमणनिमित्तं धम्मम्' म्हणजे पुद्गल आणि जीवाना गमन करण्यास धर्मद्रव्य निमित्त आहे. द्रव्यसंग्रहात म्हटले आहे की,

गइपरिणयाण धम्मो, पुग्गलजीवाण गमण सहयारी । तोयं जह मच्छाणं अच्छंताणेव सो णेई ॥ १७ ॥

म्हणजे ज्याप्रमाणे माशाच्या गतीला पाणी जसे सहकार्य करते, त्याप्रमाणे धर्मद्रव्य जीव आणि पुद्गलाना गमन करण्यास सहकारी कारण आहे. पण जे जीव आणि पुद्गल गमन करीत नाहीत, त्याना हे द्रव्य गतिमान करीत नाही. अनेक शास्त्रातून धर्मद्रव्याचे विस्तृत, वर्णन केले आहे. ते सर्वच येथे देणे शक्य नाही. सारांश रूपाने 'पंचास्तिकाय' ग्रंथातील खालील गाथा पहा–

धम्मत्थिकायमरस अवण्णगंधं असद्दप्फासं । लोगागाढं पुट्ठं पिहुलमसंखादियपदेसं ॥
अगुरुलघुगेहि सया तेहि अणंतेहि परिणदं णिच्चं । गदिकिरियाजुत्ताणं कारणभूदं सयमकज्जं ॥
उदयं जह मच्छाणं गमणाणुग्गहयरं हवदि लोए । तह जीवपुग्गलाणं धम्मं दव्वं वियाणेहि ॥
जादो अलोगलोगो जेसिं सब्भावदोय गमणठिदी । दो वि य मया विभत्ता अविभत्ता लोयमेत्ता य ॥
ण य गच्छदि धम्मत्थी गमणं ण करेदि अण्णदवियस्स । हवदि गदी स प्पसरो जीवाण पुग्गलाणं च ॥
विज्जदि जेसिं गमणं ठाणं पुण तेसिमेव सभवदि । ते सगपरणामेहिं दु गमणं ठाणं च कुव्वति ॥

भावार्थ– धर्मद्रव्य अरस (रसरहित), वर्णरहित, गंधरहित, शब्दरहित, स्पर्शरहित आहे. सर्व–संपूर्ण– लोकाकाश व्यापून आहे. धर्मास्तिकाय अस्पर्श, अरस, अगंध, अवर्ण आणि अशब्द आहे लोकव्यापक आहे. विशाल आणि असंख्यात प्रदेशी आहे. ते अनंत असून अगुरुलघु आहे, सदा परिणमित होते, नित्य आहे. गति क्रियायुक्तांना कारणभूत आहे आणि स्वतः अकार्यरूप आहे. ज्याप्रमाणे–

वरील गाथावरून धर्मद्रव्याविषयी पूर्ण कल्पना येते.

धर्मद्रव्य नसेल तर ?– सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे जीव आणि पुद्गल यांचे हलनचलन होऊ शकणार नाही. जितके धर्मास्तिकाय महत्त्वाचे तितकेच अधर्मास्तिकाय देखील आहे, अधर्मास्तिकाय द्रव्य नसते तर जगात सर्वच पदार्थ अनंत आकाशात उडत राहिले असते धर्मद्रव्याच्या अभावी लोक व अलोकाची कल्पना व्यर्थ आहे. विश्वव्यवस्था धर्मद्रव्यामुळे अबाधित आहे, प्रमेय कमल मार्तंडमध्ये म्हटले आहे, 'विवादापन्नसकलजीव-पुद्गलाश्रयासकृद्गतयः। साधारण बाह्य निमित्तापेक्षा युगपद् भाविगतिमत्त्वादेकसरः सलिलाश्रयानेकमत्स्यगतिवत् ।'

( सर्व जीव आणि पुद्गल यांच्या गतीना एका साधारण बाह्य निमित्त अपेक्षित असते, कारण हे सर्व युगपत् गतिमान दिसतात, तळ्यामधील सर्व मत्स्यांच्या युगपत् गतीवरून गतीसाठी साधारण निमित्त असलेल्या तळ्यातील पाण्याचे अनुमान होते त्याप्रमाणे )

**धर्मद्रव्य–एक युक्तिसंगत कल्पना–** आकाश अनंत आहे, विश्व एक देशवर्ती आहे असे जैनदर्शन म्हणते. विश्व एक देशवर्ती आहे असे का ? यासाठी की, लोक परिमित आणि गतिक्रियेस कारण असे एक तत्त्व आहे. जर असे नसते तर विश्वातील पुद्गलाचा एक एक परमाणु अनंत आकाशात विखुरला गेला असता हे आपण पाहिले आणि विश्वाची एकरूपता–संघटन राहिले नसते. ही कल्पना वैज्ञानिक व सुसंगत आहे.

दुसरा एक तर्क असा की, आत्मा आणि अणु दोन गतिशील पदार्थ आहेत. आपल्या गतीचे उपादान कारण तर ते स्वतःच आहेत, पण निमित्त कारण सुद्धा आवश्यक आहे. पृथ्वी, जल इ. लोकव्यापी नाहीत. गति मात्र सर्व लोकात व्यापून आहे. वायु आदि स्वयं गतिशील आहेत. आकाश लोक आणि अलोकात सर्वत्र व्यापून आहे, पण जीव आणि पुद्गल यांची गति सर्वत्र असत नाही काल गति निरपेक्ष आहे. निर्धारित द्रव्यापैकी एकही द्रव्य गति-माध्यमाचे प्रतीक होऊ शकत नाही. आणि म्हणूनच धर्मद्रव्याची स्वतंत्र कल्पना अत्यंत स्वाभाविक व तर्कसंगत आहे.

**विज्ञानाकडे एक दृष्टिक्षेप–** सूर्य, ग्रह, तारे हे लाखो मैल ( पृथ्वीपासून ) दूर आहेत हे गमन कसे करतात ? त्यांच्या गतीचे माध्यम कोणते ? प्रकाश इतक्या दूर अंतरावर येतो कसा ? ह्या व अशा प्रश्नाचे उत्तर ज्यावेळी शास्त्रज्ञ शोधू लागले त्यावेळी असे मत झाले की, माध्यमाशिवाय हे शक्य नाही. ते माध्यम म्हणजे ईथर. ईथरचे स्वरूप पुढीलप्रमाणे निश्चित झाले, 'तारे, ग्रह आणि आकाशातील इतर प्रकाशपिंड यांच्यातील रिकाम्या जागेत ( पोकळी ) भरलेला-व्यापून-आहे. अत्यंत सूक्ष्म परमाणूंच्या पोकळीत तो व्यापून असतो. ईथर भौतिक पदार्थ आहे. तो लवचीक असून सघन आहे.' लवचीक आणि सघन या गुणाबाबत शास्त्रज्ञाना पुरावे न सापडल्यामुळे तो विचार मागे पडला. मात्र वैज्ञानिक ईथर पुष्कळ प्रकारचे मानू लागले. अनेक कारणासाठी विशिष्ट प्रकारचे ईथर असावे अशी त्यांची समजूत झाली आणि मग शेकडो प्रकारचे ईथर समजले जाऊ लागले. ही गोष्ट १९ व्या शतकापूर्वीचे अनेक प्रयोग झाले. शेवटी Chicago rotation Experiment या संस्थेने निर्णय दिला की, Ether was stagnant not moving.[1]

( ईथर साठलेला-भरलेला आहे अस्थिर नाही. ) शास्त्रज्ञानी ईथर मूर्तिक पदार्थ मानला होता म्हणून ते असे समजत की, ईथर सूक्ष्मातिसूक्ष्म वायूपेक्षा देखील सूक्ष्म आणि पोलादाहून देखील कठिण आहे. प्रसिद्ध शास्त्रज्ञ प्रो. आइन्स्टाइन याने आपल्या अपेक्षावादाने वेगळी व स्पष्ट व्याख्या केली. त्यांच्या मते ईथर अपारमाणविक, लोकव्याप्त, अदृश्य आणि अखंड द्रव्य आहे हार्वे या शास्त्रज्ञाचे असे मत होते की, ईथरच्या सहाय्याने सूर्य प्राण्यांच्या रक्तापर्यंत उष्णता पोहोंचवू शकतो. तरंग प्रवाहासाठी ईथर हे माध्यम ठरवले गेले. गंमत अशी की, मॅक्सवेल या शास्त्रज्ञाने सिद्ध केले की, प्रकाशाच्या लहरी विद्युत् चुंबकयुक्त आहेत आणि हे सिद्ध झाल्यावरोबर ईथर घनरूप कठिण आहे ही कल्पना मागे पडली. श्री. नोमिमिरसन यानी स्पष्ट केले की, ......it as an utterly thin and utterly elastic, fluid that flowed undisturbed between the particles of the material universe and fillen all 'empty' space of every kind ! प्रो. मिलर या शास्त्रज्ञाने १९२१ ते २५ पर्यंत अनेक प्रयोग करून सिद्ध केले की, पृथ्वी आणि ईथर यामध्ये सापेक्षिक गति आहे. या सापेक्षिक गतीच्या सिद्धांताने ईथरच्या गतिविषयी अनेक प्रयोग झाले आणि सिद्ध केले गेले की, ईथरला कसलीच गति नाही. Nature ( 1934 Feb. 3 ) या

1. Cosmoloy old and new Page No. 22.




पत्रकात लिहिले आहे की, the magnitude and direction of the observed effect vary in the manner required by assumption that the earth is moving through a fixed Ether अशा प्रकारे अनेक सिद्धांत पुढे आले. त्या सर्वांचा परामर्श येथे घेणे अगदीच अशक्य आहे.

**ईयर आणि धर्मद्रव्य एकच कसे ?**– वर जे थोडक्यात वैज्ञानिकानी सिद्ध केलेल्या सिद्धांताचे वर्णन दिले याचे कारण एवढेच की, वैज्ञानिकानी ईथरविषयी जे मान्य केले ते म्हणजे धर्मद्रव्यच होय हे निश्चित. प्रो. ए. एस. एडिंग्टन म्हणतो, " ... this does not mean that the ether is abolished. We need an ether...now a days it is agreed that ether is not a kind of matter, being non-material, its properties are sinigeneries (quite unique) characters such as mass and rigidity which we meet with in matter will naturally be absent in ether but the ether will have new and definite characters of its own ...... non material ocean of ether[1] " प्रो. आइन्स्टाईन या जगद्विख्यात शास्त्रज्ञाने मान्य केले आहे की, "जग-विश्व-परिमित आहे, अलोक अपरिमित आहे. लोक जगपरिमित असल्यामुळे द्रव्य किंवा शक्ति ( Matter or energy ) विश्वाच्या बाहेर जाऊ शकत नाही. विश्वाच्या बाहेर त्या शक्तीचा (द्रव्याचा) अभाव आहे, जी शक्ति गतीस सहाय्यक आहे." प्रो. जी. आर. जैन तर स्पष्टच म्हणतात की, " Thus it is proved that science and Jain Physics agree absolutely so far as they call Dharm (ether) non-material, non-atomic, non-discrete, continuous, co-extensive with space, indivisible and as a necessary medium for motion and one which does not itself move.[2] सारांश धर्मद्रव्य आणि ईयर एकच.

**अधर्म द्रव्य**– (Medium of rest of souls, matter & energy) महाकवि हरिश्चंद्र अधर्म द्रव्याचे स्वरूप सोदाहरण समजावून देतांना म्हणतात– ( अ. २१ )

छायेव घर्मतप्तानाम् अश्वादीनामिव क्षितिः । द्रव्यानां पुद्गलादीनामधर्मः स्थितिकारणम् ॥

अधर्म द्रव्य सर्व पदार्थांना स्थितीस कारण आहे, ज्याप्रमाणे सूर्यकिरणानी तसे माणसाला झाडाची सावली थांबण्यास कारण आहे किंवा अश्वादिकाना पृथ्वी हे थांबण्यास कारण आहे.

अधर्म द्रव्य हे निष्क्रीय, अरूपी असून सर्व लोकाकाशात व्यापून आहे. नियमसार ( २·३० ) मध्ये श्री कुंदकुंदाचार्य यानी 'अधम्मं ठिदि जीव पुग्गलाणं च' (अधर्म द्रव्य हे जीव आणि पुद्गल यांना स्थितीस कारण आहे.) चंद्रप्रभ काव्यामध्ये धर्म-अधर्म द्रव्याची तुलना केली आहे.

द्रव्याणां पुद्गलादीनामधर्मः स्थितीकारणम् । लोकेऽभिव्यापकत्वादि धर्मोऽधर्मोऽपि धर्मवत् ॥ १८-७११ ॥

म्हणजे अधर्म द्रव्य पुद्गलादिक द्रव्यांच्या स्थितीस कारण आहे. ते द्रव्य संपूर्ण लोकाकाशात व्यापलेले असून त्याचे इतर गुणधर्म धर्म द्रव्यासारखे आहे. हेच गुणधर्म श्री असग कवि सांगतात–

नित्योऽमूर्तः क्रियाहीनश्छायेव पथिकांगिनाम् ।

अधर्म द्रव्य नित्य, अमूर्त, क्रियाहीन आहे, ज्याप्रमाणे पथिकाना थांबविण्यास छाया कारण आहे. एकंदरीत थोडक्यात स्वरूप समजून येण्यासाठी वरील उदाहरणे दिली आहेत.

**न्यूटनचा गुरुत्वाकर्षण सिद्धांत**– सर्वश्रुत गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत सांगतो की, प्रत्येक पदार्थ दुसऱ्या पदार्थास आकर्षित करतो. न्यूटन एके ठिकाणी म्हणतात– " *Gravity must be caused by some agent*

1. The nature of the physical world P. 31.   2. Cosmoloy old and new.

acting constantly according to certain laws; but this agent be material or non material, I have left to the consideratian of my reasless.[1] "

म्हणजे गुरुत्वाकर्षणामध्ये कशाचे तरी प्रतिनिधीत्व असले पाहिजे पण ते भौतिक आहे की अभौतिक आहे हे मात्र नक्की झाले नाही. श्री भास्कराचार्य यानी 'सूर्य सिद्धान्तामध्ये सांगितले आहे की, प्रत्येक पुद्गल पदार्थाचा पिंड परस्पराना परस्पराकडे आकर्षित करतो. हे आकर्षण अंतराप्रमाणे विशिष्ट प्रमाणात बदलते. अंतर दुप्पट झाल्यास आकर्षण एक चतुर्थांश असते. पदार्थाचे अंतर अति जवळ किंवा अति-दूर झाले तर हे आकर्षण अपकर्षणामध्ये बदलते.

**गुरुत्वाकर्षण क्षेत्र–** (Gravitational field) इलेक्ट्रान आणि प्रोटॉनची चर्चा मागे आलीच आहे. जी शक्ती Electron ला Proton च्या भोवती गतिमान ठेवते आणि एकमेकापासून पृथक् होऊ देत नाही ती विद्युत् चुंबकीय शक्ति आहे आणि ज्या माध्यमातून ही शक्ति कार्य करते ते क्षेत्र (field) होय. हे फील्ड (क्षेत्र) म्हणजे अधर्मद्रव्य. यामुळेच पदार्थ यथावत् रहातात. स्कन्धामध्ये परमाणु देखील असेच रहातात. त्या क्षेत्राअभावी स्कन्ध इतस्ततः विखुरलेले असते. स्फटिक (crystal) सुद्धा याच माध्यमामुळे आपले स्वरूप टिकवून असतात.

**आईन्स्टाइनचा सिद्धांत आणि अधर्मद्रव्य–** सुमारे पंचवीस वर्षे संशोधन करून आइन्स्टाइनने एक सिद्धांत जगापुढे ठेवला. त्याला Unified field theory of Gravitation and Electro Magnatism (गुरुत्वाकर्षण) व विद्युत-चुम्बकीय शक्तींचा समन्वित सिद्धांत) असे म्हणतात. या सिद्धांतामध्ये म्हटले आहे की the forces of gravitation and electromagnatism can be represented by the same set of equations; in other words they are fundamentally the same म्हणजे गुरुत्वाकर्षण आणि विद्युत्चुंबकीय शक्ति एकाच समीकरणाने दाखविता येते. याचाच अर्थ या दोन्हीही शक्ति एकच. याच समन्वित सिद्धांताला म्हणजे Unified field ला जैन धर्म ग्रंथात अधर्मद्रव्य म्हटले आहे.

**सारांश–** विश्वातील सहा द्रव्यापैकी अधर्मद्रव्य एक आहे. याचे कार्य विश्वातील वेगवेगळे स्कंध आपापल्या ठिकाणी अवस्थित-यथास्थित ठेवणे हे आहे. म्हणजे Cosmic unity राखणे हे आहे जैनाचार्यांनी मांडलेले सिद्धांत शेंकडो वर्षांनी का असेनात पण खरे सिद्ध होत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे.

**आकाशद्रव्य–** (Space) पुद्गल द्रव्य, धर्म द्रव्य, अधर्म द्रव्य याविषयी यापूर्वी आपण तौलनिकदृष्ट्या विचार केला. आता आकाश द्रव्याविषयी विचार करावयाचा आहे. प्रसिद्ध तत्त्वार्थ सूत्रात पू. उमास्वामी यांनी 'आकाशस्यावगाहः' या सूत्राद्वारे लक्षण सांगितले आहे. सर्व द्रव्यांना अवकाश-अवगाह (जागा) देणे हे आकाशाचे लक्षण आहे. अधिक स्पष्ट कल्पना येण्यासाठी सर्वार्थसिद्धि ग्रंथातील खालील सूत्र पाहू, 'जीवपुद्गलादीनामवगाहिनामवकाशदानमवगाह आकाशस्योपकारो वेदितव्य.' जीव, पुद्गल, धर्म, अधर्म, काल या द्रव्यांना अवकाश–जागा देणें हा आकाशाचा उपकार आहे. आकाश द्रव्याच्या गुणधर्माची कल्पना येण्यासाठी अनेक उदाहरणे देता येतील पण विस्तारभयास्तव ती टाळून आपण विज्ञानाकडे वळू.

**डॉ. थायबॉट आणि आकाश द्रव्य–** डॉ. थायबॉट (Dr. Thibaut) हे म्हणतात– Akasa must mean some form of subtle matter and not the mathematican's space पण त्यांनी चूक अशी केली की, आकाशासाठी 'ईथर' शब्द वापरला. प्रो. चक्रवर्ती यानी जैनाचार्यांची व्याख्या मान्य केली आहे. ते म्हणतात– "Curiously the non-Jain Indian systems of thought do not pay any prominent attention to the problem of space." हे त्यांचे म्हणणे योग्यच आहे. कारण वेदांतामध्ये देखील आकाश हा शब्द

1 Letters to Benthey प्रो न्यूटन (cos. P. 27)




आकाश आणि ईथर या अर्थी वापरलेला आहे. आचार्य कुंदकुंदानी पंचास्तिकाय ग्रथात सविस्तर वर्णन केले आहे. त्यावरुन व इतरही ग्रंथ पाहिल्यास वरील विधान असत्य नसावे असे वाटते प्रो. कान्ट (Kant) आणि हिगेल (Higel) हे तत्वज्ञानी तर आकाशद्रव्याचे वेगळे अस्तित्व मान्य तर करीतच नव्हते उलट ते केवळ काल्पनिक मानीत.

भगवंताच्या आकाश आणि काल द्रव्याविषयीचे सिद्धांत पाश्च्यात्य शास्त्रज्ञाशी जुळतात. कॅन्टर, पीनो व फ्रेग या गणितज्ञांनी आकाश (Space) व काल (Time) यांचे अस्तित्व मानले आहे. बर्गसनच्या सिद्धांतानुसार कालक्रियात्मक उत्क्रांती (Creative evolution) कारणरूप आहे. बर्ट्रांड रसेलनेही काल अस्तित्वरूप असल्याचे सांगितले आहे पण ते अनुरूप नाही. जैन दर्शनामध्ये उर्ध्वप्रचय मानले आहे व गणितशास्त्रामध्ये ते एकमापी आहे.

वास्तविक आकाश आणि काल यांचा समन्वय गणितीय पद्धतीनेच साधता येतो. प्रो. चक्रवर्ती म्हणतात, "It is modern mathematics that has successfully reclaimed once again space and time from destructive हानिकारक– dialective of the idealistic metaphysics तार्किक, धर्म, अधर्म काल ही द्रव्ये आकाशातच आहेत आणि ते एकमेकात व्यापून (Inter penetrating) आहेत.

**युक्तिसंगत मान्यता–** जैनाचार्यांनी आकाशाचे दोन भाग केले आहेत लोकाकाश ससीम आहे आणि अलोकाकाश असीम–धर्मद्रव्य लोकाकाशाच्या बाहेर नाही म्हणून पुद्गल तसेच जीवादि द्रव्ये लोकाकाशाच्या बाहेर जाऊ शकत नाहीत. 'धर्मास्तिकायाभावात्' असे म्हटलेले आहे. म्हणजेच लोकाकाशाची निश्चित अशी सीमा झालेली–ठरलेली आहे. त्या सीमेनंतरचा भाग अलोकाकाश म्हणवला जातो. आकाशाशिवाय मात्र तिथे कोणतेच द्रव्य नाही. ही मान्यता अगदि उचित आहे. कारण अशा जागेची कल्पना करणे देखील चूक आहे की, ज्यापुढे आकाश नाही. शेवटी असे म्हणावे लागते की, The wonders of modern sicence are all associated with the reality of space and what is contained therein. Hence to the "Indian Realism" cannot but be real. आधुनिक विद्वानांची मान्यता अशी की, जगात जे दृश्य अदृश्य पदार्थ आहेत त्यांचे प्रमाण मर्यादित आहे आणि हे विश्व देखील मर्यादित आहे. या विश्वाचा बांक (Curvature) असा आहे की, प्रकाशाचा किरण सरळ रेषेत प्रवास करून परत त्याच ठिकाणी येतो जेथून तो निघाला. या प्रवासाला १०० (शंभर) परार्ध वर्षे लागतील. (१०० वर अठरा शून्ये देऊन होणारी संख्या.) प्रो. आइन्स्टाइन यांनी या Curvature चा संबंधी विश्वातील पदार्थाच्या संख्येशी आणि प्रमाणाशी जोडले आहे. जर या जगात वस्तु नसेल तर आकाश आणि काल हे दोन्हीही नाहीसे होतील. प्रो. आइन्स्टाइन हे विश्व मर्यादित मानतात तसेच त्या पलिकडे 'कांहीच नाही' असे मानतात तर जैनाचार्य अलोकाकाश मानतात.

काल (Time)– श्री. आचार्य नेमिचन्द्रांनी द्रव्यसंग्रहात म्हटले आहे–

लोयायासपदेसे इक्किक्के जे ठिया हु इक्किक्का । रयणाणं रासी इव ते कालाणू असंखदव्वाणि ॥ २२

(लोकाकाश प्रदेशामध्ये रत्नांच्या राशीप्रमाणे कालाणू आहेत. ते असंख्य आहेत.) "कालश्च" (५–३९) या सूत्राद्वारे श्री उमास्वामीनी कालसुद्धा एक द्रव्य आहे हे सांगितले. अनेक शास्त्रातून कालद्रव्याचे वर्णन आले आहे. एका आकाश प्रदेशात एक कालाणु याप्रमाणे असंख्य कालाणु आहेत. 'रत्नांच्या राशीप्रमाणे' हे कालाणूचे लक्षण महत्त्वाचे आहे. सर्वार्थसिद्धि ग्रंथामध्ये पुढीलप्रमाणे स्वरूप सांगितले आहे–

लोकाकाशस्ययावन्त. प्रदेशाः तावन्त. कालाणवोनिष्क्रिया एकैकाकाशप्रदेशे एकैकवृत्त्या लोकं व्याप्य व्यवस्थिताः।

(लोकाकाशाचे जितके प्रदेश आहेत तितके कालाणू आहेत. ते निष्क्रीय असून एका आकाश प्रदेशामध्ये एक याप्रमाणे सर्व लोक व्यापून आहेत.) आकाशाच्या जितक्या प्रदेशाला एक परमाणु व्यापतो त्याला प्रदेश

म्हणतात तितकेच कालाणू आहेत. हे कालाणू एकमेकात बद्ध होत नाहीत, भेटत नाहीत. ते सर्व अरूपी, अविभाज्य आणि निष्क्रीय आहेत. कालाच्या सर्वात सूक्ष्म भागास समय म्हणतात. एका आकाश प्रदेशातून दुसऱ्या आकाश प्रदेशामध्ये परमाणु मंद गतीने जितक्या वेळात जातो तितक्या वेळाला समय म्हणतात.

कालाचे उपकार— कालाचे लक्षण सांगताना उत्तराध्ययनसूत्र २८।१० मध्ये 'वत्तणालक्खणो कालो' (वर्तना हे कालाचे लक्षण आहे) असे सांगितले आहे. सर्व द्रव्याचे परिवर्तन कालामुळे होते हे सांगताना गोम्मटसार (जीवकांड ५६८) मध्ये म्हटले आहे की,

वत्तणहेदू कालो वत्तणगुणमविय दव्वणिचयेसु । कालाधारेणेव य वट्टंति हु सव्वदव्वाणि ॥

श्री उमास्वामी यांनी काळाचे उपकार सांगितले आहेत ते असे—

'वर्तपरिणामक्रियाः परत्वापरत्वे च कालस्य ।'

म्हणजे १) वर्तना ( Exist ) २) परिणाम, ( Modification ) ३) क्रिया ( Movements ), ४) परत्व ( Priority ) ५) अपरत्व ( Juniority ), हे कालद्रव्याचे उपकार आहेत.

कालद्रव्याचे भेद— कालद्रव्याचे व्यवहार काल आणि निश्चय काल असे दोन भेद सांगितले आहेत. त्या प्रत्येकाचे लक्षण सांगताना द्रव्यसंग्रहामध्ये श्री नेमिचंद्राचार्य म्हणतात—

दव्वपरिट्टरूवो जो जो कालो हवेइ ववहारो । परिणामदिलक्खो वट्टणलक्खो य परमट्ठो ॥ २१ ॥

काल द्रव्य आणि वैज्ञानिक— द्रव्यपरिवर्तनाला काळ कारण आहे अशा अर्थाचे फ्रेंच तत्वज्ञ श्री. बर्गसन (Bergsan) याचे मत पहा. तो म्हणतो, "Time was a patent factor in the evalutian of the Cosmas." त्यांच्या मते पदार्थामधील वर्तन आणि परिणाम कालद्रव्याअभावी अशक्य आहे. हे त्यांचे मत जैनदर्शनाशी अगदी जुळणारेच आहे.

Key of Knowledge या ग्रंथामध्ये म्हटले आहे की, "विश्वातील पसरलेले कालद्रव्य घ्या आणि त्याचे रूपांतर शक्तीच्या वेष्टणात करा. तुम्हाला असे आढळून येईल की, परंपरा नष्ट झालेली आहे. अल्लाउद्दीनचा जादूचा दिवा ज्याप्रमाणे जादू निर्माण करतो व नष्ट करतो. त्याप्रमाणे विश्वातून कालद्रव्य काढून टाका, विश्वाचा विकास थांबेल. पुढे लेखक श्री. सी. आर. जैन म्हणतात, "Thus, from one point of view, Time serves as the mainspring of the Perpetum mobile (चिरस्थाई फिरणारा) and from another, keeps back the impish ( mischievous खोडकर ) chance from playing its uncanny pranks (भेसूर चेष्टा) with men and things in the world."

श्री. रिचर्ड ह्युजेस (Richard Hughes) हा कालद्रव्याच्या गतिविषयी म्हणतो की, "The only way in which you can tell future from past is that you will find more chance and higgledy-figgledy in it!" त्यासाठी त्याने एक उदाहरण दिले. तो म्हणतो, "समजा मी एक सिनेमा फिल्म तयार केली, त्यामध्ये असे दृश्य आहे की, कांही मुले एका खोलीत खूप खेळत आहेत. खेळता खेळता त्यांनी सर्व खोली अस्ताव्यस्त केली आणि नंतर ती सर्व बाहेर आली. हेच दृश्य जर उलट दाखवले ( फिल्म उलटी फिरवून) तर त्या दृश्यावर तुमचा विश्वास बसेल कां? मुळीच नाही. म्हणजे भूतकाळाची जाणीव भविष्यावरून होते.

प्रो एडिंग्टन आकाशद्रव्य आणि कालद्रव्याबाबत म्हणतो की, "आइन्स्टाइनच्या सिद्धांतावरून हे स्पष्ट झाले आहे की काल (Time) आणि आकाश (space) चमत्कारिकरित्या एकमेकात मिसळलेले आहेत. "जैनदर्शनात आकाश आणि काल यांचा संबंध कालाणूची व्याख्या करताना आला आहे मिकोंच्या चतुर्थ




आयाम सिद्धांताने (Four dimentional theory) आधुनिक विज्ञानाला एक नवीन दृष्टी देऊन नवीन वळण लावले. मिकोने आपले क्रांतिकारक विचार आणि सिद्धांत या योगे 'वस्तूच्या परिवर्तनात तिची लांबी, रुंदी आणि उंची यावरोबर काल (Time) देखील आहे, या गोष्टीचे समर्थन केले आहे. याचाच अर्थ पदार्थाचे परिवर्तन म्हणजे केवळ त्याच्या आकृतीत बदल नसून त्यास काल देखील सहाय्यक आहे. मिकोंचा हा सिद्धांत आणि जैनदर्शनातील कालद्रव्य या दोन्ही एकच आहेत. त्यावरून आइन्स्टाइनचे मत जैनदर्शनाशी जुळणारे आहे. थोडा फार स्पष्टीकरणात फरक जाणवतो, तो असा की, आइन्स्टाइन म्हणतो की, जर वस्तु नसेल तर काल आणि आकाश नाश पावेल. हे मत मात्र जैनदर्शनाशी जुळत नाही. कारण अलोकाकाशात कोणतेच द्रव्य नाही. केवळ आकाश आहे. कालाची गति सारखी एकाच दिशेने आहे हे सांगताना प्रो. एडिंग्टन म्हणतो की, "I shall use the phrase time's arrow to express this one way property of time which has no anologue (अंश) in space." सारांश असा की, काल बाणासारखा एकाच दिशेने जातो म्हणजे आकाशामध्ये कालाणू एका लांबच लांब सरळ रेषेत विद्यमान आहेत.

न्यूटन या वैज्ञानिकाने काल, आकाश आणि पदार्थ (Matter) याची स्वतंत्र सत्ता मानली आहे. तो असे समजतो की, विश्वाचा संकोच इतका झाला की ते एक बिंदु एवढे (इतके सूक्ष्म) झाले तरी काळ (Time) मात्र थांबणार नाही तो चालतच जाईल. आइन्स्टाइनचे मत मात्र जैनदर्शनाशी जुळते आहे. तो 'काल' हे स्वतंत्र द्रव्य मानीत असला तरी आकाशाशी काळाचा संबंध त्याला मान्य आहे.

रिचर्ड ह्यूजेस (Richard Hughes) असे मानतो की, काल आकाशासारखा वर्तुळाकृति नाही म्हणूनच तो म्हणतो की, "By going far enough into the future we shall never reach the past". प्रो. आइन्स्टाइन आपल्या सिलिंडर थेअरीमध्ये (Einstein's cylinder theory) म्हणतो की, "विश्वपृष्ठभाग सारखे असले तरी त्याच्या दोनच बाजू दृश्य आहेत." म्हणूनच तो म्हणतो की, पूर्व ही पश्चिम होऊ शकते पण भविष्यकाळ भूतकाळ होऊ शकत नाही. (But no bending by which Before ultimately becomes After).

प्रो. हेनशॉ वार्ड म्हणतो की पदार्थ, आकाश, काल आणि क्रिया ही चारही मूलतत्वे स्वतंत्र आहेत. यातील एकाचेही परिवर्तन दुसऱ्यात होऊ शकत नाही.

सारांश वैज्ञानिकांनी मांडलेली, सिद्ध केलेली मते जैनाचार्यांच्या मताशी जुळणारी आहेत. यावरूनच जैनाचार्यांची तत्वप्रणाली (द्रव्य व्यवस्था) किती सुसंबद्ध व स्पष्ट आहे हे कळते.

विज्ञानाने काळास (Time) मान्यता दिली असली तरी कालांणू (Atoms of Time) मात्र अजून सापडला नाही एवढे मात्र येथे प्रामुख्याने नमूद करावे लागते.

येथपर्यंत आपण जीवद्रव्य सोडून इतर पाच द्रव्यांचा तौलनिक विचार केलेला आहे. जैनाचार्यांनी साहित्य क्षेत्रातील सर्व विभागांवर विस्तृत, सुसंबद्ध विवेचन केले आहे. म्हणूनच पॅरिसचे एक थोर तत्वचिंतक श्री. लुई रेनाऊ हे म्हणतात, "नव्या धार्मिक आंदोलनाची गरज नाही कारण जैन धर्मातील वैज्ञानिक दृष्टिकोन एवढा वास्तववादी आहे की, या धर्मात दु.खी दुनियेचे हित करण्याचे परिपूर्ण सामर्थ्य आहे. त्याचा ऐतिहासिक आधार देखील सारभूत आहे" विषय (काव्य, इतिहास, भूगोल इ.) इतके विपूल आहेत की, एकही विषय अस्पष्ट किंवा अस्पृष्ट वाटत नाही शारदेच्या मंदिरात जैनाचार्य स्वप्रतिष्ठित आणि सुप्रतिष्ठित असले तरी आज जगाच्या दृष्टीने स्वप्रतिष्ठित असले तरी सुप्रतिष्ठित नसावेत असे वाटू लागते. 'दर्शना'ची भूमिका किंवा विज्ञानाची भूमिका कोणतीहि स्पष्ट करावयाची तर विपुल ग्रंथाचे अवलोकन व्हावयास हवे पण तौलनिक विचार पुढे मांडताना, त्या प्रकारची साहित्य निर्मिति करण्याकडे विद्वानांचे लक्ष न गेल्यामुळे अरुणोदयापूर्वीच्याच मंद प्रकाशात वाटचाल करावी लागते.

यापुढे आपण जीवद्रव्य व तत्संबंधी कर्म इ. विषयी तौलनिक विचार करावयाचा आहे. वाचकांनी हे लक्षात ठेवावे की, विस्तार भयास्तव 'दर्शना' तील उदाहरणे कमी दिलेली आहेत. मात्र जिथे जिथे तुलनेचा प्रश्न येईल किंवा विषय स्पष्ट करण्याचा प्रसंग येईल तिथे तिथे 'दर्शन' साहित्यातील मूळ श्लोक, गाथा इ. चा उपयोग केला आहे. हे तौलनिक अध्ययन परिपूर्ण नसेल, पण जैनाचार्य मात्र विज्ञान क्षेत्रात तितकेच स्वयंपूर्ण तसेच परिपूर्ण आहेत, जितके ते दर्शन क्षेत्रात आहेत.

विज्ञान हा विषय मनोरंजनाचा नसेल पण त्याचा इतिहास मनोरंजक आहे. म्हणून शक्यतो क्लिष्टता कमी होईल हा प्रयत्न केलेला आहे. विषय स्पष्ट व्हावा म्हणून उदाहरणे दिली आहेत. विज्ञानाने केलेल्या प्रगतीकडे पाहून आपले डोळे दिपून जातात हे खरे पण दर्शनाकडे त्यामुळे डोळेझाक झाली आहे हे आपण विसरतो. ज्ञानाची वाटचाल विज्ञानाला पुढे घेऊन चालली आहे, दर्शन मागे आहे. वास्तविक विज्ञान आणि दर्शन या दोघानाही त्याने घेऊन पुढे जावे.

जीव द्रव्य (Soul)– आतापर्यंत आपण अजीव द्रव्याविषयी विचार केला आहे. आता जीव द्रव्य, आत्मा, कर्म, बंध इ. विषयी विचार करावयाचा आहे.

आत्मा– भौतिक पदार्थात (Material object) आत्मा समाविष्ट केला जाऊ शकत नाही. कोणत्याही प्रकारच्या शक्तिशाली सूक्ष्मदर्शक यंत्राद्वारे त्याला कोणी पाहू शकत नाही विज्ञान आणि वैज्ञानिक याचा इतिहास अतिशय मनोरंजक आहे. परस्पर विरोधी सिद्धांत देखील विज्ञानाने सिद्ध केले आहेत तर अविरोध असणारे सिद्धांत देखील विरूद्ध सिद्ध केले. प्रारंभी विज्ञान भौतिक पदार्थ, शब्द, विद्युत्, प्रकाश इ. च्या शोधात गुंतले होते आणि म्हणूनच की काय आत्मा, ज्ञान, भावना, राग, द्वेष याकडे वैज्ञानिकांचे लक्षच गेले नाही. विज्ञानाला धर्माचा विरोध होता आणि त्यामुळेच की काय गॅलिलियो या शास्त्रज्ञाला त्याच्या शोधामुळे फार त्रास सहन करावा लागला. पण हळू हळू शास्त्रज्ञ-वैज्ञानिक आत्मा, ज्ञान याकडे वळू लागले. म्हणूनच सर जीन्स हा शास्त्रज्ञ म्हणतो, "दर्शन आणि विज्ञानाच्या सीमारेषा, ज्या सारहीन वाटत असत, त्या पदार्थ विज्ञानाच्या अर्वाचीन विकासामुळे तीच सीमा अत्याकर्षक तशीच महत्त्वपूर्ण झालेली आहे.[1]" सर जीन्स यांना असे का वाटावे? कारण स्पष्ट आहे. 'मी कोण आहे? कोठून आलो?' इ. चा विचार करणे हे दर्शनाचे ध्येय आहे तर सत्याचा शोध करणे हे विज्ञानाचे.

आत्म्यासंबंधाने मात्र विज्ञानाचा थोडा चमत्कारिक तर्क आहे. तो असा की, लाखो वर्षांपूर्वी पृथ्वी अत्यंत उष्ण गोळ्याच्या रूपात होती. अणु विखुरलेले होते. कालांतराने अणु एकत्र आले. ते अणु (Virus) व्हायरस, बॅक्टेरिया या सूक्ष्म जंतूमध्ये परिवर्तित झाले. नंतर हाड नसलेले जीव, वनस्पति, त्यानंतर मासे, जलचर, स्थलचर, इ. प्राणी निर्माण झाले. नंतर मस्तन प्राणी आणि वनमानुष निर्माण झाले.[2] पैकी काही युगल प्रगत होते तीच आदिमानव. प्रयोगाद्वारे ज्या गोष्टी सिद्ध होतील त्याच सत्य असे मानणाऱ्या विज्ञानाला वरीलप्रमाणे वरील पोकळ-बिनबुडाचा तर्क कसा मानवला हे आश्चर्य नव्हे का? खरी गंमत शेपटीची आहे. चिंपाजी यास मानवाचा निकटतम मानतात. त्याला शेपटी असते. थोडा वानरासारखा थोडा माणसासारखा हा प्राणी. पण याची शेपटी कुठे गायब झाली असा प्रश्न उपस्थित झाल्यावर विज्ञानाजवळ त्याचे उत्तर काय तर म्हणे तो जमिनीवर ज्यावेळी चालू फिरू लागला त्यावेळी ती शेपटी घासून घासून खतम झाली[3] तेव्हा वैज्ञानिकांनी जो वरील तर्क केला आहे तो खुळा आहे. या तर्कामुळे सत्य सापडले नाही. प्रो. आइन्स्टाइन म्हणूनच स्पष्ट म्हणतो, "We can know the relative truth, but absolute truth is known only to the universal observer" आत्म्यासबंधी विचार करताना श्री. मॅकडूगल हा शास्त्रज्ञ म्हणतो, 'कारण हाच

1. Physics and Philosophy (preface). २. पाश्चात्य दर्शनोंका इतिहास (आचारे).
३. जैन दर्शन और आधुनिक विज्ञान पृ ९०.

(आत्मा) पदार्थ मनुष्याच्या संपूर्ण ज्ञानाचा आधार आहे. त्यामुळे या पदार्थाला आत्मा म्हणू शकतो, असेही तर्क, जे खुळे नाहीत, वैज्ञानिकांनी मांडलेले आहे. अनेक शास्त्रज्ञांनी आत्म्याविषयी अनेक प्रयोग केले पण त्याना कळून चुकले की, "We are not yet in contact with ultimate reality"[1] हे जरी कळाले तरी त्याची अशी निश्चित धारणा झाली की, असे आपण पदार्थ पहातो तसे ते नाहीत, मूळ प्रश्न असा की, 'चैतन्य' तत्व आले कोठून ? हे विज्ञानाला कळाले नाही पण चैतन्य आहे हे कळल्याशिवाय राहिले नाही. म्हणून तर प्रो. आइन्स्टाइन म्हणतात, I believe that intelligence is manifested through out all nature" आत्म्याला वजन आहे का ? याचा शोध लावण्यासाठी अनेक प्रयोग केले गेले. १९३७ साली दक्षिण आफ्रिकेतील एक डॉक्टर आणि एक लंडनचे इंजिनियर यांनी असा तर्क मांडला की, "the secret of life lay in some kind of energy" नुसते म्हणून शास्त्रज्ञ गप्प राहिले नाहीत तर त्यांनी अगोदर जनावरावर प्रयोग केले आणि सिद्ध केले की, मनुष्य जेव्हा जन्मतो, तो त्यावेळी विशिष्ट प्रमाणात इलेक्ट्रिक चार्ज घेऊन. म्हणजे जन्मतः मनुष्याच्या शरीरामध्ये विशिष्ट प्रमाणात विद्युत् अणु असतात. हा इलेक्ट्रिक चार्ज सरासरी ५०० व्होल्ट असावा असे शास्त्रज्ञांचे मत आहे. मरणानंतर हा इले. चार्ज नाहीसा होतो. हा चार्ज स्त्रियापेक्षा पुरुषांच्या शरीरात जास्त असतो असे शास्त्रज्ञांना आढळून आले. हा "चार्ज" मरणानंतर जातो कुठे याचे संशोधन सध्या चालू आहे.[2] शास्त्रज्ञांनी अशी एक नवीन रेकॉर्डिंग मशीन तयार केले आहे की, ज्या मशीनद्वारे माणसाच्या शरीराभोवतीची रीडिंग घेतली जाईल. वैज्ञानिकांच्या मते माणसाच्या शरीराभोवती कांही वलय, लहरी असतात आणि त्याच शोधून काढण्यासाठी मशीन तयार केले आहे. मरणानंतर या लहरी (Electric charge) एकदम नाहीशा होत नाहीत तर कांही वेळ शरीराभोवती घुटमळत असतात. मनुष्य मेल्यानंतर हे मशीन बंद पडणार नाही तर त्याची रीडिंग चालूच असेल.

पण या सर्व उपक्रमापासून आत्म्याचा शोध लागेल असे मात्र नव्हे. कारण हा सर्व शोध "तैजस शरीरा"चा असावा. कारण तैजस शरीर हे जीवावरोबर सतत असते. Key of knowledge-822 या ग्रंथात म्हटले आहे की, "The Taijasa is composed of electric or magnetic matter is a necessary link between the outer-most body and the Carmana sarira (कार्मण शरीर), या इलेक्ट्रिक किंवा मॅग्नेटिक मॅटरचा शोध मशीनद्वारे लागेल, आत्म्याचा नव्हे, आत्म्याच्या अस्तित्वाच्या ज्ञानासाठी शास्त्रज्ञांनी एक असा प्रयोग केला, ज्या प्रयोगामध्ये एक मरणोन्मुख लहान प्राणी होता. त्याला (Airtight) बंद पोलादी नळीमध्ये ठेवले. आसपास Super sensative यंत्र ठेवले. पण शास्त्रज्ञाना त्या छोट्या प्राण्याच्या शरीरातून आत्मा कधी निघून गेला हे कळले नाही. मात्र त्या पोलादी नळीला तडा गेलेला आढळला.

आता आपण कांही शास्त्रज्ञांची मते पाहू. मनासंबंधी सर जेम्स जीन्स हे म्हणतात, "मन अशी वस्तु नाही जी या जडजगामध्ये अकस्मात् आली, अज्ञात तत्त्वाची जाणीव–भास झालेले श्री. हर्बर्ट स्पेन्सर म्हणतात "सर्वांना (संतांना व धर्मगुरु इ. ना) अनुभव आहे, ते तत्त्व (आत्मा) म्हणजे तो स्वतःच आहे." विश्वाची मौलिक तत्त्वासंबंधी कल्पना मांडताना जे. बी. एस्. हेल्डन म्हणतात "The truth is that, not matter, not forces, not any physical thing, but mind, personality is the central fact of the universe."[3]

सायन्स ॲन्ड रिलीजन या पुस्तकात म्हटले आहे की, "जडवादाची जितकी मते गेल्या वीस वर्षात मान्य केली गेली, ती मते सर्वच आत्मवादावर आधारित आहे." अशी अनेक उदाहरणे देता येतील की, ज्यामुळे आत्म्याचे अस्तित्व सिद्ध होईल. "आत्मा कसा आहे" हे विज्ञान सांगू शकणार नाही पण एवढे मात्र खरे

१. आत्मरहस्य (प्रो. रतनचद जैन) पृ. २९. २. नवभारत टाइम्स वार्षिकांक १९७५.
३. आत्मरहस्य (प्रो. रतनलाल जैन) च्या आधारे




की, "आत्मा आहे" हे वैज्ञानिकांना कळाले आहे. धर्म आणि विज्ञान विरोधी मार्गावर विरुद्ध दिशेस जात नाहीत तर ते दोन्ही समांतर आहेत. आत्म्याचे गुणधर्म सविस्तर दर्शनाने सांगितले आहेत, विज्ञान तत्संबंधी मूक आहे. विज्ञान दर्शनाच्या खूपच पाठीमागे आहे, दर्शनाची तत्त्वभूमि मन्या अर्थाने सुस्पष्ट, प्रामाणिक आहेत. विज्ञानाची भूमि ही केवळ-प्रयोगाद्वारे प्रकट होणारी चीज आहे म्हणून अपूर्ण आहे. आत्म्याचा विचार करताना जैनशास्त्रातील श्लोक, गाथा दिलेल्या नाहीत, त्यामुळे वाचकानी निराश होऊ नये. जागे अभावी दिलेल्या नाहीत. केवळ मनुष्यांच्याच नव्हे तर क्षुद्र वनस्पतीमध्ये सुद्धा आत्मा आहे हे देखील विज्ञानाने सिद्ध केले आहे. जैनाचार्यांनी हे शेकडो वर्षापूर्वी सांगितले ही गोष्ट अलाहिदा. प्रसिद्ध वैज्ञानिक श्री. जगदीशचंद्र बसु यांनी केलेल्या शोधावरून हे सिद्ध झाले आहे की, पशूंच्या शरीराप्रमाणे, वृक्षामध्ये देखील सूक्ष्म तंतु असतात. त्यांच्या सहाय्याने ते भोजनाच्या रसाला एका भागाकडून दुसऱ्या भागाकडे पोहोचवितात. अन्य प्राण्यासारखे वृक्ष सुद्धा झोप घेतात. ज्याप्रमाणे शस्त्राघाताने पशु दुःखी होतात, त्याचप्रमाणे आघाताने वृक्षांच्या सूक्ष्म तन्तूमध्ये क्षोभ उत्पन्न होतो. मनुष्याच्या शरीरामध्ये विष गेल्यावर ज्याप्रमाणे तो मरण पावतो त्याप्रमाणे वृक्षाच्या सूक्ष्म तंतूमध्ये विष गेल्यावर वृक्ष सुकून जातो-मरून जातो. वृक्ष आणि पशु यांच्या शरीरातील सूक्ष्म तंतूची सादृश्यता हे सिद्ध करते की, वृक्षामध्ये देखील प्राण आहे.

**आत्मा असतो कोठे ?** – शरीरामध्ये आत्मा नेमका असतो कोठे हा वैज्ञानिकाना संशोधनाचा विषय आहे. अनेक शास्त्रज्ञांनी त्याविषयी संशोधन केले आहे. युनानी आणि रोमवासी शास्त्रज्ञाचे असे मत होते की, आत्मा केवळ शरीराच्या आकाराचा असतो. शरीरातील वृद्धि आणि संकोच यावरोबर तो (आत्मा) वाढत अथवा घटत रहातो. श्री. जे. डब्ल्यू. ड्रेपर लिहीतो, " इसाई धर्म न मानणारे युनान व रोम येथील लोकांचा असा विश्वास होता की, मनुष्याच्या आत्म्याचा आकार शरीरा प्रमाणे आहे, शरीरात परिवर्तन व वृद्धि जसजशी होईल त्याप्रमाणे आत्म्याच्या आकारात परिवर्तन व वृद्धि होत रहाते."

श्री. मेहर हे महान् मनोविज्ञानी समजले जातात. त्यांनी म्हटले आहे की, "कांही विद्वान आत्म्याचे स्थान हृदय, कांही जणांनी मस्तक, काहीनी डोक्याचा विशिष्ट भाग मानलेले आहे." म्हणजे आत्मा हृदयात रहातो, किंवा डोक्यात किंवा डोक्याच्या विशिष्ट भागात रहातो असा समज आहे. श्री. मेहर पुढे म्हणतात, " विद्वानानी भ्रमाने अशी समजूत करून घेतलेली आहे की, सुगमता तर यातच आहे की, आत्मा आकारात सूक्ष्म बिन्दुप्रमाणे आहे." परिणाम असा झाला की, शास्त्रज्ञ त्या जागेच्या शोधात लागले. श्री मेहर याच्या मते आत्मा एक अभौतिक शक्ति आहे. ज्यामुळे चैतन्य, स्फूर्ति येते तो आत्मा शरीरामध्ये (संपूर्ण) व्यापून आहे. तो शरीराला वेष्ठून रहात नाही तर शरीरामध्ये सीमित आहे. शरीराच्या प्रत्येक भागामध्ये पूर्ण शक्तिसह व्यापून आहे. त्याच्या आकारात व कार्यक्षेत्रात विस्तार किंवा संकोच होतो. जैनाचार्यांनी आत्मा अदृश्य, अविभाजित, अखंड, अभौतिक आहे हे सांगितले. या मताशी जुळणारेच वरील शास्त्रज्ञांचे (रोम इ. देशातील) मत आहे.

आता कांही दैनंदिन जीवनातील घटनांचा विचार करू, समजा आपल्या प्रिय व्यक्तीचा मृत्यु झाला तर दुःख शरीराच्या कोणत्या भागाला होते ? डोळ्यातून अश्रू येतात, मुख म्लान, निस्तेज होते, हातापायातून शक्ति गेल्याचा भास होतो, जेवणादिक क्रिया कराव्याशा वाटत नाहीत म्हणजेच त्याचा परिणाम सर्वच शरीरावर होतो. या उलट पुत्रप्राप्तीसारखे सुखद प्रसंग घडून आल्यास आनंद होतो. तो का केवळ शरीराच्या विशिष्ट भागाला? मुखमंडल प्रफुल्लित होते, शरीर रोमांचित होते, हातापायात त्राण आल्यासारखे वाटते. म्हणजेच आनंदाचा परिणाम सर्व शरीरावर होतो.

पायाला काटा टोचला, डोळ्याला पाणी का यावे ? मुखातून दु:खोद्‌गार का निघावे ? कांही कांही वेळा असा अनुभव येतो की, वेदना होतात कोठे हेही कळत नाही. कधी कधी आपण म्हणतो मूड नाही, करमत नाही. *कुणाला करमत नाही, हाताला कि पायाला ! सारांश सुख, दु:ख, वेदना इ. सर्व शरीराला होतात* की ज्यामुळे आपण म्हणू शकतो आत्मा सर्व शरीरामध्ये व्यापून आहे.

आत्म्याचे छायाचित्र घेतले जाऊ शकते का ?– सेमयोन किर्लियान या नावाचा एक रशियन इलेक्ट्रॉनिक विशेषज्ञ आहे. अत्यंत सूक्ष्म रितीने त्याने फोटोग्राफीचे अध्ययन केले. सजीव प्राणी, झाडे, वनस्पति यांच्या शरिराभोवती होणाऱ्या विद्युत् लहरींचे फोटो काढण्यात त्याने यश मिळविले आहे. प्रयोगासाठी एक झाडाचे पान तोडले. तावडतोब त्या पानाभोवतीच्या विद्युत् लहरींचा फोटो घेतला. अनेक प्रकारचे विद्युत् मंडळ पानाभोवती आढळून आले. १० तासानंतर पुन्हा फोटो घेण्यात आले. मंडळाचे व लहरींचे प्रमाण कमी आढळले. नंतरच्या दहा तासात संपूर्ण अभाव आढळून आला. किर्लियान नुसत्या पानावर प्रयोग करून थांबले नाहीत. माणसाच्या शरीराचे अत्यंत जवळून फोटो घेतले तर वेगवेगळ्या भागावर वेगवेगळे डाग आढळले, ते डाग म्हणजे त्या अवयवाभोवती असलेल्या विशेष प्रकारच्या विद्युत् लहरी. त्यांनी (किर्लियान) असा निर्णय दिला की, माणसाला दोन प्रकारचे शरीर असते. १) प्राकृतिक, जे डोळ्यांनी दिसते ते. २) सूक्ष्म, जे प्राकृतिक शरीरासारखेच पण डोळ्यांनी न दिसणारे. सूक्ष्म शरीराचे इलेक्ट्रॉन इतके सूक्ष्म असतात आणि स्थूल शरीराच्या इलेक्ट्रॉनपेक्षा इतके गतिमान असतो की, प्राकृतिक शरीरापासून ते निघून इतस्तत: अंतराळात फिरू शकते. हे सूक्ष्म शरीर म्हणजे आत्मा. असे जरी त्यांना वाटले तरी ते शक्य नाही. कारण त्याहीपेक्षा आत्मा अधिक सूक्ष्म व *वेगळा आहे. असे सांगतात की, येशूचे शरीर मरणानंतर इतके सूक्ष्म झाले होते की, ते कोणत्याही पदार्थातून* आरपार जावू शकत होते. तेज:पुंज होते. त्याचा फोटो काढण्याचा प्रयत्न शास्त्रज्ञांनी केला पण व्यर्थ. शेवटी शास्त्रज्ञांनी असा निर्णय दिला की, ते सूक्ष्म शरीर (आत्मा) अत्यंत सूक्ष्म असून अभौतिक आहे.

### पुनर्जन्माची वैज्ञानिक पृष्ठभूमि–

**जीवाचे भ्रमण–** जग अनादि आहे. कर्मांचा संबंधही अनादि आहे. त्यामुळे जीव पुनर्जन्म धारण करतो. पुनर्जन्म धारण करतेवेळी हा जीव शरीर सोडतो. त्याला विग्रहगति म्हणतात. 'सत्' रूपात असलेली वस्तु कधीच नाश पावत नाही आणि 'असत्' रूप वस्तु कधी *निर्माणच होत नाही हा नियम आहे आणि म्हणून जीव* एक शरीर सोडून दुसरे शरीर धारण करतो हीच विग्रहगति.

**कर्मयोग–** जीव ज्यावेळी दुसरे शरीर धारण करण्यासाठी निघतो, त्यावेळी कार्मण शरीर असतेच. कर्मांच्या समूहाला कार्मण शरीर म्हणतात.[1] आत्म प्रदेशांच्या स्पंदनाला योग म्हणतात. या परिस्पंदनाच्यावेळी कार्मण शरीर निमित्तरूप असते त्यामुळे त्याला कर्मयोग म्हणतात. विग्रहगतीत गमन कसे– जीव आणि पुद्‌गलांचे गमन अनुश्रेणिप्रमाणे असते.[2] लोकाकाशाच्या मध्य भागातून वर, खाली व तिरप्या दिशेमध्ये हारबद्ध असलेल्या प्रदेशांच्या पंक्तीला श्रेणि म्हणतात. विग्रहगतीमध्ये[3] आकाश प्रदेशांची सरळ मांडणी असते आणि त्याप्रमाणेच गमन होते. विदिशेत गमन होत नाही. श्रेणीची रचना ६ प्रकारची आहे– १) पूर्वेकडून पश्चिमेकडे, २) उत्तरेकडून दक्षिणेकडे, ३) वरून खाली, ४) पश्चिमेकडून पूर्वेकडे, ५) दक्षिणेकडून उत्तरेकडे, ६) खालून वर.

**किती वेळात जीव दुसरा जन्म धारण करतो–** संसारी जीवाची गति एक समयापर्यंत होते अथवा दोन तीन समयापर्यंत देखील होते. म्हणजे ससारी जीव दुसऱ्या समयात एक मोडा, तिसऱ्या समयात दुसरा मोडा आणि

---

१. विग्रहगतौ कर्म योग: । (त. सूत्र २।२५) २. अनुश्रेणी गति: । (त. सू. २।२६)
३. विग्रहवती च ससारिण: प्राक् चतुर्भ्य: (२।२८).

चौथ्या समयात, चौथा समय होण्यापूर्वीच तिसरा मोड घेऊन कोणत्या ना कोणत्या तरी ठिकाणी जाऊन शरीर धारण करतो.

याशिवाय जीव कोण्या योनीत जन्मतो, कोणत्या जीवाची पात्रता पुढे जन्म घेण्याची आहे, कर्म त्याच्या बरोबर कसे बरोबर जातात इ. सर्व प्रश्नावर जैनाचार्यांनी विचार केला आहे. सारांश रूपाने वरील माहिती दिली आहे. मूळ हेतु वैज्ञानिक पृष्ठभूमि समजावून सांगणे हा असल्यामुळे वाचकांनी जैन शास्त्रांचा अधिक अभ्यास करणे इष्ट ठरेल.

निरनिराळ्या वैज्ञानिकांचे आणि विद्वानांचे विचार– जे वैज्ञानिक पुनर्जन्मावर विश्वास ठेवतात त्यामध्ये आर्किक, पायथागोरस, प्लेटो, ग्लासटिक, मनोचियनस, ब्रुनो इ. प्रमुख आहेत.[1] न्यूटनचे मत असे की, क्रिया-प्रतिक्रियेचा नियम (Action & Reaction) शेकडो वर्षापूर्वीच सांगितला आहे. प्लेटोने स्पष्ट केले आहे की, 'आत्मा शरीरामध्ये पूर्वीपासूनच आहे. आत्मा सतत या जगामध्ये फिरत जन्म घेतो.' प्रो हक्सलेचे मत आहे की, "विकास वादाच्या सिद्धांताप्रमाणे देहांतर वादाचा सिद्धान्त वास्तविक आहे. Carrington : the story of Psychic sciencer या पुस्तकात हेरवार्ड कॅरिंग्टन याने जीवाचे मृत्यूनंतर अस्तित्व सिद्ध केले आहे. History of Indian Literature यामध्ये प्रो. विंटरनिट्झ म्हणतो, "Of the dismal belief in the Transmigration of the soul and ternal rebirths..." श्री सर हेन्री जोन्स हा म्हणतो, "अमरत्वाच्या तत्वाचा निषेध करणे त्याचाच अर्थ नास्तिकता."[2-3]

पुनर्जन्मावरील विश्वास– जर्मन दार्शनिक कांट म्हणतो, "...कृत कर्माचे फळ मिळणे....त्यांच्या या बऱ्या-वाईट कर्माचे फळ या जन्मी नाही तर पुढील जन्मी अवश्य मिळावे." तोच पुढे म्हणतो, "मनुष्याच्या आध्यात्मिक विकासाचा क्रम आहे. एका जन्मात तो पूर्ण होत नाही." असा त्याचा विश्वास आहे. शाश्वततेचा सिद्धांत– लॅटिन भाषेमध्ये एक न्याय वचन आहे, ते असे Ex nihilo nihil fit ( Nothing comes out of nothing ). हीच गोष्ट गीतेतील 'नासतो विद्यते भावः' या सूत्राने स्पष्ट होते. विज्ञानाचा शक्ति संरक्षणाचा सिद्धांत (Law of conservation of energy) मान्य केला आहे. तसेच ( Para Psychology ) परा मनोविज्ञान देखील मरणोत्तर अस्तित्व मान्य करते. पाश्चात्य जगात– Psycical research society या बाबतीत महत्वाचे संशोधन करीत आहे. एक पाश्चात्य मनोवैज्ञानिक *Sri. F. W. Balis* म्हणतो की, *Man is* not a body consisting of a mind. He is mind operating through a body-the body itself is the result of the activity of mind, is moulded by mind and changed by mind (Kalyan Vol. 1, year 43 P. No. 223) काही विचारवंताच्या कल्पना– वॉल्ट विटमॅन म्हणतो की, "As to you, life, I reckon you are the livings of manyldeaths-no doubt I had died myself 10,000 times before." (Kalyan P-303) जगप्रसिद्ध वैज्ञानिक पायथागोरस (Pythagoras) ची अशी कल्पना आहे की, "सात्विक जीवन जगणाऱ्या आत्म्याचा जन्म उच्चतर लोकात होतो आणि दुष्ट आत्मे निम्न पशु आदि योनीत जन्म घेतात. सॉक्रेटिस, प्लूटार्क, आरफ्यूस, कॅथारिस्ट, त्रिस्टन बुल्फे अशा अनेक विचारांच्या कल्पना येथे देता येतील की, ज्यामुळे पुनर्जन्मावर त्यांचा विश्वास आहे हे सिद्ध होईल. शेवटी मॅक्समूलरचे वाक्य उद्धृत करून पुढे आपण कांही प्रत्यक्ष पुरावे पाहू. मॅक्समूलर म्हणतो, "मानवतेच्या सर्वोत्तम चिंतकांनी पुनर्जन्म सिद्धांत स्वीकारलेला आहे."

प्रत्यक्ष पुरावे व घटना– कल्याण (हिंदी) मासिकाचा वार्षिकांक (पुनर्जन्मांक) यामध्ये तर अनेक पुरावे देऊन पुनर्जन्म वास्तव आहे हे सिद्ध केले आहे. येथे केवळ २–३ उदाहरणे देत आहे.

१ कल्याण–वर्ष–४३ अंक १ पृष्ठ ९१. २. कल्याण–वर्ष–४३ अंक १ पृष्ठ २०२.
३. कल्याण–वर्ष–४३ अंक १ पृष्ठ २०४.

१) पूज्य म. गांधीजींचे धर्मगुरु श्रीमद् राजचंद्र यांना जातिस्मरण झालेले होते.

२) गोष्ट इंग्लंडची आहे. जोआॅन नांवाची मुलगी (वय ९ वर्षे) आईबरोबर फिरायला गेली. आईने मुलीला टॉवरग्रीनजवळ गाइडने सांगितले की, "या ठिकाणी आठव्या हेन्रीच्या पत्नीचा गळा तलवारीने कापला होता." मुलीने सांगितले, "गळा तलवारीने कापला होता. दातेरी शस्त्राने नाही." आईला आश्चर्य वाटले की, आपल्या मुलीला हे कसे माहित ? पूर्ण तपासाअंती कळाले की, पूर्वजन्मी ती मुलगी घटनास्थळी हजर होती व प्रत्यक्ष घटना पाहिली होती.

३) राचाले ग्रॅन्ड (न्यूयार्क) या स्त्रीला नेहमी असे वाटत होते की, ती पूर्व जन्मी युरोपमध्ये नर्तकी होती, तपासाअंती ही गोष्ट खरी असल्याचे न्यूयार्कच्या लोकांना आढळले. या जन्मीही ती नर्तकीच आहे. कुणीही न शिकविता ती नर्तन कला शिकली.

४) श्रीमती रोजनवर्ग ( अमेरिका ) नांवाची एक अमेरिकन स्त्री होती. 'जैन' हा एकच शब्द तिला येत होता पण अर्थ मात्र माहित नव्हता. ती आगीशी फार भीत असे. तिच्या हाताची बोटे आगीत जळाल्यासारखी होती. योगायोग असा की, एकदा जैन संमेलन (अमेरिकेमध्ये) भरले त्यावेळी रोजनवर्ग हिने त्यात भाग घेतला आणि आश्चर्य असे की, तिला जाति स्मरण झाले. ती भारतात एका जैन मंदिरात रहात होती. आगीने जळून ती मरण पावली होती.

५) स्वित्झरलंडमध्ये गॅवियल उराइव नांवाचा गृहस्थ राहात होता. बेचैन अवस्थेत तो स्पेनला गेला. तेथे त्याला जाति स्मरण झाले की, तो पूर्वी तेथील रहाणारा होता. थू राफेल या नांवाचा तो राजकारणी पुरुष होता. त्याच्या मुलाबाळांची स्मृति, नांवे इ. त्याला सर्व आठवले. सन १९१४ मध्ये त्याचा कुऱ्हाडीने अंत झाला होता. विशेष म्हणजे ज्या ठिकाणी कुऱ्हाडीचे घाव झाले होते, तेथे या जन्मी देखील खूण होती.

एकंदरीत जन्माचा सिद्धान्त पूर्ण वैज्ञानिक आहे. अजून वैज्ञानिकांचे प्रयोग प्राथमिक अवस्थेत आहेत. इंग्लिश कवि व तत्ववेत्ते टेनिसन, ब्राउनिंग, वर्डस्वर्थ, इमर्सन ह्यांच्या वाङमयात पुनर्जन्मासंबंधी उल्लेख आहेत. इजिप्तमध्ये प्राचीन काळी प्रेतात्मा आणि पुनर्जन्म मानला होता. ग्रीक देशातील प्राचीन कालीन तत्त्ववेत्ते थेल्स प्लेटो, पायथागोरस, फिरीसायडिस इ. पुनर्जन्म मानीत असत. इटलीत रोमन तत्ववेत्ते सिसरो, वर्जिल, ओविद ह्यांच्या ग्रंथ रचनेत पुनर्जन्माचे उल्लेख आहेत. अमेरिकन आदिवासी रेड इंडियन्स पुनर्जन्म मानतात. चिनी, जपानी, तिबेटी, ब्रह्मदेशी लोक पुनर्जन्मावर विश्वास ठेवतात. सिरिअन सम्प्रदाय देखील पुनर्जन्म मान्य करतो.

वैज्ञानिकांनी अजूनही संशोधन केल्यास पुनर्जन्माबाबत पुष्कळ स्पष्टीकरण होण्यासारखे आहे. वैज्ञानिकाचे प्रयोग इतके अपूर्ण आहेत की, अजून खूपच प्रयोग करावयाचे आहेत.

**भूत-पिशाच यासंबंधी–** जैनाचार्यांनी देवांचे चार प्रकार मानले आहेत– १) भवनवासी, २) कल्पवासी, ३) व्यंतर आणि ४) ज्योतिष्क. पैकी तिसऱ्या प्रकारच्या देवांचा विचार करावयाचा आहे. देव म्हणजे सिद्ध भगवान किंवा अरिहंत वा केवली असा अर्थ घेऊ नये. केवळ विशेष वैभव, शरीर इ.नी शोभित असा अर्थ घ्यावा. व्यंतर जातीच्या देवांचे किन्नर, किंपुरुष, महोरग, गंधर्व, यक्ष, राक्षस, भूत, पिशाच असे प्रकार आहेत. यांचे रहाण्याचे ठिकाण म्हणजे समुद्र, पर्वत, चौरस्ता, ओसाड घरे, वृक्ष इ. ठिकाणी रहातात. त्यांचे शरीर मनुष्यासारखे नसते. ते वैक्रियिक असते. वाटेल तसा आकार ग्रहण करता येतो. नाक, कान इ. इन्द्रियातून स्त्राव होत नाही. मनाप्रमाणे विहार करतात. ते कुतुहल प्रिय असतात. आपल्या विद्येच्या बळावर ते कलह, कोलाहल निर्माण करतील. मनुष्यांच्या शरीरात ते प्रवेश करतात. पूर्वजन्मीचे कांही वैर असेल तर संबंधितास त्रासही देतात. मित्र असेल तर मदत करतात.




व्यंतर योनीत कोण जन्मतो— जे आत्महत्या करतात, ज्यांची हत्या होते, मरतेवेळी संक्लेश अवस्था ज्यांची असते, मरतेवेळी ज्यांची वासना राहिलेली असते, जे चंचल चित्त असतात अशांचा जन्म व्यंतर योनीत होतो. याप्रमाणे थोडक्यात रूपरेषा आहे.

**भूत, प्रेत आणि वैज्ञानिक**— मनुष्यामध्ये जी चेतना असते ती मरणानंतर जाते कुठे, आत्मा मरणानंतर कुठे जातो या प्रश्नाचे उत्तर शोधताना वैज्ञानिकाना असे आढळून आले की, कांही आत्मे मरणानंतर भूत होतात. सर आर्थर कानन डायल यानी भूतांचे अनुभव लोकाना सांगितले. त्यांनी प्लॅंचेटवर भूतांना बोलावले आणि त्यांचेकडून अनेक प्रश्न सोडवून घेतले. मृत झालेल्या ब्रिटानियन लोकांना प्लॅंचेटवर बोलावून त्याचेकडून परलोका-विषयी माहिती करून घेतली. ऑर्थर कानन डायल यांचा मुलगा डेनिस कानन डायल यानेही तेच काम केले. हॉलंडच्या वैज्ञानिकानी एक यंत्र शोधून काढले. त्याला 'दि डायनामिस्टोग्राफ'[1] असे नांव आहे. या यंत्रामुळे भूताशी सरळ संबंध स्थापित होतो. माध्यमाची गरज नाही. एमेनुअल स्वेटनब्रोर्ग या नांवाचा एक प्रकांड पंडीत होता. हॉलंडच्या राजदूताच्या पत्नीने त्याला विनंती केली की, "माझ्या मृत पतीशी संबंध साधून रशीदीविषयी माहिती द्या" त्याप्रमाणे मृत राजदूताकडून हरवलेल्या गुप्त रशीदीची योग्य माहिती मिळाली.

अमेरिकेला एकोणिसाव्या शतकामध्ये भूत–प्रेतासंबंधाने अध्ययन करण्यासाठी एक केन्द्र स्थापन केले. लिलिडेल इथे ते केन्द्र आहे. विशेष आश्चर्य असे की, त्या केन्द्रात भूत–प्रेतांची छायाचित्रे-फोटो घेतली जातात. सर विलियम क्रुक्स आणि सर ऑलिवर लॉज या दोघा शास्त्रज्ञांनी भूत-प्रेताविषयी खूप अध्ययन केले. सर क्रुक्स यांनी तर भूताकडून आपल्या मृत पत्नीचे छायाचित्र घेतले. १९३४ मध्ये सर लॉज व सर अर्नेस्ट बेनेट यानी विशेष शोधकार्य केले. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीमध्ये त्यांनी स्वतंत्र विभाग केला. भूत–प्रेतांच्या अध्ययनासाठी सध्या देखील अमेरिकेमध्ये 'साइकिकल रिसर्च फाउंडेशन' या नांवाची संस्था आहे. त्या संस्थेमध्ये सध्या या प्रश्नावर अध्ययन चालू आहे. १) खरोखरच भूत आहे काय ? २) त्यांचा आकार व रूप कसे आहे ? ३) ते कोठे रहातात ? ४) ते कशाने प्रभावित होतात. ५) ते चांगले कार्य करतात का वाइट कार्य ?

वैज्ञानिकाचे असे मत आहे की, मानव हा एक विद्युद्वैगिक प्राणी आहे आणि तो सतत अदृश्य शक्तीच्या सागरात पोहत असतो. प्रत्येक मानव आपल्या विचाराप्रमाणे, इंद्रियाकडून त्या शक्तीचे ग्रहण करतो आणि त्यामध्ये इच्छेप्रमाणे परिवर्तन करून प्रक्षेपणही करीत असतो. त्यावरून भूत–प्रेतांच्या संबंधी वैज्ञानिकांनी अध्ययन करून सिद्ध केले की, "भूत-प्रेतांच्या शरीरातून अशी अदृश्य शक्ती विसर्जित होते जी शक्ती परमाणु विस्फोटा-सारखी विनाशकारी आणि प्रचंड आहे. त्यामुळे बहुधा भूत विनाशकारी असते. विस्तारभयास्तव प्रत्यक्ष घटना येथे देत नाही. भूतांचा फोटो काढण्यात देखील शास्त्रज्ञांनी यश मिळविले आहे.

अमेरिकेचे राष्ट्रपति भवन (White House) म्हणजे भूताचे केन्द्रस्थान. तेथे आजपर्यंत झालेल्या अनेक अध्यक्षांची भूते पहावयास मिळतात. अब्राहिम लिंकनचे भूत तर अनेकांनी प्रत्यक्ष पाहिले आहे. सारांश जैनाचार्यांनी भूत योनीचे जे वर्णन केले आहे त्याला पूरक असेच सिद्धांत वैज्ञानिकांनी मांडले आहेत. भूत प्रेताविषयी अनेक आख्यायिका, सत्य कथा आहेत. पण त्या इथे दिलेल्या नाहीत कारण प्रस्तुत लेखाचा विषय तो नाही केवळ 'दर्शन आणि विज्ञान' याचा समन्वय कसा होतो हे सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

**कर्म सिद्धान्त**— विश्वव्यवस्या, ब्रह्माड नियंत्रण यासाठी इतर दर्शन ईश्वराला कर्ता, हर्ता मानतात. पण जैन धर्माने निरीश्वरवाद सांगितला आहे. जैन दर्शन असे मानते की, विश्वव्यवस्था निसर्ग नियमानुसार आपोआप चालते. षड्द्रव्यानी भरलेल्या या विश्वातील प्रत्येक द्रव्य स्वतंत्र आहे. त्यांचे परिवर्तन स्वयमेव होत असते. त्या परिवर्तनाचा कर्ता कोणी ईश्वरासारखा किंवा ईश्वर कुणीच नाही. जीवद्रव्याबाबत असे आहे की, सुख-दुःख हे

१. समाटा विशेषांक १९७५ पृ. ४८ वर या यंत्राचे चित्र आहे.




फक्त आपल्या कर्मावर अवलंबून असते. प्रत्येक प्राणी स्वतःच्या सुख-दुखांचा स्वतःच कर्ता, भोक्ता व हर्ता असतो. जीव स्वतःचे अधःपतन करून घेण्यास जसा स्वतः जबाबदार असतो त्याप्रमाणे स्वतःची उन्नती करून घेण्यास स्वतःच जबाबदार असतो. हे तत्त्वज्ञान आधुनिक विज्ञानास व सर्कशुद्ध विचारसरणीस पूर्णपणे कसे पूरक व अनुसरून आहे हेच आता पहावयाचे आहे.

**विचारशक्ति–** कोणतेही कार्य करण्याआधी डोक्यात विचार निर्माण होतात, मनात विचार निर्माण होतात. विचार निर्माण होण्या अगोदर बुद्धीमध्ये स्पन्दन होते त्यास Vibrations म्हणतात. स्पन्दनरूप लहरीच म्हणा ना ! या लहरी कशा असतात हे पहाण्यासाठी आज विज्ञानाने त्या लहरी कागदावर अंकित करण्याची विधि शोधून काढली आहे. विशेषतः या लहरीच्या अकन पद्धतीचा उपयोग डॉक्टर किंवा मनोविज्ञानी यांना अधिक होतो. कारण प्राकृतिक Natural लहरी या निरामयतेचे लक्षण आहे आणि अनैसर्गिक किंवा विकृत लहरी रोगाचे (Discasc) लक्षण आहे. त्यावरून रोगाचे निदान (Dignosis) होऊ शकते. त्यानंतर रोगावर उपाय सुचविण्यात येतो. सारांश कोणतेही कार्य करण्याआधी मनात विचार येतात त्याही अगोदर बुद्धीची स्पदन-क्रिया सुरू होते. स्पंदनरूप क्रियेसारखीच ग्रहणरूप क्रिया देखील होते. अगदी रेडिओ रिसीव्हरसारखी–रेडिओ रिसीव्हर जिथे असेल तिथे जगातील कानाकोपऱ्यातील लहरी विद्यमान असतात. त्या सरळ आणि वेगवेगळ्या लांबीच्या असतात, ज्या लांबीच्या लहरी ग्रहण करावयाच्या असतील त्याच लांबीच्या लहरी अगोदर रेडिओमध्ये निर्माण कराव्या लागतात. समजा आपणास २५.१ मिटरची लहर ग्रहण करावयाची असेल तर त्या लहरीबरोबरच ४९.१२ किंवा दुसऱ्या अनेक लांबीच्या लहरी अंतराळात विद्यमान असतात पण जोपर्यंत रेडिओमध्ये २५.१ मिटरची लहर निर्माण होत नाही तोपर्यंत आपणास हवी असलेली २५.१ मिटर लांबीची लहर ग्रहण करता येणार नाही.

बरोबर वरीलप्रमाणेच क्रिया बुद्धीमध्ये होते. बुद्धीमध्ये ज्या लहरी Vibrations निर्माण होतात त्यामुळे भोवतालच्या तशाच लहरीचे ग्रहण-आश्रव-होते. म्हणजे प्रत्येक विचाराबरोबर बुद्धीमध्ये लहरी निर्माण होतात आणि बाह्य पुद्गलाचा आमच्या आत्म्याशी संबंध येतो. हाच आश्रव. जैन दर्शनामध्ये या क्रियेस (लहरींचे ग्रहण करण्यास) कर्म वर्गणांचा आश्रव म्हणतात.

आता एक दुसरा प्रयोग पाहू. वैज्ञानिक एका लोखंडाच्या तुकड्याभोवती तांब्याच्या तारा गुंडाळतात आणि त्यामध्ये विद्युत्प्रवाह सोडतात लागलीच तो लोखंडाचा तुकडा विद्युत्चुंबकीय ( Electro–Magnetic ) होतो. मग त्या तुकड्याकडून हवे ते कार्य करून घेता येते. विद्युत् प्रवाह बंद झाला की, त्या तुकड्याची चुंबकशक्ती समाप्त होते आणि तो तुकडा कांहीच कार्य करू शकत नाही. या किंवा अशाच प्रकारची क्रिया आपल्या आत्म्यात होते. ज्यावेळी आमच्यामध्ये रागद्वेषादि भावना निर्माण होतात त्याचवेळी आत्म्याभोवती असलेल्या तशाच प्रकारच्या कार्माण वर्गणा आत्म्याकडे आकृष्ट होतात आणि सुख-दुःख देण्याची शक्ती निर्माण होते. पण जेव्हा या कार्माण वर्गणा फळ देतात तेव्हा किंवा ध्यानादिकांनी आत्मा शुद्ध होतो तेव्हा या वर्गणांची फलदान शक्ती समाप्त होते आणि या वर्गणा आत्म्यापासून आपोआप वेगळ्या होतात.

**कर्मांची एकरूपता–** सोन्यातील मळ काढून टाकल्यावर सोने शुद्ध होते हे सर्वश्रुत आहे पण 'मळ' केव्हापासून आहे हे कोणी सांगू शकणार नाही. कारण सोन्याबरोबर बाकी द्रव्य अनादि काळापासून आहे. त्यामुळे सोन्याचे रूप विकृत होते. नंतर विशेष रासायनिक क्रियेने त्यातील अशुद्धपणा काढून टाकावा लागतो. तेव्हा सोने शुद्ध होते. त्याचप्रमाणे कर्म आपल्या आत्म्याशी अनादि काळापासून एकरूप झालेले आहे. ते कर्म आपण तप, ध्यान इ. आचरणाने आत्म्यापासून वेगळे केल्यानंतर आत्मा शुद्ध होतो. हेच कथन वेगळ्या शब्दात असे सांगता येईल की, या विश्वात आत्मा आणि पुद्गल अनादि काळापासून एकरूप आहेत. त्यामुळे आत्म प्रदेशात अनंतानंत

स्वत एव भवः प्रवर्तते, स्वत एव प्रविलीयते पि च । स्वत एव च मुच्यते भवात्, इति पश्यंस्त्वमिवाभयो भवेत् ॥

पुद्‍गल परमाणु असतात. विश्वात तर अनंतानंत पुद्‍गल परमाणु-कार्माण वर्गणा-भरलेले आहेत हे आपण मागेच पाहिले आहे. एखाद्या छिद्रातून सूर्यकिरण जर खोलीत आला तर किती धूलिकण दिसतात ? अगणित वस्तुकण (Matter particles) दिसतात. आत्मा ज्या शरीरात रहातो त्या शरीरातील विद्यमान आणि ग्रहण केलेले आणि सोडलेले या सर्व पुद्‍गल परमाणूंचा आत्म्याशी संबंध येतो. आत्मप्रदेश पुद्‍गल परमाणुशिवाय कधीही शून्य राहू शकत नाही.

**कर्मबंध**– मागे अणु-परमाणु या प्रकरणात त्याचे स्वरूप इ. पाहिले. हे इतके सूक्ष्म असतात की जगातील कोणत्याही साधनानी दिसू शकत नाहीत. तरीही इलेक्ट्रॉन, प्रोटॉन याशिवाय न्यूट्रॉन, पॉजिट्रॉन या अति सूक्ष्म कणांचा शोध लावला आहे. आपण बोलतो, चालतो, विचार करतो त्यामुळे पुद्‍गल परमाणूमध्ये कंपन होत रहाते. शरीरामध्ये तर अनंत पुद्‍गल परमाणु आहेतच. शिवाय बाहेरूनही येतात आणि शरीरातून बाहेर जातात. असे सतत परिवर्तन चालू असते. हे परिवर्तन चालू असताना कांही पुद्‍गल परमाणु कांही काळ शरीरात आत्म्याशी एकरूप रहातात. हाच कर्मबंध-पुद्‍गल परमाणु 'येणे' म्हणजे आश्रव, 'राहणे' म्हणजे बंध, येण्याचे 'थांबवणे' म्हणजे 'संवर' आणि 'जाणे' म्हणजे 'निर्जरा'. श्री. उमास्वाति यांनी तत्वार्थ सूत्रात म्हटले आहे की, "सकषायत्वात् जीवः कर्मणोयोग्यान्पुद्‍गलानादत्ते सबन्धः" थोडक्याशा वैज्ञानिक भाषेत वरील सूत्राचा सारांश असा सांगता येईल की, शरीराची हालचाल, मनातील भावना, बुद्धीचे विचार यामुळे जे अनंत विश्वात भरलेल्या अनंतानंत इलेक्ट्रॉन, प्रोटॉन युक्त परमाणूमध्ये कंपन होते त्यामुळे तशाच प्रकारचे परमाणु-पुद्‍गल स्कंध-आत्म्याकडे येतात तो बंध होय. संपूर्ण विश्वामध्ये विद्युत चुंबक ( Electromagnatic waves ) तरंग भरलेले आहे. ते अत्यंत सूक्ष्म असतात, या तरंगांचे ग्रहण ग्राहक वेगाने करतो. त्याचप्रमाणे आत्मा कार्माण स्कंधांना आपल्याकडे ओढतो. विचार आणि भावना यानुसार मन आणि शरीर क्रिया याद्वारे आत्मप्रदेशात प्रवेश करतात त्यालाच योग म्हणतात. या योग शक्तीने आत्म्यामध्ये पूर्वीच असलेल्या कर्मरूप परमाणूमध्ये कंपन उत्पन्न होते. हे कंपन कमी अधिक होणे हे जीवाच्या कषायांच्या मंदता किंवा तीव्रता यावर अवलंबून आहे. शुभ किंवा अशुभ परिणामामुळे आत्म प्रदेशामध्ये तरंग उत्पन्न होतात व त्यामुळे कर्म परमाणूंचे तसे परिणमन होते. याचा संबंध एक क्षेत्रावगाही असतो. असे तरंग आत्म्याचे परिणाम आपल्या स्वभावाप्रमाणे विकृत करून पुन्हा नवतरंग निर्माण करतात. या कंपनरूप क्रियेमध्ये अजून विशेष असे की, नवीन परमाणु येण्यापूर्वी किंवा नंतर शरीरस्थ असलेल्या परमाणूमध्येही कंपन होते, परिवर्तन होते आणि त्यामुळे जसा बाहेरून येणाऱ्या परमाणूंचा आतील परमाणूवर परिणाम होतो तसाच तो आतील परमाणूंचा बाहेरील परमाणूवर परिणाम होतो. म्हणजेच जीव कषाययुक्त झाला म्हणजे कार्माण वर्गणाना आकर्षित करून घेतो आणि विद्यमान असलेल्या कार्माण वर्गणानी कषाययुक्त होतो. जैन दर्शनामध्ये कर्मासंबंधाने जे काही सांगितले आहे त्याला आधुनिक विज्ञान किंवा रसायन शास्त्राप्रमाणे 'पुद्‍गलांचे रसायन' समजून जर विचार केला तर कर्माचा आश्रव बंध, संवर आणि निर्जरा इ. ची क्रिया तावडतोब कळून येईल. जैनाचार्यांच्या अनेक ग्रंथातून अनेक गाथा कर्मासंबंधाने देता येतील. पण विस्तारभयास्तव एकही गाथा, श्लोक दिलेला नाही.

**कर्मसिद्धांताची सार्थता**– विज्ञानानेच वायरलेस, रेडिओ इ. च्या कार्यपद्धतीवरून हे सिद्ध केले आहे की, जेव्हां कोणी जीव कार्य करतो तेव्हां त्याच्या जवळील वायुमंडळामध्ये हलन-चलन होते आणि त्यामुळे निर्माण झालेल्या लहरी खूप दूर जातात. हीच गोष्ट जैनाचार्यांनी 'मन वचन कायेचे परिस्पंद' या शब्दात समजावून सांगितली आहे. Electron Proton मध्ये परस्पर आकर्षण असते हीच गोष्ट 'स्निग्धरूक्षत्वात् बंध.' अशा रितीने समजावून सांगितली आहे. कर्मसिद्धाताचे एवढ्या विस्तृत प्रमाणात प्रतिपादन जैनाचार्यांनी केलेले आहे की, जगातील सर्व दर्शनाचे वर्णन एकत्रित केले तरी अपूरेच पडेल. पण खरी यथार्थता विपुलतेत नसून 'वैज्ञानिकतेत' आहे.

 

**गुरुत्वाकर्षण आणि कर्मसिद्धांत–** मागे आपण विद्युत लहरी या दृष्टिकोनातून कर्मसिद्धांताचा विचार केला होता तोच आता गुरुत्वाकर्षणाच्या दृष्टीने विचार करावयाचा आहे. गुरुत्वाकर्षण सिद्धान्ताप्रमाणे एक पुद्गलस्कंध दुसऱ्या पुद्गलस्कंधाला आकर्षित करतो हे सिद्ध झाले आहे. त्याचप्रमाणे आत्म्यासंबंधाने म्हणू शकतो की ज्याप्रमाणे विद्युत्चुंबकीय तरंगांनी हे जग भरले आहे त्याप्रमाणे कार्माण वर्गणा देखील सर्व जगभर व्यापून राहिल्या आहेत. हे परमाणु अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे तरंगरूपात गमन करतात. तरंगाची लांबी व पुनरावृत्ति N आणि C प्रकाशवेगाने दाखवावयाची झाल्यास c=n² हे प्रकाशवेगाने तरंगरूपात लोकाकाशाच्या एका प्रदेशातून दुसऱ्या प्रदेशात गमन करीत असतात. याची कंपनशक्ति फारच मोठी म्हणजे एक्सरेच्या कंपनशक्तीहून कोटयावधीपट आहे. एका विशिष्ट पुनरावृत्यात्मक विद्युत्चुंबकीय तरंगांना पकडण्यासाठी एका विशिष्ट ऑसिलेटरचा उपयोग केला जातो तो त्याच पुनरावृत्तीवर आपले कार्य करीत असतो. या विद्युतीय साम्यावस्थेच्या सिद्धांताने ते आकाशात पसरलेल्या तरंगांना ग्राहकाच्या सहाय्याने सहज पकडले जाते.

हुबेहूब याच प्रकारची घटना कर्माणस्कंध आकर्षित होतेवेळी घडते. मरणसमयी आत्मा कर्मांनी लिप्तच असतो म्हणजेच त्याच्या चोहोबाजूंनी कर्मवर्गणांचा लेप असतो ज्या मरणानंतर नवीन जन्म धारण करण्यासाठी हा जीव जातो त्यावेळी आधीच लेप चढलेला आत्मा पौद्गलिक द्रव्याच्या संसर्गाने पुन्हा आपल्या चोहोबाजूनी पुद्गल परमाणु आकर्षित करतो आणि भ्रमण सुरू होते. हेच आश्रव आणि बंध.

**निर्जरा व मोक्ष–** पुद्गल कर्म वर्गणाचे ग्रहण झाल्यानंतर त्या वर्गणामध्येही परिवर्तन होते. नव्या वर्गणा जशा येतात तशा जुन्या जातात म्हणजे नष्ट होतात. हे नष्ट होणे म्हणजेच निर्जरा. मोक्ष तत्व समजाऊन घेण्यासाठी म्हणजेच आत्मा ऊर्ध्वगमन कसा करतो हे समजण्यासाठी आपण एक प्रयोग विचारात घेऊ. एक शिशीमध्ये पारा, पाणी व पेट्रोल भरून खूप हलवा. नंतर बाटली स्थिर ठेवा. पारा सर्वात खाली राहील पेट्रोल सर्वाच्या वर राहील. दोन्हीच्या मध्ये पाणी. कारण तिन्हीमध्ये पारा सर्वात वजनदार आहे म्हणून तो तळाशी आहे. हेच नव्हे तर जी हवा आम्ही घेतो त्या हवेमध्ये हायड्रोजन, नायट्रोजन, कार्बनडायआक्साइड, ऑक्सीजन इ. अनेक प्रकारचे वायु असतात. सर्वामध्ये हायड्रोजन वजनाने हलका आहे. म्हणूनच हायड्रोजन भरलेला फुगा उंच आकाशात वर वर जातो. अशाच प्रकारची क्रिया आत्म्यात होते असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. म्हणजे असे की, जीवात्मा एक अरूपी पदार्थ आहे आणि त्यामुळे पौद्गलिक द्रव्य हायड्रोजनपेक्षा अनत गुणी हलके आहे, म्हणून पुद्गलाचा संबंध पूर्ण सुटल्यानंतर आत्मा सरळ तिथे जातो जिथे सर्व सिद्धात्मे आहेत. त्यापुढे धर्मद्रव्याचा अभाव आहे म्हणून आत्मा अधिक ऊर्ध्वगमन करू शकत नाही. या क्रियेस मोक्ष असे म्हणतात.

**चित्रगुप्त, यमराज, छे, Automatic record–** जैन धर्माशिवाय इतर धर्म असे मानतात की, ईश्वराच्या दरबारी पापपुण्याचे रेकॉर्ड ठेवले जाते. हे रेकॉर्ड जो ठेवतो त्याला चित्रगुप्त म्हणतात. रेकॉर्ड पाहून प्राण्याला स्वर्गात न्यावयाचे की, नरकात हे ठरवले जाते. मरणानंतर जीवाला जो नेतो तो 'यमराज'. जैन दर्शन निरीश्वर वादी आहे. तेव्हां त्याच्या (जीवाच्या) पापपुण्याचे रेकॉर्ड कोण ठेवणार त्याचे कार्माण शरीर हीच त्याची Personal file तेच Record आणि म्हणूनच कर्माप्रमाणे फळ मिळण्याची Automatic Action स्वचालित क्रिया आहे. जीवाचे रेकॉर्ड जे कार्माण शरीराच्या रूपाने रहाते ते पुद्गल परमाणु न्यूटनच्या नियमाप्रमाणे वेगवेगळया स्वरूपात परस्पर आकर्षणाने वेगवेगळया योनीमध्ये भ्रमण करण्यास भाग पाडते. त्यामुळे तिथे ईश्वरासारखा कोणी कर्ता असावा ही कल्पना वैज्ञानिक ठरत नाही.

**पृथ्वीचा आकार–** विज्ञान युगात वैज्ञानिकानी जे शोध लावले ते कांही काही वेळा परस्पर विरोधी सिद्ध झाले. सर जे. जे. थॉमसन याचे उदाहरण आपणास घेता येईल. सन १९०६ मध्ये यांनी इलेक्ट्रॉन्स हे कणरूप असतात हे सिद्ध करून दाखवले. त्याबद्दल त्यांना नोबेल पारितोषिक मिळाले. विचित्र योगायोग असा

की, त्याचाच मुलगा सर जॉर्ज थॉमसन याने त्यानंतर ३१ वर्षांनी म्हणजे सन १९३७ मध्ये असे सिद्ध केले की, इलेक्ट्रान्स हे कणरूप नसून त्या लहरी आहेत. त्यालाही नोबेल पारितोषिक मिळाले.[1]

पृथ्वीबद्दलहि असेच आहे. पृथ्वी चेंडूसारखी गोल असून अस्थिर आहे, असे मानणारे जसे कांही वैज्ञानिक आहेत तसेच पृथ्वी चपटी आहे, स्थिर आहे असे मानणारे वैज्ञानिक देखील आहेत. फरक एवढाच की, पृथ्वी चेंडूसारखी गोल व अस्थिर आहे असे मानणारे शास्त्रज्ञ अधिक आहेत.

अशा विरोधाभासातून विचार करावयाचा झाल्यास त्या सिद्धांतासंबंधी पोषक अशी मते आपणास पहावी लागणार आहेत. चेंडूसारखी गोल आहे या संबंधी पोषक मते येथे मांडण्याची गरज नाही. केवळ 'चपटेपणा' या संबंधाने विचार माडावयाचे आहेत.

पृथ्वीविषयी जैन साहित्यातील कल्पना (संक्षिप्त रूपाने)[2]– त्रिलोक १४ राजू उंच आहे. जाड ७ राजू आहे. अधोलोक व ऊर्ध्वलोक प्रत्येकी सात राजू उंच आहे. मध्यलोक एक राजू रुंद व १.४० लाख (एक लाख चाळीस हजार योजन) उंच आहे. (राजू म्हणजे किती याचे प्रमाण पूर्वीच्या लेखामध्ये आले आहे.) त्या मानाने एक लाख चाळीस हजार योजन 'न गण्य' रूप आहे म्हणून ऊर्ध्व किंवा अधोलोकातून ही उंची कमी करून येथे दिलेली नाही. अधोलोक आणि ऊर्ध्वलोक याचेमध्ये 'मध्यलोक' आहे. या मध्यलोकात असंख्यात द्वीप आणि असंख्यात समुद्र आहेत. या मध्य लोकात एक लाख योजन व्यास (४० कोटी मैल) विस्तार असलेले जंबूद्वीप आहे. त्याला वेढून २ लाख योजन व्यासाचे लवण समुद्र, त्याला वेढून त्याच्या दुप्पट आकाराचा धातकी खंड, पुढे दुप्पट आकाराचा वलयाकार कालोदधि समुद्र, त्याच्या दुप्पट वर्तुळाकार पुष्करवर द्वीप अशा प्रकारे पुढे पुढे क्रमाक्रमाने दुप्पट दुप्पट आकाराचे द्वीप व समुद्र आहेत.

जंबूद्वीपाच्या मध्यभागी एक लाख योजन उंच सुमेरु पर्वत आहे. या जंबूद्वीपात ६ कुलाचल (पर्वत) व ७ क्षेत्र आहेत. त्यांची लांबी, रुंदी, रंग इ. चे क्षेत्र सविस्तर दिलेले आहेत. विस्तार रूची वाचकांनी त्रिलोकसार, जम्बूदीवपण्णत्ति, सूर्य प्रज्ञप्ति, चंद्र प्रज्ञप्ति आदि ग्रंथ पहावेत.

भरत, हैमवत, हरि, विदेह, रम्यक, हैरण्यवत व ऐरावत असे ७ क्षेत्र व हिमवान, महाहिमवान, निषध, नील, रुक्मि व शिखरी असे सहा पर्वत आहेत.[3]

भरत क्षेत्राचा विस्तार ५२६$\frac{६}{१९}$ योजन म्हणजे २१०५६३$\frac{३}{१९}$ मैल आहे. हा विस्तार हैमवत, हरि व विदेह क्षेत्रापर्यंत वाढत जातो नंतर कमी होत जातो. शेवटच्या ऐरावत क्षेत्राचा विस्तार भरत क्षेत्राइतका आहे. म्हणजेच हैमवत आणि हैरण्यवत, हरि आणि रम्यक तसेच भरत आणि ऐरावत यांचा विस्तार सारखाच आहे.

पर्वतामध्ये हिमवान १०० योजन उंच आहे. तितकाच शिखरी पर्वत आहे. महाहिमवान आणि रुक्मि, निषध आणि नील यांची उंची समान आहे म्हणजे अनुक्रमे २०० व ४०० योजन.[4] पर्वताचा रंग स्वर्ण, चांदी, तापवलेले सोने, वैडूर्य मणि, रजत आणि सोने याचे समान आहे.

---

१. आपण– दि. १०–१–७०. २ अनेक शास्त्रातून सविस्तर वर्णन असल्यामुळे येथे विशिष्ट शास्त्राचे नांव व श्लोक दिलेले नाहीत. ३. जैनागमात योजनाचे दोन भेद आहेत–१) लघु योजन, २) महा योजन, लघु योजन चार कोसाचा व महायोजन २००० कोसाचा आहे. सूर्य चंद्र इ. गति, द्वीप समुद्र याचे प्रमाण दाखवण्यासाठी महायोजनाचे प्रमाण आहे.

४. हे सर्व प्रमाण महायोजन (अर्थात २००० कोस) समजावे. लेखामध्ये लघु योजनाचा संबंध जर आला तर विशेष निर्देष केला जाईल. तोपर्यंत जेव्हा जेव्हा योजनाचे वर्णन येईल तोपर्यंत महायोजन समजावे.

ज्योतिर्लोक– सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्र, तारे असे ज्योतिर्लोकाचे ५ प्रकार आहेत. मेरू पर्वताचे भोवती (११२१ योजन अंतर सोडून म्हणजे ४४८४०००) हे भ्रमण करतात. आपण रहातो त्या पृथ्वीपासून (उंच) ७९० योजन (३१६००० मैल) ते ९०० योजन (३६०००००) एवढया पोकळीत हे सर्व आहेत. पृथ्वीपासून सूर्य, चंद्र, नक्षत्र, बुध, शुक्र, गुरु, मंगळ आणि शनि हे अनुक्रमे वरवर आहेत. (अनुक्रमे ८००, ८८०, ८८४, ८८८, ८९१, ८९४, ८९७ व ९०० योजन उंचीवर आहेत.) याप्रमाणे थोडक्यात वर्णन आहे.

## पृथ्वी चपटी आहे–

पृथ्वी चपटी आहे असे म्हणणाऱ्या लोकामध्ये अनेक धर्माचे लोक आहेत, पदवीधर आहेत, वैज्ञानिक आहेत, भारतात आहेत, तसे परराष्ट्रात आहेत. या सर्वांचे मत चुकीचे म्हणून डावलता येणार नाहीत.[1]

पृथ्वी चपटी आहे या मताची पुष्टी करणाऱ्यामध्ये विलियम एडगल या शास्त्रज्ञाचा उल्लेख करावा लागेल. तो ५० वर्षेपर्यंत जोतिर्लोकाचे निरीक्षण करीत होता. रात्री तो कधी बिछान्यावर झोपला नाही. खुर्चीवर बसून आकाशाचे निरीक्षण करीत असे. आपल्या बागेत त्याने एक नळ रोवून टाकला होता जो नळ ध्रुवताराच्या सन्मुख होता.[2] The Sunday News of India यामध्ये "How Round is the earth" या नावचा एक लेख आहे. ( May 2nd 1948 ) त्यामध्ये म्हटले आहे. This eccentric ( चमत्कारिक) man eventually evolved the theory at a flat, basin shaped earth with the Sun moving North & South across it. He contented that the pole star was only 5000 miles away and that the Sun was only 10 miles in diameter.

एस्ट्रॉलॉजिकल मॅगेझीन (सन १९४६, जुलै व ऑगष्टचे अंक) मध्ये श्री. जे. मॅग्डोनाल्ड यांनी पृथ्वीच्या आकाराबाबत कांही विचार मांडले आहेत आणि पृथ्वी चपटी आहे असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. सन्मति सन्देश जुलै १९६८ मध्ये या लेखा आधारेच "पृथ्वी गोल नही चपटी है" हा लेख लिहीला आहे अनेकांत, जैन सिद्धांत भास्कर यामधूनही अशा अर्थाचे लेख प्रसिद्ध झालेले असावेत पण ते पहाण्यास मिळाले नाहीत. सबब सन्मति संदेशच्या लेखाधारे खालील विचार मांडीत आहे.[3]

**श्री. जे. मेक्डोनाल्ड यांचे विचार[4]–** १) जर पृथ्वी गोल असती तर ज्या अक्षांशावर उत्तरेकडे जितका वेळ उषःकाल रहातो तितक्याच अक्षांशावर दक्षिणेकडे तितकाच वेळ उषःकाल राहिला पाहिजे. पण वास्तविक तसे नाही. उत्तरेस ४० अक्षांशावर ६० मिनिटे उषःकाल असतो तर भूमध्य रेषेवर केवळ ५ मिनिट. मेलबॉर्न, आस्ट्रेलिया (दक्षिण) व फिलाडेल्फिया (उत्तर) एकाच अक्षांशावर पण उषःकाल मात्र निरनिराळे आहेत.

२) सर्व आधुनिक वैज्ञानिक मानतात की चन्द्र आदि ग्रहांचा समोरचा पृष्ठभाग (मुख) पृथ्वीसमोर असतो. जर पृथ्वी चेंडूसारखी गोल असती तर प्रत्येक दिवशी वेगवेगळा भाग समोर असता. कारण वैज्ञानिक पृथ्वीला देखील चंद्रादिकाप्रमाणेच सूर्यापासून निर्मित मानतात, मग त्यांचा आकार सारखाच असावा.

३) दक्षिण अमेरिकेत सनातन हिमश्रेणींची उची १६००० (सोळा हजार फूट) आहे. ही उंची उत्तरेकडे कमी होत गेली आहे. अलास्का येथे ही उंची केवळ १००० फूट आहे. जर पृथ्वी गोल असती तर भूमध्य रेषेपासून उत्तर दक्षिण समान अंतरावर हिमश्रेणी सारख्याच उंचीच्या असत्या.

---

१. जैन बोधक– दि. २।६।६९ (श्री. बाळ चौगुले यांचा लेख) २ जैन दर्शन आधुनिक विज्ञान पृ. १११

३. प्रस्तुत लेखाचा आवश्यक तेवढाच भाग उद्धृत केला आहे. ४. प्रमुख विचार सारांश रूपाने घेतले आहेत.



४) जर पृथ्वी गोल आहे तर उत्तर ध्रुवावर जशा वनस्पति आढळतात तशा दक्षिण ध्रुवावर का आढळत नाहीत ? उत्तर ध्रुवाच्या आसपास २०० मैलाच्या परिसरात अनेक प्रकारच्या वनस्पति आहे तर दक्षिणेला ७० अंशावर (ओरकेनी, शेटलॅन्ड प्रदेश) एकही नाही.

५) पृथ्वी गोल आहे हे सिद्ध करण्यासाठी समुद्रातून येणाऱ्या जहाजाचे उदाहरण देण्यात येते. पण हा केवळ दृष्टिभ्रम आहे. आपले डोळे गोल असल्यामुळे लांब असलेली वस्तु काही वेगळीच दिसते (दृष्टिभ्रमाची अनेक उदाहरणे आहेत.) दुर्बिणीतून पाहिल्यास पूर्ण जहाज दिसू शकते.

६) जर पृथ्वी गोल असती तर भूमध्य रेषेच्या खाली ध्रुवतारा दिसला नसता पण प्रत्यक्षात तो ३० अक्षांशापर्यंत तो दिसतो.

७) जर पृथ्वी गोल असती तर आर्कटिक आणि अटलांटिक या भागात सारख्या प्रमाणात तीन महिने रात्र व तीन महिने दिवस राहिला असता पण तसे नाही. ७० अक्षांश (दक्षिण) शेटलॅन्ड येथे सर्वात मोठा दिवस १६ तास ५३ मिनिटाचा आहे तर ७० अक्षांश (उत्तर) 'हॅमरफास्ट' येथे पूर्ण तीन महिन्याचा सर्वात मोठा दिवस असतो.

८) कॅप्टन जे. रास हे सन १८३८ मध्ये अति दक्षिणेकडे गेले. त्यांना अटलांटिक (ऍंटार्टिक) प्रदेशात १००००' ते १३०००' फुटापर्यंत पहाडांची उंची आढळली. तसेच ४५० ते १००० फूट उंचीच्या पक्क्या बर्फाची भित आढळली. त्या भितीचा अंत शोधावा म्हणून चार वर्षात ४०००० मैल प्रवास केला पण भित संपली नाही. पृथ्वी जर गोल असती तर १०८०० मैलच प्रवास करावा लागला असता.

९) कर्क रेषा २३½° उत्तरेला ४० मैल आहे तर दक्षिणेला ७५ मैल (मकर रेषा) आहे. हेच अंतर दक्षिणेला अटलांटिक भागात १०३ मैल आहे. असे कां व्हावे ?

१०) दक्षिण ध्रुवाचा शोध ज्यांनी लावला ते म्हणतात की, त्यानी तेथे ४०० ते ५०० पौंड वजन सहज उचलले. उत्तर ध्रुवावर ही परिस्थिती नाही. तेथे १०० पौंड वजन उचलणे अवघड आहे. गोलाकारामुळे (पृथ्वीच्या) दोन्ही ध्रुवावर सारखीच स्थिती असायास पाहिजे.

११) भूमध्य रेषेच्या दक्षिणेकडे गेल्यावर लोहचुंबक सुई जशीच्या तशी रहाते. वास्तविक सुई दक्षिणेकडे वळावी. पण असे होत नाही.

१२) पृथ्वीचा परीघ ४००००किलो मीटर आहे. या हिशोबाने एका तासात ती १६६६⅔ किलो-मिटर भ्रमण करते. हा वेग इतका प्रचंड आहे की, पृथ्वीवरील वस्तु स्थिर राहू शकत नाहीत

यावर असे उत्तर येईल की पृथ्वीची आकर्षण शक्ति असे होऊ देत नाही. जर असे आहे तर न्यूयार्क ते शिकागो (१००० मैल) एका तासात जाऊ शकला असता. (कोणत्याही प्रकारची गति धारण न करता आकाशात स्थिर विमानात बसून.) पण हे पूर्णतः असंभव आहे.

१३) जर बंदुकीची गोळी सरळ उंच आकाशात सोडली एक मिनिटानंतर ती खाली आली तर ती कुठे पडावी ? पृथ्वीच्या गतीप्रमाणे ती आठ मैलावर पडावी. पण असे घडत नाही. जेथून गोळी सोडली तिथेच ती पडते.

१४) आता प्रत्यक्ष उदाहरण पहा 'एरिक' नांवाचा झरा ६० मैल लांब आहे. पृथ्वीचा गोलाकार विचारात घेतला असता झऱ्याचा मध्यभाग ६१० फूट उंच असावा. पण प्रत्यक्षात (स्टेट इंजिनियरच्या रिपोर्ट-प्रमाणे) उभार तर नाहीच उलट ३ फुटाने कमी आहे. सुएझचा कालवाच घ्या किनाऱ्याच्या अपेक्षेने मध्यभाग १६६६ फूट उंच पाहिजे. परंतु प्रत्यक्षात तसे नाही. यावरून गोलाकाराविषयी संशय येणे साहजिक आहे






श्री. मॅग्डोनाल्ड यांनी अजूनही बरेच प्रयोग दिले आहेत पण विस्तार भयास्तव येथे दिले नाहीत. जे विचार श्री. मॅग्डोनाल्ड यांनी मांडले ते बारकाईने वाचल्यास गोलाकाराविषयी शंका येणे साहजिक आहे. कारण त्यांनी मांडलेल्या विचारामध्ये बहुतांशी प्रयोग सिद्ध व प्रत्यक्ष उदाहरणे आहेत.

**अजून कांही उदाहरणे–**

पृथ्वी सतत भ्रमण करीत आहे तर मग मोठमोठ्या समुद्रातील प्रचंड जल संचय स्थिर कसा ? आणि तो गोलाकार कसा राहिला? जैन ज्यौतिर्लोक पृ. ७६ वर पुढील वाक्ये आहेत, "अर्थात् गंगा नदी जैसे हरिद्वारसे कलकत्ताकी ओर बहती है, पृथ्वीके गोल होनेपर उल्टीभी वह जायेगी। समुद्र और कुयेके जल गिर पडेंगे।"

आधुनिक वैज्ञानिक असे मानतात की ध्रुवतारा उत्तर ध्रुवाच्या (North pole) समश्रेणीमध्ये आहे. म्हणून पूर्व व पश्चिमेकडे राहणाऱ्या लोकाना ध्रुवतारा सारखाच दिसेल. पण हे त्यांच्या तर्कानेच अशक्य वाटते कारण १२ तासात पृथ्वीचा एक भाग दुसरीकडे त्यावेळी व्यासाच्या दृष्टीने तो भाग १२७५८ किलोमिटर दूर असतो. अशाही वेळी ध्रुवतारा जसा पूर्वेकडून दिसतो तसा पश्चिमेकडून दिसतो हे पटत नाही. पुन्हा वैज्ञानिक मानतात की, पृथ्वी केवळ आपल्याच आसाभोवती फिरत नाही तर ती तासी ६६००० मैल या गतीने सूर्याभोवती फिरते सूर्याचा व्यास ८६६००० मैल व परीघ २६०००००० मैल आहे. त्याभोवती पृथ्वी अंडाकार फिरते. तीही ९३०००००० मैल दूरून. यावरूनच पृथ्वीचे सूर्यापासून प्रचंड अंतर आणि अंडाकार भ्रमणामुळे कमी जास्त होणारे अंतर याची कल्पना केल्यास, असे असताना देखील ध्रुवतारा उत्तर ध्रुवाकडेच दिसावा यामुळे पृथ्वीच्या वर्तुळाकारा (चेंडूसारख्या) बद्दल शंका आल्यास आश्चर्य नाही.

वैज्ञानिक याचे उत्तर देताना असे देतात की, ध्रुवतारा पृथ्वीपासून इतका दूर आहे की पृथ्वीचे कितीही परिवर्तन (स्थानांतरण, भ्रमण इ.) झाले तरीही ध्रुवतारा तियेच दिसतो पण हे उत्तर बरोबर वाटत नाही. कारण या उत्तरामुळे पृथ्वीचे भ्रमण आणि आकार दोन्हीही शंकास्पद वाटतात.

दुसरा एक तर्क असा की, पृथ्वीचे वजन लाखो करोडो नव्हे अब्जावधि टन आहे, मग ती खाली खाली कां येत नाही? त्याला वैज्ञानिकांचे उत्तर असे आहे की, पृथ्वीभोवती एक विशिष्ट प्रकारचे वातवलय आहे. जे पृथ्वीलाच काय, समुद्राचे पाणी इ. प्रचंड वजनासहित असलेल्या पृथ्वी आदिक ग्रहांनाही यथास्थित भ्रमण करीत ठेवते.

पण या उत्तराने गुंतागुंत अधिकच वाढते. ते वातवलय स्थिर आहे कि अस्थिर ते कशावर आधारलेले आहे. पृथ्वीला ते वर का लोटू शकत नाही, पृथ्वीच्या गतीमुळे घर्षण होत असेल तर मग त्यापासून निर्माण होणाऱ्या उष्णतेचे काम ?

वैज्ञानिक अजून एक तर्क असा उपस्थित करतात की, पृथ्वीमध्ये आकर्षण शक्ति आहे. त्या मुळे सर्व वजनदार वस्तु पृथ्वीवरच पडतात हाही तर्क पूर्ण समाधान करीत नाही. कारण प्रत्यक्षात नदी, नाले उताराकडे इतस्ततः वाहताना दिसतात पण लोखंडासारखे जड पदार्थ सरळ खालीच पडतात. गुरुत्वाकर्षणाचा प्रभाव असा वेगवेगळा आहे तर प्रचंड पर्वत त्याच्या तळापासून एखादा पदार्थ वर का आकर्षून घेत नाही !

कांही वेळा असे म्हणावे लागते की, "विज्ञान एक वह नदी है जिसमें सतत एकके बाद एक नई लहर उठती रहती है।"[१] एवढे मात्र खरे की, आजचे खगोल, भूगोल इ. शास्त्राचे ज्ञान इतके तोकडे-अपूर्ण आहे की, पृथ्वीच्या आकारासारखे अनेक प्रश्न सुटू शकत नाहीत, गुंतागुंत अधिकच वाढते. या गुंतागुंतीस कंटाळून एलफान्सो (१३ वे शतक) म्हणतो, "If the heavens were really like that, I could have given the Deity good advice, had He consulted me at their creation," – Sir Jems Jeens

१. जैनदर्शन और आधुनिक विज्ञान पृ. ११५.

शेवटी सामान्य शिक्षा पुस्तक बी. ए कोर्स (१९३७) मधील खालील विचार प्रगट करून हा लेख मी पूर्ण करतो. या पुस्तकात वैज्ञानिकांचा पृथ्वीविषयी तर्क प्रकट केला आहे तो हा– "हमारा सौर मंडल एवं पृथ्वीकी उत्पत्ति एक रहस्यमय पहेली है। इस बारेमें अभीतक निश्चित रूपसे कुछ भी नही कहा जा सकता। अलग अलग विद्वानों एवं वैज्ञानिकोंने अपनी बुद्धि एवं तर्कके अनुसार अलग अलग मत प्रचलित किये है। उन सब मतोंके अध्ययनके पश्चात् हम इसी निर्णय पहूंचते हैं, ब्रम्हाण्ड की विशालताके समक्ष मानव एक क्षणभंगुर प्राणी है। उसका ज्ञान सीमित हैं। प्रकृतिके रहस्योंको ज्ञात करनेके लिये जो साधन उनके पास उपलब्ध हैं, वे सीमित हैं, अपूर्ण है। वैज्ञानिकोंके विभिन्न सिद्धांतोको हम रहस्योद्घाटनकी अटकले मात्र कह सकते है। वास्तवमें कुछ मान्यताओंके आधारपर आश्रित अनुमानही हैं"।

**वैचारीक विज्ञानता म्हणजेच स्याद्वाद आणि अनेकान्त–** जैनाचार्यांची विश्वाला एक मोठी देणगी म्हणजे स्याद्वाद आणि अनेकान्त या विषयावर एवढी अगाध रचना आहे की, अनेक ग्रंथ लिहून देखील विषय पूर्ण होणार नाही. म्हणूनच केवळ तौलनिक दृष्टीने विचार करावयाचा आहे आणि तोही थोडक्यात स्याद्वाद जैन दर्शनाचा एक विशिष्ट नय सिद्धांत आहे. पदार्थाची सत्ता या सिद्धांत द्वारे अनेक मार्गानी स्विकारलेली आहे. त्यामुळे पदार्थाकडे आपण अनेक दृष्टिकोनाद्वारे पाहू शकतो. जगातील कोणतीच भाषा पूर्ण नाही आणि त्या भाषेमधून जे सांगितले जाते त्याचा अर्थ सदासर्वदा सर्वत्र एकच नसतो. वेगवेगळ्या कारणांनी वेगवेगळे अर्थ लावले जातात. पदार्थामध्ये एकाच वेळी अनेक गुण असतात.

सप्तभंगी नय– पदार्थाचे ज्ञान करून घेण्यासाठी सात प्रकारच्या शंका निर्माण होतात. त्यामुळे आपण सात प्रकारे प्रश्न करू शकतो आणि उत्तरही त्यामुळेच सात प्रकारचे मिळू शकते. आठ शंका, आठ प्रश्न, आठ उत्तरे शक्य नाही तसेच सहा शंका, सहा प्रश्न, सहा उत्तरे यामुळे देखील पदार्थाचे संपूर्ण ज्ञान होणार नाही. प्रश्नाचे उत्तर एक तर 'हो' असे देता येईल किंवा 'नाही' असे देता येईल. एकाच वेळी हो आणि नाही असे उत्तर देता येणार नाही म्हणजे तो पदार्थ अवक्तव्य आहे. गणित शास्त्राप्रमाणे तीन संख्येचे भंग जास्तीत जास्त प्रकार सातच होऊ शकतात. त्यामुळे सात भंग नय संभवतात. ते असे– १) स्यात् अस्ति २) स्यात् नास्ति ३) स्यात् अस्ति नास्ति ४) स्यात् अवक्तव्य ५) स्यात् अस्ति अवक्तव्य ६) स्यात् नास्ति अवक्तव्य ७) स्यात् अस्ति नास्ति अवक्तव्य. अधिक खुलाशासाठी जैनशास्त्रातून सात आधळ्यांचा व हत्तीचा दृष्टांत दिला जातो. एका शहरात एक हत्ती आला. सात ओंधळे तो हत्ती पहाण्यास निघाले. एकाने पाय चाचपून पाहिला तो म्हणाला हत्ती खांबासारखा आहे, दुसऱ्याने कान चाचपून पाहिला तो म्हणाला हत्ती सुपासारखा आहे, तिसऱ्याने शेपटी चाचपून पाहिली तो म्हणाला हत्ती दोरासारखा आहे. अशा प्रकारे सातही जणांनी वेगवेगळे हत्तीचे वर्णन केले. पण वास्तविकता अशी की, सातही जणाचे वर्णन एकत्र केले तर हत्तीचे वर्णन पूर्ण होऊ शकते. स्यात् हा शब्द अत्यत महत्त्वाचा आहे. स्यात् हा शब्द दृष्टिकोन दाखवणारा आहे.

स्याद्वाद आणि बर्ट्रॉन्ड रसेल– एकाच वेळी एका पदार्थाला आपण सर्व बाजूनी पाहू शकत नाहीत. त्यामुळेच 'स्यात्' (अमुक एका दृष्टिकोनातून) शब्द योजिला आहे. ब. रसेल सुद्धा याचा स्वीकार करून मानतात की, जर आम्ही पदार्थाचा सर्व बाजूनी विचार प्राप्त झाला तर आम्ही वस्तूच्या स्वरूपाची एक तर्कीय (तर्काने) रचना करू शकतो. सर्व बाजूनी विचार करण्याला त्यांनी पर्सपेक्टिव्ह्ज् म्हटले आहे आणि तर्कीय रचनेला लॉजिकल कॉन्स्ट्रक्ट (Perspectives & Logical construct). जगातील पदार्थांना एकाच प्रत्यक्षातून (अपेक्षेने) पाहू शकत नाहीत, विभिन्न स्वरूपाला विभिन्न दृष्टिकोनातून पाहू शकतो म्हणजे पदार्थाचे प्रत्यक्ष, वास्तविक, विषयगत पण आंशिक स्वरूप पाहू शकतो. सर्व दृष्टिकोण पारस्परिक रूपाने एकत्र येऊन संश्लेषणात्मक व्यवस्था झाली तर पदार्थांना पूर्ण पाहू (जाणू) शकतो. म्हणूनच रसेल यांनी 'सिस्टिम ऑफ पर्सपेक्टिव्ह्ज्' ही पद्धति स्वीकारली आहे. रसेल यांनी केवळ प्रत्यक्षीकृत दृष्टिकोणांचा विचार केला नाही तर अप्रत्यक्षीकृत





दृष्टिकोणाचा ( अन्परसीव्हड् पर्सपेक्टिव्हज् ) देखील स्वीकार केला आहे. वरील दोन्ही पद्धति वस्तुनिष्ठ आहेत. रसेलचे सिद्धांत स्याद्वादाशी मिळते जुळते आहेत. कारण दोन्हीही बाह्य जगताला वस्तुगत मानतात (मानसिक वा व्यक्तिनिष्ठ नाही). तसेच विविध दृष्टिकोनांनी (अपेक्षेने) पदार्थाचे ज्ञान होऊ शकते. पुन्हा पदार्थाचे पूर्ण ज्ञान होऊ शकते मात्र सर्व दृष्टिकोनां(अपेक्षांची)ची तेथे अपेक्षा आहे. अशा तिन्ही दृष्टीने स्याद्वादाशी रसेलचे साम्य आहे.



स्याद्वाद आणि हिगेल– हिगेलचा द्वंद्वात्मक भौतिकवाद (Dilectic Materialism) प्रसिद्ध आहे. त्या सिद्धांताद्वारे त्याने तीन अवस्था मांडल्या. १) वाद (Thesis), २) प्रतिवाद (Anti thesis) व ३) संवाद (Synthesis). वेदान्ताच्या विवर्तवादानुसार वाद, प्रतिवाद आणि संवाद म्हणजे अनुक्रमे स्थिति, परिवर्तन आणि प्रतिफलन आहे. प्रत्येक वस्तूची स्वत.ची एक स्थिति असते. वस्तूला प्रतिषेधात्मक (परिवर्तनात्मक) स्थिति जेव्हा येते तेव्हा नवे रूप येते (विवर्तरूपामध्ये) उदा– दुधाची स्थित्यात्मक सत्ता, त्याचे प्रतिषेधात्मक परिवर्तन आणि परिवर्तनजन्य दधिरूपामध्ये विवर्त भाव. दुसऱ्या उदाहरणाने असे म्हणता येईल की, सोन्याची द्रव्यरूप सत्ता, अग्निक्रियाद्वारा परिवर्तन आणि विवर्तरूप कटक ( मुकुट ) कुंडल आदि म्हणजे उत्पाद, व्यय, ध्रौव्य सारांश रूपाने हिगेलचा द्वं. भौतिकवाद 'उत्पादव्ययध्रौव्ययुक्तं सत्' या सूत्रानुरूप आहे. म्हणजेच स्याद्वादाशी साम्य आहे.

स्याद्वाद आणि आइन्स्टाइन– आइन्स्टाइनचे नाव माहित नाही असा सुशिक्षित माणूस सापडणे कठीण. जगातील सर्वात बुद्धिमान माणूस शालेय अभ्यासात 'ढ' असलेल्या विद्यार्थ्याने सन १९२१ मध्ये नोबेल पारितोषिक मिळवले. ज्यामुळे त्याला नोबेल पारितोषिक मिळाले तो सिद्धांत आहे सापेक्षतावाद Theory of Relativity.

स्याद्वाद हा शब्द 'स्यात्' आणि 'वाद' यांनी मिळून झाला आहे. स्यात्चा अर्थ आहे अपेक्षेने (कोण्या एका). वस्तु तत्त्व निर्णयामध्ये जो वाद अपेक्षेची प्रधानता बाळगतो तो स्याद्वाद.

सापेक्षवादाचे भाषांतर केले तर 'अपेक्षेचा सिद्धांत' असे होईल. सापेक्षतावाद आणि सापेक्षवाद अशी दोन नावे Theory of relativity ला आहेत. सारांशरूपाने स्याद्वाद आणि सापेक्षवाद यांचा अर्थ एकच. शब्दभेद जरूर आहे पण अर्थभेद मात्र नाही. योगायोग म्हणा किंवा आश्चर्य म्हणा, डॉ. राधाकृष्णन् यांनी *'स्याद्वाद' या शब्दाचे भाषांतर Theory of relativity असेच केले आहे. स्याद्वादामध्ये वस्तूचे स्वरूप* अपेक्षिक असते. वस्तूचे वर्णन करताना एका गुणधर्मास मुख्य त्याचवेळी इतर दुसऱ्या गुणधर्मांना गौण करावे लागते. त्यावेळी जे सत्य आपण सांगतो ते अपेक्षित असते. म्हणूनच आइन्स्टाइन म्हणतात, "We can only know the relative truth, the Absolute truth is known only to the Universal observer". 'अस्ति' 'नास्ति' शब्द स्याद्वादात अनेक वेळा येतात. त्याचप्रमाणे 'आहे' आणि 'नाही' हे शब्द सापेक्षवादात नेहमी येतात. आइन्स्टाइनचे एक उदाहरण पहा, एक मनुष्य लिफ्टमध्ये आहे. त्याच्या हातात सफरचंद आहे. लिफ्ट खाली येतानाच त्याने सफरचंद पाडण्यासाठी हात उलटा केला. परिणाम असा झाला की, माणसाची खाली जाण्याची गति सफरचंदपेक्षा जास्त असल्यामुळे ते माणसाच्या तळहाताला चिकटून राहील. इतकेच नव्हे तर त्याचा दाब माझ्या हातावर पडला आहे असा त्याला भास होईल. म्हणजे पृथ्वीवर उभ्या असलेल्या माणसाच्या अपेक्षेने तर सफरचंद गुरुत्वाकर्षणाच्या योगाने खाली येत असेल पण लिफ्टमध्ये असलेल्या माणसाच्या अपेक्षेने गुरुत्वाकर्षण काहीच नाही. म्हणजे गुरुत्वाकर्षण आहे सुद्धा आणि नाही सुद्धा. एके ठिकाणी निसर्गाविषयी ते म्हणतात, "Nature is such that it is impossible to determine absolute motion by any experiment whatever" (Mysterious Universe P. 78). याचे कारण सांगताना सर जेम्सजीन्स म्हणतो, "गति आणि स्थिति आपेक्षिक धर्म आहेत. उभे असलेले जहाज पृथ्वीच्या अपेक्षेने स्थिर आहे पण पृथ्वी सूर्याच्या अपेक्षेने गतिमान आहे. जहाज पृथ्वीबरोबर आहे. जर पृथ्वी सूर्याभोवती फिरली नाही तर जहाज










सूर्याच्या अपेक्षेने स्थिर होईल पण दोन्ही इतर ताऱ्यांच्या अपेक्षेने गतिमान असतील. सूर्य जरी स्थिर झाला तरी अति दूर ताऱ्यांच्या अपेक्षेने गतिशील आहे. आकाशात अशा प्रकारे आपण पुढे पुढे गेलो तर स्थिर कोणतीच वस्तु मिळणार नाही." स्याद्वाद म्हणतो, परमाणु नित्यही आहे आणि अनित्य सुद्धा. सापेक्षवादाचा ज्यावेळी जगात खूपच गाजावाजा झाला त्यावेळी आइन्स्टाईनच्या पत्नीने विचारले, "मी सापेक्षवाद कसा समजावून सांगू" उत्तर देताना आइन्स्टाइन म्हणाले, "जेव्हा एखादा तरुण एका सुंदर तरुणीशी गुजगोष्टी करतो त्यावेळी त्याला एक तास एका मिनिटासारखा भासेल पण त्यालाच गरम चुलीवर जर बसवले तर एक मिनिट एका तासासारखा भासेल."

जैनाचार्यांनी सत्याचे दोन प्रकार मानले. १) व्यवहार सत्य, २) निश्चय सत्य. (True & Really-true) आइन्स्टाइन म्हणतात, One thing may be true but not really true.

एक साधा प्रश्न घ्या. एखाद्याने विचारले किती वाजले ? तर भारतातील मनुष्य जर रात्रीचे ८–३० वाजले म्हणाला तर लंडनला रहाणारा म्हणेल दिवसाचे ३ वाजले आहे. ज्याच्या त्याच्या अपेक्षेने उत्तर बरोबर आहे. सर्वच ठिकाणची वेळ सांगणे कठीण. जैनागम यास अव्यक्त म्हणेल तर आइन्स्टाइन म्हणेल याचे उत्तर केवळ त्रिकालज्ञ देऊ शकेल.

स्याद्वाद आणि सापेक्षवाद यामध्ये कमालीचे साम्य आहे असे म्हटले तर मुळीच अतिशयोक्ति होणार नाही. पण ज्याप्रमाणे स्याद्वादाला श्री. शंकराचार्यांनी 'संशयवाद' असे म्हणून चूक केली त्याप्रमाणे आइन्स्टाइनच्या सापेक्षवादावरही टीका झाली.

स्याद्वाद व डॉ. राधाकृष्णन्– सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे डॉ. राधाकृष्णन् यांनी स्याद्वादाचा अनुवाद Theory of Relativity असा केला आहे. त्यांचा तर्क त्यांच्याच शब्दात वाचा, Indian Philosophy या ग्रंथात ते म्हणतात. "The theory of relativity cannot be logically sustained without the hypothesis of an obsolute... the Jains admit that things are one in their universal aspect (joti or karam) and many in their particular aspect (vyakti or karya). Both these according to them are partial points of view" असा तर्क जरी त्यांनी केलेला असला तरी स्याद्वाद इतका परिपूर्ण आहे की, (डॉ. राधाकृष्णन्) त्याच्या तर्कामुळे स्याद्वादाचे कांही बिघडत नाही. स्याद्वादाची सुद्धा अशी मान्यता आहे की, निरपेक्ष सत्य या जगात कांहीच नाही मग आमच्या मनात निरपेक्षतेचा मोह का यावा ? जर वस्तूच निरपेक्ष नाहीत तर आम्ही निरपेक्षता दाखवणारे कोण ? सापेक्षसत्याबाबत संदेह-संशय निर्माण होण्याचे कारण असे की, सापेक्ष सत्य म्हणजे वास्तविक (पूर्ण) सत्यापेक्षा दूरचे निराळे असे समजले जाते, वास्तविक तसे नाही.

स्याद्वाद आणि प्रो. एडिंग्टन– सापेक्षवाद किंवा स्याद्वाद याबाबत प्रो. एडिंग्टन म्हणतात, "A more familiar example of a relative quantity is direction of an abject. There is a direction of Cambridge relative to Edinburgh and another direction to London, and so on. It never access to us to think of this as discrepancy or to suppose that there must be same direction of Cambridge (at present undiscoverable) which is absolute Nature of Physical world. (P. 26)" अशी अनेक उदाहरणे देता येतील की, ज्यामुळे स्याद्वाद स्पष्ट होईल. शेवटी १२ उदाहरणे देऊन पुरे करतो.

ऊन सर्वांनीच पाहिले आहे. पण विज्ञान म्हणते पाहू शकत नाहीत. धर्मयुग, ७-१०-७३ मध्ये श्री. हरिमोहन शर्मा यानी त्याविषयी वैज्ञानिक सत्यता (पद्धती) सादर केली आहे. ते म्हणतात, "आप रोज धूपको देखते है। देखते है न? पर वैज्ञानिकसे पूछिए तो वे कहेंगे कि धूपको कोई कभी नही देख सकता। उनकी

भाषामें धूप सारे सौरमंडलकी वर्णक्रम (Solar spectrum) हैं, जो वास्तवमें सूर्यद्वारा अन्तरिक्षमें फेंकी गयी तरंगोंऔर स्फुरणोंकी विस्तीर्ण पट्टी है। यदि इस पट्टीको एक सप्तक मान लिया जाए, तो इस पट्टीके जो रंग हमें आंखोंसे दिखाई देते हैं. लालसे लेकर बैंगनी तक उन्हे सप्तकके बीचका एक स्वरानुक्रम माना जा सकता है; अर्थात् धूपमे ऐसे रग भी मौजूद है, जो हमे आंखोंसे कभी दिखाई नही देते। ऐसे रंगोंकी संख्या १०,०००,०००,००० के करीव हैं।

अकवर आणि बिरवलची कथा सर्वश्रुत आहे. जमिनीवर रेघ ओढून अकवराने बिरवलला सांगितले की, या रेघेला हात न लावता ही रेघ लहान करून दाखव. लागलीच बिरवलने तिच्या शेजारी एक पहिल्या रेघेपेक्षा मोठी रेघ ओढली आणि म्हणाला हे पहा, ती रेघ लहान झाली. वास्तविक रेघ तेवढीच होती पण तिच्या शेजारीच मोठी रेघ ओढल्यामुळे ती लहान झाली.

रेषेची व्याख्या करताना जिला लांबी असते पण रुंदी व जाडी नसते तिला रेषा म्हणतात, अशी व्याख्या केली जाते. बिंदूला देखील जाडी नसते. पण वास्तविक असे आहे की, जिला रुंदी आणि जाडी नाही अशी रेषा जगात नाही. अतिशय सूक्ष्म जरी असली तरी, नाही म्हणू शकत नाहीत. सरळ रेषा कागदावर ओढून आपण सरळ म्हणू शकतो पण अधिक सूक्ष्म रितीने पाहिल्यावर कळून चुकेल की रेषा जिला आपण सरळ रेषा म्हणतो वास्तविक ती पूर्णपणे सरळ नाही.

शेवटी स्याद्वादासंबंधी कांही विचारवंतांचे उद्गार खाली देत आहे. त्यावरून स्याद्वादासंबंधाने त्यांचे मत व समर्थन कळेल.

१) प्रयाग विश्वविद्यालयाचे उपकुलपति महामहोपाध्याय डॉ. गंगानाथ झा, एम्. ए, डी. लिट्., एल्. एल्. डी., हे म्हणतात–

"जवसे मैंने शंकराचार्यद्वारा किया गया जैन सिद्धान्तका खंडन पढा है तवसे मुझे विश्वास हुआ है कि इस सिद्धांतमें बहुत कुछ है, जिसे वेदांत के आचार्योंने नही समझा है। और जो कुछ अब तक मैं जैनधर्मको जान सका हूँ उससे मुझे यह दृढ विश्वास हुआ है कि यदि वे (शंकराचार्य) जैनधर्मको उसके असली ग्रथोंसे देखनेका कष्ट उठाते तो उन्हे जैनधर्मका विरोध करनेको कोई बात नही मिलती."

जैनधर्माचे सिद्धांत आणि प्राचीन भारतीय तत्त्वज्ञान हे धार्मिक पद्धतीच्या अभ्यासकासाठी महत्वपूर्ण असे आहे. स्याद्वादाने सर्व सत्य विचारांचे दार खुले केले आहे.

– जर्मन विद्वान, हर्मन जेकोबी

ज्या प्रकारे मी स्याद्वाद जाणतो त्याच प्रकारे मी त्याला मानतो. मला हा अनेकात मोठा प्रिय आहे

– म. गांधी

अनेकात अथवा स्याद्वाद विश्वदर्शनात अद्वितीय आहे. सन्दर्शन आणि स्याद्वादाचे सिद्धात हे औद्योगिक पद्धतीमुळे प्रस्तुतकाली झालेल्या गुंतागुंतीच्या समस्या उलगडण्यास अत्यधिक कार्यकारी होतील.

– डॉ. एम्. वी. नियोगी, M. A. LL. M. LL. D.
चीफ जज्ज नागपूर हायकोर्ट व उपकुलगुरु नागपूर वि.

जैनियोंका अनेकांतवाद और नयवाद एक ऐसा सिद्धांत है जो कि सत्यकी खोजमें पक्षपातरहित होनेकी प्रेरणा करता है, जिसकी आवश्यकता सब धर्मोको है।

– प्रो. बी. एल्. आत्रेय, M. A.

तव प्रेष्योस्मि, दासोस्मि, सेवकोस्म्यस्मि किङ्करः । ओमिति प्रतिपद्यस्व, नाथ ! नातः परं ब्रुवे ॥

जैनधर्मकी बुनियाद अनेकातपर है यह हम सबका दावा है ।

— भगवानदीन

स्याद्वाद जैनधर्मका एक अभेद्य कीला है, जिसके अन्दर वादी प्रतिवादियोंके मायामय गोले प्रवेश नहीं कर सकते ।

— श्री. म. म. स्वामी राममिश्रजीशास्त्री, बनारस

स्याद्वाद और अनेकान्त वस्तु स्वरूपको यथार्थ बतलाता है ।

— प्रो. फणिभूषण अधिकारी, M. A.

द्रव्यका सम्पादक करनेके लिए जैनधर्मने योजित एक स्याद्वादकाही स्वरूप देख लेना काफी होगा कि जो आधुनिक पद्धतिके साथ मिलता जुलता है ।

— एल्‌बी परटोल्ड, झेकोस्लोवाकिया

तत्वज्ञानी या नात्याने मी जैनधर्माचा अध्यात्मवाद, त्याग आणि अहिंसा आदि सिद्धांताचा आदर करतो.

— प्रो. रेमान्ड पाश्वर, न्यूयार्क

व्यवहार शोधनेके लिए शास्त्र बनता है । सो जैनशास्त्रका मूल सिद्धांत स्याद्वाद ऐसाही साधु उपाय है ।

— डॉ. भगवानदास

.... यदि मुझे अनेकान्तवादी या स्याद्वादी माना जाय तो भी इसमें मेरी कोई हानि नही होगी.... मुझे यह अनेकांतवाद बडा प्रिय है ।

— म. गांधी

जैन धर्ममें अहिंसा तत्व जितना रम्य और भक्ति मार्ग जितना स्तुत्य है उससे कही अधिक सुंदर स्याद्वाद है ।

— आचार्य आनंदशंकर ध्रुवजी, काशी

....मुझे विश्वास हुआ है कि इस (स्याद्वाद) सिद्धान्तमें बहुत कुछ है ।

— म. म. डॉ. गंगानाथ झा, M. A. D. LIT. LL. D.

जैनधर्मने सब धर्मोंके मेलको और सब तत्वज्ञानोंको भिन्न भिन्न अपेक्षाओंको अपने सार्वधर्म और उसके अनेकान्तवादमें रख दिया है ।

— महाराजासाहब, म्हैसूर

इन भंगोंके कहनेका यह मतलब नही है कि प्रश्नमें निश्चितपना नहीं है.... यह भाव है कि जो कुछ कहा जाता है वह सब किसी द्रव्य, क्षेत्र कालादिकी अपेक्षासे सत्य है ।

— डॉ. भांडारकर, M. A. पुणे

जैनधर्मके तत्वज्ञानमें स्याद्वाद नामका एक बडा सिद्धान्त है.... जिसके बिना कोई भी वैज्ञानिक तथा दार्शनिक अन्वेषण सफल नही हो सकता ।

— प्रो. गंगाप्रसाद मेहता, M. A., काशी

पूर्वी और पश्चिमी दर्शनोंमें जुदे जुदे स्थानोंमे स्याद्वादका मूल सूत्र स्वीकृत होनेपर भी स्याद्वादको स्वतंत्र दार्शनिक मतवादका उच्चासन देनेका गौरव केवळ जैनदर्शनकोही मिल सकता है ।

— प्रो. सरकार महोदय, M. A.

इस स्याद्वादसे सर्व सत्य विचारोका द्वार खुल जाता है ।

– प्रो. डॉ. हर्मन जैकोबी, M. A. Ph. D. बर्लिन

आतापर्यंत आपण स्याद्वाद तौलनिक दृष्टीने पाहिला. कथन थोडक्यात जरी असले तरी मान्य करावे लागेल की, स्याद्वाद तथ्यपूर्ण आहे. वस्तुस्वरूप जाणून घेण्याचा तो यथार्थ मार्ग आहे, जो मार्ग जैनाचार्यांनी अनेक शतकापूर्वी शोधून काढला आहे. म्हणूनच जैनाचार्य म्हणतात–

जेण विणावि लोगस्स ववहारो सव्वहा न निव्वडइ । तस्स भुवणेक्क गुरुं णमो अणेगन्तवायस्स ॥

## मंत्र शास्त्र व जैन धर्म

व्याख्या– मंत्र हा शब्द ( दिवादि ज्ञाने ) मन् धातुपासून ष्ट्रन् (त्र) प्रत्यय लावून तयार झाला आहे. व्युत्पत्तीप्रमाणे त्याचा अर्थ होतो की, "मन्यते ज्ञायते आत्मादेशोऽनेन इति मन्त्रः"[1] अर्थात् ज्याच्या योगाने आत्म्याचा आदेश–निजानुभव जाणला जातो, तो मंत्र आहे. दुसऱ्या प्रकाराने तनादि गणीय मन् धातूपासून (तनादि अवबोधे to consider) ष्ट्रन् प्रत्यय लावून मंत्र शब्द झाला आहे. या उत्पत्तीप्रमाणे 'मन्यते विचार्यते आत्मादेशो येन स मंत्रः' म्हणजे ज्याच्यापासून आत्म–आदेशावर विचार केला जातो तो मंत्र होय. तिसऱ्या प्रकाराने 'मन्यंते सत्क्रियन्ते परमपदे स्थिता. आत्मानः वा यक्षादि शासनदेवता अनेन इति मन्त्रः' म्हणजे ज्याच्यामुळे परमपदात स्थित पंच उच्च आत्म्यांचा आणि यक्षादि शासन देवतांचा सत्कार केला जातो तो मन्त्र. या तीन व्युत्पत्तींनी मंत्र या शब्दाची व्याख्या केली जाते.

साहित्य– मंत्र शास्त्रावरसुद्धा जैन रचना उपलब्ध आहेत. विक्रमसंवतचे अकरावे शतक (शेवट) आणि बारावे शतक ( आदि ) या काळातील विद्वान श्री. मल्लिषेण यांचे 'भैरव पद्मावति कल्प, सरस्वती मन्त्रकल्प, अखिज्वालामालिनी कल्प या रचना महत्वाच्या आहेत.[2] भैरव पद्मावति कल्प या ग्रंथात मन्त्रीलक्षण, सकलीकरण, देव्यर्चन, द्वादश रंजिकामन्त्रोद्धार, क्रोधादिस्तम्भन, अंगनाकर्षण, वशीकरण यन्त्र, निमित्त वशीकरण मंत्र आणि गारुडमन्त्र नावाचे दहा अधिकार आहेत आणि यावर वन्धुषेण नावाच्या विद्वानाचे संस्कृत विवरण सापडते. ज्वालामालिनी कल्प नावाची एक दुसरी रचना इन्द्रनन्दि यांची आहे जी रचना शक संवत् ८६१ मध्ये मान्यखेट येथे रचिली गेली. विद्यानुवाद किंवा विद्यानुशासन नावाचा अजून एक-महत्वाचा ग्रंथ आहे ज्यात २४ अध्याय आहेत. ती मल्लिषेणाचार्यांची समजली जाते पण परीक्षणांति असे दिसते की ही कृति मल्लिषेण नंतर झालेल्या दुसऱ्या विद्वानांची असावी.[3]

उद्देश– स्वर व्यंजन इत्यादिकापासून मंत्र तयार होतो. त्यापासून निघणाऱ्या ध्वनि मातृका म्हणविल्या जातात. प्रतिष्ठापाठा (पं. जयसेनकृत, पृ. ३७७) मध्ये खालील श्लोक आढळतो.

अकारादिक्षकारान्ता वर्णा प्रोक्तास्तु मातृका. । सृष्टिन्यास-स्थितिन्यास-संहृतिन्यासतस्त्रिधा ॥ ३७६ ॥

अर्थात् अकारापासून क्षकारापर्यंत ( क् + ष् + अ = क्ष ) मातृका वर्ण म्हणविले जातात. यांचा तीन प्रकारचा क्रम आहे– सृष्टिक्रम, स्थितिक्रम आणि संहारक्रम.

'मंत्र साधनेचा मूळ उद्देश आत्मकल्याण आहे. प. नेमिचंद्र हे म्हणतात, 'णमोकार मन्त्रमें मातृका ध्वनियोका तीनो प्रकारका क्रम सन्निविष्ट है ।[4] इसी कारण यह मंत्र आत्मकल्याणके साथ लौकिक अभ्युदयोंको देनेवाला है । अष्टकर्मोके विनाश करनेकी भूमिका इसी मन्त्रके द्वारा उत्पन्न की जा सकती है । संहारक्रम

१. मगलमत्र णमोकार पृ ११. २. अनेकांत वर्ष १२ किरण ९. ३. जैन साहित्य आणि इतिहास (पं. नाथूरामजी) पृ. ४१५. ४. मंगलमंत्र णमोकार पृ. १४.

कर्मविनाशको प्रगट करता है तथा सृष्टिक्रम और स्थितिक्रम आत्मानुभूतिके साथ लौकिक अभ्युदयोंकी प्राप्तिमें भी सहायक हैं। जैनदर्शन वीतराग विज्ञानतेचे समर्थन करणारा आहे. तेव्हां कोणत्याही मंत्राचा उपयोग केवल लौकिक साधन सामुग्री साठवणे किंवा क्षणिक सुखासाठी मंत्रसिद्धि करणे योग्य होणार नाही. म्हणून साधकाने आत्मोन्नतीच्या आड मंत्र येणार नाहीत याची खबरदारी घ्यावी.

उत्पत्ति– भारतामध्ये एक काळ असा होता की ज्यावेळी जैनेतरामध्ये या शास्त्राचे प्राबल्य होते अशा वेळी अनेक शाखा आणि उपशाखा निर्माण होणं साहजिक होतं. पण काळाबरोबर उद्देश बदलला आणि आत्मविकासाची मर्यादा ओलांडून मंत्र लौकिक कार्यासाठी उपयोगात येऊ लागले. या युगाला तांत्रिक युग म्हणतात.[1] या युगात मंत्र, तंत्र, यंत्र यांचा खूपच प्रचार झाला आणि याविषयी अनेक ग्रंथांची रचना झाली. अशा वेळी कांही जैन दिगंबर मुनिसुद्धा या कालप्रवाहातून सुटू शकले नाहीत. त्यांनी सुद्धा समयानुकूल मंत्र शास्त्र लिहिले, अनेक चमत्कार दाखविले. लोकांना मुग्ध केले आणि सिद्ध करून दाखविले की, आम्ही जगाच्या कोणत्याच प्रकारे मागे नाही. किती तरी शास्त्रांची निर्मिति केली, ज्याचे मूळ विद्यानुवाद नावाचे १० वे पूर्व आहे. बीज आणि शक्ती– बीजाक्षरांच्या निष्पत्ती विषयी खालीलप्रमाणे उल्लेख आहे. (पहा जयसेन प्रतिष्ठापाठ)

" हलो बीजानि चोक्तानि स्वराः शक्तय ईरिताः ॥ ३७७ "

( अर्थ– ककारापासून हकारापर्यंत व्यंजन बीजसंज्ञक आहेत आणि अकारादिस्वर शक्तिरूप आहेत. ) मंत्रबीज बीज आणि शक्ती यांच्या संयोगाने उत्पन्न होतात.

सारस्वत बीज, माया बीज, शुभनेश्वरी बीज, पृथ्वी बीज, अग्नी बीज, प्रणव बीज, मारुत बीज, जल बीज, आकाश बीज, आदीची उत्पत्ति उक्त क ते ह् आणि अकारादि यापासून होते. बीजकोशामध्ये बीजाक्षरांचे वर्णन खालीलप्रमाणे सांगितली आहे.

ॐ प्रणव ध्रुवं ब्रह्मबीजं, तेजोबीजं वा ओं तेजोबीजं ऐं वाग्भव बीजं, लृं कामबीजं, क्षी शक्तीबीजं, हंसः विषापहारबीजं, क्षीं पृथ्वीबीजं, स्वा वायुबीजं, हा आकाशबीजं, ह्रा मायाबीजं, त्रैलोक्यबीजं, वा क्रों अंकुश बीजं, जं पाशबीजं, फट् विसर्जनं चालनं, वा वौषट् पूजा ग्रहणं आकर्षणं वा, संवौषट् आमंत्रणम्, ब्लूं द्रावणं, क्लूं आकर्षणं, ग्लौ स्तंभनं, ह्रौं महाशक्तीः, वषट् आव्हाननं, रं ज्वलनं, क्ष्वीं विषापहारबीजं, ठः चन्द्रबीजं, घे घै ग्रहण बीजं, वैविबन्धों वा, द्रा द्रां क्ली ब्लूं सः पञ्चबाणी, द्रं विद्वेषणं रोषबीजं वा, स्वाहा शान्तिकं मोहकं वा, स्वधा पौष्टिकं, नमः शोधन बीजं, हं गगन बीजं, ह्लूं ज्ञानबीजं, यः विसर्जनबीजं उच्चारणं वा, यं वायुबीजं, जुं विद्वेषण बीजं, झ्वीं अमृतबीजं, झ्वी भोगबीजं, हूं दण्डबीजम्, खः स्वादनबीजं, झ्रौं महाशक्तीबीजं, हल्वयूं पिण्डबीजं, हैं मंगलबीज सुखबीज वा, श्री कीर्तिबीजं कल्याण बीजं वा, क्ली धनबीजं कुबेरबीजं वा, तीर्थंकर नामाक्षर शान्तिबीजं मांगल्यबीजं कल्याणबीजं विघ्नविनाशकबीजं वा, अ आकाशबीजं धान्यबीज वा, आ सुखबीजं तेजोबीजं वा, ई गुणबीजं तेजोबीजं वा, उ वायुबीज, ज्ञां ज्ञी ज्ञू ज्ञे ज्ञै ज्ञों क्षो क्ष्रौं ज्ञः रक्षाबीजं, सर्वकल्याणबीजं सर्वशुद्धि-बीजं वा, वं द्रवणबीजं, यं मंगलबीजं, संशोधनबीजं, यं रक्षाबीजं, झं शक्तीबीजं। तं थं दं कालुष्यनाशकं मंगलवर्धकं सुखकारकं च।

या संपूर्ण बीजाक्षरांची उत्पत्ति णमोकारमंत्र आणि यक्ष-यक्षिणीच्या नामाक्षरापासून झाली आहे. कांही पारिभाषिक शब्दांचे स्पष्टिकरण–

कल्पग्रंथ– ज्या ग्रंथामध्ये मंत्र-विधान, यंत्र-विधान, मंत्र-यंत्रोद्धार, बलिदान, दीपदान, आव्हान, पूजन, विसर्जन आणि साधना इ. चे वर्णन असते त्याना कल्पग्रंथ म्हणतात.

१. जैन सिद्धांत भास्कर–डिसें–३७, भाग ४ किरण ३ पृष्ठ १३७.




तंत्र ग्रंथ– ज्यामध्ये गुरु आणि शिष्य यामध्ये संवाद रूपाने मंत्र-यंत्र, तन्त्र, औषधि आदि विषयावर चर्चा असेल ते तंत्र ग्रंथ म्हणविले जातात.

पद्धति ग्रंथ– ज्या ग्रंथात अनेक देव-देवींची साधना कशी करावी याचे विधान असते, त्यांना पद्धति ग्रंथ म्हणतात.

बीजकोष– मंत्राच्या पारिभाषिक शब्दांना समजण्याची पद्धति दाखवून एका एका बीजाक्षरांच्या अनेक व्याख्या केल्या जातात त्यास बीज कोष म्हणतात.[1]

मार्ग– मंत्रशास्त्रात मार्गाचे खूप विस्ताराने वर्णन आहे. कारण या उपायांनी मंत्रसिद्धि होते असे मंत्र शास्त्राचे मत आहे. सर्वसाधारणपणे त्याचे तीन मार्ग केले जातात.

१) दक्षिण अथवा सात्त्विक मार्ग– सात्विक देवतांचे, सात्विक सामग्रीद्वारा सात्त्विक उपासना करणे दक्षिण मार्ग आहे.

२) वाम मार्ग– मदिरा, मांस, महिला इ. कुद्रव्यांनी भैरव, भैरवी इ. तामस प्रकृति युक्त देव-देवी यांची आराधना करण्याचे विधान आहे तो वाम मार्ग.

३) मिश्र मार्ग– मांस, मदिरा वस्तूंना प्रत्यक्ष ग्रहण न करता त्यांच्या प्रतिनिधीमार्फत इष्ट सिद्धि करणे यास मिश्र मार्ग म्हणतात.

मंत्राचे प्रकार– डॉ. नेमिचंद्र हे मंगलमंत्र णमोकार या ग्रंथात म्हणतात, "मत्रोंका बार-बार उच्चारण किसी सोते हुए को जगानेके समान है। यह प्रक्रिया इसीके तुल्य है, जिस प्रकार किन्ही दो स्थानोंके बीच बिजलीका सम्बन्ध लगा दिया जाय। साधककी विचारशक्ती स्विच का काम करती है और मंत्रशक्ती विद्युत् लहरका।" साधक वेगवेगळ्या कारणासाठी वेगवेगळे मंत्र साध्य करतो. त्यामुळे ढोबळ मानाने खालील प्रकार पडतात–

१) स्तम्भन, २) मोहन, ३) उच्चाटन, ४) वश्याकरण, ५) जृम्भण, ६) विद्वेषण, ७) मारण, ८) शान्तिक आणि ९) पौष्टिक.

१) स्तंभन– हिंस्र श्वापदे, भूतप्रेतादिकापासून होणारे कष्ट दूर करून त्यांना खिळून (स्तंभित) टाकण्यात येते असे मंत्र.

२) मोहन– इष्ट किंवा अनिष्ट जीवांना मोहित करणारे मंत्र.

३) उच्चाटन– मन अस्थिर, निरुत्साहित, भ्रष्ट होईल असे मंत्र.

४) वश्याकरण– इष्ट वस्तु किंवा व्यक्ति प्राप्त करून देणारे, मन वश करणारे मंत्र.

५) जृम्भण– या मंत्राने भूत, प्रेत, शत्रु इ. त्रस्त होतात.

६) विद्वेषण– या मंत्राने समाज, राष्ट्र इ. मध्ये परस्पर कलह होतो.

७) मारण– या मंत्राने अनिष्ट व्यक्ति किंवा शत्रू यांना साधक प्राणदंड देऊ शकतो.

८) शान्ति– या मंत्राने व्याधि, भूतपिशाच्यादिकांच्या पीडा अतिवृष्टि, अनावृष्टि इ. शांत होतात.

९) पौष्टिक– या मंत्राने सुख सामग्रीची प्राप्ति होते.




---

१. जैन सिद्धान्त भास्कर–भाग ४, डिसेंबर १९३७.

सम्प्रदाय– मंत्रशास्त्रामध्ये केरळ, काश्मीर आणि गौड या नावांचे तीन संप्रदाय आहेत. वैदिक धर्मामध्ये केरळ संप्रदाय, बौद्धामध्ये गौड आणि जैनामध्ये काश्मीर संप्रदाय प्रचलित आहे. ज्यांनी काश्मीर मार्ग (संप्रदाय) स्वीकारला ते सरस्वती, पद्मावती इत्यादि सात्त्विक देवतांचे उपासक असल्यामुळे विशुद्ध दक्षिण मार्गी आहेत, गौंड संप्रदाय ज्यांनी स्वीकारला ते काली, तारा इत्यादि तामस देवतांचे आराधक असतात म्हणून ते वाममार्गी आहेत. केरळ संप्रदाय मिश्रमार्गी आहे. यामध्ये प्रगट रूपाने तर दक्षिण आणि गुप्त रूपाने वाम मार्गाचा आश्रय घेतला जातो. राजस प्रकृतीची महालक्ष्मी इत्यादि त्यांची उपास्य देवता आहे. कुलार्णव आदि ग्रंथामध्ये संप्रदायाचा आश्रय घेणे अत्यंत आवश्यक समजले आहे.[1]

पीठ– मंत्र सिद्धीसाठी खालील चार पीठांची आवश्यकता असते असे मंत्र शास्त्रातून वर्णन आहे. ते चार पीठ असे– १) श्मशान पीठ, २) शवपीठ, ३) अरण्य पीठ, ४) श्यामा पीठ.

१) श्मशान पीठ– भयानक श्मशान भूमीमध्ये जाऊन मंत्राची आराधना करणे श्मशान पीठ आहे. मंत्रसिद्धीचा जो काल असेल तितक्या काळापर्यंत यथाविधी श्मशानमध्ये साधना करावी लागते. भयवान् पुरुष या पीठाचे अवलंबन करू शकत नाही.

२) शवपीठ– या पीठामध्ये कर्ण पिशाचीनी आदि विद्या सिद्ध करण्यासाठी प्रेतावर यथेष्ठ आसन मांडून सविधि मंत्र साधना करावी लागते. बहुधा कुदेवि-देवता यांची सिद्धि या पीठासनाने केली जाते.

३) अरण्य पीठ– निर्जन अरण्यात जिथे हिंस्र पशु आहेत, अशा अरण्यामध्ये जाऊन यथाविधी साधना करणे अरण्यपीठ आहे. निर्वाण मंत्राच्या सिद्धीसाठी हे पीठ योग्य आहे. सहसा निर्ग्रंथ मुनींनी भयानक अरण्यात तप केल्याची जास्त उदाहरणे आढळतात. यामुळे मनात इच्छा, आकांक्षा नसतांना देखील बऱ्याच सिद्धी त्यांना प्राप्त होतात. त्या सिद्धींचा उपयोग लोककल्याणासाठी मुनि करतात. पण स्वतःसाठी (लौकिक स्वार्थासाठी) ते कधीच उपयोग करून घेत नाहीत. आणि त्यागमय जीवनाकडे लक्ष देता एकांतासाठी हे पीठ फार उपयुक्त, एकमेव आहे.

४) श्यामा पीठ– सर्वात कठिण किंवा असाध्य असे हे पीठ समजले जाते. विरळा पुरुषच असे ज्याने साधनासाठी हे पीठ स्वीकारले असेल. एकांत स्थानामध्ये षोडशी नव यौवना वस्त्ररहित अवस्थेत बसवून तिच्या समोर यथाविधी साधना करावी लागते. चंचल चित्तसाधक मंत्र साधना करण्यात (या पीठासनाने) अयशस्वी होतात.

मंत्राने प्रभाव व कार्यसिद्धी का होते ?– आतापर्यंत आपण थोडक्यात मंत्राविषयी माहिती मिळविली. आता आपणास हे पहावयाचे आहे की, मंत्रामुळे प्रभाव किंवा कार्यसिद्धि इ. कशी होते ? मंत्राचा मनाशी अतिशय संबंध आहे त्यामुळे मन एकाग्र झाल्याशिवाय विषयाविषयी अनासक्ती होणे अशक्य आहे. जितकी स्थिरता लवकर तितके फल तत्काल मनुष्याच्या दृश्य क्रिया चेतन मनात आणि अदृश्य क्रिया अचेतन मनात असतात असे मानस शास्त्र आहे. यालाच मनोवृत्ति म्हणतात. या मनोवृत्ति ३ (तीन) प्रकारच्या आहेत–[2] १) ज्ञानात्मक २) वेदनात्मक ३) क्रियात्मक. मंत्राचे उच्चारण केले असताना ज्ञानात्मक मनोवृत्ति उत्तेजित होते. ज्ञान केंद्र आणि क्रिया केंद्र याचा घनिष्ठ संबंध असल्यामुळे मंत्राच्या स्मरणाने माणसाचे मन शुद्ध होते आणि आत्मिक विकासाची प्रेरणा मिळते. याशिवाय माणसाच्या भोजनादिक ज्या मूल प्रवृत्ति आहे त्यांचे दमन (Repression), मार्गांतरी करण (Inhibition), विलियन (Redirection) आणि शोधन (Sublimation) होत रहाते.

---

१. जैनसिद्धांत भास्कर भाग ४, किरण ३ पृ १३९    २. मंगल मंत्र णमोकार, पृष्ठ ४४.




दुसरेही एक कारण असे आहे की, मंत्राच्या उच्चारणाने अशी विद्युत्शक्ति निर्माण होते की, माणसाच्या चेतन अचेतन आणि अनचेतन मनोभावावर परिणाम होतो, निरंतर उच्चारणाने आत्म्यामध्ये शक्ति निर्माण होते ती विद्युत् असे समजले तरी चालेल. याच शक्तीने आश्चर्यजनक कार्ये होतात.]

मंत्र शास्त्रामध्ये मंत्र कशावर लिहावे, का लिहावे, कसे लिहावे, कोण्या मुहूर्तावर, नक्षत्रादिकावर मंत्रसाधना करावी इत्यादि सर्व बाबीवर विशेषरूपाने अनेक ग्रंथातून चर्चा आलेली आहे. त्या सर्वांचे बाबतीत चर्चा करणे शक्य नाही. लेखाचे आरंभी दिलेल्या ग्रंथावरून विस्ताररुचि वाचकानी जाणून घ्यावे.

**स्वप्न शास्त्र व जैन धर्म–**

ज्ञानसागर इतका गहन आहे की, त्याचा पार सर्वज्ञाशिवाय कुणालाच लागणार नाही. एक एक परमाणु रहस्यमय आहे. रहस्य उलगडण्याचा अनेक विचारवंतानी प्रयत्न केला आहे. त्याला स्वप्न हेही अपवाद नाही. पाश्चात्य, पौर्वात्य सर्व वैज्ञानिकांनी त्या संबंधाने संशोधन केले आहे. स्वप्न का पडते, केव्हां पडते, त्याचा बुद्धीशी संबंध आहे काय ? मनाशी संबंध आहे काय ? स्वप्नामध्ये भविष्याबाबत सूचना मिळतात काय ? सुप्त भावनांशी त्याचा संबंध आहे काय ? अशा अनेक बाबींचे मनोवैज्ञानिकांनी तसेच विचारवंतांनी संशोधनपूर्वक सिद्धांत सादर केले आहेत.

स्वप्न म्हणजे काय ? त्याचे लक्षण– अनादि कालापासून हा जीव कर्माशी बद्ध झालेला आहे. जीव जो वर्तमानकाळी क्रिया करतो त्या क्रियाद्वारे त्या जीवाचा भूतकाळ व भविष्यकाळ जाणून घेता जरी नाही आला तरी पण संकेत मात्र असतो. स्वप्नाचे अंतरंग कारण ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय कर्माचा क्षयोपशम तसेच मोहनीय कर्माचा उदय हे आहे. ज्या जीवाचा क्षयोपशम जसा असेल तसा स्वप्नाचा तीव्र मंद प्रभाव-सत्यता आढळून येते. तीव्र कर्मांच्या उदयाने दिसणारी स्वप्ने निरर्थक असतात. विशेष क्षयोपशमधारी जीवांची स्वप्ने निरर्थक न ठरण्याचे कारण असे की, त्यांना क्षयोपशमामुळे ज्ञान अधिक असते. त्याचमुळे स्वप्नाचा संबंध भूत व भविष्याशी असावा.[1]

स्वप्नांचे प्रकार– महापुराणामध्ये (४१–५९) खालीलप्रमाणे उल्लेख आहे–

ते च स्वप्ना द्विधाम्नाताः स्वस्थास्वस्थात्मगोचराः । समैस्तु धातुभिः स्वस्था विषमैरितरे मता ॥

स्वप्न दोन प्रकारचे आहेत– १) स्वस्थ अवस्था असणारे, २) अस्वस्थ-विकृत-अवस्था असणारे. जे धातूंची समानता असताना दिसतात ते स्वस्थ, आणि जे धातूची असमानता असताना दिसतात ते अस्वस्थ-विकृत-अवस्था असणारे. स्वप्न पडण्याच्या कारणावरुनसुद्धा स्वप्नाचे दोन भेद आहेत.[2]

स्वप्नानां द्वैतमस्त्यन्यद्दोषदैवसमुद्भवम् । दोषप्रकोपजा मिथ्या तथ्याः स्युर्दैवसम्भवा ॥

(दैवामुळे-कर्मांच्या उदयामुळे पडणारे स्वप्न आणि दोषामुळे पडणारे स्वप्न असे आणखी दुसरे दोन प्रकार स्वप्नाचे आहेत. दैवाने उत्पन्न होणारे स्वप्न सत्य आणि दोषामुळे पडणारे स्वप्न असत्य ठरतात.)

लक्षण आणि निमित्त तसेच फळ– स्वस्थ अवस्थे (चित्तवृत्ति) मध्ये पडणारे स्वप्न सत्य आणि अस्वस्थ अवस्थेमध्ये पडणारे स्वप्न असत्य ठरतात.[3] वातपित्तादि प्रकोपाने रहित माणूस सूर्य, चंद्र इ. पाहतो हे शुभ स्वप्न आणि गाढव उंट इ. वर चढणे व प्रदेश गमन इ. पाहतो ते स्वप्न अशुभ आहे. याचे फलरूप सुख-दुःखादिक दाखविणे स्वनिमित्त आहे. स्वप्नामध्ये हत्ती इ. चे दर्शन 'चिन्ह स्वप्न' आहे आणि पूर्वापर संबंध असणारे 'माला-स्वप्न' म्हणविले जातात.[4]

---

१. जैन सिद्धांत भास्कर–भाग ११, किरण–१. २. महापुराण–४१।६१. ३. महापुराण–४१।६०.
४. जैनेंद्रशब्द कोश (स्वप्न–पृष्ठ–५०५).




स्वप्नात जे पदार्थ दिसतात, ज्याचे ज्ञान होते ते जागृत अवस्थेत अनुभूत असतात. त्यामुळे स्वप्नाचे ज्ञान निर्विषय होऊ शकत नाही. जिनभद्रगणि म्हणतात, 'अनुभव घेतलेले, पाहिलेले, ऐकलेले पदार्थ, वात, पित्त आदि प्रकृतीचे विकार, दैविक आणि जलप्रधान प्रदेश स्वप्नाला कारण होतात.' सुख निद्रा आल्यास पुण्यरूप आणि सुख निद्रा न आल्यास पापरूप स्वप्ने दिसतात.

जैन शास्त्राप्रमाणे स्वप्नाविषयी थोडक्यात स्वरूप वर्णन केले. आता आपण ज्योतिष, आयुर्वेद याकडे थोडे वळू.

ज्योतिषशास्त्राप्रमाणे स्वप्न– निमित्तशास्त्र हा एक ज्योतिषशास्त्रात महत्त्वाचा भाग आहे. जैनांचे निमित्तशास्त्र वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यामध्ये उन्नति, अवनति, इष्ट, अनिष्ट इ. चे वर्णन आहे. भद्रबाहू निमित्तशास्त्र या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. प्राधान्ये करून खालीलप्रमाणे सात प्रकार आहेत. दृष्ट, श्रुत, अनुभूत, प्रार्थित, कल्पित, भाविक व दोषज. या प्रकारांचे थोडक्यात वर्णन असे– जागृत अवस्थेतील दृश्ये स्वप्नात पाहाणे दृष्ट, झोपण्याअगोदर जे पाहिले ऐकिले ते स्वप्नात पाहाणे श्रुत, जागृत अवस्थेत अनुभव घेतलेले स्वप्नात पाहाणे अनुभूत, जागृतावस्थेत प्रार्थिले इच्छिले ते स्वप्नात पाहाणे प्रार्थित, जागृत अवस्थेत कल्पिले ते स्वप्नात पाहाणे कल्पित, जे कधी पाहिले नाही ऐकिले नाही पण भविष्यकाळी होणारे आहे ते स्वप्नात पाहाणे भाविक आणि वात पित्त कफादिक दोषामुळे जे स्वप्न पडते ते दोषज.

वरीलप्रमाणे थोडक्यात वर्णन असले तरी विस्ताराने वर्णन भद्रबाहू निमित्तशास्त्र, मुहूर्तगणपति या वरून पाहावे.

शुभ व अशुभ स्वप्ने सर्वसाधारणपणे खालीलप्रमाणे आहेत–

रात्रीच्या पहिल्या प्रहरी पाहिलेले स्वप्न एका वर्षात, दुसऱ्या प्रहरी पाहिलेले आठ महिन्यात, तिसऱ्या प्रहरी पाहिलेले तिसऱ्या महिन्यात, चवथ्या प्रहरी पाहिलेले एका महिन्यात, ब्राह्म मुहूर्तावर पाहिलेले दहा दिवसात आणि सूर्योदयापूर्वी (अगदि अल्प काळ) पाहिलेले स्वप्न अति शीघ्र फलद्रुप होतात.

शुभ स्वप्ने– किंचित् काळा रंग पाहाणे, धूमयुक्त अग्नी, अन्न पाहाणे, अलंकार पहाणे, अस्त्र पाहाणे, आकाश पाहाणे, गाय, हत्ती, मन्दिर इ. वर चढणे, कलश पाहाणे, कुमारी कन्या पाहाणे, गाईचे दूध काढताना पाहाणे, घोडा पाहाणे, दही पाहाणे, दिवा जळत असतांना पाहाणे, इष्ट देव गुरु शास्त्र दर्शन, फळ पाहाणे, श्वेत (पांढरी) फुले घेणे, कुणाचा तरी मृत्यु पाहाणे, युद्धात विजय होणे, शरीरातून रक्त येणे इ. स्वप्ने शुभ आहेत.[1]

अशुभ स्वप्ने– अग्नीने मृत्यु, अन्न काळे झालेले पाहाणे, अलंकार घालणे, पुष्पमाला घालणे, अंधाऱ्या जागी जाणे, कापूस पाहाणे, भांडण पाहाणे, घाण विहीरीत पडणे, हजामत पाहाणे, नृत्य करणे, काळी फुले पाहाणे, काटेरी वेल पाहाणे, लोखंड पाहाणे इ. अशुभ स्वप्ने आहेत.

आयुर्वेदाप्रमाणे स्वप्न– वाग्भट शारीरस्थान (अ. ६ वा) असे म्हटले आहे की,

मनोवहानां पूर्णत्वाद्दोषैरतिबलैस्त्रिभिः । स्त्रोतसां दारुणान्स्वप्नान्काले पश्यत्यदारुणान् ॥

( मनोवाहिनी नसांची छिद्रे ज्यावेळी अतिशय बलवान तिन्ही (वात-पित्त-कफ) दोषांनी परिपूर्ण होतात त्यावेळी प्राण्यांना शुभ आणि अशुभ स्वप्ने पडतात. ) अर्धवट जागृत आणि अर्धवट निद्रित अवस्थेत इंद्रियांचा अधिपति मनाकडून सफल-निष्फल स्वप्ने पडतात. चरक आणि सुश्रुत याचे मताप्रमाणे सारांश रूपाने खालील शुभ अशुभ स्वप्ने देत आहोत.

---

१ जैन सिद्धांत भास्कर–किरण १, भाग ११ पृष्ठ ६१

रोग दर्शविणाऱ्या स्वप्नांची माहिती–

| अ. नं. | स्वप्नातील दृश्य | होणारा रोग |
|---|---|---|
| १) | उंट, कुत्रा, गाढव यावर बसून दक्षिण यात्रा | राजयक्ष्मा |
| २) | लाल वस्त्रासारखे आकाश पहाणे | रक्तपित्त |
| ३) | शूलरोग आणि अशक्तपणा व नखाचा रंगविकृत | गुल्म |
| ४) | शरीरावर घाव, तूप लावणे, अग्निहवन, हृदय कमलप्रकट | कुष्टरोग |
| ५) | चांडाल, चर्मकारासोबत तूप, तेल इ. पदार्थ सेवन | मधुमेह |
| ६) | अनेकासोबत नृत्यकी पाण्यात यथेच्छ विहार | उन्माद |
| ७) | कुत्र्याशी प्रेम करणे | ज्वर |
| ८) | राक्षसाशी प्रीति करणे | अपस्मार |
| ९) | माकडाशी प्रीति करणे | गुप्तरोग |
| १०) | रस्ता-मार्ग चालत असतांना बघणे | श्वास |
| ११) | हळद मिश्रीत पदार्थ सेवन करणे | पांडुरोग |

वाग्भटाच्या मते वातयुक्त प्रकृतीच्या माणसास स्वप्नामध्ये आकाश भ्रमण, काळ्या रंगाचे वस्त्रपरिधान आणि प्रचंड वारे दिसतात. पित्त प्रकृतीच्या माणसास रत्नमाला, सूर्य, अग्नि व वीज इ. प्रकाशमान पदार्थ दिसतात. कफप्रकृतीच्या पुरुषास चंद्र, नक्षत्र, श्वेतपुष्प आणि नदी इ. दिसतात. प्रकृतीप्रमाणे स्वप्न पाहाणे निष्फळ ठरते.

श्री. उग्रादित्याचार्यकृत (शास्त्र संग्रहाधिकार) कल्याणकारक ग्रंथाप्रमाणे

स्वप्न– जर रोगी स्वप्नामध्ये व्याकुळ होऊन आपणास तीव्र कंटक वृक्षावर चढताना पाहील, भयंकर गुहेमध्ये प्रवेश करील, पर्वतावरून पडेल, डोके, गळा, हृदय यामध्ये त्याच प्रकारे उंच ताडादि वृक्षांची उत्पत्ति अनुभवील तर ही सर्व चिन्हे मरणाची आहेत.[१]

विशिष्ट रोग विशिष्ट स्वप्ने– रक्तपित्त झालेल्या माणसास लाल, पांडुरोग असणारास पिवळे, कफ व वातरोग असणारास अनुक्रमे पांढरे व लाल पदार्थ स्वप्नात दिसतील तर तो अवश्य मरतो.

क्षयरोग पीडित मनुष्य स्वप्नात वानराशी मैत्री करील तर रोगी मरतो.[२]

दुष्ट स्वप्ने– असदृश व राक्षसासारखी दुष्ट स्वप्ने जर निरोगी मनुष्य पाहील तर तावडतोब अनेक रोगांनी ग्रस्त होतो. कदाचित मृत्युसुद्धा ओढवतो.[३]

शुभ स्वप्ने– जो रोगी स्वप्नात पंच परमेष्ठी, गुरु, राजा, जैनशास्त्रात वर्णिलेली १६ स्वप्ने, जिनमंदीर, मित्र बांधव इ. पाहील, स्वतःस नदी समुद्र पार करतांना पाहील, उंच पर्वत, सुंदर घोडा, हत्ती यावर स्वार होईल (स्वप्नात) तर हे सर्व शुभ आहे.

स्वप्नाविषयी निरनिराळी मते– स्वप्नाविषयी पौर्वात्य व पाश्चिमात्य विचारवंतांचे विचार खाली देत आहोत. दोन्हीमध्ये फरक असा की, पौर्वात्य आत्म्याची अमरता मूळ मानतात तर पाश्चिमात्य भौतिकता. दुसरी विचारप्रणाली पूर्णतेपर्यंत पोहोचू शकत नाही.

१) ॲरिस्टॉटल– जागृत अवस्थेतील सर्वच घटनाकडे मनुष्य लक्ष देऊ शकत नाही. ज्या घटना लक्षात नाहीत त्या घटना स्वप्नात दिसतात.

---

१ कल्याणकारक–शास्त्र संग्रहाधिकार–श्लोक ३२.   २. कल्याणकारक–शास्त्र संग्रहाधिकार–श्लोक ३५.
३. कल्याणकारक शास्त्र संग्रहाधिकार–श्लोक ३६।३७.

२) हेनरी बर्गसन– स्वप्नाचा मानसिक जग आणि बाह्य जग यांचा संबंध असतो. त्यामुळेच भविष्यकालीन घटनांची सूचना मिळते. (पहा. Dreams by Henri Bergsan.)

३) डॉ. सी. जे. व्हिटवे– उष्णता कमी असल्यामुळे हृदयाच्या ज्या क्रिया जागृत अवस्थेत सुप्त असतात, त्याच स्वप्नावस्थेत जागृत होतात.

४) पॅथागोरियन सिद्धांत– शरीर म्हणजे आत्म्याची कबर. निद्रेमध्ये आत्मा शरीरापासून भिन्न होतो आणि खरे जीवन जगतो. तसेच अनंत जीवनाच्या घटना समोर आणतो.[1]

५) सॉक्रेटिस– जागृत अवस्थेत आत्मा बद्ध आहे पण तोच निद्रेमध्ये स्वतंत्र आहे. जो कलुषित आहे त्याला स्वप्नेही घाण पडतात. पवित्रात्म्यांना पडलेली स्वप्ने अंतर्जगत व बाह्यजगताशी संबंधित असतात. याद्वारे भावी जीवनाची सूचना मिळते.[2]

६) बिबलोनियन– स्वप्नात देवी देवता येतात शिवाय त्यांच्याकडून भावी जीवनाच्या सूचना मिळतात.

सारांशरूपाने विचारवंतांची मते दिली आहेत. आता मनोवैज्ञानिकाची कांही महत्वाची संशोधनपर मते पाहू.[3]

विश्वविख्यात फ्राइड याने संशोधन (मनोवैज्ञानिक पृष्ठ भूमि)– स्वप्न आपणास विकृत व निरर्थक वाटतात ती तशी नसतात. प्रत्येक स्वप्न आमच्या आशा-आकांक्षेचे रूपक असते. ज्या इच्छांची पूर्तता मनुष्य वास्तविक-प्रत्यक्ष-जगात करू शकत नाही त्या इच्छा स्वप्नात तो पूर्ण करतो.

जेम्स एलेन[4]– मानवाच्या अंतस्तल पटलावर ज्या सद् किंवा असद् इच्छा वर्तमान असतात त्या स्वप्नात येतात. कल्पनांच्या जगाचेच दुसरे नांव स्वप्न आहे.

जी. एच्. मिलर– Dreams Scientific पुस्तकात ते म्हणतात, " सुपुप्तावस्थेमध्ये बुद्धीचा अंतरंग जगाशी असतो त्यामुळे मनुष्यात आध्यात्मिक प्रवृत्ति जास्त असते. त्यामुळे माणसाचा संबंध बाह्य जगाशी न रहाता अंतरंग जगाशी असतो, परिणामतः स्वप्नातून भावी जीवनाच्या घटनांची सूचना मिळते. स्वप्नामुळे मानवी जीवनास पूर्णता येते. म्हणून स्वप्नाना भविष्याची सूचना देणारे मानावे लागते.

वरीलप्रमाणे थोडक्यात वर्णन केले आहे. विस्ताररुचि जिज्ञासूनी संदर्भीय ग्रंथांचे अवलोकन करावे.

जैन शास्त्रातील कांही संदर्भ– जैन पुराण साहित्यातून चक्रवर्ती बलदेव, तीर्थंकर माता इ. अनेकांना भविष्य सूचक स्वप्ने पडल्याची उदाहरणे आहेत. पैकी कांही खालीलप्रमाणे आहेत.

१) श्रीकृष्ण गर्भात येण्यापूर्वी देवकीला पडलेली स्वप्ने–

| अ. न. | स्वप्न | फळ |
|---|---|---|
| १) | सूर्य | मुलगा प्रतापयुक्त होईल |
| २) | चंद्र | सर्वांचा प्रिय होईल |
| ३) | लक्ष्मीचा अभिषेक | राज्याभिषेक होईल |
| ४) | आकाशातून येणारे विमान | स्वर्गातून येईल |
| ५) | देदिप्यमान अग्नि | अति कान्तियुक्त |
| ६) | रत्नराशिकिरणयुक्त ध्वजा | स्थिर प्रकृति होईल |
| ७) | मुखात प्रवेश करणारा सूर्य | निर्भय होईल |

1. The Dream problem, Vol. 2 Part 1 P. 309. 2. The interpretation of dreams (6) Delusion & dream. ३) जैनसिद्धांत भास्कर–भाग ११ किरण १ पृष्ठ ५५ ते ५८. 4. Asyns thinkett P. 18, P. H. Sayce P. 33.

२) तीर्थंकर मातेला पडलेली सोळा स्वप्ने—

| | | |
|---|---|---|
| १) | उत्तम हत्ती (श्वेत) | उत्तम पुत्र होईल |
| २) | बैल | सर्व लोकात श्रेष्ठ |
| ३) | सिंह | अनंत बलयुत |
| ४) | मालायुग्म | समीचीन धर्म प्रवर्तक |
| ५) | लक्ष्मी | देवाकडून अभिषेक होईल |
| ६) | पूर्ण चंद्रमा | लोकांना आनंद देणारा होईल |
| ७) | सूर्य | दैदिप्यमान प्रभा धारक होईल |
| ८) | कलश युग्म | अनेक निधि मिळवील |
| ९) | मत्स्य युग्म | सुखी होईल |
| १०) | सरोवर | अनेक लक्षणांनी शोभित |
| ११) | समुद्र | केवली होईल |
| १२) | सिंहासन | जगद्गुरू होईल |
| १३) | देवाचे विमान | स्वर्गाहून येईल |
| १४) | नागेन्द्र भवन | अवधिज्ञान युक्त |
| १५) | रत्नराशि | सकल गुण मंडित |
| १६) | निर्धूम अग्नि | कर्मनाश करणारा होईल |

याशिवाय चक्रवर्ती भरताच्या मातेला पडलेली ६ स्वप्ने, भरत चक्रवर्तीला पडलेली सोळा स्वप्ने, श्रेयांस राजाला पडलेले स्वप्न (ज्यावरून आहार दान विधिचे ज्ञान झाले).

सारांश पौर्वात्य आणि पाश्चिमात्य विद्वानानी स्वप्नाविषयी अनेक सिद्धांत मांडले आहेत. पौर्वात्य फल सांगतात, ते प्रतीक कल्पनेने पण पाश्चिमात्य त्याशिवाय इच्छा (सुप्त) जमेस धरून स्वप्न फल सांगतात. पौर्वात्य स्वप्नासाठी पूर्व जन्म सस्कार देखील कारण मानतात तर, पाश्चिमात्य शरीराला यत्र मानून स्वप्नाला कारण भौतिक क्रिया मानतात. स्वप्न, स्वप्न फल यावरून पौर्वात्य आणि पाश्चिमात्य यांच्यामध्ये खूपच भिन्नता आहे. पण त्या सर्वांचा विस्तारभयास्तव इथे उल्लेख करता येणार नाही.

जिज्ञासुना आणि संशोधकांना 'स्वप्न' हा एक मनोरजक विषय आहे हे मात्र खरे.

# जीव व शरीर शास्त्र— जैनांचे मानव वैज्ञानिक विवेचन

### जैनांचे मानव वैज्ञानिक विवेचन—

मानव विज्ञान आयु, लिंग, भौगोलिक अवस्था इ चे अध्ययन करण्याचे साधन आहे. असे जरी असले तरी सर्व दृष्टीनी विचार झालाच आहे असे मात्र म्हणता येत नाही. अजून बऱ्याच गोष्टी पूर्णांशाने वैज्ञानिकांना कळावयाच्या आहेत, असे जैनशास्त्राकडे पाहिल्यानंतर वाटते.

अकरा अंग, १४ पूर्व ज्ञानाचा महासागरच म्हणावा लागेल. १४ पूर्वामध्ये अस्ति नास्ति प्रवादपूर्व आहे. त्यामध्ये १८ वस्तुगत ३६० प्राभृतातून ६०,००,००० (साठ लाख) पदाद्वारे जीव आणि अजीवाचे अस्तित्व आणि नास्तित्व या दृष्टीने विवेचन आहे. इतरही अंगातून विवेचन आहेच. हे जरी खरे आहे तरी आज या महासागरातील एक बिंदूच शिल्लक आहे असे सध्या उपलब्ध असलेल्या शास्त्राकडे पाहून म्हणावे लागते.

प्रस्तुत लघुकाय लेखात जीव द्रव्याचे प्रामुख्याने मानव वैज्ञानिक विवेचन थोडक्यात करावयाचे आहे.[1]

शोध म्हणजे मार्गणा – ज्या ज्या गुणधर्म विशेषांनी जीव द्रव्याचा शोध घेतला जातो त्यास मार्गणा म्हणतात. उहापोह, संशोधन, शोध, मिमांसा हे एकार्थवाची शब्द आहेत. अशा मार्गणा १४ ( चवदा ) आहेत. सत्संख्या आदि अनुयोगद्वारांनी १४ जीवसमास ज्यामध्ये किंवा ज्याद्वारे शोधिले जातात त्यासही मार्गणा म्हणतात. त्या अशा १) गति २) इंद्रिय ३) काय ४) योग ५) वेद ६) कषाय ७) ज्ञान ८) संयम ९) दर्शन १०) लेश्या ११) भव्यत्व १२) सम्यक्त्व १३) संज्ञित्व व १४) आहार यांच्या थोडक्यात व्याख्या अशा-

१ – जी प्राप्त केली जाते त्यास गति म्हणतात.

२ – जे प्रत्यक्षात हालचाल करतात त्यास इंद्रिय म्हणतात.

३ – जे संचित केले जाते त्यास काय म्हणतात.

४ – आत्म्याच्या परिस्पंदरूप निमित्ताने कर्मांचे ग्रहण करण्यास कारणभूत वीर्य उत्पत्तीला योग म्हणतात.

५ – जो अनुभविला जातो त्यास वेद म्हणतात.

६ – सुख, दुःखरूपी नाना प्रकारच्या धान्यास उत्पन्न करणाऱ्या कर्मरुपी क्षेत्राचे जे कर्षण करतात अर्थात फल उत्पन्न करण्यायोग्य करतात त्यास कषाय म्हणतात.

७ – ज्या द्वारे जाणले, पाहिले जाते त्यास ज्ञान म्हणतात.

८ – मन व इंद्रियांचा वृत्ति निरोध म्हणजे संयम.

९ – ज्यामुळे सामान्य अवबोध होतो ते दर्शन.

१० – कषायांनी अनुरंजित योगांची प्रवृत्ति व शरीराचा रंग म्हणजे लेश्या

११ – ज्या शक्तीच्या निमित्ताने दर्शन, ज्ञान आणि चारित्र गुण प्रगट होतात त्यास भव्यत्व म्हणतात.

१२ – तत्वार्थ श्रद्धान म्हणजे सम्यक्त्व.

१३ जे जीव मनाच्या अवलम्बनाने शिक्षा क्रिया उपदेश आणि आलाप ग्रहण करतात त्यांना संज्ञी म्हणतात.

१४ – औदारिक आदि शरीर आणि पर्याप्ति ग्रहण करणे म्हणजे आहार.

वरील १४ मार्गणाद्वारा सविस्तर वर्णन धवलादि ग्रंथामध्ये आहे. पैकी कांहींचे थोडक्यात वर्णन या लेखात करावयाचे आहे.

**जन्म पूर्व गति –** जीव एक शरीर सोडून दुसरे शरीर धारण करतो त्यावेळी पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, ऊर्ध्व आणि अध. अशा सहाच दिशांनी गमन करतो. विदिशांनी ( तिरपे ) गमन करीत नाही. यास अनुश्रेणी गति म्हणतात दुसरे शरीर धारण करीपर्यंत जीवास जास्तीत जास्त तीन मोडे व चार समय लागतात. अधिक मोडे किंवा समय लागण्याचे कारणच नाही संपूर्ण लोकात कोठूनही आणि कुठेही जन्म घेण्यास तीन मोडे आणि चार समय पुरे होतात. गणिताद्वारे मुद्दा हे सिद्ध होते.

वैज्ञानिकाच्या पुढे मरणानंतर हा जीव कोठे, कसा जातो हे एक कोडे आहे. त्या दृष्टीने जैनांनी वर्णन केलेली 'अनुश्रेणि गति' व 'मोडे' या दोन्ही गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत.

**जीव पूर्ण कधी होतो–** ज्याप्रमाणे घर, घट, वस्त्रादिक अचेतन द्रव्य पूर्ण आणि असे अपूर्ण दोन प्रकारचे असतात, त्याप्रमाणे जीवसुद्धा पूर्ण आणि अपूर्ण अशा दोन प्रकारचे आहेत. पूर्ण जीवांना पर्याप्त आणि अपूर्ण जीवांना अपर्याप्त म्हणतात. ज्यामुळे जीव पूर्ण होतात त्यांना पर्याप्ति म्हणतात म्हणजे आहार, शरीर इंद्रिय इ. प्रवृत्तीमध्ये परिणमन करण्याच्या ज्या शक्ति आहेत त्या शक्तींना कारण जे पुद्गल स्कंधाच्या निष्पत्तिला पर्याप्ति

१ या लेखातील व्याख्या वर्णन इ. धवलग्रंथ, गोम्मटसार, राजवर्तिक, जैनेन्द्र सिद्धांत कोश आदि ग्रंथातून सारांश रूपाने घेतल्या आहेत.




म्हणतात.' अशा या पर्याप्ति सहा आहेत– १) आहार २) शरीर ३) इंद्रिय ४) श्वासोच्छ्वास ५) भाषा आणि ६) मन.

**सहा पर्याप्तींची ओळख –** शरीर नामकर्माच्या उदयाने जे परस्पर अनंत परमाणूंच्या संबंधाने उत्पन्न झाले आहेत आणि जे आत्म्याने व्याप्त केलेल्या आकाश प्रदेशात स्थिर आहेत असे पुद्गलविपाकी आहार वर्गणा-संबंधी पुद्गलस्कंध, कर्मस्कंधाच्या निमित्ताने कथंचित् मूर्तपणा धारण करतात. ते आत्म्याशी समवाय रूपाने राहतात. ते स्कंध खल ( घट्ट ) व रस ( पातळ ) रूप होऊ शकतात. अशा शक्तीला धारण करणाऱ्या पुद्गल स्कंधाच्या प्राप्तीला आहार पर्याप्ति म्हणतात.

आहार पर्याप्ति प्राप्त झाल्यानंतर 'तिल खलोपम' खल भागास हाड इ. कठिण भागरूप आणि रस भागास रस रुधिर वीर्यादि द्रव ( पातळ ) अवयवरूप परिणमन करणाऱ्या औदारिकादि ३ ( तीन ) शरीरांच्या शक्तीनी युक्त पुद्गल स्कंधाच्या प्राप्तीला शरीर पर्याप्ति म्हणतात. पदार्थांना ग्रहण करणे रूप शक्तीच्या उत्पत्तीला निमित्तभूत पुद्गल स्कंधाच्या प्राप्तीला इंद्रीय पर्याप्ति म्हणतात.

उच्छ्वास आणि नि:श्वासरूप शक्तीच्या पूर्णतेला निमित्तभूत पुद्गल प्रचयाच्या प्राप्तीला श्वासोच्छ्वास पर्याप्ति म्हणतात. भाषा वर्गणेच्या स्कंधाच्या निमित्ताने भाषारूप परिणमन करण्याच्या शक्तीला निमित्तभूत नोकर्म पुद्गल प्रचय प्राप्तीला भाषा पर्याप्ति म्हणतात आणि अनुभूत अर्थाच्या स्मरणरूप शक्तीच्या निमित्तभूत मनोवर्गणा स्कंधानी निष्पन्न पुद्गल प्रचयाच्या प्राप्तीला मन.पर्याप्ति म्हणतात.

वरीलप्रमाणे थोडक्यात स्वरूप आहे. विस्ताररुचि वाचकांनी धवलग्रंथ, गोम्मटसार, सर्वार्थसिद्धि इ. ग्रंथ पहावेत.

**पर्याप्ति केव्हा प्रारंभ होतात, केव्हा पूर्ण होतात त्यांचा क्रम –** या सहाही पर्याप्ति एकाच वेळी सुरू होतात. कारण असे की, जन्म समयापासूनच त्याचे अस्तित्व असते. पण पूर्णता क्रमाने होते.

शरीर ग्रहण झाल्यानंतर एका समयापासून अंतर्मुहूर्तापर्यंत आहार पर्याप्ति पूर्ण होते. आहार पर्याप्तीनंतर एका एका अंतर्मुहूर्तात शरीर पर्याप्ति पूर्ण होते. त्यानंतर एका अंतर्मुहूर्तात इंद्रिय पर्याप्ति पूर्ण होते. इंद्रिय पर्याप्ति पूर्ण झाल्याबरोबर बाह्य पदार्थांचे ज्ञान मात्र नसते. त्यानंतर श्वासोच्छ्वास पार्याप्ति अंतर्मुहूर्तात पूर्ण होऊन नंतरच्या अंतर्मुहूर्तामध्ये मन:पर्याप्ति पूर्ण होते.

आहार पर्याप्तीपासून मन: पर्याप्ति पूर्ण होण्याचा क्रम लक्षात घेण्यासारखा आहे.

**गर्भात जीव कसा वाढतो ? –** भगवती आराधना ( गाथा १००६ ते १०१७ ) मध्ये याविषयी सविस्तर वर्णन आहे.

मातेच्या उदरात वीर्य प्रवेश झाल्यानंतर वीर्याचे कलल बनते, जे १० दिवसपर्यंत काळे असते. पुढे १० दिवसापर्यंत ते स्थिर रहाते. एक महिना पूर्ण होईपर्यंत गर्भ स्थिर होतो. दुसऱ्या महिन्यात बुडबुड्यासारखा तिसऱ्या महिन्यात घट्ट बनून चौथ्या महिन्यात मांस पेशीचे रूप धारण करतो. पाचव्या महिन्यात अंकुर निर्माण होतात. खालच्या अंकुराने दोन पाय व वरच्या अंकुराने दोन हात, मस्तक उत्पन्न होते. सहाव्या महिन्यात या पाच अंगांची आणि डोळे, कान इ. उपांगाची रचना होते. सातव्या महिन्यात त्या अवयवावर चर्म व रोम उत्पन्न होतात आणि आठव्या महिन्यात मातेच्या उदरात हलन चलन सुरू होते. नवव्या अथवा दहाव्या महिन्यात गर्भातून बाहेर येतो. आमाशय आणि पक्वाशय या दोन्हीच्या मध्ये मांसयुक्त तंतुनी वेष्ठिलेला असतो.

---

१. कार्तिकेयानुप्रेक्षा– गाथा १३४।१३५.

**गर्भात आहार कसा ?**– आई अन्न दाताने चावून खाते. कफाने मिश्रीत होऊन ओले झालेले अन्न पोटातील पित्ताच्या मिश्रणाने कडू होते. ते कडू अन्न थेंब थेंब गर्भस्थ बालकावर पडते. बालक ते सर्वांगाने ग्रहण करते. सातव्या महिन्यात कमलाच्या देठासारखी नाळ निर्माण झाल्यावर त्यातून अन्न ग्रहण होते. त्या आहाराने बालक पुष्ट होत राहते.[१]

वैज्ञानिकांनी जन्माचे मूळ झायगॉटमध्ये मानले आहे. स्त्री बीज व पुं बीज यांच्या मिश्रणाचे जे तयार होते त्यास झायगॉट म्हणतात. मग कलल ( पहिल्या दहा दिवसात गर्भामध्ये सतत फिरणारा पदार्थ ) म्हणजे झायगॉट का ? असा प्रश्न उपस्थित होतो. पण हा एक तर्क आहे. कदाचित् तसे असूही शकेल. संशोधनावर अवलंबून आहे.

**इंद्रियांचा आकार**– ज्याप्रमाणे अहमिंद्र देव 'मी इंद्र आहे' 'मी इंद्र आहे' असे मानतात आणि ऐश्वर्याचा स्वतंत्रपणे उपभोग घेतात त्याचप्रमाणे इंद्रियांना जाणावे. अर्थात् इंद्रिये आपआपल्या विषयाचे ग्रहण करण्यास स्वतंत्र आहेत.[२] इंद्रिय म्हणजे आत्मा. त्या जाणण्यासाठी जे निमित्त होते ते इंद्रिय. सूक्ष्म आत्म्याचे ज्ञान करविण्यास जे कारण आहे ते इंद्रिय. ज्यामुळे रचना केली गेली आहे ते इंद्रिय.

त्यांच्या आकाराविषयी खालीलप्रमाणे उदाहरणे आहेत–

श्रोत्र इंद्रियाचा आकार यव ( जव ) जाळीसारखा, चक्षु इंद्रियाचा आकार मसूरीसारखा, रसना इंद्रियाचा आकार अर्धचंद्राकार, घ्राणेंद्रियाचा आकार कदम्बाच्या फुलासारखा आणि स्पर्शनेंद्रियाचा आकार अनेक प्रकारचा आहे. स्पर्शनेंद्रियाशिवाय इतर इंद्रियाचे प्रमाण घनांगुलाच्या असंख्यातव्या भागाइतके आहे. ( बाह्यनिवृत्ती ) मात्र स्पर्शनेंद्रिय घनांगुलाचा असंख्यातवा भाग ( सूक्ष्म निगोदिया जीव इ. ) व संख्यात घनांगुल प्रमाण ( महामत्स्य इ. ) आहे.

**इंद्रियांचे प्रदेश**– चक्षु इंद्रियाचे अवगाहनारूप प्रदेश सर्वात कमी आहेत. त्याहून संख्यातपट अधिक श्रोत्र इंद्रियाचे, त्याहून अधिक घ्राणेंद्रियाचे आहेत. घ्राणेंद्रियाहून असंख्यातपट अधिक जिव्हेंद्रियाचे आणि त्याहून संख्यातपट स्पर्शनेंद्रियाचे प्रदेश आहेत.

याचाच अर्थ असा की, आकाराने सर्वात लहान डोळे आहेत कान, नाक आणि जीभ त्याहून क्रमाने मोठ्या आकाराची असून स्पर्शनेंद्रियाचा आकार सर्वात मोठा आहे.

**कोणता इंद्रिय किती कार्यक्षम आहे ? क्षेत्रापेक्षेने उत्कृष्ट विषय मर्यादा**–

स्पर्शन, रसना, घ्राण, चक्षु आणि श्रोत्र यांचे अनुक्रमे स्पर्श, रस, गंध, वर्ण व शब्द हे विषय आहेत. हे पाच इंद्रिये मूर्तिक पदार्थांना जाणणारी आहेत.

एकेंद्रिय जीवाना स्पर्शन हे एकच इंद्रिय असते. द्वीन्द्रिय जीवाना स्पर्शन रसना, त्रीन्द्रिय जीवाना स्पर्शन रसना व घ्राण, चतुरिंद्रिय जीवाना त्याशिवाय चक्षु, असंज्ञी पंचेद्रियाना मनाशिवाय सर्व इंद्रिये व संज्ञी पंचेन्द्रिय जीवाना मनासहित सर्व इंद्रिये असतात.

एकेंद्रियापासून स पचेन्द्रियापर्यंत कोण्या इंद्रियाची उत्कृष्ट क्षमता ( क्षेत्र ) किती आहे हे खाली दर्शविले आहे.

---

१ भगवती आराधना– गाथा १०१३ ते १०१७ वरून २ व्याख्या आणि साराश धवल, गोम्मटसार, राजवार्तिक इ. ग्रंथातून घेतला आहे क्लिष्टता येऊ नये व विस्तारमय यामुळे गाथा दिल्या नाहीत.




| इंद्रिय जीव कोणते | स्पर्शन | रसना | घ्राण | चक्षु | श्रोत्र | मन |
|---|---|---|---|---|---|---|
| एकेंद्रिय | ४०० ध. | — | — | — | — | — |
| द्वीद्रिय | ८०० ध. | ६४ ध. | — | — | — | — |
| त्रीद्रिय | १६०० ध. | १२८ ध. | १०० ध. | — | — | — |
| चतुरिंद्रिय | ३२०० ध. | २५६ ध. | २०० ध. | २९५४ यो. | — | — |
| असंज्ञी पंचेंद्रिय | ६४०० ध. | ५१२ ध. | ४०० ध. | ५९०८ यो. | ८२०० यो. | — |
| संज्ञी पंचेंद्रिय | ९ योजना | ९ योजना | ९ योजना | ४७२६२ ७/२० | १२ योजन | सर्व लोकवर्ती |

ध = धनुष्य, यो = योजन, सर्व लोकवर्ती म्हणून संपूर्ण लोकातील दृष्ट अनुभूत विषय–

वरील आकृतीवरून हे लक्षात येईल की माणसाची स्पर्श, रस आणि गंध ग्रहण करण्याची कमाल मर्यादा ९ योजन आहे मनुष्य जास्तीत जास्त (बाह्य साधनांचा आधार न घेता) ४७२६२ ७/२० योजन लांबचे पाहू शकतो, १२ योजनापर्यंतचे ऐकू शकतो.

याशिवाय अजून एक गोष्ट लक्षात येते की, मन असणाऱ्या जीवाना सर्व इंद्रिये असतात. चक्षु इंद्रिय असणारे चक्षुरिंद्रिय असतात. त्रीद्रिय जीवाना स्पर्शन, रसना व घ्राण ही इंद्रिये असतात.

**शरीरात काय किती आहे ?**– मनुष्याच्या शरीरात ३०० हाडे, ३०० संधि (सांधे), ९०० स्नायु, ७०० शिरा, ५०० मांस पेशी, **४ जाळे**[१] **(?) १६ कंडरा (?)**, ६ शिरांचे मूळ, २ मांस रज्जू आहेत. ७ त्वचा असून ७ कालेयक आहेत. ८०,०००,०० कोटी रोम (दहा लाख कोटी) आहेत. पक्वाशय आणि आमाशयात १६ आंतडे आहेत, दुर्गंधयुक्त मलाचे ७ आशय (साठे) आहेत. ३ स्थूणा (?), १०७ मर्मस्थान, ९ व्रणमुख आहेत.

**शरीरात कोणती धातु किती आहे ?**– मेंदू, मेद, ओज, शुक्र या चारी धातु एक एक अंजुलि प्रमाण आहे वसा (मांसातील स्निग्धपणा) ३ अंजुलि, पित्त आणि श्लेष्म (कफ) ६-६ अंजुलि प्रमाण आणि रक्त अर्ध आढक (?) मूत्र एक आढक म्हणजे आठ शेर, विष्ठा ६ प्रस्थ (?), नखे २० आणि ३२ दात आहेत [२] शरीराची आकृति– मनुष्यांच्या आकृत्यामध्ये फरक असतो. काही उंच, काही ठेंगणे, काही कमरेपासून वर जाड असे अनेक प्रकार संभवतात. अशा आकृत्यांचे ढोबळ मानाने सहा प्रकार केलेले आहेत. खरे म्हणजे गोल, त्रिकोण, चतुष्कोण आदि प्रगट अप्रगट अनेक प्रकार होतात. पण खालील प्रकार प्रामुख्याने आहेत. समचक्रासमानः समचतुरस्त्रसंस्थानः। कुशल शिल्पकार ज्याप्रमाणे समान रूपाने शरीराच्या अवयवांची रचना करतो त्याप्रमाणे वरचा, मध्य आणि अधोभाग समरूप असतो ते संस्थान. 'सम विभक्त अवयवा (शरीर) स समचतुरस्त्र इत्यर्थ सम' विभक्त म्हणतात. सारांश जे यथास्थित प्रमाणबद्ध शरीर असते असे शरीर.

वडाच्या झाडाखाली सारखी आकृति–न्यग्रोध परिमण्डल–जे शरीर खाली (बेंबीपासून खालचा भाग) सूक्ष्म व वर विशाल असते ते न्यग्रोध परिमडल संस्थान. न्यग्रोध म्हणजे वडाचे झाड. परिमडल म्हणजे शरीराच्या सर्व बाजूचे मंडल वल्मीक किंवा शाल्मलि वृक्षासारखे– स्वाति संस्थान– स्वाति म्हणजे वल्मीक अथवा शाल्मलि वृक्ष. त्यासारखा आकार असणारे शरीर. अर्थात् अशा शरीराचा आकार वर सूक्ष्म व खाली विशाल असतो.

---

१. ? असे चिन्ह केलेल्या शब्दाचा अर्थ व ते शरीरात कोठे व कसे आहे हे माहीत नाही. २. शरीरात काय किती आहे आणि शरीरात कोणती धातु किती आहे, याचे प्रमाण भगवती आराधना शिवाय इतर ग्रंथात सापडत नाही.




कुबडे शरीर– कुब्ज संस्थान– पाठीवर पुद्गलांचा अधिक ( बहु ) पिंड होणे अर्थात् कुबडेपणा म्हणजे कुब्ज संस्थान अशा प्रकारच्या शरीरात अवयवांची दीर्घता असते. मात्र मध्यभाग ऱ्हस्व असतो.

अंग उपांग लहान : वामन संस्थान– अशा प्रकारच्या शरीराचे सर्व अंग लहान लहान असतात मात्र शरीर दीर्घ असते.

**विषमाकार : हुंडक संस्थान–** वेडया वाकडया दगडानी पिशवी भरावी त्याप्रमाणे ज्या शरीराचे अवयव समानतारहित प्रमाणरहित असते असे शरीर हुंडक म्हणवले जाते.

वरीलप्रमाणे स्थूल मानाने सहा प्रकार मानले आहेत.

**शरीराची जडण-घडण : संहनन–** अस्थींचे बंधन विशेष असल्याशिवाय शरीराची जडण-घडण मजबूत असत नाही. त्या दृष्टीने सहा प्रकारचे संहनन आहे. हाडांचा जो संचय (समुदाय) त्यास संहनन म्हणतात. त्याला (हाडाला) जे वेष्टन असते त्यास ऋषभ म्हणतात.

सर्वात उत्तम संहनन वज्रऋषभनाराच या प्रकारात हाडांच्या संधि वज्राकार असतात. वज्रासारखे अभेद असल्यामुळे यास वज्रऋषभनाराच म्हणतात. थोडक्यात वज्रऋषभ आणि वज्रनाराच ज्या वज्र संहननात असते ते वज्रऋषभनाराच संहनन आहे. वज्र हा शब्द आद्य दीपक समजावा. नाराच म्हणजे नेमके काय आहे हे लेखकास माहीत नाही. बहुधा हाडामधील जो खीळ असते ते नाराच असावे.

दुसरा प्रकार वज्रनाराच सहनन. वज्र वृषभ (वेष्टन) रहित ते वज्रनाराच. या प्रकारात हाडे वज्राची जरी असली तरी वलय वज्राचे नसते.

तिसऱ्या प्रकारात हाडे, हाडांचे संधि, खिळी वज्राच्या नसतात.

चवथ्या प्रकारात एकीकडून नाराच युक्त व दुसरीकडून नाराच रहित अवस्था असते.

पाचव्या प्रकारात हाड आणि खीळ वज्र रहित असते.

सहाव्या प्रकारात हाडाचे परस्पर बंधन नसते पण बाहेरून मात्र शिरा, स्नायु, मांस यामुळे हाडे संघटित झाल्यासारखी असतात. म्हणजे सरीसृप अर्थात् सर्पाप्रमाणे हाडे परस्पर असंप्राप्त असतात आणि शिरादीकानी हाडे बद्ध असतात.

अशा प्रकारे– १) वज्रऋषभनाराच, २) वज्रनाराच, ३) नाराच, ४) अर्धनाराच, ५) कीलक, ६) असंप्राप्तासृपाटिका असे उत्तरोत्तर कमी प्रतीचे सहनन संभवते.

जैन मान्यतेप्रमाणे चतुर्थ काळापर्यंत वज्रऋषभनाराच वज्रनाराच, अर्धनाराच संहनन असते. सध्या शेवटचे दोन प्रकार संभवतात म्हणजे सध्या कीलक आणि असंप्राप्तासृपाटिका संहननधारी मनुष्य आहेत. याप्रमाणे शरीराची थोडक्यात जडण-घडण आहे.

शरीराचे प्रकार– आता आपण शरीराचा वेगळया दृष्टिकोणातून विचार करू. आतापर्यंत जैन मान्यते-प्रमाणे शरीराविषयी कांही अंशी विचार केला. जैनाचार्यांनी प्रत्येक विषयाविषयी सविस्तर ग्रंथ निर्मिती केली आहे. केवळ शरीरासंबंधानेच लिहावयाचे झाले तर गति आदि १४ मार्गणाद्वारे विचार मांडून एका विशालकाय ग्रंथाची रचना करावी लागेल. तसा हेतु इथे नाही. सोप्या सरळ भाषेत विचार मांडावयाचे आहेत. त्यामुळे लेखात संस्कृत, प्राकृत गाथा दिल्या नाहीत तर केवळ भावार्थ घेतला आहे.





म्हणतात. स्थूल शरीराचे मरण झाल्यावरसुद्धा हे असतेच. विग्रह गतीमध्ये केवळ हेच शरीर असते आणि त्यावेळी नोकर्म वर्गणांचे ग्रहण न झाल्यामुळे अनाहारक असते.

अशा प्रकारे सामान्य रूपाने एका वेगळ्या दृष्टीने शरीरासंबंधी सारांशरूप पाहिले. अधिक विस्तारपूर्ण माहिती हवी असल्यास सर्वार्थसिद्धि, गोम्मटसार, धवल, राजवार्तिक, श्लोकवार्तिक इ. ग्रंथ पहावे.

**जिवंतपणाचे बाह्य लक्षण : श्वासोच्छ्वास–** वर किंवा खाली जाणे ज्याचे स्वरूप आहे त्या वायूस श्वासोच्छ्वास म्हणतात. पंचेंद्रिय जीवाना जे शीत, उष्ण इ. उच्छ्वास, निःश्वास असतात ते श्रोत्र आणि स्पर्शनेंद्रिय प्रत्यक्ष असतात. सर्व जीवाना श्वासोच्छ्वास पर्याप्ति असते पण केवळ मनुष्यांचीच श्रोत्र आणि स्पर्शनेंद्रिय प्रत्यक्ष असते.

**नाडी आणि श्वासोच्छ्वास–** जिवंतपणाचे बाह्य लक्षण समजल्या गेलेली नाडी म्हणजे एक वायु आहे जो अडीच घडीपर्यंत एके ठिकाणी रहातो. नंतर दुसऱ्या ठिकाणी जातो. (अडीच घडी म्हणजे एक तास) म्हणजे दुसऱ्या नाडीत जातो. कांही कांही आचार्यांच्या मते चोवीस तासात १६ वेळा वायूचे संक्रमण एका नाडीतून दुसऱ्या नाडीत होते. श्वासोच्छ्वासावरून कालगणना केली जाते. श्वासोच्छ्वासासंबंधाने खालील कोष्टकावरून कालनिर्णय लक्षात येईल.

| | | | |
|---|---|---|---|
| १. ४ | संख्यात आवली | = $\frac{२८८०}{३७७३}$ सेकंद | = उच्छ्वास |
| २. ७ | उच्छ्वास | = ५ [illegible] सेकंद | = स्तोक |
| ३. ७ | स्तोक | = ३७ [illegible] सेकंद | = लव |
| ४. ३८ | लव | = २४ मिनिटे | = नाली (घडी) |
| ५. २ | घडी | = ४८ मिनिटे | = मुहूर्त |

५११० निमिष म्हणजे ३७७३ श्वासोच्छ्वास अर्थात् एक मुहूर्त असेही एक प्रमाण धवलादि ग्रंथातून आढळते. श्वासोच्छ्वासास आनपान देखील म्हणतात.

**नाना प्रकारचे विकल्पजाल : मन–** आतापर्यंत इंद्रिय व श्वासोच्छ्वास या संबंधी थोडक्यात स्वरूप पाहिले. खरे पाहू जाता जीवद्रव्याविषयी एवढी प्रचंड ग्रंथरचना आहे की, सविस्तर कल्पना येण्यासाठी अनेक ग्रंथ पहावे लागतील. विस्ताररुचि वाचकांनी ते अवश्य पहावेत.

मन एक अभ्यंतर इन्द्रिय आहे हृदयामध्ये आठ पाकळ्यांनी युक्त कमलाकारे पुद्गलांच्या रचना विशेषाला द्रव्यमन म्हणतात आणि संकल्प विकल्पात्मक परिणाम तथा विचार चिंतवन इ. रूप ज्ञानाची अवस्था विशेष म्हणजे भावमन. मनाची गति, विचारांचे त्वरित होणारे परिवर्तन यामुळे मनाला नाना विकल्पजाल म्हटले आहे. हे नेहमी चंचल आणि अस्थिर असते.

अनिंद्रिय का ?– चक्षु आदि इंद्रिये ज्याप्रमाणे आपल्या विषयात निमित्त असतात त्याप्रमाणे मन देखील आहे पण अप्रत्यक्ष आणि अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे मनाला अनिंद्रिय म्हणतात. ईषत् इन्द्रिय असे मनाला म्हटले जाते.

याशिवाय मनाला गुण आणि दोष यांचा विचार आणि स्मरण करण्यासाठी दुसऱ्या इंद्रियांचा आधार घ्यावा लागत नाही. तसेच चक्षु आदि इंद्रियासारखे दृश्यस्वरूपही नसते. सारांश, अंतर्गत करण असल्यामुळे अंतःकरण असेही म्हणतात.

जीव आणि कर्म जोडणारी लेश्या– शुभ, अशुभ, पुण्य, पाप इ. चे मापक म्हणून लेश्या अत्यंत महत्वाची आहे. तिचा थोडासा विचार आता करावयाचा आहे. भाव-लेश्या–भाव-भावना यावर अवलंबून असल्यामुळे फक्त द्रव्यलेश्येचाच आपण विचार करू.




**शरीराचा रंग : द्रव्य लेश्या–** काळा, गोरा इ. जो शरीराचा रंग त्यास द्रव्यलेश्या म्हणतात कषायानी अनुरंजित जीवाच्या मन, वचन, कायेची प्रवृत्ति ती भावलेश्या. तरतमता ( Resonance ) समजण्यासाठी द्रव्य व भावलेश्येचे कृष्ण, नील, कापोत, पीत, पद्म, शुक्ल असे सहा प्रकार मानले आहे भ्रमरासारखा काळा रंग कृष्ण, नीलमण्यासारखा निळा रंग नील, कापोतसारखा रंग कापोत, सुवर्णासारखा रंग पीत, पद्मकमलासारखा रंग पद्म आणि शंखासारखा रंग शुक्ललेश्या आहेत. भ्रमर आदि उदाहरणे उपमारूप आहेत. हीन-उत्कृष्ट ( गडद फिकट ) काळा रंग या दोन्हींच्यामध्ये शरीराच्या रंगाच्या अपेक्षेने संख्यात असंख्यात व अनंत भेद आहेत. सारांश, वर्ण नामकर्माच्या उदयाने प्राप्त झालेला जो शरीराचा रंग त्यास द्रव्यलेश्या म्हणतात.

रंगाविषयी अधिक कल्पना येण्यासाठी उदाहरणे वेगवेगळी दिली आहेत. गोम्मटसार आणि पंचसंग्रह यातील उदाहरणे पहा. फरक अधिक जरी नसला तरी तपशीलासाठी उपयोगी आहे.

| अनु. | लेश्या | गो. जीवकांड | पंचसंग्रह | फरक |
|---|---|---|---|---|
| १) | कृष्ण | भ्रमर सदृश | भ्रमर सदृश | स्थूलमानाने |
| २) | नील | नीलमणि सदृश | नीलमणि सदृश वा मयूरकंठ सदृश | फरक नाही |
| ३) | कापोत | कापोत सदृश | कबुतरासारखा | फरक नाही |
| ४) | पीत | सुवर्ण सदृश | तप्त सुवर्णासारखा | फरक नाही |
| ५) | पद्म | पद्मकमल सदृश | पद्म सदृश | फरक नाही |
| ६) | शुक्ल | शंख सदृश | कासकुसुम सदृश | फरक नाही |

पंचसंग्रहातील उदाहरणे धवल ग्रंथातील उदाहरणाशी तंतोतंत जुळतात. मनुष्यांचे विविध रंग जे आढळतात त्या दृष्टीने वरील उदाहरणे आणि विशेषतः विभागणी व पृथक्करण सूचक आहे. वर वर पहाता यात कांही विशेष असेल असे वाटत नाही पण सूक्ष्म रितीने विचार केल्यास हे पृथक्करण समजतो तितके साधे नाही हे पटेल. हा एक संशोधनाचा विषय समजला तरी हरकत नाही.

येथपर्यंत सारांश व ढोबळमानाने विचार केला. जीव व प्राणिशास्त्र या निबंधामध्ये अधिक विस्तार येईलच. कारण जैनाचार्यांनी जन्म, जाति, कुल, योनि व प्राण यादृष्टीने अत्यंत सूक्ष्म रीतीने विवेचन केले आहे.

**नवीन शोध व जैनाचार्य : एक मनोरंजक अभ्यास–** विज्ञान युगाने अनेक शोध लागले आहेत, लागत आहेत आणि लागणार देखील आहेत. उदा– बहिऱ्याला ऐकवणारे यंत्र, स्पर्शाने अंधाना रंग कळवणारे यंत्र, अशी यंत्रे मानवाच्या इंद्रियाशी इतकी एकरूप झालेली आहेत की, ती यंत्रे म्हणजे उप-इंद्रियेच होऊन बसलेली आहेत. तेव्हा यंत्रामुळे इंद्रियांच्या क्षमतेवर कसा परिणाम होतो ? पुद्‌गल कार्माण वर्गणा इंद्रियांना कशा पुरविल्या जातात ? हे पहाणे म्हणजे अतिशय मनोरंजक अभ्यास आहे. असे करीत असताना जैनाचार्यांनी मांडलेल्या मानव विज्ञानाचा आपोआपच समन्वय साधला जातो त्या दृष्टीने प्रयत्न होणे आवश्यक आहे.[1]

## जैन वनस्पति विज्ञान

आधुनिक जगात प्रत्यक्षादि प्रमाणात प्रत्यक्ष प्रमाणालाच मुख्यता दिली जाते. जी गोष्ट प्रमाणाने सिद्ध करता येत नाही तिला अप्रमाण तरी म्हटले जाते किंवा संशय कोटीत ढकलले जाते जैन दर्शनाने वनस्पतीला सजीव म्हटले आहे. ज्या युगात आधुनिक विज्ञानाचा उगम देखील झाला नव्हता अशा प्राचीन काळी जैनागमाने

१ संदर्भ ग्रंथ– तत्त्वार्थ सूत्र, गोम्मटसार (जीवकांड), धवलग्रंथ (प. सुमतीबाई संपादित), पंचसंग्रह, श्लोकवार्तिक, राजवार्तिक, बृ. द्रव्यसंग्रह, जैनेन्द्र सिद्धान्तकोश, सर्वार्थसिद्धि.




वनस्पतीच्या ठिकाणी आहार, निद्रा, भय, मैथुन, परिग्रह, क्रोधादि कषाय प्रवृत्ति असल्याचे स्पष्टतया नमूद केले आहे.

वनस्पतीला सजीव सिद्ध करणाऱ्या वैज्ञानिकात जगदीशचंद्र बोस याचे नांव प्रामुख्याने घेतले जाते. त्यानी इ. स. १९२० साली वनस्पतीतील चेतना स्पष्ट करणारी यांत्रिक उपकरणे बनविली. त्यांच्या सहाय्याने रोपट्याच्या हालचाली कोट्यावधी पटीने अधिक रूपात दिसू शकतात. तसेच या यंत्रांच्या सहाय्याने एक सहस्रांश सेकंदाइतक्या सूक्ष्म कालाची देखील नोंद घेता येते. वनस्पती आणि प्राणी यांच्या तंतूवर जोर, ताप, वायु, आहार वगैरेचा प्रभाव पुष्कळ अंशी सारखाच असतो हे स्पष्ट केले आहे.

श्री बोस एकदा पॅरिस शहरात वनस्पति सचेतन असते ही गोष्ट सप्रयोग दाखवत होते. त्यावेळी त्यांनी एका रोपट्यावर 'पोटॅशियम सायनाइड' या विषाचा उपयोग केला; पण वनस्पति कोमेजण्याऐवजी टवटवीत दिसू लागली. तेव्हा श्री. बोस विचारात पडले. अंदाजाने त्यांनी ओळखले की, हे विष नव्हे. दुसरेच रुचकर खाद्य वस्तु आहे. कसलाही विचार न करता विष म्हणून वापरलेली वस्तु स्वतः खाऊन टाकली. विषाच्या नांवाने साखर पाठविणारा मनुष्य तेथेच होता. त्याने ही गोष्ट मान्य केली.

सचेतनता– अनुभव करण्याची शक्ती जीवित पदार्थाचा हा प्रमुख गुण आहे या गुणामुळे जीव बाह्य वस्तूचा प्रभाव अनुभवतो आणि त्याविषयी योग्य ती क्रिया-प्रतिक्रिया करतो. केळीच्या रोपाला पाणी मिळताच ते पिऊ लागते. रोपांना पाणी मिळताच ती ताजी टवटवीत होतात. प्रकाश, वारा, आकर्षण, परिस्थितीतील बदल, ताप वगैरे उत्तेजकांचा प्रभाव वनस्पतीवर वेगवेगळ्या प्रकारे घडतो. वनस्पती विज्ञानात प्रकाशाच्या प्रभावाला हेलियोट्रापिज्म, पाण्याच्या प्रभावाला हायड्रोट्रापिज्म आणि पृथ्वीच्या आकर्षण शक्तीच्या प्रभावाला जियोट्रापिज्म म्हटले जाते. या उत्तेजकांचा प्रभाव प्रयोग करून पहाता येतो. उदा. अंकुर प्रकाशाकडे धाव घेतो. मुळ्या प्रकाशाच्या विरुद्ध दिशेला वाढतात, पाने प्रकाशाशी काटकोनात रहाण्याचा प्रयत्न करतात. रोपे ओल्या भागाकडे वळलेली दिसतात. गुरुत्वाकर्षणामुळे मुळ्या जमिनीकडे आणि रोप पृथ्वीशी काटकोनात राहण्याचा प्रयत्न करत असलेले दिसून येते. निर्जीव वस्तूंचा आकार, प्रकार, हवा तसा ठेवता येतो तसे सचेतन वस्तूचे नाही. प्रत्येक प्राणी आपल्या वाढीसाठी आहार ग्रहण करतो. माती, पाणी, हवा इ. पासून आहार ग्रहण करून शरीर वाढविते. वनस्पतीमध्ये देखील दुग्धाहारी, मांसाहारी, निरामिषाहारी इ. अनेक प्रकार आढळतात. प्राणी श्वासोच्छ्वास करताना म्हणजे ऑक्सिजन घेतात आणि कार्बन डायऑक्साइड वायु सोडतात. वनस्पतीमध्ये ही क्रिया पानावाटे चालते. तींत बाधा आल्यास वनस्पती कोमेजून मरून जाते. इतर प्राण्याप्रमाणे प्रजनन, संभोग, गर्भाधान वगैरे क्रिया देखील वनस्पतीमध्ये होतात. या सर्व गोष्टी सजीव वस्तू खेरीज इतरत्र आढळणे शक्य नाही.

जैनांनी वनस्पतीला चार पर्याप्ति सांगितल्या आहेत आहार, शरीर, इंद्रिय, श्वासोच्छ्वास. या पर्याप्तीच्या वर्णनामध्ये विज्ञानातील सचेतनतेबरोबर आहार पर्याप्तीत आहार, शरीरपर्याप्तीत शरीर रचना आणि वाढ, इंद्रियपर्याप्तीत संवेदन आणि स्पंदनशीलता तसेच श्वासोच्छ्वास पर्याप्तीत श्वसन ही सहाही लक्षणे समाविष्ट होतात. जैनांनी वनस्पतीला स्पर्शनेंद्रिय, काय, श्वासोच्छ्वास आणि आयुष्य हे चार प्राण सांगितले आहेत. यात दिलेल्या आयुष्य प्राणाची अंतिम स्थिति म्हणजेच मरण होय. तसेच प्रजनन हे मैथुन संज्ञेचे आणि अनुकूलन हे मति श्रुतज्ञानाचे द्योतक आहे. जैन आगमात वनस्पतीला मैथुन संज्ञा आणि मति श्रुतज्ञान सांगितले आहे.

जैन वनस्पतीविषयक वर्णन आणि वैज्ञानिक विवेचन याचे तुलनात्मक अध्ययन केल्यास स्पष्ट दिसून येईल की, वैज्ञानिक जगात निरनिराळ्या शोधाद्वारे तथ्य या नावाने जे उघडकीला आले आहे त्याचे बीज जैन शास्त्रात आधीच पेरून ठेवले आहे हजारो वर्षांच्या पूर्वीच जैन शास्त्रकाराना या गोष्टी माहीत होत्या.




वनस्पतिकायिकाचे दोन भेद आहेत– १) सूक्ष्म, २) बादर. बादर वनस्पतिकायिक दोन प्रकारचे आहेत. प्रत्येक शरीर बादर आणि साधारणशरीर. प्रत्येक शरीर बादर वनस्पति कायिकाचे बारा प्रकार आहेत– १) वृक्ष, २) गुच्छ, ३) गुल्म, ४) लता, ५) वल्ली, ६) पर्व, ७) तृण, ८) वलय, ९) हरित, १०) औषधि, ११) जलरुह, १२) कुहल.

आधुनिक वनस्पति विज्ञान देखील वरील सर्व भेदांना मान्य करते. सक्षेपाने त्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे– ज्या एका शरीराचा एकच जीव मालक असतो त्या वनस्पतीला प्रत्येक शरीर वनस्पति कायिक जीव म्हणतात.

पुष्कळशा मोहऱ्या किंवा तीळ गुळात मिसळून त्याचा एक लाडू बनविला. लाडूचा पिंड एक असला तरी मोहरीचा अथवा तिळाचा प्रत्येक दाणा स्वतंत्र असतो. त्याप्रमाणे बाह्यतः एक पिंडरूपाने दिसत असून देखील जो जीव आपले शरीर अथवा व्यक्तिमत्व स्वतंत्र बाळगतो तो प्रत्येक शरीर वनस्पति होय. पूर्ण रोपात असणारा जीव प्रत्येक शरीरी आहे आणि त्याच्या वेगवेगळ्या भागात संयुक्त रूपाने राहाणारे देखील प्रत्येक शरीरीच होत.

एकदा कांही सज्जनासह स्व. बाबू छोटेलालजी यांनी झाडाच्या पानात, फुलात, बी वगैरेमध्ये अलग अलग जीव आहेत अथवा नाहीत अशी शंका श्री. जगदीशचंद्र बोस याच्या प्रयोगशाळेकडे केली. प्रयोगशाळेत यंत्राच्या सहाय्याने त्या प्रत्येकांत जीव असल्याचे दाखवून दिले.

साधारण वनस्पति कायिक अथवा निगोदजीव हे जीव इतके सूक्ष्म असतात की, कुठल्याही परिस्थितीत ते डोळ्याला दिसू शकत नाहीत. तसेच बादर निगोद जीवांचा शरीर पिंड जर तो अनंत जीवांचा पिंड असेल तरच तो दिसू शकतो.

ज्या वनस्पतीचे मूळ, स्कंध, शाखा, पान, फूल आणि फलाचा मोडून तुकडा केला असता चाकूने कापल्याप्रमाणे त्याचे दोन तुकडे झालेले दिसतात ती वनस्पति अनन्त साधारण वनस्पति आहे. तिचे अवक, पणक, शेवाल इत्यादि अनेक प्रकार आहेत. बादर वनस्पति कायिक जीव देखील संपूर्ण लोकात उत्पन्न होतात.

'वनस्पति सर्वत्र जगात आहे' या जैन दर्शनातील सूत्राबाबत 'आकाशात रोपे' शीर्षक उदाहरण पहाण्याजोगे आहे–

कॅलिफोनिया युनिव्हर्सिटीच्या 'इलेक्ट्रो आप्टिकल सिस्टिम' विभागातील डॉ. फ्रेड एम्. जान्सन यांनी संशोधनात्मक एका निबंधात म्हटले आहे की, दूर अंतरिक्षात पसरलेल्या धूलीकणाबाबत ते 'ग्रेफाइट अथवा बर्फापासून बनले आहेत असे साधारणतया म्हटले जाते' ते आता बरोबर वाटत नाही. स्पेक्ट्रम परिक्षणाच्या आधारे मला असे वाटते की, ते कण क्लोरोफिलपासून बनले आहेत. सर्वच झाडा-झुडपाना हिरवा रंग देणारी ती वस्तु क्लोरोफिल होय.

सूक्ष्म वनस्पतिकायिकाबाबत जैन साहित्यात म्हटले आहे की, त्यावर कोणत्याही पदार्थाचे मरण, छेदन-भेदन, शीत-ताप स्वरूप प्रभाव पडू शकत नाही. हीच गोष्ट खालील उदाहरणावरून स्पष्ट होईल–

अमेरिकेच्या अंतरिक्ष प्रयोगशाळेत केलेल्या प्रयोगावरून हे सिद्ध झाले आहे की, प्लॅवोवेक्टिन जीवाणु अति सूक्ष्म आणि अद्भुत प्राणी आहेत. कारण त्यात जन्मही नाही, मृत्यूही नाही. विकासही नाही आणि नाशही नाही. त्यांना जिवंत रहाण्यासाठी आहाराचीही आवश्यकता नाही आणि हवेचीही जरूरी नाही. कसल्याही साधनाशिवाय ते या ग्रहापासून त्या ग्रहापर्यंतचा प्रवास विना रोकटोक करतात. प्लॅवोवेक्टिन जीवाणूवर अत्यधिक शीत उष्णतेचा देखील प्रभाव पडत नाही. ते अवातजीवी आहेत. प्रकाश हाच त्यांचा आहार. जैनागमात सूक्ष्म स्थावर आणि निगोद जीवांचे वर्णन वरील वर्णनाशी मिळते जुळते आहे. विवाद फक्त जन्म-मरणाचाच.




ही गोष्ट नीट समजून घ्यावयाची असेल तर जैनागमातील एका विशिष्ट रहस्याकडे लक्ष द्यावे लागेल. जैनदर्शनात निगोदी जीवांच्या शरीराच्या जन्म-मरणाला निगोदी जीवांचे जन्म-मरण म्हटलेले नसून ते शरीर जसेच्या तसे राहून देखील त्या शरीरातील अनंत जीवांचे जन्म-मरण सतत चालू असते असे सांगितले आहे. हा दृष्टीकोन वैज्ञानिकाना आला नसावा. म्हणून त्यांनी त्यांना जन्म-मरणातीत म्हटले असावे. त्यामुळे जैन आगमाशी कसलाही विरोध येत नाही उलट समर्थनच दिसून येते. या जीवाना वैज्ञानिक एकदा अनाहारक व पुन्हा लगेच भास्वीय (प्रकाश) आहारक म्हणतात. यावरून सूक्ष्म निगोदी जीवाना आहार आहे, ही जैन दर्शनाची मान्यताच पुष्ट होते.

जैनांनी सांगितलेल्या सूक्ष्म स्थावर जीवांची तुलना बॅक्टेरियाशी होऊ शकेल.

पणक– 'सार्देष्टिकभूमिकुडचोद्भवकलिका:' हिलाच वैज्ञानिक Funaria म्हणतात.

किण्व– 'वर्षाकालोद्भवछत्राणि' छत्रीच्या आकाराची पावसाळी वनस्पति. शिळया अन्नावर अथवा कुजलेल्या लोणच्यावर जी बुरसी येते तिला आगमात कुहण आणि विज्ञानशास्त्रात Fungi म्हटले आहे.

शैवाल– 'उदकगतकायिका हरितवर्णा:'

कवक– 'शृङ्गोद्भवाङ्कुरा: जटाकारा:' या दोहोना विज्ञान Algae असे संबोधते.

खमीर– वनस्पतीवरील पांढरट पापुद्रा, याला लुईपाश्चर यानी वनस्पतीकायिक जीवकोष असे सिद्ध केले आहे. हा पांढरटपणा मनुष्याच्या त्वचेवर देखील उगवतो. याला इंग्रजीत यीस्ट म्हणतात. पीठ किंवा शरबत आंबविण्यासाठी एक पेशी शेवाळवजा बुरशीच कारणीभूत आहे. पेनिसिलीनसारख्या औषधी अशा बुरशीपासूनच बनतात.

संज्ञा– वनस्पति सजीव आहे असे म्हणून जैनदर्शन थांबत नाही. वनस्पतीची प्रकृति, प्रवृत्ति इत्यादि शेकडो प्रकारानी स्पष्टीकरण करते. संज्ञा चार प्रकारच्या आहेत.

१ आहार– वनस्पति वाढते ती खत, पाणी, हवा, प्रकाश आदि आहारामुळेच वाढत असते. घेतलेल्या आहाराचे परिवर्तन घडवून आणतात. तिच्यात अनेक प्रकारचा आहार ग्रहण करण्याची आणि त्याचे विश्लेषण करून रूपान्तरित करण्याची विलक्षण शक्ति आहे. जैनागमातील आहारप्रक्रियेच्या विस्तृत वर्णनाशी हल्लीचे विज्ञान पूर्णतया सहमत आहे. जैनशास्त्रात आहार १ प्रक्षेपाहार, २ रोमाहार, ३ ओजाहार अशा तीन प्रकारचा मानला आहे. शरीराने घेतल्या जाणाऱ्या आहाराला ओजाहार, त्वचेवरील रोमस्पर्शाद्वारे घेतल्या जाणाऱ्या आहाराला रोमाहार, आणि तोंडावाटे घास करून घेतल्या जाणाऱ्या आहाराला प्रक्षेपाहार म्हणतात. वनस्पति पहिल्या दोन प्रकारचा आहार ग्रहण करतात. यांनाच विज्ञानशास्त्रात एसिमिलेशन आणि आसमोसिस म्हटले आहे. खत, पाणी, प्रकाश हाच वनस्पतीचा आहार आहे असे नसून इतर वनस्पति, दूध मास इत्यादि वस्तू देखील वनस्पतीच्या आहारात गर्भित आहेत. 'होरिजिटल स्क्रब' नावाचा वृक्ष पशु-पक्षाना आणि मनुष्याना आपली शिकार बनवितो, युट्रीकुलेरियड, वटरवार्ट इ. वनस्पति कीटक भक्षक म्हणून प्रसिद्धच आहेत.

सारांश– अडीच हजार वर्षापूर्वी जगातील बहुतेक सर्वच दार्शनिक वनस्पतीला सजीव मानायलाच तयार नव्हते. अशा काळी जैनदर्शनाने वनस्पतीला फक्त सजीवच मानले असे नसून शेकडो दृष्टीकोनातून तिचा विचार केला आहे. त्यापैकीच आहाराचा एक प्रकार होय. वनस्पतीचे आहारग्रहण, आहारपरिणमन, विहार, ओजाहार तसेच वनस्पति स्वयं एकेंद्रिय असून देखील ती पंचेंद्रियांना खाऊ शकते आदि वस्तुस्थितीवर प्रकाश टाकणारी जैनसूत्रे खरोखरच त्यावेळी जगावेगळी होती. विज्ञानाचा विकास घडण्यापूर्वी सामान्य जनतेला जैनलोकांचा हा फक्त कल्पनाविलास असे वाटत होते, पण विज्ञान युगातील प्रयोगामुळे हीच सूत्रे आगमप्रणेता अतींद्रिय दृष्टा असल्याचे उद्घोषित करत आहेत.




भय– प्रत्यक्ष प्रतिकूल परिस्थिती आणि भविष्यकालीन प्रतिकूल परिस्थिती यामुळे प्राणीमात्र भयभीत होतात आणि आपल्या सरक्षणाचा उपाय शोधीत असतात. वनस्पतीमध्ये देखील हे दोन्ही प्रकार अस्तित्वात असल्याचे प्रत्यक्ष दिसून येते. वनस्पतीच्या एखाद्या अवयवावर आघात झाला अथवा संहारक परिस्थिती निर्माण झाली म्हणजे ती थरथर कापू लागते हे जगदीशचंद्र बोस यांनी यन्त्राच्या सहायाने दाखवून दिले आहे, लाजाळू किंवा काश्मीरमध्ये आढळणारी जावागल नांवाची वनस्पति आहे. तीमध्ये हा प्रकार उघड दिसतो. लाजाळू अंग आकसून घेते तर जावागलला तीव्र कांपरे भरते.

विंचू जातीचे झाड स्वसंरक्षणासाठी आपल्या पानावरील कुसळांचा उपयोग करते. आगवोंडा, निवडुंग वगैरे अशाच प्रकारच्या वनस्पति होत. वनस्पति शास्त्रात ज्याला 'एंटियारिस टोक्सकारिया' म्हटले जाते ते 'उपस' नावाचे काटेरी झुडूप तर आपल्या अंगातून कापरासारखा द्रव सोडते. तो द्रव पोटेशियम सायनाइटसारखा विषारी असतो. १०-१५ मैलापर्यंत त्याचा प्रभाव जाणवतो. हा त्यांचा संरक्षणाचा उपाय आहे. सलीबीज, मलायातील दाट जंगले आणि बोटॅनिकल गार्डनमध्ये आज देखील अशा वनस्पति पहावयास मिळतात.

वनस्पतीमध्ये स्वसंरक्षणाशिवाय आपल्या मुला-बाळांच्या संरक्षणाचा प्रयत्न देखील दिसून येतो. कड्या कपारीत उगवणारे हे झाड स्वतःचे गर्भरूप असलेल्या फुलांच्या संरक्षणासाठी आपल्या डहाळ्या कपारीपासून दूर ठेवते. त्यात बिया निर्माण होताच त्यांना रुजण्यास जागा मिळावी म्हणून परत कपारीच्या आधारे सरकत असलेल्या दिसून येतात. अशा प्रकारे आपल्या वंशवृद्धीची काळजी त्यानाही आहे.

सारांश– जैनागमात सांगितलेल्या सर्व सिद्धांतांचे वनस्पतिविज्ञान समर्थन करत आहे.

मैथुनसंज्ञा– प्राणीमात्राप्रमाणे वनस्पतीला देखील संभोग ( मैथुन ) संज्ञा आहे. ही गोष्ट शाळकरी मुलाना देखील परिचित झाली आहे.

परिग्रह संज्ञा– 'मूर्छा परिग्रहः' आत्मभिन्न वस्तूविषयी ममत्व बाळगणे त्यांचा संग्रह करणे म्हणजे परिग्रह होय. वनस्पतीमध्ये ही प्रवृत्ति भोजन संग्रहाच्या स्वरूपात आढळते. विज्ञानाने याविषयी बराच प्रकाश टाकला आहे.

१ हेमंत ऋतूत पाने गळून पडतात. तेव्हा आहार बनविण्याचे त्यांचे कार्य थांबते, अशा वेळी त्यांच्या जवळ पूर्वसंग्रहित आहार नसता तर ती जगू शकली नसती. वनस्पति आपला आहार बुंदा वगैरे विशिष्ट भागात संग्रहित करून ठेवतात.

२ या साठविलेल्या अन्नामुळेच वनस्पतीमध्ये ऊर्जा उत्पन्न होते व ती मुळे फुले, फळे, बी इ उत्पन्न होतात.

३ बीज, डहाळ्या आणि सांधे यामध्ये विशेषरूपाने अन्न साठविले जाते. त्यायोगे वाढीचे आणि प्रजननाचे कार्य करता येते.

४ कोबी, कांदा वगैरे वनस्पति आपल्या पात्यात अन्न साठवितात. बी मधील अन्नसंग्रह नारळात विशेषरूपाने आढळतो. स्वतःपेक्षा संततीलाच तो अधिक उपयोगी असतो. वनस्पतीची ही संग्रहप्रवृत्ती विज्ञानाने अनेक प्रयोगाने सिद्ध केली आहे.

कषाय– आत्म्याचे कर्षण करणाऱ्यास कषाय म्हणतात. क्रोध, मान, माया आणि लोभ हे चारही कषाय वनस्पतीमध्ये आढळतात. वेस्ट इंडीजमध्ये असे एक झाड आहे की, त्यातून दिवसा गाण्याचे राग, रात्री रडण्याचे स्पष्ट एकू येते. क्वीन्स आणि न्यू साऊथ वेल्समध्ये 'टच मी नॉट' म्हणजे दंश करणारे वृक्ष आहेत. जवळ जाणाऱ्याचा ते चावा घेतात. अर्थात क्रोधाचे अस्तित्व आहेच. मान म्हणजे गर्व, उन्मत्तता अनुकूल परिस्थितीत

हर्षोन्मत्त होणे, प्रतिकूल परिस्थितीत कोमेजणे, हे प्रकार वनस्पतीत दिसून येतात. गोड गाण्याने वनस्पतिचे हर्षित होणे आदि गोष्टी जगदीशचंद्र बोस यांनी यंत्राच्या साहाय्याने दाखवून दिल्या आहेत. माया म्हणजे कपटाचार दुसऱ्याला फसविणे. मलायातील 'फिगस रूबी जिनोसा' नांवाचा वृक्ष प्रथम इतर वनस्पतींना प्रेमळपणे आधार देतो आणि नंतर त्यानाच खाऊन टाकतो. किड्याना पकडून खाणाऱ्या वनस्पति आहेत. अर्जेंटिनामधील 'क्लोरोफार्मट्री' गोड आवाजाने इतर प्राण्यांना भुलवितो व आपले भक्ष्य बनवितो. 'सन ड्यू' 'ड्रासरा' वगैरे मायावी वनस्पति प्रसिद्ध आहेत. लोभ-आसक्ती, अन्न संग्रह वगैरे तृष्णावश प्रवृत्ति वनस्पतीमध्ये असल्याचे वर आलेच आहे.

उपयोग– ज्ञान आणि दर्शन याना जैन शास्त्रात उपयोग म्हटले आहे. वनस्पति कुमतिज्ञान, कुश्रुतज्ञान आणि स्पर्शनेन्द्रियविषयक अचक्षु दर्शन असते.

आधुनिक विज्ञानवेत्ता वनस्पतीला सुख-दु:खाचा अनुभव घेण्याचे, स्वतःच्या हिताचा विचार करण्याचे सामर्थ्य आहे असेच मानतात. आम्ही जी कामे पांच इंद्रियांनी करतो ती सर्व कामे वनस्पति आपल्या त्वचेद्वारे करतात. त्या वेळेवर खातात, वेळेवर झोपतात आणि वेळेवर जाग्या होतात ही गोष्ट श्री. जगदीशचंद्र बोस यांनी आपल्या प्रयोगाने सिद्ध केली आहे. अचक्षु दर्शन वनस्पतीचे हे कार्य तिच्या त्वचेद्वारे घडते. तिच्या बाह्य त्वचेवर बिंदूसारखे लहान लहान कोश असतात. त्यापैकी पुष्कळशा कोषात तरल पदार्थ भरलेला असतो. या तरल पदार्थाच्या सहाय्याने वनस्पति बाह्य वस्तूच्या उपस्थितीचा अनुभव करते.

लेश्या– कषायोदययुक्त योग प्रवृत्तीला लेश्या असे जैनशास्त्रात म्हटले आहे. कृष्ण, नील, कापोत, पीत, पद्म आणि शुक्ल अशा सहा लेश्या आहेत. त्यापैकी पहिल्या चार लेश्या वनस्पतीना असतात.

१ कृष्णलेश्या– अत्यंत अशुभतम प्रवृत्ति. 'होरिजिंटल स्क्रब' इ. मानव-पशु-पक्षी भक्षक वनस्पतीमध्ये दिसून येते.

२ नीललेश्या– अशुभतर प्रवृत्ति. 'यूट्रीकुलेरिया, वटखार्ट, सनड्यू' आदि कीटक भक्षक वनस्पतीमध्ये दिसून येते.

३ कापोत– अशुभ प्रवृत्ति. 'टच मी नॉट, आगवोंडा' इ. काटेरी, विषारी, दुर्गंधी वनस्पतीमध्ये आढळते.

४ पीत– हिलाच तेजोलेश्याही म्हटले जाते. ही शुभप्रवृत्ति आहे. मधुर जल, सरस फल, सुगंधित फूल देणाऱ्या वनस्पतीत ही प्रवृत्ति आढळते. मादागास्करमधील प्रवाशाना पाणी पुरविणारा नारळाच्या पानाच्या आकाराचा वृक्ष, ब्राझीलमधील दुधासारखा गोड आणि पातळ पदार्थ पुरविणारा वृक्ष इ. या लेश्येची उदाहरणे देता येतील.

आयु– जगण्याची कालमर्यादा, ती कमी अधिक असू शकते. जैनशास्त्रात वनस्पतिकायिक जीवांचे जघन्य आयुष्य अन्तर्मुहूर्त आणि उत्कृष्ट आयुष्य दहा हजार वर्षांचे मानले आहे.

कॅलीफोर्नियातील डगलसफर नावाच्या झाडाना पाहिले म्हणजे जैनशास्त्रातील वर्णनाची सत्यता दिसून येते. या झाडाचा व्यास ५० फुटाहून अधिक आहे. यापैकी कांही झाडे ४-५ हजार वर्षांच्या वयाची आहेत.

निद्रा (झोप)– वनस्पति झोप घेतात, पेंगतात. हे मद्रास येथील एक प्रकारच्या खजूरीच्या झाडावरून कळून येण्यासारखे आहे. ते मध्यरात्री पेंगता पेंगता पडू लागते. दोनप्रहरपर्यंत झोप काढते नंतर पुन्हा अर्धरात्री-पर्यंत उभे रहाते.

उद्योत नामकर्म– प्रकाश देणारी शरीररचना, जैनशास्त्रात वनस्पतीला उद्योत नामकर्मही असल्याचे सांगितले आहे. अमेरिकेच्या शिवाडी प्रान्तातील वस्तीत सात फूट उंचीचे एक झाड आहे. त्याचा प्रकाश एक मैल-पर्यंत पसरतो.

चालू युग विज्ञानाचे आहे. कोणताही सिद्धांत असो तो विज्ञानाच्या प्रकाशात तपासूनच मानला जातो. दर्शनशास्त्र याला अपवाद नाही. आज तेच दर्शनशास्त्र अथवा तोच दार्शनिक सिद्धांत मान्यता पावतो. जो शास्त्रसम्मत असून देखील विज्ञानसम्मत असतो. ही गोष्ट नजरेसमोर ठेवूनच वनस्पति विषयाचे विश्लेषण घडविणारा निबंध लिहिला आहे. तुलनात्मक दृष्टीकोनामुळे आगम व विज्ञान यातील समानता कळून येते. तसेच विशेषात्मक दृष्टीने आगमाची महत्ता सिद्ध होते.

जैनानी सांगितलेल्या गूढ सूत्रांची सत्यता शब्दशः विज्ञानसम्मत असल्याने मनात आपोआपच हे भाव जागृत होतात की, खरोखरच आगमप्रणेता अतीन्द्रियज्ञान संपन्न होते. असे नसते तर ज्या काळी यांत्रिक (भौतिक) साधनांचा अभावच होता अशाकाळी त्याच्या हातून एक प्ररूपण घडलेच नसते. वनस्पति विज्ञानाप्रमाणेच जैनागमात सांगितलेला परमाणुवाद, कर्मसिद्धान्त इत्यादि विषय देखील विज्ञानसम्मत तर आहेतच, पण अत्यंत कल्याण करणारेही आहेत.

वर वनस्पतीविषयक जैनागमातील ज्या गोष्टीना विज्ञानसम्मत सिद्ध केले आहे त्यापैकी एक गोष्ट देखील जगातील दुसऱ्या कुठल्याच त्या काळच्या दर्शनग्रंथात आढळत नाही. विज्ञान काळापूर्वी अशा गोष्टींना असंभव, अप्रामाणिक मानले जात होते. भौतिक विज्ञानाच्या जन्म होण्याच्या हजारो वर्षे आधी जैनांनी अशा सूत्रग्रंथांची रचना केली आहे यावरून वनस्पति विज्ञानाचे अद्य प्रणेते जैनांची होते ही गोष्ट निर्विवाद मान्य आहे.

## जैन ज्योतिष

'जैन ज्योतिष' या विषयावर जैन आचार्यांनी इ. स. पूर्वीच्या कित्येक वर्षापासून लिखाणास सुरुवात केलेली दिसून येते. जैन ज्योतिषाविषयी लिहिले गेलेले सूर्यप्रज्ञप्ति, चंद्रप्रज्ञप्ति, ज्योतिषकरण्डक इत्यादी ग्रंथ अत्यंत महत्त्वाचे आहेत. या ग्रंथातून प्रतिपादित केलेले जैन ज्योतिषविषयक सिद्धांत अत्यंत मौल्यवान आहेत. जैन ज्योतिषाची ही विचारधारा ग्रीक ज्योतिष विचारसरणीच्या बरीच पूर्वीची असल्याचेही दिसून येते. श्याम शास्त्री यांच्या वेदांग ज्योतिष प्रस्तावनेनुसार 'जैन ज्योतिषाची परंपरा इसवी सन पूर्वकालापासून चालत आली असून, जैन ज्योतिष ग्रंथ ब्राह्मण ग्रंथापेक्षा अधिक महत्त्वाचे असल्याचे म्हटले आहे.' सूर्यप्रज्ञप्ति ग्रंथ वेदांगापेक्षा बराच व्यवस्थित तथा सुधारित असल्याचा दिसून येतो. जैन ज्योतिष साहित्याचे सूक्ष्मपणे अवलोकन केले असता, त्यातून मासगणना, युगगणना इत्यादीच्याविषयी अधिक सखोल माहिती मिळण्याची शक्यता आहे.

सर्वसाधारणपणे "ज्योतिषम् सूर्यादिग्रहाणां बोधकं शास्त्रं" अर्थात् सूर्यादी ग्रह आणि काल घडविणारे शास्त्र म्हणजेच ज्योतिषशास्त्र होय. सूर्य, चंद्र इत्यादि ज्योतिष्मान् असतात. म्हणूनच त्यांना ज्योतिषी असे म्हटले आहे. जैन दर्शनाकार यांनाच देवांचे एक प्रकार असल्याचे मानतात. ज्योतिष्मान् ग्रहांची संख्या असंख्यात मानली असून, या लोकांची स्थिति मध्यलोकातील चित्रा पृथ्वीपासून ७९० योजने उंच अशी मानली आहे. तसे पाहता अत्यंत प्राचीन काळापासून आकाश मंडळ म्हणजे मानवाला कुतूहलाचा विषयच होऊन बसला आहे. सूर्य-चंद्राची माहिती मिळाल्यानंतर याच मानवाने विविध ग्रह, तारे, नक्षत्र याची माहिती देखील प्राप्त केली. एवढेच नव्हे तर आधुनिक यंत्रसामुग्रीच्या साह्याने या सर्व ग्रहांचे सान्निध्य तो प्राप्त करू पहात आहे. जैन परंपरेनुसार असे सांगितले जाते की, लाखो वर्षांपूर्वी कर्मभूमीच्या प्रारंभी प्रथम कुलकर प्रतिश्रुतीच्या काळी जेव्हा मानवाला सर्वप्रथम सूर्य आणि चंद्र नजरेस पडले, त्यावेळी ते साशंकित झाले. आपली उत्सुकता शांत करण्यासाठी ते प्रतिश्रुति कुलकर–मनुजवळ गेले. त्यावेळी तो कुलकर सौर-ज्योतिष नावाने प्रसिद्ध झाला. जैन आगमाची परंपरा जरी विच्छिन्न झाली असली, तरी सर्व साधारणपणे ज्योतिष साहित्याचा इतिहास इथपासून सुरू होतो. अर्थात् त्या कालापूर्वी देखील ज्योतिष साहित्य उपलब्ध असण्याची शक्यता सांगितली जाते.

## जैन ज्योतिष-साहित्याचा उगम व विकास-

जैन ज्योतिष साहित्याचा उगम आगमदृष्टचा आपण पाहू गेल्यास तो आपणाला विद्यानुवादांग आणि परिकर्मांच्यापासून झालेला दिसून येतो. तत्कालीन सर्व गणित सिद्धांत ज्योतिष परिकर्मांच्या अंतर्गत होते आणि अष्टांग निमित्ताचे विवेचन विद्यानुवादागमध्ये करण्यात आले होते. षट्खंडागम धवला टीकेत- रौद्र, श्वेत, मैत्र, सारभट, दैत्य, रोहण, बल, विजय, नैऋत्य, वरूण एकूण १५ मुहूर्त सांगण्यात आले आहेत. मुहूर्तांची ही नामावली स्वतः आचार्य जिनसेनांनी वापरली नसून ती आगमानुसार चालत आलेली दिसून येते. म्हणून मुहूर्त-विषयक चर्चा अति प्राचीनकालीन आहे यात शंका नाही.

नक्षत्राविषयीची चर्चा प्रामुख्याने आपणाला प्रश्नव्याकरण या ग्रंथात पहावयास मिळते. सर्व नक्षत्रांचे कुल, उपकुल यांचे सविस्तर वर्णन तेथे करण्यात आले आहे. हे वर्णन ज्योतिष साहित्याच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. या ग्रंथात घनिष्ठा, उत्तरा, भाद्रपदा, अश्विनी, कृतिका, मृगशिर्ष, पुष्य, मघा, उत्तरा, फाल्गुनी, चित्रा, विशाखा, मूला तसेच उत्तराषाढा ही कुलसंज्ञक नक्षत्रे असून, श्रवण, पूर्वाभाद्रपदा, रेवती, भरणी, रोहिणी, हस्त, स्वाति, ज्येष्ठा, तसेच पूर्वाषाढादि उपकुलसंज्ञक नक्षत्रे आहेत. याशिवाय अभिजित, शतभिषा, आर्द्रा, तसेच अनुराधा इत्यादि कुलोपकुलसंज्ञक नक्षत्रे आहेत. हे कुल-उपकुलांचे विभाजन पूर्णमासी होणाऱ्या नक्षत्रांच्या आधारावर करण्यात आले आहे. प्रत्येक मासाच्या पूर्णमासीला त्या महिन्याचे प्रथमकुल नक्षत्र. दुसरे उपकुल नक्षत्र व तिसरे कुलोपकुल नक्षत्र अशी नावे देण्यात आली आहेत. या वर्णनावरून प्रामुख्याने त्या महिन्याचे फलनिरुपण करणे हे उद्दिष्ट होय. या ग्रंथामध्ये ऋतु, अयन, मास, पक्ष आणि तिथि याविषयीची देखील चर्चा करण्यात आली आहे.

समवायांग ग्रंथामध्ये करण्यात आलेली ज्योतिषविषयक चर्चा अत्यंत महत्त्वाची आहे. या ग्रंथामध्ये कृत्तिका, रोहिणी, मृगशीर्ष, आर्द्रा, पुनर्वसु पुष्यादि सात नक्षत्रे पूर्वद्वारी असून मघा, उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाति इत्यदि दक्षिणद्वारी आहेत तर अनुराधा, ज्येष्ठा, मूला, पूर्वाषाढा नक्षत्रे पश्चिमद्वारी आहेत व घनिष्ठा, शतभिषा, रेवती, अश्विनी, भरणी इत्यादि नक्षत्रे उत्तरद्वारी असल्याचे म्हटले आहे.

स्थानांगमध्ये चंद्रावरोबर स्पर्शयोगी नक्षत्रांचे कथन करण्यात आले आहे. या ग्रंथानुसार असे सांगितले आहे की, कृत्तिका, रोहिणी, पुनर्वसु, मघा, चित्रा, विशाखा, अनुराधा आणि ज्येष्ठा ही आठ नक्षत्रे चंद्राला स्पर्श करणारी आहेत. या योगांचे फळ तिथीनुसार वेगवेगळया प्रकारचे असते. याचप्रमाणे उत्तर, पश्चिम, दक्षिण आणि पूर्व दिशेला चंद्रस्पर्श असणाऱ्या नक्षत्रांचे नाव, त्यांचे फल, विस्तारपूर्वक सांगितले आहे. या ग्रंथात ८८ ग्रहांची ( ठाणांग पृ. ९८ ते १०० ) नावे सांगितली आहेत. समवायांग ग्रंथात देखील ८८ ग्रहांचा उल्लेख आला आहे. प्रश्न-व्याकरण ग्रंथात सूर्य, चंद्र, मगल, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु आणि केतु या नऊ ग्रहासंबंधी माहिती देण्यात आली आहे. समवायांगात ग्रहणाच्या कारणांची मीमांसा देखील मिळते. यात राहूचे नित्यराहू व पर्वराहू असे दोन भेद सांगितले आहेत. नित्यराहू कृष्ण व शुक्ल पक्षाचा कारण असून पर्वराहू चंद्रग्रहणाचे कारण समजला जातो. समवायांग ग्रंथात याशिवाय दिनवृद्धि आणि दिनह्रास यासंबंधीची माहिती देखील मिळते.

अशा प्रकारे जैन आगम ग्रंथात ऋतु, अयन, दिनमान, दिनवृद्धि, दिनह्रास, नक्षत्र त्यांची संज्ञा, ग्रह मंडळ, विमानांचे स्वरुप, विस्तार, त्यांची गृहे इत्यादींचे वर्णन मिळते. आगमांचा संग्रह साधारणपणे इ. स. पूर्व शताब्दीच्या पूर्वीचा किंवहुना त्याहून प्राचीन मानला जातो. परंतु त्याशिवाय ज्योतिष साहित्याची चर्चा त्यापेक्षाही अधिक प्राचीन आहे असे वाटते आणि याच मान्यतेच्या आधारे जैन ज्योतिष ग्रीक ज्योतिषापूर्वीचे असावे असे म्हणण्यात आले आहे. इतिहासतज्ञांनी गणित ज्योतिषाला देखील प्राचीन मानले आहे. स्वकर्माच्या कार्यसिद्धीसाठी समयशुद्धीची आवश्यकता आदिमानवाला देखील भासली असावी. म्हणून जैन आगम ग्रंथात फलित ज्योतिषाविषयी असलेली तिथि, नक्षत्र, योग, करण, वार, समयशुद्धि, दिनशुद्धि इत्यादींची चर्चा मिळू शकते.




## जैन ज्योतिष सामान्य माहिती–

'जैन ज्योतिष' साहित्यामध्ये संबंधित अशा ज्योतिष देव, त्यांची संख्या, त्याचप्रमाणे ग्रह व नक्षत्रांचे भेद व लक्षण, ज्योतिष देवाचे शरीर, आहार, सुख, दु.ख, सम्यक्त्व विषयांचा विचार केला असून, त्याचबरोबर ज्योतिष देवांच्याबाबत संभवनीय कषाय, वेद, लेश्या, पर्याप्ति यांचीही माहिती दिलेली दिसते. ज्योतिषी देव मरण पावून कोठे उत्पन्न होतात, ते कोणते पद प्राप्त करतात, त्यांची अवगाहना, मार्गणा, गुणस्थान, त्यांचे सत्, संख्या, क्षेत्र, स्पर्श, काल, अंतर, भाव, अल्पबहुत्व यांचेही वर्णन करण्यात आले आहे. ज्योतिष देवाच्या कर्मबंधाविषयी व उदयाविषयी देखील माहिती मिळते.

सर्वसाधारणपणे जैन मतानुसार ज्योतिषांनी व्याप्त नभप्रदेश हा ११० योजन मोठा आणि घनोदधिपर्यंत असंख्यात द्वीपसमुद्र प्रमाण लांबीचा आहे. त्रिलोकप्रज्ञप्तिनुसार १३०३२९२५०१५ योजन प्रमाण क्षेत्रात ज्योतिष देवांचा निवास मानण्यात आला आहे. या लोकाच्या अंती पूर्व-पश्चिम दिशेला घनोदधि वातवलयाना स्पर्शित आहे. उत्तर-दक्षिण दिशाना तो स्पर्शित नाही. थोडक्यात १ राजू लांब व रुंद संपूर्ण मध्यलोकातील चित्रापृथ्वीपासून ७९० योजने उंच ज्योतिष लोकाचा प्रारंभ होतो तो ११० योजनपर्यंतच्या आकाशात स्थित आहे. अशा प्रकारे चित्रा पृथ्वीच्या ७९० योजने उंच १ राजू लांब व १ राजू रुंद व ११० योजन विस्तृत आकाश क्षेत्रात ज्योतिषदेवांचे राहण्याचे व संचार करण्याचे स्थान सांगण्यात आले आहे. त्याच्या वर-खाली ते जाऊ शकत नाहीत. त्या क्षेत्रात देखील मध्य मेरूच्या चोहोबाजूंना १३०३२९२५०१५ योजन क्षेत्र त्यांना गम्य नाही. कारण मेरूपासून ११२१ योजन दूर राहून ते संचार करतात. त्याच्या आत प्रवेश करु शकत नाहीत. ज्योतिष लोकातील चंद्र, सूर्य, ग्रह, नक्षत्र यांचे स्थान, विमान व किती वरपर्यंत असतात हे पुढील कोष्टकावरून समजेल.

| ति. प ।७। गाथा | किती उंच असतात | विमान | प्रमाण | किती वरपर्यंत जातात | विमान |
|---|---|---|---|---|---|
| | प्रथम दृष्टिक्षेप-१ | ज्यो. देव | ( राजवार्तिक ।४।१२।१०।२१९ ) | | |
| १०८ | ७९० योजन | तारे | | ७९० योजन | तारे |
| ६५ | ८०० ,, | सूर्य | | ८०० ,, | सूर्य |
| ३६ | ८८० ,, | चंद्र | | ८८० ,, | चंद्र |
| १०४ | ८८४ ,, | नक्षत्र | | ८८३ ,, | नक्षत्र |
| ८३ | ८८८ ,, | बुध | | ८८६ ,, | बुध |
| ८९ | ८९१ ,, | शुक्र | | ८८६ ,, | शुक्र |
| ९३ | ८९४ ,, | बृहस्पति | | ८९२ ,, | बृहस्पति |
| ९६ | ८९७ ,, | मंगल | | ८९६ ,, | मंगल |
| ९९ | ९०० ,, | शनि | | ९०० ,, | शनि |
| १०१ | ८८८–९०० ,, | इतर ग्रह | | | |

जैन ज्योतिषामध्ये चंद्र, सूर्य, ग्रह, नक्षत्र, तारे यांना देव मानले असून, त्याच्या विमानविषयीची सखोल चर्चा करण्यात आली आहे. ज्योतिष लोकाचे प्रामुख्याने चर आणि अचर असे दोन भेद पाडून त्याची माहिती देण्यात आली आहे. अचर ज्योतिषाविषयीची माहिती हरिवंशपुराण व त्रिलोकसारादि ग्रंथामधून मिळते. तर चर ज्योतिष लोकाची माहिती सर्वार्थसिद्धि, तत्त्वार्थसूत्र, हरिवंशपुराण इत्यादि ग्रंथातून पहावयास मिळते. विविध ग्रंथातून जैन ज्योतिषमधील अमावस्या, पूर्णिमा, चंद्रग्रहण, दिवस-रात्र, अयन वर्ष यांचीही माहिती मिळते.

## अमावस्या, पूर्णिमा व चंद्रग्रहण–

त्रिलोकप्रज्ञप्तिनुसार चंद्राच्या नगरतलापासून चार अंगुल प्रमाण खाली राहु विमानाचे ध्वजदंड असतात. दिवस व पर्व भेदानुसार राहूंचे परतलातील गमन दोन प्रकाराचे होते. यातील दिवस राहूची गति





चंद्राप्रमाणे असते. कांही अंतर ओलांडून राहु आणि चंद्रबिंब जंबूद्वीपाच्या आग्नेय आणि वायव्य दिशेला येतात. राहु प्रत्येक दिवशी आपल्या पथातील चंद्रमंडळाच्या १६ भागांना हळूहळू आच्छादित करीत राहतो. अशा रीतीने १५ कला व्यापून टाकून एक कला शिल्लक राहते. हाच तो अमावस्या दिवस होय.

पुढे चांद्र दिवसाचे प्रमाण ३१$\frac{२३}{४६२}$ मुहूर्त प्रमाण होते. प्रतिपदेच्या दिवसापासून राहु काही अंतर सोडून देऊन चंद्राच्या एकेका कलेला मुक्त करीत असतो व नंतर मनुष्य लोकात जेव्हा संपूर्ण चंद्रबिंब दिसू लागते तो दिवस पौर्णिमा म्हणून ओळखला जातो, अथवा चंद्रबिंब स्वभावतः १५ दिवसापर्यंत कृष्ण कांतीस्वरूप व तितकेच दिवस शुक्ल कांतीस्वरूप धारण करतो. पूर्वराहू मात्र नियमानुसार गतिविशेषांच्या साह्याने सहा महिन्यातील पौर्णिमेच्या शेवटी वेगवेगळ्या चंद्रबिंबांना आच्छादित करतो तेच चंद्रग्रहण मानले जाते

### दिवस व रात्र–

सूर्य नगरतलापासून चार अंगुल प्रमाण खाली अरिष्ट ( केतू ) विमानांचे ध्वजदंड असतात. सूर्य प्रथम प्रथम स्थित असल्यामुळे १८ मुहूर्तांचा दिवस व १२ मुहूर्तांची रात्र होते. यात पुनः बदल होऊन १८ मुहूर्तांची रात्र व १२ मुहूर्तांचा दिवस होतो. हा क्रम नित्य चालतो. (त्रि. सा. ३७९–३८१)

### अयन व वर्ष–

सूर्य, चंद्र आणि जे आपापल्या क्षेत्रात संचार करणारे ग्रह आहेत त्यांचे अयन होत असते. नक्षत्रसमूह व तारकांच्या अयनांचा ठराविक असा नियम नाही. सूर्याच्या प्रत्येक अयनामध्ये १८३ दिवस व रात्री होतात आणि चंद्राच्या अयनात १३$\frac{४४}{६७}$ दिवस होतात. सर्व सूर्यांचे दक्षिणायन प्रथम व उत्तरायन शेवटी होते. चंद्र अयनांचा क्रम मात्र याच्या उलट आहे.

जैन ज्योतिषशास्त्रात ज्योतिषी देवांचे निवास व त्यांच्या विमानाचे स्वरूप, रंग, संख्या इत्यादींची देखील माहिती देण्यात आली आहे. त्रिलोकप्रज्ञप्त्यनुसार चंद्र विमानात चार-चार गोपुर द्वार, कूट, वेदी व जिनभवन असून विमानांच्या कूटावर चंद्रांचे प्रासाद आहेत. या भवनात उपपाद मंदिर, अभिषेकपुर, भूषणगृह, मैथुनशाला, क्रीडाशाला, मंत्रशाला आणि सभाभवने आहेत. प्रत्येक भवनात सात-आठ भूमि आहेत. चंद्र विमानांच्याप्रमाणेच सूर्य विमान व प्रासाद आहेत. त्याचप्रमाणे नक्षत्र, ग्रह, तारे यांच्याही प्रासादाचे वर्णन सांगण्यात आले आहे. चंद्र, सूर्य, बुध, शुक्र, बृहस्पति, मंगल, शनि, नक्षत्र इत्यादि ज्योतिष देव मानले असून त्यांच्या विमानांचा आकार अर्धगोल सांगितला आहे. त्यांचे अनुक्रमे मणिमय, सुवर्ण, रजत स्फटिक, रक्त सूर्यवत असे रंग सांगितले आहे.

थोडक्यात जैन ज्योतिष शास्त्रामध्ये सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्र तारे यांचे स्थान, स्वरूप, त्यांच्या हालचाली इत्यादींचे अगदी सूक्ष्मपणे विवेचन करण्यात आले आहे.

## ज्योतिष साहित्याचे कालविभाजन

जैन ज्योतिष साहित्याची परिपूर्ण माहिती करून घेण्यासाठी या साहित्याचे पुढील चार भागात विभाजन करण्यात आले आहे.[1] १) आदिकाल इ पू ३०० पासून ६०० इ. सनापर्यंत, २) पूर्वमध्यकाल ६०१ इ. सनापासून १००० इ. सनापर्यंत, ३) उत्तरमध्यकाल १००१ इ. सनापासून १६०० इ. सनापर्यंत, ४) अर्वाचीन काल १६०१ इ. सनापासून १८६० इसवीसनापर्यंत.

---

१. जैन ज्योतिष साहित्य का सर्वेक्षण– डॉ नेमिचंद्र शास्त्री

## आदिकालातील ग्रंथरचना–

साधारणपणे आदिकाल रचनेत सूर्यप्रज्ञप्ति, चंद्रप्रज्ञप्ति, अंगविज्जा ज्योतिषकरण्डक इत्यादि ग्रंथांचा समावेश होतो. सूर्यप्रज्ञप्ति हा प्राकृत भाषेतील एक प्राचीन ग्रंथ मानला जातो. यावर मलयगिरीची संस्कृत टीका आहे. हा ग्रंथ इ. स. पूर्व २०० वर्षापूर्वीचा असावा. यात तिथी नक्षत्राचे कथन आहे. चंद्रप्रज्ञप्तीमध्ये सूर्याचा आकाशमार्ग, आयु, परिवार अयन, नक्षत्र, तिथि, मास इत्यादीचे वर्णन आहे. बहुधा चंद्र-सूर्य प्रज्ञप्तीचा विषय सारखाच आहे. चंद्र व सूर्याचा आकार यातून अर्धकपीठ अर्धसमचतुस्त्र गोल असल्याचा सांगितला आहे. या प्रज्ञप्ति ग्रंथाशिवाय ज्योतिषकरण्डक, अंगविज्जा व लोकविजय मंत्र हे ग्रंथ देखील प्राचीन ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाचे मानले आहेत.

## ज्योतिषकरण्डक–

या ग्रंथाची रचना इ. स. पूर्व ३०० ज्या आसपास झाली असावी. विषय आणि भाषा या दोन्ही दृष्टीने हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. या ग्रंथात अयनादि माहितीबरोबरच नक्षत्राविषयी माहिती दिली आहे. नक्षत्राच्या विविध अवस्थेला राशी म्हणतात त्याचप्रमाणे नक्षत्रांच्या विशिष्ठ अवस्थेला लग्न म्हटले आहे. या ग्रंथात कृत्तिका, धनिष्ठा, भरणी, श्रवण व अभिजित् इत्यादि नक्षत्रांची माहिती दिली आहे.

## अंगविज्जा–

अंगविज्जा या ग्रंथात प्रामुख्याने अष्टांगनिमित्ताचे विस्तारपूर्वक व विविध दृष्टीने कथन केले आहे. या ग्रंथाचा रचनाकाल कुषाण व गुप्त यांच्यामधील काळातील मानला जातो.

## पूर्व मध्यकालीन ज्योतिष साहित्य–

पूर्व मध्यकालीन ज्योतिष साहित्यामध्ये आपणाला द्वितीय भद्रबहुकृत अर्हच्चूडामणिसार, करलक्खण, ऋषिपुत्रकृत संहिता तथा निमित्तशास्त्र, हरिभद्ररचित लग्नशुद्धि व लग्नकुंडिका, महावीराचार्यरचित ज्योतिषपटल व गणितसारसंग्रह, चंद्रसेनरचित 'केवलज्ञान होरा' गणितसार, संस्कृत ज्योतिर्ज्ञानविधि व कन्नड जातकतिलकादि ग्रंथाचा समावेश करता येईल.

## अर्हच्चूडामणिसार–

प्रस्तुत ग्रंथाची रचना द्वितीय भद्रबाहु यांनी केलेली असावी. ही प्रश्नशास्त्राविषयीची एक प्रमुख रचना असून तिच्या ६८ प्राकृत गाथा आहेत. हे भद्रबाहु वराहमिहिर यांचे बंधु असावेत. या ग्रंथारंभी वर्णांची संज्ञा सांगून पुढे स्वर व्यंजनांचे विवेचन केले आहे. प्रश्नोत्तरांचा नाश होताच कार्यसिद्धीचाही नाश होत असल्याचे सांगितले आहे. मात्र ग्रंथात जय-पराजय, लाभ-अलाभ, जीवन-मरण इत्यादीचे विवेचन करण्यात आले आहे. या ग्रंथाची भाषा महाराष्ट्री प्राकृत आहे या ग्रंथात मश्रुति नियमाचा वापर केलेला आढळून येतो.

## करलक्खण–

ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने हा एक प्रमुख ग्रंथ मानला जातो. हा सामुद्रिक शास्त्राविषयीचा लहानसा ग्रंथ आहे. या ग्रंथात रेषांचे महत्त्व, स्त्री-पुरुष यांच्या हाताची विविध लक्षणे, मणिबंध, विद्यारेषा, कुल, धन, समृद्धि, आयुष्य, धर्मव्रत इत्यादि रेषांचे वर्णन आहे. भाऊ, बहीण, संतति यांच्याविषयीच्या रेषांचेही वर्णन आहे. या ग्रंथातील उद्देश स्वतः ग्रंथकर्त्याने स्पष्ट केला आहे की, 'या ग्रंथात प्रामुख्याने करलक्षणांचे विवेचन असून जनकल्याणासाठी व नवागत शिष्यांची परीक्षा घेण्यासाठी प्रस्तुत ग्रंथाची रचना करण्यात आली आहे.

ऋषिपुत्रकृत संहिता व निमित्तशास्त्र–

ऋषिपुत्रांना गर्ग मुनींचे पुत्र असल्याचे मानण्यात आले आहे. ते ज्योतिषशास्त्राचे एक धुरंधर व विद्वान होते. ते ऋषिपुत्र कोणत्या तरी ऋषिवंशाचे अथवा मुनींच्या आशीर्वादापासून प्राप्त झालेले असावेत. यांची एक संहिता असून तिच्याविषयी विशेष माहिती मिळू शकत नाही. निमित्तशास्त्र हा त्यांचा ज्योतिषाविषयीचा दुसरा ग्रंथ असून, त्यात पृथ्वीवरून आकाशातील दिसणाऱ्या विविध फलाचे विवेचन करणे हाच या ग्रंथातील वर्ण्यविषय आहे. या ग्रंथाचे विभाजन एकूण ६० अध्यायामध्ये करण्यात आले आहे. मोठ्या अध्यायांचे विभाजन पटलामध्ये करण्यात आले आहे. आरंभीच्या अध्यायामधून अंगविद्येची उत्पत्ति, स्वरूप, शिष्याचे गुणदोष, अंगविद्येचे महत्व यांचे विवेचन आहे. गृह-प्रवेश, वस्त्र, यान, धान्य, चर्या चेष्ठाद्वारे शुभाशुभ फलाचे कथन केले आहे. त्याचप्रमाणे इंद्रधनुष्य, चंद्रग्रह, नक्षत्र, तारा, अमावस्या, पूर्णमासी, युग, संवत्सर, ऋतु, मास, पक्ष, उल्कापात यांचेही विवेचन केले आहे.

लोकविजय यंत्र–

हा ग्रंथ ३० प्राकृत गाथांनी युक्त आहे. ज्योतिष शास्त्रावरील हा देखील एक महत्वाचा आणि प्राचीन प्रमाण ग्रंथ म्हणून मानण्यात येतो. यात प्रामुख्याने सुभिक्ष व दुर्भीक्ष यांची माहिती दिली आहे. अंतिम मंगलाचरणात त्रिलोकनाथ ऋषभदेवांच्या चरणस्थळी नमस्कार करून सिद्धीसाठी प्रस्तुत ग्रंथाची रचना केल्याचे म्हटले आहे. हा ग्रंथ शेतीविषयक माहितीच्या दृष्टीने महत्वाचा असून त्यात शुभाशुभ फलाचेही वर्णन आहे.

तत्वार्थसूत्र–

उमास्वातिरचित तत्वार्थसूत्रातील तीन, चार अध्यायाच्या दरम्यान ज्योतिषविषयक मूळ सिद्धांताची माहिती देण्यात आली आहे. यांच्या मतानुसार ग्रहांचे केंद्र सुमेरु पर्वत असून, ग्रह नित्य गतिशील असतात व ते मेरूला प्रदक्षिणा घालतात. ग्रह, नक्षत्र, प्रकीर्णक व तारा यांचे वर्णन चौथ्या अध्यायात सुस्पष्ट केले आहे. यांच्या ग्रंथात आलेली ज्योतिषविषयक माहिती संक्षेपरूप पण महत्वाची आहे.

वराहमिहीरकृत चूर्ण साहित्य–

वराहमिहीर यांनी बृहज्जातकात कालकसंहितेचा उल्लेख केला आहे. निशियचूर्ण, आवश्यकचूर्ण आदि ग्रंथावरून त्यांचे ज्योतिषशास्त्राविषयीचे ज्ञान समजू शकते.

तिलोयपण्णत्ति–

यतिवृषभाचार्यविरचित करणानुयोगातील हा एक अतिशय महत्वाचा ग्रंथ असून या ग्रंथात ज्योतिर्मण्डलाचे संपूर्ण व सुंदर विवेचन केले असून ज्योतिर्लोकान्धकारातील अयन, गगन मार्ग, नक्षत्र तसेच दिनमान यांचे विस्तृत विवेचन केले आहे.

गोष्टींचे वर्णन करण्यात आले आहे. वर्षोत्पात, देवोत्पात, उल्कोत्पात, गंधर्वोत्पात इत्यादि उत्पादाद्वारे शुभाशुभत्वाचे सुंदर रितीने विवेचन केले आहे.

हरिभद्रकृत लग्नकुंडिका व लग्नशुद्धि–

हरिभद्रसूरि ८ व्या शतकातील एक महान व गाढे विद्वान मानले जातत. साहित्यातील सर्व प्रकार त्यांनी हाताळलेले दिसतात. ते कथा, दर्शन, आगमादि शास्त्रातील प्रकांड पंडित होते. त्यांनी एकूण १४४० प्रकरण ग्रंथाची रचना केली आहे. त्यातील ८८ प्रकरणांची माहिती मिळते. त्यांच्या इतर २६ ग्रंथाचे प्रकाशन झाले




आहे. लग्नशुद्धीही ज्योतिषविषयीची प्राकृतमधील रचना आहे. यात लग्न फल, लग्नासंबंधी ग्रहांचे फळ, ग्रहांचे स्वरूप, द्वादशभावांची नावे यांची चर्चा केली आहे. या ग्रंथाला जातकशास्त्र तथा होराशास्त्र असे संबोधिले असून उपयोगितेच्या दृष्टीने तो अत्यंत महत्त्वाचा आहे.

### महावीराचार्यरचित ज्योतिषपटल व गणितसार संग्रह–

ज्योतिषपटल आणि गणितसार संग्रह हे ग्रंथ ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने महत्वाचे असून, त्याची रचना ९ व्या शतकात झाली असावी. महावीराचार्य एक थोर गणितज्ञ होते. या आचार्यांनी आपल्या या ग्रंथातून गणिताला जास्त महत्व दिले असून गणिताशिवाय संसारातील कोणत्याही शास्त्राचे आकलन व्यवस्थितरीत्या होऊ शकणार नाही असे म्हटले आहे. कामशास्त्र, गांधर्व, नाटक, वास्तुविद्या, छंदशास्त्र, अलंकार, काव्य, तर्क व्याकरण या सर्वासाठी गणिताची आवश्यकता असल्याचे सांगितले आहे.

प्रस्तुतच्या ग्रंथामधून संज्ञाधिकार परिकर्मव्यवहार, कलासवर्णव्यवहार, प्रकीर्णव्यवहार, त्रैराशिव्यवहार, *क्षेत्र गणितव्यवहार, खातव्यवहार तसेच छायाव्यवहार इत्यादि नावाची प्रकरणे आहेत.* पाटीगणित व रेखागणिताच्या दृष्टीने यात अधिक सूक्ष्म चर्चा करण्यात आली आहे. ज्योतिष पटलातील ग्रहांची गमन क्षेत्रे सूर्याचे मंडळ, नक्षत्र व तारकांची स्थिती, गति, संख्या यांचे विवेचन केले आहे.

### चन्द्रसेनकृत 'केवलज्ञान होरा'–

चंद्रसेनरचित केवलज्ञान होरा हा ज्योतिषशास्त्रातील एक महान व विशाल असा ग्रंथ मानला जातो. कल्याणवर्मानंतर या ग्रंथाची रचना करण्यात आली असावी. कर्नाटकीय ज्योतिषाचा या ग्रंथावर अधिक प्रभाव असलेला दिसून येतो. या ग्रंथात मधून मधून कन्नड भाषेचाही वापर करण्यात आला आहे. या ग्रंथात हेमकरण, लाभालाभ प्रकरण, वास्तु प्रकरण, भोजन प्रकरण, निर्वाह प्रकरण, अपत्य प्रकरण, लाभालाभ प्रकरण तसेच विषविद्या प्रकरण इत्यादींची माहिती दिली आहे.

### श्रीधरकृत गणितसार ज्योतिर्ज्ञानविधि–

श्रीधर हे कर्नाटक प्रांतातील रहिवासी असून त्यांचा काळ अंदाजे १० व्या शतकाचा उत्तरार्ध मानला जातो. ज्योतिषशास्त्रातील हे एक प्रकांड पंडित मानले जातात. त्यांच्या मातेचे नाव अंबिका आणि पित्याचे नाव बलदेव शर्मा असे होते. लहानपणापासूनच त्यांनी संस्कृत आणि कन्नड भाषेचे ज्ञान आत्मसात केले होते. प्रारंभी श्रीधर हे शैव होते. नंतर ते जैन झाल्याचे मानले जाते. गणितसारमध्ये त्यांनी गणिताचे गुणक, वर्ग, वर्गमूळ, घन, घनमूळ, भागानुबंध, सुवर्ण गणित, प्रक्षेपण गणित, राशि, व्यवहार इत्यादी गोष्टींचे विवेचन केले आहे. *ज्योतिर्ज्ञानविधीमध्ये ज्योतिषविषयक गोष्टींचे विवेचन करून व्यवहारोपयोगी मूहूर्त दिले आहेत. यात* मासविशेष, दिनविशेष इत्यादींचीही माहिती दिली आहे.

जाततिलकामध्ये जातकशास्त्रासंबंधी चर्चा असून हा कन्नडमधील श्रीधरांचा महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. या ग्रंथात लग्न, ग्रह, ग्रहयोग, जन्मकुंडली संबंधी बाबींचे विवेचन केले आहे.

### चन्द्रोन्मीलन–

चन्द्रोन्मीलन ही प्रश्नशास्त्राविषयीची एक महत्त्वपूर्ण रचना असून या ग्रंथाच्या कर्त्याविषयी काही माहिती मिळू शकत नाही. या प्रश्नप्रणालीयुक्त ग्रंथावरूनच तात्कालीन समाजात प्रश्नप्रणालीची अधिक आवड असल्याचे दिसून येते.

ज्योतिष साहित्य–

या ज्योतिष साहित्यात संहिता, सामुद्रिक शास्त्र, मुहूर्तजातक इत्यादींची अधिक निर्मिती झाली. या कालामध्ये दुर्गदेव, मल्लिसेन, भट्टवोसरि, उदय प्रभदेव, राजादित्य, पद्मप्रभसूरि, नरचंद्र उपाध्याय, अर्हद्दास, महेंद्रसूरि, हेमप्रभ इत्यादि महान ज्योतिर होऊन गेले त्यांची माहिती खालीलप्रमाणे आहे–

दुर्गदेव–

उत्तरमध्यकालातील दुर्गदेव हा एक महान ज्योतिषकार समजला जातो. दुर्गदेवाने रिट्ठसमुच्चय आणि अर्द्धकाण्ड या दोन ग्रंथाची रचना केली. ही रचना दुर्गदेवाचे गुरु संयमदेव यांच्या वचनानुसार करण्यात आली आहे. दुर्गदेवाचा काल सन १०३२ इतका मानला जातो. रिट्ठसमुच्चय या ग्रंथाची भाषा शौरसेनी प्राकृत असून त्यात एकूण २६१ इतक्या गाथा आहेत. यात शकुन–अपशकुन तसेच शुभाशुभ गोष्टींचे संकलन केले आहे. याशिवाय चंद्र, सूर्यादीविषयी माहिती सांगून प्रश्नाक्षर, शकुन आणि स्वप्न यांचे विस्तारपूर्वक विवेचन केले आहे. अर्द्धकांडात ग्रहांच्या अनुसार तेजी–मंदीचा विचार करण्यात आला आहे. या ग्रंथात एकूण १४९ इतक्या गाथा असून त्या प्राकृतमध्येच आहेत.

मल्लिसेन–

मल्लिसेनांचा काल साधारणपणे इ. स. १०४३ इतका मानला जात असून, ते संस्कृत–प्राकृत दोन्ही भाषेचे प्रकांड पंडित होते. त्यांच्या पित्याचे नाव जिनसेनसूरि असून ते धारवाडमधील गदग तालुक्यातील रहिवासी होते. त्यांनी 'आयसद्भाव' या ग्रंथाची रचना केली. सुग्रीवादि जैन मुनींच्या रचनेच्या द्वारे या ग्रंथाची त्यांनी रचना केली असावी. या ग्रंथरचनेत एकूण १९६ इतकी पद्ये आहेत. त्यात ध्वज, धूम, सिंह, मंडल, वृष इत्यादि आर्यांचे स्वरूप आणि त्यांचा फलादेश सांगितला आहे.

भट्टवोसरी–

भट्टवोसरी हे दिगंबराचार्य दामनंदी यांचे शिष्य असून, त्यांनी 'आयज्ञानतिलक' या ज्योतिष ग्रंथाची रचना केली. या ग्रंथावर एक स्वोपज्ञ वृत्ति असून या ग्रंथात २५ प्रकरण व ४१५ इतक्या गाथा आहेत. भट्टवोसरि यांचे गुरु दामनंदी यांचा उल्लेख श्रवणबेळगोळमधील शिलालेख नं. ५५ मध्ये उल्लेख मिळतो. यावरून त्यांचा काळ वि. सं. ११ वे शतक असावा. या ग्रंथात प्रश्न–फलादेशाचे वर्णन करून कार्य–अकार्य, जय–पराजय सिद्धि–असिद्धि यांचे विस्तृत विवेचन केले आहे. प्रश्नशास्त्रदृष्ट्या प्रस्तुत ग्रंथ महत्वाचा आहे.

उदय प्रभदेव–

उदय प्रभदेव यांनी 'सिद्धि अपरनामा व्यवहारचर्या' या ग्रंथाची रचना केली. रचनाकाल सुमारे इ. स. १२२० इतका मानला जातो. यांच्या गुरूचे नाव विजयसेनसूरि असून, याच ग्रंथावर हेमहंस गणिने एक विस्तृत टीका लिहिली आहे. या टीकेत मुहूर्तासंबंधी गोष्टींचे सुंदर विवेचन केले आहे. व्यवहारचर्याविषयी हेमहंसाने म्हटले आहे की, 'मुहूर्तविषयक माहिती प्राप्त करण्यासाठी हा एक ग्रंथ देखील पुरेसा आहे.'

राजादित्य–

राजादित्य यांचा काळ सुमारे ११२० इतका मानला जात असून गणित ग्रंथ लेखक म्हणून त्यांची फार मोठी ख्याति आहे. त्यांनी व्यवहारगणित, व्यवहाररत्न, लीलावती इत्यादी गणिती ग्रंथाची रचना केली आहे. त्यांच्या पित्याचे नाव श्रीपति आणि मातेचे नाव वसन्ता होते. त्यांना राजवर्म, भास्कर आणि वाचिराज या विविध नांवानी संबोधिले जाते. ते विष्णूवर्धन राजाच्या दरबारी एक मुख्य विद्वान म्हणून होते.

**पद्मप्रभसूरि–**

पद्मप्रभसूरींचा काळ वि. सं. १३३६ इतका मानला जात असून, ते वादिदेव सूरीचे शिष्य होते त्यांनी भुवनदीपक, ग्रहभाव प्रकाश नामक ज्योतिष ग्रंथाची रचना केली आहे. याच ग्रंथावर सिंहतिलक सूरीचे एक विवृत्ति लिहिली आहे. त्यांचा भुवनदीपक हा छोटासा पण अत्यंत महत्वाचा ग्रंथ असून त्या ग्रंथात एकूण ३६ प्रकरणे आहेत. या ग्रंथाची भाषा संस्कृत असून एकूण १०० श्लोक आहेत.

**अर्हद्दास–**

अर्हद्दास कन्नड भाषेचे महान विद्वान असून त्यांनी कन्नडमध्ये 'अट्ठमत' नामक ज्योतिष ग्रंथाची रचना केली होती. त्यांचा काल इ. स. १३०० च्या आसपास मानला असून ते जैन ब्राह्मण होते. त्यांच्या पित्याचे नाव नागकुमार होते. भास्कर नावाच्या एका आंध्र कवीने या ग्रंथाचा अनुवाद तेलगू भाषेत केला होता. या ग्रंथात वर्षावाची चिन्हे, भूकंप, उत्पाद लक्षण, गर्भलक्षण, परिवेष लक्षण यांचे विवेचन केले आहे.

**नरचन्द्र उपाध्याय–**

नरचंद्र उपाध्याय यानी जातकवृत्ति, प्रश्न शतक, प्रश्न चतुर्विंशतिका, जन्मसमुद्रटीका, लग्न विचार ज्योतिषप्रकाश या ग्रंथाची रचना केली असून त्यांचा काळ सं. १३२४ मानला जातो. त्यांनी वेडाजातक नावाच्या महान वृत्तीची रचना केली असून, त्यातील एकूण श्लोक संख्या १०५० इतकी आहे. त्यांची ज्ञानदीपिका नावाची एक अन्यरचना असावी.

**ठक्कर फेरू–**

यांचा काल १४ वे शतक मानला जात असून त्यांनी गणितसार व जोइससार या दोन महत्त्वपूर्ण ग्रंथाची रचना केली. गणितसारमध्ये पाटीगणित आणि परिकर्माष्टक यांची मीमांसा केली आहे. जोइससारमध्ये नक्षत्रांच्या नामावलीपासून ग्रहांच्या विविध योगांचे योग्य विवेचन केले आहे.

वर उल्लेखित सर्व ज्योतिषकार व त्यांच्या ज्योतिष ग्रंथाशिवाय जिनवल्लभरचित स्वप्नसंहिता, जयविजयकृत शकुनदीपिका, हर्षकीर्तीकृत जन्मपत्रपद्धति, पुण्यतिलककृत ग्रहायुसाधन, गर्गमुनिरचित पासावली, जिनसेनकृत निमित्तदीपक, समुद्र कविरचित सामुद्रिकशास्त्र, मानसागर इत्यादि ग्रंथ महत्त्वाचे असून निनावी असणारे ज्योतिषसार, ज्योतिषसंग्रह, शकुनसंग्रह, शकुनदीपिका, शकुनविचार, ग्रहयोग ग्रहफल सारखे अनेक ग्रंथ आहेत. आतापर्यंत ज्योतिषशास्त्राविषयीचे सुमारे ५०० ग्रंथ तरी असल्याचे दिसून येतात.

**आर्वाचीन कालातील ज्योतिष साहित्य–**

प्राचीन मध्ययुगीन कालाप्रमाणेच ज्योतिष शास्त्र सरिता प्रवाहित ठेवण्याचे काम अर्वाचीन कालात देखील काही विद्वानांनी केलेले दिसून येते. यामध्ये प्रामुख्याने मेघविजयगणि, उभयकुशल, लब्धचंद्रगणि, बाधती मुनि, यशस्वतसागर इत्यादीच्या ग्रंथांचा उल्लेख करणे अत्यावश्यक आहे.

**मेघविमयगणि–**

मेघविजयगणि यांचा काल सुमारे वि. स. १०३६ मानला जात असून ते ज्योतिषशास्त्राचे प्रकांड पंडित होते. त्यांनी वर्षप्रबोध, उदयदीपिका, रमलशास्त्र आणि हस्तसंजीवन इत्यादि ग्रंथाची रचना केली. वर्षप्रबोध ग्रंथामध्ये १३ अधिकार व ३५ प्रकरणे आहेत. यात शकुनादि विषयाबरोबरच उत्पात, सूर्य–चंद्रग्रहण, मास, वायुविचार यांचे विवेचन केले आहे. हस्तसंजीवनीमध्ये दर्शनाधिकार, स्पर्शनाधिकार व विमर्शनाधिकार हे तीन अधिकार असून सामुद्रिक शास्त्राच्या दृष्टीने हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

### महेन्द्रसूरि–

महेन्द्रसूरींनी यंत्रराज नामक ग्रंथाची रचना केली असून हा ग्रंथ ग्रह गणितावरील एक प्रमुख ग्रंथ मानला जातो. ते मदनसूरीचे शिष्य असून फिरोजशाह तुघलकाचे मुख्य सभापंडीत होते. महेन्द्रसूरीचे शिष्य मलयेंदूसूरि असून त्यांनी या ग्रंथावर सोदाहरण टीका लिहिली आहे. या ग्रंथाची रचना संवत १२९२ मध्ये झाली असून त्यात गणिताध्याय, यंत्रघटनाध्याय, यंत्ररचनाध्याय व यंत्रशोधनाध्याय व यंत्रविचारणाध्याय हे पाच अध्याय आहेत. विभिन्न यंत्राद्वारे व गणिताद्वारे ग्रहाविषयक गणिताचे यात सुंदर विवेचन केले आहे. याच ग्रंथात पंचांग निर्माण करण्याविषयीची माहिती दिली आहे.

### समंतभद्र–

या समंतभद्रांचा काल १३ वे शतक मानला जात असून त्यानी केवलज्ञान प्रश्नचूडामणि ग्रंथाची रचना केली. हे समंत विजयपत्रांचे पुत्र असून या ग्रंथात त्यांनी धातु, मूल, जीव, नष्ट, मुष्टि, लाभ, हानि, रोग, मृत्यु भोजन, शयन, जन्म, कर्म, अस्त्र, शस्त्र, वृष्टि, अतिवृष्टि, सिद्धी, असिद्धी, यांचे विस्तृत विवेचन केले आहे. अक्षरांचे विविधवर्ग देखील यात सांगितले आहेत. प्रश्नशास्त्राच्या दृष्टीने हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

### हेमप्रभ–

हेमप्रभांनी त्रैलोक्यसार या अत्यंत महत्त्वपूर्ण ग्रंथाची रचना केली असून त्यांचा काल सुमारे चौदावे शतक मानला जातो. मेघमाला ही त्यांची दुसरी महत्त्वाची ग्रंथरचना मानली जाते. यांच्या गुरुंचे नाव देवेन्द्रसूरि असे होते. त्रैलोक्यसार ग्रंथात एकूण ११६० इतके श्लोक असून, या ग्रंथाध्यायनावरून फलित ज्योतिषाविषयी सुंदर माहिती मिळते. प्रारंभीच्या ११० श्लोकात लग्नज्ञानाचे विवेचन असून नंतर विविध प्रकरणातून शत्रू–मित्र, उच्च–नीच्चता, भावराशि, ग्रहवल, राज्यप्राप्ति, संतानप्राप्ति, विद्याप्राप्ति, याविषयीची माहिती दिली आहे या ग्रंथाची शैली अत्यंत सरळ, सुबोध व ओघवती असून विविध गोष्टींचे केलेले विवेचन अन्यत्र पाहावयास देखील मिळत नाही.

### लब्धचंद्रगणि–

यानी वि. सं. १०५१ कार्तिक महिन्यात जन्मपत्री पद्धति नावाचा एक व्यवहारोपयोगी ज्योतिष ग्रंथ लिहिला. ते खरतरगच्छीय कल्याणनिधान यांचे शिष्य होते. जन्मपत्री पद्धति या ग्रंथात योग्य काल नवग्रहांचे स्पष्टीकरण. द्वादशभाव, तात्कालिक चक्र, दशवल या बाबींचे विवेचन केले आहे.

### बाघजी मुनि–

यांचा काल वि. सं. १०८३ मानला जात असून, ते पार्श्व चंद्रगच्छीय शाखेचे मुनि होते. त्यांनी तिथिसारिणी या ग्रंथाची रचना केली. ज्योतिषशास्त्राविषयीचा हा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ आहे. यांचे फलित ज्योतिष व मुहूर्तसंबंधी आणखी दोन-तीन ग्रंथ आहेत यांनी लिहिलेला सारणी ग्रंथ मकरंद सारणीप्रमाणे आहे.

### यशस्वतसागर–

याना जसवंतसागर या नावाने देखील संबोधिले जाते. ते न्याय, ज्योतिष, दर्शन, व्याकरण इत्यादींचे प्रकांड पंडित होते. त्यांनी ग्रहलाघववर वार्तिक नावाची टीका लिहिली आहे. वि. स. १०६२ मध्ये त्यांनी जन्मकुंडली विषयाधारे 'यशोराज पद्धति' नामक व्यवहारोपयोगी ग्रंथाची रचना केली आहे या ग्रंथात जन्मकुंडलीविषयी विशेष माहिती दिली आहे

उभयकुशल–

उभयकुशल हे फलित ज्योतिषाचे एक महान् विद्वान मानले जात असून त्यांचा काल साधारणपणे १८ वे शतक इतका मानला जातो. त्यांनी विवाहपटल व चमत्कारचिंतामणी टवा या दोन ग्रंथांची रचना केली. उभयकुशल हे मुहूर्त व जातक या दोन्ही विषयांचे ज्ञाते होते. चिंतामणी टबामध्ये द्वादश भावासह ग्रह फलोद्वेषाचे वर्णन केले आहे. विवाहपटल ग्रंथात मुहूर्त व कुंडली मिलन यांचे सुंदर विवेचन केले आहे.

ज्योतिषशास्त्राविषयीच्या उल्लेखित या सर्व ग्रंथाखेरीज मेघराज, विनयकुशल, हरिकुशल, जिनपाल, जयरत्न, सूरचंद्र या ज्योतिष पंडितांचे ज्योतिषशास्त्रविषयक ग्रंथ उपलब्ध आहेत. त्या सर्वांचे येथे विवेचन करणे शक्य नाही.

सर्व जैन ज्योतिष साहित्याचे अवलोकन केले असता आपणाला असे दिसून येईल की, ज्योतिषशास्त्राच्या या विविध ग्रंथातून संक्षेपाने मुहूर्त, सामुद्रिकशास्त्र, प्रश्नशास्त्र, निमित्तशास्त्र, अंकगणित, बीजगणित, रेखागणित, पंचांगनिर्माण गणित, स्वप्नशास्त्र या नानाविध गोष्टींचे विवेचन करण्यात आले आहे. आजदेखील जैन ज्योतिषशास्त्रावर अनेक टीपा टीप्पणी लिहिल्याच्या आढळतात. थोडक्यात अतिप्राचीन कालपासून आजपर्यंत ज्योतिष शास्त्रावर अनेक विद्वानांनी ग्रंथरचना करून ज्योतिषशास्त्ररूपी गंगोत्रीला अधिक प्रवाहित तथा गतिमान करण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो.

आधुनिक कालाच्या दृष्टीने या सर्व साहित्याकडे पाहिले तर त्यात सहजासहजी विशेषतः जाणवणार नाही. परंतु आजच्या यंत्रयुगाने जे काही नवनवीन ग्रह-ताऱ्यांचे तथा ज्योतिर्लोकाचे सूक्ष्म निरीक्षण केले आहे व करताहेत त्या सर्वांना हे साहित्य एका प्रेरक शक्तीच्या स्वरूपात उपयोगी पडले आहे व पडणार आहे यात शंका नाही. अजूनही या ज्योतिषशास्त्राविषयी अधिक सखोल ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न केला तर ते अधिकच उपकारक ठरणार आहे. किंबहुना त्यापासून काही नवीन कल्पना प्राप्त होण्याची दाट शक्यता आहे. ही सर्व शास्त्रे भारतीय संस्कृतीची खास वैशिष्ठ्ये असून त्यांचे सखोल अध्ययन होणे आवश्यक आहे.

## जैन भूगोल

भूगोलामध्ये सर्वसाधारणपणे पृथ्वी, तिच्या चोहोबाजूचे वायुमंडळ, भूगर्भातील रचना तसेच आकाशातील सौरमंडळाचे स्वरूप, त्यामध्ये राहणारे प्राणी, त्याच्यापासून उत्पन्न होणारे पदार्थ व त्यांचा एकमेकाबरोबर असणारा संबंध; पर्वत, नद्या, द्वीप, महाद्वीप, वन, सागर इत्यादि विषयांचे सर्व विवेचन भूगोलामध्ये येते. पृथ्वी प्रत्यक्षात अस्तित्वात असल्यामुळे पृथ्वी मंडलाची रचना सर्वांना मान्य आहे. परंतु पृथ्वीवरील अन्य गोष्टींची माहिती मिळविण्यासाठी अनुमान करणे हाच एक उपाय आहे. आधुनिक युगात यंत्राद्वारे जरी विविध भूखंडाचे वर्णन तथा माहिती एकत्रित करणे शक्य असले तरी, सबंध पृथ्वी व्यापापुढे ही यंत्रसामुग्री अगदी अपुरी आहे. यंत्रापेक्षाही विश्वातील अनेक योग्यांची तथा विद्वानांची दृष्टि अगदी सूक्ष्म असलेली आढळते. कारण या महान् योगी लोकानी आपल्या ज्ञानाच्या द्वारे विश्वातील विविध गोष्टीचे सूक्ष्मपणे विवेचन केलेले दिसते. आजपर्यंत तरी भूगोलाचा आधार म्हणून या योगि लोकांच्या ज्ञानाचाच आधार घेतलेला दिसतो. जैन, वैदिक, बौद्ध इत्यादि विविध दर्शनकारांनी आपापल्या रीतीने या विषयाचे विवेचन केले आहे. या सर्वांची मते जरी भिन्न भिन्न असली तरी ती काही अंशाने सारखीच असलेली दिसतात. जैन व वैदिक भूगोल एकमेकाशी बऱ्याच अंशानी मिळता-जुळता असलेला दिसतो. अर्थात् वर्तमानकालामध्ये या गोष्टींची प्रत्यक्षता पडताळता येत नसली तरी आधुनिक विद्वानांनी आचार्यांच्या या कथनाचे अधिक सूक्ष्म रीतीने अवलोकन तथा अभ्यास केला तर, काही सत्यता त्यातून बाहेर पडण्याची शक्यता वाटते.




भौगोलिक साहित्य निर्माण करण्यामध्ये जैन आचार्यांचे योगदान महान आहे. सर्वसाधारणपणे भौगोलिक गोष्टींचे विवेचन करणानुयोगामध्ये समाविष्ट करण्यात आले आहे. जैन भूगोलाविषयीची माहिती आपणाला तिलोयपण्णत्ति, सूर्यप्रज्ञप्ति, चंद्रप्रज्ञप्ति, जंबूद्वीपप्रज्ञप्ति इत्यादि प्राकृत ग्रंथातून तथा संस्कृत प्राकृत अन्य प्राचीन व अर्वाचीन अशा लोकविभाग, तत्त्वार्थराजवार्तिक, धवला-जयधवला टीका, जंबूद्वीप-प्रज्ञप्तिसंग्रह त्रिलोकसार व त्रिलोकदीपिका या विविध ग्रंथातून मिळते.

जैन भूगोल या प्रस्तुत लेखामध्ये जैन परंपरेनुसार सांगितलेला भूगोल अधो, मध्य व उर्ध्व लोकांचे वर्णन विस्तार, जंबूद्वीप, जंबूद्वीपातील पर्वत, नद्या, क्षेत्रनिर्देश, पर्वत, सागर इत्यादींची माहिती देऊन पुढे वैदिक-बौद्ध दर्शनानुसार सांगितलेला भूगोल, आधुनिक विश्वाचा परिचय, त्यांचे तुलनात्मक विवेचन, जैन भूगोलाचा समन्वय वगैरे गोष्टींचे विवेचन करण्याचा प्रयत्न केला आहे.

## जैन परंपरागत भूगोल¹–

या अनंत आकाशातील जो अनादि अकृत्रिम भाग आहे, ज्यामध्ये जीव पुद्गलादि षट्द्रव्य समुदाय आहे त्याला 'लोक' असे म्हणतात. आकाशाशी तुलना करता हा लोक अति लहान आहे. 'लोक नावाने प्रसिद्ध असणारा आकाशाचा हा खंड मनुष्याकार आहे. तो चोहोबाजूंनी तीन प्रकारच्या वायूने वेष्ठिला गेला आहे. लोकाच्या वरपासून खालपर्यंतच्या भागामध्ये एक राजू प्रमाण विस्ताराने युक्त त्रसनाली आहे. त्रस जीव याच्याबाहेर राहू शकत नाहीत. मात्र स्थावर जीव सर्वत्र राहतात. हा लोक तीन भागात विभक्त केला आहे–
१. अधोलोक, २. मध्यलोक, ३. ऊर्ध्वलोक.

अधोलोकात नारकी जीव रहात असून, तेथे दुःखमय व भयंकर असे सात नरक आहेत. पापी जीव मरण पावून तेथे जन्म घेतात. ऊर्ध्वलोकात करोडो योजन अंतरावर एकावर एक असे एकूण १६ स्वर्ग असून, तेथे कल्पवासी विमाने आहेत. पुण्यात्मे मृत्यू पावल्यानंतर तेथे जन्म घेतात. त्यावर पुनः भवावतारी लोकांचे राहण्याचे ठिकाण आहे. लोकाच्या वर सिद्धलोक आहे. तेथे मुक्तजीव ज्ञानमात्र शरीरसहित राहतात. मध्यलोकात वलयाकाररूपाने स्थित असंख्यात द्वीप व समुद्र एकानंतर एकाला वेष्ठित झालेले आहेत. जंबू, धातकी, पुष्कर इत्यादि द्वीप असून, लवणोद, कालोद, वारुणीवर, क्षीरवर, इक्षुवर इत्यादि समुद्र आहेत. प्रत्येक द्वीप व समुद्र पूर्वपेक्षा दुप्पट विस्ताराने विस्तृत होत गेले आहेत. सर्वांच्या मध्ये जंबूद्वीप आहे. त्याच्यामध्ये सुमेरु पर्वत आहे. पुष्कर द्वीपाच्या मध्ये वलयाकार मानुषोत्तर पर्वत आहे. ज्यामुळे त्याचे दोन भाग होतात.

जंबूद्वीप, धातकी व पुष्कर यांचा अर्धभाग मिळून २॥ द्वीप आहेत. यात मनुष्याचा निवास आहे. शेष द्वीपात तिर्यंच, भूतप्रेत तसेच व्यंतरदेव राहतात. जंबूद्वीपात सुमेरू पर्वताच्या दक्षिणेला हिमवान, महाहिमवान व निषध तसेच उत्तरेला नील, रुक्मि व शिखरी हे सहा कुलपर्वत आहेत. ते या जंबूद्वीपाला भरत, हैमवत, हरि विदेह, रम्यक, हैरण्यवत व ऐरावत इत्यादी सात क्षेत्रात विभक्त करतात. प्रत्येक पर्वतावर एकेक महासरोवर आहे. त्यातून दोन-दोन नद्या उगम पावून प्रत्येक क्षेत्रात पूर्व-पश्चिम दिशेने वहात लवण सागरात समाविष्ठ होतात. एकंदर १४ नद्या आहेत. त्या नद्या आपापल्या क्षेत्रातील इतर अनेक अन्य नद्यांना स्वतःमध्ये समाविष्ठ करून घेतात. भरत व ऐरावत क्षेत्राच्यामध्ये एकेक विजयार्धपर्वत आहे. या क्षेत्रातील दोन दोन नद्यामुळे व पर्वतामुळे या क्षेत्राचे सहा खंडात विभाजन होते. यातील मध्यवर्ती खंडात आर्य लोक राहतात व शेष खंडात म्लेच्छ लोक राहतात. या दोन्ही क्षेत्रात धर्म–कर्म, सुख–दुःख यांची हानी व वृद्धि होत असते. इतर क्षेत्र पूर्ववत् राहतात.

विदेह क्षेत्रात सुमेरूच्या दक्षिण व उत्तरेकडे निषध व नील, पर्वतस्पर्शी सौमनस, विद्युत्प्रभ तसेच गंधमादन व माल्यवान नावाचे दोन दोन गजदंताकार पर्वत आहेत. यांच्यामध्ये देवकुरु व उत्तरकुरू नावाच्या दोन

१. जैनेंद्र सिद्धांत कोश पृ






उत्कृष्ट भोगभूमी आहेत. तेथील मानव व तिर्यंच काही कार्य न करता अति सुखाने आपले जीवन व्यतीत करतात. त्यांचे आयुष्य देखील असंख्यात वर्षांचे असते. या दोन्ही क्षेत्रात जंबू, शाल्मली नावाचे दोन वृक्ष आहेत. जंबू वृक्षामुळेच या द्विपाचे नाव जंबूद्विप असे पडले आहे. याच्या पूर्व व पश्चिम भागात प्रत्येकात १६-१६ क्षेत्र आहेत. याला ३२ विदेह असे म्हणतात. यांचे तेथील पर्वत व नद्यामुळे विभाग झाले आहेत. प्रत्येक क्षेत्रांत भरतक्षेत्राप्रमाणे सहा खंडाची रचना झाली आहे. या क्षेत्रात कधी धर्मविच्छेद होत नाही. दुसऱ्या तिसऱ्या अर्ध द्वीपामध्ये पूर्व पश्चिम विस्ताराच्या मध्यभागी एक सुमेरू आहे. सुमेरूशी संबंधीत सहा पर्वत व सात क्षेत्रे आहेत. त्यांची रचना वरीलप्रमाणेच आहे. लवणोदकाच्या तळाशी अनेक पाताळ आहेत. ज्याच्यातील वायूच्या हानि-वृद्धीमुळे सागर जलात देखील कमि-अधिकता निर्माण होते. पृथ्वीतलापासून ७९० योजने वर आकाशात क्रमाने तारे, सूर्य, चंद्र, नक्षत्र, बुध, शुक्र, बृहस्पति, मंगळ व शनिचर इत्यादि जोतिष ग्रह आहेत. ते सदैव सुमेरूला प्रदक्षिणा घालून फिरत राहतात. यामुळेच दिवस, रात्र, पाऊस, इत्यादि गोष्टींची उत्पत्ति होते. जैन परंपरेनुसार सूर्याला चंद्राच्या मानाने छोटे समजले आहे.

यापुढे अधोलोक, मध्यलोक व उर्ध्वलोक यांच्या माहितीबरोबरच लोकाचे लक्षण, लोकाचा आकार लोकाचा विस्तार, वातवलयांची माहिती, त्रस स्थावर जीवांचा निर्देश यांचे थोडक्यात विवेचन केले आहे.

### लोकाचे लक्षण–

नियुक्तिनुसार आकाशाच्या जितक्या भागात जीव पुद्गलादि षट्द्रव्य दिसतात तो 'लोक' आहे. त्याच्या चारी बाजूना शेष अनंत आकाश 'अलोक' आहे असा लोकाचा अर्थ सांगितला आहे. अथवा षट्द्रव्याचे एकत्रीकरण म्हणजेच लोक होय. जन्म-जरामरणरूप या संसारालाही लोकच म्हटले आहे. तसे पाहता लोक याचा अर्थ 'आत्मा' आहे. शिवाय जेथे पुण्य-पाप यांचे फल व सुख-दुःख दृष्टीस पडते तो लोक म्हणूनच ओळखला जातो. लोक हाच आत्मा असल्यामुळे तो आत्मा स्वतःच्या स्वरूपाचे अवलोकन करतो. थोडक्यात सर्वज्ञाद्वारा पाहिला जाणारा तो 'लोक' होय.

### लोकाचा आकार–

लोकाचे प्रामुख्याने अधो, मध्य व ऊर्ध्व असे तीन प्रकार आहेत. त्यातील अधोलोकाचा आकार वेत्रासनाप्रमाणे आहे. मध्यलोकाचा आकार उभ्या केलेल्या अर्ध्या मृदंगाच्या वरच्या भागाप्रमाणे आहे. ऊर्ध्वलोकाचा आकार उभ्या केलेल्या मृदंगाप्रमाणे आहे.

### लोकाचा विस्तार–

लोकाचा विस्तार दक्षिण उत्तर जगश्रेणी प्रमाण अर्थात, सात राजू इतका आहे. पूर्व व पश्चिम भागात भूमि आणि मुखाचा व्यास क्रमाने सात, एक, पाच आणि एक राजू इतका आहे तात्पर्य असे की, या लोकाचा विस्तार सर्वत्र सात राजू असून क्रमाने लोकाखाली सात राजू, मध्यलोकात एक राजू, ब्रह्मस्वर्गात पाच राजू व लोकांच्या अंती एक राजू आहे. संपूर्ण लोकाची उंची १४ राजू प्रमाण आहे. क्रमाने अधोलोकाची उंची सात राजू, मध्यलोकाची उंची १०,००,००० योजन व ऊर्ध्व लोकाची उंची एक लाख योजन इतकी आहे. कल्पातीत भूमीचा जो अंत आहे तोच लोकाचाही अंत होय.

### वातवलय–

घनोदधि, घनवात व तनुवात ही तीन वातवलये मानली असून, क्रमाने त्यांचा रंग गोमूत्राप्रमाणे मूगाप्रमाणे व अनेक वर्णाप्रमाणे मानला आहे. ही तिन्ही वातवलये वृक्षाच्या सालीप्रमाणे लोकाभवती पसरली




आहेत. यातील प्रथम घनोदधि वातवलय लोकाला आधारभूत आहे. त्यानंतरचे घनवातवलय असून तनुवातवलय शेवटी असते. त्यानंतर अंती निराधार आकाश आहे. ही तिन्ही वलये एकमेकाश्रित अशी आहेत.

**त्रसस्थावर उल्लेख–**

पूर्वोक्त वेत्रासन व मृदंगाकार लोकाच्या मध्यभागात लोक शिखरापासून अंतापर्यंत १४ राजू लांबी व मध्यलोकात एक राजू प्रमाण विस्ताराने युक्त अशी त्रसनाडी आहे. त्रसजीव या नाडीच्या बाहेर राहू शकत नाहीत. म्हणूनच ती 'त्रसनाली' नावाने प्रसिद्ध आहे. परंतु स्थावर जीव या लोकात सर्वत्र आढळतात. सूक्ष्म जीव सर्व लोकात ठासून भरलेले आहेत. बादर जीव त्रसनालीतच असतात.

**अधोलोकाची सामान्य माहिती–**

सर्व लोक अधो, मध्य व ऊर्ध्व लोकात विभाजित करण्यात आला आहे. मेरू तळाच्या खालच्या क्षेत्राला अधोलोक असे म्हणतात. तो वेत्रासनाच्या आकाराप्रमाणे आहे. तो ७ राजू उंच व ७ राजू मोठा आहे. तो खाली ७ राजू व वर १ राजू प्रमाण एवढा रुंद आहे. यात वरपासून खालपर्यंत क्रमाने रत्नप्रभा, शर्कराप्रभा, वालुकाप्रभा, पंकप्रभा, धूमप्रभा, तमःप्रभा व महातमःप्रभा नावाचे ७ नरक आहेत. १ राजू प्रमाणात स्थित आहेत. या प्रत्येकात पटले असून ती १०० योजन अंतरात स्थित आहेत. एकूण ४९ इतकी पटले आहेत. प्रत्येक पटलात विविध बिळे व गुहा आहेत. पटलाचे मध्यवर्ती बीळ इंद्रक नावाने ओळखले जाते. इतर विविध बिळात नारकी जीव राहतात. सात नरकानंतर शेवटी १ राजू प्रमाण क्षेत्र मोकळे आहे. तेथे निगोद जीव राहतात.

तत्त्वार्थसूत्राप्रमाणे रत्नप्रभा नरकात रत्नासारखा प्रकाश, शर्कराप्रभात साखरेसारखा पांढरा प्रकाश असून, वालुका नरकात वाळू, रेती यांची प्रधानता आहे. धूमप्रभात धूर अधिक असून तमःप्रभात अंधकार आणि महातमःप्रभात महान अंधकार आहे. या सातही नरकांची नावे क्रमशः धर्मा, वंशा, मेघा, अजना, रिष्ठा, मघवी आणि माघवी अशी आहेत. यातील रत्नप्रभाचे तीन कांड असून प्रथम खरकांड १६ हजार योजन, दुसरे पंकबहुलकांड ८४ हजार योजन व त्याखाली जलबाहुल ८० हजार योजन आहे. तिन्ही कांडाची प्रमाणता १ लाख ८० हजार आहे. हे कांड एकमेकावर आधारित आहेत. या विविध प्रकारच्या नरकामध्ये उष्णता व थंडी यांचे भयंकर दुःख असते. तहान व भूक यांचे दुःख तर नारकी जीवांच्या बाबतीत विचारावयास नको. अग्निज्वालेपेक्षा भूकज्वाला भयंकर असते. या सातही नरकात राहणाऱ्या जीवांचे आयुष्य क्रमाने १, ३, ७, १०, १७, २२, ३३ सागर इतके असते. ते कृष्ण, नील, कापोत इत्यादि लेश्याधारी असतात. त्यांची प्रस्तर संख्या अनुक्रमे १३, ११, ९, ७, ५, ३, १ असून त्यांचे आयुष्य क्रमाने १०,००० वर्ष १, ३, ७, १०, १७, २२ इतके आहे.

**भावनलोक उल्लेख–**

रत्नप्रभा नामक पृथ्वीभाग हा खर भाग, पंक भाग व अब्बहुल या तीन भागात विभाजित आहे. खरभाग १६ प्रस्तरामध्ये विभाजित असून, प्रत्येक प्रस्तर १००० योजन इतका मोठा आहे. त्यातील चित्रा नावाचा प्रस्तर विविध रत्न व धातूंनी युक्त आहे. तेथे खर व पंक भागात भवनवासी देवांचे निवासस्थान आहे. म्हणूनच याला भावनलोक म्हटले आहे. यात भवनवासी देवांचे निवासक्षेत्र, त्यांचे भेद, चिन्ह, भवनसंख्या, दक्षिण-उत्तर इंद्रांचा विभाग, त्यांच्या भवनाचे प्रमाण, भवनवासी देवाचे आयुष्य इत्यादीचे वर्णन यात केले आहे.

**मध्यलोकाचे सामान्य वर्णन–**

तनुवात वलयाच्या अंतभागापर्यंत तिर्यक्लोक अर्थात् मध्यलोक स्थित आहे. मेरू पर्वत एक लाख योजन असून त्याच मेरू पर्वतामुळे मध्यलोकाची वरची व खालची मर्यादा निश्चित केली आहे. यात असंख्यात




द्वीप, समुद्र एक दुसऱ्यांना वेष्ठीत आहेत. म्हणूनच या सर्वाला तिर्यकलोक म्हणतात. या तिर्यक लोकाच्या मध्यवर्ती जंबूद्वीपापासून मानुषोत्तर पर्वतापर्यंत अडीच द्वीप व दोन सागर यांनी युक्त ४५००००० योजन प्रमाण क्षेत्र मनुष्यलोक आहे. देवांच्या द्वारे देखील त्यांना मानुषोत्तर पर्वताच्या इतर भागात जाता येत नाही. मनुष्य लोकातील या अडीच द्वीपापैकी जंबूद्वीपामध्ये एक व धातकी, पुष्करार्ध द्वीपामध्ये दोन-दोन मेरू पर्वत आहेत. प्रत्येक मेरूला संबंधित ६ कुलधर पर्वत आहेत. त्यामुळे ते क्षेत्र ७ क्षेत्रात विभाजित झाले आहे. मेरूच्या प्रणिधि भागात दोन कुरू तथा मध्यवर्ती विदेह क्षेत्राच्या पूर्व पश्चिमवर्ती दोन विभाग होतात. त्यात प्रत्येकी ८ वक्षार पर्वत, ६ विभंगा नद्या व १६ क्षेत्र आहेत. वरील ७ व ३२ क्षेत्रातील प्रत्येकात दोन मुख्य नद्या आहेत. ७ क्षेत्रातील दक्षिणी व उत्तरीय अशी दोन क्षेत्रे व ३२ विदेह या सर्वांच्या मध्यभागी एकेक विजयार्ध पर्वत आहे. तेथे विद्याधरांची वस्ती असते. अंतिम द्वीप, सागरात कर्मभूमि आहे. अन्य द्वीप व सागरात सदैव भोगभूमीची व्यवस्था असते. पट्कर्म व धर्मकार्यासंबंधी अनुष्ठान जेथे केले जाते ती कर्मभूमि होय व जेथे जीव काही न करता प्राकृतिक पदार्थांच्या साह्याने उत्तम भोग भोगतात व सुखपूर्वक जीवन व्यतित करतात ती भोगभूमि आहे. विदेह क्षेत्रात त्रिकाल उत्तम प्रकारची कर्मभूमि असते. तीन कालात उत्तम, मध्यम व जघन्य भोगभूमि आणि तीन कालात उत्तम, मध्यम व जघन्य स्वरूपात कर्मभूमि असते. भोगभूमीत जीवाचे आयुष्य, बल व सुख क्रमाने वृद्धिंगत होते. तर कर्मभूमीत त्याची क्रमशः हानि होते.

### ज्योतिष लोक–

चित्रा पृथ्वीपासून ७९० योजन वरपर्यंत जाऊन व ११० योजनपर्यंत आकाशात एक राजू प्रमाण विस्तृत ज्योतिष लोक आहे. खालून वरपर्यंत क्रमाने तारागण सूर्य, चंद्र, नक्षत्र, शुक्र, बृहस्पति, मंगल, शनि व शेष अनेक ग्रह आहेत. ते आपापल्या संचार क्षेत्रानुसार मेरू पर्वताला प्रदक्षिणा घालतात. यातील चंद्र इंद्र व सूर्य प्रतींद्र आहे. १ सूर्य, ८८ ग्रह, २८ नक्षत्र व ६६९७५ तारे हा एकट्या चंद्राचा परिवार आहे. जंबूद्वीपात २, लवणसागरात ४, धातकी खंडात १२, कालोदकात ४२ व पुष्करार्धात ७२ चंद्र आहेत. हे सर्व चल अर्थात् चालणारी ज्योतिष विमाने आहेत. त्याच्यापुढे पुष्करार्धात ८, पुष्करोदमध्ये ३२, वारूणीवर द्वीपात ६४ आणि त्याच्या पुढील सर्व द्वीप समुद्रात उत्तरोत्तर दुप्पट चंद्रमा आपल्या परिवारासहित राहतात. ही अचर ज्योतिष विमाने आहेत.

### ऊर्ध्व लोकाचे सामान्य वर्णन–

सुमेरू पर्वताच्या टोकापासूनच्या जवळील अंतरावरूनच ऊर्ध्वलोकाला प्रारंभ होऊन लोक शिखरापर्यंत १००४०० योजनयुक्त व ७ राजू प्रमाण ऊर्ध्वलोक आहे. लोक शिखरापासून २१ योजन ४२५ धनुष्य खाली स्वर्ग आहे. पुन: त्याच्यावर असलेल्या लोकशिखरावर सिद्धलोक असतात. स्वर्गलोकातील स्वर्गपटल वरवरती स्थिर होत जाते. या पटलात कल्प व कल्पातीत असे दोन विभाग आहेत. इंद्र सामानिक इत्यादि १० कल्पनायुक्त देव कल्पवासी आहेत आणि कल्पनारहित अहमिंद्र देव कल्पातीत विमानवासी आहेत. आठ युगलरूप स्थित अशी १६ कल्प पटले आहेत ती पुढीलप्रमाणे– सौधर्म, ईशान; सानत्कुमार, माहेंद्र; ब्रह्म ब्रह्मोत्तर; लान्तव, कापिष्ठ, शुक्र, महाशुक्र; शतार, सहस्त्रार; आनत, प्राणत; आरण व अच्युत यांच्यावर ग्रैवेयक, अनुदिश व अनुत्तर ही तीन कल्पातीत पटले आहेत. प्रत्येक पटल लाखो योजनाच्या अंतरावर स्थित आहे. अन्य पटले क्षुद्र आहेत. सर्व पटलांची संख्या ६३ इतकी आहे. प्रत्येक पटलात विमान आहे. नरकातील बिळाप्रमाणे ही विमाने देखील इंद्रक, श्रेणिबद्ध व प्रकीर्णकाच्या भेदानुसार तीन प्रकारात विभक्त आहेत. प्रत्येक क्षुद्र पटलात एकेक इंद्रक असून अनेक श्रेणीबद्ध-प्रकीर्णक आहेत. प्रथम महापटलात ३३ आणि अंतिम केवल एक सर्वार्थसिद्धि नावाचे इंद्रक आहे. याच्या चारी दिशेला केवळ एकेक श्रेणीबद्ध आहे. हा सर्व स्वर्गलोक म्हणून ओळखला जातो. सर्वार्थसिद्धि

विमानाच्या ध्वजदंडापासून २९ योजन व ४२५ धनुष्यवर सिद्धलोक आहे. तेथे मुक्त जीव स्थित आहेत. त्याच्यापुढे लोकाचा अंत होतो.

**जंबूद्वीप सामान्य वर्णन–**

असंख्यात द्वीप व समुद्रामध्ये १००,००० योजनाने युक्त असे जंबूद्वीप आहे. त्याच्या मध्यभागी मेरू पर्वत आहे. त्यात भरतवर्ष, हैमवतवर्ष, हरिवर्ष, विदेहवर्ष, रम्यकवर्ष, हैरण्यवतवर्ष आणि ऐरावतवर्ष ही सात वर्षे अर्थात् क्षेत्रे आहेत. त्या क्षेत्रांना विभाजित करणारे पूर्व-पश्चिम लांब असणारे असे हिमवान, महाहिमवान, निषध, नील, रुक्मी आणि शिखरी हे महा वर्षधर अथवा कुलाचल पर्वत आहेत. हे महा पर्वत क्रमाने सोने, चांदी, तप्त सुवर्ण, वैडूर्यमणि, चांदी आणि सोने यांच्यासमान वर्णाचे आहेत. यांचे पार्श्वभाग मण्यांच्यामुळे चित्र-विचित्र असून मूळ, मध्य व वरच्या भागात विस्ताराने सारखे आहेत. या कुलाचल पर्वताच्या व क्रमाने पद्म, महापद्म, तिगिंछ, केसरी, महापुंडरीक आणि पुंडरीक ही तळी आहेत. या तलावात विविध प्रकारची कमळे असून या कमळावर अनुक्रमे श्री, ह्री, धृति, कीर्ति, बुद्धि आणि लक्ष्मी या देवता राहतात. या देवता आपल्या देवांच्या परिवारासह राहतात. भरतादि क्षेत्रात क्रमाने गंगा, सिंधू रोहित् रोहितास्या हरित् हरिकान्ता सुवर्णकूला, रूप्यकूला, रक्ता-रक्तोदा नद्या वाहतात. यातील पहिल्या काही नद्या पूर्व समुद्रात तर इतर नद्या पश्चिम समुद्राला मिळतात.

याशिवाय या द्वीपाच्या चारी बाजूला विजय, वैजयंत, जयंत व अपराजित नावाची चार द्वारे आहेत. हे जंबूद्वीप अनेक वन, उपवन, कुंड, गोपुर, द्वार, देव, नगरी, पर्वत, नद्या, सरोवर, कुंड यांनी सुशोभित झाले आहे. येथील प्रत्येक पर्वत, कूट यावर भवनवासी व व्यंतरलोकांची भवने आहेत. या प्रत्येक पर्वतावर व देवांच्या भवनात जिन चैत्यालय असते.

**क्षेत्र वर्णन–**

जंबूद्वीपाच्या दक्षिणेकडे प्रथम भरतक्षेत्र असून त्याच्या उत्तरेला हिमवान पर्वत व तिन्ही दिशेला लवणसागर आहे. याच्यामध्ये लांबच लांब विजयार्ध पर्वत आहे. त्याच्या पूर्वबाजूला गंगा व सिंधू या नद्या वाहतात. विविध नद्यांच्या वाहण्यामुळे पुढे विजयार्धापासून विभक्त अशा सहा खंडाची उत्पत्ति होते. विजयार्धाच्या ... मध्यखंड, आर्यखंड असून बाकीचे पाच खंड म्लेंच्छ खंड आहेत. आर्यखंडाच्या मध्यभागी ... नावाची नगरी असून तेथील राजा चक्रवर्ती असतो. त्यानंतर हिमवान पर्वताच्या उत्तरेला हैमवत क्षेत्र ... मध्यभागी गोल असा नाभिगिरी पर्वत आहे. या क्षेत्राच्या पूर्वेला रोहित व पश्चिमेला रोहितास्या ... त्यानंतर महाहिमवान पर्वताच्या उत्तरेला व निषध पर्वताच्या दक्षिणेला तिसरे हरिक्षेत्र ... दक्षिणेला रम्यकक्षेत्र आहे. रुक्मीच्या उत्तरेला व शिखरी पर्वताच्या दक्षिणेला हैरण्यवत् ... उत्तरेला तथा नीलपर्वताच्या दक्षिणेला विदेह क्षेत्र आहे. सर्वात शेवटी शिखरी ... लागून सातवे ऐरावत क्षेत्र आहे. हे संपूर्ण भरतक्षेत्रवत् आहे.

१६ प्रस्तराम...
प्रस्तर विविध ...
याला भावनलोक ...
इंद्रांचा विमाग, त्यांच्या ...

**मध्यलोकाचे सामान्य वर्ण...**

...तनुवात वलयाच्या अंत... योजन असून त्याच मेरू पर्वतामुळे मध्य ...

...त्यांच्या सीमापार पूर्व-पश्चिम लांब असलेला प्रथम हिमवान पर्वत आहे. ... जिनायतन आणि इतर कूटावर योग्य नामधारी व्यंतरदेव देवतांची ... दिशेला महाहिमवान पर्वत आहे. यावर आठ कूट आहेत. तदनंतरचा ... त्यानंतर विदेह आणि रम्यक क्षेत्रांना विभक्त करणारा चौथा ... पश्चिम लंबायमान विजयार्ध पर्वत आहे. भूमितलापासून वर

१० योजन अंतरावर उत्तर-दक्षिण दिशेला विद्याधर नगरांच्या दोन श्रेणी आहेत. यातील दक्षिण श्रेणीत ५५ व उत्तर श्रेणीत ६० नगरे आहेत.

विदेह क्षेत्राच्या मध्यभागी सुमेरू पर्वत आहे. हा पर्वत तीर्थंकरांच्या जन्माभिषेकाचा आसनरूप मानला जातो. कारण तेथील सर्व तीर्थंकरांचा जन्माभिषेक देवांच्याकडून केला जातो. सुमेरू पर्वत तिन्ही लोकांचा मानदंड आहे. तसेच याची मेरू, सुदर्शन मंदर इत्यादि विविध नावे आहेत. मेरूचा आकार गोल असून पृथ्वीतलावर त्याचा आकार १०,००० योजन असून वरती ९,९०० योजन इतका आहे. शिखरावरचा याचा आकार १०० योजनच राहतो.

वनखंड उल्लेख–

सुमेरू पर्वताच्या तळभागी भद्रशाल नामक प्रथम वनाचा उल्लेख मिळतो. ते पाच भागात विभाजित केले आहे– भद्रशाल, मानुषोत्तर, देवरमण, नागरमण आणि भूतरमण. या वनाच्या चारी दिशेला चार जिनभवने आहेत. ती अनुक्रमे मेरू पर्वताच्या पूर्वेला, दक्षिणेला, पश्चिमेला व उत्तरेला आहेत. या वनात मेरूच्या चारी बाजूने वाहणाऱ्या सीता व सीतोदा नदीच्या तटावर एका पाठोपाठ एक असे आठ दिग्गजेंद्र पर्वत आहेत. २. भद्रशाल वनापासून ५०० योजन वर दुसरे वन आहे. त्याचे नंदन व उपनंदन असे दोन विभाग आहेत. यांच्या पूर्व दिशेच्या पर्वतांच्या जवळ क्रमाने मान, धारणा, गंधर्व व चित्र नावाची चार भवने आहेत. तेथे क्रमाने सौधर्म इंद्रातील चार लोकपाल सोम, यम, वरूण व कुबेर क्रीडा करीत असतात. तेथील मेरूच्या भागात चार दिशेला चार जिन भवने आहेत. तेथील कूटात दिक्कुमारी देवी राहतात. तेथे १६ पुष्करिणी आहेत. ३. नंदन वनापासून ६२,५०० योजन वर सुमेरू पर्वतावर सौमनस नावाचे तिसरे वन आहे. त्याचे सौमनस व उपसौमनस असे दोन विभाग आहेत. तेथील चारी दिशेला मेरूजवळ वज्र, वज्रमय, सुवर्ण व सुवर्णप्रभ नावाची चार नगरे आहेत. तेथे सोमादि लोकपाल क्रीडा करीत असतात. तेथील चारी दिशेला चार-चार पुष्करिणी आहेत. चारी दिशेला चार जिन भवने आहेत. तेथेच कूटामध्ये दिक्कुमारी देवी राहतात. ४. सौमनस वनापासून वर ३६,००० योजन मेरूच्या मस्तकावर पांडुक वन आहे. याचे दोन विभाग आहेत– पांडुक व उपपांडुक याच्या चारी बाजूला लोहित, अंजन, हरिद्र आणि पांडुक नावाची चार भवने आहेत. त्यात सोम इत्यादि लोकपाल क्रीडा करतात. चारी दिशेला चार-चार मिळून १६ पुष्करिणी आहेत. वनाच्या मध्यभागी चार जिन भवन आहेत. वनाच्या ईशान्य दिशेला पांडुकशिला, पांडुकंबला शिला, रक्तकंबला शिला आणि रक्तकवला शिला या चार शिला आहेत. या शिलांच्या वर क्रमशः भरत, अपरविदेह, ऐरावत आणि विदेहादि क्षेत्रातील तीर्थंकराचा जन्माभिषेक होतो.

कुंड निर्देश–

हिमवान पर्वताच्या मूलभागात २५ योजन बाजूला गंगा कुंड आहे. त्याच्या मध्यभागी एक द्वीप आहे व त्याच्या मध्यभागी एक शैल आहे. शैलावर गंगादेवीचा प्रासाद आहे. याचेच नाव 'गंगाकूट' असे आहे. त्या कूटावर एक जिनप्रतिमा असून तिच्या मस्तकावर गंगेचा प्रवाह पडत असतो. त्याचप्रमाणे सिंधू इत्यादि इतर नद्यांच्या खाली पडण्याच्या ठिकाणी आपापल्या क्षेत्रात आपापल्या पर्वताच्या खाली सिंधू इत्यादि कुंड आहेत. यांचे संपूर्ण वर्णन वरील गंगा कुंडाप्रमाणे आहे. मात्र भिन्नता एवढीच आहे की, तेथे रहात असलेल्या देवींची नावे तेथील नद्यांच्याप्रमाणेच आहेत. भरत क्षेत्रात विविध पर्वतावरील विविध कुंडे आहेत. विदेह क्षेत्रात गंगा, सिंधू, रक्त, रक्तोदा नावाच्या ६४ नद्यांची देखील आपापल्या नावाची कुंडे असून ती नील, निषध पर्वताच्या मूळ भागात स्थित आहेत. यांचे वर्णन देखील गंगा कुंडाप्रमाणेच आहे.

**नद्यांचा उल्लेख–**

पर्वत कुंड यांच्या उल्लेखाप्रमाणे आपणाला विविध नद्यांचा उल्लेख देखील जैन भूगोलात मिळतो. १. हिमवान पर्वतावरील पद्म सरोवराच्या पूर्वद्वारातून गंगा नदीचा उगम होतो. सरोवराच्या पूर्व दिशेला व नदीच्या मध्यभागी एक कमलाकार कूट आहे. तेथे बला नावाची देवी रहात असते. ही गंगानदी पुढे गंगाकूटाच्या आसपास प्रवाहित होत दक्षिणेकडे वळते. वृषभाकार प्रणालीच्या मुखातून बाहेर पडून, पर्वतावरून खाली उतरून गंगाकूटावर पडते व उत्तर भारतात दक्षिणामुखी वहात विजयार्धाच्या तमिस्त्र गुहेत प्रवेश करते. इतर नद्याना आपल्यामध्ये सामावून घेऊन दक्षिणेकडे जाते. त्यानंतर पूर्वेला वळून मागध तीर्थस्थानी लवण सागरामध्ये विलीन होते. या गंगानदीला इतर ठिकाणाहून येऊन मिळणाऱ्या नद्यांची संख्या १४००० इतकी आहे. २. यानंतरची महत्त्वाची मानली जाणारी सिंधू नदी आहे. या सिंधू नदीचे संपूर्ण वर्णन गंगा नदीप्रमाणेच आहे. तिची विशेषतः एवढीच की, ती पद्म सरोवराच्या पश्चिम द्वारातून उगम पावते. तिच्या कमलाकार असलेल्या कूटामध्ये लवणा देवी निवास करीत असते. ती विजयार्ध पर्वतातील गुहेमध्ये प्रवेश करते आणि त्यानंतर पश्चिमेच्या बाजूला वळून प्रभास तीर्थाच्या ठिकाणी लवण सागरामध्ये ती विलीन होते. ३. हिमवान पर्वतावरील पद्म सरोवराच्या उत्तर द्वारातून रोहितास्या नदी उगम पावते. ती उत्तराभिमुख होऊन वहात वहात रोहितास्य कुंडामध्ये स्थित होऊन रोहितास्य कूटावर पडते. पुढे ती नाभिगिरीपर्यंत वहात वहात जाते. पुढे पश्चिमादि दिशेला वहात जाऊन शेवटी लवण समुद्राला मिळते. हिच्या इतर नद्यांचा परिवार २८,००० इतका आहे. ४. पुढे महाहिमवान पर्वतावर महापद्म सरोवरातील दक्षिण द्वारातून रोहित नदी उगम पावते. ती दक्षिणेकडून वहात जाऊन रोहित कुंडामध्ये पडते आणि शेवटी लवण समुद्राला मिळते. तिला मिळणाऱ्या इतर नद्यांचा परिवार २८,००० इतका आहे.

वरील गंगा, सिंधू, रोहिता इत्यादि नद्याप्रमाणेच हरिकान्ता, हरित नदी, सीतोदा नदी, सीता नदी, नरकांता नदी, नारी नदी, रूप्यकूला नदी, सुवर्णकूला, रक्ता, रक्तोदा, विभंगा इत्यादि विविध नद्यांचा उल्लेख आपणाला जैन भूगोलामध्ये मिळतो. या नद्या विविध ठिकाणी उगम पावून पुढे समुद्राला मिळतात.

अशा प्रकारे जैन भूगोलामध्ये आपणाला विविध पर्वत, द्वीप, क्षेत्र, नद्या, कुंड इत्यादींचा उल्लेख मिळतो. ही सर्व माहिती सध्यस्थितीमध्ये यथायोग्य वाटत नसली तरी पुढे केलेल्या तुलनात्मक विवेचनावरून त्यातील काही गोष्टींची साम्यता आधुनिक विश्वाशी मिळती जुळती असल्याचे दिसून येईल.

## वैदिक धर्मपरंपरागत भूगोल

वैदिक धर्मपरंपरेनुसार सांगितलेल्या भौगोलिक गोष्टींचे वर्णन आपणाला विष्णु पुराणादि ग्रंथातून पहावयास मिळते. विष्णु पुराण (२।२-७) च्या अनुसार या पृथ्वीवर जंबू, प्लक्ष, शाल्मल, कुश, क्रौंच, शाक आणि पुष्कर हे सात द्वीप, तसेच लवणोद, इक्षुरस, सुरोद, सर्पिसलिल, दधितोय, उदके, स्वादुसलिल हे सात समुद्र आहेत हे समुद्र वलयांकित असून एकमेकाला वेष्ठित आहेत. हे द्वीप पूर्व द्वीपापेक्षा दुप्पटीने विस्तृत होत गेलेले आहेत.

या सर्वांच्यामध्ये जंबूद्वीप आणि त्याच्यामध्ये ८४,००० योजन उंच सुमेरू पर्वत आहे. जो १६,००० योजन पृथ्वीभागामध्ये घुसला आहे. सुमेरूच्या दक्षिणेस हिमवान, हेमकूट, निषध व उत्तरेला नील, श्वेत, शृंगी हे सहा पर्वत आहेत. ज्यामुळे भारतवर्ष, किंपुरुष, हरिवर्ष, इलावृत, रम्यक, हिरण्यमय आणि उत्तर कुरु या सात क्षेत्रात विभाजित होते.

मेरू पर्वताच्या पूर्व-पश्चिमेला इलावृत्ताची मर्यादाभूत असलेले मौल्यवान व गंधमादन नावाचे दोन पर्वत आहेत. जे निषध व नीलपर्यंत पसरले आहेत. मेरूच्या चारी बाजूला पूर्वादि दिशेत मंदर, गंधमादन, विपूल आणि सुपार्श्व हे चार पर्वत आहेत. त्यावर क्रमशः कदंब, जंबू, पीपल व वट हे चार वृक्ष आहेत. जंबूवृक्षाच्या नावामुळेच हे द्वीप जंबूद्वीप म्हणून प्रसिद्ध आहे. वर्षांच्यामध्ये भारतवर्ष कर्मभूमि आहे आणि शेष वर्ष भोगभूमि आहेत. कारण भारतातच कृतयुग, त्रेता, द्वापर आणि कलियुग हे चार काल असून स्वर्ग मोक्ष पुरुषार्थाची सिद्धि आहे. अन्य क्षेत्रात सदैव त्रेतायुग असते व तेथील निवासी पुण्यवान असून व्याधिरहित असतात.

भरतक्षेत्रात मेहेंद्रादि इतर सहा कुलपर्वत आहेत. ज्यातून चंद्रमा इत्यादि अनेक नद्या उगम पावतात. नद्यांच्या किनाऱ्यावर कुरु, पांचाल इत्यादि आर्य व कलिंगादि म्लेंच्छ लोक राहतात. अशा प्रकारे प्लक्षद्वीपात देखील पर्वत व त्यांच्यानुसार विभाजित क्षेत्र आहेत. तेथे प्लक्ष नावाचा वृक्ष असून तेथे सदैव त्रेता काल असतो. शालमल इत्यादि इतर सर्व द्वीपांची रचना प्लक्ष द्वीपाप्रमाणे असते. पुष्कर द्वीपाच्या मध्यभागी मानुषोत्तर पर्वत आहे. त्यामुळे त्याचे दोन खंड झाले आहेत. आतील खंडाचे नाव धातकी आहे. तेथे भोगभूमि आहे. या द्वीपात पर्वत, नद्या इत्यादि नाहीत. या द्वीपाला स्वादूदक समुद्राने वेष्ठिले आहे. त्याच्यापुढे जीवांचा निवास नाही.

या भूखंडाच्या खाली दहा-दहा योजनांचे सात पाताळ आहेत. ते पुढीलप्रमाणे– अतल, वितल, नितल, गभस्तिमत्, महातल, सुतल व पाताळ. पाताळाच्या खाली विष्णु भगवान् हजारो फणांनी युक्त शेष नागाच्या रूपात स्थित होऊन या भूखंडाला आपल्या मस्तकावर धारण केले आहे. पृथ्वीतल व जलाच्या खाली रौख, सूकर, रोध, ताल, विशसन, महाज्वाल, तप्तकुंभ, लवण, विलोहित, रुधिराम्भ, वैतरणी, कृमीश, कृमीभोजन, असिपत्र वन, कृष्ण, लालाभक्ष, दारुण, पूयवह, पाप, वह्निज्वाल, अधःशिरा, सन्देश, कालसूत्र, तमस्, अवीचि, श्वभोजन, अप्रतिष्ठ आणि अरूचि इत्यादि महाभयंकर नरक आहेत. तेथे पापी जीव मरण पावून जन्म घेतात. भूमीपासून एक लाख योजन अंतरावर वरच्या बाजूला अंतराळात सूर्य, चंद्र व नक्षत्र मंडळ स्थित आहे. तसेच त्याच्यावर दोन-दोन लाख योजन अंतरावर बुध, शुक्र, मंगल, बृहस्पति, शनि तसेच यांच्यावर एक लाख योजनावर सप्तऋषि व ध्रुवतारे स्थित आहेत. यांच्यापासून एक कोटि योजनावर महर्लोक आहे. तेथे कल्पापर्यंत जीवित राहणारे कल्पवासी, भृगु इत्यादि सिद्धगण राहतात. याच्या २ कोटि योजनावर जनलोक आहे. तेथे ब्रह्माचे पुत्र सनकादि राहतात. आठ कोटि योजनावर तपलोक आहे. तेथे वैराज देव राहतात. १२ कोटि योजनावर सत्यलोक आहे. ते पुनः मृत्यु न येणारे जीव राहतात. त्याला ब्रह्मलोक देखील म्हणतात. भूलोक व सूर्यलोकाच्यामध्ये मुनिजनाच्याकडून सेवित भुवर्लोक राहतात व सूर्य तसेच ध्रुवाच्यामध्ये १४ लाख योजन स्वर्लोक आहे.[1]

### बौद्ध परंपरागत भूगोल–

वैदिक, जैन यांच्याप्रमाणेच बौद्ध परंपरा लोकाला मानते. त्यांच्या मतानुसार लोकाच्या अधोभागात १६,००,००० योजन उंच अपरिमित वायुमंडल आहे. त्याच्यावर ११,२०,००० योजन उंचीवर जलमंडल आहे. या जलमंडलात ३२०,००० योजन भूमंडल आहे. या भूमंडलाच्या मध्यभागी मेरु पर्वत आहे. पुढे ८०,००० योजन विस्तृत सीता (समुद्र) असून मेरूला चारी बाजूनी त्याने घेरले आहे. त्याच्यापुढे ४०,००० योजन विस्तृत वलयांकित युगंधर पर्वत आहे. त्याच्यापुढे याचप्रमाणे एकेक सीता समुद्राच्या अंतराने उत्तरोत्तर अर्ध्या विस्ताराने युक्त क्रमशः ईषाधर, खदिरक, सुदर्शन, अश्वकर्ण, विनतक व निमिंधर पर्वत आहेत. शेवटी लोहमय चक्रवाल पर्वत आहे. निमिंधर आणि चक्रवाल पर्वतांच्या मध्यभागी जो समुद्र स्थित आहे त्यात मेरूच्या पूर्व दिशेला क्रमाने अर्धचंद्राकार पूर्वविदेह, शकटाकार जंबूद्वीप, मंडलाकार अवरगोदानीय आणि समचतुष्कोण उत्तर कुरू हे चार द्वीप आहेत. या द्वीपांच्या पार्श्वभागात दोन-दोन अंतर्द्वीप आहेत. त्यातील जंबूद्वीपाच्या जवळच्या

१. विष्णुपुराण अध्याय २ ते ७ वरून



धरमद्वीपात राक्षसांचा व शेषद्वीपात मनुष्यांचा निवास आहे. जंबूद्वीपात उत्तरेकडे ९ छोटे पर्वत तसेच त्यांच्यापुढे हिमवान पर्वत स्थित आहे. त्यापुढे अनवतप्त नावाचे अगाध सरोवर आहे. त्यातून गंगा, सिंधू, वक्षु आणि सीता या नद्या निघतात. या सरोवराच्या जवळ जंबू वृक्ष आहे. ज्यामुळे या द्वीपाचे नाव जंबूद्वीप असे पडले आहे. जंबूद्वीपाखाली २०,००० योजन प्रमाण अवीचि नावाचा नरक आहे. त्यावर क्रमशः प्रतापनादि सात नरक आहेत. या नरकांच्या चोहोबाजूच्या पार्श्वभागात कुकूल, कुणप, क्षुरमार्गादिक आणि खारोदक हे चार उत्सद आहेत. या नरकांच्या खाली आठ शीतनरक आहेत. भूमीपासून ४०,००० योजनावर चंद्र, सूर्य परिभ्रमण करतात. ज्यावेळी जंबूद्वीपात मध्यान्ह होते त्यावेळी उत्तरकुरूमध्ये अर्धरात्र होते. पूर्वविदेहात अस्त व अवरगोदानीयात सूर्योदय होतो. मेरू पर्वताच्या पूर्वादि दिशेला त्याचे चार विभाग आहेत. ज्यावर क्रमशः यक्ष, मालाधर, सदामद आणि चातुर्महाराजिक देव राहतात. अशाच प्रकारे शेष सात पर्वतावर देवांचा निवास आहे. मेरूशिखरावर स्वर्ग आहे. त्यावर विमानात याम, तुषित इत्यादि देव राहतात. त्यातील चातुर्महाराजिक आणि त्रयस्त्रिंश देव मनुष्याप्रमाणे कामभोग भोगतात. याम, तुषित इत्यादि क्रमशः आलिंगन, पाणिसंयोग, हसित आणि अवलोकनाने तृप्ति प्राप्त करतात. उपर्युक्त कामधातू देवांच्यावर रूपधातू देवांचे ब्रह्मकायिक इत्यादि १७ स्थाने आहेत. ही सर्व क्रमशः वरवर अवस्थित होत गेली आहेत. जंबूद्वीपवासी मनुष्यांची उंची केवळ साडेतीन हात असते. पुढे अनभ्र देवांच्या शरीराची उंची १२५ योजन प्रमाण असते.

## आधुनिक विश्वाची माहिती–

विश्वाची आधुनिक माहिती घेत असताना विद्वानांनी आपली वेगवेगळी मते प्रतिपादली आहेत. परंतु त्यातील सर्वमान्य तथा सर्वसाधारण जी कल्पना आहे ती पुढीलप्रमाणे दिसून येते. ज्या पृथ्वीवर आपण राहतो ती पूर्वी अग्नीगोळयाच्या स्वरूपात होती. अर्थात् पुढे ती थंड झाली. तिचा रंग नारंगी असून, ती एक चपटा गोल खंड होता. पृथ्वीचा पृष्ठभाग जरी थंड असला तरी, तिच्या अंतर्भागात अजूनही धगधगती ज्वाला आहे. वायुमंडळ पृथ्वीपासून वर उत्तरोत्तर विरळ होत ५०० मैलापर्यंत पसरला आहे. प्रथम यावर जीवांचा निवास नव्हता. नंतर क्रमाने सजीव, वनस्पती, पाण्यामध्ये राहणारे मत्स्यादि पृथ्वीवर उड्या मारणारे बेडूक निर्माण होऊन त्यापुढे सरपटणारे सर्प, स्तनधारी पशु, माकड व मनुष्य यांची उत्पत्ति झाली. तात्कालिक परिस्थितीनुसार आणखी असंख्यात असे जीव उत्पन्न झाले. भूमिभागापेक्षा जलाचा विस्तार तिप्पट आहे. भूभागामध्ये आशिया इत्यादि महाद्वीप तथा अन्य अनेक द्वीप आहेत. भारत आशियाच्या दक्षिणेकडील पूर्व भागात येतो. भारताच्या उत्तरेला हिमालय पर्वत असून मध्ये विंध्य, सातपुडा इत्यादि पर्वत आहेत. पूर्व-पश्चिमेला सागराकडे धाव घेणाऱ्या गंगा, सिंधू इत्यादि नद्या आहेत. देशाच्या उत्तरेकडे साधारणतः आर्य व अन्य दिशांना द्राविड, भिल्ल, कोल तसेच अनेक पर्वतीय जाती (म्लेच्छ) इत्यादि राहतात. या भूखंडाच्या चारी बाजूला अनंत आकाश आहे. त्यात सूर्य, चंद्र, तारे इत्यादि दिसतात. चंद्रमा अधिक जवळ असून, त्यानंतर क्रमशः शुक्र, बुध, मंगल, बृहस्पति शनि इत्यादि ग्रह आहेत. ९॥ कोटि मैलावर सूर्य तसेच असंख्यात मैल अंतरावर अनेक तारे आहेत. चंद्र आणि ग्रह स्वप्रकाशित नाहीत ते सूर्यापासून प्रकाशित होतात. तारे फार दूरवर असल्यामुळे ते फार लहान दिसतात. परंतु त्यात सूर्यासमान अथवा त्याहून छोटे असणारे तारे कमी आहेत. हे तारे सूर्यापेक्षा अत्यंत मोठे आहेत. एवढेच नव्हे तर ते स्वतः प्रकाशित असून मोठे सूर्य आहेत. अशा प्रकारे लोकाचे प्रमाण असंख्य आहे. तसेच या पृथ्वीशिवाय अन्यत्र ठिकाणी जीवराशींचे स्थान नाही. प्रथम मंगळावर जीववस्ती असावी असे अनुमान करण्यात येत होते. पण अद्याप तसा निश्चितपणे पुरावा मिळू शकला नाही.

मात्र अद्यावत् यंत्रसामुग्रीच्या साह्याने गेल्या काही वर्षातच मानवाने चंद्रावर आपले पहिले पाऊल ठेवले. तेथील जमीन, खडक इत्यादींचे निरीक्षण केले व आता मानव चंद्रावर राहू शकेल असे ठामपणे सांगितले आहे. चंद्रावर वस्ती करण्याच्या उद्देशाने अमेरिका, रशियासारख्या राष्ट्रांनी प्रयत्न देखील सुरू केले आहेत. चंद्राशिवाय इतर ग्रहांचा शोध घेण्याचा प्रयत्न देखील आधुनिक विद्वान करीत आहेत.





### जैन-वैदिक मतांची तुलना–

. . . भूगोलविषयक जैन वैदिक मतांची मान्यता एकमेकांना बरीचशी मिळती जुळती आहे. उदा– १) वलयांकित आकाररूपाने अनेक द्वीप व समुद्र एकमेकांना वेष्टित असे आहेत. २) जंबूद्वीप, सुमेरू, हिमवान, निषध, नील, श्वेत, (रूक्मि) शृंगी (शिखरी) हे पर्वत व भरतवर्ष (भरतक्षेत्र), हरिवर्ष, रम्यक, हिरण्मय (हैरण्यवत) उत्तरकुरू ही क्षेत्रे दोन्ही मान्यतेनुसार समान आहेत. ३) भारतवर्षात कर्मभूमि तसेच अन्य क्षेत्रात त्रेतायुग (भोगभूमि) असून मेरूच्या चारही दिशांना मंदरादि चार पर्वत तर जैनमान्य चार गजदंत आहेत. ४) कुल पर्वतातून नद्या उगम पावणे तसेच आर्य व म्लेंच्छ जातीचे राहणे यात समानता आहे. ५) प्लक्ष द्वीपात प्लक्षवृक्ष, जंबूद्वीपाप्रमाणे त्यात पर्वत व नदी यांची उत्पत्ति, धातकी खंडातील धातकी वृक्ष व जंबूद्वीपाप्रमाणे दुप्पट रचना आहेत. ६) पुष्कर द्वीपाच्या मध्यभागी वलयांकित मानुषोत्तर पर्वत, तसेच त्याच्या आतील भागात धातकी नामक खंड आहे. ७) पुषकर द्वीपापुढे प्राण्यांचा अभाव पुष्करार्धाच्या पुढील मनुष्यांच्या अभावाप्रमाणेच आहे. ८) भूखंडाखालील पाताळांचा निर्देश लवण सागरातील पाताळाशी मिळता जुळता आहे. ९) पृथ्वीखालील नरकाची स्थिती दोन्हीत सारखी आहे. १०) आकाशातील सूर्य चंद्र याच्या स्थितीचा क्रम सारखा आहे. ११) कल्पवासी तथा पुनः मृत्यू न येणाऱ्या (लौकांतिक) देवांचा लोक यात समानता आहे.

### जैन-बौद्ध मान्यतांची तुलना–

वैदिक जैन मान्यतेप्रमाणेच जैन-बौद्ध मान्यतांच्यामध्येही बरेचसे साम्य आहे. उदा– १) पृथ्वीच्या चोहोबाजूला वायु व जलमंडल यांचे स्थान जैनमान्य वातवलयांच्याप्रमाणेच आहे. २) मेरू इत्यादि पर्वताचे एकेक समुद्राच्या अंतराने उत्तरोत्तर वेष्ठित जाऊन वलयाकाररूप स्थिती धारण करणे यात समानता आहे. ३) जंबूद्वीप, पूर्वविदेह, उत्तरकुरू, जंबूवृक्ष, हिमवान, गंगा, सिंधू इत्यादि नावात साम्यता आहे. ४) जंबूद्वीपाच्या उत्तरेला ९ क्षुद्रपर्वत, हिमवान, महासरोवर त्यातून गंगा, सिंधू नद्यांचा उगम, भरत क्षेत्राच्या उत्तरेकडील ११ कूट युक्त हिमवान पर्वतावरस्थित पद्म द्रहातून गंगा, सिंधू व रोहितास्या नद्यांच्या विकासाप्रमाणेच आहे. ५) जंबूद्वीपाच्या खाली एकेकानंतर अनेक नरकांची स्थिति सारखी आहे. ६) पृथ्वीपासून वरचे चंद्र सूर्याचे भ्रमण सारखे आहे. ७) मेरू शिखरावरील स्वर्गाची स्थिति जैन मेरू शिखरापासून वर काही अंतर मात्र असणाऱ्या जैन याच स्वर्गाच्या ऋतु नामक पटलाप्रमाणेच आहे. ८) काही देवांचे मैथुनाने तर काहींचे स्पर्शाने कामभोगाचे सेवन करणे तसेच त्याच्या वरच्या स्वर्गात कामभोगाचा अभाव असणे हे जैन मान्यतेप्रमाणेच आहे. ९) देवाचे वरवरचे स्थान. १०) मनुष्याच्या उंचीपासून देवाच्या शरीराच्या उंचीपर्यंतची क्रमिक वृद्धि होत जाणे जैन मान्यतेप्रमाणेच आहे.

### आधुनिक विश्व व जैन मान्यता–

स्थूल दृष्टीने पाहिले असता आधुनिक भूगोलाबरोबर जैन भूगोलाचा मेळ बसू शकत नाही. तरीसुद्धा आचार्यांची दूरवरती सूक्ष्म दृष्टि व सूत्रात्मक कथन पद्धति लक्षात घेतली तर, दोहोत बरीच साम्यता दिसून येते. अर्थात् याच वेळी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, वैज्ञानिक लोकांचे पृथ्वीविषयक असणारे अनुमान अथवा इतिहास करोडो वर्षापूर्वीचा आहे. पण आचार्यांचे लक्ष या इतिहासाकडे कित्येक कल्प वर्षापूर्वी गेले आहे. उदा– १) पृथ्वी प्रथम अग्नीच्या गोळ्याच्या स्वरूपात असणे, हळूहळू तो थंड होणे व त्यावर पुढे क्रमाने जीव मनुष्यांच्या उत्पत्तीचा विकास होणे ही कल्पना जैनमान्य प्रलय स्वरूपाशी मिळती-जुळती आहे. २) पृथ्वीच्या चारी बाजूंच्या वायुमंडळात ५०० मैलपर्यंत उत्तरोत्तर तरलता, जैनमान्य तीन वातवलयाप्रमाणेच आहे. ३) आशिया इत्यादि महाद्वीप जैनमान्य भरतादि क्षेत्राच्या बरोबर अधिक अंशाने मिळते जुळते आहेत. ४) आर्य व म्लेंच्छ जातीचे यथायोग्य स्थान हे जैनमान्यतेचे सर्वथा उल्लंघन करू शकत नाही. ५) सूर्य-चंद्र यांची स्थिति,

त्यावरील जीवासंबंधी विचार याबाबत दोन्हीमध्ये मतभेद आहेत. तरीसुद्धा सूर्य-चंद्रादीमध्ये जीवांचा सर्वथा अभाव मानणे ही वैज्ञानिकांची अल्पज्ञता मानावी लागेल. कारण तेथे राहणाऱ्या जैनमान्य शरीरधारी वैक्रियिक जीवाच्या विशेषतेला सूक्ष्म यत्राने पाहणे देखील शक्य नाही.

## चातुर्द्वीपिक भूगोल परिचय–

श्री रायकृष्णदास यांच्या एका लेखानुसार वैदिक धर्ममान्य सप्तद्वीपिक भूगोलापेक्षा चातुर्द्वीपिक भूगोल हा अधिक प्राचीन आहे.[1] याचे अस्तित्व अजून देखील वायुपुराणात काही काही ठिकाणी मिळते. चिनी यात्री मेगस्थनीजच्या वेळी देखील हा भूगोल प्रचलित होता. कारण तो लिहितो– 'भारताच्या सीमेवर सीदिया, वैक्ट्रिया तसेच एरियाना हे आणखी तीन देश होते.' सीदिया म्हणजे भद्राश्व व वैक्ट्रिया म्हणजे उत्तरकुरू व एरियाना म्हणजे केतुमालद्वीप अभिप्रेत होते. अशोकाच्या वेळी देखील हा भूगोल प्रचलित होता. कारण त्याच्या शिलालेखातील जंबूद्वीप ही संज्ञा भारतवर्षाची आहे. सर्वप्रथम महाभाष्यात सप्तद्वीपिक भूगोलाची चर्चा करण्यात आली आहे. म्हणून सप्तद्वीपिका ही कल्पना अशोक तथा महाभाष्य या दोहोंच्या दरम्यानची असावी असे दिसते. २) सप्तद्वीपिक भूगोलाप्रमाणे हा चातुर्द्वीपिक भूगोल कल्पनामात्र नाही. परंतु त्याचा आधार वास्तविक आहे. ३) चातुर्द्वीपिक भूगोलात जंबूद्वीप पृथ्वीच्या चार महाद्वीपापैकी एक आहे आणि भारतवर्ष हे जंबूद्वीपाचे दुसरे नाव आहे. तेच द्वीप सप्तद्वीपिक भूगोलात येऊन एवढे मोठे होते की, त्याच्या बरोबरीचे अन्य तीन द्वीपे ( भद्राश्व, केतुमाल व उत्तरकुरू ) त्याचे वर्ष बनून राहतात आणि भारतवर्ष नावाचे अन्य वर्ष ( क्षेत्र ) देखील त्याच्यात आत असल्याचे मानले आहे. ४) चातुर्द्वीपिक भूगोलातील भारत ( जंबूद्वीप ) जो मेरूपर्यंत पोहोचतो तो सप्तद्वीपिक भूगोलात जंबूद्वीपीय तीन वर्ष तथा क्षेत्रात विभक्त होतो. ते म्हणजे– भारतवर्ष, किंपुरुष व हरिवर्ष. भारताचा वर्ष पर्वत हिमालय हाच आहे. किंपुरुष हिमालयाच्या दुसऱ्या भागात मंगोलियाची वस्ती आहे. तेथून सरस्वती नदीचा उगम होतो. हे वर्ष प्रथम तिबेटपर्यंत पोहचत असल्याचे दिसते, कारण तिथपर्यंत मंगोलियाची वस्ती असलेली दिसून येते. तथा याचा वर्ष पर्वत हेमकूट आहे. जो काही ठिकाणी हिमालयातर्गतच वर्णिला गेला आहे. ( जैन मान्यतेप्रमाणे किंपुरुष ठिकाणी व हिमकूटच्या स्थानी महाहिमवान पर्वत असल्याचा उल्लेख आहे. ) हरिवर्ष हिरातक म्हणजे निषध पर्वताशी संबंध असून तो मेरूपर्यंत पोहचतो. याच हरिवर्षाचे नाव अवेस्त्यामध्ये हरिवरजी असे पहावयास मिळते. ५) अशाच प्रकारे रम्यक, हिरण्यमय आणि उत्तरकुरू नावाच्या वर्षात विभक्त होऊन चातुर्द्वीपिक भूगोलातील उत्तरकुरू महाद्वीपाची तीन वर्ष बनली असावीत. ६) जैन परंपरागत भूगोलात ९ ऐवजी १० वर्षांचा उल्लेख आहे व क्षेत्राचे देखील अधिकाधिक विभाजन केले आहे ते वैदिक परंपरेपेक्षा उचित वाटते. ७) मेरू पर्वत म्हणजे वर्तमान भूगोलातील मंघाच्या पामीर प्रदेश असावा. उत्तरकुरू पश्चिमी तुर्किस्थान आहे. सीता नदी यारकंद नदी आहे. निषध पर्वत हिंदूकुश पर्वताची शृंखला आहे. हैमवत भारतवर्षाचेच दुसरे नाव असावे.

वरीलप्रमाणे आपणाला जैन परंपरागत भूगोलाचा आधुनिक बौद्ध व वैदिक परंपरेशी तुलनात्मक अभ्यास करता येतो. वर्यात या गोष्टी स्थूलमानाने मांडल्या आहेत. त्यात कमी अधिकपणा आढळू शकेल, परंतु या गोष्टींचा अधिक सूक्ष्मपणे तुलनात्मक अभ्यास होणे आवश्यक आहे.

## जैन आयुर्वेद व शरीरशास्त्र

न्याय, व्याकरण, सिद्धांत इत्यादी विविध विषयामध्ये जैनधर्मांनी जसे असामान्य कार्य केले आहे त्याचप्रमाणे आयुर्वेद व ज्योतिष इत्यादी विषयामध्येही त्यांनी मौलिक साहित्य निर्मिती केलेली आहे. तथापि या शास्त्रांचा मानवी जिवनाशी नित्य संबंध नसल्याने नंतरच्या काळात या शास्त्राचा विकास झालेला दिसत नाही.

१. सपूर्णानंद अभिनंदग्रंथ– रायकृष्णदासजी.




जैन आचार्यांनी, आमच्या उद्धारार्थ जेव्हा जेव्हा विचार केला, उपदेश केला किंवा आपली मते ग्रंथरूप केली, तेव्हा "शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्" या तत्वाला प्रमुख मानून आरोग्यरक्षणार्थ शरीरस्वास्थ स्वानुभूत व प्रायोगीकृत उपायांच्या सहाय्याने कसे टिकवावे याचे प्रथमतः विवेचन केले आहे.

## आयुर्वेदाची निर्मिती–

आयुर्वेद शास्त्र कसे निर्माण झाले हे सांगणे कठीण आहे तथापि,

"तं तीर्थनाथमधिगम्य विनम्रमूर्ध्ना
सप्रातिहार्यविभवादिपरीतमूर्तिम् ।
सप्रश्रयाः त्रिकरणोक्त प्रणामाः
पप्रच्छुरित्थमखिलं भरतेश्वराद्याः ।"

उपर्युक्त प्रमाणावरून सिद्ध होते की, जेव्हा सृष्टीमध्ये उपवास, अध्ययन, ब्रह्मकर्म, व्रत इत्यादींचे योग्य प्रकारे पालन करणाऱ्या पुरुषामध्येही, नाना प्रकारची विघ्ने निर्माण करणाऱ्या रोगाचा प्रादुर्भाव झाला, तेव्हा भरत चक्रवर्ती भगवान आदिनाथाकडे गेले. सविनय वंदन व प्रार्थना करून समाजाच्या आरोग्यरक्षणाचे उपाय त्यांनी विचारले. यावेळी भगवान आदिनाथांनी पुरुषाची लक्षणे, शरीराशरीरामधील फरक, दोषोपत्ति, चिकित्सा व कालभेद इत्यादीचा विस्तार इत्यादी विषयांचे विवेचन केले. हाच आयुर्वेद शास्त्राचा प्रारंभ होय.

न्याय, दर्शन व सिद्धांत इत्यादीच्या परंपराप्रमाणेच आयुर्वेद शास्त्राची परंपराही प्रमाणित आहे. हे काही कपोलकल्पित शास्त्र नाही तर, भगवंताच्या दिव्य ध्वनीतून निर्माण झालेले हे शास्त्र, श्रुती व स्मृतीच्या रूपाने प्रवाहित राहिलेले आहे. सर्वज्ञ परमश्रेष्ठींच्या दिव्यध्वनीतून निघालेल्या ह्या दिव्यज्ञानाचे श्रुतसागराच्या धारक गणधर परमेष्ठींनी १० अंगे व १४ पूर्वांमध्ये विभाजन करून निरूपण केले आहे. चौदा पूर्वांमध्ये प्राणवायु नावाचा जो भेद आहे त्यातच आयुर्वेदाचा अंतर्भाव झाला आहे.

कायचिकित्साद्यष्टांग आयुर्वेदः भूतकर्मजांगुलिप्रक्रमः ।
प्राणापानविभोगोवि यत्र विस्तरेण वर्णितस्तत्प्राणावायम् ।

अर्थात ज्या शास्त्रामध्ये काया, तद्गत दोष व चिकित्सा इत्यादी अष्टांग आयुर्वेदाचे वर्णन विस्ताराने केले आहे तसेच पृथ्वी व इतर पंचभूतांची क्रिया, विषारी प्राणी व त्यावरील चिकित्सा, तसेच प्राणवायुचे वर्णन ज्यात आहे. त्यास 'प्राणवायु पूर्वशास्त्र' असे म्हणतात. त्यात विस्ताराने अष्टांगायुर्वेद–

१) कायचिकित्सा २) शल्यचिकित्सा ३) शालाक्यचिकित्सा ४) भूतविद्या
५) कौमारभृत्य ६) अगदतंत्र ७) रसायनतंत्र ८) वाजीकरण

इत्यादी विषयांची माहिती मिळते. हेच आयुर्वेदशास्त्र अथवा मुळवेद होय. विद्येति सत्प्रकटकेवललोचनाख्या तस्या यदेतदुपपन्नमुदारशास्त्रम् । वैद्यं वदंति पदशास्त्र विशेषणज्ञा एतद्विचिंत्य च पठन्ति च तेपि वैद्याक ।

जीवादिक समस्त पदार्थांचे लक्षण जे केवलज्ञान त्यास विद्या म्हटले आहे. त्या विद्येमुळे या ग्रंथाचे उत्पत्ती झाली असल्याने त्यास वैद्यक ग्रंथ व या ग्रंथांचे अध्ययन व अध्यापन करणाऱ्या विद्वानाला वैद्य म्हणतात. वैद्यक शास्त्रालाच आयुर्वेद असेही म्हणतात. यात मानवाच्या आयुष्याविषयक सर्व गोष्टींचा ऊहापोह केलेला असतो.

## आयुर्वेदशास्त्राचे प्रयोजन–

'लोकोपकारकरणार्थमिदं हि शास्त्रं । शास्त्रप्रयोजनमपि द्विविधं यथावत् ।
स्वास्थ्यस्य रक्षणमयामयमोक्षणं च । संक्षेपतस्सकलमेव निरूप्यतेऽत्र ॥



वैद्यकशास्त्र किंवा आयुर्वेद शास्त्राची रचना परोपकारासाठी आहे. या शास्त्राचे प्रयोजन दोन प्रकारचे आहे– १) स्वास्थ्यरक्षण २) रोग्याचे रोगमोक्षण.

आचार्यांनी स्वस्थ्य दोन प्रकारचे सांगितले आहे– १) पारमार्थिक स्वास्थ्य व २) व्यावहारिक स्वास्थ्य. ज्ञानावरणादी अष्टकर्मांचा नाश झाल्याने उत्पन्न होणारे अविनश्वर, अतींद्रिय, अद्वितीय, आत्मिक सुखाला परमार्थिक स्वास्थ्य म्हणतात. शरीरातील सप्तधातु, अग्नि व वातपित्तादिक दोष यामध्ये समता राहणे, इंद्रिये प्रसन्न असणे, मन आनंदी राहणे, शरीर निरोगी राहणे याला व्यावहारीक स्वास्थ्य म्हणतात.

जैनाचार्यांनी शरीर व मन हे दोन प्रकारचे रोगनिष्ठान सांगितले आहे. रोगग्रस्त शरीर प्रत्यक्ष दिसते तर रोगग्रस्त मन लक्षणावरून ओळखता येते. ज्वर, अतिसार, श्वास, कुष्ठ इत्यादी शारिरीक रोग आहेत, तर काम, क्रोध, मोह, मत्सर, शोक, भय इत्यादी मानसिक रोग आहेत. काही रोग शरीर व मन यावर एकाच वेळी परिणाम करतात. उदा. मुर्छा, उन्माद, अपस्मार इत्यादी. जैनाचार्यांनी निरनिराळे प्रयोग करून-चिकित्सा करून, तयार केलेल्या औषधांनी रोगमुक्ती करण्यात सफलता मिळविली. त्यांनी ही माहिती लिपीबद्ध केली. म्हणून जैनाचार्यांनी या विषयातील ग्रंथरचना म्हणजे महान देणगी आहे.

स्वास्थ्य बिघडण्याचे मुख्य कारण असातावेदनीय कर्मांचा उदय असल्याचे आचार्यांनी सांगितले आहे. वात, पित्त, कफ यामध्ये विषमता निर्माण होणे हे स्वास्थ्य बिघडण्याचे बाह्य कारण होय, तर रोग शमण्याची असातावेदनीय कर्माची उदीरणा साताचा उदय, धर्मादिकांचे सेवन इ. अंतर्गत कारणे व योग्य चिकित्सा, द्रव्य, क्षेत्र, काल, भाव इत्यादींची अनुकूलता इत्यादी बाह्य करणे आचार्यांनी सांगितली आहेत.

## आयुर्वेदीय चिकित्सा–

उग्रादित्याचार्यांनी कल्याणकारक ग्रंथाच्या सातव्या अध्यायात चिकित्सेचे हेतु व फळ कथन केले आहे. चिकित्सा पापांचा नाश करणारी आहे, धर्मवृद्धि करणारी आहे. तिच्यामुळे इहलोक व परलोकातही सुख प्राप्त होते. चिकित्सा म्हणजे एक प्रकारे तपश्चर्याच असल्याने काम, क्रोध, मोह इत्यादी विकाराना वश होऊन चिकित्सा करू नये. रोग्याशी मित्रत्व किंवा शत्रुत्वाच्या भावनेने चिकित्सा करू नये. रोग्याविषयी करुणाबुद्धि ठेवून, त्यास आपला पुत्र समजून आपल्या कर्मक्षयाची जाणीव ठेवून चिकित्सा करावी. अशा प्रकारे निःस्पृह व समयोचित विचारानी केलेली चिकित्सा वैद्याला निश्चितपणे साफल्य प्राप्त करून देते.

चिकित्सक कसा असावा हेही आचार्यांनी सांगितले आहे–

" चिकित्सकः सत्यपरः सुधीरः क्षयन्वितः हस्तलघुत्वयुक्तः ।
स्वयंकृती दृष्टमहाप्रयोगः समस्तशास्त्रार्थविदप्रमादी ॥"

म्हणजेच वैद्य सत्यनिष्ठ, धीरसंपन्न, हस्तलाघवयुक्त, स्वयं औषध तयार करण्यास समर्थ, मोठमोठ्या रोगावर केलेले प्रयोग पाहिलेला, सपूर्ण शास्त्राला जाणणारा, निरलस असावा. रोग्याचे कर्तव्य काय या विषयीचाही उहापोह उग्रादित्याचार्यांनी केला आहे. रोगी ज्याप्रमाणे आपले आई, वडील, पुत्र, मित्र इत्यादीवर विश्वास ठेवतो, त्याचप्रमाणे त्याने वैद्यावरही पूर्णपणे विश्वास ठेवलाच पाहिजे. त्याने वैद्यापासून कोणतीही शारीरिक तक्रार लपवून ठेवता कामा नये.

## जैन आयुर्वेदाचे वैशिष्ट्य–

'अहिंसा परमो धर्मः' या तात्विक भूमिकेमुळेच जैनेतर आयुर्वेद ग्रंथापेक्षा, जैनाचार्यांच्या आयुर्वेद विषयक ग्रंथामध्ये विशेषता आढळून येते. जैनाचार्यांनी मद्य, मांस व मधूचे अनुपान अगर औषध म्हणूनही सेवन

करण्यास कोठेच सांगितले नाही. केवळ वनस्पति, खनिज, क्षार व रत्नादिक पदार्थ, त्यापासून बनविलेली मिश्रणे यांचाच उपयोग औषध म्हणून करावयास सांगितला आहे. खनिज द्रव्ये जशीच्या तशी औषध म्हणून घेता येणार नाहीत, कारण त्या स्वरूपात त्यांचे शोषण होणे अशक्यच आहे. यासाठी खनिज द्रव्य किंवा निरींद्रय द्रव्यावर सेंद्रीय वनस्पतीच्या अनेक पुटभावनाद्वारा संस्कार केले जातात. आयुर्वेदाचे रसशास्त्र अशा प्रकारच्या संस्कार प्रक्रियांनी ओतप्रोत भरले आहे. जैनाचार्यांनी रसशास्त्र विषयक महान कामगिरी केली आहे. आज आयुर्वेदीय वैद्य ज्या विविध सिद्धौषधि उपयोगात आणतात, त्या सिद्धौषधी म्हणजे जैनाचार्यांच्या नितांत प्रतिभेचे व अविश्रांत परिश्रमाचे फळच होय. अनेक प्रतिभावंत व वीतरागी आचार्यांनी जन्मभर विचार, परिश्रम व प्रयोगाद्वारे अनुभव घेऊन, अनेक औषधी रत्नांचे भांडार संग्रहित व समृद्ध करून ठेवले आहे. रसशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, निघंटु, औषधिगुणधर्मशास्त्र इत्यादी अनेक शास्त्रांची निर्मिती करून जैनाचार्यांनी आयुर्वेदशास्त्रात महान कार्य केले आहे व मानवावर अनंत उपकार करून ठेवले आहेत.

**आयुर्वेदशास्त्रावर ग्रंथलेखन करणारे जैन ग्रंथकार–**

भगवान आदिनाथांनी भरत चक्रवर्तीने केलेल्या विनंतीनुसार पुरुषाची लक्षणे, शरीरशरीरातील बदल, दोषोत्पत्ति चिकित्सा इत्यादी विषयांचे विवेचन करून, आयुर्वेदशास्त्राचा पाया घातला. त्याच्याच आधारावर पुढील काळात निरनिराळ्या जैन आचार्यांनी आयुर्वेद ग्रंथाची रचना केली. व्याम, दर्शन इत्यादीवर त्यांनी प्रकाश टाकला आहे. त्याचप्रमाणे ज्योतिष व आयुर्वेद यांनाही अस्पर्श मानलेले नाही. आयुर्वेदावरील त्यांचे शेकडो ग्रंथ आज उपलब्ध नसले तरी, अन्य ग्रंथातील त्यांच्या उल्लेखावरून त्यांचे अस्तित्व समजते.

आठव्या शतकाच्या सुमारास, प्रसिद्ध आयुर्वेद ग्रंथाचे उग्रादित्याचार्य यांनी आपला आयुर्वेदावरील ग्रंथ लिहिला. त्यात त्यांनी आयुर्वेदशास्त्रावर ग्रंथरचना करणाऱ्या पुढील पूर्वाचार्यांचा उल्लेख केला आहे– श्रुतकिर्ती, कुमारसेन, वीरसेन, मेघनाद, सिंहनाद, समंतभद्र, जटाचार्य इत्यादी. या निरनिराळ्या आचार्यांनी कोणकोणते ग्रंथ लिहिले याचे स्पष्टीकरण पुढील श्लोकात केले आहे–

"शालाक्यं पूज्यपादं प्रकटितमधिकं शास्त्रतंत्रं च पात्र
स्वामिप्रोक्तं-विषोग्रग्रहशमनविधिः सिद्धसेनैः प्रसिद्धैः ।
काये या सा चिकित्सा दशरथगुरुतिर्मेघनादैः शिशूनां
वैद्यं वृष्यं च दिव्यामृतमणि कथितं सिंहनादैर्मुनींद्रैः । (अ. २० श्लो. ८५)

यावरून पूज्यपाद आचार्यांची 'शालाक्य तंत्र' नावाच्या ग्रंथाची रचना केली. पात्र स्वामीनी 'शल्यतंत्र' नावाच्या ग्रंथाची रचना केली. प्रसिद्ध आचार्य सिद्धसेनांनी विष व उग्र ग्रहांच्या शमनविधीचे निरूपण आपल्या ग्रंथात केले.

दशरथ गुरु व मेघनायसूरीनी बालरोग व तत्संबंधीची चिकित्सा आपल्या ग्रंथात केली. सिंहनाद आचार्यांनी शरीर बलवर्धक प्रयोगांचे प्रतिपादन केले. पूज्यपाद व पात्र स्वामींनी तर शल्यतंत्राचीही माहिती आपल्या ग्रंथात दिली आहे. तथापि या ग्रंथकर्त्यांपैकी पात्रस्वमी, सिद्धसेन, मेघनाद, दशरथसूरि व सिंहनाद इत्यादी ग्रंथकर्त्यांचे ग्रंथ उपलब्ध नाहीत.

**आचार्य संमतभद्र–**

आयुर्वेदविषयक महत्वपूर्ण ग्रंथाची रचना आचार्य संमतभद्रांनी केली उग्रादित्याचार्यांच्या कल्याणकारक ग्रंथामध्ये तदसंबंधाने खालीलप्रमाणे उल्लेख आहे–

अष्टांगमप्यखिलमत्र समंतभद्रैः। प्रोक्तं सविस्तरवचो विभर्वविशेषात् ॥
संक्षेपतो निगदितं तदिहात्मशक्त्या । कल्याणकारकमशेषपरार्थयुक्तम् ॥ (अ. २० श्लो. ८६)



( आचार्य संमतभद्रांनी अष्टांग आयुर्वेद नामक विस्तृत व गंभीर विवेचनात्मक ग्रंथाची रचना केली. त्याचेच अनुकरण संक्षेपात कल्याणकारक ग्रंथात करून मी संपूर्ण विषयाचे प्रतिपादन केले आहे. यावरून उग्रादित्याचार्यांच्या वेळी आचार्य संमतभद्रांचा ग्रंथ उपलब्ध होता असे निश्चितपणे दिसते. )

तिसऱ्या शतकात आचार्य संमतभद्र होऊन गेले. सिद्धांत, न्याय इत्यादी विषयावरील ग्रंथरचनेप्रमाणेच आयुर्वेदशास्त्रावरही त्यांनी अनमोल ग्रंथरचना केली. आज त्यांचा ग्रंथ संपूर्णतः उपलब्ध नसला तरी, इतर ग्रंथामधून आलेले त्यातील श्लोक उपलब्ध आहेत. त्यांचा एकत्र संग्रह केल्यास तीन चार हजार श्लोक सहज होऊ शकतात. अहिंसाप्रधान धर्माचे ते उपासक असल्यामुळे, त्यांनी अहिंसात्मक धर्माचे प्रतिपादन केले आहे. यांशिवाय आपल्या ग्रंथात त्यांनी जैन पारिभाषिक शब्दांचा प्रयोग केला आहे, संकेत वापरले आहेत. त्यामुळेच या ग्रंथाचा वापर करताना जैन सिद्धांताच्या प्रक्रियेचे ज्ञान असणे अत्यंत आवश्यक आहे. उदाहरणार्थ संमतभद्रांच्या ग्रंथाच्या 'रत्नत्रयौषध' चा उल्लेख आलेला आहे. सामान्य वैद्य वज्रादी तीन रत्नाद्वारे बनविलेले औषध किंवा भस्म असा अर्थ लावणे शक्य आहे, पण ते चूक होय. जैन सिद्धांतात सम्यग्दर्शन, सम्यक्ज्ञान व सम्यक्चारित्र याला रत्नत्रय असे म्हणतात. ही तीन रत्ने ज्याप्रमाणे मिथ्या दर्शन, ज्ञान व चारित्र्यरूपी त्रिदोषांचा नाश करतात त्याचप्रमाणे रस, गंधक व पाषाण या तीन धातूंना एकत्र करून तयार होणारे रसायन वात, पित्त व कफ इत्यादी त्रिदोषांना दूर करते, म्हणून या औषधाचे नांव रत्नत्रयौषध असे आहे.

त्याचप्रमाणे औषधाची निर्मिती करताना घ्यावयाचे प्रमाणही त्यांनी जैन मताच्या संकेतानुसार निर्देशित केले आहे. उदा. रससिंदूर कसा तयार करावा हे सांगताना म्हटले आहे की,

" सूतं केसरिगंधकं मृगनवासारद्रुमम् मर्दितम् "

या संकेताचा अर्थ जैन सिद्धांताचे ज्ञान असणाराच समजू शकतो. जैन तीर्थंकरांची भिन्न भिन्न चिन्हे आहेत. त्या चिन्हांच्या संकेतावरून चिन्हांकित तीर्थंकराची संख्या येथे घ्यावी लागणार आहे. सूतं केसरि म्हणजे रस केसरीच्या प्रमाणात घ्या. अर्थात केसरी म्हणजे सिंह व सिंह चौविसावे तीर्थंकर भगवान महावीरांचे चिन्ह आहे. म्हणजे केसरीसाठी २४ संख्या घ्यावी लागेल. गंधक मृग म्हणजे हरिण व हरिण १६ वे तीर्थंकर शांतिनाथांचे चिन्ह आहे. म्हणजेच गंधक १६ भाग व रस २४ भाग घ्यावयास हवे.

या प्रयोगामुळे अनेक जैन प्रयोगिक शब्दांची माहिती आपणास मिळते, वैद्यक ग्रंथातील पारिभाषिक शब्दांचा अर्थ समजण्यासाठी जैन विद्वानांनी पारिभाषिक शब्दकोषाची रचनाही केलेली आहे. उपलब्ध कोषामध्ये आचार्य अमृतनंदीचा कोष महत्त्वपूर्ण व मोलाचा आहे. तथापि तो अपूर्ण आहे. वनस्पतीसाठीही काही वेळा जैन पारिभाषिक शब्द वापरलेले दिसतात. अशा प्रकारे समंतभद्रांनी आयुर्वेद शास्त्रामध्ये ग्रंथरचना या शास्त्राची मोठ्या प्रमाणात प्रगति घडवून आणलेली दिसते. बंगलोर येथील प्रसिद्ध जैन ज्योतिर्वेद विद्वान श्री. शशिकांत जैन यांचेकडे आचार्य समंतभद्र लिखित ताडपत्रावर लिहिलेला विषवैद्यकावरील अनमोल ग्रंथ आहे. त्यांच्या मतानुसार तो अद्‌भूत व अनन्यसाधारण, अभूतपूर्व आहे. जैन आयुर्वेदशास्त्रात महान कार्य करणाऱ्या या आचार्यांची सर्व ग्रंथरचना उपलब्ध होणे आवश्यक आहे

जैन आयुर्वेदाची निर्मिती भगवंताच्या दिव्यध्वनीतून झालेली आहे. ते ज्ञान गणधरांनी आपल्या शिष्यांना सांगितले, त्या शिष्यांनी पुढील पिढीतील शिष्यांना हे ज्ञान दिले. याप्रमाणे वैद्यकशास्त्राचे सर्वांगीण ज्ञान परंपरागत रीतीने एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे गेल्याची माहिती मिळते. संमतभद्राचार्यांच्या पूर्वीही काही आयुर्वेद ग्रंथाचे ग्रंथकर्ते सुमारे इ. स. पू. ३ किंवा २ शतकात होऊन गेले. ते कारवार जिल्ह्यातील होन्नावर तालुक्यातील गेरसप्पाजवळ हाडहळ्ळीमध्ये ( संगीतपुरात ) राहत असत. येथील इंद्रगिरी व चंद्रगिरी पर्वतावर ते तपश्चर्या करीत असावेत. अजूनही या पर्वतांचे प्राचीनत्व अवशिष्ट आहे. महर्षि सामंतभद्राचार्यांनी आपल्या




'रसायन सिद्धांतकल्प' नावाच्या ग्रंथात या मुनीचा उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे, "श्रीमद्भल्लातकादे वसति जिनमुनिः सूतवादे रसवर्जे" सामंतभद्रानी आपल्या ग्रंथाला "रसेंद्रजैनागमसूत्रबद्ध" असे नाव दिले आहे. यावरून त्यांच्या पूर्वाचार्यांची परंपरागतता लक्षात येते.

### पुष्पायुर्वेद--

जैनधर्म अहिंसा प्रधान धर्म असल्यामुळे, महाव्रतधारी मुनींनी औषध निर्माण करताना कोणत्याही प्राण्याची हिंसा होणार नाही याकडे प्रकर्षाने लक्ष दिले. कोणालाही त्रास होणार नाही इतकेच नव्हे तर एकेंद्रिय प्राण्यालाही बुद्धीपुरस्सर त्रास दिला जाणार नाही याची त्यांनी काळजी घेतली. त्यामुळे पुष्पायुर्वेद ग्रंथाची निर्मिती केलेली दिसते. आयुर्वेद ग्रंथकारांनी ज्याप्रमाणे आपल्या ग्रंथात वनस्पतींना स्थान दिले आहे त्याचप्रमाणे पुष्पायुर्वेदात केवळ परागरहित फुलांना स्थान दिलेले आहे. पुष्पायुर्वेदात १८ हजार जातीच्या फुलांच्या उपयोगाने औषध निर्माण करण्याच्या प्रक्रिया सांगितल्या आहेत. पुष्पायुर्वेद ही इ. स. पूर्व ३ ऱ्या शतकातील ग्रंथरचना आहे. पुष्पायुर्वेद प्राचीन कन्नड लिपीत लिहिलेला असून वाचण्यास कठीण आहे. इतिहास संशोधनाच्या दृष्टीने हा ग्रंथ जसा अपूर्व आहे त्याचप्रमाणे आयुर्वेदशास्त्राच्या दृष्टीनेही हा ग्रंथ म्हणजे एक अपूर्व वस्तू आहे. या स्वतंत्र व वैशिष्ट्यपूर्ण आयुर्वेदाच्या क्षेत्रात जैनाचार्यांशिवाय कोणीही कार्य केलेले नाही. आयुर्वेदाच्या एकंदर स्वरूपातच नवीन भर घालण्याचे काम पुष्पायुर्वेदाने केले आहे. समंतभद्राचार्य गेरसप्पा येथे रहात असत, तेथे ज्वालामालिनी देवीचे प्रेक्षणीय ठिकाण आहे. दंतकथेनुसार या ठिकाणी सिद्धरसांनी युक्त असा एक रसकूप आहे. कलियुगात धर्मसंकट आल्यानंतर या रसकूपाचा उपयोग होईल असे मानतात. या रसकूपाचे स्थान पाहण्यासाठी सर्वांजन प्रयोग करावा असे मानतात. या विधीची माहिती पुष्पायुर्वेदात दिलेली आहे व हे सर्व पुष्प या प्रांतातील जंगलात मिळतात असे म्हणतात. यावरून सामंतभद्र आचार्यांच्या पूर्वी आयुर्वेदावर ग्रंथरचना करणारे ग्रंथकार होऊन गेले असे निश्चितपणे सांगता येते.

### महर्षी पूज्यपाद--

आचार्य सामंतभद्रानंतर आचार्य पूज्यपादांचे नाव आयुर्वेदाच्या क्षेत्रात मोठ्या आदराने घेतले जाते. इतरही महर्षीनी महर्षि पूज्यपादांचा नामनिर्देश मोठ्या आदराने केला आहे. आयुर्वेदशास्त्रातील त्यांच्या कार्याला असामान्य स्थान आहे. महर्षी पूज्यपादांनी व्याकरण शास्त्राची रचना केली. जैनसिद्धांतावर ग्रंथलेखन केले, त्याप्रमाणे आयुर्वेदशास्त्रातील त्यांच्या कार्यालाही महत्त्वाचे स्थान आहे. महर्षि पूज्यपादांनी वैद्यक ग्रंथाची निर्मिती केली ही माहिती निःसंदेहपणे सिद्ध आहे. कारण शिलालेखातच पुढीलप्रमाणे उल्लेख मिळतो--

न्यासं जैनेंद्रसंज्ञं सकलबुधनुतं पाणिनीयस्य भूमौ ।<br>
न्यासं शब्दावतारं मनुजततिहितं वैद्यशास्त्रं च कृत्वा ॥<br>
यस्तत्त्वार्थस्य टीकां व्यरचयदिह तां भात्यसौ पूज्यपादः ।<br>
स्वामी भूपैःस वन्द्यः स्वपरहितवचा पूर्णदृग्बोधवृत्तः ॥

बसवराजानेही आपल्या वैद्यकग्रंथात 'सिंदूरदर्पण व तद्वत्पूज्यपादीयमेव च' असा उल्लेख केला असून त्यांच्या अनेक योगांचे ग्रहण केले आहे.




अशीतिवातानां कालाग्निरुद्ररसोऽग्नितुण्डो वा ।<br>
शुद्धसूतं विषं गंधमजमोदं पलत्रयं । सर्जक्षारं यवक्षारं वह्निसैन्धव जीरकम् ॥<br>
सौवर्चलं विडंगानि टङ्कणं च कटुत्रयं । विषयुष्टि सर्वमसोजद्वीरैर्मर्दयेद्दिनम् ॥<br>
मरीचमात्रवटिका अग्निमान्द्यं प्रणाशयेत् । अशीतिवातजान्रोगान्गुल्मंच ग्रहणीजदान् ॥<br>
रसःकालाग्निरुद्रोऽयं पूज्यपादविनिर्मितः ( प्रष्ठं प्र. पृ. १०३ ब. रा. )



याचप्रमाणे पुढील औषधांचीही वर्णने बसवराजाने उद्धृत केली आहेत.

१) भ्रमणादि वातानां ( गन्धकरसायनम् )
२) वातादिरोगाणां त्रिकटुकादिनस्यम् (पूज्यपादीये)
३) जरगजाङ्कुहा (माधवनिदाने)
४) ज्वराणां चण्डभानुरसः (नित्यनाथीये)
५) शोफमुद्गररस इत्यादी

रत्नसमुच्चयकारांनी 'कर्मेरी पूज्यपादश्च' इत्यादी रूपाने त्यांचा उल्लेख आपल्या ग्रंथात केला आहे. तर आचार्य शुभचंद्रानी आपल्या ज्ञानार्णव ग्रंथात पूज्यपादांचा उल्लेख करून पुढील श्लोक लिहिला आहे.

अपाकुर्वंति यद्वाचः कायवाक्चित्तसंभवम् ।
कलङ्कमङ्गिनां सोऽयं देवनंदी नमस्यते ॥

महर्षि चामुंडराय व पार्श्वपंडित यांनी आपल्या कन्नड ग्रंथामध्येही पूज्यपादांचा उल्लेख केलेला आहे. महर्षि पूज्यपादाचार्यांनी आपल्या 'कल्याणकारक' या वैद्यकप्रधान्या द्वारे प्राण्यांच्या शारिरीक दोषांना, जैनेंद्र व्याकरणद्वारे वाचनिक दोषांना व तत्वार्थवृत्तिद्वारे मानसिक दोषाना दूर केले आहे. याशिवाय पूज्यपादाचार्यांनी शालक्यतंत्र नावाचा ग्रंथ लिहिला. ह्यात ऑपरेशनचे विधान आहे. पूज्यपादांचा समग्र ग्रंथ उपलब्ध नसला तरी तो महत्वपूर्ण असला पाहिजे हे मात्र निश्चित. 'कुमारी भृंगामलक तैल,' 'गंधक रसायन' 'महाविषमुष्टितैल' 'भुवनेश्वरी चूर्ण' यांचा विधि अनुष्टुप श्लोकात अनुक्रमे ३०, ३७, ३८, ४६ चरणात सांगितला आहे. त्यांच्या ग्रंथात सांगितलेली मरिचकादि प्रक्रिया पुढीलप्रमाणे आहे

मरिचमरिचमरिच तवततिक्तं च तिक्तम् ।
कणकणकणमूलं कृष्णकृष्णं च कृष्णम् ॥
मेघमेघं च मेघो रजरजरजनी यष्टियष्टयाद्ययष्टी ।
वज्रं वज्रंच वज्रं जलजलजलजं भृंगिभृंगी च भृंगम् ॥
श्रृंगं श्रृंगं च श्रृंग हरहरहर ही वालुकं वालुकं वा ।
कंटल्कंटल्ककंटं शिवशिवशिवनी नंदीनंदी च नंदी ॥
हेमंहेमं च हेमं वृषवृषवृषभा अग्निमग्नि च अग्ने ।
वांतिवांत च पैत्यं विषहरनिमिषं पूजितं पूज्यपादैः ॥

उपर्युक्त उल्लेखावरून महर्षि पूज्यपादांचा वैद्यक ग्रंथ किती महत्वपूर्ण व सिद्धौषधीनी भरलेला आहे हे लक्षात येते. 'कल्याणकारक ग्रंथ,' 'शालक्यतंत्र' याशिवाय 'वैद्यामृत' या ग्रंथाचीही रचना महर्षि पूज्यपादांनी केली. पूज्यपादनिर्मित वैद्यामृत ग्रथाचा उल्लेख गोम्मटदेवमुनीनी पुढीलप्रमाणे केला आहे.

सिद्धातस्य च वेदिनो जिनमते जैनेंद्रपाणिन्य च ।
कल्पव्याकरणाय ते भगवते देकालिमाराधिपा ॥
श्रीजैनेंद्रवचस्सुधारसवरैः वैद्यामृतो धार्यते ।
श्रीपादस्य सदा नमोस्तु गुरवे श्रीपूज्यपादो मुनेः ॥

या उल्लेखावरून पूज्यपादांच्या वैद्यक ग्रंथाची निरनिराळ्या भाषेमध्ये भाषांतरे झालेली असावीत यात शका नाही. पूज्यपादानंतर आलेला गोम्मटदेव मुनीनी आपल्या आयुर्वेदविषयक मेरुतंत्र नावाच्या ग्रंथात प्रत्येक परिच्छेदाच्या शेवटी महर्षि पूज्यपादांचा आदराच्या भावनेने उल्लेख केला आहे.

सिद्धनागार्जुन– सिद्धनागार्जुन हे पुज्यपादाचार्यांचे पुतणे होते. त्यांनी 'नागार्जुनकल्प' 'नागार्जुनकल्पपट' इत्यादी ग्रंथ लिहिले, याशिवाय त्यांनी सोने तयार करण्याची 'वज्रखेचरभुटिका' नावाची रत्नद्युटिका तयार केली होती. या भुटिके प्रीत्यर्थच त्यांना स्वतःचे डोळे घालवावे लागले अशी माहिती मिळते. तथापि आपल्या प्रयोगात ते यशस्वी झालेले दिसतात.

**उग्रादित्याचार्य–** पूज्यपादानतर आयुर्वेद शास्त्रावर ग्रंथरचना करणारे जे विद्वान झाले त्यात उग्रादित्याचार्यांचे नाव श्रेष्ठ म्हणून आदराने घेतले जाते. त्यांनी 'कल्याणकारक' नावाच्या महत्वपूर्ण ग्रंथाची रचना इ. स. ८ व्या शतकात केली. या ग्रंथात सुमारे ५०० श्लोक प्रमाणानी युक्त असून, जैन परंपरेनुसार त्यांनी कधीही औषधासाठी म्हणून मद्य, मांस, मध इत्यादींचा उपयोग केला नाही. या ग्रथात पंचवीस परिच्छेद आहेत. प्रत्येक परिच्छेदात निरनिराळे रोग, निर्मिती, निदान, पूर्वरूप चिकित्सा इत्यादींची क्रमवार चर्चा केली आहे. हजारो रोगांचे प्रतिपादन या ग्रंथात आहे. निरनिराळ्या जैन, जैनेतर, भारतीय व अभारतीय विद्वानांनी या ग्रंथाची प्रशंसा केली आहे.

आयुर्वेदासंबंधी उपलब्ध असलेल्या ग्रंथात महत्वपूर्ण ग्रंथ 'कल्याणकारक' हाच आहे. जैनाचार्य उग्रादित्य राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष व चालुक्य राजा कलिविष्णुवर्धन पंचम यांच्या समकालीन होते. रोगप्रतीकार व चिकित्सा प्रयोग उग्रादित्याचार्यांनी 'कल्याणकारक' ग्रंथात शास्त्रतंत्राचे वर्णन फार चांगल्या प्रकारानी केले आहे. तसेच कामचिकित्सा, बालचिकित्सा, ग्रहचिकित्सा, ऊर्ध्वांगचिकित्सा, शस्त्रचिकित्सा, दंष्ट्राचिकित्सा, जराचिकित्सा, वृषचिकित्सा इत्यादि चिकित्सांचे विवेचन केले आहे. या दोन विभागात विभाजित असलेल्या या ग्रंथाची सुरुवात आयुर्वेदाच्या तत्वाच्या प्रतिपादनाने केलेली आहे. शेवटी परिशिष्टात एक लांबलचक परिसंवाद दिलेला आहे. ज्यात मांसाशन वगैरेचे निर्मूलन व आवश्यकता वगैरेचे प्रतिपादन केलेले आहे. तेथेच असेही म्हटले आहे की, हा परिसंवाद राजा अमोघवर्षाच्या दरबारातील अनेक विद्वान, वैद्य व ग्रंथकार यांच्यात झालेला असून मांसाशनाच्या अनावश्यकतेचा विचार सिद्ध झालेला आहे.

उग्रादित्याचार्यांनी सुश्रुताचार्यांचा 'स्याद्वादी' या नावाने उल्लेख केला आहे, सुश्रुत ग्रंथामध्ये जो चिकित्साक्रम दाखविलेला आहे त्यातील सर्व प्रयोग मूलतः जैन प्रक्रियेशी मिळते जुळते आहेत. त्यामुळे उग्रादित्याचार्यांनी त्यांचा स्याद्वादी म्हणून उल्लेख केला आहे. अर्थात सुश्रुताचार्य असतीलच असेही म्हणता येत नाही. कारण पूज्यपादांच्या 'शल्यतंत्र' ग्रंथाचे अनुकरण करून त्यांनी आपला ग्रंथ लिहिला असणे शक्य आहे. अर्थात यासाठी संशोधन आवश्यक आहे. अर्थात तसे असले तरी, जैनाचार्यांचा आयुर्वेद शास्त्रावर मोठा अधिकार आहे हे निःसदेह. त्यामुळे त्यांच्या ग्रंथाचा प्रभाव इतर आयुर्वेदविषयक ग्रंथावर पडणे शक्य आहे.

याचप्रकारे मल्लिषेणसूरिनी आपल्या 'विद्यानुशासन' इत्यादि मंत्रशास्त्रविषयक ग्रंथामध्येही आयुर्वेद चिकित्साचे निरूपण केले आहे. मंत्रशास्त्र व आयुर्वेद शास्त्राचा निकटचा संबध होता म्हणूनच 'भैरव पद्मावती कल्प,' 'ज्वालामालिनी कल्प' इत्यादी. मंत्रशास्त्रामध्येही ठिकठिकाणी आयुर्वेदाचे उल्लेख मिळतात. आयुर्वेद विद्वानाला आपल्या शास्त्रात प्रवीण होण्यासाठी मंत्र, तंत्र, शकुन, निमित्त इत्यादी शास्त्रांचेही अध्ययन करावयास हवे. रोग्याच्या रोग परीक्षेसाठी सर्व दृष्टीने मिळणारे ज्ञान हे फलदायीच असते. यावरून पूर्वाचार्यांनी आयुर्वेदा-बरोबरच इतरही अन्य ग्रथाचा अभ्यास केला होता असे दिसते.

कन्नड भाषेतील जैन ग्रंथकर्ते संस्कृत भाषेत निर्माण झालेल्या वैद्यक ग्रंथाप्रमाणेच अन्य भारतीय भाषामध्येही वैद्यक ग्रंथांची निर्मिती झालेली आहे. तेलगू व तमिळ भाषामध्येही जैन वैद्यक ग्रथाची निर्मिती झाली आहे. मल्याळी भाषेत वैद्यक व ज्योतिष या दोन्हीही विषयाच्या संबधीची ग्रथ निर्मिती मोठ्या प्रमाणावर झाली. याशिवाय कन्नड भाषेतही वैद्यक व ज्योतिष ग्रंथाची निर्मिती झालेली दिसते. या भाषेत स्वतंत्र ग्रंथाप्रमाणेच संस्कृत वैद्यक ग्रंथावर लिहिलेले टीकात्मक ग्रथही निर्माण झाले.



जगद्दल सोमदेव कवीने पूज्यपादाचार्य रचित 'कल्याणकारक ग्रंथाचे' कन्नडमध्ये भाषांतर केले आहे. हा ग्रंथ पीठिका प्रकरण, परिभाषा प्रकरण, षोडशवर निरूपण इत्यादी अष्टांगांनी युक्त असून हा कन्नड भाषेतील आयुर्वेदविषयक ग्रंथातला प्राचीन ग्रंथ होय. या ग्रंथांत सोमनाथ कवीने पूज्यपादाचार्यांचा मोठ्या आदराने उल्लेख केला आहे.

सुकरं तानेने पूज्यपाद मुनिगल मुपेलद कल्याणका ।
रंकमवाहट सिद्धसार चरका मुत्कृष्टमं सद्गुणा ।
धिकमं वर्जित मद्य मास मधुवं कर्णाटदि लोकर ।
क्षकमा चित्र मदागे वित्र कवि सोमं पेलूद नितलूर्तिथि ।

हे काव्यही सुंदर असून प्रत्येक चरणाच्या द्वितीयाक्षरामध्ये ककार साधलेला आहे. ग्रंथकाराने स्पष्ट केले आहे की, आचार्य पूज्यपादांनी "कल्याणकारक" ग्रंथाची केलेली रचना, ज्यात मद्य, मांस व मध इत्यादींचा प्रयोग वर्ज्य सांगितला आहे, जो कृती वाग्भट, चरक यांच्या आयुर्वेदविषयक ग्रंथापेक्षा सर्वश्रेष्ठ आहे, अशा या लोकरक्षक, उत्कृष्ट ग्रंथाचे मी विविध छंदात व अत्यंत प्रेमाने कर्नाटक भाषेत भाषांतर केले. यावरून स्पष्ट आहे की, कवि सोमनाथांच्या वेळी वाग्भट, चरक इत्यादींचे ग्रंथही विद्यमान होते.

याच प्रकारे किर्तिवर्मनी गोवैद्य, मंगराजनी 'खगेंद्रमणिदर्पण' नामक विषवैद्यकावरील अभिनव चंद्रनी 'हयशास्त्र' नामक अश्वपरीक्षा व चिकित्साविषयक, देवेंद्रमुनींनी बाळग्रहचिकित्सा, अमृतनंदींनी वैद्यक 'निघंटु' इत्यादी ग्रंथांची रचना करून आयुर्वेदशास्त्राच्या क्षेत्रात असामान्य कामगिरी केली आहे. तसेच जगदेवनी महामंत्र व 'इत्यादी' श्रीधरदेवनी २४ अधिकारांनी युक्त वैद्यामृत ग्रंथाची रचना केली आहे. त्याचबरोबर साळव कवीद्वारा विरचित रसरत्नाकर व वैद्य सांगत्य या ग्रंथांनाही कमी महत्त्व देता येत नाही. याचप्रमाणे कन्नड भाषेतील महाकवींनी वैद्यक विषयातही अमूल्य सेवा प्रदान केली आहे.

जैनवैद्यक ग्रंथांनी अहिंसाप्रधान दृष्टीकोनाचा स्वीकार केला आहे. खा, प्या व मजा करा ही जैनांची विचारसरणी नाही. त्यांच्या मते आपल्या शरीराच्या स्वास्थ्यासाठी अन्य असंख्य जीवांची हत्या करणे मानवता होत नाही. आयुर्विज्ञानमहार्णव, आयुर्वेदकलाभूषण श्री शेष शास्त्रींनी मद्यमांसादिकांचा प्रयोग औषध म्हणून करणे अयोग्य असल्याचे आयुर्वेद संमेलनात सिद्ध करून दाखविले आहे. महामहोपाध्याय, विद्यानिधि कविराज श्री गजनाथ सेन व कविराज योगिंद्रनाथ सेन यांनी मद्यमांसाच्या औषधासाठी वापर अयोग्य असल्याचे व मद्यमांस मिश्रित औषध भारतीयांच्या आरोग्याला उपकारक नसल्याचे सिद्ध केले आहे. विश्वातील सर्व प्राणीमात्रांचे कल्याण करण्याचे श्रेय आयुर्वेदाला आहे, असा विश्वकल्याणाचा प्रचंड दृष्टीकोन जैन आयुर्वेदात स्विकारलेला दिसतो. औषध तयार करतानाही कोणत्याही प्राण्याला दुःख होणार नाही याची काळजी यांनी घेतलेली दिसते.

अशा प्रकारे भ. आदिनाथांच्या दिव्यध्वनीतून निघालेल्या या जैन आयुर्वेद व शरीरशास्त्राची अनेक आचार्यांच्या महान ग्रंथनिर्मितीमुळे मोठ्या प्रमाणात प्रगति झालेली दिसते. या जैन आचार्यांनी आयुर्वेद शासनाची उत्क्रांती करताना, निरनिराळ्या चिकित्सांचे विश्लेषण करताना किंवा निरनिराळे प्रयोग करून सिद्धौषधि तयार करताना, आयुर्वेदशास्त्राच्या विश्वकल्याणाच्या, अहिंसा तत्त्वाचा कधीही विसर पडू दिला नाही. म्हणूनच जगातील कोणत्याही धर्माच्या किंवा देशाच्या आयुर्वेदशास्त्रविषयक ग्रंथात न आढळणाऱ्या 'पुष्पायुर्वेद' या स्वतंत्र शाखेची निर्मिती करणे, ती उत्क्रांत करणे, उपयुक्त बनविणे हे जैनधर्माचे भारतीय आयुर्वेद शास्त्रातील असामान्य कर्तव्य होय.

# जैन गणित

भारतावर्षामध्ये गणित-ज्योतिष-भूगोल-खगोल-शास्त्रांचे अध्ययन फार प्राचीन कालापासून चालत आले आहे. आर्यभट्ट, ब्रह्मगुप्त, महावीराचार्य, भास्कराचार्य इ. प्राचीन ऋषींनी गणित विषयासंबंधी अनेक ग्रंथ निर्माण केले आहेत.

आर्यभट्ट हा गणित शास्त्राचा प्रथम पुरस्कर्ता होता अशी आतापर्यंत इतिहासकारांची समजूत होती. पण जैन गणित शास्त्रांचा शोध लागल्यानंतर गणित-शास्त्र परंपरा त्याहीपेक्षा प्राचीन कालापासून चालत आली आहे हे आता सर्वमान्य झाले आहे.

इ. सनापूर्वी सुमारे ३०० वर्षापूर्वी श्री भद्रबाहू आचार्य गणित व ज्योतिष शास्त्राचे पारगामी होऊन गेले. १) सूर्यप्रज्ञप्ति, २) भद्रबाहुसंहिता हे त्यांचे मौलिक ग्रंथ होत. त्या नंतर सुमारे इ. सनाच्या आठव्या शतकामध्ये श्री महावीराचार्य यांनी 'गणितसार-संग्रह' ग्रंथ निर्माण केला.

इ. सन १९१२ पासून प्रो. रंगाचार्यांनी भारतीय गणितशास्त्राचे जगत्प्रसिद्ध गणितज्ञ श्री महावीराचार्य यांच्या गणित-सार-ग्रंथाचा सर्वत्र प्रसार केला. सर्व शास्त्रामध्ये प्रवेश होण्यासाठी गणित व व्याकरण विषयांचे ज्ञान अत्यंत आवश्यक आहे.

जैन परंपरेमध्ये गणितशास्त्राचे प्रामुख्याने दोन विभाग आहेत– १) लौकिक गणित, २) अलौकिक गणित.

## १. लौकिक गणित

लौकिक गणितामध्ये १) संख्यामापन, २) अष्ट परिकर्म इत्यादि विषयांचा परिचय आढळून येतो.

संख्यामापनामध्ये, १) क्षेत्रमापन, २) कालमापन, ३) धान्यमापन, ४) वस्तुमापन इत्यादिकांचा समावेश होतो.

### १. संख्यामापन

दाशमिक क्रम पद्धतीने एकं, दहं इत्यादि स्थानांचे कोष्टक नियम ठरलेले आहेत.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | एकं | = | १ | ६ | लक्ष | १,००,००० |
| २ | दशं | = | १० | ७ | दशलक्ष | १०,००,००० |
| ३ | शतं | = | १०० | ८ | कोटि | १,००,००,००० |
| ४ | सहस्त्रं | = | १,००० | ९ | दशकोटि | १०,००,००,००० |
| ५ | दशसहस्त्रं | = | १०,००० | १० | कोटाकोटी | $(१,००,००,०००)^{२}$ |

त्यापुढे ११) अर्बुद (अरब), १२) दश अर्बुद (१० अरब), १३) खर्व, १४) दश खर्व, १५) पद्म, १६) महापद्म, १७) क्षोणी, १८) महाक्षोणी, १९) शंख, २०) महाशंख, २१) क्षित्या, २२) महाक्षित्या, २३) क्षोभ, २४) महाक्षोभ याप्रमाणे २४ स्थाने संख्यामापन प्रक्रियेमध्ये प्रसिद्ध आहेत.

### २. क्षेत्रमापन

क्षेत्रमापन करण्यासाठी आकाशाच्या एक प्रदेशाला व्यापणारा एक परमाणु सर्वात सूक्ष्ममापक ठरविला आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अनंत परमाणु | = | १ उवसन्नासन्न रेणु | ८ जव | = | १ अंगुल |
| ८ उवसन्नासन्न रेणु | = | १ सन्नासन्न रेणु | २ अंगुल | = | १ पाद |
| ८ सन्नासन्न रेणु | = | १ त्रुटि रेणु | २ पाद | = | १ वीत |
| ८ त्रुटि रेणु | = | १ त्रसरेणु | २ वीत | = | १ हात |
| ८ त्रसरेणु | = | १ रथरेणु | २ हात | = | १ रिक्कू |
| ८ रथरेणु | = | १ बालाग्र | २ रिक्कू | = | १ दंड (धनुष्य) |
| ८ बालाग्र | = | १ लीखा | २००० धनुष्य | = | १ कोस |
| ८ लीखा | = | १ जूं | ४ कोस | = | १ योजन |
| ८ जूं | = | १ जव | असंख्यात योजन | = | १ राजू |

### ३. कालमापन

कालाचे मापन करण्यासाठी सर्वात सूक्ष्म काल 'समय' मानला आहे. पुद्गल परमाणु अत्यंत मंद गतीने आकाशाच्या एका प्रदेशावरून दुसऱ्या प्रदेशावर जाण्यास जो अत्यंत सूक्ष्म काल लागतो त्याला 'समय' म्हटले आहे.

#### कोष्टक

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| असंख्यात समय | = | १ आवली | ३ ऋतु | = | १ अयन |
| संख्यात आवली | = | १ उच्छ्वास | २ अयन | = | १ वर्ष |
| ७ उच्छ्वास | = | १ स्तोक | ५ वर्ष | = | १ युग |
| ७ स्तोक | = | १ लव | असंख्यात वर्ष | = | १ पल्य |
| ३८.१/२ लव | = | १ घटका | १० कोडाकोडी अद्धापल्य | = | १ सागर |
| २ घटका | = | १ मुहूर्त | | | |
| ३० मुहूर्त | = | १ दिवस | १० सागर | = | १ उत्सर्पिणी काल<br>१ अवसर्पिणी काल |
| १५ दिवस | = | १ पक्ष | | | |
| २ पक्ष | = | १ मास | १ उत्सर्पिणी काल<br>१ अवसर्पिणी काल | = | १ कल्पकाल |
| २ मास | = | १ ऋतु | | | |

### ४. धान्यमापन कोष्टक

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ षोडशिका | = | १ कुडव | ४ द्रोण | = | १ मानी |
| ४ कुडव | = | १ प्रस्थ | ४ मानी | = | १ खारी |
| ४ प्रस्थ | = | १ आढक | ५ खारी | = | १ प्रवर्तिका |
| ४ आढक | = | १ द्रोण | ५ प्रवर्तिका | = | १ कुंभ |

### ५. सुवर्ण-चांदी-लोखंड मापक कोष्टक

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ गंडक | = | १ गुंज | ४ कर्ष | = | १ पल |
| २ गुंज | = | १ मासा (रत्ती) | १२ १/२ पल | = | १ प्रस्थ |
| १६ मासे | = | १ धरण | २०० पल | = | १ तुला |
| २.१ २ धरण | = | १ कर्ष | १० तुला | = | १ भार |

टीप– एका कुडव मापात ३६०० तांदूळ मावतात.

( सहस्रैश्च त्रिभिः षड्भिः शतैश्च व्रीहिभिः समं । य. सपूर्णोऽभवत्सोऽयं कुडव. परिभाष्यते ॥ )

## ६. संख्यामापन कोष्टक

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | एकं | = | १ | १५ | अब्बुद | = | $(१,००,००,०००)^{८}$ |
| २ | दशं | = | १० | १६ | निरब्बुद | = | $(१,००,००,०००)^{९}$ |
| ३ | शतं | = | १०० | १७ | अहह | = | $(१,००,००,०००)^{१०}$ |
| ४ | सहस्र | = | १,००० | १८ | अबब | = | $(१,००,००,०००)^{११}$ |
| ५ | दशसहस्र | = | १०,००० | १९ | अटट | = | $(१,००,००,०००)^{१२}$ |
| ६ | शतसहस्र (लक्ष) | = | १,००,००० | २० | सोगन्धिक | = | $(१,००,००,०००)^{१३}$ |
| ७ | दश शत सहस्र | = | १०,००,००० | २१ | उप्पल | = | $(१,००,००,०००)^{१४}$ |
| ८ | कोटी | = | १,००,००,००० | २२ | कुमुद | = | $(१,००,००,०००)^{१५}$ |
| ९ | प्र-कोटी | = | $(१,००,००,०००)^{२}$ | २३ | पुंडरिक | = | $(१,००,००,०००)^{१६}$ |
| १० | कोटी-प्रकोटी | = | $(१,००,००,०००)^{३}$ | २४ | पदम | = | $(१,००,००,०००)^{१७}$ |
| ११ | नहुत | = | $(१,००,००,०००)^{४}$ | २५ | कथान | = | $(१,००,००,०००)^{१८}$ |
| १२ | निन्नहुत | = | $(१,००,००,०००)^{५}$ | २६ | महाकथान | = | $(१,००,००,०००)^{१९}$ |
| १३ | अखोभिनी | = | $(१,००,००,०००)^{६}$ | २७ | असंख्येय | = | $(१,००,००,०००)^{२०}$ |
| १४ | बिन्दु | = | $(१,००,००,०००)^{७}$ | | | | |

## ७ कालमापन कोष्टक

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५ वर्ष | = १ युग | ८४ लाख नीलनांग | = १ नलिन | ८४ लाख हाहांग | = १ हाहा |
| ८४ लाख वर्ष | = १ पूर्वांग | „ „ नलिन | = १ कमलांग | „ „ हाहा | = १ हुहुंग |
| „ „ पूर्वांग | = १ पूर्व | „ „ कमलांग | = १ कमल | „ „ हुहुंग | = १ हुहू |
| „ „ पूर्व | = १ नयुतांग | „ „ कमल | = १ त्रुटितांग | „ „ हुहू | = १ लतांग |
| „ „ नयुतांग | = १ नयुत | „ „ त्रुटितांग | = १ त्रुटित | „ „ लतांग | = १ लता |
| „ „ नयुत | = १ कुमुदांग | „ „ त्रुटित | = १ अटटांग | „ „ लता | = १महालतांग |
| „ „ कुमुदांग | = १ कुमुद | „ „ अटटांग | = १ अटट | „ „ महालतांग | = १ महालता |
| „ „ कुमुद | = १ पद्मांग | „ „ अटट | = १ अममांग | „ „ महालता | = १ श्रीकल्प |
| „ „ पद्मांग | = १ पद्म | „ „ अममांग | = १ अमम | „ „ श्रीकल्प | = १ हस्तप्रहेलित |
| „ „ पद्म | = १ नीलनांग | „ „ अमम | = १ हाहांग | „ „ हस्तप्रहेलित | =१ अचलप्रं |

८४ लाख संख्येला ३१ वेळा परस्पर गुणले असताना ९० अंकप्रमाण संख्या येते.

## २. अंकमापन पद्धति

अंकमापन पद्धतीचे निरनिराळे प्रकार जैनशास्त्र परंपरेत आढळून येतात.

**१) प्रकार–** पहिला व शेवटचा आकडा सांगून नंतर मधले आकडे सांगणे.

उदाहरणार्थ– ( ७ ९९९९ ९९८ ) ही संख्या– संख्येचा पहिला आकडा ७ आहे, शेवटचा आकडा ८ आहे व मधले सहा आकडे ९ आहेत. ती संख्या.

**२) प्रकार–** ( अंकानां वामतो गतिः ) अंकाची मोजणी उजवीकडून डावीकडे करणे.

उदाहरणार्थ– (४,६६,६६,६६४) ही एक संख्या आहे. चतुष्पष्टिश्च, पट्शतानिव, पट्पष्टिः सहस्राणि च, पट्पष्टि लक्षाणिच, चतस्रः कोट्यश्च ।

३) प्रकार– डावीकडून उजवीकडे अथवा मोठ्या संख्येकडून लहान संख्येकडे मोजणे.

उदाहरणार्थ– ( २,२७,९९,४९८ ) ही संख्या– द्वे कोटयौ, सप्तविंशतिलक्षाणि, नवनवति; सहस्राणि, चत्वारि शतानि, अष्टानवतिश्च । ( दोन कोटी, सत्तावीस लाख, नव्याण्णव हजार, चारशे अठ्ठयाण्णव. )

### ३. अक्षरलिपी.

पूर्वी अंकलिपी अक्षर लिपीमध्ये सांगण्याचा देखील सुंदर व मनोरंजक प्रकार शास्त्रामध्ये आढळून येतो.

जगातील सर्व पर्याप्त मनुष्यांची संख्या किती आहे या संबंधी जैन शास्त्रामध्ये मोठ्या मार्मिक रितीने वर्णन केलेले आढळून येते.

तललीन मधुग विमलं धूमसिलागावि चोर भयमेरु ।
तटहरिख झसा होंति हु माणुसपज्जत्त संखंका ॥ ( गोम्मटसार )

या श्लोकात २९ अंक प्रमाण संख्या पर्याप्त मनुष्यसंख्या सांगितली आहे. ७९,५२,८१,६२,५१,४२,६४, ३३,७५,९३,५४,३९,५०,३३६ या अक्षर लिपीची उपपत्ती फार मार्मिक रितीने बसविली आहे.

कटपय पुरस्य वर्णैः नव नव पंचाष्ट कल्पितैः क्रमशः ।
स्वर ञान शून्यं संख्या मात्रोपरिमाक्षरं त्याज्यं ॥

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| ट | ठ | ड | ढ | ण | त | थ | द | ध |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| प | फ | ब | भ | म | | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | | | | |
| य | र | ल | व | श | ष | स | ह | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | |

याप्रमाणे १ ते ९ आकड्यावर सर्व व्यंजने बसविली आहेत. कोणताही स्वर ( ञ व न ) या वर्णांना शून्य ० ही संज्ञा दिली आहे.

( अंकानां वामतो गतिः । ) या न्यायाने वरील पर्याप्त मनुष्य संख्या– उजवीकडून डावीकडे मोजावी.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ल | म | वि | ग | धु | म | न | ली | ल | त |
| ३ | ५ | ४ | ३ | ९ | ५ | ० | ३ | ३ | ६ |

अथवा डावीकडून उजवीकडे लिहिण्याचाही प्रकार आढळून येतो, जसे–

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वा | प | ण | न | र | नो | ना | नं | ण्यारंगे जुदी । |
| ४ | १ | ५ | ० | २ | ० | ० | ० | ही संख्या अकरा अंकातील पदांची बेरीज आहे |
| ज | न | क | न | ज | य | सी | म | बाहिरे वण्णा । |
| ८ | ० | १ | ० | ८ | १ | ७ | ५ | ही संख्या अंगबाह्य अक्षरांची सांगितली आहे. |

याप्रमाणे अंकलिपी अक्षरलिपीमध्ये सांगण्याचा प्रकार फार रोचक आहे.

### अंकमापन पद्धतीचा दुसरा प्रकार.

वस्तूंच्या संख्येवरून अकमापन करण्याचा प्रकार देखील प्राचीनकाळी प्रचलित होता.

१ चंद्र, शशी, सोम, रूप

२ युगल- लोचन- अक्षि- चक्षु

३ लोक, रत्न, गुण, अग्नि.

४ समुद्र, सागर, गति, वेद, बंध, कषाय.

५ बाण, इषु, शर, शस्त्र, भूत, इंद्रिय, व्रत, विषय.

६ ऋतु, जीव, रस, लेश्या, द्रव्य.

७ शैल, पर्वत, भय, मुनि, गिरि, अश्व, सर्प, धातु, व्यसन, मातृका.

८ शरीर, गज (हत्ती), कर्म, व्दिरद, दन्ती, नाग, अनीक,

९ नंद, रध्र, पदार्थ, निधि, रत्न, ग्रह, दुर्गा.

१० आकाश, गगन, ख, नभ, अनन्त, अंतरिक्ष, स्वर्ग.

### २. अष्ट परिकर्म

गणित शास्त्रामध्ये लौकिक गणित प्रक्रिया ८ प्रकाराने आढळून येते, यालाच 'परिकर्माष्टक' संज्ञा आहे.

१ संकलन (बेरीज). २ व्यकलन, (वजावाकी). ३ गुणाकार. ४ भागाकार. ५ वर्ग. ६ वर्गमूळ. ७ घन. ८ घनमूळ.

### १. बेरीज

दोन आकड्यांचे किंवा दोन संख्यांचे परस्परात संकलन करणे म्हणजे परस्परात मिळविणे तिला बेरीज म्हणतात.

ज्या संख्येत दुसरी संख्या मिळवितो त्या संख्येला मूल राशी म्हणतात व मिळविणाऱ्या संख्येला 'धनराशि' म्हणतात.

जसे २५६ व ८४ या दोन संख्याची बेरीज करण्याचे दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार– प्रथम एकं स्थानातील आकड्यांची बेरीज करून त्या बेरजेचा एकंचा आकडा एकं स्थानी मांडावा. दहं स्थानचा आकडा दहं स्थानी मांडावा. नंतर दहं स्थानातील आकड्यांची बेरीज करावी. त्यातील पहिला आकडा दहं स्थानी मांडावा व दुसरा आकडा शतं स्थानी मांडावा. नंतर शतं स्थानच्या आकड्यांची बेरीज करावी.

| शतं | दहं | एकं |
|---|---|---|
| २ | ५ | ६ |
| ० | ८ | ४ |
| १ | १ | |
| ३ | ४ | ० |

दुसरा प्रकार

| शतं | दहं | एकं |
|---|---|---|
| २ | ५ | ६ |
| + | ८ | ४ |
| २ | ० | ० |
| | ५ | ० |
| | ८ | ० |
| | | ६ |
| | | ४ |
| २ | ० | ० |
| १ | ३ | ० |
| | १ | ० |
| ३ | ४ | ० |

प्रथम शतं आकड्यांची बेरीज करावी. ती शतं स्थानी मांडावी. नंतर दहं स्थानच्या आकड्याची बेरीज करून त्यातील पहिला आकडा दहं स्थानी लिहावा व दुसरा आकडा शतं स्थानी लिहावा. नंतर एकं स्थानच्या आकड्यांची बेरीज करावी. त्यातील एकंचा आकडा एक स्थानी लिहावा व दहंचा आकडा दहं स्थानी लिहावा नंतर बेरीज करावी.

१ ते १० अंकाची बेरीज करण्यासाठी जैन शास्त्रात सोपे व उपयुक्त करणसूत्र सांगितले आहे. (मुहभूमी जोगदले पदगुणिदे पदधणं होदि) पहिल्या व शेवटच्या आकड्याची बेरीज करून (१+१०=११) त्याचा अर्ध करून (११÷२=५½) त्याला पदसंख्या १० ने गुणून (५½×१०=५५) जो आकडा येईल ती १ ते १० अंकांची बेरीज होय

## २. व्यकलन– ( वजाबाकी )

मोठ्या संख्येतून लहान संख्या वजा करणे याला व्यकलन किंवा वजाबाकी म्हणतात. मोठ्या संख्येला मूल राशी म्हणतात. वजा करणाऱ्या संख्येला ऋण राशी म्हणतात. प्रथम एकं स्थानातील संख्याची वजाबाकी करावी. जर मूलराशीचा आकडा ऋण राशीच्या आकड्यापेक्षा लहान असेल तर दहं स्थानातील १ हातचा घेऊन त्यात मिळवून नंतर त्यातून ऋणराशीचा आकडा वजा करावा. नंतर जर दहं स्थानातील १ आकडा हातचा घेतला असेल तर तो ऋण राशीच्या दहं स्थानच्या आकड्यात मिळवून नंतर मूल राशीच्या दहं स्थानच्या आकड्यातून वजा करावा. येथेही जर मूल राशीचा दहं स्थानचा आकडा ऋण राशीच्या आकड्यापेक्षा लहान असेल तर शतं स्थानचा १ आकडा हातचा देऊन मूल राशीच्या आकड्यात मिळवून नंतर ऋण राशीचा आकडा वजा करावा. नंतर शतं स्थानातील आकड्याची वजाबाकी करावी. येथे जर दहं स्थानासाठी १ आकडा हातचा घेतला असेल तर तो १ ऋण राशीच्या शतं स्थानच्या आकड्यात मिळवून नंतर मूल राशीच्या आकड्यातून वजा करावा.

दुसरा प्रकार

प्रथम शतं स्थानातील आकड्यांची वजाबाकी करावी. नंतर दहं व इतर एकं स्थानातील आकड्याची वजाबाकी करावी. मूल राशीचा आकडा ऋण राशीपेक्षा लहान असेल तर १ आकडा कमी करावा जसे–

| | | |
|---|---|---|
| २ | ५ | ६ |
| – | ८ | ४ |
| २ | १५ | ६ |
| –१ | – ८ | –४ |
| १ | ७ | २ |




३. गुणाकार– १) ज्या संख्येला गुणावयाचे तिला 'गुण्यराशी' म्हणतात. २) ज्या संख्येने गुणावयाचे तिला 'गुणक राशी' म्हणतात. ३) गुणाकार करून आलेल्या संख्येला 'गुणित राशी' म्हणतात.

गुणाकारचे २ प्रकार.

जसे– गुण्य गुणक

१२८ × ६४ =

प्रथम प्रकारात गुण्य राशीला गुणक राशीतील एक एक आकड्याने गुणावे. दुसऱ्या प्रकारात गुणक राशीला गुण्य राशीतील एक एक आकड्यानी गुणावे.

| प्रकार १. | प्रकार २. |
|---|---|
| १२८ | १२८ |
| × ६४ | × ६४ |
| ५१२ | ६४ |
| ७६८४ | १२८ |
| ८१९२ | ५१२ |
| | ८१९२ |

तिसरा प्रकार–

| | |
|---|---|
| १२८ | १२८ |
| × ६० | × ४ |
| ७६८० | ५१२ |
| +५१२ | |
| ८१९२ | |

चवथा प्रकार– गुण्य–गुणक राशीचे अवयव पाडून गुणाकार करावा.

१२८ = २ × ६४

= २ × ४ × १६

६४ = ४ × १६

(१२८ × ६४) = (२ × ४ × १६ × ४ × १६) = ८१९२

= (२ × ४ × १६ × ६४) = ८१९२

= (२ × १६ × १६ × १६) = ८१९२

४. भागाकार– भागाकारामध्ये देखील तीन राशि असतात.

१. भाज्य– ज्या संख्येला भागावयाचे ती 'भाज्य' राशि.

२. भाजक– ज्या संख्येने भागावयाचे ती 'भाजक' राशि.

३. भाजित– भाज्याला भाजकाने भागून आलेली राशि. 'भाजित' राशि किंवा भक्त.

जसे– २०० ÷ ८ = २५

$\frac{२००}{८}$ = २५

८ ) २०० ( २०
    १६०
८ ) ४० ( ५ : २० + ५ = २५
    ४०
    ००

५. वर्ग– दोन समान संख्यांचा परस्पर गुणाकार करणे याला वर्ग किंवा 'कृति' म्हणतात.

जसे– १) २ चा वर्ग (२ × २) = ४ = ($२^२$)

२) ४ चा वर्ग (४ × ४) = १६ = ($४^२$)

३) १६ चा वर्ग (१६ × १६) = २५६ = ($१६^२$)

४) २५६ चा वर्ग (२५६ × २५६) = ६५५३६ = (पण्णठ्ठी)

५) ६५५३६ चा वर्ग (६५५३६ × ६५५३६) = ४२९४९६७२९६ (बादाल)

६) बादालचा वर्ग = (एकठ्ठी)
(१८४४६७४४०७३७०९५५१६१६) वीस अंक प्रमाण संख्या....
याला 'द्विरूप वर्गधारा' म्हणतात.

द्विरूपवर्गधारेचे ४ थे स्थान = पण्णठ्ठी
,, ,, ५ वे स्थान = बादाल
,, ,, ६ वे स्थान = एकठ्ठी

६. घन– तीन समान राशींचा परस्पर गुणाकार करणे याला 'घन' म्हणतात.

जसे– २ चा घन (२ × २ × २) = ८ = ($२^3$)
३ चा घन (३ × ३ × ३) = २७ = ($३^3$)
७ चा घन (७ × ७ × ७) = ३४३ = ($७^3$)
१६ चा घन (१६ × १६ × १६) = ४०९६ = ($१६^3$)
६४ चा घन (६४ × ६४ × ६४) = २६२१४४ = ($६४^3$)

७. वर्गमूळ– ज्या संख्येचा वर्ग केलेला असतो ती संख्या त्या वर्गाचा 'वर्गमूळ' म्हटली जाते.

जसे– ४ चा वर्गमूळ (४ ÷ २) = २
१६ चा वर्गमूळ (१६ ÷ ४) = ४
२५६ चा वर्गमूळ (२५६ ÷ १६) = १६

८. घनमूळ– ज्या संख्येचा घन केलेला असतो ती संख्या त्या घनाचा 'घनमूळ' म्हटली जाते.

जसे– ८ चा घनमूल (८ ÷ २ ÷ २) = २
६४ चा घनमूल (६४ ÷ ४ ÷ ४) = ४
४०९६ चा घनमूल (४०९६ ÷ १६ ÷ १६) = १६

याप्रमाणे पूर्ण अंकाचे परिकर्माष्टक गणिताचा आतापर्यन्त आपण विचार केला. यापुढे अपूर्ण अंकाचे भिन्न गणित परिकर्माष्टकाचा देखील जैन गणित शास्त्रात उल्लेख आहे. या भिन्न गणिताला 'अंशहार' किंवा 'दशांश' गणित म्हणतात.

संख्येचा जेवढा अंश असेल तो अंशस्थानी वर लिहावा. ज्या संख्येचा तो अंश असेल ती संख्या छेदस्थानी खाली लिहावी.

जसे– $\frac{१}{२}$ $\frac{१}{३}$ $\frac{२}{३}$ $\frac{४}{५}$ इत्यादि.

या अपूर्णांक संख्येची बेरीज–वजाबाकी करताना छेदस्थानचा आकडा समान (समच्छेद) करावा. नंतर त्या समच्छेदाला छेदस्थानच्या आकड्याने भागावे. त्या भागाकाराने अंशस्थानच्या आकड्याला गुणावे. याप्रमाणे सर्व संख्या समच्छेद करून नंतर त्यांची बेरीज किंवा वजाबाकी करावी.

जसे– $\frac{१}{२} + \frac{१}{३} = \frac{३}{६} + \frac{२}{६} = \frac{५}{६}$

तसेच या अपूर्णांक संख्यांचा गुणाकार किंवा भागाकार करताना अंश व छेदातील आकड्यांचा जर परस्पर भाग सुटत असेल तर त्यांचा अपच्छेद करून नंतर अंशातील आकड्यांचा परस्पर व छेदातील आकड्यांचा परस्पर गुणाकार करून क्रमाने अंशस्थानी व छेदस्थानी लिहावा.

जसे— $$\frac{\overset{१}{\cancel{२}}}{३} \times \frac{३}{\underset{२}{\cancel{४}}} = \frac{१}{२}$$

भागाकार करताना भाजक संख्येतील आकडे छेदस्थानचा आकडा अंशस्थानी व अंशस्थानचा आकडा छेदस्थानी भरून नंतर गुणाकार करावा.

जसे— $$\frac{३}{४} \div \frac{३}{\underset{१}{४}} = \frac{\overset{१}{\cancel{३}}}{\underset{१}{\cancel{४}}} \times \frac{\overset{१}{\cancel{४}}}{३} = \frac{१}{१}$$

अज्ञात राशि काढण्याचे प्रकार— त्रैराशिक–पंचराशिक यांचाही उल्लेख जैन गणितशास्त्रात केला आहे. त्रैराशिक पद्धतीत तीन राशि असतात—

१. प्रमाणराशि, २. फलराशि, ३. इच्छाराशि.

प्रमाणराशि व इच्छाराशि यांची एकजाति असली पाहिजे. फलराशि भिन्नजातीची असू शकते.

फलराशि व इच्छाराशि यांचा परस्पर गुणाकार करावा व प्रमाणराशीने भागावे म्हणजे जी लब्धराशि येते तिला 'इच्छाफल' म्हणतात.

| जसे— | प्रमाणराशि. | इच्छाराशि. | फलराशि. |
|---|---|---|---|
| | १ पुस्तक | १० पुस्तके | ४ रुपये. |

$$\frac{\text{इच्छा } १० \times ४ \text{ फल}}{१ \text{ प्रमाण}} = ४० \text{ रुपये (इच्छाफल)}.$$

जेथे प्रमाणराशि व इच्छाराशि यांचे व्यस्त प्रमाण असते तेथे प्रमाणफल व इच्छाफल याचेही व्यस्तप्रमाण येते.

त्यावेळी प्रमाणराशि व फलराशि यांचा गुणाकार करून इच्छाराशीने भागावे

| जसे— | प्रमाणराशि. | इच्छाराशि. | फलराशि. |
|---|---|---|---|
| | १ मनुष्य | ४ मनुष्ये | १० दिवस |

प्रमाण फल दिवस. इच्छाफल.

$$\frac{१ \text{ मनुष्य} \times १० \text{ दिवस}}{४ \text{ मनुष्य}} = \frac{\overset{५}{\cancel{१०}}}{\cancel{४}} = \frac{५}{२} \text{ दिवस}.$$

इच्छाराशि.




लोकाकाशाची जाडी सर्व ठिकाणी ७ राजू आहे. रूंदी मुळात ७ राजू आहे व उंची १४ राजू आहे.

वरील ७ राजू उंचीचा भाग खालच्या ७ राजूच्या त्रिकोणाइतका असल्यामुळे लोकाकाशाचे घनक्षेत्र ( राजू उंच रूंद जाड ७ × ७ × ७ = ३४३) घनराजू एवढे आहे.

**क्षेत्रमापन**

क्षेत्रमापन पद्धतीचा देखील उल्लेख जैनगणित शास्त्रात केला आहे.

क्षेत्राचे मापन लांबी (किंवा उंची), रूदी व जाडी, अशा तीन प्रकारानी केले जाते.

१. जेथे केवळ लांबी किंवा उंची असते, रुदी–जाडी नसते त्याला 'सूचि–क्षेत्र' म्हणतात.
जसे– २५ हात दोरी.

२. जेथे लांबी व रुदी असते त्याला 'प्रतर–क्षेत्र' म्हणतात.
जसे– ४ हात लांब, २ हात रुंद पडदा.

जेथे लांबी, रूंदी, जाडी असते त्याला 'घनक्षेत्र' म्हणतात.
जसे– कपाट (४ हात उंच व ३ हात रूंद व २ हात जाड कपाट.)




१. सूचिक्षेत्रात केवळ लांबीमध्ये कमी-अधिकपणा असतो. पण त्यात निरनिराळे आकार संभवू शकत नाहीत.

२. प्रतरक्षेत्रात लांबी–रुंदी असल्यामुळे त्रिकोण–चौकोन इत्यादि आकार संभवू शकतात. त्रिकोणाला 'तिस्र' व चौकोनाला 'चतुरस्र' देखील म्हणतात.
ज्याचे तीनही कोण किंवा चारीही कोण समान असतात त्याला समभुज–त्रिकोण किंवा समभुजचतुष्कोण म्हणतात.

३. वर्तुळाकार क्षेत्राला 'वृत्त' म्हणतात.

४. वर्तुळाकार क्षेत्राचे मापन त्याच्या व्यास व परीघावरून केले जाते. वर्तुळाच्या मध्यबिंदूतून दोन्ही टोकाला जाणाऱ्या रेषेला 'व्यास' म्हणतात. वर्तुळालाच 'परीघ' म्हणतात.

१. प्रतर क्षेत्राचे क्षेत्रफळ लांबी–रुंदीचा गुणाकार करून काढले जाते. २ इंच रुद व ३ इंच लांब पडद्याचे ( २ × ३ ) = ६ इंच क्षेत्रफळ येते.

२. घनक्षेत्राचे घनक्षेत्रफळ लांबी–रुंदी–जाडी यांचा गुणाकार करून येते.
२ इंच रुंद, ३ इंच जाड व ४ इंच उंच अशा कपाटाचे घनक्षेत्रफळ ( २ × ३ × ४ = २४) इंच येते.
वृत्तक्षेत्राचे मापन व्यास व परिधि याचा परस्पर गुणाकार करून केले जाते. परिधीचे प्रमाण व्यासाच्या तिप्पट ( $\frac{२२}{७}$ ) पट असते.

जंबूद्वीप वृत्ताकार आहे. (परातीसारखा ताट). जंबुद्वीपाचा व्यास १ लाख योजन ( २००० कोस = १ योजन ) आहे. परिधि $\frac{२२}{७}$ लाख योजन आहे.

## अलौकिक गणित

**१. परिकर्माष्टक–**

गणिताचे ८ परिकर्माष्टक आहेत. १) संकलन (बेरीज), २) विकलन (वजाबाकी), ३) गुणाकार, ४) भागाकार, ५) वर्ग, ६) वर्गमूळ, ७) घन, ८) घनमूळ.

**१. संकलन–** ( २ + २ = ४ ) ही बेरीज होय. दोन संख्येची बेरीज.

**२. विकलन–** ( ८ – ३ = ५ ) ही वजाबाकी होय. मोठ्या संख्येतून लहान संख्या उणी करणे ही वजाबाकी होय.

**३. गुणाकार–** ( २ × ३ = ६ ) दोन संख्याना परस्पर गुणणे.

**४. भागाकार–** ( ६ ÷ २ = ३ ) मोठ्या संख्येला लहान संख्येने भागणे.

**५. वर्ग–** ( ४ × ४ = १६ ) दोन समान संख्यांचा परस्पर गुणाकार.

**६. वर्गमूळ–** ( १६ चा वर्गमूळ ४ ) ज्या दोन संख्यांचा वर्ग असतो त्यातील एक संख्या. त्याचा वर्गमूळ असतो.

**७. घन–** ( ४ × ४ × ४ = ६४ ) तीन समान संख्यांचा परस्पर गुणाकार.

**८. घनमूळ–** ( ६४ चा घनमूळ ४ ) ज्या तीन संख्यांचा घन असतो त्यातील एक संख्या त्याचा घनमूळ असतो.

२. त्रैराशिक– १) प्रमाणराशि, २) फलराशि, ३) इच्छाराशि.

जसे– (प्रमाण) (इच्छा) (फल)

२ रु. : ८ रु. : : १६ शेर. =

इच्छा व फल यांचा परस्पर गुणाकार करून त्या गुणाकाराला प्रमाणराशिने भागावे म्हणजे इष्टफल निघते.

$$\frac{८ \times १६}{२} = ६४ \text{ शेर इष्टफल.}$$

(४ / १)

क्षेत्रफळ– लांबी-रुंदी-जाडी यांचा परस्पर गुणाकार केला असताना क्षेत्रफळ निघते.

जसे– ४ फूट लांब, ४ फूट रुंद व ४ फूट जाड चौरस जागेचे क्षेत्रफळ काढण्यासाठी १ फूट लांब, १ फूट रुंद व १ फूट जाड असे समान तुकडे करावेत म्हणजे जितके तुकडे होतील ते त्याचे क्षेत्रफळ होय. (४ × ४ × ४ = ६४) चौ. फूट क्षेत्रफळ.

वृत्ताचे क्षेत्रफळ– व्यास व परिघ यांचा गुणाकार केला असताना वृत्ताचे क्षेत्रफळ निघते.

### मान–गणित

मानाचे मुख्य ३ भेद– १) संख्यात, २) असंख्यात, ३) अनंत.

१. संख्याताचे ३ भेद– १) जघन्य, २) मध्यम, ३) उत्कृष्ट.

२. असंख्याताचे ९ भेद– १) परीता संख्यात, २) युक्ता संख्यात, ३) असंख्याता संख्यात– याचे प्रत्येकी जघन्य-मध्यम-उत्कृष्ट. (३ × ३ = ९ भेद).

३. अनंताचे ९ भेद– १) परीतानंत, २) युक्तानंत, ३) अनंतानंत. याचे प्रत्येकी जघन्य-मध्यम-उत्कृष्ट (३ × ३ = ९) भेद = एकूण = २१ भेद.

१. जघन्यसंख्यात– (२) (गणितप्रमाणात १ ही संख्या मोजणीत धरली नाही.)

२. मध्यम संख्यात– मध्यम विकल्प.

३. उत्कृष्ट संख्यात– जघन्य परीतासंख्यात राशितून १ कमी.

४. जघन्य परीतासंख्यात–

जंबूद्वीप प्रमाण १ लाख योजन व्यासाचा १ हजार योजन खोल असे ४ कुंड करावे, १) अनवस्था कुंड, २) शलाका कुंड, ३) प्रतिशलाका, ४) महाशलाका.

पहिला अनवस्थाकुंड सरसूनी शीगेपर्यंत भरावा. ते ४६ अंकप्रमाण होतात. त्यातून एक सरसू एका द्वीपात व एक सरसू एका समुद्रात याप्रमाणे प्रत्येक द्वीपसमुद्रात टाकीत जावा. जेव्हा सर्व सरसू समाप्त होतील तेव्हा १ सरसू शलाका कुंडात टाकावा. जेथे ते सरसू समाप्त झाले त्या विस्ताराचा दुसरा अनवस्थाकुंड करावा व तो सरसूनी भरावा त्यातून एक-एक सरसू द्वीप व समुद्र यात टाकीत जावा. जेव्हा ते सर्व सरसू पूर्ण होतील तेव्हा दुसरा एक सरसू शलाका कुंडात टाकावा. याप्रमाणे ४६ अंकप्रमाण अनवस्था कुंड झाले म्हणजे १ शलाका कुंड पूर्ण भरतो. ४६ अंकप्रमाण शलाका कुंड पूर्ण झाले म्हणजे १ प्रतिशलाका कुंड भरतो व ४६ अंकप्रमाण प्रतिशलाका कुंड पूर्ण झाले म्हणजे १ महाशलाका कुंड पूर्ण भरतो. याप्रमाणे एकूण अनवस्था कुंड ४६ अंकप्रमाणाचा घनप्रमाण येतात. शेवटला अनवस्था कुंड ज्या द्वीप किंवा समुद्राच्या विस्तारप्रमाण येईल, त्यात जितके सरसू मावतील ती संख्या जघन्यपरीतासंख्यात समजावी.

५. मध्यमपरीतासंख्यात– मध्यमविकल्प.

६. उत्कृष्टपरीतासंख्यात– जघन्ययुक्तासंख्यात राशीतून १ कमी.

७. जघन्ययुक्तासंख्यात– जघन्यपरीतासंख्यात राशीचे विरलन करावे (तितक्या वेळा १-१ अंक मांडावा). त्यावर तीच राशि देय ठेवावी व त्यांचा परस्पर गुणाकार करावा. म्हणजे जी राशि येईल ती जघन्य युक्तासंख्यात राशी येते.

८. मध्यमयुक्तासंख्यात– मध्यमविकल्प.

९. उत्कृष्टयुक्तासंख्यात– जघन्यअसंख्यातासंख्यात राशीतून १ कमी.

१०. जघन्यअसंख्यातासंख्यात– जघन्ययुक्तासंख्यात राशीला त्याच राशीने परस्पर गुणले असता जी राशि येते ती जघन्य असंख्यातासंख्यात राशि होते.

११. मध्यमअसंख्यातासंख्यात– मध्यमविकल्प.

१२. उत्कृष्ट असंख्यातासंख्यात– जघन्यपरीतानंत राशीतून १ कमी.

१३. जघन्यपरीतानंत– जघन्यअसंख्यातासंख्यात राशीप्रमाणे ३ राशि कराव्यात.

१) शलाका राशि, २) विरलन राशि, ३) देय राशि.

विरलनराशी १-१ अंकप्रमाण विरलन करावे, त्यावर देयराशि ठेवावी. त्यांचा परस्पर गुणाकार करावा. शलाकाराशीतून १ सरसू कमी करावा. गुणाकार करून जी राशि येईल तिचे पुनः विरलन व देयराशी करून विरलन करावे. त्यावर प्रत्येकी देयराशि ठेवून त्यांचा परस्पर गुणाकार करावा. शलाकाराशीतून दुसरी १ सरसू कमी करावी. याप्रमाणे विरलन व देय राशि करून त्यांचा परस्पर गुणाकार करून एक एक सरसू शलाका राशीतून कमी करीत करीत जेव्हा संपूर्ण शलाकाराशि रिकामी (निःशेष) होईल ते मध्यमअसंख्यातासंख्याताचे प्रमाण समजावे. याप्रमाणे तीन वेळा शलाकात्रय निष्ठापन करून जे प्रमाण येईल त्यात ६ असंख्यात राशि मिळवाव्यात.

१) धर्मद्रव्याचे प्रदेश, २) अधर्मद्रव्याचे प्रदेश, ३) एकजीवाचे प्रदेश, ४) लोकाकाशाचे प्रदेश, ५) त्यापेक्षा असंख्यातपट अप्रतिष्ठित प्रत्येक जीवराशि, ६) त्यापेक्षा असंख्यातपट प्रतिष्ठित प्रत्येक जीवराशि या ६ राशि मिळवाव्यात. नंतर पुन्हा शलाकात्रय निष्ठापन करावे. नंतर त्यात ४ राशि मिळवाव्यात. १) कल्पकालाचे (२० कोडाकोडीसागर) समय, २) स्थितिबंधास कारणभूत कषायस्थान, ३) अनुभागबंधास कारण कषायस्थान, ४) योगस्थान या ४ राशि मिळवाव्यात. पुनः शलाकात्रय निष्ठापन करावे. जे प्रमाण येईल ती जघन्य परीतानंत राशि होते.

१४. मध्यमपरीतानंत– मध्यमविकल्प.

१५. उत्कृष्टपरीतानंत– जघन्ययुक्तानंत राशीतून १ कमी.

१६. जघन्ययुक्तानंत– जघन्यपरितानंत राशीचे विरलन करून त्यावर प्रत्येक तीच राशि देय ठेवून परस्पर गुणाकार केला असताना जे प्रमाण येते ती जघन्ययुक्तानंत राशि होय.

१७. मध्यमयुक्तानंत– मध्यमविकल्प.

१८. उत्कृष्टयुक्तानंत– जघन्यअनंतानंत राशीतून १ कमी.

१९. जघन्यअनंतानंत– जघन्ययुक्तानंत राशीला त्याच राशीने परस्पर गुणले असताना जघन्य-अनंतानंत राशि येते.

२०. मध्यमअनंतानंत– मध्यमविकल्प.

२१. उत्कृष्टअनंतानंत– जघन्यअनंतानंत राशीचे विरलन करून त्यावर तीच देयराशि ठेवून परस्पर गुणाकार करावा. याप्रमाणे शलाकात्रय निष्ठापन करावे. त्यानंतर त्यात ६ राशि मिळवाव्यात.

१. व्यवहारपल्याचे प्रमाण काढण्याची रीति–

प्रमाणांगुलाने २००० कोस प्रमाण १ योजन प्रमाण लांब-रुंद व खोल असा खड्डा करावा. त्यात उत्तमभोगभूमिजबालाग्र रोम भरावेत. त्यांची संख्या ४५ अंकप्रमाण येते. त्यातून एक एक रोम प्रत्येक शंभर वर्षांनी काढावा. त्याला जितका काल लागेल तो व्यवहारपल्य होय. त्याला असंख्यात कोटीवर्षांच्या समयांनी गुणले असता उद्धारपल्याचे प्रमाण निघते. त्याला असंख्यात कोटी वर्षांच्या समयांनी गुणले असता अद्धापल्याचे प्रमाण निघते.

१० कोडाकोडी अद्धापल्यांचा १ सागर होतो.

१. सूच्यंगुल = प्रमाणांगुल प्रमाण लांब १ प्रदेश रुंद याला सूच्यंगुल म्हणतात.

२. प्रतरांगुल = सूच्यंगुलाच्या वर्गाला प्रतरांगुल म्हणतात.

३. घनांगुल = सूच्यंगुलाचा घन केला असता घनांगुल होतो.

१. जगत्श्रेणी = सात राजू लांब व १ प्रदेश रुंद क्षेत्राला जगत्श्रेणी म्हणतात.

२. जगत्प्रतर = जगत्श्रेणीच्या वर्गाला जगत्प्रतर म्हणतात.

३. जगत्घन = जगत्श्रेणीच्या घनाला जगत्घन म्हणतात.

७ राजू लांब-रुंद-जाड या क्षेत्राला जगत्घन म्हणतात. लोकाकाशाचे प्रदेश जगत्घनप्रमाण आहेत.

| | | |
|---|---|---|
| १ सूक्ष्मद्रव्य | – | पुद्‌गल परमाणु |
| २ सूक्ष्मक्षेत्र | – | आकाशाचा १ प्रदेश |
| ३ सूक्ष्मकाल | – | कालाचा १ समय |
| ४ सूक्ष्मभाव | – | १ अविभाग प्रतिच्छेद |
| १ महान्द्रव्य | – | लोकाकाशप्रमाण महास्कंध |
| २ महान्क्षेत्र | – | आकाशद्रव्य |
| ३ महान्काल | – | तीन्ही काल |
| ४ महान्भाव | – | केवलज्ञानाचे अविभाग प्रतिच्छेद |

| | | |
|---|---|---|
| व्यवहारकालप्रमाण — जघन्ययुक्त संख्यातसमय | = | १ आवळी |
| संख्यात आवली | = | १ मुहूर्त |
| ३० मुहूर्त | = | १ दिवस (अहोरात्र) |
| ३० दिवस | = | १ महिना |
| १२ महिने | = | १ वर्ष |

## जैन राजनीति व शासनसंस्थाविषयक विचार

जैन आगमग्रंथामधून राजनैतिक व शासनसंस्थाविषयीचे तात्त्विक विश्लेपण काही प्रमाणात केलेले आढळते. या ग्रंथात स्वतंत्रपणे हा विषयच मांडून त्याचे विश्लेपण केलेले नसले तरी, तत्कालीन समाज जीवनाचे विश्लेपण करताना समाज नियंत्रणाच्या दृष्टीकोनातून आवश्यक असलेल्या राजनैतिक विचारांचे विश्लेपण ठिकठिकाणी केलेले आढळते. दिगंबर संप्रदायातील प्रसिद्ध देवसंघाचे आचार्य श्रीमत्सोमदेवसूरि यांनी राज्यशास्त्र विषयक आपला 'नीतिवाक्यामृत' नावाचा प्रसिद्ध महान ग्रंथ लिहिला आहे. अनेक विद्वानांच्या मते 'नीतिवाक्यामृत' लेखनाचा काल विक्रम अकराव्या शतकाचे तृतीय चरण हा असावा. कामंदकानंतर आचार्य सोमदेवांनी शुद्ध






राजनीतिवरील आपल्या प्रसिद्ध ग्रंथाची रचना केलेली असावी. सोमदेवांचा नीतिवाक्यामृत ग्रंथ कौटिल्याच्याच वैचारिक तुलनेचा असून, त्यात राज्यशास्त्राच्या सर्व विषयावर प्रकाश टाकण्यात आलेला आहे. सोमदेवसूरीची रचनाशैली, वर्णनशैली अतुलनीय असल्यामुळे ग्रंथात राजनीतीची शुष्कता जाणवत नाही. गंभीर व विस्तृत वर्णनही त्यांनी थोडक्या व सरळ शब्दांमध्ये, उत्कृष्टपणे मांडले आहे. राजनीति हाच या ग्रंथाचा प्रमुख विषय असल्याने राज्य किंवा शासनव्यवस्थेशी संबंधित असलेल्या सर्व बाबींचे विवेचक विश्लेषण या ग्रंथात आहे. राज्याच्या स्वामी, अमात्य, जनपद, दुर्ग, कोश, दंड व मित्र या सप्तांगावर या ग्रंथात प्रकाश टाकलेला आहे. त्याचबरोबर राजधर्माचीही मोठ्या विवेचकरितीने चर्चा केली आहे. मानवी जीवनाला सर्वांगपरिपूर्ण बनविणाऱ्या, धर्मनीति, अर्थनीति व समाजनीति या विषयांचे विवेचनही या राजनीतिक ग्रंथात मोठ्या प्रमाणात केलेले आहे. हा ग्रंथ मानवी जीवनाचे विज्ञान व दर्शन आहे. प्राचीन नीतिसाहित्याचे सारभूत अमृत आहे. मनुष्याला आपल्या आपल्या मर्यादित स्थिर ठेवणाऱ्या राज्यप्रशासन व त्याचे जीवन पल्लवित, संवर्धित, सुरक्षित ठेवणाऱ्या, राजनैतिक तत्त्वांचेही वैज्ञानिक दृष्टिकोनातून विश्लेषण या ग्रंथात केलेले आहे.

**राजा व राजपद**— जैन परंपरेनुसार ऋषभदेव पहिले राजे होत, ज्यांनी भारताची पहिली राजधानी इक्ष्वांकूभूमि ( अयोध्या ) येथे राज्य केले. या अगोदर कोठेंही राज्य नव्हते, राजा नव्हता, शासन नव्हते व शासनकर्ताही नव्हता ही अशा प्रकारची स्थिती होती की, सर्व लोक आपल्या आपल्या निसर्ग धर्माचे पालन करून सदाचाराच्या सहाय्याने आनंदपूर्वक जीवन व्यतीत करीत होते. त्यामुळेच त्यांच्यात वैमनस्य नसून संघर्षाचे कोणतेही कारण नव्हते. संघर्षच होत नसल्याने त्या संबंधाने शासन करणाऱ्या शासन किंवा शास्ता यापैकी कोणाचीही जरुरी नव्हती. तथापि तिसऱ्या काळाच्या शेवटी जेव्हा यतिगण धर्मभ्रष्ट झाले, कल्पवृक्षाचा प्रभाव कमी होण्यास सुरुवात झाली, स्वार्थ हा मानवाचा स्थायीभाव बनला, त्यावेळी समाजात अराजकाची निर्मिती झाली. या अवस्थेत व्यक्ति व समाजाचीही प्रगति होत नसल्याने सर्व लोकांनी एकत्र येऊन वृषभदेवांचे पिता नाभि यांना विनंती करून त्यांच्या अनुमतीने वृषभदेवांना राजा म्हणून अभिषेक केला. वृषभदेवांनीही प्रथमतः असि, मसि, शिल्प इत्यादि विविध कलांचा उपदेश केला व शासन संस्थेची निर्मिती केली.

जैन आगमांमध्ये दंडनीतीचे सात प्रकार सांगितले आहेत. पहिल्या व दुसऱ्या प्रकाराला 'हक्कार' नीति, तिसऱ्या व चौथ्या प्रकाराला 'मक्कार' नीति, पाचव्या व सहाव्या प्रकाराला 'धिक्कार' नीति म्हणत. वृषभदेवांच्या काळात क्रोधपूर्वक बोलणे, स्थानबद्ध करणे हे शिक्षा प्रकार सुरू झाले तर त्यांचा पुत्र भरत याच्या कारकीर्दीत तुरुंगवास व अवयवच्छेदन या शिक्षांची सुरुवात झाली.

प्राचीन काळात प्रजेच्या पालनासाठी राजा असणे आवश्यक मानलेले होते. राजाने सर्वगुण संपन्न असले पाहिजे. काम वासनेत आसक्त असलेला, द्यूतात रममाण होणारा, मद्यपान करणारा, शिकार करण्यात मग्न होणारा, कठोर बोलणारा व कठोर शिक्षा देणारा व धनसंचनार्थ प्रयत्नशील न राहणारा राजा लवकरच नष्ट होतो. राजाचे मातृकुल व पितृकुल शुद्ध वंशाचे असावे. त्याने प्रजेकडून १०% कर घेऊन प्रजेला सुखात ठेवण्याचा प्रयत्न करावा. लोकाचार व राजनीती इत्यादीमध्ये त्याने कुशल व धार्मिक बाबतीत श्रद्धावान असणे आवश्यक मानलेले होते. चंपाचा राजा कुणिक ( अजातशत्रु ) प्रतापशाली क्षत्रिय राजा होता. त्याला विशुद्ध चिरकालीन राजवंशात निर्माण झालेला, बहुजन सम्भाषित, सर्वगुण समृद्ध, राजलक्षणांनी युक्त व दयाळू राजा असे म्हटले आहे. तो सीमांचे योग्य प्रकारे रक्षण करणारा, प्रजेचा योग्य प्रतिपालक, विद्वानाचा आश्रयदाता असून धन, धान्य, सुवर्ण, भवन, आसन, यान, वाहन, दास, दासी, गाय खजिना, कोठार, शस्त्रागार इत्यादीनी संपन्न होता. म्हणजेच शासनाच्या सुव्यवस्थेसाठी राजाची संपन्नता असणे आवश्यक होते. जर राज्यात कोणत्याही प्रकारची गडबड निर्माण झाली, अराजक, अशांतता प्रस्थापित झाली तर प्रजेला फार कष्ट होतात व अशा अशांत अव्यवस्थित राज्यामध्ये प्रवेश करणेही जैन साधूना अशक्य होते, असे म्हटलेले आहे.





राजपद सामान्यतः वंशपरंपरागत मानलेले आहे. राजपुत्र हा राजाचा एकटाच मुलगा असेल तर, राजाच्या मृत्यूच्या पश्चात लगेच तो राजसिंहासनाधिकारी होतो. तथापि राजाला अनेक मुले असल्यास राजाच्या मृत्यूनंतर सत्तेसाठी संघर्षाला सुरुवात होते. साधारणतः काही विपरीत घटना न घडल्यास राजाच्या मृत्यूनंतर ज्येष्ठ पुत्र हा राजपदाचा अधिकारी होतो. जैन आगमामध्ये सापेक्ष व निरपेक्ष नावाचे राजाचे दोन प्रकार सांगितले आहेत. सापेक्ष राजा आपल्या जीवन काळातच आपल्या पुत्राला युवराज पद देतो व राज्याचे गृहयुद्धातून संरक्षण करतो. निरपेक्ष राजाच्या मृत्यूनंतर त्याच्या पुत्राला राजा करण्यात येते.

राजाला एकापेक्षा अनेक पुत्र असल्यास काही वेळा त्यांची परीक्षा घेण्यात येते व जो राजपुत्र या परीक्षेत यशस्वी होईल त्याला युवराज बनविण्यात येते. कांही वेळा राज्याच्या मृत्यूनंतर राजसत्तेचा अधिकारी असलेला राजा दीक्षा ग्रहण करतो. त्यावेळी कनिष्ठ बंधूला राजा म्हणून गादीवर बसविण्यात येते. कित्येकदा दीक्षा ग्रहण करणाऱ्या पुत्राला संयम पाळणे अशक्य आहे अशी जाणीव होऊन तो परत स्वगृही येतो व कनिष्ठ बंधूकडून राज्य ताब्यात घेतो. कनिष्ठ बंधू दीक्षेचा स्वीकार करतो. साकेत नगरीत राहणांऱ्या कुंडरीक व पुडरीक या दोन पुत्रापैकी कुंडरीक ज्येष्ट व पुडरीक कनिष्ठ होता. कुंडरीकाने श्रमण-दीक्षा घेतली पण कांही काळातच संयमाचे पालन करणे अशक्य आहे हे जाणवताच दीक्षा सोडून घरी परत आला. कनिष्ठ भाऊ पुडरीकाने त्याला गादीवर बसविले व स्वतः श्रमणधर्माच्या दीक्षेचा स्वीकार केला. जर राजा व युवराज या दोघानीही राजगृह सोडून श्रमण दीक्षेचा स्वीकार केला तर, त्यांची भगिनी किंवा तिचा योग्य पुत्र यांना राजसत्तेवर बसविले जाई. राज्यकारभारात स्त्रिया भाग घेत असल्याचे अनेक उल्लेख मिळतात. दक्षिण भारताच्या इतिहासात तर अनेक जैन स्त्रियांनी राज्यकारभारात भाग घेऊन उत्कृष्ट प्रकारे राज्यकारभार केल्याची माहिती मिळते.

**राजा व राजपुत्र संबंध**– राजपुत्र हा उत्तराधिकार प्राप्त करण्यासाठी इच्छुक असल्याने राजाला सदैव साशंक, भयभित रहावे लागते. कित्येकदा राजा राजपुत्रावर कठोर नियंत्रणही ठेवतो. तथापि या बंधनातूनही राजपुत्र मुक्त होऊन संधी मिळताच राजाला नष्ट करून सत्ता ताब्यात घेतो. राजगृहचा राजा कुणिक याने आपल्या सावत्र बंधूच्या मदतीने आपला पिता श्रेणिक ( बिंबिसार ) याला पकडून बंदीस्त केले व स्वतः सत्ता मिळविली. उत्तराधिकाराचा प्रश्न या काळातही महत्वाचा मानला जाई. सामान्यतः राजानंतर त्याच्या जेष्ठ पुत्राला, तो नसल्यास इतराना उत्तराधिकारी बनविले जाई तथापि प्रयत्नहीन अवस्थेत राजा मरण पावला तर मंत्रिमंडळ सर्वांच्या सहकार्याने योग्य विवेकशील व उच्च कुळातील राजाची नियुक्ती करीत असत.

राज्याभिषेक समारंभ मोठ्या धुमधडाक्याने केला जात असे. जंबुद्विपप्रज्ञप्तीमध्ये भरत चक्रवर्तीच्या राज्याभिषेकाचे वर्णन आलेले आहे. राजा, महाराजा, सेनापती, पुरोहित, अठरा श्रेणीचे श्रेष्ठी, वणिक यांनी राजाला मोठ्या उत्साहाने राज्याभिषेक केला. सर्व प्रजेतर्फे राजाला राजमुकूट परिधान करण्यात आला. यावेळी प्रजेला करमाफी देण्यात येऊन सर्वत्र मोठ्या प्रमाणात आनंदोत्सव साजरा करण्यात आला. राजा राजभवन किंवा प्रासादामध्ये निवास करीत असे. प्रासाद अनेक कलाकुसरीच्या नक्षीकामांनी आकर्षक बनविण्यात येई. राजप्रासादामध्ये अंत.पुराला महत्वाचे स्थान होते. देशाच्या अंतर्गत व परराष्ट्र व्यवहारातील हालचालीही अंतर्गृहातून चालत असत. अंतःपुराचे अनेक प्रकार असत. जीर्ण अंत.पुरात वयोवृद्ध स्त्रिया रहात असत. नवअंतःपुरामध्ये यौवनवती स्त्रिया रहात असत व कन्याअंत पुरामध्ये यौवन अप्राप्त स्त्रिया रहात असत. अंत.पुराला अधिकाधिक समृद्ध व आधुनिक बनविण्याच्या दृष्टीने राजे प्रयत्नशील असत.

जैन ग्रंथामध्ये राजा, युवराज, अमात्य, श्रेष्ठि व पुरोहित या पाच व्यक्तींना महत्वाचे पुरुष म्हटले आहे. राजाच्या पश्चात् युवराज उत्तराधिकारी होत असे. युवराज बहात्तर कला, अठरा देशी भाषा, गीत, नृत्य, हस्तियुद्ध, अश्वयुद्ध, मुष्टियुद्ध, बाहुयुद्ध, रथयुद्ध– धनुर्वेद इत्यादी विषयामध्ये निपुण असावा. दिवसातील ठराविक काळ त्याने राज्यकर्तव्यार्थ देणे आवश्यक मानलेले होते. राजकुमाराला युद्ध नीतीचे शिक्षण युवराज अवस्थेतच

दिले जात असे. राज्यपद स्वीकारण्याच्या अगोदरही काही युद्धविषयक संघर्ष घडल्यास युवराज ते संघर्ष मिटविण्याचा प्रयत्न करी.

मंत्री– राज्याधिष्ठानमध्ये अमात्य व मंत्री याना अत्यंत महत्त्वपूर्ण स्थान आहे मंत्र्याच्या सत्कार्यावरच राज्याचा विकास, उन्नति व स्वामित्व निर्भर असते. त्यामुळेच आचार्य सोमदेवानीही मंत्र्याला सप्तप्रकृतीतील एक प्रकृती म्हटले आहे. राजाने कोणतेही कार्य एकट्याने न करता, सुयोग्य मंत्रि व अमात्य यांची नियुक्ती करून त्यांच्या सहकार्यानेच करणे आवश्यक मानलेले होते. कुलीन, कर्तृत्ववान, स्वदेशवासी, चारित्र्यवान, निर्व्यसनी, राजभक्त, नीतिज्ञ, युद्धविद्या विशारद, निष्कपट अशा व्यक्तीचीच परीक्षा घेऊन राजाने मंत्रि म्हणून त्याची नियुक्ती करावी. राष्ट्रकार्यात राजाला योग्य सल्ला देणे मंत्र्याचे आद्यकर्तव्य आहे. परराष्ट्र धर्म, युद्ध अथवा तह इत्यादी विषयक निर्णय व प्रशासकीय निर्णय घेण्याच्या बाबतीत राजाला आवश्यक ते सर्व सहकार्य करणे हे मंत्र्याचे आद्यकर्तव्य होय. त्याचबरोबर राजावर नियंत्रण ठेवणे व अयोग्य प्रकारे वागणाऱ्या राजाला वेळप्रसंगी काढून टाकण्याचे काम मंत्री, मंत्रिमंडळ व मंत्रिपरिषद करीत असे. वसंतपुरचा राजा जितशत्रू आपली राणी सुकुमालिया हिच्या प्रेमात इतका निमग्न झाला की राजकारभाराच्या बाबतीत तो उदासिन राहू लागला. तेव्हा मंत्र्यानी त्या राजाला राजसत्तेवरून दूर करून, राजकुमाराला सिंहासनावर बसविले. याशिवाय राजाला राज्यकारभाराच्या बाबतीत सल्ला देण्याचे, राजासाठी धार्मिक कृत्य करण्याचे काम, राजाला लष्करी बाबतीत सहकार्य करण्याचे काम मंत्री, पुरोहित, सेनानी इत्यादी निरनिराळे अधिकारी करीत असत.

न्याय व्यवस्था– निष्पक्षपणे न्यायदान करणे व दुष्टाचा नाश करणे हे राजाचे आद्य कर्तव्य आहे, तर तेच न्यायसंस्थेचे प्रमुख सूत्र आहे. प्रशासन व्यवस्थेत न्यायसंस्थेचे महत्त्व स्पष्ट करताना आचार्य सोमदेवांनी म्हटले आहे की, जो राजा न्यायपूर्वक राज्यकारभार करीत नाही तो प्रजापीडा व असंतोषास कारणीभूत होतो व परिणामतः तो नष्ट होतो. अशा प्रकारे न्यायव्यवस्था प्रशासनाचा स्थिर मूलाधार मानलेली आहे.

राजाचे न्यायालय हे सर्वश्रेष्ठ न्यायालय असून, राजा राजधानीच्या ठिकाणी न्यायदानाचे कार्य करी. आचार्य सोमदेवांनी या न्यायालयाला सभा व सभासदाना सभ्य म्हटले आहे. या सभेचा राजा हा प्रमुख असून, सभ्यांच्या सहकार्यानेच तो न्यायदानाचे कार्य करीत असे. या न्यायालयात सीमाविषयक कोणत्याही विवाद विषयांच्या बाबतीत निर्णय घेतला जात असे. तसेच ग्राम, शहर येथील न्यायालयाकडून आलेल्या अपीलांच्या बाबतीत न्यायदानाचे कार्य येथे चाले. राजाच्या न्यायालयाने दिलेला निर्णय हा सर्वश्रेष्ठ व अंतिम निर्णय असे. या निर्णयाचे उल्लघन करण्याचा प्रयत्न जर एखाद्या व्यक्तीने केल्यास त्याला मृत्यूदंडाची शिक्षा देण्यात येत होती. ज्या प्रकारे सूर्य अंधकाराचा नाश करून प्रकाशाचा संचार करतो, त्याचप्रमाणे सभ्यांनी निष्पक्षभावाने अपराधी व्यक्तींच्या दोषांचा विचार करून, त्या दोषांना राजासमोर स्पष्ट करणे आवश्यक आहे. सभ्य, धर्मज्ञ, व्यवहारज्ञ असणे आवश्यक मानलेले होते

न्यायालयद्वारे योग्य तपासणीशिवाय कोणत्याही व्यक्तीला शिक्षा होता कामा नये. आपला क्रोध शांत करण्यासाठी, बदला घेण्यासाठी अपराध सिद्ध न करता, कोणत्याही व्यक्तीला शिक्षा करणे अयोग्य मानलेले होते. वेळप्रसंगी एखादा अपराधी व्यक्ति सुटला तरी चालेल पण निरपराध व्यक्तीला शिक्षा होता कामा नये हे जैन न्यायसंस्थेचे तत्त्व होते. जैन ग्रंथकारानी न्यायदान प्रक्रियेच्या चार स्थितीचे वर्णन केले आहे. प्रथमतः वादी व प्रतिवादी प्रतिज्ञेवर आपले मत न्यायालयात विवाद्य मुद्यासंबधाने स्पष्टपणे मांडतात. त्यानंतर आचार्य सोमदेवतांच्या मते योग्य अनुभव असलेल्या साक्षीदाराच्या साक्षीने व सत्य व लिखित पुराव्याच्या आधाराने विधानाची सत्यासत्यता शोधून काढण्याचा प्रयत्न करण्यात येतो. साक्षीदारानाही आपले मत मांडताना शपथ घेऊनच आपले सत्य मत प्रदर्शित करावे लागते. साक्षीदार असत्य साक्ष देत असल्यास त्यास दंड केला जात असे.




उपयुक्त पुराव्याच्या आधाराने न्यायधीश अपराधी व्यक्तीचा अपराधामागील हेतू शोधून काढण्याचा प्रयत्न करीत असत. या सर्व प्रक्रियेनंतर गुन्ह्याच्या स्वरूपानुसार गुन्हेगाराला शिक्षा केली जात होती. शिक्षा करतानाही पैशाच्या स्वरूपातील दंड, अवयव तोडणे, फांशी इत्यादी कठोर शिक्षा देण्यात येत, तथापि त्यामुळे समाजात किंवा त्या व्यक्तीच्या जीवनातही या किंवा अशा प्रकारच्या गुन्ह्याची पुनर्वृत्ति होऊ नये हा महत्त्वाचा हेतू त्या मागे असे. समाजात अशांतता निर्माण करणाऱ्या लोकापासून समाजाचे संरक्षण करण्याच्या कार्यासाठी राजा न्यायदानाचे कर्तव्य आवश्यक कर्तव्य समजून करीत असे, तथापि त्याचवेळी गुन्हेगाराकडेही सुधारणावादी दृष्टिकोनातून पाहिले जात असे. त्या व्यक्तीच्या मनातून सूडबुद्धि, आसुरी प्रवृत्तीचा नाश करणे हेही राजा आपले कर्तव्य मानीत होता. राजाने सारासार बुद्धीनेच न्यायदान करावे. अयोग्य प्रकारे, क्रोध भावनेच्या ताब्यात जाऊन न्यायदान करणारा राजा सदैव असंतुष्ट असतो. राजाने न्यायदानाचे कार्य न केल्यास, समाजात अशांतता निर्माण होते. म्हणून राजाने न्यायदानाला आवश्यक कर्तव्य मानून अपराधी व्यक्तीला योग्य प्रकारे दंड करून समाजस्वास्थ्य टिकविणे आवश्यक मानलेले आहे. न्यायसंस्था ही राष्ट्राच्या राजकीय व सामाजिक जीवनात महत्त्वाची संस्था असलेली दिसते.

चोरी, दरोडा, परस्त्रीगमन, राजाज्ञेचा भंग इत्यादी अपराध होत असल्याची माहिती मिळते. याशिवाय प्रशासन कार्यात केलेल्या अयोग्य कर्तव्याबद्दल, सैन्यात किंवा प्रशासकीय यंत्रणेत लाचलुचपत, राज्यद्रोह इत्यादी कृत्याबद्दल किंवा विचारांचा प्रसार केल्याबद्दल निरनिराळ्या अधिकाऱ्यांना शिक्षा देण्यात येत होती. चोरी करणारालाच नव्हे तर, चोरीचा सल्ला देण्याबद्दल, चोरीची माहिती असून न सांगणाऱ्या, चोरलेली वस्तू कमी पैशात खरेदी करणाराला किंवा चोराला कोणत्याही प्रकारे सहकार्य देणाऱ्या व्यक्तीलाही शिक्षा केली जात होती. तुरुंगातील जीवन अतिशय कष्टमय व शोचनीय असे. कैद्यांना विविध प्रकारे कठीण त्रास दिला जात असे. त्यांचे सर्वस्व अपहरण करून त्यांना कैदेत बंद केले जाई. भूक, तहान, इत्यादींच्या बाबतीत त्रास दिला जात असे. पुत्रोत्सव, राज्याभिषेक उत्सव प्रसंगी आनंदाप्रीत्यर्थ कैद्यांना मुक्त करण्यात येत होते. सामान्यतः समाजात सामाजिक स्वास्थ्य कायम टिकावे, अयोग्य कृत्य करणाऱ्या व्यक्तींना शासन करण्यात यावे या भावनेतून न्यायसंस्थानी कार्य करावे, अशी जैन ग्रंथकाराची अपेक्षा होती व त्याप्रमाणे जैन राजे कार्य करतानाही दिसतात.

**सैन्य-विभाग-** आचार्य सोमदेवसूरींनी 'नीतिवाक्यामृत' मध्ये सैन्य किंवा बल याला राज्याच्या अस्तित्वात आवश्यक असलेल्या सप्तांगापैकी एक अंग किंवा घटक मानले आहे. बाह्य आक्रमणापासून प्रजेचे सर्वांगीण रक्षण करणे हे राजाचे आवश्यक कर्तव्य मानले जात होते. आ. सोमदेवसूरींच्या मते 'शत्रूचे निवारण करून धन, दान व मधुर भाषणाद्वारे राज्याचे समस्त ध्येय सिद्ध करून राज्याचे कल्याण करणाऱ्या घटकाला बल म्हणतात. प्राचीन काळात राजा आपल्या साम्राज्यविस्तारार्थ युद्धाचा मार्ग स्वीकारीत असे. त्याचबरोबर धन, धान्य, समृद्धि मिळविण्यासाठी शत्रूच्या राज्यात खितपत पडलेल्या प्रजेला मदत म्हणून युद्धे केली जात असल्याची माहिती मिळते.

युद्धात यश मिळविण्यासाठी रथ, अश्व, हत्ती व पदाति असे सैन्याचे चार विभाग केलेले असत. अश्व, हत्ती व रथ यांना राजकीय व शासकीय जीवनात महत्त्वाचे स्थान दिलेले दिसते. प्राचीन जैन ग्रंथात सेनापति, गृहपति, पुरोहित व स्त्री यांच्याबरोबर हत्ती, अश्व यांची राष्ट्राच्या रत्नामध्ये गणना करण्यात आलेली आहे. मौर्यकाळात तर हत्तीचा वध करणाऱ्या व्यक्तीला फाशीची शिक्षा देण्यात येत होती. हत्तीचे भद्र, मृग, मन्द व संकीर्ण असे चार प्रकार सांगितले आहेत. त्यापैकी सात हात ऊंच, नऊ हात रुंद, मध्यभागी दहा हात, पाद पुच्छ या सात अंगानी परिपूर्ण असलेला, सुप्रतिष्ठित, सौम्य, प्रमाणयुक्त, शिक्षण घेतलेला हत्ती योग्य समजलेला असे. कठीण मार्ग सुकर करणे, शत्रूपक्षाची कडेकोट तटबंदी, नष्ट करणे, शत्रूप्रहारापासून आपल्या सैन्याचे रक्षण करणे, शत्रूपक्षाचा युद्धसमयी नाश करणे इत्यादी कामे हत्तीला करावी लागत. निरनिराळ्या जंगलातून हत्तींना पकडून








आणून, त्यांना योग्य प्रकारे शिक्षण देऊन युद्धात त्यांच्याकडून काम करवून घेतले जात असे. हत्तीनंतर युद्ध सैन्य विभागात अश्वविभागाला दुय्यम महत्त्वाचे स्थान होते. निरनिराळ्या देशामधून अश्व आणले जात. कालीय बेटावरील घोडे प्रसिद्ध होते. उडी मारणे, गोल फिरणे, वेगवान चाल घेणे इत्यादी विविध प्रकारचे शिक्षण घोड्यांना दिले जाई. योग्य प्रशिक्षण दिलेल्या व धष्टपुष्ट अश्वांच्या संख्येवरच सैन्य विभागाची शक्ति व युद्धातील यश अवलंबून असे. चतुरंगिणी सेनेचा रथ विभाग हा तृतीय भाग होय. रथ समतल भूमीवर युद्ध करण्यास उपयुक्त असे. त्यात धनुर्धारी योद्धा आरूढ होऊन शत्रूला पराभूत करून स्वतःचे सामर्थ्य प्रस्थापित करीत असे. आचार्य सोमदेवांच्या मते रथाला सर्व सेनेच्या पुढे ठेवणे आवश्यक समजावे, रथामुळे नष्ट झालेल्या शत्रू सैन्याला पाठीमागून येणाऱ्या सैन्याच्या मदतीने सहजपणे जिंकता येते. पदाती हा चतुरंग सेनेचा चौथा विभाग होय. सैन्य कोठून जमवावे, त्यांना कशा प्रकारे शिक्षण द्यावे, नवीननवीन डावपेच राजाने कसे शिकवावे व सैन्य राष्ट्रनिष्ठ राजनिष्ठ कसे राहील यासाठी काय काय प्रयत्न करावेत याचेही निवेचन जैन राजनीति शास्त्रकारांनी केले आहे.

सेनाध्यक्ष हे पद अतिशय महत्त्वाचे असून, त्या अधिकाऱ्याच्या कार्यावरच राष्ट्राचा जय पराजय अवलंबून असल्याने आचार्य सोमदेवसुरींनी या पदावर नियुक्त होणाऱ्या व्यक्तीच्या अंगी खालील गुण असणे आवश्यक मानलेले आहे. ती व्यक्ति कुलीन, आचार-व्यवहार संपन्न, राजविद्या प्रवीण, स्वामी व सेवकावर अनुरक्त, पवित्र हृदयाची, परिवारयुक्त, नैतिक; हत्ती, घोडे, रथ व सर्व प्रकारची शस्त्रास्त्रे यांचे सर्वांगिण ज्ञान असलेली, शत्रू व मित्र राष्ट्रांच्या भाषांचे ज्ञान असणारी, आत्मज्ञानी व बलवान, राजनीतिशास्त्र व युद्धशास्त्र या विषयात सर्वांग परिपूर्ण ज्ञान असलेली असावी. सर्व सैन्य हे सेनापतीच्या किंवा सेनाध्यक्षाच्या नियंत्रणाखाली ठेवण्यात येते. युद्धाच्या वेळी सम्राटाची परवानगी घेऊनच हा सर्व सैन्य सुसज्ज करून युद्धभूमीवर जातो.

**युद्धनीति–** आजच्याप्रमाणेच प्राचीन काळातील लोकही युद्धाला भीतच असत. प्राचीन काळातील युद्धेही समाजाच्या राजकीय, सामाजिक व आर्थिक इत्यादी विविध क्षेत्रात सर्वांगीण बदल घडवून आणीत असत. युद्धाचा स्विकार करण्याच्या अगोदर साम, दाम, दंड व भेद या नीतीचा उपयोग केला जातच असे व या मार्गांनी सफलता न आली तरच युद्धाचा स्वीकार करण्यात येई. उपर्युक्त मार्गांचा अवलंब करण्यासाठी निरनिराळे राजदूत पाठविले जात असत व या मार्गांपैकी कोणताही मार्ग यशस्वी होत नाही असे दिसताच युद्धाला आव्हान दिले जात असे.

युद्धकौशल्यात प्राचीन काळातील राजे प्रवीण होते. चतुरंगसेना, आवरण, शस्त्रास्त्रे इत्यादींबरोबर कौशल्य, नीति, व्यवस्था, अन्न व शस्त्र वाहतूक इत्यादींनाही युद्धात महत्त्वाचे अंग मानण्यात येत होते. शहरांना तटबंदी बांधून तसेच धान्यकोठारामध्ये मोठ्या प्रमाणात अन्न व शस्त्रास्त्रांचा साठा करून युद्धाची तयारी केली जात होती. युद्धे अनेक प्रकारांनी होत असत जैनसूत्रामध्ये युद्ध, नियुद्ध, महायुद्ध, महासंग्राम इत्यादी अनेक युद्धांचे प्रकार सांगितले आहेत. राजा भरत व बाहुबली यांच्यात दृष्टियुद्ध, वाक्युद्ध, बाहुयुद्ध, मुष्टियुद्ध व दंडयुद्ध इत्यादी युद्धे झाल्याची माहिती मिळते, राजा कुणिक व राजा चेटक यांच्यात झालेल्या महासंग्रामामध्ये कुणिकाने गरुडव्यूह व चेटकाने शकटव्यूह रचल्याची माहिती मिळते या महासंग्रामामध्ये लाखो सैनिकांचा विध्वंस झाला. व्यूहरचनेत चक्रव्यूह, दंडव्यूह व सूचिव्यूह या तीन प्रकारच्या व्यूहांचा उपयोग केला जात होता.

युद्धाच्या प्रारंभी प्रथम आक्रमण करणारा राजा शत्रूच्या नगराला चारी बाजूने घेरत असे तरीही शत्रू शरण न आल्यास दोन्ही पक्षात युद्धाला सुरुवात होई काशीकोसलच्या सहा राजाच्या दूतांना मिथिलेच्या राजाने जेव्हा अपमानित करून परत पाठविले तेव्हा या सर्व राजांनी मिथिलेला चारी बाजूने सैन्यांनी घेरले व नागरिकांनाही बाहेर पडू दिले नाही. अशा प्रकारच्या संकटापासून संरक्षण करण्यासाठीच राजा मजबूत किलेबंदी करीत असे. नगराच्या चारी बाजूला तटबंदी, प्राकारगोपुरे बांधण्यात येत. तसेच निरनिराळी शस्त्रास्त्रे नगररक्षणार्थ सुसज्ज ठेवण्यात येत.







युद्धात कूटनीतीला विशेष महत्त्व होते. युद्धनीतीत प्रवीण असणारे मंत्री आपल्या चातुर्याने, बुद्धिमत्तेने व कलाकौशल्याने अशा प्रकारचे डावपेच रचित की, शत्रूपक्षाला शरणागति पत्करणे भाग पडे, यावेळी शत्रूसैन्याच्या गुप्त बातम्यांची माहिती मिळविण्यासाठी गुप्तचरांचाही उपयोग केला जात असे. शत्रू सैन्यात भरती होऊन हे हेर शत्रूकडील गुप्त बातम्या मिळवित असत. ध्वज पताकांचाही युद्धभूमीवर उपयोग केला जात असे. शंख किंवा भेरीच्या निनादाने सैनिकाना प्रोत्साहन केले जात होते. सैनिक बाणाच्या माऱ्याने ध्वज छिन्नविछिन्न करण्याचा किंवा शत्रूच्या हातातून ध्वज हिसकावून घेण्याचा प्रयत्न करीत असत. हातातून ध्वज पडणे हे युद्धात पराभूततेचे लक्षण समजले जाई. राजाने सैनिकाना आवश्यक तेवढे धन ( पगार ) देणे आवश्यक मानलेले आहे. त्यामुळे सैनिक संतुष्ट राहून सदैव यशप्राप्तीचा प्रयत्न करतात. तथापि आचार्य सोमदेवांच्या मते, एखाद्या वेळी राजाकडून धन न मिळाले तरी स्वामिभक्ति करणे हे सेवकाचे कर्तव्य आहे. राजाने उत्कृष्ट कार्याबद्दल सैन्याची प्रशंसा करावी त्यामुळे सैन्यात राष्ट्रभक्ति व देशभक्ति वाढत जाते. त्याचप्रमाणे अयोग्य वर्तन, देशद्रोह यासारख्या गुन्ह्याना राजाने कडक शासन करावे, म्हणजे सैन्य सदैव योग्य प्रकारे कार्यशील व तत्पर रहाते. अशाप्रकारे सदैव जागरूक राहणाऱ्या राजाचे स्वातंत्र्य कधीही धोक्यात येत नाही. उलट तो आपल्या साम्राज्याचा मोठ्या प्रमाणात विस्तार करू शकतो.

प्राचीन काळात राज्याच्या संरक्षणासाठी किल्ल्याला महत्त्वाचे स्थान दिलेले असून त्याला राज्याच्या प्रमुख अंगापैकी एक अंग म्हटले आहे. ज्या राज्यात अनेक किल्ले असतील ते राज्य अधिक बलवान मानले जाई. प्रजेच्या संपत्तीच्या संरक्षणाच्या दृष्टीने तसेच युद्धात सहाय्यक होण्याच्या दृष्टीने किल्ल्याला राष्ट्राच्या जीवनात महत्त्वपूर्ण, अनन्यसाधारण स्थान देण्यात आले आहे. आचार्य सोमदेवांच्या मते ज्या राज्यात किल्ला नाही ते पराजयाचेच स्थान होय. संकट काळामध्ये दुर्गविहिन राज्याचे रक्षण करणारे कोणीही असत नाहीत. आचार्य सोमदेवानी स्वाभाविक व आहार्य हे दुर्गाचे दोन प्रकार सांगितले आहेत. तर टीकाकारांनी स्वाभाविक दुर्गाच्या चार प्रकारांचे वर्णन केले आहे– १) औदक–चारी बाजूस नदी किंवा सरोवरांनी वेष्टीलेल्या व मध्यभागी सपाट भूप्रदेशावर बांधलेल्या दुर्गास औदकदुर्ग म्हणतात. २) पर्वतदुर्ग–मोठ्या पर्ववतांच्या माथ्यावर बांधलेला व बिकट मार्ग असलेल्या. दुर्गास पर्वतदुर्ग म्हणतात. ३) धन्वदुर्ग–पाणी, निर्जन प्रदेशात बांधलेल्या दुर्गास धन्वदुर्ग म्हणतात. ४) वनदुर्ग–चारी बाजूला दलदलीचा प्रदेश किंवा जंगले यानी युक्त असलेल्या प्रदेशात बांधलेल्या दुर्गाला वनदुर्ग म्हणतात.

जलदुर्ग व पर्वतदुर्ग हे देशाच्या संरक्षणाच्या कार्यात तर धन्वदुर्ग व वनदुर्ग हे प्रजाजनाच्या व्यापाऱ्यांच्या किंवा सरहद्दीवर राहणाऱ्या लोकांच्या रक्षणाच्या कार्यात उपयुक्त ठरतात. राजाही शत्रूनी आक्रमणामुळे निर्माण केलेल्या आपत्तीच्यावेळी पळून जाऊन किल्ल्याचा आश्रय घेऊ शकतो जैन राजनैतिकविचारवंताच्या मते बलवान राजाचे दुर्ग हे शेवटचे आश्रमस्थान होय. आचार्य सोमदेवांच्या मते दुर्ग शस्त्र, धन्य-धान्य, वाहने, विद्वान, जल इंधन, इत्यादी उपयुक्त वस्तूंनी नेहमी युक्त हवा म्हणजे कोणतेही संकट आल्यास त्या संकटातून बाहेर पडण्यास दुर्ग राजाला मदत करू शकतो. आचार्य सोमदेवांनी अभिगमन ( सुसज्ज सैन्य पाठविणे ) उदजाप ( अमात्य वगैरे अधिकाऱ्यांना फितविणे ) चिरनिबंध ( दीर्घकाळ शत्रूच्या किल्ल्याला सैन्याचा वेढा घालणे ) अवस्कन्द संपत्तीच्या सहाय्याने वश करून घेणे ) तीक्ष्णपुरुष प्रयोग ( घातक गुप्तचराचा उपयोग करणे ) इत्यादी. पाच मार्गाने शत्रूचे किल्ले कशा प्रकारे जिंकावेत याचेही वर्णन केले आहे. प्राचीन काळात राजकीय जीवनात दुर्गाला विशेष महत्त्व देण्यात येत असावे. म्हणून सर्व राजनीतिज्ञांनी दुर्गाचे महत्त्व विशेषत्वाने वर्णन केले आहे.

**कोष–** आचार्य सोमदेवांनी कोषाला राष्ट्राचा व राजाचा प्राण म्हटले आहे. ज्याच्याजवळ समृद्ध कोष आहे तोच राजा राष्ट्राचे योग्य प्रकारे संरक्षण करू शकतो. कोष परिपूर्णपणे भरलेला असेल तरच राजा दीर्घकाळ युद्ध चालवू शकतो. कोणत्याही मानवनिर्मित किंवा निसर्गनिर्मित संकटातून राष्ट्राची सुटका राजाला



कोषाच्या महाय्यानेच करता येते. योग्य राजाने धर्म व धर्माच्या संरक्षणार्थ, शासकीय व सैनिकी सेवकाच्या पोषणार्थ, कोषाचे रक्षण करणे आवश्यक मानलेले होते. आचार्य सोमदेवांच्या मते कवडी कवडी करून जो राजा कोषाची अभिवृद्धि करीत नाही त्याचे भविष्यकाळात कल्याण होत नाही. त्यांच्या मते राज्याची उन्नति हे राजाच्या शरीरावर नसून कोषाच्या साहाय्यानेच होते. समृद्ध कोष हे राजाच्या संरक्षणाचे एक अमोघ शस्त्र आहे. कोषाच्या सहाय्यानेच राजाला सेवक व सैन्य सर्व गोष्टी सुलभ होतात. कोषहीन राजा नाममात्र राजा असतो. कोष समृद्ध नसलेला राजा पैसा मिळविण्यासाठी प्रजेवर अत्याचार करतो ज्यामुळे प्रजा दुःखी होते. या अत्याचारामुळे प्रजा असमाधानी होऊन कित्येकदा तो देश सोडून निघून जाते व त्या राजावर जनशक्तिशिवाय राहण्याची पाळी येते.

उत्तम कोष कोणता याचे वर्णन करताना आचार्य सोमदेव लिहितात, 'ज्या कोषात सुवर्ण, चांदी इत्यादि पुष्कळ प्रमाणात आहे. व्यावहारिक नाणी किंवा मुद्रा इत्यादींनी जो परिपूर्ण भरलेला आहे व संकटकाळी मोठ्या प्रमाणात खर्च करण्यास जो समर्थ आहे तो उत्तम कोष होय.' आचार्य सोमदेवानी कोषाच्या गुणांची केलेली व्याख्या आर्थिक दृष्टीने यथार्थ आहे, संकटकाळी धान्य किंवा पशु यांच्या विक्रीतून फारसा पैसा मिळत नाही. त्यामुळे वस्तूंची लवकर विक्री होऊ शकेल व ज्या अल्प वस्तूचेही मोठ्या प्रमाणात मूल्य येईल अशा वस्तूचा राजकोषामध्ये मोठ्या प्रमाणात संग्रह असणे आवश्यक आहे. नाण्याचा संग्रह असणे आवश्यक आहे. कारण नौकर व सैन्य इत्यादींचे वेतन नाण्यातच द्यावे लागते. कोषातील सुवर्ण किंवा चांदीही नाणी पाडता येतात. तसेच शत्रूपक्षात फाटाफूट निर्माण करण्यासही सुवर्णाचा उपयोग होतो. म्हणून आचार्य सोमदेवाच्या मते सुवर्ण व चांदी यांनी समृद्ध असलेला कोष सर्वश्रेष्ठ कोष होय.

आचार्यांच्या मते धनहीन राजा, मग तो कितीही कुलीन, चरित्रवान असो, सेवकगण त्याची सेवा करण्यास तयार होत नाहीत. कारण त्यांना त्यांच्या जीवनाला आवश्यक असणारे धन या राजाकडून मिळण्याची शक्यता नसते. या उलट नीचकुलीन चारित्रभ्रष्ट राजाची तो धनवान असल्यास धनाचे महत्त्व समजून सर्व सेवक, सेवा करण्यास तयार असतात. आचार्य सोमदेवांनी रिकाम्या राजकोषाची समृद्धि करण्यासाठी निरनिराळे मार्ग सांगितले आहेत. ब्राह्मण, व्यापारी यांच्या धर्मानुष्ठान, यज्ञानुष्ठान व कौटुंबिक पालन इत्यादीमधून खर्च झाल्यानंतर उरणारी रक्कम राजाने घेऊन आपला कोष समृद्ध करण्याचा प्रयत्न करावा. धनाढ्य व्यक्ति संतान-विहिन, पाखंडी लोकांच्या संपत्तीवर कर वसवून त्या संपत्तीच्या सहाय्याने कोष समृद्ध करावा. संपत्तिवान लोकाकडून प्रयत्न करून वेळोवेळी संपत्ति मिळवावी. मोठे श्रीमंत व्यक्ति, मंत्री, पुरोहित, सामंत यांची मर्जी संपादन करून त्यांना प्रार्थना करून त्यांच्याकडून संपत्ति मिळवावी व कोष समृद्ध करावा. या व इतर मार्गाने राजाने आपला रिकामा कोष भरण्याचे दृष्टीने सदैव प्रयत्न करणे आवश्यक मानलेले होते. कोष हा राजाचा प्राण असून त्याच्याशिवाय राजा नष्ट होत असल्याने, राजाने कोष कधीही रिकामा राहणार नाही याची खबरदारी घ्यावयास हवी, तरच राष्ट्राची सर्वांगीण समृद्धि होऊ शकते.

संपत्ति निर्माण करणारे कायदेशीर उपाय व विविध साधने, व्यापार, शेती इत्यादीवर वसविण्यात येणारा कर ही राजाच्या उत्पन्नाची महत्त्वाची साधने होत. आचार्य सोमदेवांच्या मते राजाने आपल्या एकंदर उत्पन्नाचा विचार करूनच खर्चाचे प्रमाण ठरवावे, अन्यथा कुबेराप्रमाणे श्रीमंत असणारा राजाही भिकारी बनतो. साधारणतः राजाने आपल्या वार्षिक उत्पन्नाचा सहावा भाग सैन्यासाठी, बारावा भाग दानधर्म प्रित्यर्थ, मंत्र्यासाठी, अन्य राज्यकर्मचाऱ्यावर व व्यक्तिगत कार्यावर खर्च करावा. सामान्यपणे राजाने अधिक खर्च करू नये हे मत राजनीतिज्ञानी सांगितलेले दिसते.

कर घेताना राज्याने काही विशिष्ट नियमाचे पालन करणे आवश्यक समजलेले होते. राजाने कराची प्रमाणे आपल्या मनानुसार ठरवू नये तर धर्मशास्त्रानुसार पूर्वपरंपरेप्रमाणे ठरलेला करच वसूल करावा. नाही तर





प्रजेला त्रास होऊन प्रजा राजाविरुद्ध बंड करण्याची शक्यता असते. आचार्य सोमदेवांच्या मते राजाने करात वाढ केल्यास राष्ट्र दरिद्री होण्याची शक्यता असते. त्यासाठी राजाने राष्ट्राची अभिवृद्धि होईल असेच कराचे प्रमाण ठेवावे. प्रजेची पात्रता पाहून त्या प्रमाणातच राजाने कराचे, प्रमाण ठरवून वसूली करावी. अधिक कर बसवून वसूली करावी. अधिक कर बसवून प्रजेचा मूलोच्छेद करणे राजालाही भविष्यकाळात हानीकारक असते. वृक्ष तोडल्याने एक वर्ष मोठ्या प्रमाणात फळे मिळतील पण पुन्हा कधीही मिळणार नाहीत. राजाने हे धोरण स्वीकारण्यास शेवटी राजा व प्रजा दोघेही अर्थहीन होतील. त्यामुळे राजाने लोभ किंवा तृष्णा याना वशीभूत होऊन प्रजेकडून अधिक प्रमाणात कर बसविण्याच्या भानगडीत पडू नये. कराचे तिसरे महत्त्वपूर्ण तत्व म्हणजे कर प्रजेला भार वाटू नये. मधमाशी ज्याप्रमाणे निरनिराळ्या फुलामधून फुलाला धक्का न पोहचविता मध गोळा करते, त्याप्रमाणे राजाने प्रजेची उत्पादनशक्तीच नष्ट होणार नाही याची काळजी घेऊन स्वल्प प्रमाणात कर बसवावा. कर वाढविणे अनिवार्य झाल्यास कर हलकेहलके वाढवावा त्यात एकदम वाढ करू नये. चौथे महत्त्वाचे तत्व आचार्य सोमदेवाच्या मते, कर देशकाल परिस्थितीनुरूप वसूल करावा. शेतकऱ्याकडून शेतमाल तयार झाल्यावर कर घ्यावा. तसेच योग्य प्रकारे उत्पन्न आलेले नसल्यास करमाफी देण्यात यावी. राजानी एकदा एखाद्या व्यक्तीला करमाफी दिल्यानंतर पुनश्च त्या व्यक्तीवर अगर संस्थेवर कर बसविला जाऊ नये. या तत्वाचे योग्य प्रकारे पालन करूनच राजाने कर वसूली करावी.

अधार्मिक रीतीने, अयोग्य प्रकारानी कर वसूली करणाऱ्या राजाचा जैन ग्रंथकारानी सदैव धिक्कारच केला आहे. अशा राजाच्या राज्यातून प्रजा निघून जाते व प्रजाविहीन राज्य राजा चालवू शकत नाही. नीतिवाक्या-मृतामध्येही प्रजेचे सरक्षणाचे कार्य करणाऱ्या राजालाच कर घेण्याचा अधिकार आहे असे म्हटले आहे. सरक्षणाचे कार्य योग्य प्रकारे न करणाऱ्या राजाचा कर घेण्याचा अधिकारही नाकारण्यात आलेला आहे.

प्राचीन काळातील राजाचे शेतीवरील कर व अन्य वस्तूवरील कर ही दोन उत्पन्नाची साधने होत. राजानी शेतकऱ्यावरोबर अन्याय रितीने वागून त्यांच्या उत्पन्नास हानी पोहचवू नये. उदारपणाच्या धोरणाचा स्वीकार करून सर्व प्रकारच्या सुखसोई त्यांना द्याव्यात म्हणजेच शेती व व्यापारात प्रगती होते. आचार्य सोमदेवांच्या मते व्यापारातील प्रगतीतच खऱ्या अर्थाने राष्ट्राची प्रगति असते. राजाने अन्याय रीतीने कर वसूली सुरू केल्यास कराच्या भीतीने व्यापारी व्यापार बंद करतात किंवा कर चुकविण्याचे मार्ग शोधतात ज्यामुळे राष्ट्राला आर्थिक हानी पोहचते. राजाने आयात मालावरही कमी प्रमाणात कर बसवावा. त्यामुळे विदेशीय व्यापाऱ्यांना या देशात येऊन व्यापार करण्याची इच्छा निर्माण होईल व आयातीत वाढ झाल्याने राजालाही अप्रत्यक्षपणे मोठ्या प्रमाणात पैसा मिळू शकेल. आचार्य सोमदेवसूरीच्या मते या कराच्या बदल्यात राजाने व्यापाऱ्यांना संरक्षण देणे आवश्यक असल्याने रस्त्यांच्या संरक्षणासाठी राजाने स्वतंत्र यंत्रणा प्रस्थापित करावी.

आचार्य सोमदेवांनी राजाने जमा खर्च पहाणारा स्वतंत्र विभाग करावा; कोषाध्यक्षाने लिहिलेल्या जमाखर्चाचे राजाने स्वतः निरीक्षण करावे अन्यथा राजाला आपले उत्पन्न किती व खर्च किती याची माहितीही होणार नाही; एखादे आर्थिक संकट निर्माण झाल्यास राजाने आर्थिक विषयातील विद्वानांची बैठक बोलवावी, त्यांचा सल्ला घ्यावा व त्यांच्या सल्ल्यानेच आवश्यक तो निर्णय घ्यावा असे सांगितले आहे.

राजाचे अंतिम ध्येय प्रजेचे सर्वांगीण कल्याण हे असते, त्यामुळेच राजाने व्यापारी वर्गावर योग्य नियंत्रण ठेवणे आवश्यक आहे. यासाठी राजाने निरनिराळे अधिकारी नेमून वजने मापे तपासावी, अन्नात मिश्रण होणार नाही याची काळजी घ्यावी, वस्तूच्या किंमती वस्तूंचे स्वरूप कायम राहील याची काळजी घ्यावी. संचय करून वस्तूंच्या किंमती वाढविणाऱ्या व्यापाऱ्याला किंवा परिस्थितीचा फायदा घेऊन जास्त किंमतीत वस्तू विकणाऱ्या व्यापाऱ्याला राजाने कठोर शिक्षा करून प्रजेच्या स्वाभाविक अधिकाराचे पालन करावे. तसेच राजाने वेळोवेळी वस्तूंचा साठा करून आवश्यक असल्यास प्रत्यक्ष व्यापारामध्येही प्रवेश करावा. अशा प्रकारे नीतिवाक्यामृतमध्ये

राज्याची आर्थिक स्थिती सुदृढ करण्यासाठी, कोष समृद्ध करणे, व्यापारावर योग्य नियंत्रण ठेवून वस्तूंच्या किमती कायम टिकविणे इत्यादी मार्ग सांगितले आहेत. आचार्य सोमदेवांनी कृषि, व्यापार व पशुधन यांना राज्याच्या आर्थिक प्रगतीच्या आधारशिला म्हटले आहे. आचार्यांनी आर्थिक समृद्धिसाठी सांगितलेले उपयुक्त विचार आज विसाव्या शतकातही उपयुक्त आहेत.

**आंतरराज्यीय संबंध–** प्राचीन काळात भिन्न भिन्न देशामध्ये कशा प्रकारचे संबंध असत याचेही विवेचन जैन राजनीतिशास्त्रज्ञानी केले आहे. सोमदेवांनी धर्म विजयी, लोभ विजयी व असूर विजयी असे विजेत्यांचे तीन प्रकार केले आहेत. धर्म विजयी राजा शत्रूचा पराभव करतो पण त्याच शत्रूला आपल्या अधिपत्याखाली मतेवर बसवितो. राज्य खालसा करीत नाही. लोभ विजयी राजा धन व भूमीची प्राप्ती करतो. तथापि इतर बाबतीत राजाला किंवा प्रजेला पूर्णपणे स्वातंत्र्य देतो, तर असुर विजयी राजा धन, भूमीबरोबरच राजाचा विनाश करून त्यांच्या मुलाबाळाचाही नाश करतो. भारतीय व जैन परंपरेनुसारही शेवटच्या प्रकारच्या राजाला अयोग्य व पहिल्या प्रकारच्या राजाला योग्य राजा म्हटले आहे. नीतिवाक्यमृतामध्ये शांतता काळातील व युद्धकाळातील आंतरराज्यीय संबंधाचे वर्णन केले आहे. आधुनिक काळाप्रमाणे प्राचीन काळात कायम स्वरुपांच्या दूताची नेमणूक केलेली दिसत नाही. तरीही काही विशिष्ट कारणासाठी, तह करण्यासाठी राजदूत पाठविले जात होते असे दिसते. राजदूत हा अमात्याच्या बरोबरीचाच प्रशासकीय अधिकारी समजलेला असून तो कुलीन, चतुर, निर्लोभी, विद्वान, उदार, बुद्धिमान असणे आवश्यक मानलेले होते. दूताने नैतिक उपायांनी शत्रूची सैन्यशक्ति नष्ट करणे, राजनैतिक मार्गाने शत्रूला दुर्बल बनविणे, त्याच्या अधिकाऱ्यांना फितूर करणे, सैन्यात, राजगृहात फितूर निर्माण करणे, निरनिराळ्या वेषातील आपले हेर तेथे नेमणे, शत्रूच्या सर्वांगीण प्रगतीची माहिती मिळवून त्याच्या विनाशाच्या दृष्टीने प्रयत्न करणे इत्यादी कामे करणे आवश्यक मानलेले होते.

वर्तमानकाळाप्रमाणे प्राचीनकाळातही राजदूताच्या मुखाने राजा बोलतो ही कल्पना मान्य असल्याने राजदूत अवध्य समजला जाई. राजदूताची काही विशिष्ट कारणापुरतीच नियुक्ती केली जात होती तर हेर व दूत हे सदैवसाठी नेमण्यात येत व ते निरनिराळ्या बातम्या काढून मायदेशी पाठवीत. या हेराने निरनिराळे प्रकार आचार्य सोमदेवांनी सांगितले आहेत. अशा प्रकारे शांततेच्या काळात शत्रूच्या अंतर्गत हालचालींची माहिती मिळविण्यासाठी, परस्परांच्या राज्यात राजे हेरांचे जाळे पसरवित असत.

प्राचीनकाळात सार्वभौम राजा मांडलिक राजांचे राज्य साम्राज्यात समाविष्ठ करीत नसे तर त्यांना विशिष्ट कर दिल्यानंतर राज्यकारभाराच्या बाबतीत पूर्णपणे स्वातंत्र्य दिले होते. काही मांडलीक राजे आपले स्वतःचेही मांडलीक ठेवीत असत. मांडलिकांना पूर्णपणे स्वातंत्र्य असले तरी, सम्राटाच्या आदेशाचे पालन करणे, वार्षिक कर देणे, युद्ध काळात राजाला सैन्याचे सहाय्य करणे, विशिष्ठ उत्सवाच्या प्रसंगी राजदरबारात उपस्थित राहणे व राजाच्या प्रतिनिधीला आपल्या दरबारी मान देणे इत्यादी बंधने पाळावी लागतच असत.

सर्व राजनीतिशास्त्रकारांनी कोणत्याही महत्वाकांक्षी राजाने साम, दाम व भेद या तीन मार्गाचा आधी उपयोग करावा व तीनही मार्ग असफल झाले तरच दंड किंवा युद्ध परस्पर संबंधाच्या बाबतीत उपयोग करावा असे सांगितले आहे. युद्धाच्या भीषणतेची सर्वानाच कल्पना असल्याने सदैव युद्ध टाळणे शक्य नसले तरी शक्यतो युद्ध टाळण्यासाठी निरनिराळे मार्ग सांगितले आहेत. विविध राज्यांनी आपल्या चारी बाजूला असलेल्या इतर राज्याबरोबर, मित्रत्वाचे तह करावेत व सत्तेचा समतोल राखण्याचा प्रयत्न करावा. त्यामुळे त्यांच्यात शांतता व कोणत्याही शक्तिशाली राज्याचे आक्रमण त्याच्यावर होत नाही असे मत दिले आहे.

आचार्य सोमदेवानी नीतिवाक्यामृत ग्रंथात षाड्गुण्य समुद्देशमध्ये या सिद्धांताचे विश्लेषण केले आहे. या सिद्धांताचा उल्लेख विजिगिषु राजाच्या संबंधात केला आहे. सोमदेवसूरींच्या मते मंडळाची निर्मिती उदासीन,






मध्यस्थ, विजिगीषु, शत्रू, मित्र, पार्ष्णिग्राह, आक्रंद, आसार, अन्तर्धि इत्यादी नऊ राजाच्या अस्तित्वाने होते. सोमदेवानी वर्णन केलेले मंडळ कौटिल्याप्रमाणेच आहे. तथापि कौटिल्याप्रमाणे, अरिमित्र, मित्रमित्र व अरि मित्र मित्र या राजाच्या उल्लेखाची त्यांना गरज न वाटल्याने त्यांनी फक्त ९ राजांचाच उल्लेख केला आहे. मंडळातील विजिगिषु राजाने मित्र व शत्रू राजाबरोबर अशा प्रकारे संबंध ठेवावेत की जेणे करून परस्परात सत्तेचे समतोलन योग्य प्रकारे राहू शकेल. आपल्या राजनीतीचा व साधनांचा त्याने अशा प्रकारे उपयोग करावा की, या मंडळापैकी कोणतेही राज्य विजिगिषुला किंवा इतर कोणत्याही राजाला हानी पोहचवू शकणार नाही.

सोमदेवांच्या मते विजिगीषु राजा उत्साहशक्ति, प्रभुशक्ति व मंत्रशक्तीच्या आधाराने शत्रूवर विजय प्राप्त करू शकतो. विजिगीषुची समृद्ध कोष व बलवान चतुरंग सेना ही प्रभुशक्ति पराक्रम व रण–कौशल्य ही उत्साहशक्ती व ज्ञानबळ ही मंत्रशक्ति होय. या तीन शक्तीनी सुसज्ज असलेला राजा सर्वप्रथम युद्धाचा आश्रय घेत नाही. शत्रू राज्य किंवा प्रतिकूल व्यक्तीला वश करण्यासाठी तो साम, दाम, भेद व दंड या चार उपायांचा प्रथम अवलंब करतो व त्यानंतर उद्देश्य प्राप्तीसाठी अखेरचे साधन म्हणून युद्धाचा तो अवलंब करतो. आतरराष्ट्रीय संबंध नियमित करण्यासाठी सोमदेवानी षाड्गुण्य मंत्राचा महत्त्वपूर्ण सिद्धांत सांगितला आहे. हे सहा गुण म्हणजे संधि, विग्रह, यान, आसन, संश्रय व द्वैधीभाव हे होत. विजिगीषुने आपल्या दुर्बलतेमुळे शक्तिमान राजाला धन देऊन तह करणे म्हणजे संधि, बलवान राजाने बलहिन राजाबरोबर सुरू केलेले युद्ध म्हणजे विग्रह. विजिगीषुने शत्रूच्या प्रदेशावर केलेले आक्रमण म्हणजे यान. शक्तिवान राजाने केलेल्या आक्रमणाची उपेक्षा म्हणजे आसन. आक्रमण करणाऱ्या शत्रूपेक्षा बलवान शत्रूबरोबर केलेला तह म्हणजे संश्रय व बलवान राजाबरोबर तह व बलहीन राजाबरोबर युद्ध म्हणजे द्वैधीभाव. या सर्व उपायांच्या सहाय्याने राजा युद्ध टाळून प्रजेला सुरक्षित ठेवू शकतो, शांतता प्रस्थापित करू शकतो. जितक्या प्रमाणात शक्य होईल तेवढ्या प्रमाणात राजाने युद्ध टाळण्याचा बुद्धिबळाच्या सहाय्याने प्रयत्न करावा, कारण बुद्धिबळ शक्तिबळापेक्षा सर्वश्रेष्ठ असते. साम, दाम, भेद, दड इत्यादी विविध उपायांनी राजाने उद्देश्यपूर्तीचा प्रयत्न करावा व तो असफल झाल्यास मात्र शस्त्रबळाचा मोठ्या प्रमाणात पाठपुरावा करण्यास सुरुवात करावी. सोमदेवांच्या मते शत्रू बलवान असेल तर त्याच्याबरोबर कधीही युद्ध करू नये उलट तहच करावा, युद्ध केल्यास आपले अस्तित्वच नष्ट होण्याची शक्यता जास्त असते. सोमदेवांनी कूटयुद्ध व तूष्णीयुद्ध हे युद्धाचे दोनच प्रकार सांगितले आहेत. कूटयुद्धात एका शत्रूवर आक्रमण करणार असे जाहीर करून सैन्य परतवून दुसऱ्या शत्रूचाच युद्धाच्या सहाय्याने नाश केला जातो व तूष्णीयुद्धात विष देणाऱ्या किंवा वार करणाऱ्या घातक व्यक्तीला शत्रूकडे पाठवून शत्रूचा नाश करण्यात येतो.

धर्मयुद्ध मानवी, सहृदयक दृष्टीकोनातून केले जात असे. शत्रूचा विनाश करणे हा या युद्धाचा मूळ हेतू नसे. शत्रूला फक्त पराभूत करून आपल्या ताब्यात घेतले जाई. धर्मयुद्धाचा उद्देशच धर्माची स्थापना करणे व अधर्माचा नाश करणे हा होता. त्यामुळे विषारी बाण या युद्धात वर्ज्य होते. समबलवान शस्त्रधारी शत्रूबरोबर युद्ध होई. कूटयुद्धात नियमांचे पालन केले जात नसे. आचार्य सोमदेवांच्या मते शत्रू मद्यपान करून किंवा आळसात पडलेला असेल तो काळ शत्रूच्या नगराला वेढा घालण्यास व शहरात सैन्य घुसविण्यास योग्य होय. आचार्यांच्या मते विजिगीषुच्या सैन्याने युद्धकलेच्या शिक्षणाप्रमाणे युद्ध करणे व शत्रूकडून होणाऱ्या प्रहाराकडे लक्ष ठेवूनच युद्ध करावे. तसेच कूटयुद्धातही संग्राम भूमीवर पडलेल्या, भयभीत झालेल्या, शस्त्रहीन, पळून जाणाऱ्या शत्रूवर हल्ला करू नये. युद्धात अटकेत टाकलेल्या शत्रू सैन्याला, युद्धानंतर वस्त्रे देऊन मुक्त करावे. विजयी राजाने खंडणी घेऊन त्या राजालाच, तो मृत झाला असल्यास त्याच्या पुत्राला, सत्तेवर बसवावे. सामाजिक, आर्थिक वा धार्मिक जीवन, संस्था, परंपरा इत्यादीमध्ये कोणताही बदल करू नये. युद्धात मारल्या गेलेल्या सैनिकांच्या संततीचे पालन पोषण करणे राजाचे आद्यकर्तव्य आहे. या कर्तव्याचे पालन न केल्यास कोणत्याही राजाचे राज्य परिपूर्ण होऊ शकत नाही.









जैन राजनीति ग्रंथकारानी, तसेच आगम साहित्यातही, प्राचीन काळातील ग्राम व्यवस्थेसंबंधी, माहिती दिलेली आहे. ग्रामणी किंवा पाटील हा खेड्याचा प्रमुख असे. खेड्याचे राजकीय, सामाजिक इत्यादी विविध प्रश्न तो सर्वसामान्य लोकांच्या किंवा अनुभवतज्ञ, वयोवृद्ध लोकांच्या संमत्तीने सोडवीत असे. हे कार्य करणारे पंचायत मंडळ नावाचे स्वतंत्र मंडळ असल्याची माहिती मिळते. ग्रामणी किंवा पाटील या मंडळाच्या मदतीने ग्रामसंरक्षणाचे कार्य करी, त्यासाठी आवश्यक तेव्हा सैन्याचीही नेमणूक केली जाई. तटबंदी, किल्ले इत्यादींच्या सहाय्याने संरक्षणाचे काम केले जात असे. पंचायत मंडळ महसूल वसूली, न्यायदान इत्यादीची कामे करी. त्याच-बरोबर हे मंडळ विश्वस्त पेढी म्हणूनही कार्य करीत असे. लहान उद्योग व्यवसायाना मदत करण्याचे कार्य हे मंडळ करी. सामान्यतः स्थानिक स्वशासनाचे तत्त्व येथे मान्य केलेले दिसते.

जैन आगम साहित्य व आगमेतर साहित्यात तत्कालीन समाजजीवनाचे वर्णन करताना तत्कालीन राजनैतिक विचारांचे व शासन पद्धतीचे प्रतिबिंबही ठिकठिकाणी पडलेले दिसते. समाजाला योग्य प्रकारे मार्गीकृत करण्यासाठी व राज्याच्या सर्वांगीण प्रगतीसाठीही काही वेळा या विषयाची चर्चा या साहित्यात केलेली दिसते. हर्षवर्धनाच्या मृत्यूनंतर भारतातील केंद्रीय बलवान सत्ता नष्ट झाली. अनेक निरनिराळ्या राज्यांची स्थापना होऊन, त्यांच्यात सत्ता स्थापनार्थ संघर्ष होण्यास सुरवात झाली या राजकीय अस्थिरतेचाच फायदा यवनांनी घेऊन त्यांनी भारतीय भूमीवर आक्रमण केले.

या राजनैतिक अस्थिरतेच्या काळातच सोमदेवसूरींचा अविर्भाव झाला. त्या काळात भारतीय राजाना योग्य प्रकारे मार्गदर्शन करणारा कोणताही राजनैतिक विचारवंत नव्हता. या अभावाची पूर्ती सोमदेवांनी केली. त्यांनी विभ्रांत भारतीय राजाना मार्गदर्शनार्थ राजनीति शास्त्रावरील नीतिवाक्यामृत हा महानग्रंथ लिहिला. कौटिल्यापासून निघालेली राजनैतिक विचारधारा कामंदकापाशी खंडित झाली होती. आचार्य सोमदेवांची या खंडित विचारधारेला पुनः प्रवाहीत करून नीतिशास्त्राचा गहन अभ्यास करून, त्यावर मनन चिंतन करून आपल्या असामान्य प्रतिभेनी नीतिवाक्यामृत नावाच्या अनमोल ग्रंथराजाची निर्मिती केली. यामुळेच तत्कालीन राजांना आपल्या कर्तव्य व आदर्शाचे ज्ञान झाले व राष्ट्रोन्नति कार्याचा संकल्प त्यांनी पुनः ग्रहण केला.

आचार्य सोमदेवांनी प्राचीन राजनीतिशास्त्राला एक नवीन स्वरूप दिले. यतींनी राजनीतीच्या-व्यावहारिक स्वरूपाला महत्वाचे स्थान दिले. राज्य व समाज या दोघांच्या प्रगतीसाठी पूरक असलेल्या सिद्धांताचे निरूपण केले. आचार्यांनी क्रम व विक्रम दोन्हीनाही राज्याचे मूळ मानले आहे. तथापि विक्रमावर त्यांनी अधिक भर दिला आहे. त्यांच्या मते क्रमागत राज्यही विक्रमाच्या ( शौर्याच्या ) अभावामुळे नष्ट होते. त्यामुळे राजाने पराक्रमी असले पाहिजे. त्याची स्पष्टपणे घोषणा आहे की, भूमीवर कोणाचाही वंशपरंपरागत अधिकार असत नाही तथापि पृथ्वी ही वीरांची आहे. त्यामुळे वीरांचा अधिकार मात्र पृथ्वीवर असतो. वीरते बरोबरच विविध शास्त्र, राजनीति इत्यादींचे ज्ञान राजाला असणे आवश्यक आहे. या प्रकारे सोमदेवांनी राजनीतीच्या व्यावहारिक सिद्धांतावर जोर दिला आहे. राजतन्त्राचा पुरस्कर्ता असूनही सोमदेवानी निरंकुश राजसत्तेला मान्यता दिलेली नाही. त्यांच्या राजतंत्राच्या कल्पनेत प्रजातंत्राची मूलभूत बीजे पूर्णत्वाने परिलक्षित होतात. त्यांचा आदेश आहे की, राजाने प्रत्येक कार्य मंत्र्याच्या समत्तीनेच करावे, त्यांनी राजाला सुयोग्य मंत्री, सेनापति, पुरोहित व अन्य राज्यकर्मचारी नेमण्याचा आदेश दिला आहे. त्यांच्या मते सुयोग्य मंत्री असल्यास गुणहीन राजाही यशस्वी होतो. आचार्यांनी मंत्री व पुरोहिताला राजाचे माता-पिता म्हटले आहे. ज्याप्रमाणे मातापिता आपल्या पुत्राच्या हितरक्षणार्थ सदैव प्रयत्नशील असतात, त्याचप्रमाणे मंत्री व पुरोहित राजाचे हित करण्यात सदैव तत्पर असतात. अशा प्रकारे वैधानिक राजतंत्राचा सिद्धांत आचार्य सोमदेवांनी मांडला आहे.

आचार्य लोकहितवादी राज्याच्या सिद्धांताचे पूर्णरूपाने समर्थन करणारे आहेत. त्यानी राज्याला धर्म, अर्थ व काम या त्रिवर्ग फलोंचा दाता असे म्हटले आहे. आचार्यांच्या दृष्टीने प्रजेची सर्वांगीण प्रगति करणे हे राजाचे परम कर्तव्य आहे. त्याचबरोबर राजाला त्याच्या मर्यादा पालनाचाही आदेश देण्यात आला आहे. राजाने अतिक्रमण केल्यास फलदायक भूमीही अरण्य समान होते व मर्यादाचे पालन केल्यास प्रजेला प्रगतीची फळे मिळतात. राजाने प्रजेसमोर उच्च आदर्शाची निर्मिती करणे, ध्येय ठेवणे आवश्यक आहे. प्रजा त्याप्रमाणे उच्च तत्वांचेच अनुकरण करते, राजा अधार्मिक असल्यास प्रजाही अधार्मिक बनते असे सोमदेवांचे मत आहे. राजाने प्रजेचे पुत्राप्रमाणे पालन करावे. राजानी प्रजेबरोबर कधीही अन्याय करू नये व अपराधानुरूप पुत्रालाही दंड द्यावा. प्रजेचे योग्य प्रकारे रक्षण न करणाऱ्या राजाला नरक प्राप्ती होते असे आचार्य सांगतात.

पापी लोकांच्या निवारणाने राजाला पाप लागत नाही. उलट राष्ट्राचे संकटातून रक्षण केल्याबद्दल धर्माचीच प्राप्ती होते. राजधर्माच्या दृष्टीने महान तत्त्वे आचार्यांनी राजासमोर मांडली आहेत. मोक्षसाधनेला त्यांनी सर्वाधिक महत्वाचे स्थान दिले आहे. आचार्यांच्या मते रोज काही ना काही तप व दान करीत रहावे. कारण की तप करणाऱ्या व्यक्तीला उत्तम लोकाची प्राप्ति होते. या प्रकारे आचार्यांनी जीवनात अधर्माचा त्याग करून, धर्माच्या साधनेने शुभगति प्राप्त करून घेणे हा राजधर्म राजासाठी निर्धारीत केला आहे. तथापि त्यानी राजासाठी संन्यास प्रधान धर्मसाधना त्याज्य सांगितली आहे. ज्याप्रमाणे भगवद्गीतेत कर्मयोग केवळ कर्म न राहता मोक्ष साधन योग बनतो तेथे क्षत्रियाचे युद्धाचरणही ज्याप्रमाणे निःश्रेयस साधक आहे त्याचप्रमाणे आचार्य सोमदेवांनी राजधर्माला मोक्ष साधक मानून त्याचे निरूपण केले आहे.

आचार्य सोमदेवानी वर्णन केलेल्या राज्याच्या परिभाषेत उच्च आदर्शांचा समावेश आहे. राजाच्या पृथ्वी पालनोचित कर्मालाच त्यानी राज्य म्हटले आहे. ती पृथ्वी वर्णाश्रम, धन, धान्य, सुवर्ण इत्यादींनी विभूषित असली तरच तिला राज्य म्हणता येईल. जर तिच्यात उपर्युक्त विशेषत्व नसेल तर ती राज्याचे महत्वपूर्ण अंग बनू शकत नाही. अशा प्रकारे राज्याची केलेली परिभाषा राज्यशास्त्राच्या क्षेत्रात एकमेवाद्वितीय आहे. यात प्राचीन व आधुनिक विद्वानांनी सांगितलेल्या राज्याच्या तत्त्वांचा पूर्णपणे समावेश आहे. सोमदेवांच्या पूर्वीही राज्यशास्त्रज्ञांपैकी कोणीही राज्याचे या प्रकारे वैज्ञानिक परिशीलन केलेले नाही. त्यामुळे या परिभाषेला राज्यशास्त्रात सर्वोच्च स्थान आहे व राज्यशास्त्राला ही आचार्य सोमदेवांची महान देणगी आहे.

आचार्यांनी धर्म व राजनीतीचा अपूर्व समन्वय केला आहे. संपूर्ण नीतिवाक्यामृतामध्ये धर्म साधना किंवा नैतिक तत्त्व यांना प्रमुखत्व देऊन राजनीतीला धर्मनीतीपासून पृथक केलेले नाही. आचार्यांनी राज्यशास्त्राच्या प्रत्येक क्षेत्रात अध्यात्मिक दृष्टीकोन मांडला आहे. राजालाही अध्यात्मविद्या प्राप्त करण्याचा आदेश त्यानी दिला आहे. राजनीतिसारख्या ऐहिक व कलुषित विषयाला सौम्य व सात्विक रूप देऊन आचार्यांनी राजदर्शनाच्या क्षेत्रात अपूर्व योगदान केले आहे. युद्धाच्या बाबतीतही त्यांनी धार्मिक नियमाची उपेक्षा केली नाही. कूटयुद्धापेक्षा धर्मयुद्धाला श्रेष्ठ मानून धर्मविजयी राजाची प्रशंसा केली आहे. अन्य सर्व उपाय संपल्यानंतर त्यांनी युद्ध करावे असे सांगितले आहे. युद्धात मारल्या गेलेल्या सैनिकांच्या कुटुंबियांच्या पालनपोषणाची जबाबदारी स्वीकारणे हा त्यांनी राजाचा धर्म मानला आहे. युद्ध व आतरराष्ट्रीय संबंधासंबंधीचे त्याचे विचार महत्त्वपूर्ण आहेत.

आचार्यांनी आपल्या दृष्टीने समृद्ध राष्ट्राची एक आदर्श कल्पना मांडली आहे. पशु, धान्य, हिरण्य व संपत्ती यांनी सुशोभित असलेले ते राष्ट्र होय. राष्ट्राच्या संपन्नतेच्या विविध उपायावर त्यानी प्रकाश टाकला आहे. व्यवसायाच्या उन्नतीतच राष्ट्राची उन्नति होते. कृषि, पशुपालन, व्यापार व उद्योगधंदे यांचा व्यवसायात समावेश होतो. या क्षेत्रात कशा प्रकारे प्रगति होते. यावरही त्यानी प्रकाश टाकला आहे. जैनाचार्य असूनही




संपत्तीच्या महत्वाला त्यांनी दृष्टीआड केले नाही. आचार्य धर्म, अर्थ, काम या तीन पुरुषार्थात अर्थाला विशेष महत्व देतात, कारण त्यांच्या मते अर्थावर दोनही इतर पुरुषार्थ अवलंबून आहेत. त्यांनी कामालाही धर्मापेक्षा कमी महत्व दिलेले नाही. या प्रकारे विचार व्यक्त करण्यात सोमदेवांची महान दूरदर्शिता व व्यावहारिक राजनीतिज्ञता स्पष्ट होते. अर्थाची त्यांची व्याख्या महत्वपूर्ण आहे. ज्यात सर्व लोकांचे योग्य प्रयोजन होते त्याला अर्थ म्हणतात, कारण विश्वात असे कोणतेही कार्य नाही की जे पैस्यानी पूर्ण होत नाही. अर्थ व्यक्तीच्या समस्त कामना पूर्ण करू शकतो. सोमदेवांच्या मते बुद्धिमान व्यक्ति वा राजाचे कर्तव्य आहे की, त्याने अप्राप्त धनाची प्राप्ती करावी. प्राप्त धनाचे रक्षण करावे व रक्षित धनाचे वर्धन करावे. त्याने उत्पन्नाच्या प्रमाणातच खर्च केला पाहिजे. या नियमांचे पालन करीत नाही तो कुबेर असला तरी दरिद्री होतो. आचार्यांनी कोषाला राज्याचा प्राण समजले आहे. कोषवृद्धीचे विविध उपाय सांगितले असून उत्कृष्ट कोषाचे वर्णनही केले आहे. कोषाला त्यांनी महत्व दिले असले तरी त्याच्या वृद्धिसाठी न्यायोचित मार्गाचा अवलंब करण्यास सांगितले आहे. प्रजेला राजाने त्रास दिल्यास प्रजा राज्य सोडून जाते व राजाला पुढील काळात करच मिळू शकत नाही. देशकालानुरूप राजाने प्रजेपासून कर घ्यावा. आचार्यांनी अर्थशुचितेवर विशेष भर दिला आहे.

आचार्यांनी राजनीति व लोकनीतीचा समन्वय केला आहे. त्यानी समाज उन्नतीतच राष्ट्रोन्नति मानली आहे व प्रत्यक्षात तेच सत्य आहे. मानवी जीवन सफल होण्यासाठी ज्या गोष्टी आवश्यक आहेत त्या सर्वांचे विश्लेषण या लहानशा ग्रंथात केलेले आहे. केवळ राजनैतिक दृष्टीकोनातूनच हा ग्रंथ महत्वाचा नाही तर लोकव्यवहाराच्या दृष्टीनेही या ग्रंथाला विशेष महत्व आहे. या राजनीतीप्रधान ग्रंथात आचार्यांनी समाज व्यवस्थेच्या विविध अंगावर प्रकाश टाकला आहे. आचार्य कौटिल्याप्रमाणे वर्णाश्रम पद्धतीवर त्यांचा विश्वास असला तरी, या क्षेत्रात प्राचीन आचार्यांपेक्षा त्यांच्या अपेक्षा उदार व प्रगतिशील आहेत. त्यांनी या पद्धतीच्या उपयुक्त अंगाचाच स्वीकार केला आहे व रूढीप्रियतेचे सर्वत्र जोरदारपणे खंडन केले आहे. सोमदेवानी शूद्रालाही समाजात महत्वपूर्ण स्थान दिले आहे. तसेच ज्ञानदानाचा राजमार्ग सर्वांसाठी खुला ठेवण्याचा आदेश दिला आहे.

राजनीतीबरोबर समाजशास्त्र, अर्थशास्त्र, धर्मशास्त्र, मनोविज्ञान व दर्शनशास्त्र इत्यादी समाजोपयुक्त विषयांचे विश्लेषण या ग्रंथात आढळते. एकाच ग्रंथात विविध विषयाच्या उपयुक्त भागांचे विश्लेषण सोमदेवांच्या महान विद्वत्ता व व्यावहारिक राजनीतिज्ञतेचे द्योतक आहे. आजच्या काळात राष्ट्रीय उत्थानाच्या कार्यातही या ग्रंथाचे मोल असामान्य आहे. जगात वैज्ञानिक प्रगतीच्या नावावर भौतिक जडवादी विचार सर्वत्र पसरलेले असून, अर्थलोलुप भोगप्रधान समाजाची रचना या प्रगतीचा शाप आहे. या काळात भौतिक जडवादासाठी मुक्ति मिळण्यासाठी आध्यात्मिक दृष्टीकोन विकसित करणे ही गरज आहे. सोमदेवांच्या नीतिवाक्यामृत या आवश्यकतेच्या पूर्तीसाठी अपूर्व ग्रंथ आहे व्यक्ति व समाजाचो आध्यात्मिक दृष्टिकोन प्रगत करून देशात चिरकालीन शांतता प्रस्थापित करता येते नीतिवाक्यामृतामध्ये राजनीतीच्या क्षेत्रात आध्यात्मिक ध्येय जागृत ठेवलेले असल्याने भारतातील राजनीतीप्रधान साहित्यातील हा ग्रंथ अमर कृति आहे.

सारांश, जैनांनी अध्यात्मिकच किंवा तात्विकच प्रगती केली असे नाही तर राज्यशास्त्रासारख्या किचकट गुंतागुंतीच्या व सर्वांगीण भौतिक विषयातही त्यानी असामान्य साहित्य निर्मिती केली. भारतीय राजसत्तेला या विचाराच्या, नीतिकल्पनाच्या, ध्येयाच्या, आदर्शाच्या व मूल्याच्या आधाराने राज्यकारभार करून समाजाची सर्वांगीण उन्नति घडवून आणण्याचा त्यानी सल्ला दिला असे दिसते. कौटिलीय अर्थशास्त्र, मनुस्मृति या राजनैतिक ग्रंथात सांगितल्याप्रमाणेच किंवा कित्येकदा त्यापेक्षाही महत्वाची राजनीतीची मूलभूत तत्त्वे जैन राजनीतिशास्त्रकारांनी सांगितली आहेत असे दिसते.

# जैन कायदा

जैन कायद्याविषयी स्वतंत्र किंवा संबंधित विचार भारतीय कायद्यात किंवा नीतिसंबंधी धोरणात कुठेही झाला नाही. कायदा किंवा नीति याविषयी जैन परंपरेत जणु काय कोणी विचारच मांडले नाहीत असा दृष्टिकोन तर कायद्याची पुस्तके लिहणाऱ्या विद्वानांनी घेतलेला नव्हता ना? या उलट भगवान आदिनाथ वृषभदेवांनी समाजातील अराजकता नष्ट करून शास्ता, शासन, विविध शास्त्रे इत्यादींची निर्मिती करून, सामाजिक शांतता प्रस्थापित करण्याचे पहिले कार्य केले. या संदर्भात सामाजिक शांतता प्रस्थापित करण्यासाठी विधिसंहिता तयार करण्याचे महान कार्य त्यानीच केले. कायद्याचे ते संस्थापकच होत. पन्नास वर्षापूर्वी बॅरिस्टर श्री. चंपतराय जैन यांनी 'जैन लॉ' नावाचे एक पुस्तक आंग्ल भाषेत लिहून प्रसिद्ध केले. त्यात त्यांनी 'जैन कायदा' हा स्वतंत्र आहे. तो हिंदुकायद्याच्या पोटशाखेच्या स्वरूपाचा नाही असे विचार उत्कटपणे प्रदर्शित केले आहे. कोणत्याही कायद्याची घडण ही विशिष्ट धर्म, जात, रीतिरिवाज, पंथ-विचार, रूढी व तात्कालीन प्रचलित समाजव्यवस्था यावर अवलंबून असते. 'अन्ततो गत्वा' कायद्याची चौकट ही समाजाने स्वतःच्या संरक्षणासाठी व सुव्यवस्थिततेसाठी निर्माण केली आहे. जेव्हा समाज किंवा समाजातील व्यक्ति नीतीची बंधने झुगारून देतो तेव्हा कायदा हा बंधन दबाव वाटू लागतो. राज्यानी दारुबंदी केली व समाजाच्या नैतिक अभ्युत्थानाच्या मार्गातील अडथळे दूर करण्याचे प्रयत्न केले. यासंबंधी हिंदुधर्म व जैनधर्म यांनी दारुपासून होणाऱ्या नुकसानीची मीमांसा केलेली आहे. धर्मपंडितांनी देखील दारु पिणे हे पाप आहे असे सांगितले तरीही सुरुवातीला दारुबंदीचे कायद्यात रूपांतर होऊ शकले नाही. पण जेव्हा दारु प्राशनाने सामाजिक हानि होण्यास सुरुवात झाली, समाजाचा अधःपात होऊ लागला तेव्हा राज्यानी दारुबंदी कायदा केला. तथापि अशा कायद्यांचा विचार जैनधर्मानी फार प्राचीन काळापासूनच केला आहे व आपल्या आचारसंहितेत त्यांचा समावेशही केला आहे. दारुच्या एका थेंबाच्या स्पर्शापासूनही अनंत जीवांची हिंसा होते म्हणून जैनधर्मशास्त्रात पुनःपुन्हा सांगितले आहे. अशा परिस्थितीत कायद्याची निर्मिती करीत असताना धर्मशास्त्र पडद्याआड ठेवून चालत नाही. प्रत्येक धर्मातील न्यायनीतीची तत्त्वेच कालांतराने कायद्याचे रूप ग्रहण करीत असतात. त्यासाठी प्रत्येक धर्मातील नैतिक सिद्धांताना प्रकाशात आणणे व त्यांना समाजाच्या सार्वजनिक जीवनात योग्य स्थान मिळणे, मिळवून देणे आवश्यक असते.

### जैनांची अदूरदृष्टी–

जैन शास्त्रामध्ये न्यायनीतिविषयक कोणत्या धारणा आहेत यासंबंधी अन्य समाजाला किंवा न्यायालयाला योग्य वेळी माहिती झाली नाही. प्राचीन इतिहासावरून दिसून येते की, अन्य जाती-जमातीवर जैनावर अत्याचार केले, अन्याय केले, तरीही या समाजाने ते निमूटपणे सहन केले. कारण न्यायालयात धर्मशास्त्राचा योग्य सन्मान होईल किंवा नाही या साशंक भावनेनी त्यांनी या धर्मशास्त्रग्रंथाना न्यायालयात नेले नाही. न्यायालयातील अधिकारी आदराने हे ग्रंथ हाताळतील याविषयी साशंकता असल्याने त्याचो आपले धर्मग्रंथ इतरांच्या समोर आणण्याची इच्छा झाली नसावी. अर्थात याचा परिणाम मात्र जो व्हायचा तोच झाला. समाजरचनेच्या कायद्याच्या बाबतीत जैनांचे स्वतंत्र असे शास्त्रच नाही असा न्यायालयाचा समज होऊन बसला. हिंदु कायद्याप्रमाणेच त्यांच्या बाबतीतही न्यायदान करण्यात येऊ लागले. स्वतःच्या धर्मग्रंथांच्या आदरानादराचे विचार तत्कालीन हिंदूंच्या मनात आले नसतील असे नाही, तथापि त्यांनी याच गोष्टीला फारसे महत्व न देता आपले धर्मग्रंथ न्यायालयात पोहचविले. ग्रंथाच्या छपाईलाही त्यानी विरोध केला नाही. जैन समेनी विचार केला की, जैनशास्त्राचे प्रकाशन करणे देखील धर्मविरुद्ध आहे. त्यामुळे जैन धर्म म्हणजे काय? त्याच्या आचारसंहिता काय काय आहेत याविषयी सामान्य जनतेमध्ये एक प्रकारचे अज्ञानच कायम राहिले. अर्थात याचे पडसाद मात्र विरुद्धच उमटले. इ. स. १९२१ मध्ये डॉ. गौड यांनी हिंदू कोड प्रकाशित केले व त्यामध्ये जैनानाच धर्मभ्रष्ट




हिंदु म्हणून घोषित केले. त्यामुळे जैनांच्या स्वतंत्र अस्तित्वावरच धोका निर्माण झाला. काहींच्या मते तर जैनधर्म हा मुलतः हिंदू धर्माचीच शाखा आहे. त्यामुळे जी हिंदू नीति तीच जैन नीति असाही विचार मांडण्यास सुरुवात झाली. तथापि प्रत्यक्षात जैनधर्म व हिंदुधर्म यांच्यात सृष्टीमान्यता, ईश्वर कर्तृत्व, मचित्ततत्व, देव-देवतावाद इत्यादींसंबंधाने फार मोठे अंतर आहे. हिंदूंचे शास्त्र वेगळे व जैनांचे शास्त्र वेगळे आहे. वेद व आठरा पुराणांना जैनधर्म मानीत नाही. जैनांच्या शास्त्रांचा उल्लेख पण स्पष्टपणे हिंदूशास्त्रामध्ये दिसून येत नाही. काही सामाजिक तत्वासंबंधी कोठे समानता दिसली तरी त्यामुळे धार्मिक मान्यता सुद्धा समान असाव्यात अशी शंका घेणे चुकीचे ठरेल. काही वैवाहिक कार्यात ब्राह्मणांना अमंत्रण दिले जात असे. त्याना पूजापाठ करण्यासही बोलाविले जाई पण त्यामुळे स्वतंत्र असलेल्या मान्यता बदलल्या असे होत नाही. दीर्घकाळ हिंदु व जैन समाज एकत्र राहिल्याने त्यांच्यात संस्कृतिक सामंजस्य किंवा देवाणघेवाण होणे शक्य आहे व हे त्याचेच प्रतीक होय. या उलट बौद्ध ग्रंथामध्ये तत्कालीन जैन धर्मियांचे किंवा महावीरांचे स्पष्ट उल्लेख आहेत. त्यामुळे हिंदु धर्माप्रमाणेच बौद्ध धर्मापासूनही जैन धर्माचे अस्तित्व स्वतंत्र होते हे सिद्ध होते. जैनधर्माची परंपरा बौद्ध धर्मापासून पुष्कळच जुनी असून, गौतमबुद्धकालीन जैनधर्माचे महावीर हे २४ वे तीर्थंकार होत. यावरून जैन धर्माचे स्वतंत्र अस्तित्व निःसंशय सिद्ध होते.

जैन कायदा आचारसंहितेवर आधारलेला असून ती आचार संहिता स्वतंत्र आहे. विशेषतः हिंदूसंहितेपेक्षा तीत महदन्तर आहे. हिंदूंनी पारलौकिक सुखाच्या अपेक्षेने पुत्रादिकांच्या मान्यता कल्पिलेल्या आहेत. तशा मान्यता जैनधर्मामध्ये नाहीत. पुत्रजन्माने कुणास पुण्यभागी किंवा पापभागी मानले जात नाहीत. पुत्र असून माणसे नरकात जाऊ शकतात. त्याप्रमाणे आपण जे धर्मकृत्य किंवा दानादिक कर्म करतो त्यामुळे मृतात्म्यास शांतीलाभ होतो अशी हिंदूंची धारणा आहे. जैनधर्मात तशी मान्यता नाही. पिंडदान या शब्दाचा अर्थ हिंदूशास्त्रात ज्याप्रमाणे आहे तसा जैनधर्मात नाही. जैन मतानुसार पिंडदान याचा अर्थ पुत्रोत्पत्ति. पिंड+दान शरीरदान अर्थात शरीराची उत्पत्ति असा आहे. तसेच स्त्रियांच्या अधिकारासंबंधी हिंदु व जैन आचार, विचार व कायदा यामध्येही एक विशाल अंतर दिसून येते. जैन कायद्यानुसार पतीच्या मृत्यूनंतर विधवा स्त्रीला संपतीचा पूर्णपणे अधिकार दिलेला आहे. परंतु हिंदू कायद्यामध्ये स्त्रीला तिच्या जिवनापर्यंतच हा अधिकार ठेवलेला आहे. हिंदू कायद्यात फक्त पुरुष हेच संपत्तीचे अधिकारी मानले जात तर जैन कायद्यात अविभक्त संपत्ति पण सामुहिक द्रव्य म्हणून मानली जाते. तसेच जैननीतीप्रमाणे जर कोणी मुलगा धर्मभ्रष्ट किंवा पतित निघाला तर त्यास घराबाहेर काढण्याचा अधिकार आहे. परंतु हिंदु कायद्याप्रमाणे असे करता येत नाही. याचा अर्थ एवढाच की, जैन कायदा व हिंदू कायदा यात अनेक विषयामध्ये मौलिक अंतर आहे. जैनधर्म हा हिंदूधर्माची शाखा मानणे हे अगदीच चूक आहे.

## जैन कायद्याची आधारशिला-

जैन कायदा हा अन्य कोणत्याही धर्माच्या संहितेवर अवलंबून नसून तो स्वतंत्र आहे. 'संपत्ति अधिकारा' संबंधी त्यांचे स्वतंत्र विचार आहेत. जैन कायद्याचे रचयिता आदिभगवंताचे सुपुत्र महाराजा भरत चक्रवर्ती हे होत. याची रचना एकाच वेळी झाली, त्यामुळे न्यायाधीशावर अवलंबून असणारे सूचक चिन्ह यात दिसत नाहीत. सामाजिक गरजा जसजशा व मानवी संबंध जसजसे विस्तारीत होत गेले, त्याप्रमाणे या कायद्यामध्येही बदल होत गेले. जैन कायद्याचे आधार खालीलप्रमाणे होत-

१) भद्रबाहूसंहिता- हा ग्रंथ श्रीभद्रबाहुश्रुतकेवली यांच्या वेळचा आहे. या ग्रंथाला २३०० वर्षे होऊन गेली पण त्याच्या संग्रहावरून त्यांचे प्राचीनत्व लक्षात येते. याची रचना सामान्यपणे वि. सं. १६५७-१६६५ किंवा १६०१-१६०९ च्या दरम्यान झाली असावी असे समजण्यात येते.





२) अर्हन्नीति– हा ग्रंथ श्वेतांबर पंथाचा आहे. याच्या लेखकाचा नामनिर्देश नाही. पण हा ग्रंथ फार जुना नसावा. ग्रंथाच्या शेवटच्या श्लोकामध्ये संपादकानी ज्याप्रमाणे पाहिले व ऐकिले त्याप्रमाणे लिपीबद्ध केले आहे असे म्हटले आहे.

३) वर्धमाननीति– याचे संपादन श्री. अमितगति अचार्यांनी जवळ जवळ वि. स. १०६८ किंवा इ. स. १०११ मध्ये केले. हा ग्रंथ राजा मुंजाच्या वेळी झाला. यातील व भद्रबाहुसंहितेतील श्लोक प्राय. एक आहेत. यावरून असे वाटते की, या दोन ग्रंथाच्या निर्मितीसाठी एखाद्या प्राचीन ग्रंथाची मदत घेण्यात आलेली असावी.

४) इंद्रनंदी जिनसंहिता– याचे रचयिता वसुनंदी इंद्रनंदी स्वामी आहेत. हा ग्रंथ उपासकाध्ययन यावर अवलंबून आहे. 'उपासकाध्ययन' आज संपूर्णतः उपलब्ध नसून, त्यापैकी काही उपाध्ये फक्त आज अस्तित्वात आहेत.

५) त्रिवर्णाचार– वि. सं. १६६७ किंवा इ. सन. १६११ च्या सुमारास हा ग्रंथ लिहिला गेला असावा. याचे रचनाकार भट्टारक सोमसेन स्वामी होत. ते मूलसंघाची शाखा पुष्करगच्छाचे पट्टशिष्य होते.

६) श्री. आदिपुराण– भगवत् जिनसेनानी याचे लेखन केले. इ. स. नवव्या शतकातील हे आचार्य होत. सुमारे १२०० वर्षाच्या काळात हा ग्रंथ जैन समाजातील सर्व स्तरात परिचित झाला आहे. या ग्रंथात जैन नीतीने वर्णन केलेले आहे. या सर्व ग्रंथामध्ये जैन कायदा असा स्पष्टपणे उल्लेख केलेला नसला तरी तो समजून घेण्यासाठी या ग्रंथाचा अतिशय उपयोग होतो.

### जैन कायद्याची वैशिष्टये–

समाजाच्या स्थैर्यासाठी आणि त्यांना चतुःपुरुषार्थाची साधना नीट करता यावी म्हणून 'जैन कायदा' प्रस्थापित झाला. यात कुटुंब, पुत्राधिकार, विवाह, पैतृकसंपत्ति, संपत्तीचे विभाजन, उत्तरदायित्वाचे किंवा दायभागाचे अधिकार, स्त्रीधन, पालन पोषणाचे अधिकार, चालीरीती इत्यादी विविध विषयांचा विशेष रूपाने विचार करण्यात आलेला आहे. त्याबाबतची विशेषतः खालीलप्रमाणे होय.

पुत्र-दत्तक वगैरे :– आपण आपल्या इच्छेप्रमाणे एखाद्यास पुत्र म्हणू शकतो. तथापि कायद्याने पुत्र दोन प्रकारचे असतात. १) वंशोत्पन्न व २) दत्तक. विवाहित स्त्रीपासून जन्मलेल्यास वारसपुत्र आणि नाव चालविण्यासाठी विधिपूर्वक ओटी घेतलेल्या पुत्राला दत्तक अशी सज्ञा आहे. लहान मुलाला दत्तक घेतले तरी तो देखील 'दायाद' (संपत्तीचा अधिकारी) समजला जाऊ शकतो. दोन्ही पुत्र वंश चालविणारे आहेत. किंमत देऊन ओटीत घेतलेल्या दत्तक पुत्राला 'क्रीत' म्हणतात. पण किंमत देऊन परंतु ओटीत न घेतलेल्या पुत्राला दत्तकाचे अधिकार मिळत नाहीत. ज्या मुलाला जन्मानंतर कांही अपरिहार्य, विशिष्ट कारणासाठी लपवून ठेवले असेल त्यालाही औरस पुत्राचे सर्व अधिकार जैन कायद्याप्रमाणे मिळतात.

एकाच वडिलाची सर्व मुले एकत्र राहात असतील व त्यापैकी एकास जरी पुत्र झाला तरी सर्वांना पुत्रवान म्हणविले जाते. तथापि इतर भावानाही दत्तक घेण्याचा अधिकार कायम होता. पण त्यापैकी कोणताही भाऊ दत्तक न घेता मरण पावला तर पुतण्या त्या व्यक्तीचा मुलगा म्हणून संपत्तीचा अधिकारी होऊ शकत असे. तसेच एखाद्या पुरुषाला अनेक स्त्रिया आहेत व त्यापैकी एखादीला पुत्र झाला तर सर्व स्त्रियांना पुत्रवती म्हणण्यात येते. म्हणजेच इतर स्त्रियांना दत्तक घेता येत नाही. कारण कोणतीही पत्नि आपल्या अपत्यहीन पतीसाठीच दत्तक घेऊ शकते. त्यामुळे तोच मुलगा अर्थातच सर्व संपत्तीचा प्रमुख होतो. अशा प्रकारची व्यवस्था हिंदु कायद्यात नाही.

दत्तक, वारस मुलगा नसेल किंवा तो मेला असेल तर किंवा पुत्राला पापाचरणामुळे घरातून बाहेर घालवून दिले असेल तर, दत्तक घेता येतो. मुलगा जर विवाह न करताच वारला तर मृत मुलाचा मुलगा म्हणून




कोणास दत्तक घेता येत नाही. दत्तकपुत्र जर चारित्रभ्रष्ट निघाला, तर, त्याच्याऐवजी दुसरा मुलगा दत्तक घेता येतो. जर पति मरण पावला, तर पत्नीदेखील दत्तक घेऊ शकते. तिला अनुमतीची गरज नाही. जर दोन विधवा असतील तर मोठ्या विधवेस लहान विधवेच्या अनुमतीशिवाय दत्तक घेता येतो. सासू व सून दोघीही विधवा असतील तर व मुलगा पतीच्या पश्चात मेला असल्यास सून दत्तक घेऊ शकते, कारण पतीच्या पश्चात ती संपत्तीची अधिकारी झालेली असते. दत्तक पुत्र अविवाहीत मेल्यास विधवा माता स्वत.साठी दुसरा पुत्र दत्तक घेऊ शकते, तथापि पहिल्या दत्तक पुत्रासाठी म्हणून दत्तक घेता येत नाही.

दत्तकाच्या अटी दत्तक कोणास घ्यावे यासंबंधी साधारणपणे जैन कायदा शास्त्रामध्ये कांही संकेत पाळले जातात. की ज्यामुळे सुपुत्र म्हणविले जाते. अशा पहिल्या मुलाला दत्तक देऊ नये. कारण या प्रथम पुत्रामुळेच तो 'पिता' म्हणविला जातो. ज्याला दत्तक घ्यावयाचे आहे त्या मुलाचे वय दत्तक आईच्या वयापेक्षा कमीच असावे. साधारणपणे दीर, पुतण्या, नवऱ्याच्या परिवारातील मुलगा, मुलीचा मुलगा याना दत्तक घेतले जाऊ शकते. हे जर शक्य नसेल तर पतीच्या गोत्राचा कोणी तरी मुलगा दत्तक घेतला जाऊ शकतो. विवाहित मनुष्य किंवा संतति असलेला मनुष्यही दत्तक होऊ शकतो.

दत्तक मुलाला ओटीत घेणे हा दत्तक विधान विधीतील सर्वात महत्वाचा भाग आहे. प्रातःकाळी दत्तक घेणारा मंदीरात जाऊन तीर्थंकाराची पूजा-अर्चा करतो व आपल्या धर्माच्या लोकाना जमवून पुत्र जन्माचा उत्सव साजरा करतो. यावेळी पुत्रावर जन्म प्रसंगीचे सर्व संस्कार करण्यात येतात. विधवा दत्तक घेतल्यानंतर सर्व संपत्ति दत्तक मुलाच्या ताब्यात देऊन स्वतः धर्म कार्यात निमग्न होते. साधारणपणे दत्तक पुत्र वारस पुत्राप्रमाणेच असतो. आई-वडिलांच्या जीवनापर्यंत दत्तक मुलाला कोणतेही अधिकार मिळत नाहीत. संपत्ति विकण्याचा किंवा गहाण ठेवण्याचाही अधिकार त्यास नाही. जर दत्तक पुत्र दुराचारी निघाला तर, न्यायालयाच्या मदतीने त्यास घराबाहेर काढून टाकता येते. त्याचा त्याने जर पुत्रसंबंधही नष्ट होतो. दत्तक किंवा औरस पुत्रालाही तो विद्यावान, विनीत व आज्ञापालक असला तरी, मातेच्या परवानगीशिवाय त्याला संपत्तीच्या बाबतीत स्वतंत्र अधिकार प्राप्त होत नाहीत. यावरून सिद्ध होते की, जैन कायद्याप्रमाणे पुत्रत्व देखील तोडले जाऊ शकते. दत्तक पुत्र घेतल्यानंतर सवर्ण विवाहीत स्त्रीपासून पुत्र झाल्यास, दत्तक पुत्राला संपत्तीचा चौथा भाग देऊन वेगळा करता येते. अशा प्रकारे दत्तक पुत्राच्या बाबतीत निरनिराळी बंधने व अटी असलेल्या दिसतात.

विवाह : जैन कायद्याचा विचार करताना समाजात स्वस्थ परंपरेचा विकास व्हावा म्हणून, विवाहाचा अग्रगण्य विचार केलेला दिसून येतो. विवाहाच्या अटी सांगताना खालील गोष्टींचा प्रामुख्याने विचार केलेला आहे. समगोत्र कन्येबरोबर विवाह करू नये. दुसऱ्या गोत्राची असलेल्या, आरोग्यसंपन्न, विद्यावती शीलसंपन्न व गुणसंपन्न अशा मुलीशी विवाह करावा. ज्या मुलीची जन्मरास मुलाच्या जन्मराशीशी सहावी किंवा आठवी असेल अशी मुलगी विवाहयोग्य समजावी. मुलगाही बुद्धिमान व सदाचारी असावा. मामाची मुलगी किंवा मेहुणीबरोबर विवाह योग्य सांगितला आहे तथापि याबाबतीत स्थानिक रितीरिवाजांना महत्व देण्यात येते. मावशीची मुलगी व सासूच्या बहिणीशी विवाह अमान्य केला आहे. जैन नीतिप्रमाणे उच्च वर्णातील पुरुष नीच वर्णातील स्त्रीबरोबर विवाह करू शकतो परंतु शूद्र स्त्रीशी विवाहानंतर निर्माण झालेल्या संततीला पैतृक संपत्तीचा अधिकार नाही. शूद्र माणसाला फक्त शूद्र स्त्रीबरोबरच विवाह करण्याची परवानगी आहे. आदिपुराणात म्हटले आहे की,–

शूद्रा शूद्रेण वोढव्या नान्या तां स्वां च नैगम. । वहेत् स्वा ते च राजन्यः स्वा द्विजन्मा क्वचिच्च ताः ।।

( पर्व १६ श्लोक २४७ )

पुरुष आपल्यापेक्षा नीच वर्णाच्या स्त्रीशी विवाह करू शकतो. उच्च वर्णाच्या स्त्रीबरोबर नाही. म्हणजेच ब्राह्मण चार वर्णाच्या, क्षत्रिय तीन वर्णाच्या, वैश्य दोन वर्णाच्या, शुद्र एक वर्णाच्या स्त्रीशी विवाह करू शकतात.





हा नियम प्रचलित असला तरी नंतरच्या काळात ब्राह्मणाचा शूद्र स्त्रीशी विवाह अमान्य करण्यात आला. विवाहाचे अनेक प्रकार असून त्यापैकी ब्राह्मविवाह, दैवविवाह, आर्यविवाह व प्राजापत्यविवाह हे धर्ममान्य व असुरविवाह, गांधर्वविवाह, राक्षसविवाह व पैशाच्चविवाह हे अधर्म विवाह प्रकार समजले जातात. विधवाविवाह हा जवळजवळ अस्तित्वातच नव्हता पण काही जातीत हा विवाह प्रचलित होता. पुराण शास्त्रामध्येही ही प्रथा मान्यवर असलेली दिसत नाही.

वाग्दान, प्रदान, वरण, पाणिग्रहण व सप्तपदी हे विवाह विधीतील पाच महत्वाचे विधि होत. प्रथम वाग्दान होत असे म्हणजे विवाह निश्चित करण्यात येई. प्रदान विधीमध्ये वरातर्फे मुलीला दागिने वगैरे भेट जात असे. कन्यादान म्हणजेच वरण. बहुधा मुलीचे वडील हे कार्य करतात. पाणिग्रहण म्हणजे हस्तमिलाप-हस्तांदोलन व सप्तपदी म्हणजे सात फेऱ्या; ही प्रथा आजही प्रचलित आहे. पिता नसल्यास बंधु, काका किंवा गोत्रातील कोणाही व्यक्तीला कन्यादान करता येत असे. जर कोणीच नसेल तर मुलीने स्वतःच विवाह करून घ्यावा. सप्तपदीशिवाय विवाहाची पूर्ति होत नाही. सप्तपदीच्या अगोदर पाणिग्रहणाच्या पश्चात मुळामध्ये काही दोष, जातीदोष माहित झाल्यास पिता आपल्या कन्येचा विवाह दुसऱ्या वराबरोबर लावू शकतो. तथापि याबद्दल जैन नीतिशास्त्रात मतभिन्नता आहे. विवाहानंतर वधू-वरांनी सातदिवस ब्रह्मचर्य पाळणे आवश्यक मानलेले आहे.

जैन कायद्याप्रमाणे संपत्तीचे स्थावर व जंगम असे दोन भेद आहेत. जी संपत्ती एका ठिकाणी स्थिर आहे उदा. घर जमीन इत्यादीना स्थावर म्हणतात. तर एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी नेता येऊ शकणाऱ्या संपत्तीला उदा. पैसा दागिने वगैरे जंगम संपत्ती म्हणतात. जैन कायद्याप्रमाणे पुढील संपत्तीचे विभाजन होऊ शकत नाही. १) पतीने किंवा पित्याने आपल्या गुणांनी किंवा पराक्रमाने मिळविलेली संपत्ती. उदा. राज्य वगैरे. २) पैतृक संपत्तीशिवाय मिळविलेले ज्ञान उदा. विद्या कला. ३) मित्र किंवा पत्नीच्या बंधुजनाकडून प्राप्त झालेली संपत्ती. ४) गाडलेली संपत्ती. ५) युद्धामुळे किंवा सेवा कार्यामुळे प्राप्त झालेली संपत्ती. ६) स्त्री धन. ७) पित्याच्या वेळी बुडालेली संपत्ती, जी एखाद्या भावाने अविभक्त संपत्तीच्या सहाय्याशिवाय मिळविली असेल. वडीलाच्या मृत्यूनंतर सर्व भावानी संपत्ती वाटून घ्यावी. प्रथम कुणाचे कर्ज असल्यास चुकवावे व उरलेल्या संपत्तीचे विभाजन करावे. जैन नीतीमध्ये सर्वप्रथम मुलाचा अधिकार विशेष मानला जातो. विभाजन योग्य नसलेली संपत्ती सोडून इतर सर्व संपत्तीचे नीती व रिवाजानुसार योग्य वारसदारामध्यें विभाजन होते. आजोबाच्या संमतिशिवाय वडिलानी स्वतः मिळविलेल्या संपत्तीचा अधिकारी मोठा मुलगाच होऊ शकतो. बाकीच्या भावांनी मोठ्या भावास पित्याप्रमाणे मानावे. हा नियम राज्य किंवा रियासतीच्या बाबतीत लागू होत नाही. जेष्ठ पुत्राच्या आज्ञेत राहणाऱ्या धाकट्या भावाच्या चरितार्थाची जबाबदारी जेष्ठ पुत्रावरच असते. लहान भाऊ अज्ञान असेल तर, त्याच्या हिश्श्याचे संरक्षण जेष्ठ पुत्रालाच करावे लागते. एखादा भाऊ वारस नसताना वारल्यास त्याची संपत्ती सर्वामध्ये सारख्या प्रमाणात वाटण्यात येते.

पैतृक संपत्तीपासून खालील लोकाना वंचित समजण्यात येते. १) जन्मजात नपुसक. २) सदाचार विरोधी. ३) उन्मत्त, लंगडा, आंधळा, शूद्र इत्यादी. ४) जातिभ्रष्ट, आई-वडीलांचा घोर विरोधी वगैरे. अपंग किंवा रोगी व्यक्तींच्या बाबतीत मात्र त्याचा रोग बरा होताच त्याला संपत्तीचा अधिकार द्यावा किंवा त्याच्या संपत्तीचा भाग त्याच्या पत्नीला किंवा मुलाला द्यावा. तथापि रोग, अंधत्व, बधिरत्व यामुळे मनुष्याला त्याच्या मिळणाऱ्या सांपत्तिक वारसापासून वंचित ठेवू नये असेही जैन कायद्यात म्हटलेले आहे ५) मांस भक्षण करणारास पण संपत्तीचा हिस्सा देऊ नये. संपत्तीचे विभाजन होण्यापूर्वी जर कोणी साधू झाला, तर त्याच्या संपत्तीचा भाग त्याच्या पत्नीस मिळावा. जर त्यास मुलगा असेल तर तो पित्याचे स्थान ग्रहण करील. जर कोणी अविवाहीत मृत अथवा साधु झाला तर त्याच्या संपत्तीचा वाटा थोरल्या भावाला किंवा भावाच्या मुलाला मिळावा.

# जैन तत्त्वज्ञान

## अर्घ्य ७ वा

जैन तत्त्वज्ञान खंडात जैन तत्त्वज्ञान, जैन सिद्धान्त, जैन धर्माची मूलभूत तत्त्वे, अहिंसा–अनेकान्त–अपरिग्रहवाद–कर्मसिद्धान्त–जैन न्याय, ज्यांच्या आधारावर जैन तत्त्वज्ञान उभारलेले आहे असे जीव, पुद्गल–धर्म–अधर्म–आकाश–काल हे जैन तत्त्वज्ञानाचे विषयभूत मूल वस्तुभूत पदार्थ, तसेच मोक्षमार्गासाठी हेय-उपादेयरूपाने प्रयोजनभूत जीव–अजीव–आस्रव–बंध संवर–निर्जरा–मोक्ष ही ७ तत्त्वे, ५ अस्तिकाय, १४ गुणस्थान, १४ मार्गणास्थान, १४ जीवसमास या सर्वांचे सूक्ष्म व गहन तत्त्वज्ञान वाचकांना या खंडाच्या अभ्यासातून मिळेल.

अर्थशास्त्र ह्या सुखवादी तत्त्वज्ञानाचा अग्रदूत आहे. त्याचे घोषित ध्येय आहे जास्तीत जास्त मानवीय सुख. ह्या मानवीय सुखाचे रूप आणि तंत्र ऐंद्रिय, भौतिक व मौतिक साधनांनी युक्त आहे. जास्तीत जास्त इन्द्रिय-तृप्ती मिळवायची हा दृष्टीकोन आहे. इंद्रिय तृप्तीचे दुसरे नाव आहे सुख. ह्या तृप्तीचे आधार म्हणजे इंद्रियांना उत्तेजित करून त्यांच्या गरजा वाढविणे. ह्याचा अर्थ म्हणजेच गरजांची वाट करणे. ह्याप्रमाणे अर्थशास्त्रीय सुख-प्राप्तीचे तंत्र द्विमुखी आहे. एकीकडे नैसर्गिक अथवा नैसर्गिक रीतीने गरजा निर्माण करणे तर दुसरीकडे भौतिक साधनाची निर्मिती व त्याचा संग्रह करणे. वर वर पाहता साधन गरजा वाढीत जीवनमान वाढविणे असलेले दिसते. त्याची कल्पना आहे की जीवन-स्तर वाढविले की मानवीय सुख प्राप्त होते. ह्या तत्त्वज्ञानाचा सरळ अर्थ आहे भौतिक समृद्धी करण्यासाठी जीवापाड प्रयत्न करणे होय.

ह्यातूनच आजचे औद्योगीकरण व त्याचे तंत्र जन्माला आले आहे. या परिणामांतून उप-परिणाम म्हणजे व्यापार पेठाचा शोध होऊ लागला आणि औद्योगिक व व्यापारी निर्बंध निर्माण झाले. बाजार मिळविण्यासाठी भूप्रदेशाचा शोध व त्यावरील सत्ता प्राप्त करून घेण्याची गरज निर्माण झाली. यातून वसाहत वाद आला. या वादातून निर्माण झालेली पुढची पायरी म्हणजे आतर नदालवाद होय. एकीकडे व्यवसायातील प्रतिस्पर्धा वाढली व त्याचा सहज परिणाम म्हणून सामुहिक स्तरात ईर्ष्या, द्वेष, तिरस्कार यातूनच युद्ध सुरू झाले. ह्या सर्वातून नवी मनोवृत्ती आली आणि तिचे नाव आहे समाजवाद. ज्या गोष्टींचा समाजवादाने विरोध केला तीच त्याचा आधार झाला. किंवा वर्ण-वर्गातील तिरस्कार व वैरभावना हेच समाजवादाचे त्याचा आधार झाले आहेत. ह्यांचा परिणाम म्हणजे जास्तीत जास्त भयानक युद्धाची शक्यता. ते टाळण्यासाठी अधिक भीषण अण्वस्त्रांची निर्मिती एका भयानक युद्धाला आळा घमविण्यासाठी महा भीषण, युद्धाची धमकी. ह्या उपायाने युद्ध थांबविण्यात यश तर मिळाले पण जास्त युद्ध होण्याची शक्यता मात्र वाढत गेली. ह्याचे फळ म्हणून शीत-युद्धाने जन्म घेतला आणि मानसिक ताण वाढला, पोसला. धर्मांच्या जुन्या रूपाला कालबाह्य ठरवून नवे मानसशास्त्र उदयास आले. रेचकवादाच्या ( थिअरी ऑफ कॅथरसिस ) आधारावर लैंगिक स्वच्छंदता ग्राह्य मानली गेली. लैंगिक-स्वैराचारातून लैंगिक उत्तेजन वाढले. त्याच्या तृप्तीसाठी मुक्तभोगाचा सिद्धान्त पुढे आला. मुक्तभोगाचा मंत्र आणि अधिक सुख मिळविण्याकरता नवनवीन फॅशन्स बहाल केल्या गेल्या. आणि आधुनिक जीवनाची पावले अशीच पुढे पुढे पडत गेली. ही पुढे पडत असलेली पावले कोठे जात आहेत, मानवतेला कोठे घेऊन जाणार आहेत ह्या विचाराने काही जण विचलित झाले, काही तर भ्रमिष्ट बनले. ह्या भीतीतून व भ्रमिष्टपणातून आजचा हिप्पीवाद आणि स्वैराचारी आवारापण आले. थोडक्यात ही आहे आधुनिक जीवनाची उसासे सोडणारी, कण्हणारी, भ्रमिष्ट झालेली आणि शेवटी आत्महत्येकडे झेपावणारी एक झलक आहे.

तर, आता प्रश्न आहे की आधुनिक जीवनाच्या भ्रमिष्ट सटाटोपाच्या संदर्भात जैन धर्म कोणता हिस्सा उचलणार आहे, योगदान देणार आहे ? ह्या प्रश्नाने असे दैत्याकार रूप धारण केले आहे की ज्याचा अस्वीकारही करता येत नाही किंवा ते सोडताही येत नाही. ह्या दैत्याबरोबर जैन धर्म कसा टिकेल ? त्या तंत्राचाच विचार करावयाचा आहे. एवढेच नाही तर लवकरात लवकर त्याचा विकासही करावयास पाहिजे. ह्या समस्येचा आणखी सरळ पद्धतीने विचार केल्यास लक्षात येईल की ज्याप्रमाणे अन्नात एक पोषक तत्त्व असते व दुसरे स्वाद. पहिले दीर्घकालीन, सूक्ष्म व अंतरंगी आहे. दुसरे प्रयोजन तुलनेने तात्कालिक, स्थूल व बाह्य आहे. दोन्हीत सुख असते. परंतु सामान्य लोक दुसऱ्या प्रयोजनातच गुरफटलेले असतात ते स्वादाच्या मागे लागले आहेत म्हणूनच अनेकविध स्वादांचा शोध लावणे हेच त्याचे ध्येय होते. स्वाद तंत्र इतके रुचिप्रधान झाले आहे की भोजनाच्या पहिल्या प्रयोजनाची त्यांना आठवणच राहिली नाही. आज चालू असलेला हॉटेल व्यवसाय ह्याचे ज्वलत प्रमाण आहे. तेव्हां ही समस्या आहे की ह्या रुचिप्रधान समाजाला ह्यातून मुक्त कसे करायचे ? स्वादवादी बाजूचा निव्वळ अभावच करायचा काय ? भोजन-तंत्राला अरस युगानुसार बदलून टाकायचे की काय ? हे शक्य नाही. मग




मधला मार्ग काढला पाहिजे. स्वादवादी प्रवृत्तीचा स्वीकार करूनही भोजनाचे असे तंत्र निर्माण केले पाहिजे की ज्यात पोषक तत्त्वाचा अधिकात अधिक समावेश व्हायला हवा आहे. आधुनिक जीवनाच्या सर्व फॅशन्स स्वादवादी सिद्धान्ताचे अनुयायी आहेत. त्याविरुद्ध धर्माचे प्राचीन स्वरूप अश्म युगीन पोषक तत्त्वाचे रक्षण करणारे आहे. म्हणूनच आता आपण आधुनिक जीवनाच्या वर्तमान स्वरूपाला टाकू तर शकत नाही. ह्या उलट त्यात संशोधन करून धार्मिक रूपात बदलणेच शक्य आहे. प्रचलित फॅशनमध्ये संशोधन करून नवीन धर्मवादी रूप देऊन त्याचा प्रचार करणेच खरा श्रेष्ठ उपाय होणार आहे. धर्माचे जुने रूप आता खरोखर कालबाह्य झाले आहे. समस्याचे खरे समाधान ह्यातच दडलेले आहे की धर्माचे शाश्वतरूप वर्तमानकालीन पद्धतीकडे वळावे व वर्तमान फॅशन्स धर्मपरायण बनावी. सांगायचे तात्पर्य असे की धर्म दृष्टीने किंवा धर्मतत्त्वानी नवीन फॅशन्सच्या वर्तुळात मुसंडी मारून खोलवर असा प्रवेश करावा की दोन्ही एकरूप होऊन जावेत व एका नवीन धार्मिक फॅशन्सचा उदय व्हावा.

जैन तत्त्वज्ञानाचा बारकाईने विचार केल्यास समस्याचे समाधान अवघड वाटत नाही. याला कारणही तसेच आहे. भ. महावीर काळात जेव्हा जैनधर्माचा पुनरुद्धार झाला किंवा त्या काळाला नवीन फॅशनमध्ये जैन तत्त्वज्ञान बदलले गेले त्यावेळची परिस्थिती आजच्या परिस्थितीपेक्षा फारशी वेगळी नव्हती, अर्थात साधनेत बराच फरक होता. त्यावेळीसुद्धा बौद्धिक जागृती, संदेहवाद, रुढि-मुक्ती, भौतिक समृद्धिवाद, लैंगिक स्वच्छंदता, लोकशाही, विवस्त्रवाद (प्राचीन स्वैराचारीचा हिप्पीवाद) वगैरे वगैरे सर्व कांही होतेच. कदाचित आजच्या सारखा स्वादवाद नसेलही त्यावेळी. त्यावेळी असलेला स्वादवाददेखील असह्य झाला असेल. अशा सर्व फॅशन्स असूनही त्यावेळी जैनधर्माने त्यातही प्राण-प्रतिष्ठा केलीच होती, तर मग आज तो तसे का करू शकणार नाही ? या सर्वाच्या *समन्वयाचा परिणाम आहे स्याद्वाद आणि अनेकान्तदृष्टी. ह्या सिद्धान्ताचा निर्माता प्रचलित स्याद्वादाच्या* संशोधनातून जैन स्याद्वाद किंवा जीवनाच्या कोणत्याही उपलब्धीचा अस्वीकार करावयाचा नाही. स्याद्वादाने जीवनाच्या प्रत्येक उपलब्धीला त्यात लपलेल्या सापेक्षतेची किंमत करून तिचा स्वीकार केला आहे. सर्व उपलब्धीना (निष्पत्तीना) एका युक्तीसंगत सूत्रात ओवले, एका बौद्धिक संस्थनेत ओतून अनेकान्तवादी तत्त्वज्ञानाच्या मुशीतून आकार दिला. ह्याच्या परिणामस्वरूपातून विश्वाच्या आश्चर्यकारक धर्माचा आविष्कार झाला. ह्याच धर्माने विश्वाच्या संरचनेच्या मूळ प्रमाणात शिरून त्याच्या अंग, उपांगाना जिवंत केले. याप्रमाणे जैनधर्म पूर्णपणे पारलौकिक किंवा इहलौकिक झाला नाही. तो आस्तिकही झाला नाही किंवा नास्तिकही झाला नाही. तो *स्वैराचारीही झाला नाही किंवा अत्यंत कर्मकाण्डीही बनला नाही. तो पूर्णरूपाने अरण्यवासी झाला नाही किंवा* नगरवासी बनला नाही. तो ईश्वरवादीही बनला नाही किंवा निरीश्वरवादीही बनला नाही. सगळ्या अतीत सिद्धान्ताचे रक्षण करीत त्याने व्यवहारवादाची निर्मिती केली. जो वाद सापेक्षदृष्टीने सगळे काही होता परंतु निरपेक्ष अथवा एकान्तदृष्टीने काहीच नव्हता त्याने समग्र जीवनाला पाहिले. समग्र आणि अंश ह्याच्या परस्पर संबंधाचे परीक्षण केले. संपूर्णतेच्या दृष्टीने अशाला व अंश-दृष्टीने समग्रतेला जाणले आणि हे सर्व समजून घेतल्यावरच जीवनाच्या संपूर्ण तत्त्वांना एकत्र करून सार्वलौकिक चारित्राची निर्मिती केली. जीवनाचा सर्वांगीण विकास करून मुक्तीवादाकडे नेऊन तो सोद्देश्य बनविला. तो जैनधर्म आज देखील तसे करू शकतो. आजच्या *नास्तित्वात अस्तित्व, स्वैराचारात संयम, निरुद्देश्य आवारपणात सोद्देश्य बंधन,* इहलौकिकतेत पारलौकिकता, युद्धात शांती, एकान्तात अनेकान्त, समाजवादात व्यक्तीत्व, इत्यादी विरोधी तत्त्वांचा समन्वय करून जीवनाला वळण लावू शकतो. सगळ्या विरोधी जोडण्यात सापेक्षवादाने एकसूत्रतेचा सूर लावता येईल.

आज असलेले बौद्धिक संदेहवाद, अधर्मवाद व जीवन मूल्यवाद जैनधर्माला अतिशय अनुकूल पार्श्वभूमी आहे. जैनतत्त्वज्ञानात ह्या तिन्ही विचारसरणीना सुरक्षित स्थान आहे. आजचा संदेहवाद रूढीवादी अंधानुकरणापासून सुटका देणारे उत्तम प्रतीक साधन आहे. अधर्मवाद निरर्थक कर्मकाण्डापासून निवृत्त होण्याचा मार्ग आहे आणि जीवनमूल्यवाद जीवनाला उपादेय करण्याचा समर्थक आहे. जैनधर्म सुरुवातीपासून रूढीवादी विचारसरणीचा




विरोधक आहे. भौतिक पद्धतीने प्राप्त झालेले ज्ञान जैन तत्त्वज्ञानाचा आधार आहे. हे ज्ञान इंद्रियजन्य (मतिज्ञान) बौद्धिक ( श्रुत ), परा-बौद्धिक ( अवधि ), परा-मानसिक (मन:पर्यय) आणि सार्वत्रिक (केवल) कोणत्याही स्तरावर, कोणत्याही व्यक्तीचे असो जैनधर्माचा आधार आहे. कोणत्याही विशिष्ट प्रकारच्या ज्ञान अवस्थेबद्दल जैनांचा आग्रह नाही. प्रत्येक ज्ञान अवस्था जर ती स्वगत व बाह्य दृष्टीने संगत असेल तर ग्राह्य आणि विश्वासार्ह पण असते. ह्यावरोबरच जैनांची हीसुद्धा मान्यता आहे की, मतिज्ञानापेक्षा उत्तरोत्तर ज्ञानक्रम जास्त सूक्ष्म व व्यापक असतो. म्हणूनच स्थूल व मर्यादित ज्ञान-अवस्था सूक्ष्म व व्यापक ज्ञानाकडून परीक्षणीय, तपासनीय आणि संशोधनीय असते. अगदी हाच दृष्टीकोन आजच्या शास्त्रीय तंत्रातसुद्धा आहे. दुसरी गोष्ट म्हणजे जैनधर्म निरर्थक क्रियाकाण्ड जसे— कोणत्या देव-देवीला प्रसन्न करण्यासाठी पूजा-पाठ, यज्ञ, होम-हवन वगैरेत विश्वास ठेवत नाही. आजच्या अ-धर्मवादी लोकांचा धर्माला जो विरोध आहे तोही ह्याच दृष्टिकोनातून. जैनधर्म यापासून प्राचीन काळापासून मुक्त आहे. कोणत्याही अ-धर्मवादाने धर्माच्या शाश्वत मूल्याचा विरोध केलेला नाही किंवा करीतही नाही. तिसरी गोष्ट— जैनधर्माने ज्याला सम्यक्चारित्र म्हटले आहे ते सुद्धा जीवनाला आवश्यक नैतिक शास्त्रीय मूल्यांचा क्रमाने स्वीकार करण्यापेक्षा निराळे काही नाही. जैनांनी अध्यात्म–विकासात जे चौदा गुणस्थान सांगितले आहेत तेसुद्धा जीवनात वरवर चढत जाताना मूल्यांच्या विकासाची प्रक्रियाच होय. मूल्यांच्या प्राप्तीचे इतके तांत्रिक सूक्ष्म तंत्र विश्वाच्या कोणत्याही धर्मात ( अपवाद बौद्धधर्म ) सहज सापडणे कठीणच आहे. आधुनिक जीवन-तत्त्वज्ञानाला जो जीवन-मूल्यांचाच चाहता आहे— जैन चारित्रिक पद्धती केव्हाही अनुकूल असली पाहिजे. ह्याशिवाय जैनधर्माला आध्यात्मिक दृष्टीने कोणतीही अलौकिक, अतीन्द्रिय सत्ता, भूत, प्रेत, देव, देवदूत, ईश्वर वगैरे महत्त्वाचे वाटत नाही. जैनधर्म मुख्यत्वे बुद्धीमान्य जीवन-पद्धतीला परिपोषक आहे. ही गोष्ट आधुनिक विचारप्रणालीच्या संदर्भात पूर्णपणे सुसंगत अशीच आहे.

ह्यावरोबरच जीवाच्या संरचनेविषयी सुद्धा जैन आणि आधुनिक मनो-जीवशास्त्रज्ञ एकाच स्तरावर येऊन विचार करतात. मनो-जीवशास्त्रज्ञ जीवाच्या संरचनेचा मनो-दैहिक ( साईको सोमेटिक ) संरचना म्हणतात. यात केवळ जीवाचे अस्तित्व त्याना मान्य नाही. जैनही धार्मिक दृष्टीने जीवाची संरचना अशाच तऱ्हेने प्रतिपादन करतात. कर्म, जैनांच्या मते, जीवाची सांसारिक अवस्थेचे नाव आहे. जीव एकीकडे भावगत ( साइको ) आणि दुसरीकडे द्रव्यगत ( सोमेटिक ) पक्षाने सहित आहे. कर्मव्यवस्थेत पूर्णतः शुद्ध जीवाचे अस्तित्व कधीही मानलेले नाही. सिद्धावस्थेत जीव पूर्णरूपाने शुद्ध असतो. परंतु व्यावहारिक दृष्टीने त्याला फारसे महत्व नाही. व्यवहार नयाने ( दृष्टीने ) जैन मनो-जीवशास्त्रांशी शंभर टक्के सहमत आहे. या पद्धतीने जीवशास्त्रज्ञ जीन्सच्या प्रयोगाने टेस्ट ट्यूबमध्ये भ्रूण-निर्मितीची शक्यता शोधत आहेत, तर जैनाना यात काही नाविन्य किंवा आश्चर्यकारक वाटत नाही. कारण जैन भ्रूण-निर्मितीत कोणत्याही अलौकिक शक्तीचे हात आहे असे मानलेलेच नाही. त्याची निर्मिती केवळ लौकिक प्रक्रियेची निष्पत्ती मात्र आहे असेच त्यांचे मत आहे. भ्रूणोत्पत्तीमध्ये संमूर्च्छन जन्म जैनांच्या दृष्टीने जीन्ससारखीच प्रक्रिया आहे. ही प्रक्रिया या नैसर्गिक क्षेत्रात काही जीवांच्या बाबतीत पूर्वीपासूनच सिद्ध झालेली आहे. मनुष्याच्या प्रयत्नानी मानवी-भ्रूणसुद्धा त्या स्थितीत येऊ शकेल. या टेस्ट ट्यूबच्या प्रक्रियेने जैनतत्त्वज्ञानाच्या वस्तुस्वभावात काहीही आक्षेप येऊ शकणार नाही.

असो, ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे की जैन दर्शनाचा तर्कावर आधारलेली बाजू आधुनिक जीवनतत्त्वाशी पूर्ण संगत आहे. ह्याबाबतीत जैन आणि आधुनिक चिंतनाचा मान-बिंदुसारखा आहे. आता विचार करण्यासारखी बाब आहे. जैनांना मान्य, त्याग आणि अहिंसेसंबंधी आहे. त्याग आधुनिक अर्थशास्त्राला अडथळा आहे आणि अहिंसा राज्यशास्त्राला विरोधक आहे ( याला अपवाद गांधीवाद आहे ) अर्थशास्त्र जास्तीत जास्त गरजा निर्माण करून त्याच्या पूर्तीचे समर्थन करीत असताना त्यागाचे समर्थन कसे होईल ! त्याचप्रमाणे गरजा भागवून मिळणारे सुख ही त्यागाने कसे प्राप्त होऊ शकेल ? त्याप्रमाणेच राज्य नीती विकास-क्रांतीची पुष्टी करून मुळातच बदल




करू इच्छिते. अशा स्थितीत अहिंसेने सामाजिक तत्त्वावर संयम कसे ठेवता येईल? अशा तन्हेने संयमन केल्याशिवाय समाजात दिशा-परिवर्तन कसे होऊ शकेल? ह्या प्रश्नासंबंधी येथे थोडा विचार झाला पाहिजे.

पहिला प्रश्न असा की, आधुनिक जीवनात त्याग ग्रहणीय आहे काय? ह्याचे विचारपूर्वक उत्तर होकारात्मकच आहे. त्याग आणि त्यागासंबंधी आणखी इतर मुद्दे जैनांच्या दृष्टीने मानसशास्त्रीय प्रक्रिया आहेत. त्यागासाठी कोणत्याही विशिष्ट वस्तूचे ग्रहण करणे किंवा सोडणे महत्त्वाचे नाही. कोणत्याही वस्तूबद्दल मानसिक ममत्व-लगाव ( मूर्छा ) च्या अभावाचेच महत्त्व आहे. थोडक्यात कोणत्याही वस्तूविषयी ममत्त्व-बुद्धीचा अभाव म्हणजेच त्याग होय. ही बौद्धिक अभिवृत्तीच मुख्य गोष्ट आहे, वस्तु दूर ठेवणे गौण बाब आहे. या अभिवृत्तीच्या द्वारेच अर्थशास्त्रास सम्मत सुख मिळू शकेल; कारण अर्थशास्त्रीय तत्त्वाला "अधिक गरजा, अधिक साधनसामुग्री अधिक सुख" हे समीकरण सम्मत आहे. परंतु ह्या समीकरणाला व्यवहारात आणण्यात एक अडचण अशी आहे की, गरजा भूमितीच्या वेगाने वाढतात ( उदा.- २ चे ४, ४ चे ८ असेच दुप्पट दुप्पट होतात ) आणि साधने वाढतात. गणित श्रेणीने ( जसे- १, २, ३, ४ आणि असेच ) ह्याचा परिणाम असा होतो की, प्रत्येक क्षणाला अतृप्त गरजांची संख्या वाढत असलेल्या साधनांना अतिशय वेगाने पराभूत करते. याप्रमाणे जितके सुख प्राप्त साधनामुळे तृप्त झालेल्या गरजातून मिळते त्याचवेळी अतृप्त गरजामुळे निर्माण झालेले दुःख किती तरी जास्त असते आणि मनुष्य ह्या सुखवादी स्पर्धेत जास्तीत जास्त दुःखच अर्जन करीत जातो. मग ह्या अर्थशास्त्रीय विचारसरणीत सुख म्हणजे केवळ मृगजलरूपच राहते. अशा परिस्थितीत त्यागवादी अभिवृत्तीनेच साधनसामुग्रीच्या तुलनेत गरजाना संतुलित केले जाऊ शकते. असे झाल्यावरच या मानसिक समतोल भूमिकेतच सुखप्राप्तीची आशा करता येईल. या त्यागाचा अर्थ सक्तीने निष्परिग्रही, निरधन व्हायचे असा नसून, ममत्व-बुद्धी अथवा मूर्छा-विरहित होणे हाच खरा अभिप्राय आहे. निर्ग्रंथ अपरिग्रही होणे ही त्यागानंतरची स्थिती आहे. या स्थितीला तपस्या म्हणतात ( वास्तविक पाहता तपस्या यापेक्षा पुष्कळच अधिक काही असते, ज्याचे विवेचन क्षेत्राभावाने येथे करता येणार नाही. ) खरे पाहिले तर वास्तविक सुख ह्यानंतरची अवस्था आहे; ते सुख धनात्मक स्थितीत होते. वर सांगितलेले समतोल अवस्थेत मिळणारे सुख म्हणजे सुखापेक्षा निकट दुःखाला फक्त थांबविणे आहे. अशा वेळी सुख दुःख समान बळ धारण करून एकमेकाच्या समोर येऊन ठाकतात. तपस्येने संयमाने गरजाची निवृत्ती होते आणि मग बाकीच्या गरजांच्या पूर्तीसाठी भरपूर साधने उपलब्ध होतात त्यानंतर रोख शिल्कीत सुखच सुख राहते. याप्रमाणे त्याग किंवा म्हणता येईल की त्यागबुद्धी आधुनिक जीवनात पूर्वीपेक्षाही जास्त प्रमाणात ग्राह्य-उपादेय अभिवृत्ती आहे.

आता दुसरा प्रश्न निर्माण होतो अहिंसेचा. जैनदृष्टीने अहिंसेचा अर्थ फक्त बाह्यदृष्टीने मारण्याचा त्याग करणे नसून ती मनोभौतिक प्रक्रिया आहे. तत्त्वार्थसूत्राचे म्हणणे; "प्रमत्तयोगात प्राणव्यपरोपणम् हिंसा" ( ७, १३ ), प्रमाद योगासहित प्राण घेण्यास हिंसा म्हणतात. या सूत्राने स्पष्ट होते की, फक्त प्राण घेण्याने हिंसा होत नाही, तर मोहबुद्धीने प्राण घेण्यास हिंसा म्हणतात. याप्रमाणे अहिंसेत सुद्धा मोह-ममत्व-बुद्धीच्या अभावाची मुख्यता आहे. ह्याचा सरळ अर्थ आहे प्रबुद्ध अभिवृत्ती. वास्तविक मारणे किंवा न मारणे हे अहिंसेत गौण आहे. सामाजिक किंवा राजकीय तत्त्वाच्या दृष्टीने क्रांती म्हणजे एक प्रबुद्ध प्रक्रिया आहे; ज्या क्रियेत गरज असेल किंवा नाइलाज झाला तर सामाजिक तत्त्वाचा विच्छेद करण्यास सुद्धा विरोध नसतो ( करणे वर्ज्य नाही ) उदाहरणार्थ न्यायाधीशाच्या खुर्चीवर बसलेली व्यक्ती अपराध्याला फाशी देणारीसुद्धा हिंसक म्हणविली जात नाही; परंतु स्वार्थी व्यक्ती, कोणाला लुटण्याची इच्छा ठेवणारा सुद्धा हिंसक होतो. असे असताना योग्य प्रकारे सिद्धान्ताप्रमाणे क्रांती प्रक्रियेला जैनदृष्टीने हिंसा कसे म्हणता येईल ? जर क्रांती खरोखरच प्रबुद्ध क्रांती असेल, तर ती नेहमीच अहिंसकच असते. म्हणून ह्या दृष्टीने सुद्धा जैनधर्म सद्यः समयानुकूलच आहे.




आता आणखी एक आधुनिक प्रश्न आहे लैंगिक-स्वैराचारासंबंधी. वास्तविक हा विषय मानसशास्त्राचा आहे. या विषयासंबंधी सुद्धा जैनांचे स्पष्ट मत आहे की रती अथवा लिंगसुद्धा इतर प्रक्रियाप्रमाणेच मनोदैहिक प्रक्रिया आहे. हीसुद्धा मनो-शारीरिक एक भूक आहे, जिला तृप्त करणे इच्छित आहे; परंतु ही तृप्ती तीव्र किंवा अतीच्या स्तराला जाऊ देता कामा नये. या संबंधात सुद्धा प्रमादी होऊन संयोग करणे प्रशंसनीय नाही आणि अंतीम अस्वास्थप्रद असते. ब्रह्मचर्य म्हणजे संयमित रती-प्रक्रियाच होय. या संयमासाठी प्रथम लग्न-संस्था मान्य केली गेली आहे. आता सध्या बदलत्या समाजात ह्या लग्न-संस्थेत काही दोष दिसत असेल तर आणखी दुसरी संस्था स्वीकारता येईल; परंतु ह्या नवीन व्यवस्थेत सुद्धा पूर्वीसारखेच संयमाला स्थान असले पाहिजे. प्लेटोने आपल्या यूटोपिया ग्रंथात अशाच स्वतंत्र सामूहिक रतीच्या पूर्ततेची सूचना दिलेली आहे, परंतु त्यानी सुद्धा ह्या व्यवस्थेचा स्वीकार एका ठरायिक सीमेपर्यंतच मानला आहे. रशियात लेनिनने लग्न-संस्था भंग केली होती, परंतु थोड्या दिवसानंतर त्याला आपला कायदा मागे घ्यावा लागला आणि लग्न-बंधन थोडेसे सैल करून स्वीकारावे लागले. जैनाचा जोर संयमावर आहे, संयमाच्या कोणत्याही विशिष्ट पद्धतीवर नाही, पद्धती पर्याय आपल्या रूपात परिवर्तन करीत असतात आणि त्यात बदल व्हायलाही पाहिजे. म्हणूनच लैंगिक-स्वच्छंदतेच्या जागी लैंगिक-संयमाचा आग्रह म्हणजे जैनाची कालातीत अथवा असामयिक मागणी आहे असे म्हणता येणार नाही.

जरा सखोल विचार केला तर लक्षात येईल की, वास्तविक जैनाचरण अशा जीवन-प्रक्रियेचे निदर्शक आहे की, ज्यामुळे जीवनाचे सर्वांगीण नैसर्गीकरण होते. मनुष्य हा निसर्गाचा एक घटकच आहे. इतर प्राण्यासारखाच मनुष्य सुद्धा निसर्गाच्या जवळ राहूनच खऱ्या अर्थाने सुखी होऊ शकतो. म्हणूनच खाणे-पिणे, राहणे-सवरणे सर्व काही जास्तीत जास्त नैसर्गिक करणे श्रेयस्कर आहे. कृत्रिम भोजन, कृत्रिम राहणे, वस्त्रालंकार सर्व काही अनैसर्गिक आहे. हे सर्व काही अधिकाधिक जाणून बुजून कशा तऱ्हेने नैसर्गिक होईल हीच जैनाचाराची मुख्य समस्या आहे. आज वाढत असलेल्या अनैसर्गिक जीवनाच्या संदर्भात जरी जैनाचारास सम्मत संयमी जीवन आणि नैसर्गीकरण कठीण व कोणा कोणाला निरर्थकही वाटते, परंतु ह्याशिवाय आधुनिकतेला इच्छित ध्येय, सुख प्राप्त होऊ शकणार नाही. म्हणूनच आधुनिकतेला जैनदृष्टी आणि जैन दृष्टीवर आधारलेले प्रबुद्ध आचरण एक अत्यंत निकडीची गरज आहे.

दोन शब्द वर्तमानकालीन लोकाबरोबर बोलले पाहिजे, जैनांनी हे लक्षात ठेवावयास पाहिजे की, ( जैनधर्म ) ( नवीन पार्श्वभूमीत ) फक्त काही स्थूल खाणे-पिणे, चालचलणुकीच्या पद्धतीचा स्वीकार केल्याने झाकला जाणार नाही किंवा देवशास्त्र गुरूची शाब्दिक प्रार्थना पूजेनेच तो वृद्धिगत होणार नाही. प्रत्येक गोष्टीत, प्रत्येक पावलागणिक स्याद्वादाच्या आधाराने नवीन पद्धती स्वीकारणे अपेक्षित आहे. स्याद्वादाची गरज आहे. आधुनिकता ही वास्तविक बाब आहे. तिचा स्वीकार करावाच लागेल. त्याचप्रमाणे जैनदृष्टी पलायनदृष्टी—पळवाट नाही. वस्तुस्थितीचा जाणीवपूर्वक बुद्धीपूर्वक व्यवस्था करणे, समजून घेणेच जैन-आचार आहे. जैन चारित्र आहे. अशी व्यवस्था व्यक्तिगत स्तरावर करून नाही चालायचे ही जाणीव सामूहिक जीवनाच्या दृष्टीकोनातून समष्टीच्या स्तरावरुन व्हायला हवी आहे. सध्याच्या काळात समूहशक्तीच्या लाभाचा विचार करणे जैनाना अतिशय आवश्यक आहे. सामूहिक प्रार्थना, सामूहिक भावना, सामूहिक व्रताचरणाचे पालन आणि एखाद्या मुख्य आचार्यांच्या आश्रयाने सामूहिक रूपाने नवीन प्रश्नाचा विचार करणे आजची फार तीव्र व परमावश्यक गरज आहे.

# जैन तत्त्वज्ञान एक सर्वोदय तीर्थ

जैन तत्त्वज्ञान हे वस्तुतत्त्वावर आधारले असल्यामुळे ज्याप्रमाणे वस्तुतत्त्व अकृत्रिम स्वतः सिद्ध, अनादि-अनंत, ध्रुव, शाश्वत आहे तसेच जैन तत्त्वज्ञान देखील अकृत्रिम स्वतः सिद्ध अनादिनिधन ध्रुव आहे.

जैन तत्त्वज्ञानाचे संस्थापक अंतिम तीर्थंकर भ. महावीर नाहीत किंवा प्रथम तीर्थंकर भ. आदिनाथ नाहीत. भ. आदिनाथाच्या अगोदर देखील अनन्त तीर्थंकर होऊन गेले. ते देखील जैनतत्त्वज्ञानाचे संस्थापक आदि प्रवर्तक नसून, स्वयं त्यांचे आराधक बनून अन्य मुमुक्षु भव्य जीवाना ते मार्गदर्शक बनले.

१) प्रत्येक वस्तूचे अस्तित्व स्वतंत्र आहे, भिन्न भिन्न आहे. प्रत्येक वस्तु आपल्या अस्तित्व शक्तीने आपले अस्तित्व जीवन जगत आहे. प्रत्येक वस्तूचे अस्तित्व स्वतःसिद्ध अकृत्रिम आहे. कोणी ईश्वर नामक अचिंत्य शक्तीने हे जग निर्माण केले नाही. प्रत्येक वस्तु ईश्वर आहे व ती आपली पर्यायसृष्टि निर्माण करण्यास स्वयं समर्थ-स्वाधीन-स्वतंत्र आहे. पराधीन-परतंत्र-अन्य ईश्वराधीन नाही.

हा वस्तु स्वातंत्र्याचा तत्वसिद्धांत प्रत्यक्ष वस्तु दर्शन घेणाऱ्या वीतराग-सर्वज्ञ तीर्थंकर देवानी जाणला. त्याचा स्वीकार केला व तोच जगातील भव्य जीवांना सांगितला. तोच जैन तत्त्वज्ञान या नावाने प्रचलित आहे.

ज्याअर्थी प्रत्येक वस्तु[1] स्वतःसिद्ध आहे त्याअर्थी प्रत्येक वस्तु अनादि, अनिधन, स्वसहाय व निर्विकल्प अखंड-अद्वैत आहे हे जैन तत्त्वज्ञानाचे चार उपसिद्धांत आहेत.

प्रत्येक वस्तूचे लक्षण सत् आहे. ते सत्[2] उत्पाद-व्यय-ध्रौव्य या तीन अंशधर्मानी युक्त आहे. अर्थात् प्रत्येक वस्तूचा द्रव्यधर्म-गुणधर्म ध्रुव-शाश्वत अपरिणमनशील आहे व वस्तूचा पर्यायधर्म-प्रतिक्षण अध्रुव-परिणमनशील आहे. प्रत्येक वस्तु अनादि-निधन आहे. असत्चा कधीही उत्पाद होत नाही. सत्चा कधीही नाश होत नाही. वस्तूचे परिणमन आपल्या शक्तिसामर्थ्याने होते. त्यासाठी वस्तूला अन्य द्रव्याच्या सहायाची अपेक्षा करावी लागत नाही. वस्तूचे प्रत्येक परिणमन वस्तूमधून उत्पन्न होते व दुसऱ्या क्षणी वस्तूमध्ये पुनः विलीन होते.

वस्तूमध्ये नवीन पर्याय उत्पन्न होतो तो वस्तूमध्ये बाहेरून येत नाही. वस्तूचा वर्तमान पर्याय जो नष्ट होतो तो वस्तूमध्येच विलीन होतो. वस्तूतून बाहेर जात नाही. वस्तु पर्यायरूपाने उत्पन्न-नष्ट होत असताना देखील वस्तूमध्ये काहीच घट-वाढ होत नाही. वस्तु जेवढीची तेवढीच अखंड-अद्वैत राहते.

समुद्रामध्ये लाटा उत्पन्न होतात व लागलीच पुनः समुद्रामध्ये विलीन होतात. समुद्र जेवढाचा तेवढाच राहतो.

प्रत्येक वस्तु अनेकान्तात्मक-उभयधर्मात्मक-सामान्य-विशेष-धर्मात्मक आहे.

वस्तूचा सामान्य धर्म-द्रव्यधर्म-गुणधर्म ध्रुवसत्-नित्य-एकरूप-अभेदरूप-सदाशुद्धरूप असतो.

वस्तूचा विशेषधर्म पर्यायधर्म अध्रुव-असत् (क्षणिकसत्) अनित्य-अनेकरूप-भेदरूप-शुद्ध-अशुद्धरूप असतो.

जैनतत्त्वज्ञानाने एकाच वस्तूमध्ये असे परस्पर विरुद्ध उभयधर्म अविरोधरूपाने-अविनाभावरूपाने सिद्ध केले आहे. अन्यदर्शनकाराना एकाच वस्तूमध्ये हे परस्पर विरोधी धर्म युगपत् कसे राहू शकतात हा कूट प्रश्न उलगला नाही. त्यामुळे त्यानी कोणत्या तरी एका अंशधर्माला परमार्थसत् मानून दुसऱ्या अंशधर्माला संवृति-माया मानून असत् मानले आहे.

---

१. तत्त्वं सल्लाक्षणिकं सन्मात्रं वा यतः स्वतः सिद्धं। तस्मादनादि निधनं स्वसहायं निर्विकल्पं च ॥ (पंचाध्यायी)

२. सद् द्रव्यलक्षणम् (तत्त्वार्थसूत्र). 'उत्पादव्ययध्रौव्ययुक्तं सत्'




जैनतत्त्वज्ञानाने कोणत्याही अन्यदर्शनकाराना सर्वथा मिथ्यावाद मानले नाही.[1] जे नयवाद वस्तूमध्ये एकच अंशधर्म परमार्थसत् मानतात व दुसऱ्या अंशधर्माचे अस्तित्व वस्तूमध्ये मानीत नाहीत अशा अन्य धर्मनिरपेक्ष एकांतवादाला मिथ्या एकांतवाद म्हटले आहे.

कारण[2] ते वस्तूमध्ये आपल्या प्रतिपक्षी धर्मांची मान्यता ठेवीत नसल्यामुळे त्याच्या अभावी ते आपल्या इष्ट अंशधर्माची देखील सिद्धि करू शकत नाहीत.

वस्तूमधील हे परस्परविरोधी धर्म एकमेकाचे विरोधक नसून परस्पराचे साधक आहेत. नित्यत्व हा धर्म अनित्यत्वाशिवाय राहू शकत नाही असा यांचा परस्पर अविनाभाव आहे.

सांख्यमतवादी वस्तूमध्ये अपरिणमनशील कूटस्थ नित्यत्व मानतात. परंतु वस्तूमध्ये प्रत्येक समयाला परिणमन होत असलेले प्रत्यक्ष प्रतीत होते. त्याला त्यानी आविर्भाव-तिरोभाव नाव ठेवून वस्तूमध्ये काहीच स्थित्यंतर होत नाही असे मानून अपरिणमनत्व स्थापन करण्याचा प्रयत्न केला. परंतु आविर्भाव होत असताना पूर्वीची अनाविर्भूत अवस्था सोडून आविर्भूत अवस्था धारण करणारे स्थित्यंतर-परिणमन मानल्याशिवाय त्यांचा आविर्भाव-तिरोभाव सिद्ध होऊ शकत नाही. यावरून कूटस्थ अपरिणमनाबरोबर आविर्भाव-तिरोभाव रूप परिणमन देखील मानणेच न्यायसंगत आहे. हे जैनतत्त्वज्ञानाने सिद्ध करून प्रत्येक वस्तु अनेकान्तात्मक-उभयधर्मात्मक मानणे हे कसे सुसंगत आहे हे सिद्ध केले आहे.

तेच एकांतवाद जर आपल्या प्रतिपक्षी धर्माची सापेक्षता ठेवीत असतील, प्रतिपक्षी धर्माचे अस्तित्व मान्य करीत असतील, तर सर्व एकांतवादांचा समन्वय म्हणजे अर्थक्रियाकारी वस्तुतत्त्व सिद्ध होते, तेच जैनतत्त्वज्ञान होय.

अनेकान्तात्मक[3] जैनतत्त्वज्ञान हे **'सर्वोदय तीर्थ'** आहे ज्यामध्ये परस्पर विरुद्ध उभय धर्मांची गुण-मुख्य व्यवस्था सुव्यवस्थित मानली आहे तेच सर्वांगपरिपूर्ण वस्तुतत्त्व विज्ञान होय. ज्या एकांतमतामध्ये प्रतिपक्ष धर्माचा सद्भाव मानला नाही, सापेक्षभाव मानला नाही ते एकांतमत वस्तूमध्ये आपल्या इष्ट तत्त्वांची देखील सिद्धि करू शकत नाही. म्हणून एकांतमताचा विषय परमार्थ वस्तु सिद्ध न होता सर्व धर्मानी रहित अशी शून्य-अपरमार्थ अवस्तु विषय बनते की, ज्यामुळे सर्व एकांतवादामध्ये परस्पर संघर्ष निर्माण होतो. ते विसंवादाचे स्थान बनतात.

परंतु जैन तत्त्वज्ञान अनेकान्त व स्याद्वाद युक्ति प्रमाणाने वस्तूमध्ये या परस्पर विरुद्ध धर्मांचा गुण्य-मुख्य रूपाने परस्पर सापेक्षभाव मान्य करीत असल्यामुळे त्यामुळे सर्व एकांतवादाचा संघर्ष-विसंवाद नाहीसा होतो. सर्व एकांतवादांचा समन्वय साधून सर्वांना आपापले सुप्रतिष्ठित मानाचे स्थान देतो, वस्तूमध्ये सर्व अंशाचे अस्तित्व स्थापित करतो म्हणून जैन तत्त्वज्ञान हे वास्तविक सर्वोदय तीर्थ आहे.

जैन तत्त्वज्ञानाच्या या सर्वोदय तीर्थामध्ये सर्व एकांतवादाना मानाचे स्थान प्राप्त होते.

जैन तत्त्वज्ञानाने सांख्यांचा कूटस्थ नित्यवादही मान्य केला आहे. प्रत्येक वस्तु आपल्या द्रव्य-धर्म-गुणधर्म रूपाने सदा कूटस्थ नित्यच आहे. ध्रुव-शाश्वत-अपरिणमन शील आहे. वस्तूच्या द्रव्य-गुणधर्मामध्ये कधीही स्थित्यंतर-द्रव्यांतर किंवा गुणांतर होत नाही. एक द्रव्य दुसऱ्या द्रव्य स्वरूप होत नाही. एक गुण दुसऱ्या गुणरूप होत नाही.

---

१. निरपेक्षा नया मिथ्या, सापेक्षा वस्तु तेऽर्थकृत् ॥

२. स्ववैरिणः ते, परवैरित्वात् ॥

३. सर्वान्तवत् तद्गुण मुख्य कल्प, सर्वान्तशून्य च मिथोऽनपेक्ष । सर्वापदामन्तकरं निरन्तं सर्वोदयं तीर्थमिदं तवैव ॥
( युक्त्यनुशासन )




परंतु जैनतत्त्वज्ञानाचा हा कूटस्थनित्यपणा अनित्यत्व-सापेक्ष मानलेला आहे. पर्यायधर्मरूपाने वस्तूमध्ये व वस्तूच्या प्रत्येक गुणामध्ये स्थित्यंतर परिणमन प्रतिक्षण होत आहे. नित्यत्वाशिवाय परिणमन होऊ शकत नाही व परिणमनाशिवाय नित्यत्व राहू शकत नाही असा परस्पर सापेक्षभाव मानला आहे. त्यातच वस्तूची सर्वांगता व परिपूर्णता आहे. याप्रमाणे वस्तुस्वरूपाचे यथार्थ ज्ञान करून देणारे जैनतत्त्वज्ञान वास्तविक सर्वोदय तीर्थ आहे.

जैन तत्त्वज्ञानाने खऱ्या अर्थाने ईश्वरसृष्टि कर्तृत्ववाद देखील वस्तुनिष्ठ मानला आहे. परंतु ईश्वरवादी जसा अन्य (कल्पित) ईश्वर मानतात, ईश्वराच्या आधीन जगाचे कर्तृत्व मानून जगाला पराधीन-परतंत्र बनविण्याचा-दु:खाचा मार्ग दाखवितात तसा ईश्वर कर्तृत्ववाद मानला नसून वस्तूच्या स्वातंत्र्यवादात खरा ईश्वरसृष्टि कर्तृत्ववाद कसा सामावलेला आहे हे अनेकान्त-स्याद्वाद युक्ति प्रमाणाने सिद्ध केले आहे.

प्रत्येक वस्तु ईश्वर आहे व ती आपली पर्याय सृष्टी उत्पन्न करण्यास स्वयं समर्थ आहे, स्वाधीन-स्वतंत्र आहे, पराधीन-परतंत्र नाही हा खरा ईश्वरसृष्टि कर्तृत्ववाद जैनतत्त्वज्ञानाने वस्तुनिष्ठ मानला आहे.

जैनतत्त्वज्ञानाने ब्रह्माद्वैतवाद देखील वस्तुनिष्ठ मानला आहे. प्रत्येक वस्तु आपल्या सत्‌ब्रह्माने युक्त आहे. प्रत्येकाचे अस्तित्वब्रह्म भिन्न-भिन्न स्वतंत्र असून अद्वैत आहे, अखंड आहे, परद्वैत सापेक्ष नाही. तथापि प्रत्येक वस्तु-अद्वैत आपल्या अनंत-गुण-पर्याय-द्वैतांनी सापेक्ष-युक्त आहे. द्वैतनिरपेक्ष अद्वैतवाद हा वस्तुनिष्ठ नसून अवस्तुरूप आहे. द्वैतसापेक्ष अद्वैतवाद हा वस्तुनिष्ठ आहे.

बौद्धमताचा क्षणिकवाद देखील जैनतत्त्वज्ञानाने वस्तुनिष्ठ मानला आहे. पर्याय धर्मरूपाने प्रत्येक वस्तु प्रतिक्षण परिणमनशील आहे. वस्तूमध्ये पूर्वपर्याय नष्ट होतो व नवीन पर्याय उत्पन्न होतो. परंतु हा क्षणभंगवाद बौद्धांनी जसा निरन्वय उत्पाद-नाशरूप मानला तो वस्तुनिष्ठ-सुसंगत नसून सान्वय-द्रव्यान्वयसहित क्षणभंगवाद हा वस्तुनिष्ठ व सुसंगत आहे हे जैनतत्त्वज्ञानाने सिद्ध केले आहे.

नैयायिक व वैशेषिक मताचा विशेषतत्त्ववाद, द्वैतवाद व त्यामधील समवाय संबंधवाद हा देखील जैनतत्त्वज्ञानाने वस्तुनिष्ठ मानला आहे. परंतु अद्वैतनिरपेक्ष द्वैतवाद हा वस्तुनिष्ठ सुसंगत नसून अद्वैतसापेक्ष द्वैतवाद हा वस्तुनिष्ठ मानला आहे.

प्रत्येक वस्तुसत् अद्वैत आहे, अखंड आहे. त्यामध्ये जे गुणविशेष व पर्यायविशेष द्वैतरूप आहेत ते *भिन्न-भिन्न स्वतंत्रसत् नसून एकाच अद्वैतसत्‌चा तो विस्तार आहे.*

याप्रमाणे सर्व मतांचे मूळ उगमस्थान वस्तुनिष्ठ जैनतत्त्वज्ञान आहे. जैनतत्त्वज्ञान हे सर्व अन्यमतांचे माहेरघर आहे. म्हणून जैनतत्त्वज्ञान हे सर्वोदय तीर्थ आहे.

जैनदर्शनाने सर्व मतांची मान्यता विशिष्ट-नय युक्तिप्रमाणाने वस्तुनिष्ठ मानली आहे. वस्तूमधील सर्व अंशधर्मांची स्याद्वाद पद्धतीने सुसंगति सिद्ध केली आहे. सर्वमतामध्ये समन्वय साधून सहमतवाद स्थापन केला आहे. जैनतत्त्वज्ञानाने सर्वमतामध्ये ऐक्य निर्माण केले त्यामुळे जैनतत्त्वज्ञान हे सर्वोदय तीर्थ आहे.

याप्रमाणे जैनतत्त्वज्ञान हे मूळ वस्तुतत्त्व सिद्धांतावर आधारलेले आहे. मूळ वस्तुतत्त्वाचे यथार्थ मार्गदर्शन करणारे आहे म्हणून ते सत्य व शाश्वत आहे.

'सत्यं शिवं सुन्दरं' जे वस्तूचे ध्रुव स्वरूप असते ते सत्य-परमार्थ असते. त्याचा आश्रय कल्याणकारी-शिवप्रद असतो. आपल्या मूळ स्वरूपात स्थिर राहणे यातच वस्तूचे खरे सौंदर्य खरी शोभा आहे.

संपूर्ण विश्व हे स्वत:सिद्ध बनलेले आहे, अकृत्रिम आहे, निसर्गसिद्ध आहे. ते कोणी बनविले नाही. त्याला कोणी बनवू शकत नाही.





विश्वातील सर्व पदार्थ एक महासत् सामान्य अपेक्षेने आपल्या ज्ञानचक्षूमध्ये युगपत् प्रतिभासित होतात. त्यावेळी हे ज्ञेयसत् व हे ज्ञानसत् असा देखील द्वैतपणाचा भेद राहात नाही. त्या अद्वैत महासत् सामान्याला ब्रह्माद्वैतवादी एक ब्रह्मसत् म्हणतात. ते देखील सत्सामान्य नय दृष्टीने परमार्थसत् आहे. सर्व पदार्थांची सत्ता समान आहे, स्वतंत्र आहे. कोणाची सत्ता दुसऱ्या पदार्थाच्या सत्तेवर अवलंबून नाही. प्रत्येक पदार्थ आपल्या अस्तित्व शक्तीने आपले स्वतंत्र अस्तित्व जीवन जगत आहे. सर्व पदार्थांची सत्ता समान आहे. कोणी कोणाचे कारण नाही व कोणी कोणाचे कार्य नाही. प्रत्येक पदार्थाची सत्ता स्वयं निर्मित आहे. सर्व सत् पदार्थ स्वयं ईश्वर आहेत. कोणी उच्च-नीच नाहीत. कोणी हीन-दीन नाहीत. कोणी अधिक श्रेष्ठ नाहीत. कोणी अगोदर कोणी मागाहून असा कालभेदही त्यांचेमध्ये नाही. अशी विश्वातील सर्व पदार्थांच्या सत्तेविषयी समानदृष्टी-उच्चपातळी तिला एक महासत् सामान्य-एक ब्रह्माद्वैत सत् म्हटले आहे. हा ब्रह्माद्वैतचा खरा अभिप्राय आहे.

संपूर्ण विश्वाकडे-विश्वातील सर्व पदार्थांकडे अशा एक महासत् सामान्य दृष्टीने-एक ब्रह्माद्वैतसत् रूपाने उच्च पातळीने पाहणे यालाच निर्विकल्प ज्ञानब्रह्माद्वैत म्हटले आहे. यातच अखिल ज्ञेयब्रह्माचे व अखिल ज्ञानब्रह्माचे खरे सौंदर्य भरले आहे. संपूर्ण विश्वाकडे एक महासत् सामान्य रूपाने पाहणारी, ही अभेद-निर्विकल्प दृष्टी शांती सुख देणारी आहे.

याचे उलट विश्वातील प्रत्येक पदार्थाकडे भिन्न-भिन्न सत्‌ला भेद रूपाने पाहणारी द्वैतरूपाने पाहणारी भेददृष्टी-विकल्पदृष्टी, उच्च-नीच रूपाने पाहणारी हीनपातळीची दृष्टी अशांति-दुःख उत्पन्न करणारी आहे.

विश्वाला एक महासत् सामान्य रूपाने उच्च पातळीवरून पाहण्याच्या अपेक्षेने जरी एक महासत्-एक ज्ञेयब्रह्मसत् म्हटले तथापि विश्व एक वस्तुसत्, असे केवळ अद्वैतब्रह्मसत् नाही. ते द्वैतनिरपेक्ष नाही, द्वैतसापेक्ष आहे. सामान्य हा शब्दप्रयोग स्वयं आपल्या प्रतिपक्षी विशेष धर्माचीअपेक्षा-सिद्धी करणारा आहे. अद्वैत हा शब्द द्वैतसापेक्षत्व दाखविणारा आहे. जगात जर द्वैतत्व वस्तुनिष्ठ नसते तर त्याला अद्वैत विशेषण देखील देण्याचे काय प्रयोजन ? द्वैतत्व वस्तुनिष्ठ मानल्याशिवाय अद्वैत हा शब्दप्रयोग आपले अद्वैतत्वच सिद्ध करू शकत नाही. द्वैतामध्ये राहणारे अद्वैतच आपले अद्वैतत्व सिद्ध करण्यास समर्थ होऊ शकते.

अद्वैतसत्‌ला सामान्यसत् व द्वैतसत्‌ला विशेषसत् ही दुसरी संज्ञा आहे. 'अशेषविशेषनिष्ठं हि सामान्यं' जे आपल्या संपूर्ण विशेषामध्ये व्यापून असते त्यालाच सामान्य म्हणतात. 'विशेष निरपेक्षं सामान्यं खपुष्पवत्' विशेष विरहित सामान्य हे आकाशपुष्पाप्रमाणे असत् म्हटले जाते.

यावरून विश्व हे एक वस्तुसत् केवळ अद्वैतरूप नसून द्वैतरूप अनेक वस्तुसत्-विशेषांच्या समूहालाच विश्व ( महासत् सामान्य ) असे एक समुच्चय दर्शक नाव दिले आहे.

विश्वातील प्रत्येक पदार्थ स्वतंत्र भिन्न भिन्न सत् आहे स्वयं निर्मित अकृत्रिम आहे. स्वयं ईश्वर आहे, स्वयं सत् स्वरूप आहे, स्वाधीन-स्वतंत्र आहे. पराधीन-परतंत्र नाही. एका पदार्थसत्‌चा दुसऱ्या पदार्थसत्‌मध्ये अत्यंत अभाव आहे. एका सत्‌चा दुसऱ्या सत्‌मध्ये प्रवेश होऊ शकत नाही. एक सत् दुसऱ्या सत्‌चे कारण नाही एक सत् दुसऱ्या सत्‌चे कार्य नाही. अन्य अचिन्त्य ईश्वर नामक शक्ति मानून त्याचे आधीन विश्वाची सृष्टि-स्थिति-लय मानणे हा खरा ईश्वर कर्तृत्ववाद नसून प्रत्येक वस्तु स्वयं ईश्वर आहे. प्रत्येक वस्तु ईश्वर आहे. तो आपली पर्यायसृष्टि निर्माण करण्यास स्वयमेव समर्थ आहे, स्वाधीन-स्वतंत्र आहे, पराधीन-परतंत्र नाही.हा खरा ईश्वर कर्तृत्ववाद आहे.

तत्त्वं सल्लाक्षणिकं सन्मात्रं वा यतः स्वतः सिद्ध । तस्मादनादि निधनं स्वसहायं निर्विकल्पं च ॥




प्रत्येक वस्तूचे स्वतंत्र अस्तित्व हे त्याचे स्वत:सिद्ध लक्षण आहे. प्रत्येक वस्तु आपल्या अस्तित्व शक्तीने आपले स्वतंत्र अस्तित्व जीवन जगत आहे. ज्याअर्थी प्रत्येक वस्तु स्वत:सिद्ध अकृत्रिम आहे त्याअर्थी ती ध्रुव, अनादि निधन आहे. असत्‌चा कधीही उत्पाद होत नाही. सत्‌चा कधीही नाश होत नाही.

वस्तूमध्ये जो परिणमनपणा दिसून येतो तो त्याच्या आकारामध्ये, त्याच्या पर्यायामध्ये दिसून येतो. वस्तु पर्याय अपेक्षेने परिणमनशील व द्रव्यधर्म-गुणधर्म अपेक्षेने ध्रुव शाश्वत अपरिणमनशील असे वस्तूचे विचित्र परस्पर विरुद्ध उभयधर्मात्मक अनेकान्तात्मक स्वरूप आहे.

वस्तूचे पर्यायरूपाने परिणमन आपल्या स्वद्रव्य शक्तिसामर्थ्याने होते. म्हणून वस्तु स्वसहाय आहे. परसहाय सापेक्ष अन्य ईश्वराधीन-पराधीन-परतंत्र नाही. यद्यपि वस्तूचे परिणमन होताना तदनुकूल निमित्तभूत अन्य पदार्थाचा संयोग हा आवश्यक असतो. तथापि तो निमित्तमात्र असतो. उपादानवस्तु आपले परिणमन आपल्या शक्तिसामर्थ्याने आपल्या प्रदेशक्षेत्रमर्यादेमध्ये करते. त्यावेळी निमित्तभूत अन्य वस्तु आपले परिणमन कार्य आपल्या प्रदेशक्षेत्र मर्यादेमध्ये करते. एक वस्तु आपल्या प्रदेशक्षेत्र मर्यादा ओलांडून अन्य वस्तूच्या प्रदेशक्षेत्रामध्ये प्रवेश, अतिक्रमण करून अन्य द्रव्याच्या परिणमन कार्यामध्ये किंचित् मात्र देखील सहकार्य करू शकत नाही. दोन्ही पदार्थ आपापली अर्थक्रिया आपापल्या प्रदेशक्षेत्रामध्ये समानकाली करीत असतात. त्यावेळी त्यांचा सहज निमित्त-नैमित्तिक संबंध लोकव्यवहारामध्ये उपचाराने म्हटला जातो. त्याशिवाय लोकव्यवहार चालत नाही.

लोकव्यवहार चालण्यासाठी प्रयोजनवश कुंभकाराने घट बनविला असे आपण म्हणतो. तसे उपचाराने लोकव्यवहारभाषेने म्हणणे चुकीचे-मिथ्या नाही, पण तात्त्विक दृष्टीने तसे समजणे किंवा मानणे ही तत्त्वसिद्धाताची भूल आहे, ती मिथ्यामान्यता आहे.

कुंभकार घट करण्याची बुद्धि इच्छा करतो व तदनुकूल आपले हातपाय हालविण्याचा प्रयत्नही करतो. पण त्याचे सर्व व्यापार आपल्या क्षेत्र मर्यादेतच होतात. घटाच्या क्षेत्रमर्यादेत तो प्रवेश करू शकत नाही. घटरूप परिणमण्याचे कार्य माती आपल्या स्वयंसिद्ध शक्तिसामर्थ्याने कुंभकाराच्या बुद्धि-इच्छा-प्रयत्न यांच्या सानिध्यात, संयोगात स्वयमेव करते असा वस्तूचा वस्तुगत स्वत:सिद्ध स्वभाव आहे.

स्थूलदृष्टीने-व्यवहारदृष्टीने कुंभकाराने घट बनविला असे आपणास वाटते व तसा लोकव्यवहारही होतो पण वास्तविक सूक्ष्म तात्त्विक दृष्टीने विचार केला तर कुंभकार व माती दोन्ही आपापल्या क्षेत्रमर्यादेत आपापले काम करतात. अशा वेळी त्यांचा परस्पर निमित्त-नैमित्तिक संबंध सहजगत्या घडून येतो.

तसेच वस्तूचे पर्यायरूपाने परिणमन होत असताना वस्तूचा नवीन पर्याय वस्तूमधूनच उत्पन्न होतो व दुसऱ्या क्षणी तो वस्तूमध्येच विलीन होतो. वस्तु सदैव अखंड-परिपूर्णच असते. पूर्वपर्याय नष्ट होतो तो वस्तूतून बाहेर जात नाही. वस्तूमध्ये घट होत नाही. किंवा नवीन पर्याय उत्पन्न होतो तो वस्तूमध्ये बाहेरून येत नाही. वस्तूमध्ये वाढ होत नाही.

समुद्राच्या पाण्यामध्ये लाट उत्पन्न होते व ती समुद्राच्या पाण्यातच पुन: विलीन होऊन जाते. त्याप्रमाणे वस्तूमधील प्रत्येक पर्याय वस्तूमधूनच उत्पन्न होतो व दुसऱ्या क्षणी वस्तूमध्येच विलीन होतो. याप्रमाणे पर्यायरूपाने परिणमन होत असताना देखील द्रव्य सदैव अखंड परिपूर्णच असते.

'भूतानागतवर्तमानपर्यायाणां अविभ्राड्भावसंबंधो द्रव्य' सर्व भूत-भविष्य-वर्तमान त्रिकालवर्ती पर्यायांचा अभिन्न-अखंड पिंड त्याला द्रव्य म्हटले आहे. प्रत्येक वस्तु अद्वैत-अखंड आहे, स्वाधीन-स्वतंत्र आहे. प्रत्येक वस्तूचे अस्तित्व समान आहे. याप्रमाणे वस्तूचा साम्यवाद व स्वातंत्र्यवाद स्थापन करणे हा जैनतत्त्वज्ञानाचा प्राण आहे. हे जैनतत्वज्ञानाचे वैशिष्ट्य आहे.




हा वस्तूचा साम्यवाद व स्वातंत्र्यवाद हाच खरा अहिंसावाद होय. केवळ दुसऱ्या जीवास मारणे, दुसऱ्याच्या प्राणांचा घात करणे ही तर स्थूलदृष्टीने हिंसाच म्हटली जाते. परन्तु दुसऱ्या वस्तुसत्तेला हीन समजणे व आपणाला श्रेष्ठ समजणे हा विषमभाव व दुसऱ्या वस्तुसत्तेवर आपले प्रभुत्व-स्वामित्व गाजविणे हा पारतंत्र्यवाद ही खरी हिंसा आहे. वस्तुतत्त्वाविषयी ही मिथ्यामान्यता-मिथ्यात्व हे महापाप आहे.

या मिथ्यात्व महापापातूनच हिंसा-असत्य-चोरी-कुशील व परिग्रह या पंचपापाची उत्पत्ति होते. जेथे परिग्रह आहे, परपदार्थाविषयी मूर्च्छा-ममत्वभाव आहे, परपदार्थावर प्रभुत्व-स्वामित्व गाजविण्याची मोठी वृद्धि आहे, तेथे हिंसा आहे.

देश-देशामध्ये, मानवा-मानवामध्ये, पिता-पुत्रामध्ये, बंधू-बंधूमध्ये जो संघर्ष-वाद निर्माण होतो त्याचे मूळ कारण हा विषमवाद, हा पारतंत्र्यवाद-परिग्रहाविषयी-अन्यपदार्थाविषयी ती मोठी प्रभुत्व-स्वामित्व वृद्धि हे प्रमुख कारण आहे. हा विषमवाद-पारतंत्र्यवाद-परिग्रहाविषयी एकत्व-ममत्व वृद्धि हेच अशांति-दुःखाचे कारण आहे.

याचे उलट साम्यवाद-स्वातंत्र्यवाद-अहिंसावाद-अपरिग्रहवाद हाच शांति-सुखाचे कारण आहे.

अहिंसा भूतानां जगति विदितं ब्रह्म परमं । न सा तत्रारंभोऽस्त्यणुरपि च यत्राश्रमविधौ ॥
ततस्तत् सिद्धार्थं परमकरुणो ग्रंथमुभयं । भवानेवात्याक्षीत् न च विकृतवेषोपधिरतः ॥

अहिंसा अर्थात् प्रत्येक प्राणीमात्राने, एवढेच नव्हे जगातील प्रत्येक वस्तुसत्तेने आपले स्वतंत्र अस्तित्व जीवन जगणे हे जगातील सर्व प्राणीमात्रांचे व सर्व पदार्थांचे परम ब्रह्मसत् आहे. मग तो गृहस्थांचा गृहस्थाश्रम असो, किंवा मुनीचा संन्यासाश्रम असो जेथे अणुमात्र पापारंभ व परिग्रह भाव-विषमभाव-पारतंत्र्यभाव आहे तेथे अहिंसेचे यथार्थ पालन होऊ शकत नाही. जेथे परिग्रह व आरंभ तेथे हिंसा अशांति-दुःख, जेथे अपरिग्रहवाद-साम्यवाद-स्वातंत्र्यवाद तेथेच अहिंसा-शांति-सुख.

यासाठी हे भगवन् आपण परम करुणाभाव धारण करून सर्व आरंभ-परिग्रहाचा त्याग करून मोह-राग-द्वेष-कामादि विकार भावाचा त्याग करून परम वीतराग-नग्न दिगंबर रूप धारण केले.

जैनसिद्धांताने आपले इष्ट दैवत म्हणून जो उच्च आदर्श समोर ठेवला आहे त्या इष्ट दैवताची मूर्ति वीतराग नग्न दिगंबर-आत्मध्यानस्थ मूर्तीचाच जो आदर्श समोर ठेवला आहे, तो वस्तुतत्त्व सिद्धांताचे यथार्थ मार्गदर्शन करणारा आहे.

आत्मतत्त्वाचे यथार्थ स्वरूप सर्व आरंभ-परिग्रहाने रहित राग-द्वेषादि सर्व विकार भावानी रहित वीतराग शुद्ध-ज्ञानदर्शन स्वरूप आहे याची यथार्थ जाणीव करून घेऊन त्यावर दृढ श्रद्धा ठेवून त्यात अविचल स्थिरवृत्ति ठेवणे हाच परमात्मा बनण्याचा राजमार्ग आहे.

ईश्वर-परमात्मा बनण्याचा अधिकार योग्यता प्रत्येक प्राणीमात्रात आहे. प्रत्येक आत्मा हा परमात्मा बनू शकतो. हा साम्यवाद-स्वातंत्र्यवाद जैनसिद्धांताने प्रस्थापित केला आहे. म्हणून जैनसिद्धांत हा विशिष्ट व्यक्तीचा, विशिष्ट जातीचा, विशिष्ट पथाचा नसून सर्व प्राणीमात्रांना यथार्थ मार्गदर्शन करणारा आहे, सर्व प्राणीमात्रांना शांति-सुखाचा मार्ग दाखविणारा आहे म्हणून जैनदर्शन हे सर्व प्राणीमात्राचे सर्वोदय तीर्थ आहे.

सर्वेऽपि सुखिनः सन्तु, सर्वे सन्तु निरामयाः । सर्वे भद्राणि पश्यन्तु, मा कश्चित् दुःखभाक् भवेत् ॥

ॐ शांतिः, शांतिः, शांतिः

# विश्व रचना व द्रव्य व्यवस्था

जैनदर्शनाने संपूर्ण विश्व स्वतःसिद्ध अकृत्रिम अनादिनिधन मानले आहे. विश्वातील सर्व पदार्थांना सहा प्रकारच्या द्रव्य जातीमध्ये समाविष्ट केले आहे. १) जीव, २) पुद्गल, ३) धर्म, ४) अधर्म, ५) आकाश, ६) काल. या सहा प्रकारच्या द्रव्यांच्या समूहाला विश्व म्हणतात.

या सहा प्रकारच्या द्रव्यापैकी आकाश एक सर्वव्यापी महान् द्रव्य आहे. आकाशाच्या मध्यभागी जेवढ्या *भागामध्ये ही सहा प्रकारची द्रव्ये राहतात त्या भागास लोकाकाश म्हणतात. त्यालाच* 'विश्व' हे नाव दिले आहे.

या सहा प्रकारच्या द्रव्यांचे लक्षण-संख्या-प्रदेश-अवगाह-परस्पर उपकार रूप कार्य इत्यादी रूपाने जैनदर्शनाने या द्रव्य व्यवस्थेचा विस्ताररूपाने विचार केला आहे.

या विश्वामध्ये ही सहा प्रकारची द्रव्ये एक क्षेत्रावगाह रूपाने एकत्र वास करीत आहेत. तथापि त्यांचे लक्षण त्यांचा स्वभाव त्यांचे स्व-प्रदेश क्षेत्र त्यांचे विशिष्ट कार्य हे भिन्न भिन्न आहेत. प्रत्येक द्रव्याचे अस्तित्व भिन्न भिन्न आहे. प्रत्येक द्रव्य आपल्या स्वतंत्र अस्तित्व शक्तीने आपले अस्तित्व जीवन जगत आहे व प्रत्येक द्रव्य आपापल्या वस्तुत्व शक्तीने आपापले भिन्न भिन्न अर्थक्रियाकारित्व कार्य करीत आहे.

## लक्षणभेद

प्रत्येक द्रव्याचे लक्षण भिन्न भिन्न आहे.

**१) जीव द्रव्याचे लक्षण–** चैतन्य, शुद्ध-ज्ञानदर्शन, केवळ जाणणे-पाहणे हे जीवाचे स्वलक्षण आहे.[1]

[2]आत्मा स्वयं ज्ञान स्वरूप आहे. जाणणे-पाहणे हाच जीवाचा स्वभाव आहे. हे जीवाचे वस्तुत्व आहे. हीच जीवाची अर्थ क्रिया (पुरुषार्थ) आहे. या शिवाय जीव दुसरे कांहीही करीत नाही व करू शकत नाही. तथापि मी खातो, मी पितो, मी बोलतो, मी चालतो, मी बसतो, मी राग करतो, मी द्वेष करतो, मी दुसऱ्यास मारतो, मी दुसऱ्याचे रक्षण करतो हे सर्व जीवाचे लक्षण विरुद्ध कार्य आहे. हे जीवाचे स्वभाव कार्य नाही. परभाव कार्य आहे. हे पराचे, जड शरीराचे, रागादि परभावाचे, अज्ञान भावाचे कार्य आहे. त्यांचा कर्ता मी आहे असे समजणे-मानणे हा व्यवहारी अज्ञजनांचा मोह भाव आहे. अज्ञान भ्रम आहे. मन-वचन-कायेच्या द्वारे कोणतीही पाप-पुण्यरूप क्रिया करणे हा जीवाचा स्वभाव नाही. हे जीवाचे परमार्थ लक्षण नाही. ते लक्षणविरुद्ध विभाव कार्य - विपरीत कार्य आहे.

*या लक्षणाविरुद्ध कार्याला आपला स्वभाव समजणे हे स्वभावाचे अज्ञानच संसार भ्रमणाचे मूळ कारण* आहे.

**२) पुद्गल[3] द्रव्याचे लक्षण–** स्पर्श-रस-गंध-वर्ण यानी युक्त असणे हे पुद्गल द्रव्याचे लक्षण आहे. पुद्गल द्रव्य अचेतन-जड आहे. ते केवळ ज्ञेय जाणण्यायोग्य आहे. पुद्गल द्रव्याविषयी केवळ ज्ञेयबुद्धि न ठेवता ज्ञाता दृष्टारूप उदासीन-वीतराग भाव न ठेवता त्याविषयी खोटी इष्ट-अनिष्ट कल्पना करून इष्ट पदार्थाविषयी अनुराग-प्रेम व अनिष्ट पदार्थाविषयी द्वेष-अप्रीति-किळस करणे हे ज्ञेय पदार्थाचे अयथार्थ विपरीत ज्ञान आहे. ज्ञेयरूप बाह्य पदार्थाविषयी हेय-उपादेय बुद्धि ठेवणे, बाह्य पदार्थांच्या त्यागात धर्म समजणे हे ज्ञेय पदार्थाचे *विपरीत वस्तुविज्ञान आहे.*

---

१. चेतनालक्षणो जीव.। उपयोगो लक्षण ॥ (तत्वार्थसूत्र)

२. आत्मा ज्ञानं स्वयं ज्ञान, ज्ञानात् अन्यत् करोति किं । परभावस्य कर्तात्मा मोहोऽयं व्यवहारिणा ॥ (समयसार कलश)

३. स्पर्शरसगंधवर्णवन्तः पुद्गलाः । (तत्वार्थसूत्र)




१) स्पर्शनेंद्रियाच्या द्वारे मऊ पदार्थाचा स्पर्श करण्याची इच्छा करणे.
२) रसनेंद्रियाच्या द्वारे गोड पदार्थ खाण्याची इच्छा करणे.
३) घ्राणेंद्रियाच्या द्वारे सुगंधित पदार्थांचा सुवास घेण्याची इच्छा करणे.
४) चक्षुरिंद्रियाच्या द्वारे सुंदर चित्र-सिनेमा-नाटक पाहण्याची इच्छा करणे.
५) कर्णेंद्रियाच्या द्वारे मधुर गीत, प्रेमाचे गोड शब्द ऐकण्याची इच्छा करणे.
६) मनाच्या द्वारे दुसऱ्याचे चांगले-वाईट व्हावे असे चिंतवन करणे.

याप्रमाणे वर्णादिक पदार्थांना व रागद्वेषादिक परभावांना आपला स्वभाव समजणे हे सर्व पुद्गल पदार्थांचे विपरीत ज्ञान आहे.

ज्याप्रमाणे हे जड अचेतन पदार्थ आपला स्वभाव सोडत नाहीत निरंतर आपल्या स्वभावात असतात हे पाहून त्यांचेप्रमाणे आपणही आपल्या ज्ञाता-द्रष्टा स्वभावात लीन होणे, त्या ज्ञेय पदार्थांविषयी राग-द्वेष न करणे, वीतराग ज्ञान उदासीन भाव ठेवणे हे पुद्गल पदार्थाचे सम्यक् वस्तुविज्ञान आहे.

३) धर्मद्रव्याचे[1] लक्षण– गति हेतुत्व वगैरे. गमन करण्यास उद्युक्त, जीव-पुद्गलांना गमन करण्यास निमित्तमात्र जे सहकारी होते त्यास धर्मद्रव्य म्हणतात. जसे– पाणी मत्स्यांना (मासे) चालण्यास सहकारी होते. परंतु जे गमन करण्यास उद्युक्त नाहीत त्यांना बलात् गमन करण्यास लावीत नाही.

४) अधर्म द्रव्याचे[2] लक्षण– स्थिति हेतुत्व वगैरे. स्थिर राहण्यास उद्युक्त, जीव-पुद्गलांना जे स्थिर राहण्यास सहकारी होते त्यास अधर्म द्रव्य म्हणतात. जसे– छाया वाटसरूस विश्रांती घेण्यास सहकारी होते. गमन करणाऱ्यास ते बलात् धरून ठेवीत नाही.

५) आकाश द्रव्याचे[3] लक्षण– अवगाहन हेतुत्व वगैरे. जे द्रव्य जीवादिक सर्व द्रव्यांना अवगाह देण्यास-राहण्यास, अवकाश देण्यास सहकारी होते त्यास आकाश द्रव्य म्हणतात.

६) काल द्रव्याचे[4] लक्षण– परिणमन हेतुत्व वगैरे. जे द्रव्य जीवादिक सर्व द्रव्यांना प्रतिसमय परिणमन करण्यास सहकारी होते ते कालद्रव्य होय. याचे १) निश्चय काल, २) व्यवहार काल असे दोन प्रकाराने वर्णन केले आहे.

१) निश्चय काल– लोकाकाशाच्या प्रत्येक प्रदेशावर एक-एक कालाणु द्रव्य स्थित आहेत ते सर्व असंख्यात कालाणु निश्चय काल द्रव्य होत.

२) व्यवहार काल– नित्य गतिमान सूर्य-चंद्र-नक्षत्र वगैरे ज्योतिष देवांच्या गतीवरून जो घटी-पळे-मुहूर्त-दिवस-पक्ष-महिना-वर्ष वगैरे काल लोक व्यवहारात प्रचलित आहे त्यास व्यवहारकाल म्हणतात. निश्चयकालाप्रमाणे हा व्यवहारकाल कालद्रव्य नाही. किंवा काल द्रव्याचा पर्याय देखील नाही. या व्यवहारकाला-वरून लोकव्यवहारात कालाचा बोध होतो म्हणून उपचारनयाने याला काल म्हटले आहे.

या व्यवहार कालाच्या सर्वात सूक्ष्म कालाला 'समय[5]' हे नाव दिले आहे. पुद्गल परमाणु अत्यंत मंदगतीने दुसऱ्या परमाणूस ओलांडून जाण्यास जो काळ लागतो, त्याला समय म्हणतात. त्याच एका समयात तोच पुद्गल परमाणु तीव्र गतीने १४ राजू गमन करू शकतो.

१. गइ परिणयाण धम्मो पुग्गल जीवाण गमण सहयारी । तोयं जह मच्छाण, अच्छंता णेव सो णेई ॥ (द्रव्यसंग्रह)
२ ठाणजुदाण अधम्मो पुग्गल जीवाण ठाण सहयारी । छाया जह पहियाणं गच्छंता णेव सो धरई ॥ (द्रव्यसंग्रह)
३. अवगासदाण जोग्गं जीवादीणं वियाण आयासं । जेण्हं लोगागासमल्लोगागासमिदि दुविहं ॥ (द्रव्यसंग्रह)
४ दव्वपरिवट्टरूवो जो सो कालो हवेइ ववहारो । परिणामादीलक्खो वट्टणलक्खो य परमट्ठो ॥
५ णभएयपयसत्थो परमाणु मंदगइ पवट्टंतो । बीयमणंतरखेत्तं जावदियं जादि तं समयकालो ॥



## संख्या भेद

संख्येच्या अपेक्षेने सहा द्रव्यामध्ये विभिन्नता आहे.

१) जीव द्रव्य अनंतानंत आहेत.
२) पुद्गल द्रव्य जीवद्रव्यराशीच्या अनंतपट आहेत.
३) धर्म द्रव्य. ४) अधर्म द्रव्य. ५) आकाश द्रव्य प्रत्येकी एक एक आहे.
६) काल द्रव्य असंख्यात आहेत.

## प्रदेश भेद

१) प्रत्येक जीव द्रव्याचे[1] लोकाकाशप्रमाण असंख्यात प्रदेश आहेत.
२) पुद्गल परमाणु १ प्रदेशी आहे. परंतु तो स्कंधरूपाने बहुप्रदेशी उपचारनयाने म्हटला जातो. म्हणून त्याचे संख्यात-असंख्यात-अनंत[2] प्रदेश आहेत.
३) धर्म द्रव्याचे लोकाकाश प्रमाण असंख्यात प्रदेश आहेत.
४) अधर्म द्रव्याचे लोकाकाश प्रमाण असंख्यात प्रदेश आहेत.
५) आकाश[3] द्रव्याचे अनंत प्रदेश आहेत.
६) प्रत्येक कालाणु द्रव्य एक प्रदेशी आहे.

## अवगाह क्षेत्र

१) प्रत्येक जीवाचा अवगाह[4] (राहण्याचे क्षेत्र) लोकाकाशाचा असंख्यातवा भाग आहे तथापि तो असंख्यात प्रदेशरूप आहे. सूक्ष्मनिगोदी लब्ध्यपर्याप्तक जीवाची अवगाहना सर्वात लहान आहे तथापि ती असंख्यात प्रदेशरूपच आहे. मोठ्यात मोठी जास्तीत जास्त अवगाहना महामत्स्याची १ हजार योजन आहे. केवली समुद्घात करताना जीवाची अवगाहना लोकाकाशप्रमाण होते. मुक्तजीवाची अवगाहना जास्तीत जास्त ५२५ धनुष्य व कमीत कमी ७ धनुष्य असते. इतर संसारी जीवांची आपापल्या शरीराप्रमाणे लहान मोठी अवगाहना असते.

२) पुद्गल द्रव्याचा अवगाह[5] एक प्रदेश-दोन प्रदेश आदि-संख्यात-प्रदेश-असंख्यात प्रदेशरूप आहे. लोकाकाश प्रमाण पुद्गलाचा एक महास्कंध असंख्यात प्रदेशी आहे. पुद्गल द्रव्याचे अनंतानंत परमाणु देखील आकाशाच्या एक प्रदेशात राहू शकतात.[6]

३) धर्म व अधर्म द्रव्याचा अवगाह[7] संपूर्ण लोकाकाश प्रमाण आहे.
४) आकाश द्रव्याचा अवगाह अमर्याद अनंत प्रदेशरूप आहे.
५) प्रत्येक कालाणु द्रव्याचा अवगाह एक प्रदेशरूप आहे.

### द्रव्यांचा परस्पर उपकार– (सहकार्य)

१) जीव द्रव्याचा अन्यजीवावर परस्पर उपकार[8] आहे.
२) पुद्गलाचा[9] जीवावर उपकार-शरीर-वचन-मनोबल-श्वासोच्छ्वास, तसे [10]सुख-दुख-जीवित-मरण हे सर्व उपकार आहेत.
३) धर्म द्रव्याचा[11] जीव-पुद्गलावर गति हेतुत्व हा उपकार आहे.

---

१. असंख्येया प्रदेशा धर्मा धर्मैक जीवाना । २. आकाशस्यानन्ता. । ३. संख्येयासख्येयाश्च पुद्लाना ।: नाणोः । ४. असख्येयभागादिषु जीवाना । ५. एक प्रदेशादिषु भाज्यः पुद्गलाना ॥ ६. त खु पदेस जाणे सव्वाणुठ्ठाण दाणरिहं ॥ ७. धर्मा धर्मयोः कृत्स्ने । लोकाकाशेऽवगाहः ॥ ८ परस्परोपग्रहो जीवानां । ९. शरीरवाङ्मनः प्राणापानाः पुद्गलानां । १०. सुखदुःखजीवितमरणोपग्रहाश्च । ११. गति-स्थित्युपग्रहो धर्माधर्मयोरुपकारः ।

४) अधर्म द्रव्याचा जीव पुद्गलावर स्थिति हेतुत्व हा उपकार आहे.

५) आकाशद्रव्याचा उपकार– सर्व द्रव्याना अवगाह देण्यास निमित्त मात्र बनणे हा आहे.[१]

६) कालद्रव्याचा उपकार– परिणमनशील सर्व द्रव्याना प्रतिसमय परिणमन करण्यास निमित्तमात्र कारण बनणे हा निश्चय कालाचा उपकार आहे[२] परिणाम– एका भवातून दुसऱ्या भवात परिणामांतर करणे, एका स्थलावरून दुसऱ्या स्थलांतरास जाण्याची गमनक्रिया करणे, हा वयाने मोठा हा लहान असे परत्व-अपरत्वाचे ज्ञान ज्यावरून होते तो सर्व व्यवहार कालाचा उपकार आहे. येथे उपकार शब्दाचा अर्थ केवळ परोपकार एवढाच अभिप्रेत नसून उपकार किंवा अपकार करण्यास निमित्तमात्र कारण बनणे त्याला येथे उपकार म्हटले आहे.

वास्तविक प्रत्येक द्रव्य आपापले परिणमन आपल्या शक्ति सामर्थ्याने करते. त्यामध्ये दुसऱ्या निमित्तभूत द्रव्याच्या सहकार्याची अपेक्षा नसते. उपादान द्रव्य व निमित्तद्रव्य दोन्ही आपापल्या प्रदेशक्षेत्र मर्यादेमध्ये आपापली अर्थक्रिया करतात. आपापल्या प्रदेशक्षेत्राचे उल्लंघन करून दुसऱ्या द्रव्याच्या प्रदेशक्षेत्रामध्ये अतिक्रमण-प्रवेश करीत नाहीत. एक द्रव्य दुसऱ्याचे कार्य करू शकत नाही. तथापि एका द्रव्याच्या सान्निध्यमात्रात दुसऱ्या द्रव्याचे परिणमन कार्य सहजगत्या घडते. याप्रमाणे त्यांच्यामध्ये सहजगत्या निमित्त-नैमित्तिकभाव घडतो. म्हणून व्यवहारनयाने एक द्रव्य दुसऱ्या द्रव्यावर उपकार करते असे व्यवहार शास्त्रात म्हटले जाते, वास्तविक एक द्रव्य दुसऱ्या द्रव्यावर कांही उपकार करू शकत नाही.[३] प्रत्येक द्रव्य आपली अर्थ क्रिया आपल्या सामर्थ्याने करते. त्यावेळी अन्य निमित्त द्रव्य केवळ निमित्तमात्र असते. ज्याप्रमाणे जीव पुद्गलाच्या गतिसाठी धर्म द्रव्य निमित्तमात्र उदासीन कारण असते. तसाच येथे उपकार शब्दाचा अभिप्राय समजावा.[४]

## लोकरचना

जैन दर्शनामध्ये लोक–रचनेवर प्रकाश टाकताना द्रव्य पदार्थ, अस्तिकाय, तत्त्व, स्याद्वाद, अनेकान्त, प्रमाण, नय, निक्षेप, शब्दार्थ सम्बंध इत्यादी अनेक विषय व उपविषयावर विस्तृत व विशद विचार केलेला आहे. आणि विचारानंतर त्यांना एक विशिष्ट ठिकाणी आणून पोहचविले आहे. म्हणून जैन दर्शनातील द्रव्य व्यवस्थे-विषयी विचार प्रामुख्याने मांडला जात आहे.

**द्रव्य - लक्षण–**

जैन दर्शनामध्ये द्रव्याचे लक्षण असे की, जे 'सत्' आहे,[५] ज्यामध्ये उत्पाद, व्यय व ध्रौव्य हे तीन अंश असतात.[६] केवळ उत्पाद, केवळ व्यय आणि केवळ ध्रौव्य द्रव्याचे लक्षण नाही. कारण अशी कोणतीही वस्तु जगात नाही की, जी उत्पन्न होते व केवळ नष्ट होते किंवा केवळ स्थिर राहते. हे धर्म परस्पर अविनाभावी आहेत; ज्या ठिकाणी उत्पाद असेल त्याठिकाणी व्यय व ध्रौव्य अवश्य असतात आणि ज्याठिकाणी व्यय असेल, त्याठिकाणी व्यय एवं ध्रौव्य निश्चित असतात. याप्रमाणे ज्या ठिकाणी ध्रौव्य असेल त्या ठिकाणी उत्पाद आणि व्यय अवश्य असतील.[७]

---

१ आकाशस्यावगाहः । २. वर्तनापरिणामक्रियाः परत्वापरत्वेच कालस्य ॥ ३. अण्णदवियस्स अण्णदवियेण ण कीरए गुणुप्पादो । ४. निमित्तमात्रमन्यत् तु गतेर्धर्मास्तिकायवत् ॥ (इष्टोपदेश) ५. सद्रव्यलक्षणम्–त. सू. ५-२९।२. अपरिच्चत्तसहावेणुप्पादव्वयधुवत्तसजुत्त । गुणवं च सपज्जाय ज त दव्व ति वुच्चन्ति । प्रवचनसार–२-३. ६ 'उत्पादव्ययध्रौव्ययुक्तं सत् । त. सू. ५–३० ।' ७. उत्पाद. केवलो नास्ति स्थितिविगमरहितत्वात् वियत्कुसुमवत् । तथा स्थितिविनाशौ प्रतिपत्तव्यौ ॥ स्थिति. केवला नास्ति, विनाशोत्पादरहितत्वात् तद्वत् । विनाश· केवलो नास्ति, स्थित्युत्पत्तिरहितत्वात् तद्वदेव ॥ इति योजनात सामर्थ्यादुत्पादव्ययध्रौव्ययुक्त सदिति । प्रकाशित भवति, तदन्यतमाभावे सत्त्वानुपपत्तेः ।' अष्टसहस्री-पृ २११ 'तत्र यदविनाभावः प्रादुर्भाव ध्रुवव्ययाना हि । यस्मादेकेन विना न स्यादितरद्द्वय तु तन्नियमात् ॥ अपि च द्वाभ्यां ताभ्यानन्यतमाभ्यां विना चान्यतरत् । एक वा तद्वय तन्नियमिह वस्तुससिद्धयै ॥ पचाध्यायी–१-२४९-२५०




उदाहरण सुवर्णाची दांडी घ्या. जेव्हा कलश बनवून एका मुलीस दिले जाते तेव्हा ती प्रमुदित होते. आणि जेव्हा त्या कलशाला मिटून मुकुट बनविला जातो तर मुलीस कळसास मिटविण्याचे दु.ख होते. पण मुलाला त्याचा आनंद होतो. परंतु सुवर्णाची इच्छा करणाऱ्याला न त्याच्या नाशासबंधी विषाद उत्पन्न होतो न मुकुटाच्या उत्पादासंबंधी हर्ष कारण ते जाणतात की सुवर्ण दोन्ही अवस्थेमध्ये विद्यमान आहे. या उदाहरणावरून स्पष्ट होते की, सर्व वस्तु उत्पादादित्रयात्मक आहे आणि उत्पादित्रय 'सत्' चे लक्षण आहे. हे एक लौकिक उदाहरण आहे. एक अध्यात्मिक उदाहरण पण आहे. ज्या व्यक्तिचा हा नियम आहे की, दूध घेईन, तो दह्याला हात लावणार नाही. त्याचप्रमाणे आणि ज्याचे व्रत आहे की मी दही खाणार नाही. तो दूध पिणार नाही. याचप्रमाणे ज्याने हा नियम केला आहे की गोरस सोडून अन्य दुसरी कोणतीही वस्तु स्वीकारणार तो पुरुष दूध तर पीत नाही व दही पण खात नाही. कारण अगोरस भक्षण करणाऱ्याला दूध व दही दोन्हीही गोरस आहेत आणि म्हणून तो दोन्हींच ग्रहण करीत नाही. या ठिकाणी गोरसामध्ये दह्याचा उत्पाद आणि दूधाचा विनाश आणि त्यामुळे दोन्हीमध्ये गोरसत्वाची स्थिती हे तिन्ही धर्म स्पष्ट लक्षात येतात.[1] या उदाहरणावरून जैनधर्मामध्ये वस्तु त्रयात्मक प्रतीत होतात. जैन दर्शनामध्ये हे पण स्पष्टपणे सांगितले आहे की कोणत्या दृष्टीने द्रव्यामध्ये उत्पाद, व्यय व कोण्या अपेक्षेने ध्रौव्य धर्म स्वीकार केलेला आहे. द्रव्यत्व सामान्याच्या अपेक्षेने ध्रौव्य आणि पर्याय विशेषाची अपेक्षा उत्पत्ति व नाश स्वीकार केलेला आहे आणि म्हणून या दोन विरोधी धर्मांना एकत्र स्वीकार करण्यात कोणती पण विसंगती नाही. या लक्षणाशिवाय द्रव्याचे आणि दुसरे लक्षण मानलेले आहे. ज्यात गुण व पर्याय दोन्ही असतात त्यास द्रव्य म्हणतात.[2] उमास्वामीनी द्रव्याचे लक्षण असे सांगितले आहे.[3] कुन्दकुन्दाचार्यांनी पण गुण व पर्याय युक्त द्रव्य असते म्हणून सांगितले आहे[4] व याच लक्षणाचे अनुकरण उत्तरवर्ती आचार्यांनी केले. जे युगपत् सदैव राहतात, ते गुण होत.[5] ज्याप्रमाणे जीवाचे चैतन्य सुखादि, पुद्गलाचे रसवर्णादि, परतु जे द्रव्यामध्ये क्रमाने प्रगट होतात ते पर्याय होत, जसे– जीवाचे पर्याय नरकादि, पुद्गलाचे स्थूल सूक्ष्मादि.[6]

द्रव्याचे लक्षण दोन प्रकारे सांगितले आहे. प्रथम लक्षणाच्या द्वारे आगमची कल्पना स्पष्ट केली आहे. वैशेषिक दर्शनामध्ये गुणवान् व क्रियावान्ला द्रव्य म्हटले आहे. कुन्दकुन्दादि आचार्यांनी जैनांचे द्रव्य लक्षण समन्वय करण्याचा प्रयत्न केला आहे. आणि इतर लक्षणांना एकत्रित केले आहे.

**द्रव्याचे भेद–**

या चराचर विश्वाला जैन दर्शनाने लोक असे म्हटले आहे. द्रव्य, जीव, पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश, काल यामध्ये जीव द्रव्य चेतन आहे बाकीचे अचेतन आहे. चेतना म्हणजे ज्ञान-दर्शन संपन्न जीव होय ससारामध्ये भ्रमण करणे तो संसार होय. जीवाचे २ भेद त्रस व स्थावर. द्वि-इन्द्रियापासून पाच इन्द्रियापर्यन्त त्रस. एकेन्द्रिय जीव पृथ्वी, पाणी, अग्नि, वायु, वनस्पति हे स्थावर. जन्म, मृत्यु, जरा, आतंक आदि संसारिक कष्ट आणि कर्म-नोकर्मापासून जे मुक्त आहेत त्यांना मुक्त म्हणतात. मुक्त जीव आत्मसुखभोक्ता सर्वज्ञाता, निरञ्जन, निर्विकार व शाश्वत असतात.' ते पुन्हा संसारात परत येत नाहीत. जैन दर्शनामध्ये बौद्धासारखे निर्वाण मानले नाही. वैशेपिकाप्रमाणे पण सर्व खेद मुक्ति मानली नाही. आवरण व दोषाचा अभाव व सर्वगुण उपलब्धि असा मोक्ष मानलेला आहे. याप्रमाणे मोक्ष प्राप्त झालेला जीव मुक्त समजला जातो.

पुद्गल द्रव्य जड आहे. त्याची अवस्था जडात्मक आहे. उत्पत्ति व नाश या त्यांच्या अवस्था आहेत. इन्द्रियांच्याद्वारे त्यांचे ग्रहण होते. पुद्गल पण दोन प्रकारचे आहे. परमाणु व स्कन्ध, पुद्गलाचा जो सर्वात लहान

१. पयोव्रतो न दध्यति न पयोत्ति दधिव्रतः । अगोरसव्रतो नोमे तस्मात्तत्त्व त्रयात्मकम् ॥ आप्तमीमांसा–६०

२. गुणवं च सपज्जाय ज त दव्वंति वुच्चंति । प्रवचन सार २–३. ३. गुणपर्ययवद् द्रव्यम्–त. सू. ५–३८

४. गुणपर्यवद्द्रव्य लक्षणमेतत्सुसिद्धमविरुद्धम् । गुणपर्ययसमुदायो द्रव्यं पुनरस्य भवति वाक्यार्थ । ५. अन्वयिनो गुणा – सर्वार्थ सिद्धि–५–३८. ६. व्यतिरेकिणो ह्यनित्यास्तत्काले द्रव्यतन्मयाश्चापि ते पर्याया. . – अ. क. मा. २–९.'

भाग ज्याचा दुसरा अंश होऊ शकत नाही त्यास परमाणु म्हणतात. परमाणुद्वारा निर्माण झालेल्या पुद्गलाना स्कन्ध म्हणतात. हे स्कन्ध लहान मोठया आकाराचे असतात. चाक्षुष-अनाक्षुष स्कंधाचे भेद आहेत.[1] शब्द, बंध, सूक्ष्मता, स्थूलता, संस्थान, भेद, छाया, अन्धःकार, सूक्ष्मता, तेज, उद्योत, हे सर्व पुद्गलाचे पर्याय आहेत. शरीर, वाणी, मन श्वासोच्छ्वास यामुळे जीवावर अनुग्रह होतो.

पुद्गलस्कन्धासंबंधी शास्त्रकारानी २३ भेद सांगितले आहे ते याप्रमाणे आहे. अणुवर्गणा, संख्याताणुवर्गणा, अनन्ताणुवर्गणा, आहारवर्गणा, अग्राह्यवर्गणा, कार्माणवर्गणा, ध्रुववर्गणा, सान्तर-निरन्तर वर्गणा, शून्यवर्गणा, प्रत्येक शरीर वर्गणा, बादर निगोद वर्गणा, शून्य वर्गणा, सूक्ष्म निगोद वर्गणा, नभो वर्गणा व महास्कन्ध वर्गणा.

जैनाचार्यानी या पुद्गलाच्या प्रकाराचे सहा प्रकारे वर्णन केले आहे. बादरबादर, बादर, बादरसूक्ष्म, सूक्ष्मबादर, सूक्ष्म, सूक्ष्मसूक्ष्म, ज्या प्रकारे ज्याचे छेदन, भेदन अन्यत्र स्थापन होऊ शकते त्यास बादर बादर म्हणतात. ज्याप्रमाणे पृथ्वी पाषाणादि. आणि ज्याचे छेदन भेदन होऊ शकत नाही त्यास बादरस्कन्ध म्हणतात. जसे– जल, तेल, आदि. जे दिसतात पण पकडले जात नाहीत. अशा डोळ्यानी बघण्यासारख्या स्कन्धाना बादरसूक्ष्म म्हणतात. जसे– छाया, आतप, चान्दणे, अन्धःकार आदि. डोळयाला सोडून बाकीच्या चार इन्द्रियांनी जे ग्रहण होतात त्या पुद्गल स्कन्धाला सूक्ष्मबादर म्हणतात. जसे– शब्द, रस, गंध, वर्ण. ज्याचा कोणत्याच इन्द्रियानी ग्रहण होत नाही त्यास सूक्ष्म म्हणतात. जसे– कर्म. जे स्कंधरूप नाही अशा अविभागी पुद्गलाला सूक्ष्मसूक्ष्म म्हणतात, जसे– परमाणू.

धर्म द्रव्य, अधर्म द्रव्य, आकाश व काल द्रव्य हे चार अतीद्रिय आहेत.[2] धर्म द्रव्य, जीव व पुद्गलाच्या गतीला साह्य होते. जसा प्रवाशाला मार्ग, रेल्वेसाठी रूळ, किंवा माशासाठी पाणी. जरी प्रवासी स्वतः गतीशीलच आहे परंतु मार्गाशिवाय त्याची गती सक्रीय होत नाही त्याप्रमाणेच जीव व पुद्गल गतीशील असून देखील धर्म द्रव्यामुळे क्रियात्मक रूप धारण करतात. म्हणून धर्म द्रव्य गतीशील द्रव्याना गती देण्यास अप्रेरक साहाय्यक आहे. याप्रमाणे [3]अधर्म द्रव्य जीव व पुद्गलाना स्थिर ठेवण्यात सहाय्यक आहे. जसे– प्रवाशासाठी वृक्षाची छाया.[4] आकाश द्रव्य सर्व द्रव्याना अवगाहन देणारे आहे व ते अनंत प्रदेशी आहे. सर्व द्रव्याच्या परिमाणामध्ये तेच मोठे आहे.

काल द्रव्य सर्व द्रव्याच्या परिणमन क्रिया जुनेपण नवेपण लहान मोठे इ. व्यवहारासाठी कारण आहे. ऋतूंचे आणि रात्र-दिवस याचे परिवर्तन हे [5]कालद्रव्याचे कार्य आहे. हे कालद्रव्य अनंतसमयरूप मानले आहे.[6] जैन दर्शनामध्ये काल द्रव्य असंख्यात व लोकाकाशाच्या एकेक प्रदेशावर एकेक कालाणु स्थिर असा दाखवलेला आहे. पुद्गलांचे अनेक प्रकारचे परिणमन आणि धर्मादि द्रव्याच्या अर्थपरिणामामध्ये ते कारण आहे. कालद्रव्याच्या या विभिन्नतेमुळे अनेक प्रकारच्या व्यक्ती आणि पुद्गल स्कंधात क्रमबद्ध नियतपणा प्राप्त होतो. व्यवहार व निश्चय असे याचे दोन भेद आहेत. दिवस, मास, ऋतु, वर्ष, अयन इ. संख्यात अनंत भेद या व्यवहार कालाचे आहेत. हा व्यवहार काल मनुष्य क्षेत्रामध्ये आहे. कारण मनुष्य क्षेत्राचे जोतिष्क देवाचे विमान भ्रमण करतात आणि त्यामुळे या काल द्रव्याची जाणीव होते.

हा व्यवहार काल तीन प्रकारचा आहे वर्तमान, भूत, भविष्य, वर्तमान समयमात्र आहे आणि अतीत सिद्ध राशीच्या संख्यातगुणा आहे. भविष्य पुद्गल राशीच्या अनंतगुणा आहे.[7] निश्चय काल जो कालानुरूप आहे व सर्व द्रव्याच्या परिणमनात निमित्त आहे. जरी वर्तना सर्व द्रव्यांचा स्वभाव आहे परंतु वर्तना बाह्य सहकाराशिवाय

१. भेदसंघाताभ्यां चाक्षुष । त. सूत्र    २. गईपरिणयाणधम्मो पुद्गलजीवाण गमण सहयारी ।
३. ठाणजुदाण अधम्मो पुग्गलजीवाण ठाणसहयारी ।    ४. आकाशावगह ।    ५. वर्तनापरिणामक्रियाः परत्वापरत्वेच कालस्य– त. सू २९    ६. लोयायासपदेसेएक्केक्के जे ट्ठिया हु एक्केक्का...धम्मतियं एक्केकं लोगपदेसप्पमा कालो ॥जी. का. ५८७.
७. वट्टणहेदू कालो वट्टणगुणमवियदव्वणिचमेसु । कालाधारेणेव य वट्टति हु सव्व दव्वाणि ॥. जी. का ५६७.

होऊ शकत नाही म्हणून या सर्व द्रव्याच्या परिणामासाठी काल द्रव्य कारण आहे काल द्रव्याच्या आश्रयानेच सर्व द्रव्य परिणमतात. 'कालद्रव्य परिणामी असल्यामुळे एक द्रव्याला दुसऱ्या द्रव्यरूप होऊ देत नाही व दुसऱ्या द्रव्याना आपल्यासारखे करू शकत नाही ते उदासीन अप्रेरकरूप आहे.'[१] याप्रमाणे जैन दर्शनातील सहा द्रव्यांचा विचार आहे याचा कधी ऱ्हास होत नाही, कधी वृद्धि होत नाही, याची सहा संख्या निश्चल असते. याप्रमाणे विश्वरचना अकृत्रिम आहे. विश्वातील सर्व पदार्थ अकृत्रिम स्वतःसिद्ध आहेत. प्रत्येक पदार्थ स्वतंत्र आपले अस्तित्व जीवन जगत आहे. स्वाधीन स्वतंत्र आहे. पराधीन परतंत्र अन्य ईश्वराधीन नाही. अशी जैन शासनाची विश्वरचना व द्रव्यव्यवस्था आहे.

## जैनदर्शन व तत्त्वसिद्धान्त

भगवान महावीर मागील धर्म युगाचे अंतिम महापुरुष शेवटले २४ वे तीर्थंकर. भगवान महावीर महान् तत्त्ववेत्ता, आदर्श महापुरुष, सर्वमान्य दार्शनिक होते. ते स्वयं वीतरागी सर्वज्ञ असल्यामुळे त्यांची दृष्टि यथार्थ वस्तुनिष्ठ, शुद्ध, निर्मल, व्यापक होती. त्यांचे चारित्र्य-आचरण उदार होते. संसाराची निःसारता जाणून ते बालपणापासूनच सहज विरक्त होते. ते बाल ब्रह्मचारी होते. त्यांनी आत्मोद्धार व लोक कल्याण या दृष्टीने वस्तुतत्त्वाचे सूक्ष्म गहन चिंतन करून, महान् तपश्चर्या व आत्मसाधना करून प्रथम स्वतः वीतराग व पूर्णज्ञान प्राप्त करून घेतले. नतर मुमुक्षु भव्य जीवाना तर्कसंगत नवीन् वैज्ञानिक दृष्टीने लोक कल्याणकारी लोक मंगलकारी तत्त्वसिद्धांताचे मार्गदर्शन केले.

त्यापैकी १) अहिंसा, २) अपरिग्रहवाद, ३) अनेकान्तवाद स्याद्वाद, ४) कर्मवाद, ५) समतावाद, ६) वस्तु स्वातंत्र्यवाद हे महत्त्वपूर्ण व प्रमुख तत्त्वसिद्धांत होत.

१) अहिंसा– Live+Let-Live स्वतः जगा व दुसऱ्याला सुखाने जगू द्या. प्रत्येक प्राणी स्वतंत्र आहे. त्याचे अस्तित्व स्वतंत्र आहे. तो आपल्या अस्तित्व शक्ति सामर्थ्याने आपले स्वतंत्र अस्तित्व जीवन जगत आहे. आपले जीवन जगण्यासाठी दुसऱ्या कोणत्याही पदार्थाच्या सहाय्याची अपेक्षा नाही. हा जीव अज्ञानाने भ्रमाने आपले जीवन दुसऱ्या पदार्थाच्या सहाय्याशिवाय स्थिर राहू शकत नाही असे समजून दुसऱ्याचे स्वतंत्र जीवनावर आक्रमण करून त्याचे जीवनावर आपले जीवन जगण्याची राक्षसी बुद्धि, पाशवी वृत्ति धारण करून राक्षसी जीवन पशु जीवन जगत आहे.

तसेच भ. महावीरांच्या समकाली याज्ञिक धर्ममार्तंडानी धर्माच्या नावाखाली 'स्वर्गकामः यजेत' स्वर्गात जाण्याची ज्यास इच्छा असेल त्यानी यज्ञ करावा, पशु बलिदान करावे यज्ञात बली दिला जाणारा पशु स्वर्गास जातो. अशा खोटया भुलथापा मारून दीन मूक प्राण्याना यज्ञात बली देण्याचा प्रघात सुरू होता.

अशा वेळी भ. महावीरानी अहिंसा तत्त्वसिद्धांताचा प्रचार करून लोकाना योग्य मार्गदर्शन केले.

"प्राणा यथात्मनोऽभीष्टाः, भूतानामपि ते तथा" ज्याप्रमाणे आपणास आपले प्राण इष्ट वाटतात. आपणाला कोणी मारू नये असे वाटते, त्याचप्रमाणे सर्व प्राणीमात्राना देखील त्याचे प्राण इष्ट असतात. अशा वेळी त्याना मारताना किती दुःख होत असेल याची कल्पना आपण आपल्या दुःखावरून करून घ्यावी.

---

१. णय परिणमदि सय सो णय परिणामेइ अण्णमण्णे हि । विविहपरिणामियाण हवदि हु कालो सयं हेदू ॥
काल अस्सियं दव्व सग सग पज्जाय परिणद होदि । पज्जायावट्ठाणं सुद्धणये होदि खणमेत्तं ॥ जी का. ५६९, ७०.

२. पहा– अध्यात्मकमलमार्तण्ड पृ. ८० ते ८३.

प्राणांचा घात करणे ही तर हिंसाच आहे. पण ती हिंसा का घडते याची कारणमीमांसा ओळखून जैनदर्शनाने ज्या कारणाने हिंसादिक पापे घडतात त्या राग-द्वेष-मोह-विकारी-परिणामाना हिंसा म्हटले आहे.[1]

प्रमादपूर्वक-निरर्गल-यथेच्छापूर्वक-असंयमाचरण, दुसऱ्यावर आक्रमण, संग्रहवृत्ति, परिग्रह रक्षणाचे भय, आतंक-चिंता, कलह-संघर्ष, काळाबाजार हे सर्व हिंसेचेच प्रकार आहेत. सामाजिक जीवन व राष्ट्र जीवन सुसंघटित होण्यासाठी जैनदर्शनाने पाच अणुव्रतांचा उपदेश देऊन संयमपूर्वक-निर्मळ-निष्पाप जीवन घालविणे हीच खरी अहिंसा होय. अहिंसा जीवनाचे यथासांग पालन करण्यासाठी जेवढा आरंभ व जेवढा परिग्रह कमी करता येईल तेवढा कमी करा व गृह जीवनासाठी कमीत कमी जेवढा आवश्यक असेल तेवढाच आरंभ व परिग्रह सीमित करावा यासाठी अणुव्रत-महाव्रत रूपी धार्मिक आचार नियम धर्माचे कायदे नियम घालून दिले आहेत. त्या धर्म कायदे नियमानी सीमित-मर्यादित पवित्र जीवन जगणे हेच खरे अहिंसा जीवन होय. जैनदर्शनाच्या अहिंसा तत्त्वामध्ये अपूर्व शक्ति, आत्मबल, उदात्त व महान् अलौकिक गुण समाविष्ट आहेत. तेथे अनेकपणामध्ये एकता, हिंसेमध्ये अहिंसा, विषमतेमध्ये समता दिसून येते. तेथे सौहार्दता, सहानुभूति, सहिष्णुता, शुचिता, सात्विकता, सरळता, सेवापरायणता, मृदुता, दया, विश्वबंधुत्व, इत्यादि विश्व मंगलकारी अनेक गुणांचा अखंड पिंड हेच चैतन्य शक्तीचे दिव्यस्वरूप आढळून येते.

अहिंसा हे जगाचे परम ब्रह्म[2] आहे. तेथे परम शांति आहे. तेथे सर्व वस्तुमात्राचे सहअस्तित्व जीवन आहे. तेथे सर्व प्राणीमात्राविषयी मैत्रीभाव[3] आहे. तेथे गुणी-कलावंत लोकांचा आदर आहे. तेथे दीन-दुःखी जीवाविषयी करुणाभाव आहे, विरुद्ध प्रकृति लोकांविषयी माध्यस्थभाव आहे. अहिंसा धर्मात सर्वांचे रक्षण आहे. सर्वत्र सुख-शांति आहे.

२) अपरिग्रहवाद– परिग्रह म्हणजे पदार्थाविषयी ममत्व बुद्धि. [4]वास्तविक कोणताही बाह्य पदार्थ इष्ट किंवा अनिष्ट नाही. कारण जो एक पदार्थ एकाला अनिष्ट वाटतो तोच दुसऱ्याला इष्ट वाटतो. यावरून इष्ट–अनिष्टपणा हा पदार्थामध्ये नसून या जीवाने भ्रमाने पदार्थाविषयी धारण केलेली इष्ट-अनिष्ट बुद्धीची खोटी मान्यता तोच परिग्रह आहे. तेच दुःखाचे खरे कारण आहे. या ममत्व बुद्धीला मूर्च्छा परिणामाला बाह्यपदार्थ विषयभूत निमित्त असतो. म्हणून व्यवहार भाषेमध्ये बाह्य पदार्थाला देखील परिग्रह म्हटले आहे.

जैन दर्शनाचा हा अपरिग्रहवाद अलौकिक स्वरूपाचा आहे. ज्याला खाण्यास पोटभर अन्न मिळत नाही व ज्याचेजवळ अंग झाकण्यापुरते फाटके वस्त्र देखील नाही, परंतु ज्याला बाह्य वैभवाची मनात सारखी हुरहुर लागली आहे तो नंगा फकीर असून देखील महान् परिग्रही-पापी म्हटला जातो. याचे उलट ज्याचेजवळ अपार संपत्ति आहे, अफाट राज्यवैभव आहे पण जो त्या संपत्तीला देखील क्षणभंगुर जाणून मृगजल समान तुच्छ समजतो, पूर्वीचे राजे पायावर लोटांगण घालणाऱ्या अफाट राज्य लक्ष्मीचा देखील क्षणार्धात त्याग करण्यात मोठी धन्यता समजत असत तो परिग्रहवान् असून देखील अपरिग्रही, सकांचन असून देखील अकांचन म्हटला जातो.

जैनदर्शनकार कवींनी या अपरिग्रहवादाचे माहात्म्य मोठ्या मार्मिक शब्दात वर्णन केले आहे.

---

१. अप्रादुर्भावः खलु रागादीनां भवत्यहिंसेति । तेषामेवोत्पत्ति हिंसेति जिनागमस्य संक्षेपः ॥

राग द्वेष मोह परिणाम न होऊ देणे हीच खरोखर अहिंसा होय राग द्वेष मोह परिणाम उत्पन्न होणे हीच खरोखर हिंसा होय. हा सर्व जैन दर्शनाचा सारसंक्षेप आहे.

२. अहिंसा भूतानां जगति विदितं ब्रह्म परमं । ३. सत्वेषु मैत्री गुणिषु प्रमोदं, क्लिष्टेषु जीवेषु कृपा परत्वं । माध्यस्थभावं विपरीतवृत्तौ सदा ममात्मा विदधातु देव ॥ ४. मूर्च्छा परिग्रहः :

[1]जो अकिंचन आहे, ज्याचेपाशी दुसऱ्यास देण्यास काही नाही पण ज्याचे मन उदार आहे, दुसऱ्यास मदत करण्याची ज्याची भावना आहे त्यापासून जी कार्यसिद्धि होते ती धनसमृद्ध कुबेराच्या मदतीपेक्षा देखील फार मोठी आहे.

नदीचा उगम हा पाण्याचा साठा नसलेल्या पर्वताच्या कोरड्या खडकाच्या झऱ्यातून निघतो. पाण्याचा अफाट साठा असलेल्या समुद्रापासून कोणतीही नदी उगम पावत नाही. [2]त्याचप्रमाणे ज्याचेपाशी काहीच धन नाही अशा निर्धन साधूची जर कृपादृष्टि प्राप्त झाली तर त्यापासून फार मोठी कार्य सिद्धि होते. तशी कार्यसिद्धि कृपण-चिक्कू अशा श्रीमंतापासून दुसऱ्यास मदत करण्याच्या इच्छेने कमरेच्या कसनीतून एक पै देखील बाहेर निघत नाही. ज्याप्रमाणे अंधकारात असलेला माणूस प्रकाशामध्ये असलेल्या माणसास सहज पाहू शकतो परंतु प्रकाशात असलेल्या माणसास अंधःकारात असलेला माणूस दिसू शकत नाही.

यावरून पैसा-परिग्रह हा मनुष्यास मदांध बनविणारा आहे. पैशाच्या धुंदीपुढे माणसास दुसऱ्याच्या हित-अहिताचा विवेक राहात नाही. जड रत्नांच्या हाराने झळकणाऱ्या श्रीमंतीपेक्षा गुणरत्नाने मंडित साधु पुरुष अधिक श्रेष्ठ म्हटला जातो. गुणरत्नानी विभूषित साधूंच्या चरणावर स्वर्गातील देव देखील नतमस्तक होतात.

अपरिग्रही जीवन ते खरे सात्विक जीवन होय. जितका व्याप अधिक तितका संताप अधिक. जितका व्याप कमी तितकी जीवनात शांति अधिक. असे हे संपत्ति व सुख याचे विषम त्रैराशिक आहे.

अपरिग्रही जीवन तेच खरे अहिंसामय जीवन, शांतिमय जीवन होय. अपरिग्रहवाद किंवा सीमित परिग्रह वाद हाच साम्यवाद–समाजवाद होय. जेथे सर्व लोक समृद्ध असतात, कोणी कोणास तुच्छ लेखीत नाही तेथेच सर्व शांति व सुख नांदते. विषमवाद, जेथे कोणी श्रीमंत तर कोणी गरीब अशी विषमता असते तेथेच संघर्ष निर्माण होतो. मनुष्यास आपणापाशी काही नसल्याचे फारसे दुःख नसते. पण ते दुसऱ्यापाशी आहे व मजजवळ नाही याचे मात्र फार मोठे दुःख वाटते. परिग्रहवाद हा विषमता उत्पन्न करणारा असल्यामुळे अशांति दुःख निर्माण करणारा आहे.

जीवनात हिंसा–संघर्ष–दुःख नको असेल, अहिंसा–सुख–शांति नांदावी असे वाटत असेल तर परिग्रहाचे भूत धारण न करता अपरिग्रहता किंवा सीमित परिग्रह याचा स्वीकार करणे नितांत आवश्यक आहे

संग्रहवृत्ति, साठेबाजी, बहुआरंभ–बहुपरिग्रह[3] हा धर्माच्या कायद्याने फार मोठा गुन्हा आहे ते फार मोठे महापाप आहे. धर्माने त्याचे फळ नियमाने नरकगतीचे दुःख सांगितले आहे. आजकाल राज्यशासनाने देखील या संग्रहवृत्तीवर, साठेबाजीवर कायद्याने नियंत्रण घातले आहे. त्यात धर्म व नीति रक्षणाचे फार मोठे तत्त्व भरले आहे.

३) **अनेकान्तवाद–** प्रत्येक वस्तु अनेकान्तात्मक–परस्परविरुद्ध–उभय धर्मात्मक–सामान्य–विशेषात्मक आहे हे सिद्ध करणे हा अनेकान्तवाद होय. प्रत्येक वस्तूला दोन बाजू असतात.

१) वस्तूचे अंतरंग स्वरूप, २) वस्तूचे बहिरंग रूप.

१) वस्तूचे अंतरंग स्वरूप– हे सदासर्वदा एकरूप–व्यापक नित्यशुद्ध व ध्रुव असते.

२) वस्तूचे बहिरंगरूप– हे वस्तूचे खरे स्वरूप नसते. ते वस्तूने तात्काळ धारण केलेले बाह्यरूप असते. ते अनेकविध असते, अध्रुव असते. ते कधी अंतरंगाच्या विरुद्ध–विसदृश असते तर कधी अविरुद्ध–सदृश असते.

---

१. तुगात् फलं यत् तदकिंचनाच्च, प्राप्य समृद्धान्न धनेश्वरादेः । निरम्भसोऽप्युच्चतमात् हिमाद्रेः, नैकापि निर्याति धुनी पयोधेः ॥

२. श्रिया परं पश्यति साधु निःस्वः, श्रीमान्न कश्चित् कृपणं त्वदन्यः । यथा प्रकाशस्थितमन्धकारस्थायीक्षतेऽसौ न तथा तमःस्थं ॥ ( विषापहार )

३. बह्वारम्भपरिग्रहत्वं नारकस्यायुषः । (तत्वार्थसूत्र)

वस्तूचे अंतरंग स्वरूप हे वस्तूचे सामान्यतत्त्व असते. या सामान्य तत्त्वावरच विशेपतत्त्व (पर्याय) आपले बहिरंगरूप दाखवीत असते.

एकाच वस्तूमध्ये निरनिराळ्या भिन्न दृष्टिकोणातून युगपत् या अंतरंग व बहिरंग, सामान्य व विशेष दोन्ही अंशाचे अस्तित्व अविरोध अविनाभावी मान्य करणे हा अनेकांतवाद होय.

वस्तूचा सामान्यधर्म सत्‌रूप ध्रुव नित्य, एकरूप, सत्‌रूप सदा शुद्ध (परद्रव्यापासून पृथक्-विभक्त) असतो.

वस्तूचा विशेष धर्म असत्‌रूप-क्षणिक सत्‌रूप, उत्पाद-व्ययरूप, अनित्य-अनेकरूप-अतत्‌रूप, शुद्ध-अशुद्धरूप असतो.

पाण्याचा पाणीपणा हा पाण्याचा सामान्यधर्म ध्रुव असतो. पाणी व वायु यांच्या संयोगात उत्पन्न होणारा पाण्याचा पर्याय विशेष-बुडबुडा हा पाण्याचा विशेषधर्म-पर्याय होय. तो क्षणिक-अध्रुव असतो.

स्थूलदृष्टी बालक पाण्याचा बुडबुडा उत्पन्न झाला की त्याला हर्ष होतो व तो फुटला, नष्ट झाला की त्याला विषाद-खेद वाटतो.

परंतु ज्याला पाण्याचा बुडबुडा क्षणभंगुर असतो याचे तत्त्वविज्ञान आहे, पाण्याने तावत्काल धारण केलेले ते बाह्यरूप आहे याचे ज्याला विज्ञान असते त्याला पाण्याचा बुडबुडा उत्पन्न झाला काय व फुटला काय तरी त्यात त्याला हर्ष-विषाद वाटत नाही. कारण पाण्याचा बुडबुडेपणा फुटला, नष्ट झाला तरी पाण्याचा पाणीपणा नष्ट होत नाही हे वस्तुविज्ञान त्याला असते.

यावरून वस्तूच्या अंतरंग-ध्रुव सामान्य धर्मालाच परमार्थ वस्तु समजणे, त्याचाच आदर-आश्रय घेणे व वस्तूमध्ये तावत्काल दिसत असलेला जो अध्रुव-पर्याय अंश त्याला वस्तूचे परमार्थ स्वरूप न समजणे, त्याचा आदर न करणे, त्याचा आश्रय न घेणे, त्याच्या उत्पाद-व्ययाबद्दल हर्ष-विषाद न मानणे हा अनेकांतवाद प्रमाणवाद होय.

अनेकांतवादाचे खरे मर्म गूढ रहस्य लक्षात न आल्यामुळे अनेकांतवादाची हेटाळणी करून जैन दर्शनाला वस्तूचे स्वरूप सुनिश्चित समजलेच नाही म्हणून जैन-दर्शन वस्तु कथंचित् आहे व कथंचित् नाही याप्रमाणे अनिश्चित रूपाने कथन करते असा जैनदर्शनाच्या अनेकांतवादावर अनिश्चितपणाचा, संशयितपणाचा दोषारोप केला जातो.

पण जैनदर्शनाचा अनेकांतवाद असा अनिश्चित किंवा संशयग्रस्त भूमिकेवर आधारला नाही.

जैनदर्शनाच्या अनेकांतवादाच्या प्रमाणतेची सुव्यवस्थितपणाची सिद्धि सुव्यवस्थित-सुनिश्चित स्याद्वादरूप एकांतवादावर आधारलेली आहे. दोन सुनिश्चित एकांतवादाचा समन्वय म्हणजे अनेकांतवाद होय.

१) वस्तु स्वद्रव्यचतुष्टयरूपाने सर्वथा (एकांतपणे) सत्‌रूपच आहे.

२) वस्तु परद्रव्यचतुष्टयरूपाने सर्वथा (एकांतपणे) असत्‌रूपच आहे.

घट घटरूपाने सर्वथा एकांतपणे घटरूपच आहे. घट पटरूपाने सर्वथा एकांतपणे पटरूप नाही. अशा रीतीने सुनिश्चित विधि-निषेधरूपाने वस्तूचे असणे हेच वस्तूचे अनेकांतात्मक परम गहन तत्त्व आहे. घटामध्ये घटाचे अस्तित्व व पटाचे नास्तित्व युगपत् अविरोधरूपाने अविनाभाव रूपाने मानल्याशिवाय घटाचे अस्तित्व सिद्ध होऊ शकत नाही. यावरून अनेकांतवाद हा अनिश्चित-संशयवाद नसून सुव्यवस्थित-सुनिश्चित स्वरूपाचा आहे. हे जैन दर्शनाचे निष्पक्षपातपणाने सूक्ष्म अध्ययन करणारे संस्कृत भाषेचे प्रकांड विद्वान् श्री. भांडारकर यांनी प्रांजलपणाने कबूल केले आहे.




अनेकांतवाद हा सर्व एकांतवादाचा समन्वय साधणारा समन्वयवाद-सहमतवाद आहे. कोणताही अन्यमताचा एकांतवाद सर्वथा मिथ्या नाही.[1] ते एकांतवादी वस्तूमध्ये एकच अंशधर्म परमार्थसत् मानतात. वस्तूमध्ये दुसरा अंश प्रतीति सिद्ध दिसत असतानाही एकाच वस्तूमध्ये परस्पर विरोधी धर्म युगपत् परमार्थसत् कसे राहू शकतील हा कूट प्रश्न त्याना सुटला नाही. म्हणून त्यानी त्यापैकी कोणताही एक अंशधर्म परमार्थसत् मानून दुसरा अंश अपरमार्थ-माया-संवृति मानून वस्तूमध्ये त्या दुसऱ्या प्रतिपक्षी अंशाचे अस्तित्वाचा निषेध केला म्हणून तो प्रतिपक्षाचा निषेध करणारा प्रतिपक्ष निरपेक्ष एकांतवाद वस्तुतत्त्वाचे मार्गदर्शक न ठरल्यामुळे त्याला मिथ्या एकांतवाद म्हटले आहे.

'परंतु ते सर्व एकांतवाद जर आपल्या प्रतिपक्ष धर्माचे अस्तित्वाची मान्यता स्वीकार करतील तर तो सर्व नयांचा समन्वय म्हणजे परमार्थ अनेकांतात्मक अर्थक्रियाकारी वस्तुतत्त्व सिद्ध होते.

याप्रमाणे जैन दर्शनाचा अनेकांतवाद अवास्तववाद नसून वास्तववाद आहे. अनिश्चय स्वरूपाचा नसून सुनिश्चित एकांत स्वरूपाचा आहे. सुनिश्चित स्याद्वाद परस्पर सापेक्ष एकांत तत्त्वावर आरूढ आहे.

**४) कर्मवाद–** कर्मवाद हे जैन दर्शनाचे अलौकिक असाधारण वैशिष्टय आहे. कर्म नामक जड-अचेतन पदार्थ आहे. तो जीवद्रव्याहून पृथक् वेगळा आहे. अनादिकाळापासून जीवाचा या कर्माशी संयोग संबंध आहे. तोपर्यंतच हा जीव नरकादि चतुर्गतीमध्ये भ्रमण करीत आहे.

कर्म नामक पदार्थ हा सूक्ष्म असल्यामुळे जरी डोळयाने दिसत नाही, तथापि त्याची सिद्धि जैन दर्शनाने मोठ्या संयुक्तिक प्रमाणाने सिद्ध केली आहे.

आपण जगात पाहतो, कोणी श्रीमान्, तर कोणी गरीब, कोणी सुखी, कोणी दुःखी, कोणी मनुष्य तर कोणी तिर्यंच पशु असा हा अनेक जीवामध्ये फरक का दिसून येतो ? याचा जर सूक्ष्म दृष्टीने विचार केला तर जीव दृष्टीने जरी सर्व जीव सारखे आहेत, कोणी उच्च कोणी कनिष्ठ असा जीव जातीमध्ये फरक नाही. तथापि वर निर्दिष्ट केल्याप्रमाणे जो फरक दिसून येतो त्याचे मुख्य कारण या जीवाचा दुसऱ्या कोणत्या तरी भिन्न पदार्थाशी संयोग आहे की, ज्याच्या संयोगाने हा जीव जीवजातीने समान असताना देखील उच्च-नीच, श्रीमंत गरीब असा भेद त्यामध्ये दिसून येतो. तो भिन्नपदार्थ म्हणजेच कर्मपदार्थ होय.

हा कर्मपदार्थ कसा उत्पन्न होतो, याचा जीवाशी का संबंध होतो व तो संबंध कसा सुटतो याचा जैन दर्शनाने सूक्ष्म रितीने विचार केला आहे त्याला जैन दर्शनाचा कर्मसिद्धांत म्हणतात.

कर्म सिद्धांत हा जीवाचा मागील पुढील व वर्तमान जीवनाचा चित्रपट आहे. या अपेक्षेने त्याचे ज्ञान करून घेणे नितांत आवश्यक आहे.

वास्तविक जीवाने केलेले कर्म म्हणजे जीवाचे शुभ-अशुभ परिणाम यालाच जैनदर्शनात भावकर्म म्हणतात. जीवाचा खरा प्रत्यक्ष संबंध या भावकर्माशी जीवाच्या शुभ-अशुभ परिणामाशी असतो. यालाच भावसंसार म्हणतात. जीव आपल्या शुभ-अशुभ परिणामानी परिणत होतो, भावकर्माशी बद्ध होतो व त्याचे निमित्त मात्र अवलंबन घेऊन पुद्गलकर्म स्वयमेव द्रव्यकर्मरूप परिणमते व त्यामुळे जीवाशी कर्माचा संयोगसंबंध घडून येतो. असा यांचा निमित्तनैमित्तिक संबंध सहजगत्या घडून येतो. अर्थात् जीवाचा द्रव्यकर्माशी संयोग घडून येणे हे सर्वस्वी जीवाच्या भावकर्म बंधनावर शुभ-अशुभ-परिणामावर अवलंबून आहे.

जेव्हा जीवाला आपल्या शुद्ध ज्ञानदर्शन स्वभावाचे भान होते, जाणीव होते, रुचि-प्रतीति होते त्यावेळी जीव शुभ-अशुभ परिणामरूपाने न परिणमता आपल्या शुद्ध ज्ञानदर्शन स्वभावात वीतरागज्ञान स्वभावात स्थिर

१. निरपेक्षा नया मिथ्या । सापेक्षा. वस्तु तेऽर्थकृत् ॥

होतो. तेव्हा जीवाचा भावकर्मांशी शुभ-अशुभ परिणामाशी बंध न झाल्यामुळे नवीन द्रव्यकर्मांना देखील बंध होत नाही व पूर्वी बांधलेले कर्म देखील आपली स्थिति संपल्यानंतर उदयास येऊन फल देऊन निघून जाते.

त्या कर्मोदय फलाशी संगत-समरस होणे किंवा न होणे हे जीवाच्या वर्तमान पुरुषार्थावर अवलंबून असते. जर जीवाने भेद विज्ञान पुरुषार्थाने त्या कर्मोदय विपाकाला आपला स्वभाव न समजता त्याचेशी संगति ठेवली नाही, शुभ-अशुभ-भावरूपाने न परिणमता शुद्ध ज्ञानदर्शन उपयोग रूपाने परिणमन केले तर त्याला नवीन कर्मांचा आस्रव बंध होत नाही. नवीन कर्मांचे येणे बंद होते व पूर्वी बांधलेले कर्मांची उदीरणा होऊन फल न देता तसेच निघून जाते. याप्रमाणे संपूर्ण पूर्वबद्ध कर्मांचा अभाव झाला असता जीव कर्मांपासून सर्वथा मुक्त होतो. आपल्या शुद्ध ज्ञानदर्शन स्वभावात अविचल स्थिर होतो यालाच जीवाची आत्यंतिक संसाराचा अंत होणारी सिद्ध अवस्था म्हणतात.

यद्यपि जीव स्वयं कर्माच्या वश होऊन नानाविध दुःख भोगतो, नानाविध स्वभाव विरुद्ध क्रिया करतो, त्यामुळे कर्मांचे माहात्म्य सांगताना कर्मच जीवाला नाना गतीमध्ये, नाना योनीमध्ये भ्रमण करविते, कर्म जीवाला झोप आणते, कर्मच जीवाला गमन करविते, असे म्हटले जाते. " कर्म बलवान मोठे चुकेना भोगाविण कोठे " असे कर्मांचे सामर्थ्य दाखविले जाते, की जेव्हा जीवाचा पुरुषार्थ कमी असतो जेव्हा जीव पुरुषार्थ हीन-नपुंसक बनतो.

परंतु वास्तविक कर्म हे जड आहे. जीव हा चेतन आहे जीवाला जेव्हा आपल्या अद्भुत चैतन्य शक्तीची जाणीव होते व जीव जेव्हा आपली चैतन्य शक्ती सर्वस्वी पणास लावतो तेव्हा ज्ञानी जीव पूर्वी अनेक भवात संचित केलेले कर्म एका क्षणात नष्ट करू शकतो. जीवाच्या चैतन्य शक्तीमध्ये फार मोठे सामर्थ्य आहे. ते भगवान महावीरांनी आपल्या प्रत्यक्ष कृतीने प्रात्यक्षिक अनुभवाने जगास दाखवून दिले.

५) समतावाद– जैनदर्शनाने समतावादाचा तत्त्वसिद्धांत अगाम सांगितला. प्रत्येक जीव समान आहे. प्रत्येकामध्ये परमात्मा बनण्याचे अनंत सामर्थ्य विद्यमान आहे. या शरीराच्या संयोगाने आपण जीवात उच्च-नीच भेद मानतो. तो केवळ मनःशुद्धि, परिणामाची शुद्धि ही बाह्य शरीर शुद्धीवर, बाह्य संगतीवर अवलंबून असते. म्हणून बाह्य शरीर शुद्धीचा लोप न व्हावा या हेतूने जरी तो आवश्यक असला तरी त्यापासून विषमतेचे जे विष उत्पन्न होते ते उत्पन्न न होऊ देण्याची देखील दक्षता ठेवणे नितांत आवश्यक आहे.

'समता सर्वभूतेषु' सर्व प्राणीमात्राविषयी समता बुद्धी ठेवणे हे जैनदर्शनाने आत्मोन्नतीचे प्रमुख साधन मानले आहे, इष्ट-अनिष्ट बुद्धि राग-द्वेषरूप बुद्धी हा विषमभाव आहे. हा अधर्म आहे, हा अन्याय आहे, समताभाव हा समाजवाद आहे. हा नीतिधर्म आहे. उच्च-नीच, गरीब-श्रीमंत, लहान-मोठा असा भेद मानणे हा विषमवाद आहे, ही हुकुमशाही आहे.

व्यक्ति तितक्या प्रकृति, प्रकृति तितके भेद. हे तत्त्व जरी निसर्गतः खरे असले तरी व्यक्तीमध्ये समष्टि, व्यक्तिभेदामध्ये देखील व्यक्तिसामान्य, जातिभेदामध्ये देखील जातिसामान्य, अनेकामध्ये देखील एकत्व हे सामावलेले असते. एकत्वाशिवाय अनेकत्वाचे अस्तित्व नाही व अनेकत्वाशिवाय एकत्वाचे अस्तित्व राहू शकत नाही. याप्रमाणे विषमवादामध्ये देखील समतावाद हे अलौकिक परम गहन तत्त्व आहे. दोहोमध्ये परस्पर अविनाभाव आहे. एकाशिवाय दुसऱ्याचे अस्तित्व राहू शकत नाही. 'अशेष विशेष निष्ठं हि सामान्यं' सामान्य हे आपल्या संपूर्ण विशेषामध्ये व्यापक असते. त्यातच त्याची शोभा आहे. 'विशेषनिरपेक्षं सामान्यं भवेत् शशविषाणवत्' विशेष रहित सामान्य हे शशशृंगाप्रमाणे अभावरूप-अवस्तुरूप ठरते.

तक्रामध्ये संघर्ष निर्माण झाल्याशिवाय त्यातून लोणी निघू शकत नाही. त्याप्रमाणे विषमवादाशिवाय समतावाद निर्माण होऊ शकत नाही. तथापि विषमवादातून समतावादरूप मक्खन काढण्यातच त्या विषमवादाचे खरे महत्त्व, खरी शोभा आहे.




अंध.काराशिवाय प्रकाशाचे महत्त्व दिसून येत नाही हे जरी खरे असले तरी अंधकार हा कोणालाही इष्ट वाटत नाही, शोभादायक वाटत नाही तसाच विषमवाद हा कोणालाही शोभादायक इष्ट वाटत नाही. समतावाद हाच सर्वांना मंगलकारी, इष्ट वाटतो.

समतावाद हे वस्तूचे प्रकृतिसिद्ध स्वाभाविक रुप आहे. विषमता हे वस्तूचे प्रकृतिविरुद्ध विभावरूप आहे. समतावाद हा मंगलकारी-शांति-सुख निर्माण करणारा आहे. विषमता ही अमंगलकारी-अशांति-दुःख निर्माण करणारी आहे.

६) वस्तुस्वातंत्र्यवाद– जैनदर्शनाने प्रत्येक वस्तूचे अस्तित्व स्वतंत्र भिन्न भिन्न मानले आहे. प्रत्येक वस्तूला आपले स्वतंत्र अस्तित्व जीवन जगण्याचा अधिकार आहे. दुसऱ्या वस्तूवर आपले प्रभुत्व-स्वामित्व गाजविणे, परपदार्थाविषयी शरीर-धन-धान्य-पुत्र-मित्र-कलत्र इत्यादीविषयी एकत्वबुद्धि-ममत्वबुद्धि ठेवणे हा जैन दर्शनाने मोठा अन्याय अधर्म मानला आहे. त्यालाच मोह-मिथ्यात्व-अज्ञान म्हटले आहे. मिथ्यात्व अर्थात् परपदार्थाचे स्वतंत्र अस्तित्वाचा लोप करण्याची ही राक्षसी वृत्ति याला महापाप म्हटले आहे.

कोणत्याही वस्तूला आपले अस्तित्व जीवन जगण्यासाठी दुसऱ्या वस्तूच्या सहाय्याची मुळीच अपेक्षा नाही. प्रत्येक वस्तु आपल्या स्वतंत्र अस्तित्व शक्तीने आपले स्वतंत्र अस्तित्व जीवन जगण्यास समर्थ आहे. ईश्वर आहे. स्वाधीन आहे. स्वतंत्र आहे. पराधीन परतंत्र नाही. प्रत्येक वस्तु स्वतःसिद्ध आहे म्हणून ती स्वतंत्र आहे. तिचे परिणमन देखील स्वत.सिद्ध नियत सुव्यवस्थित क्रमबद्ध आहे. तिचे नियत क्रमबद्ध परिवर्तन मागे-पुढे करण्यास जगातील कोणतीही वस्तु किंवा कोणतीही शक्ति समर्थ नाही.

वस्तु स्वातंत्र्यवाद हा शांति-सुख निर्माण करणारा आहे. वस्तूचे परिणमन आपल्या इच्छेप्रमाणे मागे-पुढे करण्याची खोटी आशा बाळगणे, त्यासाठी खोटा पुरुषार्थ करणे हेच जीवाच्या अशांति-दुःखाचे मूळ कारण आहे.

पराधीनता– दुसऱ्यावर आक्रमक वृत्ति जगात संघर्ष निर्माण करणारी आहे.

१) प्रत्येक वस्तूचे परिणमन आपल्या स्वद्रव्य शक्ति सामर्थ्याने होते.

२) प्रत्येक वस्तूचे परिणमन आपल्या नियत स्वक्षेत्र प्रदेश मर्यादेत होते. दुसऱ्या द्रव्याच्या क्षेत्र मर्यादेत प्रवेश करून आक्रमण करून दुसऱ्या द्रव्याचे परिणमन करवू शकत नाही.

३) प्रत्येक वस्तूचे परिणमन आपल्या नियत क्रमबद्ध स्वकालीच होते. मागे-पुढे होत नाही

४) प्रत्येक वस्तूचे परिणमन आपल्या नियत स्वभावांच्या पुरुषार्थानेच होते. असा वस्तूचा वस्तुगत स्वत.सिद्ध स्वभाव आहे.

याप्रमाणे जैन दर्शनाने वस्तूतील वस्तुगत स्वतःसिद्ध स्वभाव गुणधर्माचे यथार्थ ज्ञान करून घेऊन जगाला मार्गदर्शन केले. शांति सुखाचा मार्ग दाखविला. जैनदर्शनाने सांगितलेले वस्तुगत तत्त्वसिद्धांत सर्व जीवांना लोकमंगलकारी आहेत. प्रत्येक मुमुक्षु जीवाने या तत्त्वसिद्धांताचा अभ्यास-तत्त्वचिंतन-मनन करणे हाच साध्यसिद्धीचा एकमेव मार्ग आहे. 'नान्यथा साध्यसिद्धिः' याशिवाय साध्यसिद्धीचा दुसरा मार्ग नाही.



# पारमेश्वरी पदार्थ व्यवस्था

जैनदर्शनाने अन्यमताप्रमाणे ईश्वर नामक अचित्यशक्ति मानून विश्वाची उत्पत्ति-स्थिति-लय ईश्वराच्या आधीन-पराधीन परतंत्र अशी पदार्थव्यवस्था मानली नाही.

विश्वातील प्रत्येक पदार्थ स्वत.सिद्ध, अकृत्रिम अनादिनिधन आहे. पदार्थांच्या समूहालाच विश्व म्हणतात. म्हणून विश्व देखील स्वतःसिद्ध-अकृत्रिम-अनादिनिधन आहे.

जैनदर्शनाने देखील या पदार्थ व्यवस्थेला पारमेश्वरी[1] म्हटले आहे. परंतु जैनदर्शनाने सर्व पदार्थांची स्वतंत्र सत्ता हिरावून घेणारी, सर्व पदार्थांना पारतंत्र्यात टाकणारी अशी ईश्वर कल्पना मान्य केली नाही. त्यामुळे अन्यमती जैन दर्शनाला अनीश्वरवादी नास्तिक म्हणतात.

परंतु जैनदर्शन अनीश्वरवादी-नास्तिक नसून वास्तविक वस्तुनिष्ठ परमेश्वर मानणारे ईश्वरवादी आस्तिक दर्शन आहे हे जैनदर्शनाने सप्रमाण सिद्ध केले आहे.

प्रत्येक वस्तु स्वत.सिद्ध आहे. स्वाधीन-स्वतंत्र आहे. आपली पर्यायसृष्टि निर्माण करण्यास स्वयं समर्थ-परमेश्वर आहे. पराधीन-परतंत्र-अन्यईश्वराधीन नाही. ह्या ईश्वर सृष्टिकर्तृत्ववादाचा खरा अभिप्राय आहे हे जैनदर्शनाने सप्रमाण सिद्ध केले आहे. [2]प्रत्येक वस्तूचे अस्तित्व हे स्वतःसिद्ध लक्षण आहे. अस्तित्व लक्षण व वस्तु लक्ष्य असा लक्ष्य-लक्षण भेद देखील केवळ वाचनिक-सांगण्यापुरता आहे. पदार्थ स्वयं अस्तित्वमय आहे.

अग्नीचे लक्षण उष्णत्व असा लक्ष्य-लक्षण भेद केवळ वाचनिक सांगण्यापुरता आहे. वास्तविक अग्नि स्वयं स्वतःसिद्ध उष्णमय आहे. त्याप्रमाणे प्रत्येक पदार्थ स्वयं स्वतःसिद्ध अस्तित्वमय आहे. ज्याअर्थी प्रत्येक पदार्थ स्वतःसिद्ध आहे त्याअर्थी तो १) अनादि २) अनिधन ३) स्वसहाय ४) निर्विकल्प या चार विशेषणानी युक्त आहे. जो पदार्थ स्वतःसिद्ध बनलेला आहे, त्याला आदि-प्रारंभ-उत्पत्ति नसते. त्याला अंत देखील नसतो.

१) असत्‌चा कधीही उत्पाद होत नाही म्हणून प्रत्येक पदार्थ अनादि आहे.

२) सत्‌चा कधीही नाश होत नाही म्हणून प्रत्येक पदार्थ अनिधन आहे.

३) प्रत्येक पदार्थ स्वतःसिद्ध आहे म्हणून तो स्वसहाय-स्वाधीन-स्वतंत्र आहे, परसहाय-पराधीन-परतंत्र नाही. यावरून वस्तु स्वातंत्र्यवाद सिद्ध होतो.

४) प्रत्येक पदार्थ हा निर्विकल्प-अखंड-अद्वैत-अभेदस्वरूप आहे. जगाला अद्वैत-ब्रह्ममय मानून जगातील सर्व पदार्थ त्या ब्रह्माचे अवयव मानणे हा अन्यमताचा ब्रह्माद्वैतवाद वस्तुनिष्ठ नसून प्रत्यक्षप्रमाण विरुद्ध ठरतो.

जैनदर्शनाने द्वैतनिरपेक्ष अद्वैतवाद वस्तुनिष्ठ न मानता द्वैतसापेक्ष अद्वैतवाद हा वस्तूनिष्ठ मानला आहे. जैनदर्शनाने ही वस्तूमधील द्वैत-अद्वैत व्यवस्था दोन प्रकाराने सिद्ध केली आहे. प्रत्येक वस्तूमध्ये जो स्वतःसिद्ध अस्तित्वधर्म आहे त्याचे वर्णन दोन प्रकाराने केले आहे. १) स्वरूपास्तित्व, २) सादृश्यास्तित्व. प्रत्येक वस्तूमध्ये हे दोन्ही प्रकारचे अस्तित्व अविरोध-अविनाभावी-परस्पराशिवाय-एकमेकाशिवाय न राहणारे असे सुसंगत सप्रमाण सिद्ध केले आहे.

१) जे अस्तित्व एकव्यक्तिनिष्ठ असते, केवळ एकच वस्तूमध्ये व्यापून असते ते स्वरूपास्तित्व होय. जसे— एक जीवाचे अस्तित्व त्याच जीवामध्ये व्यापून असते एक परमाणूचे अस्तित्व त्याच परमाणूमध्ये व्यापून असते.

---

१. इय हि सर्व पदार्थांना द्रव्यगुणपर्यायस्वभाव प्रकाशिका पारमेश्वरी व्यवस्था साधीयसी । ( प्रवचनसार गाथा ९३ )

२ तत्त्व सल्लाक्षणिक सन्मात्र वा यत स्वत सिद्ध । तस्मात् अनादि निधन, स्वसहाय निर्विकल्प च ॥ (पचाध्यायी)




२) जे अस्तित्व अनेक व्यक्तीमध्ये जातिनिष्ठ समानता दाखविणारे असते ते सादृश्यास्तिव होय. जसे– अनेक जीवामध्ये जीवत्व सामान्य समानता दाखविणारे आहे. अनेक परमाणूमध्ये पुद्गलत्व सामान्य समानता दाखविणारे आहे.

**१) सादृश्यास्तित्व–** जगातील सर्व पदार्थाकडे सत्-सामान्य दृष्टीने पाहण्याची जी उच्च पातळी-विशाल दृष्टिकोण त्या अपेक्षेने संपूर्ण जगास एक सत्-ब्रह्मरूपाने अद्वैतरूपाने पाहणे हा खरा सुसगत वस्तुनिष्ठ अद्वैतवाद होय. ही ज्ञानाची सर्वोत्कृष्ट अंतिम सीमा मानली जाते. या अद्वैतदृष्टीमध्ये हे जीवसत्, हे अजीवसत् ही देखील द्वैतदृष्टि-भेददृष्टि वस्तूकडे पाहण्याची हीन पातळी राहात नाही, ती गौण असते. संपूर्ण पदार्थसत्‌ला एक अखंड समानसत् रूपाने पाहण्याची जी विशालदृष्टि तो जैनदर्शनाने खरा वस्तुनिष्ठ अद्वैतवाद मानला आहे. परंतु हा अद्वैतवाद द्वैतसापेक्ष आहे.

ही समानता किंवा एकता असमानता-अनेकता सापेक्ष असते. असमानतेमध्ये समानता पाहणे, अनेकामध्ये एकता पाहणे, असमानतेला किंवा अनेकतेला गौण ( अविवक्षित ) करून समानतेला-एकतेला मुख्य विवक्षित करणे हा अनेकान्त जैनदर्शनाचा द्वैतसापेक्ष अद्वैतवाद वस्तुनिष्ठ खरा सुसंगत अद्वैतवाद म्हटला जातो.

**२) स्वरूपास्तित्व–** जैनदर्शनाने व्यक्तिनिष्ठ स्वरूपास्तित्वरूपाने देखील हा द्वैतसापेक्ष-अद्वैतवाद वस्तुनिष्ठ मानला आहे. प्रत्येक वस्तु वस्तुसत्-एकव्यक्तिसत्‌रूपाने अखंड-अभेद-अद्वैत आहे. तथापि त्यामध्ये उत्पाद-व्ययरूपाने अध्रुव अंश (पर्याय अंश) व ध्रुवरूपाने ध्रुव अंश (द्रव्य गुण अंश) असा द्वैतसापेक्ष अद्वैतवाद वस्तुनिष्ठ मानला आहे.

प्रत्येक वस्तु अनेकान्तात्मक-उभयधर्मात्मक-सामान्य-विशेष धर्मात्मक आहे. वस्तूचा सामान्यधर्म (द्रव्यधर्म-गुणधर्म) हा अद्वैत-ध्रुव असतो. वस्तूचा विशेषधर्म (पर्याय धर्म) द्वैतरूप अध्रुव असतो. वस्तूमधील सामान्य धर्म जरी अद्वैत एकरूप असतो तथापि क्षेत्ररूपाने व कालरूपाने तो देखील दोन-प्रकारचा आहे. १) विस्तार सामान्य, २) आयतसामान्य.

**१) विस्तारसामान्य–** ( विस्तार = क्षेत्र ) आपल्या सर्व प्रदेशक्षेत्रामध्ये अखंड व्यापून असणारे जे एकसत् सामान्य ते विस्तार सामान्य होय. प्रत्येक वस्तु अखंड असताना देखील वस्तूमध्ये दोन प्रकार आहेत. १) अणुद्रव्य, २) महत्‌द्रव्य.

१) पुद्गल परमाणु व कालाणु एक प्रदेशी हे अणुद्रव्य आहेत. ज्याना लांबी-रुंदी नसते, त्याना निरवयव अप्रदेशी अणुद्रव्य म्हणतात.

२) बाकीची द्रव्ये– जीव-धर्म-अधर्म-आकाश ही बहुप्रदेशी आहेत. त्याना महत् द्रव्य म्हणतात. त्याना लांबी-रुंदी असते. त्याना सावयव किंवा 'अस्तिकाय' असे विशिष्ट नाव आहे. अस्तिकाय द्रव्ये पाच आहेत. यद्यपि ५ अस्तिकायामध्ये पुद्गल द्रव्याचा समावेश केला आहे. तथापि पुद्गल द्रव्य वास्तविक एकप्रदेशी अणुद्रव्य असल्यामुळे अस्तिकाय नाही. तथापि अनेक परमाणूचा स्कंध बनून बहुप्रदेशी बनू शकतो. म्हणून उपचारनयाने पुद्गल द्रव्याला अस्तिकाय म्हटले आहे. आकाशाचा[१] जेवढा भाग एक पुद्गल परमाणु व्यापतो त्याला 'प्रदेश' ही संज्ञा दिली आहे. आपल्या सर्व प्रदेशामध्ये प्रत्येक द्रव्याचे क्षेत्र अपेक्षेने अखंड एक द्रव्य रूपाने राहणे हे प्रत्येक द्रव्याचे विस्तार सामान्य होय. [२]धर्मद्रव्य-अधर्मद्रव्य व प्रत्येक जीव द्रव्य यांचे लोकाकाशप्रमाण असंख्यात प्रदेश आहेत. [३]आकाश द्रव्याचे अनंत प्रदेश आहेत. [४]पुद्गल परमाणु कालाणु एक प्रदेशी द्रव्य आहे. या अनेक प्रदेशामध्ये प्रत्येक द्रव्याचे जे अखंड एक सत् सामान्य ते प्रत्येक द्रव्याचे विस्तार सामान्य होय.

१. जावदियं आयासं अविभागी पुग्गलाणुवट्टद्धं । तं खु पदेसं जाणे, सव्वाणुट्ठाण दाणरिहं ॥ ( द्रव्यसंग्रह )
२. असंख्येया प्रदेशाः धर्माधर्मैकजीवानाम् ॥ ( तत्त्वार्थसूत्र ) ३. आकाशस्यानंताः ॥ ४. नाणोः ।




२) आयत सामान्य– आयत म्हणजे लांबी कालक्रमाने प्रत्येक समयाला पर्यायरूपाने परिवर्तन होणारी जो पदार्थाची अमर्याद व अनंत (कधीही न संपणारी) काल मर्यादा. त्या सर्व पर्यायामध्ये प्रत्येक द्रव्याचे समान अस्तित्व ते आयत सामान्य होय. प्रत्येक पदार्थ प्रत्येक समयाला सद्विशेष रूपाने पर्यायरूपाने परिणमन करीत असताना देखील प्रत्येक द्रव्य आपल्या सर्व पर्यायामध्ये सत् सामान्य रूपाने अखंड एक द्रव्यान्वयपणा-सामान्यपणा कायम ठेवणे त्याला आयत सामान्य म्हणतात. याप्रमाणे प्रत्येक वस्तूमधील सामान्यधर्म हा क्षेत्र अपेक्षेने विस्तार सामान्य रूप व काल अपेक्षेने आयत सामान्य रूप असा दोन प्रकारचा असतो. तसाच प्रत्येक वस्तूमध्ये विशेषधर्म देखील दोन प्रकारचा आहे. १) विस्तार विशेष (सहभावी विशेष), २) आयत विशेष (क्रमभावी विशेष).

१) **विस्तार विशेष**–प्रत्येक पदार्थामध्ये जे अनंत शक्तिविशेष गुण, सामर्थ्यविशेष त्याना विस्तार विशेष म्हणतात. हे विस्तार विशेष प्रत्येक द्रव्यामध्ये युगपत् असतात म्हणून त्याना सहभावी विशेष असे दुसरे नाव आहे. हा द्रव्याचा जो प्रदेशरूप क्षेत्र विस्तार आहे त्या संपूर्ण प्रदेश क्षेत्र विस्तारामध्ये प्रत्येक गुण व्यापून असतो. म्हणून याना विस्तार विशेष हे नाव दिले आहे. हे विस्तार विशेष गुण देखील दोन प्रकारचे आहेत. १) सामान्य गुण, २) विशेष गुण.

१) सामान्यगुण– जे गुण सर्व द्रव्यात समान असतात त्यास सामान्यगुण म्हणतात. जसे– अस्तित्व-वस्तुत्व-द्रव्यत्व-प्रमेयत्व-अगुरुलघुत्व-प्रदेशत्व वगैरे.

२) विशेषगुण– जे आपापल्या द्रव्यातच व्यापून असतात. इतर द्रव्यात राहात नाहीत. त्याना विशेषगुण म्हणतात. प्रत्येक द्रव्याचे विशेषगुण वेगवेगळे असतात. यावरून प्रत्येक द्रव्य एकमेकापासून भिन्न वेगळे ओळखले जाते.

१) जीव द्रव्याचे विशेषगुण– ज्ञान-दर्शन-सुख-वीर्य वगैरे अनंतगुण.[१]
२) पुद्गल द्रव्याचे विशेष गुण– स्पर्श-रस-गंध-वर्ण वगैरे अनंत गुण.[२]
३) धर्म द्रव्याचे विशेष गुण– गति हेतुत्व वगैरे.[३]
४) अधर्म द्रव्याचे विशेष गुण– स्थिति हेतुत्व वगैरे.[४]
५) आकाश द्रव्याचे विशेष गुण– अवगाहन हेतुत्व वगैरे.[५]
६) काल द्रव्याचे विशेष गुण– वर्तना हेतुत्व वगैरे.[६]

याप्रमाणे प्रत्येक द्रव्याचे सामान्य गुण व विशेष गुण हा सर्व प्रत्येक द्रव्याचा विस्तार विशेष होय.

२) आयत विशेष– कालक्रमाने प्रत्येक समयाला होणारे जे परिणमन विशेष पर्याय विशेष त्याना आयत विशेष म्हणतात. हे पर्याय विशेष नियत-क्रमबद्ध नियमाने होतात. मागे पुढे होत नाहीत किंवा युगपत् एकदम होत नाहीत. म्हणून याना क्रमभावी विशेष हे दुसरे नाव आहे. हे आयत विशेष (पर्याय) देखील दोन प्रकारचे आहेत– १) द्रव्य पर्याय, २) गुण पर्याय. द्रव्य पर्याय देखील दोन प्रकारचा आहे– १) एक द्रव्य पर्याय, २) अनेक द्रव्य पर्याय.

१) एक द्रव्य पर्याय– प्रत्येक द्रव्याचा जो प्रदेशवत्व गुण आहे त्यामुळे प्रत्येक समयाला द्रव्याचा जो विशिष्ट आकार बदलत असतो त्यास एक द्रव्य पर्याय म्हणतात. यालाच व्यंजन पर्याय असे दुसरे नाव आहे. व्यंजन म्हणजे व्यक्त. या व्यंजन पर्यायाने द्रव्य क्षेत्राच्या अपेक्षेने आकाराने लहान-मोठे केवढे आहे हे ओळखले जाते. म्हणून यास व्यंजन पर्याय म्हणतात.

---

१. उपयोगो लक्षणं (जीवस्य) । २. स्पर्शरसगंधवर्णवन्तः पुद्गलाः । ३-४. गतिस्थित्युपग्रहौ धर्माधर्मयोरुपकारः । ५. आकाशस्यावगाहः । ६. वर्तना परिणाम क्रिया परत्वा परत्वे च कालस्य ॥ (तत्वार्थसूत्र)





अहमेको न मे कश्चिन्नैवाहमपि कस्यचित् । इत्यदीनमनाः सम्यगेकत्वमपि भावयेत् ॥




१) प्रत्येक जीव द्रव्याचा एक द्रव्य पर्याय भिन्न भिन्न स्वतंत्र आहे. प्रदेशाच्या अपेक्षेने प्रत्येक जीव लोकाकाश प्रमाण असंख्यात प्रदेशी आहे. तथापि जीवाच्या प्रदेशामध्ये संकोच विस्तार शक्ती असल्यामुळे प्रत्येक जीवाचा एक द्रव्य पर्याय (व्यंजनपर्याय-आकार) आपापल्या शरीर प्रमाणाएवढा आहे. विशिष्ट काळी समुद्घात[1] करतानाच जीवाचे प्रदेश शरीराच्या बाहेर शृंखलाबद्ध रूपाने (साखळी रूपाने) बाहेर पडतात. इतर वेळी जीव आपल्या शरीराएवढा असतो. तो त्याचा एक द्रव्य पर्याय होय.

१) वेदना समुद्घात– शरीरात रोगादिकाची तीव्र वेदना झाली असताना जीव प्रदेश बाहेर पडतात. रोगशामक वनस्पति औषधीला स्पर्श करून पुनः शरीरात प्रवेश करतात. तो वेदना समुद्घात होय.

२) कषाय समुद्घात– तीव्र कषायाचा उदय झाला असताना जीवाचे प्रदेश बाहेर पडतात. शत्रूचा घात करून पुनः शरीरामध्ये प्रवेश करतात.

३) वैक्रियिक समुद्घात– वैक्रियिक शरीरधारी जीवाच्या शरीरातून आत्मप्रदेश बाहेर पडतात, नानारूपे धारण करतात. पुनः शरीरामध्ये प्रवेश करतात.

४) मारणांतिक समुद्घात– मरणापूर्वी जीवाचे प्रदेश बाहेर पडून नवीन उत्पत्तिस्थानाला स्पर्श करून पुनः शरीरामध्ये प्रवेश करतात. नंतर जीव मरून तेथे जातो.

५) तैजस समुद्घात– तैजस ऋद्धिधारी मुनीच्या शरीरातून तैजस शरीररूप आत्मप्रदेश बाहेर पडतात ते दुसऱ्याचे (शुभ तैजस) रक्षण किंवा (अशुभ तैजस) नाश करतात. पुनः शरीरात प्रवेश करतात.

६) आहार समुद्घात– आहारक ऋद्धिधारी मुनीच्या शरीरातून काही तत्त्वशंका उत्पन्न झाल्यास आहारक शरीराचा पुतळा बाहेर पडतो. केवली किंवा श्रुतकेवलीजवळ जातो त्यांची तत्त्वशंका दूर होते. नंतर तो पुनः शरीरामध्ये प्रवेश करतो.

७) केवली समुद्घात– केवली भगवान् जेव्हा मोक्षास जातात त्यापूर्वी आयुकर्म स्थिति कमी व इतर अघातिकर्माची स्थिति जास्त असते तेव्हा ती स्थिति कमी करण्यासाठी आत्मप्रदेश बाहेर पडतात. १) पहिल्या समयात १४ राजू प्रमाण ऊंच दंडाकार होतात. २) दुसऱ्या समयात रूंद प्रतराकार (पडद्याप्रमाणे) होतात. ३) तिसऱ्या समयात जाड कपाटाकार होतात. ४) चवथ्या समयात लोक पूरण होतात. ५) पाचव्या समयात पुनः कपाटाकार. ६) सहाव्या समयात प्रतराकार. ७) सातव्या समयात दंडाकार. ८) आठव्या समयात शरीरात प्रवेश करून मुक्त होतात.

२) अनेक द्रव्यपर्याय– याचे दोन प्रकार आहेत. १) समान जातीय २) असमान जातीय.

१) समान जातीय– हा समान जातीय अनेक द्रव्यपर्याय केवल पुद्‌गल द्रव्यामध्येच होतो. दोन किंवा दोहोपेक्षा जास्त अनेक परमाणूंचा स्निग्ध-रूक्ष गुणामुळे जो स्कंधरूप स्थूलरूपाने एक पर्याय बनतो तो समान जातीय अनेक द्रव्यपर्याय होय. यामध्ये देखील प्रत्येक परमाणूचे एक द्रव्यपर्यायरूप सूक्ष्म परिणमन स्वतंत्र भिन्न भिन्न होत असते. ते परमाणु स्थूलरूपाने बंधरूप एक पर्याय धारण करून जगाला आपले सुंदर-असुंदर रूप दाखवून अज्ञानी जीवाला मोहित करतात. अज्ञानी जग या अनेक पुद्‌गलांचे तावत्काल एक वेष धारण करणारे पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे तावत्काल दिसणारे पण वास्तविक वस्तुरूप नसणारे क्षणिक रूप पाहून मोहित होते. त्याला इष्ट-अनिष्ट समजून त्यावर राग-द्वेष करते. तोच या जगाचा हा मायाजाळ संसार होय. ज्ञानी-वृद्ध जीव या अनेक द्रव्यपर्यायाचे क्षणिकरूप ओळखून त्यावर मोहित होत नाही. तो त्या स्कंधाला परमाणु परमाणुरूप यथार्थ वस्तुदृष्टीने पाहतो. त्याची वस्तुनिष्ठ यथार्थदृष्टी असते. त्यामुळे त्या पदार्थाविषयी राग–द्वेष, मोह करीत नाही. तो पदार्थ जसा आपल्या स्वरूपात आहे तसा ज्ञानी आपल्या ज्ञान–दर्शन स्वभावात स्थिर होतो तेव्हा तो

---

१. समुद्घात– मूल शरीराला न सोडता जीवाचे प्रदेश शरीराच्या बाहेर पडणे याला समुद्घात म्हणतात. समुद्घात सात प्रकारचा आहे वेयण कसाय वेगुव्विय-मारणांतिओ समुग्घादो । तेजाहारो छठ्ठो सत्तमओ केवलीणं तु ॥

सर्व पदार्थाचा खरा ज्ञाता-द्रष्टा बनतो. पदार्थाचे ज्ञान करून पदार्थावर मोहित न होता, पदार्थाविषयी इष्ट-अनिष्ट बुद्धि राग–द्वेष परिणाम न करता परम उदासीन–वीतराग विज्ञान भावाने त्यांचा ज्ञाता–द्रष्टा बनणे हे खरे पदार्थविज्ञान होय. जैन दर्शनाचे पदार्थविज्ञान लौकिक पदार्थविज्ञानाहून वेगळे अलौकिक स्वरूपाचे आहे. हे जैनदर्शनाचे असाधारण वैशिष्टच होय.

२) **असमान जातीय अनेक द्रव्यपर्याय–** जीव व पुद्गल यांचे यथार्थ वस्तुस्वरूप न ओळखल्यामुळे अनादिकालापासून हा जीव आपल्या अज्ञान अपराध दोषाने राग–द्वेष–मोह भावकर्मांनी–विकारभावाने बद्ध होतो. त्यामुळे कर्म–नोकर्मांशी बद्ध होऊन या चतुर्गतिरूप संसारामध्ये देव–मनुष्य–तिर्यंच–नरकगतीमध्ये नानाविध रूप धारण करतो. तो असमानजातीय– ( जीव व पुद्गलाचा मिळून ) एकरूप दिसणारा पण वास्तविक वस्तुस्वरूप नसणारा अनेक द्रव्यपर्याय होय.

या अनेक द्रव्यपर्यायाला अनेकरूप भिन्न भिन्न वेगवेगळे न समजता एकरूप समजणे ही पर्यायमूढता आहे. हा तत्वभ्रम आहे. आत्मा व अनात्मा ( अजीव ) यांचे लक्षणभेदावरून त्यांना भिन्न भिन्न ओळखणे हे भेदविज्ञान यथार्थ तत्त्वदर्शन आहे. तत्त्वभ्रम अज्ञान हे संसारभ्रमणाचे मूळ कारण आहे. यथार्थ तत्वदर्शन संसार भ्रमणातून मुक्त होण्याचा उपाय आहे.

२) **गुणपर्याय–** प्रदेशत्व गुणाशिवाय बाकीच्या प्रत्येक गुणाचे जे प्रत्येक समयाला होणारे परिणमन तो गुणपर्याय होय.

याचे दोन भेद आहेत– १) स्वभावगुणपर्याय, २) विभावगुणपर्याय.

१) **स्वभाव गुणपर्याय–** वस्तूचा जो ध्रुव गुणस्वभाव त्याचे लक्ष ठेवून त्याचा आश्रय घेऊन होणारे जे परिणमन तो स्वभाव गुणपर्याय होय. हा स्वभाव गुणपर्याय आपल्या ध्रुवस्वभावाच्या लक्षाने प्राप्त होतो म्हणून याला स्वसापेक्ष ( परनिरपेक्ष) स्वभावपर्याय म्हणतात.

२) **विभावगुणपर्याय–** परद्रव्य व परद्रव्याचे निमित्त घेऊन उत्पन्न होणारे जे राग-द्वेष मोहरूप विकारभाव परभाव यांचे लक्ष ठेवून होणारे जे स्वभावविरुद्ध परिणमन तो विभावगुणपर्याय होय.

याप्रमाणे प्रत्येक पदार्थ १) विस्तारसामान्य, २) आयातसामान्य, ३) विस्तारविशेष, ४) आयतविशेष यांचा समुदायरूप अखंड एकसत् आहे.

१ विस्तारसामान्य व आयतसामान्य याना दुसरे नाव ' द्रव्य ' हे आहे.

२ विस्तारविशेषाला दुसरे नाव ' गुण ' हे आहे.

३ आयतविशेषाला दुसरे नाव ' पर्याय ' असे आहे.

याप्रमाणे प्रत्येक वस्तु द्रव्य-गुण-पर्यायात्मक आहे. द्रव्य, गुण, पर्याय हे तीन वेगवेगळे सत् नसून एक सत्चे पूर्णस्वरूप समजण्यासाठी हे तीन प्रकाराचे वर्णन आहे. प्रत्येक वस्तु अनेकान्तात्मक– परस्पर विरुद्ध उभय धर्मात्मक आहे. सामान्य विशेष धर्मात्मक द्रव्य-गुण-पर्यायात्मक आहे. वस्तूचा सामान्यधर्म द्रव्य-गुणधर्म हा सदा अपरिणमनशील ध्रुव असतो. वस्तूचा विशेषधर्म, पर्यायधर्म हा प्रतिसमय उत्पाद-व्ययरूपाने परिणमनशील असतो.

प्रत्येक समयाला वस्तु नवीन पर्यायरूपाने उत्पन्न होते. पूर्वपर्यायरूपाने नष्ट होते. त्याचवेळी वस्तूचा द्रव्य-गुणधर्म ध्रुवरूपाने अपरिणमन शीलध्रुव–कायम असतो. म्हणून प्रत्येक वस्तु सत् उत्पाद–व्यय[1]–ध्रौव्यरूप त्रिलक्षणात्मक आहे. पर्यायरूपाने उत्पाद, व्ययरूपाने परिणमनशील व द्रव्यधर्म-गुणधर्मरूपाने ध्रुवरूप अपरिणमनशील असे परस्पर विरोधी धर्म एकाच वस्तूमध्ये युगपत् अविनाभावरूपाने अविरोध सिद्ध करणे हीच जैनदर्शनाची अनेकान्तात्मक पारमेश्वरी पदार्थ व्यवस्था वस्तुनिष्ठ सुसंगत व प्रमाणसिद्ध आहे. हे जैनदर्शनाने सप्रमाण सिद्ध केले आहे. हे जैनदर्शनाचे असाधारण वैशिष्ट्य आहे.

१ उत्पाद-व्यय ध्रौव्ययुक्त सत् (तत्वार्थसूत्र).

# जैनदर्शन : कार्यकारणभाव

## अनादि विश्वाची निर्मिती–

प्रत्येक दर्शनशास्त्रामध्ये विश्वाचा विचार स्वतंत्रपणे केला आहे, दृश्यमान विश्व–जगत ह्याच्या कर्ता-हर्ता कोणी आहे काय ? अशी जिज्ञासा प्राचीनकाळापासून तत्वचिंतकासमोर उभी आहे. या विचाराने तत्त्वचिंतकामध्ये दोन विभिन्न मान्यता निर्माण केल्या. काही वेदनिष्ठ दर्शनकार या विशाल सृष्टीच्या मागे कोणी महान शक्ती आहे ती सर्वव्यापक, सर्व शक्तिशाली व सर्वदर्शी असून तिला ते 'परब्रह्म' 'ईश्वर' इत्यादी शब्दानी व्यक्त करतात. त्यांचा तर्क असा की ह्या चराचर प्राण्याने युक्त अशा विश्वाच्या निर्मितीच्या मागे कोणी महान, अद्भुत, सामर्थ्ययुक्त व्यक्ती असली पाहिजे.[1] त्याशिवाय एवढा हा विश्वातला पसारा कसा निर्माण होईल ? कोणतेही सामान्य–किरकोळ कार्य होण्यास निमित्त लागते तर मग हा तर गुल्तर संरंभ आहे. म्हणून सृष्टीच्या या कार्याला कोणी तरी निर्माता चालना देणारा असावा, असा सरळ तर्क वेदनिष्ट दर्शनकारांचा आहे. सृष्टीकार्य व ईश्वर त्याचे कारण म्हणून कार्यकारण वादाचा जन्म झाला. तसेच सांख्यानी देखील आपल्या विशाल प्रकृति व पुरुष तत्वामध्ये कार्यकारणवाद दाखवून मूळ कारण प्रकृति आहे व ती पुरुषाच्या निर्मितीने सर्व चराचर विश्वाला जन्म देते, असे प्रतिपादिले आहे. ईश्वराच्या ठिकाणी 'प्रकृती' हे मूळ तत्त्व कल्पून आपल्या कार्यकारणवादाची आधारशिला टाकली आहे. पण 'ईश्वर' अशी बाह्य सत्ता त्यांनी मानली आहे. सांख्याच्या सत्कार्यवादाची मीमांसा सृष्टीकार्य व कारणावरच अधिष्ठित आहे. ईश्वराची कल्पना केल्याने अनेक प्रश्न उत्पन्न होतात. त्या सर्वांना उत्तर म्हणून जैनदर्शनकारानी आपला एक आगळा व तर्कसंगत विचार मांडला. त्या दर्शनाच्या द्रव्य, गुण व पर्याय या त्रिपुटीचे रहस्य जाणून घेतले तर त्यात सर्वच प्रश्नाना उत्तर मिळते.

## अनादित्व–

जैनदर्शनकारानी या दृश्यमान जगाचा कोणी निर्माता आहे ही गोष्ट प्रथमतः अमान्य केली आहे. ते अनादिकालापासून विद्यमान आहे व अनंत काळपर्यंत राहणार आहे. ही सृष्टी अकृत्रिम कल्पिलेली आहे. या जगाला कोणतीही शक्ति उत्पन्न करू शकत नाही किंवा नष्ट करू शकत नाही. म्हणून मूळतःच ते अविनश्वर आहे. सृष्टीच्या विषयी जैनाचार्यानी सखोल विचार केला व त्यातून त्याना सृष्टीचे अनादित्व अनंतत्व लक्षात आले. आचार्य कुंदकुंद यांनी या गोष्टीचे पंचास्तिकाय या ग्रंथात समर्थन केले आहे.

सत्ता सव्वपयत्था सविस्सरूवा अणंतपज्जाया । भंगुप्पादधुव्वा, सप्पडिवक्खा हवदी एक्का ॥ पंचास्ति गा.

अर्थात् जगाची सत्ता सर्व पदार्थात आहे. ती सत्ता जगातील प्रत्येक पदार्थात आहे, ती सत्ता अनंत पर्यायरूप आहे, ती सत्ता उत्पाद, व्यय व ध्रौव्यरूप आहे. ती सत्ता आपल्या प्रतिपक्षासहित आहे. प्रत्येक पदार्थात पर्यायामध्ये व गुणामध्ये अवांतर सत्ता असते.

याचा अर्थ असा जगात सर्वत्र द्रव्य आपल्या सत्तेने अस्तित्वात आहे. ही द्रव्याची सत्तारूप अवस्था जगत्–सृष्टीव्यवस्थेचे उत्तर आहे.

## सत् व्यवस्था–

जैनदर्शनामध्ये प्रत्येक पदार्थाची अस्तित्वरूपाने सत्ता मानलेली आहे. जो सत्पदार्थ आहे तो कधीही नष्ट होत नाही. कोणताही पदार्थ उत्पन्न करता येत नाही व नष्ट होत नाही. यामध्ये जे ध्रुवस्वरूप आहे ते द्रव्यातील अस्तित्व, वस्तुत्व गुणामुळे आहे. आचार्य समंतभद्र आपल्या स्वयंभू स्तोत्रात म्हणतात–

---

१. अज्ञो जन्तुरनीशोऽयं......स्वभ्रमेव वा–आप्तपरीक्षा.

नैवासतो जन्म सतो न नाशो, दीपस्तम्भः पुद्‌गल भावतोऽस्ति ॥

अर्थात् असत् पदार्थ कधी उत्पन्न होत नाही आणि सत् पदार्थ कधी नष्ट होत नाही. आचार्यांनी यासाठी एका दिव्याचे उदाहरण दिले आहे. दिवा जळतो तेव्हां अंधःकार दिसत नाही. पण दिवा विझला की अंधःकार दिसून येतो. या दोन्हीमध्ये एकाग्र व अंधःकार हे पद्‌गल पदार्थ आहेत. त्यात पुद्‌गल द्रव्याची नवीन उत्पत्ति होत नाही. तद्वत् जे विद्यमान आहे ते नष्टही होत नाही. दिवा तर प्रकाश किंवा अंधःकार संपला तरी आहेच. अंधःकार व प्रकाश ह्या पुद्‌गल द्रव्याच्या अवस्था आहेत.

भगवद्‌गीतेमध्ये द्रव्याचे नित्यत्व व अच्छेद्य, अभेद्यरूप सांगताना पण हेच म्हटले आहे–

नासतो विद्यते भावः नाभावो विद्यते सत. ।[1]

अर्थात् कोणतीही जगात नसलेली वस्तु उत्पन्न होत नाही व असलेली वस्तु नष्ट होत नाही. म्हणून वस्तूचे ध्रौव्यत्व या ठिकाणी पण स्पष्ट केले आहे.

द्रव्य-व्यवस्था–

म्हणून द्रव्याचे स्वरूप जैन दर्शनामध्ये आचार्यांनी खालीलप्रमाणे सांगितले आहे–

दव्वं सल्लक्खवयं उत्पादव्ययध्रुवचसंजुत्तं । गुणपज्जयासयं वा, जं तं भण्णति सव्वण्हू ॥

अर्थात् सत्ता लक्षण असलेला, उत्पाद, व्यय, ध्रौव्यरूप, गुणपर्यायरूप, असे द्रव्याचे स्वरूपदर्शन सर्वज्ञप्रणीत आहे. द्रव्याच्या लक्षणामध्ये अन्यदर्शनकाराची मतभिन्नता आहे. बौद्ध द्रव्य क्षणिक, अर्थात् प्रतिक्षणाला नवीन उत्पत्ती व नाश मानतात. कांही वैशेषिक वेदांत दर्शनकार द्रव्याला नित्य मानतात व गुण स्वतंत्र मानतात. पण ही मान्यता एकान्तवादी आहे. वस्तुतः द्रव्याचे लक्षण यापेक्षा वेगळे आहे. कोणतेही द्रव्य पर्यायाशिवाय असूच शकत नाही व पर्याय द्रव्याशिवाय असणे शक्य नाही द्रव्य व पर्याय दोन्ही एक दुसऱ्याशी संबंद्ध आहेत.[२] हे वेगळे पृथक असू शकत नाहीत.

हे दृश्य आपणांस नेहमीच पहावयास मिळते. संसारी जीवाच्या मनुष्य, देव, नारकी, या अवस्था त्याला जन्म-मरणामुळे प्राप्त होतात. किंवा एकाच जीवात जन्मल्यानंतर मृत्युपर्यन्त बाल, तरूण वृद्ध इत्यादि अवस्था दिसतात. त्या सर्व पर्याय-अवस्थेत आत्मतत्त्व एक आहे. म्हणजे याचा अर्थ असा की, द्रव्य सामान्यरुपाने ध्रुव, नाशरहित आहे. त्याचे गुणही स्वभावरूपाने ध्रुव आहेत. परंतु द्रव्याचा किंवा पर्याय प्रतिक्षण बदलत असतो. म्हणजे पर्याय नष्ट होतो व त्याचे स्थान नवीन पर्याय घेतो.

जैनदर्शनामध्ये जगातील सर्व अनत पदार्थ दोन प्रकारे विभाजित केले आहेत. १. चेतन, २. अचेतन ज्यांना ज्ञान व दर्शन शक्ती आहे ते चेतन व ज्याना ज्ञान व दर्शन नाही ते अचेतन. चेतन पदार्थाला जीव किंवा आत्मा ही सज्ञा आहे व त्याचे संसारी व मुक्त हे भेद आहेत. ससारी जीव चतुर्गतीमध्ये भ्रमण करतो तर जन्म–मरणरहित जीव मुक्त असतो. त्याचप्रमाणे जीवाच्या व्यतिरिक्त अचेतन किंवा जडाने विभाजनाला अजीव पदार्थ मानून त्याचे पुद्‌गल (मूर्त) व अमूर्त, धर्म–अधर्म, आकाश व काल हे भेद आहेत. यांचे कार्य प्रत्येक पदार्थाला गती देण्यास, त्याना स्थिर करण्यास व जागा देण्यास निमित्त होणे हे आहे हे सर्व पदार्थ उत्पाद, व्यय, ध्रौव्य, यामुळे सत्‌रूप आहेत, त्याना गुण आहेत, पर्याय आहेत.

---

१ भगवद्‌गीता अ. २ श्लोक.

## परिणमन–

या सर्व द्रव्यांचे परिणमन होते. त्याच्या बदलास कारणे आहेत. प्रत्येक कार्यामागे कांही कारणे असतातच. या कारणीमीमांसेसबंधी जैन धर्मात एक स्वतंत्र विचार आहे. दोन प्रकारची कारणे सांगितली आहेत– १) उपादान कारण, २) निमित्त कारण. यामध्ये उपादान कारण म्हणजे जे कारण स्वतः कार्यरूप परिणमते, ज्याप्रमाणे एखाद्या घटरूप कार्यात माती हीच घटरूप परिणमते. म्हणून असे म्हणता येईल की माती ही घडानिर्मितीमध्ये मूळ कारण आहे. त्यालाच उपादान कारण म्हणतात. त्यातही सूक्ष्मतेने बघितल्यास घडा निर्माण होण्याच्या अनंतरपूर्वी क्षणवर्ती पर्याय ही घटरूप अवस्थेचे उपादान आहे. उपादान कारणाशिवाय जे दुसरे पदार्थ कार्यामध्ये कारण असतात त्यास निमित्त कारण म्हणतात. वर सांगितलेल्या सहा द्रव्यापैकी धर्म अधर्म, आकाश व काल हे चार शुद्ध द्रव्य आहेत. यात दुसरे कोणतेही पदार्थ मिसळू शकत नाहीत. या चार द्रव्यांचे अनादी कालापासून अनंत कालापर्यन्त शुद्ध परिणमनच होते. परंतु जीव आणि पुद्गल यांचा सतत परस्पर संबंध येतो. संसारी जीव शरीराश्रित असतो. कर्माने तो बांधला जातो व त्यामुळे त्याला जन्म-मरण इत्यादि अवस्था पहाव्या लागतात. अशा परिणमनास अशुद्ध परिणमन म्हणतात व जेव्हा हे वेगवेगळे अमिश्रित (विभक्त) असतात तेव्हा त्याचे परिणमन शुद्ध होते असे परिणमन मुक्तात्म्याचे होते.

शुद्ध द्रव्यांच्या परिणमनामध्ये–कार्यामध्ये तर उपादान कारण स्वतः ते शुद्ध द्रव्य आहेत. त्यांच्या शुद्ध परिणमन कार्यात दुसरे द्रव्य पण निमित्तस्थानें, उदासीनपणे सहाय कारण होऊ शकतात. जीव व पुद्गलांना गतीरूप क्रियेत धर्म–द्रव्य उदासीन निमित्त आहे. ते कधी जबरदस्तीने कुणास चालवित नाही तर जो कोणी जीव किंवा पुद्गल एका स्थानाहून दुसऱ्या स्थानाकडे गमन करीत असेल त्यास मदत करते. जसे सरोवराचे पाणी त्यात राहणाऱ्या मत्स्याना उदासीन निमित्त आहे. हे बळजबरीने मत्स्यांना चालवित नाही. म्हणूनच उदासीन निमत्त ते अप्रेरक निमित्त आहे. जसे आठ कर्मांचा क्षय झाला म्हणजे जीव स्वभावाने उर्ध्वगमन करतो तेव्हा तीन लोकात व्यापलेले हे धर्मद्रव्य त्यास ऊर्ध्वगमन मदत करते. पण त्यास अलोकाकाशामध्ये नेत नाही. कारण तेथे धर्मद्रव्यच नाही. वास्तविक मुक्त जीवामध्ये लोकाच्या अंतापर्यंत जाण्याची ऊर्ध्वगमन शक्ती आहे. पण अलोकाकाशात धर्मद्रव्याचा सद्भाव नाही म्हणून लोकाकाशाच्या बाहेर तो जाऊ शकत नाही. तसेच अधर्म, आकाश व काल हे उदासीन निमित्तरूप आहे. कालद्रव्याचे अणु समान असून ते पण अमूर्तिक आहे. अलोकाकाशात कोणतेही द्रव्य नाही, कालद्रव्य नसेल तर प्रत्येक द्रव्याच्या पर्यायामध्ये परिणमन होणार नाही. पुद्गलाच्या परिणमनाला बहिरंग निमित्त कारण कालद्रव्य जीव आहे. व पुद्गलांच्या परिणमनामध्ये ते द्रव्य स्वतः उपादान कारण आहे व कालद्रव्य केवळ निमित्त कारण आहे.

## पुद्गल द्रव्य–

पुद्गल द्रव्य तर मूर्तिक आहे. त्यामध्ये स्पर्श, गंध, रस व रूप हे चार गुण आहेत अणु व स्कंध असे त्याचे दोन भेद आहेत. शुद्ध पुद्गल परमाणु अखंड असतो. परस्पर मिश्रणाने स्कंध अनेक प्रकारे तयार होतो पुद्गलाचा अर्थ जे अनेक कारणामुळे छिन्न-विछिन्न होऊन एक स्कंध दुसऱ्या स्कंधाशी मिळून मोठे होतात. पुरण व गळणे ही दोन्ही क्रिया अंगी असणारे ते पुद्गल ससारातील सर्व पदार्थ ते पुद्गल Matter होत. एकेंद्रियापासून पचेंद्रिय जीवापर्यंतचे शरीर पण पुद्गल स्कंधच होय काही पुद्गल स्कंधाना स्पर्श करता येतो, कांहीचा प्राणेंद्रियाद्वारे वास घेता येतो. कांहीना डोळयानी बघता येते किंवा काहीचा केवळ आवाज ऐकता येतो. याप्रकारे पुद्गलाचे अनेक भेद आहेत. पुद्गलाचे परिणमन पण अनेक प्रकारे होते. ऑक्सिजन व हायड्रोजन मिळून पाणी तयार होते. ते पाणी अत्यंत थंड होऊन बर्फात परिणमते. सूर्याच्या प्रचड उष्णतेने अथवा अग्नीमुळे वाफेत रूपांतरित होते व वाफ ही ढगाच्या रूपाने वर जाते. अशा प्रकारे निमित्त मिळाल्यावर पुद्गलाची विविध स्थित्यंतरे होतात. याप्रमाणे पृथ्वीचे विभिन्न परिवर्तन माती, गोटे, गंधक, कोळसा, लोखड इत्यादि स्याने होत. साधा वायु घ्या, त्याचे परिणमन गॅस रूपाने होते. तो अनेक कामी वापरतात. मोटरच्या चाकामध्ये हवेमुळे मोटर चालते ती निमित्तकारण होय.

चालक हा प्रेरक निमित्त होय. याशिवाय पेट्रोल, तेल वगैरे निमित्त कारणे आहेतच. निमित्त कारणे नसतील तर मोटर चालवायचेच बंद पडेल. म्हणून आचार्य विद्यानंद म्हणतात– 'सामग्री कार्यस्यजनिका नैकं कारणम्।' उपादान कारणाबरोबर निमित्त कारणे आवश्यक असतात. उपादान कारणाबरोबर सर्वच कार्य होण्यास आवश्यक निमित्त कारणे पाहिजेत. एकही कमी असेल तर कार्य होणार नाही.

ज्याप्रमाणे पुद्गलाचे त्याप्रमाणे जीवाचे परिणमन पण होते. ते दोन प्रकारचे आहेत. शुद्ध परिणमन– (१) मुक्त जीवाचे (२) कर्मबद्ध जीवाचे. संसारात भ्रमण करणारे व जन्म-मरण यातना भोगणाऱ्या जीवांचे वस्तुत: आत्म्याचा मूळ स्वभाव शुद्ध, शांत, अमर, अजन्मा, अराग असा आहे. परंतु, रागद्वेषादि अशुद्ध परिणमनाने आपल्या योगप्रभावाने तो सर्वत्र विखुरलेल्या कार्माण वर्गणेस आपल्याकडे आकर्षित करतो. कार्माण वर्गणा आत्मप्रदेशामध्ये नीरक्षीराप्रमाणे मिसळते व आत्म्याच्या रागद्वेष भावामुळे कर्मरूप परिणमतात. आत्म्याच्या स्वाभाविक शक्तीचा घात करणारी प्रबल निमित्ते तयार होतात. त्याला 'कर्म' ही संज्ञा दिली आहे. ज्ञानावरण कर्माच्या उदयाने ज्ञानशक्ती कुंठित होते, झाकली जाते. त्याचप्रमाणे दर्शनावरण कर्माच्या उदयाने दर्शनाचा घात होतो. वेदनीयाने सुख-दु:खादि प्राप्त होतात. मोहनीयामुळे रागद्वेषादि भाव उत्पन्न होतात. आयुकर्म चतुर्गती, नामकर्माने, शरीरादि, गोत्राने नीच-उच्चादि गोत्र व अंतरायाने एखाद्या गोष्टीत विघ्ने उत्पन्न होतात. सम्यक्त्व, मिथ्यात्व भाव, संयम-असंयमभाव हा कर्मविपाकच होय. रागद्वेषादि भाव उत्पन्न होतात व जीव संसारात भ्रमण करतो.[1] नामकर्माने त्याला दुसरे शरीर मिळते.

संसारामध्ये जीव रागद्वेषभावामुळे आपले नातेवाईक, मित्र यांच्यावर प्रेम करतो व त्यामुळे परस्पर संयोग प्राप्त झाल्यामुळे सुख व वियोगामुळे दु:ख उत्पन्न करतो. धनादीची प्राप्ती झाल्याने सुख अनुभवतो आणि हानी झाली तर दुःख अनुभवतो. कर्मबंधामुळे जीवाचे शुभ व अशुभ भाव होतात आणि शुभ-अशुभ भावामुळे कर्माची प्रकृती, स्थिती, अनुराग, प्रदेश निश्चित होतात. कर्माचे उत्कर्षण, उदीरणा वगैरे या भावामुळे होते. उदा. जिनवाणीच्या श्रवणामुळे व साधु-संपर्कामुळे आणि जिनदर्शनामुळे सम्यग्दर्शनाची उत्पत्ति होते. त्याचे अंतरंग कारण दर्शन मोहनीय कार्याचा क्षय हे होय.

एकूण निमित्त कारण प्रेरक, उदासीन, बलाधान इत्यादि अनेक प्रकारे असू शकते. उपादान कारण स्वयं कार्यरूप परिणमते. ज्याप्रमाणे स्वयंपाक तयार करण्यात स्वयंपाकी प्रेरक निमित्त आहे. कारण तो पिठाला पोळी, पुरी इत्यादि रूपाने वेगवेगळे आकार देतो. ज्या पदार्थामुळे कार्य होण्यामध्ये उपादानाला जोर प्राप्त होतो त्यास बलदायक निमित्त कारण म्हणतात. लंगड्या मनुष्याला चालण्यास काठी ही आहे किंवा ज्याला कमी दिसते त्यास चष्म्याची आवश्यकता आहे. या निमित्ताचा विचार करता कधी अभावात्मक निमित्त कारणांचा पण विचार करावा लागतो. ज्या कारणामुळे कार्यामध्ये विघ्न उत्पन्न होते त्यामुळे कार्य होत नाही, त्यास अभावात्मक निमित्त कारण म्हणतात. ज्याप्रमाणे कोणी अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्याला शारीरिक कष्ट ताप, डोळे दुखणे, पोट दुखणे वगैरे अनेक रोगांचा अभाव, नैसर्गिक बाधक कारण भूकंपादीचा अभाव आवश्यक आहे. म्हणून जेव्हा उपादानाला कारण व सर्व भावरूप आणि अभावरूप निमित्त कारणे मिळतात तेव्हा कार्य होते.

मानवी जीवन तर शेवटी निमित्त कारणाशिवाय पुढे जाऊच शकत नाही. जीवित राहण्यासाठी हवा, पाणी, भोजनादि आवश्यक आहे. जलचर जीवांना पाण्याशिवाय तर जगणेच कठीण. नभचर जीवांना आकाशाच्या मदतीनेच जगता येईल. संसारी जीवांना जर आवश्यक निमित्त मिळाले नाही तर जगणे असंभवनीय आहे. एकूण मानवामध्ये आपल्या विकासासाठी मूळ उपादान कारण आहे. त्याला जसे वळण लागेल, शिक्षण मिळेल, सत्संग मिळेल, तितक्या प्रमाणात त्याचा उत्कर्ष होतो, तो सद्गुणी किंवा दुर्गुणी होतो, निमित्त कारणामुळे कार्य सुकर होते. सारांश, मानवी जीवन हे कार्यकारणवादाचे उत्कृष्ट उदाहरण आहे. कोणतेही कार्य तेव्हाच होईल जेव्हा अनुकूल उपादान व सर्व आवश्यक निमित्त कारणे बरोबर योग्य वेळी एकत्र येतील तर एखादे लहानसे जरी निमित्त कारण कमी पडले तर कार्य होत नाही.

१. जीव परिणामहेदुं कम्मत्तं पुग्गला परिणमंति । पुग्गलकम्मणिमित्तं तहेव जीवो वि परिणमइ ॥ समयसार– ८०

# जैन दर्शन व ईश्वरवाद

ईश्वर या शब्दाचा अर्थ अनेक प्रकारे करण्यात येतो. परमेश्वर, प्रभु, स्वामी, पति, ईश्वरशाली, वैभवी जगन्नियंता, समर्थ इत्यादि विविध अर्थाने करण्यात येतो. तथापि सैद्धांतिक दृष्टीकोनातून 'ईश्वर' शब्दासंबंधी विचार केल्यास असे दिसते की, वैदिक दर्शनाचा हा एक पारिभाषिक शब्द आहे. वैदिक दर्शनानुसार त्या परम-शक्तीचे नाव ईश्वर आहे जी शक्ति या जगाची निर्मात्री, भाग्यविधात्री, कर्मफलदात्री सर्व व्यापक नित्य आहे. वैदिक दर्शन विश्वासानुसार संसाराचे कालचक्र ईश्वराच्या हातात आहे. ईश्वर सर्वशक्तिमान असून सर्व संसार हा त्याच्या इच्छेचा खेळ आहे.[1] जीव अज्ञ असल्याने जीवनातील सुख-दुःखांचा तो स्वतः स्वामी नाही. स्वर्गात किंवा नरकात जाणे ईश्वरी इच्छेवर निर्भर आहे. जीव जीव आहे, ईश्वर ईश्वर आहे. भक्ति, धर्म इत्यादींच्या सहाय्याने जीव ईश्वर बनू शकत नाही. जगात जेव्हा अधर्म, पाप वाढते त्यावेळी पापीयांचा नाश करून धर्माची संस्थापना करण्यासाठी ईश्वर कोणत्या ना कोणत्या स्वरूपात अवतार घेतो. परमेश्वर माणूस बनतो अशी विचारप्रणाली भगवद्गीतेतही मांडली आहे.

तथापि जैनदर्शनात परमात्मा या अर्थाने ईश्वर या शब्दाचा कोठेही उपयोग केलेला दिसत नाही. या उलट 'परमात्मा' या शब्दासाठी सिद्ध, बुद्ध, पारंगत, परंपरागत, कर्मविरहित, अजर, अमर, असग, सुख-दुःख विरहित, जरा-मरण-बंधन मुक्त इत्यादि शब्दाचा वापर केलेला आढळतो. हे सर्व शब्द पर्यायवाचक आहेत. कृतकृत्य जीवाला सिद्ध, केवलज्ञानाद्वारे विश्वाला जाणणाऱ्यास बुद्ध, संसाररूपी समुद्र पार केलेल्यास पारंगत, सम्यग्ज्ञान, सम्यग्दर्शन व सम्यक्चारित्र या परंपरेद्वारे ज्याने मोक्ष प्राप्त केला त्याला परंपरागत इत्यादि विविध संज्ञा वापरलेल्या दिसतात.

मुक्तात्म्याचे वर्णन करीत असताना भ. महावीर म्हणतात. मुक्तात्म्याचे स्वरूप सांगण्यासाठी कोणताही समर्थ शब्द नाही. तर्काची गति व बुद्धि तियपर्यंत पोहचत नाही, त्याची कल्पना केली जात नाही. मुक्तात्मा संपूर्ण कर्मरहित व संपूर्ण ज्ञानमय स्थितीत विराजमान आहे. तो लांब, छोटा, गोल, त्रिकोण, चौरस, काळा, निळा, सफेद, सुगंधी, दुर्गंधी, कठोर, सुकुमार, शीत, उष्ण, नपुंसक नाही. तो ज्ञाता परिज्ञाता आहे अरूपी. अवर्णनीय आहे. मुक्तात्मा शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श स्वरूपही नाही.

जैनदर्शनात मुक्तात्म्यासाठी 'ईश्वर' शब्दाचा उपयोग केलेला नाही. वैदिक दर्शनानी मानलेले ईश्वराचे ईश्वरत्व जैनदर्शन स्वीकारीत नाही. म्हणूनच वैदिक दर्शनाने जैनदर्शनाला अनीश्वरवादी दर्शन म्हणून घोषित केले आहे. तथापि याचा अर्थ असा नाही की जैनदर्शन ईश्वराला मानीतच नाही. जैनदर्शन ईश्वराला मानते तथापि आपल्या स्वतंत्र पद्धतीने. वस्तुतः ईश्वराचे जैनदर्शनाने प्रतिपादित केलेले शुद्ध तात्विक व प्रामाणिक स्वरूप दुसऱ्या,कोणत्याही दर्शनात आढळत नाही. जैनदर्शन ईश्वराला जगताचा कर्ता, भाग्य-विधाता, कर्मफलदाता मानीत नाही. जैनधर्माचा विश्वास आहे की, ईश्वर सत्यरूप, ज्ञानरूप सर्वज्ञ आहे. त्याचा दृश्य किंवा अदृश्य जगातील विषयाशी प्रत्यक्ष किंवा परोक्षरीतीने कोणताही हस्तक्षेप नाही जीव कर्म करण्याबाबत स्वतंत्र आहे. ईश्वर जीवाला कर्म करण्याची प्रेरणा देत नाही. जो कर्म करतो त्याचे फळ त्याला मिळते. आत्म्याशी निगडीत असणारे कर्मपरमाणू कर्मकर्त्यास त्याची फळे देतात. त्याचा ईश्वराशी प्रत्यक्ष किंवा परोक्ष संबंध नाही जीव स्वतंत्र आहे. जीव आपल्या भाग्याचा स्वनिर्माता आहे. स्वर्ग, नरक मनुष्याचा सत्-असत् वृत्तीचे परिणाम आहेत. यात ईश्वराचा संबंध नाही. जीव स्वतःच आपली नैया पार करतो व स्वतःच डुबवितो, यात ईश्वराचा काही संबंध नाही. एवढे असून देखील ईश्वर अध्यात्म जीवनाचे सर्वोच्च ध्येय आहे. अहिंसा, संयम, तपाच्या मंगलमय साधनेद्वारे स्वतःचे ईश्वरीय स्वरूपात प्रकट केले

---

१. अज्ञो जन्तुरनीशोऽय आत्मनः सुखदुःखयोः । ईश्वर प्रेरितो गच्छेत् स्वर्गं वा श्वभ्रमेव वा ॥

आहे. कर्मआवरण बाजूला टाकून जीव स्वतः ईश्वर बनतो. आत्मा आणि ईश्वर यात मूलतः फरक नाही. दोन्ही सजातीय आहेत, फक्त विकासाचेच अंतर आहे. ईश्वर नामस्मरणीय, संस्करणीय आहे.

ईश्वर सृष्टीकर्तृत्ववादाचा खरा अर्थ आहे की प्रत्येक प्राणी एवढेच नव्हे तर, प्रत्येक पदार्थ आपली पर्यायसृष्टी निर्माण करण्यास तिचा लय करण्यास, स्वाधीन, स्वतंत्र व पूर्ण समर्थ आहे. प्रत्येक वस्तु अनादिनिधन स्वतः सिद्ध असून प्रतिसमय परिणमनशील आहे, वस्तूचा नियत पर्याय, नियतकालीन स्वतःच्या नियत स्वभाव सामर्थ्याने होत असतो असा वस्तुगत स्वभाव नियम आहे. त्याला मागेपुढे करण्याचे सामर्थ्य कोणत्याही पदार्थात किंवा कल्पित ईश्वरात नाही. प्रत्येक वस्तु पर्यायसृष्टि निर्माण करण्यास स्वसहाय्य, स्वाधीन व स्वतंत्र असून पराधीन, परतंत्र किंवा ईश्वराधीन नाही. त्यामुळेच कर्ता, हर्ता ईश्वर खरा देव होऊ शकत नाही. जो वीतराग सर्वज्ञ असेल तोच खरा देव होय.

जैनदर्शनामध्ये अरिहंत व सिद्ध यांनाच खरे देव म्हटले आहे. अरिहंत जरी शरीरधारी असले तरी त्यांच्या चार घाति कर्मांचा नाश झालेला असतो. त्याना अनंतज्ञानादि चतुष्टच प्राप्त होतात. ते परमवीतरागी सर्वज्ञ भगवान जोपर्यंत आयुकर्म आहे तोपर्यंत जगात विहार करीत भव्य जीवाना मोक्षमार्गाचा तसेच प्रयोजनभूत जीवादि सात तत्त्वांचा हितोपदेश देतात. त्यांना क्षुधा तृष्णादि १८ दोष नसतात. शेवटी ते चार अघाति कर्मांचा नाश करून सिद्ध शिलेवर विराजमान होतात तेव्हा त्याना सिद्ध म्हणतात. अरिहंताना सकल परमात्मा व सिद्धाना निकल परमात्मा अशी संज्ञा आहे.

सारांश जैनदर्शनानुसार संसारी जीव आठ कर्मांनी सहित असल्यामुळे त्याना खऱ्या शाश्वत सुखशांतीची प्राप्ति होत नाही. अरिहंत, सिद्ध या संसारी जीवाना कर्मबंधनातून मुक्ततेचे मार्गदर्शन करतात. त्यानाच येथे ईश्वर मानलेले आहे. वैदिक दर्शनाप्रमाणे नियंता, विश्वकर्ता या स्वरूपात जैनदर्शनात ईश्वरकल्पना मान्य नाही.



# जैनदर्शन व वस्तुनिष्ठता

श्रीमत् परमगभीर स्याद्वादामोघ लांछनं । जीयात् त्रैलोक्यनाथस्य शासनं जिनशासन ।।

इतर दर्शनाप्रमाणे जे सर्वज्ञ जिनदेवाने सांगितले ते जैन शासन असा अर्थ लौकिक व्यवहार भाषेमध्ये केला जातो. पण जैन शासनाचा तो खरा अर्थ नाही. आचार्य समंतभद्र म्हणतात–

पक्षपातो न मे वीरे, न द्वेषः कपिलादिषु । युक्तिमद्वचनं यस्य, तस्य कार्यः परिग्रहः ।।

भगवान महावीर हे जैनधर्म पक्षाचे होते म्हणून त्याचे वचन खरे, कपिलादि मुनी इतर धर्मपक्षाचे होते म्हणून त्यांचे वचन खोटे असा पक्षपात जैनदर्शनास मान्य नाही. जैनदर्शन म्हणजे ज्याचे वचन प्रत्यक्षप्रमाण–युक्तिप्रमाण–आगमप्रमाण यानी युक्त असेल, जे वचन वस्तुनिष्ठ असेल, ज्यात कोणत्याही प्रमाणाने बाधा दोष येत नसेल ते वचन सत्य होय, ते वचन जैनदर्शन होय.

जैनदर्शनाने वचनाची प्रमाणता वस्तुनिष्ठत्वावर मान्य केली आहे. यावरून जिनाने सांगितले ते खरे, ते जैनदर्शन असे नसून जे वस्तुनिष्ठ आहे, वस्तूचे जसे यथार्थस्वरूप आहे, वस्तूचे जे अंतरंग ध्रुवस्वरूप आहे ते जिनानी ओळखले, पाहिले, जाणले व तेच लोकाना सांगितले. यावरून **"जे खरे वस्तुनिष्ठ आहे ते जैनदर्शन"** हा जैनदर्शनाचा खरा अर्थ आहे.

जैनदर्शन व इतर दर्शनात जर स्थूलमानाने फरक असेल तर हा मोठा फरक आहे की इतर दर्शन म्हणतात– **"जे माझे ते खरे"** परंतु जैनदर्शन म्हणते– **जे माझे ते खरे नसून "जे खरे ते माझे"**

इतर दर्शनामध्ये माझेपणाचा पक्षपात आहे. परंतु जैनदर्शनामध्ये माझेपणाचा पक्षपात नसून खरेपणाचा पक्ष आहे. म्हणून तो निष्पक्ष खरा न्याय देणारा न्यायाधीश आहे.

**जैन शब्दाची व्युत्पत्ति–**

सर्वसाधारण लोकव्यवहार भाषेने जो काम–क्रोधादि षड्रिपूना जिंकतो (जयति इति जिनः) त्याला जिन म्हणतात. परंतु व्यवहार भाषा परमार्थ गूढ अर्थाची सूचक असते.

ज्याप्रमाणे आपण व्यवहारात प्रयोजनवश 'तुपाचा घट' असा शब्दप्रयोग करतो. पण वास्तविक घट तुपाचा बनलेला नसतो. तुपाने सहित असलेल्या मातीच्या घटामध्ये 'तुपाचा' उपचार करून 'तुपाचा घट' असे आपण लोकव्यवहारात म्हणतो. परंतु बोलणारा व ऐकणारा यातील गूढ परमार्थ समजून घेतो व तूप असलेला घट घेऊन येतो.

तोच न्याय येथेही लागू आहे. षड्रिपूना जिंकणारा जिन म्हटला जातो. पण षड्रिपूना जिंकण्याचे परमार्थ गूढ रहस्य काय आहे ? कोण षड्रिपूना जिंकू शकतो ? याचा जर सूक्ष्मदृष्टीने विचार केला तर निश्चय-नयाने वास्तविक जो 'निजा' ला (आत्म्याला) जाणतो तोच षड्रिपूना जिंकतो व तोच 'जिन' म्हटला जातो. **आत्मज्ञच सर्वज्ञ होऊ शकतो.**

तत्त्वदर्शनाचे मूळ निजदर्शन–आत्मदर्शन आहे. **जैनदर्शन म्हणजे निजदर्शन. निजदर्शन तेच खरे तत्त्वदर्शन.** तत्त्वदर्शन तेच जैनदर्शन होय.

यः एकं जानाति स सर्वं जानाति । यः एकमपि न जानाति स सर्वमपि न जानाति ।।

जो एकाला जाणतो, तो सर्व जगाला जाणतो. जो एकाला देखील जाणू शकत नाही, तो सर्वांना देखील जाणू शकत नाही. येथे एक म्हणजे जाणणारा आत्मा.

सर्व जग अन्य वस्तूला जाणण्यासाठी उत्सुक असते. जीवतत्त्वाची सिद्धि करताना न्यायशास्त्रामध्ये मोठ्या मार्मिक रितीने सिद्धि केली आहे.

" अस्ति जीवः, जिज्ञासान्यथानुपपत्तेः ।"

जोव नामक पदार्थ डोळ्याने दिसत नसला तरी तो पदार्थ सत्‌रूप आहे, कारण जी जिज्ञासा जाणण्याची उत्सुकता दिसून येते ती अन्यथा दिसली नसती. जाणण्याची उत्सुकता असणे हे जीवाचे चिन्ह–लक्षण आहे.

इतर दर्शन जगाला जाणण्याच्या पाठीमागे लागले आहेत. इतर दर्शनानी जगाला जाणण्याचा उपदेश केला आहे. पण जैनदर्शन म्हणते– जगाला जाणण्यासाठी जगाच्या पाठीमागे लागावे लागत नाही. आत्मदर्शनात, ब्रह्मदर्शनात संपूर्ण विश्वाचे दर्शन सहजगत्या घडते हे गूढतत्त्व जैनदर्शनाने सांगितले आहे. हे जैनदर्शनाचे एक वैशिष्ठ्य आहे.

आत्मा 'ज्ञ' आहे, जाणणारा आहे, जाणणे हा आत्म्याचा स्वभाव आहे. सर्व जग 'ज्ञेय'– जाणले जाणारे आहे. ज्ञानाचे द्वारे जाणले जाणे हा ज्ञेयाचा स्वभाव आहे.

ज्ञानाचे एक एवढे सामर्थ्य आहे की ज्ञानाच्या स्वच्छ प्रकाशात संपूर्ण ज्ञेय पदार्थ संपूर्ण जग युगपत् स्वयं प्रतिबिंबित होते. ज्याप्रमाणे दर्पणामध्ये आपण अनेक वस्तु युगपत् एकदम पाहू शकतो, प्रत्येक वस्तूला अलग अलग जाणण्याचे श्रम करावे लागत नाहीत, तीच गोष्ट ज्ञान दर्पणाची आहे.

ज्ञानरूपी दर्पणात संपूर्ण ज्ञेय, संपूर्ण जग युगपत् एकदम दिसू शकते.

" ज्ञो ज्ञेये कथमज्ञः स्यात्, असति प्रतिबंधने ।"

काही प्रतिबंध आडकाठी नसेल तर ज्ञस्वभावी आत्मा संपूर्ण ज्ञेयाविषयी कसा अज्ञ राहील ? अर्थात् मुळीच अज्ञ राहणार नाही.

यावरून सर्व जगाला जाणण्यासाठी सहजसिद्ध सोपा उपाय म्हणजे स्वतःला जाणणे हा आहे, हे जैनदर्शन सांगते.

यावरून हे सिद्ध होते की जे आत्मदर्शन तेच वस्तुतत्त्वदर्शन जे वस्तुतत्त्व दर्शन तेच खरे तात्त्विक दर्शन जे खरे तात्त्विक दर्शन तेच जैनदर्शन.

**प्रश्न**– येथे सहज प्रश्न उपस्थित होऊ शकतो की इतर दर्शन देखील वस्तुतत्त्वाचेच वर्णन करतात मग त्यांचे दर्शन ते तत्त्वदर्शन खरे दर्शन नव्हे का ?

**समाधान**– इतर दर्शन देखील वस्तुतत्त्वाचेच वर्णन करतात. परंतु आत्मदर्शन झाल्याशिवाय वस्तुतत्त्वाचे खरे दर्शन होऊ शकत नाही. हे गूढ रहस्य इतर दर्शनानी ओळखले नाही. म्हणून त्याचे ते तत्त्वदर्शन खरे तत्त्वदर्शन म्हटले जात नाही.

तसेच जेथे पक्षाभिमान आहे, पक्षपात आहे तेथे ज्ञानाची अपूर्णता आहे. पक्षपातपूर्वक अपूर्ण ज्ञानपूर्वक होणारे तत्त्वदर्शन ते खरे तत्त्वदर्शन होऊ शकत नाही.

जो निष्पक्षपाती व त्या विषयाचा पूर्ण तज्ञ असतो तोच खरा न्यायाधीश होऊ शकतो.

इतर दर्शनाविषयी वर्णन करताना जैनदर्शनाचार्य म्हणतात–

'स्ववैरिणस्ते, परवैरित्वात्'






जे परवैरी आहेत, दुसऱ्या प्रतिपक्ष पक्षाशी सहमत नाहीत, दुसऱ्या प्रतिपक्ष पक्षाचा सर्वथा निषेध करतात व आपला पक्षच काय तो खरा असे समजतात ते खरोखर स्ववैरी आहेत. कारण ते आपल्या स्व पक्षाची देखील सिद्धि करू शकत नाही. प्रतिपक्ष परपक्षाची मान्यता स्वीकृत केल्याशिवाय आपण आपला स्वपक्ष सिद्ध करू शकत नाही हे गूढ रहस्य इतर दर्शनाना समजले नाही. म्हणून त्यांचे तत्त्वदर्शन पक्षपाती असल्यामुळे खरे तत्त्वदर्शन होऊ शकत नाही.

जैनदर्शन पक्षपाती नाही. निष्पक्षपाती आहे. पक्षातीत आहे. येथे पक्षातीत याचा अर्थ सर्व पक्षांचा सर्वथा निषेध करणारे असा नसून सर्व पक्षाना आपापले इष्ट स्थानी प्रतिष्ठित, सुव्यवस्थित मानणारे ते जैनदर्शन होय. म्हणून जैनदर्शन निष्पक्षपाती असल्यामुळे वस्तूचे पूर्ण व यथार्थ दर्शन करून देणारे असल्यामुळे खरे तत्त्वदर्शन आहे.

### जैनदर्शन हे सर्वोदयतीर्थ आहे–

"सर्वापदां अन्तकर निरन्तं सर्वोदयं तीर्थमिदं तवैव" (युक्त्यनुशासन ६१ )

जैनदर्शन हा विशिष्ट जातीचा, विशिष्ट धर्माचा, विशिष्ट पंथातील लोकांचा धर्म नसून सर्व प्राणीमात्रांचा धर्म आहे. तीर्थंकराच्या समवसरण सभेत १२ सभा (विभाग) असतात. त्यात देव-देवी, मनुष्य-स्त्रिया, पशु-पक्षी सर्वप्रकारचे जीव येऊन बसतात. भगवंताच्या दिव्यध्वनीतून निघणारा धर्मोपदेश ऐकतात. आत्मकल्याण करून घेतात.

जैनदर्शन वस्तूचे यथार्थ स्वरूप सांगणारे दर्शन आहे. म्हणून ते परम मंगल आहे. ज्यामुळे (मं+गल) मं म्हणजे पाप-संकट-आपत्ति याचा स्वयं नाश होतो व (मंग+ल) जैनदर्शनाने सांगितलेला धर्मोपदेश ऐकून जीवाला शाश्वत सुख-शांतीचा लाभ होतो. जैनदर्शन वस्तुस्वरूपाचे कथन करणारे आहे. वस्तु व वस्तुस्वरूप जसे अनादिनिधन आहे तसेच वस्तुस्वरूपाची जाणीव करून देणारे जैनदर्शन देखील अनादिनिधन आहे. सर्व प्राणीमात्रांचे कल्याण करणारे म्हणून ते '**सर्वोदय तीर्थ**' आहे.

### सर्वदर्शनांचा समन्वयवाद म्हणजे जैनदर्शन–

प्रत्येक दर्शन वस्तूच्या एका अंगाचे वर्णन करणारे असल्यामुळे कोणतेही दर्शन सर्वथा मिथ्या-खोटे नाही.

"निरपेक्षा नया: मिथ्या । सापेक्षा वस्तु तेऽर्थकृत् ।।"

इतर दर्शन आपल्या प्रतिपक्षी पक्षाचा निषेध करणारे असल्यामुळे, प्रतिपक्ष निरपेक्ष असल्यामुळे मिथ्या म्हटले जातात. परंतु तेच दर्शन प्रतिपक्षाचा निषेध न करता प्रतिपक्ष सापेक्ष असेल, प्रतिपक्षाचे म्हणणे देखील एका विवक्षित दृष्टिकोणाने सत्य-परमार्थ आहे अशी मान्यता जर ठेवीत असेल तर प्रत्येक नय दर्शन सम्यक् आहे. व त्या सम्यक् सर्व नयदर्शनांचा एकत्र समन्वय म्हणजे परमार्थ अर्थक्रियाकारी वस्तु सिद्ध होत असल्यामुळे **सर्वदर्शनांचा एकत्र समन्वय तेच जैनदर्शन होय.**

### जैनदर्शन हे लोकतंत्र आहे–

प्राणीमात्र या जैन धर्माचा सदस्य होऊ शकतो. जैनधर्मात जातीचे, पंथाचे बंधन नाही. जो कोणी भव्य जीव धर्माचे आचरण करील तो आपले आत्मकल्याण करू शकतो. जैनदर्शनातील प्राय: अनेक आचार्य गौतमगणधर, आचार्य विद्यानंदी, पूज्यपादाचार्य हे सर्वप्रथम अन्यधर्मी होते. नंतर ते जिनधर्मानुयायी बनले. त्यानी अनेक आगमग्रंथ निर्माण करून जैनदर्शनाची प्रमाणता सिद्ध केली व जैनदर्शनाचा प्रचार केला.




जसा इतर धर्मपक्षीयानी जैनधर्माचा द्वेष केला तसा जैनदर्शनाने इतर धर्मपक्षीयांचा कधीही द्वेष केला नाही. आचार्यकल्प श्रीमान् स्व. पं. टोडरमलजी यांचे उदाहरण येथे अप्रस्तुत होणार नाही. त्यांची विद्वत्ता, त्याचे अगाध ज्ञान सहन न होऊन अन्यधर्मीय इतर राजमान्य पंडितानी त्यांचा द्वेषबुद्धीने अत्यंत छळ केला. त्यानी पंडितजीना न कळत त्यांचे अंगरख्याचे खिशात शिवाची मूर्ति ठेवून राजाकडे चुगली केली. जैनदर्शनाचे पंडित



आपल्या देवमूर्तीचा अपमान करतात. राजाने चौकशी केली. पंडितजींमध्ये जैनदर्शनाची उदारता भरपूर भरली होती. त्याना वाटले की, राजाला सत्य सांगितले तर आपल्या प्रतिपक्षीयाना कठोर शिक्षा होईल. म्हणून त्यानी सत्य लपवून स्वतःचा अपराध कबूल केला.

'न ब्रूयात् सत्यमप्रियं' जे सत्य असूनही दुसऱ्याला अपाय देणारे असेल ते बोलू नये. या जैनदर्शनातील उदार सिद्धांताचा स्वीकार करून पंडितजीनी स्वतःचा अपराध कबूल केला. पूर्वीचे काही राजे अविवेकी व करारी होते. त्यानी पंडितजीना हत्तीच्या पायाखाली तुडवून देहांत शासनाची शिक्षा फर्माविली. त्यावेळी प्रजातंत्री राज्य नव्हते. राजाच्या मुखातून निघालेला शब्द दगडाची रेघ समजली जात असे. हत्ती समोर उभा आहे. पंडितजी त्याचे समोर उताणे पडले आहेत. महात हत्तीला पाय उचलून पंडितजींच्या शरीरावर ठेवण्यास आज्ञा करीत आहे. हत्ती पाय उचलतो आहे. पण पाय अधर ठेवून पंडितजींच्या निष्पाप पुण्य पुरुषाच्या शरीरावर ठेवण्यास हत्तीचे मन कचरत आहे, अशा वेळी पंडितजी त्याला म्हणतात– हे आत्मन्, घाबरू नकोस. तुझा अपराध नाही. राजाज्ञेचे पालन तुला केलेच पाहिजे. हत्ती नाइलाजाने पाय ठेवतो व पंडितजींचा पवित्र आत्मा देहकुडीतून निघून जातो. ते दृश्य किती भयंकर असेल !

**जैनदर्शनाचा साम्यवाद–**

जैनदर्शन एकेंद्रियापासून पचेंद्रियापर्यंत, कीडा-मुंगीपासून मनुष्यापर्यंत सर्वांचा आत्मा समान मानतो. जन्माने, कुलाने, जातीने, वैभवाने कोणाला उच्च-नीच समजणे, हा विषमवाद अधर्म आहे, अन्याय आहे, पाप आहे.

*प्राणा यथाऽऽत्मनोऽभीष्टाः, भूतानामपि ते तथा । आत्मौपम्येन भूतेषु यः पश्यति स पंडितः ॥*

जसे आपले प्राण आपणास प्रिय असतात, आपणास कोणी मारू नये असे जसे आपणास वाटते तसेच सर्व प्राणीमात्राना देखील मग तो कितीही क्षुद्र प्राणी असो, त्याला देखील आपले प्राण इष्ट असतात. कोणी आपणास मारू नये असे त्याना देखील वाटते. जो सर्व प्राणीमात्राच्या आत्म्याना आपल्या आत्म्याप्रमाणे समजतो, त्याचे दुःख ते आपले दुःख, त्यांचा घात तो आपला घात समजतो तोच ज्ञानी विवेकी पंडित म्हटला जातो.

**जैनदर्शनाचा समाजवाद–**

अहिंसा व अपरिग्रहवाद हे जैनदर्शनाचे प्रमुख सिद्धांत जैनदर्शनाच्या समाजवादाचे सूचक आहेत. Live & Let Live 'स्वतः जगा व दुसऱ्यास जगू द्या' हे जैनदर्शनाच्या मूलसिद्धांताचे बीदवाक्य आहे.

"अहिंसा परमो धर्मः, यतो धर्मस्ततो जयः"

प्रत्येक वस्तु स्वतंत्र आहे. प्रत्येक वस्तूचे अस्तित्व स्वतंत्र आहे. प्रत्येक वस्तू आपल्या अस्तित्वशक्तीने जगत आहे. प्रत्येक वस्तु आपल्या स्वतंत्र वस्तुत्वशक्तीने आपले परिणामरूप अर्थक्रिया करीत आहे.

असे असताना दुसऱ्या वस्तूवर आपली सत्ता गाजविणे, आपल्या इच्छेप्रमाणे अन्य वस्तूने परिणमन करावे अशी खोटी आशा बाळगणे ही हिंसा आहे. हिंसा हे महापाप आहे.

सर्व वस्तूना आपल्या स्वतंत्र अस्तित्व शक्तीने स्वतंत्र अस्तित्व जीवन जगू देणे व आपणही आपल्या स्वतंत्र अस्तित्व शक्तीने स्वतंत्र अस्तित्व जीवन जगणे आपणास जगण्याकरिता दुसऱ्या कोणत्याही अन्य परपदार्थाची परिग्रहाची इच्छा न करणे ती खरी अहिंसा होय. स्वतंत्र अस्तित्व जीवन हीच खरी अहिंसा. तोच प्रत्येक वस्तूचा परमधर्म आहे, जेथे धर्म आहे तेथेच खरी शांति-सुख आहे.

याप्रमाणे जैनदर्शन शाश्वत सुख शांतीचा मार्ग दाखविणारे दर्शन असल्यामुळे तोच सर्व प्राणीमात्रांचा कल्याण करणारा आत्मधर्म आहे. वस्तुतत्वाचे यथार्थ दर्शन करून देणारा असल्यामुळे तो वास्तववाद आहे. तेच सत्यवस्तुतत्त्व कथन आहे. तेच आदर करण्यायोग्य आहे. तेच सर्वथा उपादेय आहे.

# जैनदर्शन व सर्वज्ञत्व

जो जाणइ अरहंतं दव्वत्तगुणत्तपज्जयत्तेहि । सो जाणइ अप्पाणं मोहो खलु जादि तस्स लयं ॥

ज्याने अरहंत सर्वज्ञ देवाला जाणले त्याने आपल्या आत्म्याला जाणले. त्याचाच मोह लयास जातो व तोच साक्षात् सर्वज्ञ परमात्मा बनतो.

सर्वज्ञाचे अस्तित्व ज्याने मान्य केले तोच आत्मज्ञ होतो. आत्मज्ञच सर्वज्ञ होतो.

श्री समयसार ग्रंथात मंगलाचरण करताना सर्वसिद्ध परमात्म्याना नमस्कार केला आहे.

'वंदित्तु सव्वसिद्धे' सर्वसिद्ध परमात्म्याना नमस्कार करून सिद्ध परमात्म्याला आपल्या आत्म्यामध्ये स्थापन केले आहे.

सिद्ध भगवान जसे आहेत तसा आपला आत्मा आहे. 'आत्मनः प्रतिच्छंदस्थानीयान् सिद्धान्' सिद्ध भगवान हे आत्म्याचे प्रतिबिंब आहे.

सिद्ध भगवान् केवलज्ञानी, सर्वज्ञ, पूर्ण ज्ञान घन आहेत व रागादि विकारानी रहित आहेत.

सिद्ध भगवान् कर्माच्या अभावाने केवलज्ञानी-सर्वज्ञ वीतराग बनले असे म्हणणे हा व्यवहार आहे, उपचार आहे. वास्तविक एका द्रव्याच्या अभावाने दुसऱ्या द्रव्यात सर्वज्ञपणा येणे हे सर्वथा असंभवनीय आहे.

मलाच्या अभावाने दर्पण स्वच्छ झालेला दिसतो, पण मलाच्या अभावाने दर्पणात स्वच्छता नंतर बाहेरून येते असे नसून स्वच्छता हा दर्पणाचा स्वभाव आहे. जो मलाच्या सद्भावात अव्यक्त-गुप्त-तिरोभूत होता तो मलाच्या अभावात व्यक्त-प्रगट-आविर्भूत झाला, तीच गोष्ट आत्म्याची आहे.

केवलज्ञान किंवा सर्वज्ञता जीवाचा स्वभाव आहे. जो कर्माच्या सद्भावात अव्यक्त-गुप्त-तिरोभूत होता तोच कर्माच्या अभावात व्यक्त-प्रगट-आविर्भूत होतो.

**प्रश्न-** जर केवलज्ञान किंवा सर्वज्ञतत्व हा जीवाचा स्वभाव आहे तर तो कर्माच्या सद्भावात तिरोभूत का होतो व कर्माच्या अभावात आविर्भूत का होतो ?

**समाधान-** कर्माच्या सद्भावाने तिरोभूत होतो किंवा कर्माच्या अभावाने आविर्भूत होतो असे परद्रव्य संयोगाची मुख्यता घेऊन कथन करणे हा व्यवहार आहे, उपचार आहे.

व्यवहारात घट हा मातीचा असताना देखील तुपाच्या संयोगाने 'तुपाचा घट' म्हटला जातो. घट तुपाचा एवढ्यावरून बोलणारा किंवा ऐकणारा घट तुपाचा समजत नाही. घट मातीचाच समजतो. ज्यात तूप ठेवले आहे असा मातीचाच घट घेऊन येतो.

तसेच व्यवहार शास्त्रात- 'मोहक्षयात् ज्ञानदर्शनावरणांतरायक्षयाच्च केवलं' असे जरी म्हटले आहे तरी त्याचा अर्थ कर्मक्षयाने केवलज्ञान नंतर जीवात उत्पन्न होते असा नसून केवलज्ञान हा जीवाचा स्वत.सिद्ध स्वाभाविक भाव आहे. तो जीवामध्ये सदासर्वदा विद्यमान असतो. तो त्रिकाली ध्रुवस्वभाव आहे.

जोपर्यंत या जीवाला आपल्या या केवलज्ञान किंवा सर्वज्ञ स्वभावाचे भान नसते तोपर्यंत कर्माचा उदय विद्यमान असतो. कर्माच्या सद्भावात तो तिरोभूत असतो, प्रगट नसतो.

परंतु जेव्हा या जीवाला आपल्या केवलज्ञान सर्वज्ञ स्वभावाचे भान होते, निर्णय होतो व त्यामध्ये तो आपली स्थिर प्रवृत्ति ठेवतो तेव्हा अनायासे कर्माचा अभाव होतो व कर्माच्या अभावात तो प्रगट होतो.

यावरून जीवाचा केवलज्ञान-सर्वज्ञस्वभाव कर्माच्या सद्भावात व अभावात तिरोभूत व आविर्भूत होतो म्हणणे हा उपचार आहे, व्यवहार आहे.

तो आपल्या ध्रुवस्वभावाने भान नसताना अज्ञानाने तिरोभूत होतो व भान झाले असता ज्ञानाने प्रकट म्हणजे हा परमार्थ-निश्चयनय आहे.

यावरून सर्वज्ञाचे अस्तित्व मानणारा तोच सर्वज्ञ होऊ शकतो, हे सहज सिद्ध होते.

प्रश्न– सर्वज्ञाचे अस्तित्व मानणारे अन्य अनेक धर्म आहेत. मग सर्वच सर्वज्ञ म्हणायचाचे काय ?

समाधान– नाही, केवळ सर्वज्ञाचे अस्तित्व मानल्याने सर्वज्ञपणा प्राप्त होत नाही.

अन्य धर्मांनी सर्वांना जाणणारा तो सर्वज्ञ अशी सर्वज्ञ शब्दाची निरुक्ती करून स्वतःला सर्वज्ञ मानण्याचा प्रयत्न केला. पण सर्वांना जाणण्याने सर्वज्ञपणा येत नाही. कारण ज्ञेय अनन्त आहे. अनंत ज्ञेयाच्या अनन्त काळापर्यंत हा जीव जाणण्याचा प्रयत्न करीत बसेल तरी जाणण्याचा अंत होणार नाही व हा जीव सर्वज्ञ बनू शकणार नाही.

सर्वांना जाणणे हा सर्वज्ञ बनण्याचा मार्ग नाही हे भगवान महावीरांनी सांगितले. सर्वज्ञ बनण्यासाठी सर्वांना जाणण्याची नसती उठाठेव-धडपड करावी लागत नाही. सर्वज्ञपणा हा सर्वपदार्थाधीन किंवा पराधीन नाही. तो जीवाचा स्वाधीन स्वभाव आहे. जो आपला सर्वज्ञ स्वभाव जाणतो व जो आपल्या सर्वज्ञ स्वभावात विलीन होतो तो अनायासे सर्वज्ञ होतो. आत्मज्ञानात सर्वज्ञता आहे. हा महत्त्वाचा सिद्धांत भगवान महावीराने जगास सांगितला.

ज्ञानाचा असा स्वच्छ स्वभाव आहे की ज्ञानामध्ये संपूर्ण ज्ञेयांचे प्रतिबिंब सहजगत्या पडते. ज्ञानाला जाणले की सर्व पदार्थांचे ज्ञान सहजगत्या घडते. सर्व पदार्थांना जाणण्यासाठी आपला उपयोग सर्व पदार्थांकडे लावावा लागत नाही. सर्व पदार्थांकडे उपयोग लावून सर्व पदार्थांचे ज्ञान होत नाही. आपल्या ज्ञानदर्पणाकडे उपयोग लावला की त्यात सर्व पदार्थांचे ज्ञान सहजगत्या घडते.

आदा णाणपमाणं णाणं णेयप्पमाण मुद्दिट्ठं । णेयं लोयालोयं तम्हा णाणं तु सव्वगयं ॥ (प्रवचनसार)

आत्मा ज्ञानप्रमाण आहे, ज्ञान ज्ञेयप्रमाण आहे, ज्ञेय लोक-अलोकप्रमाण आहे. म्हणून ज्ञान सर्वगत म्हटले जाते. ज्याने आत्म्याला किंवा ज्ञानाला जाणले त्याला सर्व लोक अलोकाचे ज्ञान अनायासे सहजगत्या होते.

ब्रह्माच्या मुखात सर्व विश्व दिसते म्हणतात त्याचा अर्थ ब्रह्म म्हणजे आत्मा, आत्मज्ञानात सर्व विश्वज्ञान होते असा आहे.

प्रायः सर्व अन्य धर्मांनी देखील सर्वज्ञता येन केन प्रकारेण मानली आहे. वेदामध्ये उपनिषद्, ग्रंथामध्ये विश्ववेदस्, विश्वचित्, विश्वविद्वान्, सर्ववित्, विश्वचक्षु, विश्वद्रष्टा इत्यादि शब्द सर्वज्ञवाचकच आहेत. बृहदारण्यक ग्रंथामध्ये आत्मज्ञानाला सर्वज्ञ म्हटले आहे. 'आत्मानं विद्धि' हा त्याचा मूलमंत्र आहे. कोणी सृष्टि-कर्तृत्व सिद्ध करण्यासाठी ईश्वराला सर्वज्ञ मानले.

कोणाला सुखी तर कोणाला दुःखी, कोणाला स्वर्गात तर कोणाला नरकात ईश्वराने का टाकावे या प्रश्नाचा उलगडा शेवटी ज्याच्या त्याच्या पाप-पुण्यकर्माकडे सोपविला गेला. याचा खरा अर्थ प्रत्येक जीव आपली पर्यायसृष्टि निर्माण करण्यास, सुखी-दुःखी बनविण्यास स्वयं कारण आहे. तो स्वयं प्रभु समर्थ आहे, स्वाधीन-स्वतंत्र आहे. पराधीन परतंत्र नाही, अन्य ईश्वराधीन नाही. जसे करावे तसे भरावे. स्वतः जसे शुभ-अशुभ परिणाम करतो त्याप्रमाणे त्याचे फल पुण्य-पाप, सुख-दुःख तो स्वयं भोगतो.

बुद्धानी सर्वज्ञपणा परजनहिताय, परजनसुखाय मानला. 'बुद्धो भवेयं जगते हिताय' मी जगाच्या कल्याणासाठी सतत बुद्ध-सर्वज्ञच होऊन राहावे. मला निर्गुण मुक्तीची इच्छा नाही.

पण वास्तविक "सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता । परो ददातीति कुबुद्धिरेषा ।"

कोणी कोणाला सुख-दुःख देऊ शकत नाही, कोणी कोणाचा कर्ता-हर्ता नाही. दुसरा आपणास सुख-दुःख देतो ही बुद्धी खोटी आहे. दुसऱ्याच्या करण्या-धरण्यात सर्वज्ञता नसून आत्मज्ञानात खरी सर्वज्ञता आहे हे भगवान




महावीरानी सांगितले. मीमासकानी सर्वज्ञाचा अभाव अभावप्रमाणाने सिद्ध करण्याचा प्रयास केला आहे. पण जैनदर्शनाने युक्तिवादाने त्याचे खंडन केले आहे आज या क्षेत्रात कोणी सर्वज्ञ दिसत नाही. एवढ्यावरून पूर्वी किंवा जगात कोठेही सर्वज्ञ नाही याची सिद्धि होऊ शकत नाही. सर्वज्ञाचा अभाव सिद्ध करणाऱ्याला प्रथम मागच्या पुढच्या सर्व काळाचे व सर्व लोकाचे ज्ञान करून घ्यावयास पाहिजे तेव्हाच तो कोठेही व केव्हाही सर्वज्ञ झाला नाही व होणार नाही हे सिद्ध करू शकेल. मागचे पुढचे जाणणारा व सर्व जगास पाहणाराच स्वतः सर्वज्ञ बनला मग तो– सर्वज्ञाचा अभाव कसा सिद्ध करील ? या युक्तीप्रमाणाने न्यायशास्त्रात सर्वज्ञाची सिद्धि केली आहे.

'अस्ति सर्वज्ञः, सुनिश्चित-असंभवद्-बाधक प्रमाणत्वात्' सर्वज्ञ आहे, कारण सर्वज्ञाचा अभाव सिद्ध करणारे असे कोणतेही बाधक प्रमाण सर्वथा असंभवनीय आहे. प्रत्यक्षादि सर्व साधक प्रमाणानी सर्वज्ञाची सिद्धि सुतरां सिद्ध होते.

१) भगवान् महावीरानी आपल्या अतींद्रिय प्रत्यक्ष प्रमाणाने आत्मा सर्वज्ञस्वभाव आहे, पूर्ण ज्ञानघन स्वभाव आहे हे सिद्ध करून जगाला दाखविले आहे.

२) नंतरच्या आचार्यांनी देखील अनुमानप्रमाणाने सर्वज्ञाची सिद्धि युक्तिवादाने केली आहे.

सूक्ष्मांतरित-दूरार्थाः प्रत्यक्षाः कस्यचित् यथा । अनुमेयत्वतोऽग्न्यादिरिति सर्वज्ञसंस्थितिः ।।

परमाणु आदि सूक्ष्म पदार्थ, धर्म-अधर्म, पाप-पुण्य आदि अदृष्ट पदार्थ, राम-रावणादि काल-अंतरित पदार्थ, मेरूपर्वत, स्वर्ग-नरक आदि क्षेत्राने दूर असलेले पदार्थ हे सर्व कोणाला तरी प्रत्यक्ष अवश्य आहेत. कारण ते अनुमेय आहेत. ज्याप्रमाणे आपण धूमावरून अग्निचे अनुमान करतो व जेव्हा पर्वतावर प्रत्यक्ष जाऊन पाहतो तेव्हा अग्नि प्रत्यक्ष दिसतो. त्यावरून अनुमानज्ञान प्रमाण मानले जाते. तीच गोष्ट सर्वज्ञसिद्धिची आहे. आपणास जे या सूक्ष्मादि पदार्थाचे शास्त्रावरून अनुमान ज्ञान होते ते प्रमाण आहे. कारण प्रत्यक्ष प्रमाणाने जाणून घेऊन नंतर सर्वज्ञाच्या दिव्यवाणीतून निघालेले ते वचन आहे. म्हणून प्रमाण आहे.

आचार्य प्रभाचंद्र यानी प्रमेयकमलमार्तंडमध्ये सर्वज्ञत्वाची सिद्धि करताना म्हटले आहे–

"अस्ति कश्चित् आत्मा सकलपदार्थसाक्षात्कारी, तत्ग्रहणस्वभावत्वे सति प्रक्षीण प्रतिबंध प्रत्ययत्वात् ।।"

सर्व पदार्थांना साक्षात् पाहणारा कोणी तरी सर्वज्ञ अवश्य आहे कारण सर्वपदार्थांना जाणणे-पाहणे हा जीवाचा स्वतःसिद्ध स्वभाव आहे व तो संपूर्ण प्रतिबंधक कारणाचा अभाव झाला असताना स्वयं प्रगट होतो.

आचार्य विद्यानंदी अष्टसहस्रीमध्ये म्हणतात–

'ज्ञो ज्ञेये कथमज्ञः स्यात्, असति प्रतिबंधने ।'

आत्मा ज्ञ स्वभाव आहे. तो कोणतेही प्रतिबंधक कारण जर नसेल तर संपूर्ण ज्ञेयाविषयी अज्ञ कसा राहील ? अर्थात् मुळीच राहाणार नाही.

'दाह्योऽग्निर्दाहको कथं न स्यात् असति प्रतिबंधके '।

जर काही प्रतिबंधक कारण आड येत नसेल तर दाहकस्वभाव अग्नि दाह्याला जाळण्याचे काम कसे करणार नाही ? अर्थात् अवश्य करील.

त्याप्रमाणे आत्मा हा स्वतःसिद्ध सर्वज्ञ स्वभाव आहे. प्रतिबंधक कर्माच्या अभावात तो स्वयं सर्वांना जाणण्याचे कार्य अनायासे करतो.

आत्मज्ञानात सर्वज्ञता स्वयं अनायासे प्राप्त होते. नियमसार ग्रंथात आचार्य कुंदकुंददेव म्हणतात– सर्वज्ञ भगवान सर्वांना जाणतात असे म्हणणे हा व्यवहारनय आहे. वास्तविक त्यांचा उपयोग सर्व पदार्थाकडे नसतो. त्यांचा उपयोग आपल्या आत्म्याकडेच असतो. निश्चयनयाने ते आत्मज्ञ आहेत. आत्मज्ञानात त्याना सर्वांचे ज्ञान अनायासे होते म्हणून व्यवहारनयाने ते सर्वज्ञ म्हटले जातात.

सर्वांना जाणण्याने सर्वज्ञता येत नसून आत्मज्ञानातच खरी सर्वज्ञता सामावलेली असते. हा सर्व शास्त्राचा सार-संक्षेप आहे.





# जैनदर्शन व शब्दब्रह्मवाद

शब्द व अर्थ म्हणजे काय ? त्यांचा परस्पर संबंध काय ? ते नित्य आहे की, अनित्य ? नित्य असतील तर त्याचे स्वरूप काय व अनित्य असेल तर त्याचे स्वरूप काय ? अर्थतत्वाचे ज्ञान कसे होते ? अर्थतत्त्वाचा निर्णय कशा रीतीने व कोणत्या साधनानी केला जातो. इत्यादी प्रश्नांचा वैयाकरणानी जसा विचार केला तसा जैनदार्शनिकानी पण प्राचीन काळापासून शब्द हा दार्शनिकाच्या विचारांचा विषय झाला आहे. जैनदार्शनिकानी शब्द व अर्थ यावर बराच विचार केला आहे. अर्थ ज्ञानाचे मुख्य साधन शब्दच आहे. म्हणून त्याविषयी विचार करणे एक दर्शनशास्त्राचे एक अनिवार्य अंग आहे.

शब्दब्रह्म स्वरूप– जैनदर्शनात शब्दाला पुद्गलाचा पर्याय अथवा रूपांतर मानले आहे. स्कंधाचा परस्पर संघर्ष होऊन शब्दाची उत्पत्ति होते. या लोकात अत्यंत सूक्ष्म पुद्गलरूपी शब्दवर्गणा सर्वत्र व्यापलेल्या आहेत. आम्ही आपल्या तालु आदींच्या प्रयत्नाने विशिष्ट वायु बाहेर सोडतो. तो पुद्गल वर्गणेशी भिडताच शब्दाची उत्पत्ति होते. 'प्रमेय कमल मार्तंडा' मध्ये शब्द हा आकाशाचा गुण आहे. याचे खंडन करताना म्हटले आहे की, परमाणु संयोगरूप स्कंधाचे शब्दवर्गणाचे अस्तित्व नेहमी सर्व ठिकाणी असते. असे असून देखील या शब्द वर्गणा जेव्हा अर्थबोधाच्या इच्छेने उत्पन्न होतात व त्यात एक-दुसऱ्याशी संघर्ष घडतो तेव्हा शब्दरूपाने परिणत होतात. वाद्यध्वनी, मेघ-गर्जना इत्यादी देखील वर्गणाच्या घर्षणाचेच फळ आहे. शब्द स्वरूपाचे वर्णन करताना आचार्य कुन्दकुन्द म्हणतात–

सद्दो खंधप्पभवो खंधो परमाणुसंगसंघादो । पुट्ठेसु तेसु जायदि सद्दो उप्पादगो णियमा ॥ –पंचास्तिकाय

शब्द स्कंधापासून उत्पन्न होतात. अनेक परमाणूंच्या बंधाला स्कंध म्हणतात. अशा स्कंधाचा मिलाप होवून शब्दाची उत्पत्ति होते.

यावरून शब्द पुद्गलपर्याय आहे. पुद्गलाचीच ती एक अवस्था आहे. शब्द ज्याअर्थी पुद्गलाचा पर्याय आहे, तर तो कोणत्या गुणाच्या विकारामुळे उत्पन्न होतो.

पुद्गलामध्ये प्रमुखपणे चार गुण आहेत. त्यापैकी स्पर्शगुणाच्या विकाराने शब्द उत्पन्न होतो. पुद्गल स्वरूप असलेल्या भाषावर्गणेत पुद्गलाचे चारही गुण असले तरी स्पर्शगुणाच्या परिवर्तनाने शब्दाची उत्पत्ति होते. याच कारणामुळे कर्णेन्द्रियाशी स्पर्श घडल्यानंतरच शब्द अर्थबोधाला कारण बनतो. हल्लीच्या विज्ञानाने ध्वनी (Sound) कसा उत्पन्न होतो (याच कारणामुळे कर्णेद्रियाशी) या बाबतीत जी प्रक्रीया दाखविली आहे तिच्यावरून देखील या म्हणण्याचे समर्थन होते. जैनदार्शनिकानी शब्द हा गतिमान, स्थितिमान व मूर्तिक मानला आहे. प्रयोगाने पण शब्द हा या तीन गुणानी युक्त आहे असे सिद्ध होते. अर्थात् शब्द या पुद्गलाचा पर्याय आहे व तो स्पर्श गुणाच्या विकारामुळे उत्पन्न होतो. तसेच यात पुद्गलाच्या चार गुणापैकी स्पर्श गुणच मुख्यत्वे करून स्पष्टपणे दिसतो.

नित्यानित्यता– मीमांसक म्हणतात की शब्द अनित्य मानल्यास पदार्थाचे ज्ञान होणे शक्य नाही. शब्दामुळे पदार्थाचे ज्ञान होते. म्हणून शब्द नित्य आहे. जर तो नित्य नसेल तर तो स्वार्थवाचक होऊ शकत नाही. शब्दामध्ये वाचकत्व व पदार्थामध्ये वाच्य शक्ती आहे. म्हणून शब्द व पदार्थ यांच्यात वाच्य-वाचक संबंध आहे. हा संबंध प्रत्यक्ष, अनुमान व आगम प्रमाणाने सिद्ध आहे. उदा. आम्ही असे म्हणू शकतो की, आम्ही एखाद्या व्यक्तीला पाणी आणावयास सांगितले. शब्द जर अनित्य असता तर पाणी या शब्दोच्चारणबरोबर तो नष्ट झाला असता व श्रोत्याला अर्थज्ञान घडले नसते. अशा परिस्थितीत कुठले पाणी व कुठले काय ? ऐकणारा कधीच पाणी आणून देणार नाही. पण या सर्व गोष्टी घडून येतात. ऐकताच श्रोत्याला अर्थबोध होतो आणि तशी क्रियाही घडून येते. म्हणून शब्द नित्य आहे. अनित्य शब्दापासून अर्थ प्रतीती, प्रवृत्ति व प्राप्ती घडणे शक्य नाही.।

'हा घट आहे' या शब्दाचे सादृश्य अशा प्रकारच्या वेगवेगळया देशातील शब्दात आढळते. यावरून हे सादृश्य अर्थवाचक होईल ती काही नित्यता नव्हे. अशा तऱ्हेची शंका घेणे बरोबर नाही. सादृश्यामुळे शब्द अर्थवाचक होऊ शकत नाही. तसे मानल्यास शब्द ज्ञानात भ्रांतीदोष उत्पन्न होईल. एका शब्दाचा संकेत झाला असता दुसऱ्या शब्दाने होणारा अर्थनिश्चय निर्भ्रान्त असू शकत नाही, नाही तर ज्याचा संकेत घेतला आहे अशा गो शब्दाने अश्व शब्द वापरला तरी होणारा गाय या अर्थाचा निश्चय देखील निर्भ्रांत ठरेल. जर शब्दांच्या अवयव साम्यावरून शब्दातील सादृश्य मानले तर ते देखील योग्य होणार नाही. कारण वर्ण हे निरवयव आहेत. गत्वविशिष्ट ग आदी शब्दामध्ये देखील वाचकत्व येऊ शकत नाही. कारण ग आदी सामान्याचा अभाव आहे आणि सामान्याचाच जेथे अभाव आहे तेथे अनेकत्व कसे शक्य होईल. म्हणून नित्य शब्दानेच अर्थबोध होऊ शकतो.

पतञ्जलीने 'ऋलृक' सूत्राची व्याख्या करताना जातिवाचक, गुणवाचक, क्रियावाचक व यदृच्छा शब्दांचे वर्णन केले आहे- त्यात म्हणतात—जातिशब्द नित्य आहेत, क्रियावाचक शब्द सूक्ष्म तसेच अप्रत्यक्ष आहेत. गुणवाचक शब्द व्यवहार्य आहेत व स्वानुभूती स्वसंवेद्य तसेच यदृच्छा शब्द लोकव्यवहाराला कारण आहेत. यदृच्छा शब्द भौतिक आहेत ते नित्य नाहीत. प्रतिक्षण परिवर्तनशील आहेत.

नैयायिक व वैशेषिक शब्दाला अनित्य मानतात. उत्पत्तीच्या तिसऱ्या क्षणाला शब्दाचा नाश होतो असा त्याचा सिद्धांत आहे. शब्दाला ते आकाशाचा विशिष्ट गुण समजतात. लौकिक व्यवहारात वर्णाहून पृथक् अशा नाद ध्वनीलाच शब्द म्हटले जाते.

बौद्ध अपोह-अन्यनिवृत्तीरूप शब्दाला मानतात. तसेच त्यांच्या दर्शनात शब्दाला अनित्य मानले आहे.

प्रभाकराने शब्दाच्या दोन अवस्था मानल्या आहेत. एक ध्वनिरूप व दुसरी वर्णरूप. या दोहोंना आकाशाचा गुण म्हटले आहे. त्यापैकी ध्वन्यात्मक शब्द अनित्य आहेत आणि वर्णात्मक शब्द नित्य आहेत असे त्यांचे मत आहे.

जैनदर्शनाची भूमिका समन्वयाची आहे. ते शब्दाला नित्यनित्यात्मक मानते. वस्तुस्थितीच अशी आहे की जैनदर्शनात दोन दृष्टीकोनातून विचार करण्याची पद्धती आहे. एक द्रव्यार्थिकन्वय–द्रव्यदृष्टीने विचार व दुसरा पर्यायार्थिक नय– पर्यायदृष्टीने विचार. कोणत्याही वस्तूचा विचार करताना वरील दृष्टीपैकी जेव्हा एका दृष्टीने विचार केला जातो तेव्हा तिला मुख्यता दुसरीला गौणता असते. दुसऱ्या दृष्टीने विचार केला जातो तेव्हा तिला मुख्यता व पहिल्याला गौणता असते. म्हणून द्रव्यदृष्टीने विचार केल्यास शब्द कथंचित नित्य सिद्ध होतो. कारण द्रव्यरूप शब्दवर्गणा नेहमी विद्यमान असतात व पर्यायदृष्टीने विचार केल्यास शब्द कथंचित् अनित्य सिद्ध होतो. कारण विशिष्ट व्यक्ती ज्या शब्दांचा उच्चार करते ते शब्द त्याच क्षणी अथवा थोडया अवधीत नष्ट होतात. जैन दार्शनिकाची पर्यायापेक्षेने देखील शब्द श्रोत्याच्या कानापर्यंत जाऊ शकणार नाहीत, मध्येच नष्ट होतील. एवढेच क्षण विध्वंसी मानले नाही. एकाच शब्दाची स्थिती कथंचित नित्यानित्यात्मक असू शकते. म्हणूनच जैन दार्शनिकांनी शब्दाला एकांततः नित्य किंवा अनित्य मानणाऱ्या बाजूचे युक्तिपूर्वक निराकरण केले आहे. कुमारिल भट्टाच्या नित्य पक्षाचे समालोचन करताना प्रभाचंद्र म्हणतात– अर्थवाचकत्वाखाली शब्दाला नित्य मानण्याची आवश्यकता नाही, शब्द अनित्य असला तरी त्यापासून अर्थ प्रतिपादन शक्य आहे. उदा. अनित्य अशा धूर वगैरे सादृश्यतेमुळे पर्वत व स्वयपाक घरातील अग्नीचे ज्ञान होते. त्याचप्रमाणे ज्यांचा संकेत गृहीत केला आहे अशा अनित्य शब्दाद्वारे देखील सादृश्यतेमुळे अर्थप्रतिपादनाची शक्यता आहे. जर कार्यकारण व सादृश्य संबंधताना वस्तु प्रतिपादक मानले नाही. फक्त नित्यत्वालाच मुख्यता दिली तर सर्वत्र सर्वच वस्तूंना नित्यत्व मानावे लागेल व ही एक आपत्तीच ठरेल म्हणून कुमारिल भट्टाचे शब्दाला नित्य मानणे त्याची उत्पत्ति न मानता आविर्भाव तिरोभाव मानणे या गोष्टी सदोष आहेत. तर्काद्वारे शब्द कथंचित् नित्यानित्यरूपच सिद्ध होतो. शब्दाची उत्पत्ति होत असते, अभिव्यक्ती घडत नाही.

## अर्थ-प्रतिपत्ती-

जैनदर्शनकारांनी पदार्थात वाच्यरूप व शब्दात वाचकरूपाची एक स्वाभाविक योग्यता मानली आहे. या योग्यतेमुळेच संकेत वगैरे द्वारे शब्द सत्य अर्थाने ज्ञान करवितात. घट शब्दात कंबुग्रीवादि वैशिष्टययुक्त घागरीचे वर्णन करण्याची शक्ती आहे व घागरीत वाच्यरूप शक्ती आहे. घट हा शब्द अशा प्रकारच्या वस्तूचा द्योतक आहे, अशा प्रकारचा संकेत आहे की ज्या व्यक्तीने ग्रहण केला असेल ती व्यक्ती घटशब्द ऐकल्याबरोबर जलधारण क्रिया करणाऱ्या घट पदार्थाचे ज्ञान प्राप्त करते. अर्थ-प्रतिपत्ती सांगताना आचार्य माणिक्यनंदि म्हणतात-

सहजयोग्यतासंकेतवशाद्धि शब्दादयो वस्तु प्रतिपत्तिहेतवः। — परिक्षामुख

शब्द व अर्थ यातील वास्तविक संबंधाची सिद्धी करताना उपस्थित केलेल्या तर्काचे उत्तर देताना आचार्य प्रभाचंद्र म्हणतात- अर्थज्ञानाच्या वेगवेगळ्या साधनानी अर्थज्ञान सारख्याच रूपात स्पष्ट होईल असे नाही. एखादे साधन अधिक स्पष्ट रूपाने वस्तूचे ज्ञान करून देईल. एखाद्या साधनाने तितकी स्पष्टता येणार नाही. अग्नी या शब्दाने अग्नीचे जे ज्ञान होते ते अग्नीच्या ज्वाला भडकत असताना उत्पन्न होणाऱ्या दाहकतेच्या स्पष्टतेहून कमी स्पष्टतेचे असणार. साधन भेदावर स्पष्टास्पष्टता अवलंबून आहे, विषय भेदावर नाही. म्हणून अस्पष्ट ज्ञान करविणाऱ्या साधनाने जाणलेल्या वस्तूला असत्य म्हणता येणार नाही. एकच शब्द साधन भिन्नतेमुळे वेगवेगळ्या परिस्थितीत वेगवेगळ्या वस्तूना प्रकट करण्याची योग्यता बाळगून असतो.

शब्द व अर्थ यांच्या या स्वाभाविक योग्यतेविषयी मीमांसक आपत्ती प्रकट करतात. अर्थामध्ये असलेली ही स्वाभाविक योग्यता नित्य आहे की अनित्य? नित्य मानल्यास अनवस्था दोष येईल आणि अनित्य मानल्यास सिद्ध साध्यता दोष येईल. याचे उत्तर देताना आचार्य म्हणतात- हात, नेत्र, बोट, संज्ञा संबंधाप्रमाणे शब्दाचा संबंध अनित्य असला तरी पदार्थाचे ज्ञान घडविण्यास तो पूर्ण समर्थ आहे. हात, संज्ञा इत्यादींचा आपल्या अर्थाशी असलेला संबंध नित्य नाही. कारण स्वतः हात, संज्ञा इ. अनित्य आहे. अशा परिस्थितीत त्यांच्या आधारे घडणारा संबंध नित्य कसा असू शकेल? भितीवर काढलेले चित्र भिंतीचे अस्तित्व असेतोपर्यंत असते, भित नष्ट होताच चित्र नष्ट होते. त्याचप्रमाणे शब्द असताना स्वाभाविक योग्यतेमुळे अर्थबोध होतो व शब्दाच्या अभावी अर्थबोध होत नाही. अशा प्रकारे मीमांसकाच्या सर्व आक्षेपाना युक्तीपूर्ण उत्तर प्रभाचन्द्राचार्यांनी दिले आहे.

भर्तृहरीने आपल्या वाक्यपदीय टीकेत शब्द व अर्थ यांच्या वेगवेगळ्या शक्तीचे निरूपण केले आहे. प्रभाचंद्रानी प्रमेयकमलमार्तंडमध्ये शब्द व अर्थ यांच्या स्वाभाविक योग्यतेचे निरूपण करून भर्तृहरीच्या सिद्धांताचा विस्तारपूर्वक विचार केला.

## शब्द व अर्थ यांचा संबंध-

जैनदर्शनामध्ये शब्दाशी अर्थाचा तादात्म्य सबंध मानला आहे. तो स्वाभाविक असून कथंचित् नित्यानित्य आहे. ज्ञान व ज्ञेय यांच्यात ज्ञाप्य, ज्ञापक संबध आहे. शब्द व अर्थ यांच्यात योग्यतेशिवाय पण कार्यकारणवादी दुसरा कसला संबंध नाही. शब्द व अर्थ यांच्यात योग्यतेचा संबंध झाल्यावरच संकेत होतो. संकेतामुळेच शब्द वस्तुज्ञानाचे साधन बनतात. फरक इतकाच की हा सबंध नित्य नाही व याची सिद्धी प्रत्यक्ष अनुमान व अर्थापत्ती या तिन्ही प्रमाणाने होते.

जैन दार्शनिकानी नित्य संबंध, अनित्य संबध व संबंधाभाव याचे विस्तारपूर्वक खंडन केले आहे शब्दार्थ प्राप्तीला क्षयोपशमरूप शक्ती प्रमुख कारण आहे. या शक्तीमुळे मागच्या पुढच्या वर्णज्ञानापासून उत्पन्न झालेला




संस्कार स्मृतीला जन्म देतो. तीमुळे अन्त्यवर्ण अर्थ प्रतीतीला कारण होतो. याप्रमाणे वाक्य व पद देखील अर्थ प्रतीतीला सहायक बनतात.

जैनदर्शनात शब्द व अर्थ याच्यात कदाचित् तादात्म्य लक्षण मानला आहे. त्यामुळे स्फोटवादी वैयाकरणाच्या शंकेला अवसर मिळत नाही. भद्रबाहुस्वामीनी शब्द व अर्थ यांच्या संबंधाचे वर्णन केले आहे की, शब्द अर्थ भिन्न आहेत. एक अभिधान दुसरे अभिधेय व अभिन्न आहे कारण खुर, अग्नी, लाडू यांचा उच्चार केल्याने वक्त्याचे तोंड किंवा श्रोत्याचे कान नष्ट होत नाहीत. म्हणून शब्द अर्थापासून कथंचित् भिन्न आहे. तसेच मोदक शब्द उच्चारल्याने मोदक या वस्तुविषयीचे ज्ञान होते, इतर वस्तूंचे होत नाही. म्हणून वाच्य अर्थाहून शब्द कथंचित् अभिन्न आहे.

**शब्दाचे भेद–**

शब्दाचे भेद मुख्य दोन आहेत– १) भाषारूप, २) अभाषारूप. भाषारूप शब्दाचे दोन प्रकार आहेत– १) अक्षररूप, २) अनक्षररूप. मनुष्याच्या व्यवहारात येणाऱ्या अनेक भाषा अक्षररूप भाषात्मक शब्द होत. पशुपक्षांच्या आवाजात अनक्षर भाषात्मक शब्द होत. अभाषारूप शब्दाचे दोन भेद आहेत– प्रायोगिक व स्वाभाविक. जो शब्द पुरुष प्रयत्नाने उत्पन्न होतो त्याला प्रायोगिक व पुरुष प्रयत्नाशिवाय ढगादिकांच्या होणाऱ्या गर्जनेला स्वाभाविक शब्द म्हणतात. प्रायोगिकाचे चार भेद आहेत. तत, वितत, घन व सुषिर. कातड्याने मढवून ढोल, नगारा, इत्यादीचा जो शब्द त्याला तत म्हणतात. वीणा, सतार वगैरेच्या शब्दाला वितत, घंटा, झांज आदीच्या आवाजाला घन व बासरी, शंख वगैरेच्या आवाजाला सुषिर म्हणतात.

एकूण जैनदर्शनात शब्दाला महत्वाचे स्थान आहे. त्याशिवाय प्रमा (क्रिया) घडणे शक्य नाही व सर्वज्ञ वचनांच्या प्रमाणतेच्या अभावी आगम देखील प्रमाण मानता येणार नाही. जैन दर्शनिकांनी शब्दाला आकाशाचा गुण मानले नाही. शब्दसिद्धी अनेकान्ताने केली आहे. तो पौदगलिक मानला गेला आहे व शब्द व अर्थ यात कथंचित् तादात्म्य संबंध सिद्ध केला आहे.






# अहिंसा

धम्मो मंगलमुक्किट्ठं अहिंसा संजमो तवो। देवा वि तस्स पणमंति जस्स धम्मे सया मणो ॥

**'अहिंसा परमो धर्मः'** अहिंसा हा सर्व प्राणीमात्रांचा सहज स्वाभाविक उत्कृष्ट धर्म आहे. वत्थुसहावो धम्मो जीवाचा जो स्वभाव तो जीवाचा धर्म. धर्म हेच उत्कृष्ट मंगल आहे. ( मं+गल ) जे सर्व दुःखाचा नाश करते व ( मंग+ल ) जे शाश्वत सुखाची प्राप्ती करून देते ते मंगल होय.

अहिंसा संयम व तप हे जीवाचे उत्कृष्ट मंगल आहे. तोच जीवाचा स्वभाव आहे. ज्याचे मन सदासर्वदा आपल्या स्वभावधर्मात लीन असते त्याचे चरणी स्वर्गातील देव देखील नमस्कार करतात, लोटांगण घालतात. हिंसा न करणे याला अहिंसा म्हणतात. हे अहिंसेचे नास्तिरूपाने कथन आहे. अहिंसेची आस्तिमुखाने परिभाषा करताना शमभाव– समताभाव याला अहिंसा म्हटले आहे.

अप्रादुर्भावः खलु रागादीनां भवत्यहिंसेति । तेषामेवोत्पत्तिः हिंसेति जिनागमस्य संक्षेपः ॥

( पुरुषार्थ सिद्ध्युपाय )

राग, द्वेष, मोह भाव उत्पन्न न होणे, विषमभाव उत्पन्न न होणे अर्थात् समताभाव ठेवणे यालाच अहिंसा म्हणतात. राग–द्वेष–मोहरूप विषमभावाची उत्पत्ति होणे यालाच हिंसा म्हणतात.

शमभावाचे स्वरूप सांगताना आचार्य म्हणतात –

चारित्तं खलु धम्मो धम्मो जो समोत्ति णिद्दिट्ठो । मोहक्खोहविहीणो परिणामो अप्पणो हु समो ॥

( प्रवचनसार गाथा ७ )

मोह व क्षोभ ( राग–द्वेष) रूप विषमभाव यानी रहित असा जो आत्म्याचा परिणाम त्याला शम किंवा समताभाव म्हणतात. शमभाव हाच जीवाचा धर्म म्हणजे स्वभावधर्म आहे. राग द्वेष परिणाम न होऊ देता ज्ञाता–द्रष्टारूप शमभावरूपाने– परम उदासीनभावरूपाने परिणमने हेच खरे चारित्र होय. तोच जीवाचा सहजसिद्ध स्वभावधर्म आहे.

पाच स्थावरकाय जीव– पृथ्वी, पाणी, वारा, अग्नी, वनस्पति व त्रसकाय जीव– द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय याप्रमाणे षट्काय जीवांची हिंसा न करणे याला अहिंसा म्हणतात. ही अहिंसेची स्थूलदृष्टीने व्याख्या आहे.

ही षट्काय जीवांची हिंसा करण्याचे परिणाम का होतात याचा जर सूक्ष्मदृष्टीने विचार केला तर मिथ्यात्व– परद्रव्याविषयी आत्मत्वबुद्धि व परद्रव्याचे मी चांगले–वाईट करू शकतो अशी कर्तृत्वबुद्धि, ममकार व अहंकार हे महापाप आहे. ही खरी हिंसा आहे. जीवाचे राग–द्वेष–मोहरूप परिणाम ही खरी हिंसा आहे.

हिंसेची परिभाषा करताना तत्वार्थसूत्र ग्रंथात म्हटले आहे–

" प्रमत्तयोगात् प्राणव्यपरोपणं हिंसा " ( तत्वार्थसूत्र अध्याय ७ सूत्र ८ )

प्रमत्तयोगपूर्वक– राग, द्वेष, मोह भावपूर्वक आपल्या व दुसऱ्याच्या भावप्राणाचा व द्रव्यप्राणाचा घात करणे याला हिंसा म्हणतात.

जेथे प्रमत्तयोग[1] असेल, मारण्याची बुद्धि–रागद्वेष–मोह परिणाम असतील तेथे प्रथम आपल्या भावप्राणाचा, आपल्या चैतन्यप्राणाचा, आपल्या ज्ञाताद्रष्टा स्वभावधर्माचा घात होत असल्यामुळे ती हिंसा म्हटली जाते. जर कदाचित् त्यावेळी ज्याला आपण मारण्याची बुद्धि करतो त्या जीवाच्या प्राणाचा घात होवो अथवा न होवो तरी आपण मारण्याची बुद्धि केल्याने आपण आपल्या चैतन्यप्राणाचा घात केल्याने ती हिंसा म्हटली जाते. त्या हिंसेचे फळ पापकर्माचा बंध आपणास लागतो

याचे उलट प्रमत्तयोग नसेल[2], मारण्याची बुद्धि नसेल, परंतु जरी कदाचित् दुसऱ्या जीवाचे प्राणाचा घात घडला तरी ती हिंसा म्हटली जात नाही. त्यापासून त्याला हिंसेचे पातक लागत नाही.

मरदु य जियदु व जीवो अयदाचारस्स णिच्छिदा हिंसा । पयदस्स णत्थि बंधो हिंसामेत्तेण समिदस्स ।।

( प्रवचनसार अ. ३ गाथा १७ )

जीव मरो अथवा न मरो, जिवंत असो, जो प्रमत्तयोगपूर्वक अयत्नाचारपूर्वक क्रिया करतो त्याला निश्चितपणे हिंसेचे पातक लागतो. परंतु जो यत्नाचारपूर्वक, ईर्या समितिपूर्वक गमन करीत आहे व जर कदाचित् चुकून नियोगवश त्याचे पायाखाली मुगी, मुगळा, कीटक जंतु, प्राणी रगडला गेला व मेला तरी केवळ त्याच्या द्रव्य प्राणाचा घात झाल्याने त्याला हिंसा निमित्तक बंध होत नाही. हिंसेचे पातक लागत नाही.

उच्चालियम्हि पाए इरियासमिदस्स णिग्गमत्थाए । आबाधेज्ज कुलिंगो मरेज्ज तज्जोगमासेज्ज ।। १ ।।
ण हि तस्स तण्णिमित्तो बंधो सुहुमो य देसिदो समये । मुच्छा परिग्गहो च्चिय अज्झप्पपमाणदो दिठ्ठो ।। २ ।।

कोणी ज्ञानी मुनि ईर्यासमितीपूर्वक गमन करीत असताना पाय उचलून जमिनीवर टेकत नाही तोच त्यांचे पायाखाली जर एखादा सूक्ष्म किडा, जंतु, प्राणी रगडला गेला व मेला तरी त्याना हिंसा निमित्तक सूक्ष्म बंध देखील होत नाही असे शास्त्रात सांगितले आहे. कारण अध्यात्मशास्त्रप्रमाणाने मूर्च्छा ममत्वरूप परिणामाला परिग्रह म्हटले आहे.

अंतरंगच्छेद म्हणजे आपल्या चैतन्यप्राणाचा घात. रागद्वेष मोहरूप परिणाम होणे हाच खरा अंतरंगच्छेद आहे. तीच खरी हिंसा आहे. जेथे अंतरंगच्छेद झाला असेल तेथे जरी कदाचित् बहिरंगच्छेद द्रव्यप्राणाचा घात झाला नसेल तरी ती हिंसाच म्हटली जाते. त्याला राज्यशासनात व धर्मशासनात देखील दंड सांगितला आहे.

याचे उलट अंतरंगच्छेद जेथे नसेल, मारण्याची बुद्धि नसेल, प्रमत्तयोग नसेल, परंतु जरी कदाचित् द्रव्यप्राणाचा घात झाला, बहिरंगच्छेद झाला तरी त्याला राज्यशासनात व धर्मशासनात देखील दंड दिला जात नाही.

एखादा कोळी माश्याचे जाळे विणत आहे, मासे पकडण्याची किंवा मासे मारण्याची क्रिया प्रत्यक्ष करीत नाही, तथापि मासे मारण्याची बुद्धि असल्यामुळे तो दोषार्ह म्हटला जातो. त्याला हिंसेचे– मासे मारण्याचे पातक अवश्य लागते.

याचे उलट एखादा डॉक्टर आहे. रोगी न मरावा याची तो सावधानतेने काळजी घेत आहे. पण कदाचित् प्रयत्न करूनही रोगी वाचला नाही, दगावला तरी तो दोषी म्हटला जात नाही. राज्यशासन किंवा धर्मशासन त्याला दंडार्ह ठरवीत नाही.

अहिंसा भूताना जगति विदितं ब्रम्ह परमं । न सा तत्रारंभोऽस्त्यणुरपि च यत्राश्रमविधौ ।
ततस्तत् सिध्यर्थं परमकरुणो ग्रथमुभयं । भवानेवात्याक्षीन्नच विकृतवेषोपधिरतः ।। (स्वयंभूस्तोत्र)

१. पुरुषार्थ सिध्युपाय श्लोक ४६–४७. २. पुरुषार्थ सिध्यु. श्लोक ४५

आचार्य समन्तभद्र आपल्या स्वयंभूस्तोत्रात-

तीर्थंकराचे स्तवन करीत असताना जैन देव-दैवताची मूर्ति नग्न दिगंबर, शांत-वीतराग, आकाळ विकाळ वेषोपाधीने रहित, शस्त्र अस्त्र गदा इत्यादि आयुधाने रहित, वस्त्र-आभूषण अलंकार दागिने यानी रहित का असते याची कारणमीमांसा मोठ्या मार्मिक शब्दात दाखवितात की-

अहिंसा हे जगातील सर्व प्राणीमात्राचे परमब्रम्ह आहे. अहिंसा म्हणजे स्वतंत्र अस्तित्वजीवन. प्रत्येक प्राणी, जगातील प्रत्येक वस्तु स्वाधीन स्वतंत्र आहे, पराधीन परतंत्र नाही. प्रत्येकाला आपले स्वतंत्र अस्तित्वजीवन जगण्याचा अधिकार आहे. Live & Let Live स्वतः स्वतंत्र अस्तित्व जीवनाने जगावे व दुसऱ्यास त्याच्या स्वतंत्र अस्तित्व जीवनाने जगू द्यावे हा शब्द शासन ब्रम्हाचा मंगल आदेश आहे.

जेथे, मग तो गृहस्थाश्रम असो किंवा संन्यासाश्रम असो, गृहस्थी श्रावकाचे आचरण असो की साधु-मुनीचे आचरण असो, ज्या ठिकाणी अणुमात्र आरंभ पापाचरण व अणुमात्र परिग्रह- मूर्च्छाममत्व भावरूप अंतरंग परिग्रह, धन-धान्यादि बाह्य परिग्रह जेथे अणुमात्र असेल तेथे अहिंसेचे पालन होऊ शकत नाही.

म्हणून अहिंसा ब्रम्हाचे रक्षण करण्यासाठी, अहिंसेचे सर्वांग पालन करण्यासाठी जैन मुनी, जैन तीर्थंकरदेव परम करूणाभाव धारण करुन सर्व प्रकारच्या बाह्य व अभ्यंतर दोन्ही प्रकारच्या आरंभ व परिग्रहाचा त्याग करतात व आत्मध्यानस्थ होऊन आपल्या शुद्ध ज्ञाता द्रष्टास्वभावात अविचल स्थिर राहतात. त्या अहिंसाब्रम्हाचे प्रतीक म्हणजे जैन देव-दैवताची-गुरुची परमशांत, वीतराग, नग्न दिगंबर जिनमूर्ती होय. आपल्या शुद्ध ज्ञानब्रम्हात अविचल स्थिर राहणे हीच खरी अहिंसा होय. तेच खरे ब्रम्हसत् होय.

प्रत्येक पदार्थ आपले अहिंसामय स्वतंत्र अस्तित्व जीवन जगत आहे. असा जगाचा ब्रम्हसिद्धांत असताना हा जीवब्रम्हा अब्रम्ह बनून, अन्य वस्तूचे स्वतंत्र अस्तित्व जीवन अपहरण करण्याची खोटी बुद्धी करीत आहे, जगातील सर्व वस्तूवर आपले स्वामित्व प्रभुत्व गाजविण्याचे महान् पाप करीत आहे. दुसऱ्या वस्तूवर, दुसऱ्या प्राण्यावर आपले स्वामित्व प्रभुत्व गाजविणे हेच अब्रम्ह, हीच खरी हिंसा, हेच महान पाप आहे.

आपण स्वतः आपले स्वतंत्र अस्तित्व जीवन जगणे व दुसऱ्यास त्याचे स्वतंत्र अस्तित्व जीवन जगू देणे, त्याचेवर आपले स्वामित्व प्रभुत्व न गाजविणे हीच खरी अहिंसा, तेच परमब्रम्ह.

आचारसंहिता ग्रंथात ही उत्कृष्ट आचार संहिता सांगितली आहे. जोपर्यंत ही उत्कृष्ट आचारसंहिता उत्कृष्ट अहिंसा परमब्रम्ह धारण करण्याचे सामर्थ्य प्राप्त होत नाही तोपर्यंत या उत्कृष्ट आचारसंहितेची सतत भावना लक्ष्यबिंदु ठेवून त्याची साधना करण्यासाठी तावत्काल मध्यम किंवा जघन्य आचारसंहिता देखील व्यवहारधर्म, लौकिकधर्म, अपवादमार्ग म्हणून सांगितला आहे.

हा लौकिक आचारधर्म धर्माच्या अपेक्षेने आपेक्षिक धर्म- आपत्धर्म म्हटला जातो. या मध्य किंवा जघन्य आचार धर्माचे पालन करीत असताना ज्या प्रमाणात सूक्ष्म हिंसा अब्रम्ह घडते ते अगतिक असते. नाइलाज असतो. त्याशिवाय लौकिक जीवन जगणे दुरापास्त असते

जीवो जीवस्य जीवनं- ऐहिक जीवनाचा आधार श्वासोच्छ्वास आहे. बाहेरील स्वच्छ वायु आत घेणे यास श्वास म्हणतात. आतील दूषित वायु बाहेर सोडणे यास उच्छ्वास म्हणतात. वायु हा वायुकायिकजीव आहे. श्वासोच्छ्वास घेताना वायु आत घेताना व बाहेर सोडताना वायुकायिक जीवाची हिंसा होते व त्याबरोबर सर्वत्र पसरलेले जे सूक्ष्म जीव त्यांचाही घात होतो.




लोकाकाशामध्ये सर्वत्र हे सूक्ष्म जीव पसरले असतात आपण थोडे हलन चलन केले की त्या सूक्ष्म जीवाचा घात होतो. म्हणूनच म्हटले आहे की " जीवो जीवस्य जीवन " जीवाचे जीवन जीवावरच अवलवून आहे. त्याशिवाय हे वाह्य संसारी जीवन जगण्याचा दुसरा उपाय नाही.

परंतु वरील उक्तीचे रहस्य न ओळखता कोणत्याही प्राण्याला मारून आपले पोट भरावे, त्यासाठी हरिण, ससे वगैरेसारखे मूक प्राण्यांची शिकार करून त्याना मारून त्यांचे जीवनावर आपले वीतभर पोट भरावे हा जीवनाचा राक्षसी प्रकार सुरू झाला.

जैन शासनाने 'जीवो जीवस्य जीवनं' या जीवन जगण्याच्या प्रकाराला वांध घातला. त्यासाठी काही नियम ठरवून दिले.

सर्व प्रथम हिंसेचे दोन प्रकार सांगितले.– १) भावहिंसा, २) द्रव्यहिंसा.

**१ भावहिंसा–** 'अहं एनं हिनस्मि' मी या जीवास मारतो अशी मारण्याची बुद्धि ठेवून हिंसा करणे, प्रमत्तयोगपूर्वक, सावद्ययोगपूर्वक हिंसा करणे ही भावहिंसा होय.

**२ द्रव्यहिंसा–** भावहिंसापूर्वक आपल्या किंवा दुसऱ्या प्राण्याच्या द्रव्यप्राणाचा घात करणे, त्यांचे प्राण हरण करणे त्यास द्रव्यहिंसा म्हणतात.

जेथे भावहिंसेपूर्वक द्रव्यहिंसा घडते तीच खरी हिंसा म्हटली जाते. त्यालाच हिंसेचे पातक लागते. जेथे मारण्याची बुद्धि नसते, प्रमत्तयोग नसतो, जीवाचे रक्षण व्हावे याची सावधानता असते अशा वेळी देखील अनायासे न कळत जो द्रव्यहिंसा घडते, दुसऱ्याच्या प्राणाचा घात होतो त्याला जैनशासनाने हिंसा म्हटले नाही. त्याला हिंसेसंबंधी पातक लागत नाही. यासंबधी श्री. प. आशाधरजी आपल्या सागारधर्मामृत ग्रंथात म्हणतात–

विष्वग्जीवचिते लोके क्व चरन् क्वाप्यमोक्षत । भावैकसाधनौ बंधमोक्षौ चेन्नाभविष्यताम् ।। (सागारधर्म)

हे जग सूक्ष्म प्राण्यांनी गचपच भरले आहे. थोडी हालचाल केली की त्या सूक्ष्म जीवाचा घात होतो. श्वासोच्छ्वास घेतला की सूक्ष्म जीव मरतात. अशा वेळी जर केवळ या द्रव्यप्राणाच्या घातालाच हिंसा म्हटले असते तर या जीवाला कदापि मुक्तीची प्राप्ति झाली नसती. म्हणून जैनशासनाने वंध किंवा मोक्ष हा केवळ द्रव्यप्राणांच्या घातावर आधारित न मानता जीवाच्या परिणामावर नियमित करून हिंसेला मर्यादित केले आहे.

हिंसेचे परिणाम ठेवणे किंवा प्रत्यक्ष हिंसा करणे ही तर हिंसा आहेच. परंतु हिंसा करणे चांगले नाही ही भावना ठेवून " मी हिंसा करणार नाही " असा जोपर्यंत हिंसा न करण्याबद्दल नियम घेतला जात नाही, तोपर्यंत तो प्रत्यक्ष हिंसा करीत नसताना देखील त्याला हिंसा करण्याचे पातक लागते. म्हणून हिंसा न करण्याचा निश्चयपूर्वक नियम करणे, ही खरी अहिंसा म्हटली जाते. हिंसारूप परिणमन जशी हिंसा म्हटली जाते, तसेच हिंसेपासून अविरमण–असंयम–अविरती याला देखील हिंसा म्हटली आहे. जेथे प्रमत्तयोग आहे तेथे नियमाने आपल्या चैतन्य प्राणाचा घात अवश्य आहे.

जैन शासनाने हिंसा न करण्यासंबंधी विरमणरूप नियम दोन प्रकारचा सांगितला आहे १) सकल देश विरमण (महाव्रत) २) एक देश विरमण (अणुव्रत).

**१ सकलदेश विरमण–** हिंसा–असत्य–चोरी–अब्रह्म (कुशील सेवन) परिग्रह या पंचपापांचा पूर्णपणे त्याग करणे ते सकल देश विरमण होय. सर्व आरंभ–व्यापार व परिग्रह यांचा त्याग करणारा मुनीच हा सकल देश विरति रूप महाव्रत धारण करू शकतो. आत्मज्ञान व आत्मध्यान रूपाने जीवन जगणे हेच जीवाचे खरे जीवन होय.







२ एकदेश विरमण- हिंसादि पंच पापांचा एक देश अंशतः विरमणत्याग, अंशतः अविरमण (अर्थात् अंशतः हिंसारूप परिणमन) ते एकदेश विरमण होय. हे श्रावकाचे गृहस्थीजीवन–व्यवहारजीवन होय. यालाच अणुव्रत किंवा विरताविरत असे दुसरे नांव आहे. या गृहस्थीजीवनामध्ये ज्ञानी श्रावक स्थूलपणे हिंसादि पापांचा त्याग करतो. द्वींद्रियादि त्रसजीवांचा घात करीत नाही. त्रस जीवांच्या शरीरामध्ये रक्त–मांस आदि सप्तधातू असतात म्हणून त्याना मारून त्यांचे भक्षण करणे हे मांस भक्षण म्हटले जाते. मद्य–मांस मधु व पंच उदंबर फळे– ( वड–पीपर–पाकर–उंबर–कटुंबर ) यांचे सेवन केल्याने त्रस जीवांचा घात होतो. म्हणून देशव्रती श्रावक या पदार्थांचा आजन्म त्याग करतो.

परंतु गृह व्यापार संबंधी आरंभक्रिया करताना एकेंद्रिय स्थावर जीवांची हिंसा तो टाळ शकत नाही. शेती करणे, जमीन नांगरणे, पाणी सांडणे, अग्नि पेटविणे, वनस्पती पासून धान्य, बीज, फळे, भाजीपाला तोडून सेवन करणे या सर्व क्रिया त्याला नाइलाज म्हणून, गत्यंतर नाही, म्हणून कराव्या लागतात. तथापि त्यामध्ये देखील तो अत्यंत सावधानता ठेवतो प्रयोजनवश आवश्यक असेल तेवढाच आरंभ करतो. व्यर्थ अनर्थदंड करीत नाही.

याप्रमाणे विरत–अविरतरूप एकदेश विरमणरूप–अणुव्रतरूप व्यवहार जीवन जगणे हा श्रावकाचा अपवाद मार्ग म्हटला जातो.

यद्यपि[१] बाह्य वस्तूचा त्याग करणे किंवा त्याग न करणे यावर अहिंसा किंवा हिंसा ही आधारित नाही. जीवाच्या परिणामावर आधारित आहे. जेथे प्रमत्तयोग असेल तेथे हिंसा, जेथे प्रमत्तयोग नसेल तेथे हिंसा नाही. तथापि प्रमत्तयोगाचे विषयरूप निमित्त बाह्यपदार्थ असतो म्हणून जैनशासनाने बाह्यपदार्थाचा त्याग देखील आवश्यक सांगितला आहे. बाह्यपदार्थाचा त्याग हा परिणाम विशुद्धीला निमित्त कारण होतो.

जो निश्चयाभासी अज्ञानी निश्चय धर्माचे खरे स्वरूप ओळखत नाही, आत्मस्वरूपात स्थिर राहण्याचा प्रयत्न करीत नाही. परंतु केवळ निश्चयतत्त्वाच्या गप्पा मारतो. बाह्यपदार्थाच्या त्यागात धर्म नाही असे म्हणून बाह्यपदार्थाचा त्याग करण्याचा पुरुषार्थ करीत नाही. प्रमादी–स्वच्छंदी–असंयमी जीवन जगून स्वतःला निश्चयज्ञ समजतो, विरमणरूप संयमी जीवन जगण्याचा अभ्यास करीत नाही तो आपल्या परिणामाची देखील विशुद्धि करीत नसल्यामुळे करणानुयोग व चरणानुयोग या दोन्ही जिनशासन आज्ञेचे उल्लंघन करीत असल्यामुळे आत्मघातकी महापापी म्हटला जातो.

**हिंसेचे अनेक प्रकार–**

हे अहिंसेचे शास्त्र मोठे गहन आहे. त्याचे अनेक प्रकार आहेत. कोठे बाह्य द्रव्य हिंसा घडून देखील त्याचे हिंसा करण्याचे परिणाम नसल्यामुळे त्याला हिंसेचे पातक लागत नाही. याचे उलट कोठे बाह्य द्रव्यहिंसा न घडता देखील हिंसा करण्याचे परिणाम असल्यामुळे त्याला हिंसेचे पातक लागते.

कोठे बाह्य द्रव्यहिंसा कमी घडते, एखाद्या जीवाचाच घात होतो पण त्याचा परिणाम अनेक जीवाच्या घातास कारणीभूत होतो तेथे हिंसेचे पातक अधिक लागते.

जसे अनेक जीवाचे कल्याण करणारा कोणी एक गुरू आहे किंवा अनेक लोकाचे रक्षण करणारा कोणी एक राजा आहे. त्याचा घात केल्या असताना, जरी तो घात एकाच जीवाचा अल्प प्रमाणात भासतो परन्तु त्याचे फल सर्व संघाचा सर्व प्रजेचा घात करण्याचे पाप त्याला लागते. याचे उलट कोठे बाह्य द्रव्यहिंसा अधिक घडते परंतु त्याचे परिणाम अल्प हिंसक असतात त्याला हिंसेचे पातक कमी लागते.

---

१. पुरुषार्थ सिध्यु श्लोक ४९




जसे युद्धामध्ये अनेक सैन्य मारले जाते, अनेक जीवांचा घात केला जातो पण त्याचे परिणाम त्या सैन्याला मारण्याचे नसतात. त्यांचा नायक जो एक राजा त्यालाच मारण्याचे असतात त्यामुळे त्याला अनेक जीवाच्या हिंसेचे पातक न लागता एका जीवाला मारण्याचेच पातक लागते.

कोठे एकच हिंसा दोघे मिळून करतात, एक हिंसा करण्यात मुख्य असतो. एकाचेच हिंसा करण्याचे भाव असतात, दुसरा तीच हिंसा करण्यात केवळ सहायक असतो. आपल्या मित्रास केवळ सहाय करावे हाच त्याचा भाव असतो. अशा वेळी दोघानी मिळून एकच हिंसा केलेली असते तरी मुख्य हिंसकास अधिक पाप लागते. राज्यशासन कायद्याने देखील तो अधिक दोषी म्हटला जातो व जो केवळ सहायक असतो तो कमी दोषी म्हटला जातो, त्याला जैनशासनाने देखील कमी पाप लागते. अशी हिंसा व हिंसेच्या फलात विचित्रता दिसून येते.

कधी हिंसा करीत असताना हिंसेचे फळ मिळते. कोणी एक शिकार करण्यासाठी बाण मारीत आहे. तोच त्याला इकडे सर्पदंश होऊन त्याला मरण येते. याप्रमाणे हिंसा व हिंसेचे फळ तात्काल मिळते.

कोठे एकाने हिंसा करण्याचे प्रथम परिणाम केले त्यामुळे त्याला पापकर्माचा बंध पडला. त्यावेळी प्रत्यक्षात जरी दुसऱ्या जीवाची हिंसा घडली नाही तथापि अन्य कारणवश कदाचित् त्याचा घात झाला; अशा वेळी ती हिंसा होण्यापूर्वीच केवळ हिंसेचे परिणाम केल्याने देखील जीवाला हिंसेचे फल हिंसा होण्यापूर्वीच मिळते.

कधी हिंसा करीत असताना तर काही फल मिळत नाही. त्यामुळे मी हिंसा करूनही माझे काहीच वाईट झाले नाही उलट फायदाच झाला असे त्याला वाटते. पण काही कालानतर त्याला त्या पूर्वी केलेल्या हिंसेचे फळ मिळते हे त्याचे लक्षात येत नाही. कोणी विश्वासघाताने लोकाना फसवून Black Marketing व्यापार करून करीत आहे. त्यात त्याला पुष्कळ पैसा मिळतो. त्याला ते लोकाना फसविणे हिताचे सुखाचे वाटते. पण पुढे कधी तरी त्या पापाचा घडा फुटतो. त्याची राज्यशासनाकडून चौकशी (inquiry) होते. त्यात त्याला शिक्षा-शासन-दंड मिळतो याप्रमाणे त्याला पूर्वीच्या कृतकर्माचे फल नंतर भोगावे लागते.

कोणी एखाद्या जीवाचा खून करण्याचा प्रयत्न करतो. पण दैववश त्याचा खून होत नाही. तथापि याने खून करण्याचा प्रयत्न केल्यामुळे त्याला राज्यशासनाने व धर्मशासनानेदेखील दंड मिळतो.

कोठे हिंसा एकच मनुष्य करतो परंतु त्याचे फल मात्र अनेकाना भोगावे लागते. घरातील नेता पुरुष एकटान पैसा मिळविण्यासाठी पापारंभ करतो पण त्याचे फल घरातील सर्व माणसाना भोगावे लागते.

कोठे अनेक जीव मिळून हिंसा करतात पण त्याचे फळ एकालाच भोगावे लागते. लढाईत अनेक सैन्य युद्ध करतात पण त्याचे पातक फल एकट्या राजालाच भोगावे लागते. याप्रमाणे हिंसा व हिंसाफल यामध्ये अनेक प्रकारानी विचित्रता दिसून येते.

प्रामुख्याने हिंसेचे ३ प्रकार सांगितले आहेत.

१ सांकल्पिकी हिंसा, २ आरंभिकी हिंसा, ३ विरोधिनी हिंसा त्यापैकी गृहस्थी श्रावकाला सांकल्पिकी हिंसेचा त्याग अवश्य सांगितला आहे. मी या जीवास मारतो अशा संकल्पपूर्वक जो हिंसा करणे ती सांकल्पिक हिंसा होय.

२ आरंभिकी हिंसा– शेती गृहव्यापार करताना हिंसा करण्याचा संकल्प नसताना जी हिंसा सहजगत्या घडते ती आरंभिकी हिंसा होय. ती गृहस्थी श्रावकाला टाळता येत नाही.




३ विरोधिनी हिंसा– कोणी प्रतिपक्षी आक्रमण करीत असेल तर त्याचा प्रतीकार करताना होणारी हिंसा ती विरोधिनी हिंसा होय. ही हिंसा गृहस्थी श्रावकाला गृहस्थी जीवन सुरक्षित सुखाने जाण्यासाठी नाइलाजाने करावी लागते. त्यामध्ये अन्यायाचा प्रतीकार करण्याची भावना असते म्हणून सांकल्पिक हिंसेचे पातक लागत नाही.

यावरून जे कोणी जैनाची अहिंसा भ्याडांची अहिंसा आहे असा अहिंसा तत्त्वाचा उपहास करतात त्यांना जैनांचे अहिंसा तत्त्वाचे गूढ रहस्य अद्यापि समजले नाही असेच म्हणावे लागते. जैनांची अहिंसा ही शूरांची अहिंसा आहे.

जैन शासनाने अहिंसेची परिभाषा करताना–जर कोणी आपल्या गालात मारले तर त्याचे पुढे दुसरा गाल उभा करणे अशी भ्याडवृत्ति धारण करणे याला अहिंसा म्हटले नाही.

राम–रावणाचे युद्ध, कौरव–पांडवाचे युद्ध यावरून जैन शासनानें हेच सिद्ध केले की शत्रूचे आक्रमण झाले असताना, अन्यायाचा प्रतीकार करण्यासाठी शस्त्र हातात घेणे हाच शूरांचा अहिंसाधर्म आहे.

य: शस्त्रवृत्तिः समरे रिपुःस्यात् । यः कंटको वा निजमंडलस्य ।
अस्त्राणि तत्रैव नृपाः क्षिपन्ति । न दीन–कानीन–शुभाशयेषु ॥

जर समरांगणी शत्रू समोर उभा ठाकला असेल किंवा जो समाजकंटक पुरुष राज्यामध्ये अशांति–अन्याय थंड करीत असेल तेथे राजे लोक शस्त्राचा वापर करतात. त्यावेळी शस्त्राने त्याचा समाचार घेणे हाच क्षत्रियांचा अहिंसाधर्म आहे.

परंतु जे दीन–निरुपद्रवी पुरुष असतील, समोर स्त्रीवर्ग असेल व पवित्र विचार व आचाराचे संत पुरुष असतील त्यांचेवर शस्त्राचा प्रयोग कधीही करू नये.

जैनधर्मामध्ये अनेक क्षत्रिय राजे, शूर सेनापति होऊन गेले आहेत. त्यांनी युद्धामध्ये कसे यश संपादन केले आहे याच्या कथा आपणास जैन पुराणातून पहावयास मिळतात.

यावरून कोठे हिंसा हा अधर्म आहे कोठे हिंसा हा देखील धर्म आहे, कोठे अहिंसा हा देखील अधर्म आहे व कोठे अहिंसा हा धर्म आहे, याचा विवेक जागृत ठेवून अहिंसा धर्माचे पालन करावे हा दडक जैन शासनाने घालून दिला आहे.










# सप्ततत्त्व व्यवस्था

जैन शासनामध्ये ६ द्रव्य, ७ तत्त्व, ९ पदार्थ, ५ अस्तिकाय यांचे वर्णन केले आहे. त्यामध्ये ६ द्रव्य व ५ अस्तिकाय हे केवळ ज्ञेयतत्त्व आहेत. हे मोक्षमार्गामध्ये प्रयोजनभूत नाहीत. त्यांचे ज्ञान कमी असले काय किंवा जास्त असले काय किंवा नसले काय तरी त्यामुळे मोक्षमार्ग खुंटत नाही.

परंतु जैनदर्शनामध्ये ७ तत्त्व व ९ पदार्थ यांचे स्थान फार महत्वाचे सांगितले आहे. मोक्षमार्गामध्ये त्यांना प्रयोजनभूत तत्त्व म्हटले आहे. हे ज्ञेयतत्त्व तर आहेतच परंतु यांचे हेय–उपादेय विज्ञान हे शांतिसुखाला कारण असल्यामुळे त्याला सम्यग्ज्ञान म्हटले आहे.

[1]तत्त्वे ७ आहेत– १) जीव, २) अजीव, ३) आस्रव, ४) बंध, ५) संवर, ६) निर्जरा, ७) मोक्ष, पुण्य व पाप यांचा आस्रव–बंधामध्ये समावेश करून कोणी तत्त्वे ७ सांगितली आहेत. परंतु ही ७ तत्त्वे भिन्न भिन्न वस्तुसत् नसून एकाच वस्तुसत्‌ची ही ७ रूपे आहेत.

[2]काही आचार्यांनी पुण्य–पापाचे विशेष वर्णन करण्यासाठी आस्रव–बंधातून पुण्य–पापाला वेगळे करून त्या ७ तत्त्वानाच ९ पदार्थाचे नाव देऊन वर्णन केले आहे. यात केवळ विवक्षा भेद आहे. तात्त्विक भेद नाही.

या प्रयोजनभूत हेय–उपादेयभूत ७ तत्त्वांचे किंवा ९ पदार्थांचे यथार्थ श्रद्धान–रुचि–प्रतिति–अनुभूति त्याला [3]सम्यग्दर्शन[4] म्हटले आहे.

जीव आपल्या अज्ञान अपराधाने ज्ञेयभूत ६ द्रव्याविषयी ज्ञेय–ज्ञायक संकर ( एकत्वबुद्धी ) करीत आहे व आपल्या भावकर्मरूप राग द्वेष मोह भावाशी भाव्य–भावक संकर ( एकत्वबुद्धी ) करीत आहे. त्यामुळे जीव व अजीव यांच्या संयोगात हे ७ तत्त्वाचे मायाजाल नाटक या संसाररूपी नाट्य भूमीवर आपले संयोगीरूप दाखवून अज्ञानी जीवास भुरळ घालीत आहे. वास्तविक ही ७ तत्त्वे परमार्थ वस्तुतत्त्व नाहीत. जीव व अजीव यांच्या संयोगात जीवाने आपल्या अज्ञान अपराधाने तावत्काल धारण केलेले संयोगीरूप आहे. हे तावत्काल दिसणारे पण वस्तुभूत नसणारे अवस्तुरूप–मायरूप–अपरमार्थ समजून ही रूपे धारण करणारा त्यामध्ये व्यापून असणारा जो एक ध्रुव कारण–परमात्मा–भगवान आत्मा, त्यालाच परमार्थतत्त्व समजणे–

हे सात तत्त्वांचे यथार्थ श्रद्धान म्हटले जाते. वास्तविक ही ७ तत्त्वे एकाच जीवतत्त्वाने धारण केलेली ७ रूपे आहेत–

[5]शुद्धनयाने या नवतत्त्वामध्ये व्यापक आपल्या एकत्व विभक्त स्वभावामध्ये नियत सुव्यवस्थित, आपल्या ज्ञानादि गुणापासून अभिन्न एकत्व स्वरूप व त्याशिवाय सर्व परभाव–परद्रव्य यापासून अत्यंत विभक्त–पृथक्–भिन्न स्वरूप अशा पूर्ण ज्ञानघन केवलज्ञानस्वभाव–आत्मतत्त्वाचे–कारणपरमात्म तत्त्वाचे जे दर्शन, श्रद्धान, रुचि, प्रतीति, अनुभूति त्याला निश्चय सम्यग्दर्शन म्हणतात. सम्यग्दर्शनाच्या अनुभूतीमध्ये जेवढा आत्मा अनुभवास येतो तेवढेच खरे परमार्थ आत्मतत्त्व आहे. त्याशिवाय ही नवतत्त्व संतति– हा सर्व जीवाने तावत्काल धारण केलेला बाह्यवेश आहे, ते जीवाचे परमार्थ स्वरूप नाही असे जे ७ तत्त्वांचे यथार्थ श्रद्धान त्याला सम्यग्दर्शन म्हणतात. अर्थात ७

---

१ जीवाजीवास्रवबंधसंवर निर्जरामोक्षास्तत्त्व ॥ ( तत्वार्थसूत्र अध्याय १, सूत्र ३ )
२ आसव बंधण संवर णिज्जर मोक्खा सपुण्ण पावा जे । जीवाजीवाविसेसा ते वि समासेण पमणामो ॥ ( द्रव्यसंग्रह )
३ तत्वार्थश्रद्धानं सम्यग्दर्शनं । ( तत्वार्थसूत्र अध्याय १, सूत्र २ )
४ भूयत्थेणाभिगया जीवाजीवा य पुण्णपावा जे । आसवसंवर णिज्जर बंधो मोक्खो य सम्मत्त ॥ ( समयसार गाथा १३ )
५ एकत्वे नियतस्य शुद्धनयतो व्याप्तुर्यदस्यात्मनः । पूर्णज्ञानघनस्य दर्शनमिह द्रव्यान्तरेभ्यः पृथक् ।
सम्यग्दर्शनमतेदेव नियमात् आत्मा च तावानयं । तन्मुक्त्वा नवतत्त्वसततिमिमां आत्माऽयमेकोऽस्तु नः ॥

तत्त्वाना अवस्तु अतत्त्व अपरमार्थ समजणे परमार्थ वस्तु न समजणे व ती रूपे धारण करणारा जो एक ध्रुव कारणपरमात्मा त्यालाच परमार्थ तत्त्व समजणे हे ७ तत्त्वांचे यथार्थ श्रद्धान होय, त्याला सम्यग्दर्शन म्हणतात.

६ द्रव्य केवळ ज्ञेय आहेत, जाणण्यायोग्य आहेत. त्यांचेविषयी हेय उपादेय बुद्धि ठेवणे, त्यापैकी काही पदार्थाना इष्ट मानून उपादेय समजणे व काहीना अनिष्ट मानून हेय समजणे हे अज्ञान आहे. तो राग–द्वेषरूप विषमभाव आहे. त्यांचेविषयी इष्ट–अनिष्ट बुद्धि न ठेवता परम उपेक्षा भाव ( उदासीनभाव ) समभाव ज्ञाता द्रष्टाभाव ठेवणे हे सम्यग्ज्ञान आहे.

परंतु ७ तत्त्वे ही केवळ ज्ञेय नाहीत. त्यांचेविषयी हेय–उपादेय विज्ञान हे सम्यग्ज्ञान आहे. प्राथमिक अवस्थेत व्यवहार शास्त्रामध्ये व्यवहारी जनासाठी व्यवहारनयाने ७ तत्त्वापैकी अजीव–आश्रव–बंध ही तीन तत्त्वे जीवाला संसार भ्रमण दुःखास कारण आहेत. म्हणून त्याना हेय–आश्रय न करण्यायोग्य समजणे व जीव–संवर–निर्जरा–मोक्ष याना उपादेय आश्रय करण्यायोग्य समजणे असे ७ तत्त्वाचे हेय–उपादेय विज्ञान त्याला व्यवहारसम्यग्दर्शन म्हणतात.

व्यवहारनय हा पर्यायाश्रित असतो. व्यवहारी जनाना पर्याय परिचित असतो. म्हणून त्यांच्या परिचित भाषेत अजीव–आस्रव–बंध पर्याय हा हेय व जीव–संवर–निर्जरा मोक्ष पर्याय हा उपादेय असे व्यवहारनयाने सांगितले आहे.

परंतु अध्यात्म ग्रंथामध्ये तत्त्वदृष्टीने ध्रुवस्वभाव हा उपादेय आश्रय करण्यायोग्य असतो व त्याशिवाय बाकी सर्व पर्यायधर्म हे अध्रुव असल्यामुळे आश्रय करण्यायोग्य नसल्यामुळे त्याना हेय समजणे हे वस्तुतत्त्वाचे यथार्थज्ञान म्हटले जाते. म्हणून निश्चय नयाने या ७ तत्त्वाना अपरमार्थ–अतत्त्व–अप्रयोजनभूत–आश्रय न करण्यायोग्य समजून या ७ तत्त्वामध्ये व्यापक राहणारा ध्रुव कारणपरमात्मा त्यालाच परमार्थतत्त्व उपादेय आश्रय करण्यायोग्य समजणे हे ७ तत्त्वाचे यथार्थ निश्चय सम्यग्दर्शन होय.

येथे ९ तत्त्वामध्ये जे अजीव तत्त्व घेतले आहे ते अजीव द्रव्य नाही. पुद्गल–धर्म–अधर्म–आकाश–काल–कर्म–नोकर्म ( शरीर) हे सर्व अजीव द्रव्य ज्ञेय आहेत. ते हेय–उपादेय तत्त्व नाही. म्हणून येथे अजीव तत्त्वामध्ये जीवाचे जे अनात्मरूप परिणमन विकारभाव भावकर्म त्यालाच अजीवतत्त्व म्हटले आहे. अजीवाच्या संसर्गात [1]एकटा जीवच ही ९ रूपे धारण करतो. तथापि तो आपला एक ध्रुवस्वभाव कायम ठेवतो. या ९ तत्त्वामध्ये ध्रुव कारणपरमात्मा सदा विद्यमान असतो. द्रव्यसंग्रह[2] ग्रंथामध्ये ७ तत्त्वाचे वर्णन करताना ही ७ तत्त्वे जीव व अजीव याच्या संयोगात होणारे जीव अजीवाचे विशेष ( पर्याय ) आहेत असे सांगितले आहेत.

जीवाचे जे पर्यायविशेष त्याना भावआस्रव व भावबंध, भावसंवर, भावनिर्जरा, भावमोक्ष म्हणतात.

अजीवाचे पुद्गलकर्माचे जे पर्यायविशेष– त्याना द्रव्यास्रव, द्रव्यबंध, द्रव्यसंवर, द्रव्यनिर्जरा, द्रव्यमोक्ष.

सात तत्त्वामध्ये आस्रवबंध यामध्ये पुण्य-पापाचा समावेश करून ७ तत्त्वे सांगितली आहेत. पुण्य-पापाला वेगळे करून त्यानाच ९ पदार्थ असे नाव दिले आहे.

१ जीवतत्त्व– जीवाचे सम्यग्दर्शन, ज्ञानचारित्ररूप, शुद्धउपयोगरूप, परिणमन ते जीवतत्त्व होय.

२ अजीवतत्त्व– जीवाचे मिथ्यादर्शन, ज्ञान, चारित्ररूप, अशुद्धोपयोगरूप परिणमन ते अनात्मतत्त्व, अजीवतत्त्व होय.

---

१ नवतत्त्वगतत्वेऽपि यदेकत्वं न मुञ्चति ।

२ आसव बंधण संवर णिज्जर मोक्खा सपुण्ण पावा जे ।
जीवाजीव विसेसा ते वि समासेण पभणामो ॥




३ भावआस्रव– जीवाचे ज्या परिणामानी कर्माचा आस्रव होतो असे राग, द्वेप, मोहरूप परिणाम किंवा मिथ्यात्व, अविरति, प्रमाद, कपाय, योगरूप परिणाम त्यास भावास्रव म्हणतात.

४ भावबंध– आस्रवपूर्वक बंध होतो म्हणून ज्या परिणामानी कर्माचा आस्रव होतो त्याच परिणामानी कर्माचा बंध होतो. म्हणून वरील भावास्रवरूप परिणामालाच भावबंध म्हणतात.

५ भावसंवर– जीवाच्या ज्या परिणामानी नवीन कर्माचा आस्रव निरोध होतो, कर्माचे येणे बंद होते त्या सम्यग्दर्शन, ज्ञान, चारित्र परिणामास किंवा गुप्ति, समिति, धर्म, अनुप्रेक्षा, परिपहजय, चारित्र परिणामास भावसंवर म्हणतात.

६ भावनिर्जरा– भावसंवररूप परिणामानी नवीन कर्माचे येणे बंद होते व पूर्वकर्माची निर्जरा होते म्हणून त्या परिणामास भावनिर्जरा म्हणतात.

७ भावमोक्ष– त्याच परिणामानी सर्व कर्माचा नाश होतो त्या परिणामास भावमोक्ष म्हणतात.

१ द्रव्यजीव– जीवाचा उपयोग आत्मस्वभावाकडे असताना पूर्वसंस्कारवश, चारित्र कर्मोदय वश जीवाचे कर्तृत्व नसताना अबुद्धिपूर्वक ज्या बाह्य मन-वचन-काय-रूप-द्रव्य योग क्रिया घडतात. ते द्रव्यजीवतत्त्व होय. त्यामुळे नवीन कर्मबंध न होता पूर्वकर्माची निर्जराच होते. म्हणून तिला क्षायिकी क्रिया म्हटले आहे. कर्माचे फल न देता उदयक्षयरूप, उदयाभावी क्षयरूप, विपाक अवस्था, द्रव्यसंवर-द्रव्यनिर्जरा द्रव्यमोक्षाला कारण होते. त्यावेळी जीवाची जी अबुद्धिपूर्वक क्रिया होते त्याला येथे द्रव्यजीव म्हटले आहे.

२ द्रव्यअजीव– द्रव्यास्रव, द्रव्यबंध रूप होण्यायोग्य अशी कर्माची जीवगुणघातनशक्तिरूप अवस्था त्याला द्रव्यअजीव म्हणतात.

३ द्रव्यास्रव– भावास्रवाचे निमित्त घेऊन नवीन कर्माचे आत्मद्रव्याकडे येणे, आकर्षण होणे तो द्रव्यास्रव होय.

४ द्रव्यबंध– द्रव्यास्रवपूर्वक कर्मपरमाणूचा जीवप्रदेशाशी एक क्षेत्रावगाहरूप व परस्पर निमित्त, नैमित्तिक भावरूप संबंध होतो यास द्रव्यबंध म्हणतात.

५ द्रव्यसंवर– भावसंवराचे निमित्त घेऊन जीवाकडे नवीन कर्माचे येणे बंद होणे तो द्रव्यसंवर होय.

६ द्रव्यनिर्जरा– द्रव्यसंवर पूर्वक पूर्वबद्धकर्म उदयास येऊन फल न देता उदयक्षय रूपाने, उदयाभावी क्षयरूपाने आत्म्यापासून एक देशरूपाने निघून जाणे ती द्रव्यनिर्जरा होय.

७ द्रव्यमोक्ष– भावमोक्षाचे निमित्त घेऊन द्रव्यसंवर, द्रव्यनिर्जरा पूर्वक सपूर्णपणे ( पुनः कधीही संबंध होणार नाही असा ) कर्माचा आत्म्यापासून पूर्ण क्षय होणे यास द्रव्यमोक्ष म्हणतात.

याप्रमाणे ही ७ तत्त्वे जीव व अजीव यांच्या संसर्गात निर्माण होणारे हे आभासरूप, अवस्तुरूप, मायाजालरूप, संयोगीरूप हे संसाराचे नाटक आहे. अज्ञानीजीव या ७ तत्त्वाना परमार्थतत्त्व समजून भाव्य-भावक-रूपाने यांचेशी तन्मय होतो तोपर्यंतच ही ७ तत्त्वे या ससाररूपी नाट्यभूमीवर आपले संयोगीरूप धारण करून अज्ञानी जगाला भुरळ घालतात.

परंतु ज्ञानी जीव जेव्हा याचे हे सयोगरूप संसारमायाजाल आहे, हे वास्तविक परमार्थरूप नाही असे यथार्थ जाणतो तेव्हा या जीवाचे हे सात तत्त्वरूप नाटक ( परिणमन ) बंद होते. हा जीव राग, द्वेप, मोहरूप, भावक भावाशी भाव्यरूप होत नाही. आपल्या ध्रुव ज्ञानदर्शनस्वभावात अविचल स्थिर होतो तेव्हा जीव व अजीव ( कर्मपुद्गल ) हे आपले संयोगीरूप टाकून देतात आपले खरे स्वरूप प्रगट करतात. हे नवतत्त्व परिणमन रूप संसारनाटक बंद होते. जीव आपल्या शुद्ध ज्ञानदर्शन स्वभावात अविचल स्थिर होतो. तेथे काळाच्या अंतापर्यंत शांतिसुखाचा अनुभव घेतो.






# कर्म – व्यवस्था

जैन परंपरा– त्यातील आचार-विचारात कर्म सिद्धांतास महत्त्वाचे स्थान आहे. कर्म सिद्धांतात– १) कर्म, २) कर्म-फळ व ३) कर्मफलकर्ता या तिहींचा विचार प्रामुख्याने येतो. संसारातील कोणी सुखी तर कोणी दुःखी अशी विचित्र स्थिती बघितल्यानंतर एखादी 'कर्म' शक्ती त्यामागे असावी यात काही नवल नाही. जगातील प्रत्येक घडामोडीत कर्म ही शक्ती पाठीमागे उभी आहे. अनादिकालापासून आत्मा व कर्म यांचा संबंध आहे. पण हा संबंध सान्त आहे. कर्मपाशातून त्याची सुटका होऊ शकते. आत्म्याने आपल्या अज्ञान अपराधाने विकारामुळे कर्ममलास आकर्षिले. कर्ममलाने आत्मसुवर्ण अशुद्ध होते. तथापि हा जीव शुद्ध पण होऊ शकतो. आत्मज्ञान हा शुद्ध करण्याचा उपाय होय.[1]

'कर्म' शब्दाचा व्युत्पत्ति अर्थ 'क्रियाव्याप्तं कर्म' क्रिया ज्यावर घडते ते कर्म होय. जीवाच्या पुरुषार्थास पण कर्म म्हणतात. मीमांसक यज्ञादि क्रियांना कर्म म्हणतात. जैनदर्शनाप्रमाणे जीवाच्या ठिकाणी असलेल्या वैभाविक शक्तीमुळे जीव व पुद्गलकर्म यांचा संबंध घडून येतो. या वैभाविक शक्तीमुळे जीव प्रथम रागद्वेष परिणामरूप भावकर्म करतो त्यामुळे कार्माण वर्गणा, आहार, तैजस, भाषा व मन या नोकर्मवर्गणांना आपल्याकडे खेचतो. कर्माचा पूर्णपणे नाश झाल्यावरच आत्मा पूर्णपणे निर्मल होतो. अशा अवस्थेत आत्मा कर्मापासून कायमचा वेगळा होतो.

कार्माण वर्गणेचे जे परमाणु आत्मप्रदेशात प्रविष्ट होतात त्यांनाच 'द्रव्यकर्म' असे म्हणतात. या कार्माण वर्गणारूप पुद्गल परमाणूंच्या पिंडालाच जैनदर्शनामध्ये 'कर्म' असे म्हटले आहे. जीवामध्ये जे अनेक प्रकार आढळतात, त्याला बाह्य निमित्त कारण हे कर्मच होय. कर्मरूपाने परिणत होणाऱ्या पुद्गल परमाणूंना कार्माण वर्गणा म्हणतात. अनेक प्रकारच्या पुद्गल परिणामांनी हे जग व्यापलेले आहे. मन, वचन व कायेच्या क्रियेला जैनदर्शनात फार महत्त्व दिले आहे. या क्रियेला योग म्हणतात. जीव आपल्या मन, वचन, क्रियेच्या प्रवृत्तीमुळे कार्माण परमाणूंना ग्रहण करतो जीवाचा कर्माशी अनादि संबंध आहे. त्यामुळे जीवाचे ठिकाणी योग प्रवृत्ति निर्माण होते. त्या योग प्रवृत्तीमुळे कर्मबंधन होते. कर्मामुळे योग प्रवृत्ती व योग प्रवृत्तीमुळे कर्म अशी कार्य-कारण परंपरा अनादिकालापासून चालत आली आहे. याच पार्श्वभूमीवर कर्माचे दोन भेद केले आहेत- पुद्गल (पिण्डाला) परमाणूच्या पिण्डाला 'द्रव्यकर्म' व रागद्वेषादी स्वरूप जीवाच्या योग प्रवृत्तीला 'भावकर्म' म्हटले आहे द्रव्य कर्माच्या बंधाला भावकर्म कारण आहे. आत्म्याच्या ज्या परिणामामुळे कर्माचा आत्म्याशी संबंध होतो त्या योग परिणतीला 'भावकर्म' म्हटले आहे. या परिणामाच्या निमित्ताने कर्मरूप परिणत झालेल्या कर्माण वर्गणारूप पुद्गल परमाणूंना द्रव्यकर्म म्हटले आहे.[2] कर्माचा भोक्ता आत्मा आहे, शरीर नव्हे. ज्यायोगे सुखदु:खाचा अनुभव घडतो, अशा क्रियेला कर्म म्हणतात. न्यायशास्त्रात पाच सांकेतिक क्रियेसाठी कर्मशब्दाचा प्रयोग झाला आहे. जैनदर्शनामध्ये 'कर्म' ही पारिभाषिक संज्ञा आहे लोहचुंबकाप्रमाणे कर्मप्रवृत्तीचे आत्म्याकडे आकर्षण आहे. आकृष्ट होणारी ही शक्ती कर्म होय. जी शक्ती जीवाची क्रिया आहे. तिला भावकर्म म्हटले आहे. पात्रविशेषात वापरल्याने फुले-फळे इत्यादींचे दारू रूपांतर होते, तसेच योग व कषाय यांच्यामुळे वर्गणा पुद्गल कर्मरूपाने परिणत होते. ढगामुळे सूर्यकिरणे इन्द्रधनुष्याच्या रूपाने रंगीबेरंगी दिसतात, त्याप्रमाणे जीवाच्या परिणामाच्या निमित्ताने कार्माण वर्गणा कर्म रूपाने परिणत होते. पुद्गल कर्माच्या निमित्ताने जीवाचे भावकर्मरूप परिणमन होते तात्त्विक दृष्टीने बघितल्यास जीव कर्मामध्ये गुण उत्पन्न करीत नाही व कर्मामुळे जीवामध्ये पण गुण उत्पन्न होत नाहीत. दोहोंच्या संयोगात परिणमन घडत असते,[3] त्याला कर्म म्हणतात. जीव आपल्या

१. छान्दयोगोपनिषद– ८।१६ २. प्रवचनसार पृ. १६५ अमृतचंद्र टीका ३. समयसार गा ८०-८२





परिणामांचा कर्ता आहे. तो कर्मापासून उत्पन्न झालेल्या परिणामाचा कर्ता नाही[1]. भाव कर्माच्या परिणमनामुळे जेव्हा पुद्गल कार्माण परमाणु आकृष्ट होतात आणि आत्म प्रदेशात दूध-पाण्याप्रमाणे मिसळून जातात त्या परमाणूंनाच कर्म म्हटले आहे कर्मांचे पृथक्त्व हे मुक्तावस्थेतच घडते. ससारावस्थेत त्याचे पृथक्त्व दिसत नाही. संसारी आत्मा नेहमी कर्मयुक्त असतो, तसेच कर्म नेहमी ससारी आत्म्याशीच सबधित असते. मुक्तात्म्याचा कर्माशी कसलाच सबंध येत नाही.



जैनदर्शनात वस्तूचे वर्णन दोन दृष्टीने केलेले आहे. एक निश्चयदृष्टी व व्यवहारदृष्टी निमित्ताशिवाय मूल वस्तूचे कथन आहे त्यास निश्चय दृष्टी म्हणतात. व विभिन्न निमित्ताच्या अपेक्षेने वस्तूचे वर्णन करणे म्हणजे व्यवहारदृष्टी. संसारी आत्मा व कर्म या मिश्र अवस्था आहेत. संसारावस्थेत दोन्हीही शुद्ध नाहीत. म्हणून त्याचे वर्णन व्यवहारदृष्टीनेच होऊ शकते. निश्चयदृष्टीने शुद्ध आत्म्याचे व शुद्ध द्रव्याचे वर्णन होऊ शकते.

आत्मवादी किंवा अनात्मवादी दर्शनात ही कर्मफलासंबंधी मान्यता दिसून येते. 'करावे तसे भरावे' ही गोष्ट कशाची द्योतक आहे? ईश्वरवादी वा अनीश्वरवादी या उभयताना ही गोष्ट मान्य आहे, पण कर्मरूप व त्याचे फलदान यांच्या मान्यतेविषयी फार मोठा फरक आहे अन्य दर्शनात सस्कारालाच धर्म, अधर्म व कर्माशय मानले आहे, पण जैन दर्शनात फक्त सस्कार न मानता आकृष्ट होणाऱ्या विशिष्ट शक्तीला 'कर्म' म्हटले आहे. ती शक्ति रागी व द्वेषी जीवाच्या क्रियेमुळे आकृष्ट होते व जीव प्रदेशाबरोबर एक क्षेत्रावगाहरूप मिळून जाते.

काहीही असो, जैनदर्शनात ज्या अर्थाने 'कर्म' शब्दाचा प्रयोग झाला आहे. जवळ जवळ त्याच अर्थाने अन्य दर्शनात माया, अविद्या प्रकृती, सवृत्ति, अपूर्व वासना, संस्कार, दैव, भाग्य, धर्म, अधर्म इत्यादी शब्दांचा प्रयोग झाला आहे. केवळ चार्वाक दर्शन तेवढेच कर्म सिद्धान्त मान्य करीत नाहीत.

न्यायदर्शनात राग, द्वेष व मोह यांच्या प्रेरणेने जीवाच्या मन, वचन व काय यांच्या प्रवृत्ति घडतात. त्यापासून धर्माधर्माची उत्पत्ति होते. यालाच संस्कार म्हटले जाते.[2] याच अर्थाने वैशेषिक दर्शनात अदृष्ट मानले असून धर्म व अधर्म असे त्यांचे दोन भेद केले आहेत.[3]

दोन्हीही ठिकाणी धर्माधर्माच्या मान्यतेमध्ये सारखेपणा आहे. रागादिकानी संस्कार व संस्कारामुळे रागादिक अशी त्यांची परंपरा आहे. अहंपणा, राग, द्वेष व अभिनिवेश यामुळे संक्लेशवृत्ति तयार होते आणि तिच्यामुळे धर्माधर्म संस्कार बनतात. या संस्काराना वासना किंवा अपूर्व म्हटले आहे. 'आशय' शब्द देखील याच अर्थाने प्रयुक्त होतो.[4] बीजांकुर न्यायाप्रमाणे याचा संबंध अनादि आहे. मीमांसकानी 'अपूर्व' शब्दाला उपयुक्त मानून त्यापासून यज्ञादिक कर्मफलाची प्राप्ति सांगितली आहे. वेदपूर्वक कर्माने उत्पन्न होणाऱ्या शक्तीला 'अपूर्व, असे म्हटले आहे. वेदांतात मायेच्या स्वरूपात कर्माचे वर्णन केले आहे. ही मायाच ससाराचे कारण आहे. ब्रह्म' सत्य आहे.[5] जीवाना त्यांच्या कर्माप्रमाणे ईश्वर फळ देतो. कर्म फळाची प्राप्ती ईश्वराधीन आहे, ती कर्माधीन नाही.[6]

कर्म करताना व त्याचे फळ भोगतानासुद्धा आत्मा स्वतंत्र असतो सकल्पाविषयीचे स्वातंत्र्य 'बृहदारण्यकोपनिषदा' मध्ये निसंदिग्धपणे सांगितले आहे. पुरुष हा काममय असून, त्याच्या इच्छेप्रमाणे तो संकल्प करीत असतो. संकल्पाप्रमाणे कर्म करतो. मुक्तिकोपोपनिषदात भाग्यावर विसंबून राहण्याचा विरोध केला असून पुरुषार्थावर भर दिला आहे. वासना ही एक नदी असून ती शुभ-अशुभ अशा दोन मार्गाने वाहते, म्हणून अशुभाकडे धावणाऱ्या वासनेच्या प्रवाहाला अडवून शुभाकडे वळवले पाहिजे संसारातील वेगवेगळेपणा हा

१. पुरुषार्थ-सिध्युपाय १२-१३, प्रवचनसार २-७७-७९  २. न्याय भाष्य १. १।२  ३. प्रशस्तपादभाष्य– पृ. ४७
४. योगदर्शनभाष्य– १।५  ५ ब्रह्मसूत्र शांकरभाष्य– २।१।१४  ६. ब्रह्मसूत्र शांकरभाष्य– ३।२।३८-४१




शुभाशुभ प्रवृत्तीवर अवलंबून आहे. त्यात फसून राहणे हा आत्म-स्वभाव नव्हे. चिखलात जन्म घेऊन पण कमळ पाण्यापासून वेगळे राहते त्याप्रमाणे संसारात राहूनही आपल्या चैतन्याची ओळख करून घेणे व अलिप्त राहणे हा ज्ञानी पुरुषाचा स्वभाव आहे. दैव, भाग्य, कर्म यांचा निर्माता जसा आत्मा आहे तसाच त्याचा नाश करणारा ही आत्माच आहे. या सर्वामध्ये कारण व कार्य अशी संगती आहे. कारणाशिवाय जगात कोणतेही कार्य होत नाही, म्हणून संसाराच्या वैचित्र्याला कर्मच कारण आहे. सुख-दुःख, विवेक-अविवेक, संपत्ति-विपत्ति इ. सर्व आपल्या कृत कर्माचे फल आहे. कर्म तर जड आहे. ते आत्म्याचे बरे वाईट काय करू शकणार? आम्ही स्वतःच आपल्या हाताने जन्म-मरणाचे चक्र बनवितो. ज्ञानाने हे चक्र बाजूला सारता येते. अज्ञानाने आत्मा स्वत.ला विसरतो. अंधाराचा नाश करणे कठीण नाही. प्रकाश प्रकट केला की अंधार आपोआप नष्ट होतो. त्याप्रमाणे अज्ञानाचा नाश करीत बसण्यापेक्षा ज्ञान प्रकट करणे हितावह आहे. ज्ञानानेच संसाराचे जाळे तुटते असे म्हटले जाते. ज्ञानवंताची कर्मे एका क्षणात नष्ट होतात.[1] गीतेत पण हीच गोष्ट सांगितली आहे.[2] विद्येने म्हणजे ज्ञानाने मोक्ष घडतो असे महाभारतात म्हटले आहे.[3]

बौद्ध दर्शनामध्ये मनोजन्य संस्काराला वासना व वचन आणि शरीरजन्य संस्काराला (कर्माला) अविज्ञप्ती म्हटले आहे. लोभ, मोह, द्वेषयुक्त प्राणी मन, वचन, कायेची प्रवृत्ति करतात. याच प्रवृत्तीमुळे परत लोभ, मोह, द्वेष करू लागतात. हे संसार चक्र अनादी आहे.[4] फळाच्या उत्पत्तीमध्ये बी जसे तसे फळ. त्याप्रमाणे सर्व जीव आपापल्या कर्माचे धनी आहेत व संसारातील हा भेद, हे वेगवेगळेपण कर्मामुळेच दिसून येते.[5]

अमूर्तिक आत्मा व मूर्तिक कर्म यांचा संबध कसा, याचा विचार करता येईल. रागद्वेषयुक्त आत्मा जेव्हा चांगल्या किंवा वाईट कार्यात सलग्न होतो तेव्हा कर्मरूपी धूळ ज्ञानावरणादिरूपाने आत्म्यात प्रवेश करते. याचे वर्णन करताना कर्माला 'मूर्तिक' आणि आत्म्याला 'अमूर्तिक' म्हटले आहे. अमूर्त आत्म्याशी मूर्तिक कर्माचा बंध होतो. पण या दोहोचा बंध घडून येणे कसे शक्य आहे मूर्तिकाचा मूर्तिकाशी बंध होऊ शकतो. मूर्तिक व अमूर्तिक यांचा बंध कसा होऊ शकेल? मूर्तिक कर्मांचा अमूर्त आत्म्यावर उपकार कसा होतो. जीव जीवावर, पुद्गल पुद्गलावर उपकार करू शकते. दारू, विष इत्यादी मूर्त पदार्थामुळे आघात पोहोचतो. तर काही दूध-तूपादी पदार्थामुळे उपकार होतो अशी मान्यता आहे. शरीर पुष्ट होते, त्याचप्रमाणे मूर्तिक कर्माचा अमूर्त आत्म्यावर प्रभाव आहे[6] आत्मा हा संसार दशेत कर्माने बद्ध आहे. म्हणून कथंचित मूर्तिक आहे. मुक्त जीव सर्वथा अमूर्तिक आहेत. संसारीजीव अनादिकालापासून कर्माने बद्ध असल्यामुळे त्याला कथंचित् मूर्तिक म्हटले आहे.

अन्य दर्शनाप्रमाणे जैनदर्शन देखील जीव व कर्म यांचा संबंध अनादि मानते. संसारातील जीव अनादिकालापासून सर्वथा अमूर्तिक नाही. त्याचा स्वभाव अमूर्तिक आहे. जीव देखील कथंचित् भावकर्म परिणामरूप आहे. म्हणून त्या स्वरूपात तो मूर्तिक देखील आहे.[7] भावकर्म परिणत– मूर्त आत्म्याचा मूर्त कर्माशी संबंध होऊ शकतो असे व्यवहारदृष्टीने सागता येते वस्तुतः जीवामध्ये पाच प्रकारचे रूप, पाच प्रकारचा रस, दोन प्रकारचा गंध व आठ प्रकारचा स्पर्श नसतो, म्हणून त्याला अमूर्तिक म्हटले आहे. कारण रूप, रस, गंध व स्पर्श या गुणानी युक्त वस्तूलाच जैनदर्शनात मूर्तिक म्हटले आहे.[8] असे असले तरी कर्मबंधामुळे फलत. कथंचित् मूर्तिक भावकर्म परिणत आत्म्याला मूर्तिक म्हटले आहे. फलतः कथंचित् मूर्तिक आत्म्याशी मूर्तिक कर्मद्रव्याचा संबंध घडून येतो.

संसारी जीवाचे परिणाम रागद्वेषरूप असतात. त्या परिणामामुळे नवीन कर्मांचा बंध होतो. कर्मामुळे वेगवेगळया गतीत जन्म घ्यावा लागतो. जन्म म्हणजे नव शरीर प्राप्ती. शरीराबरोबर इन्द्रिये व त्यामुळे जीव

---

१. छहढाला–ज्ञानीके क्षण में २. गीता– 'ज्ञानेन तु तदज्ञान' ३. महाभारत शाती– पर्व. २४०-७
४. अगुत्तर-निकाय– ३।३३।१ ५. मिलिन्दप्रश्न–८१ ६. विशेषा.–१६३७ ७. विशेषा –१६३८
८. तत्वार्थसूत्र- अध्याय– ५.




इन्द्रियविषयांचे ग्रहण करतो. विषयांचे ग्रहण करताना इष्टानिष्ट परिणाम होतात. कर्म व आत्म्याच्या संबंधाप्रमाणेच आत्मा व शरीर यांचा संबंध अनादी आहे. शरीर व कर्म यांचा देखील परस्पर कार्यकारणभाव आहे. शरीरामुळे कर्म व कर्मामुळे शरीराची उत्पत्ति होते. शरीराच्या सहाय्यानेच जीव कर्मफलाचा उपभोग घेतो. आत्मा व कर्म, कर्म व शरीर तसेच आत्मा व शरीर यांची परंपरा अनादि सिद्ध होते. ही परंपरा तोडण्यास आत्माच समर्थ आहे. इष्टानिष्ट बुद्धी सोडून, अहंकार ममकाराचा त्याग करून, पुद्‌गलाची क्रिया पुद्‌गलात आणि जीवाची जीवात घडत आहे. असे समजून ज्ञाता द्रष्टा बनणे हा परंपरा तोडण्याचा उपाय आहे.

कर्माचे भेद.– योग व कषाय यांच्यामुळे जीवाचा कर्मपुद्‌गलाशी बंध घडतो, तो चार प्रकारचा आहे. प्रकृतिबंध, प्रदेशबंध, स्थितिबंध व अनुभागबंध. यापैकी प्रकृतिबंध आठ प्रकारचा आहे. ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय, मोहनीय, आयु, नाम, गोत्र आणि अंतराय यांच्या भेद प्रभेदाचे वर्णन तत्त्वार्थसूत्र व कर्मग्रंथात आढळते.

कर्म– सामान्याच्या दृष्टीने कर्म एक आहे. द्रव्य व भाव या अपेक्षेने द्रव्यकर्म व भावकर्म असे दोन भेद आहेत. प्रकृती बंधाच्या आठ भेदाना घाती व अघाति अशा दोन भागात विभागले आहे. ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय व अंतराय ही चार घाति कर्मे जीवाच्या स्वाभाविक गुणांचा घात करतात. अघाती कर्मे जीवगुणांचा घात करीत नाहीत. घाती कर्माचे देशघाती व सर्वघाती असे दोन भेद आहेत. जीवगुणांचा पूर्णतया घात करणाऱ्याना सर्वघाती व अंशतः घात करणाऱ्याना देशघाती म्हटले जाते. घाती कर्मांना पाप कर्म असेही म्हटले आहे.

जैन सिद्धान्ताप्रमाणे कर्माच्या दहा मुख्य अवस्था सांगितल्या आहेत. बंध, उत्कर्षण, अपकर्षण, सत्ता, उदय, उदीरणा, संक्रमण, उपशम, निधत्ती व निकाचित यांचे स्वरूप गोमट्टसार कर्मकाण्डात पुढीलप्रमाणे म्हटले आहे. १ आत्म्याशी कर्माचा संबंध होणे हा बंध. २ कर्माची स्थिती व अनुभाग यात वाढ होणे हे उत्कर्षण. ३ कर्माची स्थिती व अनुभाग यात कमतरता होणे अपकर्षण. ४ कर्माचा बंध झाल्यावर लगेच त्याचे फळ अनुभवात येत नाही. काही काळानंतर त्याचे फळ मिळते. कर्म उदयात येत नाही तोपर्यंतच्या या मधल्या काळात कर्म आत्म्याजवळ तसेच पडून राहते त्याला सत्ता म्हणतात. ५ कर्माच्या फलदानाला उदय म्हटले आहे. ६ ज्याचा उदयाचा काळ अजून आला नाही अशा कर्माचा उदय घडवून आणणे याला उदीरणा म्हणतात. जसे कांही आंबे वगैरे फळे अडीला लावून पिकवावी लागतात. ७ एक कर्म दुसऱ्या सजातीय कर्म स्वरूपात बदलणे म्हणजे संक्रमण उदा. साता वेदनीय असाता वेदनीय रूप होणे, किंवा असाता वेदनीय साता वेदनीय रूप होणे. ८ कर्माच्या उदयाला रोकणे यास उपशम म्हटले आहे. ९ कर्माचा उदय अथवा संक्रमण न होणे याला निधत्ती म्हणतात. १० कर्मामध्ये उत्कर्षण, अपकर्षण, संक्रमण व उदय न होऊ देणे अशास निकाचित म्हणतात. या दहा अवस्था घडवून आणणे अथवा घडू न देणे हे त्या त्या जीवावर अवलंबून आहे. सारांश जो जीव परद्रव्याविषयी आसक्ति बाळगतो, त्यालाच कर्मबंध होतो व जो आसक्ति रहित आहे तो कर्म बंधातून मुक्त होतो.[1]

मुक्ति : कर्मबंधाच्या प्रवृत्तीहून विपरीत प्रवृत्ति मुक्तीला कारण ठरते. कर्मापासून मुक्त होण्यासाठी दोन प्रकारच्या क्रियाची आवश्यकता आहे– संवर व निर्जरा. नवीन कर्म न येऊ देणे हा संवर व प्राप्त केलेल्या कर्माचा नाश ही निर्जरा होय. या दोन क्रियांच्या पूर्णतेने आत्मा मुक्त होतो. गुप्ती, समिती, धर्म, अनुप्रेक्षा इत्यादि कारणानी कर्माचे येणे रोकले जाते.

जीव व बंध यांचे स्वरूप मुळी वेगळे आहे. बंधाचा त्याग हा शुद्धात्मस्थितीसाठी आवश्यक आहे. त्यासाठी या दोहोंचा स्वभाव समजून घ्यावा लागतो. कर्मास्रव रोकला म्हणजे कर्मबंध होणार नाही.

संपूर्ण कर्माच्या नाशाला निमित्त होणारा आत्म्याचा परिणाम त्यास भावमोक्ष म्हणतात व आत्म्यापासून कर्म वेगळे होणे हा द्रव्यमोक्ष होय. द्रव्यमोक्ष व भावमोक्ष यांना समजून तदनुकुल परिणाम ठेवून ( मनोव्यापार

१ प्रवचनसार– २।८७




क्षीण ) रागद्वेषादी विकाराचा सर्वथा अभाव झाला म्हणजे आत्म्याचे खरे निर्विकारी स्वरूप प्रकट होते. ज्या ठिकाणी इन्द्रिये, उपसर्ग, मोह, आश्चर्य, निद्रा, तहान, भूक, श्वास, मरण व जन्म नाही म्हणजे मोक्ष,[२] आत्मा, परमात्मा व संसारचक्र समजल्याने कर्मापासून सुटका होते असे नाही. हे सर्व समजून देखील त्यातच रममाण झाल्यास तीव्र कर्मबंध होतो. 'जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः, जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः' अशी धारणा असली तर मुक्ती मिळत नाही.

काही ठिकाणी क्रियमाण, संचित व प्रारब्ध असे कर्माचे तीन भेद आढळतात. जोपर्यंत नवीन कर्माचे येणे चालू आहे, तोपर्यंत संचित कर्माचा नाश होत नाही. कर्माचा नाश न झाला तर, मुक्ती कशी? अशा जीवास संचित कर्मफल भोगण्यासाठी पुनःपुन्हा सत्-असत् योनीमध्ये जन्म घ्यावा व स्वर्ग-नरकादिकात भ्रमण करावे लागते. राग-द्वेषाच्या अभावी नवीन कर्माचा संचय होत नाही. ज्ञान प्राप्त झाल्यावर कर्म-राशी भस्म होते व जीव मुक्त होतो.

जैनदर्शनात जन्म-मरणाचे कारण कर्म हेच मानले आहे. कर्माच्या आधारावर संसारचक्र चालत आहे. कर्माच्या जाळ्यात फसलेला जीव स्वतंत्रता मिळवू इच्छितो. कर्माच्या जाळ्यातून कसे सुटावे व त्यासंबंधी संक्रमण इत्यादी जाणता यावे म्हणून प्रथम कर्म-सिद्धांत जाणणे जरूरी आहे






२ नियमसार– १७९–८०

# कर्म सिध्दांत

'**कर्मसिद्धांत**'– हे जैनदर्शनाचे असाधारण वैशिष्टच होय. सांख्यदर्शनाने मानलेला प्रकृतिवाद हा जरी कर्मसिद्धांताशी मिळता जुळता असला तरी त्यामध्ये जमीन अस्मानाचे अंतर आहे. सांख्यदर्शनाचा प्रकृतिवाद जीवाला अकर्ता मानून प्रकृतीच जीवाला ज्ञानी, अज्ञानी बनविते. कर्माचा उदय असला तर जीवाला ज्ञान होत नाही. कर्माचा क्षय-क्षयोपशम असला तरच जीवाला ज्ञान होते. कर्मच जीवाला सुख दुःख देते. कर्मामुळेच जीव मिथ्यादृष्टि, असंयमी होतो. कर्मामुळेच जीव चतुर्गतीत भ्रमण करतो. कर्मच जीवाला सुख-संपत्ति देते. कर्मच जीवापासून सुखसंपत्ति हरण करते. कर्मच जीवाला पुरुष, स्त्री बनविते. कर्मच मनुष्याला स्त्रीशी संगम करविते व कर्मच स्त्रीला मनुष्याशी संगम करविते. जीव ( पुरुष-आत्मा ) स्वयं अब्रह्मचारी कुशीलसेवन करणारा नसून कर्मच त्याला अब्रह्माचरण कुशीलसेवन करण्यास भाग पाडते.

जीव ( पुरुष-आत्मा ) स्वयं हिंसाचारी, पापाचारी नसून कर्मच जीवाला हिंसा, प्राणघात करण्याची बुद्धि उत्पन्न करविते. जीव स्वयं घातक नसून कर्मच जीवाला घातक बनविते. जीव स्वयं खोटे बोलणारा नसून कर्मच त्याला खोटे बोलण्यास भाग पाडते. जीव स्वयं चोर नसून कर्मच जीवाला चोरी करण्याची बुद्धि उत्पन्न करविते.

जगातील पापपुण्याचे जे काही व्यवहार चालू आहेत, ती सर्व कर्माचीच अगाध लीला आहे. याप्रमाणे सांख्यदर्शनाचा प्रकृति-कर्मवाद जगाच्या पराधीनतेचा-कर्माधीनतेचा सूचक आहे.

परन्तु जैनदर्शनाचा कर्मसिद्धांत हा कर्माधीनतेचा, पराधीनतेचा सूचक नसून जीवाच्या स्वाधीनतेचा सूचक आहे.

वास्तवीक जीव कर्माधीन नसून उलट कर्म जीवाधीन आहे. जीव स्वयं आपल्या अपराध, दोषाने, प्रज्ञा-पराधाने, शुभ-अशुभ परिणामरूप भावकर्म करतो. त्यामुळे त्याला पुण्य-पापकर्म प्रकृतीचा बंध होतो. कर्म जेव्हा उदयास, पक्वदशेस येते तेव्हा ते सुख-दुःख फल देते. पुण्यकर्माचा उदय जेव्हा असतो तेव्हा सुख सामग्री प्राप्त होते. पापकर्माचा उदय असतो तेव्हा दुःख सामग्री प्राप्त होते. कर्म केवळ आपले फल देण्याचे काममात्र करते. परंतु त्या सुख-दुःख फलाशी समरस होऊन भोगणे किंवा न भोगणे हे काम तर कर्म बलात् करवीत नाही. जीव स्वयं आपल्या अज्ञान अपराधाने त्या कर्म फलाशी सुख-दुःखाशी समरस होतो. त्या सुख-दुःखाचे वेदन करणे, भोगणे हा आपला स्वभाव समजतो तेव्हा हा जीव स्वयं कर्माधीन बनतो. कर्म बलात् त्याला पराधीन बनवीत नाही. हा जैनदर्शनाच्या कर्मसिद्धांताचा खरा गाभा आहे.

जैनदर्शनाच्या कर्मसिद्धांत शास्त्रामध्ये जरी निमित्तप्रधान व्यवहारनयाने कर्माला प्राधान्य देऊन कर्माच्या उदयाने जीवाला राग, द्वेष, मोह उत्पन्न होतात, कर्माच्या क्षयाने जीवाला केवलज्ञानाची, मोक्षाची प्राप्ति होते अशी कर्माधीनता सूचक व्यवहारभाषा कथन केली जाते तथापि त्याचा अभिप्राय तो अपराध कर्माचा नसून तो अपराध जीवाच्या प्रज्ञापराधाचा, अज्ञानभावाचा आहे याचा सूचक आहे.

जे कोणी जैनदर्शनाच्या कर्मसिद्धांताचा अभिप्राय कर्माधीनतेचा सूचक समजतात त्यांना जैनदर्शनाचा कर्मसिद्धांत वास्तविक समजला नाही असेच नाइलाजाने म्हणावे लागते.

भावो हि पुण्याय मतः, शुभः पापाय चाशुभ. । तं दुष्यन्तमतो रक्षेत्, धीरः समयभक्तितः ॥

कायवाङ्मनःकर्म योगः । स आस्रवः । शुभः पुण्यस्य, अशुभः पापस्य ॥




मन-वचन-काय यांच्याद्वारे आत्मप्रदेशाचे हलनचलनात्मक कर्म-क्रिया करण्यासाठी उत्सुकतारूप जीवाचा जो परिणाम त्यास योग म्हणतात. हा योगरूप परिणामच कर्मांच्या आस्रवाचे कारण असल्यामुळे कारणामध्ये कार्याचा उपचार करून त्यालाच आस्रव म्हटले. जीवाच्या शुभयोग परिणामानी पुण्यकर्माचा आस्रव होतो व अशुभयोग परिणामानी पापकर्माचा आस्रव होतो. आपले परिणाम जेणे करून क्षुब्ध-दूषित न होतील, शुभ-अशुभरूप न होतील याची सावधानी ज्ञानी जीवाने ठेवली पाहिजे. समय म्हणजे ज्ञायकस्वभाव आत्मा त्याची श्रद्धा, भक्ति, रुची ठेवणाऱ्या धीर पुरुषाने राग, द्वेषरूप, विषमभाव, शुभ-अशुभ परिणाम न ठेवता निरंतर समभावरूप ज्ञाता-द्रष्टाभावरूप परिणाम ठेवण्याचा पुरुषार्थ केला पाहिजे.

कर्मसिद्धांत हा जीवाच्या जीवनाचा दृश्य चित्रपट आहे. पूर्वी जीवाने ज्या प्रकारचे परिणाम केलेले असतात त्याचे फल त्याला वर्तमानकाळी भोगावे लागते. वर्तमानकाळी जीव ज्या प्रकारचे परिणाम करतो त्याचे फल त्याला भविष्यकाळी नियमाने भोगावे लागते.

स्वयं कृतं कर्म यदात्मना पुरा फलं तदीयं लभते शुभाशुभं ।
परेण दत्तं यदि लभ्यते स्फुटं स्वयं कृतं कर्म निरर्थकं तदा ॥

जीवाने पूर्वजन्मी जे शुभ-अशुभ परिणाम करून कर्म बांधलेले असते त्याचेच चांगले-वाईट फल त्याला या जन्मी भोगावे लागते. ज्या निमित्तभूत परवस्तूच्या संयोगात आपणसुख किंवा दु:ख भोगतो ती निमित्तभूत परवस्तू किंवा अन्य कोणी ईश्वर-देव-देवता आपणास सुख-दु:ख देतात असे मानले तर पूर्वी केलेले कर्म निरर्थक ठरेल. परंतु पूर्वी केलेले कर्म निरर्थक ठरत नाही. तदनुकूल निमित्ताचा संयोग किंवा वियोग हा नियोगवश होतो.

तादृशो जायते बुद्धि:, पुरुषार्थश्च तादृश: । सहायास्तादृशा: सन्ति, यादृशी भवितव्यता ॥
होणारे न चुकेल होइल जरी ब्रह्मा तया आडवा । णो चालेदुं सक्को इंद णरिंदो जिणिदो वा ॥

विधी, दैव, कर्म, भवितव्यता हे सर्व एकार्थवाचक शब्द आहेत. भवितव्यता नामक अन्य एखादी अद्भुत, अदृश्य शक्ति नसून जीव वर्तमानकाळी जे शुभ-अशुभ परिणाम करतो तेच पुढील भविष्यकाळातील जीवनाचे 'दैव', भवितव्यता या नावाने संबोधिले जाते.

आपण पूर्वजन्मी जसे शुभ-अशुभ, खरे-खोटे परिणाम केले असतील तदनुसार जसे पुण्य-पापकर्म बांधले असेल तदनुसार या वेळी आपली बुद्धि आपला पुरुषार्थ होतो व तदनुसार इष्ट-अनिष्ट पदार्थांचा संयोग-वियोग हा घडून येतो.

आजचे वर्तमानकालीन जीवन हा पूर्वभवातील संचित केलेल्या कर्मांचा दृश्य चित्रपट आहे व भावी जीवनातील घडामोडीचा Red Signal धोक्याची सूचना देणारा सूचक चित्रपट आहे.

मनुष्याला वर्तमान जीवनात सुख-शांती मिळावी अशी जर खरी इच्छा असेल व भावी जीवन सुखमय व्हावे असे वाटत असेल तर त्याने कर्मसिद्धांत शास्त्रातील नियमांचा सूक्ष्म रितीने अभ्यास करणे आवश्यक आहे. जीवाने कसे परिणाम ठेवल्याने त्याला कोणते बरे-वाईट फळ मिळते याचे सिद्धांत नियम कर्मशास्त्रात सांगून ठेवले आहेत.

### १- कर्म म्हणजे काय ?

'कर्तु: इप्सिततमं कर्म', 'स्वतंत्र: कर्ता' कर्ता हा स्वतंत्र असतो. स्वतंत्र बुद्धीने कर्ता जे कार्य करण्याची इच्छा करतो ते त्याचे कर्म म्हटले जाते.

प्राप्यं, निर्वर्त्यं, विकार्यं च यत् तत् कर्म ।

स्वतंत्र बुद्धीने कर्ता जी अवस्था प्राप्त करतो, ज्या अवस्थारूपाने स्वयं उत्पन्न होतो, ज्या अवस्थारूपाने स्वयं परिणमतो, विकृत होतो ते त्याचे कर्म होय.

या वरील व्युत्पत्ति अर्थावरून जीवाचे शुभ-अशुभ परिणाम हे जीवाचेच खरे कर्म ( कार्य ) होय. त्यालाच **'भावकर्म'** असे म्हणतात.

जीवाचे हे शुभ-अशुभ परिणाम होण्यास निमित्त कारण केवळ विषयभूत निमित्तमात्र द्रव्यकर्माचा संयोग आवश्यक असतो. कारण शुभ-अशुभ परिणाम हे विकारविभाव परिणाम आहेत, स्वभाव परिणाम नाहीत.

ज्याप्रमाणे जीवाचा ज्ञान-दर्शन हा स्वभाव परिणाम आहे. त्यासाठी त्याला अन्य निमित्ताच्या संयोग, वियोगाची अपेक्षा ठेवावी लागत नाही तसा शुभ-अशुभ परिणाम हा स्वभाव परिणाम नाही, विभाव परिणाम आहे. त्यामुळे त्याला विषयभूत, अन्य निमित्त द्रव्याचा संयोग आवश्यक असतो. निमित्तभूत द्रव्याच्या संयोग-वियोग असल्याशिवाय नैमित्तिक कार्य, विभावपरिणाम होत नाहीत.

परतु हा निमित्तभूत अन्य द्रव्याचा संयोग केवळ निमित्तमात्र असतो. विभाव परिणामाचे उत्पादक कारण नसतो.

दगडाशिवाय ठेच लागत नाही. पण ठेच लागण्याचे कारण दगड नसून चालणाऱ्याचा बेसावधपणा हे त्याचे कारण असते.

तीच गोष्ट द्रव्यकर्माची आहे. द्रव्यकर्माचा संयोग असल्याशिवाय भावकर्मरूप, शुभ-अशुभ परिणाम होत नाहीत. हे जरी खरे असले तरी द्रव्यकर्माचा संयोग किंवा उदय हा जीवाच्या शुभ-अशुभ परिणामाचा जनक नसून जीवाचा प्रज्ञापराध, अज्ञानभाव हाच शुभ-अशुभ परिणामाचा जनक आहे. जीव स्वयं कर्मफलाशी, सुख-दुःखाशी समरस होतो, त्याला आपला स्वभाव समजतो. त्याचेविषयी एकत्वाध्यास करतो. त्यामुळे शुभ-अशुभभाव उत्पन्न होतात.

यावरून कर्म जीवाच्या परिणामाचे जनक नसून जीवच आपल्या परिणामाचा जनक आहे. ते त्याचे भावकर्म म्हटले जाते. त्याचे निमित्त घेऊन कार्माणवर्गणा स्वयं कर्मरूप होऊन जीवाशी बद्ध होते, त्यास द्रव्यकर्म म्हणतात.

वास्तविक निश्चयाने 'भावकर्म' हेच जीवाचे कर्म आहे. त्या भावकर्मानेच तो खरा बद्ध आहे. त्या भावकर्मापासून, दोषापासून मुक्त होणे हाच खरा मोक्ष आहे. जीव भावकर्माने बद्ध असतानाच द्रव्यकर्माशी बद्ध होतो. एकक्षेत्रावगाहरूप संबंध होतो. म्हणून व्यवहारनयाने जीव कर्मांनी बद्ध आहे असे म्हटले जाते.

तसेच जीव जेव्हा भावकर्मापासून मुक्त होतो. द्रव्यकर्माचा क्षय आपोआप होतो. म्हणून व्यवहारनयाने कर्माच्या क्षयाने आत्मा मुक्त होतो असे म्हटले जाते.

वास्तविक जीवाने आपले शुभ-अशुभ परिणाम भावकर्म न करण्याचा पुरुषार्थ केला तर द्रव्यकर्माचा अभाव हा आपोआपच होतो. तो करावा लागत नाही. जीव कर्मामध्ये पुरुषार्थ करूही शकत नाही.

जैनदर्शनाचा कर्मसिद्धांत हा जीवाच्या करणानुयोग सिद्धांतावर आधारलेला आहे. करण म्हणजे जीवाचे परिणाम. कर्मसिद्धांत हा जीवाच्या परिणामाचा चित्रपट आहे.

## २. कर्माचे प्रकार व त्यांचे कार्यफल–

कर्माची प्रकृति ( स्वभाव ) या अपेक्षेने ८ भेद केले आहेत– १) ज्ञानावरण २) दर्शनावरण ३) वेदनीय ४) मोहनीय ५) आयु ६) नाम ७) गोत्र ८) अंतराय

१) ज्ञानावरण– जे कर्म जीवाच्या ज्ञानगुणावर आवरण टाकते त्यास ज्ञानावरण कर्म म्हणतात.

जीवाच्या ज्ञानाचे १) मतिज्ञान २) श्रुतज्ञान ३) अवधिज्ञान ४) मनःपर्ययज्ञान ५) केवलज्ञान असे ५ भेद आहेत. त्यावरून त्या ५ ज्ञानावर आवरण टाकणारे ज्ञानावरण कर्म देखील ५ प्रकारचे आहे. १) मतिज्ञानावरण २) श्रुतज्ञानावरण ३) अवधिज्ञानावरण ४) मनःपर्ययज्ञानावरण ५) केवलज्ञानावरण.

२ दर्शनावरण– जे कर्म जीवाच्या दर्शन गुणावर आवरण टाकते त्यास दर्शनावरण कर्म म्हणतात. याचे ९ भेद आहेत– १) चक्षुदर्शनावरण २) अचक्षुदर्शनावरण ३) अवधिदर्शनावरण ४) केवलदर्शनावरण ५) निद्रा ६) निद्रानिद्रा ७) प्रचला ८) प्रचलाप्रचला ९) स्त्यानगृद्धि

१) चक्षुरिंद्रियाने होणारे जे ज्ञान त्याचे अगोदर जो सामान्य प्रतिभास होतो त्यास चक्षुदर्शन म्हणतात. त्यावर जे आवरण टाकते त्यास चक्षुदर्शनावरण कर्म म्हणतात.

२) चक्षूशिवाय बाकीच्या इंद्रियांनी जो सामान्य प्रतिभास होतो त्यास अचक्षुदर्शन म्हणतात. त्यावर जे आवरण टाकते त्यास अचक्षुदर्शनावरण कर्म म्हणतात.

३) अवधिदर्शनावरण– अवधिज्ञानाच्या अगोदर जो सामान्य प्रतिभास होतो त्यास अवधिदर्शन म्हणतात. त्यावर जे आवरण टाकते त्यास अवधिदर्शनावरण कर्म म्हणतात.

४) केवलदर्शनावरण– केवलज्ञानाबरोबर होणाऱ्या केवलदर्शनावर जे आवरण टाकते त्यास केवलदर्शनावरण कर्म म्हणतात.

प्रश्न– ज्ञानाचे ५ भेद असताना दर्शनाचे ४ भेदच का?

उत्तर– श्रुतज्ञान हे मतिज्ञानपूर्वक होते. त्यामुळे मतिज्ञानापूर्वी होणारे जे चक्षु किंवा अचक्षुदर्शन तेच श्रुतज्ञानापूर्वी असते. म्हणून श्रुतज्ञान होताना वेगळे दर्शन होत नाही.

तसेच मन.पर्ययज्ञान हे ईहा मतिज्ञानपूर्वक होते. प्रथम याचे मनात कोणते विचार चालले आहेत अशी जिज्ञासा उत्पन्न होते. नंतर मन.पर्ययज्ञानाने तो मनातील विचार जाणतो. म्हणून मन.पर्ययज्ञानापूर्वी देखील वेगळे दर्शन होत नाही.

५) निद्रा– ज्याच्या उदयाने अल्प झोप येते, लागलीच जागा होतो त्यास निद्रादर्शनावरण कर्म म्हणतात

६) निद्रानिद्रा– ज्याच्या उदयाने पुनः पुनः गाढ झोप येते त्यास निद्रानिद्रादर्शनावरण कर्म म्हणतात.

७) प्रचला– ज्याच्या उदयाने झोपेत डोळे जड पडतात, उठून पुनः झोपतो त्यास प्रचला दर्शनावरण कर्म म्हणतात.

८) प्रचलाप्रचला– ज्याच्या उदयाने झोपेत बडबड करतो, शरीराचे अवयव चलायमान होतात त्यास प्रचलाप्रचला दर्शनावरण कर्म म्हणतात.

९) स्त्यानगृद्धि– ज्याच्या उदयाने जीव झोपेमध्ये बडबडतो, उठून अचाट कामे करतो त्यास स्त्यानगृद्धि दर्शनावरण कर्म म्हणतात.

[1]ज्ञानी माणसास दूषण लावणे, आपले ज्ञान लपविणे, दुसऱ्याच्या ज्ञानाविषयी मत्सर भाव ठेवणे, ज्ञान कार्यात विघ्न-अंतराय आणणे, दुसरा ज्ञानप्रकाशन कार्य करीत असेल त्यामध्ये अडथळा आणणे, प्रशंसायोग्य ज्ञानाला दूषण लावणे या परिणामांनी ज्ञानावरण, दर्शनावरण, कर्मांचा आस्रव होतो. शास्त्राचे उत्सूत्र

१. " तत्प्रदोष, निन्हव, मात्सर्य अंतराय, आसादन, उपघाताः, ज्ञानदर्शनावरणयो " (तत्वार्थसूत्र आध्याय ६ सूत्र १० )




( शास्त्रविरुद्ध ) कथन करणे, शास्त्र ऐकण्याचा अनादर करणे, लोभाने शास्त्र वाचणे हे सर्व जीवाच्या अल्पज्ञानतेचे सूचक आहेत. स्वपरविवेक, हित-अहितविवेक हे ज्ञानाच्या पूर्णतेचे सूचक आहेत.

३) **वेदनीय कर्म–** ज्या कर्माच्या उदयाने जीवाला साता-असातारूप, सुख-दुःखजनक सामग्री प्राप्त होते त्यास वेदनीय कर्म म्हणतात. याचे २ भेद आहेत– १) साता २) असाता.

१) सातावेदनीय– ज्याच्या उदयाने जीवाला ऐहिक-शरीर सुखाला कारणीभूत सामग्री प्राप्त होते त्यास सातावेदनीय कर्म म्हणतात.

२) असातावेदनीय– ज्याच्या उदयाने जीवाला शरीर-दुःखाला कारणीभूत सामग्री प्राप्त होते त्यास असातावेदनीय कर्म म्हणतात.

हे वेदनीय कर्म जीवाच्या गुणाचा घात करीत नसल्यामुळे त्याला घातिकर्म म्हटले नाही. तथापि मोहनीय कर्माच्या सद्भावात जीवाच्या सुख-दुःखाला निमित्तभूत कारण सामग्री प्राप्त करून देते. म्हणून त्याला जीवविपाकी कर्म म्हटले आहे. मोहनीय कर्माच्या अगोदर घातीकर्माच्या पंक्तीत त्याला स्थान दिले आहे.

वास्तविक वेदनीय कर्म जीवाला सुख-दुःख देत नसून सुख-दुःखाला कारणभूत निमित्त सामग्री प्राप्त करून देणे एवढेच वेदनीय कर्माचे कार्य आहे.

[1]दुःख करणे, शोक करणे, पश्चात्ताप करणे, जोराने ओरडणे, दुःखावेगात आत्मवध करून घेणे, दुसऱ्याला करूणा उत्पन्न होईल अशा रितीने मोठ्याने आक्रोश करणे, स्वतः करणे, दुसऱ्यास करविण्यास भाग पाडणे यामुळे असाता कर्माचा आस्रव बंध होतो.

[2]सर्व प्राणीमात्राविषयी अनुकंपा, दयाभाव ठेवणे, व्रती-रत्नत्रय, संपन्न, पुरुषाचा योग्य आदर, विनय करणे, त्याना दान देणे, सराग संयम धारण करणे, संयमासंयम धारण करणे, समाधियोग धारण करणे, क्षमाभाव ठेवणे, संतोषवृत्ति धारण करणे, लोभ न करणे या शुभ परिणामानी सातावेदनीय कर्माचा आस्रव बंध होतो.

ज्याप्रमाणे हिंसादि पापभावरूप परिणाम हा जीवाचा स्वभावधर्म नाही, अधर्म आहे. तसाच अहिंसादि व्रतरूप शुभ परिणाम देखील जीवाचा स्वभावधर्म नाही. तो पापबंधाला कारण नसल्यामुळे जरी त्याला व्यवहारनयभाषेने अधर्म न म्हणता व्यवहारधर्म म्हटले आहे, तथापि निश्चयनयभाषेने तो देखील पुण्यबंधालाच कारण असल्यामुळे संवर-निर्जरेला कारण नसल्यामुळे त्याला देखील हेयच म्हटले आहे.

धर्मबुद्धीने केली जाणारी क्षमा किंवा दया ही खरी क्षमा किंवा दया नसून शुद्ध ज्ञाता द्रष्टा स्वभावालाच आत्मधर्म समजून गुणस्थान पदानुसार सहजगत्या होणारा क्षमा- दयारूप शुभराग भाव याला व्यवहारनयाने धर्म म्हटले आहे.

४) **मोहनीयकर्म–** ज्या कर्माच्या उदयाने जीव मोहित होतो, मूर्च्छित होतो. आपल्या ज्ञानदर्शन स्वभावापासून स्वरूपापासून भ्रष्ट होतो त्यास मोहकर्म म्हणतात.

मोहकर्माचे २ भेद आहेत- १) दर्शनमोह, २) चारित्रमोह.

१) दर्शनमोह– जे कर्म आत्म्याच्या सम्यक्त्वगुणाचा घात करते त्यास दर्शनमोहनीय म्हणतात.

---

१. दुःख- शोक- ताप- आक्रन्दन- वध- परिदेवनानि- आत्म- पर- उभयस्थानि- असद्वेद्यस्य ॥ (तत्वार्थसूत्र अध्याय ६ सूत्र ११)
२. भूतव्रत्यनुकंपादान- सराग संयमादियोगः क्षान्तिः शौचमिति सद्वेद्यस्य ॥ ( सूत्र १२ )

४) देवायुच्या[1] आस्रवाची कारणे – सराग संयम, संयमासंयम, अकाम निर्जरा, बालतप हे परिणाम देवायुच्या आस्रवबंधास कारण आहेत. तसेच सम्यग्दर्शन प्राप्त झाल्यावर जर नवीन आयुकर्माचा बंध पडला तर नियमाने देवायुचाच बंध होतो.

६) **नामकर्म–** ज्या कर्माचा उदय झाला असताना जीवाला शरीर-इंद्रिये-अवयव नाना प्रकारचे रूप प्राप्त होतात त्यास नामकर्म म्हणतात. याचे ९३ भेद आहेत.

**१ ते ४ गतिनामकर्म–** ज्या कर्माचा उदय झाला असताना जीवाचा नरक-तिर्यंच-मनुष्य-देवगतिमध्ये यथायोग्य जन्म होतो त्यास गतिनामकर्म म्हणतात.

**५ ते ९ जातिनामकर्म–** ज्या कर्माचा उदय झाला असताना जीवाचा एकेंद्रिय, द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय जातिमध्ये यथायोग्य जन्म होतो त्यास जातिनामकर्म म्हणतात.

**१० ते १४ शरीरनामकर्म–** ज्या कर्माच्या उदयात जीवाला औदारिक, वैक्रियक, आहारक, तैजस, कार्माण या शरीरापैकी यथायोग्य शरीर प्राप्त होणे त्यास शरीरनामकर्म म्हणतात.

**१५ ते १७ अंगोपांग नामकर्म–** ज्या कर्माच्या उदयात जीवाच्या शरीराच्या यथायोग्य अंग–उपांगाची रचना होते त्यास अंगोपांग नामकर्म म्हणतात.

**१८ निर्माण नामकर्म–** ज्या कर्माच्या उदयात औदारिकादि शरीरास योग्य अशा अवयवाची रचना होते त्यास निर्माण नामकर्म म्हणतात.

**१९ ते २३ बंधन नामकर्म–** ज्या कर्माच्या उदयात औदारिकादि शरीर परमाणूंचे परस्पर बंधन ( एकत्रपणा ) होतो त्यास बंधन नामकर्म म्हणतात.

**२४ ते २८ संघात नामकर्म–** ज्या कर्माच्या उदयात औदारिकादि शरीर परमाणूचा छिद्ररहित एकपणा होतो त्यास संघात नामकर्म म्हणतात.

**२९ ते ३४ संस्थान नामकर्म–** ज्या कर्माच्या उदयात जीवाच्या शरीराला कोणतातरी आकार येतो त्यास संस्थान नामकर्म म्हणतात. संस्थान ६ आहेत.

१) समचतुरस्र संस्थान– सर्व अवयव योग्य प्रमाणात असणे.
२) न्यग्रोध परिमंडल– वडाच्या झाडाप्रमाणे वरचे अवयव मोठे खालचे अवयव बारीक असणे.
३) स्वाति संस्थान– वारूळाप्रमाणे खालचे अवयव मोठे वरचे अवयव बारीक असणे.
४) वामन संस्थान– शरीराचा आकार बुटका असणे.
५) कुब्जक संस्थान– शरीराचा आकार कुबडा असणे.
६) हुंडक संस्थान– शरीराचा आकार ओबड-धोबड कुरूप असणे

**३५ ते ४० संहनन नामकर्म–** शरीरामध्ये हाडांची रचना असणे. संहनन ६ आहेत.

१) वज्रर्षभनाराच संहनन– ऋषभ (वेष्ठन) नाराच (खिळे) संहनन (हाडे) वज्राप्रमाणे मजबूत असणे.
२) वज्रनाराच सहनन– खिळे व हाडे वज्रमय असतात पण वेष्ठन वज्रमय नसणे.
३) नाराच संहनन– हाडे वज्रमय नसतात पण हाडांचे सांधे कीलीत ( खिळे असलेले ) असतात.
४) अर्धनाराच संहनन– हाडाचे सांधे अर्ध कीलित असणे.

१. सरागसंयम-संयमासंयम-अकामनिर्जरा-बालतपांसि दैवस्य ( सूत्र २० ) सम्यक्त्वं च ( सूत्र २१ )




५) कीलक संहनन– हाडाचे सांधे परस्परात खिळलेले असतात. पण त्यात खिळे नसतात.

६) असंप्राप्ता सृपाटिका संहनन– हाडांचे सांधे परस्पर खिळलेले नसतात. केवळ नसानी परस्पर बांधलेले लवचिक असतात.

**४१ ते ६० स्पर्शादि नामकर्म**– शरीरामध्ये ८ प्रकारचा स्पर्श, ५ प्रकारचा रस, २ प्रकारचा गंध, ५ प्रकारचा वर्ण उत्पन्न होतो. त्यास स्पर्श-रस-गंध-वर्ण नामकर्म म्हणतात.

**६१ ते ६४ आनुपूर्वी नामकर्म**– मरणानंतर व जन्म घेण्याचे अगोदर विग्रह गतीमध्ये जीवाचा आकार पूर्व शरीरासारखा असणे.

**६५ अगुरुलघु नामकर्म**– शरीर लोखंडासारखे जड व कापसासारखे हलके नसणे.

**६६ उपघात नामकर्म**– आपल्याच अवयवाने आपल्या शरीराचा घात होईल असे अवयव असणे.

**६७ परघात नामकर्म**– दुसऱ्याचा घात होईल असे अवयव प्राप्त होणे.

**६८ आतप नामकर्म**– सूर्यबिंबासारखे आतापरूप शरीर प्राप्त होणे.

**६९ उद्योत नामकर्म**– चंद्रबिंबासारखे प्रकाशमान शरीर प्राप्त होणे.

**७० उच्छ्वास नामकर्म**– श्वासोच्छ्वास प्राप्त होणे.

**७१–७२ विहायोगति नामकर्म**– प्रशस्त–अप्रशस्त गमन करणे.

**७३ प्रत्येक शरीर नामकर्म**– एक शरीराचा एकच जीव स्वामी असणे.

**७४ साधारण शरीर नामकर्म**– एका शरीराचे अनंत जीव स्वामी असणे. यांचे मरण-जन्म-श्वासोच्छ्वास युगपत् होतात.

**७५ त्रस नामकर्म**– ज्या कर्माच्या उदयात जीव द्वीद्रिय-त्रीद्रिय-चतुरिंद्रिय-पंचेंद्रियात जन्म घेतो.

**७६ स्थावर नामकर्म**– ज्या कर्माच्या उदयात जीव एकेंद्रियात जन्म घेतो.

**७७ सुभग नामकर्म**– ज्यामुळे दुसरे आपल्यावर प्रीति करतात.

**७८ दुर्भग नामकर्म**– ज्यामुळे दुसरे आपला द्वेष करतात.

**७९ सुस्वर नामकर्म**– ज्यामुळे चांगला सुस्वर आवाज असतो.

**८० दुःस्वर नामकर्म**– ज्यामुळे दुःस्वर आवाज असतो.

**८१ शुभ नामकर्म**– चांगले सुरूप अवयव प्राप्त होणे.

**८२ अशुभ नामकर्म**– कुरूप अवयव प्राप्त होणे.

**८३ सूक्ष्म नामकर्म**– ज्यामुळे ( दुसऱ्यास न रोकणारे, दुसऱ्याकडून रोकले न जाणारे ) सूक्ष्म शरीर प्राप्त होते.

**८४ बादर नामकर्म**– ज्यामुळे बादर (स्थूल) दुसऱ्यास रोकणारे व दुसऱ्याकडून रोकले जाणारे शरीर प्राप्त होते.

**८५ पर्याप्ति नामकर्म**– ज्यामुळे जीवाच्या यथायोग्य पर्याप्ति पूर्ण होतात.

**८६ अपर्याप्ति नामकर्म**– ज्यामुळे यथायोग्य पर्याप्ति पूर्ण न होताच मरण येते.

**८७ स्थिर नामकर्म**– ज्यामुळे शरीरातील सप्त धातू स्थिर असतात.





२) चारित्रमोह– जे कर्म आत्म्याच्या चारित्रगुणाचा घात करते, ज्या कर्माच्या उदयाने आत्मा आत्मस्वरूपापासून च्युत होतो त्यास चारित्रमोहनीय म्हणतात.

१) दर्शनमोहकर्माचे ३ भेद आहेत- १) मिथ्यात्व, २) सम्यग्मिथ्यात्व, ३) सम्यक्प्रकृति.

१) मिथ्यात्व– या कर्माच्या उदयाने जीवाचे मिथ्यात्वपरिणाम होतात, अतत्त्वश्रद्धान होते, अतत्त्वामध्ये तत्त्वबुद्धि होते, अजीवामध्ये जीवत्वबुद्धि होते, आस्रवबंध तत्त्वामध्ये संवर-निर्जरातत्त्व बुद्धि होते, स्व-पराचा विवेक राहात नाही, शरीरादि परद्रव्यामध्ये आत्मत्वबुद्धि होते, रागादि विभावभावामध्ये स्वभावबुद्धि होते, विषय व कषायामध्ये रुचि उत्पन्न होते, स्पर्शनेंद्रियाच्याद्वारे मृदुस्पर्शसुखाची इच्छा करणे, रसनेंद्रियाच्याद्वारे रुचकर स्वादिष्ट पदार्थ खाण्याची इच्छा करणे, घ्राणेंद्रियाच्याद्वारे सुवासिक तेल-अत्तर-फुले यांचा सुवास घेण्याची इच्छा करणे, चक्षुरिंद्रियाच्याद्वारे सुंदर चित्र-नाटक-सिनेमा पाहण्याची इच्छा होणे, कर्णेंद्रियाच्याद्वारे मधुर गीत-वाद्य ऐकण्याची इच्छा करणे या सर्व क्रिया जीवाच्या मिथ्यात्वभावाचे सूचक आहेत.

मिथ्यात्व म्हणजे विपरीतबुद्धि. हा विपर्यास प्रामुख्याने ३ प्रकारचा असतो. १) स्वरूप विपर्यास, २) कारण विपर्यास, ३) भेदाभेद विपर्यास.

१) वस्तूचे जसे यथार्थस्वरूप आहे तसे न समजता विपरीत समजणे, रागादिभावाला आपले स्वरूप समजणे हा स्वरूप विपर्यास होय.

२) उपादान कारणाप्रमाणे निमित्ताला देखील कारण समजणे, उपादान व निमित्त दोन्ही मिळून कार्य होते असे समजणे हा कारण विपर्यास होय.

३) शरीर व आत्मा किंवा रागभाव व ज्ञानभाव यामध्ये भेद असताना त्याना अभेद समजणे, गुण व गुणी, केवलज्ञानादि गुण व आत्मा यात अभेद असताना त्याना भेदरूप समजणे हा भेदाभेदविपर्यास होय.

२) सम्यग्मिथ्यात्व– ज्या कर्माच्या उदयाने सम्यग्मिथ्यात्वरूप मिश्र परिणाम होतात त्यास सम्यग्मिथ्यात्व कर्म म्हणतात.

३) सम्यक्प्रकृति– ज्या कर्माच्या उदयाने जीव सम्यक्त्वापासून भ्रष्ट होत नाही पण त्यामध्ये चलमलिन अगाढ दोष उत्पन्न होतात त्याम सम्यक्प्रकृति कर्म म्हणतात.

१) [1]केवली कवलाहार घेतात असे मानणे हा केवली अवर्णवाद होय.

२) खऱ्या शास्त्राला दूषण लावणे, व्यवहार शास्त्राचा नयाभिप्राय न ओळखता व्यवहारनयकथनाला परमार्थ समजणे हा श्रुत अवर्णवाद होय.

३) रत्नत्रय सपन्न मुनि-अर्जिका-श्रावक-श्राविका चतुर्विध संघाला दूषण लावणे हा संघ अवर्णवाद होय.

४) आत्मस्वभावाच्या आश्रयाने जे शुद्ध परिणाम त्याला धर्म न मानता शुभरागाला किंवा बाह्य क्रियेला धर्म मानणे हा धर्म-अवर्णवाद होय.

५) स्वर्गातील देव मास खातात, अन्नादिकाचा आहार घेतात असे समजणे हा देव-अवर्णवाद होय.

या परिणामानी दर्शन मोहकर्माचा आस्रव-बंध होतो.

२) चारित्रमोहकर्माचे २५ भेद आहेत. कषायाचे १६ भेद व नोकषायाचे ९ भेद असे एकूण २५ भेद आहेत. कषायाचे मुख्य ४ भेद क्रोध-मान-माया-लोभ व याचे प्रत्येकी अनंतानुबंधी, अप्रत्याखानावरण-प्रत्याखानावरण संज्वलन भेदाने एकूण १६ भेद होतात.

१) अनंतानुबंधी– जे आत्म्याच्या सम्यक्त्व व चारित्र ( स्वरूपाचरण चारित्र ) गुणाचा घात करतात त्यास अनंतानुबंधी क्रोध-मान-माया-लोभ म्हणतात.

---

१. केवलि-श्रुत-संघ-धर्म-देव-वर्णवादो दर्शनमोहस्य ॥ (सूत्र १३)




२) अप्रत्याख्यानावरण– जे कषायभाव असताना किंचित देखील प्रत्याख्यान-त्याग-व्रत-नियम घेण्याचे परिणाम होत नाहीत. त्याना अप्रत्याख्यानावरण क्रोध-मान-माया-लोभ म्हणतात.

३) प्रत्याख्यानावरण– जे कषायभाव असताना एकदेश संयम घेण्याचे शुभ परिणाम होतात पण सकलसंयम धारण करण्याचे परिणाम होत नाहीत त्यास प्रत्याख्यानावरण क्रोध-मान-माया-लोभ म्हणतात.

४) संज्वलन– जे कषायभाव असताना सकलसंयम धारण करण्याचे शुभ परिणाम होतात परंतु त्यामध्ये दोषजनक प्रमाद– ( आत्मस्वरूपात असावधानता ) उत्पन्न होतो त्यास संज्वलन क्रोध-मान-माया-लोभ म्हणतात.

नोकषायाचे ९ भेद आहेत- १) हास्य, २) रति, ३) अरति, ४) शोक, ५) भय, ६) जुगुप्सा, ७) पुंवेद, ८) स्त्रीवेद, ९) नपुंसकवेद.

१) ज्याच्या उदयात हास्य उत्पन्न होते ते हास्यकर्म होय.

२) ज्याच्या उदयात इष्टपदार्थाविषयी प्रेम-रति-अनुराग उत्पन्न होतो त्यास रतिकर्म म्हणतात.

३) ज्याच्या उदयात अनिष्टपदार्थाविषयी अरति द्वेष उत्पन्न होतो त्यास अरतिकर्म म्हणतात.

४) ज्याच्या उदयात शोक उत्पन्न होतो त्यास शोककर्म म्हणतात.

५) ज्याच्या उदयात भय उत्पन्न होते त्यास भयकर्म म्हणतात.

६) ज्याच्या उदयात जुगुप्सा ( किळस ) उत्पन्न होते त्यास जुगुप्सा कर्म म्हणतात.

७) ज्याच्या उदयात स्त्रीशी रममाण होण्याची इच्छा होते त्यास पुंवेद नोकषायकर्म म्हणतात.

८) ज्याच्या उदयात पुरुषाची रममाण होण्याची इच्छा होते त्यास स्त्रीवेद नोकषाय कर्म म्हणतात.

९) ज्याच्या उदयात स्त्री व पुरुष दोहोशी रममाण होण्याची इच्छा होते, अथवा ज्याच्या उदयाने स्त्री व पुरुष या उभयलिंगानी रहित असताना देखील तीव्र कामासक्ति असते त्यास नपुंसकवेद कर्म म्हणतात.

कषायाच्या[1] उदयात जे तीव्र क्षोभयुक्त परिणाम होतात त्यानी चारित्र मोहकर्माचा आस्रवबंध होतो.

५) आयुकर्म– ज्या कर्माच्या उदयाने जीवाला चार गतीमध्ये तावत्काल अडकून राहावे लागते त्यास आयुकर्म म्हणतात. त्याचे ४ भेद आहे- १) नरकायु २) तिर्यंचायु ३) मनुष्यायु ४) देवायु.

१) ज्या कर्माच्या उदयात जीव नरकगतीमध्ये अडकून राहतो त्यास नरकायु म्हणतात.

२) ज्या कर्माच्या उदयात जीव तिर्यंचगतीमध्ये अडकून राहतो त्यास तिर्यंचायु म्हणतात.

३) ज्या कर्माच्या उदयात जीव मनुष्यगतीमध्ये अडकून राहतो त्यास मनुष्यायु म्हणतात.

४) ज्या कर्माच्या उदयात जीव देवगतीमध्ये अडकून राहतो त्यास देवायु म्हणतात.

एक वेळ ज्या गतीच्या आयुकर्माचा बंध झाला असेल त्या गतीमध्ये त्याला नियमाने जावे लागते. राजा श्रेणिक भगवान महावीर स्वामीचा पट्टशिष्य. त्याला प्रथम नरकायूचा बंध पडला. त्यानंतर त्याला क्षायिक सम्यक्त्व प्राप्त झाले. त्याला महान् पुण्यशाली तीर्थंकर प्रकृतीचा बंध देखील पडला. तथापि त्याला तो नरकायुचा बंध टाळता आला नाही. त्याला नरकगतीत जावे लागले.

१) नरकायुच्या[2] आस्रवाची कारणे– बहु आरंभ– बहु परिग्रह– तीव्रममत्व परिणाम यानी नरकायुचा आस्रवबंध होतो.

२) तिर्यंचायुच्या[3] आस्रवाची कारणे– मन–वचन–कायेची वक्रता– कपटाचार माया परिणाम यानी तिर्यंच आयुचा आस्रवबंध होतो.

३) मनुष्यायुच्या[4] आस्रवाची कारणे– अल्प आरंभ व अल्प परिग्रह– अल्प ममत्व– संतोष परिणाम यानी मनुष्यायुचा आस्रवबंध होतो.

१. कषायोदयात् तीव्र परिणामः चारित्रमोहस्य ॥ (सूत्र १४) २. 'बह्वारम्भ परिग्रहत्वं नारकस्यायुषः ।' (सूत्र १५)
३. 'माया तैर्यग्योनस्य ॥' ( सूत्र १६ ) ४. 'अल्पारंभ परिग्रहत्वं मानुषस्य ।' ( सूत्र १७ )

८८ अस्थिर नामकर्म– ज्यामुळे शरीरातील धातू-उपधातू स्थिर नसतात. रक्त-पू वगैरे वाहते.

८९ आदेय नामकर्म– ज्यामुळे शरीरावर कांति येते.

९० अनादेय नामकर्म– ज्यामुळे शरीरावर कांति येत नाही.

९१ यशःकीर्ति नामकर्म– ज्यामुळे जीवाची यशःकीर्ति होते.

९२ अयशःकीर्ति नामकर्म– ज्यामुळे अपकीर्ति होते.

९३ तीर्थंकरत्व नामकर्म– ज्यामुळे तीर्थंकरत्व प्राप्त होते. नामकर्मामध्ये ज्या पुण्यप्रकृति आहेत त्याना शुभनामकर्म म्हणतात. ज्या पापप्रकृति आहेत त्याना अशुभ नामकर्म म्हणतात.

मन-वचन-काय[1] यांची वक्रता कुटिल परिणाम व वितंडवाद करणे, यानी अशुभ नामकर्माचा आस्रव होतो.

मन-वचन-कायेची[2] कुटिलता नसणे, सरळ परिणाम व वितंडवाद न करणे, माध्यस्थभाव ठेवणे यानी शुभनामकर्माचा आस्रव होतो.

७) गोत्रकर्म– ज्या कर्माचा उदय असताना जीव उच्च-नीच कुलामध्ये जन्म घेतो त्यास गोत्रकर्म म्हणतात.

परनिंदा[3] आत्मप्रशंसा, दुसऱ्याच्या चांगल्या गुणांचे आच्छादन ( प्रगट न करणे ) दुसऱ्याच्या वाईट दोषाचे उद्भावन ( प्रगट करणे ) या परिणामानी नीचगोत्र कर्माचा आस्रव होते.

परप्रशंसा,[4] आत्मनिंदा, दुसऱ्याच्या चांगल्या गुणांचे उद्भावन ( प्रगट करणे ) वाईट दोषांचे आच्छादन ( प्रगट न करणे ) विनय–नम्रता धारण करणे, गर्व न करणे या परिणामानी उच्चगोत्र कर्माचा आस्रव होतो.

८) अंतराय कर्म– ज्याचा उदय असताना दान-लाभ-भोग-उपभोग-वीर्य यामध्ये विघ्न येते त्यास अंतराय कर्म म्हणतात.

दुसऱ्याच्या[5] कोणत्याही चांगल्या कामात अडथळा करणे या परिणामानी अंतराय कर्माचा आस्रव होतो.

याप्रमाणे कर्माचा हा चित्रपट जीवाच्या मागील–पुढील जीवनाचे शुभ–अशुभ दाखविणारा जीवन–चित्रपट आहे.

याप्रमाणे कर्मसिद्धांताचे ज्ञान करून घेऊन कर्माच्या निमित्ताने होणारे राग-द्वेष-मोह परिणाम न होऊ देण्याचा प्रयत्न करणे. आपल्या शुद्ध वीतराग ज्ञान-दर्शन स्वभावात समताभावात स्थिर राहण्याचा प्रयत्न करणे हे कर्मसिद्धांताच्या ज्ञानाचे सार्थक फल आहे.

एकच मनुष्य कधी श्रीमंत होतो व कधी तोच गरीब होतो हे दृश्यचित्रही कर्मलीला जाणून घेऊन ज्या परिणामानी कर्मबंध होतो अशा राग-द्वेष-मोह परिणामापासून सावध राहणे, राग-द्वेष मोह परिणाम न होऊ देणे हेच ज्ञानी जीवाचे परम कर्तव्य आहे.



१. योग वक्रता विसंवादनं चाशुभस्य नाम्न.। ( त. सूत्र ) २. तद् विपरीतं शुभस्य। ( त. सूत्र )
३. परात्मनिंदा प्रशंसे सदसद्गुणोच्छादनोद्भावने च नीचैर्गोत्रस्य ( त. सूत्र )
४. तद्विपर्ययो नीचैर्वृत्त्यनुत्सेकौ चोत्तरस्य। ( त. सूत्र ) ५. विघ्नकरणं अंतरायस्य। ( त. सूत्र )

# आत्मतत्त्वसिद्धी

भारतीय तत्त्व-चितकांनी जड व चेतन या दोन रूपात जगातील सर्व पदार्थांची विभागणी केली आहे.

दर्शन इत्यादी गुण चेतनात आढळतात व स्पर्श रस गंध वर्ण गुण अचेतनात अर्थात पुद्गलात दिसून येतात. जगातील संपूर्ण पदार्थ जैनदर्शनात नव पदार्थांच्या वाचनेत अन्तर्भूत होतात. त्यातही दोन पदार्थांना विशेष प्राधान्य दिले आहे. भगवतीसूत्र व तत्त्वार्थसूत्र, प्रज्ञापना, उत्तराध्ययन, समयसार इत्यादी ग्रंथात या नव पदार्थांची विशेषरूपाने चर्चा केली आहे. त्याच्या आधारे आत्मतत्त्वाचे तौलनिक परीक्षण करण्याचा येथे प्रयत्न केला आहे.

संपूर्ण जीवसृष्टीत फक्त मानवप्राणी हा विचारशील आहे. त्याने जीवनाला उपयोगी अशी तात्विक विचारधारा निर्माण केली, त्यालाच 'दर्शन' असे म्हटले आहे. दार्शनिक व वैज्ञानिक आपल्या मनन व चिंतनाद्वारे दर्शनातील तथ्य हुडकण्याचा प्रयत्न करीत आहे. व आपली जिज्ञासा जागृत ठेवीत आहेत. हेच खरे सत्य शोधक आहेत. दार्शनिकाची दृष्टी कल्याणमयी असते ती अमूर्ततत्वाच्या चिंतनात गढून गेलेली असते. पण वैज्ञानिक फक्त जड वस्तु आपल्या दृष्टीसमोर ठेवून सत्याचा शोध घेतो. तो आत्मादी पदार्थांचे चिंतन करतो. जोपर्यंत दार्शनिक व वैज्ञानिक यांच्या दृष्टीकोनात समन्वय घडत नाही तोपर्यंत सत्य हे अंधारात राहते. सत्याशिवाय आत्मदर्शन घडणे शक्य नाही. सत्य हेच जगातील सारभूत तत्व आहे. जो साधक सत्य दर्शनाने नव पदार्थांची वास्तविक माहिती करून घेत नाही, त्याचा संशय दूर होणार नाही. जेथे संशय आहे तेथे श्रद्धा उत्पन्न होणे शक्य नाही. श्रद्धेशिवाय जीवन सुखमय होऊ शकत नाही. उत्तराध्ययन सूत्रात पण या गोष्टीचे समर्थन केले आहे.[1] सत्य श्रद्धेशिवाय चारित्र सम्यक्चारित्र नव्हे, ज्ञान सम्यग्ज्ञान नव्हे. ज्ञान व चारित्र या गुणाशिवाय कर्मापासून सुटका नाही. कर्मापासून सुटका झाल्याशिवाय आत्मज्ञान होत नाही.

जैनदर्शनाप्रमाणे संसार हा एक तत्वमय पदार्थ होय. त्यात संसाराला अस्तित्व आहे, त्यास सत्ता आहे. त्याच्या सर्व रचनेत दोन पदार्थांना प्रमुख स्थान आहे. एक जीव व दुसरा अजीव यांना नवपदार्थात प्रमुख स्थान आहे. दुसरे पदार्थ म्हणजे या दोहोंचा संयोग व वियोगरूप स्थित्यंतरे होतात. आस्रव, बंध, पुण्य व पाप ही चार तत्वे वरील दोन पदार्थांच्या संयोगाने बनली आहेत. संवर, निर्जरा व मोक्ष ही तत्वे वियोग पद्धतीने बनली आहेत. संवर म्हणजे आस्रवरूपाने येणाऱ्या कर्म प्रवाहास रोकणे, आत्म्याचा कर्माशी संयोग येऊ न देणे, आत्म्याशी पूर्व संयुक्त कार्माण वर्गणेच्या पुद्गलाना दूर सारणे ही निर्जरा होय. आत्मसंबंधित कर्मवर्गणारूप पुद्गल आवरणाला पूर्ण रूपाने दूर करणे हा मोक्ष होय. जेथे आस्रव आहे तेथे बंध हा आहेच. जीवाच्या शुभाशुभ परिणामांनी आस्रव व बंध होतो. हे दोन्ही संसाराला कारण आहेत. संवर व निर्जरा मुक्तीला कारण आहेत. जोपर्यंत रागद्वेष मोहरूप भाव परिणामांनी परिणत होत नाही तोपर्यंत आत्म्याकडे कर्मवर्गणा येत नाही. कर्म दोन प्रकारचे आहे- भावकर्म व द्रव्यकर्म. भावकर्माशिवाय द्रव्यकर्माचा आस्रव होत नाही. ज्ञानावरणादि कर्माला द्रव्यकर्म म्हटले आहे. जीवाचे इष्टानिष्ट परिणाम राग-द्वेष मोह-रूप भावकर्म होय. या ठिकाणी हे लक्षात ठेवले पाहिजे की कर्म हे स्वतः जड आहे. ते आपण होऊन आत्म्याच्या वाटेला जात नाही. उलट आत्माच आपल्या योग व कषायाने कर्माला आपल्याकडे आकृष्ट करतो व दु:खी होतो. म्हणूनच जो आत्मस्वरूपाला खऱ्या अर्थाने जाणतो तो सर्व कांही जाणतो[2]. म्हणून आत्मा हाच सर्व दर्शनाचा पाया आहे. आत्मा असेल तरच दार्शनिक विचार आहेत आणि दार्शनिक विचारमंथनातूनच आत्मारूपी लोणी प्राप्त होते. पराविद्या, ब्रह्मविद्या व मोक्षविद्या यांच्या बरोबरच आत्मविद्येचा उल्लेख केलेला आहे. आत्मा हा इतर सर्व पदार्थांहून वेगळा असा अविनाशी पदार्थ आहे. तो स्वप्रभावी आहे. यासाठी वेगळ्या कशाची गरज नाही. दिव्याचे अस्तित्व स्वयं असे आहे. ते समजण्यासाठी वेगळ्या

१. उत्तराध्ययन – २८।२।३५ २. बृहदारण्यक उप. २।४।६

दिव्याची गरज नाही. आत्मा मरत नाही व उत्पन्नही होत नाही. तो स्वत: भावरूपाने किंवा अभावरूपाने कोठून बाहेरून आलेला नाही. नित्य व शाश्वत आत्म्यामध्ये कर्तृत्व व भोक्तृत्व या दोन्ही तऱ्हेच्या शक्ती आहेत.[1] उपनिषदकारानी देखील आत्माला सत् चित् आनंदरूप मानले आहे. पण दु:खाच्या अनुभूतीला ते मिथ्या म्हणतात. अनादिकालापासून आत्म्याचे शुद्ध स्वरूप आनंदादी कर्मसंयोगाने विकृत झाले आहे. आत्मा हा ब्रम्हाणु स्वरूपाचा मानला नसून त्याला एक स्वतंत्र द्रव्यरूपाने मानले आहे. सहा द्रव्ये, सात तत्वे अथवा नवपदार्थ आत्मस्वरूप बनवू बिघडवू शकत नाहीत. उलट आत्मा हाच आपल्या परिणामाने त्यांना जन्म देतो, म्हणून सुख-दु:खाचे उत्तरदायित्व नवपदार्थावर नसून त्याला जबाबदार आत्मा स्वत:च आहे.

आत्मस्वरूप– ज्ञान व दर्शनरूप उपयोग यांना आगम साहित्यात त्याचप्रमाणे आगमोत्तर साहित्यात आत्म्याचे असाधारण गुण मानले आहेत. आत्म्याशिवाय दुसऱ्या वस्तूत हे गुण आढळत नाहीत. उपयोगामुळेच आत्मा स्वस्वरूप व पररूपास जाणतो. जेथे उपयोग आहे. तेथे जीवत्व आहे. जेथे उपयोग नाही, तेथे जीवत्व नाही. अर्थात् आत्मा हा उपयोगमय, ज्ञानमय आहे. जीव व उपयोग ( ज्ञान व दर्शन ) यांचा संबंध अविनाभावी आहे म्हणून 'ज्ञानं आत्मा' असे म्हटले आहे. जो आत्मा आहे तोच विज्ञाता आहे. जो विज्ञाता आहे तोच आत्मा आहे. ज्ञानाहून वेगळा आत्मा नाही व आत्म्याहून वेगळे ज्ञान नाही.

'द्रव्यसंग्रह' या ग्रंथात आत्म्याचे वर्णन नऊ प्रकारानी केले आहे– १) सामान्य जीव २) उपयोगमय ३) अमूर्तिक ४) कर्ता ५) स्वदेहपरिमाण ६) भोक्ता ७) संसारी ८) सिद्ध ९) उर्ध्वगामी. आत्म्याच्या ठिकाणी दोन प्रकारचे गुण आढळतात. स्वाभाविक व वैभाविक. उदा. पाण्याचा थंडपणा, गरमपणा. याप्रमाणे आत्म्याचे स्वरूप समजावून दिले आहे. तैत्तरीयोपनिषदात[2] आत्म्याचे स्वरूप अन्नमय, रसमय सांगितले आहे.

पायसी राजाने शरीराचे तुकडे तुकडे करून क्रमाने हाडे, मांस इत्यादीकात आत्मस्वरूप जाणण्याचा प्रयत्न केला आहे. काही ठिकाणी मन, इन्द्रियविज्ञानाला आत्मा मानले आहे. केनोपनिषदात[3] इन्द्रिय, मन व शरीर याहून आत्म्याचे स्वरूप भिन्न असल्याची मान्यता आहे. भगवान गौतमबुद्धाने 'आत्मा' अदृश्य असल्यामुळे त्याविषयी काहीही न सांगता त्याविषयी मौन स्वीकारले आहे. संयुक्तनिकायात[4] आत्मा हा शोधण्याचा विषय नाही असे म्हटले आहे.

या सर्व वर्णनावरून असे दिसून येते की सर्व भारतीय दर्शनात कोणत्या तरी रूपाने आत्म्याला चैतन्यस्वरूपी मानले आहे. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक मीमांसक व जैनदर्शन आत्म्याला अनादि परिणामी नित्य मानतात.

अन्य दर्शनाप्रमाणे आत्मा चार्वाक मनात केवळ प्रत्यक्ष हेच प्रमाण मानतात, स्वर्ग-नरक इत्यादिकांचा, तसेच शाश्वत आत्म्याचा निषेध केला आहे. अग्नीचा उष्णपणा हा स्वाभाविक गुण आहे. अग्नीच्या निमित्ताने पाणी उष्ण होते. तो पाण्याचा वैभाविक गुण आहे. उष्णतेचे निमित्त दूर झाले म्हणजे पाणी पुन्हा थंड होते. ज्ञान हा आत्म्याचा मूळ स्वभाव आहे. ज्ञानावरणादिक कर्मामुळे आत्म्यात विभाव भाव उत्पन्न होतात पण ज्ञान गुणाचा सर्वथा नाश होत नाही. मति, श्रुत, अवधि व मनपर्ययज्ञान, क्षयोपशमिक आहेत. या अवस्थेत कर्माचे अस्तित्व असते. केवलज्ञान क्षायिक आहे.

जीव हा कधीच अजीव होऊ शकत नाही.[5] तो ध्रुव, सत्य, शाश्वत, नियत, आश्रय तीनही काळात ज्ञानरूप आहे. हीच गोष्ट गीतेत[6] देखील सांगितली आहे. स्वरूपाच्या दृष्टीने आत्मा एक आहे. हे झाले आत्मस्वरूपाच्या दृष्टीने व्यवहारदृष्टीने आत्म्याचे पांच भेद केले आहेत.–

१. कठोपनिषत्– १।२।१८ २. तैत्तरियोपनिषद– २-१, २ ३. केनोपनिषद– १।४।६ ४. संयुक्तनिकाय– १२, ७०, ३२, ३५– दीघनि महानिदान सूत्र– १५ ५. स्थानांग– १०।१।९३१ ६. १. गीता– २।१२, २०, २३, २४

१) द्रव्यात्मा, २) गुणपर्यायात्मा, ३) योगात्मा, ४) उपयोगात्मा, ५) ज्ञानात्मा

आत्म्याच्या संदर्भात विभिन्न दृष्टीकोनातून दुसऱ्या दार्शनिकानी विचार केला आहे. वेद, उपनिषद आदी ग्रंथात अनेक प्रकारची चर्चा दिसून येते त्यात आत्म्याच्या आतरीक स्वरूपाकडे लक्ष देण्याचा उद्देश आहे. छांदोग्यापद्यनिषदात[1] कथेच्या आधारे त्याच्या मते पंचमहाभूतापासून शरीरात चैतन्य उत्पन्न होते[2] त्या विशिष्ट चैतन्यालाच आत्मा म्हटले आहे. आपणाला ज्ञान सुखादिकांचा अनुभव या चैतन्यशरीराने होतो. शरीराशिवाय आत्मा नावाची दुसरी वस्तु नाही. पंचमहाभूतांचा नाश झाल्यावर तन्निर्मित चैतन्याचा नाश होतो.[3] चैतन्य विशिष्ट शरीरच ज्ञान-उपयोग व कर्ता-भोक्ता त्या व्यतिरिक्त आत्मा ही वस्तूच नाही.

बौद्धमतामध्ये आत्मज्ञानाने मुक्ती होते असे मानले नाही. त्याच्या मनात आत्म्याला विज्ञानाचा बोध मानला नसून विज्ञान प्रवाहाचा बोध होतो असे मानले आहे. आत्मा कसा आहे, कोठून येतो? मूर्त आहे की अमूर्त? तो कुठे जातो व मी कोण आहे? अशा प्रश्नांच्या उत्तराबाबत त्यानी मौन स्वीकारले आहे. असे असले तरी गौतमानंतर आत्म्यावर विचार केलेला दिसून येतो. गौतम बुद्धाने अनात्मवादाचा उपदेश दिला. याचा अर्थ त्यांनी आत्म्याचा सर्वथा निषेध केला असा अर्थ होत नाही. उपनिषदातील सांगितलेले आत्मतत्व त्यानी मानले नाही. एक स्वतंत्र द्रव्यरूपाने त्यानी आत्मद्रव्याचा स्वीकार केला नाही. बुद्धाने पुद्गलाला ( पुद्गलास बुद्ध आत्मा म्हणतात ) चैतन्य व चैतन्येतर म्हणजे विज्ञान मानले आहे. विज्ञानाप्रमाणेच भूत देखील त्यांच्या मते मूळ तत्व आहे. केवळ विज्ञान संततीचा स्वीकार करताना ते म्हणतात की ज्याप्रमाणे नदीचा प्रवाह सतत वाहत असतो, त्यातील विशिष्ट स्थानाचे पाणी नेहमी बदलत असते, त्यात स्नान करता येत नाही. त्यातील जलबिंदुप्रमाणे प्रत्येक देश व काल यात विज्ञानाचे क्षण वेगळेच असतात. भगवान बुद्धाचा मार्ग हा मध्यम मार्ग आहे[4]. त्याच्या मताप्रमाणे आत्मा सनातन व कूटस्थ नाही, शरीरातील रसावर निर्भर नाही. तसाच तो शरीराहून सर्वथा वेगळा पण नाही. स्कंधभूत व मन याच्या योगाने उत्पन्न झालेली जी एक विशिष्ट शक्ती तिलाच आत्मा म्हटले आहे. गौतमाने भौतिकवादही स्वीकारला नाही व शाश्वतवादपण मानला नाही. माध्यमिकांप्रमाणे व्यवहारदशेत जीवात्मा प्रतिभासित होतो पण त्याचा मूळ स्वभाव शून्यच आहे.[5] दिव्याची ज्योत खाली वर येते शेवटी विलीन होते, प्रत्येक क्षणाला त्यामध्ये नाविन्य असते. त्याप्रमाणे आत्मा क्षणिक व ज्ञानमय या विषयाशी पाश्चात्य दार्शनिक हेराक्लिटस् म्हणतो की, There is change only and you can never batbe twice.

न्याय वैशेषिकाच्या मताप्रमाणे प्राणवान् जीवन, निमिषोन्मेष, मनोगती, इन्द्रिय-इत्यादि या आत्म्याच्या खुणा आहेत.[6] इन्द्रिय व शरीर यांच्यावर आत्म्याचे नियंत्रण असते. वैशेषिक लोक सुखदु:खापेक्षा आत्म्याची एकता आणि प्रति शरीर आत्म्याला मानतात. त्यांच्या मते ज्ञान, सुख इत्यादि गुण असून ते जड वस्तूत नसतात.

सांख्यदर्शनात द्विविध तत्त्व मानले असून पुरुष ( आत्मा ) तत्त्व ज्ञाता नाही. ते चैतन्यस्वरूप आहे. त्यांच्या मते आत्मे अनेक आहेत. अमूर्त, चेतन, भोक्ता, नित्य, सर्वव्यापी, क्रियारहित, निर्गुण व सूक्ष्म हे आत्म्याचे गुण मानले आहेत.[7] ते आत्म्याला कर्ता व ज्ञाता मानत नाहीत, भोक्ता मानतात. त्यांच्या मते प्रकृति कर्ता आहे. प्रकृति व पुरुष याचा संयोगच ससाराला कारण आहे. तसेच प्रकृति व आत्मा यांचे वेगळेपण म्हणजे मोक्ष होय.

मीमांसकांच्या मते आत्मा, कर्ता, भोक्ता व्यापक असून प्रत्येक शरीरात वेगवेगळा आहे. ज्ञान सुखादी गुणांनी तो युक्त असतो. समवाय संबंधामुळे आत्म्याशी गुणाचा संबंध मानला आहे. या विषयांच्या अनुषंगाने भट्ट मीमांसक आत्म्याला अंशरूपाने, चेतनस्वरूप अंशरूपाने जडरूप मानतात त्यांच्या दृष्टीने आत्मा हा बोधाबोधरूप आहे.[8] प्रभाकरांच्या मते शरीर आणि विषय याच्या संयोगाने आत्म्यामध्ये चैतन्य उत्पन्न होते.

१. छान्दो- ८।८ २. सर्वदर्शनसग्रह- पृष्ठ २ व ३ ३ बृहदारण्यकोप- २।४।१२ विज्ञानघन एवैतेभ्यो
४. मिलिंदप्रश्न- २।३३ ५ सर्वदर्शनसग्रह पृ. ३६ ६. वैशेषिकसूत्र- ३।२।४
७. स्याद्वादमञ्जरी- पृ. १८६. सांख्यकारिका- ६२ ८. पचदशी- चित्तदीपप्रकरण- ६।९५

## जैन न्याय– उदय व विकास–

जैन साहित्यामध्ये विभाजन चार अनुयोगामध्ये केले आहे १)प्रथमानुयोगचरित्र, कथा. २)चरणानुयोग– श्रावक व मुनींचा आचारधर्म. ३) करणानुयोग– भूगोल, गणित व ४) द्रव्यानुयोग– जीवाजीवादि तत्ववर्णन. द्रव्यानुयोगामध्ये सर्वसाधारणपणे जैनदार्शनिक साहित्याचा अंतर्भाव होतो. दर्शनशास्त्रामध्ये पण ज्यांना कारण देता येत नाही व केवळ आगमाप्रमाणे वर्णन असते अशा वेळी त्यास अहेतुवादशास्त्र म्हणतात.[१] आणि ज्यात अनुमान किंवा तर्काच्या आश्रयानें वस्तुतत्वांची साधक बाधक प्रमाणाने चर्चा केलेली असते त्यास हेतुवाद शास्त्र म्हणावे. जैन न्यायशास्त्राची तर्क अथवा अनुमान आधारशिला मानली जाते. ही गोष्ट अनेक तार्किक आचार्यांनी आपल्या ग्रंथात स्पष्ट केली आहे.

## जैन न्यायाची पार्श्वभूमी–

जैन पौराणिक इतिहासात प्रथम तीर्थंकर आदिनाथाच्या वेळी दार्शनिक संप्रदाय निर्माण झाले. वृषभनाथाबरोबर दीक्षित झालेल्या मुनीमध्ये तपोभ्रष्ट झालेल्या मुनींनी अनेक दर्शनात अशा मिथ्यामतांची संख्या ३६३ म्हणून सांगितली आहे. मुनीच्या आक्षेपाना उत्तर देण्यासाठी कांही वाद कुशल साधूनी प्रयत्न केले आहेत. त्यांची संख्या प्रत्येक तीर्थंकराच्या परिवारामध्ये दिली आहे.

ऐतिहासिक दृष्टीनें भगवान् पार्श्वनाथांच्या वेळेपासून आम्हाला न्यायदर्शनाची निश्चित अशी माहिती प्राप्त होते. जैन आगम ग्रंथात भगवान पार्श्वनाथ व भगवान महावीर यांच्या मतामध्ये सादृश्य व भिन्नतेसंबंधी उल्लेख सापडतात. त्यामुळे भगवान पार्श्वनाथाचे ऐतिहासिक अस्तित्व सिद्ध होते. भगवान पार्श्वनाथाचे निर्वाण महावीरांच्या निर्वाणाच्या २५० वर्षापूर्वी झाले होते. भगवान पार्श्वनाथाने आपल्या जीवनात ७० वर्षेपर्यंत उपदेश केला.[२] ते काशीच्या अश्वसेन राजाचे पुत्र होते. म्हणून त्याच्या ऐतिहासिक उल्लेख प्राप्त होतो. भगवतीसूत्रामध्ये जगाच्या आकारासंबंधी भगवान पार्श्वनाथ व महावीर यांचे विचारसादृश्य लक्षात येते. तप व संयमादि याविषयी त्यांच्यात मतैक्य होते.[३] परंतु भगवान् पार्श्वनाथापासून सृष्टि, आचार, तप आदि विषयावर चर्चा होत असे. साधक बाधक मते मांडली जात असत. पार्श्वनाथ परंपरेचे आचार्य केशी कुमार श्रमण महावीरांचे समकालीन होते. त्यांच्या प्रदेशी राजाशी झालेल्या संवादातून राजप्रश्नीय सूत्र नांवाचे उपांग निर्माण झाले. त्यात जीवाच्या मृत्यूनंतरच्या अस्तित्वासंबंधी दृष्टांत व युक्तिवाद लढविला आहे.

सामान्यपणे भगवान् पार्श्वनाथ व भगवान् महावीर यांच्यामधील काळ हा दार्शनिक साहित्य व न्याय दर्शनाच्या दृष्टीने महत्वाचा आहे. या देशातील वैदिक संस्कृती व पूर्व भारतातील त्यागप्रधान श्रमण संस्कृती यात निरंतर संघर्ष असे. आत्मा, परमात्मा, ब्रह्म, आदि रहस्यमय विचाराचे जनकत्व ज्यांचेकडे आहे ती उपनिषदे याच वेळी निर्माण झाली. वैचारिक व आचार धर्मासंबधी संघर्ष समाजात निर्माण झाले व त्यातून सत्य–असत्य, सत्–असत्, एक–अनेक, नित्य–अनित्य असे द्वंद्व निर्माण झाले. त्यातून न्याय किंवा तर्कवादाचा जन्म झाला.

महावीरांचा काळ म्हणजे इ. स. पूर्व ६ वे शतक. पार्श्वनाथानंतर २५० वर्षानी महावीरांच्या काळी कांही दार्शनिक मताचे विवरण बौद्ध व जैन साहित्यात केलेले आढळते. जगाचे मूलतत्व व त्याचा साक्षात्कार यासबधी विवरण उपनिषदात आहे. पुण्य व पाप प्रक्रिया न मानणारे काही पूरणकश्यपासारखे तर काही नियतिवादी होते, काही उच्छेदवादी होते म्हणजे ते फक्त चार महाभूतापासूनच जीवोत्पत्ति मानणारे होते. विक्षेपवादी, अन्योन्यवादी, अशी अनेक मत–मतांतरे उत्पन्न झाली व त्यातून वाचण्यासाठी बुद्धाने मध्यम मार्गाचे प्रतिपादन केले. ह्या द्वंद्वाना बुद्धाने 'अव्याकरणीय' म्हणून टाळले.

१. दुविहो धम्मावाओ अहेउवाओ य हेउवाओ य। सन्मतिसूत्र ३-४३ २. पार्श्वनाथ का चातुर्याम धर्म– धर्मानंद कोसंबी
३. भगवती सूत्र–२–५–१०९ तुंगियार नयरीए बहिया पुफ वतीए चेइए... चेव णं आयमावक्तव्वयाए




परंतु भगवान् महावीरानी या प्रश्नाचे निश्चित स्वरूप प्रतिपादन करून जैन न्यायाची भूमिका दृढ केली. प्रत्येक वस्तूचे स्वरूपासंबंधी सयुक्तिक विचारधारा निश्चित केली. द्रव्य, क्षेत्र, काल व भाव यास अनुसरून महावीरांचे प्रतिपादन असे. महावीरांनी ३० वर्षामध्ये दीक्षा धारण केली व १२ वर्षाच्या कठोर तपानंतर त्यांना केवलज्ञान लाभले. त्यांचे प्रधानशिष्य गौतम गणधर हे होते. त्यांना जीवाच्या अस्तित्वासंबंधी संदेह होता. गौतम गणधर समवशरणात जाताच त्याना त्यांचा संदेह दूर झाला. त्यांनी भगवान् महावीरांच्या उपदेशातून १२ अंगाचे संकलन केले. या १२ अंगामध्ये दुसरा सूत्रकृत, ५ वा व्याख्याप्रज्ञप्ति, १० वा प्रश्न–व्याकरण व १२ वा दृष्टिवाद हे ग्रंथ विशेषरूपाने न्याय व तर्काचा आश्रय घेणारे आहेत. सूत्रकृत अंगामध्ये ज्ञान–विनयादि विषयासह स्वसमय व परसमय सिद्धांताचे वर्णन आहे.[१] प्रश्न व्याकरणामध्ये आक्षेपिणी, विक्षेपिणी, संवेदिनी व निर्वेदिनी या चार प्रकारच्या कथेचे वर्णन आहे. दृष्टिवादामध्ये ३६३ मतवाद्यांचे निराकरण झाले आहे. यात ५ उपभेद आहेत. सूत्र, परिकर्म, प्रथमानुयोग, पूर्वगत व चूलिका. यात नैय्यायिक, नियतिवाद, विज्ञानवाद, शब्दवाद, प्रधानवाद, द्रव्यवाद, पुरुषवाद, आदीचे वर्णन केले आहे.

जैन न्याय साहित्याच्या उद्‌भवाची आगमिक परंपरा लक्षात घेतल्यानंतर त्याचा कालक्रमाने कसा विकास झाला व प्रचलित साहित्यात जैन न्यायाची मूल्ये कुठे दिसतात हे पाहणे अगत्याचे आहे. वास्तविक पाहता सूत्रकृतांग, स्थानांग, व्याख्याप्रज्ञप्ति, उपासक दशांग, प्रश्नव्याकरण, अंगबाह्य ह्यात सैद्धांतिक वादविवाद आले आहेत. पण या नंतरच्या साहित्यात भद्रबाहूंच्या नियुक्तीना आद्यस्थान आहे. यांनी ११ अंगावर ११ नियुक्ति लिहिल्या व शब्दोत्पत्ती, पूर्वापार संबंध व विषय विवेचन ह्यावर विशेष प्रकाश टाकला. नियुक्तीमध्ये तर्क व चर्चाचे अनेक प्रसंग आलेले आहेत. दशवैकालिक नियुक्तीमध्ये तार्किक विचार बरेच आले आहेत. जीवाचे अस्तित्व, कर्तृत्व, नित्यत्व, भू–पाप आदि विषयांची चर्चा आलेली आहे. न्यायदर्शनामध्ये येणारे प्रतिज्ञा, हेतु, दृष्टांत, उपनय व निगमन या पाच अवयवांना नियुक्ति गाथेत प्रतिज्ञा, प्रतिज्ञा विभक्ति, हेतु, हेतुविभक्ति, विपक्ष, विपक्षप्रतिवेध, दृष्टांत, आशंका, आशंका प्रतिवेध, व निगमन असे १० अवयव सांगितले आहेत.

आधुनिक प्राकृत साहित्याचे जनक कुंदकुंद स्वामीनी जी पंचास्तिकाय, प्रवचनसार, समयप्राभृत, अष्टप्राभृत, नियमसार, द्वादशानुप्रेक्षा व 'दशभक्ती' या ग्रंथाची रचना केली त्यांचे हे ग्रंथ आज प्रकाशित झाले आहेत. त्यात त्यांनी आगमाला अनुसरून अध्यात्मदर्शी साहित्य निर्माण केले. त्यांच्या ग्रंथामध्ये प्रसंगानुरूप आत्मसिद्धीसाठी तर्क प्रस्तुत केले आहेत. कुंदकुंदांच्या ग्रथामध्ये स्वतंत्ररूपाने प्रमाण चर्चा नसली तरी ज्ञानासंबंधी विवेचन करताना त्यांनी दार्शनिक प्रमाण दिले आहे. कुंदकुंद आचार्यानी न्यायवादाचा प्रारंभ ज्ञानाच्या स्वप्रकाशक व परप्रकाशक या वादापासून केला. त्यांना ज्ञान हे स्वपरप्रकाशक आहे हे अभिप्रेत आहे. कुंदकुंदानंतर झालेल्या आचार्यानीही ही मान्यता स्वीकारली. कुंदकुंद आचार्यानी प्रवचनसारामध्ये प्रत्यक्ष व परोक्ष प्रमाणांची व्याख्या देऊन ती युक्तीने सिद्ध केली आहे.[२] त्यात मूळ अंतर हे की अन्य दार्शनिक इंद्रियजन्य ज्ञानाला प्रत्यक्ष मानतात. पण इंद्रिय हे जड असल्यामुळे परद्रव्य आहे व यामुळे वस्तूचे प्रत्यक्ष ज्ञान होणे युक्तियुक्त नाही. प्रवचनसारकर्ते कुंदकुंदाचार्यानी इंद्रियजन्य ज्ञानाला परोक्ष म्हटले आहे. जे ज्ञान परनिमित्तद्वारा होते ते परोक्ष. हा अर्थ त्याना अभिप्रेत आहे[३]. कुंदकुंदानी व्यवहार दृष्टीने सर्वज्ञाची व्याख्या केली आहे. परंतु निश्चय दृष्टीने केलेली व्याख्या भिन्न आहे[४]. समय प्राभृतामध्ये पण आत्म्याला संपूर्ण अकर्ता मानणाऱ्या सांख्याचे खण्डन केले आहे. त्याबरोबरच सांख्याना परद्रव्याचा कर्ता मानणाऱ्या वैष्णव मताचा निषेध केला आहे. जर आत्मा परद्रव्याचा कर्ता आहे तर तो परद्रव्यमय आहे असा साधारण नियम मांडला आहे[५] पंचास्तिकाय तर स्याद्वाद व सप्तभंगीचे कथन करणारा आहे.

१. समवायांग सू १३७ प्रमाणे सात्व ह्या अगात ३६३ मतावींचे निराकरण केले आहे.

२. प्रवचनसार गाथा– १–४०, ४१, ५४–५८ ३. प्रवचनसार– १-५७, ५८ ४. नियमसार-गाथा– १५८

५. समय प्राभृत-गा–९९




वेदान्तात मात्र फक्त ब्रह्मच स्वीकारले आहे. त्यालाच सत्य म्हटले आहे. वेगळ्या प्रकाराने त्यालाच आत्मा म्हटले आहे. तो ज्ञाता, ज्ञेय, विषय, विषयी, ज्ञान, मती या सर्वांच्या पलीकडे आहे. तो सापेक्ष नसून निरपेक्ष व निर्गुण आहे. या रीतीने प्रत्येक व्यक्ती ब्रह्ममय आहे आणि ब्रह्म व्यक्तीरूप आहे. आत्माच आत्म्याला जाणतो. वास्तविक आत्मा एक आहे, विभु आहे. पण देहादिक उपाधिमुळे अनेक प्रकारचा भासतो. या दृष्टीने आत्मा कूटस्थ नित्य आहे. रामानुजाचार्यांनी आत्म्याचे अनेकत्व मानले असून दुसरीकडे त्याला आनंदरूप तसेच नित्य मानले आहे.

उपनिषद् आणि गीतेत आत्म्याचे स्वरूप व वर्णन सारखेच आहे. दोहोत आत्मा नित्य आहे. तो कधीच मरत नाही. शरीराहून विलक्षण विभु व अपरिणामी आहे.[1] सार्वभौम, अन्तर्यामी व इंद्रियांच्या अनुभवापलिकडे आहे. अनुभववादी पाश्चात्य विद्वान बर्कले म्हणतो की, निद्रा, मूर्च्छा व स्वप्न या अवस्थेत आत्मा असत नाही. कंठोपनिषदात देखील आत्म्यासंबंधी अशाच प्रकारचे विषय आढळतात. शरीर रथ आहे, बुद्धी सारथी आहे, मन लगाम आहे, विविध वासनेच्या मागे धाव घेणारी इन्द्रिये हे घोडे आहेत. या सर्वांचा स्वामी आत्मा आहे.[2]

गीतेत आत्मस्वभावाचे[3] जे वर्णन आढळते त्यावरून असे दिसून येते की आत्मा आहे तो जळत नाही, मरत नाही, नष्ट होत नाही. ज्याप्रमाणे नवीन वस्त्र धारण करताना आनंद होतो, जुनी वस्त्रे काढून फेकताना वाईट वाटत नाही, त्याचप्रमाणे जुनी जीर्ण शरीरे सोडून नवी शरीरे धारण करणे आहे. अविनाशी आत्मा आपल्या परिणामाप्रमाणे कर्माप्रमाणे शरीर धारण करतो, त्याच्या सहाय्याने कर्मफळ भोगतो. जोपर्यंत पूर्व संचित कर्मांचा नाश होत नाही तोपर्यंत जन्म मरणाच्या फेऱ्यात फिरत रहावे लागते. वरील सर्व विवेचनावरून असे दिसून येते की सर्व दर्शनातील वर्णनशैलीत फरक असला तरी जड व चेतन अथवा ब्रह्म व माया यांचा स्वीकार केला आहे. आत्म्याच्या अस्तित्वाविषयी संदेह ठेवला नाही.

सारांश– आत्मा ज्ञानमय, अविनाशी, स्वभावतः उर्ध्वगमन करणारा. जडतत्त्वाहून वेगळा आहे. वैज्ञानिकांनी देखील जड, चेतन यांच्या स्वरूपाविषयी विचार केला आहे. वस्तुतः चेतनत्व आत्म्याहून वेगळे नाही. 'मी' मधील मी चे अस्तित्व टाळता येत नाही.



१. कंठोपनिषद्– १-२।१५।१८, इशा., गीता– २।२५ २. कठोपनिषद्– आत्मान रथिन विद्धि...। ३. गीता– २।२२

# जैन न्याय – एक समीक्षणात्मक अध्ययन

## पृष्ठभूमि–

मानवी अंतःकरणाला बऱ्याच वेळी काही गोष्टी विचारान्ती मान्य होत नाहीत. कधी वस्तुतत्वाच्या स्वरूपाविषयी विसंवाद निर्माण होतो. आपल्या विचाराच्या पूर्तीसाठी तो साधने हुडकतो. यथार्थ किंवा अयथार्थ बाजूच्या परीक्षणासाठी तर्काचे निकष वापरतो व अंततः विशिष्ट अशा निर्णयाला येतो. पण प्रत्येकाचा निर्णयदेखील वादाचा विषय होऊ शकतो. चार्वाक नावाच्या दर्शनाने सुदीर्घ विचारानंतर 'जीव' नावाचे स्वतंत्र अनादि अनंत असे तत्व कोणत्याही तर्कावर सिद्ध होत नाही, असे मानले आहे. पण जैन तत्ववाद्यास हे मान्य नाही. शरीर व आत्मा यातील संबंध काय आहेत हे सप्रमाण सिद्ध केले पाहिजे. केवळ 'आम्ही मानतो' म्हणून तर्क किंवा न्याय शास्त्रात अशा विचारास स्थान नाही. याचा अर्थ असा की, जसे इतिहास, भूगोलादि ज्ञानोत्पत्तीचे साधन देणारे शास्त्र आहे. तत्वतः 'ज्ञानाचा समीचीनपणा' यथार्थता हवी. तदनुषंगाने सुसंवादी विचारांची जोपासना करणारे जे शास्त्र आहे त्यास 'न्यायशास्त्र' तर्कशास्त्र; हेतुविद्या किंवा युक्तिशास्त्र पण म्हटलेले आहे. न्यायशास्त्राला प्राचीन काळी 'आन्वीक्षिकी' म्हणत. कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रामध्ये यास आन्वीक्षिकी त्रयी म्हटले आहे[१] व तिला सर्व विद्यांचा आधार मानले आहे. आन्वीक्षिकीला आत्मविद्या पण म्हटले आहे.[२] अन्य अन्य विचारकामध्ये न्यायशास्त्राची व्याप्ती मोठी आहे.

परंतु 'न्याय' शब्दाची उत्पत्ति 'नी' धातूपासून मानून तर्कज्ञानी त्याचा अर्थ ज्याने वस्तूचे निश्चित व अविरोधरूप ज्ञान होईल त्यास 'न्याय' म्हटले आहे. न्याय कुसुमांजलीमध्ये 'नीयते ज्ञायते विविक्षातार्थोऽनेनेति न्यायः' असे म्हटले आहे[३] व याचेच निश्चित स्वरूप न्यायविनिश्चयालंकारानी मानले आहे. 'किं निश्चितं च निर्बाधं च वस्तुतत्वमीयतेऽनेनेति न्यायः[४]' वस्तूचे यथार्थ ज्ञान करून देण्याचे साधनास 'प्रमाण' म्हणतात. म्हणून जैन न्यायशास्त्र प्रामुख्याने प्रमाणशास्त्राची चर्चा करते. जगातील वस्तु तत्वाचे ज्ञान प्रत्यक्ष व परोक्ष प्रमाणांनी होते म्हणून जैन न्यायाचार्यांनी प्रथमतः जैन धर्मातील तत्वाच्या प्रस्थापनेसाठी हेतुवाद व युक्तीवादाचा स्वीकार केला. निश्चित व अविरोधी असे कारण सांगितल्याशिवाय वस्तुतत्वाची प्रतिष्ठाच होणे कठीण आहे. म्हणून तर्कशास्त्राची ज्ञान मीमांसेसाठी आवश्यकता भासली. तर्कशास्त्र (Logic) एक स्वतंत्र ज्ञान शाखा म्हणून प्रचलित झाली. सांख्यानी तर न्यायाला एक स्वतंत्र दर्शन म्हणून मान्यता देऊन 'न्यायदर्शन' संबोधिले विश्वाची प्रक्रिया १६ पदार्थात मानून त्यात जल्प, वितण्डा, हेत्वाभास, छल, जाति इत्यादि गोष्टींचा समावेश आहे. यांचा उपयोग वादविवादासाठी होतो.

न्यायशास्त्राचा उदय केव्हा झाला यावर एकमत नाही. बौद्ध दार्शनिक नागार्जुन याने आपल्या ग्रंथात न्यायदर्शनाच्या १६ पदार्थावर आक्षेप घेतला आहे.[५] बौद्ध दार्शनिक नागार्जुनाच्या वेळी न्यायसूत्राचा उपयोग होत असावा. बौद्ध आम्नायांत वसुबन्धु न्यायशास्त्राचा विद्वान होता. दिङ्नाग व धर्मकीर्ति या दोन विद्वानानी बौद्धन्यायाची प्रतिष्ठा केली. 'बौद्धन्याय' ग्रंथात रशियन विद्वान चिरबिटस्की यांनी लिहिले आहे की, तर्कशास्त्राला चालना देणारे ई. स. ६–७ व्या शतकातील विद्वान दिङ्नाग व धर्मकीर्तिला आहे. यात परार्थानुमानाला स्थान आहे. व त्यानतर ह्या दोन दार्शनिकांनी अध्यवसाय, अपोहवाद, प्रमाण व त्यातील निमित्त अंगांना प्राधान्य दिले.

---

१. आन्वीक्षिकी त्रयी वार्ता दण्डनीतिश्चेति विद्याः । आश्रय. सर्वधर्माणां शश्वदान्वीक्षिकी मता । कौटिल्य अर्थशास्त्र १-२

२. मनुस्मृति अ. ७-४३ ३ न्यायकुसुमान्जली–प्रस्तावना. ४ न्यायविनिश्चयालंकार भा. १ पृ. ३१.

5. History of Indian Logic–Vidya Bhushan P. 257.

**जैन न्याय– उदय व विकास–**

जैन साहित्यामध्ये विभाजन चार अनुयोगामध्ये केले आहे १) प्रथमानुयोगचरित्र, कथा. २) चरणानुयोग– श्रावक व मुनीचा आचारधर्म. ३) करणानुयोग– भूगोल, गणित व ४) द्रव्यानुयोग– जीवाजीवादि तत्ववर्णन. द्रव्यानुयोगामध्ये सर्वसाधारणपणे जैनदार्शनिक साहित्याचा अंतर्भाव होतो. दर्शनशास्त्रामध्ये पण ज्यांना कारण देता येत नाही व केवळ आगमाप्रमाणे वर्णन असते अशा वेळी त्यास अहेतुवादशास्त्र म्हणतात.[1] आणि ज्यात अनुमान किंवा तर्काच्या आश्रयाने वस्तुतत्वांची साधक बाधक प्रमाणाने चर्चा केलेली असते त्यास हेतुवाद शास्त्र म्हणावे. जैन न्यायशास्त्राची तर्क अथवा अनुमान आधारशिला मानली जाते. ही गोष्ट अनेक तार्किक आचार्यांनी आपल्या ग्रंथात स्पष्ट केली आहे.

**जैन न्यायाची पार्श्वभूमी–**

जैन पौराणिक इतिहासात प्रथम तीर्थंकर आदिनाथाच्या वेळी दार्शनिक संप्रदाय निर्माण झाले. वृषभनाथाबरोबर दीक्षित झालेल्या मुनींमध्ये तपोभ्रष्ट झालेल्या मुनींनी अनेक दर्शनात अशा मिथ्यामताची संख्या ३६३ म्हणून सांगितली आहे. मुनींच्या आक्षेपाना उत्तर देण्यासाठी कांही वाद कुशल साधूंनी प्रयत्न केले आहेत. त्यांची संख्या प्रत्येक तीर्थंकराच्या परिवारामध्ये दिली आहे.

ऐतिहासिक दृष्टीने भगवान् पार्श्वनाथांच्या वेळेपासून आम्हाला न्यायदर्शनाची निश्चित अशी माहिती प्राप्त होते. जैन आगम ग्रंथात भगवान पार्श्वनाथ व भगवान महावीर यांच्या मतामध्ये सादृश्य व भिन्नतेसंबंधी उल्लेख सापडतात. त्यामुळे भगवान पार्श्वनाथाचे ऐतिहासिक अस्तित्व सिद्ध होते. भगवान पार्श्वनाथाचे निर्वाण महावीरांच्या निर्वाणाच्या २५० वर्षापूर्वी झाले होते. भगवान पार्श्वनाथाने आपल्या जीवनात ७० वर्षेपर्यंत उपदेश केला.[2] ते काशीच्या अश्वसेन राजाचे पुत्र होते. म्हणून त्यांच्या ऐतिहासिक उल्लेख प्राप्त होतो. भगवतीसूत्रामध्ये जगाच्या आकारासंबंधी भगवान पार्श्वनाथ व महावीर यांचे विचारसादृश्य लक्षात येते. तप व संयमादि याविषयी त्यांच्यात मतैक्य होते.[3] परंतु भगवान् पार्श्वनाथापासून सृष्टि, आचार, तप आदि विषयावर चर्चा होत असे. साधक बाधक मते मांडली जात असत. पार्श्वनाथ परंपरेचे आचार्य केशी कुमार श्रमण महावीराचे समकालीन होते. त्यांच्या प्रदेशी राजाशी झालेल्या संवादातून राजपक्षीय सूत्र नांवाचे उपांग निर्माण झाले. त्यात जीवाच्या मृत्यूनंतरच्या अस्तित्वासंबंधी दृष्टांत व युक्तिवाद रुढविला आहे.

सामान्यपणे भगवान् पार्श्वनाथ व भगवान् महावीर यांच्यामधील काळ हा दार्शनिक साहित्य व न्याय दर्शनाच्या दृष्टीने महत्वाचा आहे. या देशातील वैदिक संस्कृती व पूर्व भारतातील त्यागप्रधान श्रमण संस्कृती यात निरंतर संघर्ष असे. आत्मा, परमात्मा, ब्रह्म, आदि रहस्यमय विचाराचे जनकत्व ज्यांचेकडे आहे ती उपनिषदे याच वेळी निर्माण झाली. वैचारिक व आचार धर्मासंबंधी संघर्ष समाजात निर्माण झाले व त्यातून सत्य–असत्य, सत्–असत्, एक–अनेक, नित्य–अनित्य असे द्वंद्व निर्माण झाले. त्यातून न्याय किंवा तर्कवादाचा जन्म झाला.

महावीरांचा काळ म्हणजे इ. स. पूर्व ६ वे शतक. पार्श्वनाथानंतर २५० वर्षांनी महावीरांच्या काळी कांही दार्शनिक मताचे विवरण बौद्ध व जैन साहित्यात केलेले आढळते. जगाचे मूलतत्व व त्याचा साक्षात्कार यासंबंधी विवरण उपनिषदात आहे पुण्य व पाप प्रक्रिया न मानणारे काही पूरणकश्यपासारखे तर काही नियतिवादी होते, काही उच्छेदवादी होते म्हणजे ते फक्त चार महाभूतापासूनच जीवोत्पत्ति मानणारे होते. विक्षेपवादी, अन्योन्यवादी, अशी अनेक मत–मतांतरे उत्पन्न झाली व त्यातून वाचण्यासाठी बुद्धाने मध्यम मार्गाचे प्रतिपादन केले. ह्या द्वद्वाना बुद्धाने 'अव्याकरणीय' म्हणून टाळले.

१. दुविहो धम्मावाओ अहेउवाओ य हेउवाओ य। सम्मतिसूत्र ३-४३ २. पार्श्वनाथ का चातुर्याम धर्म– धर्मानंद कोसंबी
३. भगवती सूत्र–२–५–१०९ तुंगियार नयरीए बहिया पुफ वतीए चेइए ... चेव ण आयमाववत्तव्वयाए

परंतु भगवान् महावीरानी या प्रश्नाचे निश्चित स्वरूप प्रतिपादन करून जैन न्यायाची भूमिका दृढ केली. प्रत्येक वस्तूचे स्वरूपासंबंधी सयुक्तिक विचारधारा निश्चित केली. द्रव्य, क्षेत्र, काल व भाव यास अनुसरून महावीरांचे प्रतिपादन असे. महावीरांनी ३० वर्षामध्ये दीक्षा धारण केली व १२ वर्षाच्या कठोर तपानंतर त्यांना केवलज्ञान लाभले. त्याचे प्रधानशिष्य गौतम गणधर हे होते. त्यांना जीवाच्या अस्तित्वासंबंधी संदेह होता. गौतम गणधर समवशरणात जाताच त्याना त्यांचा संदेह दूर झाला. त्यांनी भगवान् महावीरांच्या उपदेशातून १२ अगाचे संकलन केले. या १२ अंगामध्ये दुसरा सूत्रकृत, ५ वा व्याख्याप्रज्ञप्ति, १० वा प्रश्न–व्याकरण व १२ वा दृष्टिवाद हे ग्रंथ विशेषरूपाने न्याय व तर्काचा आश्रय घेणारे आहेत. सूत्रकृत अंगामध्ये ज्ञान–विनयादि विषयासह स्वसमय व परसमय सिद्धांताचे वर्णन आहे.[1] प्रश्न व्याकरणामध्ये आक्षेपिणी, विक्षेपिणी, संवेदिनी व निर्वेदिनी या चार प्रकारच्या कथेचे वर्णन आहे. दृष्टिवादामध्ये ३६३ मतवाद्यांचे निराकरण झाले आहे. यात ५ उपभेद आहेत. सूत्र, परिकर्म, प्रथमानुयोग, पूर्वगत व चूलिका. यात नैय्यायिक, नियतिवाद, विज्ञानवाद, शब्दवाद, प्रधानवाद, द्रव्यवाद, पुरुषवाद, आदींचे वर्णन केले आहे.

जैन न्याय साहित्याच्या उद्‌भवाची आगमिक परंपरा लक्षात घेतल्यानंतर त्याचा कालक्रमाने कसा विकास झाला व प्रचलित साहित्यात जैन न्यायाची मूल्ये कुठे दिसतात हे पाहणे अगत्याचे आहे. वास्तविक पाहता सूत्रकृतांग, स्थानांग, व्याख्याप्रज्ञप्ति, उपासक दशांग, प्रश्नव्याकरण, अंगबाह्य ह्यात सैद्धांतिक वादविवाद आले आहेत. पण या नंतरच्या साहित्यात भद्रबाहूंच्या नियुक्तीना आद्यस्थान आहे. यांनी ११ अंगावर ११ नियुक्ति लिहिल्या व शब्दोत्पत्ती, पूर्वापार संबंध व विषय विवेचन ह्यावर विशेष प्रकाश टाकला. नियुक्तीमध्ये तर्क व चर्चाचे अनेक प्रसंग आलेले आहेत. दशवैकालिक नियुक्तीमध्ये तार्किक विचार बरेच आले आहेत. जीवाचे अस्तित्व, कर्तृत्व, नित्यत्व, भू–पाप आदि विषयांची चर्चा आलेली आहे. न्यायदर्शनामध्ये येणारे प्रतिज्ञा, हेतु, दृष्टांत, उपनय व निगमन या पाच अवयवांना नियुक्ति गाथेत प्रतिज्ञा, प्रतिज्ञा विभक्ति, हेतु, हेतुविभक्ति, विपक्ष, विपक्षप्रतिवेध, दृष्टांत, आशंका, आशंका प्रतिवेध, व निगमन असे १० अवयव सांगितले आहेत.

आधुनिक प्राकृत साहित्याचे जनक कुंदकुंद स्वामीनी जी पंचास्तिकाय, प्रवचनसार, समयप्राभृत, अष्टप्राभृत, नियमसार, द्वादशानुप्रेक्षा व 'दशभक्ती' या ग्रंथाची रचना केली त्यांचे हे ग्रंथ आज प्रकाशित झाले आहेत. त्यात त्यांनी आगमाला अनुसरून अध्यात्मदर्शी साहित्य निर्माण केले. त्यांच्या ग्रंथामध्ये प्रसंगानुरूप आत्मसिद्धीसाठी तर्क प्रस्तुत केले आहेत. कुंदकुंदांच्या ग्रंथामध्ये स्वतंत्ररूपाने प्रमाण चर्चा नसली तरी ज्ञानासंबंधी विवेचन करताना त्यांनी दार्शनिक प्रमाण दिले आहे. कुंदकुंद आचार्यांनी न्यायवादाचा प्रारंभ ज्ञानाच्या स्वप्रकाशक व परप्रकाशक या वादापासून केला. त्यांना ज्ञान हे स्वपरप्रकाशक आहे हे अभिप्रेत आहे. कुंदकुंदानंतर झालेल्या आचार्यांनीही ही मान्यता स्वीकारली. कुंदकुंद आचार्यांनी प्रवचनसारामध्ये प्रत्यक्ष व परोक्ष प्रमाणांची व्याख्या देऊन ती युक्तीने सिद्ध केली आहे.[2] त्यात मूळ अंतर हे की अन्य दार्शनिक इद्रियजन्य ज्ञानाला प्रत्यक्ष मानतात. पण इंद्रिय हे जड असल्यामुळे परद्रव्य आहे व यामुळे वस्तूचे प्रत्यक्ष ज्ञान होणे युक्तियुक्त नाही. प्रवचनसारकर्ते कुंदकुंदाचार्यांनी इंद्रियजन्य ज्ञानाला परोक्ष म्हटले आहे. जे ज्ञान परनिमित्तद्वारा होते ते परोक्ष. हा अर्थ त्यांना अभिप्रेत आहे[3]. कुंदकुंदानी व्यवहार दृष्टीने सर्वज्ञाची व्याख्या केली आहे परंतु निश्चय दृष्टीने केलेली व्याख्या भिन्न आहे[4]. समय प्राभृतामध्ये पण आत्म्याला सपूर्ण अकर्ता मानणाऱ्या सांख्याचे खण्डन केले आहे. त्याबरोबरच सांख्याना परद्रव्याचा कर्ता मानणाऱ्या वैष्णव मताचा निषेध केला आहे. जर आत्मा परद्रव्याचा कर्ता आहे तर तो परद्रव्यमय आहे असा साधारण नियम माडला आहे[5] पंचास्तिकाय तर स्याद्वाद व सप्तभंगीचे कथन करणारा आहे.

---

१. समवायाग सू १३७ प्रमाणे साध्य ह्या अगात ३६३ मतादींचे निराकरण केले आहे.

२. प्रवचनसार गाथा– १–४०, ४१, ५४–५८ ३ प्रवचनसार– १-५७, ५८ ४. नियमसार-गाथा– १५८

५. समय प्राभृत-गा–९९

जैन न्याय तत्व मीमांसेला आचार्य कुंदकुंदानी सर्वज्ञता, अतींद्रियज्ञान, सप्तभंगी इत्यादीद्वारा दार्शनिक शैलीचा अवलंब केला. त्याला चालना उमास्वामी यांनी आपल्या तत्वार्थसूत्रद्वारे दिली. उमास्वामीने पहिल्या अध्यायामध्ये प्रमाण व नयाचे संक्षेपाने वर्णन करून प्रमाण ज्ञानासंबंधी चर्चेचा उपोद्घात केला. नय देखील स्वतंत्र ज्ञानसाधन म्हणून त्यांस वेगळे स्थान दिले[1].

जैन न्याय साहित्याला खरी चालना स्वामी समंतभद्राचार्यांनी दिली. न्यायशास्त्राचा इतिहास पाहता असे लक्षात येते की इ. स. पूर्व पहिल्या शतकामध्ये न्याय शब्दाचा प्रयोग पण प्रचलित नव्हता. तसेच न्यायशास्त्रावर ग्रंथ असा कोणताही उपलब्ध नव्हता. केवळ तत्वचर्चा व वादविवादामध्ये अनुमानाद्वारे युक्तीप्रयुक्तींचा उपयोग केला जात असे. पण जैन न्यायसाहित्यामध्ये इ. स. च्या तिसऱ्या शतकात न्याय साहित्याचे स्वतंत्र ग्रंथ निर्माण झाले. स्वामी समंतभद्र आणि सिद्धसेन दिवाकर यांनी विभिन्न न्यायसाहित्य स्तोत्ररूपाने निर्माण केले. आपल्या इष्ट देवतेच्या प्रार्थनेसाठी त्यांनी न्यायसिद्धांताचे प्रतिपादन केले. त्यामुळे न्यायसाहित्याला विशुद्धस्वरूप प्राप्त झाले. स्याद्वाद व सप्तभंगी यांना प्रतिष्ठा प्राप्त झाली. समंतभद्र उद्भटवादी वक्ता व श्रेष्ठ दर्जाचे कवि होते. भारतातील विभिन्न प्रांतामध्ये प्रवास करून दुर्जिटीसारख्या वादीना त्यांनी पराभूत केले. आप्तमीमांसा, युक्त्यनुशासन, स्वयंभूस्तोत्र, यासारखे प्रगाढ विद्वत्तापूर्ण ग्रंथ तसेच अलंकार व शैलीसाठी जिनस्तुती शतक, त्या बरोबरच आचारग्रंथ म्हणून रत्नकरंड श्रावकाचार हे ग्रंथ त्यांनी लिहिले. आप्तमीमांसेमध्ये प्रथमतः सर्वज्ञ सिद्धीसाठी त्यांनी अनुमान उपस्थित केले. त्यांच्या मताप्रमाणे जसे सूक्ष्म परिमाणु अंतरित (उदा. रामरावणादी) तसेच दूरवर्ती सुमेरु पर्वत हे पदार्थ कोणाला तरी प्रत्यक्ष आहेत, कारण ते अनुमेय आहेत. जसा अग्नि याप्रमाणे या तर्काद्वारे त्यांनी हेतुवाद सिद्ध केला. समंतभद्राने शाबर भाष्यावर खूप टीका केली व सर्वज्ञत्वासाठी हेतुवाद सिद्ध केला. समंतभद्राचे महत्वपूर्ण कार्य हे की त्यानी हेतुवाद आगमवादापासून अलग केला व त्याची स्वतंत्र प्रतिष्ठापना केली. आप्तमीमांसेमध्ये[2] महावीराचे वचन श्रेष्ठ का आहे व ते सर्वज्ञ कसे याची सिद्धी अनेक श्लोकाद्वारे केलेली आहे. वस्तुतत्वाच्या निर्णयासाठी स्याद्वादाचा उपयोग किती श्रेष्ठ आहे हे त्यांनी चर्चिले आहे. एकांतवादाची आलोचना करून अनेकांतवादाची प्रतिस्थापना करणे हा समंतभद्राचा उद्देश आहे. न्यायसाहित्याला समंतभद्राची खालीलप्रमाणे देणगी आहे–

१ जैन साहित्यात अनेकांतवाद व सप्तभंगीवाद यांची रूपरेखा निश्चित करून त्याची व्यावहारिक प्रणाली सिद्ध केली.

२ प्रमाणाचे दार्शनिक लक्षण व फल, स्याद्वादाची व्याख्या, सुजय आणि दुर्जयाची व्यवस्था व श्रुतप्रमाणांची सिद्धी, त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वस्तु कथंचित् सत्, कथंचित् असत्, कथंचित् सत्-असत् अशी असते व ती कथंचित् अवाच्यतही असते. ही नय विवक्षा सप्तभंगाच्या रूपाने प्रतिपादित केली आहे.

युक्त्यनुशासन या स्तोत्र ग्रंथात महावीराचा उपदेश युक्ति व आगमाला कसा अविरोधी आहे व तो स्तुत्य का आहे याची तात्त्विक मीमांसा केली आहे. ज्या ठिकाणी आप्तमीमांसेमध्ये परस्पर विरोधी अशा सामान्य साधारण वादांचा समन्वय आहे तर युक्त्यनुशासन या स्तोत्र ग्रंथात दार्शनिक प्रश्नांचा विचार केलेला आहे. चैतन्याची उत्पत्ती, बौद्धाचा व्यावहारिक संबंध, वैशेषिकांचा समवाय संबंध व मीमांसकांच्या पशुबलिविषयीचे समर्थन इ. वादाना उपस्थित करून वीर निर्वाण महावीरांचे सर्वोदय तीर्थ कसे आहे हे सिद्ध केले आहे. स्वयंभू स्तोत्रामध्ये देखील १४३ पद्याद्वारे २४ तीर्थंकराच्या गुणाचे स्तवन केले आहे. २४ तीर्थंकराच्या स्तुतीच्या व्याजाने अनेक एकांतवादी विचारांचे खंडन केलेले आहे.

---

१. पंचास्तिकाय- गा. १४ २. आप्तमीमांसा श्लो. १४ व २०

सिद्धसेन आचार्यांनी नयवादाची विस्तृत व्याख्या केलेली आहे. सिद्धसेनाचा न्यायावतारग्रंथ जैन न्यायाचा आद्य ग्रंथ मानला जातो. सिद्धसेन दिवाकरानी जैन विचारप्रणालीला व तार्किक विचाराना संस्कृत भाषेत बद्ध केले. उज्जयनीच्यां महाकाल मंदिरामध्ये आपल्या स्तोत्राद्वारे कल्याण मंदिरातील शिवलिंग भग्न करून त्या ठिकाणी पार्श्वनाथ भगवंताची मूर्ती प्रगट करण्याचा चमत्कार केलेला आहे. आचार्य सिद्धसेनांची महत्वाची कृती म्हणजे 'सन्मती सूत्र' हा ग्रंथ होय. या ग्रंथाची भाषा प्राकृत आहे व तीन खंडात तो विभागलेला आहे. याची श्लोकसंख्या १५८ आहे. प्रथम खंडामध्ये नयकांड द्रव्यार्थिक व पर्यायार्थिक या दोन नयाचे वर्णन आहे. तसेच नैगम, संग्रह आदि सात नयाचे नाम, स्थापना आदि निक्षेपांच्या द्वारा वर्णन केलेले आहे. सन्मती सूत्रामध्ये प्रामुख्याने नयवाद व सप्तभंगीवाद याची चर्चा केली आहे. सिद्धसेन आचार्यांनी ७ नयाच्या ठिकाणी ६ नय संकलित केले आहेत. नैगम स्वतंत्र नय मानलेला नाही आणि संग्रह नयापासून सहा नय स्वतंत्र मानलेले आहेत. दुसऱ्या कांडामध्ये ज्ञान व दर्शन मीमांसा आहे. श्वेतांबर आगमाप्रमाणे केवलज्ञान व दर्शनाची उत्पत्ती क्रमाक्रमाने होते[1] दिगंबर नयाप्रमाणे या दोन्हीची उत्पत्ति युगपत् मानली आहे. सिद्धसेन आचार्यांनी या दोन्ही मताना तर्काद्वारे अनुचित ठरवून अभिवादाची सिद्धी केली. केवलज्ञानीच्या दर्शन व ज्ञानामध्ये कोणताही भेद नाही आणि तिसऱ्या खंडामध्ये द्रव्यगुण पर्यायाचा संबंध स्पष्ट केलेला आहे. द्रव्यार्थिक व पर्यायार्थिक नयाप्रमाणे गुणार्थिक नयाचा उपदेश का केला नाही हेही स्पष्ट केले आहे. द्रव्यातील उत्पत्ति, नाश व स्थिरता यांची प्रक्रिया सांगितली आहे. सन्मती तर्काशिवाय सिद्धसेनांनी केलेल्या ३२ द्वात्रिंशिका न्यायशास्त्राच्या दृष्टीने अत्यंत महत्वाच्या आहेत. सिद्धसेनानी न्यायावतार या स्तुतिमध्ये पदार्थमानाची चर्चा केलेली आहे. सिद्धसेनांची ही रचना विवाद्य आहे.

जैन न्यायाचे खरे प्रस्थापक आचार्य अकलंक हे होत. ब्राह्मण व बौद्ध परंपरेमध्ये ज्यांनी प्रौढ व प्रगल्भ अशा संस्कृत भाषेतील टीकेद्वारे तत्वचर्चा केली आहे. अशी प्रगल्भ व दुरूभाषी टीका अकलंकानी केली. अकलंकाचार्यांनी प्रमाणशास्त्रास परिपक्व असे रूप दिले. हा वास्तविक भारतीय दर्शनाचा मध्यान्हकाळ होय. अकलंकाचार्यांना बौद्ध पंडीत धर्मकिर्ती व शिष्य समूह याच्याशी वादविवाद करावा लागला. हे राजा सासतुंग व शुभतुंगाच्या समकालीन होते. इ. स. ६७६ मध्ये यांनी सिद्धिविनिश्चय हा ग्रंथ लिहिला म्हणून त्यांचा काळ सातवे शतक असे मानण्याकडे कांही विद्वानांचा कल आहे. पंडीत सुखलालजीच्या शब्दात असे म्हणता येईल की अकलंकानी न्यायशास्त्राला जैनपरंपरेत प्राथमिक स्थान निर्माण करून दिले. त्यांनी जैनन्यायपरिभाषा, त्यातील शब्दांचे लक्षण निश्चित केले आहे. प्रमाण, प्रमेय आदींचे वर्गीकरण[2], पदार्थ, वाद, कथा आदि संबंधी जैन विचार स्थिर केले. त्यामुळे जैन न्यायप्रमाणशास्त्राचे स्थापकयुग म्हणून हे मानले जाते. न्यायाला सम्यक्ज्ञानरूपी जलाने स्वच्छ करण्याची प्रतिज्ञा अकलंकानी सुरुवातीस केली आहे[3].

अकलंकाचार्यांनी बौद्ध दर्शनाचे जनक दिग्नाग व त्यांचे उत्तराधिकारी धर्मकीर्ती याच्या मताचे खंडन केले. प्रख्यात मीमांसक कुमारीलभट्टाने मीमांसा दर्शनाच्या शबर भाष्यावर श्लोकवार्तिक लिहीले. त्यात सर्वज्ञसिद्धीचे विवेचन केले. अकलंकदेव यांनी समंतभद्राचार्यांचे उत्तराधिकारी म्हणून न्यायशास्त्रावर अधिक संशोधन केले. अनेकांतवाद व अहिंसावाद यांच्या द्वारे न्यायसिद्धांत अधिक विशद केले. अकलंकाचार्यांनी प्रमाणशास्त्राला अधिक व्यवस्थित रूप दिले. प्रत्यक्ष आणि परोक्ष या दोन मूळ प्रमाणाद्वारे ज्ञानाची व्यवस्था केली. इंद्रियजन्यज्ञान म्हणजे परोक्षज्ञान. मति आणि श्रुति हे परोक्ष ज्ञान आहेत प्रत्यक्ष ज्ञान म्हणजे

---

१. सर्वान्तवत्सद्गुणमुख्यकल्पं सर्वान्तशून्य च मिथोनपेक्षम् । सर्वापदामंतकर दुरन्त सर्वोदय तीर्थमिद तवैव ।।
युक्त्यनुशासन- श्लो. ६१

२. दर्शन आणि चिंतन पृष्ट ३६५

३. बालानां हितकामिना मतिमहापापैः पुरोपार्जितं. माहात्म्यात् तमसः स्वयं कलिबलात् प्रायो गुणद्वेषिभिः।
न्यायोयं मलिनीकृतः कथमपि प्रक्षाल्य नेनीयते । सम्यग्ज्ञानजले वचोभिरमल तत्रानुकंपापरैः ।।




आत्मिकसहाय्याने होणारे ज्ञान. त्याचे तीन भेद आहेत. अवधि, मनःपर्यय आणि केवल. न्यायावतारमध्ये प्रत्यक्ष आणि परोक्ष प्रमाणे देऊन अनुमान आणि शब्द प्रमाणांची चर्चा केली आहे. अन्य दर्शनकारांच्या मते प्रत्यक्ष, अनुमान, शब्द, उपमान आणि अर्थापत्तिप्रमाण मानले जात होते. परोक्ष नावाचे कोणतेही प्रमाण मानले नव्हते. अनुमान या शब्दाचा प्रयोग पण होत नव्हता. अकलंकानी या दार्शनिक विचाराना व्यक्त करण्यासाठी अनेक मौलिक ग्रंथाची रचना केली. त्यांचे सहा ग्रंथ प्रामुख्याने उपलब्ध आहेत. त्यापैकी तत्वार्थवार्तिक, अष्टशती, लघीस्त्रय, न्यायविनिश्चय, सिद्धिविनिश्चय व प्रमाणसंग्रह. अकलंक देवांच्या या रचनेमध्ये दोन टीका व बाकीचे चार स्वतंत्र ग्रंथ आहेत. ते न्यायाचे प्रस्थापक आचार्य होते. तत्वार्थवार्तिक हा तत्वार्थसूत्रावरील टीकात्मक ग्रंथ आहे. त्याची श्लोकसंख्या सोळा हजार आहे. प्रत्येक सूत्रामध्ये बाधकबाधक चर्चा केलेली आढळते. विद्यानंदस्वामीद्वारा लिखित श्लोकवार्तिकापेक्षा हे वेगळे आहे. म्हणून याचे नाव राजवार्तिक दिले आहे. श्वेतांबर परंपरेमध्ये मान्य सूत्र पाठांची त्या त्या ठिकाणी चर्चा केली आहे. जैन आगमात आलेल्या विषयांचे स्पष्टीकरण अनेकांतात्मक पद्धतीद्वारे केलेले आहे.

अष्टशती-समंतभद्र स्वामीद्वारा रचित आप्तमीमांसा या दार्शनिक स्तोत्रावर अत्यंत प्रगल्भ अशी टीका आहे. हे आठशे श्लोक प्रमाण असल्यामुळे त्याला अष्टशती असे नाव आहे. एकांतवादी पक्षाचा पूर्वपक्ष देऊन त्यांचे निराकरण केले आहे.

लघीयस्त्रय– हा दार्शनिक विचाराचा संग्रह आहे. प्रमाणप्रवेश, नयप्रवेश व प्रवचनप्रवेश नांवाचे तीन संग्रह आहेत. प्रमाणाचे भेद, स्वरूप याशिवाय न्यायनिश्चय टीका इत्यादी प्रत्यक्ष अनुमान आणि प्रवचन या विषयावर विवेचन केले आहे. जिनप्रवचनाचे स्वरूप, बौद्ध आणि मीमांसकाचे अप्रमाणत्व, सर्वज्ञत्व आदि विषयांची चर्चा सखोलपणे केली आहे.

जैन न्यायशास्त्रामध्ये हरिभद्राचे महत्वपूर्ण योगदान आहे. त्यानी आगम, न्याय, अध्यात्म, स्तोत्र, श्रावक व मुनीआचार, कथा आदि विषयावर प्रचुर साहित्य निर्माण केले. त्यांचे केवल तर्कप्रधान ग्रंथ एकूण १३ आहेत. यापैकी १० स्वतंत्र व ३ टीकात्मक आहेत. अनेकांत जयपताका, अनेकांतवाद, प्रवेश, शास्त्रवार्तासमुच्चय, षड्दर्शनसमुच्चय, सर्वज्ञसिद्धी, अनेकांत सिद्धी भावनासिद्धी, परलोकसिद्धी, न्यायप्रवेश टीका, तत्त्वार्थाधिगम टीका, न्यायावतार टीका आदी प्रसिद्ध ग्रंथ आहेत. अनेकांत जयपताकामध्ये नित्य-अनित्य, सत्व-असत्व आदी विरुद्ध गुणधर्म एकाच ठिकाणी कसे राहतात हे सिद्ध केले आहे. षड्दर्शन समुच्चय ग्रंथात बौद्ध, न्याय, सांख्य, जैन, वैशेषिक, मीमांसक व लोकायत या सात दर्शनांच्या प्रमुख मतांचा संग्रह आहे. ईश्वर, जीव, जगत् आणि प्रमाण या चार विषयास अनुसरून त्या त्या दर्शनांचे प्रामाणिक वर्णन केलेले आहे. अन्य ग्रंथात ग्रंथाच्या नावाप्रमाणे विषय प्रतिपादन केलेले आहे.









# श्रावकधर्म

मोक्षमार्गामध्ये श्रावकाचे स्थान फार महत्वाचे आहे. ज्याप्रमाणे इमारत उभारण्यासाठी त्याचा पाया भरभक्कम मजबूत असावा लागतो, इमारतीचे सर्व श्रेय त्याच्या पायावर अवलबून असते अथवा वृक्षाची उभारणी त्याच्या बीजावर अवलंबून असते त्याप्रमाणे मोक्षमार्गाचा प्रारंभ, मूळपाया, मूळबीज श्रावकधर्म आहे.

जो श्रावक धर्माचे यथायोग्य पालन करतो त्याचा मोक्षमार्ग निष्कंटक सहज सुलभ होतो.

नित्यनिगोद राशीतून संसार राशीत येणे दुर्लभ आहे. त्यात त्रसपर्याय प्राप्त होणे दुर्लभ आहे. त्यात संज्ञीपंचेंद्रिय अवस्था प्राप्त होणे दुर्लभ आहे त्यात मनुष्यगति मिळणे दुर्लभ आहे. मनुष्यगतीत उत्पन्न होऊन जैनकुल प्राप्त होणे दुर्लभ आहे. जैनकुल प्राप्त होऊन यथार्थ तत्त्वदर्शन-सम्यग्दर्शन प्राप्त होणे दुर्लभ आहे. त्यातही तत्त्वज्ञानपूर्वक धर्माचरण पाळणे अत्यंत दुर्लभ आहे. "दुसऱ्यास सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडे पाषाण" असे पुराण-पोथी वाचणारे पंडित जगात पुष्कळ आहेत. " कळते पण वळत नाही " या उक्तीप्रमाणे तत्त्वज्ञान अंगी आणणारे भाग्यवान पुरुष फार थोडे असतात.

ज्ञानमर्च्यं तपोऽङ्गत्वात्, तपोऽर्च्यं तत्परत्वतः । द्वयमर्च्यं शिवाङ्गत्वात्, तद्वन्तोऽर्च्या यथागुणं ।।

सर्वप्रथम तत्त्वाचे यथार्थज्ञान हे आदरणीय आहे. " जशी दृष्टि तशी सृष्टि " दृष्टिच समीचीन नसेल तर आचरण देखील निरर्थक ठरते.

कोटिजन्म तप तपे, ज्ञानबिन कर्म झरे जे । ज्ञानीके छिनमें त्रिगुप्तितें सहज टरे तै ।।

तत्त्वज्ञानरहित शेकडो जन्मोजन्मी तप तपले तरी ते सर्व व्यर्थ आहे. ज्ञानपूर्वक तीन गुप्तीचे पालन करून यथायोग्य आचरण करणाऱ्या संयमी साधुसंताचे पूर्वी अनेक जन्मामध्ये संचित केलेले सर्व पाप क्षणार्धात नष्ट होते असा ज्ञानपूर्वक तपाचा-आचार धर्माचा महिमा आहे. ज्ञानाचे फळ, ज्ञानाची खरी सार्थकता आचार धर्मात आहे. " हतं ज्ञानं क्रियाहीनं, हता चाज्ञानिना क्रिया " ।। अध्यात्मशास्त्रामध्ये ज्याप्रमाणे ज्ञानरहित क्रियाकांडाला निरर्थक म्हटले आहे त्याचप्रमाणे आचारधर्महीन ज्ञानाला केवळ ज्ञानाच्या पोपटपंचीला देखील निरर्थक म्हटले आहे.

" दंसण मूलो धम्मो " यद्यपि धर्माचे मूळ बीज सम्यग्दर्शन यथार्थ तत्त्वज्ञान हे आहे, तथापि " चारित्तं खलु धम्मो " ते तत्त्वज्ञान आचारसहित असेल तरच त्याला धर्म म्हटले आहे. धर्माचा प्रारंभ चारित्राशिवाय आचार धर्माशिवाय होत नाही.

आत्मा एक ....आत्म्याचा धर्म ही एकच आहे. म्हणून मोक्षमार्गही वास्तविक एकच आहे. आत्म्याचा स्वभाव शुद्ध-ज्ञानदर्शन स्वभाव ज्ञाताद्रष्टा स्वभाव आहे. राग-द्वेष करणे हा जीवाचा धर्म नाही. वीतराग-शुद्ध उपयोग हा एकच मोक्षमार्ग आहे. त्याचे अवलंबन घेऊनच हा जीव आपल्या ज्ञान–दर्शन स्वभावात अविचल स्थिर होतो. आत्म्याचे आत्मस्वभावात अविचल स्थिर होणे यालाच मोक्ष म्हणतात. "सिद्धिः स्वात्मोपलब्धिः" आपल्या आत्मस्वरूपाची जाणीव होऊन त्यात स्थिर होणे हीच बोधि, हीच समाधि, हीच परिणाम विशुद्धि, हीच आत्मोपलब्धि, हीच मोक्षसुखाची प्राप्ति. " बोधिः, समाधिः, परिणामशुद्धिः, स्वात्मोपलब्धिः, शिवसौख्यसिद्धिः " हाच क्रमाने मोक्षप्राप्तीचा सरळ-सुलभ-राजमार्ग आहे. स्व-पराचे, हित-अहिताचे, तत्त्व-अतत्त्वाचे, धर्म-अधर्माचे, आत्मा-अनात्माचे यथार्थ विज्ञान-भेदविज्ञान तीच बोधि होय. यालाच सम्यग्दर्शन म्हणतात.

भेद विज्ञानतः सिद्धा, सिद्धा ये किल केचन । तस्यैवाभावतो बद्धा, बद्धा ये किल केचन ।।

आत्म–अनात्म तत्वाने यथार्थ भेदविज्ञान हाच मोक्षाचा सुलभ उपाय आहे. आजपर्यंत जे कोणी जीव सिद्ध झाले ते सर्व या भेदविज्ञानानेच सिद्ध झाले व आजपर्यंत जे कोणी संसारात बद्ध आहेत ते सर्व या भेदविज्ञानाच्या अभावानेच बद्ध आहेत. भेदविज्ञानपूर्वक-यथार्थतत्त्वज्ञानपूर्वक आपल्या शुद्ध ज्ञानदर्शन स्वभावात-वीतराग शुद्ध उपयोगात स्थिर होणे हा एकच मोक्षाचा खरा उपाय आहे. 'नान्यथा साध्यसिद्धिः' याशिवाय दुसरा कोणताही साध्यसिद्धिचा-मोक्षप्राप्तिचा मार्ग नाही.

परंतु जोपर्यंत या शुद्ध उपयोगात स्थिर राहण्याचे सामर्थ प्राप्त होत नाही तोपर्यंत "दगडापेक्षा वीट मऊ" या उक्तीप्रमाणे तीर्थप्रवृत्तिनिमित्त मंदकषायरूप–विशुद्धिपरिणामाला–शुभरागरूप शुभयोगाला देखील उपचाराने व्यवहारधर्म म्हणून त्याला देखील परंपरा मोक्षमार्ग म्हटले आहे.

यद्यपि शुभरागरूप शुभयोग हा पुण्यबंधालाच कारण आहे. बंधमार्गच आहे. बंधतत्त्वच आहे तो मोक्षमार्ग नाही-संवर-निर्जरा-मोक्षतत्व नाही. तथापि या शुभरागाचा विषय शुद्धोपयोगी वीतराग देव-शास्त्र गुरु यांची भक्ति असते, त्यामध्ये शुभोपयोगी ज्ञानी सम्यग्दृष्टी जीवाची भावना शुद्धोपयोगाची प्राप्ति व्हावी ही पवित्र भावना असते. सम्यग्दृष्टीला निरंतर असंख्यात–गुणी संवर–निर्जरा सुरु होते. म्हणून त्या शुभरागरूप शुभोपयोगाने अल्पस्थिति अनुभागरूप कर्मबंध होत असताना देखील त्याला गौण करून तो शुभोपयोग संवर निर्जरेला कारण आहे. असा उपचार करून व्यवहारशास्त्रामध्ये त्याला परंपरा मोक्षमार्गच म्हटले आहे. याप्रमाणे आपल्या स्वरूपात अविचल स्थिर राहण्यास असमर्थ अशा श्रावक लोकासाठी तीर्थ प्रवृत्तिनिमित्त सांगितला गेलेला हा अपवादमार्गरूप व्यवहार धर्म नितांत आवश्यक आहे.

त्याज्यान् अजस्रं विषयान् पश्यतोऽपि जिनाज्ञया । मोहात् त्यक्तुमशक्यस्य गृहिधर्मोऽनुमन्यते ।।

वीतराग सर्वज्ञ जिनदेवाच्या उपदेशावरून पंचेंद्रियाचे विषय व कषाय हे आपले स्वभाव नाहीत. विभाव भाव आहेत. हे उपादेय नाहीत. आश्रय करण्यायोग्य नाहीत हेय आहेत. अशी ज्याची दृढश्रद्धा आहे, ज्याना स्वभाव विभावाचे यथार्थ तत्त्वदर्शन झाले आहे तथापि जे चारित्र मोहाने विषय कषायाचा पूर्णपणे त्याग करण्यास असमर्थ आहेत त्यांचेसाठी पाप निवृत्तिरूप व पुण्य प्रवृत्तिरूप गृहस्थाचा व्यवहारधर्म-आचारधर्म सांगितला आहे. मुमुक्षु भव्य श्रावक लोकानी श्रावक धर्माचे यथायोग्य पालन सावधानपूर्वकच केले पाहिजे. प्रमादी, स्वच्छंदी, असंयमी जीवन घालवून नरक, निगोदाचे दुर्गति दु.ख भोगण्यापेक्षा, व्रत, नियम, दया, दान, पूजा आदि व्यवहार धर्माचे यथोचित पालन करून पुण्यसंपादन करून संसारातील जीवन सुगति, सुखामध्ये व्यतीत करावे व परंपरेने मोक्षसुखाची प्राप्ति करून घ्यावी, हाच एकमेव श्रावकाचा आचार धर्म आहे.

मात्र श्रावक धर्माचे पालन करीत असताना दोन महत्वाच्या धोक्याच्या सूचना दिल्या आहेत.

१) दया, दान, पूजा, व्यवहार धर्मरूप श्रावकधर्माचे पालन करीत असताना माया, मिथ्यात्व, निदान रूप शल्यभाव न ठेवता व्यवहार धर्माचे पालन करावे. पुण्यफळाची, स्वर्गसुखाची इच्छा ठेवून, संसार सुख, वैभवाची इच्छा ठेवून केलेले पुण्य आचरण तो खरा व्यवहार धर्म नव्हे, तो अनंत संसाराला कारण आहे. पुण्यफलाविषयी इष्ट बुद्धीचा, उपादेय बुद्धीचा व्यवहार शास्त्रामध्ये देखील निषेधच केला आहे.

'निःशल्यो व्रती' जो माया, मिथ्यात्व, निदान या तीन शल्याने रहित होऊन व्रत, नियमाचे, व्यवहार धर्माचे आचरण करतो त्यालाच खरा व्रती म्हटले आहे. त्याचाच व्यवहार धर्म परंपरामोक्षमार्ग म्हटला गेला आहे.

२) तसेच श्रावकधर्माचे पालन करीत असताना त्याचे लक्ष-त्याची भावना-त्याची उपादेय बुद्धि-इष्टबुद्धि वर चढण्याकडे असली पाहिजे. 'यतिव्रतरत तं श्रद्दधे श्रावकं-जो श्रावक श्रावकधर्मातच संतुष्ट आहे, श्रावक धर्मामध्येच ज्याची इष्ट बुद्धि आहे त्याला खरा श्रावक म्हटले नाही. जो मुनिधर्म पालन करण्यास उत्सुक आहे,




ज्याचे लक्ष वर चढण्याचे आहे त्याला मुमुक्षु श्रावक म्हटले आहे. श्रावक धर्माचे वर्णन करताना सर्वप्रथम श्रावकाचे ३ भेद सांगितले आहेत– १. पाक्षिक २. नैष्ठिक ३. साधक

(१) (तद्धर्मगृह्य: पाक्षिक)– श्रावकधर्म ग्रहण करणे मला प्रयोजनभूत आहे असे ज्याला पक्ष आहे, असा ज्याचा अभिप्राय आहे, ज्याची भावना आहे, तो सम्यग्दृष्टि श्रावक पाक्षिक श्रावक होय.

(२) (तन्निष्ठो नैष्ठिकः)– अकरा प्रतिमेचे श्रावक धर्माचे साक्षात् पालन करणारा-अणुव्रत, गुणव्रत, शिक्षाव्रत धारण करणारा नैष्ठिक श्रावक म्हटला जातो.

(३) (साधकः स्वयुक्)– सर्व आरंभ, परिग्रहाचा त्याग करून अंती समाधिमरण साधून आत्मस्वभावात स्थिर राहण्याचा अभ्यास करणारा आत्मयोग धारण करणारा योगी पुरुष साधक श्रावक म्हटला जातो.

सर्वप्रथम पाक्षिक श्रावकाने अष्टमूळगुण धारण करणे हे श्रावकाचे प्रथम आवश्यक आहे. मद्य, मांस, मधु व पंच उदुंबर फले यांचा त्याग व सप्तव्यसनांचा आजन्म त्याग करणे हे प्रथम आवश्यक आहे. या अष्टमूल गुणामध्ये कोणी स्थूल पंचपापाचा त्याग, जलगालन, रात्री भोजन न करणे, (अभक्ष्य कांदा, लसूण, वांगी, बटाटे वगैरे) फलभाजी न खाणे यांचा समावेश करून ते देखील नितात आवश्यक कर्म म्हटले आहे.

अष्टमूल गुण धारण केल्याशिवाय श्रावक धर्माचा खरा प्रारंभ होत नाही. 'जैसा खावे अन्न तैसा होवे मन", "जैसा पीवे पाणी वैसी होवे वाणी" या उक्तीवरून खाण्या, पिण्याच्या बाह्य वस्तू देखील पवित्र, शुद्ध, प्रासुक, निर्जंतुक असणे नितात आवश्यक आहे. जरी बाह्य वस्तूच्या खाण्यात–न खाण्यात किंवा त्यागात खरा आत्मधर्म नसला तरी हे बाह्य पदार्थ आपल्या शुभ, अशुभ परिणामास निमित्त कारण होतात. म्हणून आपल्या परिणामाची विशुद्धि ठेवण्यासाठी या बाह्य वस्तूंचा – अभक्ष्य पदार्थाचा त्याग देखील नितांत आवश्यक आहे. त्याला देखील व्यवहारधर्मामध्ये महत्वाचे स्थान दिले आहे.

आत्मस्वभावात स्थिर राहण्यास असमर्थ असा सम्यग्दृष्टी ज्ञानी श्रावक दान, पूजा, दया आदि पुण्यकर्म अवश्य करतो. त्याच्या पुण्यक्रिया सहजगत्या घडतात. पुण्यकर्म करणे हा अधर्म नाही. परंतु पुण्यकर्माला आत्मधर्म समजणे, उपादेय समजणे, त्याविषयी इष्ट बुद्धी ठेवणे, पुण्यफलाची इच्छा करणे हे माया, मिथ्यात्व, निदान शल्यभाव आहेत. त्याचा व्यवहार शास्त्रात देखील अत्यंत निषेधच केला आहे. जैनसिद्धान्ताचे तत्त्व जाणून घेण्यासाठी जैन सिद्धांतातील कर्मसिद्धांताचे देखील ज्ञान करून घेणे नितांत आवश्यक आहे.

जीवाचे शुभ, अशुभ, शुद्ध परिणाम व कर्माचा उदय, उपशम, क्षय, क्षयोपशम यांचा परस्पर अत्यंत निगडित समकाळ प्रत्यासत्ति संबंध आहे. जीवाचे शुभ, अशुभ परिणाम अमूर्त असल्यामुळे अदृश्य असतात. तत्समकालीन कर्माचा उदय, उपशम हा देखील अदृश्य असतो. पण कर्माचे फळ सुख - दुःख रूपाने सर्व संसारी जीवाना परिचित दृश्य असते.

त्यावरून आपण कसे परिणाम ठेवले तर कोणत्या कर्माचा बंध होतो व त्यामुळे आपणास कसे सुख, दुःख भोगावे लागते याचे दैनंदिन चित्र आपल्या दृष्टीसमोर नेहमी असते. कर्मसिद्धांत शास्त्राचे यथार्थ ज्ञान करून घेऊन ज्या विषय – कषायरूप अशुभ परिणामापासून पाप कर्माचा बंध होतो ते परिणाम न होऊ देण्याचा प्रयत्न करणे व ज्या मंदकषाय शुभ परिणामापासून पुण्यकर्माचा बंध होतो त्या परिणामामध्ये तावत्काल प्रवृत्ति ठेवण्याचा प्रयत्न करणे हाच श्रावकाचा आचारधर्म होय तो श्रावक अवस्थेत नितांत आवश्यक आहे.

श्रावकांचे आचारधर्म पालन करण्यासाठी ११ प्रतिमाचे (अवस्था) नियमपूर्वक पालन केले पाहिजे.

(१) दर्शनप्रतिमा– शंकादिक ८ दोष, ८ प्रकारचा गर्व, तीन मूढता, ६ अनायतन याप्रमाणे २५ दोषांचा त्याग करून निर्मल सम्यग्दर्शन धारण करणे ही सम्यग्दर्शन प्रतिमा होय.




(२) व्रतप्रतिमा– ५ अणुव्रते, ३ गुणव्रते, ( दिग्व्रत, देशव्रत, अनर्थ दंडव्रत ) ४ शिक्षाव्रते ( सामायिक, प्रोपधोपवास, भोगोपभोगपरिमाण, अतिथिसंविभाग ) यांचे निरतिचार पालन करणे ही व्रतप्रतिमा होय.

३) सामायिकप्रतिमा– त्रिकाल सामायिक करणे, आत्मस्वरूप चिंतवन करणे ही सामायिक प्रतिमा होय.

४) प्रोपधप्रतिमा– प्रत्येक अष्टमी, चतुर्दशीला प्रोपधसहित उपवास करणे ही प्रोषध प्रतिमा होय.

५) सचित्तत्याग प्रतिमा– कच्चा भाजीपाला, फळे न खाणे ही सचित्तत्याग प्रतिमा होय.

६) रात्रिभोजनत्याग प्रतिमा– रात्री चारही प्रकारच्या आहाराचा त्याग करणे ही रात्रिभोजनत्याग प्रतिमा होय.

७) ब्रम्हचर्य प्रतिमा– सर्व स्त्रीमात्राचा त्याग करणे, काम विकाराचा त्याग करणे ही ब्रम्हचर्य प्रतिमा होय.

८) आरंभत्याग प्रतिमा– व्यापार, धंदा, चूल पेटविणे, स्वयंपाक करणे इत्यादि पापारंभ क्रियांचा त्याग करणे ही आरंभत्याग प्रतिमा होय.

९) परिग्रहत्याग प्रतिमा– धन, धान्य, घर, जमीन, आदि परिग्रहाचा व त्यावरील ममत्व भावाचा, स्वामित्वाचा त्याग करणे ही परिग्रहत्याग प्रतिमा होय.

१०) अनुमतिविरतित्याग प्रतिमा– पापारंभ, व्यापार धंदा करण्याविषयी माझेसाठी अमुक आहाराचे पदार्थ करा असे अनुमोदन, संमति देण्याचा त्याग करणे ही अनुमतिविरतित्याग प्रतिमा होय.

११) उद्दिष्टविरतित्याग प्रतिमा– उद्दिष्ट आहाराचा त्याग करणे ही उद्दिष्टविरतित्याग प्रतिमा होय.

या श्रावकांच्या आचारधर्माचा पुढील भावी जीवनाशी देखील निगडित संबंध आहे. सम्यग्दर्शन सहित जर नवीन आयूचा बंध पडला तर नियमाने देवायूचाच बंध होतो. इतर आयूचा बंध होत नाही. पण ज्याला सम्यग्दर्शन होण्यापूर्वी नरकायूचा बंध पडला असेल त्याला नंतर सम्यग्दर्शनाची प्राप्ति होऊ शकते. सम्यग्दृष्टी जीव कदाचित् नरकात देखील जातो. यावरून केवळ सम्यग्दर्शन धारण करणे हे पुढील भावी सुखी जीवनाचे कारण म्हटले जात नाही. परंतु व्रत, नियमरूप श्रावक धर्माचा भावी जीवनाशी निगडित संबंध आहे. ज्याप्रमाणे नरकगतीत किंवा देवगतीत श्रावकाचे व्रत घेण्याचे परिणाम होत नाहीत त्याचप्रमाणे ज्याला प्रथम नरकायूचा बंध पडला असेल त्याला श्रावकाचे व्रत घेण्याचे देखील परिणाम होत नाहीत. असा जीवाच्या परिणामाचा व कर्मबंधाचा निगडित संबंध असतो

यासाठी आपणास पुढे नरकादि दुर्गतीचा बंध न व्हावा या हेतूने प्राय: पूर्वी राजघराणे आदि उच्च वर्णीय कुलातील माणसे यौवन जीवनात पूर्व कर्मकृत पुण्य वैभवाचा यथोचित भोग भोगून. म्हातारपणी अंत समयी व्रत, संयम, तप धारण करून सल्लेखनामरण साधीत असत. त्यामुळे त्याना नियमाने सद्गतीचीच प्राप्ती होत असे. सरागसयम, सयमासयम, अकामनिर्जरा, वालतप यामुळे नियमाने देवायूचाच आस्रवबंध होतो.'

यावरून श्रावकधर्माचे आचरण म्हणजे पुढील भावी जीवनातील सद्गतीचे रिझर्वेशन तिकिटच म्हटले तरी ते चुकीचे होणार नाही.

हा दुर्लभ नरदेह प्राप्त होऊन आपण जर आपले जीवन प्रमादी - असंयमी - निर्गल पापप्रवृत्तीमध्ये घालविले तर नियमाने आपणास भावी जीवनात दुर्गति - दु:ख भोगण्याचा अनिष्ट प्रसंग आल्याशिवाय राहणार नाही. तो टाळू म्हटले तरी टाळला जाणार नाही.

' बह्वारंभ परिग्रहत्वं नारकस्यायुषः '

बहु आरंभ व बहु परिग्रहरूप अशुभ परिणामानी, प्रमादी - स्वच्छंदी - असंयमी - निरर्गल अधर्माचरणाचे फळ नियमाने नरकादि दुर्गति दु.खच सागितले आहे.

जर आपले भावी जीवन दुर्गति दु.खापासून वंचित व्हावे व नियमाने सद्‌गतीचे रिझर्वेशन तिकिट मिळावे असे वाटत असेल तर मुमुक्षु भव्य जीवाने आपल्या ऐहिक जीवनात निदान श्रावकधर्माचरण पालन करण्याचा अभ्यास अवश्य केला पाहिजे

मिथ्यात्वपूर्वक अधर्माचरण - असंयमी - निरर्गल - प्रमादी - स्वच्छंदी जीवन नियमाने दुर्गति दुःखाचेच कारण आहे.

सम्यग्दर्शनपूर्वक - तत्त्वज्ञानपूर्वक व्रत - नियम - सयमरूप श्रावकधर्माचरण नियमाने सद्‌गतीचेच कारण आहे व शेवटी परंपरेने मोक्षाचे देखील कारण आहे. मुमुक्षु भव्य जीवाने श्रावकाच्या आचारधर्माचे यथोचित पालन करून आत्मकल्याण करून घ्यावे हाच सर्व व्यवहारशास्त्राचा सारसंक्षेप आहे.

रे जीव ! सुन, चेत, सयाने, काल वृथा मत खोवे ।
यह नरभव फिर मिलन कठिन है जो सम्यक् नहि होवे ॥

# आरोग्य आणि जैनाचार

आत्मसाधनेसाठी निरोगी शरीराची आवश्यकता लक्षात घेऊनच की काय जैनाचार्यांनी श्रावकासाठी व मुनिजनासाठी जे आचरण सांगितले आहे ते आरोग्याला पोषकच आहे असे विचारांती कळून येईल. वैज्ञानिक दृष्टिकोण विचारात घेतला तर आचरणाचे समर्थन तर होईलच पण वैशिष्ट्य असे की, विज्ञानाने जैनाचाराचा आदर्श समोर ठेवून वागावे आणि विश्वातील सर्व मानव जातीला आवाहन करावे इतको समीचीन उपदेश आहे.

प्रस्तुत लेखामध्ये जैनाचार आरोग्याला पोषक कसा आहे हे पटवून देण्याचा थोडक्यात प्रयत्न केला आहे.

अनेक ग्रंथातून आचारासंबंधाने सविस्तर वर्णन आहे. त्या सर्वांचे मूळ अहिंसा आहे. श्रावक आणि मुनि यांचे आचरण अहिंसेवरच आधारलेले आहे. ज्याना जैनागम समजलेले नाही किंवा समजून देखील पक्षाभिनिवेष सुटत नाही अशा विचारकाना अहिंसेचा अतिरेक वाटतो पण विचारांती अहिंसेची महत्ता कळून येते.

खाली कांही आचारपद्धति दिल्या आहेत त्यांचा सरळ ( Direct ) आरोग्याशी संबंध आहे आणि विज्ञानाने देखील त्यांचे समर्थन केलेले आहे.

**जलगालनविधी–**

जीवंत रहाण्यासाठी हवे नंतर पाण्याचाच क्रम आहे. हे महत्त्व लक्षात घेऊन जलशुद्धीचे विशेष वर्णन जैनशास्त्रातून आहे. पाणी कसे प्यावे, ते कसे गाळावे, गाळण्यासाठी उपयोगात येणारे वस्त्र कसे असावे, कोणते पाणी किती वेळ शुद्ध रहाते इ. चे सविस्तर वर्णन आहे पण त्या सर्वांचेच वर्णन इथे अशक्य आहे.

विहीर, तळे, नदी, झरा इ. चे पाणी आपणास स्वच्छ दिसते पण त्यात वनस्पति आणि सूक्ष्म जंतु फार मोठ्या प्रमाणात असतात. पाण्याच्या एका बिंदूमध्ये ३६४५० जलचर त्रसजीव असतात हे कॅप्टन स्क्वोर्सबी या प्रसिद्ध शास्त्रज्ञाने सिद्ध केले आहे. तर वनस्पतीमध्ये डेसमिस्ड व डायटम्स जातीच्या वनस्पति पाण्याच्या एकाच थेंबात असतात हे देखील विज्ञानाने सिद्ध केले आहे. 'वोलवक्स ग्लोवेटर' या नावाची एक अद्भुत आणि सूक्ष्म वनस्पति असते. याविषयी वैज्ञानिकानी संशोधन केले आणि सिद्ध केले की, वनस्पति खाऊन जंतु वाढतात तर निर्जीव पदार्थ खाऊन वनस्पति वाढतात, हे सर्व अतिशय स्वच्छ दिसणाऱ्या पाण्यात घडते मग घाण पाण्याची कथा तर निराळीच. पाण्यातील जंतु आणि वनस्पति आरोग्यास घातक असतात. Draeunealus Medinensis हे गोल कृमि ( Nemalodes ) न गाळलेल्या पाण्यामध्ये असतात. पाणी न गाळता पिल्यास हे पोटात जातात आणि त्वचेला छिद्र पाडून बाहेरील बाजूस अंडी घालतात. हे जंतु विषारी पदार्थांचे उत्सर्जन करतात. त्यामुळे अॅलर्जिक मॅनिफिस्टेशन्स किंवा ब्लिस्टर फॉर्मेशन हे रोग उद्भवतात. जे कृमि शरीरात जातात ते स्वतः बरोबर कांही अपायकारक जंतु (Bacteria) नेतात आणि विषाणु (Virus) निर्माण करतात[१]

या सर्व कारणामुळे या अनेक जतु वनस्पतीपासून बचाव होण्यासाठी म्हणजे अनेक रोगापासून बचाव होण्यासाठी पाणी गाळून पिणे अत्यंत आवश्यक आहे. पुष्टिकारक जतु पाण्यात नाहीतच म्हणून योग्य प्रकारे गाळून किंवा उकळून पाणी निर्जंतुक करून पिल्यास कॉलरा, कावीळ, रक्तामेम, ग्रॅस्ट्रो, नारू अपचन, खोकला, हगवण इ. रोगापासून बचाव होतो.

जलगालनविधीचे महत्व सांगताना प दौलतरामजी यानी क्रियाकोषामध्ये स्पष्ट निर्वाळा दिला आहे की,

जलगालन समक्रिया और नाही कही । जलगालनमे निपुण सोहि श्रावक सही ॥

१. हे सर्व वर्णन 'अहिंसा' साप्ताहिक व इतर मासिकातून सकलित केले आहे.




## रात्रि भोजन त्याग–

शरीरासाठी भोजनाची आवश्यकता असली तरी त्यासाठी जैनाचारामध्ये मर्यादा घालून दिलेल्या आहेत. त्या मर्यादेपैकी 'रात्रि भोजन त्याग' ही एक महत्त्वाची मर्यादा आहे. तसे पाहिले तर वैदिक व अवैदिक दोन्ही ग्रंथामध्ये रात्रि भोजनाचा निषेध केलेला आहे. वैदिक दर्शनाचा 'भारत' नांवाचा ग्रंथ, महाभारतातील शांतिपर्व, मार्कण्डेय पुराण इ. जैनेतर ग्रंथामध्ये रात्रि भोजनाचा स्पष्ट निषेध आहे.

केलेले भोजन पचणे ही एक अत्यंत महत्त्वाची बाब आहे आणि त्यासाठी योग्य तो कालावधी हवा आहे. तो कालावधी रात्रि भोजन केल्यास मिळत नाही. दिवसा भोजन केल्यास योग्य तो कालावधी मिळतो म्हणून पचन व्यवस्थित होते.

सूर्य प्रकाशामध्ये अशी शक्ति आहे की, त्यामुळे शरीरास घातक अशा जीव जंतूंची वाढ होत नाही उलट नाश होतो. याचे कारण असे की, सूर्य प्रकाशात अल्ट्राव्हायलेट किरण असतात. त्या किरणामुळे जंतूंची वाढ होत नसते. रात्री कितीही प्रखर दिवे वापरले तरी देखील त्यांच्या प्रकाशात सूर्य प्रकाशाचे गुण येत नाहीत. रात्री जीवजंतूंची वाढ वेगाने होते. त्यामुळे अशा वेळी भोजन केल्यास अपचन, पेपटिक, अल्सर इ. रोग होतात.

सूर्य प्रकाशाचे सहाय्याने शरीरात निसर्गत:च पाचकरस निर्माण होत रहातो. म्हणजेच रात्री पाचकरसाचे प्रमाण कमी असते. दिवसा सूर्य प्रकाशात ऑक्सीजनचे प्रमाण जास्त असते. रात्री हेच प्रमाण फार कमी होते. त्यामुळे पचन होण्यास अधिक वेळ लागतो म्हणजे आंतड्याना योग्य विश्रांति मिळू शकत नाही.

शिवाय रात्री भोजनाने 'मादकता व अब्रह्म' वाढण्याची जास्त शक्यता असते ज्याचा परिणाम भावी संततीवर अनिष्ट होतो.

## रसपरित्याग–

आपण जे अन्न सेवन करतो त्यामुळे आवश्यक व योग्य प्रमाणात रस मिळणे आरोग्यदायी असते. चुकून एखादा रस जास्त जर घेण्यात आला तर शरीराचा मेटॅबॉलिझम्, मेटॅबॉलिक पूल बिघडत असतो. तेव्हा हा बिघडलेला मेटॅबॉलिक पूल सुधारण्यास रस परित्यागामुळे मदत होते, अवकाश मिळतो. अग्निमांद्यता टळते. अनेक व्याधि होण्यापूर्वीच निसर्गत: सुधारणा घडून येते. शरीराला योग्य प्रकारे विश्रांति मिळून शरीर कार्यक्षम रहाते. बुद्धिमंदता येत नाही.

## अनशन, उपोषण, अवमोदर्य–

शरीरास विश्रांतीची गरज असते. त्या दृष्टीने अनशनादि आवश्यक आहे. अनशनामुळे कित्येक हानिकारक जीवजंतु औषधाशिवाय नाहीसे होतात. आतडे शुद्ध होते. तसेच शरीरातील अनेक प्रकारचा नको असलेला साठा कमी होतो. मधुमेह, ब्लडप्रेशर, किडनीचे आजार, श्वसन संस्थेतील आजार, हार्ट अटॅक, मेंदूतील रक्तस्राव, रक्तवाहिन्यांचे रोग, स्नायूचे रोग होत नाहीत. चरबीचा अनावश्यक साठा वाढत नाही. अवयव कार्यक्षम रहातात व मेंदूही कार्यक्षम रहातो. जवळ जवळ ८०% रोगी आवश्यकतेपेक्षा जास्त भोजन करून रोगाना आमंत्रण देतात. ( –डॉ. विधानचन्द्ररॉय, बंगाल. )

शरीराचे सांधे, स्नायु कार्यक्षम रहातात. ॲलडिहाइड, युरिया, कोलेस्टॉल आदि लेव्हल्स योग्य ठेवल्या जातात.





### हातचे दळण–

हातच्या दळलेल्या पीठामध्ये जीवनसत्वे कायम असतात कारण अनावश्यक उष्णता, विद्युत निर्माण होत नाही. यंत्राच्या दळणामध्ये एक तर स्वच्छता नसते आणि दुसरे म्हणजे वेगाने होणाऱ्या घर्षणामुळे उष्णता वाजवीपेक्षा जास्त निर्माण होते व कांही जीवनसत्वे कमी होतात. स्निग्धता कमी होते. स्वच्छता नसल्यामुळे रोगजंतूंचा प्रसार होऊ शकतो. विशिष्ट रासायनिक घटक व क्षार यांचा घर्षणामुळे निर्माण झालेल्या उष्णतेने नाश होतो. या सर्व कारणामुळे हातचे दळण आरोग्याच्या दृष्टीनें हितावह आहे.

### मद्य निषेध–

मद्य अनेक प्रकारचे आहे. मद्यपान केल्यामुळे सर्वात अगोदर बुद्धीवर अनिष्ट परिणाम होतो. सदसद्‌विवेक बुद्धि नष्ट होते. केवळ आरोग्याच्या दृष्टीनेंही विचार करावयाचा झाल्यास मद्य, मदिरापान केल्याने आरोग्य नष्ट होते. सर्वात प्रथम मद्यामुळे पचन शक्ति बिघडते. शरीरावरचे नियंत्रण नाहीसे होते. पोटांचे आजार हमखास होतात. आतडे सुजून अन्न पचन तर होतच नाही उलट दुसरेही अनेक रोग होतात.

मद्य प्राशनानंतर थोडयाच वेळात डोळे व चेहरा लाल होतो. यामुळे कांही मदिराभक्त म्हणतात की मद्य शक्तिवर्धक आहे पण वैद्यकशास्त्राप्रमाणे वास्तविकता अशी आहे की, मद्यातील द्रव्ये म्हणजे विजातीय द्रव्ये, शरीरात गेल्यानंतर शरीरातील कोषाणु संघर्षशील होतात आणि हृदय जलदगतीने रक्त फेकू लागते. याचाच परिणाम म्हणजे डोळे व चेहरा लाल दिसणे होय.

मद्ये सडलेल्या वस्तुपासून बनवतात. सडलेल्या वस्तु म्हणजे अनेक जंतूची प्रेते, रोगोत्पादक जंतु. त्यामुळे मद्य सेवनामुळे आरोग्य न बिघडले तरच आश्चर्य

### शाकाहार, आरोग्याची नांदी–

जगातील कोणत्याच धर्माने मांसाहाराची पुष्टि केली नाही. पण जिव्हा लोलुपी मानवाने विवेक सोडला. आज मांसाहार बोकाळलेला आहे तर अनेक रोगही बळावले आहेत. जगातील अनेक आरोग्य संस्थानी शाकाहार आरोग्यदायक आहे असा निर्वाळा दिला आहे.

असा निर्वाळा देण्यासाठी मांसाहार आणि शाकाहार याचा तौलनिक अभ्यास करणे अगत्याचे ठरते पण त्यासाठी वेगळाच ग्रंथ लिहावा लागेल म्हणून या लघु कायलेखाद्वारे अगदी थोडक्यात शाकाहारापासून कसे फायदे आहेत हे पहावयाचे आहे. या लेखात फक्त कांही प्रयोग व संस्यांची, विद्वानांची मते नमूद करावयाची आहेत ज्यामुळे शाकाहारास पुष्टि मिळेल.

रॉबर्ट मौकेरिसन ( अमेरिका ) या शास्त्रज्ञानें शाकाहार आणि मांसाहार दोन्हींचे प्रयोग उंदरावर केले. कांही उंदराना मांसाहारावर व कांही उंदराना शाकाहारावर ठेवले ( फंगस वनस्पति खावयास दिली ) प्रयोगांती असे दिसून आले की, शाकाहारावर जगलेल्या उंदरांचे आरोग्य उत्तम आहे तर मांसाहारावर असलेल्या उंदराना अनेक रोग झाले.

फ्रॅंकफुर्ट युनिव्हर्सिटीच्या संशोधन विभागाने ज्ञात रोगांची माहिती संकलित केली. १९७५ अखेर २९००० रोगांची नोंद झाली आहे. दरवर्षी यादी वाढतच आहे. याचे कारण शाकाहाराची उपेक्षा दुसरे काय ?

इंग्लंडचे अेक कृषि सल्लागार सर जेम्स स्कॉट वॉटसन् यांनी दिलेला निर्णय विचारणीय आहे. ते म्हणतात " वाढत्या लोकसंख्येप्रमाणे अन्न समस्या अति गंभीर आहे. या समस्येवर उपाय म्हणजे लोकाना मांसाहारापासून परावृत्त करुन त्यांना शाकाहारी व दुग्धाहारी बनवणे आहे "–




विज्ञानानेच हे आता सिद्ध केले आहे की, " जसजसा माणसाचा मांसाहाराकडे कल वाढत जाईल तसतशी त्याची पचन संस्था कमकुवत होत जाईल. वनस्पति पचनासाठी लागणारे विकार ( Esszymes ) नाहीसे होतील.'

इंग्लंडचे प्रोफेसर हेग यानी सिद्ध केले आहे की, मांस व अंड्यामध्ये युरिक ॲसिड असते ते दमा, मधुमेह, डोकेदुखी इत्यादिंचे कारण आहे.

इलिनोइस के हावर्ड या विश्वविद्यालयाने जाहीर केले आहे की, वयस्क माणसास ३० ग्राम प्रोटीन लागते ते फळभाज्यातूनच मिळते.

युरोपमध्ये एका संस्थेने अनेक प्रयोगाद्वारे असे सिद्ध केले आहे की, शाकाहाराद्वारे ९५ ते १०० टक्के प्रोटीन मिळते.

न्यूयार्क ( अमेरिका ) मध्ये न्यूयार्क ट्रिब्यून या मासिकाचे संपादक मि. हेरेस ग्री रेले यानी जाहीर केले आहे की, मांसाहारीपेक्षा शाकाहारी १० वर्षे अधिक जगतो.

असे अनेक पुरावे देता येतील ज्यामुळे हे सिद्ध होईल की शाकाहार, दुग्धाहार अधिक उत्तम असून मांसाहार सर्वथा त्याज्य आहे.

जैनाचाराचा श्रीगणेशाच मुळी सप्तव्यसन त्यागाने होतो. पैकी मांस व मद्य त्याग करण्याचा जो उपदेश दिला आहे तो पाहता असे वाटते की, जैनाचारामध्ये ज्याचा उपदेश दिला आहे तो आरोग्याला पोषक आहे हे जगाला कळाले पण फार उशीरा. कांद्याचेच घ्याना. कांदा हा जैनाचाराप्रमाणे त्याज्य-असेवनीय आहे. त्याची पुष्टि अेका अमेरिकन शास्त्रज्ञाने केली. शरीरास विघातक अशा अनेक वस्तूंची यादी त्यानी केली. त्यामध्ये कांद्याचा पहिला क्रमांक आहे हे त्याने सिद्ध केले आहे.

२२ प्रकारच्या ज्या अभक्ष्य पदार्थांचा निर्देश जैनाचार करतो त्यामध्ये बहुतांशी अभक्ष्य पदार्थ आरोग्य नष्ट करणारे आहेत असेच विज्ञान म्हणते.

१२ व्रतांचा उपदेश जैनाचार्यांनी दिला आहे, अष्ट मूळ गुणांचा निर्देश केला आहे, भक्ष्य अभक्ष्यांची सविस्तर चिकित्सा केली आहे. त्यामध्ये आरोग्याला विघातक असे कांहीच नाही. मात्र कांही आरोग्यशास्त्र विशारदानी अर्धवट प्रयोगाद्वारे जे पदार्थ आरोग्यवर्धक आहेत म्हणून सिद्ध केले त्यापैकी अंडे, मासे इ. असे अनेक पदार्थ आहेत. ते घातकच आहे असे शेवटी सिद्ध झाले आहे. धूम्रपान, तंबाखू अशा लहानसहान मौजेखातर सुरू होणाऱ्या घातक संवयी लावून न घेण्याचा उपदेश पाहिला म्हणजे असे वाटते की, जैनाचार्यांनी आत्मसाधनेसाठी आधारभूत शरीराला निरोगी व कार्यक्षम ठेवण्याकडे देखील लक्ष दिले आहे आणि तदनुरूप आचरणाचा उपदेश दिला आहे.

त्या आचरणामुळे मुमुक्षु जीवाची आत्मसाधना निराबाध सफल होण्यास मदत होते.






# जैन–आचारधर्म

**धर्माचे स्वरूप ( Concept of Religion )–**

मानवी आचारसंहिता म्हणजे केवळ धर्माचे अंग नव्हे तर तो धर्मच आहे असे जेव्हा म्हणण्यात येते त्यावेळी चिन्तकासमोर हा विचार प्रामुख्याने येतो की आचार हा धर्म कसा? व धर्माची मग व्याप्ती तरी किती आहे? धर्म म्हणजे जो धारण करावयाचा आहे असे तत्त्व व ज्या तत्त्वाचरणाच्या बळावर मानवास चिर शान्ती व सुख प्राप्त होईल. या संदर्भात विचार केला तर धर्माचा प्रसार फार मोठा आहे. सुखद ठरणाऱ्या धर्माची व्याख्या करणे इतके सोपे काम नाही. इतिहासाकडे दृष्टिक्षेप केला तर धर्म शब्दाला अनेक उत्क्रान्ती काळातून वेगवेगळ्या भूमिका घ्याव्या लागल्या. आगम काळामध्ये तर धर्म शब्दाचा अर्थ आत्मनिष्ठ व आत्मज्ञानपर होता. रागद्वेषाचा त्याग करून शुद्ध आत्म्याच्या स्वरूपाची प्राप्ती म्हणजे 'धर्म' या शब्दाचा अर्थ अभिप्रेत झाला. याचा अर्थ असा की आगमकाळात 'धर्म' शब्दाचे दोन अर्थ करण्यात आले– १ वस्तु स्वभाव[1], २ आचार. ज्या वस्तूचा जो स्वभाव आहे तोच त्या वस्तूचा धर्म. व्यवहारामध्ये याची उदाहरणे अनेक आढळतील. सामान्यपणे अग्नीचा स्वभाव उष्ण किंवा जलाचा स्वभाव थंडपणा म्हणजे उष्णता किंवा शीतलता हे अनुक्रमे अग्नी व पाणी यांचे स्वभाव आहेत, हाच यांचा धर्म. ज्याप्रमाणे हा धर्म जड वस्तूच्या अपेक्षेने दिसतो. त्याप्रमाणे असा धर्म भेद चेतन वस्तूमध्ये दिसतो. स्वभावधर्म हा दोन्ही पदार्थात जड व चेतन यामध्ये आहे. परंतु यात विशेषता ही की आचरणरूप केवळ चेतन आत्म्यामध्येच दिसून येतो. खरे तर धर्म शब्दाचा प्रयोग आत्म्याच्या संदर्भात केला जातो म्हणून मूलाराधनेमध्ये असे स्पष्ट म्हटले आहे की 'धम्मेण होदि पुज्जो'[2] रत्नत्रय धर्मानेच आत्मा पूज्य आहे या आत्म्याच्या आचाररूप धर्माचा जेव्हा आम्ही विचार करू लागतो त्यावेळी अनेक तत्त्व दृष्टि समोर येतात. या धर्माचा विचार करताना आत्मा परमात्मा, विश्व ईश्वर, जगत् याना आधार असलेले तत्त्व– पुनर्जन्म, कर्मबंधन, कर्म-हेतु व त्या कर्मापासून मुक्ती आदी विषयाचे निरूपण करण्यात येते.

वस्तुतः जैनदर्शनाचा इतिहास बघितला तर अनेक आचार्यांनी या आचार धर्माची यथार्थ मीमांसा आपल्या दर्शन किंवा अध्यात्म ग्रंथात केलेली आहे. जैन दर्शनाच्या इतिहासातील अग्रगण्य आचार्य कुन्दकुन्दानी हा विचार सडेतोडपणे व वादातीतपणे मांडला व त्याचे अनुकरण उत्तरवर्ती आचार्यांनी केले. आचार्य कुन्दकुन्द म्हणतात–[3]

चारित्तं खलु धम्मो धम्मो जो सो समो त्ति णिद्दिट्ठो । मोहक्खोहविहीणो परिणामो अप्पणो हु समो ।।

अर्थात् चारित्र म्हणजे धर्म. हा धर्म समभावरूप आहे व हा साम्यभाव रागद्वेष मोहाच्या अभावाने प्राप्त होतो. याचा अर्थ असा की मोह, क्षोभ, उद्वेग यांनी रहित अशी प्रवृत्तीच धर्म आहे. क्रोध, मान, माया व लोभरूप कषाय भावामुळे विकृती उत्पन्न होते. यामुळे आत्मा विभावरूपात परिणमतो. त्याच्यामध्ये विकार निर्माण होतात. कषायभावांच्या अभावामुळे साम्यावस्था उत्पन्न होते व आत्मा आपले खरे आचार पाळू लागतो.

**धर्माचे मूळ–**

आचाराला धर्माचा आधार मानून जरी आम्ही धर्माची मीमांसा करू लागलो तरी त्याचे मूळ लक्षात घेणे जरूरी आहे. आत्मा ही स्वतंत्र शक्ती आहे. ती ज्ञान, दर्शन, सुख व वीर्य यांनी ओतप्रोत भरली आहे. स्वतःच्या अस्तित्वासाठी या शक्तीला दुसऱ्यावर अवलम्बून राहावे लागत नाही. या शक्तीला वेगवेगळ्या आगम-शास्त्रात वेगवेगळ्या पद्धतीने विशद केले आहे.

---

१. धम्मो वत्थुसहावो– कत्तिगेयाणुपेक्खा गा. ४७६. २. मूलाराधना–गाथा १८५९. ३. प्रवचनसार–१.७.




वास्तविक पाहता धर्माचे मूळ सम्यग्दर्शन सांगितले आहे. सम्यग्दर्शन या शब्दाने आत्मद्रव्य हे स्वतंत्र आहे असा विश्वास प्रकट होतो. आचार्यांनी तर इथपर्यंत सांगितले आहे की जो रत्नत्रय - धर्माने रहित आहे, तो दिगम्बर रूप धारण करूनही आत्मकल्याणापासून दूर आहे. धर्माने स्वावलम्बनरूप प्रवृत्ति निर्माण झाली पाहिजे आणि आत्म्याला धर्मात्मा असे म्हणता येईल. कारण भावपाहुड मध्ये म्हटले आहे की[1]–

धम्मम्मि णिप्पवासो दोसावासो य उच्छु फुल्लसमो । णिप्फलणिग्गुणयारो णडसवणो णग्गरूवेण ॥

आचार्य कुन्दकुन्दानी चारित्रालाच आत्म्याचा स्वधर्म म्हटले आहे. असे चारित्र समतेवर अवलंबून आहे. कारण ज्या साम्यावस्था तेव्हाच मिळू शकते जेव्हा व्यक्ती सावद्य अर्थात पाप व्यापाराचा त्याग करतो. रागद्वेषाने रहित होऊन आकुलता राहत नाही, तो निराकुल होतो. मोक्षपाहुडामध्ये पण सांगितले आहे की[2]–

चरणं हवइ सधम्मो घम्मो सो हवई अप्पसमभावो । सो रांगरोसरहिओ जीवस्स अणण्णपरिणामो ॥

अर्थात् साम्यभाव प्राप्त झाल्यावर राग - द्वेषाने मलिन झालेल्या वृत्ती नष्ट होतात व व्यक्तीमध्ये तप व त्यागाची भावना निर्माण होते. बाह्य व अभ्यन्तर शुद्धी ही आचार व विचारांच्या शुद्धीवर अवलंबून आहे. व शेवटी रत्नत्रयाने कर्माचे बंधन दूर सारून जीवास मुक्ती प्राप्त होते.

जैन आचाराचे मूळ ' सम्यग्दर्शन म्हणून पूर्वी सांगितले. जैनाचार्य कुन्दकुन्द यांनी ' दंसणमूलो धम्मो ' असे जेव्हा सांगितले तेव्हा त्याचा अर्थ असा की आत्म्याची दृढ अवस्था सम्यग्दर्शन आहे. जीव हा आपल्या सर्व उपाधींचा त्याग करतो व शुद्धत्वाचा अनुभव करतो, तेव्हा त्याचे कर्म बंधन तुटावयास लागते. आत्म्याचे स्वरूप त्याच्या बंधनाचे कारण त्यापासून मुक्ती व त्याचा उपाय आदी गोष्टीवर विश्वास ठेवणे सम्यक्त्व आहे. अनेक आचार्यांनी याच गोष्टीला दुसऱ्या दुसऱ्या शब्दात सांगितले. उमास्वामी आचार्य म्हणतात की जीव, अजीव आदी सात तत्त्वावर श्रद्धान करणे म्हणजे सम्यग्दर्शन होय. सम्यक्त्वाला धर्माचे मूळ म्हणण्याचे कारण की मोक्षमार्गामध्ये तत्त्वज्ञानापेक्षा ही समीचीन आस्था - श्रद्धा अधिक महत्त्वाची आहे. वास्तविक पाहिले तर आस्था किंवा श्रद्धा धर्माची आधारभूमिका आहे कारण यावरच शील किंवा आचाराचा महावृक्ष वाढलेला असतो. यापुढे पण आचार्य सांगतात की मूळात जर खरे श्रद्धानच नसेल तर ज्ञान पण कार्यकारी- यथार्थ होऊ शकत नाही. ज्ञानाला देखील उपयोगी व हितप्रद करण्याचे काम देखील सम्यग्दर्शनच करते. आचार्यांनी देखील असे सांगितले की–

सम्मत्तादो णाणं णाणादो सव्वभावउवलद्धी । उवलद्धपदत्थे पुण सेयासेयं वियाणेदि ॥

आत्म्याचे अर्थात सम्यग्दर्शनामुळे ज्ञान पण सम्यक् होते. सम्यग्ज्ञानाने पदार्थाचे ज्ञान होते. पदार्थ उपलब्धीमुळे कल्याण–अकल्याण मार्ग स्पष्ट होतो.

सम्यक्त्वाशिवाय ज्ञान, तप व चारित्र मोक्षमार्गाचे कारण होऊ शकत नाही. सम्यदर्शन कर्मधूळ स्वच्छ करण्यास जलप्रवाहाप्रमाणे आहे, ज्याप्रमाणे जलाचा वेग मातीला प्रवाहित करतो त्याप्रमाणे हा कर्म रजास फेकून देतो.

## आचार म्हणजे काय–

जैन धर्मात चारित्राला धर्माला स्थान दिले जाते. चारित्राची पुष्टि तत्वज्ञानाने होते. यालाच आम्ही शील म्हणतो. असे म्हणतात की, शीलाशिवाय ज्ञान नाही व ज्ञानाशिवाय शीलाला किंमत नाही. ज्ञानी लोक पण इन्द्रियांच्या आधीनतेमुळे संसारात फिरतो. इन्द्रियाच्या विषयातून विरक्त झालेला व्यक्ती चारित्रयुक्त दिसतो व त्यांना निर्वाण प्राप्त होते. मनुष्याच्या मन, वचन आणि शरीराविषयी प्रत्येक क्रियेचा संबंध शीलाशी आहे.

---

१. भावपाहुड गाथा – ७१ २. मोक्षपाहुड गाथा–५० ३. तत्वार्थसूत्र – सूत्र – ४

शीलाचे दोन अंग आहेत. प्रवृत्तीमूलक व दुसरे निवृत्तीपर. प्रवृत्तीमूलक याचा अर्थ असा की, कोणतेही कार्यात इच्छापूर्वक करणे व निवृत्तीमूलक याचा अर्थ कोणत्याही कार्यात मन जात असताना त्यास रोकणे. अशी प्रवृत्ति दोन प्रकारची असते. शुभ व अशुभ याचे देखील तीन प्रकार आहेत. मन, वचन व काय. वाईट चिन्तन करणे, ईर्षा व द्वेष करणे, इत्यादी अशुभ मानसिक प्रवृत्ति आहेत. शुभ विचार करणे, रक्षणाचा विचार करणे, दुसऱ्याचे चागले कसे होईल याचा विचार करणे यास शुभ मानसिक प्रवृत्ति म्हणता येईल. याचप्रमाणे खोटे भाषण, कठोर वचन बोलणे, निन्दा करणे, ह्या अशुभ वाचनिक प्रवृत्ति आहेत व हित-मित वचन बोलणे शुभ वाचनिक प्रवृत्ति आहेत. तसेच हिंसा, चोरी, व्यभिचार इत्यादी कार्य करणे अशुभ काय प्रवृत्ति आहे; तर दया, सेवा, मदत करणे ह्या शुभ कायिक प्रवृत्ति आहेत. यावरून माणसाच्या आचरणानी शुभत्व किंवा अशुभत्व हे कर्त्याच्या भावनेवर कसे अवलंबून आहे स्पष्ट होते. कोणतीही प्रवृत्ति करीत असताना कर्त्याची भावना कशी आहे हे महत्त्वाचे आहे. म्हणून आपल्या भावना शुभ ठेवून कार्यात प्रवृत्ति ठेवणे म्हणजेच सदाचार. त्यालाच आम्ही शील म्हणतो. आचरणामध्ये सयम, समता व एकाग्र विचार या चांगल्या प्रवृत्ति समजल्या जातात. खऱ्या आचरणासंबंधी आचार्य कुन्दकुन्द सांगतात–

जीवदया दम सच्चं अचोरियं बंभचेरसंतोसे । सम्मद्दंसण णाणं तओ य सीलस्स परिवारो ॥

अर्थात् जीवदया, इन्द्रिय-दमन, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य, सन्तोष, सम्यग्दर्शन, ज्ञान व तप हे सच्चारित्राचे अंग आहेत. आचरण करणाऱ्यामध्ये पण तारतम्य असते. या आचरणातील फरकावरून जैन आचार संहितेत दोन भेद केले आहेत– १) मुनींचा आचार, २) श्रावकाचार.

## मुनींचा आचार धर्म–

सामान्यपणे आचारधर्मात श्रेष्ठ ध्येयस्वरूप आचारण मुनीचे आहे. ते अधिक विशुद्ध आहे म्हणून मुनिधर्माचा प्रथम विचार करण्यात येतो. साधूच्या आचारांचे प्रामाणिक कथन करणारे कांही आचार-ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. प्रामुख्याने भगवती–आराधना, मूलाचार, शीलपाहुड, प्रवचनसार, इत्यादी ग्रंथ मुनिधर्माची विस्तृत चर्चा करतात. त्यातील प्रमुख अशा आचार अंगाचे विवेचन येथे दिले आहे. **पंच महाव्रते–** अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य व अपरिग्रह. **पाच समिती–** प्रमाद सोडून चालणे (ईर्या), बोलणे (भाषा), भोजन करणे (एषणा), पदार्थांना उचलून ठेवणे ( आदान निक्षेपण ) व मलमूत्राचे विसर्जन करणे ( उत्सर्ग ) पाच इंद्रियाचा निरोध. सहा आवश्यके आणि केशलोच, नग्नत्व, स्नान न करणे, जमीनीवर झोपणे, दात न घासणे, उभे राहून जेवण करणे, दिवसातून एकदा आहार घेणे, हे अठ्ठावीस मूलगुण साधूसाठी सांगितले आहेत. त्याचप्रमाणे भूक, तहान, शीत, उष्ण, दंश-मशक, अचेल, अरती, चर्या, शय्या, आक्रोश इत्यादी बावीस परिषह सांगितले आहेत. ते साधु लोक स्वेच्छेने सहन करतात. स्वाध्याय व आत्म निरीक्षण करण्यात सदा ते मग्न असतात. वासना, तृष्णा, विषयाभिलाषा, त्यागी व सर्व प्राण्यावरोबर त्यांचा मैत्रीभाव असतो. मुनीचे व्रत हे इतके कठीण आहे की, मुनी राग-द्वेष मोह इत्यादी कारणांचा त्याग तर करतातच परन्तु दुसऱ्याला ताप देणाऱ्या सत्य वचनाला देखील त्याज्य समजतात. साधूसाठी आवश्यक कार्यात सामायिक, चतुर्विंशतिस्तव वंदना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान व कायोत्सर्ग पण आहेत. सामायिक मध्ये[1] समभाव उत्पन्न करण्यासाठी जीवन-मरण, लाभ-अलाभ, इष्ट-अनिष्ट, स्व-परभाव, शत्रु-मित्रभाव, सुख-दुःख, संयोग-वियोग यामध्ये राग-द्वेष नसतो, त्यामुळे समत्वरूप वृत्ति निर्माण होण्यास मदत होते. सामायिकाच्या पाठीमागील उद्देश वीतराग धर्माची प्राप्ती व्हावी असा आहे व त्यासाठी राग व द्वेषाचा त्याग करावा लागतो. ज्याप्रमाणे अभ्यासूला अक्षर व शब्दाची आकृती बघून तो शब्द व अक्षर लिहू शकतो, त्याप्रमाणे आत्माभ्यासी वीतराग, सर्वज्ञ व हितोपदेशी तीर्थंकरांची वंदना, स्तुती व भक्ती करीत तो आत्मस्वरूप प्राप्त करण्याचा प्रयत्न करतो.

---

१. जीविदमरणे लाहालाहे संजोय–विप्पओगे य । बंधुरि सुखदुक्खादिसु समदा सामायियं णाम ॥ मूलाचार १।२३.




साधुसाठी प्रायश्चित्त सांगितले आहे. साधु किंवा मुनी, मन, वचन व कायाने कोणताही अपराध घडल्यावर पश्चात्ताप प्रकट करतात व त्यासाठी प्रायश्चित्त घेतात. प्रत्याख्यान याचा अर्थ त्याग असा आहे– म्हणून मुनी मन, वचन व शरीराने अशुभ कर्माचा त्याग करतो. तपाने आत्मशुद्धी होते व कर्माची निर्जरा होते. कायोत्सर्ग शरीरापासून आपले ममत्व दूर करते. त्यामुळे वीतरागवृत्ती वृद्धीगत होते. आचार्य कुन्दकुन्द म्हणतात की साधु हा रागद्वेषाच्या आधीन जात नाही. अशा मलिन प्रवृत्तींचा तो त्याग करतो–

वयसम्मत्तविसुद्धे पंचेंद्रिय संजदे णिरावेक्खे । ण्हाएउ मुणी तित्थे दिक्खासिक्खासुण्हाणेण ।।

साधुचे आचरण विशुद्ध असते. इन्द्रियसंयम हा त्यांचा उद्देश असतो. कोणत्याही आचार किंवा क्रियेच्या मागे प्रसिद्धी मिळावी, पूजा-प्रतिष्ठा मिळावी हा उद्देश नसतो. त्याना या लोकात किंवा परलोकात विषयभोग प्राप्त व्हावे अशी इच्छा नसते.

साधूंच्या आचार धर्माची अनेक वैशिष्टये लक्षात येतात. त्यांच्या जीवनात आचार-विचारांच्या शुद्धतेस विशेष प्राधान्य दिले आहे. अहिंसेचे पालन त्यांना अगदी सूक्ष्मतेने करावे लागते. जैन साधु कोणासही कशाची याचना करीत नाही. किंवा कोणासमोर आपले हात पसरत नाही. जड किंवा चेतन या दोन्ही पदार्थासंबंधी ममत्व दूर केले असते. उत्तम क्षमा, मार्दव, आर्जवादी दहा धर्माचे तो पालन करतो. अनासक्तरूप प्रवृत्ति वाढावी म्हणून संसार, शरीर, भोग व कर्मबंधन इत्यादीविषयी तो चिन्तन करतो. बारा भावनेच्या चिन्तवनाने वैराग्य भावना वाढीस लागते. अनुप्रेक्षा ही साधूच्यासाठी आवश्यक बाब आहे. म्हणूनच कुन्दकुन्द आचार्यांनी बारस– अणुवेक्खा म्हणून स्वतंत्र ग्रंथ लिहला याचे विशेष विवरण कार्तिकेयानुप्रेक्षा ग्रंथात केले आहे.

मुनींचे आचार वर्णन करताना त्याना रात्री चर्या करणे पण नाकारले आहे. मूलाचार ग्रंथात या गोष्टीचा उल्लेख आहे.

तेसिं चेव वदाणं रक्खट्टं राइभोयणणियत्ती । अट्ठय पवयणमादा य भावणादो य सव्वाओ ।।

अर्थात् रात्रि चर्येसाठी गेले तर व्रतभंग होतो. दशवैकालिक व उत्तराध्ययन सूत्रात पण त्यागाचा निर्देश केलेला आहे. मूलाराधना व मूलाचारामधूनही पिण्डशुद्धी, आहारशुद्धी, विहार करण्याविषयी नियम, अनगार भावना इत्यादीचा प्रचार झाला आहे.

### श्रावकाचार–

जैनधर्मामध्ये प्रथम स्थान मुनीना असल्यामुळे त्यांच्या आचारसंहितेचा विचार केला. आता दुसरा दर्जा गृहस्थाना आहे. म्हणून त्यांच्या संबंधी येथे विचार केलेला आहे. श्रावकांच्या आचाराविषयी जैन साहित्य विपुल प्रमाणात आहे. काळ जसा परिवर्तित होत गेला तसा त्यांच्या आचार-विचारात फरक होत गेला. याचे मूळ आम्हाला आचार्य कुन्दकुन्दाच्या 'चारित्रपाहुड' ग्रंथात दिसते. त्यात चारित्राचे दोन भेद सांगितले आहे–

### सागार व अनगार–

सागारांच्या आचरणासंबंधी सांगताना आचार्य म्हणतात–

दंसण वय सामाइय पोसह सचित्त राइभत्ते य । बंभारंभ परिग्गह अणुमण उद्दिट्ठ देसविरदो य ।।

अर्थात् दर्शन, व्रत, सामायिक, प्रोषधोपवास, सचित्तत्याग, रात्रिभुक्तित्याग, ब्रह्मचर्य, आरम्भत्याग, परिग्रहत्याग, अनुमतीत्याग, उद्दिष्टत्याग हे अकरा देशविरताचे संयम भेद सांगितले आहेत. दर्शनप्रतिमेत श्रावक संसार, शरीर व भोगापासून विरक्त होऊन आस्था ही दृढ होते. आत्मा परलोक याविषयी विश्वास वाढतो. व्रत प्रतिमेमध्ये साम्यभाव निर्माण व्हावा म्हणून पाच अणुव्रते, तीन गुणव्रते व चार शिक्षाव्रताचे पालन सांगितले आहे.







सामायिक प्रतिमेत क्रोधादी विकारांना जिंकण्यासाठी साधक नियमाने सामायिक करतो. प्रोषधोपवासामध्ये तपश्चरणाची वृद्धी व्हावी म्हणून प्रत्येक अष्टमी व चतुर्दशीला उपवास करणे. सचित्तत्याग प्रतिमेत अहिंसेचे पालन व्हावे म्हणून हिरवी भाजी, कन्दमूळ, फलादी भक्षणाचा त्याग केलेला असतो. रात्रीला सर्व प्रकारच्या भोजनाचा त्याग म्हणजे रात्रिभोजन त्याग प्रतिमा होय. ब्रह्मचर्याचे पूर्ण पालन म्हणजे ब्रह्मचर्य प्रतिमा. जीवनासाठी आवश्यक असलेल्या आरंभाचा त्याग म्हणजे आरम्भत्याग प्रतिमा होय. परिग्रहाच्या त्यागाचा अभ्यास करणे म्हणजे परिग्रहत्याग. आरम्भ किंवा परिग्रहासंबंधी कार्यात अनुमतीपण न देणे म्हणजे अनुमती त्याग प्रतिमा होय. आपल्यासाठी तयार केलेल्या भोजनाचा त्याग म्हणजे उद्दिष्ट त्याग प्रतिमा होय. कुन्दकुन्द आचार्यांच्या मताप्रमाणे तीन गुणव्रतात दिग्व्रत, देशव्रत, अनर्थदण्डव्रत व भोगोपभोग परिमाण व्रतांना व शिक्षा व्रतामध्ये सामायिक, प्रोषधोपवास, अतिथिसंविभाग व सल्लेखना यांचा समावेश केला आहे.

**श्रमकधर्म अंग–**

जैन धर्मामध्ये श्रावकाचाराच्या परिपूर्तीनंतर अकराव्या प्रतिमेत सूक्ष्म व स्थूल आचार पालनामुळे फरक पडतो. त्याचे दोन भेद पडतात. ते म्हणजे क्षुल्लक व ऐल्लक. आचार्य कुन्दकुन्दाच्या म्हणण्याप्रमाणे मुनीनंतर श्रेष्ठ श्रावक म्हणजे गृहत्यागी श्रावक होय. याठिकाणी क्षुल्लकास गृहत्यागी म्हटले आहे. परन्तु याचा अर्थ भिक्षुक असा होतो, क्षुल्लकाची किंवा ऐल्लकाची दीक्षा कुणास द्यावी यासंबंधी पण एक वेगळा विचार दिसून येतो. दीक्षाप्रक्रियेत याचा अन्तर्भाव होतो. हीन कुलामध्ये जन्मलेल्यास, विद्या व शिल्प यांनी उपजीविका करणाऱ्यास दीक्षा घेता येत नाही. त्यावर संस्कार करता येत नाही. म्हणून क्षुल्लकाने आपल्या दर्जाप्रमाणे व्रतादि धारण करुन संन्यास मरण साधावे व त्याने एक खंडवस्त्र वापरावे असा आशय आचार्य जिनसेन सांगतात.

क्षुल्लकासंबंधी सांगताना ते म्हणतात की, क्षुल्लकाला एक वस्त्र धारण करावयास पाहिजे तो अधिक दुसरे वस्त्र ठेवू शकत नाही. मुनीप्रमाणे उभ्याने भोजन करू शकत नाही. त्यांच्यासाठी आतापन योग किंवा वृक्षमूल योग किंवा दुसऱ्या योगाचा नेहमी निषेध केलेला आहे. ते न्हाव्याकडून केस कापून घेऊ शकतात किंवा केशलोच पण करू शकतात. ताटात जेवण घेऊ शकतात. लंगोटी त्यांनी धारण करावी.

**ऐल्लक–**

अकराव्या प्रतिमेचे दोन भेदांचा उल्लेख सर्वप्रथम आचार्य वसुनंदीने केला. पंधराव्या शतकापर्यन्त तो प्रकार चालू होता. सोळाव्या शतकात क्षुल्लक व ऐल्लक शब्दाचा प्रयोग झाला. ऐल्लक शब्द तसा अत्यन्त प्राचीन आहे. भगवान् महावीरांच्या पूर्वे जैन साधुना 'अचेलक' म्हटले जात असे. जे वस्त्र धारण करीत नाहीत, त्यांना अचेलक म्हणतात. भगवती आराधना, मूलाचार इत्यादी ग्रथात प्राचीन दिगम्बर साधूसाठी अचेलक पदाचा वापर होतो. परन्तु भ. महावीरांच्यावेळी साधूसाठी नग्न, दिगम्बर, निर्ग्रंथ इत्यादी शब्दांचा वापर होऊ लागला. महात्मा बुद्ध व त्याचा शिष्य परिवार वस्त्रधारी होता त्यामुळे जैन साधूपासून फरक करण्यासाठी त्यांनी जैन साधूना 'णिगंठ' नावाचा प्रयोग केला. अकराव्या प्रतिमेत जे अगदी कमी वस्त्र वापरत असत त्याला अ – ईषत् + चेलक: = वस्त्र धारण करणारे. अचेलकाची जागा–ऐल्लक पदाने घेतली. यावरून हे समजावयास हरकत नाही की, 'ऐलक' हा आधुनिक शब्द असला तरी त्याचे मूळ रूप 'अचेलक' असे होते. म्हणूनच आचार्य समन्तभद्राने अकराव्या प्रतिमाधारीसाठी 'चेलखण्डधर' हे विशेषण वापरले आहे व ते सार्थक आहे. म्हणून ऐलक म्हणजे केवळ लंगोटी धारण करणारे, याशिवाय त्याना सर्व वस्त्र व पात्र ठेवण्याचा नकार दिला आहे त्यांच्यासाठी पण मुनीप्रमाणे उभे राहून आहार घेणे, केशलोच करणे, मयूर पिच्छिका ठेवणे इत्यादी गोष्टींचे विधान केले आहे. म्हणून विद्वान् लोक त्यांना 'ईषन्मुनी' 'यती' इत्यादी नावानी संबोधित करतात.








श्राविकांच्या आचारासंबंधी कालक्रमाने विकास झालेला दिसून येतो. आचार्य कुन्दकुन्दानंतर स्वामी कार्तिकेयानी आपल्या अनुप्रेक्षा ग्रंथात यासबंधी विस्तृतपणे वर्णन केले आहे[१]. त्यांनी पण धर्माचे दोन भेद सांगून गृहस्थाच्या धर्माचे १२ भेद केले आहे. त्यात थोडे शब्दान्तर झालेले असून एकभेद अधिक आढळतो. १ सम्यग्दर्शन-युक्त, २ मद्यादीस्थूल दोष रहित, ३ व्रतधारी, ४ सामायिक, ५ पर्वव्रती, ६ प्रासुक-आहारी, ७ रात्रिभोजनविरत, ८ मैथुनत्यागी, ९ आरम्भत्यागी, १० संगत्यागी, ११ कार्यानुमोदविरत, १२ उद्दिष्टाहार विरत. यामध्ये प्रथम नावाशिवाय बाकीचे व्रत सर्वसाधारण आहे. आचार्य कुन्दकुन्दांनी मानलेल्या तीन गुणव्रतांना कार्तिकेय स्वामीनी मानले आहे, परंतु आचार्यांनी मानलेल्या सल्लेखनेचा अस्वीकार करून त्या ठिकाणी देशावकाशिक व्रत मानलेले आहे. श्रावकाचारामध्ये सर्व प्रथम अनर्थदण्डव्रताचे पाच भेद सांगणारे हे पहिले आचार्य. यांनी शिक्षाव्रताचे वर्णन चांगले केले आहे. विशेषत: अतिथिसंविभाग व्रतामध्ये चार दानापैकी आहारदानावर विशेष जोर दिलेला आहे. त्याचे इथपर्यन्त वर्णन केले आहे की केवळ आहारदान दिल्यावर तीन दान दिल्याप्रमाणेच आहे[२]. प्रोषध प्रतिमेत १६ प्रहरपर्यंत उपवास सांगितले आहे. सचित्तत्याग प्रतिमेमध्ये जो श्रावक सचित्तवस्तु खाण्याचा त्यागी आहे त्याला इतरांना सचित्त वस्तु देता पण येणार नाही[३]. तसेच रात्रिभोजन त्याग प्रतिमेसंबंधी पण आहे. ब्रह्मचर्यव्रतधारण करणाऱ्या चतुर्गतीतील व चित्रातील सर्व प्रकारच्या स्त्रियासंबंधी मन, वचन, शरीराने त्याग सांगितला आहे[४]. स्वामी कार्तिकेयांनी अकराव्या प्रतिमेच्या भेदांचा कोठे उल्लेख केला नाही. यावरून असे वाटते की कदाचित तोपर्यन्त भेद नसावेत.

स्वामी कार्तिकेयानंतर श्रावकधर्मासंबंधीचा विचार उमास्वामी आचार्यांनी आपल्या तत्त्वार्थसूत्रामध्ये केला आहे. व्रती माणसाने शल्यरहित असावे ( निशल्योव्रती–अ ७ ) असे म्हटल्यावर व्रती म्हणजे अगारी व अनगारी असे दोन भेद केले आहे. आचार्यांच्या श्रावकाव्रताचारांचे वैशिष्ठ्य म्हणजे त्यांनी अहिंसादी पाच व्रते, त्यांच्या भावना व त्यासंबंधी अतिचार याचे वर्णन सूक्ष्म रीतीने केलेले आहे. यापूर्वी असे वर्णन केलेले नाही. तसे सादृश्य बघावयाचे झाले तर आचार्य कुन्दकुन्द कार्तिकेय व उमास्वामीनी अष्टमूल गुणांचा विचार आतापर्यन्त मांडलेला नाही. तत्त्वार्थसूत्रामध्ये ११ प्रतिमेचा काहीही उल्लेख नाही. उमास्वामीच्या मते दिग्व्रत, देशव्रत व अनर्थदण्डव्रत हे तीन गुणव्रत, सामायिक, प्रोषधोपवास, उपभोग–परिभोग परिमाण, अतिथिसंविभाग हे चार शिक्षाव्रत मानलेले आहे.

श्रावकाचारासंबंधी जिज्ञासूचे समाधान करणारा ग्रंथ म्हणजे रत्नकरण्ड श्रावकाचार. वस्तुत: रत्नांचा करण्डच म्हटला पाहिजे. स्वामी समंतभद्रांनी या ग्रंथात श्रावक आचारधर्माचा विचार सांगोपांग रीतीने केला आहे. यापूर्वीच्या ग्रंथातून व्रतांचे वर्णन, प्रतिमा वर्णन, अतिचार वर्णन, दर्शनमहिमा वर्णन, समाधि मरण व मोक्ष–वर्णन आलेले आहे. मोक्षादीवर्णनाचा आधार भगवती आराधना होय. या ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणजे धर्माचे स्वरूप सत्यदेव, गुरु, शास्त्र, अष्टांगे, तीन - मूढता, आठ - मदवर्णन, सम्यग्दर्शन, ज्ञान, चारित्राचे वर्णन, अनुयोग–स्वरूप श्रावक–१२ व्रते, अकरा प्रतिमा याचे सुंदर वर्णन केले आहे. श्रावकांच्या आठ - मूलगुणांचे प्रथमत: वर्णन रत्नकरण्ड श्रावकाचारामध्येच केले आहे. श्वेताम्बर साहित्यामध्ये पाच अणुव्रत मूलगुणरूप व सात शीलव्रत उत्तर

१. तेणुवइटठो धम्मो संगासत्ताण तह असगाण । पढमो बारहभेओ दसमेओ मासिओ विदिओ ॥
समद्दसणसुद्धो रहिओ मज्जाइथूलदोसेहिं । वयधारी सामइओ पव्ववई पासु आहारी ॥
राईभोयणविरओ मेहुण - सारग - सगचत्तोय । कज्जाणुमोयविरओ उद्दिट्ठाहारविरओ य ॥

२. भोयणदाणे तिण्णि वि दाणाणि होंति दिण्णाणि ॥

३. जो णेय भक्खेदि सय तस्सण अण्णस्स जुज्जदे दाऊं । भुत्तस्स भोजिदस्स हि णत्थि विसेसो तदो को वि ॥

४. जो चउविह पि भोज्ज रयणीए णेव भुजदे णाणी । णय भुजावई अण्णं णिसिविरओ हवे भोज्जो ॥
जो आरमं ण कुणदि अण्ण कारयदि णेय अणुमण्णो । हिंसासत्तद्धमणो चत्तारंभो हवे सो हि ॥
– स्वामिकार्तिकेयानुप्रेक्षा गा. ३०४, ३०६, ३६३, ३८०, ३८२.

गुणरूप आहे. यामध्ये हे पण सांगितले आहे की ज्याप्रमाणे व्रत - प्रतिमाधारी श्रावक १२ व्रतांचे निरतिचार पालन करतो त्याप्रमाणे मूलगुणाचे[1] दर्शन प्रतिमाधारी श्रावकाच्या आचरणात त्याचे विधान केले आहे. म्हणजे-दोषरहित, सम्यग्दर्शनाचा धारक, संसार, शरीर व भोगापासून विरक्त पञ्चपरमेष्ठीचा भक्त, तत्त्वपथगृह्य तत्त्वव्रतमार्गाचा अनुगामी दर्शन प्रतिमाधारी म्हणवितो.

समन्तभद्र आचार्य परीक्षा–प्रधानी व तार्किक होते. त्यांनी मताप्रमाणे सामायिक व प्रोषधोपवासापूर्वी देशविकासिकाचा क्रम हवा. कारण याची त्या दोहोंच्या अपेक्षेने कालमर्यादा मोठी आहे. त्यांना हे पण तर्कयुक्त वाटले नाही की मरणाच्या वेळी केली जाणारी सल्लेखना आजीवन अभ्यास केल्या जाणाऱ्या शिक्षाव्रतात कशी येईल ? म्हणून त्यांनी त्याठिकाणी 'वैयावृत्य' नावाचे शिक्षाव्रत मानले. त्यांनी श्रावकांच्या व्रतासंबंधी मूलगामी संशोधन केले. अतिथिसंविभाग हे नाव अपूर्ण वाटले म्हणून वरील नाव दिले गेले. त्याचप्रमाणे भोगोपभोग-परिमाणाचे अतिचार केवळ ते भोगासंबंधीच वाटतात म्हणून त्याचा वेगळा विचार मांडण्यात आला[2].

समंतभद्रांनी अर्हत्पूजनाचे वर्णन 'वैयावृत्य' मध्ये केले. यापूर्वी पूजनास श्रावक–व्रतामध्ये कोणी सांगितले नाही. सम्यक्त्वाच्या अष्टांगामध्ये, पाच व्रतामध्ये, पांच पापामध्ये व चार दानामध्ये प्रसिद्ध व्यक्तींची नावे यात दिलेली आहे.

श्रावकाचारांचा विचार स्वामी समंतभद्रानंतर जिनसेनांच्या महापुराणात केलेला आहे. त्यात पक्ष चर्या व साधनरूप श्रावकधर्म सांगितला आहे. यामध्ये १२ व्रतांचे वर्णन आहे.

केवळ अष्टमूलगुणामध्ये मधूच्या ठिकाणी द्यूत सांगितले आहे. पाक्षिक श्रावकास कमीत कमी सात व्यसनांचा त्याग हवा. कदाचित् समन्तभद्रानंतर समाजामध्ये सप्तव्यसनाची प्रवृत्ति अधिक असावी. आचार्य जिनसेन पूजेला स्वतंत्र स्थान दिले व त्याचे नित्यमह, अष्टान्हिकमह, चतुर्मुखमह, महामह जिनचैत्यालयाच्या निर्मितीवर आचार्यांनी जोर दिलेला आहे. आजकाल प्रचलित गर्भाधानादी संस्कार व क्रियाकाण्ड यांचे जनक जिनसेनच मानले जातात.

श्रावकधर्माचे विषम स्वरूप, यानंतर आचार्य सोमदेवांच्या यशस्तिलक या महाकाव्यातील सहाव्या सातव्या व आठव्या आध्यायामध्ये दिसून येते, म्हणून या प्रकरणाना 'उपासकाध्ययन' म्हणून म्हटले जाते. त्यात मोक्षाचे स्वरूप सांगताना सम्यग्दर्शन ज्ञान - चारित्रात्मक सांगून आप्त, मूढता, अष्टांगे यांचे एक आगळे वर्णन केलेले आहे. रत्नत्रयाची आवश्यक्ता व त्याचे फळ– सुगती ज्ञानाने कीर्ती, चारित्राने प्रतिष्ठा तिहींनी मुक्ती सांगितली आहे. यातील विशेषता म्हणजे मद्य, मांस, मधु व पाच उदुम्बर फळांचा त्याग पाच अणुव्रतांच्या ठिकाणी पांच उदुम्बर फळाचा त्याग सांगणारे सोमदेव पहिलेच. यावरून मूलगुणासंबंधी दोन परम्परा सुरू झाल्या. एक - जिनसेनापूर्ववर्ती आचार्यांची व दुसरी सोमदेवांची. एवढेच नव्हे तर सोमदेवानी केलेल्या मकारादीयांचे वर्णन उत्तरवर्ती आचार्यांनी मानले आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे मांसाहारींना दया नसते, मद्यपान करणाऱ्याना सत्य दिसत नाही, मधु व पंच उदुम्बर फळांचे सेवन करणाऱ्यांना क्रूरता सोडीत नाही[3].

सोमदेव आचार्यांनी पाच अणुव्रतांचे वर्णन करून पाच पापात प्रसिद्ध होणाऱ्या पुरुषांच्या चरित्राचे वर्णन केले आहे. अहिंसा व्रताचे वर्णन करताना यज्ञातील पशुहत्येची प्रवृत्ती कशी सुरु झाली व वाढली यांचे वर्णन केले

१. सम्यग्दर्शनशुद्धः संसारशरीरभोगनिर्विण्णः । पञ्चगुरुचरणशरणो, दर्शनिकस्तत्त्वपथगृह्यः ॥
— रत्नकरण्ड श्रावकाचार– १३७

२ विषयविषतोऽनुप्रेक्षानुस्मृतिरतिलौल्यमतितृषानुभवो । भोगोपभोगपरिमाव्यतिक्रमाः पंच कथ्यंते ॥
— रत्नकरण्ड श्रा०– ९०

३. मांसाशिषु दया नास्ति न सत्यं मद्यपायिषु । अनृशंस्यं न मर्त्येषु मधुदुम्बरसेविषु ॥ — यशस्तिलक– श्रा० ७




आहे. याच श्रावकांच्या शिक्षाव्रताचे वर्णनात आप्त सेवा किंवा देवपूजा यास सामायिक म्हटले आहे. अभिषेक, पूजन, स्तोत्र, जप, ध्यान, श्रुतस्तव या सहा कर्तव्यांना आवश्यक[1] सांगून त्याचे विस्ताराने वर्णन केले आहे. आचार्यांनी या व्रताने एक नवीन दृष्टीकोण दिलेला आहे गृहस्थांना निर्द्वंद होऊन आपल्या उपास्य देवाची उपासना सांगितली आहे. त्रैकालिक सामायिकाची भावना हे एक विशेष होय. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे–

प्रातर्विधिस्तव पदाम्बुजपूजनेन मध्याह्नसन्निधिरयं मुनिमाननेन ।
सायंनतोऽपि समयो ममदेव यायान्नित्यं त्वदाचरण कीर्तन कामितेन ॥

अर्थात हे देव माझा प्रातःकाळ तुझा चरणारविन्दाच्या पूजनाद्वारे, मध्याह्नकाळ मुनिजनांच्या सन्मानाद्वारे व सायंकाळ तुझ्या आचरणाच्या कीर्तनाद्वारे जावो ! यामध्ये प्रात.काळ मौनाने, मध्याह्न भक्तीने व सायंकाळ स्तोत्रपाठ, तत्त्व चर्चेने जावो हे उत्तम रीतीने सांगितले आहे. सोमदेवांनी प्रतिमेचे निरूपण करताना आरंभ-त्यागाच्या ठिकाणी सचित्तत्याग व सचित्तत्यागाच्या ठिकाणी आरंभत्याग प्रतिमा सांगितली आहे. यावरून तर्कप्रधान आचार्य होते ही गोष्ट लक्षात येते[2] सोमदेवांनी उपासकाध्ययन व उपासकांच्या चर्चेची सांगोपांग चर्चा केलेली आहे.

यानंतर आचार्य देवसेनानी भावसग्रह ग्रंथात पाचव्या गुणस्थानाचे वर्णन करीत असताना श्रावकधर्माचे विस्तारपूर्वक विवेचन केले आहे. यांच्या विवेचनात पण आठ मूलगुणांचे निरूपण आचार्य सोमदेवाप्रमाणेच आहे. 'यांनी सर्वांनी केलेल्या अणुव्रत, गुणव्रत, शिक्षाव्रत, प्रतिमा, सप्त व्यसने, व्रतातिचार आदिचा उल्लेख न करता त्यांना गृहस्थांच्या पुण्य, पाप, धर्मध्यान इत्यादी भावाचे वर्णन करणे अभिप्रेत होते हे लक्षात येते. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे गृहस्थांना सालंब ध्यान संभव नाही. म्हणून त्याने पुण्यवर्धक कार्य, पूजा, व्रत - विधान, उपवास इत्यादीकांचे पालन करावयास पाहिजे. त्यांनी देवपूजेवर विशेष जोर दिलेला आहे. पुण्याचे वर्णन करताना ते म्हणतात की पुण्यामुळे विशाल कुल प्राप्त होते. तीन लोकाची कीर्ति प्राप्त होते, यौवन व तेज प्राप्त होते.

अमितगति आचार्यांनी 'अमितगति श्रावकाचार' ग्रंथ लिहला. त्यामध्ये त्यांनी विशेष निरूपण केले आहे धर्म - महत्ता, मिथ्यात्व - त्याग, सम्यक्त्व - ग्रहण, सप्त तत्त्व, अस्ति - सिद्धि, सृष्टिकर्तृत्व इत्यादि विषयावर विशेष चर्चा केली आहे. शेवटच्या तीन परिच्छेदामध्ये क्रमाने शील, बारा तप, तीन शल्ये, दान, पूजा, सामायिकादी षडावश्यके याचे विस्ताराने वर्णन केले आहे. आचार्यांनी सप्त व्यसनांची चर्चा ४६ श्लोकामध्ये केली आहे. प्रायः अमितगति आचार्यांनी पूर्ववर्ती आचार्य उमास्वामी व स्वरूपाख्यानामध्ये सोमदेवांचे अनुसरण केले आहे.

श्रावकाचारावर पुरुषार्थसिद्धयुपाय म्हणून एक स्वतंत्र रचना अमृतचन्द्र आचार्यांनी केली. मुक्ती हे जर ध्येय असेल तर प्रथम सम्यग्दर्शनाची प्राप्ती करणे किती आवश्यक आहे हे सागून सम्यग्दर्शनाच्या आराधनेसाठी त्यांनी उपदेश केला आहे. हिंसादी पंच पापांचा त्याग हा उपासकासाठी किती आवश्यक आहे हे प्रतिपादले आहे. वस्तुतः सर्व पापाचे मूळ हिंसा आहे, त्यातच सर्वच पापे कशी अन्तर्गत होतात याचे विवेचन सुदर रीतीने केले आहे. हिंसा-अहिंसेचे असे निरूपण अन्यत्र कुठेही दिसत नाही.

आचार्य वसुनन्दीनी अकरा प्रतिमेचे वर्णन विस्ताराने केले आहे. श्रावकास प्रथम सप्त व्यसनाचा त्याग कसा आवश्यक आहे हे सांगितले आहे. पण्डित आशाधरजीचे 'सागार-धर्मामृत' हे श्रावकांच्या आचारावरील शेवटचे वाक्य. यानंतर आचार्यप्रणित किंवा पंडितप्रणित ग्रंथ नाही. या ग्रंथात श्रावकांच्या संपूर्ण आचारसंहितेचे प्रासादिक विवेचन आहे. त्यांच्या या ग्रंथाचा आधार सोमदेवांचे उपासकाध्ययन, नीतिवाक्यामृत व हरिभद्रसूरीचो श्रावकधर्म प्रज्ञप्तीचा बराच उपयोग केला आहे.




१. स्नपन पूजन स्तोत्रं जपो ध्यान श्रुतस्तवः । षोढा क्रियोदिता सद्भिर्देवसेवासु गेहिनाम् ॥ यशस्तिलक श्रा० – ८
२. मूलव्रत व्रतान्यर्चा पर्वकर्माकृषिक्रियाः । दिवा नवविध ब्रह्म सचित्तस्य विवर्जनम् ।

# अनेकांतवाद व स्याद्वाद

प्रत्येक दर्शन किंवा धर्माचा एक विशिष्ठ मौलिक सिद्धांत असतो, ज्याच्या आधारावरच त्या धर्माची किंवा दर्शनाची वैचारिक परंपरा आधारलेली असते. जैन दर्शन व जैन धर्म देखील एक मौलिक वैचारिक परंपरा आहे. त्या दर्शनाचेही स्वतंत्र सिद्धांत, स्वतंत्र दृष्टी व मौलिक चिंतन आहे. अनेकांतवाद ही जैन दर्शनाची अनन्य साधारण स्वतंत्र व महत्त्वाची अशी विचारप्रणाली आहे. भारतीय दर्शनाला जैन-दर्शनातील अनेकांतवाद ही एक मोठी देणगीच होय.

एकांत व अनेकांत या दोहोत हा फरक आहे की, एकांतवाद वस्तु स्वरूपाचे एकाच दृष्टीकोणातून निरीक्षण करतो तर, अनेकांतवाद वस्तु स्वरूपाचे निरीक्षण अनेक दृष्टीकोणातून करतो. वस्तु एक रंगी नसून विभिन्न रंगानी युक्त असते, त्यातील एकाच रंगाला विशेष मानणे म्हणजेच वस्तूत अस्तित्वात असलेल्या इतर रंगाचा अपलाप करणे, म्हणजेच सत्याचा तिरस्कार करणे होय. म्हणूनच एकांतवाद मिथ्या आहे वस्तु स्वरूपाला जाणण्याची ही सत्य व परिपूर्ण दृष्टी नव्हे. अनेकांतवाद किंवा स्याद्वाद वस्तु स्वरूपाचे यथार्थ ज्ञान समजून घेण्याची योग्य दृष्टी होय.

जैन विचारप्रणालीप्रमाणे जैन साधनेचा प्राण देखील अनेकांतवाद आहे. सत्य हाच अनेकांतवादाचा मूलाधार आहे. प्रत्येक व्यक्तीला सत्याचा साक्षात्कार व्हावा असे वाटते तथापि त्यांच्या दृष्टीकोणात अंतर राहते. भ. बौद्ध व शंकराचार्य देखील सत्याचा शोध घेऊ पहात होते परंतु सत्याकडे पाहण्याची त्यांची दृष्टी एकांगी होती. भ. महावीरांचा दृष्टीकोण या सर्वापेक्षा वेगळा होता. त्यांनी सत्याकडे एका दृष्टीकोणातून अथवा एका अपेक्षेने न पाहता या अनेकांतमयी दृष्टीकोनातून पाहिलेले आहे. म्हणूनच भ. महावीरांच्या सत्य प्रतिपादन शैलीचे नाव अनेकांतवाद असे पडले. अनेकांतवादात मूलतः दोन गोष्टी दिसतात. १) पूर्णता, २) यथार्थता. जे तत्त्व पूर्ण आहे आणि पूर्ण असून देखील यथार्थ रूपाने परिलक्षित होते तेच सत्य होय.

अल्पज्ञ व्यक्तीला कोणत्याही वस्तूचे पूर्णपणे व त्रिकालाबाधित यथार्थ ज्ञान होणे शक्य नाही. त्या वस्तूचे पूर्णस्वरूप अथवा साक्षात्कार फक्त सर्वज्ञानाच होतो. साधारण व्यक्तींना नव्हे. सर्वज्ञ पुरुष देखील आपल्या ज्ञानाने वस्तूचे पूर्णतः तसेच यथार्थ स्वरूप पाहू शकतो. परंतु स्वतः वाणीद्वारे प्रकट करू शकत नाहीत. म्हणूनच देश, काळ, परिस्थिती, शैली इत्यादीच्या विचित्रतेमुळे पूर्ण पुरुषांच्या कथनात देखील शाब्दिक भेद झालेला दिसून येतो. उदा. भ. महावीर एके ठिकाणी म्हणतात, 'एगे आया– आत्मा एक आहे' आणि आपल्याच उपदेशातील दुसऱ्या ठिकाणी ते म्हणतात, 'अनेगे आया'– आत्मा अनेक आहे. शाब्दिक दृष्ट्या या दोन्ही कथनात फरक दिसतो, परंतु सैद्धांतिक दृष्ट्या त्यात कसलाही विरोध नाही, केवळ शब्द भेद आहे आणि दोन्हीही ध्येय सत्य आहेत.

सत्यतेच्या दृष्टीने पाहू गेल्यास आत्म्याचे एकत्व आणि अनेकत्व ही दोन्हीही यथार्थ आहेत. परंतु दोन्ही मधील कोणत्याही एका कथनात पूर्णता नाही. शुद्ध स्वरूपाच्या दृष्टीने आत्मा एक समान प्रदेशानी युक्त तसेच अनंत ज्ञान, दर्शन, सुख, वीर्य यांच्या अस्तित्वाने पूर्ण आहे. द्रव्याच्या दृष्टीने आत्मद्रव्य एक आहे. परंतु प्रदेश अथवा पर्याय यांच्या दृष्टीने आत्मा एक नसून अनेक आहेत. या दोन्ही दृष्टी यथार्थ असून देखील वेगवेगळ्या रूपाने अपूर्ण आहेत आणि म्हणूनच त्यांच्यात शाब्दिक भेद असल्याचे दिसून येते.

जर सर्वज्ञ वस्तूच्या पूर्ण स्वरूपाला प्रकट करू शकत नाही तर सामान्य व्यक्ती, यथार्थतेनी युक्त असूनही वस्तूच्या पूर्ण स्वरूपाला प्रकट करणे अशक्य होय. दोन सामान्य व्यक्तींनी वस्तूचे केलेले निरीक्षण व प्रकटीकरण यथार्थपणे केले तरी त्यात विभिन्नता असणे स्वाभाविक आहे. ही मतभिन्नता संघर्षाला कारणीभूत होते. हा संघर्ष टाळण्यासाठीच भ. महावीरांनी विश्वाला अनेकांत दृष्टी दिली आहे. अनेकांत दृष्टी अपूर्ण अंशाना एकत्रित करून वस्तूच्या पूर्ण स्वरूपाचे प्रकटीकरण करण्याची एक कला आहे. या दृष्टीमुळेच संपूर्ण सत्याचे ज्ञान होते.




वस्तु मूलतः पूर्ण, एक, अखंड आहे. परंतु ती अनंत धर्मानी युक्त आहे. जिला आगमिक भाषत गुण व पर्याय असे म्हटले आहे. वस्तु द्रव्यपर्यायात्मक आहे, तिच्यात उत्पत्ति, विनाश व स्थिती स्थित आहेत. दर्शनकारांनी यालाच क्रमशः उत्पाद, व्यय व ध्रौव्य या शब्दाचा वापर केला आहे. तत्त्वार्थसूत्रात वस्तूची व्याख्या "उत्पादव्यय ध्रौव्य युक्तं सत्" अशी केली आहे.

जैन दर्शनानुसार वस्तु उत्पाद व व्यय यांनी युक्त मानली आहे. परंतु प्रत्यक्षात वस्तूचा व्यय अथवा उत्पाद होत नाही. जैन परंपरेनुसार, स्वजातीचा परित्याग न करता पर्यायाला ग्रहण करणे याला उत्पाद व स्वजातीला न सोडता पर्यायाच्या पूर्व भावाचे विशम होणे याला व्यय असे म्हणतात. उदा. मातीचा गोळा स्वजातीचा त्याग न करता घटात परिवर्तित होतो हा त्यांचा उत्पाद आहे व घटात परिवर्तीत होऊन मातीच्या गोळयाच्या आकृतीचा नाश होणे हा त्याचा व्यय होय. गोळा व घट या दोन्ही अवस्थेत असणारी माती म्हणजे ध्रौव्य होय. येथे मातीच्या उदाहरणाने वस्तूचे स्वरूप समजाविले आहे.

यावरून वस्तूमध्ये नित्यत्व-अनित्यत्व, एकत्व-अनेकत्व इ. अनेक धर्म आहेत, तथापि आपण त्याना एकच समजतो. पदार्थाच्या अनंतगुण पर्यायापैकी एखाद्याच गुणधर्मासंबंधी ज्ञात्याचा जो अभिप्राय व्यक्त होतो त्याला नय म्हणतात आणि नयपद्धतीनेच वस्तूतील विविध गुणांचे विवेचन संभवनीय होते. द्रव्यार्थिक नयाच्या दृष्टिकोणातून वस्तूचे नित्य स्वरूप पाहून तिला नित्य म्हटले जाते. तर पर्यायार्थिक नयाच्या दृष्टीने वस्तूच्या पर्याय परिवर्तनाला पाहून अनित्य म्हणण्यात येते. दोन्हीही दृष्टीकोण यथार्थ असून त्यात सत्यांश आहे. एक नय वस्तूच्या स्वरूपाचे अवलोकन करतो तथापि दुसऱ्या नयाला असत्य मानत नाही, यासच सम्यक् नय म्हणतात व या दृष्टीने वस्तूचे स्वरूप म्हणजेच सम्यग्दर्शन होय.

नयवाद एकांतवादी दर्शन आहे. वस्तूच्या स्वरूपाला एका दृष्टीकोणातून पाहून त्या स्वरूपाला सत्य व दुसऱ्या दृष्टीकोणातून मांडलेल्या सिद्धाताला किंवा स्वरूपाला पूर्णतः असत्य मानण्यात येते यासच 'नयाभास' म्हणतात. नयाभासात सत्यांश असतानाही एकांताचा आग्रह, अन्य सत्याचा अस्वीकार असतो.

**स्याद्वाद–**

अशा रीतीने दार्शनिक समस्त नयातील स्थित सत्याला जोडून वस्तूचे पूर्ण स्वरूप जाणण्याऐवजी एकांशालाच पूर्ण सत्य समजतात व आपल्याशिवाय भिन्न सत्यांशाला असत्य मानतात. त्यामुळेच दार्शनिक संघर्ष सुरू होतो. दार्शनिक आपण मानलेल्या सत्यांशाला पूर्ण सत्य मानून दुसऱ्याच्या सत्यांशाला पूर्णतः असत्य ठरविण्यासाठी तर्क-वितर्क लढवितात. या संघर्षज्वाला शांत करण्यासाठी भ. महावीरानी एकांताऐवजी अनेकांतची शीतल सरिता प्रवाहित केली. त्यांनी नित्य, अनित्यादी पक्ष घेऊन संघर्ष करणाऱ्या दार्शनिकांना सांगितले की, तुम्ही समजता ते सत्य नाही. तुमचा एकांतवाद चुकीचा व अयोग्य आहे. प्रत्यक्षात वस्तु एकांत व नित्य नाही. तसेच एकांत व अनित्य नाही. तिच्यात एकत्त्व व अनेकत्त्वही आहे. वस्तु अनंत व अनेक धर्मानी युक्त आहे. त्यामुळेच तिला एक धर्माने युक्त म्हणणे म्हणजे सत्याचा तिरस्कार करणे होय पूर्ण सत्य समजण्यासाठी भ. महावीरानी अनेकांतदृष्टी दिली व तिच्या अभिव्यक्तिसाठी स्याद्वादाची भाषा दिली.

अनेकांत व स्याद्वाद एकाच सिद्धांताची रूपे आहेत. त्यामुळे साधारण व्यक्ति दोहोना एकच समजतो. बाह्यतः त्याच्यात एकत्व प्रतीत होत असले तरी, दोन्हीत थोडेसे अंतर आहे. अनेकांत वस्तूच्या स्वरूपाचे निरीक्षण करण्याची विचार पद्धती आहे. तर स्याद्वाद निरीक्षण केलेल्या स्वरूपाची अभिव्यक्ति करण्याची भाषा पद्धती आहे. अनेकांत दार्शनिक दृष्टि आहे तर स्याद्वाद त्याची भाषा आहे. अनेकांतवादात सर्व दर्शनांचा संगम होतो व स्याद्वाद त्या सिद्धांताचे प्ररूपण आहे.

नयवाद अनेकांतचा आधार आहे. नय म्हणजे वस्तूच्या स्वरूपाला सापेक्ष दृष्टीने समजणे. वस्तूत स्थित असलेल्या अनंत धर्माला अनेक दृष्टीने समजणे ज्याप्रमाणे फळात आकार, रूप, गंध, स्पर्श व आणखी कांही धर्म असतात. तथापि जेव्हा आपण आकाराच्या दृष्टीने पाहतो तेव्हा ते फळ गोल, त्रिकोणादि आकाराचे प्रतीत होते. रसाच्या दृष्टीने पाहिल्यास गोड किंवा आंबट प्रतीत होते. हे सर्व दृष्टीकोण नयवादात समाविष्ट होतात.

सप्तभंगीवाद हा स्याद्वादाचा आधार आहे. वस्तुगत धर्म सापेक्ष आहे त्यामुळे त्याचे विश्लेषणही सापेक्ष होते. स्याद्वाद जेव्हा वस्तूचे विश्लेषण करतो तेव्हा सप्तभंगीवाद वस्तुगत अनंत धर्मातील प्रत्येक धर्माचे विश्लेषण करण्याची प्रक्रिया प्रस्तुत करतो. त्यामुळेच जैन दर्शनात सप्तभंग सांगितले आहेत व या दृष्टीकोणास सप्तभंगी संबोधिले आहे. त्याचे प्रकार पुढीलप्रमाणे– १) स्याद् अस्ति, २) स्याद् नास्ति, ३) स्याद् अस्ति-नास्ति, ४) स्याद् अवक्तव्य, ५) स्याद् अस्ति-अवक्तव्य, ६) स्याद् नास्ति-अवक्तव्य ७) स्याद् अस्ति-नास्ति अवक्तव्य.

हे सातभंग अस्तित्व धर्मानी युक्त आहेत. अशा प्रकारच्या अन्य धर्मांच्या आश्रयानी सप्तभंगी होऊ शकतात. यात प्रथम भंग विधेयात्मक विचाराच्या आधारापासून निर्मित आहे. वस्तूच्या अस्तित्वाचे विधेयात्मक ढंगाने त्याचे प्रतिपादन केले जाते. द्वितीय भंगाचा आधार निषेध, तृतीय भंग विधी व निषेधाचे क्रमश: वर्णन करतो. तो प्रथम व द्वितीय भंगाच्या संयोगापासून उत्पन्न होतो. चतुर्थ भंगात विधिनिषेधाचे विश्लेषण करणे अशक्य असते. म्हणूनच अवक्तव्य म्हणतात, पंचम भंगात विधि व अवक्तव्य यांचे प्रतिपादन असते. सहाव्या भंगात निषेध व अवक्तव्याचे प्रतिपादन करतो, सप्तभंग विधिनिषेध व अवक्तव्य यांचे प्रतिपादन करतो.

मूलतः वस्तूमध्ये विरोधी प्रतीत होणारे धर्म विद्यमान असतात. यांचे अपेक्षेसह विवेचन करणे म्हणजे स्याद्वाद होय. उदा.—ज्यावेळी आपण मनुष्य मनुष्य आहे असे म्हणतो त्याचवेळी मनुष्य पशुरूप नाही हे स्पष्ट होते. मनुष्यरूपाने तो अस्ति व पशुरूपाने तो नास्ति होय. यावरून वस्तूमधील अस्तित्व निरपेक्ष नसून वस्तूच्या स्वरूपाच्या अपेक्षेनुसार असते. आपल्या स्वरूपाने सत् वस्तु पर रूपाच्या अपेक्षेने त्याचवेळी असत्‌ही असते. याशिवाय तृतीय पक्षाचा स्वीकार दोन्ही प्रकारे करता येतो. वस्तु सत्‌ही आहे व असत्‌ही आहे. ही दृष्टी स्वरूप व पररूप दोन्हीच्या क्रमिक अपेक्षेनी सांगितली आहे. पहिल्या दोन भंगात वस्तूचे एकेक स्वरूप समोर येते परंतु तिसऱ्या भंगात दोन्ही पक्षाचा स्वीकार करणारी दोन रूपे दिसतात. चतुर्थ भंगात वस्तूतील सत् व असत् दोन्ही विद्यमान असले तरी त्यांचे प्रतिपादन एकदम करता येत नाही, म्हणूनच त्या स्वरूपाला अवक्तव्य म्हणतात. अंतिम तीन भंग संयोगित होण्यास सुलभ आहेत.

वस्तूचे व वस्तूगत धर्मांचे विश्लेषण करण्याची सत्याकडे नेणारी एक वेगळीच पद्धती आहे व परस्पर-विरोधी पक्षामध्ये समन्वय करण्यासाठी ही पद्धत मार्गदर्शक आहे जैन विद्वानाची ही एक अनुपमेय देणगी आहे. स्याद्वादात वस्तूच्या स्वरूपाचा निश्चित बोध होतो. येथे स्याद (स्यात्) चा अर्थ 'कदाचित्' नसून 'अपेक्षा' आहे. 'आत्मा स्याद् अस्ति' म्हणजे येथे स्याद्‌चा अर्थ कदाचित नसून 'अपेक्षा' असा आहे. 'आत्मा स्याद् अस्ति' म्हणजे आत्मा कदाचित नव्हे तर 'आत्मा आपल्या चैतन्यस्वरूप युक्त आहे' अशा प्रकारे स्याद् नास्तिचे तात्पर्य पररूप किंवा जडतारूपी आत्मा नव्हे. तिसऱ्या पक्षात चैतन्य स्वरूपाच्या अपेक्षेने आत्मा आहे व जडतेच्या अपेक्षेने तो नाही. उभय पक्ष कथनानुसार आत्मा अवक्तव्य आहे. भ. महावीरानी आपल्या कथनात संशयाला स्थान दिले नाही. सर्वत्र वस्तूचा निश्चयात्मक बोध होतो. या सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, अस्ति; नास्ति, अस्ति-नास्ति व अवक्तव्य हे चार भग मौलिक आहेत. इतर भग अस्ति-नास्तीच्या संयोगाने युक्त आहेत. या सात भगात सर्व अपेक्षाचा समावेश होतो




अशा प्रकारे भ. महावीरांनी अनेकांत व स्याद्वादाच्याद्वारे वस्तूच्या या यथार्थ व सत्य स्वरूपाला समजून दार्शनिक संघर्ष नष्ट करण्याचा प्रयत्न केला व हा संघर्ष नष्ट करण्याचा उपाय अनेकांत आहे यावर त्यांनी भर दिला. एकांत आग्रह असत्यावर अवलंबित असून संघर्षाचे मूळ आहे. वैमनस्य, राग, द्वेष, वैर इत्यादी वाढविणारा आहे. त्यामुळेच पूर्ण सत्य जाणणे, पाहणे व पूर्ण शांति प्राप्त करण्याचा मार्ग सांगितला आहे. जैन दर्शनातील हा सिद्धांत अनेक प्रकारे महत्त्वाचा असून, विचारवंतामध्ये सामाजिक घटकात सहिष्णुता सहअस्तित्व इत्यादी भावना प्रस्थापित करण्यासाठी या व्यावहारिक सिद्धांताचे महत्त्व अनन्य साधारण आहे. म्हणून जैन दर्शनकारांनी भारतीय दर्शन व समाजाला दिलेली ही महत्त्वपूर्ण दृष्टी आहे.

# मोक्ष व मोक्षमार्ग

व्यवहारशास्त्रामध्ये व्यवहारी जनाना संसार व कर्मबंधन याचा परिचय असतो, म्हणून व्यवहारी जनांच्या परिभाषेत संसारबंधनातून किंवा [1]कर्मबंधनातून मुक्त होणे याला मोक्ष म्हणतात असे मोक्षाचे स्वरूप सांगितले आहे. [2]अथवा सर्व कर्मापासून मुक्त होऊन अशरीरी आत्म्याची अंतिम अवस्था त्याला मोक्ष म्हणतात. [3]अथवा ज्याचा पुन: कधीही उत्पाद होणार नाही असा संसार अवस्थेचा व्यय त्याला मोक्ष म्हणतात. व्यवहारनय हा पराश्रित किंवा पर्यायाश्रित असल्यामुळे पर्यायाच्या माध्यमातून वरीलप्रमाणे मोक्षाचे पर्यायरूपाने वर्णन करतो.

परंतु ते मोक्षाचे खरे वर्णन नव्हे. अध्यात्मशास्त्रामध्ये निश्चयनयाने जे मोक्षाचे स्वरूप सांगितले ते मोक्षाचे यथार्थ स्वरूप आहे.

'मोक्ष आत्मा सुखं नित्य:' स्वत:सिद्ध आत्माच स्वयं मोक्षस्वरूप आहे. सुखानुभति हे मोक्षाचे लक्षण आहे. मोक्ष आत्म्याचे सत्य स्वरूप आहे. तो नित्य-ध्रुव-शाश्वत आहे. 'सिद्धि: स्वात्मोपलब्धि:' स्वत.सिद्ध आत्मतत्त्वाची उपलब्धि तोच मोक्ष होय.

मलाच्या अभावाने दर्पण स्वच्छ होतो असे म्हणणे हा व्यवहार-उपचार आहे. वास्तविक मलाचा अभाव दर्पणामध्ये नसलेली स्वच्छता कशी आणणार ? दर्पणाचा स्वभाव स्वच्छता आहे मलाच्या सद्भावात देखील स्वच्छता दर्पणामध्ये स्वत.सिद्ध असते. ती मलाच्या अभावात व्यक्त होते म्हणून मलाच्या अभावाने दर्पण स्वच्छ होतो असे व्यवहारात म्हटले जाते. तसेच कर्माच्या अभावाने मोक्ष होतो असे म्हणणे हा उपचार आहे. मोक्ष होत असताना कोणकोणत्या प्रक्रिया घडतात हे सांगणे ते मोक्षाचे वर्णन आहे. ते मोक्षाचे स्वरूप नाही.

मोक्ष जीवाचा स्वभाव आहे. एकत्व-विभक्त जीवाचा स्वभाव. आपल्या स्वद्रव्य-गुणपर्यायाशी अभिन्न—एकत्व-तादात्म्य असणे व पर द्रव्य-गुणपर्यायापासून अत्यंत भिन्न-विभक्त-पृथक्त्व असणे हा जीवाचा, एवढेच नव्हे प्रत्येक सत्‌रूप द्रव्याचा स्वभाव आहे. त्या एकत्व-विभक्त स्वभावाचे दुसरे नाव मोक्ष आहे.

प्राथमिक अवस्थेत व्यवहारी जनाना संसार अवस्था परिचित असते. म्हणून त्याना मोक्ष अवस्था प्राप्त करावयाची आहे हे ध्येय समोर ठेवणे आवश्यक आहे. परंतु ती व्यवहार नयभाषा आहे. ते उपचार कथन आहे. मोक्ष काही वेगळा आहे व तो प्राप्त करावयाचा आहे अशी वस्तुस्थिति नाही.

अथवा सिद्धशिलेवर जाणे, वैकुंठाला जाणे याला मोक्ष म्हणतात असे नाही. ती मोक्ष होताना घडणारी प्रक्रिया आहे. ते मोक्षाचे वास्तविक स्वरूप नाही. सिद्धशिलेवर तर सूक्ष्म एकेंद्रिय जीव देखील जातात. मग ते देखील मोक्षास जातात असे म्हणण्याचा अनिष्ट प्रसंग येईल.

मोक्ष काय वस्तु आहे. त्याचे स्वरूप काय आहे हे जाणून घेणे नितांत आवश्यक आहे.

[4]मोक्ष हा कर्माचा अभाव स्वरूप नाही. [5]बौद्धमतवादी दिवा विझतो तेव्हा ज्योतीचा सर्वथा आत्यंतिक नाश होतो तसा आत्म्याचा-चित्तक्षणाचा आत्यंतिक नाश-अभाव होणे याला मोक्ष मानतात. परंतु मोक्ष असा

१. बंधहेत्वभाव–निर्जराभ्यां कृत्स्नकर्मविप्रमोक्षो मोक्ष: ॥ (तत्वार्थसूत्र)
२. निरवशेषनिराकृतकर्ममलकलंकस्य अशरीरस्यात्मन. आत्यन्तिक अवस्थान्तरं मोक्ष. ॥ (सर्वार्थसिद्धि)
३. अशुद्धात्मस्वभावेन संभववर्जितविनाश: मोक्ष ।
४. नाभाव: सिद्धिरिष्टा, न निजगुणहृति तत् तपोभिर्नयुक्ते: । अस्त्यात्मानादिबद्ध: स्वकृतजफलभुक् तत्क्षयात् मोक्षभागी । ज्ञाता द्रष्टा स्वदेहप्रमितिरुपसमाहार विस्तार धर्मा । ध्रौव्योत्पत्तिव्ययात्मा स्वगुणयुत इतो नान्यथा साध्यसिद्धि: ॥
५. प्रदीपनिर्वाणवत् आत्मनिर्वाणं मोक्ष. ।




अभाव स्वरूप नाही. वैशेषिक मतवादी [1]'सुख-दुःखादि गुणांच्या नाशाला मोक्ष मानतात. परंतु मोक्ष असा निर्गुण-गुणरहित-गुणनाश स्वरूप नाही. मोक्ष होताना विकाराचा-उपाधिभावाचा नाश होतो. पण विकारांचा नाश होणे हे देखील मोक्षाचे स्वरूप नाही. मोक्षामध्ये कशाची नास्ति होते, कशाचा अभाव होतो, कोणती प्रक्रिया घडते याचे नास्तिरूपाने ते मोक्षाचे वर्णन आहे. ते मोक्षाचे यथार्थ स्वरूप नाही. ते मोक्षाचे लक्षण नाही. मोक्ष तप तपल्याने किंवा अन्य कोणत्या उपायानी होतो असे देखील नाही. आत्मा अनादि कालापासून आपल्या अज्ञान भावाशी-मोह-राग-द्वेष विकार भावाशी-बद्ध आहे. तन्मय समरस झालेला आहे. आपल्या शुभ-अशुभ परिणामांनी बांधले गेलेल्या पाप-पुण्य कर्माचे फल सुख-दुःख भोगत आहे. ह्या राग-द्वेष-मोहरूप विकार भावाचा, कर्माचा व कर्मफल भोगाचा नाश झाला की मोक्ष होतो. जीवाचा अज्ञानभाव हा कल्पनाभ्रम आहे, अवस्तुरूप आहे. राग-द्वेष-मोहाचा किंवा कर्माचा कर्मफल भोगाचा अभाव करण्यासाठी अवस्तूमध्ये पुरुषार्थ करावा लागत नाही. अंधःकाराचा अभाव करण्यासाठी अंधःकाराच्या पाठीमागे लागावे लागत नाही. प्रकाशरूप वस्तूचा आश्रय घेतला. यामध्ये पुरुषार्थ केला की अंधःकार स्वयमेव नष्ट होतो.

तसेच मोक्षस्वरूप, एकत्व-विभक्तस्वरूप ध्रुव आत्म्याचा आश्रय घेतला, त्यामध्ये स्थिर राहण्याचा पुरुषार्थ केला की, विकाराचा अभाव स्वयमेव होतो. आत्मा ज्ञाता-द्रष्टा स्वभाव आहे, असंख्यात प्रदेशी आहे. तथापि संकोच विस्तार शक्तीमुळे आपल्या शरीर प्रमाण आकाराचा आहे, उत्पाद-व्यय-ध्रौव्यात्मक सत्रूप आहे, अनंत गुणांचा अखंड पिंड आहे. त्याची जाणीव करून घेऊन त्याचा आश्रय घेणे त्यामध्ये स्थिर होणे हाच मोक्षाचा उपाय आहे. त्याशिवाय साध्यसिद्धीचा दुसरा कोणताही उपाय नाही.

आपल्या अनंत गुणाशी समरस-तन्मय होणे हाच मोक्ष आहे. सिद्ध परमात्म्यामध्ये जो व जेवढा अनंत गुणांचा अखंड पिंड आत्मा शिल्लक राहतो तो व तेवढाच आपला ध्रुव आत्मा. तेवढेच शुद्ध जीवास्तिकाय द्रव्य आहे. त्याशिवाय आज संसार अवस्थेत जे आपणास दिसते ती सर्व कर्म-नोकर्म-भावकर्मरूप उपाधि आहे. ते अनात्मद्रव्य आहे.

आज या संसार अवस्थेत या उपाधीने सहित असताना देखील आपला ध्रुव आत्मा त्या उपाधीपासून अत्यंत विभक्त आहे. आपल्या अनंतगुणाशी अभिन्न एकत्व स्वरूप व उपाधीपासून अत्यंत विभक्त स्वरूप मोक्षस्वभाव भगवान् आत्मा आपल्या शरीरामध्ये विराजमान आहे. मोक्ष आत्म्याहून भिन्न वस्तु नाही. मोक्ष प्राप्त करण्यायोग्य बाह्य - वस्तु नाही. मोक्ष प्राप्त करावा लागत नाही. मोक्षाच्या प्राप्तीच्या इच्छेने मोक्षाची प्राप्ति होत नाही.

साक्षात् आत्माच मोक्षस्वरूप आहे. आत्मस्वरूप ओळखून आत्मस्वरूपात लीन होणे हाच पर्यायरूपाने मोक्ष म्हटला जातो. मोक्ष ही सत्रूप आत्मवस्तु आहे. अनेकान्तात्मक आहे. उभयधर्मात्मक - सामान्य - विशेष धर्मात्मक-द्रव्य-गुणपर्यायात्मक आहे. गुणशक्तिरूप मोक्ष हा कारणरूप आहे व पर्यायरूप मोक्ष हा कार्यरूप आहे. शक्तिरूप मोक्ष कारण परमात्मा आहे. कार्यपरमात्मा हा पर्यायरूप मोक्ष आहे.

कार्याची सिद्धि कार्याच्या आश्रयाने होत नाही. कारणाच्या आश्रयाने कार्याची सिद्धि होते. मला मोक्ष प्राप्त व्हावा या इच्छेने कधीही मोक्षाची प्राप्ति होत नाही. मी स्वयंमोक्ष स्वरूप कारणपरमात्मा आहे हा दृढ विश्वास ठेवून हा दृढ निर्णय घेऊन त्यात अविचल स्थिर होणे हाच साक्षात् मोक्ष आहे.

[2]'मोक्ष एक आपला आत्माच आहे व मोक्षाचा मार्ग देखील एक आपल्या कारणपरमात्म्याचा आश्रय घेणे हाच आहे. मोक्ष एक, मोक्षाचा मार्ग देखील एकच आहे. 'नान्यथा साध्यसिद्धिः' त्याशिवाय साध्यसिद्धीचा मोक्षाचा दुसरा मार्ग नाही.

---

१. सुखदुःखादि गुणोच्छेदः मोक्षः । २. एकः एव निःश्रेयस पन्थाः, न अन्यत् वर्त्म निर्वाणस्य । (प्रवचनसार)

'आजपर्यंत जे सिद्ध झाले ते सर्व स्वयं आपल्या मोक्षस्वभाव कारणपरमात्म्याचा आश्रय घेऊनच मुक्त झाले. कारणपरमात्म्याचे दर्शन हेच सम्यग्दर्शन, कारणपरमात्म्याचे ज्ञान हेच सम्यग्ज्ञान, कारणपरमात्म्यात लीन होणे हेच सम्यक्चारित्र. सम्यग्दर्शन - ज्ञान - चारित्र यांची एकता व पूर्णता हाच मोक्षमार्ग,[2] हाच साक्षात् मोक्ष.

१) सम्यग्दर्शन - ज्ञान - चारित्र हा आत्मस्वभाव आहे. आत्मतत्वाला सोडून ते रत्नत्रय अन्य द्रव्यामध्ये राहात नाही म्हणून रत्नत्रयमय - रत्नत्रयस्वभावी आत्माच साक्षात् मोक्षाचे कारण आहे. आत्माच मोक्षस्वरूप आहे व रत्नत्रयस्वभावी आत्माच मोक्षाचे कारण आहे.[3]

मोक्ष व मोक्षमार्ग हे दोन भिन्न भिन्न नाहीत. अभिन्न एकच वस्तु आहे. अध्यात्म शास्त्रामध्ये निश्चयनयाने कार्य - कारणभाव हा एकाच अभिन्नवस्तूमध्ये असतो असे सांगितले आहे.

२) उपादान कारणच स्वयं कार्यरूप परिणमते, जसे[4] उपादान तसे कार्य. आत्मा जसा स्वयं स्वतःसिद्ध बनलेला आहे तसाच तेवढाच तो सिद्ध अवस्थेत शिल्लक राहतो.

वास्तविक सिद्ध ही संज्ञा परमार्थनयाने स्वतःसिद्ध आत्म्याची आहे. तेवढाच सिद्ध अवस्थेत शिल्लक राहतो म्हणून सिद्धपर्यायामध्ये पर्यायनयाने सिद्ध म्हटला जातो.

सिद्धभगवंताना सिद्ध म्हणणे ही उपचार संज्ञा आहे. स्वतःसिद्ध भगवान् आत्म्याला सिद्ध म्हणणे ही मुख्य संज्ञा आहे. आपला भगवान् आत्माच स्वयं सिद्ध आहे याचा दृढ निर्णय घेऊन जो त्यात स्थिर होतो तोच पर्यायरूपाने नंतर सिद्ध व्यवहारनयाने म्हटला जातो.

३) सुवर्णपाषाणातून जे सोने निघते ते अग्नीच्या सहायाने किंवा पाषाण मलाच्या अभावाने निघते असे नसून त्या सुवर्ण पाषाणामध्ये मूलतः स्वतःसिद्ध जेवढे सोने असते ते व तेवढेच सोने निघते. पाषाणातून किंवा अग्नीतून सोने निघत नसून सोन्यातूनच सोने निघते.

तसा सत्स्वरूप मोक्ष शक्तिरूप असलेला आत्माच मोक्षपर्यायरूप बनतो. कर्म किंवा कर्मोपाधीचा अभाव मोक्षस्वरूप बनत नाही.

'सत् अकारणवत् नित्यं' शक्तिमोक्षस्वरूप आत्मा सत्स्वरूप आहे. शक्तिमोक्ष आत्म्याचे ध्रुवस्वरूप आहे म्हणून तो स्वयं कारणरूप आहे. कारणाला दुसऱ्या कारणाची आवश्यकता नसते. कार्याला कारणाची अपेक्षा असते. परंतु मोक्षपर्यायरूप आत्मा स्वयं मोक्षस्वभावरूप असल्यामुळे त्याला अन्य कारणाची देखील अपेक्षा नसते.

मोक्षपर्याय अनन्तकालपर्यंत मोक्षरूपच राहतो याचे कारण आत्मा स्वतःसिद्ध मोक्षस्वरूप आहे. स्वभाव हा ध्रुव अनादिनिधन असतो. म्हणून आत्मा अनन्तकालपर्यंत मोक्षसुखाचा अनुभव घेतो. तो पुनः कधीही संसारात येत नाही.

व्यवहार शास्त्रामध्ये मोक्षमार्ग २ प्रकारचा सांगितला आहे. पण त्याचा अर्थ मोक्षमार्ग २ प्रकारचा नसून मोक्षमार्गाचे कथन साक्षात् मोक्षमार्ग व परंपरा मोक्षमार्ग ( अपवादमार्ग ) ( तीर्थप्रवृतिमार्ग ) याप्रमाणे दोन प्रकारने केले आहे.

त्यात मोक्षमार्गाचा क्रम दाखविला आहे. शुद्धोपयोग हा एकच साक्षात् मोक्षमार्ग आहे. त्याचे साधन म्हणून प्रथम सखोल गहन शास्त्राभ्यास केला पाहिजे. शास्त्रामध्ये ६ द्रव्यांचे, ७ तत्त्वांचे यथार्थ स्वरूप वर्णन केले आहे. जीवाच्या द्रव्य-गुण-पर्यायाचे वर्णन केले आहे.

---

१. यस्य स्वयं स्वभावाप्तिरभावे कृत्स्नकर्मणाम् ।। (इष्टोपदेश) २. सम्यग्दर्शनचारित्राणि मोक्षमार्गः । (तत्त्वार्थसूत्र)
३. रयणत्तयं ण वट्टइ अप्पाणं मुयत्तु अण्णदवियम्हि । तम्हा तत्तियमइयो होदि हु मोक्खस्स कारणं आदा ।। ( द्रव्यसंग्रह )
४. उपादान कारणसदृशं हि कार्यं ५. आत्मोदानयोगेन दृषदः स्वर्णता मता ।




शुद्ध उपयोग म्हणजे आत्मतत्त्वाची अनुभूति. आपणास आपल्या आत्मतत्त्वाची अनुभूति होण्यासाठी ज्यानी स्वतः प्रत्यक्ष आत्मानुभूति घेतली आहे असे पंचपरमेष्ठी यांचा आदर्श समोर ठेवला पाहिजे. त्यांच्या द्रव्य-गुण-पर्यायाचे स्वरूप समजून घेतले पाहिजे.

[1]जो अरिहंताचे द्रव्य-गुण-पर्याय जाणतो तोच आपले द्रव्य-गुण-पर्याय जाणू शकतो. जसे आपणास आपले मुख पाहण्यासाठी प्रथम दर्पणात पाहणे आवश्यक असते, त्याशिवाय आपणास आपले मुख दिसू शकत नाही त्याप्रमाणे अरिहंताचे द्रव्य-गुण-पर्याय चिंतवन केल्याशिवाय आपणास आपल्या आत्म्याचे द्रव्य-गुण-पर्यायाचे ज्ञान होणे शक्य नाही. ज्याला आपल्या आत्मतत्त्वाची अनुभूति झाली त्याचाच राग-द्वेष-मोह दूर होतो. तो स्वतः परमात्मा बनतो.

परमात्मा बनण्याचा हा क्रमबद्ध मार्ग आहे. याशिवाय दुसरा मार्ग नाही. प्रथम अरिहंत देवाची भक्ति-पूजा-दान-दया आदि व्यवहारधर्म हा मोक्षमार्गाचा क्रमबद्ध मार्ग नितांत आवश्यक आहे. पण त्याचे पालन करीत असताना लक्ष-भावना-रुचि निश्चय धर्माची-शुद्ध आत्मस्वरूप जाणून घेण्याची ठेवली पाहिजे. तरच तो व्यवहारधर्म परंपरा मोक्षमार्गाचा साधक होऊ शकतो.

याप्रमाणे प्रत्येक मुमुक्षु भव्य श्रावकाने आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाचे ध्येय-लक्ष ठेवून वीतराग-देव-शास्त्र-गुरूची पंचपरमेष्ठीची भक्ति-दया-दान आदि आचार-धर्म तीर्थ-प्रवृत्ति मार्गाचे क्रमाने आचरण करीत करीत शेवटी आपल्या आत्मस्वरूपाचे चिंतवन करीत आपल्या आत्मस्वरूपात स्थिर होण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

भेदविज्ञानतः सिद्धाः, सिद्धा ये किल केचन । तस्यैवाभावतो बद्धाः, बद्धा ये किल केचन ॥

आजपर्यंत जे कोणी सिद्ध परमात्मा बनले ते याच मार्गाने स्वसंवेदन-भेदविज्ञान बलाने शुद्ध उपयोग पुरुषार्थानेच सिद्ध झाले. स्वतः त्यानी आपल्या आत्मस्वरूपाचा अनुभव घेतला व तोच मार्ग त्यानी मुमुक्षु भव्य जनास मार्गदर्शन केला आहे. याचे उलट आजपर्यंत जे कोणी संसारात बद्ध आहेत ते स्वसंवेदन ज्ञानाच्या अभावाने राग-द्वेष-मोह-भावरूप विभाव परिणामानीच बद्ध आहेत.

राग-द्वेष-मोहाचा विषय-कषाय भावाचा त्याग करून शुद्ध आत्मस्वरूपाची रुचि-प्रतीति-अनुभूति हाच शाश्वत शांति सुखाचा एकमेव राजमार्ग आहे.






१. जो जाणइ अरहंत दव्वत्तगुणत्त पज्जयत्ते हिं । सो जाणइ अप्पाणं मोहो खलु जादि तस्स लयं ॥

# गुणस्थान (जीवन-चित्रपट)

जैन शासनाने जीवाची उन्नति किंवा अवनति याचे दिग्दर्शक सूक्ष्म-मापक यंत्र गुणस्थान सांगितले आहेत. गुण म्हणजे जीवाचा ध्रुवस्वभाव सम्यग्दर्शन-सम्यग्ज्ञान-सम्यक्‌चारित्र या तीन रत्नत्रयगुणाला येथे प्रामुख्याने गुण संज्ञा दिली आहे.

" गुणसण्णा सा च मोह जोग भवा "

मोह-राग-द्वेष-भाव व योगभाव यांच्या निमित्तवश जीवाच्या दर्शन-ज्ञान-चारित्र गुणांची, श्रद्धा-रुचि, प्रतीति, वृत्ति या स्वभावाचे जे प्रकार त्याना गुणस्थान म्हणतात.

जीवाचे हे परिणाम असंख्यात लोकप्रमाण असंख्यात प्रकारचे होतात. परंतु त्याना प्रामुख्याने १४ प्रकारच्या गुणस्थानामध्ये अंतर्भूत केले आहे.

हे १४ प्रकारचे गुणस्थान भाव नित्य अचेतन[1] भाव आहेत असे म्हटले आहे. कारण हे जीवाचे स्वभाव भाव नाहीत. म्हणून या गुणस्थान परिणामाविषयी सतत परत्वबुद्धी ठेवून हे गुणस्थान भाव जो धारण करतो तो ध्रुव कारण परमात्मा— परम पारिणामिक भाव त्यालाच स्वभाव समजून, त्या स्वभावाकडे सतत लक्ष ठेवणे, त्याचीच रुचि, त्याचीच प्रतीति, त्यातच स्थिर वृत्ति हाच उन्नतीचा राजमार्ग आहे.

याचे उलट आपल्या ध्रुव स्वभावाची जाणीव न ठेवता या गुणस्थानादि परभावाना आपला स्वभाव समजणे, त्या परभावाची रुचि-प्रतीति-वृत्ति ठेवणे यालाच मिथ्या दर्शन-ज्ञान-चारित्ररूप संसारमार्ग म्हटले आहे.

हा जीव अनादि काळापासून आपल्या स्वभाव भावास विसरून या परभावालाच आपला स्वभाव समजून आपल्याच अपराध दोषाने संसारात भ्रमण करीत कोणकोणत्या अवस्था प्राप्त करीत आहे व त्यामुळे त्याला कशा प्रकारचे फळ मिळते याचा दिग्दर्शक चित्रपट म्हणजे ही १४ गुणस्थाने होत.

या गुणस्थानाचे स्वरूप अत्यंत विस्ताररूपाने गोम्मटसार जीवकांड या ग्रंथात सांगितले. त्या करणानुयोग ग्रंथाचा अभ्यास करणे नितांत आवश्यक आहे. त्यामुळे कशा प्रकारच्या परिणामानी कसे फळ मिळते याचा बोध होऊन त्या प्रकारचे परिणाम होऊ न देता सतत आपल्या नित्य शुद्ध-बुद्ध-ध्रुव चैतन्य भावात ज्ञाता-द्रष्टा स्वभावात स्थिर राहण्याची ओढ निर्माण होते. त्यालाच स्व-संवेदन-भेदविज्ञान-सम्यग्दर्शन, स्व-पर-विवेक इ. अनेक नावे आहेत. तोच मोक्ष प्राप्तीचा, जीवाच्या उन्नति पथाचा राजमार्ग आहे.

१ गुणस्थानाचे लक्षण— जेहि दु लक्खिज्जंते उदयादिसु संभवेहि भावेहि ।
जीवा ते गुणसण्णा णिद्दिट्ठा सव्व दरसीहि ॥ ८ ॥ (गो. जी.)

मोहनीय कर्माचा उदय-उपशम-क्षय-क्षयोपशम झाला असता जीवाचे जे भाव होतात त्या परिणामाची जी स्थाने-प्रकार त्याना गुणस्थान म्हणतात.

मोह (राग-द्वेष-मोहरूप परिणाम) व योग (मन-वचन-काय यांची प्रवृत्ति) रूप परिणाम यांच्या निमित्ताने जीवाच्या सम्यग्दर्शन व चारित्र गुणाची जी स्थाने-प्रकार त्याना गुणस्थान म्हणतात.

२ गुणस्थानाचे प्रकार— ही गुणस्थाने १४ आहेत. त्यापैकी १ ते ४ गुणस्थानाना प्रामुख्याने जीवाच्या सम्यग्दर्शन गुणाची मुख्यता ठेवून नावे दिली आहेत व ५ ते १४ गुणस्थानाना चारित्र गुणाची मुख्यता ठेवून नावे ठेवली आहेत.

---

१. मोहण कम्मस्सुदया दु वण्णिया जे इमे गुणट्ठाणा । ते कह हवंति जीवा जे णिच्चमचेदणा उत्ता ॥ (प्रवचनसार गाथा १८)

३ गुणस्थानाची नावे– मिच्छो सासण मिच्छो अविरदसम्मो य देसविरदो य ।
विरदा पमत्त इदरो, अपुव्व अणियट्टि सुहुमो य ॥
उवसंत खीणमोहो सजोग केवलि जिणो अजोगी य ।
चउदस जीवसमासा कमेण सिद्धा य णायव्वा ॥

१) मिथ्यात्व, २) सासादन, ३) मिश्र, ४) अविरतसम्यक्त्व, ५) देशविरत, ६) प्रमत्तविरत, ७) अप्रमत्त, ८) अपूर्वकरण, ९) अनिवृत्तिकरण, १०) सूक्ष्म सांपराय, ११) उपशांतमोह, १२) क्षीणमोह, १३) सयोग केवली, १४) अयोग केवली.

**४ गुणस्थानांचे स्वरूप– १ मिथ्यात्व–** विपरीत-उलटी-मान्यता.

अतत्त्वाविषयी तत्त्व बुद्धी, अधर्मविषयी धर्म बुद्धी, अनिष्टाविषयी इष्ट बुद्धी, हेयाविषयी उपादेय बुद्धी अशी विपरीत मान्यता, मिथ्या श्रद्धा त्याला मिथ्यात्व म्हणतात.

मिथ्यात्व कर्माचा[1] उदय असताना जीवाचे असे विपरीत परिणाम होतात. ज्याप्रमाणे ज्वराने पीडित असलेल्या माणसास गोड पदार्थ कडवट वाटतो त्याप्रमाणे या विपरीत दृष्टि माणसाला धर्माची कथा-आत्म्याची कथा आवडत नाही. मिथ्यात्वाचे प्रामुख्याने ५ भेद आहेत–

१) एकांत, २) विपरीत, ३) विनय, ४) संशय, ५) अज्ञान.

**१ एकांत मिथ्यात्व–** वस्तु अनेकान्तात्मक–उभय धर्मात्मक–सामान्यविशेष धर्मात्मक असताना वस्तु केवळ कोणत्याही एक धर्मात्मकच मानणे हे एकांत मिथ्यात्व होय. जसे वस्तु सर्वथा नित्य-अपरिणमनशील मानणे (सांख्य), वस्तु सर्वथा अनित्य-परिणमनशील मानणे (बौद्ध).

**२ विपरीत मिथ्यात्व–** अतत्त्वाला तत्त्व मानणे, अधर्माला धर्म मानणे ते विपरीत मिथ्यात्व होय. जसे– यज्ञयागादि क्रियेस धर्म मानणे.

**३ विनय मिथ्यात्व–** खऱ्या-खोट्याची परीक्षा न करता सर्वांचा सारखा विनय करणे ते विनय मिथ्यात्व होय. सरागी व वीतरागी देवाचा सारखा विनय करणे ते विनय मिथ्यात्व होय.

**४ संशय मिथ्यात्व–** वस्तूच्या स्वरूपाविषयी हे खरे की ते खरे असा संशय ठेवणे ते संशय मिथ्यात्व होय. स्त्रीवेदामध्ये प्रमत्तादि गुणस्थाने सांगितली आहेत. तेव्हा तो भाववेद की द्रव्यवेद असा संशय ठेवणे, श्वेतांबर मतानुयायी द्रव्यस्त्रीला मुक्ति मानतात. ते संशय मिथ्यात्व होय.

**५ अज्ञान मिथ्यात्व–** वस्तु स्वरूपाचे अज्ञान असणे, जाणीव नसणे ते अज्ञान मिथ्यात्व होय. एकेंद्रियापासून असंज्ञी पचेंद्रियापर्यंत सर्वांना अज्ञान मिथ्यात्वच असते. मस्करी मतवाले अज्ञान मिथ्या दृष्टि होत.

मिथ्यात्वाचे– गृहीत-अगृहीत असे २ भेद आहेत.

**१ गृहीत मिथ्यात्व–** कुगुरु-कुदेव-कुशास्त्र यांच्या भक्तीने जी विपरीत मान्यता होते ते गृहीत मिथ्यात्व होय.

**२ अगृहीत मिथ्यात्व–** दुसऱ्याच्या उपदेशाशिवाय पूर्वपरंपरेने चालत आलेली जी विपरीत मान्यता ते अगृहीत मिथ्यात्व होय. जीवादिक प्रयोजनभूत तत्त्वाविषयी विपरीत श्रद्धान ते अगृहीत मिथ्यात्व होय.

१. मिच्छत्तं वेदंतो जीवो विवरीय दंसणो होदि । ण य धम्मं रोचेदि हु महुरं खु रसं जहा जरिदो ॥ (गो. जी. १७)




शरीर-धन-धान्य आदि परद्रव्य, पंचेंद्रियाचे विषय व कषाय याविषयी एकत्व बुद्धि ठेवणे ते अगृहीत मिथ्यात्व होय. मी सुखी, मी दुःखी, मी श्रीमंत, मी गरीब, मी राजा, मी रंक, माझे धन, माझे वैभव, माझा पुत्र, माझी स्त्री, शरीर सुखी तर मी सुखी, शरीर दुःखी तर मी दुःखी, शरीराचा जन्म तो माझा जन्म, शरीराचे मरण ते माझे मरण अशी जीव-अजीव तत्त्वाविषयी विपरीत मान्यता ते मिथ्यात्व होय.

अशुभ– पाप कर्मांचा आस्रवबंध दुःखदायक, अनिष्ट समजणे व शुभ– पुण्य कर्माचा आस्रवबंध सुखदायक-इष्ट समजणे ही आस्रवबंध तत्त्वाची विपरीत मान्यता होय. वीतराग-विज्ञानरूप आत्म स्वभाव भाव हा संवर-निर्जरेला कारण आहे. त्याला कष्टदायक समजणे ही संवर-निर्जरा-मोक्ष तत्त्वाची विपरीत मान्यता होय.

२ सासादन गुणस्थान– (स + आसादन) (विराधना)

हे गुणस्थान वर चढताना होत नाही. चवथ्या गुणस्थानातून खाली उतरताना होते. उपशम सम्यग्दृष्टि जीवास जेव्हा अनंतानुबंधी कषायाचा उदय येतो तेव्हा तो सम्यक्त्वापासून भ्रष्ट होतो पण जोपर्यंत मिथ्यात्वाचा उदय येत नाही तोपर्यंत मधल्या अवस्थेत जे विराधनारूप भ्रष्टरूप परिणाम होतात त्याला सासादन गुणस्थान म्हणतात. या गुणस्थानाचा काळ कमीत कमी १ समय व जास्तीत जास्त ६ आवली असतो. या गुणस्थानातून नियमाने तो मिथ्यात्व गुणस्थानातच जातो.

जेव्हा सम्यक्त्वरूपी पर्वतावरून मिथ्यात्वरूपी भूमीच्या सन्मुख खाली पडतो परतु जोपर्यंत मिथ्यात्व-रूपी भूमीवर येत नाही त्या मधल्या अवस्थेला सासादन हे नाव आहे.

३ मिश्र गुणस्थान– सम्यग्मिथ्यात्व प्रकृतीचा उदय असताना जीवाचे धड सम्यक्त्वरूपही नाही व धड मिथ्यात्वरूपही नाही असे मिश्र परिणाम होतात त्यास मिश्र गुणस्थान म्हणतात. ज्याप्रमाणे श्रीखंडाचा स्वाद धड साखरेसारखा गोडही नसतो व धड दह्यासारखा आंबटही नसतो असा मिश्र स्वाद असतो. त्याप्रमाणे हे सम्यक्त्व मिथ्यात्वरूप परिणाम मिश्र असतात. या मिश्र गुणस्थानातील जीव देशसंयम किंवा संयम धारण करू शकत नाही. पुढील आयूचा बंध देखील या मिश्र परिणामात होत नाही. मरताना नियमाने एक तर मिथ्यादृष्टि होतो, अथवा सम्यग्दृष्टि होतो. नंतर मरण येते. या गुणस्थानात मारणांतिक समुद्घात देखील होत नाही.

४ अविरत सम्यक्त्व– दर्शन-मोहनीय कर्माच्या तीन प्रकृति (मिथ्यात्व-सम्यग्मिथ्यात्व-सम्यक्प्रकृति) व अनंतानुबंधीच्या चार प्रकृति याप्रमाणे सात प्रकृतीचा उपशम किंवा क्षय किंवा क्षयोपशम झाला असताना जीवाचे यथार्थ तत्त्व श्रद्धानरूप परिणाम होतात ते चौथे गुणस्थान होय. सातिशय मिथ्यादृष्टि जीव सम्यग्दृष्टि होण्यापूर्वी जेव्हा करणलब्धि प्राप्त करतो तेव्हा त्याचे परिणामाची शुद्धि तीन प्रकाराने होते. त्याला करण-त्रय म्हणतात– १) अधःकरण, २) अपूर्वकरण, ३) अनिवृत्तिकरण.

१) अधःकरण– ज्या परिणामात अनिकृष्टि रचना [1]असते.

२) अपूर्वकरण– जेथे परिणामाची शुद्धता अपूर्व-वाढतच राहते.

३) अनिवृत्तिकरण– जेथे सर्वांचे परिणामाची सारखी शुद्धि होत राहते.

याप्रमाणे जो करणलब्धि प्राप्त करून करणत्रय मांडतो जेव्हा तीन प्रकारची परिणाम शुद्धी होते तेव्हाच त्याला सम्यग्दर्शनाची प्राप्ति होते. करणलब्धि प्राप्त झाल्याशिवाय सम्यग्दर्शन प्राप्त होत नाही हाच करणत्रय मांडण्याचा क्रम ५ व्या गुणस्थानात व ७ व्या गुणस्थानात चढताना देखील होतो.

---

१ [खालच्या जीवाचे परिणाम (मागाहून करणत्रय माडणाऱ्या) वरच्या (अगोदर करणत्रय माडणाऱ्या) जीवाच्या परिणामासारखे समान होऊ शकतात त्याला अनुकृष्टि रचना म्हणतात.]








जीव-अजीव आदि प्रयोजनभूत तत्त्वाविषयी याचे यथार्थ श्रद्धान असते. स्व-पराचे भेदविज्ञान असते. हेय-उपादेय तत्त्वाचा विवेक असतो. आपल्या ध्रुव आत्म स्वभावाची दृढ रूचि असते. तथापि पूर्वकर्मोदयवश व्रत-संयम धारण करण्याचे परिणाम होत नाही. म्हणून या गुणस्थानास अविरत[1] सम्यक्त्व हे नाव आहे. तो पंचेंद्रियाच्या विषयापासून, त्रस-स्थावर जीवाच्या हिंसेपासून विरत नसतो म्हणून यास अविरत सम्यग्दृष्टी म्हणतात.

धर्माचा–मोक्षमार्गाचा प्रारंभ याच गुणस्थानापासून होतो. ज्यावेळी जीवाला यथार्थ तत्त्वज्ञान–आत्म स्वभाव ज्ञान होते, यथार्थ तत्त्व श्रद्धान होते त्याच समयी त्याला पूर्वी असलेले ज्ञान व चारित्र हे सम्यक्ज्ञान व सम्यक्चारित्र म्हटले जाते म्हणून सम्यग्दर्शन ज्ञान-चारित्र यांची एकतारूप मोक्षमार्ग या गुणस्थानापासून सुरू होतो. अनंतानुबंधीच्या अभावात लब्धिरूप स्वरूपाचरण चारित्र या गुणस्थानात निरंतर असते. त्यामुळे संवर-निर्जरा सतत होत असते.

सम्यग्दर्शन प्राप्त होताच जीवाच्या जीवनाचा सुकाणू जो पूर्वी मिथ्यात्व अवस्थेत संसार मार्गाकडे सुरू होता तो बदलून मोक्ष मार्गाकडे सुरू होतो.

यासाठी सर्व प्रथम मिथ्यात्वाचा विपरीत मान्यतेचा त्याग करून सम्यग्दर्शनाची प्राप्ती करून घेण्याचा पुरुषार्थ अवश्य केला पाहिजे. सम्यग्दर्शन हाच सुखी जीवनाचा राजमार्ग आहे. सम्यग्दर्शन प्राप्त झाल्यानंतर त्याचे ज्ञान व चारित्र सर्व मोक्षमार्गानुकूल परिवर्तन झाल्याशिवाय राहात नाही.

सम्यग्दर्शनाचे माहात्म्य सांगताना आचार्य म्हणतात–
दंसणभट्टा भट्टा दंसणभट्टस्स णत्थि णिव्वाणं । सिज्झंति चरियभट्टा, दंसणभट्टा ण सिज्झंति ॥

जे सम्यग्दर्शनापासून भ्रष्ट आहेत ते संसारातच भटकतात, सम्यग्दर्शनापासून भ्रष्ट जो होतो त्याला निर्वाणाची प्राप्ति होऊ शकत नाही. जे दर्शनभ्रष्ट नाहीत पण कदाचित् तावत्काळ चारित्रापासून भ्रष्ट जरी असतील तरी पुन: तत्काळ चारित्रामध्ये स्थिर होऊन मोक्ष प्राप्ती करून घेऊ शकतात. पण जे दर्शनापासूनच भ्रष्ट आहेत त्याना मोक्षसिद्धि प्राप्त होत नाही.

**५ देशविरत गुणस्थान–** प्रत्याख्यानावरण कषायाचा उदय असताना जीवाचे परिणाम सकलसंयम धारण करण्याचे होत नाहीत तथापि अप्रत्याखानावरण कर्माचा क्षयोपशम असताना तो सकलसंयमाचा अभ्यास म्हणून देशसंयम, श्रावकाचे अणुव्रत-गुणव्रत-शिक्षाव्रत धारण करतो त्यास देशविरत गुणस्थान म्हणतात.

या गुणस्थानात तो त्रसजीवाचा घात करीत नाही म्हणून विरत म्हटला जातो परंतु स्थावर जीवाच्या घातापासून विरत नसतो, गृह-व्यापार संबंधी स्थावर जीव-हिंसा त्याला नाइलाजाने करणे आवश्यक असते म्हणून तो अविरत– याप्रमाणे एकाच वेळी निरनिराळ्या अपेक्षेने विरत-अविरत रूप उभयरूप परिणाम अविरोध रूपाने असतात म्हणून यास विरताविरत असे दुसरे नाव आहे.

श्रावकाचे प्रामुख्याने ३ भेद आहेत. १) पाक्षिक, २) नैष्ठिक, ३) साधक. दुसऱ्या प्रकाराने श्रावकाच्या ११ प्रतिमा (स्थाने) सांगितल्या आहेत.




१) पाक्षिक– पहिला दर्शन प्रतिमाधारी हा पाक्षिक श्रावक म्हटला जातो. याला व्रत धारण करण्याचे परिणाम होत नाहीत. परंतु व्रत धारण करण्याची भावना-पक्ष असतो म्हणून यास पाक्षिक हे नाव आहे.

२) नैष्ठिक– दुसऱ्या व्रत प्रतिमेपासून ११ व्या प्रतिमेपर्यंत नैष्ठिक श्रावक म्हटला जातो.

३) साधक– अती आत्म स्वभावात स्थिर राहून समाधि-मरण साधणारा तो साधक म्हटला जातो.

१. णो इंदियेसु विरदो, णो जीवे थावरे तसे वापि । जो सद्दहदि जिणुत्त, सम्माइट्ठी अविरदो सो ॥ (गो. जी. २९)

६ प्रमत्तविरत– संज्वलन व नोकषाय यांचा उदय असताना मलजनक प्रमाद (आत्म स्वरूपात लीनता सावधानता नसणे) असतो म्हणून यास प्रमत्त म्हणतात. पण प्रत्याख्यान आवरण कर्माचा क्षयोपशम असल्यामुळे महाव्रत-सकलसंयम रूप पाळण्याचे परिणाम होतात म्हणून यास प्रमत्तविरत म्हणतात.

मुनीचे २८ मूलगुण[1] ५ महाव्रत, ५ समिति, ५ इंद्रियनिरोध, ६ आवश्यक, ७ इतर गुण, ( १ स्नान न करणे, २ दंत धावन न करणे, ३ केशलोच करणे, ४ वस्त्र धारण न करणे, नग्न दिगंबररूप धारण करणे. ५ जमिनीवर झोपणे, ६ उभे राहून भोजन करणे, ७ दिवसा एक वेळ भोजन करणे. या २८ मूलगुणांचे जे निरतिचार पालन करतात ते प्रमत्तविरत साधु-मुनि-यति-ऋषि म्हटले जातात.

ज्ञान व ध्यान हे मुनीचे पवित्र जीवन होय. ते भव्य जीवाना धर्माचा मोक्षमार्गाचा उपदेश देतात. स्वतः रत्नत्रय धर्माचे निरतिचार निर्दोष पालन करतात.

प्रमाद १५ आहेत– विकहा तहा कसाया इंदिय णिद्दा तहेव पणयो य ।
चदु-चदु-पण-मेगेगं होंति पमादा हु पण्णरस ॥

४ विकथा ( १ स्त्री कथा, २ भोजन कथा, ३ राष्ट्रकथा, ४ राजकथा )

४ कषाय ( १ क्रोध, २ मान, ३ माया, ४ लोभ )

५ इंद्रिय विषय ( १ स्पर्शन, २ रसन, ३ घ्राण, ४ चक्षु, ५ श्रोत्र )

१ निद्रा १ प्रणय ( राग-द्वेष )

( ४ × ४ × ५ × १ × १ = ८० ) याप्रमाणे प्रमादाचे अपुनरुक्त भंग ( प्रकार ) ८० होतात. ८० प्रकारच्या प्रमादाने सहित हा प्रमत्तसंयत साधु चित्रलाचरण ( अनेक प्रकारचे विचित्र आचरण करणारा ) म्हटला जातो. हे गुणस्थान चढताना होत नाही. प्रथम ५ वा गुणस्थानवर्ती देशव्रती श्रावक मुनि होतो तेव्हा एकदम ७ वे अप्रमत्त गुणस्थानात जातो. नंतर अंतर्मुहूर्तात ६ व्या प्रमत्तविरत गुणस्थानात येतो. पुढे सहाव्यातून सातव्यात, सातव्यातून सहाव्यात असा चढ-उतार सारखा चालू असतो.

७ अप्रमत्त गुणस्थान– जेव्हा संज्वलन व ९ नोकषाय यांचा मंद उदय असतो तेव्हा प्रमादरहित होऊन हा जीव आपल्या ध्रुवस्वभावात अविचल स्थिर होतो त्यास अप्रमत्त विरत साधु म्हणतात.

या गुणस्थानातून वर चढताना करणत्रय (तीन[2] प्रकारचे परिणाम) मांडतो. त्यापैकी पहिले अधःकरण रूप परिणाम या ७ व्या गुणस्थानात होतात. या गुणस्थानातून चढताना २ श्रेणी[3] असतात.

या गुणस्थानात परिणामाची अनुकृष्टि रचना असते. अर्थात् मागाहून प्रारंभ करणाऱ्या खालच्या जीवाचे परिणाम देखील प्रथम प्रारंभ करणाऱ्या वरच्या जीवाचे परिणामासारखे विशुद्ध होऊ शकतात म्हणून या गुणस्थानास अधःप्रवृत्त[4] करण गुणस्थान हे नाव दिले आहे. या गुणस्थानाचा काल अंतर्मुहूर्त आहे.

८ अपूर्वकरण– या गुणस्थानात जीवाचे परिणाम पूर्वी कधीही इतके शुद्ध झाले नव्हते असे अपूर्व विशुद्ध होतात म्हणून या गुणस्थानास अपूर्वकरण गुणस्थान म्हणतात. या गुणस्थानात ४ आवश्यक होतात–

---

१. वद-समिदिंदियरोधो, लोचावस्सय मचेलमण्हाणं । खिदिसयण– मदंतवणं ठिदि भोयणमेयभुत्ति च ॥

२. अधःकरण ( गुण ७ वे ) अपूर्वकरण ( गुण ८ वे ) अनिवृत्तिकरण ( गुण ९ वे )

३. १) उपशमश्रेणी– चारित्र मोहाचा उपशम करीत वर चढतो तो उपशमक म्हटला जातो.
२) क्षपकश्रेणी– चारित्र मोहाचा क्षय करीत वर चढतो तो क्षपक म्हटला जातो.

४. जम्हा उवरिम भावा हेट्ठिम भावेहि सरिसगा होंति । तम्हा पढमं करण अधापवत्तेत्ति णिद्दिट्ठं ॥

१) स्थितिकांडकघात– अशुभ कर्माची स्थिति कांडकसमूहरूपाने कमी होते.

२) अनुभागकांडकघात– अशुभ कर्माचे फल कांडकसमूहरूपाने कमी होते.

३) गुणसंक्रमण– अशुभप्रकृतीचे शुभप्रकृतिरूप संक्रमण होते.

४) गुणश्रेणीनिर्जरा– गुणाकार श्रेणीरूपाने अशुभ कर्माची निर्जरा होते.

या गुणस्थानाचा काल अंतर्मुहूर्त आहे.

**९ अनिवृत्तिकरण**–या गुणस्थानात ज्यांचे परिणामामध्ये निवृत्ति भेद-फरक नसतो, सर्वांचे समान विशुद्ध परिणाम असतात त्यास अनिवृत्तिकरण गुणस्थान म्हणतात. या गुणस्थानाचा काल अंतर्मुहूर्त आहे.

या गुणस्थानाला दुसरे नाव बादरकृष्टि आहे. अर्थात् या गुणस्थानात क्रोध-मान-माया व स्थूल लोभ व नोकषाय यांचा अभाव होतो.

**१० सूक्ष्मसांपराय**– जेथे केवल सूक्ष्म लोभ शिल्लक राहतो अशा विशुद्ध परिणामास सूक्ष्मसांपराय गुणस्थान म्हणतात. या गुणस्थानातून वर चढताना जो जीव उपशम श्रेणीने चढणारा उपशमक असतो तो नियमाने ११ व्या गुणस्थानात जातो. तेथून अंतर्मुहूर्तपर्यंत ११ व्या गुणस्थानात राहून सत्तेतील चारित्र मोहनीय कर्म उदयास येते. त्यामुळे तेथून तो नियमाने खाली पडतो. क्षपक श्रेणीने चढणारा क्षपक ११ व्या गुणस्थानात न जाताना १० व्यातून एकदम १२ व्या गुणस्थानात जातो. तेथून नियमाने १३–१४ व्या गुणस्थानात जाऊन मुक्त होतो. खाली पडत नाही.

**११ उपशांत मोह**– जेथे चारित्रमोहनीयच्या २१ प्रकृतीचा उपशम[1] झाला असताना जीवाचे निर्मल राग-द्वेष रहित वीतराग शुद्ध परिणाम होतात, त्यास उपशांत मोह गुणस्थान म्हणतात.

**१२ क्षीण मोह**– चारित्र मोहाचा संपूर्णपणे क्षय झाला असताना जीवाचे निर्मल राग-द्वेष रहित वीतराग शुद्ध परिणाम होतात त्यास क्षीण मोह गुणस्थान म्हणतात.

उपशांत मोह व क्षीण मोह या दोन्ही गुणस्थानात चारित्र मोहाच्या उदयाचा अभाव असल्यामुळे परिणामाची शुद्धता सारखी असते. दोहोंचे परिणाम वीतराग शुद्ध असतात. केवळ फरक हा असतो की, ज्याप्रमाणे एका भांड्यातील पाणी गाळ खाली दबून बसला असताना वरून दिसावयास स्वच्छ असते परंतु भांडे हालविले की लागलीच ते पाणी पुनः गढूळ होते. त्याप्रमाणे उपशांत मोह गुणस्थानात मोहनीय कर्म पूर्णपणे उपशम होऊन दबून बसलेले असते, त्यामुळे तावत्काळ परिणाम पूर्ण शुद्ध-वीतराग असतात. पण लागलीच अंतर्मुहूर्तानंतर सत्तेतील मोहकर्म उदयास येते व जीवाचे परिणाम राग-द्वेष युक्त होतात.

परंतु क्षीणमोह गुणस्थानातील परिणाम मलरहित निर्मल शुद्ध पाण्याप्रमाणे मोहरहित-राग-द्वेषरहित वीतराग पूर्ण शुद्ध असतात. पुनः ते परिणाम रागद्वेषरूप होत नाहीत.

क्षीणमोह गुणस्थानवर्ती जीव अंतर्मुहूर्तामध्ये नियमाने बाकीच्या तीन घातिकर्मांचा (ज्ञानावरण-दर्शनावरण-अंतराय कर्मांचा) युगपत् क्षय करून १३ व्या गुणस्थानात जातो. केवलज्ञानाची प्राप्ति करून घेतो.

**१३ सयोग केवल गुणस्थान**– या गुणस्थानात ४ घाति कर्मांचा पूर्णपणे नाश होतो. जीवाला आपले स्वभाव चतुष्टय-अनंतज्ञान-अनंतदर्शन-अनतसुख-अनंतवीर्य प्राप्त होतात. आत्मा परमात्मा बनतो. या गुणस्थानात ४ घाति कर्मांचा नाश झाला असताना ९ क्षायिक लब्धी प्राप्त होतात. १) क्षायिक ज्ञान, २) क्षायिक दर्शन. ३) क्षायिक सम्यक्त्व, ४) क्षायिक चारित्र ५ ते ९ क्षायिक दान-लाभ-भोग-उपभोग-वीर्य. येथे काययोग असतो म्हणून या गुणस्थानास सयोग केवल गुणस्थान म्हणतात. याना शरीर असते म्हणून सकल परमात्मा म्हणतात.

१. सत्तेमध्ये राहणे, उदयास न येणे यास उपशम म्हणतात.

गुणस्थान ७ पासून पुढील गुणस्थाने ध्यानस्थ असतात. त्यांचा निरंतर उपयोग आत्मध्यानात असतो.

या १३ व्या गुणस्थानात काययोग असल्यामुळे सर्वज्ञ भगवान् ध्यानस्थ असताना देखील त्यांच्या शरीराच्या बाह्य क्रिया[1] समवसरणात सिंहासनावर अधर बसणे, दिव्यध्वनी द्वारे उपदेश देणे, समवसरण विघटित झाल्यानंतर सिंहासनावरून उठणे, विहार करणे या सर्व क्रिया नियतिवश-नियोगवश होतात. त्या क्रिया करण्याकडे त्यांचा उपयोग नसतो.

समवसरणामध्ये सर्वज्ञ भगवान भव्य जीवाना धर्माचा-व्यवहार धर्माचा, तीर्थ प्रवृति मार्गाचा-पुण्य मार्गाचा व निश्चय धर्माचा मोक्षमार्गाचा दिव्यध्वनीद्वारे उपदेश देतात.

दिव्यध्वनि निघणे हा त्यांचा देवकृत अतिशय असतो. त्या अतिशयामुळे त्यांच्या सर्वांगातून-जीभ-दात-ओठ इ. अवयव न हालविता ॐकार रूप-अनक्षरी भाषारूप दिव्यध्वनि निघते. ती समवसरणातील सर्व जीवाना आपापल्या भाषेमध्ये समजते.

याप्रमाणे सर्वज्ञ भगवान भव्य जीवाना मोक्ष मार्गाचे मार्गदर्शन करून जीवाना आत्म कल्याण-सुखाचा मार्ग दाखवितात. ते साक्षात् प्रत्यक्ष निमित्त होतात म्हणून त्यांना प्रथम नमस्कार[2] केला आहे. अरिहंत भगवान वीतराग १८ दोषानी रहित असतात. सर्वज्ञ असतात. ते केवलज्ञानाने लोक-अलोकातील सर्व पदार्थ व त्याचे त्रिकालवर्ती भूत-भविष्य-वर्तमान सर्व पर्याय याना युगपत् जाणतात. वास्तविक निश्चयनयाने ते आत्मज्ञ असतात. त्यांचा उपयोग आपल्या ध्रुव आत्मस्वरूपात स्थिर असतो. परंतु त्यांचे आत्म-ज्ञानोपयोगात जगातील संपूर्ण ज्ञेयपदार्थ स्वयं प्रतिबिंबित होतात म्हणून व्यवहारनयाने भगवान सर्वज्ञ म्हटले जातात.

आपण आरशाकडे पाहतो. त्यावेळी त्यात पडलेले प्रतिबिंब देखील आपणास सहजपणे दिसते. आरशात पडलेल्या प्रतिबिंबाकडे पाहण्याच्या उद्देशाने त्या प्रतिबिंबाकडे आपले लक्ष केंद्रित करणे हे अल्पज्ञानाचे कनिष्ट ज्ञानाचे लक्षण होय. वास्तविक त्यावेळी देखील आपण प्रथम आरसा पाहतो, नंतर प्रतिबिंब पाहतो. पण आपणास आरसा दिसत नाही. आपण आरशाकडे पाहतो याचे भान विसरतो व प्रतिबिंबाकडे पाहण्यातच आपण तल्लीन होतो. ही प्रतिबिंबाकडे पाहण्याची जी रागमय बुद्धी तेच जडज्ञान-अज्ञान होय. ते ज्ञान असूनही अज्ञान-जडज्ञान म्हटले जाते. कारण ते ज्ञानाचे कार्य न करता जडाला पाहण्याचे कार्य करते. तो प्रतिबिंबाला पाहात असताना वास्तविक ज्ञानाला ज्ञानाकाराला जाणण्याचे कार्य करतो. तथापि त्याला ज्ञानाकाराचे भान होत नाही. प्रतिबिंबाकार ज्ञेयाकारालाच वस्तु समजून त्या प्रतिबिंबाकडे पाहण्यातच ज्ञानाची सार्थकता समजतो हेच त्याचे अज्ञान होय.

परंतु जे सत्यज्ञान-पूर्णज्ञान असते, त्याचा उपयोग केवळ आत्मज्ञानरूप दर्पणाकडे असतो. त्यावेळी ज्ञानाच्या स्वच्छ स्वभावात संपूर्ण ज्ञेयाचे प्रतिबिंब ज्ञानात पडते. संपूर्ण ज्ञेयाकारामध्ये ते ज्ञान व्यापक असते. तथापि त्या ज्ञेयाकाराकडे त्या ज्ञानाचा उपयोग नसतो, त्या ज्ञेयाकाराना जाणण्याची उत्सुकता रागबुद्धी नसते म्हणून ते ज्ञान ज्ञानाकार रूपानेच परिणमते. ज्ञेयाकार रूपाने परिणमत नाही. त्या ज्ञानाचे ज्ञेयार्थ परिणमन होत नाही. तेच ज्ञान खरे सत्यज्ञान, जीवज्ञान म्हटले जाते.

आपले ज्ञान ज्ञेयाकार परिणत होते, ज्ञेय पदार्थाला जाणण्याची उत्सुकता-रागबुद्धी ठेवून आपण जाणण्याचे काम करतो. आपले ज्ञान ज्ञेयार्थ परिणमन करते म्हणून आपले ज्ञान खरे सत्यज्ञान नसून ते जडज्ञान-अज्ञान म्हटले जाते. या जडज्ञानाला इष्ट न समजता सत्यज्ञानालाच इष्ट समजून त्यालाच उपादेय समजून त्यात जो श्रद्धेने, ज्ञानाने, वृत्तीने स्थिर होतो तोच स्वतः सत्यज्ञानी-सर्वज्ञ परमात्मा बनतो.

---

१. ठाण-णिसेज्ज विहारा धम्मुवदेसो णियदयो तेसिं ॥ प्रवचनसार ( अध्याय १ गाथा ४४ )

२. 'णमो अरिहंताणं' या णमोकार मंत्रातील प्रथम पदाने प्रथम नमस्कार केला आहे.

या गुणस्थानाचा काल कमीत कमी अंतर्मुहूर्त व जास्तीत जास्त १ कोटी पूर्वाला ८ वर्षे व अतर्मुहूर्त कमी इतका असतो. शेवटी विहार बंद होतो. समाधि योग धारण करतात.

आयुकर्माची स्थिति संपत आली असताना जर इतर तीन अघाति कर्माची स्थिति जास्त असेल तर ती स्थिति कमी करण्यासाठी केवली भगवान केवली समुद्घात करतात. आत्म्याचे प्रदेश मूल शरीराला न सोडता बाहेर पडणे याला समुद्घात म्हणतात. हा केवली समुद्घात आठ समयाचा असतो.

१) पहिल्या समयात आत्म्याचे प्रदेश १४ राजू ऊंच दंडाकार पसरतात.

२) दुसऱ्या समयात आत्म्याचे प्रदेश पडद्याप्रमाणे प्रतराकार लांब व रुंद लोकाकाशभर पसरतात.

३) तिसऱ्या समयात आत्म्याचे प्रदेश कपाटाप्रमाणे लांबी-रुंदी-जाडी लोकाकाशभर पसरतात.

४) चवथ्या समयात पूर्ण लोकाकाशभर लोकपूरण रूप होतात. त्यामुळे त्या बाकीच्या तीन अघाति कर्माची स्थिति पूर्ण आभोग प्राप्त करुन आयुकर्मा इतकी समान होते.

५) पाचव्या, ६ सहाव्या, ७ सातव्या समयात पुनः पूर्ववत् क्रमाने कपाटाकार-प्रतराकार-दंडाकार होऊन शेवटच्या आठव्या समयात मूल शरीरात प्रवेश करतात.

**१४ अयोग केवल गुणस्थान–** जेव्हा अरिहंत भगवान योगनिरोध करतात, समाधियोग धारण करतात. शेवटी योगाचा अभाव होतो. नवीन कर्माच्या आस्रव-बंधाचा पूर्ण अभाव होतो. शेवटी चारीही अघाति कर्माचा पूर्ण नाश होतो. त्यांचे परम औदारिक शरीर कापरासारखे उडून बाह्य वातावरणात ते परमाणू मिळून जातात. त्यांचा आत्मा एका समयात ऊर्ध्वगमन करून लोकाच्या अग्रभागी असलेल्या सिद्धभूमीवर जाऊन विराजमान होतो. तेथून पुनः कधीही संसारात येत नाही. तेव्हा तो मुक्त किंवा सिद्ध म्हटला जातो.

**सिद्ध परमात्मा–** मुक्त परमात्म्याला 'सिद्ध' म्हणतात निश्चयनयाने मूलात आत्मा स्वतःसिद्ध जीवास्तिकायस्वरूप जसा जितका जेवढा अनंत गुणांचा अखंडपिंड असतो. तसाच, तितकाच, तेवढाच सिद्ध अवस्थेत शिल्लक राहतो प्रगट होतो. बाकी संसार अवस्थेत जीवाशी अनादिकाळापासून बद्ध संयोगरूप असलेली उपाधि-अनात्मतत्त्व– भावकर्म ( रागद्वेषादि विकार ), द्रव्यकर्म ( ज्ञानावरणादि ८ कर्म, नोकर्म-शरीर-इंद्रिये वगैरे ) या सर्वांचा सिद्ध अवस्थेमध्ये अभाव होतो.

त्यापैकी कर्म व नोकर्म तर पुद्गल वर्गणा रूप सत् द्रव्य आहे. त्या कर्म-नोकर्म अवस्था विलीन होऊन पुद्गलवर्गणारूप होतात. परंतु रागद्वेषादि भावकर्म हे वास्तविक सत्‌रूप पदार्थ नाहीत. जीवाने भ्रमाने मानलेले विकारभाव असतात.

ज्याप्रमाणे आरसा व पदार्थ याचा जोपर्यंत सयोग असतो तोपर्यंत प्रतिबिंब दिसते. पण त्यांचा संयोग दूर झाला म्हणजे ते प्रतिबिंब कोठे जाते. त्याचे काय होते हा प्रश्नच आकाश पुष्पाप्रमाणे निरर्थक ठरतो. कारण वास्तविक ते रागादिकभाव मूल पदार्थ नसतात. आत्म्याच्या ज्ञानरूप पदार्थाने तात्कालिक धारण केलेले ते मायावी रूप असते. ज्याप्रमाणे मृगजल ही वास्तविक वस्तु नसते. पण त्याचे अस्तित्वाचा भास हरिणाना होतो. त्याचप्रमाणे रागद्वेष हे वास्तविक मूलभूत वस्तु नसतात. हा जीव अज्ञानाने त्याना आपला स्वभाव समजतो. त्यांचा आदर करतो तोपर्यंतच ते आपले मायावी रूप दाखवून जगाला भुरळ घालतात.

गुणस्थान ७ पासून पुढील गुणस्थाने ध्यानस्थ असतात. त्यांचा निरंतर उपयोग आत्मध्यानात असतो.

या १३ व्या गुणस्थानात काययोग असल्यामुळे सर्वज्ञ भगवान् ध्यानस्थ असताना देखील त्यांच्या शरीराच्या बाह्य क्रिया[1] समवसरणात सिंहासनावर अधर बसणे, दिव्यध्वनी द्वारे उपदेश देणे, समवसरण विघटित झाल्यानंतर सिंहासनावरुन उठणे, विहार करणे या सर्व क्रिया नियतिवश-नियोगवश होतात. त्या क्रिया करण्याकडे त्यांचा उपयोग नसतो.

समवसरणामध्ये सर्वज्ञ भगवान भव्य जीवाना धर्माचा-व्यवहार धर्माचा, तीर्थ प्रवृत्ति मार्गाचा-पुण्य मार्गाचा व निश्चय धर्माचा मोक्षमार्गाचा दिव्यध्वनीद्वारे उपदेश देतात.

दिव्यध्वनि निघणे हा त्यांचा देवकृत अतिशय असतो. त्या अतिशयामुळे त्यांच्या सर्वांगातून-जीभ-दात-ओठ इ. अवयव न हालविता ॐकार रूप-अनक्षरी भाषारूप दिव्यध्वनि निघते. तो समवसरणातील सर्व जीवाना आपापल्या भाषेमध्ये समजते.

याप्रमाणे सर्वज्ञ भगवान भव्य जीवाना मोक्ष मार्गाचे मार्गदर्शन करुन जीवाना आत्म कल्याण-सुखाचा मार्ग दाखवितात. ते साक्षात् प्रत्यक्ष निमित्त होतात म्हणून त्यांना प्रथम नमस्कार[2] केला आहे. अरिहंत भगवान वीतराग १८ दोषानी रहित असतात. सर्वज्ञ असतात. ते केवलज्ञानाने लोक-अलोकातील सर्व पदार्थ व त्यांचे त्रिकालवर्ती भूत-भविष्य-वर्तमान सर्व पर्याय याना युगपत् जाणतात. वास्तविक निश्चयनयाने ते आत्मज्ञ असतात. त्यांचा उपयोग आपल्या ध्रुव आत्मस्वरूपात स्थिर असतो. परंतु त्यांचे आत्म-ज्ञानोपयोगात जगातील संपूर्ण ज्ञेयपदार्थ स्वयं प्रतिबिंबित होतात म्हणून व्यवहारनयाने भगवान सर्वज्ञ म्हटले जातात.

आपण आरशाकडे पाहतो. त्यावेळी त्यात पडलेले प्रतिबिंब देखील आपणास सहजपणे दिसते. आरशात पडलेल्या प्रतिबिंबाकडे पाहण्याच्या उद्देशाने त्या प्रतिबिंबाकडे आपले लक्ष केंद्रित करणे हे अल्पज्ञानाचे कनिष्ट ज्ञानाचे लक्षण होय. वास्तविक त्यावेळी देखील आपण प्रथम आरसा पाहतो, नंतर प्रतिबिंब पाहतो. पण आपणास आरसा दिसत नाही. आपण आरशाकडे पाहतो याचे भान विसरतो व प्रतिबिंबाकडे पाहण्यातच आपण तल्लीन होतो. ही प्रतिबिंबाकडे पाहण्याची जी रागमय बुद्धी तेच जडज्ञान-अज्ञान होय. ते ज्ञान असूनही अज्ञान-जडज्ञान म्हटले जाते. कारण ते ज्ञानाचे कार्य न करता जडाला पाहण्याचे कार्य करते. तो प्रतिबिंबाला पाहात असताना वास्तविक ज्ञानाला ज्ञानाकाराला जाणण्याचे कार्य करतो. तथापि त्याला ज्ञानाकाराचे भान होत नाही. प्रतिबिंबाकार ज्ञेयाकारालाच वस्तु समजून त्या प्रतिबिंबाकडे पाहण्यातच ज्ञानाची सार्थकता समजतो हेच त्याचे अज्ञान होय.

परंतु जे सत्यज्ञान-पूर्णज्ञान असते, त्याचा उपयोग केवळ आत्मज्ञानरूप दर्पणाकडे असतो. त्यावेळी ज्ञानाच्या स्वच्छ स्वभावात संपूर्ण ज्ञेयाचे प्रतिबिंब ज्ञानात पडते. संपूर्ण ज्ञेयाकारामध्ये ते ज्ञान व्यापक असते. तथापि त्या ज्ञेयाकाराकडे त्या ज्ञानाचा उपयोग नसतो, त्या ज्ञेयाकारांना जाणण्याची उत्सुकता रागबुद्धी नसते म्हणून ते ज्ञान ज्ञानाकार रूपानेच परिणमते. ज्ञेयाकार रूपाने परिणमत नाही. त्या ज्ञानाचे ज्ञेयार्थ परिणमन होत नाही. तेच ज्ञान खरे सत्यज्ञान, जीवज्ञान म्हटले जाते.

आपले ज्ञान ज्ञेयाकार परिणत होते, ज्ञेय पदार्थाला जाणण्याची उत्सुकता-रागबुद्धी ठेवून आपण जाणण्याचे काम करतो. आपले ज्ञान ज्ञेयार्थ परिणमन करते. म्हणून आपले ज्ञान खरे सत्यज्ञान नसून ते जडज्ञान-अज्ञान म्हटले जाते. या जडज्ञानाला इष्ट न समजता सत्यज्ञानालाच इष्ट समजून त्यालाच उपादेय समजून त्यात जो श्रद्धेने, ज्ञानाने, वृत्तीने स्थिर होतो तोच स्वतः सत्यज्ञानी-सर्वज्ञ परमात्मा बनतो.

---

१. ठाण-णिसेज्ज विहारा धम्मुवदेसो णियदयो तेसिं ॥ प्रवचनसार ( अध्याय १ गाथा ४४ )

२. 'णमो अरिहंताणं' या णमोकार मंत्रातील प्रथम पदाने प्रथम नमस्कार केला आहे.

# १४ मार्गणा स्थान

जैनदर्शनाने ज्याप्रमाणे जीवाच्या कोणत्या परिणामानी जीवाला संसारामध्ये नानाविध अवस्था धारण कराव्या लागतात याचे सूक्ष्म अध्ययन करण्यासाठी १४ गुणस्थानाचे वर्णन मोठ्या मार्मिकपणाने केले, त्याचप्रमाणे त्या परिणामानी जीवाला कोणकोणत्या अवस्था प्राप्त होतात. त्या अवस्थांचे परिज्ञान होण्यासाठी १४ मार्गणा स्थानाचे वर्णन देखील मोठ्या मार्मिकपणाने केले आहे. जीवतत्त्वाचे अध्ययन करण्यासाठी हे १४ मार्गणा स्थानाचे वर्णन देखील जाणून घेणे नितांत आवश्यक आहे.

मार्गणा म्हणजे शोध. जीवाचा शोध करण्यासाठी जीव ज्या ज्या अवस्था धारण करतो ते जाणून घेणे प्रथम आवश्यक आहे.

मार्गणा लक्षण– ज्या योगे किंवा ज्या ठिकाणी जीव शोधले जातात, जीवाचे अस्तित्व जाणले जाते त्यास मार्गणा म्हणतात. मार्गणा १४ आहेत– १) गति, २) इंद्रिय, ३) काय, ४) योग, ५) वेद, ६) कषाय, ७) ज्ञान, ८) संयम, ९) दर्शन, १०) लेश्या, ११) भव्यत्व, १२) सम्यक्त्व, १३) संज्ञित्व, १४) आहारकत्व.

या १४ प्रकारानी जीवाचे अन्वेषण– जीवाचा शोध केला जातो. म्हणून ही १४ मार्गणा स्थाने सांगितली आहेत–

**१ गतिमार्गणा–** गति नामकर्माचा उदय असताना जीव जी अवस्था धारण करतो त्यास गति म्हणतात. गति ४ आहेत– १) नरकगति, २) तिर्यंचगति, ३) मनुष्यगति, ४) देवगति.

**१ नरकगति–** पृथ्वीच्या खाली ७ नरकभूमी आहेत. तेथे जे उत्पन्न होतात, त्याना नारकी म्हणतात. नरकगति नामकर्माचा उदय असताना जे जीव नरक भूमीमध्ये उत्पन्न होतात त्याना नारकी म्हणतात. त्याना निरंतर शारीरिक-मानसिक-आगन्तुक-क्षेत्रजन्य दुःख भोगावे लागते. बहु आरंभ– बहु परिग्रह– या परिणामानी नरकायूचा बंध पडतो. तेथील जीवाना अवधिज्ञान असते. अवधिज्ञानाने पूर्वभवातील वैरभाव आठवून नारकी जीव परस्पराना अत्यंत दु.ख देतात. त्याना भूक लागते पण अन्नाचा कण देखील मिळत नाही. तेथील माती हेच त्यांचे अन्न. त्याना तहान इतकी लागते परंतु पाण्याचा एक थेंब देखील मिळत नाही. तेथे वैतरिणी नद्या असतात. त्यामध्ये अत्यंत दुर्गंध पाणी असते. तेथील शालमली वृक्षाला तरवारीच्या धारेप्रमाणे तीक्ष्ण पाने असतात. त्यामुळे नारकी जीवांच्या शरीराचे तुकडे तुकडे होतात. त्यांचे वैक्रियिक शरीर असते. तुकडे होऊन पुनः पाऱ्याप्रमाणे ते एकत्र मिळून जाते. तेथे इतकी उष्णता असते की, मेरू पर्वता एवढा लोखंडाचा गोळा देखील वितळून जातो.

याप्रमाणे नरकगतीमध्ये पूर्वजन्मी केलेल्या पाप कर्माचे फल नाना प्रकारचे दु.ख भोगावे लागते.

**२ तिर्यंचगति–** तिर्यंचगति नामकर्माचा उदय असताना जे एकेंद्रियादि तिर्यंच गतीमध्ये उत्पन्न होतात त्याना तिर्यंच म्हणतात. तिर्यंच जीवाचे ५ भेद आहेत–

१) एकेंद्रिय, २) द्वीद्रिय, ३) त्रीद्रिय, ४) चतुरिंद्रिय, ५) पचेंद्रिय.

१ एकेंद्रिय– पृथ्वी-पाणी-अग्नि-वारा-वनस्पति याना एक स्पर्शन इंद्रिय असते म्हणून त्याना एकेंद्रिय तिर्यंच म्हणतात.

२ द्वीद्रिय– ज्याना स्पर्शन व रसना (जीभ) दोन इंद्रिये असतात त्याना द्वीद्रिय जीव म्हणतात. जसे– आळी-शंख वगैरे.






जेव्हा जीवाला वस्तु स्वरूपाचे ज्ञान होते, जेव्हा जीव आपल्या ध्रुव ज्ञान स्वभावात स्थिर होतो तेव्हा पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे केवळ दिसणारे पण वास्तविक वस्तु भूत नसणारे रागद्वेष पार लयास जातात. याप्रमाणे संसाराचे या मायावी नाटकाचा शेवट होतो. जीव आपल्या स्वाभाविक स्वत.सिद्ध मूळ स्वरूपात सदासर्वकाळ स्थिर होतो.

त्यावेळी कर्म-नोकर्म-भावकर्म रूप उपाधीचा नाश होतो. म्हणून व्यवहारनयाने निमित्तप्रधान भाषेमध्ये कर्माच्या अभावाने आत्मा सिद्ध परमात्मा होतो असे म्हटले जाते.

वास्तविक कर्म परद्रव्य आहे. एका द्रव्याच्या अभावाने दुसऱ्या द्रव्यात ( जीव द्रव्यात ) पूर्वी नसलेला सिद्धपणा नंतर प्राप्त होतो असे नसून जो जेवढा स्वतःसिद्ध जीवास्तिकाय मूलद्रव्य असतो तोच तेवढाच कर्माच्या अभावात प्रगट होतो.

व्यवहारात आपण दर्पणावरील मळ नष्ट झाल्यामुळे दर्पण स्वच्छ झाला असे म्हणतो. पण त्याचा अर्थ मलाच्या अभावाने दर्पणामध्ये नसलेला स्वच्छपणा मागाहून येतो असे नसून मळाच्या सद्भावात देखील दर्पणाचा जो स्वच्छ स्वभाव मूलभूत असतो तोच मळाच्या अभावात प्रगट झालेला आपणास दिसतो.

यावरून वास्तविक 'शक्ति मुक्त' आत्मा मूळ स्वतःसिद्ध शुद्ध जीवास्तिकायच असतो. त्या शक्तिमुक्त आत्म्याचे ज्याला दर्शन होते, श्रद्धान होते त्याला 'दृष्टि मुक्त' म्हणतात. जेव्हा दृष्टिमुक्त आत्मा शक्तिमुक्त आत्म्याशी तल्लीन होतो तेव्हा तोच 'पर्याय मुक्त' 'व्यवहार मुक्त' म्हटला जातो.

परमात्मा बनवावा लागत नाही, बनविला जात नाही. तो स्वत.सिद्ध बनलेलाच आहे. त्याची जाणीव करून घेऊन त्यात विलीन होणे हेच व्यवहाराने परमात्मा बनणे म्हटले जाते.

हेच जैनदर्शनाचे अनेकान्तात्मक गूढ रहस्य आहे.









# १४ मार्गणा स्थान

जैनदर्शनाने ज्याप्रमाणे जीवाच्या कोणत्या परिणामानी जीवाला संसारामध्ये नानाविध अवस्था धारण कराव्या लागतात याचे सूक्ष्म अध्ययन करण्यासाठी १४ गुणस्थानाचे वर्णन मोठ्या मार्मिकपणाने केले, त्याचप्रमाणे त्या परिणामानी जीवाला कोणकोणत्या अवस्था प्राप्त होतात. त्या अवस्थांचे परिज्ञान होण्यासाठी १४ मार्गणा स्थानाचे वर्णन देखील मोठ्या मार्मिकपणाने केले आहे. जीवतत्त्वाचे अध्ययन करण्यासाठी हे १४ मार्गणा स्थानाचे वर्णन देखील जाणून घेणे नितांत आवश्यक आहे.

मार्गणा म्हणजे शोध. जीवाचा शोध करण्यासाठी जीव ज्या ज्या अवस्था धारण करतो ते जाणून घेणे प्रथम आवश्यक आहे.

मार्गणा लक्षण– ज्या योगे किंवा ज्या ठिकाणी जीव शोधले जातात, जीवाचे अस्तित्व जाणले जाते त्यास मार्गणा म्हणतात. मार्गणा १४ आहेत– १) गति, २) इंद्रिय, ३) काय, ४) योग, ५) वेद, ६) कषाय, ७) ज्ञान, ८) संयम, ९) दर्शन, १०) लेश्या, ११) भव्यत्व, १२) सम्यक्त्व, १३) संज्ञित्व, १४) आहारकत्व.

या १४ प्रकारानी जीवाचे अन्वेषण– जीवाचा शोध केला जातो. म्हणून ही १४ मार्गणा स्थाने सांगितली आहेत–

**१ गतिमार्गणा–** गति नामकर्माचा उदय असताना जीव जी अवस्था धारण करतो त्यास गति म्हणतात. गति ४ आहेत– १) नरकगति, २) तिर्यंचगति, ३) मनुष्यगति, ४) देवगति.

**१ नरकगति–** पृथ्वीच्या खाली ७ नरकभूमी आहेत. तेथे जे उत्पन्न होतात, त्याना नारकी म्हणतात. नरकगति नामकर्माचा उदय असताना जे जीव नरक भूमीमध्ये उत्पन्न होतात त्याना नारकी म्हणतात. त्याना निरंतर शारीरिक-मानसिक-आगन्तुक-क्षेत्रजन्य दुःख भोगावे लागते. बहु आरंभ– बहु परिग्रह– या परिणामानी नरकायूचा बंध पडतो. तेथील जीवाना अवधिज्ञान असते. अवधिज्ञानाने पूर्वभवातील वैरभाव आठवून नारकी जीव परस्पराना अत्यंत दुःख देतात. त्याना भूक लागते पण अन्नाचा कण देखील मिळत नाही. तेथील माती हेच त्यांचे अन्न. त्याना तहान इतकी लागते परंतु पाण्याचा एक थेंब देखील मिळत नाही. तेथे वैतरिणी नद्या असतात. त्यामध्ये अत्यंत दुर्गंध पाणी असते. तेथील शाल्मली वृक्षाला तरवारीच्या धारेप्रमाणे तीक्ष्ण पाने असतात. त्यामुळे नारकी जीवांच्या शरीराचे तुकडे तुकडे होतात. त्यांचे वैक्रियिक शरीर असते. तुकडे होऊन पुनः पाऱ्याप्रमाणे ते एकत्र मिळून जाते. तेथे इतकी उष्णता असते की, मेरू पर्वता एवढा लोखंडाचा गोळा देखील वितळून जातो.

याप्रमाणे नरकगतीमध्ये पूर्वजन्मी केलेल्या पाप कर्माचे फल नाना प्रकारचे दुःख भोगावे लागते.

**२ तिर्यंचगति–** तिर्यंचगति नामकर्माचा उदय असताना जे एकेंद्रियादि तिर्यंच गतीमध्ये उत्पन्न होतात त्याना तिर्यंच म्हणतात. तिर्यंच जीवाचे ५ भेद आहेत–

१) एकेंद्रिय, २) द्वीद्रिय, ३) त्रीद्रिय, ४) चतुरिंद्रिय, ५) पंचेंद्रिय.

**१ एकेंद्रिय–** पृथ्वी-पाणी-अग्नि-वारा-वनस्पति याना एक स्पर्शन इंद्रिय असते म्हणून त्याना एकेंद्रिय तिर्यंच म्हणतात.

**२ द्वीद्रिय–** ज्याना स्पर्शन व रसना (जीभ) दोन इंद्रिये असतात त्याना द्वीद्रिय जीव म्हणतात. जसे– आळी-शंख वगैरे.



३ त्रींद्रिय– ज्याना स्पर्शन-रसना-घ्राण (नाक) तीन इंद्रिये असतात त्याना त्रींद्रिय जीव म्हणतात. जसे– मुंगी-मुगळा-टेकूण वगैरे.

४ चतुरिंद्रिय– ज्याना स्पर्शन-रसना-घ्राण-चक्षु चार इंद्रिये असतात त्याना चतुरिंद्रिय जीव म्हणतात. जसे– माशी-भुंगा-पतंग वगैरे.

५ पंचेंद्रिय– ज्याना पाच इंद्रिये असतात त्याना पंचेंद्रिय तिर्यंच म्हणतात. पंचेंद्रिय तिर्यंचाचे ३ भेद आहेत.

१) जलचर– पाण्यात राहणारे मासे, सुसर, मगर वगैरे.

२) स्थलचर– गाय, म्हैस वगैरे पशु.

३) नभचर– चिमणी, कावळा, हंस वगैरे पक्षी.

या तिर्यंच गतीतील जीवामध्ये प्रायः 'जीवो जीवस्य जीवनं' या उक्तीप्रमाणे दुसऱ्या जीवास मारण्याची क्रूर व कुटिल बुद्धि अधिक असते. ज्याना तीव्र, प्रगट मैथुन संज्ञा असते, सारासार विवेक बुद्धि नसते, अत्यंत पापी-क्षुद्र-नीच वृत्ति असते, त्याना तिर्यंच जीव म्हणतात. १) सामान्य तिर्यंच, २) पंचेंद्रिय तिर्यंच, ३) योनिमती तिर्यंच, ४) पर्याप्त, ५) अपर्याप्त. याप्रमाणे पाच प्रकाराने तिर्यंचगति मार्गणेचे वर्णन केले आहे.

३ मनुष्यगति– मनुष्यगति नामकर्माचा उदय असताना ते मनुष्य गतीमध्ये जन्म धारण करतात त्याना मनुष्य म्हणतात. मनुष्यगतीमध्ये मानकषायाचा प्रायः तीव्र उदय असतो. मानापमानासाठी वेळप्रसंगी आपले प्राण देखील देण्यास मागे पुढे पाहात नाही. मनुष्यामध्ये मनाने सारासार विचार करण्याची बुद्धि अधिक असते. या कलियुगातील मानवाची १४ मनूपासून उत्पत्ति होते म्हणून याना मनुष्य ही संज्ञा रूढ आहे. मनुष्याचे कर्मभूमिज, भोगभूमिज, आर्य, म्लेंच्छ इ. अनेक भेद आहेत.

१) सामान्य मनुष्य, २) योनिमती मनुष्य (भावस्त्री-द्रव्यस्त्री), ३) पर्याप्त मनुष्य, ४) अपर्याप्त मनुष्य. याप्रमाणे चार प्रकाराने मनुष्यगति मार्गणेचे वर्णन केले आहे.

अडीच द्वीपातील एकूण पर्याप्त मनुष्य संख्या किती आहे याचे वर्णन जैनशास्त्रकारानी लिहून ठेवले आहे. ती संख्या २९ अंकप्रमाण आहे.[1]

प्राचीन काली अकसंख्या वर्णाक्षर भाषेत वर्णन करण्याची पद्धत मोठी मजेदार गंमतशीर वाटते.
कटपय पुरस्थवर्णैः नवनवपंचाष्टकल्पितैः क्रमशः । स्वरञनशून्यं संख्यामात्रोपरिमाक्षरं त्याज्यं ॥

क ख ग घ ङ च छ ज झ.
१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९
ट ठ ड ढ ण त थ द ध
१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९
प फ ब भ म
१ २ ३ ४ ५
य र ल व श ष स ह
१ २ ३ ४ ५ ६ ७ ८
कोणताही स्वर, ञ, न हे वर्ण शून्य ० चे सूचक आहेत.

१. तललीन मधुग विमल धूमसिलागाविचोरभयमेरू । तटहरिखझसा होंति हु माणुस पज्जत्त संखंका ॥

अंकानो वामतो गतिः या न्यायाने श्लोकातील वर्ण उजवीकडून डावीकडे मोजावे. यावरून वरील पर्याप्त मनुष्य संख्या २९ अंकप्रमाण आहे.

सा क्ष ख रि हृ ट त रु मे य भ र चो वि गा ला सि म घू
७ ९ २ २ ८ १ ६ २ ५ १ ४ २ ६ ४ ३ ३ ७ ५ ९
लं म वि ग धु म न ली ल त
३ ५ ४ ३ ९ ५ ० ३ ३ ६

पुरुष मनुष्य संख्येच्या ३/४ संख्या योनिमती मनुष्यिनी स्त्रियांची आहे.

**४ देवगति–** देवगति नामकर्माचा उदय असताना जे देवगतीमध्ये जन्म धारण करतात त्याना देव म्हणतात. देवाना– १) अणिमा (अणुप्रमाणे लहान होणे), २) महिमा (मोठे होणे), ३) गरिमा (लोखंडाप्रमाणे जड होणे) ४) लघिमा (कापसासारखे हलके होणे), ५) प्राप्ति (कोठेही गमन करणे), ६) प्राकाम्यं (इच्छा होईल ती वस्तु प्राप्त करणे), ७) ईशित्वं (सर्वावर प्रभुत्व गाजविणे), ८) वशित्वं कोणालाही (वश करणे), या आठ सिद्धी ज्याना असतात, ज्यांचे शरीर दिव्य प्रकाशमान वैक्रियिक असते त्यांना देव म्हणतात.

देवाचे चार भेद आहेत– १) भवनवासी, २) व्यंतर, ३) ज्योतिष्क, ४) वैमानिक.

१) भवनवासी– पृथ्वीच्या खाली खरभाग-पंकभागामध्ये ज्यांचे भवन-प्रासाद वासस्थान आहेत त्याना भवनवासी म्हणतात. भवनवासी देवांचे १) असुरकुमार, २) नागकुमार, ३) विद्युत्कुमार, ४) सुपर्णकुमार, ५) अग्निकुमार, ६) वातकुमार, ७) स्तनितकुमार, ८) उदधिकुमार, ९) द्वीपकुमार, १०) दिक्कुमार असे दहा भेद आहेत.

२) व्यंतर– १) किंनर, २) किंपुरुष, ३) महोरग, ४) गंधर्व, ५) यक्ष, ६) राक्षस, ७) भूत, ८) पिशाच्च असे ८ भेद आहेत.

३) ज्योतिष्क– १) सूर्य, २) चंद्र, ३) ग्रह, ४) नक्षत्र, ५) प्रकीर्णक तारका असे ५ भेद आहेत.

हे ज्योतिष्क देव मनुष्य लोकात (अडीच द्वीपात) नित्य गमनशील असतात. मेरुपर्वताभोवती प्रदक्षिणा घालतात. यांचे गतीवरून दिवस-पळ-घटका इ. व्यवहार कालाचे प्रमाण ठरविले जाते.

४) वैमानिक– ऊर्ध्वलोकात १६ स्वर्ग, ९ अनुदिश, ९ ग्रैवेयक, ५ पंचोत्तर विमानात जे राहतात त्याना वैमानिक देव म्हणतात.

## ५ सिद्धगती

जन्म-मरण-म्हातारपण-संयोग-वियोग-दुःख-चार संज्ञा-रोग आदि विकार ज्याना नसतात, ज्यानी कर्म-नोकर्म-भावकर्म उपाधीचा पूर्णपणे नाश केला आहे ज्याना अनंतज्ञानादि स्वाभाविक गुण प्रगट झाले आहेत त्याना सिद्ध जीव म्हणतात. ते पुनः संसारात कधीही येत नाहीत.

## २ इंद्रियमार्गणा

१) ज्याप्रमाणे अहमिंद्र देव सर्व समान असतात. एकमेकाचे एकमेकावर प्रभुत्व नसते. प्रत्येकजण आपापला स्वामी असतो, त्याप्रमाणे ही इंद्रिये स्वतंत्र असतात. एकमेकावर एकमेकाचे प्रभुत्व नसते. प्रत्येक इंद्रिय आपला कारभार करण्यात स्वतंत्र असते. म्हणून याना इंद्रिय म्हणतात.

इंद्रियाचे २ भेद आहेत– १) द्रव्येंद्रिय. २) भावेंद्रिय.

**१ द्रव्येंद्रिय–** शरीर नामकर्माच्या उदयाने शरीरामध्ये असे चिन्ह विशेष असतात की, ज्यांचे द्वारा भावेंद्रिय जाणण्याचे कार्य करतात त्यास द्रव्येंद्रिय म्हणतात.

स्पर्शनेंद्रियाचे सर्व शरीर स्थान आहे. बाकी रसना-घ्राण-चक्षु-कर्ण यांचे विशिष्ट स्थान आहे. त्याना द्रव्येंद्रिय म्हणतात.

**२ भावेंद्रिय–** द्रव्येंद्रियाच्या द्वारे आपापल्या विषयाना जाणण्याची क्षयोपशमरूप लब्धि व उपयोग याला भावेंद्रिय म्हणतात.

इंद्रिये ५ आहेत– १) स्पर्शनेंद्रिय, २) रसनेंद्रिय, ३) घ्राणेंद्रिय, ४) चक्षुरिंद्रिय, ५) कर्णेंद्रिय.

ही इंद्रिये ज्याना असतात त्या जीवाचे इंद्रिय भेदावरून ५ भेद आहेत.

१) एकेंद्रिय– ज्याना एक स्पर्शन इंद्रिय असते.
२) द्वींद्रिय– ज्याना स्पर्शन-रसना दोन इंद्रिये असतात.
३) त्रींद्रिय– ज्याना स्पर्शन-रसना-घ्राण तीन इंद्रिये असतात.
४) चतुरिंद्रिय– ज्याना स्पर्शन-रसना-घ्राण-चक्षु चार इंद्रिये असतात.
५) पंचेंद्रिय– ज्याना ५ इंद्रिये असतात ते पंचेंद्रिय होत.

**इंद्रियाचे विषयक्षेत्र दर्शक कोष्टक**

| जीव | स्पर्शन | रसना | घ्राण | चक्षु | कर्ण |
|---|---|---|---|---|---|
| १) एकेंद्रिय | ४०० धनुष्य | – | – | – | – |
| २) द्वींद्रिय | ८०० ध. | ६४ ध. | – | – | – |
| ३) त्रींद्रिय | १६०० ध. | १२८ ध. | ११० ध. | – | – |
| ४) चतुरिंद्रिय | ३२०० ध. | २५६ ध. | २०० ध. | २९५४ योजन | – |
| ५) असंज्ञी पंचेंद्रिय | ६४०० ध. | ५१२ ध. | ४०० ध. | ५९०८ योजन | ८००० ध. |
| ६) संज्ञी पचेंद्रिय | ९ योजन | ९ योजन | ९ योजन | ४७२६३ $\frac{७}{२०}$ यो. | १२ योजन |

**अतींद्रिय ज्ञानधारी**

जे इंद्रियज्ञान व इंद्रियसुख यानी अतीत अतींद्रिय स्वाभाविक ज्ञान व सुखाने युक्त असतात त्याना अतींद्रिय ज्ञानधारी परमात्मा म्हणतात.

**३ कायमार्गणा**

जाति नामकर्माशी अविनाभावि अशा त्रस-स्थावर नामकर्माचा उदय असताना जे त्रस व स्थावरकाय धारण करतात त्याना त्रसकाय व स्थावरकाय जीव म्हणतात.

१) त्रसकाय– द्वींद्रिय-त्रींद्रिय-चतुरिंद्रिय-पचेंद्रिय हे त्रसकाय होत.
२) स्थावरकाय– पृथ्वी-पाणी-वारा-अग्नि-वनस्पति एकेंद्रिय जीव हे स्थावरकाय होत.

स्थावरकाय जीवाचे २ भेद आहेत– १) बादर, २) सूक्ष्म.

१) बादरकाय– जे शरीर दुसऱ्याकडून अडविले जाते व जे दुसऱ्यास अडविते अशा स्थूल शरीराला बादरकाय म्हणतात

२) सूक्ष्मकाय– जे शरीर दुसऱ्यास अडवीत नाहीत जे दुसऱ्याकडून अडविले जात नाहीत त्यास सूक्ष्मकाय म्हणतात.

बादरकाय जीव कोणाच्या तरी आधाराने राहतात. सूक्ष्मकाय जीव निराधार सर्वत्र लोकभर गचपच भरले आहेत.

## वनस्पतिकाय जीव वर्णन

कोणती वनस्पति भक्ष्य, कोणती अभक्ष्य याचे साधारण ज्ञान करून घेण्याच्या अपेक्षेने येथे वनस्पति कायाचे वर्णन करणे आवश्यक आहे.

वनस्पतिकायाचे २ भेद आहेत– १) प्रत्येक, २) साधारण.

१) प्रत्येक– ज्या वनस्पतिकाय शरीराचा एकच जीव स्वामी असतो त्यास प्रत्येक वनस्पतिकाय म्हणतात.

याचे दोन भेद आहेत– १) सप्रतिष्ठित, २) अप्रतिष्ठित.

१) सप्रतिष्ठित प्रत्येक– ज्या प्रत्येक वनस्पतीच्या आधारावर साधारण वनस्पतिकाय जीव असतात त्याना सप्रतिष्ठित प्रत्येक म्हणतात. या वनस्पतीच्या भक्षणाने अनंत जीवाचा घात होतो म्हणून ही वनस्पति अभक्ष्य आहे.

२) अप्रतिष्ठित प्रत्येक– ज्या प्रत्येक वनस्पतीच्या आधारावर साधारण वनस्पतिकाय जीव राहात नाहीत ती अप्रतिष्ठित प्रत्येक वनस्पति होय. ही वनस्पति भक्ष्य आहे.

ज्या वनस्पतीचे मूळ, स्कंध–पल्लवी–साल–पान–फूल–फल–बीज तोडले असताना [समानभंग होतो ती सप्रतिष्ठित प्रत्येक वनस्पति होय. जिचा समानभंग होत नाही ती अप्रतिष्ठित प्रत्येक वनस्पति होय.

२) साधारण वनस्पति– साधारण नामकर्माचा उदय असताना एकाच शरीराचे अनंतजीव स्वामी असतात ती साधारण वनस्पति होय. याचे बादर व सूक्ष्म असे दोन भेद आहेत. या अनंत निगोद काय जीवांचा सर्वांचा आहार, श्वासोच्छ्वास-जन्म-मरण एकदम होते. एका श्वासामध्ये यांचे अठरा वेळा जन्म-मरण होते. जेथे एक जीव मरतो तेव्हा सर्व अनंत जीव एकदम मरतात. जेथे एक जीव उत्पन्न होतो तेव्हा सर्व अनंत जीव एकदम उत्पन्न होतात. या एका साधारण-वनस्पतिकाय निगोद शरीरामध्ये सिद्ध राशीच्या अनंतपट किंवा अतीतकालाचे जेवढे समय होऊन गेले त्याच्या अनतपट अनंतानंत जीव असतात.

या निगोद जीवामध्ये असे अनंत जीव आहेत की ज्यानी आतापर्यंत त्रसपर्याय धारण केली नाही. काही जीव असे आहेत की, पुढे अनंत कालपर्यंत देखील निगोदवास सोडणार नाहीत.

या निगोदराशीतून दर ६ महिने आठ समयामध्ये ६०८ जीव संसारराशीत येतात व तितकेच संसारस्थ जीव दर ६ महिने आठ समयामध्ये मुक्त होतात. असा नियम आहे.

आतापर्यंत अतीतकाल अनंत होऊन गेला. अनंत जीव मुक्त झाले. पुढे अनंतकालात अनंत जीव मुक्त होतील. तथापि या निगोद राशीमध्ये सतत अनंतानत जीव राहतील अशी ही निगोदजीव राशि अक्षयानंत राशि म्हटली जाते.

## ४ योगमार्गणा

पुद्गलविपाकी नामकर्माचा उदय असताना मन-वचन-काय यांचे अवलंबनाने कर्माला ग्रहण करण्याची जी जीवाची शक्ति तिला योग म्हणतात. हा योगच कर्माच्या आस्रवाचे कारण आहे. मन-वचन-कायेच्या अवलंबनाने जे आत्मप्रदेशामध्ये स्पंदन-हलन-चलन होते त्यास योग म्हणतात. योगाचे मुख्य तीन भेद आहेत–

१) मनोयोग, २) वचनयोग, ३) काययोग. पोटभेदाच्या अपेक्षेने योगाचे १५ भेद आहेत–

४ मनोयोग– सत्य-असत्य-उभय-अनुभय.

४ वचनयोग– सत्य-असत्य-उभय-अनुभय.

७ काययोग– १) औदारिक काययोग, २) औदारिक मिश्र काययोग, ३) वैक्रियिक काययोग, ४) वैक्रियिक मिश्र काययोग, ५) आहारक काययोग, ६) आहारक मिश्र काययोग, ७) कार्माण काययोग.

सद्भावपूर्वक– सम्यग्दर्शनपूर्वक असणारा जो मनोयोग-वचनयोग तो सत्यमनोयोग, सत्यवचनयोग होय.

असद्भावपूर्वक– मिथ्यात्वपूर्वक असणारा जो मनोयोग-वचनयोग तो असत्यमनोयोग-असत्यवचनयोग होय.

मिश्रगुणस्थानवर्ती– सम्यक्‌मिथ्यात्वपूर्वक असणारा जो मनोयोग वचनयोग तो उभयमनोयोग व उभयवचनयोग होय. ज्याला सत्य किंवा असत्य म्हणता येत नाही त्याला अ-सत्य-मृषा ( अनुभय ) मनोयोग-वचनयोग म्हणतात. जसे– आमंत्रण देणे, याचना करणे, प्रश्न विचारणे वगैरे.

सत्य मनोयोग वचनयोग, अनुभय मनोयोग, वचनयोग यांचे मूळ निमित्त कारण पर्याप्ति व शरीर नामकर्माचा उदय हे आहे.

असत्य मनोयोग– वचनयोग व उभय मनोयोग-वचनयोग यांचे मूळ निमित्त कारण आपापले आवरण कर्म अर्थात्– दर्शनमोह व सम्यग्मिथ्यात्व प्रकृतिरूप मिश्र प्रकृतीचा उदय हे कारण आहे.

वास्तविक अरिहंताना– सयोग केवली गुणस्थानात इंद्रियज्ञान नसल्यामुळे मनोयोग-वचनयोग नसतो. तथापि उपचाराने त्याना सत्य मनोयोग-वचनयोग व अनुभय मनोयोग-वचनयोग सांगितला आहे. अरिहंताना द्रव्यमन द्रव्यवचन असते. त्यासाठी मनोवर्गणाचे भाषावर्गणेचे ग्रहण होते म्हणून उपचाराने मनोयोग-वचनयोग सांगितला आहे.

औदारिक काययोग व औदारिक मिश्रकाययोग औदारिक शरीरधारी मनुष्य-तिर्यंचाना असतो.

वैक्रियिक काययोग व वैक्रियिक मिश्रकाययोग वैक्रियिक शरीरधारी देव मनुष्याना असतो. आहारक काययोग व आहारक मिश्रकाययोग आहारक शरीरधारी ऋद्धिधारी प्रमत्त गुणस्थानवर्ती मुनीना असतो. कार्माण काययोग विग्रहगतीमध्ये व केवली समुद्घात केवलीना लोकपूरण अवस्थेत असतो.

२) औदारिक-वैक्रियिक-आहारक-तैजस शरीर नोकर्मवर्गणेपासून बनते व कार्माणशरीर कार्माण वर्गणेपासून बनते.

३) अनंतपरमाणूच्या समूहाला वर्गणा म्हणतात. अनंतवर्गणासमूहांचा एक समयप्रबद्ध होतो.

४) प्रतिसमय समयप्रबद्ध प्रमाण कर्म-नोकर्मसमूह बांधला जातो. तितकाच प्रतिसमय उदयाला येतो. शेवटी दीडगुणहानिगुणित समयप्रबद्ध प्रमाण कर्म सत्तेत असते.

## ५ वेदमार्गणा

पुरुषवेद-स्त्रीवेद-नपुसकवेद नामक नोकषाय मोहनीयाच्या उदयाने जीवाचे मैथुनसेवन करण्याचे परिणाम होतात त्यास भाववेद म्हणतात. नामकर्माच्या उदयाने पुरुषाना मेहनाकार जे द्रव्यलिंग व स्त्रियाना योनिलिंग तो द्रव्यवेद होय. प्रायः जो द्रव्यवेद तसेच भाववेद समान असतो, परंतु कधी कधी विषमता देखील असते.

वेदनामक नोकषायाचा उदय किंवा उदीरणा असताना जीवाचे स्पर्शनेंद्रियाच्या द्वारे विषयसेवन करण्याचे मोहयुक्त परिणाम होतात त्यास वेद म्हणतात. या मोहयुक्त परिणामात जीवाला गुणदोषाचे-हित-अहिताचे चांगल्या-वाईटाचे भान विवेक राहात नाही.

'पुरुगुणभोगेषु शेते सः पुरुषः' उत्कृष्ट गुण व भोग यामध्ये विश्राम घेतो तो पुरुष होय. मोक्षासाठी सत्पुरुषार्थ या पुरुषवेदातच होतो व सातव्या नरकात जाण्याचा कुपुरुषार्थ देखील पुरुषवेदातच होतो.

जी मृदुभाषण विनय हावभाव इत्यादिकानी पुरुषाला अब्रम्ह आदि दोषानी आच्छादित करते, स्वत.ला दोषानी आच्छादित करते ती स्त्री होय. ( स्तृणाति छादयति इति स्त्री )

जो अत्यंत कलुषित भाव धारण करतो– जो न स्त्री, न पुरुष उभयलिंगानी रहित असतो त्यास नपुंसक म्हणतात.

जो तृणाग्निसमान पुरुषवेदाने रहित असतात, गोवरीच्या ( कारीष ) अग्निसमान स्त्रीवेदाने रहित असतात व ( इष्टपाक ) भाजलेल्या वीटेच्या अग्निसमान नपुसक वेदाने रहित असतात, आपल्या स्वाभाविक आत्म सुखात लीन असतात त्याना अपगतवेदी म्हणतात.

## ६ कषाय मार्गणा

सुख दुःखरूपी फल धान्य उत्पन्न होण्यासाठी जे कर्मरूपी क्षेत्र भूमीला नांगरून तयार करतात त्याना कषाय म्हणतात. कषाय हे संसार मार्गाला वाढविणारे आहेत. कषायाचे मुख्य ४ भेद– क्रोध, मान, माया, लोभ. याचे प्रत्येकी ४ भेद आहेत– १) अनंतानुबंधी, २) अप्रत्याख्यानावरण, ३) प्रत्याख्यानावरण, ४) संज्वलन–

१) अनंतानुबंधी– जे सम्यग्दर्शन ( स्वरूपाचरण चारित्र ), याचा घात करतात त्याना अनंतानुबधी क्रोध, मान, माया, लोभ म्हणतात.

२) अप्रत्याख्यानावरण– ज्यामुळे श्रावकाचे देशचारित्र धारण करण्याचे परिणाम होत नाहीत त्यास अप्रत्याख्यानावरण क्रोध-मान- माया-लोभ म्हणतात.

३) प्रत्याख्यानावरण– ज्यामुळे मुनीचे सकल चारित्र धारण करण्याचे परिणाम होत नाहीत त्यास प्रत्याख्यानावरण क्रोध-मान-माया-लोभ म्हणतात.

४) संज्वलन– जे यथाख्यात चारित्राचा घात करतात त्यास संज्वलन क्रोध-मान-माया-लोभ म्हणतात.

१) अनंतानुबंधी क्रोध शिलारेखा समान लवकर मिटणारा नसतो. तो प्रायः नरकगतीच्या बंधाला कारण होतो.

२) अप्रत्याख्यानक्रोध– पृथ्वीरेखासमान लवकर मिटणारा असतो. तिर्यंचगतिबंधाला कारण होतो.
३) प्रत्याख्यानक्रोध– वालुरेखासमान लवकर मिटणारा असतो. मनुष्यगतिबंधाला कारण होतो.
४) संज्वलनक्रोध– जलरेखासमान तत्काल मिटणारा असतो. देवगतिबंधाला कारण होतो.
१) अनंतानुबंधीमान– पर्वताप्रमाणे कठोर न वाकणारा मान नरकगतिबंधाला कारण होतो.
२) अप्रत्याख्यानमान– हाड ( अस्थि ) प्रमाणे कमी कठोर मान तिर्यंचगतिबंधाला कारण होतो.

३) प्रत्याख्यानमान– लाकूड ( काष्ट ) प्रमाणे कमी कठोर मान मनुष्यगतिबंधाला कारण होतो.
४) संज्वलनमान– वेताप्रमाणे जलद वाकणारा मान देवगतिबंधाला कारण होतो.
१) अनंतानुबंधीमाया– वेणुमूलाप्रमाणे तीव्र जटिल माया नरकबंधाला कारण आहे.
२) अप्रत्याख्यानमाया– मेंढ्याच्या शिंगाप्रमाणे कमी वक्र माया तिर्यंचगतिबंधाला कारण आहे.
३) प्रत्याख्यानमाया– गोमूत्राप्रमाणे कमी वक्र माया मनुष्यगतिबंधाला कारण आहे.
४) संज्वलनमाया– खुरपा ( विळा ) प्रमाणे अल्प वक्र माया देवगतिबंधाला कारण आहे.
१) अनंतानुबंधी लोभ– किरमिजी रंगाप्रमाणे तीव्र लोभ नरकगतिबंधाला कारण आहे.
२) अप्रत्याख्यान लोभ– चक्रमल ( ओंगण ) प्रमाणे चिकटणारा लोभ तिर्यंचगतिबंधाला कारण आहे.
३) प्रत्याख्यान लोभ– शरीरमलाप्रमाणे कमी चिटकणारा लोभ मनुष्यगतिबंधाला कारण आहे.
४) संज्वलन लोभ– हळदीप्रमाणे अल्प चिकटणारा लोभ देवगतिबंधाला कारण आहे.

हे क्रोधादिक कषाय स्वतःच्या ज्ञानस्वभावाचा घात करणारे आहेत. ज्यांच्या निमित्ताने हे कषाय उत्पन्न होतात त्यांचा पराचा व उभयाचा घात करणारे आहेत. बंधालाच कारण आहेत. ज्या अंशाने कषाय आहेत त्या अंशाने ते आत्मस्वरूपात स्थिरतारूप सयम चारित्राचा घात करणारे आहेत. ज्यानी या कषाय भावाचा पूर्णपणे नाश केला आहे व जे आपल्या यथाख्यात संयमरूप आत्मस्वभावात अविचल स्थिर आहेत त्याना अकषाय जीव म्हणतात.

सरागता– कषायभाव हे कर्मबंधालाच कारण आहेत.

वीतरागता– अकषायभाव हेच मोक्षाला कारण आहेत.

क्रोध-मान-माया-लोभ यांचे शक्तीच्या अपेक्षेने ४ स्थाने आहेत. क्रोध शिला रेखा आदि समान, मान शैल आदि ( पर्वत ) समान, माया वेणु मूल आदि समान, लोभ किरमिजी रंगासमान.

१) शिलारेखा समान क्रोध असताना कृष्ण लेश्या एकच स्थान असते.

२) भूमिरेखा समान क्रोध असताना कृष्ण, कृष्णनील, कृष्णनील-कापोत, कृष्ण-नील-कापोत-पीत, कृष्ण-नील-कापोत-पीत-पद्म, कृष्ण-नील-कापोत-पीत-पद्म शुक्ल अशी ६ स्थाने असतात.

३) धूलिरेखा समान क्रोध असताना– कृष्णादि सहा, नीलादि पाच, कापोतादि चार, पीतादि तीन, पद्म-शुक्ल, शुक्ल अशी ६ स्थाने असतात.

४) जलरेखासमान क्रोध असताना एक शुक्ल लेश्या स्थान असते.

### कषाये शक्तिस्थान लेश्यास्थान आयुबंध–अबंधस्थान दर्शक कोष्टक

| शक्ति-स्थान ४ | शिला-रेखा १ | | भूमि-रेखा २ | | | | | | | धूलि-रेखा ३ | | | | | | | | | | जल-रेखा ४ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १ | | १ | २ | | ३ | ४ | ५ | ६ | ६ | ५ | ४ | | ३ | | २ | | १ | | १ |
| लेश्या स्थान १४ | कृष्ण लेश्या | | कृष्ण | कृष्ण नील | | कृष्ण नील कापोत | कृष्ण नील कापोत पीत | कृष्ण नील कापोत पीत पद्म | कृष्ण नील कापोत पीत पद्म शुक्ल | कृष्ण आदि ६ लेश्या | नील कापोत पीत पद्म शुक्ल | कापोत पीत पद्म शुक्ल | | पीत पद्म शुक्ल | | पद्म शुक्ल | | शुक्ल | | शुक्ल |
| | १ | २ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १ |
| आयु बंध अबंध स्थान २० | ० अबंध | १ नरक | १ न | १ म. | १ न. | २ न. ति. | ३ न. ति. म. | ४ न. ति. म. दे. | ४ न. ति. म. दे. | ४ न. ति. म. दे. | ४ न. ति. म. दे. | ३ ति. म. दे. | २ म. दे. | १ देव | १ देव | १ देव | ० अबंध | ० अबंध | ० अबंध | ० अबंध |





## ७ ज्ञानमार्गणा

जे तिन्ही लोकातील पदार्थाना त्यांच्या त्रिकालवर्ती द्रव्य-गुण-पर्यायासह प्रत्यक्ष अथवा परोक्ष जाणते त्यास ज्ञान असे म्हणतात.

ज्ञानाचे ५ भेद आहेत– १) मतिज्ञान, २) श्रुतज्ञान, ३) अवधिज्ञान, ४) मनःपर्ययज्ञान, ५) केवलज्ञान. त्यापैकी पहिली ४ ज्ञाने क्षायोपशमिक आहेत. ५ वे केवलज्ञान क्षायिकज्ञानआहे. मिथ्यात्व व अनंतानुबंधी याचा उदय असताना मति-श्रुत-अवधि ही तीन ज्ञाने जेव्हा मिथ्या दृष्टीला असतात तेव्हा ती मिथ्या ज्ञाने म्हटली जातात. जेव्हा ती तीन ज्ञाने सम्यग्दृष्टीला असतात तेव्हा ती सम्यग् ज्ञाने म्हटली जातात. विभंगावधि मिथ्या अवधिज्ञान संज्ञीपचेंद्रियपर्याप्तक जीवालाच असते. सम्यग्मिथ्यात्व कर्माचा उदय असताना मिश्रगुणस्थानामध्ये ही तीन ज्ञाने जात्यंतररूप मिश्रज्ञाने म्हटली जातात. मन.पर्ययज्ञान हे संयमधारी मुनींना ६ ते १२ गुणस्थानातील जीवाना होऊ शकते.

१) **मतिज्ञान–** पदार्थ व इंद्रिये आपल्याला योग्य ठिकाणी असताना इंद्रियद्वारे जे वर्तमानकालीन पदार्थाचे ज्ञान होते ते मतिज्ञान होय. याचे १) अवग्रह, २) ईहा, ३) अवाय, ४) धारणा असे ४ भेद आहेत.

१) अवग्रह– सामान्य प्रतिभासरूप दर्शन झाल्यानंतर पदार्थाचे आद्यग्रहण तो अवग्रह होय. जसे– प्रथम काही तरी आहे असा सामान्यप्रतिभास होतो ते दर्शन होय. त्यानंतर हा पांढरा पदार्थ आहे असे जे पदार्थाचे आद्यग्रहण तो अवग्रह होय. अवग्रहाचे २ भेद आहेत– १) व्यंजनावग्रह, २) अर्थावग्रह.

१) व्यंजनावग्रह– अव्यक्त पदार्थाच्या अवग्रहाला व्यंजनावग्रह म्हणतात.

२) अर्थावग्रह– व्यक्त पदार्थाच्या अवग्रहाला अर्थावग्रह म्हणतात. स्पर्शन-रसना-घ्राण-कर्ण या चार इंद्रियानी प्रथम अव्यक्तरूप व्यंजनावग्रह होतो नंतर व्यक्तरूप अर्थावग्रह होतो. चक्षु व मन यानी व्यक्तरूप अर्थावग्रहच होतो. अव्यक्तरूप व्यंजनावग्रह होत नाही.

२ **ईहा–** अवग्रहाने जाणलेल्या पदार्थाविषयी विशेष जाणणेची जी उत्कंठा तिला ईहा म्हणतात. जसे– हा पांढरा पदार्थ अमुक असावा. ईहा ज्ञान हे संशयज्ञान नसून अवग्रहाने जाणल्यानंतर उत्पन्न होणाऱ्या संशयाला दूर करणाऱ्या ज्ञानाला ईहा ज्ञान म्हणतात– ईहाज्ञानामध्ये 'हे की ते' असा संशय नसतो.

३ **अवाय–** ईहा ज्ञानाने जाणलेल्या पदार्थाविषयी निश्चयात्मक ज्ञानाला अवाय ज्ञान म्हणतात. जसे– हा पांढरा पदार्थ बक पंक्तीच (बगळ्याची रांग) आहे.

४ **धारणा–** अवाय ज्ञानाने जाणलेल्या पदार्थाचे ज्ञानाचे संस्कार काही काल विस्मरण न होणे यास धारणा ज्ञान म्हणतात. या अवग्रहादि ज्ञानाचे विषयभूत ज्ञेय पदार्थ सामान्यतः १२ प्रकारचे असतात– बहु-बहुविध-क्षिप्र-अनि.सृत-अनुक्त-ध्रुव-याचे उलट एक-एकविध-अक्षिप्र-नि.सृत-उक्त-अध्रुव याप्रमाणे या १२ प्रकारच्या पदार्थाचे होणाऱ्या मतिज्ञानाचे एकूण ३३६ भेद होतात.

| | व्यंजनअवग्रह | अर्थअवग्रह | ईहा | अवाय | धारणा |
|---|---|---|---|---|---|
| १) स्पर्शनेंद्रिय | १२ | १२ | १२ | १२ | १२ |
| २) रसनेंद्रिय | १२ | १२ | १२ | १२ | १२ |
| ३) घ्राणेंद्रिय | १२ | १२ | १२ | १२ | १२ |
| ४) चक्षुरिंद्रिय | – | १२ | १२ | १२ | १२ |
| ५) कर्णेंद्रिय | १२ | १२ | १२ | १२ | १२ |
| ६) मनः | – | १२ | १२ | १२ | १२ |
| | ४८ | ७२ | ७२ | ७२ | ७२ |

एकूण ३३६ भेद

२) श्रुतज्ञान– श्रुतज्ञान हे मतिज्ञानपूर्वक होते. मतिज्ञानाने जाणलेल्या पदार्थाविषयी जे विशेष ज्ञान होते त्यास श्रुतज्ञान म्हणतात. श्रुतज्ञानाचे मुख्य २ भेद आहेत– १) अंगबाह्य, २) अंगप्रविष्ट.

१) अंगबाह्य श्रुतज्ञान अनेक प्रकारचे आहे. २) अंगप्रविष्ट श्रुतज्ञानाचे १२ भेद आहेत.

| | | |
|---|---|---|
| १) आचारांग– श्रावकाचार-मुनिधर्माचाराचे वर्णन | यात १८००० | पदे आहेत. |
| २) सूत्रकृतांग– स्वसमय-परसमय सूत्रांचे वर्णन | यात ३६००० | पदे आहेत. |
| ३) स्थानांग– स्थान-विकल्प भेदाचे वर्णन | यात ४२००० | पदे आहेत. |
| ४) समवायांग– द्रव्यामध्ये परस्पर सादृश्य वर्णन | यात १६४००० | पदे आहेत. |
| ५) व्याख्याप्रज्ञप्ति– साठ हजार प्रश्नोत्तर वर्णन | यात २२८००० | पदे आहेत. |
| ६) ज्ञातृधर्म कथा– तीर्थंकर माहात्म्य वर्णन | यात ५५६००० | पदे आहेत. |
| ७) उपासकाध्ययन– उपासक-श्रावकधर्म वर्णन | यात ११७०००० | पदे आहेत. |
| ८) अंतःकृतदशांग– अंत:कृत् केवली वर्णन | यात २३२८००० | पदे आहेत. |
| ९) अनुत्तरोपपाददशांग– तीर्थंकराच्या तीर्थातील मुनींचे वर्णन | यात ९२४४००० | पदे आहेत. |
| १०) प्रश्नव्याकरणांग– आक्षेपणी-विक्षेपणी-संवेजनी निर्वेजनी कथा वर्णन | यात ९३१६००० | पदे आहेत. |
| ११) विपाकसूत्रांग– कर्मफल वर्णन. | यात १८४००००० | पदे आहेत. |

अकरा अंगांची एकूण पदे ४१५०२००० आहेत.

१२) दृष्टिवाद अंग याचे ५ भेद आहेत.

१) पाच परिकर्म– १ चंद्रप्रज्ञप्ति, पदे– (३६०५०००), २ सूर्यप्रज्ञप्ति, (५०३०००), ३ जंबूद्वीपप्रज्ञप्ति, (३२५०००), ४ द्वीपसागरप्रज्ञप्ति, (५२३६०००), ५ व्याख्याप्रज्ञप्ति. (८४३६००).

२) सूत्र– ८८००००० लाख पदे आहेत.

३) प्रथमानुयोग– ५००० पदे आहेत.

४) चवदापूर्व– ९५५०००००५ पदे आहेत.

५) पाच चूलिका– १ जलगता, २ स्थलगता, ३ मायागता, ४ आकाशगता, ५ रूपगता. ( १०४९४६००० पदे ) आहेत.

एकूण दृष्टिवाद अंगाची पदे– १०८६८५६००५ आहेत.

द्वादशांग वाणीची एकूण पदसंख्या– ११२ कोटि ८३ लाख ५८ हजार ५ इतकी पदे आहेत.

श्रुतज्ञान केवल ज्ञानाप्रमाणे संपूर्ण द्रव्यांच्या गुणपर्यायांना जाणते. श्रुतज्ञान परोक्ष जाणते. केवल ज्ञान प्रत्यक्ष जाणते. एवढाच फरक आहे.

३) अवधिज्ञान– जे ज्ञान द्रव्य-क्षेत्र-काल-भाव याच्या मर्यादेत रूपीपदार्थांना इंद्रियांच्या सहायाशिवाय आत्मिक ज्ञानशक्तीने जाणते त्यास अवधिज्ञान म्हणतात. यास सीमाज्ञान हे दुसरे नाव आहे. याचे १) भवप्रत्यय २) गुणप्रत्यय असे २ भेद आहेत.

१) भवप्रत्यय अवधिज्ञान– देव-नारकीजीवांना, तीर्थंकरांना असते.

२) गुणप्रत्यय अवधिज्ञान– सम्यक्त्वादि गुणविकासामुळे मनुष्य-तिर्यंचांना विशिष्ट शंख आदि चिन्हातून होते. याचे १) देशावधि, २) परमावधि, ३) सर्वावधि असे भेद आहेत. भवप्रत्यय अवधिज्ञान देशावधिच असते.




गुणप्रत्यय अवधिज्ञान– देशावधि-परमावधि-सर्वावधि तीन्ही प्रकारचे असते. ३) सामान्य तिर्यंच-मनुष्याना जघन्य देशावधिज्ञान होते. उत्कृष्ट देशावधि प्रमत्तसयत मुनीला होते. परमावधि व सर्वावधि चरमशरीरी मुनीनाच होते. ४) देशावधि प्रतिपाती आहे. होऊन नष्ट होऊ शकते. परमावधि-सर्वावधि अप्रतिपाती नष्ट होत नाही. अवधिज्ञान द्रव्य अपेक्षेने सूक्ष्म परमाणुला जाणते. क्षेत्र अपेक्षेने असख्यात द्वीप-सागरातील रूपी पदार्थाना जाणते. कालाच्या अपेक्षेने असंख्यात वर्षातील अवस्थाना जाणते. भावाच्या अपेक्षेने असंख्यात भवातील परिणामाना जाणते.

४) मन:पर्ययज्ञान– जे ज्ञान इंद्रियाच्या सहाय्याशिवाय आत्मीक शक्तीने दुसऱ्याच्या मनातील रूपी विचाराना जाणते ते मन:पर्याय ज्ञान होय. याचे दोन भेद आहेत. १) ऋजुमति, २) विपुलमति–

१) ऋजुमति– जे सरळ विचाराना जाणते ते ऋजुमति मन.पर्यय ज्ञान होय.

२) विपुलमति– जे चिंतित-अर्धचिंतित-अचिंतित सर्व प्रकारच्या वक्र विचाराला देखील जाणते ते विपुलमति मन.पर्यय ज्ञान होय. ऋजुमति मन.पर्ययज्ञान प्रतिपाती आहे. नष्ट होऊ शकते. विपुलमति अप्रतिपाती– नष्ट होत नाही. नियमाने त्यानंतर केवलज्ञान प्राप्त होते हे मन.पर्ययज्ञान द्रव्य मनाच्या आधारानेच उत्पन्न होते.

अंगोपांग नामकर्माचा उदय असताना मनोवर्गणेच्या स्कंधा पासून द्रव्यमनाची रचना होते. ते हृदयाच्या मध्यभागी असते. अष्टदल-कमलाकार असते. याच्या आश्रयाने भावमनाच्या-द्वारे संज्ञीजीव विचार करतो. या मनातील रूपी विचाराना व मनात येणाऱ्या रूपी पदार्थाना मन.पर्ययज्ञान प्रत्यक्ष जाणते.

५) केवलज्ञान– जे ज्ञान संपूर्ण आहे, समग्र आहे, असपत्न केवल असहाय आहे. लोक-अलोकातील सर्व पदार्थ ज्यामध्ये स्वयं प्रतिबिंबित होतात त्यास केवलज्ञान म्हणतात. हे केवलज्ञान जीवाचे स्वाभाविक ज्ञान आहे. सर्व आवरणाचा अभाव झाला असताना जो मूल स्वभाव असतो तो प्रगट होतो. जीवाचा स्वभाव केवलज्ञान स्वभाव आहे. या ध्रुव केवलज्ञान स्वभावाच्या आश्रयाने पर्यायात केवलज्ञान प्रगट होते. भगवंतामध्ये प्रगट झालेल्या केवलज्ञानपर्यायावरून आपल्या केवलज्ञानस्वभावाचा निर्णय घेणे हेच स्वभावदर्शन-सम्यग्दर्शन होय. सम्यग्दर्शन हाच धर्माचा मूळ पाया आहे. सम्यग्दर्शन झाल्याशिवाय धर्माचा-मोक्षमार्गाचा प्रारंभच होत नाही.

## ८ संयममार्गणा

व्रताचे ग्रहण, समतीने पालन, कषायांचा निग्रह, अनर्थदंडाचा त्याग, पंचेंद्रियाच्या विषयाचा जय, यास संयम म्हणतात. संयमाचे ५ भेद आहेत. १) सामायिक, २) छेदोपस्थापना, ३) परिहार विशुद्धि, ४) सूक्ष्मसांपराय, ५) यथाख्यात.

बादर संज्वलनाचा उदय असताना ६ ते ९ गुणस्थानात सामायिक व छेदोपस्थापना संयमभाव असतात. परिहारविशुद्धि संयमभाव ६–७ गुणस्थानात होतो. सूक्ष्मसांपराय संयमभाव सूक्ष्मलोभाचा उदय असताना होतो. मोहाचा उपशम व क्षय झाला असताना यथाख्यात संयम होतो.

१) सामायिक– सर्व सावद्य योगाचा त्याग करून समय म्हणजे ध्रुव आत्मस्वभाव त्यात लीन होणे ते सामायिक होय. २) छेदोपस्थापना– सामायिक पासून च्युत झाले असताना त्यामध्ये पुनः स्थिर होणे ती छेदोपस्थापना होय ( गुण ६ ते ९ ). ३) परिहार विशुद्धि– जन्मल्यापासून ३० वर्ष सुखी जीवन घालवून नंतर दीक्षा ग्रहण करून तीर्थंकर पादमूलात ७–८ वर्ष प्रत्याख्यान शास्त्राचा अभ्यास करतो. त्या परिणाम-विशुद्धिमुळे त्याला विहार करताना जमीनीवर पाय न टेकता अधर गमन करण्याची ऋद्धि प्राप्त होते. तो संध्याकाळ सोडून २ गव्यूति अधर विहार करतो. तो परिहारविशुद्धि संयम होय. ( गुण ६–७ ). ४) सूक्ष्मलोभाचे वेदन करीत असताना जी परिणामाची विशुद्धि होते तो सूक्ष्म सांपराय संयम होय ( गुण १० ).








२) श्रुतज्ञान– श्रुतज्ञान हे मतिज्ञानपूर्वक होते. मतिज्ञानाने जाणलेल्या पदार्थाविषयी जे विशेष ज्ञान होते त्यास श्रुतज्ञान म्हणतात. श्रुतज्ञानाचे मुख्य २ भेद आहेत– १) अंगबाह्य, २) अंगप्रविष्ट.

१) अंगबाह्य श्रुतज्ञान अनेक प्रकारचे आहे. २) अंगप्रविष्ट श्रुतज्ञानाचे १२ भेद आहेत.

| | | |
|---|---|---|
| १) आचारांग– श्रावकाचार-मुनिधर्माचाराचे वर्णन | यात १८००० | पदे आहेत. |
| २) सूत्रकृतांग– स्वसमय-परसमय सूत्राचे वर्णन | यात ३६००० | पदे आहेत. |
| ३) स्थानांग– स्थान-विकल्प भेदाचे वर्णन | यात ४२००० | पदे आहेत. |
| ४) समवायांग– द्रव्यामध्ये परस्पर सादृश्य वर्णन | यात १६४००० | पदे आहेत. |
| ५) व्याख्याप्रज्ञप्ति– साठ हजार प्रश्नोत्तर वर्णन | यात २२८००० | पदे आहेत. |
| ६) ज्ञातृधर्म कथा– तीर्थंकर माहात्म्य वर्णन | यात ५५६००० | पदे आहेत. |
| ७) उपासकाध्ययन– उपासक-श्रावकधर्म वर्णन | यात ११७०००० | पदे आहेत. |
| ८) अंतःकृतदशांग– अंतःकृत् केवली वर्णन | यात २३२८००० | पदे आहेत. |
| ९) अनुत्तरोपपाददशांग– तीर्थंकराच्या तीर्थातील मुनींचे वर्णन | यात ९२४४००० | पदे आहेत. |
| १०) प्रश्नव्याकरणांग– आक्षेपणी-विक्षेपणी-संवेजनी निर्वेजनी कथा वर्णन | यात ९३१६००० | पदे आहेत. |
| ११) विपाकसूत्रांग– कर्मफल वर्णन. | यात १८४००००० | पदे आहेत. |

अकरा अंगांची एकूण पदे ४१५०२००० आहेत.

१२) दृष्टिवाद अंग याचे ५ भेद आहेत.

१) पाच परिकर्म– १ चंद्रप्रज्ञप्ति, पदे– (३६०५०००), २ सूर्यप्रज्ञप्ति, (५०३०००), ३ जंबूद्वीपप्रज्ञप्ति, (३२५०००), ४ द्वीपसागरप्रज्ञप्ति, (५२३६०००), ५ व्याख्याप्रज्ञप्ति. (८४३६००).

२) सूत्र– ८८००००० लाख पदे आहेत.

३) प्रथमानुयोग– ५००० पदे आहेत.

४) चवदापूर्व– ९५५००००००५ पदे आहेत.

५) पाच चूलिका– १ जलगता, २ स्थलगता, ३ मायागता, ४ आकाशगता, ५ रूपगता. ( १०४९४६००० पदे ) आहेत.

एकूण दृष्टिवाद अंगाची पदे– १०८६८५६००५ आहेत.

द्वादशांग वाणीची एकूण पदसंख्या– ११२ कोटि ८३ लाख ५८ हजार ५ इतकी पदे आहेत.

श्रुतज्ञान केवल ज्ञानाप्रमाणे संपूर्ण द्रव्याच्या गुणपर्यायांना जाणते. श्रुतज्ञान परोक्ष जाणते. केवल ज्ञान प्रत्यक्ष जाणते. एवढाच फरक आहे.

३) अवधिज्ञान– जे ज्ञान द्रव्य-क्षेत्र-काल-भाव याच्या मर्यादेत रुपीपदार्थांना इंद्रियाच्या सहायाशिवाय आत्मिक ज्ञानशक्तीने जाणते त्यास अवधिज्ञान म्हणतात. यास सीमाज्ञान हे दुसरे नाव आहे. याचे १) भवप्रत्यय २) गुणप्रत्यय असे २ भेद आहेत.

१) भवप्रत्यय अवधिज्ञान– देव-नारकीजीवांना, तीर्थंकरांना असते.

२) गुणप्रत्यय अवधिज्ञान– सम्यक्त्वादि गुणविकासामुळे मनुष्य-तिर्यंचांना विशिष्ट शंख आदि चिन्हांनून होते. याचे १) देशावधि, २) परमावधि, ३) सर्वावधि असे भेद आहेत. भवप्रत्यय अवधिज्ञान देशावधिच असते.

## १० लेश्या मार्गणा

लेश्या १) ज्या परिणामानी जीव शुभ-अशुभ-भावानी अनात्मभावानी लिप्त होतो, त्या भावाना आत्मसात करतो त्यास लेश्या म्हणतात.

कषायाच्या उदयाने अनुरंजित अशी योगप्रवृत्ति-मनवचनकाय प्रवृत्ति तिला लेश्या म्हणतात. कषाययुक्त योग परिणामच चार प्रकारच्या बंधाचे कारण आहे. लेश्येचे ६ भेद आहेत. त्यापैकी १ कृष्ण २ नील ३ कापोत या तीन अशुभ लेश्या– संक्लेश परिणाम म्हटले जातात. ४ पीत ५ पद्म ६ शुक्ल या तीन शुभलेश्या विशुद्धि परिणाम म्हटले जातात. ही ६ प्रकारची लेश्या १ द्रव्यलेश्या २ भावलेश्या याप्रकारे दोन प्रकारची आहे. १ द्रव्यलेश्या– शरीर नामकर्माचा उदय असताना शरीराचा जो कृष्ण-नील आदि वर्ण ती द्रव्यलेश्या होय. २ भावलेश्या– जीवाचे कषाययुक्त योग परिणाम ती भावलेश्या होय.

नारकी जीवाची द्रव्यलेश्या (शरीरवर्ण) कृष्ण (भ्रमराप्रमाणे काळा) असतो. कल्पवासी देवाची द्रव्यलेश्या भावलेश्या अनुसरून असते. भवनवासी-व्यंतर-ज्योतिष्क व मनुष्य-तिर्यंच यांची द्रव्यलेश्या ६ प्रकारची असू शकते. उत्कृष्ट भोगभूमीतील जीवांची द्रव्यलेश्या सूर्याप्रमाणे पीतवर्ण असते. मध्यम भोगभूमीतील जीवांची चंद्राप्रमाणे शुक्लवर्णाची असते. जघन्य भोगभूमीतील जीवाची द्रव्यलेश्या हरित वर्णाची कपोत लेश्या असते.

बादरजलकायिकांची द्रव्यलेश्या शुक्ल, बादर तेजस्कायिकांची पीत, वायुकायिकापैकी घनवातवलयाची गोमूत्रवर्ण (पीत), घनोदधि-वातवलयाची मूगाप्रमाणे हरित-(कपोत) तनुवातवलयाची अव्यक्तवर्ण असते. सर्व सूक्ष्मकाय जीवांचा शरीरवर्ण कपोतवर्ण असतो. विग्रहगतीमध्ये जीवाच्या कार्माणशरीराचा वर्ण शुक्ल असतो. अपर्याप्त अवस्थेमध्ये शरीराचा वर्ण कपोतवर्ण असतो. कोणत्या जीवास कोणती लेश्या असते हे त्याच्या शुभ-अशुभ क्रियेवरून सूचित होते. यावरून प्रत्येक भावलेश्येचे परिणाम कसे असतात याची कल्पना येते. सामान्यपणे भावलेश्या परिणाम खालील दृष्टांतावरून लक्षात येतात.

१) कोणी ६ पुरुष प्रवासाला निघतात. रस्ता चुकून अरण्यात घुसतात. त्याना सपाटून भूक लागलेली असते. समोर फळाने भरलेला वृक्ष दिसतो.

१) कृष्णलेश्यावाला जीव संपूर्ण वृक्ष मुळासकट उपटून टाकण्याचा विचार करतो.

२) नीळलेश्यावाला जीव जमिनीतील मूळासकट वृक्ष न उपटता वरील स्कंध (बुंधा) सकट वृक्ष तोडण्याचा विचार करतो.

३) कपोत लेश्यावाला जीव– खालचा बुंधा न तोडता मोठी शाखा तोडण्याचा विचार करतो.

४) पीतलेश्यावाला– मोठी शाखा न तोडता ज्याला फळे लागली आहेत ती छोटी फांदी तोडण्याचा विचार करतो.

५) पद्मलेश्यावाला– फांदी न तोडता केवळ फळे तोडण्याचा विचार करतो.

६) शुक्ललेश्यावाला– झाडावरची फळे न तोडता अनायासे खाली खाली पडलेली फळे खाण्याचा विचार करतो.

१) **कृष्णलेश्येचे बाह्यचिन्ह**– जो तीव्रक्रोध करतो, वैरभाव लवकर विसरत नाही. सदैव दुसऱ्याशी भांडणे करतो, दया-धर्म परिणामानी रहित असतो. मनामध्ये नेहमी दुष्ट विचार ठेवतो. कोणास जुमानत नाही.

२) **नीललेश्येचे बाह्यचिन्ह**– नेहमी आळशी प्रमादी असतो, सारासार विचार बुद्धि ठेवीत नाही, कला-विज्ञान-चातुर्य यानी रहित असतो, विषयलंपट असतो, मानी मायावी असतो, आळशी असतो, दुर्भेद्य




५) यथाख्यात संयम— मोहकर्माचा उपशम किंवा क्षय झाला असताना जसे आत्म्याचे मूळ स्वरूप आहे त्यात लीन होणे तो यथाख्यात संयम होय ( गुण ११ ते १४ ). ६) देशसंयम— प्रत्याख्यानावर कषायाचा क्षयोपशम झाला असताना ५ अणुव्रत, ३ गुणव्रत, ४ शिक्षाव्रत या प्रमाणे श्रावकाचे १२ व्रत धारण करण्याचे परिणाम होतात तो देशसंयम होय ( गुण ५ ). ७) असंयम— अप्रत्याख्यानावरण कषायाचा उदय असताना संयम धारण करण्याचे परिणाम न होणे तो असंयम होय ( गुण १ ते ४ ).

जीवसमास १४ आहेत. १) एकेंद्रियाचे २ भेद— बादर-सूक्ष्म, तीन विकलत्रय (द्वींद्रिय-त्रींद्रिय-चतुरिंद्रिय) पंचेन्द्रियाचे २ भेद— संज्ञी-असंज्ञी यांचे पर्याप्तक-अपर्याप्तक या अपेक्षेने ( २+३+२ )=७×२=१४ प्रकारचे जीवसमास आहेत. त्यांची विराधना न व्हावी असे विरतरूप-संयमरूप परिणाम न होणे तो असंयम होय.

इंद्रियाचे विषय २८ आहेत— ५ रस, ५ वर्ण, २ गंध, ८ स्पर्श, ७ स्वर, १ मन. या इंद्रिय विषयापासून विरति-निवृत्ति होण्याचे परिणाम न होणे तो असंयम होय.

## ९ दर्शनमार्गणा

प्रत्येक पदार्थ हा अनेकान्तात्मक-उभयधर्मात्मक-सामान्य-विशेष धर्मात्मक आहे. तथापि पदार्थाला जाणताना सर्वप्रथम पदार्थाच्या विशेष अंशाचे ग्रहण न होता सामान्य अंशाचे ग्रहण होते. ते दर्शन होय. त्यानंतर पदार्थाच्या विशेष अंशाचे जे ग्रहण ते ज्ञान म्हटले जाते.

छद्मस्थ जीवाला प्रथम दर्शन होते. नंतर ज्ञान होते. दर्शन झाल्याशिवाय ज्ञान होत नाही.

सामान्यविशेषात्मक पदार्थाचे जे सामान्य ग्रहण महासत्तारूप प्रतिभास त्यास दर्शन म्हणतात. हे दर्शन निर्विकल्प-निराकार म्हटले जाते. कारण येथे हा काहीतरी पदार्थ आहे असा सामान्य प्रतिभास असतो. हा पांढरा पदार्थ आहे. किंवा हा काळा पदार्थ असा विशेष प्रतिभास नसतो म्हणून याला निर्विकल्प-निराकार म्हटले आहे. पदार्थाच्या विशेष प्रतिभासाला सविकल्प-साकार-ज्ञान म्हणतात. दर्शन हे निराकार-निर्विकल्प असते.

दर्शनाचे ४ भेद आहेत— १) चक्षुदर्शन, २) अचक्षुदर्शन, ३) अवधिदर्शन, ४) केवल दर्शन.

१) चक्षुदर्शन— चक्षुरिंद्रियाने होणाऱ्या ज्ञानाच्या अगोदर जो सामान्य विशेषात्मक पदार्थाचा सामान्य प्रतिभास होतो. जे प्रकाशते जे दिसते ते चक्षुदर्शन होय. जे दिसते ते ज्ञान त्याचे अगोदर जे प्रकाशते ते दर्शन.

२) अचक्षुदर्शन— चक्षुशिवाय बाकीच्या इंद्रियानी होणाऱ्या ज्ञानाच्या अगोदर जो पदार्थाचा सामान्य प्रतिभास होतो त्यास अचक्षुदर्शन म्हणतात. इतर इंद्रियाने होणाऱ्या ज्ञानाचे अगोदर जो सामान्य प्रतिभास होतो ते अचक्षुदर्शन होय.

३) अवधिदर्शन— अवधिज्ञानाचे पूर्वी होणारा जो सामान्य प्रतिभास ते अवधि दर्शन होय.

४) केवलदर्शन— केवल ज्ञानाबरोबर होणारा जो सामान्य प्रतिभास ते केवल दर्शन होय.

केवल ज्ञानामध्ये आपल्या ज्ञानाकारामध्ये सर्व ज्ञेय वस्तूचा युगपत् स्व-परसत्तारूप एकाकार-ज्ञानाकाररूपच प्रतिभास होतो. मी ज्ञायक व हे माझे ज्ञेय असा भेदरूप-विकल्परूप प्रतिभास नसतो म्हणून केवलज्ञान व केवल दर्शनाने युगपत् निराकार-निर्विकल्प ज्ञानाकाराचेच ग्रहण होते. त्यामध्ये सर्व ज्ञेयाकार अंतर्भूत असतात म्हणून केवलज्ञान स्व-परज्ञायक-सर्वज्ञ म्हटले जाते. वास्तविक केवल ज्ञानाचा उपयोग स्व-प्रतिभासरूप असतो. स्व-प्रतिभासात पर-प्रतिभास हा अनायासे होतो म्हणून केवलज्ञान स्व-परप्रकाशक म्हटले जाते.

आरशात पाहिल्यानंतर आरशात पडलेले प्रतिबिंब हे सहजगत्या आपोआप दिसते. प्रतिबिंब पाहण्यासाठी प्रतिबिंबाकडे दृष्टि द्यावी लागत नाही. प्रतिबिंबाकडे दृष्टि देणे हे अल्पज्ञानाचे सराग ज्ञानाचे चिन्ह आहे. दर्पणाकडे पाहणे हे निर्मल पूर्ण ज्ञान पूर्ण दर्शन आहे.








३) कृष्णादि ३ लेश्या– मध्यम अशात मरणारे जीव– अग्निकाय-वायुकाय. विकलत्रय जीवात उत्पन्न होतात. देव व नारकी आपल्या आपल्या लेश्या परिणामानी यथायोग्य मनुष्य-तिर्यंच गतीत उत्पन्न होतात. देव देवगतीतून पुन: देवगतीत उत्पन्न होत नाहीत किंवा नरकगतीत उत्पन्न होत नाहीत. नारकीजीव पुन: नरकगतीत किंवा देवगतीत उत्पन्न होत नाहीत.

## ११ भव्यत्व मार्गणा

४) ज्याना अनंत चतुष्टय प्रगट होण्याची योग्यता असते त्याना भव्य म्हणतात. ज्याना योग्यता नसते त्याना अभव्य म्हणतात. भव्य जीव देखील २ प्रकारचे आहेत. १) ज्याप्रमाणे कुमारीमध्ये पुत्र होण्याची योग्यता असते. त्याप्रमाणे जे पुढे नियमाने मुक्त होणार आहेत ते भव्य होत. २) ज्याप्रमाणे विधवा स्त्रीमध्ये पुत्र होण्याची योग्यता असते पण पतीचा संयोग असंभव असल्यामुळे कधी पुत्र होत नाही. त्याप्रमाणे मुक्त होण्याची योग्यता असते. परंतु त्यांचे परिणाम कधीही मुक्त होण्यायोग्य होत नाहीत त्याना अभव्यसमभव्य म्हणतात.

अभव्य– ज्याप्रमाणे वांझ स्त्रीमध्ये पुरुष समागम झाला तरी पुत्र होण्याची योग्यता नसते त्याप्रमाणे ज्या जीवाचे परिणाम मुक्त होण्यायोग्य कदापि होत नाहीत ते अभव्य जीव होत. अभव्य जीव राशि युक्तानंत प्रमाण अनंत आहेत. संसारीराशितून अभव्यराशि उणा केली असता भव्य जीवराशि अनंतानंत आहे.

मुक्त जीव पूर्वी संसारी होते या अपेक्षेने ते भव्य राशीमध्ये येतात तथापि मुक्त झाल्यानंतर त्यांच्यामध्ये भव्यत्व–अभव्यत्व हा विकल्प नसतो म्हणून ते भव्य-अभव्य विकल्पातीत म्हटले जातात.

## १२ सम्यक्त्व मार्गणा

१) सहा द्रव्य, पाच अस्तिकाय द्रव्य, सात तत्त्व–नव पदार्थ याचे जसे स्वरूप शास्त्रात सांगितले तसे यथार्थ श्रद्धान करणे ते सम्यग्दर्शन होय

दर्शन मोहाचा उदय– उपशम-क्षय-क्षयोपशम असताना सम्यक्त्व गुणाच्या ज्या अवस्था होतात त्या अपेक्षेने सम्यक्त्व मार्गणेचे ६ भेद आहेत.

१) **क्षायिक सम्यक्त्व–** दर्शन मोहाच्या तीन प्रकृति व अनंतानुबंधीच्या ४ प्रकृति या ७ प्रकृतींचा क्षय झाला असताना ध्रुव आत्मतत्त्वाचे जे दर्शन ते क्षायिक सम्यग्दर्शन होय. (गुण ४ ते १४)

२) **उपशम सम्यक्त्व–** ७ प्रकृतींचा उपशम झाला असताना जे आत्मतत्त्वाचे दर्शन ते उपशम सम्यग्दर्शन होय. (गुण ४ ते ११)

३) **क्षायोपशमिक सम्यक्त्व–** ७ प्रकृतीपैकी ६ प्रकृतींचा सर्व घातीचा पुढे उदयास येणाऱ्याचा सदवस्थारूप उपशम व वर्तमानकाळी उदयास येणाऱ्यांच्या उदयाभावी क्षय व सम्यक्त्व प्रकृतीचा उदय असताना जे सम्यग्दर्शन प्राप्त होते परंतु त्यामध्ये चल-मलिन अगाढ दोष उत्पन्न होतात ते क्षायोपशमिक सम्यक्त्व होय. (गुण ४ ते ७)

४) **सम्यग्मिथ्यात्व–** सम्यग्मिथ्यात्वरूप मिश्र प्रकृतीचा उदय असताना धड सम्यक्त्वरूप नाही व धड मिथ्यात्वरूप नाही असे मिश्र परिणाम होतात त्यास सम्यग्मिथ्यात्व म्हणतात. (गुण ३)

५) **सासादन–** अनंतानुबंधीचा उदय असताना सम्यक्त्वापासून च्युत होतो पण मिथ्यात्वाचा उदय नसल्यामुळे जोपर्यंत मिथ्यात्व परिणाम नसतात त्या मधल्या अवस्थेला सासादन म्हणतात. (गुण २)





आतील गाठीचा असतो, ज्याचा अभिप्राय दुसऱ्यास लवकर समजत नाही. सदैव झोप घेतो, दुसऱ्याला फसविण्यात जो चतुर असतो. धन-धान्यादि परिग्रहाविषयी ज्याला तीव्र अत्यंत आसक्ति असते.

३) कापोतलेश्येचे चिन्ह— रुष्ट होणे, दुसऱ्याची निंदा-आपली प्रशंसा, तीव्र शोक, तीव्र भय, असुया द्वेष करणे, दुसऱ्याचा पराभव करण्यात आनंद मानणे, दुसऱ्यावर विश्वास न ठेवणे, आपणासारखे सर्व जग फसविणारे आहे असे समजणे, दुसऱ्यानी आपली स्तुति केली तर आनंद मानणे, हानि-लाभ याचा विचार न करणे, युद्धामध्ये मरण यावे अशी प्रार्थना करणे, आपली स्तुति करणाऱ्याला आपले सर्वस्व देण्यात अभिमान वाटणे, कार्य-अकार्याचा विचार न करणे.

४) पीतलेश्येचे चिन्ह— कृत्य-अकृत्य, सेव्य-असेव्याचा, भक्ष्य-अभक्ष्याचा विचार करणे, सर्वावर समान दृष्टी ठेवणे, भेदभाव न ठेवणे, दया दानामध्ये रत असणे, मृदु भाषण करणे.

५) पद्मलेश्येचे चिन्ह— त्यागी-भद्रपरिणामी, उज्वल परिणाम ठेवणारा, क्षमाशील, देव-गुरु शास्त्र यांची भक्ति-पूजा करण्यात लीन असणे.

६) शुक्ललेश्येचे चिन्ह— पक्षपात न करणे, निदान-भावीभोग सुखाची इच्छा न करणे, समताभाव ठेवणे, रागद्वेष न करणे हे शुक्ललेश्येचे चिन्ह समजावे.

कोणत्या लेश्या परिणामाने जीव कोणत्या गतीत जातो हे वर्णन पुढील जीवनाचा सूचक चित्रपट आहे—

१) शुक्ललेश्या उत्कृष्ट अंशात मरणारा जीव सर्वार्थसिद्धीत जन्म घेतो. शुक्ललेश्या जघन्य अंश व मध्यम अंशात मरणारे जीव शतारसहस्रार आनत-प्राणत-आरण-अच्युत-नऊ ग्रैवेयक-नऊ अनुदिश, इतर चार अनुत्तर विमानापर्यंत उत्पन्न होतात.

२) पद्मलेश्या— उत्कृष्ट अंशात मरणारा जीव सहस्रार स्वर्गात उत्पन्न होतो. पद्मलेश्या जघन्य अंशात मरणारा जीव सानत्कुमार-माहेंद्र स्वर्गात उत्पन्न होतो. मध्यम अंशात मरणारे जीव मध्यम वर्गात उत्पन्न होतात.

३) तेजोलेश्या— उत्कृष्ट अंशात मरणारा जीव सानत्कुमार-माहेंद्र-स्वर्गाच्या अंतिम पटलात चक्रनामक इंद्रक श्रेणीबद्ध विमानात उत्पन्न होतो. जघन्य अंशात मरणारा जीव सौधर्म ऐशान स्वर्गाच्या ऋजुनामक इंद्रक व श्रेणीबद्ध विमानामध्ये उत्पन्न होतो.

४) कृष्णलेश्या— उत्कृष्ट अंशात मरणारा जीव ७ व्या नरकाच्या अवधि स्थान नामक इंद्रकबिलामध्ये उत्पन्न होतो. जघन्य अंशात मरणारा जीव ५ व्या नरकाच्या अंतिमपटल तिमिस्र नामक इंद्रकबिलामध्ये उत्पन्न होतो.

५) नीललेश्या— उत्कृष्ट अंशात मरणारा जीव पाचव्या नरकाच्या द्विचरिम पटलात अंध्रनामक इंद्रकबिलात उत्पन्न होतो. जघन्य अंशात मरणारा ३ ऱ्या नरकातील अंतीमपटलात संप्रज्वलित नामक इंद्रकबिलात उत्पन्न होतो.

१) कापोत लेश्या— उत्कृष्ट अंशात मरणारा जीव ३ ऱ्या नरकाच्या द्विचरिम पटलात संज्वलित नामक इंद्रक बिलात उत्पन्न होतो. जघन्य अंशात मरणारा जीव १ ल्या नरकाच्या सीमन्त नामक प्रथम इंद्रक बिलात उत्पन्न होतो.

२) कृष्णादि ४ लेश्या— मध्यम अंशात मरणारे जीव. भवनत्रिक ( भवनवासी-व्यंतर-ज्योतिष्क ) देवात उत्पन्न होतात. तसेच पृथ्वीकाय, जलकाय, वनस्पतिकाय जीवात उत्पन्न होतात.




धरणेन्द्रांना सेवन करण्यास योग्य भोग आणि त्रिभुवनाला जिंकणारी राज्य लक्ष्मी तथा ज्यात शत्रूचा समूह क्षीण झाला आहे असे राज्य आणि देवांगनांच्या नृत्यलीलाना जिंकणाऱ्या स्त्रिया आणि इतरही आनंदरूप वस्तु मला कशा मिळतील असे चिंतवन करण्याला भोगार्तध्यान म्हणतात.[1]

आर्तध्यान (चारही प्रकारचे) अत्यंत अशुभ कृष्ण, नील आणि कापोत लेश्यांच्या आश्रयाने उत्पन्न होतात, त्यांचा काळ अंतर्मुहूर्त आहे आणि आलंबन अशुभ आहे.[2]

आर्तध्यान संसाराचे कारण आहे.[3] याचे फल तिर्यंच गति आहे.[4]

अविरत, देशविरत आणि प्रमत्त संयत गुणस्थानवर्ती जीवांना आर्त ध्यान होते. अविरत आणि देशविरत गुणस्थानवर्ती जीवांना चारही, प्रमत्त संयत गुणवर्ती जीवांना निदान (४ था प्रकार) आर्तध्यानाशिवाय शेष प्रमादवश कदाचित् होतात.[5]

सर्वसाधारणपणे आर्तध्यानी जीव कसा असतो याचे स्वरूप ज्ञानार्णव ग्रंथात खालीलप्रमाणे दिले आहे. (बाह्य चिन्ह)

प्रत्येक गोष्टीत सन्देह(शंका) असतो, नंतर त्या जीवाला शोक होतो, भीति वाटते, तो प्रमादी असतो, कलह (भांडण) करतो, त्याला चित्त भ्रम होतो, भ्रांती होते, तो चंचल चित्त असतो, त्याला विषय सेवनात उत्कंठ असते, तो निद्रालु असतो, अंगात जडता असते, खेद असतो....[6]

### आध्यात्मिक दृष्टिकोणातून आर्तध्यान–

वरीलप्रमाणे सारांशरूपाने आर्तध्यानाचे स्वरूप पाहिले. हे आर्तध्यान आगम दृष्टिकोणातून आहे. आता आध्यात्मिक दृष्टिकोणातून याचे लक्षण चारित्रसार ग्रंथात खालीलप्रमाणे दिले आहे. पहा–

तत्रार्तं बाह्याध्यात्मिकभेदाद् द्विविकल्पं ।[7] म्हणजेच ते आर्तध्यान बाह्य आणि अध्यात्म अशा दोन प्रकारचे आहेत....आध्यात्मिक आर्तध्यान चार प्रकारचे असल्याचा उल्लेख आहे. त्या आधारे जै. सि. को. मध्ये खालीलप्रमाणे आलेख दिला आहे. स्वसंवेद्यमाध्यात्मिकार्तध्यानं । असे आध्यात्मिक आर्तध्यानाचे लक्षण सांगितले आहे. अर्थ हा की (इतर जन ज्याचे अनुमान करू शकतात ते बाह्य आर्तध्यान) ज्याला फेवळ आपलाच आत्मा जाणू शकतो ते आध्यात्मिक आर्तध्यान होय.

आर्त-ध्यान

आलेख–




१. ज्ञानार्णव– २५।३४ चे आधारे. २. महापुराण– २१।३८ ३. सर्वार्थसिद्धी– ९।२९
४ जै. सि. को. १।२८७ ५ द्रव्य संग्रह, त. सूत्र, ज्ञानार्णव इ. ग्रंथातील वर्णनावरून सारांश.
६. ज्ञानार्णव– २५।४२ चा सारांश ७ मूळ ग्रंथ जवळ नसल्यामुळे उतारा जैनेन्द्र सिद्धांत कोशावरून घेतला आहे.



## आगम आणि अध्यात्म—

सामान्य विशेषरूपाने सर्व पदार्थांचे निरूपण आगमामध्ये केलेले असते आणि केवळ आत्म्याच्या आश्रयाने अध्यात्म सांगते. वीतराग सर्वज्ञांनी सांगितलेल्या षड् द्रव्यादिकावर स. श्रद्धान इ. चे प्रतिपादन आगमामध्ये असते तर अभेद रत्नत्रय प्रतिपादक अर्थ व पदार्थांचे व्याख्यान अध्यात्मशास्त्रात असते.[1] गोम्मटसारादि आगम ग्रंथ आहेत समयसारादि अध्यात्म ग्रंथ आहेत. ध्यानाच्याच अपेक्षेने सांगावयाचे झाले तर आगम भाषेप्रमाणे ध्यानाचे अनेक प्रकार आहेत. अध्यात्म भाषेने परम शुद्ध चैतन्यशाली आणि परिपूर्ण आनंदाचा धारक भगवान निजात्मा आहे त्यात उपादेय बुद्धि ठेऊन, नंतर "मी अनंतज्ञानाचा धारक आहे इ. रूपाने अंतरंग धर्मध्यान आहे.... निजशुद्धात्म्यामध्ये निर्विकल्प ध्यानरूप शुक्लध्यान आहे"[2]

प्रस्तुत लेखामध्ये अध्यात्म दृष्टिकोणातून अधिक विचार करावयाचा आहे. प्रसंगोपात्त आगमभाषेने देखील विचार करू—

## ध्यानाचे प्रकार—

ध्यानाचे मुख्य दोन भेद आहेत १ अप्रशस्त व २ प्रशस्त किंवा १ अशुभ व २ शुभ प्रामुख्याने वरील भेद असले तरी सूक्ष्म दृष्टीने अनेक भेद आहेत—

पापास्रवहेतुत्वादशुभम् अप्रशस्तमार्तरौद्रध्यानद्वयम्, शुभ कर्ममलकलङ्कनिर्दहनसमर्थं धर्मशुक्लद्वयं प्रशस्तम्। असे सर्व साधारण स्वरूप सांगितलेले आहेत.[3] अर्थात् ज्या ध्यानाने पापास्रव होतात ते अप्रशस्त ( आर्त आणि रौद्र ) आणि ज्यामुळे कर्मांची निर्जरा होते ते प्रशस्त ध्यान आहे. आगमाप्रमाणे प्रथम अप्रशस्त ध्यानाचे थोडक्यात स्वरूप पाहून नंतर प्रशस्त ध्यानाचा विस्ताराने विचार करू.

## आर्तध्यान—

ऋत दुःखं, अर्दनमर्तिर्वा, तत्र भवमार्तम् ।[4] म्हणजे आर्त शब्द 'ऋत' अथवा 'अर्दन' यापैकी एका शब्दाने झाला आहे. ऋत म्हणजे दुःख आणि अर्दन म्हणजे पीडा ( अर्दन अर्ति. ) यामध्ये ( दुःखात आणि पीडेमध्ये ) जे होते ते आर्तध्यान होय.

याचे **१ अनिष्ट योगज, २ इष्ट वियोगज, ३ भोगार्त ( वेदना प्रभव ) व ४ निदान** असे चार भेद आहेत. थोडक्यात स्वरूप असे, १) अनिष्ट पदार्थांच्या संयोगाने होणारे, २) इष्ट पदार्थांच्या वियोगाने होणारे ३) रोग प्रकोपाच्या पीडेने होणारे व ४) आगामी काळातील भोगांच्या वांछेने होणारे. असे चार प्रकार आहेत.

.. स्वजन धन शरीर याचा नाश करणारे अग्नि, जल, विष, शस्त्र, सर्प, सिंह, दैत्य तथा स्थळ जीव, जल जीव किंवा दुष्टजन, वैरी, राजा आदि अनिष्ट पदार्थांच्या संयोगाने अनिष्ट योगज आर्तध्यान होते.[5]

जे राज्य, ऐश्वर्य, स्त्री, कुटुंब, मित्र, सौभाग्य भोगादिकांचा नाश झाल्यावर तसेच चित्तात प्रीती उत्पन्न करणाऱ्या सुन्दर इन्द्रियांच्या विषयाचा प्रध्वंसाभाव असताना संत्रास, पीडा, भ्रम, शोक, मोहामुळे निरंतर खेदरूप होणे इष्टवियोगजनित आर्तध्यान आहे.[6]

वातपित्तकफाच्या प्रकोपाने उत्पन्न झालेल्या शरीराचा नाश करणाऱ्या वीर्यापेक्षा प्रबळ आणि क्षणाक्षणाला उत्पन्न होणाऱ्या कास (खोकला) श्वास भगंदर, जलोदर, वार्धक्य, कोड, अतिसार, ज्वरादिक रोगांनी मनुष्यांना जो व्याकुलता होते ते रोगपीडाचिन्तवन आर्तध्यान आहे.[7]

# ध्यान–आत्मसाधना

## व्याख्या : आत्म्यात रममाण होणे

जीवाचे परमोत्कृष्ट ध्येय मोक्ष आहे. हे ध्येय स्व-स्वरूपानुभूत जीवाला प्राप्त होऊ शकते. स्वरूपाभिमुख होण्यासाठी ध्यान आवश्यक आहे. ध्यानासंबंधी सर्वात प्रसिद्ध व्याख्या तत्त्वार्थ सूत्रात आहे. ती अशी,

"एकाग्रचितानिरोधो ध्यानम् .... ॥ ९–२७ ॥

चित्तवृत्तींना अन्य क्रियेपासून परावृत्त करून एका विषयामध्ये स्थिर करणे म्हणजे ध्यान होय.

आत्मोन्नतीच्या दृष्टीने विचार करताना ही व्याख्या खालीलप्रमाणे होईल–

अप्पा अप्पम्मि रओ इणमेव परं हवे झाणं ।

( द्रव्यसंग्रह गाथा–५६ )

म्हणजे ज्यायोगे आत्मा आत्म्यामध्ये रममाण होऊन स्थिर होईल तेच परम–श्रेष्ठ–ध्यान आहे. प्रस्तुत लेखामध्ये ध्यानासंबंधी सर्वांगीण विचार करावयाचा आहे.

## ध्यानं चित्तवृत्तिनिरोध :–

अमर कोशामध्ये योग शब्दाची व्याख्या करताना ध्यान शब्दाचा वरील अर्थ केला आहे. ( २।२२ ) भ. पतजलीने देखील योग सूत्रात योग शब्दाची व्याख्या चित्तवृत्ति निरोधः अशी केली आहे.

या दोन्ही व्याख्येमुळे ध्यान आणि योग एकच. जैनदर्शनामध्ये योग आणि ध्यान याचा सविस्तर विचार केलेला आहे. बौद्ध ग्रंथामध्येही योगाचा अर्थ ध्यान असा केलेला आहे. वैदिक संस्कृतीमध्ये हठयोगाला अत्यंत महत्व आहे. जैन आणि बौद्ध यामध्ये मात्र हठयोगाला कांहीच स्थान नाही. जैनदर्शनामध्ये योगाचा विचार करताना मनाचा तर विचार आहेच शिवाय वचन आणि काय ( शरीर ) या संबंधाने सविस्तर विवेचन आहे. ध्यानासंबंधी विवेचनाचे वेळी त्याचे अनेक प्रकार पद्धति इ. चा खुलासेवार निर्देश आहे. सर्वसाधारणपणे अशी मान्यता प्रचलित आहे की, ध्यान आणि योग हे जवळ जवळ एकच पण जैनमान्यता त्याच्याशी सहमत नाही–

## एकाग्र चितानिरोध–

तत्त्वार्थ सूत्रामधील "एकाग्रचितानिरोधो ध्यानम्" ही व्याख्या वर आलेली आहे. त्याचा आपण थोडा विचार करू–

अग्र म्हणजे टोक किंवा मुख. ध्यानामध्ये अवलंबन एकाचेच असते. एकाच ठिकाणी लक्ष केंद्रित करणे असा एकाग्र याचा अर्थ. चिंता या शब्दाचा अर्थ काळजी, व्याधि, मानसिक व्यथा असा अर्थ ध्यान प्रकरणी घेणे अनुचित आहे. अमरकोशा ( १।२८–२९ ) मध्ये धर्म चिंतनाच्या दोन नांवामध्ये 'धर्म चिंता' हे एक नांव आहे आणि स्मरण या अर्थी देखील चिंता हा शब्द दिलेला आहे. दुसरा अर्थ ध्यान प्रकरणात जुळतो. निरोध म्हणजे अभाव हा अर्थ येथे घेता येणार नाही. कारण जर अभाव असा अर्थ घेतला तर ध्यान निर्विषय अभावरूप ठरेल पण चिंता ज्या विषयाचे अवलंबन घेईल तदनुरूप प्रवर्तते म्हणून सद्भावरूप आहे. तेव्हां एकाग्र चितानिरोध याचा अर्थ असा की, अन्य पदार्थाचे अवलंबन सोडून एकाच पदार्थाचे अवलंबन घेणे म्हणजे ध्यान. निरोधशब्द भावसाधनरूप न धरता कर्मसाधनरूप घ्यावा त्यामुळे निरोधरूप झालेली चिंता असेच ज्ञान चचलपणा सोडून एकाग्र होईल तेच ज्ञान.[1] ( वाऱ्याने रहित वातावरणात अग्नीची ज्योत ज्याप्रमाणे स्थिर दीप्तिमान असतेत्याप्रमाणे. )

१. सर्वार्थसिद्धि वचनिका या ग्रंथातून भावार्थ घेतला आहे ( अ. ९ सू–२७ )

६) मिथ्यात्व- मिथ्यात्व व अनंतानुबंधी यांचा उदय असताना जे जीवाचे अतत्त्वश्रद्धान रूप परिणाम होतात ते मिथ्यात्व होय. ( गुण १ )

## १३ संज्ञित्व मार्गणा

ज्याना संज्ञा म्हणजे मन सारासार विचार करण्याची बुद्धि असते त्याना संज्ञी म्हणतात. मनुष्य-देव-नारकी सर्व संज्ञीच असतात. तिर्यंचापैकी कांही पंचेंद्रिय तिर्यंच संज्ञी असतात. पशु-पक्षी वगैरे ज्याना संज्ञा म्हणजे मन नसते ते असंज्ञी जीव होत. एकेंद्रिय-द्वींद्रिय-त्रींद्रिय-चतुरिंद्रिय जीव सर्व असंज्ञीच असतात. पंचेंद्रियांपैकी काही पंचेंद्रियतिर्यंच असंज्ञी असतात.

## १४ आहार मार्गणा

औदारिक-वैक्रियिक-आहारक-शरीराना योग्य अशा नोकर्म आहारवर्गणा पुद्गल परमाणूना ग्रहण करणे यास आहार म्हणतात. हा नोकर्म आहार जे जीव ग्रहण करतात ते आहारक होत. जे ग्रहण करीत नाहीत ते अनाहारक होत. एक भव सोडून दुसरा भव धारण करण्यासाठी जे गमन ती विग्रहगति होय. विग्रहगतीमध्ये एक समय, दोन समय, किंवा तीन समयपर्यंत जीव अनाहारक असतो. नवीन भव धारण करताच नंतर आहारक होतो.

संसार अवस्थेत १ ते १३ गुणस्थानापर्यंत कर्मांचे ग्रहण निरंतर असते. विग्रहगतीत देखील कर्मांचे ग्रहण चालू असते. येथे नोकर्मवर्गणेच्या ग्रहणाच्या अपेक्षेनेच आहारक अनाहारक भेद विवक्षित आहेत.

याप्रमाणे जीवाचे मार्गणा-अन्वेषण-शोध करण्यासाठी ही १४ मार्गणास्थाने जाणून घेणे आवश्यक आहेत. ही केवळ ज्ञातव्य आहेत. आश्रय करण्यायोग्य उपादेय नाहीत.

ही जीवाची राहण्याची स्थान आहेत. ही जीवाची उपाधि आहे. वास्तविक हे जीवतत्त्व नाही. ही मार्गणास्थाने नित्य अचेतन-अजीवतत्त्व आहे. यांचेविषयी एकत्वबुद्धि, ममत्त्वबुद्धि, अहंकार-ममकार ही तत्त्वाची महान् भूल आहे. याना जीवतत्व समजून त्याविषयी इष्ट-उपादेय बुद्धि ठेवणे हे मिथ्यादर्शन आहे.

सिद्ध अवस्थेत या १४ मार्गण्यस्थानापैकी केवळ तीनच स्थाने शिल्लक राहतात- १) ज्ञानमार्गणेतील १ केवलज्ञान, २) दर्शन मार्गणेतील १ केवल दर्शन, ३) सम्यक्त्व मार्गणेतील १ क्षायिक सम्यक्त्व.

बाकीची कोणतीच मार्गणास्थानें शिल्लक राहात नाहीत. सर्वांचा अभाव होतो. ज्याप्रमाणे दर्पण व वस्तु हे दोन पदार्थ सत् आहेत तसे या दोहोंच्या संयोगात दर्पणात दिसणारे प्रतिबिंब हे तावत्काळ दिसते. पण ती वास्तविक मूलभूत कोणतीच वस्तु नसते, अवस्तु असते. दर्पण व वस्तु यांचा वियोग ( समोरासमोर नसताना ) झाला की प्रतिबिंब दिसत नाही. ते प्रतिबिंब कोठे गेले, त्याचे काय झाले हे प्रश्न निरर्थक ठरतात.

हे सर्व दिसणारे जग तसेच इंद्रजाल-माया आहे. जीव व कर्म दोहोंच्या सयोगात तावत्काल आपले सुदर रूप जगास दाखवून जगास भुरळ घालते.

दिसते तसे नसते म्हणून जग फसते. पण वस्तुदृष्टी ज्ञानी या तावत्काल दिसणाऱ्या पण वस्तुनिष्ठ नसणाऱ्या इंद्रजालाला वस्तुभूत समजत नाही त्याचा आदर करीत नाही. त्याचेविषयी इष्ट-उपादेय बुद्धि ठेवीत नाही. तो वस्तुभूत असणाऱ्या आपल्या शुद्ध ज्ञानदर्शन स्वभावात स्थिर होतो. तोच खरा सुखी होतो.





धरणेन्द्रांना सेवन करण्यास योग्य भोग आणि त्रिभुवनाला जिंकणारी राज्य लक्ष्मी तथा ज्यात शत्रूचा समूह क्षीण झाला आहे असे राज्य आणि देवांगनांच्या नृत्यलीलाना जिंकणाऱ्या स्त्रिया आणि इतरही आनंदरूप वस्तु मला कशा मिळतील असे चिंतवन करण्याला भोगार्तध्यान म्हणतात.[1]

आर्तध्यान (चारही प्रकारचे) अत्यंत अशुभ कृष्ण, नील आणि कापोत लेश्यांच्या आश्रयाने उत्पन्न होतात, त्यांचा काळ अंतर्मुहूर्त आहे आणि आलंबन अशुभ आहे.[2]

आर्तध्यान संसाराचे कारण आहे.[3] याचे फल तिर्यंच गति आहे.[4]

अविरत, देशविरत आणि प्रमत्त संयत गुणस्थानवर्ती जीवांना आर्त ध्यान होते. अविरत आणि देशविरत गुणस्थानवर्ती जीवांना चारही, प्रमत्त संयत गुणवर्ती जीवांना निदान (४ था प्रकार) आर्तध्यानाशिवाय शेष प्रमादवश कदाचित् होतात.[5]

सर्वसाधारणपणे आर्तध्यानी जीव कसा असतो याचे स्वरूप ज्ञानार्णव ग्रंथात खालीलप्रमाणे दिले आहे. (बाह्य चिन्ह)

प्रत्येक गोष्टीत सन्देह (शंका) असतो, नंतर त्या जीवाला शोक होतो, भीति वाटते, तो प्रमादी असतो, कलह (भांडण) करतो, त्याला चित्त भ्रम होतो, भ्रांती होते, तो चंचल चित्त असतो, त्याला विषय सेवनात उत्कंठ असते, तो निद्रालु असतो, अंगात जडता असते, खेद असतो....[6]

**आध्यात्मिक दृष्टिकोणातून आर्तध्यान–**

वरीलप्रमाणे सारांशरूपाने आर्तध्यानाचे स्वरूप पाहिले. हे आर्तध्यान आगम दृष्टिकोणातून आहे. आता आध्यात्मिक दृष्टिकोणातून याचे लक्षण चारित्रसार ग्रंथात खालीलप्रमाणे दिले आहे. पहा–

तत्रार्तं बाह्याध्यात्मिकभेदाद् द्विविकल्पं ।[7] म्हणजेच ते आर्तध्यान बाह्य आणि अध्यात्म अशा दोन प्रकारचे आहेत ...आध्यात्मिक आर्तध्यान चार प्रकारचे असल्याचा उल्लेख आहे. त्या आधारे जं. सि. को. मध्ये खालीलप्रमाणे आलेख दिला आहे. स्वसंवेद्यमाध्यात्मिकार्तध्यानं । असे आध्यात्मिक आर्तध्यानाचे लक्षण सांगितले आहे. अर्थ हा की (इतर जन ज्याचे अनुमान करू शकतात ते बाह्य आर्तध्यान) ज्याला केवळ आपलाच आत्मा जाणू शकतो ते आध्यात्मिक आर्तध्यान होय.

आलेख–




१. ज्ञानार्णव– २५।३४ चे आधारे. २. महापुराण– २९।३८ ३. सर्वार्थसिद्धी– ९।२९
४. जं. सि. को. १।२८७ ५. द्रव्य संग्रह, त. सूत्र, ज्ञानार्णव इ. ग्रंथातील वर्णनावरून साराश
६. ज्ञानार्णव– २५।४३ चा साराश ७. मूळ ग्रंथ जवळ नसल्यामुळे उतारा जैनेन्द्र सिद्धान्त कोशावरून घेतला आहे.





## आगम आणि अध्यात्म–

सामान्य विशेषरूपाने सर्व पदार्थांचे निरूपण आगमामध्ये केलेले असते आणि केवळ आत्म्याच्याच आश्रयाने अध्यात्म सांगते. वीतराग सर्वज्ञांनी सांगितलेल्या सात तत्त्वांविषयी स. श्रद्धान इ. चे प्रतिपादन आगमामध्ये असते तर अभेद रत्नत्रय प्रतिपादक अर्थ व पदार्थांचे व्याख्यान अध्यात्मशास्त्रात असते.[1] गोम्मटसारादि आगम ग्रंथ आहेत समयसारादि अध्यात्म ग्रंथ आहेत. आगमाप्रमाणे जीवांनी मोक्षमार्गाचे ... आगम भाषेप्रमाणे ध्यानाचे अनेक प्रकार आहेत. अध्यात्म भाषेने परम शुद्ध चैतन्यशाली आणि परिपूर्ण आनंदाचा धारक भगवान निजात्मा आहे त्यात उपादेय बुद्धि ठेऊन, नंतर "मी अनंतज्ञानाचा धारक आहे इ. रूपाने अंतरंग धर्मध्यान आहे ... निजशुद्धात्म्यामध्ये निर्विकल्प ध्यानरूप शुक्लध्यान आहे"[1]

प्रस्तुत विषयामध्ये अध्यात्म दृष्टिकोनातून अधिक विचार करावयाचा आहे. प्रसंगोपात्त आगमभाषेने देखील विचार करू–

## ध्यानाचे प्रकार–

ध्यानाचे मुख्य दोन भेद आहेत १ अप्रशस्त व २ प्रशस्त किंवा १ अशुभ व २ शुभ. प्रामुख्याने वरील भेद असले तरी सूक्ष्म दृष्टीने अनेक भेद आहेत–

पापास्रवहेतुत्वादशुभम् अप्रशस्तमार्तरौद्रध्यानद्वयम्, शुभं कर्मनिर्दहनसमर्थं धर्म्यशुक्लद्वयं प्रशस्तम्। असे सर्व साधारण स्वरूप सांगितले आहे.[3] अर्थात् ज्या ध्यानाने पापास्रव होतात ते अप्रशस्त ( आर्त आणि रौद्र ) आणि ज्यामुळे कर्मांची निर्जरा होते ते प्रशस्त ध्यान आहे. आगमानुसार प्रथम अप्रशस्त ध्यानाचे थोडक्यात स्वरूप पाहून नंतर प्रशस्त ध्यानाचा विस्ताराने विचार करू.

## आर्तध्यान–

ऋतं दुःखं, अर्दनमर्तिर्वा, तत्र भवमार्तम्।[4] म्हणजे आर्त शब्द 'ऋत' अथवा 'अर्दन' यापैकी एका शब्दाने झाला आहे. ऋत म्हणजे दुःख आणि अर्दन म्हणजे पीडा ( अर्दनं अर्तिः ) यामध्ये ( दुःखात आणि पीडेमध्ये ) जे होते ते आर्तध्यान होय.

याचे १ अनिष्ट योगज, २ इष्ट वियोगज, ३ भोगार्त ( वेदना प्रभव ) व ४ निदान असे चार भेद आहेत. थोडक्यात स्वरूप असे, १) अनिष्ट पदार्थांच्या संयोगाने होणारे, २) इष्ट पदार्थांच्या वियोगाने होणारे ३) रोग प्रकोपाच्या पीडेने होणारे व ४) आगामी काळातील भोगाच्या वांछेने होणारे. असे चार प्रकार आहेत.

...स्वजन धन शरीर यांचा नाश करणारे अग्नि, जल, विष, शस्त्र, सर्प, सिंह, दैत्य तथा स्थळ जीव, जल जीव किंवा दुष्टजन, वैरी, राजा आदि अनिष्ट पदार्थांच्या संयोगाने अनिष्ट योगज आर्तध्यान होते.[5]

जे राज्य, ऐश्वर्य, स्त्री, कुटुंब, मित्र, सौभाग्य भोगादिकांचा नाश झाल्यावर तसेच चित्तात प्रीती उत्पन्न करणाऱ्या सुन्दर इन्द्रियांच्या विषयांचा प्रध्वंसाभाव असताना संत्रास, पीडा, भ्रम, शोक, मोहामुळे निरंतर खेदरूप होणे इष्टवियोगजनित आर्तध्यान आहे.[6]

वातपित्तकफाच्या प्रकोपाने उत्पन्न झालेल्या शरीराचा नाश करणाऱ्या सोयपिक्षा प्रबळ आणि क्षणाक्षणाला उत्पन्न होणाऱ्या कास (खोकला) श्वास भगंदर, जलोदर, वार्धक्य, कोड, अतिसार, ज्वरादिक रोगांनी मनुष्याना जी व्याकुलता होते ते रोगपीडाचिन्तवन आर्तध्यान आहे.[7]

---

१ मूत्र पाहुड व तात्पर्य वृत्ती ( १७३।२५५।११ व ६।५४।५ ) चा भावार्थ. २. द्रव्य संग्रह गाथा ४८ वरील ब्रम्हदेवकृत संस्कृत टीका. ३ स्वामिकार्तिकेयानुप्रेक्षा गाथा ४७० ची संस्कृत टीका ४. सर्वार्थसिद्धि– ९।२८ (संस्कृत टीका) ५. ज्ञानार्णव– २५।२५ चे आधारे ६ ज्ञानार्णव– २५।२९ चे आधारे. ७ ज्ञानार्णव २५।३२ चे आधारे.

९) शुद्धात्मतत्त्वाच्या भावनेला धर्म म्हणतात.
१०) शुद्धात्मतत्त्वाची प्रतीति, दृष्टीला धर्म म्हणतात.
११) उत्तमक्षमादि दश विशुद्ध भावाला धर्म म्हणतात.
१२) जीवादि तत्वाचे यथार्थ श्रद्धान, यथार्थ ध्यान आणि अव्रतत्यागरूप भेदरत्नत्रयाला धर्म म्हणतात
१३) समता, वंदनादिक साधूच्या सहा आवश्यक क्रिया पालन करणे यास धर्म म्हणतात.
१४) जो दुःखापासून सोडवून उत्तम सुखात घेऊन जातो त्यास धर्म म्हणतात.
१५) देवपूजा, गुरूपास्ति आणि श्रावकाच्या ६ कर्तव्याला पालन करणे यास धर्म म्हणतात.
१६) जीवदया करणे यास धर्म म्हणतात.[१]

**प्राणायाम–** श्वास हळूहळू आत ओढणे पूरक आहे, त्याला थांबवून ठेवणे कुंभक आहे आणि नतर हळूहळू बाहेर सोडणे रेचक आहे. या तिन्हीना मिळून प्राणायाम म्हणतात. चित्ताची एकाग्रता झाल्यावर श्वास निरोध आपोआप होतो. म्हणून जैनाचार्यानी यास अधिक महत्त्व दिले नाही. महापुराणामध्ये मनोयोग, काययोग व वचनयोग या तिन्हींचा निग्रह करणे आणि शुभ भावना ठेवणे यास प्राणायाम म्हटले आहे. ज्ञानार्णव ग्रंथात बरेच विस्ताराने वर्णन आहे.

**चार मंडल–** ध्यान सिद्धीसाठी मनाला एकाग्र करण्यासाठी पूर्वाचार्यानी प्राणायामाची प्रशंसा केली आहे.[२] पृथ्वी मंडल, अप् मंडल, तेजोमंडल व पवनमंडल अशा मंडल चतुष्टयाचे वर्णन ज्ञानार्णवामध्ये आहे. प्रथम पथ्वीमंडल नंतर वरूणमंडल, नतर पवनमंडल व शेवटी तेजोमंडल जाणावे. असे जरी म्हटले आहे तरी ते जाणणे अचित्य आहे असे श्री शुभचद्राचार्यांनी स्पष्ट सांगितले आहे.

**मोक्षमार्गात अकार्यकारी–** मोक्षाभिलाषी जीवाना प्राणायामाचा उपयोग फारसा होत नाही, कारण श्वासोच्छ्वास थांबवण्याच्या वेदनेमध्ये शरीरपात होऊ शकतो.[३] श्री शुभचंद्राचार्यांनी देखील सांगितले आहे की, 'प्राणायामात पवन साधनेमुळे विक्षिप्त झालेले मन स्वास्थ्य प्राप्त करीत नाही........पवन चातुर्य शरीराला सूक्ष्म स्थूलादि करणे रूप अंगाचे साधन आहे, यामुळे मुक्तीची इच्छा करणाऱ्या मुनीला विघ्नाचे कारण आहे.... कारण हे (प्राणायाम) आत्म्याला सन्देह आणि पीडेचे कारण आहे........जो मुनी संसार देह आणि भोगापासून विरक्त आहे, कषाय मन्द आहेत, जो विशुद्ध भावयुक्त आहे. वीतराग आणि जितेंद्रिय आहे, त्याने प्राणायामाची प्रशंसा करणे योग्य नाही.'[४]

परमात्म प्रकाश ग्रंथामध्ये असे सांगितले आहे की,......"वायुधारणा वांछा पूर्वक होते आणि वांछा मोहापासून निर्माण होणारी विकल्परूप आहे, वांछा मोहाचे कारण आहे........वायुधारणेने मुक्ति होत नाही, कारण वायुधारणा शरीराचा धर्म आहे, आत्म्याचा नाही."[५]– थोडक्यात असे की, प्राणायाम मोक्षमार्गामध्ये कार्यकारी होऊ शकत नाही. प्राणायाम कौतुकमात्र आहे, त्याचे पारमार्थिक फल काहीच नाही. वायुधारणेमुळे शरीर निरोगी होते, हलके होते. वायु धारणेने मुक्ति होत नाही असे परमात्म प्रकाश ग्रथात म्हटले आहे.

**ध्यान आणि प्राणायाम–** रागादि सोडल्यामुळे वायुनिरोध स्वयमेव होतो. हे सांगणारे पुढील अत्यत महत्त्वाचे वाक्य पहा– 'यदायं जीवो रागादिपरभावशून्यनिर्विकल्पसमाधौतिष्ठति तदायमुच्छ्वासरूपो वायुर्नासिका छिद्रद्वयं वर्जयित्वा स्वयमेवानीहितवृत्या तालुप्रदेशे यत् केशात् शेषाष्टमभागप्रमाण छिद्रं तिष्ठति तेन क्षणमात्रं दशमद्वारेण तदनन्तर रन्ध्रेण कृत्वा निर्गच्छतीति। (सारांश जेव्हा हा जीव रागादि परभावशून्य निर्विकल्प समाधीत असतो तेव्हा श्वासोच्छ्वासरूप पवन नाकाचे दोन्ही छिद्र सोडून वालाग्राच्या आठव्या भाग प्रमाण

१. द्रव्यसंग्रह प्रश्नोत्तरी टीका– सहजानंद वर्णी– पान २५४ २ विस्तारासाठी पहा– ज्ञानार्णव सर्ग– २९
३. राजवार्तिक– ९–२७ ४. ज्ञानार्णव– ३०।४ ते ८ ५. परमात्मप्रकाश– टीका– २।१६२ वरून सारांश.

**रौद्रध्यान—**

रौद्र म्हणजे क्रूर किंवा उग्र. क्रूर भाव असताना होणारे ध्यान ते रौद्रध्यान. क्रूर आशया असणाऱ्या जीवास रुद्र म्हणतात. त्याचे कार्य वा भावा( परिणाम )स रौद्र म्हणतात.[१] असे भाव असताना होणारे ध्यान ते रौद्रध्यान. हिंसा आदि पाप कार्य करून गर्वाने फुगून जाणे हाही भाव रौद्रध्यानाचा आहे. जो पुरुष प्राण्यांना रडवतो तो रुद्र, क्रूर अथवा सर्व जीवामध्ये निर्दय म्हटला जातो अशा पुरुषाला जे ध्यान होते ते रौद्रध्यान.[२]

**प्रकार—**

१. हिंसानन्द २. मृषानन्द ३. चौर्यानन्द व ४. विषयसंरक्षणानन्द, रौद्रध्यान असे चार प्रकारचे आहे. त्याचे सामान्य स्वरूप असे—

१) हिंसा करणे, करविणे व अनुमोदना देणे, यात आनंद मानणे ते पहिले रौद्रध्यान. २) खोटे बोलणे, बोलवणे व अनुमोदना देणे व चहाडी, निंदा इत्यादीमध्ये आनंद मानणे ते दुसरे रौद्रध्यान. ३) चोरी करणे, करविणे, अनुमोदन देण्यामध्ये, चोरी करण्यास प्रोत्साहन देणे चोरीचा माल ठेवणे, खरीदणे यात आनंद मानणे तिसरे रौद्रध्यान व पंचेंद्रियांच्या ४) विषयसाधनांच्या संरक्षणामध्ये परिग्रह उपार्जन करणे, रक्षण करणे यात आनंद मानणे ते चौथे रौद्रध्यान आहे.[३]

आध्यात्मिक रौद्रध्यान— चारित्रसार ग्रंथामध्ये हा प्रकार सापडतो. याचेही बाह्य आणि आध्यात्मिक असे दोन प्रकार आहेत. आध्यात्मिक रौद्रध्यानाचे असे.[४] 'स्वसंवेद्यमाध्यात्मिकं ( रौद्रध्यानम् ) म्हणजे ज्याला आपलाच आत्मा जाणू शकतो ते आध्यात्मिक रौद्रध्यान.

हे रौद्रध्यान अत्यंत अशुभ आहे. कृष्ण-नील-कापोत या तीन लेश्येमुळे हे उद्भवते व अंतर्मूहूर्त काळापर्यंत टिकते. आर्तध्यानासारखाच क्षायोपशमिक भाव असतो. भावलेश्या आणि कषायांची प्रधानता असल्यामुळे औदयिक भाव आहे. मिथ्यादृष्टि जीवापासून पंचमगुणस्थानापर्यंत होते. संयमी जीवाला हे ध्यान होत नाही.

येथपर्यंत आर्त व रौद्र ध्यानाचे थोडक्यात स्वरूप पाहिले. विशेषतः प्रशस्तध्यानाचे वर्णन करावयाचे असल्यामुळे अप्रशस्त ध्यानाचे सारांश रूपाने वर्णन केले आहे.

**धर्मध्यान—**

धर्म आणि ध्यान अशा दोन शब्दानी मिळून धर्मध्यान हा शब्द झालेला असल्यामुळे धर्माचे स्वरूप प्रथम पाहू.

१) अखंड चैतन्य स्वभावाला धर्म म्हणतात.
२) अखड चैतन्य स्वभावाच्या पूर्ण अनुरूप परिणमनाला धर्म म्हणतात.
३) मोह क्षोभाने सर्वथा मुक्त आत्मपरिणमनाला धर्म म्हणतात
४) रागद्वेषाच्या बाधारहित परम अहिंसेला धर्म म्हणतात.
५) शुद्धात्म्याचे श्रद्धान, ज्ञान, आचरणरूप अभेद रत्नत्रयास धर्म म्हणतात.
६) शुद्धात्म्याच्या संवेदनास धर्म म्हणतात.
७) शुद्धात्म्याच्या अवलंबनास धर्म म्हणतात.
८) शुद्धात्मतत्त्वाच्या उपयोगास धर्म म्हणतात.

---

१. ज्ञानार्णव— २६।२ २. महापुराण— २१।४२ ३. द्रव्यसंग्रह— प्रश्नोत्तरी टीका—(श्री वर्णीजी. पान— ३१० वरून
४. जैनेन्द्र सिद्धांत कोश— ३।४२१.




असलेले, पाखंडी लोक रहात असलेले, रुद्रादि देव रहात असलेले, व्यसनी, व्यभिचारी लोकानी व्याप्त इ. अनिष्ट ठिकाणी ध्यान करू नये. मन, वचन व काया याचे जेथे समाधान होईल ते योग्य क्षेत्र. कारण असे,[1] जे मुनि मनुष्यानी गच्च भरलेल्या शहरात निवास करतात आणि निरतर विषय पाहतात, अशा मुनीचे चित्त इंद्रियाच्या विषयाची अधिकता असल्यामुळे कदाचित् व्याकुळ होऊ शकते. त्यामुळे मुनीनी एकान्त स्थळीच शयन करावे.

**दिशा–** अंधःकाराचा नाश करणाऱ्या सूर्याचा उदय पूर्व दिशेला होतो त्यामुळे पूर्व दिशा प्रशस्त आहे. सूर्योदयासमान आमच्या कार्यात सुद्धा सदोदित उन्नति व्हावी अशी इच्छा करणारे लोक पूर्व दिशेकडे आपले मुख करून आपले इष्ट कार्य करतात. विदेह क्षेत्रामध्ये स्वयंप्रभादि तीर्थंकर झाले आहेत, हे क्षेत्र उत्तर दिशेकडे आहे, त्यामुळे त्या तीर्थंकराना हृदयामध्ये धारण करून मुनि आचार्य आपले मुख उत्तर दिशेकडे करून कार्यसिद्धी करून घेतात.[2] ध्यानाचे वेळी प्रसन्न मुख साक्षात् पूर्व दिशेकडे तोंड करून अथवा उत्तर दिशेकडे तोंड करून ध्यान करणे प्रशंसनीय आहे.

**धर्मध्यान सामान्य लक्षण–** ज्यायोगे धर्माचे परिज्ञान होते ते धर्मध्यानाचे लक्षण आहे.[3] रागद्वेषांचा त्याग करून अर्थात् साम्य भावाने जीवादि पदार्थांचे, ते जसे आपल्या स्वरूपात स्थित आहेत तसे ध्यान किंवा चिंतन करणे धर्मध्यान आहे.[4] पंचपरमेष्ठीची भक्ति आदि तसेच तदनुकूल शुभानुष्ठान ( पूजा, दान, अभ्युत्थान, विनय इ.) बहिरंग धर्मस्थान आहे. पाप कार्यापासून निवृत्ती आणि पुण्यकार्यामध्ये प्रवृत्ति यांचे मूळ कारण एक सम्यग्ज्ञान आहे. त्यामुळे मुमुक्षु जीवाच्यासाठी सम्यग्ज्ञानच धर्मध्यान आहे, असे रयणसार ग्रंथामध्ये म्हटले आहे.

वाचना, पृच्छना, अनुप्रेक्षा, आम्नाय आणि परिवर्तन हे स्वाध्यायाचे भेद आहेत. हे धर्मध्यानाचे आधारसुद्धा आहेत असा भगवती आराधना ( गाथा १७१० ) या ग्रंथामध्ये उल्लेख आहे.

**धर्मध्यानाचे चिन्ह–** आगम, उपदेश आणि जिनाज्ञेप्रमाणे, जे जिनेश्वरांनी सांगितलेल्या पदार्थांचे श्रद्धान होते ते धर्मध्यानाचे चिन्ह आहे असे धवल ग्रंथामध्ये सांगितले आहे. बाह्य आणि अंतरंग अशा दोन प्रकारची ही चिन्हे आहेत. प्रसन्न चित्त राहणे, धर्माशी प्रेम करणे, शुभ योग ठेवणे, उत्तम शास्त्राचा अभ्यास करणे, चित्त स्थिर ठेवणे आणि शास्त्राज्ञा तथा स्वकीय ज्ञानामुळे एक प्रकारची रुचि उत्पन्न होणे हे बाह्य चिन्ह आहे. अनुप्रेक्षा इत्यादि अनेक प्रकारच्या शुभ भावना अंतरंग चिन्ह आहे.[5]

**धर्मध्यान योग्य सामग्री–** ध्यानाच्या उत्पत्तीस कारणीभूत द्रव्य, क्षेत्र, काल, भाव आदि सामुग्री तीन प्रकारची आहे. त्यामुळे ध्याता व ध्यान देखील तीन प्रकारचे आहे.[6] याच ( तत्वानुशासन ) ग्रंथामध्ये सांगितले आहे की (श्लोक ७५ व २१८) परिग्रह त्याग, कषाय निग्रह, व्रत धारण, इन्द्रिय व मनोविजय या सर्व ध्यानाच्या उत्पत्तीमध्ये सहाय्यभूत सामग्री आहेत. गुरुपदेश, श्रद्धान, निरंतर अभ्यास आणि मनाची स्थिरता ही चार ध्यानाच्या सिद्धीची मुख्य कारणे आहेत. द्रव्यसंग्रह टीकेमध्ये वैराग्य, तत्वांचे ज्ञान, परिग्रह त्याग, साम्य भाव आणि परिषहजय या पाच कारणांचा उल्लेख आहे.

**धर्म ध्यानाचे प्रकार–** स्थूलमानाने धर्म ध्यानाचे १ आज्ञा, २ अपाय, ३ विपाक व ४ संस्थान असे चार भेद आहेत. पुढे धर्मध्यानाचे १० प्रकार[7] सांगितले आहे. त्यामध्ये आज्ञादिक ४ प्रकार अंतर्भूत आहेत.

**१. अपाय विचय–** पापाचा त्याग करणाऱ्या साधूनी राग, द्वेष, कषाय आणि आश्रव आदि क्रियामध्ये विद्यमान जीवांच्या इहलोक आणि परलोक यातील अपायाचे चिंतवन करावे.[8] मिथ्यादृष्टि जीव जन्मांध

१. महापुराण २१।७८–७९ २. भगवती आराधना ५६०।७७१. ३. भगवती आराधना– १७०९
४. ज्ञानसार– १७ ५. महापुराण– २१।१५९–१६१. ६. तत्वानुशासन– ४८ ७. चारित्रसार, हरिवंश पुराण, भावपाहुड हे ग्रंथ पहा ८. धवल ग्रंथ– १३।गाथा ३९





अतिसूक्ष्मछिद्रातून बाहेर पडतो)[1] संयमी जीवाला वायुनिरोध अवांछिक स्वयमेव होतो तो स्वाभाविक असतो. वांछापूर्वक नसतो–

**प्राणायाम उपादेय का ?–** ज्ञानार्णव ग्रंथामध्ये मात्र उपादेयता (कथंचित्) सांगितली आहे. सर्ग २९ मध्ये याचे जे वर्णन आहे त्याचा सारांश असा– प्राणायाम करणारांचे मन इतके स्थिर होते की त्यांना जगाच्या सर्व घटना प्रत्यक्ष दिसू लागतात. ध्यानाच्या सिद्धीसाठी आणि मन एकाग्र करण्यासाठी प्राणायाम प्रशंसनीय आहे. एकदा मन वश केल्यानंतर जीवाची अविद्या तत्क्षणात संपून जाते, इंद्रिये मदरहित होतात व कषाय क्षीण होतात–

**प्रत्याहार–** महापुराणामध्ये (२१।२३०) असा उल्लेख आहे की, मनाच्या प्रवृत्तीचा संकोच केल्यानंतर जो मानसिक संतोष होतो त्यास प्रत्याहार म्हणतात. ज्ञानार्णव ग्रंथामध्ये ध्यानाचे प्रामुख्याने वर्णन असल्यामुळे अनेक लहान सहान गोष्टींचा सूक्ष्मतेने विचार केला आहे. ज्याचे मन निःसंग आणि संवररूप झालेले आहे, कासवाप्रमाणे ज्याची संकोचरूप इद्रिये आहेत असा मुनि रागद्वेषरहित होऊन ध्यानतंत्रात स्थिर होतो.[2] मनाला विषयापासून अलग करून निराकुल करून ललाटस्थळी त्याला धारण करण्याचा विधी सांगितलेला आहे. १ नेत्रयुगल, २ कान, ३ नासिकाग्र, ४ ललाट, ५ मुख, ६ नाभि, ७ मस्तक, ८ हृदय, ९ तालुस्थान व १० दोन्ही भुवयांचा मध्य भाग. अशा दहा स्थळांपैकी कोणत्याहि एका स्थानामध्ये आपल्या मनाला विषयांनी रहित करून आलंबित करावे.

**आसन–** पर्यंकासन, अर्धपर्यंकासन, वज्रासन, वीरासन, सुखासन, कमलासन, कायोत्सर्ग हे ध्यानासाठी योग्य अशी आसने सांगितलेली आहेत.

बोधपाहुड आणि अनगार धर्मामृत तसेच इतरही ग्रंथातून आसनाचे लक्षण आदि दिलेले आहेत.

ध्यानाची इच्छा असणाऱ्याने पर्यंकासनाप्रमाणे कायोत्सर्गासन धारण करण्याचे विधान आहे.[3] वरील अनेक आसनांचा निर्देश केलेला जरी असला तरी सर्वच आसन आवश्यकच आहेत असे नाही. समर्थ जीवासाठी कोणत्याच आसनाचा निषेध-नियम नाही. पण विषम आसनामुळे शरीराप्रमाणे पीडा होते त्यामुळे मनामध्येही विचलता निर्माण होऊ शकते. आकुलता उत्पन्न झाल्यावर ध्यान थोडेच होणार ? त्यामुळे ध्यानाचे वेळी सुखासन योग्य आहे. त्याशिवाय बाकीची आसने विषम अर्थात् दु:खदायक आहेत.[4]

**मुद्रा–** राजवार्तिक ग्रंथामध्ये असे सांगितले आहे की, सहज-सुखपूर्वक पल्यंकासन घालावे. त्यावेळी शरीराला सम, ऋजु आणि निश्चल ठेवावे. मांडीवर डाव्या हाताच्या तळव्यावर उजव्या हाताचा तळवा ठेवावा. डोळे अधिक उघडे किंवा बंद ठेवू नयेत. खालील दातावर वरील दंतपंक्ती जोडून ठेवावी. तोंड किंचित् वर करावे. कमर सरळ ठेवावी. प्रसन्नमुख आणि अनिमिष स्थिर सौम्य दृष्टि होऊन, नासाग्र दृष्टि ठेवून निद्रा, आळस, काम, राग, रति, अरति, शोक, हास्य, भय, द्वेष, विचिकित्सा इ. सोडून मंद श्वासोच्छ्वास ठेवावा.

**पीठ–** साधूनी तृणमय, शिलामय अथवा काष्ठमय अशा आसनावर बसावे. क्षुद्र जीव नसलेल्या, छिद्र नसलेल्या, सुखकर स्पर्शाच्या आणि कटकरहित स्थिर जागी आसनावर बसावे. बाह्य आणि अभ्यंतर बाधांनी रहित पवित्र भूमीवर बसावे.

**क्षेत्र–** सिद्धक्षेत्र, तीर्थक्षेत्र, कल्याणकारण स्थान, समुद्र किनारा, वन, पर्वत, शिखर, नदी काठ, कमळ वन, प्राकार (कोट) नदीसंगम स्थळ, द्वीप, वृक्ष कोटर, स्मशान, पर्वत गुहा, सिद्धकूट, कृत्रिम व अकृत्रिम चैत्यालय अशा ठिकाणी ध्यान करणाऱ्याने ध्यान करावे. म्लेंच्छादि दुष्ट जन जिथे रहातात, दुष्ट राजाच्या अधिकारात

१ परमात्मप्रकाश– २।१६२।२७४।५ २ ज्ञानार्णव– प्रत्याहार प्रकरण. ३ महापुराण– २१।६९ ४ महापुराण– २१।७१.






असलेले, पाखंडी लोक रहात असलेले, रुद्रादि देव रहात असलेले, व्यसनी, व्यभिचारी लोकानी व्याप्त इ. अनिष्ट ठिकाणी ध्यान करू नये. मन, वचन व काया याचे जेथे समाधान होईल ते योग्य क्षेत्र. कारण असे,[1] जे मुनि मनुष्यानी गच्च भरलेल्या शहरात निवास करतात आणि निरंतर विषय पाहतात, अशा मुनीचे चित्त इंद्रियाच्या विषयाची अधिकता असल्यामुळे कदाचित् व्याकुळ होऊ शकते. त्यामुळे मुनीनी एकान्त स्थळीच शयन करावे.

**दिशा–** अंधःकाराचा नाश करणाऱ्या सूर्याचा उदय पूर्व दिशेला होतो त्यामुळे पूर्व दिशा प्रशस्त आहे. सूर्योदयासमान आमच्या कार्यात सुद्धा सदोदित उन्नति व्हावी अशी इच्छा करणारे लोक पूर्व दिशेकडे आपले मुख करून आपले इष्ट कार्य करतात. विदेह क्षेत्रामध्ये स्वयंप्रभादि तीर्थंकर झाले आहेत, हे क्षेत्र उत्तर दिशेकडे आहे, त्यामुळे त्या तीर्थंकराना हृदयामध्ये धारण करून मुनि आचार्य आपले मुख उत्तर दिशेकडे करून कार्यसिद्धी करून घेतात.[2] ध्यानाचे वेळी प्रसन्न मुख साक्षात् पूर्व दिशेकडे तोंड करून अथवा उत्तर दिशेकडे तोंड करून ध्यान करणे प्रशंसनीय आहे.

**धर्मध्यान सामान्य लक्षण–** ज्यायोगे धर्माचे परिज्ञान होते ते धर्मध्यानाचे लक्षण आहे.[3] रागद्वेषांचा त्याग करून अर्थात् साम्य भावाने जीवादि पदार्थाचे, ते जसे आपल्या स्वरूपात स्थित आहेत तसे ध्यान किंवा चिंतन करणे धर्मध्यान आहे.[4] पंचपरमेष्ठीची भक्ति आदि तसेच तदनुकूल शुभानुष्ठान (पूजा, दान, अभ्युत्थान, विनय इ.) बहिरंग धर्मध्यान आहे. पाप कार्यापासून निवृत्ती आणि पुण्यकार्यामध्ये प्रवृत्ति यांचे मूळ कारण एक सम्यग्ज्ञान आहे. त्यामुळे मुमुक्षु जीवांच्यासाठी सम्यग्ज्ञानच धर्मध्यान आहे, असे रयणसार ग्रंथामध्ये म्हटले आहे.

वाचना, पृच्छना, अनुप्रेक्षा, आम्नाय आणि परिवर्तन हे स्वाध्यायाचे भेद आहेत. हे धर्मध्यानाचे आधारसुद्धा आहेत असा भगवती आराधना (गाथा १७१०) या ग्रंथामध्ये उल्लेख आहे.

**धर्मध्यानाचे चिन्ह–** आगम, उपदेश आणि जिनाज्ञेप्रमाणे, जे जिनेश्वरांनी सांगितलेल्या पदार्थाचे श्रद्धान होते ते धर्मध्यानाचे चिन्ह आहे असे धवल ग्रंथामध्ये सांगितले आहे. बाह्य आणि अंतरंग अशा दोन प्रकारची ही चिन्हे आहेत. प्रसन्न चित्त राहणे, धर्माशी प्रेम करणे, शुभ योग ठेवणे, उत्तम शास्त्रांचा अभ्यास करणे, चित्त स्थिर ठेवणे आणि शास्त्राज्ञा तथा स्वकीय ज्ञानामुळे एक प्रकारची रुचि उत्पन्न होणे हे बाह्य चिन्ह आहे. अनुप्रेक्षा इत्यादि अनेक प्रकारच्या शुभ भावना अंतरंग चिन्ह आहे.[5]

**धर्मध्यान योग्य सामग्री–** ध्यानाच्या उत्पत्तीस कारणीभूत द्रव्य, क्षेत्र, काल, भाव आदि सामुग्री तीन प्रकारची आहे. त्यामुळे ध्याता व ध्यान देखील तीन प्रकारचे आहे.[6] याच (तत्वानुशासन) ग्रंथामध्ये सांगितले आहे की (श्लोक ७५ व २१८) परिग्रह त्याग, कषाय निग्रह, व्रत धारण, इन्द्रिय व मनोविजय या सर्व ध्यानाच्या उत्पत्तीमध्ये सहाय्यभूत सामग्री आहेत. गुरुपदेश, श्रद्धान, निरंतर अभ्यास आणि मनाची स्थिरता ही चार ध्यानाच्या सिद्धीची मुख्य कारणे आहेत. द्रव्यसंग्रह टीकेमध्ये वैराग्य, तत्त्वाचे ज्ञान, परिग्रह त्याग, साम्य भाव आणि परिषहजय या पाच कारणांचा उल्लेख आहे

**धर्म ध्यानाचे प्रकार–** स्थूलमानाने धर्म ध्यानाचे १ आज्ञा, २ अपाय, ३ विपाक व ४ संस्थान असे चार भेद आहेत. पुढे धर्मध्यानाचे १० प्रकार[7] सांगितले आहे. त्यामध्ये आज्ञादिक ४ प्रकार अंतर्भूत आहेत.

**१. अपाय विचय–** पापाचा त्याग करणाऱ्या साधूनी राग, द्वेष, कषाय आणि आश्रव आदि क्रियामध्ये विद्यमान जीवांच्या इहलोक आणि परलोक यातील अपायाचे चितवन करावे.[8] मिथ्यादृष्टि जीव जन्मांध

---

१. महापुराण २१।७८–७९ २. भगवती आराधना ५६०।७७१. ३. भगवती आराधना– १७०९
४. ज्ञानसार– १७ ५. महापुराण– २१।१५९–१६१. ६. तत्वानुशासन– ४८ ७. चारित्रसार, हरिवंश पुराण, भावपाहुड हे ग्रंथ पहा ८. धवल ग्रंथ– १३।गाथा ३९.

पुरुषाप्रमाणे सर्वज्ञ प्रणीत मार्गापासून विमुख होतात. त्यांना सन्मार्ग माहीत नसल्यामुळे ते मोक्षार्थी पुरुषांना दूरूनच त्यागतात. याप्रकारे सन्मार्गातील अपायांचे चितवन करणे अपाय विचय धर्मध्यान आहे.

मन, वचन, काय यांच्या प्रवृत्ति विशेषानी संचित पापांची शुद्धि कशी होईल असा विचार करणे; राग, द्वेष, कषाय आणि आश्रव आदि क्रियेमध्ये विद्यमान जीवांच्या इहलोक व परलोक यापासून होणाऱ्या अपायाचे चिंतन करणे; अथवा मिथ्यादर्शन, मिथ्याज्ञान व मिथ्याचारित्रात फसलेल्या जीवांचा उद्धार कसा होईल याचा विचार करणे अपाय विचय धर्मध्यान आहे.

२. उपाय विचय– माझ्या मन, वचन, कायेची शुभ प्रवृत्ति कशी होईल असा विचार करणे अथवा दर्शन-मोहनीय कर्माच्या उदयामुळे जीव सम्यग्दर्शनापासून विमुख होत आहेत त्याचा उद्धार कसा होईल असा विचार करणे; अथवा पुण्यरूप योग प्रवृत्तींना आपल्या आधीन करणे उपाय म्हटला जातो. तो उपाय मला कोणत्या प्रकारे होईल या प्रकारच्या संकल्पांची जी संतति (परंपरा) आहे ते उपाय विचय धर्मध्यान आहे.

३. जीव विचय– जीवाचे लक्षण उपयोग आहे, द्रव्य दृष्टीने जीव अनादि आणि अनत आहे. पर्यायार्थिक नयाने असंख्यात प्रदेशाचा आहे, आपल्या कृत कर्माच्या शुभाशुभ कर्म फलांना भोगतो, आपल्या शरीर प्रमाण आहे, संकोच विस्तार (आत्मप्रदेशांचा) करणारा आहे, सूक्ष्म आहे, व्याघातरहित आहे, ऊर्ध्वगामी आहे, अनादि काळापासून कर्मबंधनाने बद्ध आहे, कर्मांचा क्षय झाल्यावर मुक्त होतो, अशा रितीने जीवाच्या मुक्त व संसारी स्वरूपाचा विचार करणे जीव विचय धर्मध्यान आहे

४. अजीव विचय– धर्म अधर्म आदि अजीव द्रव्यांच्या स्वभावाचे चितवन करणे अजीव विचय धर्मध्यान आहे.

५. विपाक विचय– आठ कर्मांच्या ज्या उत्तर प्रकृति आहेत त्यापैकी शुभ प्रकृतीचा विपाक गूळ, खडीसाखर, साखर व अमृत याप्रमाणे मधुर असतो आणि अशुभ प्रकृतीचा विपाक लता, दारु, अस्थि आणि शैल याप्रमाणे कठोर असतो असा विचार करणे तसेच कर्मबंधाच्या चार प्रकारापैकी कोणकोणत्या गतीत आणि कोणकोणत्या योनीमध्ये जीवाला कोणकोणत्या प्रकृतीचा बंध, उदय आदि होतो याचे चितवन करणे विपाक विचय धर्मध्यान आहे.

६. विराग विचय– आपले शरीर अपवित्र, अनित्य आहे, इंद्रियांचे भोगोपभोग किंपाक फलाप्रमाणे उत्तर कालात दु:खदायी आहेत, भोगतृष्णा वाढतच जातात, त्यामुळे यापासून विरक्त होणेच श्रेयस्कर आहे, अशा प्रकारचा वैराग्य उत्पन्न होईल अशा कारणांचा विचार करणे विराग विचय धर्मध्यान किंवा विराग चिंतन धर्मध्यान आहे.

७. भव विचय– चारी गतीमध्ये भ्रमण करणाऱ्या या जीवांना मरणानंतर जी पर्याय प्राप्त होते त्यास भव म्हणतात. अनेक भवामधून भटकताना जीवाच्या गुणामध्ये कांहीच विशेषता येत नाही म्हणून हे भटकणे व्यर्थ, दु:खरूप आहे असे चिंतवन करणे भवविचय धर्मध्यान आहे.

८. संस्थान विचय– अनित्य, अशरण आदि १२ भावनांचे चिंतन करणे अथवा त्रिलोकाचे प्रमाण, जीवाचे आयु आदिकांचा विचार करणे संस्थान विचय धर्मध्यान आहे.

९. आज्ञा विचय– ५ अस्तिकाय, काल, द्रव्य व अशा प्रकारचे आज्ञाग्राह्य जितक्या प्रकारचे पदार्थ आगमातील त्यांचे चिंतवन करणे अथवा सर्वज्ञानी उपदेशिलेल्या आगमाला प्रमाण मानून अत्यंत परोक्ष पदार्थामध्ये आस्था ठेवणे आज्ञाविचय धर्मध्यान आहे




१० हेतु विचय– आगमाच्या विषयामध्ये विवाद झाल्यावर नैगम आदि नयांची गौणता आणि प्रधानता यांच्या प्रयोगामध्ये कुशल आणि स्याद्वादाची शक्ति प्राप्त झाली आहे असा तर्कशील मनुष्य, आपल्या आगमाच्या गुणाना आणि अन्य आगमाच्या दोषाना जाणून 'जेथे गुणांचे आधिक्य असेल त्यातच प्रवृत्ती करणे इष्ट आहे.' हा अभिप्राय समोर ठेवून तीर्थंकराच्याद्वारे उपदिष्ट प्रवचनामध्ये युक्तिद्वारा पूर्वापर अविरोध पाहून त्याच्या पुष्टीसाठी अनेक युक्तींचा विचार करतो ते हेतुविचय धर्मध्यान आहे.[1]

### विस्तार : इष्ट प्रयत्न–

वरीलप्रमाणे विस्तार काही वाचकाना अधिक वाटेल पण केवळ लेख वाढवणे हा हेतु मुळीच नाही. ध्यान हा चिंतनाचा विषय असल्यामुळे ते चिंतन कसे असावे हे समजणे इष्ट आहे. म्हणून थोडा विस्तार करण्याचा प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न इष्ट असावा असे लेखकास वाटते.

धर्मध्यान जीवाने उपादेय समजावे. या दृष्टीने काही तपशीलांचा पुढे विचार करावयाचा आहे.

### निश्चय धर्मध्यान : सार्थकता–

या अगोदर व्यवहार धर्मध्यानाचे स्वरूप पाहिले आहे. व्यवहार धर्मध्यान पराश्रित आहे. म्हणजेच वर आलेले १० प्रकार व्यवहार धर्मध्यानात अंतर्भूत होतात.[2] जो वास्तविक व्यावहारिक धर्म ध्यानात परिणत रहातो, त्यामुळे चरणकरण प्रधान आहे, पण तो निरपेक्ष तपोधन साक्षात् मोक्षाच्या कारणभूत स्वात्माश्रित आवश्यक कर्माला, निश्चयाने परमात्म तत्त्वामध्ये विश्रान्तीरूप निश्चय धर्मध्यानाला तथा शुक्लध्यानाला जाणीत नाही; त्यामुळे परद्रव्यात परिणत होत असल्यामुळे अन्यवश म्हटला गेला आहे.[3] कारण निश्चय धर्मध्यानाचे स्वरूप सांगताना 'मन, वचन व काया या तिन्हीच्या प्रवृत्ति थांबवा, ज्यामुळे आपला आत्मा आपल्या आत्म्यात स्थिर होईल.'[4] असे सांगितले. ज्या जीवाच्या ध्यानामध्ये ज्ञानाने निजात्म्याचा प्रतिभास होणार नाही ते ध्यान नाही.[5] प्रवचन सारामध्ये तर स्पष्ट सांगितले आहे की, "जो वास्तविक ज्ञानात्मक आत्मस्वरूप एक अग्राची भावना करणार नाही, तो अवश्य ज्ञेयभूत अन्य द्रव्याचा आश्रय करतो...." या सर्व कारणामुळे निश्चय धर्मध्यान करण्यामध्ये सार्थकता आहे. निश्चय ध्यान साध्य आहे तर व्यवहार ध्यान साधन आहे. "....याप्रमाणे परस्पर सापेक्ष निश्चय व्यवहार नयद्वारा साध्यसाधक भाव जाणून ध्येयाच्या विषयामध्ये विवाद करू नये...."[6] असे आचार्य म्हणतात.

### पंचमकाळात धर्मध्यान शक्य आहे का ?–आशेचे किरण–

श्री ब्रह्मदेवकृत द्रव्यसंग्रह टीकेमध्ये या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा प्रश्न उपस्थित केला आहे. त्याचे यथार्थ उत्तरही दिले आहे ते प्रश्न आणि उत्तर पहा–

प्रश्न– मोक्षासाठी ध्यान करावे आणि मोक्ष या पंचमकाळात होत नाही, मग ध्यान करण्याचे काय प्रयोजन ?

उत्तर– या पंचमकाळातसुद्धा परंपरेने मोक्ष आहे

प्रश्न– ते कसे काय ?

उत्तर– ध्यानी पुरुष निज शुद्धात्म भावनेच्या बळाने संसार ( भ्रमण ) स्थितीला अल्प करून स्वर्गाला जातो. तेथून मनुष्य भवास येऊन रत्नत्रय भावना प्राप्त करून घेऊन शीघ्र मोक्षाला जातो...

---

१. सदरील व्याख्या किंवा सारांश हरिवंश पुराण, सर्वार्थसिद्धि, भगवती आराधना, ज्ञानार्णव, स्वामिकार्तिकेयानुप्रेक्षा व धवलग्रंथ यामधून निवडून घेतलेल्या आहेत. २. तत्त्वानुशासन–१४१ ३ नियमसार–ता. वृ. १४४ ४ द्रव्यसंग्रह–गाथा ५५-५६ ५. तिलोयपण्णत्ति ९–४० ६. पंचास्तिकाय– ता. वृ. १५२।२२०।९८.








वरील उत्तरामध्ये स्पष्टपणे परंपरेने मोक्ष मिळतो असे सांगितले आहे. मोक्षपाहुड (गा. ७६) मध्ये तर स्पष्ट सांगितले आहे की, या भरत क्षेत्रामध्ये पंचमकाळातसुद्धा आत्मस्वभावस्थित साधूला धर्मध्यान होते. तत्वानुशासन आणि ज्ञानार्णव या ग्रंथामधून देखील वरील विधानास पुष्टि मिळते. शुक्लध्यानाचा फक्त निषेध संहनन हीनतेमुळे केला आहे.

## धर्मध्यानाचे फल : स्वर्ग व परंपरेने मोक्ष–

तत्वार्थसूत्र[1]मध्ये धर्मध्यान व शुक्लध्यान मोक्षाचे हेतु आहेत असे स्पष्ट सांगितले आहे. जो भव्य पुरुष या (वर्तमान) पर्यायाच्या अंत समयामध्ये संपूर्ण परिग्रहाना सोडून धर्मध्यानपूर्वक आपल्या शरीराचा त्याग करतात, ते पुरुष पुण्यस्थानरूप (पुण्य बळाने मिळणारे) अशा ग्रैवेयक व अनुत्तर विमानामध्ये आणि सर्वार्थसिद्धीमध्ये जन्म घेतात.[2] उत्कृष्ट धर्मध्यानाचे शुभास्रव, संवर, निर्जरा आणि देवादिकाचे सुख हे शुभानुबन्धी विफल फल आहेत.[3] त्याच ग्रंथात पुढे म्हटले आहे की, ज्याप्रमाणे ढगांचा समुदाय वाऱ्याने ताडित होऊन क्षणमात्रात विलीन होते त्याचप्रमाणे धर्मध्यानरूपी वाऱ्याने उपहृत होऊन कर्ममेघ सुद्धा विलीन होऊन जातात. पंचास्तिकाय ग्रंथामध्ये म्हटले आहे की, एकाग्र चिंतवन करणे तर (धर्म) ध्यान आहे आणि संवर निर्जरा त्याचे फळ आहे.

## धर्म ध्यानाचे स्वामित्व–

धर्मध्यान परोक्षज्ञानगोचर असल्यामुळे क्षयोपशमिक आहे.[4] लेश्येच्या अपेक्षेने पीत पद्म व शुक्ल लेश्या असाव्या लागतात. गुणस्थानाच्या दृष्टीने अविरत, देशविरत, प्रमत्तसंयत आणि अप्रमत्तसंयत गुणस्थानात धर्मध्यान शक्य आहे. असंयत सम्यग्दृष्टि, संयतासंयत, प्रमत्तसंयत, अप्रमत्तसंयत, क्षपक आणि उपशामक अनिवृत्तिकरण संयत, क्षपक व उपशामक सूक्ष्म सापराय संयत जीवांना धर्मध्यानाची प्रवृत्ति होते,[5] यावरून असे जाणावे की धर्मध्यान कषाय सहित जीवांना होऊ शकते.

मात्र जो पुरुष रत्नत्रय (साक्षात्) धारण न करता ध्यान करू इच्छितो तो मूर्ख आकाशपुष्पानी वंध्या पुत्रशेखर बनू इच्छितो.[6] ज्ञानार्णव ग्रंथात असे सांगितले आहे की, ज्याचे चित्त चलित आहे आणि जैन साधु म्हणवून घेतात त्यांना सुद्धा ध्यानाचा निषेध आहे. दृष्टीची विकलता असल्यामुळे वस्तुसमूहास आपल्या इच्छेनुसार ग्रहण करणाऱ्या मिथ्यादृष्टि जीवाना ध्यानाची सिद्धि स्वप्नात सुद्धा होत नाही. बृहद् नयचक्र ग्रंथात स्पष्टपणे सांगितले आहे की जो प्रमाण आणि नयाद्वारे वस्तु निश्चय करून त्यास जाणीत नाही तो ध्यानाच्या भावनेने सुद्धा आराधक होऊ शकत नाही.[7]

## धर्मध्यानाचे आणखी कांही प्रकार–

धर्मध्यानाचे पदस्थ, पिंडस्थ, रूपस्थ व रूपातीत असे चार प्रकार आहेत. ज्ञानार्णव ग्रंथामध्ये हे प्रकार संस्थानविचय धर्मध्यानांतर्गत किंवा संस्थानविचय धर्मध्यानाचे प्रकार म्हणून दर्शविले आहेत. पण इतर ग्रंथातून हे चार प्रकार वेगळेच दर्शविले आहेत. त्यांचे लक्षण असे–

### १. पदस्थ ध्यान–

ज्याच्याद्वारे जाणले जाते ते पद होय. (न्याय विनिश्चय). ज्याचे ज्यामध्ये अवस्थान असते ते त्याचे पद आहे (धवल) व जे जाणले जाते ते पद होय. असे पद या शब्दाचे अर्थ आहेत.

---

१ तत्वार्थसूत्र– ९।२९ २ ज्ञानार्णव– ४१।१६ ३. धवल– १३।५ ४. चारित्रसार– २०३
५. धवल– १३।९, ४,२६।७४।१० ६ ज्ञानार्णव– ४।१८,३० ७. बृ नयचक्र (श्री देवसेनाचार्यकृत)– १७९.








ज्याला योगीश्वर पवित्र मंत्राच्या अक्षरस्वरूप पदांचे अवलंबन करून चिंतवन करतात........त्याला पदस्थध्यान म्हटले आहे [1]

एक अक्षर इ. अनेक प्रकारच्या पचपरमेष्ठीवाचक पवित्र मंत्रपदांचे उच्चारण करून जे ध्यान केले जाते ते पदस्थ ध्यान जाणावे.[2] पवित्र पदाचे अवलंबन घेऊन जे ध्यान केले जाते त्यास पदस्थ ध्यान म्हणतात.[3]

### २. पिंडस्थ ध्यान–

निजात्म्याचे चिंतवन पिंडस्थ ध्यान आहे. (द्रव्यसंग्रह). श्वेत किरणांनी स्फुरायमान आणि अष्टमहाप्रातिहार्यांनी संयुक्त जे निजरूप (केवली तुल्य) आत्मस्वरूपाचे ध्यान केले जाते त्यास पिंडस्थ ध्यान जाणावे. (वसु. श्रावकाचार, ज्ञानार्णव)

### ३. रूपस्थ ध्यान–

सर्व चिद्रूपाचे चिंतवन रूपस्थ ध्यान आहे[4] ...... अर्थात् आकाशामध्ये स्थित अरहंत भगवंताचे जे ध्यान केले जाते ते रूपस्थ ध्यान आहे.[5] अरहंत भगवंताचे अभ्यंतर व बाह्य विभूतीसह स्वरूपाचे चिंतवन करणे रूपस्थ ध्यान आहे.

### ४. रूपातीत ध्यान–

वर्ण रस गंध आणि स्पर्शाने रहित, केवलज्ञान दर्शनस्वरूप जे सिद्ध परमेष्ठीचे अथवा शुद्ध आत्म्याचे ध्यान केले जाते ते रूपातीत ध्यान आहे.[6] ज्या ध्यानामध्ये ध्यानी मुनि चिदानंदमय, शुद्ध, अमूर्त परमाक्षररूप आत्म्याला आत्मा असेच स्मरण करतो ते रूपातीत ध्यान आहे.[7]

याप्रमाणे चारही ध्यानाचे स्वरूप सामान्यपणे आहे. यांचे स्वरूप खालील श्लोकावरून संक्षिप्तपणे एकदम लक्षात येईल. तो श्लोक असा–

पदस्थं मंत्र वाक्यस्थं पिंडस्थम् स्वात्म चिंतनम् ।
रूपस्थं सर्व चिद्रूपं रूपातीतं निरंजनम् ॥

आता वरील चारही ध्यानाचा थोड्या विस्ताराने विचार करू.

### १. पदस्थ ध्यान–

स्वर व्यंजनादि अक्षर किंवा 'ॐ ऱ्हीं' आदि बीजमंत्र किंवा पंच परमेष्ठी वाचक मंत्र किंवा अन्य मत्राना यथाविधी कमलावर स्थापित करून चिंतवन करावे लागते. अनेक मंत्र शास्त्रातून दिलेले आहेत. त्यापैकी कांही येथे दिले आहेत– ज्ञानार्णव, द्रव्यसंग्रह, वसुनन्दि श्रावकाचार, आत्मप्रबोध, तत्त्वानुशासन, गुणभद्र श्रावकाचार, महापुराण आदि ग्रंथातून हे मंत्र दिले आहेत. एकाक्षरी आदिक मत्र–

१. अ
२. ॐ (प्रणव मंत्र)
३. अनाहत मत्र 'र्हं'[8]
४. माया वर्ण 'र्ह्रीं'

---

१. ज्ञानार्णव ३८।१ २. वसुनदी श्रावकाचार– ४६४ ३. स्वामिकार्तिकेयानुप्रेक्षा– पान ४८२ ४. द्रव्यसग्रह टीका– ४८।२५ ५. गुणभद्र श्रावकाचार– २४२. ६ वसुनन्दि श्रावकाचार– ४७६ ७. ज्ञानार्णव– ४०।१६
८. अनाहत मत्राचा अकार विस्तार रुचि श्रावकानी ज्ञानार्णव ग्रथातून पहावा. (प.पन्नालाल बाकलीवाल याची प्रस्तावना पान २)

५. झ्वीं ( महाविद्या )
६. क्ष्वीं ( छिन्न मस्तक महाबीज )[1]
७. अर्हं
८. सिद्धं
९. अरहंत
१०. अ सि आ उ सा
११. ॐ न्हां न्हीं न्हूं न्हौं न्हः अ सि आ उ सा नमः
१२. 'णमो सिद्धाणं' किंवा 'नमः सिद्धेभ्यः'
१३. अरहंत सिद्ध
१४. अर्हद्भ्यो नमः
१५. ॐ नमो अर्हते
१६. अर्हद्भ्यः नमोऽस्तु
१७. ॐ नमः सिद्धेभ्यः
१८. नमो अर्हत्सिद्धेभ्यः
१९. णमो अरहंताणं
२०. नमः सर्व सिद्धेभ्यः
२१. नमोऽर्हत्परमेष्ठिने
२२. अर्हत् सिद्धसयोगकेवली स्वाहा
२३. अर्हत्सिद्धाचार्योपाध्याय सर्व साधुभ्यो नमः
२४. णमो अरिहंताणं, णमो सिद्धाणं, णमो आयरियाणं,
णमो उवज्झायाणं, णमो लोए सव्वसाहूणं

अजून किती तरी मंत्र देता येतील. ऋषिमंडळ यंत्र, सिद्ध चक्र यंत्र आदिवरून ते मंत्र जाणून घेता येतील. ज्ञानार्णव ग्रंथामध्ये म्हटले आहे की, याप्रकारे दुसरे अनेक मंत्र आहेत, ज्यांना द्वादशांगाने जाणून घ्यावे. मंगल मंत्र णमोकार ( डॉ. नेमिचंद्रशास्त्री ) या ग्रंथात देखील शास्त्रींनी विस्ताराने चर्चा केली आहे. ज्ञानार्णव ग्रंथामध्ये देखील विस्तारपूर्ण वर्णन आले आहे. विस्तार भयास्तव प्रस्तुत लेखामध्ये त्या सर्वांचा परामर्श घेता येत नाही. स्वामि कार्तिकेयानुप्रेक्षा या ग्रंथात म्हटले आहे की, '...या ( वर दिलेल्या ) मंत्राशिवाय १२००० ( बारा हजार ) श्लोक प्रमाण पंच नमस्कार ग्रंथामध्ये सांगितलेल्या विधीने लघुसिद्धचक्र, बृहत्सिद्धचक्र आदि विधान सुद्धा करावे.'[2]

## सिद्धचक्र ध्यान विधि–

नाभि मंडळामध्ये षोडशदल कमलाच्या प्रत्येक पत्रा ( पान ) वर अनुक्रमे अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः या १६ स्वरांना क्रमाने चिंतवन करावे. नंतर हृदयस्थ २४ दल कमल पत्रावर कर्णिका व २४ दल यावर अनुक्रमे क ख ग घ ङ च छ ज झ ञ ट ठ ड ढ ण त थ द ध न प फ ब भ म या २५ व्यंजनांचे चिंतन करावे. त्यानंतर मुखावरील अष्टदल-कमलदलावर अनुक्रमे य र ल व श स ह चिंतन करावे.

**वर्ण मातृका ध्यान–** वरील सिद्ध चक्र ध्यान विधीस ज्ञानार्णव ग्रंथात वर्णमातृका ध्यानविधी म्हटले आहे. तत्त्वानुशासन ग्रंथामध्ये चतुर्दल कमल विधीचे वर्णन आहे. त्याच ग्रंथामध्ये अष्टदल कमल ध्यानविधी ( क च ट त प य श अर्हं ) हेही वर्णन आहे.

१. क्ष्वीं, क्ष्वीं, अर्हं, (ज्ञानार्णव अध्याय ३५ श्लोक ९०)   २. स्वामिकार्तिकेयानुप्रेक्षा– गाथा ४८२ वरील संस्कृत टीका–




**अंग निर्देश–** नेत्र, कान, नाकाचा अग्रभाग, ललाट, मुख, नाभि, मस्तक, हृदय, तालु आणि भुवया असे शरीरातील ध्यानाचे आश्रयभूत स्थान आहेत. अ सि आ उ सा हा पच परमेष्ठीरूप पंचाक्षरी मंत्र आहे. त्यातून 'अ' नाभिकमलावर 'सि' मस्तक कमलावर 'आ' कंठस्थ कमलावर 'उ' हृदयकमलामध्ये आणि 'सा' मुखस्थ कमलावर स्थापन करून चितवन करावे.[१]

धैर्यवान योगीजनांनी हा मंत्रराज ('र्हं') भुवयामध्ये स्फुरायमान झालेला, मुखकमलात प्रवेश करीत असलेला, तालुछिद्रातून गमन करीत असलेला........डोळयांच्या पापणीवर स्फुरायमान होत असलेला, केसामध्ये स्थिर झालेला........ध्यावा.[२]

अशा प्रकारे ध्यान करण्यासाठी कमलांची स्थापना शरीराच्या कोणत्या भागात करावी याचा सविस्तर खुलासा ग्रंथातून आहे.

**कांही ध्यान विधी–** वर आपण 'र्हं' मंत्रराज कसा ध्यावा हे पाहिले. आता ज्ञानार्णव ग्रंथामधील अजून कांही ध्यानविधी पाहू–

'ॐ' यास प्रणवमंत्र म्हणतात. ध्यान करणारा संयमी[३] हृदयस्थ कमलाच्या कर्णिकेमध्ये स्थिर आणि स्वर व्यंजन अक्षरांनी वेष्टित, उज्ज्वल, अत्यंत दुर्धर्ष, देव आणि दैत्येंद्रांनी पूजित आणि महाप्रभाव संपन्न, कर्मरूपी वनाला दग्ध करण्यासाठी अग्निसमान अशा या महातत्त्व, महाबीज, महामंत्र, महापदस्वरूप आणि शरच्चंद्रासमान गौर वर्णधारक 'ॐ' यास कुंभक प्राणायामाने चितन करावे.

मायाबीज 'ह्रीं' अक्षराला स्फुरायमान होत असलेले... कधी मुखस्थ कमलामध्ये संचार करीत असलेले तर कधी कधी कर्णिकेमध्ये स्थिर झालेले तर कधी आठही दलावर भ्रमण करीत असलेले....अचित्य आहे. महिमा प्रभाव ज्याचा असे चितवन करावे.

**आत्म्याचे ध्यान–** अष्टदल कमल पत्रावर स्थापित आणि अत्यंत स्फुरायमान ग्रीष्मऋतूतील सूर्यासमान देदीप्यमान आत्म्याचे स्मरण करावे.[४] आत्मध्यानाविषयी पुढे विस्ताराने वर्णन येणारच आहे. येथे एवढेच लक्षात असू द्यावे की, "मंत्रपदाच्या अभ्यासानंतर विलय झाले आहेत. समस्त कर्म ज्यामध्ये अशा अति निर्मल स्फुरायमान आपल्या आत्म्याला आपल्या शरीरामध्ये चितवन करावे."[५] अशा प्रकारे आत्मध्यानाची महती पदस्थ ध्यानासंबंधी सुद्धा वर्णन केली आहे.

### पदस्थ ध्यानाची महिमा व त्याचे फल–[६]

'र्हं' बीजाक्षर भयंकर अज्ञानरूपी अंधकराला दूर सारण्यासाठी सूर्यासारखे आहे. जो भव्य 'अर्हं' या मंत्राचे चितवन करतो तो स्वर्गामध्ये महर्द्धिक देव होतो. जो भव्य 'ॐ' चे चितन आपल्या हृदयकमलामध्ये करतो तो सर्व सुख प्राप्त करून घेतो. हा नमस्कार मंत्र जगातील जीवांना पवित्र करण्यास समर्थ आहे. ज्या योगिजनांनी मोक्षलक्ष्मी प्राप्त करून घेतली आहे त्या सर्वांनी एक मात्र याच मंत्राची आराधना केली आहे. पापी जीव या महामंत्राने विशुद्ध होतात. जो मुनि मन, वचन आणि काय शुद्ध करून या मंत्राचे १०८ वेळा ध्यान करतो तो मुनि आहार करीत असताना सुद्धा पूर्ण एक उपवासाचे फल प्राप्त करून घेतो. 'ओं ह्रां ह्रिं ह्रीं ह्रुं ह्रूं ह्रें ह्रैं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा सम्यग्दर्शनज्ञानचारित्र्येभ्यो ह्री नमः" या २७ अक्षरांच्या ऋषिमंडल मंत्राला जो भव्य ८००० वेळा जपतो तो इह-परलोकी वांछित सुखाला प्राप्त करून घेतो.

१. ज्ञानार्णव– ३८।१०८।१०९ २ ज्ञानार्णव– ३८।१६,१७ ३. ज्ञानार्णव– ३८।३३,३५
४ ज्ञानार्णव– ३८।९५ ५. ज्ञानार्णव– ३८।११६ ६. स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षा ग्रंथाचे आधारे.





ज्ञानार्णव ग्रंथामध्ये असे वर्णन आहे की, अनाहत 'हँ' चे ध्यान केल्याने इष्ट सिद्धि, ऋद्धि, ऐश्वर्य प्राप्ति होते, संसाराचा नाश होतो. मायाक्षर 'ह्रीं' च्या ध्यानाने लोकाग्रस्थान प्राप्त होते. 'ॐ णमो अरहंताणं' या मंत्राचे आठ रात्री ध्यान केल्यास क्रूर जीव जन्तू भयभीत होऊन आपला गर्व सोडून देतात.

अजूनही ग्रंथामध्ये पुष्कळ वर्णन आहे पण ते सर्वच येथे देणे शक्य नाही.

## २ पिंडस्थध्यान–

पिंडस्थ ध्यानाचे सामान्य लक्षण पूर्वी सांगितलेच आहे. या ध्यानात ५ धारणा असतात. १) पार्थिवी, २) आग्नेयी, ३) मारुती, ४) वारुणी व ५) तात्त्विकी.

### १. पार्थिवी धारणा–

सर्व प्रथम ध्यान करणाऱ्या जीवाने पुढीलप्रमाणे चिंतन करावे. एक राजू प्रमाण मध्य लोकासमान निःशब्द निस्तरंग कल्लोल रहित आणि कापूर अथवा बर्फ किंवा दूध यासारखा क्षीरसमुद्र आहे असे ध्यान करावे. नंतर त्याच्या मध्यभागी सुंदर आणि अमित दीप्तीने शोभायमान, तापवलेल्या सुवर्णाप्रमाणे शोभा असलेल्या एक हजार पाकळ्यांच्या कमळाचे चिंतवन करावे. त्या कमलाला केशराच्या पंक्तींनी शोभायमान चित्तरूपी भ्रमराला रंजायमान करणारे एक लाख योजन आकाराचे ते कमळ चिंतावे. त्यानंतर त्या कमलाच्या मध्यभागी स्फुरायमान पिवळ्या रंगाच्या प्रभेने युक्त सुवर्णाचलासारखी एक कर्णिका आहे असे ध्यान करावे. त्या कर्णिकेमध्ये शरद्ऋतूतील चन्द्रमासमान श्वेत वर्णाचे उंच सिंहासन आहे असे चिंतवन करावे त्या सिंहासनावर स्वतःस सुखपूर्वक आसीन, शांत जितेन्द्रिय आणि रागद्वेषविरहित चिंतवन करावे. हे पार्थिवीधारणेचे स्वरूप आहे.

### २. आग्नेयी धारणा–

पार्थिवी धारणेनंतर निश्चल अभ्यासाने आपल्या नाभिमण्डलामध्ये १६ पाकळ्यांचे कमल चिंतावे. त्या कमळाचा महामंत्र (मंत्र पुढे दिला आहे.) चिंतवन करावा. कमलाच्या १६ पाकळ्यावर अनुक्रमे 'अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः या १६ अक्षरांचे ध्यान करावे. त्या कमळाच्या कर्णिकेवर अर्हं (हँ) या महामंत्रास अत्यंत देदिप्यमान चिंतन करावे. नंतर महामंत्राच्या (रेफ) रकारामधून मंदमंद धूम शिखा निघत आहेत असे चिंतन करावे. नंतर क्रमाने स्फुल्लिंगयुक्त पंक्ति व ज्वालांचे ध्यान करावे. या ज्वाला वर वाढत आहेत. त्यांनी आपल्या हृदयस्थ आठ पाकळ्यांचे कमल जे अधोमुखी, कृष्ण वर्ण व ज्यावर ज्ञानावरणादि आठ कर्म आहेत, 'हँ' मधून निघणाऱ्या अग्निज्वालांनी जळत आहे असे चिंतवन करावे. ते कमळ जळून गेल्यानंतर शरीराच्या बाहेर त्रिकोण अग्नी आहे, तो 'र' बीजाक्षराने व्याप्त आहे, स्वस्तिक चिन्हाने युक्त आहे, सुवर्ण वर्ण आहे असे चिंतवन करावे. या भयंकर अग्नीने संपूर्ण शरीर भस्म झाल्यामुळे अग्नि आपोआप शांत झाला असे चिंतन करावे. असे आग्नेयी धारणेचे स्वरूप आहे.

### ३. मारुती धारणा–

नंतर महाबलवान व महावेगवान वायुमंडल, जे वायुमंडल देवांच्या सेनेला चलायमान करणारे आहे, मेरुपर्वताला कंपायमान करणारे आहे, मेघाच्या समूहाला अस्ताव्यस्त करणारे आहे, समुद्रामध्ये क्षोभ निर्माण करणारे आहे, चिंतावे. त्या वायुमंडलाने पूर्वी (आग्नेयी धारणेत) शरीरादिकाचे झालेले भस्म तावडतोब नष्ट केले असे चिंतन करावे व वायु स्थिर झाला असे ध्यान करावे.

तत्वानुशासन ग्रंथामध्ये पुढीलप्रमाणे स्वरूप आहे, "अर्हं मंत्राच्या 'अ' अक्षराला पूरक पवनाद्वारे पूरित आणि कुम्भित करून रेफ (रकार) अग्नीने कर्मचक्रास आपल्या शरीरासह भस्म करून नंतर भस्मास आपोआप विरेचित करावे.[1]

## ४. वारुणी धारणा–

त्यानंतर इंद्रधनुष्य, वीज, गर्जनादि चमत्कारसहित मेघांच्या समूहाने भरलेल्या आकाशाचे ध्यान करावे. मोत्याप्रमाणे मोठमोठ्या बिंदूंचा निरंतर वर्षाव होत आहे असे चिंतन करावे. नंतर अर्द्धचन्द्राकार, मनोहर, अमृतमय, जल प्रवाहाने पूर्ण भरलेल्या आकाशरूप वरुण मंडल चिंतवन करावे. पूर्वीचे शरीरादिकांचे भस्म प्रक्षालित झाले आहे असे चिंतन करावे.

तत्वानुशासन (श्लोक १८५) ग्रंथामध्ये स्वरूप असे वर्णन केले आहे की, "हं मंत्राचे आकाशात असे ध्यान करावे की त्यामुळे आत्म्यामध्ये अमृत वाहू लागले आहे आणि त्या अमृताने अन्य शरीराचे निर्माण होऊन ते अमृतमय आणि उज्ज्वल बनत आहे.

## ५. तात्विकी किंवा तत्ववती धारणा–

वारुणी धारणेनंतर ध्यानी पुरुषाने स्वतःला सर्वज्ञासमान, सप्त धातुरहित, पूर्ण चंद्रासारखी प्रभा असणारा, सिंहासनावर विराजमान, दिव्य अतिशयांनी युक्त, कल्याणिकांनी सहित, देवांनी पूजित आणि कर्मरूपी कलंकाने रहित समजावे. नंतर आपल्या शरीरामध्ये स्थित आत्म्याला आठ कर्मांनी रहित, अत्यंत निर्मल पुरुषाकार चिंतवन करावे.

## धारणांचे फल–

याप्रमाणे पिंडस्थ ध्यानामध्ये ज्याचा निश्चल अभ्यास झाला आहे तो मुनि अन्य प्रकारे साध्य होऊ शकत नाही अशा मोक्ष सुखाला शीघ्र प्राप्त होतो.[2] तेव्हां अष्टकर्म जळून जातात, हे चैतन्य परिणामांचे सामर्थ्य आहे.[3]

## ३. रूपस्थ ध्यान–

ध्यानी पुरुषाने समवसरण स्थित जिनेन्द्रांचे चिंतन करावे. समवसरण कसे असते याचे थोडक्यात स्वरूप पहा– प्रथम चारी दिशांना चार मानस्तंभ त्यांच्याभोवती सरोवरे असतात, नंतर निर्मल जलाच्या खाई, नंतर पुष्प वाटिका, त्याच्या पुढे १ ले कोट, नंतर नाट्यशाला, दुसरे उपवन, वेदिका, नंतर ध्वजपंक्ती, नंतर २ रे कोट, नंतर वेदिकासहित कल्पवृक्षांचे उपवन नंतर स्तूप आणि गृहपंक्ती, नंतर स्फटिक मण्याचे ३ रे कोट, त्यात मनुष्य, देव इ. १२ सभा. नंतर पीठिका आणि पीठिकेच्या अग्रभागावर स्वयभू भगवान विराजमान असतात. अशा अरहंत भगवंताचे चिंतन करावे.

या व अशा प्रकारच्या अष्ट प्रातिहार्यादिकांचे चिंतवन करणे रूपस्थ ध्यान आहे.

## ४. रूपातीत धर्मध्यान–

हे धर्मध्यान अत्यंत महत्त्वाचे आहे. त्यामुळे विस्तारपूर्वक वर्णन करावयाचे आहे. सामान्य रूपाने कथन स्वामिकार्तिकेयानुप्रेक्षेमध्ये उत्तम आहे.

---

१. तत्वानुशासन– १८४ २. ज्ञानार्णव– ३७।३१ ३. तेच– ३७।१५

रूपस्थ ध्यानामध्ये ज्याचे चित्त स्थिर झालेले आहे आणि ज्याचा विभ्रम नष्ट झाला आहे असा ध्यानी अमूर्त, अजन्मा आणि इंद्रियांना अगोचर परमात्म्याचे ध्यान आरंभ करतो, ज्या ध्यानामध्ये ध्यानी पुरुष चिदानंदमय, शुद्ध अमूर्त, परमाक्षररूप आत्म्याचे आत्म्याद्वारे ध्यान करतो ते रूपातीत ध्यान आहे. या ध्यानामध्ये प्रथम आपल्या गुणांचा विचार करावा. नंतर सिद्धांच्या सुद्धा गुणांचा विचार करावा.

नंतर आपला आत्मा, आपल्याशिवाय इतर व मुक्तात्मा यांच्यामधील गुणकृत भेद दूर करावेत. नंतर परमात्म्याच्या स्वभावाबरोबर एकरूपाने भावित आपल्या आत्म्याला परमात्म्याच्या गुणांनी पूर्ण करून परमात्म्यामध्ये मिळवावे.

जो ध्यानी प्रमाण आणि नयाद्वारे आपल्या आत्मतत्त्वाला जाणतो तो योगी निश्चितपणे परमात्म्याला जाणतो....समस्त अवयवांनी पूर्ण आणि समस्त लक्षणांनी लक्षित तथा निर्मल दर्पणामधील प्रतिबिंबासमान परमात्म्याचे चिंतवन करावे.

निरंतर अभ्यासाने परमात्मा जाणल्यावर असे चिंतन करावे की– 'तो परमात्मा मीच, मीच सर्वज्ञ आहे, सर्व व्यापक आहे, सिद्ध आहे, साध्य आहे आणि संसाराने रहित आहे.' असे चिन्तन केल्यामुळे ध्याता आणि ध्यान भेद रहित चिन्मात्र स्फुरायमान होतो. त्यावेळी ध्यानी मुनि पृथक्पणा दूर सारून परमात्म्याशी असे ऐक्य साधतो की ज्यामुळे भेद आहे याचे भान देखील रहात नाही.

सारांश ज्यामध्ये ध्यान धारणा ध्याता ध्येय कशाचाच विकल्प रहात नाही तेच ध्यान श्रेष्ठ आहे.

अशा प्रकारे सामान्यपणे वर्णन आहे. हे ध्यान होण्याअगोदर रूपस्थ ध्यानापर्यंत सर्व ध्यानांचा अभ्यास साधकाचा झालेला असतो. त्यामुळे चिंतनामध्ये परिपक्वता येते.

**शुक्लध्यान–**

आतापर्यंत आपण धर्मध्यानाचे स्वरूप पाहिले. आता क्रमाने शुक्ल ध्यानाचे स्वरूप पहावयाचे आहे. कांही जण अशी शंका व्यक्त करतात की, जर आता शुक्ल ध्यान होऊ शकत नाही तर मग त्याचे स्वरूप पाहून करावयाचे काय ? पण ही शंका व्यर्थ आहे. कारण शुक्लध्यानाचा सर्वथैव निषेध केलेला नाही. विदेह क्षेत्रामध्ये वर्तमान काळी देखील शुक्लध्यान आहे. पुन्हा असे की, जैनाचार्यांची ग्रंथ संपदा एवढी प्रचंड आहे की, एकही विषय अस्पृष्ट राहिला नाही. त्याला शुक्लध्यानही अपवाद नाही. काल दोषाने ग्रंथ नष्ट झाले हे दुर्दैव !

स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षेमध्ये शुक्ल ध्यानाचे स्वरूप खालीलप्रमाणे आहे. ( पहा गाथा ४८३ ) जेथे गुण अति विशुद्ध होतात, जेथे कर्मांचा उपशम आणि क्षय होतो. तसेच जेथे लेश्यासुद्धा शुक्ल असते, त्या ध्यानाला शुक्ल ध्यान म्हणतात. ज्यामध्ये शुचि गुणाचा संबंध आहे ते शुक्ल ध्यान आहे.[१] शुचि गुण समजावून सांगण्यासाठी स्वच्छ कपड्याचे उदाहरण देता येईल. ज्याप्रमाणे मल निघून गेल्यानंतर वस्त्र शुचि होऊन शुक्ल म्हटले जाते त्याप्रमाणे निर्मल गुणयुक्त आत्मपरिणतिसुद्धा शुक्ल आहे.[२] मल म्हणजे कषाय कारण धवल ग्रंथांमध्ये स्पष्ट म्हटले आहे की, कषाय मलाचा अभाव झाल्यामुळे यास ( शुक्लध्यानास ) शुक्लपणा प्राप्त आहे. हे ध्यान असताना जीवाला 'मी ध्यान करावे' असा सुद्धा विकल्प रहात नाही. कारण ज्ञानार्णव (४२।४) ग्रंथामध्ये सांगितले आहे की, जे निष्क्रिय आणि इंद्रियातीत आहे. 'मी ध्यान करावे' या प्रकारच्या धारणेने रहित आहे, ज्यामध्ये चित्त अंतर्मुख असते ते शुक्ल ध्यान आहे. शुक्ल ध्यानाच्या निर्मलतेविषयी व निश्चलतेविषयी तत्त्वानुशासन ग्रंथामध्ये वर्णन आहे की,[३] आत्म्याच्या शुचि गुणांच्या संबंधाने याचे नांव शुक्ल असे आहे. कषायरूपी धूळ नष्ट झाल्यामुळे आत्म्याचे सुनिर्मल परिणाम होतात, तोच शुचि गुणाचा योग आहे आणि ते

१ सर्वार्थसिद्धि – ९।२८ २ राजवार्तिक – ९।२८ ३. तत्त्वानुशासन– २२१।२२२.




शुक्लध्यान वैडूर्यमण्याच्या ज्योति समान सुनिर्मल आणि निष्कंप आहे. शुक्लध्यानामध्ये स्वसंवेदन प्रामुख्याने असते. रागादि विकल्पांनी रहित स्वसंवेदन ज्ञानाला आगमामध्ये शुक्लध्यान म्हटले आहे.[१] निजतत्व परमतत्व आहे. त्यामध्ये अविचल स्थिति असणे ते निश्चय शुक्लध्यान आहे.

## बाह्य आध्यात्मिक शुक्लध्यान–

शरीर आणि नेत्रांना स्पन्दरहित ठेवणे, जांभई न देणे, प्राणापान (श्वासोच्छ्वास) व्यक्त न होणे अथवा नष्ट होणे बाह्य शुक्लध्यान आहे. हे बाह्य शुक्लध्यान अन्य जनांना अनुमानाने जाणले जाऊ शकते. जे केवळ आत्म्यालाच स्वसंवेदन होते ते आध्यात्मिक शुक्लध्यान आहे.[२]

वर निश्चय शुक्ल ध्यानाचा उल्लेख आलेला आहे. कारण नियमसार ग्रंथामध्ये असे वर्णन आहे की, "ध्यान, ध्येय, ध्याता, ध्यानाचे फळ इ. च्या विविध विकल्पांनी विमुक्त, अन्तर्मुखाकार, संपूर्ण इंद्रियसमूहाला अगोचर निरंजन निज परमतत्त्वामध्ये अविचल स्थितीरूप ते निश्चय शुक्लध्यान आहे."

## शुक्ल ध्यानाचे भेद–

शुक्ल ध्यानाचे दोन व चार प्रकार मानले जातात. थोडासा नामभेद सोडला तर भावार्थरूपाने प्रकार सारखेच आहेत. भगवती आराधना ग्रंथात खालील चार प्रकार सांगितले आहेत. १) सवितर्क सवीचार शुक्लध्यान, २) सवितर्क एकत्व वीचार, ३) सूक्ष्मक्रिया शुक्लध्यान आणि ४) समुच्छिन्न क्रिया शुक्लध्यान.

चारित्रसार ग्रंथामध्ये असा उल्लेख आहे की,[३] "शुक्ल ध्यानाचे दोन भेद आहेत. एक शुक्ल आणि दुसरा परमशुक्ल. पुन्हा ते शुक्लध्यान दोन प्रकारचे आहे– पृथक्त्व वितर्क वीचार आणि दुसरे एकत्व वितर्क वीचार. परमशुक्लध्यान सुद्धा दोन प्रकारचे आहे. एक सूक्ष्मक्रियाप्रतिपाती आणि दुसरे समुच्छिन्नक्रिया निवृत्ति.

स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षा या ग्रथात खालील चार प्रकार दाखविलेले आहेत. १) पृथक्त्व वितर्क वीचार, २) एकत्व वितर्क वीचार, ३) सूक्ष्मक्रियाप्रतिपाती व ४) व्युपरतक्रिया निवृत्ति.

पुढे प्रत्येकाचे थोडक्यात स्वरूप सांगितले आहे, त्यावरून लक्षात येईल की, शुक्ल ध्यानाचे चार प्रकार सारखेच आहेत. केवळ शब्द भेद आहे.

## १. पृथक्त्व वितर्क वीचार शुक्लध्यान–

उपशांत मोही जीव अनेक द्रव्यांचे तिन्ही योगांच्या आलंबनाने ध्यान करतात. त्यामुळे त्याला पृथक्त्व म्हणतात. वितर्काचा अर्थ श्रुत आहे. पूर्वगत अर्था (श्रुत) मध्ये कुशल साधूच हे ध्यान करू शकतात म्हणून या ध्यानाला सवितर्क म्हणतात. अर्थ, व्यंजन आणि योगांचे संक्रमण वीचार आहे. जे अशा संक्रमणाने सहित असेल त्यास सवीचार म्हणतात (धवल). तत्त्वार्थ सूत्रामध्ये (सूत्र ९।४१ ते ४४) देखील वितर्क म्हणजे श्रुत हा अर्थ दिला आहे. शिवाय अर्थ, व्यंजन आणि योगाची सक्रांति (सक्रमण) वीचार आहे असे म्हटले आहे. म्हणजेच सारांशपणे असे सांगता येईल की भेदरूपाने वितर्क (श्रुत) वीचार (संक्राति) ज्या ध्यानामध्ये होतो ते पृथक्त्व वितर्क वीचार ध्यान. द्रव्य संग्रह टीका (श्रीब्रह्मदेवकृत) मध्ये हाच भाव योग विस्ताराने सांगितला आहे. (पहा गाथा ४८ ची संस्कृत टीका), "द्रव्यगुण आणि पर्याय यांच्या भिन्नत्वाला पृथक्त्व म्हणतात. निज शुद्धात्म्याच्या अनुभव रूप भावश्रुताला आणि निज शुद्धात्म्याला म्हणणाऱ्या अंतर्जल्परूप वचनाला वितर्क म्हणतात. इच्छेविनासुद्धा एका अर्थातून दुसऱ्या अर्थात, एका वचनातून दुसऱ्यात; मन, वचन आणि काय या तीनही योगामधून कोणत्याही योगापासून दुसऱ्या योगामध्ये जे परिणमन आहे त्यास वीचार म्हणतात." भावार्थ असा की,

१. प्रवचनसार– ८।१२ (तात्पर्य वृत्ति) २ चारित्रसार– २०३।५ ३. चारित्रसार– २०३।४.




जरी ध्याता निज शुद्धात्म संवेदन सोडून बाह्य पदार्थांच्या चिंतेमध्ये पडत नाही तरी जितक्या अंशी स्वरूपामध्ये स्थिरता होणार नाही तितक्या अंशांनी अनिश्चित वृत्तीमुळे विकल्प उत्पन्न होतात. यामुळे या ध्यानास पृथक्त्व वितर्क वीचार म्हणतात.

या ध्यानामध्ये अनेक द्रव्य विषय असतात आणि विषयांचा वीचार करताना ध्याता मन, वचन, काय योगांचे परिवर्तन करतो.

चारित्रसार ग्रंथामध्ये द्विसंयोगी व त्रिसंयोगी या अपेक्षेने असे वर्णन आले आहे की, एक द्रव्य अथवा द्रव्य-पर्यायास श्रुतरूपी रविकिरणाच्या प्रकाशबलाने ध्यान करतो. या प्रकारे एक अंतर्मुहूर्त काल ध्यान करून अर्थान्तरावर नियमाने संक्रमित होतो अथवा त्याच अर्थाच्या गुण किंवा पर्यायावर संक्रमित होतो आणि पूर्व योगाने स्यात् योगांतरावर संक्रमित होतो. इतके संक्रमण झाले तरी ध्यानाचा नाश होत नाही. कारण अर्थापासून अर्थांतराचे संक्रमण जरी झाले तरी चिंतांतरामध्ये गमन होत नाही.

## २. एकत्व वितर्क–

एकाच योगाचा आश्रय घेऊन ध्याता एकाच द्रव्याचे चिंतन करतो म्हणून हे ध्यान एकत्व वितर्क आहे. चारित्रसार ग्रंथामध्ये असे सांगितले आहे की, " जो जीव ९ पदार्थांपैकी कोणत्याही एकाच पदार्थाचे द्रव्य, गुण व पर्याय भेदाने ध्यान करतो, त्या जीवाचा एक योग आणि एका शब्दाच्या आलम्बनाने एक द्रव्य गुण किंवा पर्यायामध्ये मेरु पर्वतासमान निश्चल भाव असतो. त्यामुळे अनंत गुणहीन श्रेणीक्रमाने कर्मांचा अनुराग शोषित करणाऱ्या आणि कर्मांच्या स्थितीचा एक योग व एक शब्द यांच्या आलंबनाने प्राप्त झालेल्या ध्यान बळाने घात करणाऱ्या जीवाचा अंतर्मुहूर्त काळ राहतो.

अर्थ, व्यंजन आणि योगांच्या संक्रमणाला वीचार म्हणतात. त्याचा इथे अभाव असतो म्हणून हे अवीचार ध्यान होऊ शकते.

जो समूळ मोहनीय कर्माचा दाह करू इच्छितो, जो अनन्त गुणी विशुद्धि विशेष प्राप्त करून घेतो व ज्ञानावरण कर्मांच्या प्रकृतींचा बंध होऊ देत नाही, कर्मस्थिती न्यून अथवा नाश करतो, अर्थ, व्यंजन आणि योग संक्रमणाने रहित आहे, जो निश्चल आहे अशा जीवाला हे ध्यान होते.

हे ध्यान केवलज्ञान उत्पत्तीचे कारण आहे. द्रव्यसंग्रह टीकेमध्ये असे वर्णन आहे की, निज शुद्धात्म द्रव्यामध्ये किंवा विकाररहित आत्मसुख अनुभवरूप पर्यायामध्ये किंवा उपाधिरहित स्वसंवेदन गुणामध्ये या तिन्हीपैकी ज्या एका द्रव्य गुण वा पर्यायामध्ये प्रवृत्त झाले आहे आणि त्यातच वितर्क नामक निजात्मानुभवरूप भाव श्रुताचे बलाने स्थिर होऊन अविचार अर्थात द्रव्यगुण पर्यायामध्ये परावर्तन करीत–होत–नाही. एकत्व वितर्क शुक्लध्यान आहे.

समस्त मोहनीय कर्माचा नाश झाल्यावर क्षीणकषाय गुणस्थानाच्या अंतिम काली आपल्या स्वरूपात लीन झालेला आत्मा एकत्व वितर्क शुक्लध्यान करतो.[1]

## ३. सूक्ष्मक्रियाप्रतिपाति शुक्लध्यान–

क्रियेचा अर्थ आहे, तो ज्यास पतनशील असतो, तो प्रतिपाति म्हणवला जातो. त्याचा प्रतिपक्षी अप्रतिपाति आहे. ज्यामध्ये क्रिया अर्थात् योग सूक्ष्म असतो ते ध्यान सूक्ष्मक्रिया आहे आणि सूक्ष्मक्रिया होऊन जे अप्रतिपाति असते ते सूक्ष्मक्रिया अप्रतिपाति ध्यान आहे.

१. स्वामि कार्तिकेयानुप्रेक्षा गाथा–४८५







एकत्व वितर्क[1] शुक्लध्यानरूपी अग्नीने ज्याने चार घाति कर्मरूपी इंधनाला जाळून टाकले, त्या जीवाचे जेव्हां आयुकर्म अंतर्मुहूर्तपर्यंत शिल्लक रहाते, तेव्हां वचनयोग, मनोयोग आणि बादर काययोगाला त्यागून सूक्ष्म काययोगाचे आलंबन घेऊन, तो जीव सूक्ष्म क्रिया प्रतिपाती ध्यानाचा स्वीकार करतो

त्रिकाल विषयक पदार्थांना युगपत् प्रगट करणाऱ्या या सूक्ष्मकाययोगामध्ये राहणारे केवली या तृतीय शुक्लध्यानाचे धारक आहेत.[2]

### ४. समुच्छिन्न क्रियानिवृत्ति शुक्लध्यान–

या ध्यानामध्ये श्वासोच्छ्वासाच्या प्रचाररूप क्रियेचा तसेच सर्व प्रकारच्या काययोग, वचनयोग व मनोयोगाद्वारे होणाऱ्या आत्मप्रदेश परिस्पंदरूप क्रियेचा उच्छेद झाल्यामुळे यास समुच्छिन्न क्रियानिवृत्ति ध्यान म्हणतात.[3]

हे अंतिम उत्तम शुक्लध्यान वितर्करहित आहे, वीचाररहित आहे, अनिवृत्ति आहे, क्रियारहित आहे.

औदारिक शरीर, तैजस व कार्मण शरीर या तीन शरीरांचा बन्ध नाश करण्यासाठी ते अयोगीकेवली भगवान् समुच्छिन्न किंवा निवृत्त नामक चतुर्थ शुक्लध्यान करतात.

धवल ग्रंथामध्ये म्हटले आहे की, ज्यामध्ये क्रिया म्हणजे योग सर्व प्रकारे उच्छिन्न झाला आहे ते समुच्छिन्न क्रिय, आणि तसे होऊन जे अप्रतिपाति आहे ते समुच्छिन्न क्रियाप्रतिपाति ध्यान आहे.

द्रव्यसंग्रहामध्ये सांगितले आहे की, विशेषरूपाने उपरत म्हणजे दूर झालेली आहे. क्रिया ज्यामध्ये ते व्युपरतक्रिय आहे, व्युपरतक्रिय असून अनिवृत्ति असते. ते व्युपरत क्रियानिवृत्ती ध्यान आहे.

वरीलप्रमाणे सारांशरूपाने शुक्लध्यानाचे स्वरूप आहे. विस्ताराने वर्णन स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षा आदि ग्रंथामधून जाणून घ्यावे.

### उपसंहार–

आतापर्यंत आपण आर्त रौद्रादिक ध्यान, धर्म, शुक्ल ध्यान यासंबंधी विस्ताराने विचार केला आहे. अनेक ग्रंथामधून ध्यानाविषयी अधिक सखोल विवरण केले आहे. त्या त्या ग्रंथातून वाचकांनी जाणून घ्यावे.

यापुढे ध्यानासंबंधाने कांही महत्त्वाचे विवेचन पुढे देत आहे–

### निर्विकल्प समाधि–

ध्यानाच्या अनुषंगाने 'निर्विकल्प समाधि' हा एक चिंतनीय विषय आहे. विकल्प शब्दाचा उपयोग सहित अवस्था असा आहे.[4] विकल्पामध्ये योगांचे परिवर्तन होते. पंचाध्यायी ग्रंथात सांगितले आहे की, योगाच्या प्रवृत्तीच्या परिवर्तनाला विकल्प म्हणतात. विकल्पामध्ये उपयोगाचे संक्रमण सतत होत असते.

'रागद्वेषके[5] वशतैं किसी ज्ञेयके जाननेविषै उपयोग लगावना। किसी ज्ञेयके जाननेतैं छुडावना, ऐसे बरांबर उपयोगको भ्रमावना, ताका नाम विकल्प है।'

अंतरंगामध्ये मी सुखी आहे, मी दुःखी आहे या प्रकारे हर्ष किंवा खेद करणे विकल्प आहे अथवा वास्तविक जो संकल्प (पुत्रादिक माझे आहेत असा भाव) आहे, तोच विकल्प आहे,[6] म्हणजेच संकल्पाची एक

१. सर्वार्थसिद्धि– ९।४४ २. भगवती आराधना–१८८७ ३. सर्वार्थसिद्धि–गाथा– ९।४४.
४. पंचाध्यायी– ३९१ ५ मोक्षमार्गप्रकाशक– ७।३१०. ६. द्रव्यसंग्रह टीका–४१।१७४








पर्याय म्हणजे विकल्प आहे. याप्रमाणे विकल्पाचे स्वरूप आहे. या उलट निर्विकल्प अवस्था असते. पंचाध्यायी या ग्रंथात म्हटले आहे की, वास्तविक स्वयं ज्ञान चेतनारूप जो शुद्ध स्वकीय आत्म्याचा उपयोग असतो तो संक्रांति-संक्रमण रूप नसल्यामुळे निर्विकल्प रूपच असतो.

आता समाधि म्हणजे काय हे पाहू. सम शब्दाचा अर्थ एकरूप करणे असा आहे. मनाला समभावामध्ये अथवा शुद्धोपयोगामध्ये एकाग्र करणे हा समाधि शब्दाचा अर्थ आहे.[१] समाधीमध्ये ध्येय आणि ध्याता हा भेद रहात नाही म्हणून ध्येय आणि ध्याता यांचा एकीकरणरूप जो समरसीभाव आहे तीच समाधि.[२]

थोडक्यात असे की अंतर्जल्प आणि बहिर्जल्प यांनी रहित अशा स्वरूपामध्ये चित्तनिरोध करणे समाधि आहे. परमात्मप्रकाश या ग्रंथामध्ये निर्विकल्प समाधीचे विस्ताराने वर्णन आहे. ते सर्वच येथे देणे शक्य नाही. पण सारांश खालीलप्रमाणे आहे.

'....निश्चित अशी आत्मानुभूति हेच ज्याचे स्वरूप आहे, आपले मन वश करणे....निर्विकल्प अशा समाधीला बहिरंग सहकारी कारण आहे....जो मुनि सर्व शास्त्रे निर्विकल्प अशा परमात्म स्वरूपाने स्थिर होऊन वाचू शकतो. सर्व शास्त्रांचे रहस्य जाणतो. परंतु तो जर परमसमाधीने ( निर्विकल्प समाधीने ) रहित असेल.... आपल्या परमात्म्याला तो पहातच नाही.... निर्विकल्प अशा समाधीमध्ये स्थिर होऊन जो परम व अनत अशा गुणास आधार असल्यामुळे अत्यंत उत्कृष्ट आहे.... शीघ्र ध्यान कर म्हणजे त्या ध्यानाच्या योगाने वीतराग व निर्विकल्प अशा समाधीपासून उत्पन्न होणाऱ्या केवळ परमानंद सुखरूपी अमृताच्या अनुभवाने तुझे मन शीघ्र शांत होईल.... जेव्हां सर्व रागादि विकल्पाचा नाश होतो तेव्हां निर्विकल्प अशा ध्यानाच्या प्रसादाने केवलज्ञान उत्पन्न होते.... जरी व्यवहार नयाने प्रथम अवस्थेत वीतराग सर्वज्ञाचे स्वरूप अथवा वीतरागाच्या प्रतिमा नाममंत्राची अक्षरे किंवा वीतरागाचे सेवक–महामुनि ध्यान करण्याला योग्य आहेत. तरी निश्चयनयाने वीतराग, निर्विकल्प व त्रिगुप्तिरूप अशा समाधीच्या वेळी आपला शुद्धात्माच ध्यान करण्याला योग्य आहे.'[३]

## अनुभव अर्थात् आत्मानुभव–

विविध प्रकारची फल देण्याची शक्ती कर्मामध्ये येणे हा अनुभव आहे. अनुभव उपभोग परिभोगरूप असतो. स्वसंवेदन गम्य आत्म सुखाचे वेदनच स्वानुभव आहे. 'हे आहे' अशा उल्लेखाने चिन्हित ज्ञान अनुभव आहे.[४]

आत्मानुभव स्वसंवेदनानेच होतो. कारण रूपादिकांनी रहित असल्यामुळे आत्मरूप इंद्रिय ज्ञानाने दिसणारे नाही. तर्क करणारे त्यास पाहू शकत नाहीत. इंद्रिय आणि मन दोन्हींचा निरोध झाल्यावर अतींद्रिय ज्ञान विशेष रूपाने स्पष्ट होते.[५]

प्रवचनसार ग्रंथामध्ये या दृष्टीने अत्यंत महत्वाची शंका उपस्थित करून त्याचे समाधान केले आहे.[६] ते खालीलप्रमाणे आहे–

शंका– हा आत्मा कोण आहे आणि तो कसा प्राप्त केला जातो ?

समा– आत्मा वास्तविक चैतन्य सामान्यरूपाने व्याप्त अनंत धर्मांचा अधिष्ठाता एक द्रव्य आहे, कारण अनन्त धर्मामध्ये व्याप्त होणारे जे एक ज्ञानस्वरूप प्रमाण आहे, त्या प्रमाणपूर्वक स्वानुभवाने प्रमेय होते. सम्यग्दर्शनसुद्धा आत्मानुभवाशिवाय शक्य नाही जिनतत्त्वोपलब्धीशिवाय सम्यक्त्वाची उपलब्धि होत नाही.[७]

१. भगवती आराधना–६७।१९४ २. जैनेन्द्र सि. कोश–भाग ४ पान ३३८ ३. परमात्मप्रकाश–श्री ब्रम्हदेव कृत संस्कृत टीका. ४. जैनेन्द्र सिद्धांत कोश–भाग १ पान ८२ ५. तत्वानुशासन–१६६–१६७ ६ प्रवचनसार परिशिष्ट–प्रारम– नतु...इत्यादी. ७. रयणसार–९०




शुद्ध निश्चय नयाने पाहिले असता, एकमात्र शुद्धपणा हेच आहे. स्वरूप जिचे अशी जी शुद्ध जीववस्तु आहे ती शुद्ध जीववस्तु आपल्या गुणपर्यायासहित आणि पूर्ण ज्ञानसमूहाचा पुज अशा शुद्ध जीव द्रव्याचे समस्त द्रव्ये व समस्त कर्मांच्या उपाधीपासून रहित असे जे दर्शन जो अनुभव आहे तेच सम्यग्दर्शन आहे आणि निश्चयाने ही जीववस्तु सम्यक्त्वगुणा एवढीच आहे. म्हणून नवतत्वाना सोडून हा आत्मा एकच प्राप्त होतो.[1] तत्त्वार्थश्रद्धानामध्ये आत्मानुभवच प्रधान असतो. समयसार ग्रंथामध्ये हा भाव फारच सुंदर वर्णन केलेला आहे.[2] परद्रव्यावरोबरच एकत्व असल्यामुळे निश्चयाने मूढ अज्ञानी जनांना 'जो ही अनुभूति आहे तोच मी आहे' असे आत्मज्ञान उदित होत नाही. याशिवाय पंचाध्यायी ग्रंथामध्ये स्पष्टच सांगितले आहे की, "जर श्रद्धा आदि स्वानुभव सहित असेल तर सम्यग्दृष्टि जीवाचे गुण लक्षण समजले जाते आणि वास्तविक स्वानुभवाशिवाय अशी श्रद्धा आदि सम्यग्दर्शनाचे लक्षण समजले जात नाही तर लक्षणाभास म्हणवला जातो."

ध्यानाचेच अपेक्षेने सांगावयाचे झाले तर धर्मध्यानात किंचित् आत्मानुभव होतो. द्रव्यसंग्रह टीका (संस्कृत) या ग्रंथात म्हटले आहे की, त्या (धर्मध्यान) ध्यानामध्ये स्थित जीवांना जो वीतराग परमानंद प्रतिभासित होतो ते निश्चय मोक्षमार्गाचे स्वरूप आहे. तेच पर्यायातराने.... शुद्धात्म स्वरूप, परमात्म स्वरूप, एकदेश परमहंस स्वरूप, धर्मध्यान, शून्य ध्यान.... त्याच ग्रंथात असे आहे की, निश्चय मोक्षमार्ग तथा व्यवहार मोक्षमार्ग या दोन्हीना मुनि निर्विकार स्वसंवेदनरूप परमध्यानाद्वारे प्राप्त करून घेतो. शेवटी शुद्धात्मानुभव कसा करावा याचे सारांश रूपाने वर्णन करून लेख आटोपता घेतो.

प्रथम[3] श्रुतज्ञानाच्या अवलम्बनाने ज्ञानस्वभाव आत्म्याचा निश्चय करून (जाणून) आणि नंतर आत्म्याच्या प्रसिद्धीसाठी परपदार्थांच्या प्रसिद्धीचे कारणभूत इन्द्रिय आणि मनाद्वारे प्रवर्तन बुद्धीना मर्यादित करून ज्याने मतिज्ञान तत्त्वाला आत्मसन्मुख केले आहे, तथा जो नानाप्रकारच्या नयपक्षांच्या अवलंबनाने होणाऱ्या अनेक विकल्पाद्वारे आकुलता निर्माण करणाऱ्या श्रुतज्ञानाच्या बुद्धीनाही मर्यादा घालून श्रुतज्ञान तत्त्वालासुद्धा आत्मसन्मुख करावे, अत्यंत विकल्परहित होऊन तात्काळ निजरसानेच प्रकट होते. आदि, मध्य आणि अन्तरहित, अनाकुल, केवल एक जणु संपूर्णच विश्वावरतरन्तमान आहे अशा अखंड प्रतिभासमय, अनंत, विज्ञानघन, परमात्मारूप समयसाराचा जेव्हा आत्मा अनुभव करतो तेव्हां त्याच वेळी आत्मा सम्यक्पणे दिसतो आणि ज्ञात होतो.

आत्मानुभवाचे महत्त्व क्षुल्लक धर्मदास यांच्या शब्दात पहा—

"....संसार जगतमें जिसकू स्वात्मानुभव आत्मज्ञान नही वा ब्रम्हज्ञान नही उसका व्रत जप तप नेम तीर्थयात्रा दानपूजादिक है सो ब्रम्हज्ञानाग्निविना सर्व कच्चा है जैसे रसोईमें आटा, दाल, चावल, बीजनादिक है परंतु अग्नीविना सर्व कच्चा है तैसेही आत्मज्ञानविना मुनिपणा, क्षुल्लकपणा आदि सर्व कच्चा है...."

वाचक हो, आगम आणि अध्यात्म ग्रंथाद्वारे ध्यानासंबंधी विश्लेषण करण्याचा प्रयत्न केला आहे. आत्मानुभव, आत्मसाधना एकच. त्यामुळे लेखाचे शीर्षक आत्मसाधना दिले आहे. समयसारादि ग्रंथातून विस्ताराने जाणून घेऊन सच्चिदानंदस्वरूपाचा चिरंतन आनंद लुटून मानव जन्माचे धन्यत्व पदरी बांधून घ्यावे हीच अपेक्षा—

— इत्यलम् —

१. समयसारकलश-१।७ २. तेच-१।१७-१८ (परै सममेकत्वाध्यवसायेन... इ.)
३. समयसार (आत्मख्याति टीका-१४४) यत. प्रथमतः... इ.

महन्मंगल जीवनकला–

# सल्लेखना

## मृत्यु : धैर्याने सामोरे जाण्याची संधि–

मरण अटळ आहे. जड-वादीसुद्धा मृत्युसंबंधी विचार करतोच. मनात भीति जरी वाळगली किंवा आनंद जरी मानला तरी मृत्यु आपणास कवटाळणारच. मग धैर्याने सामोरे गेल्यास बिघडले कुठे? महाकवि रत्नाकर[1] एके ठिकाणी म्हणतो, "हे भगवन् मरणाला भिल्यामुळे काय भित्रा म्हणून मरण जीवाला सोडून देणार आहे? मनुष्य मरणाला या भीतो? अनंत वेळा मरून या जीवाला मरणाचा सराव (अभ्यास– Practice) झालेला आहे, मग हा जीव का भीतो? मरणानंतर पुन्हा जन्म मिळणार नाही का?" जीर्ण वस्त्रांना सोडून नवीन वस्त्र धारण करताना जसा आनंद होतो, त्याप्रमाणे जीर्ण देह सोडून नवीन शरीर धारण करण्यासाठी जे मरण आम्हास सहाय्य करते ते (मरण) आनंदासाठीच आहे. त्याचे स्वागत करावे असे मृत्यु महोत्सवामध्ये म्हटले आहे. मरावे असे कुणालाही वाटत नाही पण ते टळत नाही. सर्वार्थसिद्धी ग्रंथामध्ये म्हटले आहे की, "ज्याप्रमाणे नाना प्रकारच्या विक्रेय वस्तूंच्या घेण्या-देण्यामध्ये आणि संचयामध्ये मग्न व्यापारी आपले घर नष्ट होणे इष्ट समजत नाही तरीही परिस्थितीवश विनाशाचे कारण उपस्थित झाले तर यथाशक्ति कारण दूर करतो, इतक्यावरही अशक्य झाले तर विक्रेय (विक्रीस योग्य) वस्तूचा नाश होऊ नये असा प्रयत्न करतो त्याप्रमाणे पण्य स्थानीय व्रत आणि शील संचयात रममाण झालेला गृहस्थसुद्धा आधारभूत आयु इ. चे पतन इच्छित नाही. यदाकदाचित् विनाशाचे कारण उपस्थित झाले तर आपल्या गुणांना बाधा येऊ नये म्हणून प्रयत्न करतो.

असा प्रयत्न करते वेळी भीति बाळगून कसे चालेल? मरणाची भीति न बाळगणारे भ. पूज्यपादस्वामी म्हणतात "हे भगवन्,...प्राणप्रयाणा (Death) चे वेळी आपले मंगलमय नामोच्चारण करते वेळी माझा कंठ अवरुद्ध न होतो, माझ्या कंठामध्ये आपल्या महामंत्राच्या उच्चारणाची शक्ति असावी. एवढेच मी इच्छितो."

मृत्यूला भिणारा माणूस असी इच्छाच करू शकत नाही. एक संस्कृत वचन असे आहे की, "अरे मूर्ख प्राण्या? तू मरणाला का भितोस? जो भितो त्याला यम सोडतो का? जे जन्मास येत नाहीत ते मात्र त्याच्या दाढेत सापडत नाहीत, म्हणून पुन्हा जन्मासच येऊ नये असा प्रयत्न कर.[2]

तेव्हां मरणसमयी मनात भीति न बाळगता धैर्याने सामोरे जाणेच इष्ट आहे. मरण आले म्हणजे सुवर्ण संधीच चालून आली असेच समजावे.

## सल्लेखना म्हणजे काय? कषाय आणि काय कृशता–

सल्लेखना हा शब्द संपूर्णपणे जैनाचार प्रक्रियेचा पारिभाषिक शब्द आहे. सत् आणि लेखना अशा दोन शब्दानी मिळून 'सल्लेखना' हा शब्द होतो. सत् म्हणजे प्रशंसनीय, चांगले, योग्य, यथोचित् आणि लेखना म्हणजे कृश करणे. त्याप्रमाणे 'सम्यक्कायकषायलेखना सल्लेखना' अशी सर्वार्थसिद्धि ग्रंथामध्ये व्याख्या केली आहे. म्हणजे चांगल्या प्रकारे काय आणि कषाय कृश करणे सल्लेखना आहे. रत्नकरंड श्रावकाचार[3] या ग्रंथात समंतभद्राचार्य यांनी योग्य कारण उपस्थित झाल्यावर 'धर्माय तनु-विमोचनमाहुः' असा स्पष्ट निर्देश केला आहे म्हणजे रत्नत्रय धर्माच्या रक्षणासाठी विधीपूर्वक शरीराचा त्याग करणे सल्लेखना आहे.

'धर्माय' शब्द महत्त्वाचा आहे. एक तर आपण स्वीकारलेल्या समीचीन धर्माचे पालन आणि दुसरा आत्मीय धर्माची आराधना अशा दुहेरी अर्थाने धर्माय हा शब्द योजलेला आहे.

---

१. रत्नाकर शतक– २. मृत्यो बिभेषि किं मूढ । भीतं किं मुञ्चते यमः । अजातं नैव गृह्णाति कुरु यत्नमजन्मनि ॥
३. रत्न-श्रावकाचार– १२२

## सल्लेखना केव्हां घ्यावी ? कारण चतुष्टय–

स्वामी समंतभद्राचार्यांचा खालील श्लोक अति प्रसिद्ध आहे–

उपसर्गे दुर्भिक्षे जरसिरुजाया च निष्प्रतीकारे । धर्मायतनुविमोचनमाहु. सल्लेखनामार्या. ॥

निष्प्रतिकार उपसर्ग आल्यावर दुर्भिक्ष पडल्यावर, वृद्धत्व आल्यावर आणि असाध्य रोग झाल्यावर धर्मार्थ शरीर सोडणे यास सल्लेखना म्हणतात.

वरील श्लोकात १) उपसर्ग, २) दुर्भिक्ष, ३) वृद्धत्व आणि ४) रोग या चार कारणांचा निर्देश केला आहे.

उपसर्ग मग तो चेतनकृत असो अथवा अचेतनकृत आणि दुर्भिक्ष दुष्काळ पडल्यावर, वृद्धपणामुळे आणि रोग असाध्य आहे असे समजून मरण समीप आले आहे असे गृहीत धरून सल्लेखना धारण करावी.

'धर्मार्थकाममोक्षाणां शरीरं साधन मतम्' या उक्तीप्रमाणे चारही पुरुषार्थ साधण्याकरिता शरीर हे साधनरूप आहे. तेव्हां शरीराला कायम ठेवणे अशक्य झाल्यावर त्याचा यथाविधी त्याग करणेच इष्ट आहे. क्वचित् देशावर आक्रमण झाले असताना किंवा तशाच प्रकारच्या इतर कारणानी धर्म पालन करणे अशक्य झाले तर शरीर (अगतिकतेमुळे) त्यागाशिवाय मार्ग उरत नाही अशा वेळी काय करणार ?

भगवती आराधना (७३–७६) या ग्रथात पुढीलप्रमाणे वर्णन आहे.

'ज्याचा महाप्रयत्नानेही दूर होऊ शकत नाही, श्रामण्य प्रवृत्तीचे हानि करणारे वृद्धत्व आले असताना तथा देव, मनुष्य, तिर्यंच वा अचेतनकृत उपसर्ग आला असताना, चरित्र धर्माचा नाश करणारा शत्रु उपस्थित झाला अथवा मिथ्यात्वाच्या प्रबलतेमुळे भरण पोषणाच्या लोभामुळे कुटुंबादिक बांधव चारित्रधर्माच्या विनाशास प्रवृत्त झाले असता, जगाचा नाश करणारा दुष्काळ पडला असता, अन्न पान मिळणे कठिण झाल्यास, वनामध्ये दिशाभूल झाली असता (जिकडे तिकडे वन आणि मार्गदर्शक कुणी नसल्यास) सल्लेखना धारण करणे योग्य आहे. दृष्टि नष्ट किंवा अतिशय कमी झाली असताना, कानाने ऐकणे अशक्य झाल्यास, आहारादिकास उभे रहाण्यास जंघा निर्बल–क्षीण झाल्यास अथवा तत्सदृश कारणे उपस्थित झाल्यावर मुनि किंवा श्रावकाने शरीर त्याग करावा.'

सागार धर्मामृत, राजवार्तिकादि अनेक ग्रंथामधून सल्लेखना केव्हां धारण करावी याचे सविस्तर वर्णन आहे. सारांश वरीलप्रमाणेच आहे.

## अंत समय : सल्लेखनेत प्रधानता–

सागार धर्मामृत या ग्रंथामध्ये असे वर्णन आहे की, चिरकालापासून आराधिलेला धर्मसुद्धा जर मरणाचे वेळी सुटेल किंवा त्याविषयी विराधना होईल तर निष्फल आहे आणि मरण समयी धर्माराधना केली तर चिरकालीन पापांचा नाश होतो. भगवती आराधना या ग्रंथात देखील असे सागितले आहे की, ज्याने आत्म्याला आराधनांनी सुसंस्कृत केले होते, तरीही मरण समयी संक्लेशपरिणाम झाले तर तो श्रमण भ्रष्ट होतो.

केवळ अंतसमय कळणे कठिण असले तरी सम्यग्दर्शनादि कारण कलाप सामग्रीची प्राप्ति अवश्य करून घ्यावी अर्थात् त्याचा सदा सर्वदा अभ्यास ठेवणे अति अगत्याचे आहे. हीच गोष्ट भ. आराधना या ग्रंथामध्ये दृष्टांताद्वारे समजावून सागितली आहे. तो दृष्टात असा, 'ज्याप्रमाणे राजपुत्र शस्त्र विद्येचा सतत अभ्यास करतो. त्यामुळेच युद्धामध्ये तसेच कर्म करण्यास समर्थ होतो, त्याचप्रमाणे साधुसुद्धा आराधनेसाठी योग्य असा नित्य अभ्यास करतो. त्यामुळेच तो जितेंद्रिय होऊन मरणसमयी ध्यान करण्यास समर्थ आहे.

## सल्लेखना : प्रकार आणि स्वरूप–

गोम्मटसार ग्रंथामध्ये शरीर त्यागाचे तीन प्रकार सांगितले आहेत. १) च्युत, २) च्यावित व ३) त्यक्त.

जे शरीर आयु पूर्ण होऊन आपोआप सुटून जाते ते च्युत, जे शरीर विषभक्षण, रक्तक्षय, धातुक्षय, शस्त्रघात, अग्नीने जळून, पाण्यात पडून इ. निमित्ताने सुटते ते च्यावित आणि रोग वगैरे होऊन आता मरण अटळ आहे असे समजल्यावर विवेकाने संन्यास रूप परिणामाने शरीर सोडले जाते ते त्यक्त. वर सांगितलेल्या प्रकारापैकी च्युत शरीर त्यागास स्वाभाविक मरण म्हणतात. च्यावित शरीर त्यागास कदळीघात ( अपमृत्यु-अकाल मरण ) मरण म्हणतात. त्यक्त शरीर त्यागाला समाधि मरण, संन्यास मरण, वीर मरण, पंडित मरण व सल्लेखना मरण अशी नांवे आहेत.

येथे थोडे विषयांतर वाटेल पण वर्ण्य विषय सल्लेखना आणि मरण ( Death ) यातील फरक स्पष्ट व्हावा या हेतूने क्रमाने वर्णन केले आहे.

ढोबळ मानाने १) भक्त प्रत्याख्यान, २) इंगिनी आणि ३) प्रायोपगमन असे तीन प्रकार सांगितले आहेत.

वरील प्रकार पहाण्या अगोदर येथे हे लक्षात ठेवावे की, भोजनाचा क्रमिक त्याग करून शरीराला कृश करणे या दृष्टीने तिन्ही प्रकारामध्ये कांही भेद नाही, जो फरक आहे तो शरीराकडे उपेक्षा बुद्धीने पहाण्याचा.

### १) भक्त प्रत्याख्यान : स्वपर उपकार–

ज्या संन्यासामध्ये आपल्या आणि परांच्याकडून झालेल्या उपकाराची अपेक्षा असते, त्याला भक्त प्रत्याख्यान संन्यास म्हणतात. भक्त शब्दाचा अर्थ आहार आहे आणि प्रतिज्ञा शब्दाचा अर्थ त्याग आहे. म्हणजेच ज्या शरीर त्यागात अन्नपान क्रमाने-शिस्तीने कमी करीत शरीर त्याग करतात ते भक्त प्रत्याख्यान किंवा भक्त प्रतिज्ञा सल्लेखना आहे.

### २) इंगिनी मरण : स्व-उपकार–

ज्या संन्यासामध्ये आपल्याकडून झालेल्या उपकाराची अपेक्षा असते पण दुसऱ्याकडून होणाऱ्या वैयावृत्य इ. उपकाराची अपेक्षा मुळीच नसते त्यास इंगिनी मरण अथवा इंगिनी समाधि म्हणतात. म्हणजेच या प्रकारात आपल्या शरीराची सेवा आपणच करीत असतो. पण दुसऱ्याकडून मुळीच सेवा करून घेत नाही.

### ३) प्रायोपगमन : अपेक्षा रहित–

'स्व' आणि 'पर' उपकाराच्या अपेक्षेने रहित समाधि मरणाला प्रायोपगमन म्हणतात. म्हणजेच या प्रकारात आपल्या शरीराची सेवा आपण स्वतःही करीत नाही आणि दुसऱ्याकडूनही करून घेत नाही. म्हणजेच शरीराकडे मुळीच लक्ष नसते. यास पादोपगमन असेही म्हणतात. पादोपगमन असा शब्द घेतल्यास आपल्या पावलानी संघातून निघून आणि योग्य प्रदेशात जाऊन जे मरण साधले जाते ते पादोपगमन मरण आहे.

वरीलप्रमाणे सामान्यरूप आहे भगवती आराधना या ग्रंथामध्ये मरणाचे १७ भेद आहेत. त्यांची नांवे अशी– १. आवीचिका मरण, २. तद्भव मरण, ३. अवधिमरण, ४, आद्यतमरण, ५. बालमरण, ६. पंडित मरण, ७. आसन्न मरण, ८. बाळ पंडित मरण, ९. सशल्यमरण, १० पलाय मरण, ११. वशार्तमरण, १२. विप्राण मरण, १३. गृध्रपृष्ठ मरण, १४. भक्तप्रत्याख्यानमरण, १५. इंगिनीमरण, १६. प्रायोपगमनमरण व १७. केवलीमरण.

हे सतरा जरी प्रकार असले तरी त्याच ग्रंथात संक्षेपाने पाच प्रकार सांगितले आहेत– १. पंडित पंडित मरण, २. पंडित मरण, ३. बाल पंडित मरण, ४. बाल मरण व ५. बाल बाल मरण. यापैकी पहिले तीन मरण प्रशंसनीय आहेत.' त्यांचे स्वरूप पहा (पं. सदासुखदासजी यांच्या शब्दात)[1]–

'क्षीण कहिये नाश हुए हैं कषाय जिनिके ऐसे भगवान् केवलीका निर्वाण गमन सो पंडित पंडितमरण है। बहुरि विरताविरत जे देशव्रत सहित श्रावक ते सूत्रकी अपेक्षा तृतीयमरण जो बाल पंडितमरण ताविषै मरे हैं। बहुरि आचारांगकी आज्ञा प्रमाण यथोक्तचारित्र के धारक साधुमुनि तिनिकै पंडितमरण होय है, सो पंडितमरण तीन प्रकार है। एक भक्त प्रतिज्ञा, दूजा इंगिनी, तीजा प्रायोपगमन। तिनिमें भक्त प्रतिज्ञामें तो संघसू वैयावृत्य करावै वा आपकी आप करै वा अनुक्रमसू आहार कषाय देहको त्याग करे हैं अर इंगिनीमरणमें परकृत वैयावृत्य वा आहारपान रहित एकाकी वनमें देहका त्याग करै कदाचित् उठना, बैठना, चलना, पसारणा, संकोचन, सोवना या प्रकार आपको आप करै परसूं टहळ न करावै कदाचित् विना कराया कोई करै तो आप मौनी रहै बहुरि प्रायोपगमन विषै आपका वैयावृत्य आप भी न करै परसूं भी नहीं करावै सूका काष्टवत् वा मृतकको नाई सर्व काय वचनकी क्रिया रहित यावज्जीव त्यागी होय धर्मध्यानसहित मरण करै ये तीन पंडितमरणके भेद हैं.......बहुरि अविरतसम्यग्दृष्टि व्रतसंयमरहित केवल तत्त्वनिकी श्रद्धाकरि सहित मरै सो बाल मरण जानना। बहुरि जाकै सम्यक्त्व व्रत दोऊ नही ऐसा मिथ्यादृष्टि ताकै बालबालमरण है।

समाधि मरणोत्साहदीपक (आ. सकलकीर्ति) या ग्रंथात ७ भेद सांगितले आहेत. मूलतः ते पाचच आहेत. पण पंडित मरणाचे तीन प्रकार समाविष्ट करून ७ प्रकार सांगितले आहेत.

### सल्लेखना विधि–

सामान्य रूपाने आपण वर प्रकार पाहिले आहेत. विधिसंबंधाने सांगण्या अगोदर साधकाने[2] मृत्यु हा महोत्सव समजून तो यथाविधि पार पाडावा ही भावना मनात रुजवावी म्हणजे विकल्प, वेदना यांचा अंश कमी होऊन निराबाध सल्लेखना पार पडते व योग्य फलनिष्पत्ति होते. विधि सांगताना प्रसंगानुसार श्रावकांच्या विधीचाही निर्देश केलेला आहे. सल्लेखना केवळ मुनीच धारण करू शकतात असे नव्हे तर श्रावक देखील पात्र आहे.

### भक्त प्रत्याख्यान–

गर्भान्वियादि ५३ क्रियेमध्ये 'योगनिर्वाण सप्राप्ति' नांवाची ३१ वी क्रिया आहे. महापुराणामध्ये या क्रियांचे विस्ताराने वर्णन आहे. साधकाने अंतसमय जवळ आला आहे असे समजून त्यावेळी उत्कटतेने वैराग्यपूर्ण एकत्व व अन्यत्व[3] भावना भाऊन सल्लेखना धारण करावी व साम्यभाव सहित शरीर त्यागासाठी हळू हळू शरीर कृश करावे. अशी ही ३१ वी क्रिया आहे. भक्त प्रत्याख्यान क्रियेमध्ये साधक अशी प्रतिज्ञा करतो की, 'मी सर्व प्रथम हिंसादि पंच पापाचा त्याग करतो, माझा सर्व जीवाशी समताभाव आहे, माझे कुणाशीच वैर नाही. त्यामुळे मी सर्व आकांक्षांचा त्याग करून समाधि योग्य परिणाम धारण करतो, मी सर्व अन्नपान आदि आहार, सपूर्ण आशा, कषाय आणि सर्व पदार्थाविषयीचा ममत्वभाव यांना सोडून देतो.'

श्रावकाच्या दृष्टीने विचार केल्यास त्याने शीत आणि उष्ण यामध्ये हर्ष आणि विषाद मानू नये. स्नेह, वैर आणि परिग्रह सोडून मधुर वचनांनी आपल्या कुटुंबियांना इतकेच नव्हे तर चाकराना सुद्धा क्षमा मागावी आणि आपणही क्षमा करावी. छलकपटरहित आणि कृत कारित अनुमोदना या सहित केलेल्या सर्व पापाची आलोचना करावी. शोक, भय, विषाद, राग, कलुषता आणि अरती याचा त्याग करावा. आपली शक्ति आणि

---

१. विस्तारभयास्तव मूळ गाथा दिलेल्या नाहीत. हे वर्णन गाथा न. २८ पासून ३० पर्यंत आहे.

२. मृत्यूस धैर्याने सामोरे जाणे आणि अंतसमयी शरीरादिकाची योग्यता असणे यावरच सल्लेखना अवलंबून आहे, त्या अपेक्षेने सल्लेखना धारण करणारा साधक समजावा. ३. १२ अनुप्रेक्षापैकी ४ थी व ५ वी अनुप्रेक्षा.

उत्साह प्रकटवावा. संसाराच्या दुःखरूपी संतापाला दूर करणाऱ्या अमृतरूप शास्त्रांच्या श्रवणाने मन प्रसन्न ठेवावे. क्रमाक्रमाने कमी कमी करीत आहार सोडून दूध व ताक सेवन करावे. पुढे तेही कमी करीत कांजी आणि गरम पाणी घ्यावे. त्यानंतर त्यांचा देखील त्याग करून, शक्यतानुसार उपवास करून पंच नमस्कार मंत्र मनात धारण करून प्राण त्याग करावा.[1]

वरील श्रावकासाठी सांगितलेले विधि समर्थ[2] श्रावकाविषयी आहे पण कांही श्रावक अशक्त रोगग्रस्त असण्याची शक्यता आहे. अशा श्रावकांनी गुरूंचा सत्संग साधावा. असा श्रावक गुरूंच्या आज्ञेने केवळ पाणी पिण्याची प्रतिज्ञा घेऊ शकतो. पुढे शरीर अत्यंत क्षीण झाल्यावर आणि मृत्यु अगदी जवळ आल्यावर पाण्याचा सुद्धा त्याग करावा. वस्त्र मात्र परिग्रह ठेवून व बाकी सर्व परिग्रहांचा त्याग करून घरी अथवा गुरु सन्निध्य खाद्य, स्वाद्य व लेह्य यांचा त्याग करावा.

श्रावक किंवा मुनि हे एखादे वेळी मृत्युविषयी साशंक असू शकतात. अशा वेळी त्याने असा निश्चय करावा की, 'मी जर जीवंत राहिलो तर अमुक पदार्थांचा त्याग करीन' किंवा उपसर्ग अवस्थेत त्याने प्रतिज्ञा करावी की, जोपर्यंत हा उपसर्ग राहील तोपर्यंत मी आहारादिकांचा त्याग करीन, उपसर्ग दूर झाल्यावर मी पारणे फेडीन.

अजूनही पुष्कळ विस्ताराने वर्णन आहे ते विस्ताररुचि वाचकांनी भगवती आराधना, मूलाचार इत्यादि ग्रंथातून पाहून घ्यावे. भक्तप्रत्याख्यान विधीचे 'सविचार व अविचार' असे दोन प्रकार आहेत. जो ग्रहस्थ अथवा मुनि उत्साह व बलयुक्त असतो आणि ज्याचा मरणकाल दूर आहे अशा साधूंच्या मरणाला सविचार भक्तप्रत्याख्यान मरण म्हणतात. याउलट जो सामर्थ्यहीन आहे आणि ज्याचा मरणकाल समीप आहे अशा साधूच्या मरणाला अविचार भक्तप्रत्याख्यान मरण म्हणतात. सविचार भक्तप्रत्याख्यान मरणाचे ४० अधिकार भगवति आराधनेमध्ये सांगितले आहेत. पुढील कोष्टकामध्ये नाम निर्देश व लक्षण दिले आहे. त्यावरून संपूर्ण कल्पना येण्यासारखी आहे.

| अ. नं. | अधिकाराचे नांव | लक्षण |
|---|---|---|
| १ | अर्ह– | पुढील अधिकार धारण करण्यायोग्य व्यक्ति. |
| २ | लिंग– | शिक्षा विनय आदि रूप साधनसामुग्रीचे चिन्ह. |
| ३ | शिक्षा– | ज्ञानोपर्जन. |
| ४ | विनय– | ज्ञानादिकाविषयी विनय असणे. |
| ५ | समाधि– | मनाची एकाग्रता. |
| ६ | अनियत विहार– | अनिश्चित ठिकाणी विहार. |
| ७ | परिणाम– | कर्तव्य परायणता. |
| ८ | उपाधित्याग– | बाह्याभ्यंतर परिग्रह त्याग. |
| ९ | श्रिति– | शुभ परिणामांची उत्तरोत्तर उन्नति. |
| १० | भावना– | उत्तरोत्तर उत्तम भावनांचा अभ्यास. |
| ११ | सल्लेखना– | कषाय व शरीर कृश करणे. |
| १२ | दिशा– | योग्य बालाचार्य स्थापना. |
| १३ | क्षमणा– | क्षमा याचना करणे. |
| १४ | अनुशिष्टि– | आगमानुसार उपदेश. |

१. हे वर्णन चारित्रसार व रत्नकरंड श्रावकाचार यामध्ये आहे   २. शरीरादिकांनी बलवान

| अ. नं. | अधिकाराचे नांव | लक्षण |
|---|---|---|
| १५ | परगणचर्या– | दुसऱ्या संघात गमन. |
| १६ | मार्गण– | समाधिमरण करविणाऱ्या आचार्यांचा शोध |
| १७ | सुस्थित– | आचार्यपद योग्य कार्यप्रवीण गुरु. |
| १८ | उपसंपदा– | आचार्यांच्या चरणसन्निध जाणे. |
| १९ | परीक्षा– | परिचारक गणादिकांची परीक्षा करणे. |
| २० | प्रतिलेखन– | राज्य देशादिकांचे शुभाशुभ पहाणे. |
| २१ | पृच्छा– | अनुग्रहाची आज्ञा प्राप्त करणे. |
| २२ | एकसंग्रह– | एका आराधकाचे ग्रहण. |
| २३ | आलोचना– | गुरुसमोर आपले अपराध सांगणे. |
| २४ | गुणदोष– | आलोचनेच्या गुणदोषांचे वर्णन. |
| २५ | शय्या– | आराधक योग्य वसतिका. |
| २६ | संस्तर– | आराधक योग्य शय्या. |
| २७ | निर्यापक– | सहाय्यक आचार्य आदि. |
| २८ | प्रकाशन– | अंतिम आहार दाखविणे. |
| २९ | हानि– | क्रमाक्रमाने त्याग करणे. |
| ३० | प्रत्याख्यान– | तीन प्रकारचा आहार त्याग (जल-पानाशिवाय). |
| ३१ | क्षमण– | आचार्य आदीची क्षमा याचना. |
| ३२ | क्षपणा– | प्रतिक्रमणादिकांच्या द्वारे कर्मांचा क्षय. |
| ३३ | अनुशिष्टि– | आचार्यद्वारा उद्यत मुनीस उपदेश. |
| ३४ | सारणा– | दु:ख व मोहग्रस्त साधूस सावध करणे. |
| ३५ | कवच– | वैराग्योत्पादक उपदेश देणे. |
| ३६ | समता– | लाभालाभादिकामध्ये उपेक्षा बुद्धि. |
| ३७ | ध्यान– | एकाग्रचितानिरोध. |
| ३८ | लेश्या– | कषायानुरंजित योग प्रवृत्ति. |
| ३९ | फल– | आराधनेचे फल. |
| ४० | शरीरत्याग– | आराधकाचा शरीर त्याग. |

वरील ४० अधिकारामध्ये अनुशिष्टि अधिकार दोन वेळा असला तरी लक्षण वेगळे आहे. भ आराधना या ग्रंथामध्ये दोन शब्दामध्ये फरक दाखवताना 'अणुसिट्ठि' व 'अणुसट्ठि' केवळ असाच फरक आहे. एकाग्रतेच्या अपेक्षेने समाधि, सल्लेखना, क्षमणा, क्षमण हे अधिकार अति महत्वाचे वाटतात.

**इंगिनी मरण विधि–**

भक्त प्रत्याख्यानमध्ये जो विधि सांगितला आहे स्थूल मानाने तो विधि सारखाच आहे. भ. आराधना ग्रंथाधारे खालीलप्रमाणे विस्तार आहे.

आपल्या गणाला साधु आचरण योग्य करून इंगिनी मरण साधण्यासाठी परिणत होऊन पूर्ण दोषांची आलोचना करतो आणि संघ त्याग करण्या अगोदर आपल्या जागी दुसऱ्या आचार्यांची स्थापना करतो. त्यानंतर बालवृद्ध आदि सर्वास क्षमेसाठी प्रार्थना करतो. त्यानेसाठी तृणाचे आसन करावे. ते निर्जंतुक पृथ्वी किंवा




शिलामयी असावे. ग्रामादिकातून मागून आणलेले तृणांचा उपयोग करून शय्या (संस्तर) तयार करावी. नंतर रत्नत्रयात लागलेल्या दोषांची आलोचना करून रत्नत्रयाची शुद्धि करावी. संपूर्ण आहारांच्या विकल्पाचा आणि बाह्य आणि अभ्यंतर परिग्रहांचा आजीवन त्याग करावा. कायोत्सर्गाने उभे राहून किंवा बसून किंव झोपून ते मुनि स्वतःच आपल्या शरीराची क्रिया करतात. शौच आणि प्रतिलेखन आदि क्रिया स्वत.च करतात. जगातील संपूर्ण पुद्‌गल दुःखरूप किंवा सुखरूप परिणत होऊन त्यांना दुःखी किंवा सुखी करण्यास उद्यत झाले तरी त्यांचे मन ध्यानापासून चलायमान होत नाही. ते मुनि याचना पृच्छना परिवर्तन आणि धर्मोपदेश या सर्वांचा त्याग करून सूत्रार्थाचा अनुप्रेक्षात्मक स्वाध्याय करतात. आठही प्रहर ते निद्रा त्याग करतात आणि एकाग्रतेने तत्त्वांचा विचार करतात. स्वाध्याय काल आणि शुद्धि इ. क्रिया त्यांना नाहीत. स्मशानात देखील ते ध्यान करू शकतात. यथाकाल षडावश्यक कर्म नियमित करतात. काटा टोचल्यास अथवा डोळ्यात रजकण पडल्यावर ते स्वतः काढीत नाहीत. पण कुणी काढू लागल्यास मौन धारण करतात. तपोबलाने प्रगट झालेल्या ऋद्धीं (वैक्रियिक) चाही उपयोग करीत नाहीत. मौन स्वीकारतात. रोगादिकांचा प्रतिकार करीत नाहीत. कदाचित उपदेश देखील देतात.

वरीलप्रमाणे विधि आहे. सांप्रतकाली केवळ आचार्य श्री १०८ चारित्र चक्रवर्ती शांतिसागर महाराज यांनी हा विधि निरतिचार साधला. सकृद्दर्शनी हा विधि अत्यंत अवघड वाटतो. पण समीचीन धर्माप्रमाणे आत्मरत पुरुष ज्यावेळी धैर्य धारण करतो त्यावेळी सर्व सुगम व सुसह्य होते. या अपेक्षेने पूज्य शांतिसागर महाराजानी इंगिनी मरण साधून जगापुढे आदर्श ठेवला.

### ३. प्रायोपगमन विधि–

मागील विधीप्रमाणेच या प्रकारात विधि आहे. विशेषता आहे ती खालीलप्रमाणे–

यामध्ये तृण संस्तराचा उपयोग करता येत नाही. कारण स्वपर शुश्रूषेचा निषेध आहे. इतकेच नव्हे तर मलमूत्र निराकरण स्वत.देखील करीत नाहीत आणि दुसऱ्याकडूनही नाही. ममत्व रहित भाव इतके पराकोटीला पोहोचलेले असतात की, जर कुणी सचित्त, पृथ्वी, जल, अग्नि, वनस्पती व त्रसजीवनिकाय यामध्ये टाकले तर आयु समाप्तीपर्यंत ते तिथेच रहातात. त्राण निवारण करण्यासाठी कसलाच प्रयत्न करीत नाहीत. त्याचप्रमाणे जर कुणी त्यांचा अभिषेक केला, गंध-पुष्पादिकांनी पूजा केली तरीही प्रसन्न होत नाहीत आणि निराकरणही करीत नाहीत. ज्यावर मुनीनी अंग टेकले किंवा ठेवले त्यावरून यावज्जीव अंग हलवीत नाहीत. याप्रमाणे संक्षिप्त रूप आहे. याचे नीहारप्रायोपगमन आणि अनीहार प्रायोपगमन असे प्रकार आहेत. संहनन हीनता व कालाची प्रतिकूलता यामुळे हा विधि करणारे मुनि वर्तमानकाळात नाहीत.

या तिन्ही प्रकारामध्ये उत्तरोत्तर विधि अवघड आहे.

### निर्यापकाचार्य : एक महत्त्वाचे पद–

समाधिमरण घेऊ इच्छिणाऱ्या मुनीची साधना सफल करण्यात निर्यापकाचार्य यांचे कार्य, उपदेश इत्यादि अत्यंत महत्वाचे आहे. निर्यापक म्हणजे समाधिमरण करविणारे, अनुभवी व तत्त्वज्ञानपूर्वक सहाय्य व उपदेश देणारे मुनि. निर्यापकांची संख्या जास्तीत जास्त ४८ व कमीत कमी २ असते. १) शरीर परिचर्या, २) शास्त्रश्रवण, ३) भोजन, ४) पान, ५) परिचर्या, ६) मलमूत्र क्षेपण, ७) वसतिकाद्वार रक्षण, ८) श्रावकांना उपदेश, ९) रात्रि जागरण, १०) वार्ता निरीक्षण (आसपासची), ११) येणाऱ्या जाणाऱ्याशी संवाद, १२) विघ्न अंतराय करणाऱ्याशी वादविवाद या बारा कारणासाठी किंवा कार्यासाठी प्रत्येकी चार चार निर्यापकांची नियुक्ति निर्यापकाचार्याकडून केली जाते. निर्यापकाचार्यांचे सर्वात मोठे कार्य म्हणजे साधकास (संस्तरगत साधु) आत्म जागृतीसाठी उपदेश देणे.







हा उपदेश अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळे सारांशरूपाने खाली दिला आहे ते असा उपदेश देतात की,

"हे भव्य क्षपका ! या शरीराची सार्थकता होण्याची सुवर्णसंधी तुला प्राप्त झालेली आहे. हे शरीर अपवित्र आहे ते आधि व्याधि यांच्या वेदनेने क्षीण होते. तरी पण अत्यंत दुर्लभ आहे. त्यामुळे जर तुला सार्थकता साधावयाची असेल तर सर्व त्रास सहन कर. घाबरू नकोस. क्षुधादि वेदनानी शरीर निर्बल होईल, आत्मा नाही.

हे भद्र पुरुषा ! अनेक मुनींनी प्राणांतिक वेदना, परिषह अत्यंत शांत भावाने सहन केले, त्यांची दृढता लक्षात घे आणि आपल्या आत्मनिधीचे रक्षण कर.

ससाराचे परिभ्रमण किती विचित्र आहे याचा विचार कर. अज्ञान आणि मिथ्यात्व यामुळे तुझे परिभ्रमण झाले आहे आणि दुःख तर त्यामुळेच आहे. नरकादिकात झालेल्या यातनांचा विचार कर. त्यासमोर आताच्या वेदना तर कांहीच नाहीत. मग यावेळी धैर्य का सोडतोस ? धैर्य धारण कर यातच तुझे कल्याण आहे.

हे भव्य पुरुषा ! अनंत काळापासून तू भ्रमण करीत आहेस पण सुखाची प्राप्ति मात्र झाली नाही. या लोकातील पुद्गल परमाणु आणि स्कंधापैकी एकापासूनही तुला सुख मिळाले नाही. मात्र तू व्यर्थ इष्टानिष्ट कल्पना केलीस. ते तुझे किंवा तू त्यांचे काहीही करू शकत नाहीस. त्यांचे चिंतन सोड, आत्म्याचे चिंतवन कर. देह आणि आत्मा भिन्न आहेत. अनादि काळापासून बहिरात्मदृष्टीमुळे स्व-स्वरूपाची ओळख झाली नाही. आता तरी लक्ष दे. घाबरू नकोस. आत्मस्थ रहा."

याप्रमाणे उपदेशादि करून साधकास आत्मस्थ ठेवण्याचा प्रयत्न करावा.

निर्यापकाचार्य पंचाचार संपन्न हवा. तसेच सूत्रार्थज्ञ असावा. निर्यापकांनी अनेक प्रकारे वैय्यावृत्य करावे. आक्षेपिणी, संवेजनी आणि निर्वेजनी या तीन कथा साधकास ऐकवाव्या. विक्षेपिणी कथा सांगू नयेत.

सारांश साधक चलायमान होणार नाही, तो आत्मस्थ राहील अशा प्रकारे वातावरण निर्माण करण्याची संपूर्ण जबाबदारी निर्यापकाचार्यावर असते. त्या दृष्टीने निर्यापकाचार्य हे अत्यंत महत्त्वाचे पद आहे.

येथपर्यंत सामान्य रूपाने सल्लेखनेचे स्वरूप प्रकार सांगितले आहेत. आता आपण एका महत्त्वाच्या विषयाकडे वळू.

## सल्लेखना आत्मघात नाही–

सल्लेखनामध्ये काय व कषाय कृश करावे लागतात. कषाय कृष करणे यासंबंधी शंका निर्माण केली जात नाही पण काय कृश करणे यासंबंधी आत्मघाताचा आरोप केला जातो.

खरे म्हणजे सल्लेखना म्हणजे आत्मयज्ञ आहे. आत्म विकास आणि परंपरेने ( वर्तमान काळी साक्षात् नाही म्हणून ) मोक्ष साधण्यासाठी ती एक क्रमबद्ध विशिष्ट क्रिया आहे. आत्मसाधना, स्वधर्म, व्रत रक्षण यामध्ये अनिवार्य उपसर्ग आला असेल तर सल्लेखना धारण करावयाची असते. त्यामुळे सर्वात महत्त्वाचा भाग म्हणजे सल्लेखना घेण्यामागे कोणत्याच प्रकारचा कषाय, वैताग नसतो. शरीराचे उपासक असलेले लोकच ते सोडताना दुःखी होतील. ज्यांचे शरीरावरचे ममत्वच नष्ट झालेले आहे ते दुःखी का होतील ? अर्थात् होणार नाहीत. जगाच्या इतिहासामध्ये असे एकही आत्महत्येचे उदाहरण नाही ज्याचे कारण कषाय नाही. प्रेमभंग, असफलता, सकट, दारिद्र्य किंवा तशाच प्रकारच्या कारणाशिवाय आत्महत्या होत नाही आणि प्रेमभंगादी कारणे कषायोत्पादक आहेत. सल्लेखना घेण्यामागे कषाय हे कारण नाहीच. त्यामुळे जेव्हां एखादा आत्मधर्माचा उपासक आत्मधर्म रक्षणार्थ प्रसन्नतापूर्वक शरीराची उपेक्षा करून मृत्यूचा सत्कार करण्यास सिद्ध होतो ती आत्महत्या कशी होऊ शकेल बरे ?

वीरपणा काय आहे ? आपल्या नगरावर परचक्र चालून आल्यावर योद्धा तन, मन, धनाचा होम करतो. 'जिंकेन तर सार्थक होईल पण मृत्यु आला तर ?' याची पर्वा तो करीत नाही. या साहसपूर्ण निर्णयाला वीरपणा म्हणतात. त्याचप्रमाणे रत्नत्रय हेच जणु नगर आहे. त्याच्यावर होणाऱ्या मृत्युरूपी शत्रूचे आक्रमण झाल्यावर त्याच्याशी सामना देण्यासाठी सल्लेखनारूपी शस्त्र घेऊन सामोरे गेल्यास आत्महत्या कशी म्हणवेल ?

सर्वार्थसिद्धि या ग्रंथामध्ये यासंबंधी प्रश्न उपस्थित करून त्याचे समाधान केलेले आहे. ते असे पहा–

प्रश्न :– ज्याअर्थी सल्लेखनेमध्ये अभिप्रायपूर्वक आयु आदिकांचा त्याग केला जातो, त्याअर्थी ती आत्महत्याच नाही का ?

उत्तर :– हा कांही दोष नाही, कारण सल्लेखनेमध्ये प्रमादाचा अभाव आहे. प्रमत्त योगामुळे प्राणांचा वध करणे हिंसा आहे हे अगोदरच सांगितले आहे. पण यामध्ये (सल्लेखनेमध्ये) प्रमाद नसतो, कारण रागादिकांचा अभाव असतो. राग, द्वेष आणि मोहाने युक्त होऊन विष आणि शस्त्र इ. उपकरणांचा प्रयोग करून त्यायोगे आपला घात करून घेतो, त्याला आत्मघाताचा दोष लागेल.

'मारणांतिकी सल्लेखनां जोषिता' या सूत्रामध्ये 'जोषिता' या शब्दाचा अर्थ केवळ 'सेवन करणे' हा नाही, कारण प्रीति राहिली नाही तर बळेच सल्लेखना करविली जात नाही, उलट प्रीति असल्यामुळे आपोआपच श्रावक किंवा मुनि सल्लेखना धारण करतो. आत्महत्येमध्ये असे घडत नाही. आत्महत्येत कषायांचा उद्रेक असतो तर सल्लेखनेमध्ये विवेक जागृत असतो. इष्ट वियोग, अनिष्ट संयोग किंवा तत्सम अनेक कारणामुळे दुःखी होऊन आत्मघातास माणूस प्रवृत्त होतो पण समभाव धारण केल्यावर दुःखी होण्याचे कारणच उरत नाही. निर्ममत्व असल्यामुळे विवेक जागृत असतो आणि जागृत आहे त्याचाच अर्थ सल्लेखना आत्महत्या नाही. कारण विवेक गमावला जातो तेव्हांच आत्महत्येला जीव प्रवृत्त होतो म्हणूनच सल्लेखना आत्मघात नाही. तो एक पवित्र मृत्युमहोत्सव आहे. तो खऱ्या वीराचा पराक्रम आहे.

### कषायांना कृश करणे : प्रमुख साध्य–

सागार धर्मामृत या ग्रंथामध्ये स्पष्ट म्हटले आहे की, "जो साधु कषायांना कृश न करता केवळ शरीरालाच कृश करतो, त्याचे ते शरीराचे कृश करणे निष्फळ आहे. कषायांना कृश करण्यासाठीच शरीर कृश केले जाते. भ. आराधना या ग्रंथामध्ये असे वर्णन आहे की, "अनेकविध शरीर सल्लेखना विधीना करीत असून देखील क्षपक एक क्षणभरही परिणामांची विशुद्धि मांडीत नाही. कषायांनी कलुषित मनामध्ये परिणामांची विशुद्धि होत नाही. परिणामांची विशुद्धीच कषाय सल्लेखना आहे. जो साधु शरीराची सल्लेखना निरतिचारपूर्वक करतो पण अंतरंगामध्ये रागद्वेषादिरूप भाव परिग्रह निवारा करीत असेल तर तो साधु संस्तरारूढ असूनही परिणामांच्या संक्लेशतेच्या कारणामुळे संसार भ्रमणच करतो." असेही म्हणता येईल की, अन्नपाण्याचा त्याग केल्याने शरीर कृश होईल पण कषाय कृष झाल्याशिवाय शरीर कृश करणे देखील सार्थ नाही. म्हणून सल्लेखनेमध्ये अभ्यंतर सल्लेखनेलाच जास्त महत्त्व आहे. शरीर कृशता गौण आहे.

### लेश्या : शुभ परिणामाची नांदी–

क्रोध, मान, माया, लोभ यांनी अनुरंजित भाव म्हणजे लेश्या. मागे आपण पाहिले की, सल्लेखना धारण करणारा जीव क्रोधादि कषायांच्या आहारी जात नाही. त्यामुळे अशुभ लेश्या असत नाही, म्हणजेच कृष्ण, नील, कपोत या लेश्या संभवणार नाहीत. जशी ज्याची लेश्या तसे तो कर्म बांधणार. सल्लेखना धारण करणारा जीव कर्म बांधीत नाही तर कमी करतो. तत्त्वार्थ सूत्रामध्ये एक महत्त्वाचे सूत्र आहे. 'सकषायत्वात् जीवः कर्मणो योग्यान् पुद्गलान् आदत्ते स बंधः' हे ते सूत्र. त्यानुसार जीव कषायसहित झाला म्हणजे कर्मयोग्य पुद्गल




वर्गणा आत्म्याकडे येतात. विशेष हे की, कर्मयोग्य वर्गणा आत्म्याकडे आल्या म्हणजे कषाय उत्पन्न होतात. म्हणजेच कषाय आणि कर्म यांचा निमित्तनैमित्तिकभाव संबंध आहे. म्हणूनच ज्याअर्थी कषाय कृश करण्याची क्रिया सल्लेखनेमध्ये असते त्याअर्थी लेश्या शुभ असतात. ( उत्तरोत्तर प्रशस्त लेश्येमध्ये कषायाचा अंश कमी असतो. ) भ. आराधना या ग्रंथामध्ये असे सांगितले आहे की, उत्कृष्टतेने शुक्ल लेश्यांनी परिणत होऊन समाधिमरण धारण करणारा जीव उत्कृष्ट आराधक आहे. त्याशिवाय शेष मध्यम व जघन्य अंश आणि पद्म लेश्येचा सर्व अंशांनी परिणमित होऊन मरणारा मध्यम आराधक आहे आणि पीत लेश्येच्या सर्व अंशांनी परिणमित होऊन मरणारा जघन्य आराधक आहे.

## सल्लेखना कोण धारण करतो ?

श्रावक आणि मुनि दोघेही सल्लेखना धारण करू शकतो. भ. आराधना या ग्रंथात असे म्हटले आहे की, गृहस्थ आणि साधु दोघेही भक्त प्रत्याख्यान विधि धारण करण्यास योग्य आहेत. पुरुषार्थ सिद्धयुपाय या ग्रंथात देखील म्हटले आहे की, " मी मरणकाली अवश्य समाधिमरण करीन " अशी भावना श्रावकाने नित्य ठेवावी. शीलव्रतधारी श्रावक ( अणुव्रत धारी ) आणि मुनि ( महाव्रतधारी ) सल्लेखनाविधि करू शकतो. राजवार्तिक या ग्रंथात असे वर्णन आहे की, "सर्वच नाहीत, पण सात शीलव्रतधारी कांही श्रावक सल्लेखनाभिमुख होतात."

## शरीर विसर्जन–

ज्यावेळी उपासकाचे मरण झाले असेल तावडतोब त्यावेळी प्रेत न्यावे. शव नेण्यासाठी पालखी, विमान अथवा शिविका तयार करावी. त्यात शव ठेवून शय्येसह बांधावे. मस्तक गावाकडे करावे व गावाबाहेर न्यावे. पूर्वी पाहिलेल्या मार्गाने शव न्यावे. मार्गामध्ये थांबू नये अथवा मागे वळून पाहू नये. ज्याने निषद्येचे ठिकाण अगोदर पाहून ठेवले आहे त्याने अगोदर जाऊन त्याठिकाणी समस्तल दर्भमुष्ठीची शय्या तयार करावी. तृण ( गवत ) जर मिळाले नाही तर तांदूळ, मसूरीची दाळ याचे चूर्ण करून केशर इत्यादीना अखंड रेषा ( मस्तका-पासून पायापर्यंत ) ओढाव्या. गावाकडे मस्तक ठेवून पिछीसह शव तिथे ठेवावे. चंदन, कापूर इत्यादिकांनी दहन करावे. भ. आराधना ग्रंथामध्ये क्षपकाच्या दहनाचा विधि नाही. यानंतर श्रावकांनी कायोत्सर्ग करावा. श्रावकांनी त्यावेळी अशी भावना करावी की, आम्हालाही असेच समाधिमरण घडावे. आम्ही देखील अशीच आराधना करावी.

## अतिचार–

सल्लेखना घेतल्यानंतरही दोन दिवस अधिक जगण्याची इच्छा करणे, मरण लौकर यावे अशी इच्छा करणे, मरण प्राप्त झाले असता इतके तीव्र दुःख होत असेल तर ते कसे सहन होईल अशी भीति बाळगणे, मरताना आपल्या इष्टमित्रपुत्रदारादिकाचे स्मरण करणे आणि मी अमुक तप केले आहे त्याचे भविष्यकाळी मला अमुक फल मिळावे, अशी इच्छा करणे हे पाच दोष टाळावेत ( असे पाच अतिचार आहेत. )

## ज्योतिष शास्त्राप्रमाणे नक्षत्र विचार–

साधकाने ज्यावेळी सल्लेखना धारण केली आहे त्यावेळचे नक्षत्राप्रमाणे मरण केव्हा होईल हे निश्चित सांगता येते. भगवती आराधना ग्रंथामध्ये यासबंधी सविस्तर वर्णन आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे कोष्टक होते.[1]

१. जैन सिद्धांत कोष भाग ४ पान ३८५ वर ही तालिका दिली आहे.

| अ. नं. | संस्तर धारणकालीन नक्षत्र | मरणकालचे नक्षत्र | वेळ |
|---|---|---|---|
| १ | आश्विनी | स्वाति | रात्र |
| २ | भरणी | रेवती | प्रभात |
| ३ | कृत्तिका | उत्तर फाल्गुनी | मध्यान्ह |
| ४ | रोहिणी | श्रवण | अर्धरात्री |
| ५ | मृगशिर | पूर्वा फाल्गुनी | ? |
| ६ | आर्द्रा | उत्तर किंवा त्यानंतरचे | दिवस |
| ७ | पुनर्वसु | अश्विनी | अपरान्ह |
| ८ | पुष्य | मृगशिर | ? |
| ९ | आश्लेषा | चित्रा | ? |
| १० | मघा | मघा | दिवस |
| ११ | पू. फाल्गुनी | धनिष्ठा | दिवस |
| १२ | उ. फाल्गुनी | मूळ | सायंकाळ |
| १३ | हस्त | भरणी | दिवस |
| १४ | चित्रा | मृगशिर | मध्यरात्री |
| १५ | स्वाति | रेवती | प्रभात |
| १६ | विशाखा | आश्लेषा | ? |
| १७ | अनुराधा | पू. भाद्रपद | दिवस |
| १८ | जेष्ठा | ? | ? |
| १९ | मूळ | ज्येष्ठा | प्रभात |
| २० | पूर्वाषाढा | मृगशिर | रात्रीचा प्रारंभ |
| २१ | उत्तराषाढा | उत्तराषाढा किंवा भाद्रपद | अपरान्ह |
| २२ | श्रवण | उ. भाद्रपद | दिवस |
| २३ | धनिष्ठा | धनिष्ठा | दिवस |
| २४ | शततारका | ज्येष्ठा | सूर्यास्त |
| २५ | पू. भाद्रपद | पुनर्वसु | रात्र |
| २६ | उ. भाद्रपद | उ. भाद्रपद | दिवस किंवा रात्र |
| २७ | रेवती | मृगशिर | ? |

विशेषः– आर्द्रा नक्षत्रात समाधिमरण घेतल्यास दुसरे दिवशी मरण होते. जर नाही झाले तर आगामी त्याच नक्षत्रावर मरण होते. मघा नक्षत्रावर घेतल्यास त्याच दिवशी मरण होईल किंवा आगामी त्याच नक्षत्रावर होईल. मृगशीर, पुष्य, आश्लेषा, विशाखा, रेवती या नक्षत्रावर सल्लेखना घेतल्यास केव्हां (वेळ) मरण होईल हे सांगितले नाही. तसेच जेष्ठा नक्षत्रासंबंधाने कांहीच वर्णन नाही.

**फल विचार–**

ज्योतिष शास्त्राप्रमाणे सल्लेखना मरण झाल्याने काय फल मिळेल याचा विचार वेगवेगळ्या दृष्टि-कोणातून केलेला आहे. निषीधिका, शवसंस्तर, नक्षत्र, शरीरांगोपांग, सल्लेखनेचे तिन्ही प्रकार इ. वरून फल सांगितलेले आहे.




निपीधिकेची रचना नैऋत्य, दक्षिण, पश्चिम दिशेकडे करणे प्रशस्त आहे. क्रमाने त्याचे फल संघहित-कारक, संघास सुलभता, संघाचा सुखद विहार असे आहे. आग्नेय, वायव्य, ईशान्य व उत्तर या दिशेकडील वसतिका १) अनिष्ट स्पर्धा, २) कलह, भेद वा व्याधि आणि ३) मुनिमरण याचे कारण होते.

तन्दुलचूर्ण आदीच्या संस्तराच्या रेषा यावरून असे फल आहे की वरच्या रेषा विषम असल्या तर आचार्यांचे मरण अथवा त्यांना व्याधि संभवते, मध्य भागाच्या विषम रेषामुळे एळाचार्य याचे मरण अथवा त्यांना व्याधि संभवते आणि खालील रेषा विषम असल्यास सामान्यमतीचे मरण अथवा त्यांना व्याधि संभवते.

जितके दिवस शव पशु-पक्षाकडून स्पर्शिले जाणार नाही तितकी वर्षे राज्यामध्ये क्षेम असेल. ज्या दिशेने पशुपक्षु शव घेऊन जातील त्या दिशेकडे क्षेम असेल. क्षपकाचे मस्तक अथवा दंतपंक्ति पर्वताच्या शिखरावर दिसेल तर क्षपक मुक्त झाला असे समजावे. मस्तर जर उच्च स्थळी दिसेल तर तो वैमानिक झाला आहे असे समजावे. समभूमीवर दिसल्यास ज्योतिष्क अथवा व्यंतरदेव झाला असे समजावे आणि खड्डयात पडलेले दिसल्यास भवनवासी देव झाला असे समाजावे.

रत्नत्रय पालनपूर्ण मुनि सल्लेखनेनंतर नवग्रैवेयक, अनुदिश विमान यात राहणारे देव होतात. तेजोलेश्येचे धारक जघन्य आराधक सौधर्मादि स्वर्गात देव होतात. इंगिनीमरण साधणारा मुनि मुक्त होतो किंवा वैमानिक देव होतो.

जी नक्षत्रे १५ मुहूर्ताची असतात त्यांना जघन्य मुहूर्त म्हणतात. त्या मुहूर्तावर समाधिमरण झाल्यास सर्व संघाचे क्षेम होईल. ३० मुहूर्ताच्या नक्षत्रावर मरण झाल्यास अजून एका मुनीचे मरण होईल. ४५ मुहूर्तांचे उत्कृष्ट नक्षत्र असते त्या मुहूर्तावर मरण झाल्यास अजूनही दोन मुनींचे मरण होईल. याप्रमाणे एकंदरीत खालील कोष्टकात दर्शविल्याप्रमाणे फल प्राप्ति होते.

| नक्षत्र प्रकार | नांव | फल. |
|---|---|---|
| अल्प नक्षत्र | शततारका, भरणी, आर्द्रा | सर्व संघात क्षेम. |
| मध्यम नक्षत्र | अश्विनी, कृतिका, मृगा, पुष्य, हस्त, पूर्वा फाल्गुन, चित्रा, अनुराधा, मूळ, पूर्वाषाढा, श्रवण, धनिष्ठा, पूर्वा भाद्रपदा व रेवती | एक मुनि मरण |
| महा नक्षत्र | उत्तरा फाल्गुन, उत्तराषाढा, उत्तरा-भाद्रपदा, पुनर्वसु, रोहिणी, विशाखा | दोन मुनिमरण |

**सल्लेखनेचे सर्वसाधारण फल–**

वरीलप्रमाणे विशेष भेद न करता फल खालीलप्रमाणे वर्णन केले आहे.

रत्नकरंड श्रावकाचारात असे सांगितले आहे की, धर्मरूपी अमृत ज्याने प्राशन केले आहे असा सल्लेखनाधारी जीव समस्त प्रकारच्या दु:खानी रहित होऊन, अपार दुस्तर आणि उत्कृष्ट उदय असणाऱ्या मोक्षसुखाच्या समुद्राचे पान करतो.

पद्मपुराण या ग्रंथात म्हटले आहे की, या गृहस्थ धर्माचे पालन करून जो समाधिमरण करतो तो उत्तम देवपर्याय प्राप्त करतो आणि तेथून च्युत होऊन उत्तम मनुष्यत्व प्राप्त करून घेतो.

जो यति एका भवात समाधिमरण धारण करतो तो अनेक भव धारण करून भ्रमण करीत नाही. सात किंवा आठ भवामध्ये मोक्षास जातो. बाल पंडित मरण साधणारा सात भवामध्ये सिद्ध होतो. जो गृहस्थधर्म पालन करून समाधिमरण धारण करतो तो जास्तीत जास्त आठ भव धारण करतो. नंतर निश्चित सिद्धपद प्राप्त करून घेतो. धर्मपरीक्षा या ग्रंथात म्हटले आहे की, 'जो बुद्धिमान पुरुष कषाय, निदान आणि मिथ्यात्व रहित होऊन संन्यास विधीला धारण करून मरण करतात ते पुरुष देवलोकामध्ये सुखांना भोगून २१ ( एकवीस ) भवामध्ये मोक्ष प्राप्त करून घेतात

## उपसंहार–

जीवन जगणे ही एक कला आहे असे अनेक विचारवंतांचे म्हणणे आहे आणि ते बरोबर आहे. ७२ कलेमध्ये जीवाची जीविका एक प्रमुख कला आहे. मात्र मरण ही एक कला आहे हे जैन शास्त्रातील सल्लेखना या पवित्र क्रियेवरून दिसून येते. मंगल या शब्दाचे दोन अर्थ आहेत– १) सुख प्राप्त करून देणारे आणि २) पापाचा नाश करणारे ते मंगल. सल्लेखना सविधि पार पडली तर स्वर्गादिक प्राप्त होतात आणि कषाय ( पापाचे मूळ ) नाश पावतात म्हणजेच पाप नाहीसे होतात. अशा प्रकारे सल्लेखनेला दोन्ही अर्थाने मंगलपणा आपोआप येतो. सल्लेखना भित्रा माणूस, कषायी माणूस, तृष्णावान माणूस घेऊ शकत नाही. त्यामुळे महानपणाही तिच्या वाट्यास येतो आणि जीवनातील मरण ही एक अनिवार्य घटना आहे. तिला धैर्याने, शांततेने, आनंदाने स्वीकारणे या अपेक्षेने कलात्मकता तिच्या पदरात टाकावी लागेल. या सर्व कारणामुळे सल्लेखना ही महन्मंगल जीवन कला आहे. आयुष्यभर श्रावकाचार करीत राहूनही मरणाचे वेळी दुःख, वेदना आदीचा अनुभव झाला तर त्या श्रावकाचारात अपूर्णता रहाते कारण सल्लेखना हे देखील श्रावकाचाराचेच एक प्रमुख अंग आहे आणि अवश्य अनुष्ठेय आहे.

कर्मसिद्धांत असा आहे की, सात कर्माचा बंध सतत होत असतो आणि आयुकर्मच एक असे आहे की, त्याचा बंध आयु त्रिभागात होतो. तो केव्हां येईल हे छद्मस्थ जीवाला सांगता येत नाही. त्यामुळे निर्मळ चारित्र्याचे पालनच सतत ठेवणे हितावह ठरते. देश स्वातंत्र्य, राष्ट्र स्वातंत्र्य, व्यक्ति स्वातंत्र्य यासाठी आपण झुंज देण्याची तयारी ठेवतो मग आत्मस्वातंत्र्यासाठी का नसावी ?

एके ठिकाणी शरीराचा व मानवाचा संवाद वाचलेला आठवतो. शरीर मानवाला म्हणते, "भल्या माणसा, मी जड आहे, नाशवंत आहे. त्याला आत्मा आपल्या चैतन्यशक्तीने सारथ्यासारखे चालवतो, मृदंगासारखे बोलवतो पण ही जबरदस्तीच नव्हे का ? पण हे चालणार कोठपर्यंत ! तू माझ्यावर विश्वास ठेवतोस हा अविवेक आहे पण मी माझा स्वभाव सोडणार नाही, तेव्हां त्यावेळी तू विवेकसंपन्न व्हावे यातच तुझी सार्थकता आहे. खरा पुरुषार्थ आहे." शेवटचे वेळी सावध रहाण्याचीच सूचना स्वतः शरीराने आपण होऊन मानवास दिलेली आहे.

जीवनाचे शेवटचे कर्तव्य सल्लेखना आहे. ते कर्तव्य पार पाडणे मात्र सुलभ नाही. व्यवस्थितरितीने या कर्तव्याचे पालन झाले तर समजावे की जीवनभर केलेल्या आचरणाचे फळ मिळाले. म्हणूनच विवेकी जीव प्रार्थना करतो–

दुक्खक्खओ, कम्मक्खओ, समाहिमरणं च बोहिलाहो य ।
मम होउ जगत बंधव, जिनवर तवचरणसरणेण ॥

# समतोल तत्त्वदर्शन

एक तुलनात्मक चिंतन–

## अर्घ्य ८ वा

आंतर भावदर्शन–

१) अथातो ब्रह्मजिज्ञासा, २) विज्ञानमयता, ३) तर्क-न्याय-शास्त्र, ४) ज्ञान मार्गातील सुसंवाद,
५) द्रव्यलक्षण–समीक्षा, ६) सत्ता : एक ज्ञानतत्त्व, ७) स्वतत्त्वाची उपलब्धी,
८) कर्मसिद्धान्त, ९) देवता-विमर्श, १०) वीतरागता, ११) धर्माचार-मार्ग,
१२) साहित्य-कला-दृष्टी, १३) शासन संस्थेवरील प्रभाव,
१४) जीवनमूल्यांची प्रतिष्ठा, १५) मंगलमयता.

## १ अयातो ब्रह्मजिज्ञासा–

तौलनिक अनुशीलनाच्या निमित्ताने खंडन-मंडन-स्वरूपाचे विवरण येथे प्रस्तुत नाही. हे केवळ बोधिमार्गातील तोल सांभाळण्याच्या दृष्टीने आवश्यक असलेले मार्गदर्शन होय ! त्यामुळे जैन तत्त्वातील वैशिष्ट्यांचे परिशीलनही करावयाचे नाही. खंडनाचा उद्देश तर स्पष्टत: विफल ठरतो. कारण तो आत्माविष्काराचाही प्रकार नसतो. ते आत्मविजयाचे खरे स्वरूपही नव्हे ! गुणविकास-मार्गातील आत्मविजय हा सर्वोदयास समर्थ ठरतो. शिवाय या ग्रंथरूपी पात्रामध्ये भरून ठेवलेल्या अर्घ्यवस्तूमध्ये त्यातील वस्तुत्वाचे व ज्ञानतत्त्वाचे दर्शन वाचकाला स्वयंगत होत असते. तेव्हा एकाचे मनोगत दुसऱ्यावर लादण्यात मतलब उरत नाही. आणि याच कारणासाठी येथे पूर्व विषयाचा सारांश सांगणेही प्रस्तुत नाही. कारण या पूर्णार्घ्यातील सर्व वस्तू स्वयं सारभूतच आहेत. तरीपण तत्त्वाभ्यासात देखील तोल जाण्याचा संभव फार असतो. आमच्या वाचकाचा असा तोल जाऊ नये आणि तो जाऊ लागताच सांभाळण्यासाठी कोणती सावधगिरी बाळगावी याचे केवळ मार्गदर्शनच येथे प्रस्तुत विषय आहे. कारण हा कळसाध्याय आहे. अध्ययनातील संज्ञावस्थेचा तोल गेला की, शिखर व मंदिर या दोहोंची स्थिती ढासळते. खऱ्या तत्वानुशीलतेची व केवलज्ञानरूप कळसाची परम स्थिती गाठावयाची असेल तर आपली ज्ञानसाधना मुळापासूनच 'सत्' तत्त्वाशी पूर्णत: सुसंगत राखली पाहिजे. अतत्त्वमार्गाचा परिहार करता येणे आवश्यक ठरते. म्हणून ज्ञानमार्गातील समतोल साधण्याच्या उपाय-अपायांचा शुद्ध विचार करणे येथे प्रस्तुत आहे.

या सुखग्लानीच्या युगामध्ये आपल्या जीवनात इतकी अस्वस्थता, अनिश्चितता, अविश्वास, गैरसमज, संघर्ष इतका बोकाळला आहे की, जीवनातील दुर्गुणांची व अपात्रतेचीच नव्हे तर सद्गुणांची व सुपात्रतेचीही दुर्दशा होत असलेली अनुभवास येते. एकीकडे उच्च आदर्शवादाची वैचारिक व भावनिक आश्वासने मिळत राहतात, पण त्याचवेळी वैयक्तिक अस्वस्थता, सामाजिक अस्थिरता आणि राजकीय गोंधळ जीवनाला भेडसावीत राहतात. सारी मानव जातच अधोगामी बनत आहे. भ्रांत अवस्था वाढत आहे. अशाच जीवन संकटाना तोंड देण्यासाठी धर्ममार्ग समर्थ व शांति-तुष्टि-पुष्टीदायक आहे असे सांगितले जाते. जगातील सर्वच संस्कृतिवादियांनी धर्ममार्ग उचलून धरण्याचा प्रयत्न केला आहे. पण तो परिणामकारक ठरलेला आहे–ठरत आहे– किंवा ठरणे शक्य आहे हे सर्वांना पटणे असंभवच आहे. कारण धर्माचा अंगीकार करणाऱ्यांना तरी धर्म तत्वत: गवसला आहे असा प्रत्यय येत नाही. दैनंदिन जीवनातील विसंगतीपेक्षा धर्ममार्गातील विसंगती अधिकाधिक विदारक आढळते. धर्मक्षेत्रातील अनेक वाद एकमेकांवर कडाडून हल्ला करतात आणि शेवटी सर्वांचाच नाश होत असलेला आढळतो. ज्ञानवाद श्रेष्ठ की क्रियावाद या विवंचनेत अर्थ उरत नाही. कारण श्रेष्ठता कोठेच प्रत्ययास येत नाही. परिणामी एकीकडे अंधश्रद्धा तर दुसरीकडे अश्रद्धा माजत राहते. अश्रद्ध लोक अंधश्रद्धेवर हल्ला चढवितात. त्यांच्या धर्माला अफूची गोळी समजून त्याची हेटाळणी करतात. त्यातील पुरोहितवादावर तुटून पडतात. आणि खरोखरच केवळ सुख कवटाळणाऱ्या धर्माधर्मांमध्ये विरोध वा विसंगती का असावी हे नीट सांगता येत नाही. **एगकज्जपवन्नाणं विसेसे किं नु कारणं ।** या साध्या सरळ प्रश्नाचे उत्तर न आढळल्यास विप्रत्य-अविश्वास का बरे वाढणार नाही ?

अशा प्रकारच्या मानसिक अविश्वास व अस्वस्थता याबरोबरच दैनंदिन जीवनातील अस्थिरतेमध्ये तांत्रिक आणि भौतिक शास्त्रातील नवनव्या शोध-सुधारणांनीही भर घातली आहे. शास्त्रीय प्रयोगांनी निसर्गावर मात करता येते, वैश्विक शक्तीवर हुकमत गाजवता येते असा फुका गर्व झाला आहे. कारण तेवढ्या प्रमाणात आपण मानवतेला– मन:शांतीला दुरावत आहोत असा प्रत्यक्षातील अनुभव आहे. जेथे आधुनिक प्रगती अधिक तेथे हिप्पीही अधिक आढळतात. तेथेच कुटुंबसंस्थेतील प्रेमळपणा नष्ट होत आहे. बळजबरी आणि अतिक्रम, बलात्कार आणि ऊपभोग बळावत आहेत. सायन्सच्या कल्पना वस्तुविवरणात्मक असल्या तरीपण आत्मसंवेदनाला मात्र त्या विसगत वा निरुपयोगी ठरतात. म्हणून हा खरा विज्ञानवाद नव्हे ! भौतिक शोध तत्काल सोयीस्कर

वाटतात एवढ्याच अर्थाने त्यांना महत्त्व येते. पण त्यातून जीवनप्रधान घटनांचा व सुखाच्या तथ्याचा बोध होत नाही. हतसुख व हितसुख यांच्या भोगक्षेत्रातील सीमारेषा आखता येत नाही. मानवता, सार्वत्रिक जीवनधर्म, चैतन्यानुभूती इत्यादी भावात्मक जीवनमूल्यांवर प्रकाश पडत नाही.

यामुळे जीवन आणि निसर्ग– जीव आणि जगत् यांची खरी ओळख पटण्यासाठी अशा खंडित व तोकड्या अनुभवांपासून पार पलीकडे जाऊन शुद्ध संवेदनशीलतेचा– अलौकिकतेचाही वेध घेता आला पाहिजे ! विश्वतत्त्वा-पेक्षा– उपभोग्यतेपेक्षाही स्वतत्त्वाची ओळख करून घेता आली पाहिजे. सुखवादापेक्षा– सुखासीनतेपेक्षा सुखतत्त्व शोधणे व अनुभवणे यातील जीवननिष्ठा अधिक निकट आहे. असा प्रयत्न झाला तर आंतरजीवनाची आणि द्रव्यव्यवस्थेतील विज्ञानाची संगती साधता येईल. चेतनारहित विज्ञानमार्गाने जीवन भलतीकडेच वळलेले आढळते. Lost-horison च्या अवस्थेत कितीही पल्ला गाठला, वेग सुधारला तरीही त्याला प्रगती म्हणता येत नाही. ती केवळ भटकंतीच असते ! ही दुर्मिळ संगती साधणे हाही धर्माचाच विषय आहे. मात्र पुष्कळ वेळा तथाकथित ( Socalled ) धर्म या क्षेत्रात अयशस्वी ठरलेले दिसतात. म्हणूनच धर्माची किंवा विज्ञानाची केवळ संभृहित कल्पना सोडून देऊन तथ्यभूत मार्ग शोधणे व स्वीकारणे अटळच ठरते.

जेथे या जीवनतथ्यांचा शोध लागला, व्यवहारी आणि आंतरजीवनातील सुसंगती सापडली आणि प्रत्यक्षात अनुभवताही आल्याने आप-पर अशा सर्वच जीवांचा मुखोदय झाला त्या मंगलमय सर्वोदय तीर्थात उगम पावलेल्या कषायरहित, केवली, श्रुतकेवली, पूर्वधर, आगमधर ज्ञानदेवांनी या संसृतिशृंखलेत भ्रांतपणे अडकलेल्या जीवांच्या उद्धारासाठी किंवा संसारातील जीवन सर्वतोपरीने मंगलमय करण्यासाठी जीवतत्त्वानुसार जो प्रयत्न केला त्यामुळे अखिल मानवांवर अनंत उपकार झाले आहेत. मानव्याची स्थिती सदैव संपन्न राहण्यासाठी पुढील शोधतत्त्वांचा आपल्या संस्कृतीवर फार मोठा प्रभाव पडलेला दिसतो. त्यामुळेच तर भारतीय संस्कृती इतर संस्कृतीपासून वेगळी आढळते. तिचा प्रभावच वेगळा असल्याने त्यानुसार तिची फलप्राप्तीही वेगळीच जाणवते. जैनाचार्यांचे सांस्कृतिक कार्य ते हेच होय. त्याचे मूल्य मोजण्याचे कोणतेही माप या जगतीतलावर आज तरी उपलब्ध नाही. कारण तो एक चिंतनशीलतेचा आंतरिक विषय आहे. अशा या आत्मपर समतोल चिंतनातील काही मुद्दे मात्र येथे वानगीदाखल नमूद करीत आहे––

### २ विज्ञानमयता–

विज्ञानाची कास धरल्याशिवाय अंधश्रद्धा व अश्रद्धा आपल्या जीवनातून दूर होत नाहीत. जीवननिष्ठा सुनियत ठेवण्यासाठी आपले धर्ममार्ग हे ज्ञानमार्गच असले पाहिजेत. धर्मश्रद्धा व ज्ञाननिष्ठा एकाकार पावल्या-शिवाय ही कोंडी फुटत नाही. जिनधर्म मूलतःच केवलिप्रणीत आहे. आमूलाग्र ज्ञानमय आहे. ते ज्ञानही इंद्रियधर्मी व कल्पनागत नसून तत्त्वगतच आहे. ते त्यामुळे शुद्धच असते. भ्रांती, आभास, व्यामोह इत्यादी विकारी संज्ञांचा परिहार आपोआप होतो. या केवल-ज्ञानाधिष्ठानामुळेच जिनतीर्थातील साधकांना **मुनी** (आत्मज्ञानी), **समण** ( राग-द्वेषानुसार ज्याचा तोल जात नाही ), **वीतराग** ( कषायादि दोष-रहित ) इत्यादी सत् तत्त्वदर्शक अभिधाने प्राप्त झाली आहेत. हा अर्हत् धर्म ज्ञानसाधनेशी इतका एकरूप होत असतो की, त्याला धर्माचार म्हणण्यापेक्षा ज्ञानमयताच म्हणतात. ज्ञान व जिन एकार्थवाची आहेत. यामुळे अंधश्रद्धेचा किंवा अश्रद्धेचा शाप या स्वयंप्रभावी धर्माला बाधू शकत नाहीत. धर्माचारात संभ्रम निर्माण झाला तर विज्ञानाच्या समागमाने त्याची परीक्षा करावी असे स्पष्टपणे सांगणारा धर्म या पृथ्वीतलावर हाच एकमेव असावा–

विन्नाणेण समागम्म धम्मसाहणमिच्छियं ॥ (उत्तराध्ययन, २३।३१)

कोणत्याही चिंतनशील जीवाने आपल्या शुद्ध प्रज्ञेला अनुसरून या धर्मतत्त्वाची केव्हाही समीक्षा करावी. या धर्मातील प्रत्येक तात्त्विक विधानाला प्रज्ञेची साक्ष सापडेल ! तत्त्वाचा– धर्मतत्त्वाचा निर्णय प्रज्ञेच्या बळावर करणारा हा धर्म विज्ञानवादी न ठरला तरच आश्चर्य–

पन्ना समिक्खए धम्मतत्तं तत्तविणिच्छियं ॥ (उत्तराध्ययन, २३।२५)

या विज्ञानदृष्टीमुळेच जैनधर्म स्वर्गसुखानाही तुच्छ समजतो. जगातील सारे धर्म अधिकाधिक सुखोपभोग किंवा स्वर्गीय भोग मिळविण्यासाठीच झटत असताना त्या भोगवादाकडे पूर्णतः दुर्लक्ष करून शुद्ध, स्वात्मभूत, निराकार केवल ज्ञानाची आराधना करणारा जैनधर्म तसा जगावेगळा वाटला तरी ते नवल नव्हे ! एका अर्थाने जैनांचा विज्ञानवाद आधुनिक सायन्सपेक्षाही अधिकोत्तर गुणवादी व परिपूर्ण आहे.

सामान्यतः सायन्स-विद्याशाखेलाच विज्ञान समजतात. पण त्यात केवळ अचेतन पदार्थाचेच विश्लेषण असते. त्यात जड वस्तूंच्या तत्कालीन व प्रयोग-प्रक्रियाशील अवस्थांचेच ज्ञान होणे संभवनीय असते. पण द्रव्यात्मक व गुणात्मक तथ्याचे वैदिक ज्ञान होत नाही. कारण निर्दोष सत्तेचे स्वरूप समजून घेण्यास वाव मिळत नाही. बाह्य आविष्काराच्या पलीकडील गुण (तांबडा, हिरवा इत्यादी रंगछटांच्या पलीकडील रंगतत्त्व) म्हणजे काय, पदार्थातील द्रव्यत्व काय असते इत्यादी प्रज्ञाक्षेत्रात सायन्सचा प्रवेश अद्याप व्हावयाचा आहे ! जीवतत्त्वाच्या भावावस्थेचे आणि शुद्ध चैतन्यानुभूतीचे परिज्ञान तर पूर्णपणे दुरावते. जिनांचे केवलज्ञान मात्र असे लंगडे नाही. ते द्रव्यमय शुद्ध अचेतनत्व तर जाणतेच पण त्याहीपुढे सायन्सला अज्ञात ठरलेल्या चेतनानुभूतीचेही ते आस्वादन घेते. त्याच्या ज्ञानाचे परिक्षेत्र द्रव्यत्व, गुणत्व, पर्यायत्व आणि ध्रुवत्व असे विश्वव्यापक आहे. म्हणूनच जिनांनी भोगावस्थेपेक्षा चेतनावस्था कवटाळली आहे. भोग इंद्रियाधीन असतात. केवळ चेतोऽवस्थाच पूर्ण विज्ञानमय आहे.

## ३ तर्क-न्याय-शास्त्र–

अशा चिन्मय ज्ञानाचा व अनुभूतीचा मूलाधार जीवच आहे. म्हणून या जीवतत्त्वाचा व जीवनाचा विचार हाच प्रमुख ज्ञानविषय ठरतो. या चेतनातत्त्वाची कास धरल्याशिवाय वस्तुधर्म किंवा ज्ञानमार्गातील तर्कसिद्धी आणि संज्ञानुभूती यातील फरकही जाणता येत नाही. संज्ञानुभूतीशिवाय केवळ तर्कवादातून निरर्थक कल्पनातिरेक पराकोटीला जातो. त्यातून एक तर अवस्तुवाद किंवा ईश्वरवाद अशी गृहितेच जन्माला येतात. म्हणूनच स्पिनोझाचा शुद्ध तर्कवाद जीवनानुभूतिशून्य ठरला. केवळ तार्किकता म्हणजे ज्ञानानुवाद नव्हे ! अनुभूतिजन्य ज्ञानमार्गातच सुसंगती साधावी लागते. म्हणून अनुपलब्धीतून परम सत्याचा शोध घेणे केवळ अशक्य ठरत असल्याने परमेश्वरवाद किंवा कूटस्थ नित्यवाद अग्राह्य ठरतो. मायावाद जग मिथ्या मानतो तर बर्कले महाशय वस्तूच मानीत नाहीत. ह्यूमसाहेब फक्त कल्पनेचीच सत्ता मानतो. केवळ तात्त्विक संकेत म्हणजे कविकल्पना होत. ज्ञानमयता स्वसंवेदनेच्या बाहेर कोठेही आढळत नाही. मात्र संवेदना म्हणजे केवळ इंद्रियगत अध्यवसाय नव्हे. अध्यवसायातूनच भासमयता, मायावाद, शून्यवाद इत्यादी अज्ञानांना निर्माण होण्याची शक्यता संभवते.

तत्त्वविचारातील ही रेशमी कोंडी फोडण्यासाठी 'अनेक धर्मात्मकमेव वस्तु' ही द्रव्यस्थिती ओळखणे व स्वीकारणे क्रमप्राप्त ठरते. विश्वातील पदार्थ-व्यवस्था, गुण-पर्याय-ध्रौव्यात्मक द्रव्यलक्षण, शुद्धज्ञानप्राप्तीचे मूलस्थान, त्याचप्रमाणे चित्तभ्रांतीचे-अध्यवसायाचे निमित्तकारण, मोहनाशाचा उपाय आणि ज्ञानतत्त्वभूत आत्मस्थिती या सर्वांची स्वरूपात्मक निश्चिती केली पाहिजे. अर्पितानर्पित-भावातील सापेक्षता समजून घेतली पाहिजे. इंद्रियजन्य ज्ञानमार्गातील आंधळेपणा व पांगळेपणा टाकला पाहिजे. कारण केवळ तार्किकतेला वनराईतील वृक्षत्व दिसत नाही व नुसत्या इंद्रियानुगामितेला वृक्षत्वातील वनस्पती गम्य होत नाही. इंद्रियानुवर्ती ज्ञानप्रक्रियेतील समत्व साधण्यासाठी स्याद्वाद अंगीकारावाच लागतो. कारण तत्त्वत:च सत्य (सत् तत्त्व) एकावयवी नसून ते विश्वरूप असते. (प्रवचनसार गाथा ८).

सत्यातील विविध बाजू परस्पर विसंगत भासल्या तरी, वस्तुधर्मच अनेकरूप असल्यामुळे त्या सर्व अवस्था सुसंगतच ठरतात. एका अर्थाने शुद्ध तर्कवाद देखील कल्पनेचा विषय नसून तो वस्तुधर्मात्मकच आढळतो. म्हणून अनेकधर्मात्मक द्रव्यलक्षणच खरे तर्कशास्त्र होय. या वस्तुनिष्ठ श्रद्धेवरच त्याचा कटाक्ष आहे. तत्त्वस्थिती देखील सापेक्षतेने अनेक कोनातून पाहता येते. म्हणूनच सापेक्षवाद महत्त्वाचा पल्ला ठरतो. एकान्तवाद-नियतवाद व्यर्थ होय. अनेक धर्मात्म वस्तुस्थितीमुळे अनेकान्त-स्याद्वाद-सापेक्ष पद्धतीच तत्त्वनिष्ठ ज्ञानमार्ग ठरतो. आंतरिक चेतोबलापेक्षा विवरणातील शब्दबल इतके तोटके आहे की कोणत्याही विधानात संपूर्ण सत्य (द्रव्यस्थिती) मांडता येत नाही- आणि शब्दाच्या असमर्थतेसाठी तत्त्वविवरणही वदलता येत नाही. म्हणून सापेक्षता-स्याद्वाद-अनेकान्त सिद्धान्त स्वीकारावाच लागतो. यामुळे प्रस्तुत विधानात एकच बाजू असली तरी उरलेल्या बाजूही समजून घेणे शक्य होते. प्रत्यक्ष परिणमन दिसत असले तरी वस्तुगत गुणत्व व ध्रुवत्व आढळते. आणि यामुळेच ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या या अद्वैताची (दीड का दोन या समस्येची) सोडवणूक गवसते.

अंशात्मक कथन वा नयवाद हा मूलतः कल्पनाग्राहक तथा संज्ञामूलक आहे. युरोपीय तत्त्वज्ञानामध्ये व वेदपरंपरेतील सर्व दर्शनांमध्ये याच नयवादाचा अनुभव येतो. म्हणूनच त्यातील सत्य अंशात्मक आढळते. सापेक्ष स्याद्वाद मात्र सर्वंकष ज्ञानाला सुपात्र आहे. तो अन्यान्य-गुणधर्म-ग्रहणशील आहे. केवळ विवरणात्मक प्रणालीच्या दृष्टीने तो सात भंगात्मक आहे.

केवळ दूषितग्रहामुळे किंवा उपेक्षेमुळे श्रीमत् शंकर-रामानुज इत्यादी दार्शनिकांनी किंवा प्रा. बेलवलकरांसारख्या विचारवंतांनीही स्याद्वादावर टीकास्त्र सोडून पाहिले आहे. तो प्रहार वस्तुव्यवस्थेमुळे आपोआपच व्यर्थ ठरतो. हेच ओळखून डॉ. राधाकृष्णन्सारख्या वैदिक विद्वानांनी देखील स्याद्वादाची महती मान्य केली आहे– "सद्भूत स्वरूपाप्रमाणेच असद्भूत स्वरूपामध्येही वस्तूची ओळख निश्चितपणे पटते. आणि म्हणूनच वस्तुनिष्ठ सत्यतत्त्व अनेकान्तस्वरूपीच आढळते. वस्तूतील फक्त सद्-भावांचेच विवरण प्रस्तुत असतानाही त्यातील असद्-भावाशी देखील जे विधान सुसंगती साधते तेच परम सत्य ठरत असते." (Indian Philosophy, Vol. I (1931), P. 304). आणि सत्याचे हेच तात्त्विक स्वरूप सप्तभंगी स्याद्वाद सिद्धान्ताला तंतोतत लागू पडते !

सत्यान्वेषनातील शुद्ध तर्कवादी पाश्चात्य विद्वानांचा वितंडवाद आणि सोफिस्टांची व बौद्धांची टाळाटाळ यांतून कोणतीही उपलब्धी होऊ शकत नाही. यामुळे मूळ जिज्ञासा अतृप्त तरी राहते किंवा तिला नको तितके फाटे तरी फुटतात. नपेक्षा केवळ कल्पनेतच तरंगत राहावे लागते. याउलट सापेक्षवादातील सुसगतीमुळे परस्पर विरोधी गुणांतील तत्त्वार्थ जाणता येतो. असत् मध्येही सत् आढळते आणि वस्तुधर्माची खरी प्रतीती येते. 'पाणी गरम नाही' या विधानातूनही ते गार असल्याचे कळते. शिवाय एखाद्या महिलेला 'भगिनी' म्हणत असताना तिचे 'मातृत्व' नष्ट होते असेही नाही. विरोधी भावातील सुसंगती साधल्याने त्या गुणांमध्ये फरक होत नाही. अण्णोण्णविरुद्धमविरुद्धं (–पंचास्तिकाय ५४) ही वस्तुस्थितीच आहे. ती समजावून घेणे हा तर्कशास्त्रातील कळसाध्याय होय. म्हणूनच जैन तर्कशास्त्र केवळ तार्किक, कल्पनात्मक, कृत्रिम व अनुमानप्रधान न बनता उलटपक्षी ते अधिक प्रमाणात तथ्यबोधक व वस्तूतील सत्, असत् इत्यादी विसंगत वाटणाऱ्या गुणांमध्येही सुसंवाद निर्माण करणारे ठरत असल्यामुळे सर्वंकप ठरले आहे. जैन तर्कपद्धतीतून व न्यायशास्त्रातून कूटस्थ नित्यवाद किंवा मायावाद निर्माण होऊ शकत नाही. द्रव्यातील गुण नित्य असूनही, द्रव्यत्वामध्ये ध्रुवता असूनही त्याचे पर्याय (गुणाची आविर्भावात्मक अवस्था) मात्र अनित्य असतात. म्हणून द्रव्यत्व गुणपर्यायरूपच ठरते. सापेक्षता म्हणजेच खरी तर्कसंगती. खऱ्या सत्तास्वरूपाचा अर्थाविष्कार करणे हेच तर्कशास्त्राचे कार्य आहे. ते जैन प्रणालीने साध्य केले आहे.

असत्‌ची धारणा नेहमी भावस्वरूपीच असते. सत्प्रमाणे त्यात प्रत्यक्षानुभूती नसते. सत् व असत् स्वरूपातील सर्व धारणांची सुसंगती साधली तरी त्यातील परस्पर संबंध नेहमीच व्यक्त करता येतील असे नाही

(अवक्तव्यता). म्हणून वस्तुधर्मातच सापेक्षता आढळते. ती समजून घेणे हा तर्कसंगतीचा खरा उपयोग होय. निरपेक्ष एकान्तवाद म्हणजे केवळ विसंगत बडबड होय. वस्तुगत सर्व सत्यधर्म सापेक्षच असतात. मात्र ही परस्पर सापेक्षता असीम असल्यामुळे ती अवक्तव्य ठरत असते. याराठीच जैन तत्त्वज्ञानामध्ये अनेकान्त दृष्टी स्वीकारली आहे. ही सर्वकष दृष्टी अनुमान व अनुभूती या दोन्हीतील प्रत्येक क्षेत्रात अनुस्यूत झालेली आढळते. शिवाय तत्त्वज्ञान म्हणजे उपलब्धीरहित केवळ तार्किकता नव्हे! वस्तुधर्माचा व जीवनमूल्याचा संबंध घनिष्ठ आहे. यातील परस्पर सातत्य साधणे म्हणजेच न्यायशास्त्र होय. त्यातून तत्त्वज्ञानाचा अभ्यास सुलभ होतो. अनुभूतीचा लाभ होऊन आपली ज्ञानचेतना वर्धमान व्हावी यासाठी वस्तुगुण-दर्शक न्यायशास्त्र आणि स्वानुभूतीला अनुकूल दृष्टिकोण यांचा सुंदर संगम अनेकान्तामध्ये साध्य झाला आहे. भाषेच्या परिमित शब्दाविष्कारामध्ये विश्वाची व स्वतत्त्वाची अनंतधर्मात्मकता व्यक्त करणे हाच जैन तत्त्वज्ञानाचा उद्देश आहे. आणि हा उद्देश साध्य करण्यास अनेकान्त समर्थ ठरला आहे. म्हणून या युगी अनेकान्ताचा जगभर आविष्कार करणे ही एक निकडीची गरज आहे. कारण त्यामुळे मानव्यतेमध्ये भर पडते.

## ४ ज्ञानमार्गातील सुसंवाद–

या विश्वातील तत्त्वे व त्यांच्या मूलोत्तर गुणांचा आविष्कार अनंत आहे. आणि ती तत्त्वे जाणण्याचा प्रयत्न करणाऱ्या मानवाचे ज्ञान मात्र अनंतगुणी होण्यास समर्थ नसते. जोवर त्याच्या चेतोवृत्तीत तत्त्वतः असलेली अनंतता प्रगट होत नाही तोवर त्याला त्याच्या इंद्रियांवरच अवलंबून राहावे लागते. या इंद्रियांची अनुभूती मात्र फारच मर्यादित असते. ही मर्यादा ओलांडून त्यापुढील जिज्ञासा पूर्ण करण्यासाठी ज्या ज्ञानमार्गांचा शोध घेण्याचा प्रयत्न झाला, त्यातूनच अनुमान-तर्क-पद्धतीचा जन्म झाला आहे. ही तर्कशुद्ध जिज्ञासाच आपल्या समग्र तत्त्वज्ञानाची आधारभूमी बनली आहे. या तर्कशास्त्राच्या चक्रव्यूहात शिरणे जमले तरी तो व्यूह भेदून बाहेर पडणे फारच अवघड! प्रत्यक्षात कित्येक तत्त्वज्ञ अभिमन्यूना बाहेर पडता आलेले नाही. ती कोंडी फोडण्याचा प्रयत्न मात्र जगभर चालू आहे. त्यातून निरनिराळ्या पद्धती–प्रणाली जन्मास येत राहिल्या. त्यातील विविधतेमुळे अधिकाधिक व्यामोहच निर्माण झाला. परिणामी विफलताच वाट्याला आलेली दिसते. अलीकडे तर खऱ्या अर्थाने तत्त्वज्ञानाचा अभ्यासही कमी होत आहे.

सध्या अनंतज्ञानी कोणीच उपलब्ध नसल्याने तत्त्वार्थाच्या शोधासाठी व विचारसरणीतील सुसंगतीसाठी तर्कशास्त्राचा आश्रय घेतल्याशिवाय चालत नाही. पण 'तर्क' केवळ एक तर्कबुद्धी म्हणून ज्ञानगामीच ठरेल याची शाश्वती नसते ही खुबी विसरणे मात्र निश्चितपणे आत्मघातक ठरते. आपली तर्क faculty ज्याच्यावर अवलंबून असते ती इंद्रियादिक साधने शुद्ध नसतात. कारण इंद्रिये नेहमी भोगातुर व विकारवश राहूनच कार्यशील होतात. मग तो विकार जन्मगत असो, परिस्थितिजन्य असो, वयोभूत असो, लिंगसंवेद्य असो, अनुभव-जन्य असो, शारीरिक असो, बुद्धिविकार असो किंवा मनोमय अध्यवसाय असो– अशी कितीही विविधता असली तरी ह्या विकारी अवस्था खऱ्या ज्ञानाला पोषक नसतात. त्यामुळेच मूल तत्त्वांचा शोध लागत नाही. तरीही या मार्गातील प्रयत्न गतिशील ठरले व त्यात काही पल्ल्यापर्यंत प्रगती झालेली भासली. पण दिशा चुकल्यामुळे ज्ञानसिद्धी झाली नाही. यासाठी विकारातीत चेतोमार्गच खऱ्या तत्त्वाचा शोधक ठरतो. या दृष्टीने तत्त्वज्ञानाच्या परिशोधांचे विश्लेषण केल्यास या जिज्ञासामार्गातील तत्त्वशोधाची आधारभूमी म्हणून i) इंद्रियप्रत्यय, ii). मनःप्रत्यय, आणि iii) द्रव्यत्वप्रत्यय असा तीन पद्धतींचा उपयोग केलेला आढळतो–

i) इंद्रियप्रत्यय– इंद्रियांची वृत्ती भोगप्रधान असते. त्यांचा भोग स्वैर असतो. त्यामुळे त्यात स्वच्छंदभाव अवतरतो. वस्तू जशी आहे तशी जाणणे हा त्याचा धर्मच नसतो. इंद्रियांच्या भोगमयतेमध्ये एकच वस्तू विषय भासते– रिकाम्या पोटी वेगळी तर भरल्या पोटी न्यारीच. त्यांचा निर्णय वस्तुनिष्ठ नव्हे तर वासनागत असतो.

म्हणून इंद्रियप्रवृत्तीला अनुसरून होणारा वस्तूचा प्रत्यय हा प्रवृत्तिमय ठरतो. या प्रवृत्तिक्षेत्रातील तर्कवाद ज्ञानमार्ग ठरत नाहीत. यामुळेच पाश्चात्य प्रणालीतील अनेक सिद्धान्त निरुपयोगी ठरू पातले. यास्तव इंद्रियगत ज्ञानसाधनेशिवाय अन्य अधिक समर्थ ज्ञानमार्गाचा अवलंब करणे क्रमप्राप्त ठरते.

ii) मनःप्रत्यय– इंद्रियानुभूतीचे क्षेत्र व्यापक असले तरीपण इंद्रियांचा अभ्यास गोलवर केल्यास असे आढळते की, इंद्रिये स्वतः जाणत नाहीत वा भोगत नाहीत, त्यांची संवेदना परतः असते. ही इंद्रियसंवेदना मूलतः परतत्त्व असून, ती इंद्रिये देखील साधनभूत ज्ञेय वस्तूच आहेत, ज्ञाते नव्हेत. ज्ञानतत्त्व वेगळे असून तत्त्वत. ते चेतनामय असे स्वतंत्र मूलतत्त्व आहे. अचेतन व सचेतन या दोन भिन्न भिन्न तथ्यांमधील इंद्रियता हा मियोभाव आहे. इंद्रियांची रचना जड असून त्यातील 'जाणणे' ही शक्ती जीवतत्त्वाधीन आहे. म्हणजे खरा ज्ञाता मन नसून जीव तत्त्वच आहे. जीव प्रकृत्याच सचेतन–ज्ञानमय असून स्वसंवेदन हा त्याचा मूलधर्म आहे. हे स्वसंवेदन ज्याचे त्याला जाणवतेच. म्हणून स्वसंवेदन किंवा आत्मप्रत्यय हाच खरा ज्ञानमार्ग होय.

जीवाचा 'चित्' धर्म नियत व शाश्वत आहे, तसा जडाचा कोणताही धर्म चिन्मय नसल्याने जडतत्त्व अनियत व अशाश्वत आहे. यासाठी आत्मानुभूतीच खरे ज्ञान असून जडाचा प्रत्यय आभासमय ठरतो. अशा आत्मप्रत्ययालाच भारतीय तत्त्वप्रणालीमध्ये दर्शन म्हटले आहे. पाश्चात्य पद्धतीप्रमाणेच या दर्शनमार्गातही जीव व जड या दोन्ही तत्त्वांचा अभ्यास केलेला असला तरी जीवतत्त्वातच आत्मप्रत्यय येतो. तो जडतत्त्वातून येत नाही. शिवाय जडतत्त्व पूर्णतः जाणणे कठीण आहे. जडतत्त्व जाणण्याची जी साधने– इंद्रिये– आहेत ती स्वतः असमर्थ आहेत! इंद्रियज्ञान अध्यवसायात्मक असते. आणि अध्यवसाय तर ज्ञानसाधनेत प्रतिपक्ष आहे. या अध्यवसायी इंद्रियांशिवाय जग-जड-तत्त्व जाणण्यास दुसरा पर्यायच नाही. जडतत्त्व तर स्वत.ला, जीवात्म्याला अगर इतर कोणत्याही तथ्याला जाणत नाही.

तरीही चेतना तत्त्व यथार्थ न जाणल्याने हा मनःप्रत्ययाचा मार्ग देखील अपुरा पडतो. म्हणूनच वैदिकांच्या दर्शनमार्गाने देखील विश्वातील संपूर्ण तत्त्वाचे ज्ञान यथार्थतेने होऊ शकले नाही. आणि या अपूर्णतेचे मूल कारणही त्यांना सापडले नाही. यामुळे त्या परंपरेतील दर्शनांमध्ये विविधतेबरोबरच विस्कळितपणा व विसंगतीही अवतरली. देहात्मवाद, द्वैतवाद, निर्गुणात्मवाद, मायावाद, शून्यवाद, अद्वैतवाद इत्यादी मतांतरे उदयास आली आणि खंडितही झाली. ते सर्व दर्शनवाद मूलतः एकाच वैदिक परंपरेतील असूनही– एकाच सूत्राचे विवरण प्रस्तुत असतानाही, त्यांच्यात इतका विरोध निर्माण झाला की, त्यांनीच एकमेकांचे पूर्णतः खंडन केले. त्यामुळे मंडनातील स्वीकार्य मुद्दाच शिल्लक उरला नाही. या दर्शनांच्या व्यामोहातून शुद्ध ज्ञानतत्त्व अस्पष्टच होत गेलेले आढळते. ही झाली सामान्यांची दशा. आणि मन.प्रत्ययातील अतत्त्व दर्शनामुळे किंवा सुतत्त्वाची निश्चिती न झाल्याने प्रत्येकाचा मन प्रत्यय एकाच तत्त्वाच्या बाबतीत वेगवेगळा ठरू लागला. त्या गणितातून निश्चित उत्तराची उपलब्धी होऊ शकली नाही. जी उत्तरे बरोबर वाटतात ती एकांगी किंवा अंशरूप सिद्ध होतात. ही भ्रांत अवस्था पार पाडण्यासाठी–

iii) द्रव्यत्वप्रत्यय– पहिल्या ज्ञानमार्गातील प्रकृतिमयता व दुसऱ्यातील अंशरूपता, शुद्ध व परिपूर्ण ज्ञानप्राप्तीसाठी निरुपयोगी ठरतात. कारण प्रत्येक वस्तू अनंत गुणात्मक असूनही त्याचे ग्रहण तेथे करता आले नाही. अनंतगुणात्मक असे एक विधान मात्र शब्दरूप करता येत नाही. कारण शब्दसामर्थ्य अपुरे आहे. म्हणून प्रस्तुताप्रमाणे अप्रस्तुत गुणांशालाही सत्ता–परिपूर्ण शुद्ध सत्ता– किंवा धर्मात्मक अस्तित्व असल्यामुळे त्याची मान्यता नाकारणे म्हणजे वस्तुस्वरूपाचे ज्ञान नाकारणे होय. कोणत्याही वस्तूतील केवळ ग्राह्य गुणासबधीच अपेक्षा प्रस्तुत असतानाही अग्राह्य गुणांसंबंधीची व्यवहारी उपेक्षा तत्त्वतः मान्य करता येत नाही. मग नाकारणे तर दूरच राहो. अव्यक्त व अप्रस्तुत गुणांची व गुणांशांचीही अपेक्षा ठेवल्यानेच वस्तुस्थिती समजते. ज्ञानगुण पूर्णांशाच्या मार्गावर गतिशील व क्रियाशील राहतो अशा सापेक्षवादातूनच नयवादाचा व निक्षेप पद्धतीचा जन्म झाला आहे. डोळ्याला




एकाचवेळी साकार वस्तूच्या तीन अंगांचे दर्शन होत असले तरी विरुद्ध बाजूच्या तीन अंगांचेही ज्ञान होणे, या पद्धतीने शक्य होते. म्हणून ही प्रमाणपद्धती विशुद्ध ठरते. शब्द सामर्थ्य अपुरे असतानाही प्रस्तुत ज्ञानांशाला अप्रस्तुताची देखील जोड देणे, किंवा प्रस्तुताप्रस्तुताचे ज्ञान क्रमशः करून घेणे शक्य होते. एवढेच नव्हेतर संज्ञाशीलतेच्या सामर्थ्यावर शब्दातीत (अवक्तव्य-अनिर्वचनीय) ज्ञप्तीचीही अनुभूती मिळविता येते. संज्ञेतील ग्रहणशक्तीची तरळता वाढली तर याही पुढे जाऊन अवक्तव्याशी अस्ति, नास्ति व अस्तिनास्तीची संगती साधून अधिकात अधिक अंशाचे ज्ञान करून घेता येते. या प्रकारांनाच प्रमाणांश म्हणतात. अशा सात भंगप्रकाराने वस्तूचे ज्ञान करून घेता येते. यालाच सप्तभंगी प्रणाली म्हणतात.

या प्रमाणांशाचाही दुराग्रह होऊ नये म्हणून आणखी एक महत्त्वाची जबाबदारी पेलावी लागते. कारण यापैकी एखादा भंग विधेय असतानाही वस्तूचा तोच एक धर्म आहे असा आग्रह धरता येत नाही. कारण शब्द असमर्थ असल्यामुळे शुद्ध वस्तुस्वरूप कथनकक्षेच्या बाहेरच जास्त राहते. त्यामुळे कथनातील प्रस्तुत गुणांश केवळ संभवनीयच मानावा लागतो. याची निशाणी म्हणून या सप्तभंगी विवेचनातील प्रत्येक विधानाला स्यात् हे संभवनीयसूचक पद जोडतात. या पदावरूनच या प्रमाणपद्धतीला स्याद्वाद असे ओळखतात. हा संभवनीय वाद वस्तुगत गुणधर्माचाच वाचक असल्यामुळे त्याला संशयवाद म्हणता येत नाही. अर्थात तो तत्त्वमय असल्यामुळे सामान्य जनास समजणे अवघड जाते हे मात्र खरे. परंतु वस्तुधर्मात्मक गुणविवेचनाला सध्यातरी दुसरा पर्याय उपलब्ध झालेला नाही. आणि या सप्तभंगी स्याद्वादात कोणताही दोष सापडलेला नाही. अनंतगुणी वस्तूप्रमाणेच स्याद्वाद देखील अनंतगुणांची खाण आहे. वस्तुधर्माचे प्रमाणभूत व वस्तुनिष्ठ गमक स्याद्वाद-अनेकान्तमध्येच सापडते. पण सामान्य व्यवहारात नयवादाने लौकिक व्यवहार निभावून नेता येतो. तर निक्षेप पद्धतीमुळे आपला अभिप्राय प्रस्थापित करता येतो. म्हणून या द्रव्यत्व-प्रत्यय मार्गातील तर्कवाद ज्ञानानुवर्ती, गुणसिद्ध आणि अनुभूतिगम्य ठरतो. यामुळेच या ज्ञानविकासी पद्धतीचा स्वीकार आदरपूर्वक झालेला आढळतो.

सर्व द्रव्यातील सर्व पर्याय जाणणे हाच ज्ञानाचा अंतिम विस्तार होय ! या विशुद्ध ज्ञानमार्गाची कास धरण्यास दोन पद्धती उपयुक्त ठरतात– व्यवहारासाठी नयमार्ग आणि तत्त्वाचा अधिगम पूर्णतः होण्यासाठी प्रमाण-मार्ग. नय व प्रमाण या दोन चाकाच्या ज्ञानरथावर आरूढ झाल्याने तत्त्वावबोध सुगम होतो. पुरुषार्थाला प्रामाण्य प्राप्त होते. जीवो मंगलम् सूत्राची प्रतिष्ठा वाढून भोगमयी पुण्याचाही परिहार करण्यास ज्ञानी पात्र बनतो. लोकालोकाचे व स्वतत्त्वाचे ज्ञान संभवते. मूर्तिक व अमूर्तिक जडतत्त्वाप्रमाणेच जीवात्मतत्त्वाचे शुद्ध ज्ञान उदय पावते. आणि चित्स्वरूपी आत्मगुणांचे सुखद अनुभवन अनंत काळपर्यंत मिळत राहते. ज्ञानमार्गातील सर्व हेतू सफल होतात.

### ५ द्रव्यलक्षण समीक्षा–

जे गुणांचे आधारभूत तथ्य आहे, जे अन्वयरूपाने सतत टिकून राहते, ज्याचे अस्तित्व गुण-पर्यायरूपाने सदैव आविर्भूत होत असते, ज्याच्या आविर्भावामध्ये पूर्वावस्था नष्ट होत असतानाच दुसरी अवस्था निर्माण होत राहते, ज्यातील मूलगुण व तत्त्वस्वरूप नष्ट होत नाही, ज्यात स्वतत्त्वात्मक गुण नित्यच राहतात, गुणांचे आविर्भावात्मक परिणमन हा ज्याचा धर्म आहे, ज्यातील उत्पादभाव व व्ययभाव हेतुप्रस्तुत कथनाच्या अपेक्षेवरून ठरविता येतो, ज्यातील मूलगुणांना स्वरूपाशिवाय दुसरे लक्षण नसते, आणि जे सत् स्वरूपी असते– अस्तित्व हा ज्याचा नित्यधर्म आहे, जे सत् स्वरूपी (स्वतत्त्वमय) असते त्याला द्रव्य म्हणतात. तीच मूलवस्तू होय. अशी तत्त्वभूत द्रव्ये अनेक आहेत. प्रत्येक द्रव्याचे गुणधर्म स्वतंत्र आहेत. काही चेतन तर काही अचेतन. आपापल्या स्वरूपधर्मानुसार ती नियत व निश्चित् असतात. समग्र द्रव्ये परिणमनशील असूनही त्यांच्यातील द्रव्यत्व मात्र नित्य व नियत असते. द्रव्यत्व (मूलगुणत्व) नित्य राहणे व गुणांमधील अवस्थांतरण– परिणमन मात्र बदलत राहणे या दोन्ही क्रिया एकाच वेळी संभवतात.





नित्यत्व व अनित्यत्व परस्पर विरोधी भासले तरी ते एकाच द्रव्याच्या आश्रयाने राहतात. नव्हे, वेगवेगळे राहू शकत नाहीत. डावेपण व उजवेपण केवळ अन्योन्यभावीच नव्हे तर अविनाभावी व एकाश्रयीच आहेत. हा द्रव्याचा स्वभावधर्म आहे. म्हणून द्रव्य केवळ नित्य किंवा सर्वार्थाने अनित्य नसून ते मूलगुणाच्या दृष्टीने ( द्रव्यत्व ) नित्य, परिणमनशीलतेच्या (पर्याय) अपेक्षेने अनित्य आणि दोन्ही हेतूने नित्यानित्य असते ! म्हणूनच वस्तू अनंत धर्मात्मक ठरतात. त्यामुळेच नियतपणे एखादाच गुण स्वीकारून दुसरे नाकारता येत नाहीत. इंद्रियांमध्ये परस्पर वेगळेपणा असणे म्हणजे देहाशी विसंगत किंवा विरोधी ठरणे नव्हे ! म्हणून द्रव्यस्वरूप जाणण्यासाठी सापेक्षता बाळगणारी स्याद्वाद-अनेकान्त-पद्धती वस्तुविवरणामध्ये उपयुक्त ठरते. त्याशिवाय सत्ता जाणता येत नाही. सत्ता द्रव्याचे लक्षण आहे तर द्रव्य सत्तामय आहे. परस्पराशिवाय दोन्ही शून्य ठरतात. जसे द्रव्य अनेक धर्मात्मक आहे तशीच सत्ता देखील अनेक धर्मात्मक आहे. हे तत्त्वरूप नीट जाणल्याशिवाय तत्त्वज्ञानात प्रगती होत नाही.

गुण व द्रव्य अविनाभावी आहेत. एका द्रव्यात अनेक गुण असतात. गुण प्रत्येकी वेगवेगळे असले तरी द्रव्यत्व मात्र एकच संभवते. त्या द्रव्यभूत मूलगुणांना पुनः दुसरे लक्षण नसते. उष्णता अग्नीचा गुण असला तरी उष्णतेला पुनः दुसरे लक्षण नसते. द्रव्य सत्तालक्षणी असल्याने द्रवणशील द्रव्यातील प्रत्येक अवस्थेत सत्ता आढळते. द्रव्याच्या अवस्थेबरोबरच सत्तेचीही अवस्था बदलते. पण ती कोणत्याही क्षणी निरस्त होत नाही. पर्याय मूलगुण नसून ती एक गुणाची कालविशिष्ट आविर्भूत अवस्था असल्याने अवस्थांतरण घडताच पूर्वपर्याय नष्ट होते. मात्र द्रव्यातील गुणांना कोणतीही अवस्था नसते असे कदापि घडत नाही. गुणांच्या आविर्भावालाच पर्याय म्हणतात. गुण नित्य असल्याने आविर्भावही नित्य घडत राहतो. म्हणून कोणतीच पर्याय नाही अशी अवस्थाच नसते. द्रव्यगुणाला पर्याय असणारच. म्हणून द्रव्यात गुण व पर्याय दोन्ही एकाच वेळी असतात. गुण मात्र बदलत नसल्याने ते नित्य असतात तर पर्याय कालविशिष्ट असल्याने कालाप्रमाणेच ते वर्तनाशील, परिणामी व अनित्य असतात. गुणांची सत्ता द्रव्याधीन तर पर्यायांची परिणमनशीलता कालाधीन असते. म्हणून त्या दोहोत यादृष्टीने फरक आहे. तरीपण गुण आणि पर्याय द्रव्याच्याच आश्रयाने राहतात म्हणून दोहोत सत्ता असते आणि विरोधी भाव एकत्र संभवतात. गुण-पर्यायातील विरोध द्रव्याशी सुसंगत ठरतो. याच अर्थाने त्या द्रव्य-गुण-पर्यायातील सत्ता एकाच वेळी विविधस्वरूपी असते– द्रव्यरूप, गुणरूप व पर्यायरूप.

आणि द्रव्य-गुण-पर्याय एक, अनेक व विश्वरूप असल्याने सत्ता देखील एक, अनेक आणि विश्वरूप असते. यात कोठेही कूटस्थ नित्यता किंवा पर्यायाशिवाय गुण संभवत नाही. द्रव्यात गुण व पर्याय सदैव एकत्र असतात, परिणमनामुळे दोष लागत नसून उलट द्रव्यत्वाची सिद्धीच होते. द्रवण-भावन-परिणमन-आविष्कार पावत राहणे हा केवळ जड वस्तूचाच नव्हे तर चेतना द्रव्याचाही धर्म आहे. कारण चेतना देखील एक द्रव्य-गुणच आहे !! द्रव्यगुण-दृष्टीने जगाला मिथ्या म्हणणे व ब्रह्म तत्त्वाला कूटस्थ नित्य समजणे हा व्यामोह होय. कोणत्याही द्रव्यातील स्वभाव, विभाव ( मिथोभावातील अशुद्ध पर्याय ) आणि परभाव विविध व विश्वरूप असू शकतात. त्या सर्व अवस्था समजावून घेणे म्हणजेच सत्ता जाणणे होय. सत्ता समजली नाही तर द्रव्याचे रूप जाणता येत नाही.

द्रव्यत्व व गुणत्व कायम असूनही वस्तूच्या द्रवणशीलतेतील जी परिणामी अवस्था ती पर्याय होय. तो गुणाचाच भाव असतो. म्हणून पर्याय देखील द्रव्याचे स्वरूप ठरते. पर्यायाशिवाय द्रव्याचा द्रवणभाव अशक्य असल्याने पर्याय नाकारणे म्हणजे द्रव्यगुण नाकारणे होय. पर्याय म्हणजे गुणांची भवनवृत्ती किंवा अस्तित्वक्रिया होय. द्रव्य जसे गुणरूप असते तसे ते पर्यायशीलही असते. ही पर्यायशीलता द्रव्यगुणांना सोडून नसते. पर्यायांना द्रव्यगुण-निरपेक्ष स्वतंत्र अस्तित्व नसते. तरी परंतु द्रव्यगुण कधीही भवनभावरहित किंवा द्रवणक्रियारहित असत नाहीत. त्यांचे हे स्वरूप सदैव टिकणे म्हणजेच नित्यत्व होय. म्हणून द्रव्य-गुण-पर्याय-सत्ता ही चारही तथ्ये




अविनाभावी असतात. हे सहभावित्व म्हणजेच नित्यत्व होय. याच अर्थाने नित्यत्वात सुद्धा परिणमन निहित आहे. द्रव्य-गुण-पर्यायांतील व सत्तेतील उत्पाद-व्यय-ध्रौव्य-रूप स्थिती– अनेकधर्मात्मकता अखंडच असते.

द्रव्यातील द्रव्यत्वाची व गुणांतील गुणत्वाची अखंड धारणाशीलता म्हणजेच ध्रुवता किंवा ध्रौव्यभाव होय. द्रव्यगुणांचे परिणमन नित्य चालू असताना पर्याय बदलतात पण द्रव्यत्व व गुणत्व बदलत नाही. त्यामुळेच निरनिराळ्या द्रव्यांमध्ये व गुणांमध्ये परस्पर बदल होत नाही. संश्लेष किंवा संकर घडत नाही. एक द्रव्य अद्रव्य किंवा परद्रव्य होत नाही. तसेच गुणांमध्येही संकर घडत नाही. पर्याय बदलत असताना त्या त्या पर्यायानुरूप प्राप्त होणाऱ्या तत्कालीन अवस्थांतरण क्रिया चालू असतानाही– पर्यायातील सत्ता बदलण्याची क्रिया चालू असतानाही– द्रव्यगुणांची अखण्डता व त्यांची अखण्ड सत्ता देखील शाबूत राहते. त्यांना हानी पोहचत नाही. अशा निर्विकल्प गुणवत्तेलाच ध्रौव्य ( ध्रुवता ) म्हणतात. ते द्रव्यात द्रव्यरूप व गुणात गुणत्वरूप असते. चैतन्य ( ज्ञानत्व ) अखंड असले तरी चेतनक्रिया ( जाणण्याची क्रिया ) अखंड किंवा कूटस्थ नित्य असत नाही. कारण जाणण्याची क्रिया ज्ञेय वस्तूबरोबर बदलत राहते. परमेश्वरातील ज्ञानगुण व त्याची ज्ञानक्रिया यातील फरक सूक्ष्म असला तरी तो आपण जाणला पाहिजे. द्रव्याला द्रवणशीलता व गुणाला आविर्भूती एकाचवेळी असल्यामुळे– तसेच द्रव्य-गुण-पर्याय एकत्रच असल्यामुळे प्रत्येक द्रव्य परिणामीच असते ! ! तरीपण द्रव्यत्व-गुणत्वाच्या रूपाने ध्रुवता ( द्रव्यधारणा व गुणधारणा ) शाश्वत व अखंड राहते. त्यामुळे जगतासारख्या कोणत्याही द्रव्याला किंवा परमेश्वरासारख्या कोणत्याही तत्त्वाला केवळ नित्य मानता येत नाही.

मात्र चेतनादी गुणांमध्ये परद्रव्य-संपर्काने विभावावस्था निर्माण होते. विभाव म्हणजे द्रव्यगुणातील भवनशीलता नष्ट होणे किंवा त्यात स्वरूपात्मक बदल होणे नव्हे, तर त्या आविर्भावामध्ये परद्रव्याचा संपर्क घडणे होय. हा संपर्क समप्रदेशी सहवर्तन असलेल्या चेतनाचेतन द्रव्यामधील परस्पर साहचर्य भावामुळे घडतो. अशा संमिश्र अवस्थेला विभाव म्हणतात. आणि हा परस्पर-भाव फक्त संसारी जीव व कार्माण वर्गणा यांच्यामध्येच संभवतो. याचेच विवरण म्हणजे जैनांचा प्रसिद्ध कर्मसिद्धान्त होय. कर्मसिद्धान्त म्हणजे क्रियापाद किंवा कर्मकाण्ड नव्हे !

द्रव्याप्रमाणेच द्रव्यभूत सत्ता देखील उत्पाद-व्यय-ध्रौव्य या अवयवांनी युक्त आहे. ते तीन भाव प्रत्येकी वेगवेगळ्या लक्षणाचे असूनही एकाच वेळी प्रत्येक द्रव्यात आविर्भूत होत राहतात. वेगळ्या लक्षणामुळे त्या अवस्था वेगळ्याच असतात. सत्तालक्षणी एकाच द्रव्याचे ते अवयव असल्याने ते द्रव्यात्मक व सत्तात्मक आहेत. ध्रुवतेबरोबरच व्यय व उत्पत्ती एकत्र असणे असंभव वाटणे हे तिन्हीपैकी एकाचेही लक्षण माहीत नसल्याचे प्रतीक आहे. व्ययही व उत्पादही द्रव्याशिवाय संभवत नाही. द्रव्य नेहमी व्यय + उत्पाद + गुणत्व या सर्व लक्षणांनी सहित असते. या तिन्हीतील धारणात्मक अवस्थेला ध्रौव्य म्हणतात. म्हणून सत्ता देखील उत्पाद-व्यय-ध्रौव्य या त्रयीनी युक्तच असते. या ध्रौव्यामुळेच नाश आणि उत्पत्ती एकदमच संभवते. कशाचा नाश आणि कशाची उत्पत्ती हे कथनाच्या हेतूवर अवलंबते. खरे तर तीनही द्रव्यलक्षण असल्याने व्ययातही उत्पत्ती असते व उत्पत्तीतही व्यय असतो. इतकेच नव्हे तर दोन्ही एकत्र संभवतात. म्हणून हेतूत बदल झाल्याने उत्पत्ति-व्यय या भावातही बदल होतो. मातृत्व निर्माण होते म्हणजेच वंध्यत्व संपते. तसेच दोन्हीतील व्यक्तित्व मात्र अभंग राहते. हे विधान हेतुप्रधान आहे. म्हणून कोठेही विसंगती निर्माण होत नाही. भासते ते अध्यवसाय असते. तत्त्व तसे नसते म्हणूनच जग फसते. तरीही द्रव्यस्थिती समजणे संभवते.

## ६ सत्ता : एक ज्ञानतत्त्व–

वस्तुगत गुणधर्मांचा प्रत्यय घडावा, त्याचे यथार्थ ज्ञान व्हावे हाच एकमेव उद्देश सर्व शास्त्रांचा आणि सर्व ज्ञानोपासकांचा असतो. ज्ञान शून्यातून उद्‌भवत नाही. ज्ञेय पदार्थाशी ज्ञानाचा संबंध अप्रतिहत असतो.

ज्ञेयाचे प्रधान लक्षण सत्ता आहे. त्यामुळे ज्ञान ही वस्तू सत्ताभूत ठरते. ज्ञानाची आधारभूमी सत्ता आहे. सत्ता जाणण्यात चूक झाली तर ज्ञान विपर्यस्त ठरते. अशी चूक झाल्यामुळेच इंद्रियप्रत्यय व मनःप्रत्यय या दोन्ही ज्ञानमार्गातील ज्ञानोपासनेचा प्रयास विफल ठरलेला आढळतो. द्रव्यप्रत्यय किंवा वस्तुधर्मात्मक ज्ञानमार्ग सत्ता जाणल्याशिवाय साध्य होत नाही. केवळ उपदेशाने तो मार्ग रुचत नाही याचे मूळ कारण ज्ञेय-वस्तूच्या किंवा द्रव्याच्या अस्तित्वाच्या स्वरूपाचे अज्ञान हेच आढळते. अस्तित्व हे एक सूक्ष्म तत्त्व आहे. तत्त्वविचारधारेत त्याला सत्ता असेही म्हणतात. या सत्तेचे लक्षण न समजल्याने ज्ञेय-वस्तू देखील समजेनाशी होते. सत्तेच्या आकलन भेदातूनच विश्वातील सारे तर्कप्रवाद विवादास्पद, विरोधमूलक किंवा विफल ठरतात. सत्तेचा अभ्यासच अखिल तत्त्वज्ञानाचा मूलाधार आहे. सत्ता या तथ्याचे ज्ञान हाच मुळी चिंतनशीलतेतील- तत्त्वविचारातील- ज्ञानानंदातील स्वयंगुरू होय. या स्व-संवेदन क्षेत्रात परतः गुरुभेट होणे असंभवनीय आहे. सत्ता समजली तर परम सत्याचे आकलन होणे व त्याची अनुभूती मिळणे संभवते. वस्तुनिष्ठ ज्ञानाबरोबरच स्वतत्त्वाची देखील प्राप्ती होते व चैतन्याचा अनुभव लाभतो. आणि हेच ज्ञानसाधनेचे परम फळ होय !

ज्ञेय वस्तू अनेकधर्मात्मक असल्याने सत्ता देखील नियत किंवा एकांगी नसते. वृक्षाप्रमाणेच ती विविधांगी आहे. कारण ज्या द्रव्यामध्ये सत्ता अधिष्ठित असते त्या द्रव्यातील गुणांच्या आविष्कारामध्ये परिणमनशील पर्याय अवस्था सदैव बदलत राहते आणि त्याच वेळी द्रव्यातील द्रव्यत्व व त्या बदलत्या पर्यायातील भावरूप गुणत्व मात्र ध्रुव राहते. म्हणून ज्ञेय वस्तूचे एकंदर लक्षण ध्रुव + अध्रुव + ध्रुवाध्रुव-स्वरूप विविधांगी ठरते. आणि वस्तुगत विविध धर्मांमुळे देखील अशी विविधता सुसंगत असते. यामुळे द्रव्यभूत सत्ता देखील विविधांगी असते. प्रत्येक द्रव्यातील अस्तिरूप, नास्तिरूप, मिश्र आणि अनिर्वचनीय स्वरूपातील अनंत गुणांच्या अपेक्षेने सत्तेचे स्वरूप देखील अनंतविध असते. कारण सत्तेशिवाय द्रव्य-गुण-पर्याय असू शकत नाहीत. आणि पर्याय तर निश्चितपणे परिणामी असतात. प्रत्येक द्रव्य जसे गुणरूप असते तसेच ते पर्यायरूपही असते. पर्यायरहित द्रव्य नसते. पिवळा, तांबडा, निळा या रंगछटा बदलल्याशिवाय राहात नाहीत; या छटारूप पर्यायांची उत्पत्ती रंगगुणाशिवाय होत नाही. आणि रंग-गुण देखील वस्तूच्या आधाराशिवाय असू शकत नाही. सर्वच गुण आपापल्या द्रव्याच्या आश्रयानेच राहतात. वस्तूच्या या सर्व विविध अवस्था जाणल्याशिवाय द्रव्य किंवा सत्ता यांपैकी कशाचेही ज्ञान परिपूर्ण होत नाही.

अशा अंगभूत विविधतेने रहित अशी कल्पित वस्तू शून्य ठरते. कारण तिला स्वयंभू सत्ता नसते. परमात्मा देखील अशी वस्तुगत विविधताच जाणतो. ती परिणामी असल्यामुळे परमात्म्याचेही ज्ञान परिणामीच ठरते. ज्ञेय-वस्तूशिवाय ज्ञानही शून्य ठरते. ज्ञानाशिवाय गुणहीनता संभवते म्हणून परमेश्वरही शून्य ठरेल ! याच वस्तुधर्म-स्थितीमुळे कूटस्थ नित्यताही अवस्तू ठरते. कारण तिला सत्ता नाही, गुण नाही. म्हणूनच ती आविर्भूत होत नाही. ती अनुपलब्ध असल्याने त्याची अनुभूती मिळत नाही. आणि अनुभूती नसल्यामुळे ती ज्ञानाचा विषयही ठरत नाही. या उलट द्रव्य-गुण-पर्याय आणि सत्ता ही सर्व तथ्ये ज्ञेय-वस्तू आहेत ! आणि ज्ञानगोचर सर्व चेतनाचेतनात्मक विश्व परिणामीच आहे. केवळ परिणमनामुळे द्रव्यत्वाला बाधा येत नाही. पर्यायरूप अवस्थांतर म्हणजे नाश नसून कालानुसारी अस्तित्वच होय ! उलट द्रव्यभावाची किंवा गुणत्वाची सत्ता पर्यायामुळेच ज्ञात होते. आणि तद्भाव अव्यय राहतो. यालाच नित्यत्व म्हणतात. भावाभिव्यक्ती नसणे म्हणजे शून्यता होय. द्रव्यगुण नित्य असूनही पर्याय मात्र अनित्य असतात म्हणूनच एक पर्याय नष्ट होऊनही द्रव्यत्व नष्ट होत नाही. पर्याय देखील बदलत राहतो. म्हणजे कोणतीच पर्याय नाही असे कधी होत नाही. पूर्वपर्याय बदलत असतानाच उत्तर पर्यायाची निष्पत्ती होत राहते. प्रत्येक वस्तूची सत्ता उत्पाद-व्यय-ध्रौव्यत्वामुळे त्रिगुणात्मकच असते. ती एकरूपस्थ व कूटस्थ नसते. मूलतः वस्तुस्थितीच नित्यानित्य स्वरूपाची असल्याने परमात्मा किंवा कोणतेही तथ्य कूटस्थ नित्य नसते.




प्रत्येक द्रव्याची पर्यायरूप भावावस्था कालानुसारी असते. म्हणून कालाप्रमाणे पर्याय बदलत राहतात. द्रव्य-व्यवस्थाच अशी असल्यामुळे पर्यायांची सत्ता नाकारता येत नाही. द्रव्यलक्षण गुण-पर्यायरूप विविधांगी असल्याने सत्ता देखील विविधांगीच असते. अशी विविधता ज्यांनी नाकारली त्यांनी खरी सत्ता वेगळी व भासमान सत्ता वेगळी मानली. पण त्यांना ज्ञानमार्गात अडून बसावे लागले.

**'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या'** या शब्दात किंवा Being आणि Becoming या स्वरूपात ज्यांनी सत्तेची एकेरी चर्चा मांडली त्यांना अखेर या दोनपैकी एकही सत्ता निश्चित करता आली नाही. जी सत्ता ज्ञानेंद्रियांना गम्य आहे तिचे स्वरूप स्पष्टतः परिणामी असल्याने तिला खरी सत्ता– नियत लक्षणाची वस्तू– मानता येईना. आणि अदृष्ट व अनुपलब्ध अशा नियत सत्तेची कल्पना करावी तर ती कल्पनाभूत वस्तू प्रत्यक्षात अनुभवता येईना. त्यामुळे ती दोन्ही प्रकारची एकांगी सत्ता अतथ्यभूत ठरून विधानकर्त्याचे स्वत.चेही अस्तित्व, मायामय ठरल्याने, धोक्यात येते. विधानाला आधार उरत नाही ! सारी बडबड व्यर्थ व निरर्थक ठरते. **हीच भंगभावना पश्चिमेकडे अवतरली.**

त्याचप्रमाणे केवळ मन.प्रत्यय मार्गामुळेही भारतात द्वैतवाद पराभूत झाला. विशिष्टाद्वैताला वापसा लाभला पण अंकुर फुटला नाही. कारण अंकुर जडवस्तूशिवाय साकार होत नाही– आणि जीव-जड दोन्ही वस्तू समलक्षणी किंवा विषमलक्षणीही मानता येईनात. चराचररूपी सत्ता खऱ्या लक्षणाविना पुनः धोक्यात आली. केवळ जड वस्तूला मान्यता दिल्यास स्वतत्त्वाचा लोप होतो. केवळ परमात्म्याला मानल्यास जड वस्तूची व संसारी जीवाची निश्चिती करता येत नाही. दोन्हीला सत्ता मानावी तर सत्ता देखील दोन स्वरूपाची ठरते. पण ती दोन वेगवेगळी लक्षणे तर आकळत नाहीत. अशा संभ्रमातून मायावाद व अद्वैतवाद जन्मला. माया हा हेत्वारोप आहे. तो वस्तूचा धर्म नसून जीवाचाच व्यामोह आहे. म्हणून माया अद्रव्य किंवा शून्य आहे. तिला स्वतःची सत्ता नाही. स्वयंसत्ता असल्याशिवाय कोणतीही कल्पना अवस्तू किंवा अज्ञान ठरते. यामुळेच मायेच्या आधारानेही दोन वस्तूंची भिन्न-सत्तात्मकता ठरविता आली नाही. आभासरूप मायेला खरी सत्ता नसल्यामुळेच **'भासमान'** अशी जी निराळीच सत्ता कल्पिली तिचे द्रव्यात्मक लक्षण ठरत नाही. त्यामुळे ती सरळच अद्रव्यरूप ठरते ! त्याचप्रमाणे परमेश्वराचीही सत्ता अद्रव्यरूपच मानणाऱ्यांनी शून्यवाद जन्माला घातला. यामुळे पुनः तोच आत्मघात पत्करावा लागतो. तोही पटत नाही कारण प्रत्यक्षात आपणही आहोत, इतर जीवही आहेत आणि जगही आहे !

तिसरीकडे हीच भौतिक श्रद्धा वळावली. त्यांनी लौकिक जीवनालाच फक्त मान्यता दिली. हा देह, हे जीवित, ह्या गरजा, भोगवस्तूंनी भरलेले हे जग आणि त्यातील गरजापूर्तीचा व्यवहार हीच एवढी तथ्ये मानून आत्मतत्त्व व त्याच्या उद्धाराचा प्रयत्न या कल्पनांना फाटा दिला. धर्माला तर अफूची गोळी ठरविली. पण हाही विचार निश्चितपणे स्थिरावू शकला नाही. कारण जीवनातील सुख-दुःखाची भावना प्रत्यक्षात नष्ट होऊ शकली नाही. साधन-संपत्ती विपुल असूनही दुःखाची भावना उद्भवतेच. शिवाय सुख केवळ भोगवस्तूवरच आधारित नाही हेही पटतेच. एकंदरीत तत्त्वज्ञानातील पळवाटा उपयुक्त ठरत नाहीत. त्यामुळे यथार्थ तत्त्वज्ञानाची कास धरावीच लागते. सत्तेची तात्त्विक लक्षणे ओळखावीच लागतात. द्रव्य-गुण-पर्याय व सत्ता परस्परांशी तत्त्वतः निगडित आहेत. ते अव्यतिरिक्त, अनन्यभूत व अविनाभावी असल्याने वस्तुस्थिती विविधांगी असूनही सुसंगत ठरते. उत्पत्ति-विनाशरूप परिणमने देखील द्रव्याचे अस्तित्वच सिद्ध करतात. अशाच सत्तेला ध्रुवत्व म्हणतात. याच अर्थाने ध्रुवत्व हे कूटस्थाहून वेगळे आहे. गुण व पर्याय परस्पर आश्रयीच आहेत. याच आश्रयामुळे द्रव्य सत्तेपासून दूर न होताही द्रवणशील-परिणमनशील राहते. गुण आहे आणि पर्याय नाही असे कधी घडत नाही. त्या त्या काळातील गुणाची अवस्था म्हणजेच पर्याय ! अशी अवस्था निरंतर टिकून राहते. म्हणून अशी सत्ता द्रव्याचे लक्षण ठरते. आणि सत्तेचे यथार्थ रूप ओळखावे लागते–








सत्ता सव्वपयत्था सविस्सरूवा अणंतपज्जाया । भंगुप्पादधुवत्ता सप्पडिवक्खा हवदि एक्का ॥

(-पंचास्तिकाय, ८)

प्रत्यक्ष सत्तेच्या अस्तित्वाला आणि तिच्या इतर सर्व लक्षणांनाही प्रतिपक्ष असतो. या मार्गातही सापेक्षता आहेच. प्रत्येक वस्तूप्रमाणे सत्तारूप तथ्याला व सत्तेच्या सर्व लक्षणांना दुसरी बाजू असते. म्हणजे ती १) अस्तित्व व नास्तित्व, २) समग्र वस्तुजातस्थ व विशिष्ट वस्तुगत अगर वस्तूतील सर्व प्रकारच्या पर्याय-अवस्थेतील व एकेका पर्याय-अवस्थेतील, ३) विविध विस्ताराच्या दृष्टीने विश्वरूप व विवक्षित वस्तूच्या दृष्टीने एकरूप, ४) परिणमनशीलतेच्या दृष्टीने अनंत-पर्यायरूप व विशिष्ट अवस्थेच्या दृष्टीने एक-पर्यायरूप, ५) व्यय-उत्पाद-ध्रौव्याशी एकरूपस्थ त्रिलक्षणात्मक व द्रवणशीलतेतील प्रत्येक अवस्थेला अनुसरून केवळ व्ययरूप, केवळ उत्पादरूप व केवळ ध्रुवरूप अशी एक-लक्षणात्मक आणि ६) सर्व द्रव्य व सर्व पर्याय यातील सत् या द्रव्यात्मक सामान्य लक्षणाच्या दृष्टीने सत्ता एक आहे आणि प्रत्येकातील विशिष्ट विशिष्ट, स्वतंत्र स्वतंत्र असलेल्या सत्-रूप लक्षणांच्या दृष्टीने सत्ता अनेकही आहेत. अशा दृष्टीने अस्तित्वाचेही स्वरूप विविधांगी आहे. कारण आधारभूत द्रव्ये स्वभावतःच अनंतधर्मात्मक आहेत. यामुळेच कूटस्थ सत्ता ही अवस्तू- शून्य ठरते ! द्रव्यातील पर्याय क्षणिक व परिणमनशील असले तरी गुण मात्र नियत व नित्य असतात. पण कोणताही गुण पर्यायरहित नसतो. कोणतेही द्रव्य केवळ गुणरूप किंवा केवळ पर्यायरूप असत नाही. वस्तूतील रंग हा गुण नित्य असला तरी लाल इत्यादी रंगछटा परिणमनशीलच असतात. यामुळे वस्तूला द्रव्य ही संज्ञा लाभली आहे. प्रत्येक द्रव्य गुणाच्या दृष्टीने नित्य तर पर्यायाच्या दृष्टीने अनित्य असते.

सर्वथा नित्य किंवा अनित्य असणे अशक्य आहे. रंगगुण नसल्यास लाल इत्यादी रंगछटाही नसणार ! आणि एक (गुण) असल्यास दुसरा (पर्याय) देखील असणारच. गुण आणि पर्याय दोन्ही अविनाभावी आहेत. यामुळेच वस्तू परिणमनशील असूनही ध्रुव राहते. परिणमन देखील उत्पाद-व्यय-ध्रौव्यरूप असते. कारण द्रव्य-गुण-पर्याय अविनाभावी आहेत. म्हणूनच द्रव्याप्रमाणेच सत्ता देखील त्रिगुणी ठरते. ज्या समयात एक पर्याय नष्ट होते त्याच समयात दुसरी पर्याय निर्माण होते आणि त्या पर्यायांचा मूलाधार गुणही त्याच समयात अस्तित्वात असतो. यामुळे प्रत्येक वस्तू एका समयात देखील त्रिलक्षणी असते. केवळ सापेक्षतेमुळेच (अर्पित व अनर्पित भावामुळेच) पर्यायांना उत्पाद व व्यय अशी अवस्था प्राप्त होते. म्हणून उत्पादरूप सत्तेबरोबर व्ययरूप असत्ताही एकाच समयात असू शकते. मग निरनिराळ्या समयात व निरनिराळ्या वस्तूत हीच व्यवस्था असल्यास नवल कोणते ? एकंदरीत वस्तू १) तत्त्वतः निरंकुश किंवा एकान्तरूप नसून ती अनेकान्तरूप आहे. २) सत्तेबरोबर असत्ता, ३) त्रिलक्षणतेबरोबर अ-त्रिलक्षणता, ४) एकतेबरोबर अनेकता, ५) सामान्यमयतेबरोबर विशिष्टमयता, ६) विविधतेबरोबर अ-विविधता आणि ७) अनंतपर्यायी स्वरूपाबरोबर एक-पर्यायीस्वरूपता इत्यादी प्रतिपक्ष संभवतो.

कोणतीही वस्तू केवळ सामान्यरूप नसते. तिला त्या सामान्यतेबरोबरच स्वतःचे विशिष्ट लक्षणही असते. पण सामान्य वस्तुत्वाशिवाय विशिष्ट वस्तुत्व संभवत नसते. म्हणून ती वस्तू सामान्य व विशेष अशा दोन स्वरूपातच आढळते. क्ष मध्ये अक्षरपणा व क्षपणा दोन्ही असणे हीच खरी वस्तुस्थिती आहे. कारण क्ष म्हणजे कोणतेही अक्षर नव्हे किंवा कोणतेही अक्षर म्हणजे क्ष नव्हे ! उत्पाद केवळ उत्पादरूपच आहे, व्ययही केवळ व्ययरूपच आहे आणि ध्रौव्य शुद्ध ध्रौव्य आहे. यादृष्टीने भंगमय स्वरूप एक लक्षणीच (अ-त्रिलक्षणत्व) आहे. पण हे तीन भंग स्वतंत्र स्वतंत्र असू शकत नाहीत तर ते द्रव्याच्या आश्रयानेच राहतात म्हणून द्रव्य त्रिलक्षणी ठरते !! शिवाय एका अवस्थेचे स्वरूप दुसऱ्या अवस्थेप्रमाणे नसते म्हणून सत्तेमध्ये विविधता अवतरते. तरीपण सत्तेचे स्वतःचे स्वरूप मात्र एकरूप आहे. सत् किंवा अस्तित्व या तथ्याचे स्वरूप बदलत नाही, ती एकरूप असते. समग्र वस्तूतील सामान्यरूप (द्रव्यत्व) एकच असले तरी एखादी विशिष्ट वस्तू म्हणजे इतर कोणतीही वस्तू नसून




प्रत्येकीचे वैशिष्ट्य अखंडच राहात असल्यामुळे आणि अशी वैशिष्ट्ये विश्वभर असल्याने विशिष्ट सत्ता विश्वरूप ठरते. यावरून वस्तूमधील सापेक्षता व अनंतधर्मात्मकता निरवद्य, निर्दोष, निर्बाध व अविरोधी आहे. वस्तुधर्माशी ही विविधता सुसंगतच आहे–

इदि जिणवरेहिं भणिदं अण्णोण्णविरुद्धमविरुद्धं ॥ – पंचास्तिकाय ५४.

### ७ स्वतत्त्वाची उपलब्धी–

या शुद्ध ज्ञानमार्गातील द्रव्यगुणात्मक दृष्टिकोण स्वीकारून ज्यांना खरोखरच स्वतत्त्वाची–स्वद्रव्याची–जीवाच्या शुद्ध अवस्थेची प्राप्ती झाली, ज्यांना कैवल्याचा, गुणरूप सुखाचा निर्विकल्प अनुभव मिळाला त्यांनाच केवली किंवा केवलज्ञानी म्हणतात. ज्योतीचा प्रकाश जसा सर्वत्र फाकतो व तो इतर सर्वांना प्रकाशित करतो तसा तो खास स्वत.साठीही प्रकाशमयच असतो. अप्रकाशी तत्त्व परप्रकाशी असत नाही. स्वयंप्रकाशी तत्त्वच परप्रकाशीही होऊ शकते. त्याचा तो गुणधर्म अगभूतच असतो. केवलींचा गुणोदय अनंत झाल्यामुळे त्यांच्या ज्ञानाची प्रभा सर्वत्र फाकली. त्यांच्या गुणोदयाच्या प्रभावाने सर्व जीवांच्या गुणोदयासाठी कल्याणतीर्थाची स्थापना झाली. त्यात सर्वांच्याच उदयाला वाव मिळाला म्हणून त्या तीर्थाला सर्वोदय तीर्थ म्हणतात. या सर्वोदय तीर्थात उदय पावलेल्या केवली, श्रुतकेवली, पूर्वधर, अंगधर ज्ञानदेवांनी या संसृति-श्रृंखलेत अडकलेल्या जीवाच्या उद्धारासाठी किंवा संसारातील जीवन मंगलमय करण्यासाठी जीवतत्त्वानुसार जो प्रयत्न केला त्यातून कित्येक जीवांना स्वतत्त्वाची उपलब्धी होऊ लागली. त्यामुळे अखिल मानवांवर अनंत उपकार झाले आहेत. मानव्याची स्थिती सदैव संपन्न राहण्यासाठी पुढील शोधतत्त्वांचा आपल्या संस्कृतीवर फार मोठा प्रभाव पडलेला आढळतो. त्यामुळेच भारतीय संस्कृती इतर संस्कृतीपासून वेगळी ठरते. तिची प्रतिभाच वेगळी असल्याने त्यानुसार तिची फलप्राप्तीही वेगळी आढळते. आत्मोद्धारार्थ स्थापिलेल्या या सर्वोदय तीर्थाच्या परिसरात घडून आलेले जैनाचार्यांचे सांस्कृतिक कार्य ते हेच होय. त्याचे खरे मूल्य मापण्याचे कोणतेही माप या जगतितलावर आजतरी उपलब्ध नाही. कारण तो एक चिंतनशीलतेचा आंतरिक विषय आहे. अशा या आत्मपर तत्त्वचिंतनातील काही ठळक मुद्दे वाणगीदाखल नमूद करीत आहे–

मी आहे. मला स्वयं सत्ता आहे. चेतना मूलभूत तत्त्व आहे. भूक, निद्रा, सुख, दु.ख इत्यादी भावावस्था ही त्याच चेतनारूप सत्तेची विविधता होय. एक द्रव्य दुसऱ्या द्रव्याचा मालक असत नाही. चेतना अचेतनातून संभवत नाही. चेतनेप्रमाणेच अचेतनालाही स्वतंत्र सत्ता आहे. या चराचर विश्वाची विभागणी मूलद्रव्यामध्ये करता येते. त्यापैकी जीवाच्या संसारी अवस्थेला कारणीभूत अशी मूल तत्त्वे दोन– अरूपी चेतन आणि रूपी अचेतन. या मूल तत्त्वांचे विवेचन व विवरण ज्या ग्रंथात बीजरूपाने केले ते ग्रंथ जैन श्रुतभाण्डारातून उपलब्ध होत आहेत. अशा द्रव्यानुयोगातील ग्रंथांमुळे तत्त्वविवरणाची शाखा समृद्ध झाली आहे. जीव आणि पुद्गल यांच्याप्रमाणेच इतर सर्व द्रव्ये गुण व पर्यायांनी नियंत्रित असल्याने प्रत्येकाची द्रव्यस्थिती नियत आहे. अशा सत्तेची जी वैशिष्ट्ये जिनागमात सांगितली ती वर्तमान काळातील अनेकविध परिशीलन व संशोधन मार्गाने पडताळून पाहिल्यानंतरही तथ्यभूतच ठरतात हे आश्चर्यजनक नव्हे काय ?

जीव द्रव्य चैतन्यमय आहे. बाह्याभ्यंतर भेदाने चेतनेचे ज्ञान व दर्शन अशा दोन स्वरूपात परिणमन होते. याशिवाय जीवामध्ये सुख, वीर्य इत्यादी चेतनस्वरूपी अनेक गुण असतात.

पुद्गल द्रव्यात मात्र, स्पर्श, रस, गंध व वर्ण हे इंद्रियगोचर गुण आढळतात. म्हणून त्याला व्यक्त किंवा मूर्त म्हणतात. ते स्कंध व अणू अशा दोन स्वरूपात आढळते. स्कंधमय असताना पूरण-गलन क्रिया अखंड चालू असते. निरनिराळ्या परमाणूमधील स्निग्ध व रुक्ष गुणांमुळे बंध-भेद-शक्ती प्रादुर्भूत होत असते. त्यामुळे स्कंध-परमाणूचे व्यवहार सदैव चालू राहतात. विभजनामुळे न्यूट्रॉन तयार होतात आणि न्यूट्रॉनमुळे विभजन






घडून येते. ही क्रिया चक्रवत चालू राहते. शुद्ध स्वरूपातील परमाणूमध्ये एक रस, एक रूप, एक गंध व दोन स्पर्शगुण असतात. आधुनिक संशोधक सायंटिस्ट ज्याला अणू म्हणतात तो या दृष्टीने सूक्ष्म स्कंधच ठरतो. केवलिप्रणीत अणूपर्यंत प्रगती होण्यास अद्याप अवकाश आहे.

जीव व पुद्‌गल यांच्या चलन-वलन-गतीला जे निमित्तभूत ठरते ते मूलद्रव्य म्हणजे धर्मद्रव्य होय. आधुनिक संशोधक गतीचे मूलतत्त्व जाणण्यास अजून तितके समर्थ ठरले नाहीत. पदार्थांच्या गतीसाठी काही तरी माध्यम (निमित्तभूत तथ्य) लागत असते एवढेच ते जाणतात! गतीच्या विरुद्ध स्थिती. गतीच्या आधारतत्त्वाप्रमाणे स्थितीचे आधारतत्त्वही आधुनिक शास्त्रज्ञांना अज्ञातच आहे. या स्थितीच्या मूलाधार-तथ्याला जिनागमात अधर्मद्रव्य म्हटले आहे. जीवपुद्‌गलादिक सर्व द्रव्यांना अवकाश किंवा अवगाहन देणारे मूलद्रव्य आकाश नावाने प्रसिद्ध आहे. आणि सर्व द्रव्यांच्या उत्पाद-विलयरूप परिणमनास जे निमित्तिक ठरते ते वर्तनालक्षणी तथ्य म्हणजे कालद्रव्य होय. या सहाही द्रव्यात प्रत्येकी सामान्य व विशेष गुण आहेत. सर्व द्रव्यांची सत्ता उत्पाद-व्यय-ध्रौव्यात्मक आहे. हे परिणमन अखंड चालूच असते. मूलतः नाश किंवा उत्पत्ती होत नाही.

यांपैकी फक्त जीव व पुद्‌गल ही दोन द्रव्ये परस्पर क्रियाशील आहेत. त्यामुळेच जीवाला बंधावस्था संभवते. या विभावालाच संसार म्हणतात. स्वतःच्याच अज्ञान व रागद्वेषमय अवस्थेमुळे जीव पुद्‌गलातील कार्माण वर्गणेशी बद्ध होतो. त्याचे फळ भोगतो. ते फळ सरताच त्यापासून मुक्तही होतो. अशा बंध-मुक्तीच्या प्रक्रियेमुळे जीव, अजीव, आस्रव, बंध, संवर, निर्जरा व मोक्ष अशी ७ तत्त्वे प्रतिपादिली आहेत. या अवस्थांचे ज्ञान झाल्याने संसारी जीवांना आपण कोण आहोत, कोठे आहोत, कसे आहोत आणि ही संसारी अवस्था संपवून शाश्वत सुख मिळविण्यासाठी काय करणे प्राप्त आहे हे स्पष्ट होते.

चेतनाचेतनेचे हे स्वरूप इतक्या तात्त्विक विवरणात इतर कोणत्याही शास्त्रप्रणालीमध्ये सांगितलेले नाही. संसारी दुःखांचा नाश होण्यासाठी आणि शाश्वत सुखाच्या लब्धीसाठी मानवाने हे समजून घ्यावे व आत्मकल्याण साधावे. जैनाचार्यांनी यासाठी अनेक ग्रंथ लिहून मानवी संस्कृतीवर अनंत उपकार केले आहेत. त्यामुळे खऱ्या सुखाचा मार्ग उपलब्ध झाला आहे. स्वतत्त्वाचा शोध लागला तरच खरे सुख मिळते. कारण ते सुख पदार्थगत नसून आत्मोत्थ असते. स्वानुभूती म्हणजेच सुखानुभूती होय. हाच सुखाचा गुरुमंत्र! स्वसंवेदन हा त्याचा मूलस्रोत!!

स्वसंवेदन अत्यंत प्रभावी गुणधर्म आहे. प्रत्येक जीवाला स्वतःचे अस्तित्व उमजतेच. मी आहे. मला भावना आहेत. मला सुख-दुःख कळते. इतराहून वेगळी अशी केवळ स्वतःचीच आवड-निवड आहे. अशा प्रकारच्या चेतोवृत्ती प्रत्येक जीवाला असतात– तीव्र किंवा मंद!! चेतनेची सत्ता स्वयंभू आहे. स्वतत्त्वाची जाण ही जीवद्रव्याची स्वगुणोत्थ भावावस्था आहे. याच मूळ जाणिवेतून पुढील ज्ञान संभवते. म्हणून सर्व ज्ञानगुणाचा मूलाधार 'मी' च्या स्वतःच्या जाणिवेत निहित आहे. स्वतःला अस्तित्व नसेल तर किंचित मात्र ज्ञान संभवत नाही. म्हणून स्वसंवेदनाला फार महत्त्व आहे. यालाच दर्शन असेही म्हणतात. यास्तव साऱ्या तत्त्वज्ञानाचा मूलाधार दर्शन होय. उशीरा का होईना पण अशाच प्रकारची तीव्र जाणीव प्रोटॅगोरसला झाली आणि त्याने आपल्या परीने Homo Mensura – मानव हाच मानदण्ड हा स्वानुभूतीचा दण्डक तत्त्वचिंतनात मान्य केला.

परंतु हा पार्थिव देह, इंद्रियमयता, आहारादी संज्ञा, मैथुनादी वासना, भोगतृष्णा आणि स्वत्त्वाचा व्यामोह या सर्व अवस्था पराधीन आहेत हे स्पष्टतः कळते. म्हणूनच तर इंद्रियभोगाचा व मनाचा संघर्ष संभवतो. शिवाय सर्व भोगवासनेच्या कक्षा देहावरोबरच निर्माण होतात व त्याबरोबरच विलय पावतात. संपन्नता असूनही शांती मिळत नाही. निर्भोग राहूनही जीव समाधान पावू शकतो. म्हणजे असा तो जीवच या चेतनेचा शाश्वत मालक ठरतो. या देहापेक्षाही मी वेगळा उरतो. त्याचा शोध-बोध घेणे गुणात्मक कार्य आहे. यात फसवणूक




नसते. अशा आंतर शोध-बोधातूनच आत्मदर्शन-ज्ञानगुणाचे अनुभवन घडते. मग आत्मा म्हणजे काय ही समस्या स्वतःच्याच अनुभवाने सुटू लागते. आणि त्यापुढे केवळ 'मी' एवढाच आत्मा नसून इतर सर्व प्राण्यामधील 'आत्मतत्त्व' ही त्याला स्पष्टतः आकळते. त्यामुळे आपोआपच इतर जीवाशी समभाव व मैत्रिभाव निर्माण होतो. स्वसंवेदन वाढीस लागते. स्वतत्त्वाबरोबरच परद्रव्याचेही ज्ञान होत राहते. द्रव्याचे चेतन व अचेतन असे मुख्य भेद आणि पुढील उत्तरभेद त्याला समजतात. प्रत्येक द्रव्याचे सामान्य व विशेष गुण वेगवेगळे जाणता येतात. सामान्य लक्षणांमुळे द्रव्यतः जाणण्याचे सामर्थ्य वळावते. वस्तूतील विशेष लक्षणांमुळे द्रव्यभूत गुणांची ध्रुवता व कालवर्ती परिणामी पर्यायही उमजतात. त्या बळावर तो स्वतःच्या गुणांच्या दृष्टीने अधिक सावध बनत जातो. **हेयोपादेय** बुद्धी शुद्धतर होत राहते. स्वगुणांमध्येच रत होण्याची कला अवगत होते. फलतः तो परद्रव्यापासून परावृत्त होऊ लागतो. द्रव्यतः सर्व जीव समान असून जीवाचा प्रत्येक गुण पूर्णतः समर्थ असल्याचा अनुभव येतो. स्वतःच अनंतगुणी असल्यामुळे दुसऱ्या कुणाचीही कृपा, देणे, घेणे, सेवाभक्ती करणे अशा व्यवहाराला अवसरच राहात नाही दर्शनमार्गात. आणि ज्ञान-भक्ति-क्रियारूप परस्य तत्त्वाच्या आराधनेला आधारभूमीच उरत नाही. '**सोऽहम्**' ची जाणीव परिपूर्णतेला पोहचल्याने एखाद्या जीवाला **विभू** किंवा **अणू** स्वरूपी मानण्याचे कारणच उरत नाही. प्रत्येक द्रव्य सत् असल्याने— **ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या** मानण्याचेही कारणच सापडत नाही.

स्वतःचेच ज्ञानादी गुण '**अनंत**' होण्यासाठी तो स्वतःच्याच ज्ञानावस्थेचा व अज्ञानावस्थेचा विचार करू लागतो. तेव्हा संज्ञा, वासना, मोह हे खरे शत्रू आहेत हे त्याच्या स्वतःच्याच भावावस्थेमुळे त्याला समजू लागते. ज्ञान वाढविण्यासाठी आणि '**सोऽहम्**' अनुभूती परिपूर्ण करण्यासाठी आत्मविचार बळावू लागतो. त्या मार्गात अडथळा आणणाऱ्या संज्ञादिकांचा तो परिहार करू लागतो. परद्रव्यात सुख नसल्याने त्यावरील राग कमी करतो. मोह कमी-जास्त करणे ही स्वतःचीच भावावस्था ठरत असल्याने 'परस्य परमात्म्याची कृपा' तो अपेक्षित नाही. त्याला एक गोष्ट नक्की पटते की परद्रव्याचा संपर्क तोडल्याशिवाय आपल्याच स्वतत्त्वाची अनुभूती मिळत नाही—

**ताम ण णज्जइ अप्पा विसएसु णरो पवट्टए जाम । विसए विरत्तचित्तो जोई जाणेइ अप्पाणं ॥**

(मोक्षपाहुड, ६६)

म्हणून तो विषयभोगाचा त्याग करतो. जसा परविषयांचा संपर्क सुटत जातो तसतसा त्याला स्वगुणांची अनुभूती अधिकोत्तर मिळत राहते. तो स्वात्मगुणांशी एकरूप होत राहतो, केवळ स्वगुणमय होऊन जातो. परद्रव्याविषयी रागभाव संपल्यामुळे त्याचा संसार संपतो. क्लेश संपतात. पराधीनता संपते. त्याला देहाचा आधार लागत नाही. तो केवळ गुणरूप उरतो. **हीच ती स्वतत्त्वाची उपलब्धी होय !**

## ८ कर्मसिद्धान्त—

ज्ञानमार्गातील तत्त्वदृष्टी, चेतनाधर्मातील अनुभूती, सोऽहम्ची जागृती इत्यादी स्वतःचीच गुणरूप स्थिती सदैव शुद्ध स्वरूपात तेवत ठेवावयाची असेल तर—

**जो कम्मजादमइओ सहावणाणस्स खंडदूसयरो ॥** (मोक्षपाहुड, ५६)

ही कर्माधीन अवस्था आणि त्यातील दोष उमजले पाहिजेत. भोगसंज्ञादी सर्व विकार कर्मजात आहेत. त्यामुळेच स्वाभाविक ज्ञान खंडित आणि दूषित होते. आणि अज्ञान दोषामुळे कर्माची शक्ती वाढते. सर्व प्रकारच्या भोगाकांक्षा, विकारप्रवृत्ती, अज्ञान, मोह अशा सर्व विकृत अवस्था कर्मामुळे निर्माण होतात. ही संसारी अवस्था दुःखमय ठरते कारण कर्मावरणामुळे गुणस्थिती खालावते. म्हणून ते आवरण दूर करण्याशिवाय मुक्तीचा दुसरा मार्ग उपलब्ध नाही. इंद्रियाधीन असलेली ही बहिरात्मरूप दशा टाकून देण्यासाठी जे सामर्थ्य किंवा जी गुणवत्ता लागते ती आपल्याच चेतनाविष्कारातून मिळवावी लागते. त्यासाठी सोऽहम् रूपी आपल्याच अंतरात्म्यावर आरूढ

होऊन आपलीच जी ध्रुवरूप परमात्मगुणमय तत्त्वस्थिती ती अनुभवणे क्रमप्राप्त आहे. याच अभ्यासातील फलित म्हणजे प्रसिद्ध **कर्मसिद्धान्त** होय.

तत्त्वतः सुख हा गुण आत्म्याचाच असला तरी तो पूर्णतः अनुभवण्यास आत्मा स्वतंत्र व समर्थ असावा लागतो. तो शुद्ध असतो तेव्हाच हे जमते. सुखादी आत्म्याच्या गुणांमध्ये व्यत्यय निर्माण होतो तो कर्मामुळे. आणि कर्माचा संग घडतो तो जीवाच्याच अज्ञान व कषाय या विभावामुळे. म्हणून अज्ञानावर ज्ञानाने आणि कषायांवर ध्यानाने विजय मिळवावा लागतो. याच साधनेला धर्माचार म्हणतात. म्हणून **कर्मसिद्धान्त धर्माचाराशी** निगडित आहे. कर्म जिंकल्याने गुणावस्था प्रगट होते म्हणून धर्माचार हा सुखाचा मार्ग ठरतो. ज्यांना कर्मसिद्धान्त ध्यानात घेता आला नाही ते धर्माला अफूची गोळी मानतात. किंवा परस्थाची प्रार्थना करीत बसतात. सुख स्वतःचाच गुण असल्याने जीव सदैव सुखासाठी धडपडत असतो. बाह्यतः सर्व सुखे इंद्रियांनीच भोगली जातात. म्हणूनच त्यात पराधीनता अवतरते व ती सुखे खंडित, व्यथित व क्षणिक ठरतात. इंद्रिय सुखाच्या मागे लागून कोणताही मानव खरा सुखी व समाधानी झालेला आढळत नाही. चित्तशांतीच्या शोधामध्ये व्यथित झालेल्या जीवांमध्ये गरिबापेक्षा श्रीमंत लोकच कित्येक पटीने जास्त आढळतात. आणि उत्तरोत्तर अधिकच दुःखी ठरत राहतात. असे का घडते ते तत्त्व त्याला उमजत नाही. स्वतः असमर्थ असल्याची जाणीव दुणावते. मग त्याची प्रतिक्रिया म्हणून सर्व समर्थ अशा परमेश्वराची कल्पना करतो व त्याची करूणा भाकतो. तरीपण ईश्वराची सत्ता अनुभूतिगम्य कधीच ठरत नाही. त्या कल्पित विभूच्या प्रसादासाठी तो ईशस्तुती गातो व सुखाची प्रार्थना करतो. पण तत्त्वतः सुखगुणच न समजल्याने तो परकीय अशा भोगवस्तूचीच अपेक्षा बाळगतो. त्यातून तीच भ्रांती वाढत जाते. अशा याचनेत असंख्य जन्मे वेचली तरी **इष्टसिद्धी** होत नाही. हा स्पष्ट अनुभव आहे. काही प्रमाणात इंद्रियसुखे मिळाली तरीही आकूलता मात्र न शमता वाढत जाते.

विषयाकांक्षेचा हा भ्रम दूर करून तत्त्वदर्शन घडविण्यासाठी जैनाचार्यांनी **कर्मसिद्धान्ताचा** आविष्कार केला. आस्रव, बंध, संवर, निर्जरा व मोक्ष या अनुयोगद्वारांचे विवरण हे कर्मसिद्धान्ताचे अंगभूत क्षेत्र होय. यातील ज्ञान इतके सूक्ष्म व तरल आहे की, अंती ते आत्मरूप पावते. हा स्वानुभूतीचा पल्ला इतर कोणत्याही शास्त्राने गाठलेला नाही. जैनांशिवाय ज्यांना ज्यांना ईश्वरवाद किंवा ईश्वरप्रेरित पुनर्जन्म मान्य होत नाही आणि या उलट कर्मफलाप्रमाणे संसारस्थिती मान्य असते अशा काही इतर तत्त्वचिंतकांनीही कर्माचे व **कर्ममार्गाचे** विवरण करण्याचा प्रयत्न केला आहे. ते मात्र मूलतः व तत्त्वतः वेगळे व फसवे आहे. तत्त्वस्थिती न समजल्यानेच त्यांच्यात कर्मासंबंधी एकवाक्यता आढळत नाही. मूळ प्रमेयाचे आकलनच न झाल्याने त्यांना खरा सिद्धान्त सापडला नाही. म्हणून अखेर तेही ईश्वराधीनतेप्रमाणेच अतत्त्वामध्ये अडकून पडले.

जैनांनी मात्र तो कर्मकाण्डरूप जंजाळ अव्हेरून कर्मसिद्धान्त मान्य केला आणि कर्मकवच भेदण्याची कर्तृत्वशाली व स्वात्मप्रभावी संस्कृती अवलंबिली आहे. गुणरूप सुखासाठी जीव स्वतत्त्वभूत दर्शन-ज्ञान-चारित्राने स्वतःचे भवितव्य घडवू शकतो हेच तत्त्व आचार्यपरंपरेतून विहित आहे. इष्टसिद्धी होत असल्यामुळे ज्ञानार्जन, तपस्या, संयम इत्यादी उपायांना श्रेष्ठत्व येते. मानवाच्या रूढीगत व अज्ञानजन्य श्रद्धेला कर्मसिद्धान्तामुळे मोठा धक्का बसला आहे. हा मौलिक कर्मसिद्धान्त श्रुतरूपाने, गिरनार पर्वताच्या गुहेत विहार करणाऱ्या धरसेनाचार्यांजवळ शेष होता. तो त्यांनी पर्याय संपण्यापूर्वी पुष्पदन्त व भूतबली या महामुनींच्या स्वाधीन केला. आजही तो षट्खण्डागमरूपाने उपलब्ध आहे. ही साक्षात् सर्वज्ञवाणीतील कर्मसिद्धान्ताची मूळपरंपरा आहे ! कर्मसिद्धान्ताचा अभ्यास सूक्ष्मपणे करणाऱ्यांना त्यातील कर्मनाशाची--आत्मगुणरूप प्रक्रियांची जसजशी अनुभूती मिळते तसतसा खरा आनंद होतो. त्याबरोबरच **सर्वज्ञतेचीही** खात्री मनोमनी पटत राहते. हा पुरुषार्थ जागृतीचा अमोल ठेवा जैनाचार्यांनी जीवापाड परिश्रमाने जतन करीत आणला. आणि भ्रांत व विकृत कल्पनांचा परिहार करून सुखेच्छू मानवाच्या वंशजांच्या स्वाधीन केला आहे. हे त्यांचे निरामय उपकार मानव जातीच्या अंतापर्यंत विसरणे शक्य नाही.

संसार-संततिच्छेद हाच या कर्मसिद्धान्ताचा गुणरूप उद्देश. त्यामुळे ईशाराधना-मार्गातील कर्मयोग, भक्तियोग इत्यादी आस्रवरूप क्रियांचा निरास होतो. आत्मा केवळ आत्मरूपच उरतो. संसार– संततीचा नाश होतो. जीवाची संसार-संतती विविध आहे. अनतजीव यात गुरफटलेले आहेत– काही स्थूल तर काही सूक्ष्म ! या स्थावर व त्रस जीवाचे भेद-प्रभेद आणि त्या त्या जीवनावस्थेचे सूक्ष्म विवरण जैनाचार्याशिवाय इतर कोणत्याही तत्त्ववेत्याने शोधले नाही. आधुनिक शास्त्रज्ञाना देखील यातील प्रत्यय सुगम होत आहे पण जैनांइतकी अगाध सूक्ष्मता व विशाल प्रत्यय अनुभवण्यास वेळ लागणार आहे. आधुनिक शास्त्रज्ञाचे जीवनिर्मितीचे प्रयत्न तर केवळ योन्यंतर स्वरूपाचेच ठरतात. तो नेहमीसारखाच देहवदल असतो, नवनिर्मिती नव्हे !! पुनर्जन्म व योन्यंतर स्वकर्मानुसार मानले नाही तर जीवनावर नीतिमत्तेचे सुसंस्कार करण्याचे प्रयास व्यर्थच ठरतील. सुजनता-दुर्जनता यातील सीमारेषा पुसून जाईल. जीव पुरुषार्थहीन व परतंत्र बनेल. मंगल-अमंगलतेमधील लक्ष्मणरेषा आखता येणार नाही. कर्मफलानुसार पुनर्जन्म न मानला तर जीवांच्या जीवितावस्थेतील विविधता व योन्यंतरामधील सुख-दु.ख याचा अन्वयार्थ सापडणार नाही. जातिस्मरण, भूत-पिशाच्च-योनीतील मानवी प्रत्यंतर इत्यादी आंतरिक अनुभव, प्रत्यक्षात भोगावे लागत असतानाही, खोटे म्हणावे लागतील !

पुनर्जन्माच्या संस्काराशिवाय बालवयात आढळणारी बुद्धीची प्रगल्भता, कलात्मक प्रतिभा, गुण-विकासातील तीव्र मंदता किंवा विषयवासनेतील स्थितप्रज्ञता कशाचा परिणाम समजायचा ? केवळ परमेश्वराची लीला समजली तर हा परागुणी परमेश्वर करुणासागर असूनही जीवांशी क्रूर खेळ का खेळतो यातील रहस्य आकलत नाही. अत्यंत उन्मत्त, मदाध, दुष्टबुद्धी किंवा अपंग, हीन, दीन, दुःखी, अज्ञानी जीव त्याने का निर्माण करावेत ही शंका चिंतनशील मनाला कष्ट दिल्याशिवाय राहात नाही. म्हणून विश्वाचा निर्माता व पालक कोणी नाही. प्रत्येक द्रव्याला स्वतःची सत्ता स्वयंभू असते. जीव-जड तत्त्वाच्या परिणमनाचे नियमन त्या त्या द्रव्याच्या उत्पाद-व्यय-ध्रौव्यरूप गुणधर्मानुसारच होत राहते. जीवाचा पुनर्जन्मही त्यापैकीच एक परिवर्तन असते. ते प्रत्येक जीवाच्या भावावस्थेवर अवलंबते. तीच भावावस्था परद्रव्य-संपर्क सोडून स्वतत्त्वमय झाली की, जन्मसंतती संपते. ज्योतीच्या संततीची कारणपरपरा संपली की तिचे जळणे सपते. तसेच मोह-संतती संपली की जन्म-मरणाची दशा संपते. जीवतत्त्व व त्याशी निगडित असलेले जडतत्त्व-स्वरूपी कर्मवर्गणा प्रत्येकी स्वतंत्र होतात. या दोन परस्पर विरुद्ध तत्त्वांची परस्पर क्रियाशील अशी मोहमयी अवस्था म्हणजेच संसार होय. मोह-तृष्णेचा नाश म्हणजेच मोक्ष किंवा आत्म्याला स्वतत्त्वाची, अनंतसुखाची, चेतनागुणाची पूर्ण लब्धी. आणि कार्माण वर्गणेला त्याच्या स्वतःची द्रव्यस्थिती. स्वद्रव्यमयता म्हणजेच तत्त्वदशा. ही मोहनाशाची पुरुषार्थ-प्रचोदक सिद्धान्ताची मांडणी जैनाचार्यांनी सातत्याने केली आहे. ईश्वराच्या लीलेची किंवा कृपेची तमा न बाळगता, स्वत.च्याच गुणसामर्थ्यावर निर्भर असण्याची व आत्मोद्धाराची प्रेरणा दिली. हे मार्गदर्शन म्हणजे मानवावर घडून आलेला महान अनुग्रह होय. स्वतःच्या अस्तित्वापर्यंत हा मानव या गुणमार्गाचा ऋणी राहील. या ज्ञानाशिवाय विश्वातील इतर सर्व दर्शनावर एकप्रकारच्या अर्धसत्याची किंवा अंशसत्याची दाट छाया पडलेली आढळते. पूर्ण सत्य पूर्णांशाने एकाच वेळी प्रतिपादन करण्याचे सामर्थ्य त्यांच्यात आढळत नाही कारण ती तत्त्वदशाच नसते. या कर्मसिद्धान्ताचा चेतनात्मक अनुभव अत्यंत सूक्ष्म आहे. शिवाय संसारी मानवाची चेतनाशक्ती अत्यंत मर्यादित आहे. म्हणून आत्मगुणांचा प्रभाव वाढल्याखेरीज हा सिद्धान्त पेलत नाही. तरीही संसारदशेतून मुक्त होण्यासाठी स्वतत्त्वाच्या विरोधी असलेल्या कर्मवर्गणेची अवस्था समजणे अपरिहार्य आहे.

## ९ देवता-विमर्श–

गुणविकासाच्या मार्गात ज्यानी दुसऱ्याचा आदर्श मानला त्यांनीच आपापल्या आदर्शवादाच्या किंवा इच्छापूर्तीच्या कल्पनेप्रमाणे गुणसामर्थ्य असलेल्या देवता मानल्या. आणि या प्राथमिक चुकीमुळेच त्या कल्पनेत विष्कळीतपणा आला. एकेश्वरवादापासून इष्टदेवतावादापर्यंत विविधता वाढत गेली. त्यांची संख्यादेखील एकापासून




३३ कोटीपर्यंत वाढली तरी तिचा अंत लागेना. ही **परस्थ सामर्थ्य-गुणवत्तेची** कल्पना स्वतःच्या असमर्थपणाचे द्योतक होय. कस्तुरी मृग कस्तुरीसाठी दहाही दिशा धावत सुटावा अशीच ही स्थिती आहे. गुण तत्त्वमयच असतात. यथार्थतः ते देता येत नाहीत किंवा घेता येत नाहीत. आपण स्वतःही एक नियत गुणमय तत्त्व आहोत ही तत्त्वस्थिती विसरल्यामुळे स्वतःचीच गुणवत्ता अनुभवता येत नाही. तत्त्वाला मूलतः गुण असतातच. ते परिपूर्णच असतात. अंशरूप किंवा विकल किंवा भंगरूप नव्हे ! गुणरहित तत्त्व असतच नाही. **सोऽहम्‌मध्ये गुणोऽहम्‌चीच** अनुभूती आहे. परद्रव्याची किंवा परगुणाची अनुभूती कुणालाच घेता येत नाही. असमर्थ जीव दुसऱ्या समर्थ जीवाची मदत घेतो ही भ्रान्त अवस्था आहे. त्यातूनच असमर्थता देणारा दुसरा कोणी आहे व तो आपला शत्रु आहे अशा विद्रोहाचा प्रादुर्भाव होतो. जीव रागद्वेषाच्या चक्रात घुटमळत राहतो.

खऱ्या अर्थाने गुणाचा उत्कर्ष किंवा अपकर्ष कर्मदशेप्रमाणे ज्या त्या जीवामध्येच घडून येतो. स्वतःची कर्मदशा बदलण्यास जीव स्वतःच पात्र असतो. वैद्य औषध देतो याचा अर्थ तो आयुष्य देतो, आरोग्य देतो, मनःस्वास्थ्य देतो, इंद्रियता देतो किंवा इंद्रियांचे गुणत्व देतो असा मुळीच होत नाही हे उमजणे आवश्यक आहे. आणि ते स्वतःच्या चेतनागुणामुळे शक्यही आहे. अग्नी जाळतो हे विधान केवळ उपचारमय आहे. ज्वलनशील पदार्थ स्वतःच्या गुणाने जळतात हेच खरे. जे ज्वलनशील नाहीत अशा अस्बेस्टॉससारख्या पदार्थांना अग्नी जाळत नाही. कारण ते जळत नाहीत. म्हणजे गुणशीलता-उपादानशक्ती ही द्रव्यभूतच असते. उपादानाशिवाय निमित्तक कार्य करीत नाही. आकलनच नसल्यावर गुरू शिकवू शकत नाहीत. उपादान समर्थ असल्यावर निमित्त कोणतेही पुरते. ते मिळतच राहते. धुंडावे लागत नाही. द्रोणाचार्यांनी नकार दिला तरी एकलव्याचे शिक्षण होऊ शकलेच की ! चक्रवर्ती ब्रह्मदत्ताची संपत्ती त्याला सुखवू शकत नाही किंवा धन्यकुमारावरील विपत्ती त्याला दुखवू शकत नाही. ज्याचा त्याचा भोग त्याला मिळतच राहतो. म्हणून **दैवतवादातील कृपेची अपेक्षा व्यर्थच ठरते !! जो देतो तो देव अशी व्याख्या करावयाची** झाल्यास स्वतत्त्वालाच देव मानणे भाग पडते. आणि तत्त्वतः तेच खरे आहे. ज्ञान-सुख इत्यादी गुण आत्मीयच असतात. प्रत्येक जीवात असे गुण निहित असल्यामुळे आणि एकाचे गुण दुसऱ्याचे होत नसल्याने **प्रत्येक जीव स्वतःच देव ठरतो.** तो स्वतःचेच गुण विकसित करतो.

एक जीव अविकसित गुणावस्थेत ( कर्माधीन ) असताना दुसरा एखादा जीव तत्त्वतः पूर्ण गुणवान असू शकतो. आणि त्याचा आदर्श मानून इतर जीव स्वतःच्या गुणोत्कर्षासाठी प्रेरणा घेऊ शकतो, एवढ्या मर्यादित अर्थानेच दैवताला किंवा 'देव' कल्पनेला मान्यता असते. त्यामुळे **परस्थ परमेश्वर** किंवा त्याचा **दूत** इतर जीवांचा उद्धार किंवा गुणविकास करतो ही कल्पना भ्रांत ठरते. व्यवहारतः आदर्श उपयुक्त मानला तरी तो केवळ निमित्तमात्रच ठरतो. उपादान ज्याचे त्याचे स्वतःचेच असते. आणि निमित्तच हवे असल्यास परतत्त्वाकडे धावण्याची गरज नाही. कोणताही जीव स्वतःच्याच बहिरात्म दशेचा त्याग करून, स्वतःतीलच अंतरात्मदशेचा, कारणपरमात्म्याचा आधार घेऊन प्रगती करू शकतो आणि गुणविकास पूर्ण झाल्यावर, उपादान पूर्णतः समर्थ बनल्यावर, कर्मावरण पूर्णपणे नष्ट झाल्याने **तो स्वतःच परमशुद्ध व अनंत गुणी होऊ शकतो.** त्या अवस्थेतील आत्मतत्त्वाला परमात्मा म्हणतात. **हीच सोऽहम्‌ची** परिपूर्ती होय.

कर्मसिद्धान्तामुळे सर्वच दैवतकल्पना निराधार ठरतात. दैवतामध्ये जी पूज्यता, जे दिव्यत्व, किंवा जी मंगलमयता गृहीत असते तीच गुणावस्था अनंतपटीने प्रत्येक जीवामध्ये तत्त्वतः निहित आहे. फक्त स्वतःचीच गुणावस्था अनुभवनीय ठरत असल्यामुळे ( आणि दुसऱ्याची अनुभवनीय नसल्यामुळे ) सर्व मांगल्यातील मंगलत्व **स्वतत्त्वामध्येच आढळते.** म्हणून **जीवो मंगलम्** हाच खरा दैवतावाद ठरतो. कर्मसिद्धान्ताला अनुसरून गुणविकासाच्या मार्गाने जीवाची संसारावस्था संपते आणि ज्याची त्याला परमगुणात्मता प्राप्त होते. गुणस्थान मार्गामध्ये स्वतःच्याच आत्मगुणाचे ध्यान करावे लागते. या कर्मनाशाच्या व गुणसिद्धीच्या मार्गात दुसऱ्या कोणत्याही तत्त्वाची पूजा, आराधना, सेवा इत्यादी गोष्टी समवत नाहीत. म्हणून **परमेश्वर-परमात्मा** किंवा




त्याचा अवतार, तसेच आकाशातील बाप व त्याचा प्रेषित, तथा अल्ला व त्याचा पैगंबर यांना आत्मधर्मीय साधनेमध्ये स्थान उरत नाही. अरिहंताचा आदर्श देखील निमित्तमात्र असून त्याची आराधना प्राथमिक दशाच ठरते. कारण अरिहंत पावत नाही व शापही देत नाही. तो स्वतत्त्वाच्या अनुभूतीशिवाय दुसरे काहीच करीत नाही.

**१० वीतरागता–**

सम्यग्दर्शनाच्या प्रभावामुळे जैनांचा प्राथमिक आदर्शवाद चटकन तत्त्वानुभूतीकडे वळतो. त्याच्या जीवनात तत्त्वमयता लगेच रुजते. त्यामुळे त्यांचा साधनामार्ग आत्मवर्ती बनतो. त्यांची गुणाराधना पूर्णतेच्या, संपूर्ण शुद्धतेच्या, अनंत-तत्त्वाच्या परिक्षेत्रातच वाढते व सफल होते सर्व संज्ञा, कषाय, मोहावस्था इत्यादी जीवाच्या विभावावस्थाच होत. चेतनागुणावरील कर्मावरणामुळे त्याच्या तत्त्वमय चेतनेत दोष उद्‌भवतात. या सर्व दोषपूर्ण विभावांचे मूळ कारण म्हणजे परद्रव्याविषयी निर्माण होणारा अध्यवसाय. हा अध्यवसाय विकारी असतो– आत्मगुणात विकार घडवितो. तो जिंकून अविकारी होणे म्हणजेच वीतरागता प्राप्त करून घेणे होय. **वीतरागता म्हणजे शुद्ध चैतन्यरूप अवस्था.** ती तत्त्वभूत असल्याने प्रगत होतेच. संसारी अवस्था ही अतत्त्वदशा होय. म्हणूनच संसारात दुःख संभवते. परद्रव्य-संपर्कातील रागयोग निघून गेला की **ज्ञानयोग स्वतः प्रगट होतो.** सर्व-दोषरहित अशी जी स्वतत्त्वाची सत्ता तीच आत्म्याची वीतरागता होय ! याच वीतरागतेची सिद्धी करावयाची असल्याने जैनांना कृपाळू परमेश्वर अपेक्षित नसतो. या आत्मगुणवर्ती साधनेमुळे पराधीनतेची व्यावृत्ती आपोआप होते आणि गुणसिद्धी मार्गी लागते. स्वतत्त्वाची उपलब्धी होते.

**स्वतत्त्वाचे लक्षण–**

**जीवो जिणपण्णत्तो णाणसहावो य चेयणासहिओ ।** –भावपाहुड, ६२

स्वतत्त्व केवळ चेतनागुण असून त्याची आविर्भूती ज्ञानमय असते. या शुद्ध तत्त्वाविष्काराकडेच ध्यान लागल्याने

**देव भजो अरिहंत नित गरु सेवो निर्ग्रंथ । दया धर्म पालो सदा यही मुक्ति को पंथ ।।**

ही प्राथमिक अवस्था गळून पडते. केवळ चेतनोपयोगच मार्गी लागतो. **सम्यग्दर्शन-ज्ञान-चारित्राणि मोक्षमार्गः ।** हे वीतरागी साधनेतील पहिले सूत्र असले तरी स्वानुभूतीमध्ये– शुद्धोपयोगामध्ये त्यातील क्रमवर्तीपणा नष्ट होतो. साधना-मार्गातील विकल्प-व्यवहार वीतरागतेला पोषक ठरत नाहीत. दर्शन-ज्ञान-चारित्र हा आचारकल्प नसून तो स्वतत्त्वाची गुणावस्था आहे. त्यामुळे ती शुद्धावस्थेत प्रतिसमयाला समानतेने युगपद प्रतिभासित होत राहते. तीच तत्त्वत. आत्मस्थिती होय. रागमयता, विकल्पावस्था, अपूर्णता निघून गेल्याशिवाय ती स्वयंभू, स्वयंप्रकाशी, अनंत अशी आत्मोत्थ स्थिती लाभत नाही. म्हणून मोक्षमार्गामध्ये केवल वीतरागता हाच ध्येयबिंदू ठरतो. रागमयता म्हणजेच अनंत सुखामध्ये व्याबाध होय. वीतरागतेमध्ये हा व्याबाध नष्ट होत असल्यामुळे **वीतराग** अवस्था अनंत सुखमयच असते.

जिनमार्गातील उद्दिष्ट, साधना व सिद्धी आत्मगुणवर्ती असल्याने जिनमार्गीयांना स्वत चेच कषाय जिंकण्यासाठी दुसऱ्या कोणत्याही परतत्त्वाची गरज भासत नाही. स्वत.चीच भावावस्था बिघडल्याने जसा जीव **दानव** होतो तसाच तो स्वतःच्याच शुद्ध भावावस्थेच्या प्रभावाने स्वतः देव होतो. त्याना परकीय देवता शोधावी लागत नाही. मंदिरातील त्यांची भावावस्था—

**तुझ्या मंदिरी आलो जरी मी नमतो जिनराया । तुझे नव्हे रे माझे दर्शन निवान्त साधाया ।। ध्रु.।।**
**तुझ्या दर्पणी बघतो माझ्या निर्मळ जिनरूपा । अनुभवतो नित परमानन्दे चिन्मय निजरूपा ।। १ ।।**

अशी होऊन स्वतत्त्वातील गुणमयता हीच त्यांची आराध्य देवता ठरते. आत्मगुण-पूजा नियतस्वरूपी असल्याने विभूतिपूजेचा प्रश्नच उद्‌भवत नाही. विशुद्ध तत्त्वदशेला विभाव किंवा विकार घडत नसल्याने अवतार,

दूत, प्रेषित, उद्धार या कल्पना शून्य ठरतात. मग लढाई-शत्रुत्व-उपद्व्याप, तसेच मित्र-गण-गोत्रादी परिवार, विवाह-पुत्र-पौत्रादी संसारी अवस्था, निर्वाहाची चिंता, लक्ष्मीची विवंचना, न्यायदिनाची योजना व प्रतीक्षा इत्यादी अनेक प्रकारच्या विकल्पामध्ये गुंतलेल्या विभूतींना देव मानून त्यांच्या कृपेची अभिलाषा बाळगणे हा वीतराग-मार्गाचा प्रतिपक्ष ठरतो. म्हणून जैनधर्मात त्यांचा निरास झालेला आढळतो.

## ११ धर्माचार-मार्ग–

द्रव्यलक्षण, स्वतत्त्वाची उपलब्धी, दिव्यत्वाची प्रचीती, कर्मावरणांचा निरास इत्यादी आवश्यक बाबींचे ज्ञान योग्य मार्गाने झाल्यामुळे धर्मक्षेत्रातील आचारमार्ग देखील सुनिश्चित ठरविणे सोपे जाते. जोवर शुद्धोपयोगाची स्थिती लाभत नाही तोवर अशुभोपयोगाचा परिहार होण्यासाठी व शुभोपयोगाची अवस्था संपन्न राहण्यासाठी सतत प्रयत्न करणे हाच त्रिगुणात्मक धर्ममार्ग होय. मार्ग हा श्रेणीबद्धच असतो, सिद्धी नव्हे. सिद्धीसाठी मात्र हा आत्मा स्वरूपात– चेतनागुणात अविचल रत राहणे (अप्पा अप्पम्मि रओ) हा एकच ध्यानमय मार्ग उपयुक्त ठरतो. तो गुणात्मक असल्याने नियत असतो. त्यात विभाषा संभवत नाही पण ध्यानमय श्रेणी लाभण्यासाठी देखील पूर्ववर्ती गुणवत्ता वाढवावी लागते. अशा प्रकारची पात्रता अशुभ-निवृत्तीमुळे व शुभ-प्रवृत्तीमुळेही वाढीस लागत असते.

अशुभनिवृत्तीचा मार्ग सामान्यतः सर्व धर्मामध्ये सारखाच सांगितलेला असतो. पापाचा परिहार हा जागतिक जीवनातही आवश्यक असतो. आणि जागतिक गरजा उघडपणे पारखता येतात. शुभ क्रिया मात्र इतक्या सहजतेने निश्चित करता येत नाहीत. सुख ही कल्पना भोगाधीन समजल्याने, आणि भोगाकांक्षा अफाट असल्याने प्रत्येक व्यक्तीगणिक भोगविषयाची व्याप्ती बदलत राहते. म्हणून लौकिक सुखलक्षणात मतभेद होतात. सुखानुभवामध्ये मानसिक वासनाप्रवृत्ती किती व कशी असावी हे ठरविण्यास माप नाही असे सामान्यतः मान्य करण्यात येत असले तरी तत्त्वदृष्टीमुळे जैनांची श्रद्धाघडी मात्र विस्कळीत होत नाही. कारण जे आत्मगुणानुसारी असते त्यालाच ते शुभ किंवा मंगल मानतात. ज्या द्रव्यगुण-दृष्टीमुळे इतर सर्व क्षेत्रात वेगळेपणा संभवतो त्याच कारणाने येथेही जैनाचार वेगळा ठरल्यास नवल नव्हे.

फलनिष्पत्तीमध्ये पाना-फुलांचा लाभ आपोआप होतो त्याप्रमाणे **गुणसिद्धीच्या मार्गात पुण्याचा लाभ आपोआप होतो** ही महत्त्वाची जैनश्रद्धा धर्माचारामध्ये सदैव कार्यकारी राहते. त्यामुळे केवळ पुण्यासाठी, वैभवासाठी, भोगोपभोगासाठी काहीही करावे लागत नाही. म्हणजे जैन धर्माचार हा पुण्यासाठी वाहिलेला नाही. एवढेच नव्हे तर पापाप्रमाणेच **पुण्याचाही नाश करणे** हेच त्यांचे ध्येय असते. कारण पापाप्रमाणेच पुण्यही कर्मरूपच असते. ते भोगधर्मी असल्याने संसार वाढविणारेच ठरते. **भोग आणि धर्म परस्पर विरुद्ध आहेत.** आणि कर्मभोग तर जिनधर्मियाचा मूळ शत्रू आहे. **पुण्याचाही नाश करणारा हा जगातील एकमेव धर्म जैनांनी अंगीकारला आहे.** म्हणून चारित्राची व्याख्या करताना–

**तं चारित्तं भणियं परिहारो पुण्णपावाणं ।** –मोक्षपाहुड, ३७

असे स्पष्ट विधान केले आहे. इतर कोणत्याही धर्माला हा विचार पेलण्यासारखा नाही. कारण ही दृष्टी स्वतत्त्वाच्या शोध-बोधाच्या भेदातून प्राप्त झालेली आहे. भोगसुखाच्या मागे लागलेले धर्ममार्ग तत्त्वतः आत्मगुणानुभूतीपेक्षा वेगळेच ठरतात! लौकिक प्रयत्नापासून तो त्याग-तपश्चर्येपर्यंत ज्यांच्या सान्या क्रिया अधिकाधिक भोगासाठी वाहिलेल्या आहेत, जे आतुरतेने भोगामागे धावत आहेत त्यांना **पुण्याचा त्याग** ही कल्पना कदापि सहन होणार नाही. त्यासाठी **कषाय जिंकण्याचीच** प्रेरणा असावी लागते. भोगपरावृत्ती म्हणजे जीवनच नष्ट झाल्याची भावना बाळगणाऱ्यांना ह्या तत्त्वातील उंची आणि या आचार मार्गातील तपश्चर्या पेलणार नाही.




जागतिक नीतिमत्ता व्यवहार मार्गाचे अनुकरण करीत असते. हा व्यवहार तर प्रसंगागणिक बदलत राहतो. एवढेच नव्हे तर एकाची नीती देखील दुसऱ्याची अनीती ठरू पाहते. सामाजिक जीवनामध्ये व्यवहार नीतीच अवलंबावी लागते. अशावेळी जैनांनी दोन प्रकारे सावधगिरी बाळगावी म्हणजे तत्त्वच्युती होणार नाही.

**यत्र न सम्यक्त्वहानिर्यत्र न व्रतदोषः ।**

ज्या व्यवहारात तत्त्व श्रद्धानाच्या दृष्टीने सम्यग्दर्शनाला (आत्मस्वरूपात्मक जाणीव) हानी पोहचत नाही, आणि तीर्थपालनाच्या दृष्टीने ज्यात आपल्या संवरात्मक व्रतांना दोष लागत नाही असा कोणताही लौकिक विधी पाळण्यास हरकत नाही. म्हणजे आत्ममार्ग व लौकिक मार्ग यामधील लक्ष्मण रेषेची मर्यादा जैनांनी कधीही ओलांडलेली नाही. यामुळे त्याचे व्यवहार मार्ग, तत्त्वश्रद्धान आणि संवरात्मक आचारधर्म यांच्यात परस्पर संघर्ष निर्माण न होता त्यातील गुणसिद्धी सफल होते. आणि धर्म-अर्थ-काम या तीनही पुरुषार्थामध्ये समतोलपणा राखता येतो. त्यांतील भासमान विरोध टाळता येतो.

सम्यग्दर्शनाचा आणि सवर तत्त्वाचा केन्द्रबिंदू **अहिंसा**–धर्मात आढळतो. म्हणून अहिंसेला समस्त मंगल आचारामध्ये फार उच्च स्थान लाभले आहे. यामुळेच जैन धर्माला **अहिंसा धर्म** म्हणून ओळखतात. **अहिंसापरमो धर्मः ।** (धर्म हा अहिंसामयच असतो) अशा सूत्र रचनेतील धर्माच्या परिभाषेला आज जागतिक प्रसिद्धी मिळाली आहे. परंतु दुर्दैवाने **अहिंसा** या तत्त्वदर्शबद्दल फार मोठ्या प्रमाणात गैरसमज प्ररूढ होत आहेत. ज्यांना हिंसेशिवाय जीवन जगताच येत नाही, त्यांनी अहिंसा या श्रद्धास्थानाची वाटेल त्या स्वच्छंद शब्दात टर उडविली आहे. कारण त्याना अहिंसा किंवा हिंसा या केवळ घटनामय प्रसंग वाटतात. अहिंसा केवळ घटना नसून ती एक **आत्म्याची भावावस्था** आहे. त्याला तात्त्विक अधिष्ठान आहे. चेतोवृत्तीतील तो एक प्रत्यय आहे. त्यात सम्यग्दर्शन-ज्ञान-चारित्र एकाकार पावतात. कारण ती विकाररहीन आत्मदशा आहे. आत्म्यातील गुणांना हीनता प्राप्त होते ती कषायाच्या उद्रेकामुळे. अशी हीनता न अंगीकारणे यालाच अहिंसा म्हणतात. **अनंतानुबंधी कषाय** आत्मगुणांची हानी जास्तीत जास्त करतात. त्याच प्रबळ कषायांना जिंकल्यामुळे **सम्यग्दर्शनाचा** प्रादुर्भाव होतो, चेतनेची गुणवत्ता वाढते, आणि **समभाव** पोसवतो म्हणून अनंतानुबंधी कषाय जिंकण्यात सम्यग्दर्शन-ज्ञान-चारित्र या त्रयीची उपलब्धी आहे ! पूर्ण अहिंसा ही उच्च **आत्मिक स्थिती** आहे. वीतराग अवस्थेतच कषाय पूर्णत नष्ट झालेले असतात. तेथेच पूर्ण समभाव सिद्ध झालेला असतो. अशा शुद्ध आत्म्यालाच **परम ब्रह्म** म्हणतात याच अभिप्रायाने स्वामी **समंतभद्र** आचार्यानी **'अहिंसा भूतानां जगति विदितं ब्रह्म परमम्'** या उक्तीत शुद्ध अहिंसेलाच **परम ब्रह्म** म्हटले आहे.

अशा परम तत्त्वगामी आचार धर्माची पूर्ण सिद्धी अधिक स्पष्ट करताना, तात्त्विक आचार हा गुणरूपच असतो, तो केवळ उपचार मार्ग उरत नाही. आचार्य कुंदकुंदांनी आपल्या **मोक्षपाहुड** (५०)मध्ये धर्म हा नियत स्वरूपात आत्मस्वरूपात्मक असतो असे स्पष्ट म्हटले आहे—

**चरणं हवइ स-धम्मो धम्मो सो हवइ अप्पसमभावो ।**
**सो राग-रोस-रहिओ जीवस्स अणण्णपरिणामो ॥ ५० ॥**

चारित्र किंवा धर्माचरण म्हणजे स्वतत्त्वाची एक गुणस्थिती होय. आत्म्याचा तो गुणधर्म म्हणजे आत्म्याचा समभाव (कर्मोदयरहित अवस्था) होय. तो समभाव म्हणजे राग-द्वेषांनी रहित (परिस्पंद-रहित) अशी एक आत्म्याची स्वस्थिती असते. आणि ती स्वस्थिती चेतनागुणाशी एकरूपच असते. ज्या धर्माचाराने अशी गुणरूप शुद्धतेची लब्धी होत नाही तो आचार जिनधर्माला अपेक्षित नाही. बाकी सर्व आचारमार्ग गुणसिद्धीच्या दृष्टीने–मोक्षाच्या हेतूने निष्फळच ठरतात ! **केवळ आत्मयोगच नियत चरण होय !!**




ज्ञानयोगात ही तात्त्विकता ठीक असली तरी प्रत्यक्षात साधना नेहमी शक्तितः करावी लागते. असमर्थताच जास्त आढळत असल्याने मुनिजनांपेक्षा सामान्यांचा आचारयोग वेगळा व विविध असतो. पुष्कळसे जीव नित्य धर्माचारापेक्षा नैमित्तिक आचार-सोहाळ्यातच भाग घेण्यात स्वतःला धन्य समजतात. पंचकल्याणकादी पूजामहोत्सव, मुनि-विहार-योग, तिथिपर्वादिक महोत्सव, तीर्थयात्रा, रथयात्रा इत्यादी सोहाळ्याच्या रूपाने मनातील धर्मप्रहर्ष व्यक्त करतात. पण या सर्वांमध्ये सम्यग्दर्शनरूप आत्मयोगच केन्द्रबिंदू असतो. सर्व आचार आत्मतत्त्वाशीच निगडित असतात. तो आत्मयोग सुटला तर सर्व सोहाळा केवळ लौकिक व्यवहार होतो. साधक मार्गभ्रष्ट होतो. धार्मिक आचार हा आत्ममार्गीच असला पाहिजे. तो तसा राखण्याचा प्रयत्न कसोशीने करावा लागतो. चूक होऊ नये, निदान दर्शनगुणाला हीनता येऊ नये म्हणून जी दक्षता बाळगावी लागते त्यासाठी चार स्तरांवरील कसोटी पुढीलप्रमाणे दिलेली आढळते--

उत्तमा सहजावस्था मध्यमा ध्यानधारणा । अधमा मूर्तिपूजा च तीर्थयात्राऽधमाधमा ।।

आत्मोन्नतीच्या दृष्टीने चरणाचा उच्च स्तर म्हणजे मोह-क्षोभरहित आत्म्याची समावस्था किंवा स्वरूपाचरण चारित्र होय. आणि सर्वांत खालची पायरी तीर्थयात्रा होय. समावस्थेच्या खालोखाल मनोयोगात्मक ध्यानधारणा सांगितली असून मूर्तिपूजेचा क्रम त्याच्या पाठोपाठ सांगितला आहे. या प्रणालीमधील स्वतत्त्वाच्या शोधाची दिशा स्पष्टपणे समजल्याशिवाय राहात नाही.

## १२ साहित्य-कलादृष्टी--

आचार-साधनेच्या उच्च स्तरावरून व्यावृत्त होण्याचा प्रसंग आला तर जैन मुनी आपली भावावस्था त्यापेक्षाही खाली घसरू नये याची दक्षता बाळगतात. अशावेळी ज्या शुभ कार्यात ते आपला योग देतात त्यामध्ये अध्ययन आणि ग्रंथरचना यांना फार मोठे स्थान मिळाले आहे. शिवाय त्यांचा कल्याण-विहार चालू असताना, प्रवचनवात्सल्य आणि मार्गप्रभावना या निमित्ताने अनेक धार्मिक प्रहर्ष साजरे होतात. त्यातून ज्ञानाराधनेचा उच्चांक गाठला जातो. तत्त्वचर्चेमुळेही अनेकांची संवेदना स्पष्टतर होते. भव्यांचे उपादान जागृत व उत्थित होते. या सर्व प्रसंगातून जैनाचार्यांनी निर्माण केलेली साहित्यरचना जितकी सूक्ष्म व तरल आहे तितकीच ती विशाल व उदात्त आहे. तत्त्वज्ञान व आत्मशास्त्र याशिवाय न्याय-तर्कशास्त्र, व्याकरण-काव्य-छंदशास्त्र, भूगोल-खगोल-ज्योतिष-गणित, चरित्र, दृष्टान्तकथा, सुभाषित, स्तुतिस्तोत्र, टीका-भाष्य-विवरण इत्यादी साहित्य प्रांगणातील विशाल क्षेत्रात निर्मिलेले वाङ्मय इतके समृद्ध व सखोल आहे की येथे त्याची दखल सर्वांशाने घेणे केवळ अशक्य आहे. ( याच लेखकाचा ३७२ पानावरील जैन साहित्य आणि सौंदर्य हा लेख वाचावा ).

ज्या ज्या आचार्यांनी गृहस्थावस्थेत ज्या ज्या लौकिक विद्येत प्राविण्य मिळविले होते त्याही विद्या धर्मायतनास व साधनामार्गास पोषक ठरण्याची शक्यता असल्याने त्यांना उपासनेच्या चौकटीत बसवून त्या त्या क्षेत्रातही ग्रंथरचना केली. कारण तत्त्वत ज्ञान अमर्यादच आहे ! त्या त्या विषयातील अन्यधर्मीय सहित्यकृतीपेक्षा जैन ग्रंथ अनेक पटीने श्रेष्ठ ठरतात. शरीर हे धर्मसाधनेत आद्य असल्याने आरोग्य-साधनेसाठी इतरत्र विहित असलेल्या मद्य-मांसादी हिंस्य पदार्थांचा परिहार करून जैन वैद्यक शास्त्राने आरोग्य-साधनेचा पुरस्कार अहिंसक मार्गाने केला आहे. कोणत्याही जीवांचा घात हा आरोग्यतंत्रात समाविष्ट करणे ही तत्त्वत विसंगती आहे. एकाचा घात करून दुसऱ्याचे आरोग्य पुष्ट करण्यात आत्मघात आहे हे ओळखून जैन ग्रंथकारानी अहिंसक वैद्यक-शास्त्राची व आरोग्य-उपचारमार्गाची स्थापना केली. शास्त्र म्हणूनही त्यांचा प्रभाव मोठा आहे

आत्मौपम्य दृष्टी सतत पुष्ट करणारे जैन ग्रंथकार मांगल्य-संवर्धनात सदैव अग्रेसर आहेत, एकाला दुःख देऊन दुसऱ्याला सुख देणे ही जीवन-नीती नव्हे ! 'जगा, जगू द्या आणि जगविण्यास समर्थ व्हा' हे ब्रीद अंगीकारणारे जैन मानवतेचे खरे पुजारी होत स्वतःच्या जीवनभोगासाठी अन्य जीवांचा व्याघात करणारे ग्रंथकार








मानव्याच्या व मांगल्याच्या कक्षेबाहेर जातात. अत्याचार, लोलुपता, क्रौर्य, स्वार्थ, अनादर, द्वेष, अहंकार, मिथ्योपदेश, स्वैराचार इत्यादी जीवनदोष माजल्याने मानवता कलंकित होते, हे पक्केपणी जाणून जैन आचार्यांनी आपल्या वाङ्मयात जीवाजीवांमधील उच्च-नीच भाव निपटून काढून सर्वत्र समता प्रस्थापित केली. जैनतीर्थात हीच प्रथा आजही अप्रतिहत आहे.

## १३ शासन-संस्थेवरील प्रभाव–

आपल्या कल्याण-विहारामध्ये जैन मुनी सर्व स्तरांवरील जीवाच्या जीवनामध्ये मंगलमयतेची प्रतिष्ठा वाढवीत असत. ते स्वतः निरंकुश मांगल्याचे अक्षय निधी बनल्यामुळे त्यांच्या विहार-क्षेत्रात सदैव मांगल्याचा महापूर वाहात असे. अशुभाचे अपहरण आपोआप होत असे. जीवाची भावावस्थाच उन्नत होत असल्यामुळे या मंगलविधानाच्या प्रभावकक्षेतून निसटून कोणीही बाहेर राहात नसे. **ही मंगलमयता तत्त्वतः जीवोत्थ** असल्याने केवळ धार्मिक लोकाप्रतच नव्हे तर अखिल जीवमात्रापर्यंत– कीटकादी जंतूपासून तो देव-दानवांपर्यंतही तिचा प्रभाव पसरत असतो. मग ही परम पवित्र मांगल्याची छाया शासन संस्थेवरही पडल्याशिवाय कशी राहील ? समवसरणातील अर्हत् छत्रत्रयाची मंगलकृपा नियतपणे विश्वविहारीच असते ! तिच्या सान्निध्यात मंगलमयताच जन्मते ! !

राज्यसंस्था सत्तामूलक असल्याने राखीव संपत्ती, विपुल सामग्री आणि अधिकोत्तर बलसामर्थ्य या त्रयींच्या जोरावर प्रशासक अनियंत्रित व उन्मत्त होण्याचा संभव फार. या एकवटलेल्या तीन बलातिशयापुढे इतर जागतिक बलांचा प्रभाव चालत नाही. उलट तेढ वाढून घातपात आणि ईर्ष्या–द्वेष वाढीस लागतात. आणि मानवी जीवनातील मांगल्याला अवकळा येते, ग्लानी पसरते. यामुळे **मानसिक व वैचारिक प्रभाव वाढविणे** हाच एकमेव मार्ग उरतो. तरीपण सत्तेपुढे सामान्यांचे शहाणपण चालत नाही. न्याय–नीतीच्या कल्पना शिथिलच नव्हे तर स्वार्थी बनतात. सामर्थ्याची साधने छळ करण्यासाठी वापरली जातात. मानवी जीवनावरील नियंत्रणच संपते. जगातील कोणत्याही शासन–शास्त्रावरील विशारदाला यावर उपाय सापडलेला नाही. त्यामुळे असहाय्य बनून तो सत्तेला शरण तरी जातो किंवा सिंहासनाला टक्कर देऊन मरण तरी पत्करतो. पण त्यामुळे मूळ समस्या सुटत नाही. जीवनाचा कोंडमारा दाटत येतो. म्हणून जैनाचार्यांनी यावर **दार्शनिक व अनुप्रेक्षात्मक आंतरगामी प्रभावाची तोड शोधली.** ते स्वतः अशा आंतर प्रभावाचे निर्मळ निधान असल्याने शासकांच्या आणि सत्ताधारीच्या मनावरच त्यांनी मंगलभावनेचा प्रभाव पाडण्याचा प्रयोग केला. तारेची नौका ज्याप्रमाणे प्रवाहाच्याच शक्तीचा तांत्रिक उपयोग करून पैल तीर गाठते त्याप्रमाणे क्षत्रियांच्या सत्तालोलुपतेला त्यांच्याच मन.सामर्थ्याने आळा घातला. त्यांना आपल्या मंगल ज्ञानाच्या प्रभावाखाली आणून **त्यांच्यातील जीवभूत मांगल्यभावनेला चेतविले.** त्यामुळे ते शासक स्वत हूनच मांगल्याच्या मर्यादेत राहू लागले. शिवाय सामान्य प्रजेचाही कल राजाचे अनुकरण करण्याचा असतो. अशा स्थितीमुळे त्यांच्या या अद्‌भुत प्रयोगाला दुहेरी फळ आले. राजाबरोबरच अनुकरणशील प्रजाही मार्गानुवर्ती बनली. तुलनेने यातील महत्ता अधिक स्पष्टपणे जोखता येते.

काही राजे स्वतःच जैन होते तर काही अजैन राजांचे मंत्री, सेनापती, सामंत, सल्लागार, कोषाध्यक्ष इत्यादिकांबरोबरच कधी कधी राणी व राजपुत्र देखील जैन धर्मीय असत. शिवाय कित्येक राजे कृपाळू व प्रजानुवर्तीही होते. अशा अनेक अनुकूल बाजू, राजांना आचार्यापर्यंत आणण्यास उपयुक्त किंवा निमित्तभूत ठरतात. जैन आचार्य अतिशयज्ञानी असल्याने त्यांचा प्रभाव निष्फळ कधीच ठरत नाही. त्यामुळे बहुतेक शासक स्वतःच धर्ममार्गी बनत असत. निदान विपरीत तरी वागत नसत. चंद्रगुप्तासारखे अतीव बलाढ्य सम्राट भद्रबाहूंचे शिष्य बनले. त्यांच्या राज्यात जिनमार्गाचा व सर्वोदय तीर्थाचा प्रभाव सर्वत्र पसरण्यास प्रत्यवाय उरला नाही. सम्राट अशोकाचे पूर्वायुष्य जैन मार्गानेच व्यतीत झाले आणि उत्तर आयुष्यातही ते शेवटपर्यंत अहिंसकच राहिले. नंदवंशीय सम्राट किंवा त्यापूर्वीचे राजे, त्याचप्रमाणे सम्राट खारवेल, संप्रती यांचीही उदाहरणे विश्वविख्यात

आहेत. गंगवंशीय राजांवरील आचार्य सिंहनंदींचा व इतर मुनींचाही प्रभाव कसा नाकारता येतो ? दक्षिण भारतात स्थिरावलेला अहिंसेचा प्रचारही इतिहासप्रसिद्ध आहे. तामीळ देशातही जिनधर्माचा प्रचार बलवत्तर होता. मारसिंह राजाची जैनधर्मावरील श्रद्धा श्रवणबेळगूळ येथील शिलालेखात अक्षरमय झाली आहे. कदंबवंशीय राजांची कारकीर्द सुवर्णाक्षरात कोरली आहे. राष्ट्रकूट राजांची कीर्ती तर दिगंतापर्यंत पसरली होती. सम्राट अमोघवर्ष तर जिनसेनाचार्यांचा प्रत्यक्ष शिष्य बनला. होयसळ, सांतर, शिलाहार, चालुक्य, पाण्डच, चेर, केर, पाल इत्यादी अनेक क्षत्रियवंशातील राजांनीही दीर्घ कालपर्यंत जैन मार्गाचा आचार व प्रचार केला.

अकराव्या शतकात कोंगालवनांनी जैनधर्माचा उद्योत केला. अनेक जिनालये निर्माण केली. वीरमार्तण्ड चामुण्डराय तर अजिक्य सेनापतीपदापेक्षाही जिनधर्मसंरक्षक म्हणून अधिक प्रसिद्ध आहे. गोमटेश्वराची मूर्ती अखिल विश्वाला ललामभूत शिल्पकला ठरली तरीही मूलत तो अेक चामुण्डरायाच्या धर्मभावनेचा वळण आहे. गुजरात प्रांतातही सिद्ध–हैम–कुमारपाल या त्रयीचा प्रभाव आजही अनुभवास येतो. अधिक तन्मयतेने जैनाचार पाळणारे लोक गुजरातेत जास्त आढळतात.

## १४ जीवनमूल्यांची प्रतिष्ठा–

जीवनातील सांस्कृतिक मूल्ये दृढमूल होण्यासाठी तत्त्वभूत आचार–विचार सपन्न करणे मानवीय कार्य ठरते. यासाठी अहिंसा, अचौर्य, असंग्रह इत्यादी रूपाने सदा संयमशील राहणारा, मद्य–मांसादी सामिष आहाराचा निषेध करणारा, अपहरण-विनयभंग-अत्याचार-अतिसेवन-इंद्रियगामिता याचा त्याग करणारा, दम-क्षम-दया-शांति-दान-त्याग-तपस्या इत्यादी उच्चातिउच्च सद्गुणांची प्रेरणा देणारा, आपत्तींचे आघात क्षमतेने सहणारा, जीवरक्षणासाठी आत्म-सामर्थ्य वेचणारा असा याशिवाय दुसरा कोणता जीवनमार्ग श्रेष्ठ आहे ? जीवनमार्गातील श्रेष्ठतेचा अवतार मूलतः योग्य व परिपूर्ण तत्त्वदृष्टीतूनच होत असतो. म्हणूनच तत्त्वदृष्टीतील चूक कटाक्षाने टाळावी लागते. आभासमय तत्त्वविचारातून आचारमार्गाची प्रतिष्ठा होत नसते. मूलतत्त्वाचीच उपलब्धी न झाल्याने मार्गाची प्रतिष्ठा तर राहोच पण ते तत्वतः ही स्थिरावत नाहीत. अज्ञानेच जीवनात आंधळ्या-लंगड्याची अवस्था निर्माण होते.

सुसंस्कृतपणा, उन्नत भावना, मंगलमयता, ज्ञानगामिता, चैतन्याचा अनुभव, समताभाव, आत्मौपम्य दृष्टी, सहकार प्रवृत्ती, वैचारिक सहनशीलता, विषयोपभोगातील साधुता, अविरोधी प्रगती, निरामय साधना, पवित्र प्रशासन, निरंकुश स्वायत्तता, विश्वबंधुता इत्यादी जीवनावश्यक गुणाची प्राणप्रतिष्ठा जैन तत्त्वदृष्टीतून सफल होणे सुलभ व संभवनीय ठरते. सम्यक् तत्त्वदृष्टीमुळेच अत्यंत आवश्यक व अभिलाषणीय प्रवृत्तींची गुणबीजे, मानवी संस्कृतीत खोलवर रुजली आहेत. जैन आचार्यांचे कार्यक्षेत्र भारतापुरते मर्यादित असल्यामुळे ही सुखी जीवनाची सपन्न गुणबीजे त्यांनी भारतभर पेरली, त्यांची वाढती शक्ती पोसवली आणि आपल्या प्रत्यक्ष आचरणाने विश्वात त्यांचा उद्योत् केला. म्हणून भारताची सांस्कृतिक थोरवी अखिल जगतात आजही वाखाणली जात आहे. ही भारतीय जीवनाची वैशिष्ट्ये जैनांच्या ज्ञानमार्गातून अवतरली आहेत. हे तत्त्वज्ञान, ही जीवनदृष्टी, ही मानवी मूल्ये, हा आचार मार्ग जगालाच आदर्श ठरतात. म्हणून त्याचा हा अल्पसा परिचय !

## १५ मंगलमयता–

सर्व जीव सुखाची अपेक्षा बाळगतात. एकाही जीवाला दुःख नको असते. या स्थितीचा शोध व बोध म्हणजेच तत्त्वज्ञानाचा प्रयास. दुःखनाशाचा मार्ग सापडणे आणि सुखाचा सिधी लाभणे यावरच तत्त्वजिज्ञासेची फलनिष्पत्ती अवलंबते. कारण सर्व जीव सुखशील असूनही त्यांना 'सुख पाहता जवापाडे दुःख पर्वताएवढे' असा अनुभव मिळतो. म्हणजे फसवणूक होते. ही फसवणूक टाळणे हाच साऱ्या सटाटोपाचा उद्देश आहे. प्रेय व श्रेय दोन्ही इष्टच वाटतात. पैकी प्रेय अनुभवणे सोपे जाते. कारण श्रेय लवकर कळत नाही. तरीपण श्रेयच साऱ्या




सुखाचा मार्ग ठरतो. प्रेय मात्र श्रेय असते किंवा नसतेही. म्हणूनच जीव फसतो. शिवाय संसारात प्रेय पूर्णत: टाळणे व श्रेयच कवटाळणे जमत नाही प्रेय स्वैर असल्याने त्याला मोकाट सोडूनही चालत नाही. म्हणजे श्रेयाच्या क्षेत्रातूनच प्रेयाचा मार्ग काढावा लागतो. **श्रेयामध्ये मांगल्याची प्रतिष्ठा होत असल्याने ते प्रेयापेक्षा श्रेष्ठ ठरते.** हा जैन दृष्टिकोण कोरडा किंवा वायफळ उपदेश नव्हे ! जिनमार्गी मुनींनी प्रत्यक्षात श्रेयोमार्ग आचरून दाखविला. मगच त्यांनी सर्व जीवांच्या कल्याणार्थ त्याचा उपदेश केला.

**जैनेन्द्रं धर्मचक्रं प्रभवतु सततं सर्वसौख्यप्रदायि ।**

ह्याच जैन मुनीच्या कल्याण विहारातील व तीर्थ-प्रवर्तनातील मंगल हेतू होय.

हा मंगल-विचार इतका व्यापक आहे की यातील कक्षा फक्त मानवी सुखापुरतीच मर्यादित नसून त्यात निखिल जीवमात्रांच्या सुखाचा विचार सामावलेला आहे. **कारण सर्व जीव द्रव्यतः व तत्त्वतः समान आहेत.** सर्वांचा जीवनधर्म एकच आहे. सुखदृष्टीचा इतका विशाल कोन इतरांना पेललेला दिसत नाही. जैनांची दृष्टी समग्र आहे. कारण ती तत्त्वमय आहे. तत्त्वदृष्टीतील ही अचूकताच यशोदायी ठरली आहे. ही तत्त्वदृष्टी गहन असली तरी त्यांनी ती गुप्त ठेवली नाही. उलट सामान्यांनाही तिचा लाभ मिळावा म्हणून **प्राकृत** भाषांमधूनच तिचा प्रचार केला. **तात्त्विकतेबरोबर एवढी विशाल सामाजिकता अवतरलेली इतरत्र आढळत नाही.** आचार-विचार-उच्चारातील मंगलतेमुळे ते स्वतः सर्व सद्गुणांचे धारक बनू शकले. **जीवो मंगलम्** या सूत्राला कवटाळून सर्व सद्भावांची कास धरली. जीवनामध्ये त्यांची प्रतिष्ठा वाढविली. आज उपलब्ध असलेल्या सर्व सद्गुणांची परंपरा त्यांच्याच जीवन-प्रणालीतून जन्मलेली दिसते. गुण उजळतात यात नवल नाही पण परिसाच्या संपर्काने लोखंडाचे सोने व्हावे त्याप्रमाणे जैन मुनीच्या साधनागुणाने **मरणही मंगल बनले !** समाधि-मंत्राने मरण जिंकण्याची किमया इतरत्र कोठेही साध्य झालेली नाही. परंतु—

**सव्वा वि सूरकरा कलुसच्चिय कोसियकुलस्स ।**

मंगलता ही एक आंतरिक अनुभूती आहे. स्याद्वादाप्रमाणेच ती ज्यांना उमजली नाही त्यांनी समाधिमरणातील मंगलतेचा अव्हेर केला व तिला आत्महत्या म्हटली. सूर्याचा समग्र किरण-समूह एकत्र केला तरीही घुबडाला काळेच दिसते यात सूर्याचा काय दोष ?

जैनांनी साध्य केलेल्या मंगलमयतेचा मूळ उगम त्यांनी अनुभवलेल्या **सम्यग्दर्शनाच्या** उपलब्धीत सापडतो. **ज्ञानाचे मूळ स्वसंवेदनेत आढळते.** अशा अनुभूतीमुळेच त्यांच्या तत्त्वदृष्टीला जीवातील मंगलता दिसू शकते ही गोष्ट विसरता येणे शक्य नाही. जैनाच्या या आत्मतत्त्व-संशोधनातील सार श्रीमत् कुंदकुंद आचार्यांच्या एकाच गाथेत गोवलेले आढळते—

**णाणं णरस्स सारं सारो वि णरस्स होइ सम्मत्तं ।**
**सम्मताओ चरणं चरणाओ हवइ णिव्वाणं ॥ ३१ ॥**

— दर्शनपाहुड, ३१.

जीवाचा सर्वश्रेष्ठ गुण ज्ञान होय. ते ज्ञान तर जीवाचे स्वतत्त्व आहे. त्या स्वतत्त्वामुळेच चरणाची ( मार्गाची ) उपलब्धी होते. आणि अशा चरणामुळे सर्व दुःखांची समाप्ती होते.

म्हणून जिनांचा ज्ञानमार्ग, त्यांची तत्त्वदृष्टी सर्वाहून श्रेष्ठ मंगल आहे. त्यामुळे सर्व प्रकारचे कल्याण साध्य होते. इतर सर्व धर्मांपेक्षा हा समभावी ज्ञानयोग महत्त्वाचा आहे. यामुळेच जगतामध्ये खरी शांती नांदते, जीवन समाधानी बनते आणि सर्व सुखे प्रादुर्भूत होत राहतात. म्हणून जिनांचा हा ज्ञानदीप सतत तेवत ठेवणे व त्याच्या प्रकाशाचा लाभ सर्वांना लाभावा म्हणून प्रयत्नशील राहणे हे एक आद्य मानवी कर्तव्य आहे–

सर्वमंगल–मांगल्यम्

सर्वकल्याणकारकम्

प्रधानं सर्वधर्माणाम्

**जैनं जयतु शासनम् ।।**



# जैन सामाजिक जीवन

## अर्घ्य ९ वा

या खंडात जैन धर्मातील सामाजिक संस्था व परंपरांची माहिती दिली आहे. त्यात प्रामुख्याने जैन महिला जीवन, संस्कार, सप्तपरमस्थान शिक्षणपद्धती चातुर्वर्ण्यविषयक विचार, धार्मिक उत्सव इत्यादी विषयांचा समावेश केला आहे. आधुनिक काळातील प्रगत विचारांबरोबर या संस्थांची व जीवनमूल्यांची तुलना करून, त्यांचे आजच्या काळातील स्थान स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. इतर खंडाप्रमाणे हाही खंड जैन धर्माच्या जीवन वैशिष्ट्यांवर प्रकाश टाकणारा आहे.

# जैन महिला जीवन

मानव जातीतील समाजरचनेत स्त्री व पुरुषाला समान स्थान आहे. स्त्री व पुरुष या दोघांच्या अस्तित्वामुळेच 'समान' ही संकल्पना अस्तित्वात येत असल्यामुळे, त्यापैकी कोणत्याही एकासच महत्व देणारा समाज हा समाजाच्या यथार्थ कल्पनेशी सुसंगत होऊ शकत नाही. विश्वरथाची ही दोन चाके असल्याने विश्वरचनेत स्त्रीचे स्थान पुरुषाप्रमाणेच सहज, स्वाभाविक, अनिवार्य व अभिन्न राहिले आहे. स्त्री ही पुरुषाला पूरक कार्य करणारी, सहयोगी, सहकार्य करणारी असल्याने गतैतिहासिक काळात विश्वेतिहासाला गतिमान करण्यात पुरुषाप्रमाणेच महत्वाचे कार्य स्त्रीनेही केलेले आहे. ऐतिहासिक काळात विश्वाला, युगाला, मानवजातीला नवीन प्रेरणा देऊन गतिमान बनविण्याचे कार्य जैन स्त्रीने केल्याची साक्ष इतिहासाची असंख्य पाने देत आहेत. म्हणूनच आज २० व्या शतकात मानवी जीवनाच्या समाजरचनेत सामाजिक गतिमानतेच्या, सामाजिक प्रबोधन व संक्रमणाच्या प्रक्रियेत जैन महिलेला आदराचे, मानाचे व क्वचित का होईना पुरुषाच्या बरोबरीचे स्थान मिळालेले आहे.

प्रस्तुत लेखामध्ये इतिहासकाळात व आधुनिक काळात जैन महिलांनी केलेल्या असामान्य कार्याचा, वीरांगणांनी दाखविलेल्या शौर्याचा, श्राविकांनी निर्माण केलेल्या आदर्शाचा व समाजजीवनातील जैन स्त्रीचे स्थान, तिच्याकडे पहाण्याचा समाजाचा दृष्टिकोन इत्यादि विषयाचा आढावा घ्यावयाचा आहे. अर्थात हा आढावा घेत असताना जिनसेनाचे आदिपुराण, आगम साहित्य, जैन कथा, जैन कला व निरनिराळे उपलब्ध आलेख इत्यादीचा आधार घेण्यात येईल.

## ब्राम्ही व सुंदरी--

भारतीय संस्कृतीच्या प्रारंभ काळापासूनच जैन स्त्रियांच्या उज्वल परंपरेला प्रारंभ झालेला दिसून येतो. भगवान आदिनाथानी आपल्या पुत्राच्या बरोबरीनेच आपल्या दोन्ही कन्याना सर्व प्रकारचे, शिक्षण देऊन सुसंस्कृत केले होते. आदिनाथानी जैन स्त्रीला दिलेल्या सामाजिक व अध्यात्मिक क्षेत्रातील स्थान व अधिकारामुळे भारतीय संस्कृतीचा प्रारंभकाळ जैन स्त्रियांच्या दृष्टीने उज्वल होता आपल्या बौद्धिक विकासाला व त्यामुळे शक्य असलेल्या आत्मिक उन्नतीला त्यांना भरपूर वाव मिळालेला दिसतो. म्हणूनच उच्च विद्याविभूषित व शीलवान जैन स्त्रियांची परंपरा संस्कृतीच्या प्रारंभकाळापासूनच सुरू झालेली दिसते. भगवान ऋषभदेव आपल्या ब्राम्ही व सुंदरी या मुलीना शिक्षणासाठी प्रेरित करताना म्हणतात--

" विद्यावान् पुरुषो लोके सन्मति याति कोविदः " नारी च तद्वती धत्ते स्त्रीसृष्टेरग्रिमं पदम् ।

( १६ पर्व श्लोक ९८ )

तद् विद्याग्रहणे यात्नं पुत्रिके कुरुतं युवाम् । तत्संग्रह कालोऽयं युवयोर्वर्ततेऽधुना ॥

( १६ पर्व श्लोक १०२ )

इत्युक्त्वा मुहुराशास्य विस्तीर्णे हेमपट्टके । अधिवास्य स्वचित्तस्था श्रुत देवी सपर्यया ॥ १०३ ॥
विभुः करद्वयेनाभ्यां लिखन्नक्षरमालिकाम् । उपादिशल्लिपिसंख्यास्थानं चाङ्कैरनुक्रमात् ॥ १०४ ॥

यावरून स्पष्ट आहे की, भगवान ऋषभदेवांच्या काळात मुलाप्रमाणेच मुलींच्याही शिक्षणाची सोय होती. ब्राम्ही व सुंदरी या कन्यांनी अंकविद्या व अक्षरविद्या या विषयामध्ये प्राविण्य संपादन केले होते. संसारिक सुखोपभोगाची लालसा त्यांना नव्हती. धीरगंभीर व प्रेमळ पित्याच्या थोर व्यक्तिमत्वाचा ठसा त्यांच्या मनावर अधिक खोलवर उमटला होता. त्यामुळे आपल्या पित्याप्रमाणे ज्ञानोपासनेत सदैव मग्न रहावे असे त्याना वाटे. इंद्रियजन्य सुखापेक्षा बुद्धिजन्य आनंदाची त्यांना अधिक रुची होती. ब्राम्ही व सुंदरी कधी साहित्य, तत्वज्ञानावर




चर्चा करीत, तर कधी वीणा घेऊन बागेत गात असत. एकदा कलासमाधी लागली की त्या देहभानही विसरत. केवलज्ञान प्राप्त होऊन अर्हंतपदाला पोहोचलेल्या आपल्या पित्याची अमृतवाणी ज्यावेळी या कन्यकांनी श्रवण केली, त्यावेळी इंद्रियजन्य सुखापेक्षा बुद्धिजन्य आनंद श्रेष्ठ व त्याहूनही आत्मिक आनंद श्रेष्ट याची त्यांना प्रचीती आली. शुद्ध स्वावलंबी आनंदाच्या नवीन क्षितीजाचे त्यांना दर्शन झाले. आपला बंधू व पालक भरत याच्या अनुमतीने त्या दोघी बहिणींनी भगवान ऋषभदेवाजवळ आर्यिकेची दीक्षा घेतली व आपल्या अखंड ज्ञानसाधनेचे व्रत जीवनभर चालविले. भगवंतानी स्थापन केलेल्या चतुर्विध संघामध्ये आर्यिका संघाची गणिका (मुख्य) ब्राम्ही ही होती. तत्कालीन जैनसमाजही स्त्रीकडे समानतेच्या भूमिकेतून पहात होता. जिनसेनाचार्यांच्या आदिपुराणातही व अनेक जैन कथामधूनही निरनिराळ्या जैन स्त्रियांनी विद्याविभूषित होऊन आयुष्यात संसारिक सुखापेक्षा बौद्धिक किंवा आत्मिक सुखाला जास्त महत्व दिल्याची माहिती मिळते.

उज्जयिनी नगरीतील राजा पशुपालाच्या कन्या सुरसुंदरी व मैनासुंदरी यांनी सुमारे १० वर्षे अध्ययन करून पुराणे, धर्मशास्त्र, काव्य, तत्त्वज्ञान इत्यादि विविध कलांचा व नृत्यसंगीतादि ललितकलांचा अभ्यास केला होता.

आध्यात्मिक व बौद्धिक क्षेत्राबरोबर जैन स्त्रियांनी युद्धशास्त्रविषयक ज्ञानही मिळविले होते. राज्यकारभारातही त्या परिपूर्ण होत्या असे दिसते. काही जैन स्त्रियांनी विवाहपूर्व किंवा विवाहोत्तर जीवनात रणांगणावर शौर्य गाजविल्याचीही आपणास माहिती मिळते. वजिरी देशाच्या क्षत्रिय राजाची राजकन्या अर्धांगी हिने खारवेल राजाने वजिरी देशाच्या केलेल्या आक्रमणाच्या वेळी युद्धात भाग घेतला व स्त्रियांची स्वतंत्र सेना उभारल्याची माहिती मिळते. या युद्धात खारवेलाचा विजय झाल्यानंतर त्यांच्यात तह झाला व अर्धांगी ही खारवेलाची खरीखुरी अर्धांगी बनली. ही राणी धर्मनिष्ठ व दानशूर असल्याचीही शिलालेखावरून माहिती मिळते. गंगाराज्यातील सरदार बामक यांची कन्या व विरवर लोकविद्याधर याची पत्नी सविमव्वा ही आपल्या पतिसमवेत लढाईवर जात असे. ही घोड्यावर बसण्यात व तलवार चालविण्यात अतिशय कुशल होती. एका तुंबळ युद्धामध्ये हिने शत्रूसैन्यातील एका बड्या सरदाराच्या हत्तीवर आपला घोडा चालवून लष्करी कौशल्याची शर्थ केली. तथापि शत्रूच्या घातूक भाल्याचा मारा सविमव्वेच्या मर्मस्थळी लागला. या आघाताने तिला मूर्छा आली. मरणान्त श्री जिनेंद्र भगवंताचे नामस्मरण करीत तिने इहलोकीची यात्रा संपविली. या तिच्या अजरामर कृत्याचे स्मारक श्रवणबेळगोळ येथील जिनमंदिरातील एका शिलालेखात खोदलेले आहे. राणी भैरवदेवी ही विजयनगर राज्यातील सरदार चंपा यांची मुलगी, विजयनगरचे साम्राज्य नष्ट झाल्यावर ह्या स्त्रीने आपले स्वतंत्र राज्य स्थापन केले. राज्यस्थापनेनंतर कित्येक वर्षे मातृसत्ताक पद्धतीने येथे राज्यकारभार चालत होता. सतराव्या शतकाच्या सुरुवातीला जरसप्पा येथे राणी भैरवदेवी राज्यकारभार चालवित असताना तिच्या राज्यावर बेदनूरचा राजा वेंकट्टप्पा नामक राजाने स्वारी केली. स्वदेशाचे संरक्षण करण्यासाठी झालेल्या लढाईत राणीने स्वतः असामान्य मर्दुमकी दाखवून वीरोचित मरण स्वीकारले. बाळगोकंड देशाच्या अधिकारी नागार्जुन याची वीरांगना जक्कम्मवा हिच्याकडे नागार्जुनाच्या कदंबराज आकालवर्ष याने बाळगोकंड देशाचा राज्यकारभार सोपविला. नागार्जुन हा या देशाचा सुभेदार असून शांतता व सुव्यवस्था ठेवण्याचे कार्य करीत असे. जक्कम्मव्वाची वीरता व युद्धनैपुण्य जाणून आकालवर्ष राजाने ही जबाबदारीची जागा तिला दिली. तिनेही ही कामगिरी उत्तम प्रकारे अनेक वर्षे पार पाडली. आपला अंतकाल समीप आला आहे असे दिसताच तिने राज्यकारभार आपल्या मुलीकडे सोपविला व जैन तीर्थावर जाऊन इ. स. ८४० मध्ये समाधिमरण स्वीकारले. जक्कमव्वा वीरोत्तम, युद्धशक्तियुक्ता व जिनेंद्रशासनभक्ता असल्याची शिलालेखात माहिती दिलेली आहे.

इ. स. पूर्व ४ थ्या शतकापासून इ. स. १६ व्या शतकापर्यंत गंगवंशात अद्भुत कार्य करणाऱ्या व असामान्य कर्तृत्व असलेल्या वीरांगना स्त्रिया असल्याची माहिती मिळते. राज्यकारभाराबरोबरच या स्त्रियांनी अनेक








जैनमंदिरे, तलाव बांधल्याची, त्याच्या देखभालीची व्यवस्था केल्याची, धर्मकार्यार्थ मोठ्या प्रमाणात दान केल्याची माहिती मिळते. या सर्व राण्यांमध्ये कम्पिलादेवीचे नाव अग्रगण्य आहे. हिने जिनभवनाची निर्मिती केवळ भक्तांच्या पूजा-अर्चासाठीच केली नव्हती, तर जैन धर्माची उन्नती व सर्वांगीण प्रसार हा त्यामागील हेतू होता.

श्रवणबेळगोळच्या शिलालेख क्रमांक ४८६ वरून माहिती मिळते की, जक्कम्मब्बा ही शुभचंद्र सिद्धान्त देवाची शिष्या असून योग्यता व कुशलतेने राज्यकारभार चालवीत असतानाच धर्माचा प्रसार करण्यासाठी तिने एका विशाल प्रतिमेची स्थापना केली. शिलालेखात ती राज्यकार्यात निपुण व जिनेंद्र शासनाच्या बाबतीत आज्ञाकारिणी व लावण्यवती असल्याची माहिती दिली आहे.

**स्त्री संस्कार–**

पत्नीमृतुमतीं स्नातां पुरस्कृतर्हदिज्यया । सन्तानार्थं विना रागात् दम्पतिभ्यां न्यवेयताम् ।।

(आदि ३८ पर्व श्लोक ७६)

आदिपुराण काळाच्या सुमारासही कन्येला समान स्थान असलेले दिसते. स्त्रीवरही निरनिराळे संस्कार केले जात होते असे दिसते. याच प्रकरणामध्ये गर्भाधान, प्रीति, सुप्रीति, धृती, मोद, प्रमोद, नामकर्म, बहिर्यान, निपद्या, अन्नप्राशन, व्युष्टि. चौळ लिपीसंख्यान इत्यादि संस्कार स्त्रियावरही होत असल्याची माहिती मिळते. राज्य-परिवारातील मुलीची स्थिती आजच्या पेक्षा पुष्कळच चांगली होती. त्या पित्याच्या संपत्तीतून दानादिक कर्मेही करीत असत. आदिपर्व (४३ श्लोक १७४, १७५) मध्ये सांगितले आहे की, सुलोचनाने आपल्या कौमार्य अवस्थेतच रत्नमयी प्रतिमाची निर्मिती केली व त्या प्रतिमांची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी मोठ्या प्रमाणात पूजाभिषेक केला. कन्येला पैतृक संपत्तीत भाग होताच, पण मूर्तिकला, चित्रकला इत्यादि विषयाचे ज्ञान मिळवून ती आयुष्यभर धन मिळवू शके. निरनिराळ्या विषयात कन्या प्राविण्य मिळवी पित्याबरोबर वैचारिक आदान-प्रदान करीत असे. आदिपुराण ७ व्या पर्वात वज्रदंत आपल्या कन्येबरोबर विविध कलाप्रकारावर चर्चा करीत असल्याची माहिती आहे.

**वैवाहिक जीवन–**

विवाहाला स्त्रीजीवनामध्ये अतिशय महत्त्वाचे स्थान होते. त्याचबरोबर आजन्म अविवाहित राहून समाजसेवा व आत्मकल्याण करणाऱ्या स्त्रियांचीही अनेक उदाहरणे आढळतात. ब्राम्ही व सुंदरी यांनी कौमार्य अवस्थेतच दीक्षा घेऊन आत्मकल्याण केल्याची माहिती मिळते. स्त्रीने विवाहित असलेच पाहिजे अशा प्रकारचे बंधन तत्कालीन समाजात असलेले दिसत नाही. वंशवृद्धी हाही विवाहाचा हेतू असल्याने तसेच विवाहोत्तर जीवनात पती-पत्नीमध्ये संपूर्ण सामंजस्य राहणे आवश्यक असल्याने अनुरूप अशाच वधू-वराचा विवाह घडवून आणला जात असे. माता-पित्यानी आयोजित केलेला विवाह, स्वयंवर विवाह, गांधर्व विवाह, इत्यादि विवाहाचे प्रकार तत्कालिन समाजात अस्तित्वात असल्याची माहिती मिळते. ती आगमसाहित्यात दिली आहे. सामान्यतः समाजात एकपत्नीत्वाची पद्धती होती. क्वचित प्रसंगी राजे लोक बहुपत्नीविवाह करीत असल्याची माहिती मिळते. स्वयंवराच्या पद्धतीवरून स्त्रियानी आपल्या पतीच्या निवडीबाबतीत मत देण्याचा अधिकार होता असे दिसते. विवाहाला करार समजले जात नसून ते एक दैवी किंवा धार्मिक बंधन, आध्यात्मिक एकतेसाठी असलेले बंधन मानले जाई. मथुरेचा राजा उग्रसेन याची रूपगुणशाली कन्या राजुलमती हिचा विवाह यदुवंशीय श्रीकृष्णाचा बंधू नेमिनाथ यांच्याबरोबर ठरला होता. तथापि पाणिग्रहणासाठी येताच म्लेंच्छ राजाच्या मेजवानीसाठी कोंडून ठेवलेल्या प्राण्यांचा करुण स्वर एकताच नेमिनाथानी त्या प्राण्यांना मुक्त केले, पण मूळचेच चिंतनशील असलेले त्यांचे मन अंतर्मुख झाले व त्यांनी भगवती दीक्षा घेण्याचा आपला निर्णय जाहीर केला.




राजुलमतीने ' प्रत्यक्षात नसले तरी मनाने मी कधीच त्यांच्याशी विवाहबद्ध झाले आहे. दुसऱ्या पुरुषाशी विवाह म्हणजे व्यभिचार. ' असे दुसरा विवाह करू इच्छिणाऱ्या माता-पित्यांना सांगून आपल्या पतीने स्वीकारलेला मार्ग स्वीकारून आपले योग्य कर्तव्य बजावले. राजुलमतीने आर्यिकेची दीक्षा घेतली व पुष्कळ दिवस तपश्चर्या करून तिने शेवटी स्वर्ग प्राप्त करून जैन स्त्रियांसमोर आदर्श चरित्र निर्माण करून ठेवले.

तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी जाऊन किंवा सिद्धप्रतिमेच्या समोर विवाहोत्सव साजरा केला जात असे. विवाहोत्तर नवोदित वर-वधू सात दिवस देव व अग्नीच्या साक्षीने ब्रह्मचर्याचे पालन करीत व त्यानंतर तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी जाऊन प्रतिज्ञाबद्ध होऊन आपल्या गृहस्थाश्रमास सुरुवात करीत. विवाहपूर्व अवस्थेत स्त्री व पुरुष हे भिन्न समाजाचे व कुटुंबाचे प्रतिनिधीत्व करणारे असतात. त्यामुळे विवाहोत्तर काळातच त्यांच्या जीवनास खऱ्या अर्थाने सुरुवात होते. आदर्श गृहिणी बनून सुखद गृहस्थ जीवन निर्माण करणे हे स्त्रीचे जीवनध्येय असते. आदर्श गृहिणी कुटुंब, देश, समाज व काळ इत्यादींचे भूषण मानली जाते. गृहस्थाश्रम ही स्त्री-पुरुष संबंधातील सुसंगत साखळी असते.

पुरुषामधील कमकुवतता स्त्री भरून काढते, तर स्त्रीच्या असमर्थतेला पुरुष सहाय्य करतो. विवाहोत्तर जीवनात अनुरूप पती मिळणे हे स्त्रीचे परमभाग्य होय. त्यामुळे तिचे जीवन संतोषमय प्रगतिशील होऊ शकते. गृहस्थाश्रमाचे पालन करून आपले कुळ, धर्म, स्थिती इत्यादींचा योग्य विचारावरून मर्यादित जीवन व्यतीत करणे हेच आदर्श पत्नीचे कर्तव्य होय. अशांत क्षुब्ध स्त्री स्वत:च्या असंतोषाबरोबरच स्वगृहाची शांतताही पूर्णपणे नष्ट करते.

विवाह विधीतील सप्तपदीमध्ये अग्नीसमोर पति-पत्नी परस्परांचे जीवन सुसंघटीत करण्याची शपथ घेतात. म्हणूनच विवाहसमयी स्त्री सप्तपदीच्या आधारे आपल्या उत्तरदायित्वाची जबाबदारी समजू शकणाऱ्या वयाची असणे आवश्यक मानले आहे. स्त्री ही शांती, शक्ती, स्नेह, क्षमा, धैर्य, त्याग, सौंदर्य, माधुर्य इत्यादींची प्रतीक आहे. गृहस्थाश्रमात तिला गृहलक्ष्मी म्हटलेले आहे. घरातील सर्व प्रबंध स्त्रीवर अवलंबून असतो. अतिथींचे स्वागत व शुश्रूषा ही तिची कर्तव्ये होत शिशुपालन हे तर तिचे जीवनध्येय आहे. पुत्रप्राप्तीसाठी विवाह आवश्यक मानलेला असला तरी विषय वासनेची पूर्ति हेच विवाहाचे ध्येय कदापीही नव्हते.

प्रजा सन्तत्यविच्छेदे तनुते धर्मसंततिम् । मनुष्य वानवधर्म समो देवैयमच्युतम् ॥
देवेम गृहिणा धर्म विद्धि दारापरिग्रहम् । सन्तानरक्षणे यत्नः कार्यो हि गृहमेधिनाम् ॥

(पर्व १५ श्लोक ६३, ६४)

आदिपुराणातील स्त्री विषयक वर्णनावरून स्त्रिया अनेक प्रकारच्या वेषभूषा करीत. धातूंचे अलंकार वापरीत. फुलांची आभूषणे व मालाही वापरण्याची पद्धती होती असे दिसते. विवाहित स्त्री धर्मकार्यात सहभागी होई. पतीशिवाय स्त्रीला शोभा येत नाही. त्याचप्रमाणे स्त्रीशिवाय पुरुषही शोभिवंत दिसत नाहीत. प्रगति करू शकत नाही अशी समाजधारणा होती. आदिपुराणातील चतुर्थ पर्वात १३२ व्या श्लोकात सांगितले आहे की, मनोहर राणी आपला पति अतीबलसाठी हास्यरूपी लतेप्रमाणे प्रिय, हित इच्छिणारी व यश वाढविणारी होती. गृहलक्ष्मी व्रत व उपासही मोठ्या प्रमाणात करीत असे पंचकल्याण व्रत, सोलहकारण व्रत, जिनेंद्रगुण संपत्ति व्रत करण्याची ही प्रथा होती. आदिपुराणातील ६ व्या पर्वात मनस्विनी स्वयंप्रभाने अनेक व्रतोपवास केल्याची माहिती दिलेली आहे.

सुशिक्षित कन्या मैनासुंदरी हिच्या पित्याने हट्टाने निर्जन वनात काळ कंठणाऱ्या कुष्ठरोगी चंपापूरचा नरेश श्रीपाल कोटीभट्ट याच्याशी विवाह करवून दिला. तथापि मैनासुंदरीने यास कर्मगति कारणीभूत समजून त्याची सर्व सेवाशुश्रूषा केली. अत्यंत कष्टमय जीवन शांतपणे सहन केले. मुनींनी सांगितल्याप्रमाणे पंचाणुव्रत




धारण केले. अष्टान्हिक पर्वामध्ये आठ दिवस उपोषण करून सिद्धचक्राची यथाविधी पूजा केली. त्यानंतर गंधोदक श्रीपालच्या अंगावर शिंपडताच तो व्याधिमुक्त झाला. पुढे क्षात्रतेजाने त्याने आपले राज्यही परत मिळविले. सुखवैभव भोगले व वृद्ध वयात राज्यकारभार मुलावर सोपवून मुनिदीक्षा घेतली. वरीच वर्षे तपश्चर्या करून तिने शेवटी सल्लेखनाव्रतपूर्वक देह ठेवला. मैनासुंदरीने आपल्या उदाहरणाने पतीला जीवनभर सावलीप्रमाणे सोबत करणारी त्याच्या सुख-दु:खात सहभागी होणारी, तो संभ्रमात पडला असता त्याला योग्य सल्ला देणारी, धर्मकार्यात सहकार्य करणारी व वैभव काळात त्याचा आनंद द्विगुणित करणारी, पुरुषाची खरी मैत्रीण त्याच्या ध्येयाची पूर्ति म्हणून पुरुषाच्या जीवनाशी एकरूप होणारी पत्नीच, आदर्श गृहिणी किंवा अर्धांगी होय अशा प्रकारचा आदर्श जैन स्त्रियांसमोर ठेवलेला आहे.

पतिनिष्ठा, पावित्र्य सहनशीलता हे गृहस्थाश्रमातील स्त्रीचे महत्त्वाचे कर्तव्य. महेंद्रपुरीची राजकन्या व पवनकुमाराची पत्नी अंजनासुंदरी हिने विवाहानंतर बारा वर्षे विरह सहन केला. त्यानंतर झालेली पतिभेट तिच्या जीवनात आनंद निर्माण करणारी होती. तथापि पवनकुमार युद्धभूमीवर गेलेले असल्याने तिच्या चारित्र्याबद्दल संशय घेऊन तिला बाहेर काढण्यात आले. माता-पित्यानीही आसरा दिला नाही व जंगलात अनेक हालअपेष्टा सहन करीत अपत्याला जन्म द्यावा लागला. निमूटपणे अन्याय व दु:ख सहन करण्याचे मानसिक सामर्थ्य तिने दाखविले. ही सहनशीलता टिकवीत असताना शेवटी नीतिधर्माप्रमाणे सत्याचाच विजय होणार आहे अशी तिची दृढश्रद्धा होती व त्याप्रमाणे पवनकुमार भेटून तिच्या जीवनात पुनश्च टिकाऊ आनंदाचा बहर आलेला दिसतो.

पातिव्रत्याच्या बाबतीत सीतादेवीने तर भारतीय समाजापुढे आदर्श निर्माण केला आहे. रावणासारख्या प्रतापी व वैभवसंपन्न पुरुषाच्या सहवासात सहा महिने राहूनही तिचे चित्त क्षणभरसुद्धा विचलित झाले नाही. या शुद्ध भावनेमुळेच ती महाभयंकर असे अग्निदिव्य करू शकली. सीतेवर आलेला अकारण आळ, त्यामुळे रामाने केलेला तिचा त्याग व प्रिय पतीच्या आठवणी काढीत तिने सोसलेले वनवासाचे दीर्घदु:ख हे सर्व सहन करताना तिने पातिव्रत्याच्या तत्त्वावर ठेवलेली निष्ठा व दाखविलेली सहनशीलता असामान्य आहे. पतित्यागानंतरही उंच पर्वत, भयंकर हिंस्रप्राणी, कडकडणारी वीज इत्यादि निसर्गाचे क्रूर स्वरूप सभोवताली असतानाही रागद्वेषाऐवजी मधुर हास्य, घबराटीऐवजी प्रसन्नता, खेदाऐवजी उल्हास प्रकट करणे हे सीतादेवीचे आदर्श होते. म्हणूनच प्रत्येक जैन स्त्रीने सीतेसारख्या आदर्श स्त्रीच्या पुण्यवान स्मृतीमुळे आपले चारित्र्य, धर्माचरण व कर्तव्यपरायण वृत्ती सदृढ व प्रांजळ बनवून सुखी, प्रगतिशील व आदर्श संसाराची निर्मिती करावी असे मानलेले आहे. भृगुकच्छ नगरीतील श्रेष्ठी जिनदत्त या धर्मशील श्रावकाची कन्या नीली हिने विवाहानंतरही जैन धर्मावरील आपली निष्ठा कमी केली नाही. या धार्मिक संघर्षानंतर तिच्या वर्तणुकीबद्दलही संशय घेण्यात आला. तिला घराबाहेर काढण्यात आले. तथापि या अवस्थेतही जैनधर्मावरील आपली निष्ठा तिने कमी केली नाही. या निष्ठेमुळेच तिचे पातिव्रत्य सिद्ध होऊन तिला कुटुंबात व समाजात मानाचे व आदराचे स्थान मिळाले. स्त्रीमधील सर्व गुणामध्ये मातृत्व हा एकच गुण स्त्रीला समाजात सदैव आदराचे स्थान मिळवून देण्यास व ते कायम ठेवण्यास कारणीभूत झालेला आहे. आचार्य मानतुंग लिहितात—

स्त्रीणां शतानि शतशो जनयन्ति पुत्रान् । नान्या सुतं त्वदुपमं जननी प्रसूता ।।
सर्वा दिशो दधति भानुसहस्ररश्मिम् । प्राच्येव दिग्जनयति स्फुरदंशुजालम् ।।

विश्वातील शेकडो स्त्रिया पुत्रांना जन्म देतात, परंतु हे भगवन् ! आपल्यासारख्या अद्वितीय पुत्राला जन्म देणारी माताही अद्वितीय होय. सूर्याच्या हजारो किरणांना निरनिराळ्या दिशा धारण करता येतात. पण स्फटिका समान किरणांनी युक्त असलेल्या सूर्याला जन्म देणारी पूर्व ही एकच दिशा होय. आचार्यांचे उपर्युक्त




स्तोत्र मातृत्वाच्या अतुल्य श्रेष्ठत्वाचे विश्लेषण करणारे आहे. विश्वाच्या रंगमंचावर स्त्री-पुरुष प्रेमाचे प्रतीक म्हणून पुत्राची निर्मिती करीत असले तरी, मातेचे स्थान पुत्राला जन्म देणारी म्हणूनच असामान्य आहे. पुत्राला जन्म देऊनच ती थांबत नाही तर, आयुष्यभर त्याची हितकारिणी संरक्षक म्हणून कार्य करते. हृदयात निर्माण झालेल्या वात्सल्याच्या असामान्य भावनेमुळे असह्य प्रसववेदना ती सुसह्य मानते. मनुष्यजीवनात, समाज जीवनात विश्वरचनेत स्त्रीला मातृत्वामुळे असामान्य स्थान प्राप्त झाले आहे म्हणून 'जिच्या हाती पाळण्याची दोरी ती जगाते उद्धरी' या शब्दात अनेकांनी मातृत्वाचा महिमा गाईलेला आहे. विश्वातील अनेक थोर पुरुषांच्या व्यक्तिमत्वाचे पैलू मातेच्या शिकवणीतच तयार झालेले आहेत. उदा:– नेपोलियन, हिटलर, छत्रपती शिवाजी, म. गांधी, असामान्य पुत्रांना जन्म देऊन त्यांचे व्यक्तिमत्व घडविणाऱ्या माताही असामान्य होत. म्हणूनच मातृत्वाच्या ह्या एकमेवाद्वितीय अलौकिक विशेषत्वामुळे समाज, स्त्रीला प्रथम वंदनीय व महनीय मानताना दिसतो. चेटक राजाजी कन्या, सिद्धार्थ राजाची पत्नी त्रिशलादेवी तीर्थंकरासारख्या जगद्वंद्य विभूतींना जन्म देऊन देवादिकांच्या स्तुतीला पात्र ठरली. थोर पुरुषांची माता म्हणून प्राप्त होणारा लौकिक हे स्त्रीच्या पूर्व पुण्याईचे फळ होय. कारण देवमाता बनण्याचे भाग्य युगायुगातून एखाद्या महापुण्यवान स्त्रीच्या वाट्याला येते व त्या स्त्रीला 'जिनमाता' या पदवीने विभूषित करण्यात येते. दिवसेंदिवस सूर्यकांतीप्रमाणे वाढणाऱ्या महावीराकडे त्रिशलादेवी काळजीपूर्वक लक्ष देत होती. अंतर्मुख वृत्तीच्या महावीरांना बहिर्मुख बनविण्याचा प्रयत्न तिने केला. तथापि शेवटी मानवजातीच्या कल्याणासाठी सर्वसंगपरित्याग करून निघालेल्या आपल्या एकुलत्या एक तरुण मुलाला त्रिशलाराणीने तेजस्वी शब्दात निरोप देऊन जिनमातेचे श्रेष्ठत्व सिद्ध केले. स्त्रीचे सर्वश्रेष्ठ स्वरूप म्हणजे माता होय. यापेक्षा मधुर, सुखरूप जगात दुसरे कोणतेही असू शकणार नाही. विश्वातील सर्वस्वी त्याग, समस्त प्रेम, सर्वश्रेष्ठ सेवा, सर्वोत्तम उदारता 'माता' या शब्दात अनुगुंठित झालेले दिसते. महात्मा गांधी म्हणतात, "जर ईश्वराने स्त्रिया क्षुद्र, हलक्या सामाजिक दर्जाच्या निर्माण केलेल्या असतील तर त्यांच्याच गर्भातून निर्माण झालेला पुरुषही क्षुद्र व हलक्या दर्जाचाच असावयास हवा, जैनधर्माने समाजात व साहित्यातही स्त्रीला मातृत्वाच्या विशेषत्वामुळे सर्व काळात अतिशय आदराचे व मानाचे स्थान दिलेले दिसते."

प्राचीन काळाचा आढावा घेतला तर जैन स्त्रिया विदुषी, धर्मात्मा व कर्तव्यपरायण असल्याची माहिती मिळते. त्या निर्भय, वीरांगना व पतिव्रता असल्याची अनेक उदाहरणे आढळतात. पतीची सेवा करीत असतानाच कित्येक स्त्रियांनी राज्याच्या संरक्षणाचे कार्य युद्धकाळात प्रत्यक्ष भाग घेऊन शत्रूचा पराभव करण्याचे कार्यही त्यांनी केले. पतीच्या मृत्यूनंतरही त्यांनी राज्यकारभार व्यवस्थित प्रकारे केल्याची अनेक उदाहरणे मिळतात. या कर्तव्यनिष्ठेबरोबरच धर्मनिष्ठ म्हणून जैन स्त्री प्रसिद्ध आहे. जैन स्त्रियांनी जैनधर्मपालनानुसार नुसताच आत्मोद्धार केला नाही तर, आपल्या पतीलाही जैन धर्माचे उपासक बनविले व आपल्या मुलांना सुसंस्कारित व आदर्श बनविण्याचा प्रयत्न केला. लिच्छवीवंशीय राजा चेटक याची सुपुत्री चेलना हिने आपला पति मगधदेशाचा राजा श्रेणिक (बिंबिसार) याला बौद्धधर्मापासून परावृत्त करून जैनधर्माचा उपासक बनविले. तिच्या अभयकुमार व वारिषेण या दोन मुलांनीही सांसारिक सुख व वैभवाचा त्याग करून आत्मसाधनेसाठी कठोरव्रताचा अवलंब केला. कर्नाटकातील जैन धर्माचा विरोधी व जैन बिंबाची घृणा करणारा राजा चालुक्य याची पत्नी जाकलादेवी हिने एकदा जिनप्रतिमेचे महत्व स्पष्ट करताना 'राजा जरा विचार करा! हे राज्य, दरबार म्हणजे किती दिवसाचा आहे. त्यातच रममाण होणे म्हणजे आपल्याच पायावर कुऱ्हाड मारण्यासारखे आहे. हे सर्व क्षणिक आहे. परंतु या जिनप्रतिमेच्या नग्नमूर्तीत जो संदेश आहे तो या संसार सागराला पार करून चिरंतन व अमर सुख देणारा आहे' असा उपदेश केला. जाकलदेवीच्या संभाषणाने राजाचे हृदयपरिवर्तन झाले व तो जैन धर्मानुयायी बनला. त्याने आपले सर्व आयुष्य जैनधर्माचे अनुकरण करून प्रसार करण्यात सार्थकी लावले.'




शिलालेखात आलेल्या वर्णनावरून अनेक जैन स्त्रियानी जिनमंदिरे बांधल्याची जिनप्रतिमांच्या पूजनाची व्यवस्था केल्याची माहिती आपणास मिळते. कलिंगाधिपती राजा खारवेलाच्या पट्टराणीने कुमारी पर्वतावर एक गुंफा बनविल्याची माहिती मिळते. सोदे येथील राजाच्या राणीने आपल्या पतीचा असाध्य रोग दूर व्हावा व आपले सौभाग्य कायम रहावे म्हणून नथेतील मोती विकून जैनमंदिर व त्यासमोर एक तलाव बांधला जो आजही 'मुत्तिनकेरे' या नावाने प्रसिद्ध आहे. आहवमल राजाचा सेनापती मछपती याची कन्या प्रतिमब्वे ही जैन धर्मावर विशेष श्रद्धा ठेवणारी व दानशूर होती. तिने चांदी, सोने इत्यादींच्या हजारो जिनप्रतिमाची स्थापना केली व लाखो रुपयाचे दान केले. जबलपूरमध्ये 'पिसनहारी की मढीया' या नावाचे मंदिर एका जैन स्त्रीने दळण दळून मिळालेल्या पैशातून बांधल्याची माहिती मिळते.

## मथुरा कलेमध्ये स्त्रीची महत्ता–

इसवी सनाच्या कितीतरी शतकापासून तो इ. स. १२ व्या शतकापर्यंत मथुरा जैनधर्माचे एक महान केंद्र म्हणून प्रसिद्ध आहे. या दीर्घकाळात जैनकला येथे अनेक रूपांनी विकसित झाली. मथुरेच्या अद्ययावत उपलब्ध कलाकृतीना भारताच्या धार्मिक व कलात्मक जीवनात महत्त्वाचे स्थान आहे. गणेशपट्टी, तोरण, वेदिक स्तंभ, छत, द्वारस्तंभ इत्यादि स्वरूपात येथे कलाकृती मिळालेल्या आहेत.

या अवशेषापैकी पुष्कळसे असे आहेत की, ज्यावर तत्कालीन ब्राह्मी लिपी मिश्रित संस्कृत प्राकृत भाषेचे शिलालेख आहेत. त्यामुळे त्या अवशेषांचा निर्माण काळ व निर्माण कर्ता इत्यादींची माहिती मिळते. या शिलालेखावरून माहिती मिळते की, ज्या शिलापट्टीवर वा मूर्तीवर हे लेख कोरलेले आहेत, त्यांची निर्मिती करणाऱ्या बहुतांशी स्त्रिया आहेत. पुरुषांचे प्रमाण अतिशय कमी आढळते. यातील बहुतेक स्त्रिया श्राविका आहेत. त्या आर्या व भिक्षुणीच्या उपदेशाने निरनिराळ्या धार्मिक कार्यासाठी प्रवृत्त झाल्या असे दिसते.

या अलिखित अवशेषांच्या सहाय्याने प्राचीन भारतीय समाजातील प्रेमपूर्ण कौटुंबिक जीवनावर प्रकाश टाकता येतो. गृहिणीने आपल्या धार्मिक कृत्यापासून मिळणारे कृत्य स्वतःसाठी न ठेवता तिने ते आपले सासू-सासरे, माता-पिता, पति-पुत्र, बंधु इत्यादींना अर्पण केलेले आहे. इतकेच नव्हे तर ही स्त्री आपल्या धार्मिक कर्तव्यात विश्वातील प्राणिमात्राच्या हिताची व सुखाची अभिलाषा करताना दिसते. अधिकांश शिलालेखात 'सर्वसत्त्वानां हितसुखाय्।' या भावनेचे दर्शन होते. हें 'उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम्।' याचे जिवंत ज्वलंत उदाहरण आहे.

## स्त्री–आर्या व श्राविका–

उपर्युक्त शिलालेखामध्ये दोन प्रकारच्या शिलालेखांचा उल्लेख मिळतो. एक भिक्षुणी ज्यांच्याकरिता 'बहुतांशी आर्या' या शब्दाचा वापर करण्यात आलेला आहे व दुसऱ्या कुटुंबीय स्त्रिया (श्राविका) की ज्या आर्यांच्या उपदेशाच्या प्रेरणेने मूर्ति इत्यादींची निर्मिती किंवा प्राणप्रतिष्ठा करीत. अधिकांश गृहिणीच्या उपदेशिका भिक्षुणीच आहेत. दान देणाऱ्याचे नांव तसेच जिच्या प्रेरणेने हे कार्य केले गेले, त्याचे नांव त्याच्या कुटुंबियांच्या नावाबरोबरच त्यांची गुरु-परंपरा शिलालेखात आढळते. मथुरेच्या शिलालेखात पाथरवट (दगड फोडणारा) गंधिक (तेली) तेल इत्यादि विकणारा, सोनार, लोहार, सुतार, नर्तकी इत्यादि विविध सामाजिक गटातील स्त्रियांचा उल्लेख मिळतो. ज्या आर्येच्या प्रेरणेमुळे श्राविका दान करतात त्यांची नावे सादिता वसुरन, जिनदासी, इसामा, धर्मार्था, दत्ता, धान्यमिश्रा इत्यादि आढळतात. या आर्या गृहस्थाश्रमी स्त्रीला सन्मार्गाचा उपदेश करीत असत. गृहस्थाश्रमी स्त्रियाच्या मनामध्ये धार्मिक भावना जागृत करण्याचे या तपस्विनीचे कार्य अतिशय मौलिक आहे. त्यांच्या प्रभावपूर्ण उपदेशामुळे कित्येक स्त्रियांना आपल्या यथायोग्य कर्तव्याचे ज्ञान झालेले दिसून येते.







मथुरा येथे तीर्थंकारांच्या प्रतिमांच्या चरणासभोवतालच्या पट्टीवर कित्येक स्त्रिया हात जोडून किंवा पूजा साहित्य घेऊन उभ्या असल्याची चित्रे मिळाली आहेत. काहीवेळा मध्यभागी धर्मचक्र व धर्मचक्राच्या एका बाजूला पुरुष व दुसऱ्या बाजूला स्त्रिया रांगेत उभ्या असल्याचीही चित्रे आढळतात. या मूर्तीवरून त्यांच्या वेशभूषेचेही ज्ञान होते. या स्त्रिया दान देणाऱ्या किंवा त्यांच्या कुटुंबापैकी आहेत.

मिळालेल्या अवशेषामध्ये दान करणाऱ्या उदार स्त्रियांपैकी काही स्त्रियांची माहिती पुढे दिली आहे. त्यांची नावे सुदैवाने शिलालेखात मिळालेली आहेत. शिलालेख, गणेशपट्टी, विविध स्तंभ, तोरणे किंवा प्रतिमांच्या चरणकमलापाशी त्या स्त्रियांची नावे कोरलेली आहेत.

१) अचला– अचला ही भद्रयशाची सून व भद्रनंदीची पत्नी होती. तिने अर्हंतपूजेसाठी एक विशाल आयागपट्टीची निर्मिती केली. त्याच्या मध्यभागी चारही बाजूला यक्ष असलेली जिनप्रतिमा आहे व चारी बाजूला विविध व प्रशस्त चिन्हे कोरलेली आहेत.

२) आमोदिनी– हरित्तीपुत्रपालाची मुलगी, कौत्स गोत्र असलेल्या व श्रमणाची श्राविका असलेल्या आमोदिनीने राजा सुदामच्या कारकीर्दीत (इ. स. पूर्व १ ले शतक) आर्यवतीच्या चौकोनी शिलापट्टीची प्रतिष्ठापना केली. लेखामध्ये आमोदिनीच्या तीन पुत्रांची नावे पालघोष, प्रोष्ठघोष तसेच धनघोष इत्यादि आहेत.

३) शिलापट्टीत आभावमुद्रेमध्ये उभी असलेली देवी आर्यवती दाखविलेली आहे. तिच्या आजूबाजूला चौरी व माला घेतलेल्या नोकर स्त्रिया उभ्या आहेत.

४) अभिजया– कुशाण सम्राट कनिष्काच्या कारकीर्दीत सं. ७ (८५ ई.)मध्ये आयुर्वृद्धी श्रीचे शिष्य आर्यसांधीची बहीण अर्यजय हिने तीर्थंकरांच्या प्रतिमांची निर्मिती केली. (ए. ई. १३६१ सं. १९)

५) ओखरिका– सं. ८४ (१६२ ई.)मध्ये दमिन दत्ताची मुलगी कुमुदिनी ओखरिकानी कोहिनगणच्या सत्यसेन व धरवृद्धीच्या प्रेरणेने वर्धमान प्रतिमेचे दान केले. (ए. ई. १९६७ सं. ४)

६) कुमारमित्रा– सं. १५ (९३ ई.)मध्ये सेठ वेणीची पत्नी भट्टीसेनाची माता कुमारमित्रा आर्यांनी उपदेशामुळे सर्वतोभद्रिका प्रतिमेची स्थापना केली. ही वसूला आर्यसंगिका (आर्यजनभूतीची शिष्या)ची शिष्या होती. (ए. ई १३८२ सं. २) (स्त्रिय फ. ९० सं. १)

७) कुमारमित्रा– ही तपस्विनी आचार्य वलदिन्न (वलदित्त)ची शिष्या होती. हिचा मुलगा गंधिक कुमारभट्टाने आपली विचारशील तनःपूत व ज्ञाती माता कुमारमित्राच्या प्रेरणेने सं. ३५ (११३ ई) मध्ये वर्धमान प्रतिमेचे दान केले. लेखावरून जाणवते की ही कुमारमित्रा संन्यासिनी होती. उपर्युक्त वेणीची पत्नी असलेल्या ज्या कुमारमित्राचा उल्लेख आहे, तिला हिच्यापासून स्वतंत्र समजणे आवश्यक आहे. या दोघींच्या काळातही अंतर आहे.

येथे एका सन्यस्त स्त्रीला पुत्र असणे विसंगत वाटते, परंतु यावरून ही गोष्ट प्रतीत होते की कुमारमित्रा प्रथम गृहस्थाश्रमी स्त्री होती. पुत्र जन्मानंतर बहुधा तिला वैधव्य प्राप्त झाले असावे तेव्हा तिने संन्यास घेतला. संन्यासिनी अवस्थेत आपल्या गृहस्थाश्रमी पुत्राला उपदेश केला. वर सांगितले आहे की मथुरा शिलालेखात सामान्यतः पुरुषाच्या उपदेशिका स्त्रिया आढळत नाहीत. पण हा मात्र त्यास अपवाद आहे. (ए. ई. १३८५ सं. ७)

८) कौशिकी– ही सिहक नावाच्या वाण्याची पत्नी होती. हिचा मुलगा सिहनंदिकने अर्हंतपूजेसाठी बांधलेले मंदिर व आयागपट्टी एक अत्यंत सुंदर आयागपट्टीशी बऱ्याचशा प्रमाणात मिळतीजुळती आहे. परंतु त्यापेक्षाही अधिक कलापूर्ण व भव्य आहे. (ए. ई. २२०७ स. ३० स्त्रिय पृ. १४ क. ७)




९) खुडा– (क्षुद्दा) कनिष्कच्या कारकीर्दीत सं. ५ (८३ ई.)मध्ये देवपाल श्रेष्ठीची मुलगी व सेन श्रेष्ठीची पत्नी खुडानी रहिने वर्धमान प्रतिमेचे दान केले. (ए. ई. १३८२ नं. १)

१०) गुल्हा– (गुंठा) ही वर्माची मुलगी व जयक्षसची पत्नी होती. हिने आर्य जेष्ठ हस्तिकी शिष्या आर्याशामा (श्यामा)च्या प्रेरणेवरून भगवान ऋषभदेवांच्या प्रतिमेचे दान केले. (ए. ई. १३८६ सं. १४)

११) गृहरक्षिता– कनिष्काच्या कारकीर्दीच्या १७ व्या वर्षी (६५ ई.) हिने जिनप्रतिमेचे दान केले. (मथुरा से. ग्र. सं. ३३८५)

१२) गृहत्री– सं. ८१ (१५६ ई.)मध्ये या महिलेने जिनप्रतिमेचे दान केले. (ए.ई. २२०४ सं. २१).

१३) जयदेवी– स ८२ (१६० ई) मध्ये वर्धमान प्रतिमेचे दान केले. (नवीन शिलालेख मथुरा सं. ग्र. स. ३२०८)

१४) जत्रा– ही नवहस्तीची मुलगी गृहसेनाचीच शिष्या व देवसेन शिवदेव ह्यांची माता होती. हिने एक विशाल वर्धमान प्रतिमेची स्थापना करविली. (ए. ई. २२०८ सं. ३४)

१५) जितमित्रा– ही उत्तुनंदीची मुलगी व गंधिक वृद्धीची धर्मपत्नी होती. हिने आर्य नदिकाच्या प्रेरणेने सं. ३२ (११० ई.) मध्ये सर्वतोभद्रिकाच्या प्रतिमेची प्रतिष्ठापना केली. (ए. ई. २२०३ स. १६)

१६) जिवदासी– महाराज वासुदेवच्या कारकीर्दीत सं. ८३ (१६१ ई.) सेनची मुलगी दत्तची सून व गंधिकची पत्नी जिवदासीने तीर्थंकरांच्या प्रतिमेचे दान केले. (स्कोगल कॅ. पृ. ६६ सं. वो. २)

१७) जीवनंदा– हिने जिनप्रतीमाचे दान केले. (ए. इ. २२०१ सं. १०)

१८) दिना (दत्त) या श्राविकाच्या पतीचे नाव मतिल, मुलांची नांवे जयपाल, नागदत्त व मुलीचे नांव नागदत्ता लिहिले आहे. स. २० (९९ इ.) दिनाने आर्य सर्घासिहच्या आदेशानुसार एक विशाल वर्धमान प्रतिमेची स्थापना केली. (ए. इ. १३६५ स. २८)

१९) दिना– (दत्ता) पुविष्याच्या कारकीर्दीत स. ४० (११ इ.) मध्ये कुटुंबिनी दिनाने (दत्ताने) ऋषभदेवाच्या प्रतिमेचे दान केले (ए. ई. १३८६ स. ८)

२०) (दत्ता) स. ७९ (१५० इ.) मध्ये या श्राविकेने मुनिसुव्रतच्या प्रतिमेला देवनिर्मित बौद्धस्तूपात प्रतिष्ठापित केले.

२१) दिना– (दत्ता) ही व्रजनंदिनची मुलगी तथा वृद्धिशिवाची पत्नी होती. हिने एका जिन प्रतिमेचे दान केले. (ए. ई. २२०८ स. ४)

२२) धर्म घोषा– भदंद जयदेवाची अंतेवासिनी शिष्या धर्मघोषा हिने एक जागा प्रासादासाठी दान दिली. (ए. ई. २१९९ सं. ४)

२३) धर्मसोमा– ही एक व्यापाऱ्याची पत्नी होती. लेखात हिला सार्थवाहिनी म्हटले आहे. या महिलेने आर्य मातृदत्ताच्या प्रेरणेने स. २२ (१०० ई.) मध्ये जिन प्रतिमेचे दान केले. (ए. ई. १३६५ सं. २९)

२४) पूसा– (पुष्या) भोगळीचा पुत्र (पुष्यक) पुकाची पत्नी पूसा (पुष्या) हिने एक आयनापट्टीची निर्मिती केली. (फोगल कॅ. प. १८६ स. वपु. ३)

२५) बलहस्तिनी– श्रवण श्राविका बलहस्तिनीने एक मोठे तोरण (६'–२"–१") प्रतिष्ठापित केले. (ए. ई. १३६० स. १७)




मथुरा शिलालेखात आढळणाऱ्या व याशिवाय आणखी अनेक स्त्रियांच्या वर्णनावरून जैन स्त्रीने दानधर्माच्या बाबतीत व जैन मंदिरांच्या व कलात्मक शिल्प निर्माण करण्याच्या बाबतीत किती असामान्य कार्य केले आहे याची जाणीव येते. कर्नाटकातील राणी अत्तिमब्बे ही तर तिच्या असामान्य कर्तृत्वामुळे दानचिंतामणी म्हणून ओळखली जाईल. अनेक ग्रंथातही तिचा दानचिंतामणी म्हणूनच उल्लेख आला आहे.

गृहस्थाश्रमात असताना जैन श्राविका धर्मानुचरण करण्यात पतीचे हृदयपरिवर्तन करून त्याला जैन धर्म स्वीकारण्यास भाग पाडण्यात, जैन मंदिराची, प्रतिमांची निर्मिती करण्यात अग्रेसर असलेल्या दिसतात तथापि कित्येक जैन स्त्रियानी आर्यिकेचे व्रत धारण करून कठोर तपश्चर्या केल्याची व आत्मानुष्ठान करीत असताना मन व इंद्रिय यांना वश करण्याचा प्रयत्न केल्याची माहिती मिळते. त्यापैकी कित्येक स्त्रियानी समाधीपूर्वक सद्गती मिळविल्याची माहिती मिळते. भ. महावीर शासनातील जीवंधर स्वामींना आठ पत्नी होत्या. त्या विविध देशाच्या राजकन्या होत्या. पतीने दीक्षा घेतल्यानंतर त्यांनी आर्यिका व्रत धारण केल्याची माहिती मिळते. जंबू स्वामींनी दीक्षा घेतल्यानंतर त्यांच्या पत्नींनेही जैनदीक्षा घेतल्याची माहिती मिळते. वैशालीच्या चेटक राजाची कन्या चंद्रासनी हिने आजीवन ब्रम्हचर्य स्वीकारून भ. महावीरापासून दीक्षा घेतली व आर्यिका व्रताचे अनुष्ठान केले. ती महावीरांच्या ३६ हजार आर्यिकामध्ये गणिनीचे स्वरूप प्रगट करू शकली. मयूर ग्रामसंघाची आर्यिका 'दयितामती' हिने कटवप्र पर्वतावर समाधिमरण स्वीकारले. दंडनायक गंगराजाची धर्मपत्नी लक्ष्मीमतीने संन्यासविधीद्वारे देहोत्सर्ग केला. पाम्बवे नावाच्या कर्नाटकातील जैन महिलेने तीस वर्ष पर्यंत तपश्चरण केले व शेवटी पंचव्रताचे पालन करीत असतानाच इ. स. ९७१ मध्ये तिने शरीरत्याग केला. तर विष्णुवर्धन राजाची महाराणी शांतलादेवी हिने सन ११२३ मध्ये श्रवणबेळगोळ येथे जिनेंद्र भगवानाची विशालकाय प्रतिमा स्थापित केली व शेवटी विषय भोगापासून विरक्त होऊन काही महिने तिने अनशन व ऊनोदर व्रताचे पालन केले. सन. ११३१ मध्ये शिवगंगे नावाच्या ठिकाणी सल्लेखना व्रत करून तिने शरीरत्याग केला.

अनेक जैन महिलानी लेखिका व कवयित्री म्हणूनही नाव मिळविलेले आहे. सन १५६६ च्या सुमारास कवयित्री 'रणमती' नावाच्या आर्यिकेने 'यशोधर' नावाचे काव्य (टिप्पणी) लिहिल्याची माहिती मिळते. आर्या 'रत्नमतीने' लिहिलेले 'समकितरास' हिंदी-गुजराथी मिश्र काव्य रचनाही आज उपलब्ध आहे. कर्नाटकाच्या साहित्य क्षेत्रात उज्वल नाव मिळविणारी कन्ती तर अद्वितीय म्हणून प्रसिद्ध आहे (१२१६ ते ११४१) हिला राजदरबारातही उच्चपद मिळालेले असून प्रसिद्ध कवी पंप हिच्या प्रतिभेबद्दल, प्रसिद्धीबद्दल असूया बाळगीत असल्याची माहिती मिळते. कर्नाटकातील दानचिंतामणी अत्तिमब्बेने दानशूर व साहित्यिक म्हणून नाव मिळविलेले आहे. साहित्य क्षेत्राबरोबरच वीरांगना म्हणून स्त्रियानी नाव मिळविले. स्त्रियानी कित्येकदा युद्धात भाग घेतला, किंवा राज्यकारभाराची धुरा सांभाळली. कर्तव्य निष्ठेबरोबर धर्मनिष्ठेलाही त्यानी प्राधान्य दिले. जैन मंदिरे, जिन प्रतिमा, निरनिराळ्या कलाकृतींची निर्मिती केली. भगवान महावीरांसारख्या अद्वितीय तीर्थंकारांना जन्म देण्याचे कार्य केले उत्कृष्ट गृहलक्ष्मी, माता, पत्नी, धर्मपरायण व कर्तव्यनिष्ठ स्त्री म्हणून तिने नाव कमविले. अर्थात ही वाटचाल करीत असताना कित्येकदा पुरुषांचे वर्चस्व मानहानीची, अपमानित वागणूकही तिला सहन करावी लागली पण त्यातूनही आपली प्रगतिशील वाटचाल करण्याचे कार्य जैन स्त्रीने केले. आजच्या आधुनिक काळातही उत्तर व दक्षिण भारतातल्या चिरोंजाबाई नारी जीवनातील एक सर्वांग परिपूर्ण रत्न होत्या. जैन स्त्रीला त्यांच्या कार्याने मिळालेली प्रेरणा अनंतकाळ कायम रहाणारी आहे. सागर येथे 'चिरोंजाबाई जैन महिला विद्यालय' व 'चिरोंजाबाई स्वाध्याय मंदिर' या दोन संस्था यांच्या कीर्तिरूपाने उभ्या आहेत.

माँ चन्दाबाईजी— चंदाबाई उत्तर भारतातील पहिल्या जागृत महिला होत की ज्यांच्या हाती शंख व वीणा दोन्हीही शोभत असत. स्त्री मुक्तीसाठी त्यांनी शंखातून प्रलयंकारी झंकार फुंकला आहे तर वीणेच्या




सुमधुर स्वरांनी त्यांनी स्त्री वेदना स्पष्ट केल्या आहेत. त्यांच्या व्यक्तिमत्वाचे प्रत्येक रूप हृदयाला भिडते. स्त्री शिक्षणासाठी त्यानी केलेले कार्य महान आहे. स्त्रीच्या प्रगतीला निरक्षरता हा प्रतिबंध असल्याचे पाहून त्यांनी आरा येथे स्त्री शिक्षण देणाऱ्या अमर सांस्कृतिक केंद्राची स्थापना केली. गेली ३२ वर्षे 'जैन बाला विश्राम' या नावाने ही संस्था कार्यरत असून स्त्री शिक्षणाचे असामान्य कार्य करीत आहे. या शिक्षण केंद्राने जैन आणि अजैन विधवा महिलांना शिक्षण देऊन त्यांना पुनर्जीवन मिळवून दिले. माँजीनी जैन समाजात सदैव जागृतीचा मंत्र दिला. स्त्रीला सौम्य, सुंदर, सुसंस्कृत, सुसम्य, सुशिक्षित बनविणे हे त्यांचे ध्येय होते. या ध्येयपूर्तीसाठी त्यांनी यथाशक्ती प्रयत्न केले. असामान्य कष्ट केले. एक कुशल लेखिका, पत्रकार, कवयित्री, समाज सुधारिका अशा विविध रुपानी त्यांचे व्यक्तित्व समाजासमोर आहे. १९२१ मध्ये त्यांनी जैन महिलादर्श संपादन करून जैन समाज जागृतीचे कार्य केले. १०-१२ पुस्तकाचे लेखन करून महिला जीवनांना प्रेरणा दिली. अखिल भारतीय महिला परिषदेच्या संस्थापिका असून कित्येकदा या परिषदेचे सभापतित्वही स्वीकारले. १२ व्या वर्षी वैधव्य प्राप्त झाल्यानंतर या महिलेने धर्माध्ययन नारित्वसाधना, ब्रम्हचर्य, संयम, तप व ममतेच्या छायेने भारतीय महिलेला प्रभावित केले. वयाची ६३ वर्षे अनेक रूपाने जैन महिला जीवन उन्नत करण्याचे काम माँ चंदा सारख्या प्रतिभासंपन्न स्त्रीलाच शक्य आहे.

पूजिता पतासी बाई– संतपरंपरेतील जागृत महिला पूज्य पतासी बाई होत. राया, हजारीबाग, रांची आणि पलामू इत्यादी दक्षिण बिहारमधील जिल्ह्यात झालेली 'महिलाजागृती' हे पूज्य पतासीबाई यांच्या अदम्य व उत्कट समाज सेवेचे प्रतीकच होय. गया येथे स्थापन केलेले 'जैन महिला महाविद्यालय' याचीच गौरव गाथा उच्च स्वरात गात आहे. जैन महिलेला धर्माबद्दल रुचि निर्माण करणे, साहित्याची आवड निर्माण करणे ही पतासीबाईंची परमसाधना होती. यांच्या पासून घेतलेल्या प्रेरणेतून आज कित्येक जैन महिला समाजसुधारणेच्या कार्यात निमग्न झाल्या आहेत. महिलांना व्यावहारिक व आध्यात्मिक शिक्षण देऊन त्यानी शिक्षणक्षेत्रात नवीन पद्धती सुरू केली.

आपल्या आचाराने व विचाराने त्यांनी साधी राहणी व उच्च विचारसरणीचे तत्त्व जैन महिलामध्ये रुजविले. ठिकठिकाणी फिरून व्याख्याने देऊन त्यांनी शिक्षण व धर्म यांचा प्रसार केला.

कर्मठ ब्रजवाला देवीजी– ब्रजबाला देवीजीप्रमाणे कर्मकुशलता, प्रवीणता, कार्य प्रणाली संपन्न करण्याची कला क्वचितच इतरत्र पहावयास मिळते. महिलांच्या सामाजिक समस्या, राजनैतिक व धार्मिक इत्यादी विषयावर यांनी केलेले लेखन जैन महिलांना मार्गदर्शक ठरलेले आहे. कोणत्याही महत्वाच्या प्रश्नावर आपल्या असामान्य बुद्धिमत्तेने मार्ग सुचविणे हे आपले वैशिष्ठ्य होय. अखिल भरतीय जैन महिला परिषदेचे कार्य त्या आत्यंतिक तन्मयतेने करीत आल्या आहेत. या परिषदेचे मंत्रिपद स्वीकारून स्त्रीजीवन विकासाच्या दृष्टीने त्यांनी असामान्य कार्य केले आहे. आधुनिक सिनेमामधून आढळणाऱ्या शृंगाराविरूद्ध आवाज उठविण्याचे कार्य यांनी केले. निरनिराळ्या गांवी फिरून शिक्षणासाठी प्रोत्साहित करण्याचे काम त्यांनी केले. देशात, दुष्काळ, महापूर इत्यादी नैसर्गिक संकटाच्या वेळी सहाय्य जमविण्याचे कार्य केले. महिला जीवनातील असहाय्य अवस्था, विधवांचे हाल नष्ट करण्यासाठी त्यांनी अतीव कष्ट घेतले म्हणून 'जैन महिला' समाजातर्फे त्यांना 'महिला भूषण' पदवी देऊन सम्मानित केले. एक अध्ययनशील कार्यपटू, कार्यपरायण, धार्मिक, सौम्य महिला म्हणून श्री ब्रजबाला देवी जैन महिलांच्या खऱ्याखुऱ्या 'महिला भूषण' आहेत.

नंदिनी कृष्णा– महावीरजी येथील 'मुमुक्षु महिलाश्रम' भारतातील एक अशी महान संस्था आहे की जेथे महिलेला धार्मिक, सामाजिक शिक्षणाने सर्वांगपरिपूर्ण बनविण्यात येते. कृष्णाबाई जैन समाजातील हुंडा पद्धती,





पडदा पद्धती इत्यादींच्या कट्टर विरोधक होत्या. त्यासाठी जैन समाजजीवनात महान कार्य करणाऱ्या महावीरजी येथील मुमुक्षु महिलाश्रमाला लाखो रुपयांचे दान करुन त्यांनी संपन्न बनविले व या महान कार्याला चालन दिली.

उज्ज्वल कुमारी– जैन महिलामध्ये सर्वांगीण जागृती घडवून आणण्याचे कार्य महासती उज्ज्वल कुमारींनी केले. यांचे जीवन सतत कर्म, अगाध धर्म, प्रवीण राजनैतिक दृष्टिकोन इत्यादीचे द्योतक आहे. जैन महिला वर्गातील या उच्च प्रतीच्या प्रवचनकार होत्या. वाक्‌पटुता, अदम्य साहस व अपूर्व तेज इत्यादीच्या सहाय्याने त्यांनी निरनिराळ्या विषयावर उपदेश, प्रवचने दिली आहेत. त्यांची काही प्रवचने 'उज्वल प्रवचन' या नावाने प्रसिद्ध झाली आहेत. साहित्य राजनीति इत्यादीपैकी कोणताही विषय त्यांनी आपल्या व्याख्यानातून सोडला नाही. टिळक, टागोर, गांधी इत्यादि महापुरुषांच्या विचारांचे ज्ञान जैन महिलांना करुन देणारी ही पहिली विदुषी-महिला होय. भारतातील जवळ जवळ सर्व प्रमुख संस्थाना यांनी भेटी दिल्या. तसेच भारतीय स्त्रीमध्ये ओज, करुणा, शिक्षण व धर्म इत्यादि गुणांच्या निर्मितीसाठी यांनी असामान्य कष्ट घेतले. राजनैतिक आंदोलनामध्येही यांनी सक्रिय भाग घेतला. तसेच अनेक महिला विद्यालयांच्या संचालिका व संस्थापिका म्हणून कार्य केले.

उत्तर भारतात अनेक जागृत महिला होऊन गेल्या. तसेच आज कार्य करीत आहेत. उपर्युक्त वर्णिलेल्या जागृत महिलांशिवाय श्रीमती ज्ञानवनदेवी, कंचनबाई, प्रभावतीदेवी, किरणबाला इत्यादि स्त्रियांचे कार्य अनन्यसाधारण आहे. याशिवाय साहित्याच्या क्षेत्रातही श्रीमती रमा जैन, श्री. कमलादेवी, श्री. प्रेमलता, सूरजमुखी, सुंदरदेवी, मणिप्रभादेवी इत्यादि स्त्रियांनी असामान्य कर्तबगारी बजावलेली आहे.

दक्षिण भारताची पुण्य भूमी जैन साधूची व मुनीची तपोभूमी म्हणून प्रसिद्धच आहे. वर्तमानकाळातही याच भूमीत 'आर्यिका' व क्षुल्लिकांनी आपल्या उदात्त चरित्र व समृद्ध ज्ञानाने महिला जीवनात जागृतीच व प्रगतीचे असामान्य कार्य केले आहे. त्यांच्या उदात्त चारित्र्याची महनीयता, स्वभावाची मृदुलता, विचाराची प्रौढता व धर्मभावनावरील प्रगाढ विश्वास त्यांच्या प्रत्येक कार्यातून प्रतिबिंबित होतो. दक्षिण भारतात याप्रकारे कार्य करणाऱ्या आदर्श स्त्रियांची मालिकाच आहे. तथापि त्यांपैकी काही स्त्रियांनी आपल्या चरित्राने व असामान्य कार्याने भारतीय महिलांना प्रभावित केले आहे. त्यात क्षुल्लिका श्री १०५ त्यागमूर्ती राजुलमती अम्मा प्रसिद्ध होत.

**क्षुल्लिका श्री १०५ त्यागमूर्ती राजुलमती अम्मा–** अचल पाषाण खंडाशी टक्कर खाऊन अग्रवाहिनी सरिता प्रचंड वेगाने प्रवाहित होते. त्याचप्रमाणे संसारात येणाऱ्या विघ्नबाधा कर्मठ जीवनामध्ये द्विगुणित उत्साह निर्माण करण्याच्या प्रेरणादायित बनतात. त्याचप्रमाणे वैयक्तिक जीवनातील संघर्षाने माता राजुलमतीला समस्त जैनजातीचा निद्रानाश करण्याचे ब्रीद स्वीकारण्याकडे प्रोत्साहित केले. राजुलमती अम्मानी कोणत्याही प्रकारची इच्छा आकांक्षा न धरता समाज, धर्म व राष्ट्राची सेवा करुन दक्षिण भारताच्या महान परंपरेत आपल्या उदात्त चरित्राने देदिप्यमान स्थान मिळविले आहे. प्रत्यक्षात राजुलमतीप्रमाणे समाज व जातीच्या उन्नतीसाठी कार्य करणारे परोपकारी क्वचितच आढळतात. दुःखाच्या प्रवाहात वाहणाऱ्या या जीवाला क्वचितच सुख मिळाले. राजुलमतींना समस्त दुःखी जीवनामध्ये चित् आनंदाच्या समृद्धीचा अनुभव घेणे भाग पडले. राजुलमती अम्मांचा जन्म सोलापूर येथे झाला. देवचंद रामचंद्र निवर्गीकर हे त्यांच्या पित्याचे नाव. या परोपकारी घराण्यातील सर्व सदस्य समाजसेवेसाठी आयुष्य व्यतीत करण्यात मानवी जीवनाची सार्थकता समजत होते. अम्माच्या चार बंधू व दोन भगिनींनी समाजसेवेचेच ब्रीद स्वीकारले होते. अम्माचे शिक्षण अत्यल्प झाले असले तरी त्यांचे धार्मिक प्रवचन मात्र महापंडिताप्रमाणे होत असे. त्यांचे अध्ययन प्रौढ, विवेकशील असून व्यक्तित्व स्पृहणीय व महान होते. आपल्या विचारांना अभिव्यंजित करण्याची खास कला असून त्यांचे विचार हृदयाला स्पर्श करीत व विचार करावयास लावणारे असत. गूढ ज्ञानाच्या निदर्शनालाही त्या आपल्या स्वतंत्र शैलीने सुगम्य व सुबोध




वनवीत असत. याप्रमाणे सदैव अध्ययनपरपरा कायम ठेवून त्यांनी आपली ज्ञानपिपासा सदैव जागृत ठेवली होती. अनेक कार्ये सांभाळीत असतानाही अम्मा साहित्यिक व आध्यात्मिक अध्ययनाच्या साहाय्याने आपल्या आत्मविकासासाठी वेळ ठेवीतच असत.

अम्मांचा विवाह अनुभवहीन अवस्थेतच श्रीमंत शेठ देवचद ( निजाम स्टेट ) यांच्यावरोवर झाला. तथापि एक वर्षातच वैधव्याची कुऱ्हाड कोसळल्याने त्यांचे जीवन अंधःकारमय झाले. तथापि प्राप्त परिस्थितीवर मात करून अम्मांनी आपले उर्वरित जीवन विशिष्ठ प्रकारे व्यतीत करण्याचा निश्चय केला. तत्कालीन विस्कळीत झालेल्या, दिशाहीन झालेल्या समाजजीवनाचे विश्लेषणात्मक विवेचन करून त्यांनी आपल्या चारही बंधूंना कल्याण, परोपकार व आत्मदर्शनाचा राजमार्ग दाखविला. या चारही बंधूनी प्रचलित विचारधारणाचे परिज्ञान प्राप्त करून समाजाची उत्कट प्रकारे सेवा केली.

समाज सेवेच्या क्षेत्रात अम्मानी समाजाच्या प्रगतीसाठी जी सेवा करणे आवश्यक होती ती सेवा करण्याचे ब्रीद घेतले. त्यांनी पाहिले समाजात विधवांची स्थिती हलाखीची आहे. त्यांचे अश्रू पुसण्यास समाज पुढे येत नाही. त्यांच्या दर्दभरी किंकाळ्या ऐकण्यास समाज तयार नाही. त्यामुळे त्यांची सेवा करणे हीच खरी समाजसेवा आहे हे ठरवून विधवांना योग्य शिक्षण देऊन समाजात स्वतःच्या पायावर उभे राहण्यासाठी स्वयंपूर्ण करण्याचे त्यांनी ठरविले. त्यासाठी सोलापूर येथे श्राविकाश्रम उघडला. हा आश्रम आदर्श बनविण्याच्या दृष्टीने भारतातील निरनिराळ्या श्राविकाश्रमांना भेटी देऊन त्यांची पहाणी केली. अनेक दातृत्ववान व्यक्तीनी अम्मांच्या या कार्याला सक्रिय सहाय्य केले. आजही आश्रमाचा पंचवीस वर्षाचा इतिहास म्हणजे राजुलमती अम्मांच्या अमर कर्तृत्वाची झलक आहे. श्राविकाश्रमाला अनेक कठीण समस्यांना तोंड द्यावे लागले. तथापि आज मान्यवर संस्था म्हणून ही संस्था प्रसिद्ध आहे. विधवांवरोबरच सधवांच्या शिक्षणाची सोयही येथे करण्यात आलेली आहे. अत्यंत उदात्त व मिलनसार महिलेच्या अम्मा ह्या मूर्तिमंत प्रतीक होत. अम्मानी जिनदीक्षा घेऊन मुनिसंघावरोवर अनेक तीर्थक्षेत्रांची यात्रा केली त्या आर्यिका झाल्या. भारतातील अनेक संस्थांच्या उद्घाटनाचे कार्य यांनी केले. प्रा. कर्वे, काशीबाई, मगनबाई, ललिताबाई, कंकूबाई इत्यादि व अम्मांच्या संबंधात आलेल्यांनी पुढील काळात समाजसेवेचे कार्य केले. त्यानंतर त्यांनी भारतवर्षीय महिला परिषदेची स्थापना केली. जैन महिलादर्श नावाचे मासिक सुरू केले. सोलापूर येथे चतुरबाई श्राविका विद्यालयाची स्थापना केली. अशा रीतीने संस्थेचा प्रसार करून अम्मा स्वर्गस्थ झाल्या.

दक्षिण भारतात राजुलमती अम्माच्या नंतर जिनमतीबाई (कंकूबाई)चे कार्य दिसून येते. त्यांची धार्मिक प्रवृत्ति लहानपणापासून विकसित होत गेली. त्यांचे वडील एक सज्जन, सच्छील गृहस्थ असून कट्टर सुधारक व ज्ञानमार्गी होते. त्यांनी आपल्या पित्यावरोवरच भारतवर्षातील अनेक ठिकाणची यात्रा केली, ज्यामुळे समाजाच्या सामाजिक, आर्थिक व राजनैतिक जीवनाचे त्यांना दर्शन झाले. विवाहोत्तर काळातही त्यांनी आपले शिक्षण कायम चालू ठेवले त्याचवेळी आदर्श गृहिणीची जबाबदारीही त्यांनी योग्य प्रकारे पार पाडली. पतीच्या मृत्यूनंतर यांनी समाजसेवेचे व्रत स्वीकारले. आपले बंधू मगनभाईबरोबर निरनिराळ्या ठिकाणी जाऊन विविध विषयावर व्याख्याने दिली. यांनी अनाथ, निःसंतान, विधवा स्त्रियासाठी एक उपयुक्त संस्था उघडली. व्याख्याने, लेख, शिक्षण केंद्रे इत्यादींच्या मार्गाने समाजातील अज्ञान दूर करण्याचा प्रयत्न करून नवजागृतीची प्रेरणा समाजात निर्माण केली. शेवटी आत्मज्ञान मिळविण्यासाठी जिनदीक्षा घेतली.

दक्षिण भारतातील सोलापूर येथील 'श्राविका सस्थानगर' या संस्थेच्या संचालिका पद्मश्री पंडिता सुमतीबाई शहा म्हणजे दुसऱ्यांच्या कल्याणासाठी स्वार्थाचा संपूर्णपणे त्याग करणाऱ्या सहज संताचे मूर्तिमंत प्रतीकच होत. भूनचा जन्म गुंजोटीला झाला. नेमचंद देवचंद शहा (निंबर्गीकर) हे त्यांच्या पित्याचे व हिराबाई त्यांच्या मातेचे नाव. परोपकार करणारे, धार्मिक घराणे म्हणून आधीच या घराण्याची प्रसिद्धी होती. कुटुंबातील





आजोबा, आई, वडील, आत्या यांच्या सुयोग्य संस्काराची देणगी सुमतीबाईंचा व्यक्तिमत्वाचा पिंड बनविण्यास कारणीभूत झाली. अंगावर घेतलेली जबाबदारी शेवटपर्यंत नेटाने पार पाडण्याची जिद्द व अनंत अडचणींना तोंड देत देत कार्यसिद्धि करण्याची प्रेरणा त्यांनी आपल्या आजोबापासून मिळविली. त्यांचे प्राथमिक शिक्षण गुंजोटीलाच झाले. तथापि याचवेळी श्री. पेंढारकर नावाच्या गुरुजींनी त्यांच्यावर केलेल्या संस्कारामुळे त्यांची ज्ञानलालसा अधिकच वाढत गेली. त्याचवेळी वाचलेल्या स्वामी विवेकानंदाच्या चरित्राने तर प्रयत्नवादाचा महिमा त्यांना जाणवला. ब्रह्मचर्याचे महत्व जाणून ते जीवनभर पाळण्याचे विचार मनात गर्दी करू लागले. आजोबा, आई, वडील यांनी सुमतीबाईच्या शिक्षणासाठी, योग्य संस्कारासाठी योग्य प्रयत्न केले. त्यांच्या भाग्याने त्यांना उत्कृष्ट गुरुजन मिळत गेले. पुढील काळातील असामान्य कर्तृत्वाचा पिंड अशा प्रकारे तयार होत गेला. भूनची प्रवृत्ति जन्मतःच "जे का रंजले गांजले त्यासी म्हणे जो आपुले" म्हणणाऱ्या संताच्या वृत्तीशी जुळणारी होती. गरिबांच्या जेवणात वाढलेले भाकरीचे तुकडे हिरव्या मिरच्यांचा ठेचा किंवा तांबडचा तिखटाची पूड त्यांनी पाहिली. तिखटाशिवाय त्यांना कालवण मिळत नाही. तर तिखटावर तेलाची धार मिळणे मुष्किलच. हे सर्व पाहून त्यांच्या पोटात मणामणाचे गोळे फिरत. बालपणीच त्यांना दीनदुबळ्याचा असा कळवळा वाटे की, त्यांनी आईवडिलांची नजर चुकवून आपल्या गरीब मैत्रिणीला परकर पोलके देऊन टाकीत. विधवांची दुःखे आत्याच्या सहवासात आत्यापासून त्यांच्या हृदयाला धरे पाडीत होती. सुखवस्तू घराण्यात जन्म झालेला असतानाही त्यांच्या मनात चैनीचे किंवा सुखोपभोगाचे विचार क्वचितच येत. त्यांनी बालपणातच परमेश्वराची प्रार्थना करून जीवनात दीनदुबळ्यांची गरीबांची, दुःखपीडितांची सेवा करण्यासाठी शक्तीची, सामर्थ्याची मागणी केली व त्याप्रमाणे पुढील काळात त्यांना सामर्थ्य मिळालेही. शिक्षण चालू असतानाच गरीबाची दुःखे, गरीब व श्रीमंता मधील विषमता, विधवांची दुःखे इत्यादी अनंत विषयावर त्या विचार करीत, उपाय शोधण्याचा प्रयत्न करीत. त्यांनी मध्यंतरीच्या काळात, काव्यतीर्थ, न्यायतीर्थ, साहित्याचार्य इत्यादी परिक्षामध्येही भरघोस यश प्राप्त केले. याकाळातच म. गांधी पं. मालवीय, डॉ. राधाकृष्णन, म. कर्वे, पूज्य श्री. शांतिसागर महाराज व समंतभद्रजी महाराज यांच्या आशीर्वादाने व मार्गदर्शनाने, वैचारिक देवाणघेवाणीने त्यांच्या मनात धूसर स्वरूपात असलेल्या ध्येयाला स्पष्ट स्वरूप येण्यास सुरुवात झाली. वयाच्या १९ व्या वर्षी मुनी श्री. शांतिसागर महाराज व मुनि समंतभद्रजी महाराज यांच्या साक्षीने त्यांनी ब्रह्मचर्य व्रताचा अंगीकार केला. स्वतःची कोणतीही प्रापंचिक बंधने न स्वीकारता, समाजसेवेला राष्ट्रसेवेला वाहून घेण्याचा त्यांनी निश्चय केला.

शिक्षण घेत असताना कलकत्ता, काशी, इंदोर, हिंगणे येथील धार्मिक कार्यांची त्यांनी माहिती मिळविलीच पण त्याचबरोबर तेथील शिक्षणसंस्थांचाही त्यांनी सर्वांगीण अभ्यास केला. यावेळेपर्यंत सोलापूरच्या श्राविकाश्रमाची जबाबदारी त्यांच्यावर पडली होती. त्याचबरोबर मुलींना इंग्रजी शिक्षण देण्यासाठी इंग्रजी शाळा, प्राथमिक शाळा स्थापन केल्या. अनंत अडचणींना तोंड देऊनही या संस्था नावारूपास त्यांनी आणल्या. मुलींना शिक्षण देत असतानाच त्यांच्या अंगातील वक्तृत्वकला, अभिनय गुणदर्शन, लेखनकला, शिवणकला, भरतकाम इत्यादी सुप्त गुणांची चांगल्या प्रकारे वाढ व्हावी याकडे त्या काटेकोरपणे लक्ष देत. मुलींना शिक्षण देऊन सर्वांगपरिपूर्ण बनविणे त्याचबरोबर उत्कृष्ट गृहिणी बनविणे हे ध्येय त्यांच्या डोळ्यासमोर होते व आजही आहे. वसतिगृहात राहणाऱ्या मुलींमध्ये मूळच्या सद्गुणांची वाढ व्हावी, सहजीवनाचे महत्व त्यांना पटावे म्हणून त्या दक्ष असत. आजही आश्रमात राहणाऱ्या मुली जीवनात सर्वांगीण यशस्वी झालेल्या दिसतात ते भूनच्या अतुलनीय कर्तृत्वाचेच फळ होय.

तथापि प्रथमपासूनच सुमतिभूनचा मनाचा कल स्त्रीशिक्षणाकडे व त्यातल्या त्यात विधवा शिक्षणाकडे जास्त होता. विशेषतः बालविधवांच्या दुःखाची तीव्रता कमी करावी, त्यांचे भवितव्य उज्वल करावे ही मनाची धारणा त्यांची प्रथमपासूनच होती. विधवासाठी वसतिगृहाची, त्यांच्या शिक्षणाची त्यांनी सोय केलीच पण

त्याचबरोबर त्यांना शिवणकाम, भरतकाम वगैरे विषयातही आवड निर्माण करून आर्थिक दृष्टीनेही स्वत.च्या पायावर, उभा राहण्यासाठी प्रयत्न करण्यास त्यांनी शिकविले. इंदोर येथे भरलेल्या अखिल भारतीय परिषदेत त्यांच्या कार्याबद्दल त्यांचा 'विदुषीरत्न' म्हणून गौरव करण्यात आला. परिषदेच्या विकासाची जबाबदारी त्यांच्यावर टाकण्यात आली. सुमतिबाईंनी निरनिराळ्या प्रांताचे दौरे करून तेथे परिषदेच्या शाखा उघडल्या. परिषदानी कशा प्रकारे कार्य करावे याच्या योजना करून दिल्या. निरनिराळ्या ठिकाणी व्याख्याने देऊन समाजाने सामाजिक उणीवा– प्रश्न सोडविण्यासाठी काय कार्य करावे याचे मार्गदर्शन केले. निराधार अनाथ अबलाना संरक्षण मिळण्यासाठी ठिकठिकाणी श्राविकाश्रम काढण्याची प्रेरणा दिली. काही ठिकाणी श्राविकाश्रमाची स्थापना केली.

शिक्षण घेत असतानाच धार्मिक ग्रंथाचाही त्यानी मन लावून अभ्यास केला होता. आध्यात्मिक व तात्त्विक वाचनाची तर पहिल्यापासूनच आवड होती. त्यांचा पिंडच आध्यात्मिक होता. या अंतर्गत आध्यात्मिक शक्तीच्या जोरावरच त्यानी ब्रह्मचर्यासारख्या कठोर व्रताचे पालन केले. तथापि स्वीकारलेल्या कार्यातील अनंत अडचणीना तोंड देत असताना त्याना आपले हे आध्यात्मिक प्रेम काही वेळा बाजूलाही ठेवावे लागत असे. तथापि सवड मिळताच त्या मननात, आध्यात्मिक चिंतनात अजूनही रममाण होतात. गिरनार पर्वतावर गेल्यानंतर मात्र या सृष्टीचे रहस्य जाणून घ्यावे; अदृश्य, अद्भुत शक्तीचा शोध घ्यावा असा शोध घेताना स्वत.स हरवून घ्यावे असे वाटू लागले. त्या महिना महिना मौन पाळू लागल्या. निरनिराळ्या ग्रंथाच्या पठणाला, मनन चिंतन करण्याला त्यानी पुनःश्च सुरुवात केली. ही आध्यात्मिक ओढच पुढील काळात त्यांच्या साहित्य निर्मितीस कारणीभूत झाली. मध्यंतरीच्या काळात त्यानी श्राविकाश्रमामध्ये स्वाध्याय मंदिर बांधले. संस्कृत विद्यापीठ, प्राथमिक शाळा, औद्योगिक कला मंदिरांची स्थापना केली. अशाप्रकारे महाराष्ट्रातील त्यांचे स्त्रीशिक्षण-विषयक कार्य असामान्य आहे. त्यांची सामाजिक व देशसेवाही उल्लेखनीय आहे. त्याचबरोबर साहित्य-क्षेत्रातील त्यांचे ग्रंथ-लेखनही अनमोल असलेले दिसते. त्यानी आजपर्यंत धवल ( प्राकृत भाषेतील ग्रंथाचे १००० श्लोकप्रमाण हिंदी भाषांतर ) ज्ञानगीता ( उपनिषदासारखा चिंतनपर स्वतंत्र अमोल ग्रंथ ) हृद्‌गंध ( गीताजलि सदृश गद्यकाव्य ) भावपल्लवी ( भगवंताचे स्तवन ) भावगीता ( श्री. कुंदकुंदाचार्यांच्या नियमसार ग्रथाचे भाषांतर ) महापुराण ( आदिपुराणातील मनोरंजक बोधप्रद कथा ) रामायण ( जैनधर्मीय दृष्टिकोनातून लिहिलेले श्रीराम चरित्र ) समयसार ( श्री कुंदाकुंदाचार्यांच्या समयसाराचे चिंतन ) सुवर्णरेखा ( गद्यकाव्य ) आदिगीता (महाकाव्य) हे गीत जीवनाचे (आत्मचरित्र) इत्यादी ग्रंथांचे लेखन केले आहे. या ग्रंथामध्ये काव्यशैली, रचनाशैली ही साहित्याची वैशिष्ट्ये जाणवतातच पण त्यांच्या प्रतिभेबरोबरच आध्यात्मिक चिंतनांची, सखोलतेची व विद्वत्तेचीही जाणीव होते.

१९५६ साली जपानमधील शिमिझू शहरी भरलेल्या आठव्या विश्वधर्म संमेलनात जैन धर्मावर सुमतीबाईंनी व्याख्यान दिले. अनेक देशीविदेशी विद्वानानी या विद्वत्तापूर्ण व्याख्यानाची मुक्त कंठाने स्तुति केली. १९७० मध्ये भारताचे राष्ट्रपति श्री गिरी यांनी सुमतिबाई यांना पद्मश्री ही पदवी देऊन त्यांच्या कार्याचा गौरव केला. उज्वल, स्निग्ध, उदात्त, भव्य, दैदिप्यमान व्यक्तित्व असलेल्या पद्मश्री पंडिता सुमतिबाई शहानी आपल्या स्वार्थाचा सर्वस्वी त्याग करून स्त्रीशिक्षण, विधवा शिक्षण या ध्येय पूर्तीसाठी अपरंपार कष्ट घेतले व घेत आहेत. याकामी त्याना अनेक दात्यांचे, सहकाऱ्यांचे सहकार्य लाभले असले तरी, कार्याचे महत्त्व जाणणारे सहकारी निर्माण करणे, कार्यपूर्तीसाठी आवश्यक तो त्याग करणे व त्रास सहनकरणे हे सुमतिबाईंचे कर्तृत्व अलौकिक, असामान्य एकमेवाद्वितीय आहे साहित्य निर्मितीच्या सहाय्याने, व्याख्यानाने स्वत. ठिकठिकाणी फिरून आपल्या समाजात नव विचाराचा प्रसार करण्याचे, धार्मिक तत्वाचे महत्व पटवून देण्याचे, राष्ट्रीय वृत्ती वाढविण्याचे कार्य त्यानी केले. आज सोलापूर येथे दिसणारी 'श्राविकासस्थानगर' ही भव्य दिव्य संस्था, त्याठिकाणी चालणारे शैक्षणिक, सांस्कृतिक, धार्मिक कार्य पद्मश्री पंडिता सुमतिबाई शहा यांच्या अनमोल कष्टानेच प्रतीक आहे.




त्रैलोक्यनाथ, त्रिकालज्ञानी, रत्नत्रयाचा स्वामी होवो हा उद्देश असतो. माला भावी पुत्र गर्भजन्मादिक आदि पंचकल्याणाचा अधिपती व्हावा असा मंत्राचा संस्कार करावा. मंत्र– त्रैलोक्यनाथो भव । त्रिरत्नस्वामी भव । त्रैलोक्यज्ञानी भव ।

३) सुप्रीति– पाच महिन्यात पूर्वीप्रमाणे विधी करावा. याचा मंत्र– अवतारकल्याणभागी भव । मन्दरेन्द्राभिषेककल्याणभागी भव । निष्क्रान्तिकल्याणभागी भव । आर्हन्त्यकल्याणभागी भव । परमनिर्वाणकल्याणभागी भव ।

४) धृति– गर्भवृद्धीसाठी वरीलप्रमाणे सातव्या महिन्यात विधी करावा. भावी पुत्र उत्तम जाति, उत्तम गृहस्थपद, उत्तम मुनीन्द्रपद देणारा व्हावा या हेतूने पुढील मंत्राचा संस्कार करावा. सज्जातिदातृभागीभव । सद्गृहिदातृभागी भव । मुनीन्द्रदातृभागी भव । सुरेन्द्रदातृभागी भव । परमराज्यदातृभागी भव । आर्हन्त्यपददातृभागी-भव । परमनिर्वाणदातृभागी भव ।

५) मोद– नवव्या महिन्यात गर्भपुष्टीसाठी हा विधी करावा. वरीलप्रमाणे सर्व विधी करून गर्भिणीच्या शरीरावर बीजाक्षरे लिहून हातात रक्षासूत्र बांधावीत. आपला पुत्र सज्जाति व सद्गृहस्थाचे कल्याण करणारा व्हावा अशा अभिप्रायाचा मंत्र म्हणून तेथे संस्कार करावेत. मंत्र– सज्जातिकल्याणभागी भव । वैवाहककल्याण-भागी भव । मुनीन्द्रकल्याणभागी भव । सुरेंद्रकल्याणभागी भव । मन्दराभिषेककल्याणभागी भव । यौवराज्यकल्याण-भागी भव । महाराज्यकल्याणभागी भव । परमराज्यकल्याणभागी भव । आर्हन्त्यभागी भव ।

६) प्रियोद्भव– पत्नी प्रसूत झाल्यावर हा विधी करावा. मंत्र– दिव्यनेमिविजयाय स्वाहा । दिव्य नेमीच्याद्वारे कर्मरूपी शत्रूवर विजय प्राप्त करून घेणाऱ्याला मी हवि अर्पण करतो. परमनेमिविजयाय स्वाहा । परमनेमीच्या द्वारे कर्मरूपी शत्रूवर विजय प्राप्त करून घेणाऱ्या अर्हंताला मी हवि अर्पण करतो. आर्हन्त्यनेमि विजयाय स्वाहा । अरिहंत अवस्थारूप नेमीच्या द्वारे कर्मरूप शत्रूंना जिंकणाऱ्या जिनेंद्रदेवाला मी हवि नैवेद्य अर्पण करतो. असे तीन मंत्र म्हणावेत. प्रथमतः सिद्ध भगवंताच्या अभिषेकाच्या गंधोदकाने सिंचन करून बालकाच्या मस्तकाला स्पर्श करून म्हणावे– ही तुझी माता, कुल, जाति, अवस्था, रूप आदि गुणांनी सहित व शीलवती आहे. सन्तानवती, भाग्यवती व अवैधव्ययुक्त आहे. ती सौम्य व शांत मूर्तियुक्त व सम्यक्दृष्टी आहे. हे पुत्रा, या मातेच्या संबंधाने तू देखील अनुक्रमाने दिव्यचक्र, विजयचक्र व परमचक्राची प्राप्ती करून घे व सर्वांना प्रिय हो ! याप्रमाणे आशिर्वाद देऊन बालकाच्या पित्याने त्याच्या सर्वांगाला स्पर्श करावा व म्हणावे– "हे पुत्रा, तू माझ्या सर्वांगापासून उत्पन्न झाला आहेस. म्हणून पुत्र नाव धारण करणारा तू माझा आत्माच आहे. हे पुत्रा, तुला दीर्घायुष्य लाभो !" यानंतर दूध व तूपरूपी पवित्र अमृत त्याच्या बेंबीवर टाकून 'घातिजयोभव' (घाति कर्मांना जिंकणारा हो ) हा मंत्र म्हणून बाळाची नाळ कापावी. नंतर "हे जात श्रीदेव्यः ते जात क्रियां कुर्वन्तु" (अर्थात् हे पुत्रा, ही आदिदेवी तुझा जन्मोत्सव करोत.) म्हणून हळू हळू त्याच्या अंगाला सुगंधित चूर्ण लावावे व 'त्वं मन्दराभिषेकार्हो भव' (मेरुपर्वतावर अभिषेक करण्यास योग्य आहेस) म्हणून त्याला सुगंधित पाण्याने स्नान घालावे व चिरजीव्याः तू दीर्घायुषी हो असा आशीर्वाद देऊन त्याच्यावर अक्षता क्षेपण कराव्यात. यानंतर 'नश्यात्कर्ममलकृत्स्नम्' (तुझे सर्व कर्ममल नष्ट होवोत) हा मंत्र म्हणून त्याच्या तोंडात व नाकात औषधी मिसळलेले तूप घालावे. नंतर 'विश्वेश्वरी स्तन्यभागी भूयाः' (तू तीर्थंकर मातेचे स्तनपान करणारा हो) म्हणून मातेच्या स्तनाला मंत्रित करून बालकाच्या मुखाला स्तन लावावा. यानंतर पुत्राच्या पित्याने दान देऊन जन्मकाळाची क्रिया समाप्त करावी.

नंतर जरायुपटलबेंबीच्या नाळीबरोबर एखाद्या पवित्र जागेत पुढील मंत्र म्हणून पुरावे– "सम्यग्दृष्टे सम्यग्दृष्टे, सर्वमातः सर्वमातः वसुधरे वसुधरे स्वाहा ।" (सम्यग्दृष्टी सर्वांची माता अशा पृथ्वीमध्ये मी हे समर्पण करतो.) या मंत्राने मंत्रित करून जमिनीत पाणी व अक्षता टाकून व पाच प्रकारच्या रत्नाच्या खाली गर्भमल







ठेवावा व त्वत्पुत्रा इव मत्पुत्राः चिरंजीविनोभुयासुः (हे पृथ्वी, तुझ्या पुत्राप्रमाणे–कुलपर्वताप्रमाणे देखील माझा पुत्र चिरंजीवी होवो) असे म्हणून धान्य उत्पन्न होण्यायोग्य शेतात तो मल टाकावा. नंतर क्षीरवृक्षाच्या डहाळ्यांनी जमीन सुशोभित करून व तिच्यावर मातेला बसवून मंत्रित केलेल्या कोमट गरम पाण्याने स्नान घालावे. त्यावेळी "सम्यग्दृष्टे सम्यग्दृष्टे, आसन्नभव्ये आसन्नभव्ये, विश्वेश्वरी विश्वेश्वरी, उर्जितपुण्ये उर्जितपुण्ये, जिनमातः जिनमातः स्वाहा।" हा मंत्र म्हणावा (हे सम्यग्दृष्टी, निकटभव्ये, सर्वांची स्वामिनी हे उत्कृष्ट पुण्यसंचय करणारी अशी तू जिनमाता हो).

तिसऱ्या दिवशी रात्रीच्या वेळी– "त्वं अनंतज्ञानदर्शी भव।" (तू अनंतज्ञानाला पहाणारा हो) हा मंत्र म्हणून पुत्राला ओटीत घेऊन आकाश दाखवावे. त्या दिवशी पुण्याहवाचन करून यथाशक्ती दान करावे. यथाशक्ती अभय घोषणा करावी असा हा जन्मोत्सव विधी पूर्वाचार्यांनी सांगितला आहे.

**७) नामकरण–** जन्मदिवसापासून बारा दिवस झाल्यावर मूल, आई-वडील यांना शुभदिनी आपल्या शक्तीप्रमाणे देव, ऋषि व उपाध्याय यांचे पूजन करावे व आपल्या बालकाचे वंशाला वाढविणारे शुभनाम ठेवावे. भगवंताची १००८ नावे १००८ कागदाच्या तुकड्यावर अष्टगंधाने, सोन्याच्या लेखणीने किंवा इतर लेखणीने लिहावी व त्या कागदाच्या त्या गोळ्या पिवळ्या वस्त्राने, नारळाने झाकलेल्या घटात भराव्या व कागदाच्या एका तुकड्यावर 'नाव' असा शब्द लिहून त्याची गोळी करावी. याप्रमाणे १००७ तुकड्याच्या गोळ्या बनवून या सर्व दुसऱ्या घटात भराव्यात. नंतर एका अज्ञान कन्या किंवा बालकाकडून दोन्ही घटातून एकेक गोळी काढवावी. ज्या नावाच्या गोळीबरोबर नाम हा शब्द निघेल तेच बालकाचे ठेवावे. मंत्र– दिव्यसहस्रनामभागी भव। विजयाष्टसहस्रनामभागी भव। परमाष्टसहस्रनामभागी भव। हा मंत्र म्हणावा.

**८) बहिर्यानक्रिया–** २।३ किंवा ३।४ महिन्यानंतर आपल्या शक्तीप्रमाणे ही क्रिया करावी. ही क्रिया केल्यानंतर बालकाला प्रसूतिगृहाच्या बाहेर नेणे शास्त्रसंमत आहे. ही क्रिया करते वेळी बालकाचे भाऊ आदिकांपासून भेट, पारितोषिके जी येतील ती एकत्र करून तो जेव्हा पित्याच्या धनाचा अधिकारी होईल तेव्हा त्याला द्यावे. ही आठवी बहिर्यान क्रिया आहे. मंत्र– "उपनयननिष्क्रांतिभागी भव। वैवाहनिष्क्रांतिभागी भव। मुनीन्द्रनिष्क्रांतिभागी भव। सुरेंद्रनिष्क्रांतिभागी भव। मन्दराभिनिष्क्रांतिभागी भव। यौवराज्यनिष्क्रांतिभागी भव। महाराज्यनिष्क्रांतिभागी भव। परमराज्यनिष्क्रांतिभागी भव। आर्हन्त्यनिष्क्रांतिभागी भव।"

**९) निषधाक्रिया–** ज्याच्याजवळ मंगलद्रव्ये ठेवलेली आहेत अशा बालकाला योग्य आसनावर बसविण्याच्या क्रियेला निषधाक्रिया म्हणतात. या क्रियेत सिद्ध भगवंतांची पूजा आदि कार्यक्रम पूर्वीप्रमाणे करावा. या क्रियेमुळे बालकाची उत्तरोत्तर दिव्य आसनावर बसण्याची योग्यता प्राप्त होत जाते. ही निषधाक्रिया होय. मंत्र– "दिव्यसिंहासन भागी भव। विजयसिंहासनभागी भव। परमसिंहासनभागी भव। अर्थात् इंद्राच्या, चक्रवर्तीच्या विजयोल्लासित व तीर्थंकरांच्या उत्कृष्ट सिंहासनावर बसणारा हो।"

**१०) अन्नप्राशन क्रिया–** जन्मापासून ७।८ महिने झाल्यानंतर बालकाला भात खाऊ घालण्याचा विधी करावा. त्यावेळी पूर्वीप्रमाणे जिनपूजनादि विधी करावा. त्यावेळी मंत्र म्हणावा– "दिव्यामृतभागी भव। विजयामृतभागी भव। निक्षसमंत्र अक्षीणामृतभागी भव। अर्थात् दिव्य अमृत, विजयरूपी अमृत व अक्षय अमृताचा भोक्ता हो।"

**११) व्युष्टिक्रिया–** व्युष्टि म्हणजे वाढदिवस Birthday त्या दिवशी जिनपूजनादि कार्ये करणे त्याला व्युष्टिक्रिया म्हणतात. बालकाला एक वर्ष पूर्ण झाल्यावर त्याचा वाढदिवस करावा. त्यावेळी सत्पात्रदान, जिनपूजन व होमकुण्डार्चन हा विधी पूर्वीप्रमाणे करावा. आपल्या इष्ट मित्राना, बांधवाना बोलावून हा विधी करावा. या प्रकारे दरवर्षी जन्मदिनी हा विधी करावा. पुढील मंत्र म्हणून आशीर्वाद द्यावा. "उपनयनजन्म-

कोणत्याही देशाच्या, समाजाच्या प्रगतीसाठी, उत्क्रांतीसाठी किंवा मानवजातीच्या इतिहासातील सामाजिक परिवर्तनासाठी समाजात काही व्यक्ती विशिष्ट ध्येयाने वेडी होऊन तन्मयतेने कार्य करणारी आवश्यक असतात. त्यांच्या अद्वितीय कर्तृत्वामुळेच समाजाची व देशाची प्रगति होत असते. भारताच्या इतिहासामध्ये तसेच जैन समाजाच्या इतिहासात स्त्रीशिक्षणासाठी, विधवांचे प्रश्न सोडविण्यासाठी संपूर्ण स्वार्थत्याग करून रात्रंदिवस अपरंपार कष्ट करणाऱ्या पद्मश्री पंडिता सुमतिबाई शहा यांना मानाचे, आदराचे स्थान निश्चितपणे आहे. भविष्यकाळातही त्या आपल्या ध्येयपूर्तीसाठी प्रयत्नशील राहतील, आपल्या प्रभावाने समाजसेवा करणारे नवीन घटक समाजात निर्माण करतील याबद्दल विश्वास वाटतो. त्यांच्या या अतुलनीय कार्याबद्दल राष्ट्र त्यांना 'भारतातील पहिल्या महिला भारतरत्न' ही पदवी देऊन त्यांच्या कार्याची मुक्तकंठाने मूर्त रुपाने गौरव करील याबद्दलही संशय वाटत नाही.

पद्मश्री पंडिता सुमतिबाई शहा यांच्या प्रभावामुळे तयार झालेल्या विद्युल्लताबाई शहा यांनीही आपल्या क्षेत्रात सुयश कमविले आहे. चारचौघीप्रमाणे आयुष्य न घालविता काहीतरी दिव्य करावे. स्वत:च्याच सुखात रंगण्याऐवजी इतरांची विशेषत: दीन-दुबळ्यांच्या सुखासाठी शरीराचा कण न कण झिजवावा, निराधार मुलींच्या अडचणी दूर कराव्यात, त्यांच्या मदतीला धावून जावे ही महत्त्वाकांक्षा विद्युल्लताबाईंची सुरुवातीपासूनच होती. शिक्षणकार्याविषयी व शिक्षणाविषयी त्यांची ओढ जाणून सुमतिमुनींनी त्यांना योग्य संधि दिली. विद्युल्लताबाईंनी बी. ए. बी. टी. या परीक्षामध्ये सुयश संपादन केलेच, पण त्याचबरोबर धर्मशास्त्रे, संस्कृत व हिंदी भाषा इत्यादि विविध विषयामध्येही त्यांनी पारंगतता प्राप्त केली. आज उमाबाई हायस्कूलच्या मुख्याध्यापिका म्हणून त्या कार्य करीत असून त्या हायस्कूलला सर्वार्थाने नावारूपास आणून समाजाच्या अत्यंत विश्वासास हे हायस्कूल पात्र बनविण्याचे श्रेय विद्युल्लताबाईंचेच आहे. याशिवाय संस्थेच्या देणग्या जमा करण्याचे अवघड काम, शालेय मासिकाच्या संपादनाची जबाबदारी इत्यादि कामेही त्या उत्साहाने पार पाडीत आहेत. संस्थेलाच आपला संसार मानून संस्थेची सर्वांगीण प्रगति करण्यात कु. विद्युल्लताबाईंचे अविश्रांत श्रम, प्रामाणिक तळमळ व दुर्दम्य उत्साहच कारणीभूत आहे.

उपर्युक्त महिलांशिवायही दक्षिण भारतात अनेक जैन महिलांचे कार्य असामान्य आहे. या जैन महिलांनी धर्म व ज्ञानगंगेचे प्रवाह वाढविण्याचे प्रयत्न करून समाज व राष्ट्राचे कल्याण केले आहे. भारताच्या सांस्कृतिक अभ्युदयाच्या कार्यात त्यांनी आपल्या स्वार्थाचा संपूर्णपणे त्याग करून समाजसेवा व राष्ट्रसेवेचे व्रत स्वीकारले आहे.

सामान्यत: प्राचीन काळापासून ते आधुनिक काळापर्यंतच्या जैन महिला जीवनाचा आढावा घेतल्यास जैन महिलांनी राजकारण, समाजकारण, धर्मकारण, कला, साहित्य, विज्ञान इत्यादि जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात कार्य केलेले दिसते. हे कार्य करताना राष्ट्रसेवा, समाजसेवा याबरोबर स्त्री जीवनाच्या सर्वांगीण प्रगतीचे प्रयत्न त्यांनी केलेले दिसतात. आधुनिक काळातील सर्वांगपरिपूर्ण स्त्री हे त्यांच्या प्रयत्नाचेच फळ होय असे म्हणता येईल.

**सप्तपरमस्थाने—**

व्यवहारात ज्याप्रमाणे मानवाच्या देहाच्या बालपण, तारुण्य आणि वार्धक्य या अवस्था आहेत, त्याप्रमाणे आत्म्याच्या विकासाची-कल्याणाची सात परमस्थाने आहेत. सज्जाति, सद्गृहस्थत्व, पारिव्राज्य, सुरेंद्रता, साम्राज्य परमस्थान, आर्हन्त्यपरमस्थान, परमनिर्वाणपद येणेप्रमाणे. या सात कर्मन्वयक्रिया पुण्य करणाऱ्या जीवालाच प्राप्त होतात. जे जिनेंद्रभगवंतानी सांगितलेल्या अमूल्य अशा रत्नत्रय धर्माचे आराधन, आचरण करतात त्यांनाच या सप्त क्रिया फलरूप प्राप्त होतात. प्रत्येक जीवाने जिनेश्वरानी सांगितलेल्या आत्मधर्माचे मनन, चिंतन, आचरण केल्यानेच आत्मविकास होतो.

१) सज्जाति– ही पहिली क्रिया आहे. निर्मल कुल आणि निर्मल जातीरूपी संपत्ती ज्या आसन्नभव्य जीवाला प्राप्त होते त्याला सज्जाति म्हणतात. आसन्नभव्य जीव म्हणजे थोडया भवात रत्नत्रयाची प्राप्ती करून मोक्ष प्राप्त करून घेणारा. त्यालाच सज्जातीची प्राप्ती होते. बापाच्या वंशाच्या विशुद्धीला कुल आईच्या वंशाच्या विशुद्धीला जाति म्हणतात. कुलाच्या, जातीच्या विशुद्धीला-निर्मलतेलाच सज्जाति म्हणतात. या सज्जातीमुळेच भव्य जीवाला उत्तरोत्तर उत्तम वंशाची प्राप्ती होते. उत्तम कुलात व निर्मल वंशात विशुद्ध जन्म घेणाऱ्या भव्यालाच मोक्षप्राप्ती होते. ही सज्जाति प्राप्त झाल्यास प्रयत्नावाचून सहज रत्नत्रयाची प्राप्ती होते. आर्यखंडामध्ये सज्जातीची प्राप्ती, शरीर आदि योग्य सामुग्री मिळाल्यास जीवाचा अनेक प्रकारे विकास होतो, कल्याण होते. ही सज्जाति उत्तम शरीराच्या जन्माचे कारण आहे. कारण पुरुषाच्या सर्व इष्ट पदार्थांच्या सिद्धीला मूलकारण ही सज्जाति आहे व संस्काररूप जन्माने जी सज्जाति प्राप्त होते ती दुसरी सज्जाति आहे. या सज्जातीच्या प्राप्तीने भव्यजीव द्विजन्मपणाला प्राप्त होतो. जसे उत्तम खाणीमध्ये उत्पन्न झालेल्या रत्नाला संस्कार केल्याने ते फार उत्कृष्ट, आकर्षक बनते, त्याप्रमाणे क्रिया व कल्याणकारी मंत्रानी सुसंस्कृत झालेल्या आत्म्याला अतिशय उत्कृष्टता, श्रेष्ठत्व प्राप्त होते. ज्याप्रमाणे सोने खाणीमध्ये मातीच्या मिश्रणात सापडल्यावर त्यावर संस्कार केल्यानंतर जसे खरे, Pure शुद्ध सोने तयार होते, त्याप्रमाणेच हा भव्यजीव उत्तम क्रियांनी शुद्ध निर्मल होतो. ज्यावेळी हा जीव जिनेश्वराच्या उपदेशाने सम्यग्ज्ञानी होतो तेव्हाच तो उत्कृष्ट ज्ञानरूपी गर्भाच्या संस्काराने युक्त होतो व व्रत आणि सुशीलाने भूषित होतो. तेव्हाच त्याला द्विज म्हणतात. असा जो जिनाचा परमभक्त जिनेश्वरांनी सांगितलेलाच उपदेश प्रमाण मानतो तोच जीव मंत्रपूर्वक यज्ञोपवीत धारण करतो. यज्ञोपवीत धारण करणे म्हणजे जिनेश्वरानी सांगितलेली तत्त्वे, उपदेश यांचा आचरण करणे होय. यज्ञोपवीत द्रव्य व भाव यज्ञोपवीत असे दोन प्रकारचे आहे.

**द्रव्य यज्ञोपवीत–** तीन पदराचे, तीन लडीचे जे यज्ञोपवीत (जानवे) त्याला द्रव्य यज्ञोपवीत म्हणतात.

**भाव यज्ञोपवीत–** अंतःकरणात उत्पन्न झालेल्या सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्ररूपी अमौलिक गुणांनी बनलेले जे श्रावकाचे सूत्र त्याला भाव यज्ञोपवीत म्हणतात.

ज्यावेळी हा भव्यजीव वरील संस्कारानी युक्त द्रव्य व भाव यज्ञोपवीत धारण करतो त्याचवेळी तो परब्रह्मत्वाला प्राप्त करून घेतो. जिनेश्वराचा खरा अनुयायी ठरतो. त्यावेळी आचार्य त्या श्रावकाची प्रशंसा करून त्याच्या मस्तकावर पुष्पाक्षता टाकून आशीर्वाद देतात. जर कोणी धर्मापासून, तत्त्वापासून चलायमान, पराङ्मुख होत असेल तर त्याला धर्माचरणात पर्यायाने आत्मतत्त्वात स्थिर करण्याचे, उत्साह वाढविण्याचे, स्वन्मुखदृष्टी प्राप्त करून देण्याचे, स्वत्त्वाची जाणीव करून देण्याचे हे कार्य आहे. याप्रकारे जेव्हा हा भव्यजीव योनीशिवाय दिव्यज्ञानरूप गर्भापासून उत्पन्न होणाऱ्या उत्कृष्ट जन्माला, पदाला धारणा करतो तेव्हाच तो सज्जातिधारक म्हटला जातो.

२) सद्गृहस्थत्व– जसे उंच कळस गाठण्यासाठी पायऱ्या क्रमानेच चढाव्या लागतात, एकदम सर्वच पायऱ्या चढणे अशक्य, त्याप्रमाणे पहिली सज्जाति क्रिया प्राप्त झाल्याशिवाय सद्गृहस्थत्व क्रिया प्राप्त होवूं शकत नाही. सद्गृहस्थत्व प्राप्त झालेला जीव आर्य पुरुषानी करण्याला योग्य अशा षट्क्रिया– देवपूजा, गुरुपास्ति, स्वाध्याय, सयम, तप आणि दान आळस त्यागून दररोज नियमितपणे करतो. तो स्वतः या षट्क्रियांचे आचरण करून इतर श्रावकांनाही करावयास लावतो, शिकवितो व सत्य, अहिंसा, क्षमा, दया, शौच इत्यादि धर्माचरणानी स्वतः व इतरांना उत्तम श्रावक बनवितो. कोणी ढोंगी, मिथ्यादृष्टी, नामधारी ब्राह्मण अशा श्रेष्ठ ब्राह्मणाला हिणवीत असेल, कुहेतूने टोमणे देत असेल तर त्याला-स्वतःला द्विज-ब्राह्मण मानणाऱ्याला दिव्य ब्राह्मणाजन्माचे वर्णन ऐकण्यास सांगावे. जातिवंत, शुद्ध, खरा सम्यक्ब्राह्मण तोच की ज्याचे माता-पिता जिनदेव आहेत.

ज्ञान हा अत्यंत निर्मल गर्भ आहे. त्या गर्भात उपलब्धी, उपयोग आणि संस्कार या तीन गुणांच्या आश्रयाने राहणाऱ्या सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या तीन अपूर्व, अनंत शक्ती आहेत. त्यांना आम्ही आमच्या आधीन करून संस्काररूपी जन्माने जन्मलो आहोत.

आयुष्याच्या अंतसमयी शरीर, आहार आणि सर्व प्रकारच्या क्रिया त्यागून ध्यानशुद्धीने आत्म्याला शुद्ध करणे तेच साधन आहे. ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि भिक्षुक हे चार आश्रम आहेत व यात उत्तरोत्तर अधिक विशुद्धी होत असते. याप्रमाणे सद्गुणाच्या द्वारे आत्म्याला उत्तरोत्तर अधिक विशुद्ध करणे हे सद्गृहस्थत्व आहे.

३) पारिव्राज्य– गृहस्थधर्माचे पालन करून नंतर विरक्त होऊन जी मुनिदीक्षा घेणे त्याला पारिव्राज्य म्हणतात. या अवस्थेत ममत्वभाव त्यागून दिगंबर अवस्था धारण करावी लागते. मोक्षाची इच्छा करणाऱ्या श्रावकाने शुभतिथी, शुभनक्षत्र, शुभयोग, शुभलग्न व शुभग्रहाच्या वेळी निर्ग्रंथ आचार्याजवळ दीक्षा घ्यावी. ज्याचे कुल गोत्र विशुद्ध आहे, चारित्र्य उत्तम आहे, प्रतिभा, बुद्धी निर्मल व तीव्र आहे असा पुरुषच दीक्षा घेण्यास पात्र समजावा.

ज्या दिवशी ग्रहण लागले, सूर्य व चंद्राच्या सभोवती खळे झाले आहे, इंद्रधनुष्य प्रकट झाले आहे. दुष्ट ग्रहाचा उदय असेल, आकाश मेघाच्छादित झाले असेल, नष्टमास, अधिक मास, संक्रांति, क्षय तिथीचा दिवस असेल अशा समयी जिनदीक्षा घेऊ नये. दीक्षित मुनीने कोणत्याही प्रकारचा गर्व व हिंसा करू नये. अरहंत-परमेष्ठीचे चिंतन, ध्यान, तपश्चरण करावे. जिनेंद्रभगवंताच्या आज्ञेला प्रमाण मानून जो साधु तपश्चरण करतो त्याचेच पारिव्राज्य वास्तविक होय.

४) सुरेंद्रता– पारिव्राज्याचे फल सुरेंद्रता आहे. म्हणजेच जिनदीक्षा घेऊन तपश्चरण करणारा जैनमुनि समाधिमरणाने देहत्याग करून स्वर्गात इंद्र होऊन जन्मतो.

५) साम्राज्य परमस्थान– यानंतर दीर्घकाल स्वर्गातील इंद्रपदाचे ऐश्वर्य भोगून तो आयुष्य संपल्यानंतर आर्य खंडात उच्च क्षत्रिय राजकुलात जन्म घेतो. नंतर राज्य प्राप्ती व चक्ररत्नाची प्राप्ती होते. तेथे नऊ निधी, भोगोपभोग संपदा प्राप्ती होते. तो षट्खंडाधिपती होऊन चक्रवर्ती सुखाचा अनुभव दीर्घकाल घेतो. साम्राज्य व सुख प्राप्ती होते.

६) आर्हन्त्यपरमस्थान– चक्रवर्तीनंतर दीक्षा घेऊन तपश्चरण करून दर्शनविशुद्ध्यादि सोळा भावनांचे आचरण करून तीर्थंकर प्रकृतीचा बंध बांधून स्वर्गात जन्म घेतो. तेथील सुखोपभोग घेऊन आयुष्य समाप्तीनंतर भावी तीर्थंकर होणाऱ्याची गर्भादिक कल्याणे होतात. पंचकल्याणिक होतात. दिगंबर दीक्षा घेऊन मानवाला मोक्षाचा मार्ग दाखवितात. या क्रियेला आर्हन्त्य क्रिया म्हणतात. जगाला मोक्षाचा मार्ग दाखवितात व स्वतःचे आत्मकल्याण करून घेतात. हे सहावे आर्हन्त्य परमस्थान होय.

७) निर्वाणपद– ससारातून मुक्त झालेल्या व आत्म्याची सर्वोच्च अवस्था, परमात्म्याची जी अवस्था त्याला निर्वाण अवस्था म्हणतात. आठही कर्मांचा नाश झाल्यामुळे जी अंतिम अवस्था प्राप्त होते तिला सिद्धि म्हणतात. ही सिद्धी अनंतगुणरूपी, ज्ञानमय, भावरूप आहे. या अवस्थेत जीव सर्व बंधनातून मुक्त होऊन अनंत आनंदात विलीन झालेला असतो. हे सातवे परमस्थान आहे.

याप्रमाणे आगमानुसार या सात कर्मन्वय क्रिया पालन केल्याने परमस्थानाची प्राप्ती होते.

फळ– जो भव्य जीव आळस सोडून सात क्रियांचे आचरण करतो त्याला परमधामाची, मोक्षाची प्राप्ती होते व तो उत्कृष्ट अक्षयसुखात विलीन होतो. या क्रियासहित जिनधर्माचे पालन व स्मरण केल्याने व त्याप्रमाणे




आचरण केल्याने संसारबंधनातून लवकर मुक्त होतो. ज्यांची अत्यंत उत्कृष्ट अशी बुद्धी जिनेंद्राच्या चरणकमलावर अनुरक्त झाली आहे असाच पुरुष या क्रियांचे पालन करू शकतो, तोच कर्मबंधनातून मुक्त होऊ शकतो व तोच जीव जन्म-मरण-वृद्धावस्था यांचा अन्त करू शकतो. तो भव्यजीव योग्य जातीची प्राप्ती करून घेऊन सद्गृहस्थ होतो. नंतर गुरूंच्या आज्ञेनुसार उत्कृष्ट पारिव्राज्य जिनदीक्षा घेतो. त्यामुळे त्याला इंद्रपदाची प्राप्ती होते. त्यानंतर तो अरिहंतपदास प्राप्त होतो व परमस्थान प्राप्त करून घेतो. शेवटी त्याला अविनाशी, अनंत असे निर्वाणपद मिळते.

ज्याप्रमाणे आपण व्यक्तीचा बाह्य विकास टप्प्याटप्प्याने करतो; एकदम कोणाचाही विकास शक्य नाही, त्याप्रमाणे आत्मविकास हा या सप्त क्रियातून आचरणाने व धर्माचे पालन करण्याने, आत्मसाधना करण्याने होतो. या सात क्रिया आचरणाने सर्व भौतिक सुखे मिळतातच, परंतु क्रमाक्रमाने आचरणाने जीवाला मोक्षप्राप्ती होते. यासाठी आत्मकल्याण सिद्धी इच्छुकांनी या सात क्रियाचे आगमानुसार यथार्थ आचरण करणे अत्यंत महत्त्वाचे आहे. त्यामुळे स्वहित व परहितही सहज होते.

### संस्कारविधी व महत्त्व–

ज्याप्रमाणे आपण बालकावर संस्कार करू त्याप्रमाणे त्याचे जीवन घडत असते. संस्कार हेच जीवनाचे मूळ आहे. संस्कारानेच भावी जीवन घडत असते. उत्तम संस्कार हेच खरे शिक्षण. सुसंस्कृत, सुसंस्कारक्षम समाज किंवा नागरिकच राष्ट्राचा–स्वतःचा उत्कर्ष करू शकतो. राष्ट्राचे भावी नागरिक सुसंस्कारमय, सुसंस्कृत करण्याची जबाबदारी आजच्या समाजाची, प्रत्येक नागरिकाची मोठी जबाबदारी आहे. बालकावर, जीवावर गर्भात आल्यापासून संस्कार केल्यास त्या जीवाचे कल्याण होते, जीवन सुखमय होते. त्यासाठी संस्कार विधी समजून घेऊन त्याप्रमाणे संस्कार केल्यास अमूल्य गुणभांडार प्राप्त झाल्याशिवाय राहाणार नाही. आपला भारत देश हा संस्कृतिप्रधान व संस्कारयुक्त आहे. खऱ्या संस्काराचा विधी व महत्त्व जाणून घेऊनच प्रत्येक माता-पित्यांनी संस्कार करावेत.

जैनत्रिवर्णज अर्थात् ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य बालकावर उपनयादि संस्कार केले जातात. परंतु जेव्हा बालक मातेच्या गर्भात येतो तेव्हापासून त्याचा जन्म होईपर्यंत गर्भधान, प्रीति, सुप्रीति, धृति, मोद, प्रियोद्भव, नामकर्म, बहिर्यान, निषघ्ना, प्राशन, वर्षवृद्धि, केशवाप व लिपीसंख्यान इ. संस्कार केले जातात. यानंतर उपनयन, व्रतचर्या, व्रतावरण, विवाहादि संस्कार केले जातात.

**संस्कार करण्याचा विधी–** हे संस्कार जिनमंदिरात किंवा स्वगृही विद्वान पंडिताकडून करवावेत. प्रथमतः पीठावर जिनबिंबाची स्थापना करावी. त्याच्या उजव्या बाजूस चक्रत्रय व डाव्या बाजूस छत्रत्रयाची स्थापना करावी. जिनबिंबापुढे बालकावर संस्कार करण्यासाठी तीन होमकुंडांची रचना करून जिनेश्वराचे पूजन करावे. नंतर होमकुंडात मंत्रोच्चारपूर्वक आज्याहुति, समिधाहुति, लवंगाद्याहुति, अन्नाहुति व पूर्णाहुति द्याव्यात. या क्रिया केल्यानंतर बालकावर उपनयनादिक संस्कार करावेत.

**१) गर्भाधान संस्कार–** ऋतुमती पत्नी स्नात झाल्यावर चतुर्थ दिवशी जिनपूजन करून होम कुंडार्चन मंत्रपूर्वक करून रात्री पुत्रप्राप्ती होण्याच्या इच्छेने दम्पतीनी समागम करावा. यास गर्भाधान संस्कार म्हणतात. याचा उद्देश होणारा पुत्र उत्तम जातीचा, उत्तम गृहस्थ, मुनीन्द्र वगैरे पदाचा धारक व्हावा हा आहे. मंत्र– सज्जातिभागी भव । सद्गृहिभागी भव । मुनीद्रभागी भव । सुरेंद्रभागी भव । परमराज्यभागी भव । आर्हन्त्यभागी भव । परमनिर्वाणभागी भव ॥

**२) प्रीतिसंस्कार–** गर्भाधानानंतर तिसऱ्या महिन्यात वरीलप्रमाणे जिनपूजनादि विधी करावा. घराच्या दरवाजाला तोरण बांधून दरवाजापुढे दोन कुंभ ठेवावेत. दररोज नगारा व घंटा वाजवावी. यामुळे पुत्र



त्रैलोक्यनाथ, त्रिकालज्ञानी, रत्नत्रयाचा स्वामी होवो हा उद्देश असतो. माझा भावी पुत्र गर्भजन्मादिक आदि पंचकल्याणाचा अधिपती व्हावा असा मंत्राचा संस्कार करावा. मंत्र– त्रैलोक्यनाथो भव । त्रिरत्नस्वामी भव । त्रैलोक्यज्ञानी भव ।

३) सुप्रीति– पाच महिन्यात पूर्वीप्रमाणे विधी करावा. याचा मंत्र– अवतारकल्याणभागी भव । मन्दरेन्द्राभिषेककल्याणभागी भव । निष्क्रान्तिकल्याणभागी भव । आर्हन्त्यकल्याणभागी भव । परमनिर्वाणकल्याणभागी भव ।

४) धृति– गर्भवृद्धीसाठी वरीलप्रमाणे सातव्या महिन्यात विधी करावा. भावी पुत्र उत्तम जाति, उत्तम गृहस्थपद, उत्तम मुनीन्द्रपद देणारा व्हावा या हेतूने पुढील मंत्राचा संस्कार करावा. सज्जातिदातृभागीभव । सद्गृहिदातृभागी भव । मुनीद्रदातृभागी भव । सुरेंद्रदातृभागी भव । परमराज्यदातृभागी भव । आर्हन्त्यपददातृभागीभव । परमनिर्वाणदातृभागी भव ।

५) मोद– नवव्या महिन्यात गर्भपुष्टीसाठी हा विधी करावा. वरीलप्रमाणे सर्व विधी करून गर्भिणीच्या शरीरावर बीजाक्षरे लिहून हातात रक्षासूत्र बांधावीत. आपला पुत्र सज्जाति व सद्गृहस्थाचे कल्याण करणारा व्हावा अशा अभिप्रायाचा मंत्र म्हणून तेथे संस्कार करावेत. मंत्र– सज्जातिकल्याणभागी भव । वैवाहककल्याणभागी भव । मुनीन्द्रकल्याणभागी भव । सुरेंद्रकल्याणभागी भव । मन्दराभिषेककल्याणभागी भव । यौवराज्यकल्याणभागी भव । महाराज्यकल्याणभागी भव । परमराज्यकल्याणभागी भव । आर्हन्त्यभागी भव ।

६) प्रियोद्भव– पत्नी प्रसूत झाल्यावर हा विधी करावा. मंत्र– दिव्यनेमिविजयाय स्वाहा । दिव्य नेमीच्याद्वारे कर्मरूपी शत्रूवर विजय प्राप्त करून घेणाऱ्याला मी हवि अर्पण करतो. परमनेमिविजयाय स्वाहा । परमनेमीच्या द्वारे कर्मरूपी शत्रूवर विजय प्राप्त करून घेणाऱ्या अर्हंताला मी हवि अर्पण करतो. आर्हन्त्यनेमि विजयाय स्वाहा । अरिहंत अवस्थारूप नेमीच्या द्वारे कर्मरूप शत्रूना जिंकणाऱ्या जिनेंद्रदेवाला मी हवि नैवेद्य अर्पण करतो. असे तीन मंत्र म्हणावेत. प्रथमतः सिद्ध भगवंताच्या अभिषेकाच्या गंधोदकाने सिंचन करून बालकाच्या मस्तकाला स्पर्श करून म्हणावे– ही तुझी माता, कुल, जाति, अवस्था, रूप आदि गुणानी सहित व शीलवती आहे. सन्तानवती, भाग्यवती व अवैधयुक्त आहे. ती सौम्य व शांत मूर्तियुक्त व सम्यक्दृष्टी आहे. हे पुत्रा, या मातेच्या संबंधाने तू देखील अनुक्रमाने दिव्यचक्र, विजयचक्र व परमचक्राची प्राप्ती करून घे व सर्वांना प्रिय हो ! याप्रमाणे आशिर्वाद देऊन बालकाच्या पित्याने त्याच्या सर्वांगाला स्पर्श करावा व म्हणावे– "हे पुत्रा, तू माझ्या सर्वांगापासून उत्पन्न झाला आहेस. म्हणून पुत्र नाव धारण करणारा तू माझा आत्माच आहे. हे पुत्रा, तुला दीर्घायुष्य लाभो !" यानंतर दूध व तूपरूपी पवित्र अमृत त्याच्या बेंबीवर टाकून 'घातिजयोभव' (घाति कर्मांना जिंकणारा हो) हा मंत्र म्हणून बाळाची नाळ कापावी. नंतर "हे जात श्रीदेव्यः ते जात क्रियां कुर्वन्तु" (अर्थात् हे पुत्रा, ही आदिदेवी तुझा जन्मोत्सव करोत.) म्हणून हळू हळू त्याच्या अंगाला सुगंधित चूर्ण लावावे व 'त्वं मन्दराभिषेकार्हो भव' (मेरुपर्वतावर अभिषेक करण्यास योग्य आहेस) म्हणून त्याला सुगंधित पाण्याने स्नान घालावे व चिरजीव्याः तू दीर्घायुषी हो असा आशीर्वाद देऊन त्याच्यावर अक्षता क्षेपण कराव्यात. यानंतर 'नश्यात्कर्ममलकृत्स्नम्' (तुझे सर्व कर्ममल नष्ट होवोत) हा मंत्र म्हणून त्याच्या तोंडात व नाकात औषधी मिसळलेले तूप घालावे. नंतर 'विश्वेश्वरी स्तन्यभागी भूयाः' (तू तीर्थंकर मातेचे स्तनपान करणारा हो) म्हणून मातेच्या स्तनाला मंत्रित करून बालकाच्या मुखाला स्तन लावावा. यानंतर पुत्राच्या पित्याने दान देऊन जन्मकाळाची क्रिया समाप्त करावी.

नंतर जरायुपटलबेंबीच्या नाळीबरोबर एखाद्या पवित्र जागेत पुढील मंत्र म्हणून पुरावे– "सम्यग्दृष्टे सम्यग्दृष्टे, सर्वमातः सर्वमातः वसुंधरे वसुंधरे स्वाहा ।" (सम्यग्दृष्टी सर्वांची माता अशा पृथ्वीमध्ये मी हे समर्पण करतो.) या मंत्राने मंत्रित करून जमिनीत पाणी व अक्षता टाकून व पाच प्रकारच्या रत्नाच्या खाली गर्भमल




ठेवावा व त्वत्पुत्रा इव मत्पुत्राः चिरंजीविनोभूयासुः (हे पृथ्वी, तुझ्या पुत्राप्रमाणे–कुलपर्वताप्रमाणे देखील माझा पुत्र चिरंजीवी होवो) असे म्हणून धान्य उत्पन्न होण्यायोग्य शेतात तो मल टाकावा. नंतर क्षीरवृक्षाच्या डहाळ्यांनी जमीन सुशोभित करून व तिच्यावर मातेला बसवून मंत्रित केलेल्या कोमट गरम पाण्याने स्नान घालावे. त्यावेळी "सम्यग्दृष्टे सम्यग्दृष्टे, आसन्नभव्ये आसन्नभव्ये, विश्वेश्वरी विश्वेश्वरी, उर्जितपुण्ये उर्जितपुण्ये, जिनमातः जिनमातः स्वाहा ।" हा मंत्र म्हणावा (हे सम्यग्दृष्टी, निकटभव्ये, सर्वांची स्वामिनी हे उत्कृष्ट पुण्यसंचय करणारी अशी तू जिनमाता हो).

तिसऱ्या दिवशी रात्रीच्या वेळी– "त्वं अनतज्ञानदर्शी भव ।" (तू अनंतज्ञानाला पहाणारा हो) हा मंत्र म्हणून पुत्राला ओटीत घेऊन आकाश दाखवावे. त्या दिवशी पुण्याहवाचन करून यथाशक्ती दान करावे. यथाशक्ती अभय घोषणा करावी असा हा जन्मोत्सव विधी पूर्वाचार्यांनी सांगितला आहे.

७) **नामकरण–** जन्मदिवसापासून बारा दिवस झाल्यावर मूल, आई-वडील याना शुभदिनी आपल्या शक्तीप्रमाणे देव, ऋषि व उपाध्याय यांचे पूजन करावे व आपल्या बालकाचे वंशाला वाढविणारे शुभनाम ठेवावे. भगवंताची १००८ नावे १००८ कागदाच्या तुकड्यावर अष्टगंधाने, सोन्याच्या लेखणीने किंवा इतर लेखणीने लिहावी व त्या कागदाच्या त्या गोळ्या पिवळ्या वस्त्राने, नारळाने झाकलेल्या घटात भराव्या व कागदाच्या एका तुकड्यावर 'नाव' असा शब्द लिहून त्याची गोळी करावी. याप्रमाणे १००७ तुकड्याच्या गोळ्या बनवून या सर्व दुसऱ्या घटात भराव्यात. नतर एका अज्ञान कन्या किंवा बालकाकडून दोन्ही घटातून एकेक गोळी काढवावी. ज्या नावाच्या गोळीबरोबर नाम हा शब्द निघेल तेच बालकाचे ठेवावे. मंत्र– दिव्यसहस्रनामभागी भव । विजयाष्टसहस्रनामभागी भव । परमाष्टसहस्रनामभागी भव । हा मंत्र म्हणावा.

८) **बहिर्यानक्रिया–** २।३ किंवा ३।४ महिन्यानंतर आपल्या शक्तीप्रमाणे ही क्रिया करावी. ही क्रिया केल्यानंतर बालकाला प्रसूतिगृहाच्या बाहेर नेणे शास्त्रसंमत आहे. ही क्रिया करते वेळी बालकाचे भाऊ आदिकापासून भेट, पारितोषिके जी येतील ती एकत्र करून तो जेव्हा पित्याच्या धनाचा अधिकारी होईल तेव्हा त्याला द्यावे. ही आठवी बहिर्यान क्रिया आहे. मंत्र– "उपनयननिष्क्रांतिभागी भव । वैवाहनिष्क्रांतिभागी भव । मुनीन्द्रनिष्क्रांतिभागी भव । सुरेंद्रनिष्क्रांतिभागी भव । मन्दरानिष्क्रांतिभागी भव । यौवराज्यनिष्क्रांतिभागी भव । महाराज्यनिष्क्रांतिभागी भव । परमराज्यनिष्क्रांतिभागी भव । आर्हन्त्यनिष्क्रांतिभागी भव ।"

९) **निषधाक्रिया–** ज्याच्याजवळ मंगलद्रव्ये ठेवलेली आहेत अशा बालकाला योग्य आसनावर बसविण्याच्या क्रियेला निषधाक्रिया म्हणतात. या क्रियेत सिद्ध भगवंतांची पूजा आदि कार्यक्रम पूर्वीप्रमाणे करावा. या क्रियेमुळे बालकाची उत्तरोत्तर दिव्य आसनावर बसण्याची योग्यता प्राप्त होत जाते. ही निषधाक्रिया होय. मंत्र– "दिव्यसिंहासन भागी भव । विजयसिंहासनभागी भव । परमसिंहासनभागी भव । अर्थात् इंद्राच्या, चक्रवर्तीच्या विजयोल्लासित व तीर्थंकरांच्या उत्कृष्ट सिंहासनावर बसणारा हो ।"

१०) **अन्नप्राशन क्रिया–** जन्मापासून ७।८ महिने झाल्यानंतर बालकाला भात खाऊ घालण्याचा विधी करावा. त्यावेळी पूर्वीप्रमाणे जिनपूजनादि विधी करावा. त्यावेळी मंत्र म्हणावा– "दिव्यामृतभागी भव । विजयामृतभागी भव । निक्षसमंत्र अक्षीणामृतभागी भव । अर्थात् दिव्य अमृत, विजयरूपी अमृत व अक्षय अमृताचा भोक्ता हो ।"




११) **व्युष्टिक्रिया–** व्युष्टि म्हणजे वाढदिवस Birthday त्या दिवशी जिनपूजनादि कार्ये करणे त्याला व्युष्टिक्रिया म्हणतात. बालकाला एक वर्ष पूर्ण झाल्यावर त्याचा वाढदिवस करावा. त्यावेळी सत्पात्रदान, जिनपूजन व होमकुण्डार्चन हा विधी पूर्वीप्रमाणे करावा. आपल्या इष्ट मित्राना, बांधवाना बोलावून हा विधी करावा. या प्रकारे दरवर्षी जन्मदिनी हा विधी करावा. पुढील मंत्र म्हणून आशीर्वाद द्यावा. "उपनयनजन्म-




वर्धवर्धनभागी भव । वैवाहनिष्ठवर्धवर्धनभागी भव । मुनीन्द्रजन्मवर्धवर्धनभागी भव । सुरेंद्रजन्मवर्धवर्धनभागी भव । मन्दराभिषेकवर्धवर्धनभागी भव । यौवराज्यवर्धवर्धनभागी भव । महाराज्यवर्धवर्धनभागी भव । परमराज्यवर्धवर्धन-भागी भव । आर्हन्त्यवर्धवर्धनभागी भव । अर्थात् तू यज्ञोपवीत क्रियेच्या वर्षाला, विवाह क्रियेच्या, मुनीपद धारण करणाऱ्या, इंद्रजन्माच्या वर्षाला वाढविणारा, सुमेरु पर्वतावर होणाऱ्या अभिषेकाच्या, युवराजपदाच्या, महाराजपदाच्या, चक्रवर्तीच्या उत्कृष्ट पदाच्या, अरिहंतपदवीरूपी राज्याच्या वर्षाला वाढविणारा हो । "

**१२) चौलक्रिया–** एखाद्या शुभदिनी देव, गुरूची पूजा करून बालकाचे जावळ काढणे यास चौलकर्म म्हणतात. प्रथमतः बालकाचे केस गंधोदकाने ओले करावेत. नंतर कुलपद्धतीला अनुसरून मुंडन करावे, शेंडी ठेवावी. नंतर बालकास आंघोळ घालून नवा पोषाख घालावा मुनिचरणास नमस्कार करायला लावावा. सर्व आप्तेष्टांनी बालकाला आशीर्वाद द्यावेत. या क्रियेत पुण्याहवाचन करावे. मंत्र– " उपनयनमुण्डभागी भव । निर्ग्रन्थमुण्डभागी भव । निष्क्रांतिमुण्डभागी भव । परमविस्तारककेशभागी भव । परमेंद्रकेशभागी भव । परमराज्य-केशभागी भव । आर्हन्त्यभागी भव । अर्थात् उपनयन क्रियेसाठी मुंडन धारण करणारा, निर्ग्रंथदीक्षा धारण करतेवेळी मुंडन केलेला, मुनी अवस्थेत केशलोचन करणारा, संसारातून पार करणाऱ्या आचार्यांच्या केसाना धारण करणारा, इंद्राच्या केसाना धारण करणारा, चक्रवर्तीच्या केसाना धारण करणारा, अरिहंत अवस्थेच्या केसाना धारण करणारा हो । " या मंत्रानी विधीपूर्वक बालकाची शेंडी ठेवावी.

**१३) लिपिसंख्यान क्रिया–** पाचव्या वर्षी बालकाला अक्षरे व संख्येची माहिती करून देणारा विधी करतात. वरीलप्रमाणे सर्व विधी करावा. बालकाला शिकविणारा उपाध्याय गुरुग्रहव्रती, कुशलव्रतीगृहस्थ बुद्धीमान, आदर्श श्रावक असावा. मंत्र– शब्दपारगामी भव । अर्थपारगामी भव । शब्दार्थसंबंधपारगामी भव । अर्थात् शब्दाचे स्वरूप, संपूर्ण अर्थ, शब्द व अर्थाचा संबंध जाणणारा हो ।

**१४) उपनीतिक्रिया–** गर्भापासून आठव्या वर्षी बालकाची उपनीति क्रिया करतात. प्रथम त्याचे मुंडन करून जिनमंदिरात जिनपूजनानंतर गुरुसाक्षीने व्रते देऊन त्याचे मौजीबंधन करावे. शेंडी ठेवून अंगावर शुभ्र वस्त्र धारण करावे. आत लंगोटी नेसून वाहेरून धोतर नेसावे. वेष निर्विकार असावा. त्याच्या गळ्यात व्रताचे सूचक यज्ञोपवीत जानवे घालावे. त्याच्या चरित्राला अनुसरून नाव ठेवावे. त्याने भिक्षेने उदरनिर्वाह करावा. त्यातील अग्रभाग जिनप्रभूला अर्पण करावा. या विद्यार्थ्यास अर्थात् प्रथमाश्रमी ब्रह्मचर्यास कटिलिंग– तीन पदराचे रत्नत्रयाचे शुद्धीचे चिन्ह असलेला कडदोरा बांधावा. ऊरुलिंग– धुतलेले वस्त्र, धोतर धारण करावे. हे श्रावकाचे कुल पवित्र असल्याचे सुचविते. उरोलिंग– सात पदराचे यज्ञोपवीत हे वक्षःस्थलाचे चिन्ह आहे व ते सप्तपरम-स्थानाचे सूचक आहे. शिरोलिंग– मुंडन करणे हे मनवचन शरीराचे पावित्र्य सुचविते. अशा चार चिन्हासह व्रत धारण करावे. म्हणजेच स्थूल हिंसा, असत्य, चोरी इ. पासून विरक्त व उत्कृष्ट ब्रह्मचर्य धारण करावे. या ब्रह्मचर्याने बाभळ, आंबा वगैरेच्या काडीने दात घासू नयेत, विडा खाऊ नये, डोळ्यात अंजन घालू नये, हळद वगैरेची उटी लावून स्नान करू नये. परतु दररोज शुद्ध स्नान करावे. एकटे जमिनीवर झोपावे. पलंग, बाज यावर झोपू नये. शिक्षण असेपर्यंत हे व्रत पाळावे. विनयाने गुरूकडून श्रावकाचार, विद्या शिकावी. मद्य, मांस, दारू याचा सर्वकाली त्याग व पच अणुव्रताचे पालन करावे. मंत्र– " परमविस्तारकालिंगभागी भव । परमार्ष-लिंगभागी भव । परमेन्द्रलिंगभागी भव । परमराज्यलिंगभागी भव । परमार्हन्त्यलिंगभागी भव । परमनिर्वाणलिंग-भागी भव । अर्थात् उत्कृष्ट आचार्यांच्या चिन्हाना, परमार्ष चिन्हाना, उत्तम इंद्राच्या चिन्हाना, चक्रवर्तीच्या राज्याच्या, उत्कृष्ट अरिहंताच्या व उत्कृष्ट मोक्षाच्या चिन्हाना धारण करणारा हो ।

उत्तम ब्रह्मचर्य पालन करून गुरुमुखाने अध्ययन करणारा ब्रह्मचारी क्रमाने ऋषि, इन्द्र, चक्रवर्ती व तीर्थंकर होऊन मोक्षप्राप्ती करून घेतो.




**श्रावणीक्रिया-यज्ञोपवीत-जानवे धारण करणे–**

दरवर्षी श्रावण महिन्यात श्रवणनक्षत्रयुक्त पौर्णिमेच्या दिवशी श्रावकाने जानवे धारण करण्याचा विधी करावा. यज्ञोपवीत संस्कारयुक्त धारण केल्यानेच खरा श्रावक, ब्राह्मण म्हटला जातो. या संस्कारामुळे आत्मोन्नती होते. आत्मोन्नतीस रत्नत्रय कारण आहेत व जे गर्भान्वयाचे त्रेपन्न संस्कार आहेत ते रत्नत्रयस्वरूपी आहेत. याप्रमाणे आदिभगवंतानी भरतचक्रवर्तीवर हे उपनयनादि संस्कार केले होते. याविषयी आदिपुराणात उल्लेख आहे. श्रावणीक्रियेत दरवर्षी नवीन यज्ञोपवीत विधीपूर्वक सर्व श्रावकांनी मिळून धारण करावे. इतर संस्कार आयुष्यात फक्त एकदाच येतात. प्रथम जिनेश्वराची विधीपूर्वक अभिषेक करून नंतर पुण्याहवाचन व ग्रहहोम करावा. नंतर यज्ञोपवीताचा मंत्र म्हणत ते धारण करावे. पूजा व दान ही दोन कार्ये यज्ञोपवीताशिवाय करू नयेत. लघवी, शौचास जाताना क्रमाने उजव्या व डाव्या कानावर गुंडाळावे. वांतीच्या वेळी त्यावर शितोडे उडू नये म्हणून गळ्यात गुंडाळावे. मैथुनसमयी ते मस्तकाला गुंडाळावे.

**यज्ञोपवीत केव्हा बदलावे–** १) नवीन यज्ञोपवीत धारण केल्यावर पूर्वीचे जलाशयात सोडावे. २) सूतक व वृद्धी प्राप्त झाली असता ती संपल्यानंतर होमादि विधी करून पूर्व यज्ञोपवीत त्यागावे व नवीन घ्यावे. ३) यज्ञोपवीत तुटले असताना पुनः यज्ञोपवीत धारण करावयाचा मंत्र म्हणून नवीन धारण करावे. ४) अपवित्र, मल, मूत्र, रक्त विप्टादिकांचा संपर्क यज्ञोपवीतास झाला असता ते बदलून नवीन घ्यावे. ५) चांडाळादि अस्पृश्यांचा (मद्य, मांस, मधू सेवन करणाऱ्यांचा) स्पर्श झाला असता प्रायश्चित्त घेऊन बदलावे. ६) मद्य, मांस सेवी लोकाबरोबर अज्ञानाने खानपान झाल्यास प्रायश्चित्त घेऊन पुनः यज्ञोपवीत घ्यावे. गाय, कुत्रा, मांजर, सर्प आदि पंचेंद्रिय जीवांची हिंसा अज्ञानादिक कारणानी घडली असता प्रायश्चित्त घेऊन यज्ञोपवीत बदलावे. गृहस्थाचार्याने श्रावकाच्या कपाळाला तिलक लावून खालील मंत्र म्हणून यज्ञोपवीत द्यावे.

**मंत्र–** ॐ नमः परमशान्ताय शान्तिकराय पवित्रीकृतायार्हं रत्नत्रयस्वरूपं यज्ञोपवीतं दधामि मम गात्रं पवित्रं भवतु अर्हं नमः स्वाहा । इति यज्ञोपवीतसंधारणम् ।

**नवग्रहादि होम केव्हा करावा–** यज्ञोपवीत धारण करताना, व्रतावरण (विद्याध्ययन समाप्त झाल्यावर) विवाह, सूतकपातक, जिनमंदिर प्रतिष्ठा, नूतनगृहनिर्माण, महारोगादिक शांति व गर्भाधानादिक विधी यावेळी नवग्रहादि होम करावा.

**विवाह संस्कार–** विद्याध्ययन झाल्यावर ज्याला गृहस्थाश्रमात राहून धर्मसाधना करावयाची असा श्रावकाने सजातीय, कुलीन, अनुरूप कन्येशी विधिपूर्वक विवाह करावा.

**उद्देश–** श्रावकधर्माची परंपरा टिकावी, सदाचार व कुलाची उन्नती व्हावी, देवपूजा, सत्पात्रदान अतिथिदान व्हावे, कामसुखाचा निराकुल अनुभव यावा म्हणून कुलीन कन्येशी विवाह करावा. आपल्या गोत्रातील, आपल्या मावशीची मुलगी, सासूची बहीण इ. कन्या वरण्यास योग्य नाहीत. भिन्न गोत्रातील, शुभ लक्षणयुक्त, दीर्घायुषी, निरोगी, अनुरूप, गुणी, श्रेष्ठ, कुलवान, सदाचारी सुरूप वधूवराशीच विवाह करावा.

**विवाहाची अंगे–** वाग्दान, प्रदान, वरण, पाणिपीडन व सप्तपदी ही विवाहाची पाच अंगे आहेत.

**१) वाग्दानविधी–** विवाहाच्या पूर्वी वधूपित्याने आपला गोत्र, जात इ. चा उच्चार करून माझी कन्या धर्मवृद्धीसाठी म्हणून प्रेमाने आपल्या पुत्राला देतो तिचा आपण स्वीकार करावा असे म्हणावे व वरपित्याच्या हातावर तांबूल अक्षता व फल ठेवावे. वरपित्यानेही कन्यापित्याच्या हातावर तांबूल, अक्षता, फल ठेवून आपली कन्या माझा वंश वाढावा म्हणून माझ्या पुत्राकरिता स्वीकारतो असे म्हणावे. हा विधी पंचाच्या मार्फतीने करावा. वाग्दानाच्या पूर्वी मंगल कलशाची स्थापना करून गणधरांचे पूजन करावे. पंचजनाचे, आप्तेष्टाचे, मित्रांचे स्वागत व आदर करावा.




२) प्रदानविधी– कन्या वरण्याच्या पूर्वी प्रदानविधी करतात. त्यावेळी कलश स्थापला करून गणधराचे पूजन करावे. चौका करून चौरंग स्थापन करून कन्येला त्यावर बसवावे व तिला वस्त्रालंकार द्यावेत. त्यावेळी पंडिताने कन्येला आशीर्वाद द्यावा.

वराचे वधूगृही गमन– विवाहाच्या दिवशी वराने स्नान करून शुद्ध वस्त्रे नेसून आपल्या जातिबांधवासह वाजत गाजत वधूच्या घरी जावे. तोरणाजवळ वधूच्या आईने वराचा सन्मान करावा. वधूच्या इतर आप्तेष्टांनी सामोरे येऊन वराला विवाह मंडपात घेऊन जावे. तेथे वराला वधूच्या पित्याने आहेर करावा. यानंतर पंडिताने वराचा व वधूच्या मामाना कन्यावरण करायला सांगावे. अमूक गोत्रात जन्मलेली, अमकयाचा पणतू, नातू, पुत्र, अमूक नावाची, त्याच्याकरिता अमूक गोत्रात अमकयाची पणती, नात, मुलगी, अमकया नावाची तिला वरावे. मामा, आपण कबूल करा असे वधूच्या मामाने म्हणावे व वराच्या मामाने आम्ही हे कबूल करतो असे म्हणावे. हा विधी संपल्यावर वधूस पश्चिमेकडे तोंड करून व वराला पूर्वेकडे तोंड करून उभे करून दोघांच्यामध्ये अंतरपट धरून वधूवराने एकमेकाचे मुखावलोकन करावे. वराने वधूच्या मुखात गूळ व जीरे घालावे व अक्षता लावून गळयात पुष्पमाळा घालावी व वधूनेही याप्रमाणे करून वराच्या गळयात माळ घालावी.

पाणिग्रहण विधी– या विधीच्या प्रारंभी कन्यादानाचा संकल्प वधूपित्याकडून म्हटला जातो. त्यावेळी वधूचा उजवा हात सुवर्णाक्षतासह वराच्या उजव्या हातात देऊन वधूपिता कन्यादान करतो व या वधूचे आपण धर्म, अर्थ, काम या तीन पुरुषार्थांनी पालन करा अशी त्याने प्रार्थना करावी. नंतर वराने मी धर्म, अर्थ, काम या तीन पुरुषार्थांने हिचे पालन करीन असे म्हणावे. यानंतर वधूने वराच्या हातात कंकण बांधावे. नंतर वराच्या वधूच्या हातात बांधावे. कंकण हळद लावलेले व त्यात एक सोन्याचा मणी ओवलेला असावा. वर-वधूनी एकमेकाच्या मस्तकावर अक्षतक्षेपण केल्यावर होमकुंडासमोर वराच्या डाव्या बाजूस वधूने बसावे. नंतर सप्तपदी विधी करावा. पाटावर तांदळाचे सात ढीग करावेत व अग्नीस प्रत्येक प्रदक्षिणा घालतेवेळी वधूने एकेका राशीला उजव्या पायाच्या आंगठयाने स्पर्श करावा. पंडिताने सप्तपरमस्थानाचे नामोच्चारण करावे. अशारीतीने सात प्रदक्षिणा झाल्यावर अग्नीला पूर्णाहुति द्यावी. नंतर शांतिधारा, प्रदक्षिणा, पुष्पांजली आदि करून विसर्जन करावे. सप्तपदी विधी झाल्यावरच विवाह झाला असे समजतात. सप्तपरमस्थानमंत्र– ॐ सज्जातये स्वाहा । ॐ सद्गृहस्थाय स्वाहा । ॐ परमपारिव्राज्याय स्वाहा । ॐ परमसुरेन्द्राय स्वाहा । ॐ परमसाम्राज्याय स्वाहा । ॐ परमार्हन्त्याय स्वाहा । ॐ परमनिर्वाणाय स्वाहा । सप्तपदीचे वेळी पंडिताने हा मंत्र म्हणावा.

पाणिग्रहणाच्या वेळी कंकणबंधन झालेले असते. ते कंकण सात दिवसानी विसर्जन करावयाचे असते. म्हणून तोपर्यंत वधू-वरानी देवाग्नीसाक्षी ब्रह्मचर्य व्रत धारण करावे. या सात दिवसात जाणे शक्य असलेल्या तीर्थास जाऊन दर्शन घ्यावे. यानंतर घरी येऊन कंकणमोचन करावे व सन्तानासाठी यथाशक्ती ऋतुकालीच कामसेवन करावे. असे जिनसेनाचार्यांनी विवाह संस्कारात सांगितले आहे.

याप्रमाणे गर्भाधानापासून उत्तम श्रावक होईपर्यंत जीवावर कल्याणासाठी उत्तम अनेकविध संस्कार करावेत. त्यामुळे संस्कारित जीवाचे कल्याण होते व काही भवातच तो मोक्षप्राप्ती करून घेतो. परतु आम्ही चुकीचे, अयोग्य, कुमार्गी संस्कार केल्यामुळे बालकाच्या जीवनात स्थिरता, समृद्धी होत नाही. त्यासाठी प्रत्येक श्रावकाने संस्कार विधी समजावून घेऊन वरीलप्रमाणे शास्त्राधारानेच सांगितलेला विधी करावा व गृहस्थधर्माचे पालन करून धर्मप्रभावना करावी. तेव्हाच उद्याचा नागरिक सुसंस्कारमय, सुधर्मयुक्त, सुगुणसंपन्न होऊन स्वत:चा व इतराचा विकास करण्यास निश्चितच पात्र होईल.

# प्राचीन भारतातील जैनशिक्षण पद्धति

भारतात प्राचीन काळापासून ज्ञानाची प्रतिष्ठा सर्वमान्य आहे. व्यक्तीच्या सर्वांगीण विकासासाठी ज्ञानाला सर्वात अधिक महत्त्व आहे. मानवी जीवनाची सफलता मनुष्याच्या ज्ञानावरच अवलंबून असते. म्हणूनच ज्ञान हा माणसाचा तिसरा डोळा समजला जातो. स्वाध्यायाने माणसाचे मन एकाग्र होते. तो स्वतंत्र विचाराचा बनतो, त्याला नित्य ज्ञानधन प्राप्त होते. तो इंद्रियावर ताबा ठेवून सुखी होतो आणि त्याची बुद्धी वाढून त्याला यशप्राप्ति होते. हे ज्ञानाचे अलौकिक महत्त्व आहे. जैन आगमामध्ये ज्ञानाची महती सांगितली आहे. उत्तराध्ययन-मधील पुढील संवादातून ती स्पष्ट होते. शिष्याने गुरूला विचारले की 'ज्ञानाच्या प्राप्तीपासून जीवाला काय फायदा होतो?' गुरूने उत्तर दिले की– "हे शिष्या! ज्ञानवान जीव सर्व पदार्थांना यथार्थ भावनेने जाणतो आणि यथार्थ भावनेने जाणणाऱ्या जीवाला संसाररूपी समुद्रात दुःख भोगीत फिरावे लागत नाही. ज्याप्रमाणे दोरा असलेली सुई हरवत नाही त्याप्रमाणे ज्ञानी जीव संसारात आपल्या सन्मार्गापासून भ्रष्ट होत नाही आणि ज्ञान, दर्शन, चारित्र, तप व विनय यांची प्राप्ति करतो. तो स्वपर भेद विज्ञान पूर्णपणे जाणतो व असत्य मार्गात फसत नाही."

१) जैन शिक्षण पद्धतीच्या उल्लेखावरून असे सिद्ध होते की, निःसंदेह भारत देशात प्राचीन कालापासून एक अत्यंत सुव्यवस्थित, आदर्श शिक्षणपद्धति होती. प्रथम तीर्थंकर भ. आदिनाथ यांनी आपल्या ब्राह्मी व सुंदरी या दोन कन्यांना भाषा व गणिताचे शिक्षण दिले तेव्हापासूनच स्त्रीशिक्षणाला सुरुवात झाली. तसेच आपल्या भरत बाहुबली इत्यादि मुलांना चौसष्ट कलांचे संपूर्ण शिक्षण दिले होते. तेव्हापासूनच शिक्षण पद्धतीचा उगम झाला व तो आजतागायत चालू आहे. म्हणून असे म्हणण्यास हरकत नाही की जैन शिक्षण पद्धति ही सर्वात प्राचीन आहे.

२) शिक्षणाचा उद्देश– सदाचाराची वृद्धी, व्यक्तित्वाचा विकास, प्राचीन संस्कृतीचे रक्षण व सामाजिक व धार्मिक कर्तव्याचे शिक्षण देणे हाच उद्देश प्राचीनकाळी भारतातील जैन शिक्षणपद्धतीचा होता.

**शिक्षणकाळातील टप्पे–**

१) विद्यार्थी जीवन– उपनयन संस्कारानंतर विद्यार्थी जीवन सुरू होते. उपनयन याचा अर्थ 'कलाग्रहण' असा केला आहे. कला म्हणजे विद्या. विद्या प्राप्त करण्यापूर्वी जो उत्सव केला जातो त्याला उपनयन म्हणतात. उपनयन संस्कारानंतर आई-वडील मुलाला गुरुगृही पाठवित असत. सुरुवातीच्या काळात विद्यार्थी आपल्या आचार्यांच्या घरी राहूनच विद्या शिकत असत. तथापि काहीवेळा धनिकवर्ग विद्यार्थ्यांच्या भोजनाची व निवासाची सोय करून शिक्षण कार्यास मदत करीत असल्याची माहिती मिळते. अवकाशाच्या वेळी आश्रमातील अध्ययन बंद करीत असत. अवकाश पुढील वेळी होत असे. दुष्काळ, गर्जना, विजांचा कडकडाट, अति पर्जन्यवृष्टी, वादळ, चंद्र-सूर्य ग्रहण इ. दोन नगरातील सैन्यात युद्ध होऊन शांतता भंग झाल्यास, मल्लयुद्धाच्या वेळी, असामान्य नेत्यांचा मृत्यु झाल्यावर, इ. वेळीही अध्ययन बंद केले जात होते. केव्हा केव्हा तर मांजराने उंदरास मारल्यावर, रस्त्यात अंडे दृष्टोत्पत्तीस पडल्यास, आश्रमाच्या आसपास बालकाचा जन्म झाल्यास इत्यादी कारणामुळेही विद्याध्ययन बंद केले जात होते.

अष्टमी गुरुहंत्री स्यात् शिष्यहंत्री चतुर्दशी । अमावास्योभयं हंत्री प्रतिपत् पाठनाशिनी ।।

जैनशास्त्राच्या आधारानुसार मुलाचा शिक्षणकाळ आठ वर्षापासून सुरू होत होते असे दिसते आणि गुरूजवळ संपूर्ण ७२ कलांचा किंवा काही आवश्यक कलांचा अभ्यास पूर्ण होईपर्यंत त्याला गुरुगृही राहून विद्याध्ययन करावे लागत असे.




४) संगीत विज्ञान कला– नृत्य, संगीत, वाद्य, सरगम, ढोल वादन व ताल. ५) मृत्तिका विज्ञान कला– दगड-मातीपासून, ६) द्यूतक्रीडा व गृहक्रीडा– (बैठी करमणूक) द्यूत, फासे, बुद्धिबळ, भोवरा, ७) स्वास्थ्य, शृंगार व भोजन विज्ञान– भोजन विज्ञान, पान, वस्त्र, शृंगार, शय्या विज्ञान, चांदीची आभूषणे, सोन्याची आभूषणे, आभूषण कला, शृंगारचूर्ण कला, स्त्रीच्या शरीराला सुंदर बनविण्याची कला, पानांची सुंदर आभूषणे बनविण्याची कला, कपाळ (भाळ(?)) सुशोभित करण्याची कला. ८) चिन्हविज्ञान–लक्षणज्ञान– यात खुणांच्या योगाने स्त्री, पुरुष, घोडा, हत्ती, गाय, कोंबडा, दासी, तलवार, रत्न व छत्र यातील फरकास जाणण्याच्या कलेचा समावेश होतो. शारीरिक लक्षणांचे ज्ञान मिळविणे. ९) शकुन विज्ञान–पक्ष्यांची भाषा जाणण्याची कला. १०) खगोलविद्या– ग्रहांचे चलन, प्रतिचलनाचे ज्ञान, ११) रसायनशास्त्र– सोने, चांदी शुद्ध धातु बनविणे, खोटया धातूंचे खऱ्या धातूमध्ये रूपांतर करणे व खऱ्या धातूचे खोटया धातूमध्ये परावर्तन करणे, १२) गृहविज्ञान– घरे बांधणे, नगर स्थापणे, जमीन नांगरणे, १३) युद्ध विज्ञान– युद्ध, कुस्ती, दृष्टियुद्ध, मुष्टियुद्ध, बाहुयुद्ध व मल्लयुद्ध. धनुर्विज्ञान, व्यूहज्ञान, प्रतिव्यूह विज्ञान, चक्रव्यूह विज्ञान, गरुडव्यूह विज्ञान, शकटव्यूह विज्ञान यांचा समावेश होता.

**शिक्षण विधी–** (पद्धती-प्रकार) वैदिक काळाच्या सुरुवातीस सूत्र कंठस्थ करण्याची पद्धत होती. तालक-दंतव्य उच्चार स्पष्टपणे करण्यात येत. वैदिक मंत्र कंठस्थ करताना त्यात कोणत्याही प्रकारची चूक होऊ नये म्हणून संहिता पाठ, पदपाठ, क्रमपाठ, घनपाठ, जटापाठ इत्यादी सूक्त कंठस्थ करण्याच्या निरनिराळ्या पद्धती प्रचलित होत्या.

जैन शिक्षणपद्धतीचे स्वरूप ठरविण्याचे श्रेय भ. महावीरांना आहे. महावीरांनी म्हटले आहे की, " पक्षी आपल्या पिलांना (शावक) ज्याप्रमाणे चारा देते, त्याप्रमाणे आचार्यांनी आपल्या शिष्यांना सदैव शिक्षण दिले पाहिजे, शिष्यांना संक्षेपाने न समजल्यास आचार्यांनी विश्लेषण करून सांगावे. आचार्य अर्थाचा अनर्थ करीत नसत, आपल्या आचार्यांकडून मिळविलेली सर्व विद्या शिष्यांना देण्यातच ते धन्यता मानीत असत. शिष्यासमोर व्याख्यान देताना विषयाव्यतिरिक्त व्यर्थ चर्चा टाळली जात असे.

परवर्ती युगात शास्त्रांच्या अध्ययनाचीही रीत बदलली. विद्यार्थी पाठांतर करण्याच्या वेळी आचार्यांकडून सूत्राचा व्यवस्थित अर्थ समजावून घेत असे व आपल्या शंकांचे निरसन करून घेई. शिष्य घोकून ते सूत्र, सूक्त कंठस्थ करी, त्यानंतर त्यावर मनन चिंतन करीत असे.

जैन शिक्षणपद्धतीची वाचणे, विचारणे, वाचलेल्या विषयावर मनन करणे, आवृत्त्या देऊन पाठांतर करणे व मिळविलेल्या धर्मज्ञानाचा उपदेश करणे, प्रसार करणे ही महत्त्वाची पाच अंगे होती.

जैन सूत्रांमध्येही समावर्तन संस्काराची माहिती मिळते. शिष्य अध्ययन संपवून जेव्हा स्वगृही परत येत असे तेव्हा त्याचे समारंभपूर्वक स्वागत करण्यात येई. ' रक्षित ' ज्यावेळी पाटलीपुत्राहून अध्ययन संपवून स्वगृही परत आला, त्यावेळी त्याचे थाटामाटात स्वागत करण्यात आले. सारे शहर पताकांनी सुशोभित करण्यात येऊन, रक्षिताला हत्तीवर बसवून शहरात आणले गेले. त्याच्या विद्वत्तेवर प्रसन्न होऊन लोकांनी त्याला दास, पशु सुवर्ण इत्यादी नजराणे देऊन त्याचे यथोचित स्वागत केले अशी माहिती मिळते.

जैन संस्कृतीत आचार्य परंपरा तीर्थंकरापासून सुरू होते. तीर्थंकर मूळतः अस्थानवासीय (अनगार) असत. शेवटचे तीर्थंकर भ. महावीरही दिगंबरच होते. त्यामुळे या तीर्थंकरांची शिक्षणकेंद्रे विशिष्ट भवनामधून असणे अशक्यच आहे. या काळातील जैन शिष्यही आचार्यांबरोबरच निरनिराळ्या देशामधून फिरत असत. भ. महावीरांचे जे बारा गणधर (शिष्य) होते ते सर्व आचार्यच होते. त्यात इंद्रभूति, वायुभूति, व्यक्त व सुधर्मा यांचे शिष्य होते, मण्डिक किंवा मौर्यपुत्राचे शिष्य तर अकम्पित, अचलभ्राता, मेतार्य किंवा प्रभास यांचे शिष्य होते. उपर्युक्त आचार्य व त्यांचे शिष्य भ्रमण करीत असतानाच योगायोगाने महावीराच्या संपर्कात आले व







जैन आचार्यांनी, गुरुगृही राहणे, उत्साही, विद्याप्रेमी, मधुरभाषी असणे हे गुण आवश्यक मानले आहेत. आज्ञा न पाळणारा, गुरूच्या मतापासून दूर राहणारा, शत्रूप्रमाणे विरोधी, विवेकहीन शिष्याला 'अविनीत' म्हटले जात असे. याउलट जो गुरूची आज्ञा पालन करतो, गुरूजवळ राहतो, आपल्या गुरूच्या मनोकामना जाणतो त्याला 'विनीत' म्हटले आहे.

**शिष्य कसा असावा–** निष्फळ बडबड करणारा, दुराचारी, क्रोधी, कठोर भाषा बोलणारा, विचार न करता उत्तर देणारा, विचारल्यावर खोटे उत्तर देणारा, गुरुजनांबरोबर वैर करणारा शिष्य नसावा. उत्तराध्ययनामध्ये शिष्याबद्दल असा उल्लेख आहे की– 'शिष्याने गुरूच्या आसनाजवळ अथवा मागे बसू नये; गुरूच्या जास्त जवळ बसू नये, अंथरूणावर झोपून किंवा बसून उत्तर देऊ नये, गुरूसमोर पायाला तिढी घालून किंवा पाय पसरून बसू नये. जर गुरूने बोलाविले तर मौन धरू नये. गुरुकृपेच्छु शिष्याने बोलावताच तावडतोब गुरूजवळ जाऊन बसावे. गुरूच्या आसनापेक्षा उंच आसनावर बसू नये.' ही शिष्याची मूलभूत कर्तव्ये आहेत आणि गुरुजनांचेही हे कर्तव्य आहे की असा विनयसंपन्न शिष्याला संपूर्ण विद्या त्याच्या योग्यतेनुसार, बुद्धीनुसार समजावून सांगावी.

**गुरु-शिष्य संबंध–** उत्तराध्ययनामध्ये गुरु-शिष्य संबंधाचीही माहिती दिलेली आहे. 'ज्याप्रमाणे चांगला घोडा पळविण्यास घोडेस्वाराला आनंद होतो त्याचप्रमाणे हुशार, चतुर विद्यार्थ्याला विद्यादान देताना गुरूला आनंद होतो. ज्याप्रमाणे न धावणाऱ्या घोड्याला चालविता चालविता घोडेस्वार दमतो त्याप्रमाणेच मूर्ख शिष्याला शिकविता शिकविता गुरू कटाळून जातात. जर एखाद्या वेळी शिष्याला गुरु रागाने बोलले तर पापदृष्टीचा शिष्य त्याला शिव्या समजतो व दुःखी होतो आणि सुशील शिष्य समजतो की गुरुवर्य मला आपला मुलगा, लहान भाऊ, स्वजन समजूनच बोलत आहेत. तो गुरूच्या शिक्षेला कल्याणकारीच मानतो. आचार्य क्रुद्ध झाले तर शिष्याने त्यांना प्रेमाने प्रसन्न करणे, क्षमा मागणे व भविष्यकाळात पुन्हा असा अपराध आपल्या हातून होणार नाही, असा विश्वास देणे आवश्यक आहे.

जैन आचार्यांवर भ. महावीर व पूर्ववर्ती तीर्थंकरांची छाप पडलेली असे. ते आपले आयुष्य आणि शक्ति मानवाला सन्मार्ग दाखविण्यासाठी उपयोग करीत असत. जैन संस्कृतीतील आचार्यांच्या आदर्श व्यक्तिमत्वाची रूपरेखा पुढीलप्रमाणे होती–

१) कलायरिय– कलेचे आचार्य, २) सिप्पायरिय– शिल्पकलेचे आचार्य, ३) धम्मायरिय– धर्माचे आचार्य.

**अध्ययनाचे विषय–** जैन साधूंना निरनिराळ्या विषयांचे सखोल अध्ययन करावे लागे. त्यात प्रामुख्याने धार्मिक व तात्त्विक विषयांचा समावेश असे. श्रावकानेही या विषयाचे ज्ञान प्राप्त करून घेणे आवश्यक मानले जात असे. या विविध विषयामध्ये स्वक्षाण (गणित), सिक्खाकप्प (स्वरशास्त्र), वाजरण (व्याकरण), छंद, निरुक्त (शब्दशास्त्र), जोइस (ज्योतिष), धम्मसत्थ (धर्मशास्त्र) इत्यादी प्रमुख विषयांचा समावेश असे. याशिवाय उप्पाय (अपशकुन-विज्ञान), निमित्त (शकुन-विज्ञान), मन्त (मंत्रविद्या), आइक्खिय (इंद्रजाल विद्या), तेगिच्छिय (चिकित्सा-विज्ञान), आवरण (गृह-निर्माण विज्ञान), अण्णाण (साहित्य कला-विज्ञान) इत्यादी विषयांचा समावेश होत असे.

अंगशास्त्रामध्ये ७२ कलांचे वर्णन आहे. जरी सर्व विद्यार्थी सर्व कलेत नैपुण्य प्राप्त करू शकत नसले तरी सुद्धा आपल्या शक्तीनुसार त्या सर्व कलांचे प्राथमिक ज्ञान प्राप्त करणे प्रत्येक शिष्याचे ध्येय असे

७२ कलांचे १३ भागात वर्गीकरण केलेले आहे.

१) पठनकला– लेख आणि गणित, २) काव्यकला– कविता निर्मिति. आर्या छंदात काव्याची निर्मिती. मागधी भाषेत काव्य निर्मिति. गाथा छंदात काव्य निर्मिति आणि श्लोक निर्मिति. ३) मूर्तिनिर्माण कला– रूप.





४) संगीत विज्ञान कला– नृत्य, संगीत, वाद्य, सरगम, ढोल वादन व ताल. ५) मृत्तिका विज्ञान कला– दगड-मातीपासून, ६) द्यूतक्रीडा व गृहक्रीडा– (बैठी करमणूक) द्यूत, फासे, बुद्धिबळ, मोवरा, ७) स्वास्थ्य, शृंगार व भोजन विज्ञान– भोजन विज्ञान, पान, वस्त्र, शृंगार, शय्या विज्ञान, चांदीची आभूषणे, सोन्याची आभूषणे, आभूषण कला, शृंगारचूर्ण कला, स्त्रीच्या शरीराला सुंदर बनविण्याची कला, पानांची सुंदर आभूषणे बनविण्याची कला, कपाळ (भाळ(?)) सुशोभित करण्याची कला. ८) चिन्हविज्ञान–लक्षणज्ञान– यात गुणांच्या योगाने स्त्री, पुरुष, घोडा, हत्ती, गाय, कोंबडा, दासी, तलवार, रत्न व छत्र यातील फरकास जाणण्याच्या कलेचा समावेश होतो. शारीरिक लक्षणांचे ज्ञान मिळविणे. ९) शकुन विज्ञान–पक्ष्यांची भाषा जाणण्याची कला. १०) खगोलविद्या– ग्रहांचे चलन, प्रतिचलनाचे ज्ञान, ११) रसायनशास्त्र– सोने, चांदी शुद्ध धातु बनविणे, खोट्या धातूंचे खऱ्या धातूमध्ये रूपांतर करणे व खऱ्या धातूचे खोट्या धातूमध्ये परावर्तन करणे, १२) गृहविज्ञान– घरे बांधणे, नगर स्थापणे, जमीन नांगरणे, १३) युद्ध विज्ञान– युद्ध, कुस्ती, दृष्टियुद्ध, मुष्टियुद्ध, बाहुयुद्ध व मल्लयुद्ध. धनुर्विज्ञान, व्यूहज्ञान, प्रतिव्यूह विज्ञान, चक्रव्यूह विज्ञान, गरुडव्यूह विज्ञान, शकटव्यूह विज्ञान यांचा समावेश होता.

शिक्षण विधी– (पद्धती-प्रकार) वैदिक काळाच्या सुरुवातीस सूत्र कंठस्थ करण्याची पद्धत होती. तालव्य-दंतव्य उच्चार स्पष्टपणे करण्यात येत. वैदिक मंत्र कंठस्थ करताना त्यात कोणत्याही प्रकारची चूक होऊ नये म्हणून संहिता पाठ, पदपाठ, क्रमपाठ, घनपाठ, जटापाठ इत्यादी सूक्त कंठस्थ करण्याच्या निरनिराळ्या पद्धती प्रचलित होत्या.

जैन शिक्षणपद्धतीचे स्वरूप ठरविण्याचे श्रेय भ. महावीरांना आहे. महावीरांनी म्हटले आहे की, "पक्षी आपल्या पिलांना (शावक) ज्याप्रमाणे चारा देते, त्याप्रमाणे आचार्यांनी आपल्या शिष्यांना सदैव शिक्षण दिले पाहिजे, शिष्यांना संक्षेपाने न समजल्यास आचार्यांनी विश्लेषण करून सांगावे. आचार्य अर्थाचा अनर्थ करीत नसत, आपल्या आचार्यांकडून मिळविलेली सर्व विद्या शिष्यांना देण्यातच ते धन्यता मानीत असत. शिष्यासमोर व्याख्यान देताना विषयाव्यतिरिक्त व्यर्थ चर्चा टाळली जात असे.

परवर्ती युगात शास्त्रांच्या अध्ययनाचीही रीत बदलली. विद्यार्थी पाठांतर करण्याच्या वेळी आचार्यांकडून सूत्राचा व्यवस्थित अर्थ समजावून घेत असे व आपल्या शंकांचे निरसन करून घेई. शिष्य घोकून ते सूत्र, सूक्त कंठस्थ करी, त्यानंतर त्यावर मनन चिंतन करीत असे.

जैन शिक्षणपद्धतीची वाचणे, विचारणे, वाचलेल्या विषयावर मनन करणे, आवृत्त्या देऊन पाठांतर करणे व मिळविलेल्या धर्मज्ञानाचा उपदेश करणे, प्रसार करणे ही महत्त्वाची पाच अंगे होती.

जैन सूत्रामध्येही समावर्तन संस्काराची माहिती मिळते. शिष्य अध्ययन संपवून जेव्हा स्वगृही परत येत असे तेव्हा त्याचे समारंभपूर्वक स्वागत करण्यात येई. 'रक्षित' ज्यावेळी पाटलीपुत्राहून अध्ययन संपवून स्वगृही परत आला, त्यावेळी त्याचे थाटामाटात स्वागत करण्यात आले. सारे शहर पताकांनी सुशोभित करण्यात येऊन, रक्षिताला हत्तीवर बसवून शहरात आणले गेले. त्याच्या विद्वत्तेवर प्रसन्न होऊन लोकांनी त्याला दास, पशु सुवर्ण इत्यादी नजराणे देऊन त्याचे यथोचित स्वागत केले अशी माहिती मिळते.

जैन संस्कृतीत आचार्य परंपरा तीर्थंकरापासून सुरू होते. तीर्थंकर मूळतः अस्थानवासीय (अनगार) असत. शेवटचे तीर्थंकर भ. महावीरही दिगंबरच होते. त्यामुळे या तीर्थंकरांची शिक्षणकेंद्रे विशिष्ट भवनामधून असणे अशक्यच आहे. या काळातील जैन शिष्यही आचार्यांबरोबरच निरनिराळ्या देशामधून फिरत असत. भ. महावीरांचे जे बारा गणधर (शिष्य) होते ते सर्व आचार्यच होते. त्यात इंद्रभूति, वायुभूति, व्यक्त व सुधर्मा यांचे शिष्य होते, मण्डिक किंवा मौर्यपुत्राचे शिष्य तर अकम्पित, अचलभ्राता, मेतार्य किंवा प्रभास यांचे शिष्य होते. उपर्युक्त आचार्य व त्यांचे शिष्य भ्रमण करीत असतानाच योगायोगाने महावीरांच्या संपर्कात आले व

त्यांच्या व्यक्तित्वाने प्रभावित होऊन आपल्या शिष्यासह जैन संघात सम्मिलित झाले. हे सर्व गणधर व त्यांचे शिष्य भ. महावीर मुक्त होईपर्यंत त्यांच्यावरोवरच होते.

यानंतरच्या काळात ठिकठिकाणी जैन मुनी व आचार्यांसाठी गुफा, मंदिरे व तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी मंदिरे बांधण्यात आली. त्यामुळेच राजधान्या, तीर्थक्षेत्र, आचार्यांचे आश्रम व जैन मंदिरे पुढील काळात जैनधर्माची शिक्षण केंद्रे बनली. कित्येक राजे व धनवान लोक विद्येचे पोषक किंवा संरक्षक असल्याने समृद्ध राज्यातील अनेक राजधान्यामध्ये पुढील काळात विशाल शिक्षण केंद्रांची स्थापना करण्यात आली.

बनारस जैनविद्येचे एक विशाल केंद्र होते. चंपापुरचा राजकुमार अगडदत्त याने येथेच जैनविद्येचे अध्ययन केले. श्रावस्ती व पाटलीपुत्र ही शिक्षण केंद्रेही प्रसिद्ध असून अनेक छात्रगण जैनविद्येच्या उच्च शिक्षणासाठी पाटलीपुत्र येथे येत. 'प्रतिष्ठान' हे दक्षिण भारतातील प्रसिद्ध जैन शिक्षण केंद्र होते तर वल्लभी जैन शिक्षण केंद्र म्हणून जागतिक प्रसिद्धीच्या उच्च शिखरावर होते. येथेच नागार्जुनसूरीने जैन आगमांचा संग्रह करण्यासाठी जैन मुनी व आचार्यांची सभा बोलाविलेली होती. साधूंचे वसतिस्थान तसेच उपाश्रयामध्येही विद्याध्ययन चालत असे. आचार्यांच्या जवळ राहून (आश्रमात राहून) प्राचीन शास्त्राध्ययन केलेले साधू या ठिकाणी अध्यापनाचे अधिकारी असत. अशा प्रकारची माहिती श्वेतांबर ग्रंथातून मिळते.

सत्य व ज्ञान यांच्या परीक्षणासाठी वादविवादही चालत या वादविवादामध्ये जैन तसेच बौद्ध वगैरे अन्य धर्मीय संघही भाग घेऊन सूक्ष्मातिसूक्ष्म विषयावर किंवा तात्त्विक विषयावर तात्त्विक वादविवाद करीत. जर कोणी तर्क किंवा न्याय इत्यादींच्या बाबतीत कमकुवत ठरला तर, तो दुसऱ्या कोणत्या तरी शिक्षण केंद्रात जाऊन अधिक अध्ययन करी. अध्ययन पूर्ण केल्यानंतर विरोधकांचा यशस्वीरीतीने पराभव करून तो धर्मप्रचाराचे कार्य पुढे चालू ठेवी.

उपर्युक्त सर्व मुद्यांचे यथायोग्य विश्लेषण केल्यावर स्पष्टपणे दिसून येते की, प्राचीन भारतीय इतिहास काळात वैदिक व बौद्ध शिक्षण पद्धतीप्रमाणे जैन शिक्षण-व्यवस्था व पद्धती अस्तित्वात होती. इतकेच नव्हे तर ती प्रगतिशील स्वरूपात होती. आजही भारतातील मोठमोठ्या शहरांमधून विद्यापीठामधून जैनधर्म व जैनदर्शन इत्यादींच्या स्वाध्यायाची प्रगतिशील केंद्रे आहेत. त्यावरही पूर्णपणे प्राचीन जैन शिक्षण पद्धतीचा प्रभाव जाणवतो.

१) ज्ञानाचे हे अलौकिक महत्त्व असल्याने, प्राचीन काळापासून भारतात शिक्षणपद्धतीवर विशेष लक्ष देण्यात आले. वैदिक, बौद्ध व जैन संस्कृतीच्या स्वतंत्र व वैशिष्ट्यपूर्ण शिक्षण परंपरा आहेत. वैदिक व बौद्ध शिक्षणपद्धतीवर बरेच लेखन झालेले आहे. जैन आगमामधून जैन शिक्षणपद्धतीसंबंधीचे जे अनेक उल्लेख मिळतात, त्यावरून प्राचीन भारतीय इतिहास काळात सुव्यवस्थित प्रगतिशील व आदर्श अशी स्वतंत्र जैन शिक्षण पद्धती अस्तित्वात होती असे दिसते.

२) जैन व बौद्ध शिक्षणपद्धतीत प्राय. साम्यता आहे. याचे मुख्य कारण म्हणजे या दोन्हीही धर्मांचा
प्रसार करण्याचे श्रेय, गृहस्थाश्रमापासून दूर राहणा-ा व ज्ञानदान व ज्ञानग्रहण यासाठी सर्वस्व अर्पण करणाऱ्या
मुनि व भिक्षु यांनाच द्यावे लागेल. तसेच या दोन्ही धर्मांच्या धार्मिक विचारात काही प्रमाणात असलेली
निकटता ही बौद्ध व जैन शिक्षणपद्धतीत साम्यता निर्मा करण्यास कारणीभूत झालेली असावी.

३) आचार्यांच्या आज्ञांचे पालन न करणारे योग्य शिष्यही असत. त्याची कठोर शब्दाने, प्रसंगी
वेतानेही संभावना केली जात असे. कित्येकदा कंटाळून आ र्य अशा शिष्याना आश्रमातून घालवूनही देत.

४) शूद्रांचा विद्याधिकार– जातक काळात शूद्र चांडाळांनाही विविध विषयांचे सर्वांगपरिपूर्ण ज्ञान
प्राप्त करण्याचा अधिकार होता असे दिसते. सुत्तनिपात (श्वे बर) मध्ये मातंग नावाचा चांडाळ विद्वान आचार्य
असून, त्याच्याकडे उच्च वर्णातील लोकही शिक्षण घेण्यासाठी त असत अशी माहिती आढळते.

५) आचार्य व त्यांचे व्यक्तिमत्त्व– अग्नि व इंद्र ही दिव्य प्रतीके असलेले प्राचीन वैदिक आचार्य तत्कालीन ज्ञान व अध्यात्म यांतील त्यांच्या असामान्य ज्ञानामुळे समाजात सर्वोच्च मानले जात.

६) आचार्य सत्य न लपविणारे, गर्व न करणारे, यशाची किंवा फळाची इच्छा न करणारे व अन्य धर्मीय आचार्यांची कधीही निंदा न करणारे असत. एखादे सत्य जर कठोर, हिंसा होणारे असेल तर त्या सत्याचाही आचार्य त्याग करीत, सदैव सद्विचाराचे प्रतिपादन करीत असत. शिष्याला अपशब्द बोलून किंवा धाक दाखवून काम करून घेत नसत धर्मविषयक ज्ञानात ते परिपूर्ण असत. आचार्यांचे जीवन तपोमय असून, ते कुशल, विद्वान व सर्वधर्मांचे ज्ञाते होते शुद्ध, ओघवत्या व विद्वत्ताप्रचुर भाषाशैलीने समाजापुढे ते नैतिक आदर्श ठेवीत आजच्या काळातही आचार्यांच्या आदर्श व्यक्तिमत्त्वाचा जैन समाजावर प्रभाव आहे

७) समाजातही या तीनही प्रकारच्या आचार्यांना मान दिला जात असे. भक्तियुक्त अंतःकरणाने त्यांना भोजन, जलपान, वस्त्र, पारिश्रमिक द्रव्य दिले जात असे

८) अध्ययन व अध्यापनाच्या दृष्टीने कमी प्रतीचेही काही विषय असत सर्वसंगपरित्याग करणाऱ्या साधुमुनींसाठी ते विषय पापश्रुत मानले जात

# जैन धार्मिक उत्सव

जैन धर्मियांमध्ये निरनिराळे धार्मिक उत्सव व पर्व मानले जातात. कोणत्याही धार्मिक उत्सवाला त्या धर्माच्या सामाजिक जीवनात महत्त्वाचे स्थान असते, त्याचप्रमाणे जैन धर्मातही या उत्सवांना वैशिष्ठ्यपूर्ण स्थान आहे. त्यातील काही उत्सवांचा परिचय पुढीलप्रमाणे–

## महावीर जयंती–

चैत्र शुद्ध त्रयोदशी ही भगवान् महावीरांची जयंती आहे. या दिवशी संपूर्ण भारतातील निरनिराळ्या ठिकाणचे जैन आपापले दैनिक व्यवहार बंद ठेवून अत्यंत प्रभावक पद्धतीने ही जयंती साजरी करतात. प्रातःकाळी प्रभातफेरी निघते, रात्री सार्वजनिक सभेचे आयोजन केले जाते. बहुतेक राज्यांनी आपल्या राज्यात महावीर जयंतीची सुट्टी जाहीर केलेली आहे.

## वीर-शासन जयंती–

जैनांचे अंतिम तीर्थंकर भगवान् महावीर यांना पूर्ण ज्ञान प्राप्त झाल्यानंतर त्यांचा पहिला धर्मोपदेश मगधातील राजगृह शहरात विपुलाचल पर्वतावर सकाळी झाला. त्याची स्मृति म्हणून दरवर्षी आषाढ वद्य प्रतिपदेला 'वीरशासन जयंती' मानली जाते. वि. सं. २००१ मध्ये प्रथमतः हा उत्सव राजगृहामध्ये व नंतर कलकत्त्यामध्ये अडीच हजारावा वीरशासन जयंती महोत्सव म्हणून अत्यंत मोठ्या प्रमाणात व उत्साहाने साजरा करण्यात आला.

## श्रुतपंचमी–

दिगंबर संप्रदायाच्या मान्यतेप्रमाणे जेव्हा अंग ज्ञानाचा लोप होऊ लागला तेव्हां अंग व पूर्वांचे एकदेश ज्ञाते आचार्य धरसेन झाले. ते सौराष्ट्र देशातील गिरनार पर्वताच्या चंद्रगुफेत ध्यान करीत होते. त्यावेळी आपल्यानंतर श्रुतज्ञानाचा लोप होणार या चिंतेने ते ग्रस्त होते. तेव्हा महिमा नगरीत होणाऱ्या मुनि सम्मेलनास पत्र लिहिल्यावर तेथून दोन मुनी त्यांच्याजवळ आले. आचार्यांनी त्यांच्या बुद्धीची परीक्षा घेऊन त्यांना सिद्धांत विषय शिकविला व निरोप घेतला. त्या दोन मुनींची नावे पुष्पदंत व भूतबली अशी होती. त्यांनी तेथून आल्यावर 'षट्खंडागम' नामक सिद्धांत ग्रंथाची रचना केली. ग्रंथरचना पूर्ण झाल्यावर भूतबली आचार्यांनी त्या ग्रंथाला शास्त्रनिबद्ध करून ज्येष्ठ शुद्ध पंचमीच्या दिवशी चतुर्विध संघासहित त्या शास्त्रांची पूजा केली. त्यामुळे श्रुतपंचमी ही दिगंबर जैनामध्ये महत्त्वाची मानलेली आहे. या दिवशी जैन लोक शास्त्राची पूजा प्रामुख्याने करतात.

श्वेतांबरामध्ये कार्तिक शुद्ध पंचमीला ज्ञानपंचमी मानतात व त्या दिवशी धर्मग्रंथाची वगैरे पूजा करतात.

## दशलक्षण किंवा पर्युषण पर्व–

जैन धर्मियांचे सर्वात पवित्र पर्व म्हणजे दशलक्षण पर्व होय. दिगंबर संप्रदायात हा पर्व दरवर्षी भाद्रपद शुद्ध पंचमीपासून चतुर्दशीपर्यंत तर, श्वेतांबर संप्रदायात श्रावण वद्य द्वादशीपासून भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यंत मानतात. या दिवसात जैनमंदिरात सर्वत्र आल्हादपूर्ण, मंगलमय वातावरण असते. दररोज सकाळपासूनच सर्व स्त्री-पुरुष स्नान करून मंदिरात जातात व आनंदाने भगवंताचे पूजन करतात. पूजन संपल्यानंतर दररोज श्री तत्त्वार्थसूत्राच्या दहा अध्यायापैकी एका एका अध्यायावर प्रवचन केले जाते व क्षमा, मार्दव, आर्जव, शौच, सत्य, संयम, तप, त्याग, आकिंचन्य व ब्रह्मचर्य या दहा धर्माच्या अपेक्षेने या पर्वाला 'दशलक्षण पर्व' असे म्हणतात. वरील दहा धर्मांची या पर्वकाळात मुख्यतः आराधना केली जाते. प्रवचन, व्याख्यान इत्यादीसाठी






विविध ठिकाणाहून विद्वान पंडिताना बोलाविले जाते व त्यांच्या ज्ञानाचा व उपदेशाचा बहुतांशी स्त्री-पुरुष फायदा घेतात. त्याग धर्माच्या तत्त्वावर कार्य करणाऱ्या परोपकारी संस्थांना यावेळी दान देण्यात येते. भाद्रपद वद्य प्रतिपदेच्या दिवशी पर्वाची समाप्ति झाल्यानंतर सर्व लोक एकत्र जमून एकमेकांना परस्पर आलिंगन देतात व गतवर्षातील आपल्या हातून झालेल्या अपराधाबद्दल क्षमा मागतात. जे लोक दुसऱ्या गावी असतात त्यांना क्षमापत्रे पाठवून क्षमा याचना केली जाते. या दिवसात बहुधा सर्व स्त्री-पुरुष आपल्या शक्तीनुसार व्रत-उपवास वगैरे ग्रहण करतात. या पर्वाच्या वेळी कोणी दहाही दिवस उपवास करतात. बहुतेक जण दहाही दिवस फक्त एकवेळच जेवण करतात. त्याच दिवसात भाद्रपद शुद्ध दशमीला सुगंध दशमी पर्व असतो. या दिवशी सर्व जण मंदिरात दशांग धूप वगैरे टाकून, मंदिरात सुगंध दरवळत ठेवण्यात येतो. भाद्रपद शुद्ध चतुर्दशीला अनंतचतुर्दशी म्हणतात. जैन समाजात या दिवसांना अतिशय महत्त्वाचे स्थान आहे. जैनशास्त्राप्रमाणे या दिवसात व्रत केल्यामुळे बराच लाभ होतो असे मानतात. अनंतचतुर्दशी हा दशलाक्षणिक पर्वाचा शेवटचा दिवस असतो. त्यामुळे त्या दिवशी साधारणतः सर्व स्त्री-पुरुष व्रत करून सर्व दिवस मंदिरातच व्यतीत करतात. अनेक ठिकाणी या दिवशी रथ-यात्रा व त्या निमित्ताने मिरवणूक काढतात व मोठा उत्सव साजरा करतात. काही लोक इंद्ररूप धारण करून पाणी आणतात व त्या पाण्याने भगवंताचा अभिषेक करतात. नंतर पूजा होऊन अनंतचतुर्दशी व्रतकथा वाचली जाते. जे व्रती निर्जळ उपवास करतात ते कथाश्रवण करून नंतरच जलग्रहण करतात.

श्वेतांबर संप्रदायात या पर्वाला 'पर्युपण' म्हणतात. साधूकरिता दहा प्रकारचे कल्प म्हणजे आचार सांगितले आहेत. त्यामध्ये 'पर्युपण' हा एक आचार आहे. परि म्हणजे पूर्ण रूपाने, उपणा म्हणजे राहणे. सारांश एकाच गावी स्थिर रीतीने राहणे यास पर्युपण म्हणतात. त्याचे कालमान तीन प्रकारचे आहे. जघन्यकाळ ७० दिवस, उत्कृष्टकाळ ६ महिने, मध्यमकाळ ४ महिने, कमीत कमी ७० दिवसाच्या स्थिरवासाची सुरुवात भाद्रपद शुद्ध पंचमीला होते. प्रथम ही परंपरा रूढ होती. तथापि असे म्हणतात की, कालिकाचार्य यांनी चतुर्थीपासूनची परंपरा सुरू केली. या दिवसांना संवत्सरी किंवा 'सांवत्सरिक पर्व' म्हणतात. सांवत्सरिक पर्व म्हणजे त्यागी साधूंचा वर्षावास निश्चित करण्याचा दिवस. सांवत्सरिक पर्वास मध्य कल्पून त्यावरोबर त्या पर्वाचे सात दिवस धरून श्रावण वद्य द्वादशीपासून भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यंत आठ दिवसास श्वेतांबर संप्रदायात 'पर्युपण' पर्व मानतात. दिगंबर संप्रदायात आठ दिवसाऐवजी दहा दिवस मानले जातात. श्वेतांबरांचा पर्युपण पूर्ण झाल्यावर दुसऱ्या दिवसापासून दिगंबरांचा दशलाक्षणिक पर्व सुरू होतो. सांवत्सरिक पर्वात गत वर्षात जे काही आपापसात वैर-विरोध असतील त्याबद्दल 'मिच्छामे दुक्कडं', 'माझे दुष्कृत्य मिथ्या होवो' असे म्हणून क्षमायाचना केली जाते. या पर्वाचा सन्मान मोगल बादशहाही करीत असत. सम्राट अकबराने हरिविजयसूरीच्या उपदेशाने प्रभावित होऊन पर्युपण पर्वामध्ये हिंसा बंद करावी असे आपल्या राज्यात फर्मान काढले होते.

## अष्टाह्निक पर्व–

दिगंबर संप्रदायातील दुसरे महत्त्वपूर्ण पर्व म्हणजे 'अष्टाह्निक पर्व' होय. हे पर्व कार्तिक, फाल्गुन व आषाढ महिन्यातील शुक्ल अष्टमी ते पौर्णिमेपर्यंत मानला जातो. जैन मान्यतेप्रमाणे आठवे नंदीश्वर नावाचे द्वीप आहे. या द्वीपात अकृत्रिम बावन्न जिनमंदिरे आहेत. या काळात स्वर्गातील देवता स्वर्गातून येऊन मंदिरातील जिनबिंबाची पूजा करतात. मनुष्य तेथे जाऊ शकत नसल्यामुळे ते या दिवसात येथेच राहून मनोभावे त्यांची पूजा करून पर्व साजरा करतात. 'सिद्धचक्रपूजाविधान' नामक एक सांगोपांग पूजाविधान या दिवसात ठिकठिकाणी होत असते. त्याचे दृश्य मोठे मनोहारी असते. श्वेतांबर संप्रदायातही पर्युपण पर्वाशिवाय या पूजाविधानासही महत्त्वाचे स्थान आहे. तथापि त्यांच्यात ही पूजा वर्षातून दोन वेळा म्हणजे चैत्र व आश्विन महिन्यात करण्याचा परिपाठ आहे आणि ही पूजा सप्तमीपासून पौर्णिमेपर्यंत नऊ दिवस चालू असते.






**दीपावली–**

उपर्युक्त उत्सव व पर्वाशिवाय असेही काही सण आहेत की जे जैनधर्मीयांशिवाय इतर धर्मीयही मोठ्या उत्साहाने साजरे करतात. अशा पर्वांपैकी सर्वात उल्लेखनीय म्हणजे दीपावलीचा सण किंवा उत्सव होय. हा सण आश्विन वद्य ३० (अमावास्या) या दिवशी केला जातो. साफसूफ केलेली व शृंगारलेली घरे सायंकाळी दिव्यांच्या लखलखाटांनी व दीपमाळांनी विशेषच आकर्षक दिसतात. त्यादिवशी घरोघर लक्ष्मीपूजन होते. कित्येक शतकांपासून हा सण साजरा केला जातो. वि. सं. ८४० मध्ये लिहिलेले जैनधर्मविषयक 'हरिवंश पुराण' नावाचा ग्रंथ आहे. त्यात भगवान महावीरांच्या निर्वाणाचे वर्णन करताना लिहिले आहे की, भगवान महावीर भव्यजीवांना उपदेश देत देत पवापुरीला आले. तेथील एका सुंदर बागेत चतुर्थ काळ संपण्यास ३ वर्षे साडेआठ महिने बाकी राहिले असता आश्विन अमावास्येला प्रभाती योगांचा निरोध करून व कर्मांचा नाश करून त्यांनी मुक्ति प्राप्त केली. निरनिराळ्या देवतांनी त्यांची पूजा केली. अमावास्या असल्यामुळे भरपूर दीपक लावले. त्यावेळी त्या दिव्यांच्या प्रकाशाने पावापुरीचे सगळे नभोमंडळ प्रकाशमय झालेले होते. त्यावेळेपासूनच भक्त लोक जिनेश्वरांची पूजा करण्यासाठी सर्व भारतवर्षात दरवर्षी त्यांच्या निर्वाण महोत्सवाच्या निमित्ताने दीपावलीचा सण साजरा करतात. दीपावलीच्या पूजनाची जी पद्धत रूढ आहे, त्यावरूनही या प्रश्नावर चांगला प्रकाश टाकता येतो. ज्यावेळी भगवान महावीरांचा निर्वाण झाला, त्याचवेळी त्यांचे मुख्य शिष्य गौतम गणधर यांनाही पूर्ण ज्ञानाची (केवलज्ञानाची) प्राप्ति झाली. हे गौतम पूर्वाश्रमीचे ब्राह्मण होते. मुक्ती व ज्ञान यांना जैनधर्मात श्रेष्ठ लक्ष्मी मानले आहे व मुक्तिलक्ष्मी किंवा ज्ञानलक्ष्मी अशा वेचक शब्दाद्वारे शास्त्रात याचा उल्लेख आढळतो. म्हणून आध्यात्मिक लक्ष्मीच्या पूजनाची प्रथा हळूहळू सर्व लोकात बाह्य लक्ष्मीच्या पूजनाचे स्वरूप धारण करू लागली असे दिसते. सामान्यतः या प्रकारे लक्ष्मी पूजनाची पद्धत सुरू झाली असलेली दिसते. लक्ष्मीपूजनाच्या वेळी मातीच्या पणत्या व अनेक प्रकारची खेळणीही ठेवण्यात येतात. ह्या पणत्या भ. महावीर व त्यांचे शिष्य गौतम गणधर यांच्या उपदेश सभेच्या (समवशरण) स्मृतिप्रीत्यर्थ ठेवण्यात येतात. हा उपदेश ऐकण्यासाठी मनुष्य, पशु, पक्षी सर्व जमत असत. त्यांच्या आठवणीसाठी चित्रे किंवा खेळणी ठेवण्याची पद्धत आहे. सर्व जैनधर्मीय दीपावलीच्या प्रकाशात दरवर्षी भगवंताच्या निर्वाणलक्ष्मीचे पूजन करतात व त्यांच्या समवसरणाचा थाट उभा करतात.

दीपावलीच्या दिवशी प्रातःकाळी सर्व जैन मंदिरात महावीर निर्वाणाच्या स्मृतिप्रीत्यर्थ मोठा उत्सव करून त्यांना नैवेद्य (लाडू) चढवून त्यांची पूजा केली जाते. या प्रकाराचा पूजेचा विधी फक्त या दिवशीच करण्यात येतो. घरोघर या दिवशी जे पक्वान्न तयार होते त्यावरूनही हा उद्देश स्पष्ट होतो. हिंदूधर्मीयांच्या मते या दिवशीचा संबंध श्री रामचंद्राच्या अयोध्येमधील पुनरागमनाशी लावण्यात येतो. तर काहीजण त्याला सम्राट अशोकाच्या दिग्विजयाचे सूचक मानतात.

**रक्षाबंधन–**

जैन लोक साजरा करीत असलेले दुसरा सार्वजनिक उत्सव म्हणजे रक्षाबंधन पर्व किंवा सलूनो पर्व होय. कोण्या एकेवेळी उज्जयिनी नगरात श्रीधर्म नावाचा राजा राज्य करीत होता. त्यांचे बळी, बृहस्पती, नमुची व प्रल्हाद हे चार मंत्री होते. एकेवेळी जैन मुनि अकंपनाचार्य सातशे मुनींच्या संघाबरोबर उज्जयिनीस आले. मंत्री नकार देत असतानाही राजा मुनींच्या दर्शनाला गेला. त्यावेळी सर्व मुनी ध्यानस्थ बसलेले होते. परत येत असताना मार्गात एका मुनीबरोबर मंत्र्यांचा शास्त्रार्थ झाला. मंत्री त्यात हरले व रागाने तलवार घेऊन मुनींना मारण्यास ते निघाले. त्याच्यावर वार करण्यासाठी मंत्र्यांनी तलवार उपसताच त्यांचे हात वरच्यावर राहिले. सकाळी राजाला जेव्हा ही गोष्ट समजली तेव्हा त्याने मंत्र्यांना आपल्या राज्यातून




हाकलून लावले. ते चारही मंत्री तेथून पुढे हस्तिनापूरचा राजा पद्म याकडे गेले. तेथे बलीने मोठ्या कौशल्याने पद्म राजाच्या शत्रूला पकडून त्यांच्या स्वाधीन केले. तेव्हा पद्म राजाने प्रसन्न होऊन तो मागेल ते वरदान देण्याचे कबूल केले, तेव्हा योग्यवेळी हे वरदान मागू असे बलीने सांगितले.

कालांतराने अकंपनाचार्यांचा संघ विहार करीत करीत हस्तिनापूर येथे आला. तेथेच त्यांनी चातुर्मास करण्याचा निर्णय घेतला. जेव्हा बली आदी मंत्र्यांना ही गोष्ट समजली तेव्हा ते प्रथम फारच घाबरले. परंतु नंतर त्यांना आपल्या अपमानाचा बदला घेण्याची युक्ती सुचली. राजा पद्माला पूर्वीच्या वरदानाचे स्मरण देऊन त्यांच्याकडून सात दिवसासाठी राज्य मागून घेतले. ते मिळाल्यावर बलीने मुनिसंघाच्या चारही बाजूला मोठ्या भिंती उभारून त्यात पुरुषमेध यज्ञ करण्याची सर्व पूर्वयोजना केली.

इकडे मुनीवर हा उपसर्ग सुरू झाला. हे मिथिला नगरीतील एका निमित्तज्ञानी मुनीला समजून आले. त्यावेळी त्यांच्या मुखातून 'अरेरे अरेरे' असे खेदप्रदर्शक उद्गार निघाले. तेव्हा जवळच असलेल्या क्षुल्लकानी त्याचे कारण विचारले, तेव्हा त्यांनी सर्व हकीकत सांगून विष्णुकुमार मुनींना विक्रिया ऋद्धि प्राप्त झाली आहे व मुनीवरील संकट ते दूर करू शकतात असे त्यांनी क्षुल्लकांना सांगितले. क्षुल्लक तावडतोब विष्णुकुमार मुनीजवळ गेले व त्यांना सर्व हकीकत सांगितली. विष्णुकुमार मुनी हस्तिनापूरच्या पद्मराजाचे बंधुच होते. त्यांनी पद्म राजाला जाऊन विचारले. पद्मराज तू हे काय आरंभिले आहेस. कुरुवंशात असा अनर्थ कधीही झालेला नाही. जर तू राजाच तपस्वी लोकावर असा अनर्थ करू लागलास तर तो दूर कोण करणार ? पाणीच जर आग वाढवू लागले तर आग विझवणार कोण ? जेव्हा पद्म राजाने बलीला राज्यदान केल्याचा सर्व प्रकार निवेदन केला व त्याबाबतीत काहीही करण्यास आपण असमर्थ असल्याचेही सांगितले, तेव्हा विष्णुकुमार मुनीने वामनरूप धारण करून बलीच्या यज्ञात प्रवेश केला व त्याला तीन पावले जमीन मागितली. बलीने जेव्हा दानाचा संकल्प केला तेव्हा विष्णुकुमार मुनींनी विक्रिया ऋद्धीच्या प्रभावाने आपले शरीर मोठे केले. त्यांनी आपला एक पाय मेरु पर्वतावर दुसरा मानुषोत्तर पर्वतावर व तिसरा पाय ठेवण्यासच जागा नसल्याने तो आकाशातच लोंबकळू लागला. तेव्हा जिकडे तिकडे हाहाःकार माजला. देव-देवता धावू लागल्या व ते मुनीजवळ प्रार्थना करू लागले की, महाराज आपण विक्रिया कमी करा. आपल्या तपाच्या प्रभावाने तीनही लोक डगमगू लागले आहेत. तेव्हा बळी राजाला हाकलून देऊन त्यांनी आपल्या विक्रिया ऋद्धीचा संकोच केला व मुनींवरचा उपसर्ग दूर केला.

बलीच्या अत्याचाराने सर्वत्र हाहाःकार माजला होता व लोकांनी अशी प्रतिज्ञा केली होती की, जेव्हा मुनीवरील संकट दूर होईल तेव्हा त्यांना आहार देऊनच भोजन करू. संकट दूर झाल्यावर सर्व लोकांनी दूध सेवयाचे हलके भोजन तयार केले, कारण मुनीना कित्येक दिवसाचा उपवास होता. मुनी केवळ ७०० च होते व तेवढ्याच घरी त्यानी आहार घेतला. तेव्हा बाकीच्यांनी घरात त्यांची प्रतिकृती बनवून त्याना आहार देऊन आपली प्रतिज्ञा पुरी केली व सर्वांनी परस्पर एकमेकांचे रक्षण करण्याचे बंधन बांधले. त्यांची स्मृति म्हणूनच रक्षाबंधनाचा हा सण आजपर्यंत चालत आलेला आहे. भिंतीवर जी चित्रांची रचना करण्यात येते त्यास 'सौन' म्हणतात. हा सौन शब्द श्रमण शब्दाचा अपभ्रंश आहे. प्राचीन काळी जैन साधूना श्रमण म्हणत असत. याप्रमाणे सलूना किंवा रक्षा बंधनाचा सण जैन सणाच्यारूपाने जैन समाजात अजूनही उत्साहाने साजरा केला जातो. या दिवशी विष्णुकुमार व सातशे मुनींची पूजा केली जाते. त्यानंतर आपापसात राखी बांधून व भिंतीवर श्रमणांची चित्रे काढून आहारदान दिले जाते व नंतर सर्वजण भोजन करतात. तसेच यावेळी गरिबांना दानही दिले जाते.

साधारणतः ब्राह्मण लोक इतरांच्या हातात यावेळी राखी बांधतात व राखी बांधताना ज्या राखीने दानवाचा इंद्र राजा महाबली, बली राजा बांधला गेला त्या राखीनेच मी तुम्हाला बांधतो, तुम्ही माझे रक्षण करावे, कसल्याही संकटाला भिऊन परावृत्त होऊ नये असा श्लोकही यावेळी म्हणतात येतो. उत्तर भारतात

# तीर्थवंदना

जैन मतानुसार संसारसमुद्र पार करण्यासाठी मार्गदर्शन करणाऱ्या महापुरुषांची जन्मापासून निर्वाणापर्यंतची स्थाने, यांनाच 'तीर्थ' म्हणतात. यादृष्टीने ज्या ठिकाणी तीर्थंकरांची जन्मादिक पाच कल्याणके झाली असतील किंवा पूज्य व्यक्ती मुनी आदींनी ज्या ठिकाणी निर्वाणप्राप्ति करून घेतलेली असेल त्या ठिकाणांना तीर्थक्षेत्र मानण्यात येते. 'तीर्थ' शब्दाचा अर्थ घाट. म्हणजे स्नान करण्याची जागा. तथापि अशाप्रकारचे तीर्थस्थान किंवा तीर्थस्नान जैनमतानुसार अमान्य आहे. जैन धर्माचे दिगंबर व श्वेतांबर या दोन्ही संप्रदायात तीर्थस्थाने आहेत. पुष्कळशी तीर्थस्थाने दोन्हीही संप्रदायांना मान्य असलेली, तर काही केवळ दिगंबरांना मान्य, काही श्वेतांबरमान्य आहेत. त्यापैकी काही तीर्थस्थानांचा परिचय पुढीलप्रमाणे–

**सम्मेद शिखर–** हजारी बाग जिल्ह्यात जैनांचे हे एक अतिप्रसिद्ध अत्यंत पूज्य असे क्षेत्र आहे. या क्षेत्रास दिगंबर-श्वेतांबर सारखाच मान देतात व पूजतात. श्री वृषभदेव, वासुपुज्य, नेमिनाथ व महावीर यांच्याशिवाय बाकीच्या २० तीर्थंकरांनी या पर्वतावरूनच निर्वाणप्राप्ति करून घेतली. २३ वे तीर्थंकर श्रीपार्श्वनाथ यांच्या नावावरून हा पर्वत 'पार्श्वनाथ हिल' या नावाने प्रसिद्ध आहे. पर्वतावर अनेक मंदिरे असून, हजारो दिगंबर-श्वेतांबर स्त्री-पुरुष दर्शनास येतात.

**पुलुआ पहाड–** या पहाडाला गयेवरून जाता येते. येथे जैन मंदिरांचे भग्नावशेष, जिनमंदिरे व प्रतिमा अखंडितही आढळतात. या पहाडावर १० वे तीर्थंकर शांतिशीतलनाथ यांनी तप करून केवलज्ञानाची प्राप्ति करून घेतली.

**गुणावा–** भ. महावीरांचे प्रथम गणधर गौतमस्वामी यांचे हे निर्वाण-क्षेत्र आहे. गया-पाटणा लाईनवर नवादा स्टेशनवरून हे १॥ मैलावर आहे.

**पावापुर–** गुणावावरून १३ मैलावर अंतिम तीर्थंकर भ. महावीरांचे हे निर्वाण-क्षेत्र आहे. त्याचे स्मारक म्हणून तलावाच्या मध्यभागी एक विशाल मंदिर आहे. त्याला जलमंदिर म्हणतात. या जलमंदिरात महावीर स्वामी, गौतमस्वामी व सुधर्मास्वामींच्या पादुका आहेत. आश्विन वद्य अमावास्येस भ. महावीरांच्या निर्वाण दिवशी या ठिकाणी फार मोठी यात्रा भरते.

**राजगृही–** या तीर्थक्षेत्राचे दुसरे नाव पंचपहाडी असेही आहे. पावापुरीपासून ११ मैलाच्या अंतरावर राजगृही आहे. एकेवेळी ही मगध देशाची राजधानी होती. येथे २० वे तीर्थंकर श्री मुनिसुव्रतनाथ यांचा जन्म झाला. या तीर्थाच्या चारही बाजूला पाच पर्वत आहेत. पाच पहाडांनी युक्त म्हणून या ठिकाणाला पंचपहाडी असेही म्हटले आहे. येथील विपुलाचल पर्वतावर भ. महावीरांनी प्रथम उपदेश दिला.

**कुंडलपूर–** राजगृहीपासून हे तीर्थक्षेत्र १० मैलावर आहे. भ. महावीरांचा येथे जन्म झाला. त्यांच्या जन्मस्थानामुळेच हे ठिकाण एक पूजनीय क्षेत्र समजले जाते.

**मंदारगिरी क्षेत्र–** हे क्षेत्र भागलपूराहून ३० मैलावर आहे. मंदारगिरी हा पहाड आहे. १२ वे तीर्थंकर वासुपूज्यस्वामी यांचे हेच मोक्षस्थान मानले जाते. परतु अलिकडे चंपापुरी हे पाचही कल्याणिकाचे स्थान मानले जाते.

**पाटणा–** ही बिहारची राजधानी असून या शहरातील गुलजार बाग स्टेशनजवळ एका लहानशा टेकडीवर चरणपादुका आहेत. तेथून श्री सुदर्शन श्रेष्ठीने मुक्तिलाभ करून घेतला. त्याची जीवनकथा सुंदर व बोधप्रद आहे.



**बनारस**– हे उत्तर प्रदेशातील एक प्रमुख तीर्थक्षेत्र असून मैदानीघाट मोहल्ल्यात गंगेच्या किनाऱ्यावर दोन विशाल जैनमंदिरे व एक श्वेतांबर मंदिर आहे. तेवीसावे तीर्थंकर पार्श्वनाथ यांचे हे जन्मस्थान आहे. तेथे जैन स्याद्वाद महाविद्यालय आहे. संस्कृतचेही तेथे उत्तम शिक्षण दिले जाते. भेलुपूर मोहल्ल्यात ही दोन्ही संप्रदायांची मंदिरे असून ती तीर्थंकर पार्श्वनाथस्वामी यांची जन्मभूमि मानली जाते. शिवाय या शहराच्या विविध ठिकाणी जैनांची लहान-मोठी अनेक मंदिरे आहेत.

**सिंहपुरी**– बनारसपासून ६ मैलावर ही सिंहपुरी नगरी आहे. ११ वे तीर्थंकर श्रेयांसनाथ यांची ही जन्मभूमि आहे. दिगंबर-श्वेतांबर दोघांचीही मंदिरे तेथे आहेत.

**चंद्रपुरी**– सारनाथपासून ९ मैल अंतरावर चंद्रपुरी नगर आहे. ती भग्नावशेष आहे. या ठिकाणी ८ वे तीर्थंकर चंद्रप्रभ यांचा जन्म झाला. गंगाकाठी श्वेतांबर-दिगंबर संप्रदायांची मंदिरे आहेत.

**प्रयाग**– त्रिवेणी संगमाच्या जवळ एक किल्ला आहे. येथे जमिनीत एक वडाचे झाड असून, तेथे तीर्थंकर वृषभदेवांनी तप केले होते. या किल्ल्याच्या आत अनेक प्राचीन जैनमूर्ती आहेत.

**कौशांबी**– फफोसा या जैन तीर्थक्षेत्रापासून चार मैलावर गढवाल नावाचे एक गाव आहे. त्याच्याचजवळ कुशंबा गाव असून त्यास प्राचीनकाळी कौशांबी म्हणत. या ठिकाणी भ. पद्मप्रभूंचा जन्म झाला होता.

**अयोध्या**– जैनांचे हे एक अतिप्राचीन असे तीर्थक्षेत्र असून मुख्य ठिकाण आहे. जैनांच्या पाच तीर्थंकरांचा जन्म याच शहरीच झाल्याचे मानले जाते. येथे जैनांची अनेक मंदिरे व धर्मशाळा आहेत.

**रत्नपुरी**– हे ठिकाण फैजाबाद जिल्ह्यातील सोहावाल स्टेशनवरून १॥ मैल आहे. धर्मनाथ स्वामींची ही जन्मभूमि आहे. येथे श्वेतांबर व दिगंबर या दोन्ही संप्रदायांची मंदिरे आहेत.

**कंपिला**– हे तीर्थक्षेत्र फरूकाबाद जिल्ह्यात नॉर्थ ईस्टर्न रेल्वेवर कायमगंज स्टेशनहून ८ मैल आहे. येथे १३ वे तीर्थंकर श्री विमलनाथ यांची चार कल्याणिके झाली. दरवर्षी चैत्र महिन्यात येथे यात्रा भरून रथोत्सवही होतो.

**हस्तिनापुर**– मेरठहून २२ मैलावर हे तीर्थक्षेत्र आहे. येथे शांतिनाथ, कुंथुनाथ व अरहनाथ तीर्थंकरांचे गर्भ, जन्म, तप, ज्ञान अशी चारही कल्याणिके झाली. तसेच १९ वे तीर्थंकर श्री मल्लिनाथ यांचेही समवशरण येथे आले होते. लाला हरसुखदासजी, दिल्ली यांनी बांधलेले एक जैनमंदिर व धर्मशाळा आहे. जवळच तीर्थंकरांच्या अतिप्राचीन धर्मशाळा आहेत. दरवर्षी शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत येथे दिगंबर जैनांची मोठी यात्रा भरते.

**चौरासी**– हे दिगंबरांचे मथुरेपासून १॥ मैलावर असलेले एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. अंतिम केवली जम्बूस्वामी यांची ही निर्वाणभूमि मानली जाते. तेथील विशाल मंदिरात त्यांच्या चरणपादुकांची स्थापना केली आहे. तेथे आश्विन वद्यपासून अष्टमीपर्यंत रथोत्सव होतो. जवळच कंकाली टीला (गढी) असून, तेथे प्राचीन ऐतिहासिक सामुग्री मिळते. तेथे दिगंबरांचे संघभवन आहे.

**ग्वाल्हेर**– हे जैनांचे तीर्थक्षेत्र नसले तरी येथे अनेक जैनमूर्ती आहेत. श्री नेमिनाथ तीर्थंकरांची ३० फूट उंचीची मूर्ति असून, त्यापेक्षाही भ. आदिनाथांची मूर्ति मोठी आहे. लष्कर विभाग व ग्वाल्हेरजवळ २५ दिगंबर जैन मंदिरे आहेत.

**सोनगिरी**– ग्वाल्हेर ते झाशी रेल्वे लाईनवरील हे एक स्टेशन आहे. त्याच्याजवळच दोन मैलावर तीर्थक्षेत्र आहे. जवळील एका टेकडीवर ७७ दिगंबर जैन मंदिरे आहेत. येथून पुष्कळ मुनी मोक्षास गेले आहेत. त्याच्या पायथ्याशी चार धर्मशाळा व १७ मंदिरे आहेत

**अजयगड**– अजयगढ संस्थानची ही राजधानी होती. याच्याजवळच एक टेकडी असून त्यावर एक किल्ला आहे. त्याच्या भिंतीच्या दोन शिलाखंडामध्ये जवळ जवळ २० दिगंबर जैन मूर्ती कोरल्या आहेत. त्याच्याजवळच एक तलाव आहे. काठावर पुष्कळशा जैन प्रतिमा आहेत. तेथे एका मानस्तंभावर अनेक जैन मूर्ती कोरल्या आहेत.








०१ खजुराहो– पन्नापासून छतरपूरला जाताना २१ व्या मैलावर तीन वाटा एकत्र येतात. तेथून ७ मैलावर खजुराहो हे तीर्थक्षेत्र आहे. येथे दोन धर्मशाळा असून ३१ दिगंबर जैन मंदिरे आहेत. या मंदिराची स्थापत्यकला प्रेक्षणीय आहे.

कुंडलपूर– सेंट्रल रेल्वेच्या कटनी, बीना लाईनवर दमोह स्टेशन आहे. तेथून २५ मैलावर हे क्षेत्र आहे. येथील कुंडलाकार पर्वतावरूनच या ठिकाणाला कुंडलपूर हे नाव पडले आहे. याच्या पायथ्याशी ५९ मंदिरे आहेत. पर्वताच्या मध्यभागी एक मोठे मंदिर असून, तेथे पद्मासनावर बसवलेली एक मूर्ति आहे. तिची उंची ९–१० फूट आहे. भ. महावीरांचीही तेथे मूर्ति आहे. येथे दूरदूरचे लोक येतात. तेथे महाराज छत्रसालांच्या काळातील मंदिर जीर्णोद्धाराविषयीचा एक शिलालेखही आहे.

देवगड– मध्य रेल्वेच्या ललितपूर स्टेशनाहून १९ मैलावर एका डोंगरावर हे क्षेत्र आहे. हे नावाप्रमाणेच देवगड असून तेथे अनेक जिनमूर्ती आहेत. विविध जिनालये असून काही मूर्ती खंडित आहेत. मूर्ती कौशल्याच्या दृष्टीने अप्रतिम आहेत. येथे अनेक शिलालेख असून सुंदर मानस्तंभही आहे. येथील नैसर्गिक सौंदर्य अनुपमेय आहे.

चंदेरी– ललितपूरहून हे ठिकाण २० मैलावर आहे. येथील एका जैन मंदिरात २४ वेदी बसविलेल्या आहेत. तीर्थंकरांच्या रंगाप्रमाणेच २४ मूर्ती आहेत. येथून ९ मैलावर बूढी चंदेरी आहे. येथे अनेक जीर्ण शीर्ण जैन मंदिरे आहेत. तेथील प्रतिमा सुंदर व आकर्षक आहेत.

अन्तरिक्ष पार्श्वनाथ– मध्य रेल्वेच्या अकोला (विदर्भ) स्टेशनापासून सुमारे ४० मैलावर शिरपूर नावाचे गाव आहे. गावाच्या मध्यभागी एक मोठे अत्यंत प्राचीन दुमजली दिगंबर जैन मंदिर आहे. त्याच्या आजूबाजूस दोन्ही संप्रदायांच्या धर्मशाळा आहेत. तळमजल्यावर २॥ फूट उंचीची पार्श्वनाथ स्वामीची प्राचीन प्रतिमा आहे. ही मूर्ति अधर असून हे अतिशयक्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे.

कारंजा– आकोला जिल्ह्यात मूर्तिजापूर स्टेशनापासून यवतमाळला जाणाऱ्या रेल्वे लाईनवर हे एक शहर आहे. येथे तीन प्राचीन विशाल जैन मंदिरे आहेत. एका मंदिरात चांदी, सोने, हिरा, पोवळे, पन्ना वगैरे रत्नांच्या मूल्यवान मूर्ती आहेत. येथे बालात्कार गण, सेनगण, काष्ठासंघ अशा भट्टारकांच्या गाद्या आहेत. बलात्कार गण व सेनगण मंदिरात संस्कृत, प्राकृत जैन ग्रंथांचे मोठे भांडार आहे. मराठी जैन साहित्य निर्मितीच्या दृष्टीनेही त्याचे महत्त्व अधिक आहे. तेथे श्री महावीर ब्रह्मचर्याश्रम नावाची एक आदर्श शिक्षण संस्था आहे.

मुक्तागिरी– वऱ्हाडात एलिचपूरपासून १२ मैलावर एका निर्जन अरण्यात हे तीर्थक्षेत्र आहे. याच्या पायथ्याशी एक धर्मशाळा असून जवळच एक टेकडी आहे. डोंगरावर अनेक गुंफा असून त्यात पुष्कळशा जैनप्रतिमा आहेत. आसपास ५२ मंदिरे आहेत. येथून अनेक मुनींनी मोक्षप्राप्ति करून घेतली आहे

रामटेक– हे तीर्थक्षेत्र नागपूरपासून २४ मैलावर आहे. येथे दिगंबर जैनांची आठ मंदिरे आहेत. त्यापैकी एका प्राचीन मंदिरात १६ वे तीर्थंकर श्री शांतिनाथ स्वामी यांची १५ फूट उंचीची मनोज्ञ अशी प्रतिमा आहे.

श्री महावीरजी– पश्चिम रेल्वेच्या नागदा-मथुरा लाईनवर 'श्री महावीरजी' नावाचे स्टेशन आहे. येथून ४ मैलावर हे क्षेत्र आहे. येथे दिगंबर जैनमंदिर असून त्यात महावीराची मूर्ति आहे. येथे यात्रेकरूंची सतत वाहतूक चालू असते.

चंदखेडी– कोटा जिल्ह्यातील खानापूर या प्राचीन शहरापासून दोन फर्लांगावर चंदखेडी नावाचे एक जुने खेडे आहे. तेथील भूगर्भात अत्यंत मोठे जैनमंदिर असून त्यात सर्व ५७७ मूर्ती आहेत बाजूलाच १० फूट उंचीचा एक कीर्तिस्तंभ आहे.

श्री ऋषभदेवः (केशरियाजी)– उदयपूरहून ४० मैलावर हे गाव–क्षेत्र आहे. तेथे ऋषभदेवांचे एक विशाल मंदिर आहे. त्याच्या चारही बाजूनी कोट आहे. मध्यभागी एक मोठे संगमरवरी मंदिर असून त्यास

उंच उंच ४८ शिखरे आहेत. ऋषभदेव मंदिरात ६-७ फूट उंचीची एक पद्मासनस्थ श्यामवर्णी दिगंबर जैन मूर्ति आहे. ही मूर्ति केशराने झाकली जाते म्हणूनच या मूर्तीस केशरियाजी म्हटले आहे. श्वेतांबरी लोक या मूर्तीवर शेंदूरादि चढवितात. दोन्ही संप्रदायाचे लोक तेथील मूर्तीची भक्तिभावाने पूजा करतात.

**अबू पर्वत**— पश्चिम रेल्वेवरील अबू रोड स्टेशनपासून अबू पहाडाकडे मोटारी जातात. पहाडावर सडकेच्या उजव्या बाजूस एक दिगंबर जैनमंदिर आहे. जवळपास काही प्रसिद्ध अशी श्वेतांबर मंदिरे देखील आहेत. यातील दोन मंदिरे अनुक्रमे विमल शहा (वि. सं. १०८८) व वस्तुपाल-तेजपाल यांनी बांधली आहेत. संगमरवरी दगडावरील नक्षीकाम प्रेक्षणीय आहे.

**अचलगड**— दिलवाडापासून ५ मैलावर अचलगड आहे. येथे तीन श्वेतांबर मंदिरे आहेत. त्यापैकी एका मंदिरात सप्त धातूंच्या १४ प्रतिमा आहेत.

**सिद्धवरकूट**— इंदौरहून खंडवा लाईनवर मोरटक्का नावाचे एक स्टेशन आहे. जवळच नर्मदेच्या काठी ओंकारेश्वर आहे. तेथून नावेत बसून सिद्धवरकूट येथे जाता येते. हे क्षेत्र रेवा नदीकाठी असून तेथून दोन चक्रवर्ती, दहा कामदेव व ३॥ कोटी मुनींना मुक्तिलाभ झाल्याचे सांगितले जाते.

**बडवानी**— बडवानीपासून ५ मैल अंतर गेल्यावर तेथे पहाडावर बडवानी हे क्षेत्र आहे. बडवानी गावालगत असल्याने याचे नाव बडवानी हे पडले असून या क्षेत्राचे दुसरे नाव 'चूलगिरी' असे आहे. या क्षेत्रावरून इंद्रजित व कुंभकर्ण यांनी मुक्ति मिळविली आहे. तेथे खड्गासनस्थ वृषभदेवांची ८४ फूट उंचीची मूर्ति आहे. पहाडावर इतर अनेक मंदिरे असून दरवर्षी पौष शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत येथे वार्षिक यात्रा भरते.

**तारंगा**— गुजरायमधील हे एक प्राचीन जैन तीर्थक्षेत्र असून ते महिकाठा जिल्ह्यात आहे. येथून वरदत्त इत्यादि ३॥ कोटी मुनी मोक्षास गेले आहेत. येथे दोन्ही संप्रदायांची अनेक मंदिरे व छत्र्या आहेत.

**गिरनार**— सौराष्ट्र प्रांतातील हे जैनांचे एक अतिशय प्रसिद्ध असे तीर्थक्षेत्र आहे. जुनागड जवळील या तीर्थक्षेत्रापासून जवळच गिरनार पर्वत असून पायथ्याशी दिगंबर-श्वेतांबर संप्रदायाच्या धर्मशाळा आहेत. २२ वे तीर्थंकर श्री नेमिनाथ भगवंतांना याच पहाडावर केवलज्ञानाची प्राप्ति झाली. तेथून ते मोक्षास गेले. वाग्दत्त वधू राजीमती हिने देखील येथेच दीक्षा घेतली होती. दोन्ही संप्रदायांची येथे अनेक मंदिरे आहेत. येथूनच अनिरुद्ध कुमाराने मोक्षप्राप्ति करून घेतली. तसेच शंभुकुमार येथूनच मोक्षास गेले. याशिवाय प्रद्युम्नकुमार, देखील येथूनच निर्वाणास गेले. पहाडात अनेक जैन मूर्ती कोरल्या असून शिखरजीप्रमाणेच हे तीर्थक्षेत्र पवित्र आहे.

**शत्रुंजय**— श्वेतांबर संप्रदायानुसार या तीर्थक्षेत्राला अत्याधिक महत्त्व दिले जाते. हे पहाड पश्चिम रेल्वेच्या पालीताना स्टेशनहून १॥-२ मैल अंतरावर आहे. पहाडावर श्वेतांबराच्या ३॥ हजार वेदी असून त्यासाठी अनेक करोड रुपये खर्च केले आहेत दिगंबरांचे तेथे एकच मंदिर आहे. श्वेतांबरांच्या २०-२५ धर्मशाळा आहेत. काही पाषाणावर श्वेतांबर आगम कोरले आहेत. येथून पांडुपुत्र व अनेक मुनी मोक्षास गेलेले आहेत.

**पावागड**— बडोद्यापासून २८ मैलावर चंपानेरच्या जवळ पावागड हे सिद्धक्षेत्र आहे. पावागड हा एक विशाल किल्ला आहे. पहाडावर आठ-दहा मंदिराचे भंडावशेष आहेत. यांचा जीर्णोद्धार झाला असून येथूनच रामचंद्रपुत्र लव, कुश कुमार मोक्षास गेलेले आहेत.

**मांगीतुंगी**— महाराष्ट्र राज्यातील नाशिक जिल्ह्यात हे क्षेत्र असून गजपंथ क्षेत्रापासून ते ८० मैलावर आहे. येथे दोन्ही पर्वतांची टोके एकत्र आली आहेत एकाचे नाव मांगी व एकाचे नाव तुंगी असे आहे. मांगी शिखराच्या गुफेत ३५० प्रतिमा व चरणपादुका असून तुंगीवर ३० प्रतिमा आहेत. येथे सायूच्याही अनेक प्रतिमा आहेत. या ठिकाणी बलभद्राने श्रीकृष्णाचा अंत्यसंस्कार केला असी दंतकथा आहे. रामचंद्र, हनुमान, सुग्रीव वगैरे येथूनच निर्वाणास गेले आहेत.




**एलोरा ( वेरुळ )–** सर्व विश्वात या क्षेत्राची प्रसिद्धी असून, हे मनमाड जंक्शन स्टेशनपासून ६० मैलाच्या अंतरावर आहे. येथील पहाडात जैन अजैनांच्या अनेक मूर्ती कोरल्या असून त्या अप्रतिम आहेत. तेथील ३१, ३२, ३३, ३४ या जैन लेण्या दर्शनीय आहेत. जवळच श्री पार्श्वनाथाचे स्वतंत्र मंदिर असून त्यात १२॥ फूट उंचीची प्रतिमा आहे.

**कुंथलगिरी–** हे दिगंबरीय तीर्थक्षेत्र अत्यंत एकांत ठिकाणी असून ते बार्शी रेल्वेस्टेशनापासून २१ मैलावर आहे. येथून श्री देशभूषण व कुलभूषण मुनी मोक्षास गेले. पर्वतावर मुनींच्या चरण पादुकांचे मंदिर आहे. भ. पार्श्वनाथांची येथे नुकतीच एक विशालकाय प्रतिमा उभारली असून ती अखंड आहे. माघ पौर्णिमेस दरवर्षी येथे यात्रा भरते. तेथे एक जैन गुरुकुलही आहे. महाराष्ट्रातील हे एक महत्त्वाचे तीर्थक्षेत्र मानले जाते. आधुनिक आचार्य श्रीशांतिसागर यांनी याच ठिकाणी समाधिमरण साधले. तेथे त्यांच्या पादुकाही आहेत.

**धाराशिव लेणी ( करकंडू गुंफा )–** सोलापूरहून कुंथलगिरीला जात असताना मार्गात उस्मानाबाद शहर लागते. त्याचे पूर्वीचे नाव धाराशिव असून जवळच एक तेर नावाचे गाव आहे. तेथे प्राचीन जिनमंदिर असून जवळील एका टेकडीत गुंफा आहेत. या गुंफेत भ. पार्श्वनाथांची महान मूर्ति आहे. मुख्य गुंफेसहित एकूण चार गुंफा असून गुंफातील बहुतेक प्रतिमा पार्श्वनाथांच्याच आहेत. या गुंफा करकंडु राजाने बनविल्या आहेत.

**विजापूर–** विजापूर हे एक जुने शहर असून स्टेशनजवळील संग्रहालयात अनेक जैनमूर्ति आहेत. एक मूर्ति भ. पार्श्वनाथांची आहे. त्यावर संवत १२३२ इतके लिहिले आहे. येथून १७ मैलावर असणाऱ्या बाबानगर येथेही जैन प्रतिमा आहेत.

**बेळगाव–** सदर्न रेल्वेवरील हे एक प्रसिद्ध शहर असून शहराच्या पूर्वेस एक किल्ला आहे. येथे १०८ जैन मंदिरे असल्याचे सांगितले जाते. परंतु ही सर्व मंदिरे विजापूरच्या बादशहाने पाडून तेथे किल्ला बांधला होता. आता तेथे तीन जैन मंदिरे असून त्यावरील नक्षीकाम प्रेक्षणीय आहे. याच बेळगाव जिल्ह्यात स्तवनिधी नावाचे एक क्षेत्र असून तेथे ५–६ जैन मंदिरे आहेत.

**श्रीबाहुबली-कुंभोज–** महाराष्ट्रातील जैनांचे हे एक अतिशय क्षेत्र असून ते मिरज-कोल्हापूर रेल्वे लाईनवरील हातकणंगले स्टेशनपासून चार मैलावर आहे. हे क्षेत्र पहाडावर असून तेथे तीन जैन मंदिरे आहेत. श्रीबाहुबली भगवंताची २८ फूट उंचीची अतिसुंदर प्रतिमा आहे. येथेच श्री बाहुबली ब्रह्मचर्याश्रम ही विशाल संस्था आहे.

**हुम्मच पद्मावती–** हे कर्नाटक राज्यातील तीर्थक्षेत्र असून शिमोगा शहरापासून या तीर्थक्षेत्राला जाता येते. येथे अनेक मंदिरे असून त्यापैकी एक मंदिर अति विशाल आहे. येथे मोठ्या गुंफा व प्रतिमाही आहेत.

**कारकल–** दिगंबर जैनांचे हे प्रसिद्ध तीर्थक्षेत्र कर्नाटकात असून ते वरांगपासून १५ मैलावर आहे. येथे १८ जिनमंदिरे आहेत. या पर्वतावर श्रीबाहुबलीची ३२ फूट उंचीची एक प्रतिमा आहे. कारागिरीच्या दृष्टीने येथील मंदिर प्रेक्षणीय आहेत.

**मूडबिद्री–** कर्नाटक राज्यातील कारकलपासून १० मैलावर हे गाव असून तेथे १८ मंदिरे आहेत. त्यातील एक मंदिर विशाल असून त्याचे नाव 'त्रिभुवन-तिलक-चूडामणि' आहे. याच्याभोवती कोट आहे व अनेक वेदी आहेत. एक मंदिर 'सिद्धांत बस्ती' नावाने प्रसिद्ध असून ते दुमजली आहे. या मंदिरात दिगंबर जैनांचे प्रख्यात ग्रंथ श्री धवल, जयधवल व महाबंध कानडी लिपीत ताडपत्रावर लिहिले असून सुरक्षित आहेत. याच मंदिरात पन्ना, पुखराज, गोमेध, पोवळा, नीलम इत्यादि रत्नांच्या ३७ मूर्ति आहेत. भट्टारक श्री चारुकीर्ति पंडिताचार्यांची येथे गादी असून अनेक प्राचीन जैनग्रंथांचा संग्रह आहे.





बेलूर-हलेबीड– कर्नाटक राज्यातील ही दोन प्रसिद्ध तीर्थक्षेत्रे असून ती हासन शहराच्या उत्तरेस एकमेकापासून १२ मैलाच्या अंतरावर आहेत. येथील मूर्तिकला सर्वोत्कृष्ट मानली जाते. एकेकाळी ही राजधानीची शहरे असून आज ती कलेची माहेरघरे म्हणून ओळखली जातात. जवळ अनेक दिगंबर जैन संप्रदायाची मंदिरे असून ती कलाकृतीच्या दृष्टीने उत्तम आहेत.

श्रवणबेळगोळ– हासन शहराच्या पश्चिमेस हे तीर्थक्षेत्र असून साहित्यिक, धार्मिक, ऐतिहासिकदृष्ट्या ते अत्यंत महत्त्वाचे आहे. श्रवणबेळगोळ येथे चंद्रगिरी व विंध्यगिरी हे दोन पर्वत जवळ जवळ येतात. त्यांच्या मध्यभागी चौकोनी पांढऱ्या शुभ्र पाण्याचा एक तलाव आहे. दिगंबर जैनांचे हे अति प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. भद्रबाहूंच्याबरोबर मौर्य सम्राट चंद्रगुप्त आपला अंतिम काळ व्यतीत करण्यासाठी येथे आले होते. त्यांच्या गुरूंनी सल्लेखना व्रत धारण करून शरीर त्याग केला. त्यानंतर त्यांच्याच पादुकांची पूजा करून १२ वर्षांनी चंद्रगुप्ताने समाधि धारण करून आपली जीवनयात्रा संपविली.

विंध्यगिरी पहाडावर गोमटेश्वरांची ५७ फूट उंचीची सुंदर व भव्य मूर्ति आहे. ती अखंड पाषाणाची असून जगात अशी मूर्ति पहावयास मिळणार नाही असे काका कालेलकरांचे मत आहे. या मूर्तीची प्रतिष्ठापना गंगवंशाचे सेनापती चामुंडराय यांनी सुमारे १००० वर्षापूर्वी केली आहे. येथे अनेक प्राचीन शिलालेख असून ऐतिहासिकदृष्ट्या त्यांचे महत्त्व अनन्यसाधारण असे आहे.

खंडगिरी– ओरिसा प्रांतातील हे जैनांचे एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. ओरिसा प्रदेशाची राजधानी कटक असून तेथून खंडगिरीला जाता येते. कटकजवळ देखील जैनांच्या हजारो प्रतिमा असून त्यांची व्यवस्था यथायोग्य नसल्याचे दिसते. भुवनेश्वरपासून ५ मैलावर पश्चिमपुरी जिल्ह्यात खंडगिरी व उदयगिरी नावाच्या दोन टेकड्या आहेत. या दोन्ही टेकड्यावर पाषाणातून कोरलेल्या अनेक गुंफा व मंदिरे आहेत. उदयगिरीच्या हत्ती गुंफेत कलिंग चक्रवर्ती जैन सम्राट खारवेल यांचा इतिहासप्रसिद्ध शिलालेख कोरलेला आहे.

उपर्युक्त जैन तीर्थक्षेत्राशिवाय पपौरा (उ. प्रदेश), खखुंद, सेंटमेंट, अहिक्षेत्र, पपौरा, अहार, मंचराई, भुवनजी, मातकुली, मक्सी, पार्श्वनाथ, बिजोलिया, ऊन, वेणूरादीही प्रसिद्ध तीर्थक्षेत्रे आहेत. जैन धार्मिकांच्या दृष्टीनेही सर्व तीर्थक्षेत्रे अति महत्त्वाची व प्रिय अशी आहेत.

पुण्यवान जीव खडतर तपाचरण करून व आपली आत्मोन्नति करून शेवटी ज्या ठिकाणाहून निर्वाणाला जातात त्या ठिकाणांना निर्वाणभूमि किंवा सिद्धभूमि म्हणतात. तीच स्थाने तीर्थक्षेत्र म्हणून ओळखली जातात. अशा अनेकविध तीर्थक्षेत्रांचा थोडक्यात परिचय या ठिकाणी दिला आहे. जैन-अजैनांच्या दृष्टीने ती निश्चित मार्गदर्शक ठरतील असा विश्वास आहे.

# जैन कला

## अर्घ्य १० वा

या अर्घ्यामध्ये आन्तरराष्ट्रीय ख्याति प्राप्त जैन-कले संबंधी संपूर्ण विवेचन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. या खंडात संगीत-कला, नृत्य-कला, मूर्ति-कला, शिल्प-कला, वास्तु-कला, चित्र-कला इत्यादी कलांची सर्वांगपूर्ण माहिती दिली आहे.

# जैन कला

भारतीय समाजात मान्यवर असलेल्या व संपूर्ण भारतभर पसरलेल्या जैन धर्माने विशिष्ट व असामान्य अशा तत्त्वज्ञानामुळे व आचारपद्धतीमुळे स्वतःचे वैशिष्ठ्यपूर्ण वेगळे स्थान मिळविले आहे. जैन धर्माने लोकांची आध्यात्मिक किंवा नैतिक पातळी उंचावण्याचा प्रयत्न केलाच पण त्याचबरोबर संगीतकला, वास्तुकला, गुहा-शिल्प, स्तूप, मूर्तिकला, चित्रकला, रंगकला इत्यादी जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रातही प्रगति घडवून आणून त्या क्षेत्रानाही सजविण्याचा प्रयत्न केला आहे. जैन तत्त्वज्ञानाच्या संदर्भात जीवाचे लक्षण उपयोग सांगितले आहे. 'मी आहे' अशी आपल्या अस्तित्त्वाची जाणीव होत असणे ही स्वसंवेदना पहिल्या प्रकारचा उपयोग, तर जीवाला आपल्या सभोवताली असणाऱ्या अन्य पदार्थांचीही प्रचीति येत असणे ही परसंवेदना हा दुसरा प्रकारचा उपयोग होय. हे सर्व प्राकृतिक अन्य पदार्थ जीवाला निरनिराळ्या प्रकाराने उपयोगी पडत असतात. मानव आपल्या ज्ञानसामर्थ्यामुळे या निरनिराळ्या वस्तूंचा प्राण्यापेक्षा वेगळा व विशेषरूपाने उपयोग करून घेत असतो. मानव त्याच्याजवळ असणाऱ्या जिज्ञासेच्या गुणामुळे विश्वाचे स्वरूप विशेषरीतीने जाणू इच्छितो. याच गुणामुळे तो निसर्गावरही मात करतो. विज्ञान व निरनिराळ्या दर्शनशास्त्रांचा विकासही या गुणामुळेच झालेला दिसून येतो. मानवामध्ये दुसरा महत्त्वाचा गुण आहे तो म्हणजे योग्य व अयोग्य यासंबंधीचा विवेक. याच विवेकाच्या प्रेरणेमुळे मानवाने धर्म, नीति, आचारपद्धती व आदर्शवाद इत्यादींची प्राणप्रतिष्ठा केली आहे व या आदर्शांना अनुरूप असे आपले जीवन निर्मळ व सुसंस्कृत बनविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळेच मानवी समाज दिवसेंदिवस प्रगति करीत आहे, उत्तरोत्तर सुसंस्कृत बनत चालला आहे. जगात विविध संस्कृतींचा आविष्कार झाला आहे. मानवाचा तिसरा व महत्त्वाचा गुण म्हणजे सौंदर्योपासना होय. आपल्या पोषणासाठी व रक्षणासाठी मानव ज्या पदार्थांचा संग्रह करतो, त्यांचे संरक्षण करतो त्या वस्तू दिवसेंदिवस सुंदर बनविण्याचाही तो प्रयत्न करीत असतो. प्रारंभी थंडी, वारा, ऊन इत्यादीपासून रक्षण व्हावे म्हणून, नैसर्गिक गरज म्हणून, मानवाने वल्कले, मृगाजिन इत्यादी ज्या शरीरप्रावरणांचा अंगिकार केला त्यामध्ये कालक्रमानुसार सुधारणा करीत राहून त्याने नाना प्रकारच्या सुती, रेशमी, लोकरी इत्यादी वस्त्रप्रकारांचा आविष्कार साधला. पुढील काळात हे वस्त्रे अंगोपांगानुसार बेतून शिवण्याची कला त्याने शोधून काढली. याच कलेतून एक सुंदर वेष-भूषापद्धती उदयास आली. परंतु मानवाची ही सौंदर्योपासना ज्या बाबतीत पराकोटीला पोहोचली आहे व ज्या कलाची मानवी संस्कृतीच्या संवर्धनामध्ये विशेष मदत झाली आहे त्यापैकी स्थापत्यकला, मूर्तिकला, चित्रकला, गांधर्वकला व काव्यकला यांना विशेष महत्त्वाचे स्थान आहे. मानवी जीवनाच्या उपयोगी दृष्टिकोनातूनच या कलांचा उदय झाला आहे. नैसर्गिक गुहामध्ये निवास करता करता मानवाने आपल्या आश्रयासाठी हळूहळू लाकडाची, मातीची व दगडाची घरे बनविली. आपल्या पूर्वीच्या पुण्यपुरुषांची स्मृती अखंड राहण्यासाठी, सुरुवातीला लांछनाकार व नंतर तदाकार पाषाणाची स्थापना केली. आपल्या अनुभवाच्या स्मृति जागृत ठेवण्यासाठी ठिकठिकाणी रेखाचित्रे कोरली. मुलांना झोपविण्यासाठी, थकलेल्या मनाच्या रंजनार्थ निरनिराळी गाणी म्हटली, कथा, गोष्टी सांगितल्या. परंतु या प्रवृत्तीमुळे त्यांनी हळू हळू इतकी सुधारणा केली की, काही काळानंतर या कलांच्या जागतिक उपयोगापेक्षा त्यातील सौंदर्यपक्ष किंवा रसात्मक रंजकता अधिक प्रबल व प्रधान बनू लागली. अशाप्रकारे या सुरुवातीच्या उपयोगी कलांना नंतरच्या काळात ललितकलांचे स्वरूप प्राप्त झाले. शेवटी या कला कोणत्याही देशाच्या व समाजाच्या सभ्यता व संस्कृती इत्यादींच्या अटळ प्रतीकांच्या स्वरूपात मानण्यात येऊ लागल्या. त्यामुळे कोणत्याही देशाचा, समाजाचा व धर्माचा इतिहास पूर्णांशाने समजून घ्यावयाचा असेल तर, या पाच कलांचा विकास-वृत्तांत जाणून घेणे अतिशय आवश्यक आहे. यावरून मानवाच्या जिज्ञासेप्रमाणेच सौंदर्याभिलाषा देखील एक मौलिक प्रेरणाच असल्याने कलेची आराधना देखील त्याच्या स्वाभाविक वृत्तीशी सुसंगतच आहे हे यावरून स्पष्ट होते. त्यामुळे कलेचे उद्देश कलाच हे स्पष्ट होते. तथापि




अशा प्रकारच्या नैसर्गिक सौंदर्यवृत्तीने स्वतःच्या जीवनाच्या आविष्कारासाठी ज्या साधनांचा उपयोग केलेला आहे त्यांचा परिपूर्ण रीतीने अभ्यास केल्यास जीवनाचा विकास हेच कलेचे उद्दिष्ट होय. असेच विधान करणे जास्त समर्थनीय ठरते. सामान्यतः भारतीय व विशेषेकरून जैन कलेच्या अभ्यासावरून याच मताला जास्त पुष्टी मिळते. कारण येथील कलाकार प्राकृतिक वस्तूंच्या केवळ नैसर्गिक रूपाच्या प्रतिबिंबाने कधीही संतुष्ट झालेला नाही, तर आपल्या कलावृत्तीने मानवी भावनांचा आविष्कार करून त्यातील परमावस्था, परिपूर्णता साधण्याचा प्रयत्न सदैव कलाकाराच्या पुढे असतो व यासाठीच कलावृत्तीत कोठे तरी, काहीसा तरी धर्माचा किंवा नीतीचा उपदेश प्रगट किंवा अप्रगट स्वरूपात गोवलेला असतोच. म्हणूनच सर्वच कलाकृतींचा जन्म धर्माच्या परिसरातच झालेला असून तेथेच त्यांचा परिपोष झालेला दिसतो. ग्रीक कलाकार मात्र वर्ण्य विषयाचे प्रतिबिंबन निसर्गाच्या अनुरोधानेच साधण्यामध्ये आपल्या कलाकृतीचे साफल्य मानतात. म्हणूनच ग्रीक कलेला भारतीय लोक आधिभौतिक व धर्मनिरपेक्ष मानतात. भारतीय कलाकार केवळ वस्तूंच्या यांत्रिक चित्रणाला कलेची परिपूर्णता मानीत नाहीत. कारण भारतीयांच्या मते या कलेपासून समाजाला नैतिक वा भावात्मक काहीही संदेश मिळू शकत नाही आणि हे कार्य जर कला करीत नसेल तर त्या कलेचे अभीष्टच काय? ती कला जीवनाच्या विकासासाठी होऊच शकत नाही. भारतीय कलाकारांच्या मनामध्ये कलानिर्मिती करीत असताना जनकल्याणा विषयीचा उपर्युक्त भावनांकुर असल्याने त्यांच्या कलाकृतीमध्ये केवळ भौतिक किंवा वास्तव वादापेक्षा काही निराळीच अंतर्भूत शक्ति बहारलेली असते. यालाच काही वेळा कलात्मक अतिशयोक्ती असेही म्हणण्यात येते. स्थापत्य कलेमध्ये भारतीय कलाकार दिव्य विमानाविषयीची आपली कल्पना साकार करण्याची उमेद बाळगतो. देवदेवतांच्या मूर्ती तर या दिव्यत्वाच्या कल्पनेने भारावून टाकण्यात येतात. त्याचबरोबर मानवी मूर्ती व चित्रे यामध्ये देखील आपला अध्यात्मिक उत्कर्ष पल्लवित करण्याचा प्रयत्न केलेला असतो. पशु, पक्षी, वनस्पती इत्यादी वस्तूंच्या कोरीव कलेत वास्तववाद स्वीकारूनही त्यांच्या कलात्मक निर्मितीमध्ये अशी भूमिका फुलविण्याचा प्रयत्न केला आहे की, त्यातून एक प्रकारची श्रद्धा, भावशुद्धि, जीवनमूल्याचा आविष्कार साध्य व्हावा. अशा प्रकारे जीवनाचे उदात्तीकरण हाच जैन कलेचा उद्देश आहे व त्यामागील प्रेरणा धर्म आहे. कलेच्या माध्यमाने जैन तत्वज्ञान व तत्वपालनातील आदर्श यांना दृश्यरूप देण्याचा प्रयत्न करीत असताना जैन कलाकारांनी मूर्तिकलेचा कळस गाठलेला दिसून येतो.

जैन धर्माने जीवनातील प्रवृत्तिमार्गाचे पोषण न करता निवृत्तिमार्गावरच भर दिलेला आहे असे अनेकदा सांगण्यात येते. तथापि हा दोषारोप म्हणजे जैनधर्मविषयक अपूर्ण ज्ञानाचा निदर्शक आहे. अनेकांत तत्त्वाला अनुसरून त्यांनी मानवी जीवनातील विविध अंगाकडे लक्ष पुरविले आहे. संयमाच्या प्रतिष्ठापनेसाठी आणि विवेकशून्य मानवी जीवनातील शुभ व अशुभ गोष्टींचे परिशीलन करण्यासाठी काही आदर्श निर्माण करणे व त्या आदर्शांना मारक ठरणाऱ्या कुत्सित प्रवृत्तीचा निषेध करणे आवश्यक असते. जैन धर्माने जीवाला परमात्मा बनविण्याचा अंतिम आदर्श स्वीकारला आहे. त्यादृष्टीने वाटचाल करण्यामध्ये प्रत्येक व्यक्तीला पूर्णपणे जबाबदार ठरवून त्याला प्रेरणा देण्याचे कार्य त्यांच्या कर्मसिद्धांताने साधले आहे. धर्माचारातील व्रतनियमरूप वैयक्तिक, सामाजिक व आध्यात्मिक हितसंबंधामध्ये बाधक ठरणाऱ्या मानवी प्रवृत्तीना रोखण्याचा प्रयत्न केला आहे. याचा अर्थ जैनांचा प्रवृत्तिमार्ग उपेक्षित किंवा अपरिपुष्ट आहे असा मुळीच होत नाही. जैनपरंपरेत कलेच्या उपासनेला जे उच्च स्थान लाभले आहे त्यावरून त्यांचा प्रवृत्तिमार्ग अधिक स्पष्ट होतो.

प्राचीन जैनागमांच्या अभ्यासावरून विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक कालखंडातील शिल्पशिक्षणावर व कला-साधनेवर भर दिलेला दिसून येतो. या विभागातील अभ्यासासाठी कलाचार्य व शिल्पाचार्य यांचा उल्लेख स्वतंत्र केलेला आढळतो. गृहस्थाची जी षट्कर्मे सांगितली आहेत त्यात असि, मसि, कृषि, सेवा, वाणिज्य याबरोबरच, शिल्पाचा स्वतंत्र रीतीने उल्लेख केलेला आहे. जैन साहित्यात ठिकठिकाणी बहात्तर कलांचा संदर्भ आढळतो.




समवायांग सूत्रामध्ये ७२ कलांची नामावली आहे. लेख, गणित, रूप, नृत्य, गीत, वाद्य, स्वरगत, पुष्करगत, समताल, द्यूत, जनवाद, अष्टापद, दगमट्टिय, (उदकमृत्तिका), अन्नविधी, पानविधी, वस्त्रविधी, शयनविधी, अज्जं (आर्या), प्रहेलिका, मागधिका, गाथा, श्लोक, ग्रंथमुक्ती, मधुसिक्थ, आभरणविधी, वरुणिप्रतिकर्म, स्त्रीलक्षण, पुरुषलक्षण, हयलक्षण, गजलक्षण, गोणा (वृषभलक्षण) कुक्कुटलक्षण, मेंढालक्षण, चक्रलक्षण, छत्रलक्षण, दडलक्षण, असिलक्षण, मणिलक्षण, काकनिलक्षण, चर्मलक्षण, चंद्रलक्षण, सूर्यचरित, राहुचरित, ग्रहचरित, सौभाग्यकर, दुर्भाग्यकर, विद्यागत, मंत्रगत, रहस्यगत, सभास, चार, प्रतिचार, व्यूह, प्रतिव्यूह, स्कंधाधारमान, नगरमान, वास्तुमान, स्कंधावारनिवेश, वास्तुनिवेश, नगरनिवेश, ईसत्थं (इष्वस्त्रं), छरुप्पवायं, अश्वशिक्षा, हस्तिशिक्षा, धनुर्वेद, हिरण्यपाक, सुवर्णपाक, मणिपाक, धातुपाक, बाहुयुद्ध, दंडयुद्ध, मुष्टियुद्ध, यष्टीयुद्ध, युद्ध, निर्युद्ध, जुद्धाइयुद्ध, सूत्रक्रीडा, नालिकाक्रीडा, वृत्तक्रीडा, धर्मक्रीडा, चर्मक्रीडा, पत्रछेद्य, कटकछेद्य, सजीव-निर्जीव, शकुनरूप.

लेख म्हणजे अक्षर-विन्यास. या कलेमध्ये लिपि व लिहिण्याचा विषय या दोन गोष्टींचा विचार केला आहे. देशभेदानुसार निरनिराळ्या प्रकारच्या १८ लिपी सांगण्यात येतात, त्यापैकी ब्राह्मी व खरोष्ट्री या दोन लिपीमधील लेख प्राचुर्याने सापडतात. खरोष्ट्रीचा उपयोग इ. स. पू. तिसऱ्या शतकातील मौर्य सम्राट अशोकाच्या लेखापासून खिस्ताब्द २-३ शतकापर्यंतच्या पंजाब, वायव्य प्रांतापासून चिनी, तुर्कस्थानपर्यंतच्या प्रदेशातील लेखामध्ये होत होता. ब्राह्मी लिपीची परंपरा आजही आपल्या देशात कायम आहे. भारतातील सर्व प्रचलित लिपी ब्राह्मी लिपीतूनच विकसित झाल्या आहेत. वारली (अजमेर) येथे जो लहानसा लेख सापडला आहे तोच या लिपीतील सर्वात जुना लेख असावा. तेव्हापासून (वीरनिर्वाण ८४) आजपर्यंत निरनिराळ्या कालखंडातील भिन्न भिन्न प्रदेशात सापडलेल्या लेखामध्ये या लिपीचा उपयोग केलेला दिसतो. ब्राह्मी लिपीसबंधी जैन आगम ग्रंथामध्ये व पुराणामध्ये सांगितले आहे की, या लिपीचा आविष्कार प्रथम ऋषभनाथांनी केला व ती लिपी त्यांनी आपली मुलगी ब्राह्मी हिला शिकविली. यावरूनच या लिपीचे नाव ब्राह्मी पडले असावे. या लिपीमध्ये ४६ मातृका अक्षरे असल्याचा उल्लेख समवायांग सूत्रामध्ये सापडतो. याशिवाय जवणालिपी (यवन लिपी) अक्षरमुष्टिका (संकेत लिपी) भूतलिपी (तिबेट-भूतानमधील) माहेश्वरी (महेश्वर-मध्यप्रदेश येथील) दामिलीलिपी (द्रविड) इत्यादी विशिष्ट लिपि प्रकारांचे उल्लेख मिळतात. याशिवाय अन्य १८ प्रकारच्या लिपीची माहिती मिळते. हंसलिपी, भूतलिपी, यक्षलिपी, राक्षसलिपी, ओड, यवनी, तुरुक्की, कीरी, द्राविडी, सैंधवी, माळविनी, नडी, नागरी, लाटी, पारसी, अनिमित्ती, चाणक्यी व मूळदेवी. याशिवाय काही लिपी, विषय गुप्त ठेवण्यासाठी वैद्य, ज्योतिषी, यांत्रिक वापरीत असावेत.

भगवान महावीरांनी आपला उपदेश अर्धमागधीत केला. बाल, वृद्ध, अशिक्षित लोकासंबधी अनुकंपा निर्माण झाल्याने त्यांच्या हितार्थ त्यांच्याच भाषेत प्रवचन करण्याचा त्यांनी निर्णय घेतला. वाग्भटानी लिहिले आहे की, अर्धमागधी भाषेला माझा नमस्कार असो. ही भाषा सर्व भाषावर परिणाम करते. ती सर्व प्रकारांनी पूर्ण असून, हिच्यामुळे सर्व गोष्टींचे ज्ञान होते. सर्व गोष्टी समजतात. यावरून दिसते की, बौद्धांनी ज्याप्रमाणे मागधी भाषेला सर्व भाषांचे मूळ मानले त्याचप्रमाणे जैनांनी अर्धमागधीला सर्व भाषांची मूळ भाषा म्हणून स्वीकार केले. अर्धमागधी ही जैन आगमग्रंथाची भाषा आहे. नाटकामधून हिचा प्रयोग झाला नाही. ध्वनितत्वानुसार अर्धमागधी पालीच्या नंतरची भाषा होय. तथापि वाक्यरचना, शैली इत्यादी दृष्टीने पाहिल्यास जैनसूत्रांची ही भाषा पालीच्या निकट आहे. जर्मन विद्वान रिचार्ड विशवल यांनी अर्धमागधीच्या अनेक प्राचीन रूपांचा उल्लेख केला आहे. भरताच्या नाट्यशास्त्रात मागधी, अवंती, प्राच्य, शौरसेनी, बाल्हीक व दाक्षिणात्य याबरोबरच अर्धमागधी या भाषेचाही सात प्राचीन भाषामध्ये समावेश केला आहे.

मगधाच्या अर्ध्या भागात बोलली जाणारी व अठरा देशी भाषापासून बनलेल्या भाषेला अर्धमागधी म्हणत असावेत. नवांगी टीकाकार अभयदेवाच्या मतानुसार, या भाषेत काही लक्षणे प्राकृतची व काही लक्षणे मागधीची असल्याने तिला अर्धमागधी म्हणत असावेत. आचार्य हेमचंद्रानी प्राचीन जैनआगम सूत्रामध्ये अर्धमागधी भाषा





वापरली असल्याचे सांगितले आहे. तथापि त्यांनी अर्धमागधीच्या नियमांच्या स्वतंत्र प्रकारे विवेचन केले नाही. हेमचंद्रसूरीनी जैन आगमांच्या भाषांना अर्धमागधी न म्हणता प्राकृत म्हटले आहे. मार्कंडेय यांच्या मतानुसार शौरसेनीची संनिधता असल्याने मागधीलाच अर्धमागधी म्हटले आहे. तथापि अर्धमागधी ही शुद्ध मागधी भाषा नव्हे. पश्चिमेस शौरसेनी व पूर्वेला मागधी, मध्यंतरीच्या क्षेत्रात ही भाषा बोलली जात असल्याने या भाषेला अर्धमागधी म्हटले जात असावे.

जैन समाजाने लेखनकलेचा उपयोग फार प्राचीन काळापासून केलेला आढळतो. तथापि दीड-दोन हजार वर्षापेक्षा प्राचीन जैन लिखित ग्रंथाचा नमुना उपलब्ध नाही. यास प्रमुख कारण म्हणजे प्राचीनकाळी विद्याप्रचाराचे विशेष कार्य मुनिजनाकडूनच होत असे व जैन मुनी तर पूर्णपणे निर्ग्रंथ (अपरिग्रही) असतात. त्यामुळे आपल्याबरोबर ग्रंथ न बाळगता ते आपली ज्ञानाराधना श्रुति-स्मृतीवरच अवलंबून ठेवीत असत. मात्र अंतिम तीर्थंकर महावीरांचा उपदेश त्यांच्या गणधरांनी त्याचवेळी ग्रंथस्वरूप रचून ठेवला होता. परंतु मौर्यकाळात त्यातील काही भाग नष्ट होऊन गेला. पाटलीपुत्र परिषदेत दृष्टिवाद या बाराव्या अंगाचे संकलन होऊ शकले नाहीच. कारण दृष्टिवादाचे एकमेव जाणकार मुनी या परिषदेत सम्मिलित होऊ शकले नाहीत. पाटलीपुत्र व मथुरा येथील वाचनामध्ये निश्चित स्वरूपात संकलित झालेले ग्रंथ आज उपलब्ध नाहीत. परंतु वल्लभी येथील वाचनामध्ये संकलित झालेल्या व त्यावेळी ताडपत्रावर व नंतर कागदावर चिरंतन परंपरेने उत्तरोत्तर अधिक कलात्मकतेने लिहिलेल्या आगम ग्रंथाच्या प्रती आज उपलब्ध आहेत. यावरून ग्रंथ लक्षरबद्ध करण्याच्या परंपरेची प्राचीनता सिद्ध होते. दशवैकालिक सूत्रावरील हरिभद्रीय टीकेमध्ये गंडी, (लांबी-रुंदीसारखी, चौरसाकार) कच्छपी (मध्यभागी रुंद व बाजूना संकुचिताकार) मुष्टी (गोलाकार अंगुलीप्रमाण) संपुट-फलक (लाकडी फळयावर लिहिलेले) व छेदपाटी (ताडपत्र रुंद, लांबट मिश्र) अशा सहा पुस्तकांच्या प्रकारांचे वर्णन आढळते.

जेथे जेथे बहात्तर जैन कलांचा संक्षेपाने उल्लेख आला आहे, तेथे या कलांना बहुतेक लेखादिक वा गणितप्रधान असे संबोधले आहे. रूपगत याचा अभिप्राय मूर्तिकला व चित्रकला होतो. नृत्य, गीत, वाद्य, स्वरगत, पुष्करगत, समताल या सर्व कलांचा विषय संगीत आहे. ह्या कलांना जैन मुला-मुलींच्या शिक्षणामध्ये महत्त्वाचे व आवश्यक अंग मानले आहे. जैन शास्त्रे व पुराणे, कथासाहित्य इत्यादीमध्ये या कलेच्या संबंधाने अनेक उल्लेख आढळतात. द्यूत, जनवाद, पोक्खच्च व अष्टापद ह्या कला द्यूतक्रीडेचे प्रकार होत. दगमट्टिया, उदकमृत्तिका, सजावट व निर्मितीच्या हेतूने, पाण्यामध्ये, मळलेल्या मातीच्या लगद्यापासून घर, मूर्ती इत्यादी सुंदराकार वस्तू निर्माण करण्याची ही कला आहे. अन्नविधी व पानविधी ह्या निरनिराळ्या प्रकारांचे खाद्य, स्वाद्य, लेह्य व पेय पदार्थ तयार करण्याच्या कला आहेत. वस्त्रविधी ही विविध प्रकारची वस्त्रे विणण्याची व शिवण्याची कला आहे. तर शयनविधी ही शय्येची सजावट करण्याची कला आहे. आर्या, प्रहेलिका, मागधिका, गाथा व श्लोक या याच नावाच्या छंदाविषयी व काव्य रीतीसंबंधी रचनाविषयक कला आहेत. गंधयुक्ती ही विविध प्रकारच्या सुगंधी द्रव्यांच्या रासायनिक संयोगापासून नवनवीन सुगंधी द्रव्य निर्माण करण्याची कला आहे. मधुसिक्थ म्हणजे तळहात, पाय रंगविण्यासाठी लागणारी मेंदी तर आभरणविधी व तरुणीप्रतिकर्म ह्या, आभूषणे, अलंकार व तरुणींच्या अंतरंगासंबंधीच्या कला आहेत. त्रिलोकप्रज्ञप्तीमध्ये पुरुषांच्या सोळा व स्त्रियांच्या चौदा आभरणांची यादी दिलेली आहे. दुसऱ्या वैकल्पिक सूत्रात १२ आभरणांची नावे समान असून केयूर, भालपट्ट व कर्णपूर ऐवजी किरीट, अर्धहार व चूडामणी ही नावे घातली आहेत. स्त्रीलक्षण ते चर्मलक्षणपर्यंतच्या चौदा कला स्त्री, पुरुष, व इतर वस्तू यांची शुभाशुभ लक्षणे जाणण्यासाठी व त्यांच्यातील गुणदोष ओळखण्यासाठी उपयोगी पडतात. चंद्रलक्षण ते ग्रहचरित या चार कला ज्योतिषशास्त्रासंबंधीच्या आहेत तर सौभाग्यकर ते मंत्रगत या चार कला मंत्र-तंत्र-विषयक आहेत. चार प्रतिचार व्यूह व प्रतिव्यूह या चार सग्रामविद्या आहेत. आघाडीवर फौजेचा मोहरा बदलणे, शत्रुसैन्याचा हल्ला विफल करण्यासाठी उपयुक्त अशी आपल्या सैन्याची रचना बदलणे, चक्रव्यूह पद्धतीने सैन्यरचना करणे व शत्रुसैन्याची व्यूहरचना फोडण्यासाठी व्यवस्था करणे इत्यादी कलांचा यात समावेश होतो.




स्कंधावार-मान ते नगरनिवेश ह्या सहा कलात सैन्याचा तळ उभारणे, त्यासाठी योग्य भूमी, किल्ला इत्यादीसाठी भूमी निश्चित करणे इत्यादीचा समावेश होतो. ईसरथ, धरुण्यवाय, सुरी, कटयार, खड्ग, इत्यादी निर्मितीच्याही कला असत. अश्वशिक्षा ते मुष्टीयुद्ध कला होत्या. तर युद्ध, नियुद्ध व जुद्दाइयुद्ध हे युद्धकलेचे प्रकार होत. सूत्रक्रीडा, वृत्तक्रीडा, धर्मक्रीडा व चर्मक्रीडा हे क्रीडाप्रकार होत. पत्रछेद्य व कटकछेद्य पाने व गवत यांचा छेद करून त्यापासून सुंदर वस्तू वनविण्यासंबंधीच्या या कला होत्या. औपपातिक सूत्रामध्ये बहात्तर कलांची एक यादी दिलेली आहे. ती या यादीप्रमाणेच असून केवळ काही नावामध्ये फरक आहे. विविध जैन पुराण व काव्य इत्यादीमध्ये जेथे जेथे शिक्षणाचा संदर्भ आलेला आहे तेथे या कलांचा प्राभुख्याने उल्लेख आलेलाच आहे. तथापि काही वेळा व काही ठिकाणी त्यांच्या नावामध्ये व संख्येमध्ये फरक आढळतो. अशा प्रकारे जैन समाजजीवनात निरनिराळ्या बहात्तर कलांना विशेष महत्त्वाचे स्थान असलेले दिसते. यापैकी काही कलांनी असामान्य स्थान मिळविले तर काही कला काळाच्या ओघात नष्ट झालेल्या दिसतात.

## जैनांची संगीत साधना

### तीर्थंकरांचे जन्म कल्याणिक : संगीताचे मंगलाचरण–

तीर्थंकरांचा जन्म होण्याअगोदर १५ महिन्यापासून रत्नवर्षा, मातेची देवीकडून सेवा इत्यादि विभूतीद्वारे गर्भ कल्याणिक साजरे होते. तीर्थंकरांच्या जन्माभिषेकाचे अनेक ग्रंथातून रसभरित वर्णन आलेले आहे. सौधर्म व ऐशान स्वर्गातले देव व देवी सुमेरु पर्वतावर तीर्थंकरांना अभिषेकासाठी घेऊन जातात. विशाल अशा देवसेना मिरवणुकीत असतात.

गजरूपधारी देवगण, विद्याधर, कामदेव आदीचे षड्ज (सा) स्वरामध्ये गुणगान करतात.

तुरंगसेना ऋषभ (रे) स्वरामध्ये मांडलिक, महामांडलिक राजांचे गुणगान करतात.

देवरथ सेना गांधार (ग) स्वरामध्ये वलभद्र, नारायण, प्रतिनारायण यांच्या बलवीर्याचे गुणगान करतात व नृत्य करतात.

पायदळ सेना मध्यम (म) स्वरामध्ये चक्रवर्तीचे वैभव, वल, वीर्य आदीचे गुणगान करतात.

वृषभ सेना पंचम (प) स्वरामध्ये चरमशरीरी मुनींचे गुणगान करतात.

गंधर्व सेना धैवत (ध) स्वरामध्ये गणधरदेव आणि ऋद्धिधारी मुनींचे गौरव गुणगायन करतात.

नृत्यकारिणी सेना निषाद (नि) स्वरामध्ये तीर्थंकर भगवंताच्या ४६ गुणाचे आणि पुण्यमय जीवनाचे गायन करतात.

वरील वर्णनात पुण्यपुरुषांचे गुणानुवाद आहेत पण त्याहीपेक्षा संगीत शास्त्राच्या दृष्टीने ते अधिक महत्त्वाचे आहे. सा, रे, ग, म, प, ध, नि या सात मूळ स्वरांचा येथे उल्लेख आढळतो.[1]

पुण्यपुरुष आणि स्वर यांचा उच्च क्रम मनोवेधक आहे. वरील वर्णनातील गज, तुरंग, आदिवरोवर जो स्वरांचा संबंध आहे. त्यांचा काही तरी संगीत शास्त्रासंबंधाने संकेत असावा. पण हा संशोधनाचा विषय आहे.

### सप्तस्वरः कोणाचा, कसा व कोणता ?

स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षा या ग्रंथावर श्री शुभचंद्राचार्यांनी संस्कृत टीका लिहिली आहे. निषाद, ऋषभ, गांधार, षड्ज, मध्यम, धैवत आणि पंचम हे सात स्वर तंत्रीरूप कंठातून उत्पन्न होतात असे त्या टीकेमध्ये म्हटले आहे. त्यांनी स्वरांच्या स्थानांचा देखील उल्लेख केला आहे.

१. जंबूदीव-पण्णत्ति-सगहो–४।२२४ ते ४।२३२.








कण्ठदेशे स्थितः षड्जः शिरस्य ऋषभस्तथा । नासिकायांच गांधारो हृदये मध्यमो भवेत् ॥
पंचमश्च मुखे ज्ञेयस्तालुदेशे तु धैवतः । निषादः सर्वगात्रे च ज्ञेयाः सप्तस्वरा इति ॥[1]

म्हणजे जो स्वर कंठप्रदेशात स्थित असतो त्यास षड्ज, जो स्वर शिरोदेशात स्थित असतो त्यास ऋषभ, जो स्वर नासिक प्रदेशात स्थित असतो त्यास गांधार, जो स्वर हृदय प्रदेशात स्थित असतो त्यास मध्यम, मुख प्रदेशात स्थित स्वराला पंचम, तालु प्रदेशात स्थित स्वराला धैवत, आणि सर्व शरीरामध्ये स्थित स्वराला निषाद असे म्हणतात.' त्यापुढे असेही वर्णन आहे[2]—

निषादं कुंजरो वक्ति ब्रूते गौ ऋषभं तथा । अजा वदन्ति गान्धारं षड्जं ब्रूते भुजङ्गभुक् ॥
ब्रवीति मध्यमं क्रौञ्चो धैवतं च तुरंगमः । पुष्पसंधारणे काले पिकः कूजति पंचमम् ॥

(हत्तीचा स्वर निषाद आहे, गाईचा स्वर ऋषभ आहे, शेळीचा स्वर गांधार आहे व गरुडाचा स्वर षड्ज आहे, क्रौंच पक्षाचा स्वर पंचम आहे, घोड्याचा स्वर धैवत आहे आणि वसंत ऋतूमध्ये कोकिळा पंचम स्वरामध्ये कूजन करते.)

### संगीत शास्त्रासंबंधी ग्रंथ—

मोहोंजदारो येथे सापडलेल्या भगवान ऋषभनाथांच्या मूर्तीभोवती वीणा, करताल, वांसुरी व मृदंग यांच्याही आकृत्या कोरलेल्या आहेत. यावरून जैनांची संगीताच्या आस्थेची साक्ष जशी पटते, तसेच त्यांनी संगीत शास्त्रावरील ग्रंथरचना केली असावी हेही लक्षात येते. पुराणग्रंथ, चरित्रग्रंथ व काव्यग्रंथ यामधून येणारे विविध वाद्यादिकांचे वर्णन वाचून तर जैन संगीतशास्त्र प्रगल्भ होते हे पटते. पण आश्चर्य असे की, जैन संगीताकडे उपेक्षेने पाहिले गेले आहे असे वाटते, कारण त्या संबंधाने कुणीही कुठे लिहिल्याचे वाटत नाही. अपवाद म्हणून २।४ लेख देता येतील. पण संगीतप्रेमी जीवांचे तेवढ्यावर समाधान होणार नाही. उपलब्ध ग्रंथासंबंधी जी त्रोटक माहिती संकलित करता आली ती खाली देत आहे. ग्रंथकार, ग्रंथकाल इ. संबंधी अधिक माहिती नाही.

### संगीत रत्नाकर : सुसंबद्ध संगीत शास्त्र—

इ. सन १२०० नंतरच्या हा ग्रंथ आहे. मार्ग आणि देशी दोन्ही पद्धतीचे यथायोग्य वर्णन यात आहे. त्यामुळे इतर ग्रंथांची याच्याशी तुलना केली जाते. याचा कर्ता शार्ङ्गदेव आहे पण त्याचा उल्लेख मात्र त्यात नाही.

### संगीत समयसार—

याचे कर्ते श्री पार्श्वदेव आहेत. इ. स. १२०० नंतरचा हा ग्रंथ आहे. यात देशी रागांचे वर्णन आहे. अध्यायामध्ये हा ग्रंथ आहे. कुठे कुठे वर्णन क्रम सुटलेला आहे. यामध्ये नाद, गीत, वर्ण, आलाप, राग, रागांग, प्रबंध, अनवद्य, नृत्य, ताळ, प्रस्तार याशिवाय लहानसहान वाबीवर बराच प्रकाश टाकलेला आहे.

### इतर ग्रंथ—

स्थानांग सूत्रामध्ये आलेल्या वर्णनावरून 'पूर्वगतस्वरप्राभृत' हा संगीत शास्त्रावरील ग्रंथ असावा. २१ मूर्च्छनांचा यात उल्लेख आहे. अभयदेवाची टीका विद्वत्तापूर्ण आहे. (स्थानांग सूत्रावरील)

### भद्रबाहूकृत कल्पसूत्र—

विनयविजयोपाध्याय याने भद्रबाहूकृत कल्पसूत्रावर संस्कृत टीका लिहिली आहे. यात वाद्यांचे वर्णन आहे. हा ग्रंथ १७ व्या शतकातील आहे.

१. वरील श्लोक ग्रंथामध्ये उक्त च असे आहेत. २ वार्ति टीका–गाथा–१८३.




संगीतोपनिपत्सारोद्धार हा सुधाकलश यांचा ग्रंथ आहे. यामध्ये तालांचे विशेष वर्णन आहे. एकमात्रिक तालापासून षष्टिमात्रिक तालापर्यंतचे यात वर्णन आहे.

हिंदी ग्रंथामध्ये नयनसुखविलास हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा आहे. भूधरदास, भागचंद, द्यानतराय, दौलतराम आदि हिंदीच्या कवींनी आपली पदे कोणत्या रागात गावीत याचा निर्देश केला आहे.

वरील शास्त्रांच्या आधारे काही महत्त्वाची संगीत शास्त्रासंबंधीची माहिती खाली दिली आहे

**कोणता राग केव्हा योजावा ?**

वर्ण्य विषय प्रभावीपणे समजावा व ऐकणाराची तदनुरूप प्रवृत्ती व्हावी यासाठी रागामध्ये स्वरांची विशिष्ट योजना असते. त्यामुळे रसनिष्पत्ति बरी होते. दुसऱ्या दृष्टीने असे म्हणावे लागते की विशिष्ट रसानुभूतीसाठी विशिष्ट रागांची योजना करावी. संगीत समयसार या ग्रंथामध्ये कोणते राग कोणत्या प्रसंगी योजावेत याचे वर्णन आलेले आहे. खाली काही राग व ते कोणत्या प्रसंगी योजावेत हे दिले आहे. पहा—

| अ. नं. | रागाचे नाव | प्रसंग अथवा रस |
|---|---|---|
| १ | श्री | वीररस |
| २ | तोडी | हर्ष |
| ३ | वसंत | श्रृंगाररस |
| ४ | भैरव | प्रार्थना |
| ५ | शुद्धबंगाल | प्रहर्ष (अति हर्ष) |
| ६ | मालवश्री | शृंगाररस |
| ७ | वराटी | " |
| ८ | गौड | वीररस |
| ९ | धन्नासी | वीररस |
| १० | गुंडकृति | हास्य–शृंगार |
| ११ | गुर्जरी | शृंगार रस |
| १२ | सायरी | करुणारस |
| १३ | देशी | " |
| १४ | भैरवी | देवतादि प्रार्थना |
| १५ | मल्हारी | शृंगाररस |

शृंगार रसाकरिता बरेच राग व रागांग उपयोगात आणले जाऊ शकतात असे दिसते. बीभत्स रसनिष्पत्तीसाठी कोणता राग योजावा हे नमूद केलेले दिसत नाही. वरील वर्णन संगीत रत्नाकरातील वर्णनाशी मिळते-जुळते आहे. भातखंडे संगीत शास्त्राशी देखील वरील वर्णन काही रागांचे बाबतीत मिळतेच आहे.

**ताल व वाद्ये—**

गायनात तालाचे फार महत्त्व आहे हे जाणूनच की काय संगीत समयसार, संगीत रत्नाकर व संगीतोपनिपत्सारोद्धार या तिन्ही ग्रंथात तालाचे बरेच वर्णन आहे. संगीत सारोद्धार तर खास तालाचाच ग्रंथ आहे. संगीत समयसारामध्ये खालील महत्त्वाचा श्लोक आलेला आहे.

तालमूलानि गेयानि ताले सर्वं प्रतिष्ठितम् । तालहीनानि गेयानि मंत्रहीना यथाहुतिः ॥








या श्लोकावरून गायनात तालाचे किती महत्त्व आहे हे लक्षात येते. तालसंबंधी द्रुत, लघु, प्लुत, कला, प्रस्तार, विराम, काल, मात्रा आदि विचारात घेऊन संगीत सारोद्धार या ग्रंथामध्ये एकमात्रिक, द्विमात्रिक.... त्रिदन्मात्रिक, षष्टिमात्रिक असे वर्गीकरण आहे. या वर्गीकरणामधील काही तालांची नावे सध्या प्रचलित संगीतशास्त्रात बहुधा आढळत नाही. उदा:– तिसारक, उदीक्षण, रायवंकोल, चाचपुर, चच्चत्पुर, पृथ्वीकुंडल इ. याच ग्रंथात काही दीर्घ तालांची माहिती मिळते.

वाद्य–

अमापात्मक शब्दांच्या वर्णनामध्ये तत, वितत, घन, सौषिर अशा प्रकारांचे वर्गीकरण येते. धवल ग्रंथ, सर्वार्थसिद्धि इत्यादि ग्रंथामध्ये त्या निमित्ताने काही वाद्यांची नावे येतात. पहा–

चर्मतननानिमितः पुष्करभेरी दर्दुरादि प्रभवस्ततः । तन्त्रीकृतवीणासुघोषादि समुद्भवो विततः ।
ताल घण्टा लालनाद्यभिघातजो घनः । वंशशंखादि निमित्तः सौषिरः ।

धवल ग्रंथामध्ये 'वीणा,' 'त्रिसारिक,' 'आलापिनी,' 'वब्वीसक,' 'खुक्खुण,' 'पटह,' 'कालह' अशी देखील वाद्यांची नांवे आढळतात. पंचास्तिकाय ग्रंथामध्ये 'कंस' या वाद्याचे नांव आहे. भद्रबाहूकृत कल्पसूत्र (संस्कृतटीका) या ग्रंथात पणव, मुरज आणि मृदंग असे तीन प्रकार सांगितले आहेत. आवश्यकवृत्तिमध्ये 'भम्भा पृथुलमुखढक्काविशेषः' अशा शब्दाने 'भम्भा' या वाद्याचा उल्लेख आहे. 'मुकुंद' असेही एका मृदंगविशेषाचे नांव आहे. याशिवाय 'कटिका' 'तलिमा' 'तिडल्लिका' 'गोमुखी' 'दरदरिका' 'पटह' 'आडंबर' अशाही नांवाचा उल्लेख आहे.

अशा प्रकारे अनेक प्रकारच्या प्रदेशातून संगीत सरिता वाहत आलेली आहे. विस्तारभयास्तव अधिक चर्चा करीत नाही. तरी पण मध्ययुगीन हिंदी काव्यातून दृग्गोचर झालेल्या संगीतशास्त्राचा थोडक्यात आढावा घेऊन लेख संपवितो.

## चोवीस तीर्थंकरांची स्तुति केव्हां करावी ?

मुजफरनगर येथे कविवर नयनानंद यति होऊन गेला. त्याने नयनसुखविलास हा हिंदी काव्यग्रंथ लिहिला. स्व. ब्र. शीतलप्रसादजी स्मारक ग्रंथमालेकडून हा ग्रंथ दोन भागात प्रसिद्ध झाला आहे. दुसरा भाग मला पहावयास मिळाला नाही. पहिल्या भागात जवळ जवळ ४० रागिणीसह पद्यरचना आहे. ग्रंथाचे वैशिष्ट्य असे की, या मध्ये गायनाचा काल दिलेला आहे. कवीने अनेक विषयावर पद्यरचना केली आहे. विस्तारभयास्तव केवळ चोवीस तीर्थंकरासंबंधी पद्यरचना विशेष पाहू. २४ तीर्थंकरांची स्तुति २४ तासात विभागली आहे. राग-रागिणींचा विशेष उल्लेख आहे. त्यावरून खालील प्रमाणे माहिती संकलित करता येईल.

| अ. नं. | तीर्थंकर | पद्यराग | पद्यकाल |
|---|---|---|---|
| १ | श्री. ऋषभनाथ | कलिंगडा | सकाळी ६ ते ७ वाजे पर्यंत |
| २ | ,, अजितनाथ | भैरवी | ,, ७ ते ८ ,, |
| ३ | ,, संभवनाथ | बिलावल | ,, ८ ते ९ ,, |
| ४ | ,, अभिनंदननाथ | प्रौढी | ,, ९ ते १० ,, |
| ५ | ,, सुमतिनाथ | जोगियाआसावरी | ,, १० ते ११ ,, |
| ६ | ,, पद्मप्रभ | भैरुनर | ,, ११ ते १२ ,, |
| ७ | ,, सुपार्श्वनाथ | सारंग | दुपारी १२ ते १ ,, |
| ८ | ,, चंद्रनाथ | पीलू पंजाबी ठुमरी | ,, १ ते २ ,, |




| अ. नं. | | तीर्थंकर | पद्यराग | पद्यकाल |
|---|---|---|---|---|
| ९ | श्री. | पुष्पदंत | खास बरवा | ,, २ ते ३ ,, |
| १० | ,, | शीतलनाथ | झंझोटी | ,, ३ ते ४ ,, |
| ११ | ,, | श्रेयांसनाथ | उंकोटिकी | सायं. ४ ते ५ ,, |
| १२ | ,, | वासुपूज्य | जंगला ( ठुमरी ) | ,, ५ ते ६ ,, |
| १३ | ,, | विमलनाथ | धनाश्री | ,, ६ ते ७ ,, |
| १४ | ,, | अनंतनाथ | घानी ( गजलसारखी ) | ,, ७ ते ८ ,, |
| १५ | ,, | धर्मनाथ | श्याम कल्याण | रात्रौ ८ ते ९ ,, |
| १६ | ,, | शांतिनाथ | ठुमरी ( खमाज ) | ,, ९ ते १० ,, |
| १७ | ,, | कुंथुनाथ | ठुमरी ( खमाज ) | ,, १० ते ११ ,, |
| १८ | ,, | अरहनाथ | देशखार | ,, ११ ते १२ ,, |
| १९ | ,, | मल्लिनाथ | सोरठ ( खास ) | ,, १२ ते १ ,, |
| २० | ,, | मुनिसुव्रतनाथ | बिहाग | उ. रात्रौ १ ते २ ,, |
| २१ | ,, | नमिनाथ | जयजयवंती | ,, २ ते ३ ,, |
| २२ | ,, | नेमिनाथ | जंगला (मांडरागातील ठुमरी) | ,, ३ ते ४ ,, |
| २३ | ,, | पार्श्वनाथ | परज | ,, ४ ते ५ ,, |
| २४ | ,, | महावीर | परज | ,, ५ ते ६ ,, |

या ग्रंथामध्ये शंभर पदे आहेत. तालाचे महत्व सांगतांना योद्ध्याची उपमा दिली आहे. ज्याप्रमाणे युद्धामध्ये योद्धा घोड्यावरून पडला असता अपमान होतो, त्याचप्रमाणे ताल चुकल्यास गायकाचा अपमान होतो. ग्रंथाच्या सुरवातीस गुण, दोष, आसन इ. ची चर्चा केली आहे.

कवि भूधरदास, भागचंद, बुधचंद, द्यानतराय, दौलतराम, प्रभृतींनी संगीत सेवा बरीच केली असे त्यांनी केलेल्या रागदारीत केलेल्या पदसंग्रहावरून दिसते. आजकाल प्रसिद्ध व प्रचलित असलेल्या रागरागिणी शिवाय कांही नवीन रागांची नांवे आढळून येतात– उदा. इमन, पंञ्याप, कसूमी इ.

**संक्षेप–**

वरील प्रमाण त्रोटक माहिती संकलित केली आहे. आज जरी जैन संगीताकडे विशेष लक्ष नसले तरी पूर्वी उपेक्षा होत नसे. ही झालेली उपेक्षा लक्षात घेऊन संगीतप्रेमी विद्वान जैन संगीत प्रचारात आणतील अशी अपेक्षा आहे.

**संदर्भ सूचि –**


१) जैन सिद्धांत भास्कर, भा. २९ कि. १, भा. ७ कि. १, भा. १० कि. १
२) दिव्यध्वनि अंक ११, १२ व १ सन १९७६
३) सर्वार्थसिद्धि
४) स्वामि कार्तिकेयानुप्रेक्षा
५) धवल ग्रंथ
६) नयन सुख विलास (भाग–पहिला).
७) जैन संदेश शोधांक–३८





( वेळे अभावी काही लेखकांची व लेखिकांची प्रसिद्धीसाठी पूर्व परवानगी मागता आली नाही त्याबद्दल त्यांची क्षमा मागतो. )

## संगीत व नृत्य

"जैनधर्म हा कठोर विधिनिषेधांचा धर्म आहे. तो बहुधा जीवनाच्या माधुर्याला नाकारतो. जीवनाच्या स्वाभाविक व अनुकूल स्थितीचा अस्वीकार करतो व ललितकलेशी त्याचा संबंध नाही" ही जैनधर्माविषयीची कल्पना अपरिपक्व असल्याचे जैन धर्माने संगीताच्या क्षेत्रातही प्रगती करून दाखवून दिले आहे. जैन संस्कृतीनुसार युगादिपुरुष ऋषभदेवाने संगीतविद्येचा आविष्कार केला होता. ते केवळ आविष्कारकच नव्हते तर, ते स्वतः शिक्षक व पुरस्कर्तेही होते.

आचार्य जिनसेन म्हणतात–

विभुर्वृषभसेनाय गीतवाद्यार्थसंग्रहम् । गन्धर्वशास्त्रमाचख्यौ यत्राध्यायाः परः शतम् ॥

– आदिपुराण

मनुकुलतिलक वृषभदेवांनी आपल्या प्रथम पुत्राला ( वृषभसेनाला ) गीतवाद्य व गांधर्व विद्येचा उपदेश दिला होता. त्याचे शत अध्यायही होतील.

वाचनाचार्य सुधाकलश संगीतोपनिषत्सारोद्धारामध्ये लिहितात–

इति जैनमते तूर्यत्रिकस्योत्पत्तिरिष्यते । हरात् संगीत निष्पत्तिः प्रसिद्धास्त्वखिले जने ॥

या प्रमाणे जैनमतात वर वर्णिलेल्या तूर्यत्रिकाची (तूर्य, वाद्य व नाटक) उत्पत्ति जैनमतात इष्ट मानली आहे. शिवाने संगीताची उत्पत्ति केली अशी लोक प्रसिद्धि आहे. शिव हे वृषभदेवाचे पर्यायवाची नाव आहे.

सम व गीत या दोन शब्दांच्या एकत्रीकरणाने संगीत हा शब्द बनला आहे. तोंडी गाण्याला गीत म्हणतात. अभिनवगुप्तांनी संगीताला नाटकातील प्राण म्हटले आहे. सम् म्हणजे चांगले. वाद्य आणि नृत्य या दोहोंचा मिलाप झाला म्हणजे गीत ( गायन ) चांगले होते. वाद्य किंवा नृत्य यांना फक्त गायनाचा उपरंजक आणि उत्कर्ष विधायक म्हटले जाते. वाद्य, नाट्य, गेय व अभिनय यांच्या फरकावरून संगीताचे चार प्रकार सांगितले आहेत. त्यात वीणा, तल,ताललय, वादित्रला मुख्य स्थान दिले आहे. स्थानांगसूत्रात सात स्वरांचा उल्लेख आहे. जैन परंपरेनुसार, सात स्वर व अकरा अलंकारांचे वर्णन चतुर्दशपूर्वांतर्गत स्वरप्राभृत नावाच्या ग्रंथात केले होते. दुर्भाग्याने हा ग्रंथ आज उपलब्ध नाही. आज या विषयाचा अभ्यास पूर्वीच्याच ग्रंथाच्या आधारावर तयार केलेल्या भरत व विशाखिल या ग्रंथावरूनही करता येतो. जैन स्थानांगसूत्रामध्ये षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद नावाच्या सात स्वरांचा उल्लेख आहे. या सात स्वरामध्ये अग्रजिव्हा, उर, कंठोद्गमन, मध्यजिव्हा, नासा, दंतोष्ठ व मूर्धा हे क्रमशः सात स्वर–स्थान असतात. मोर, कोंबडा, हंस, गाय, कोकिळ, क्रौंच व हत्ती यांच्याकडून या सप्त स्वरांचे उच्चारण होते. मृदंग, काहला, शंख, झल्लरी ( झांजा ) गोधिका, आडम्बर ( पटह ) व महाभेरी या वाद्यामधून हे स्वर निर्माण होतात. याप्रकारे स्वरांचे लाभ, त्याचे तीन ग्राम, ग्रामांची मूर्च्छना व त्यांचे गुण व दोष इत्यादींचे या सूत्रात वर्णन केलेले आढळते. इसवी सनाच्या सातव्या शतकात होऊन गेलेल्या रविषेणाच्या पद्मचरित्राचा स्वाध्याय जैनलोकांच्या घरोघरी चालतो. हा ग्रंथ अनेक विषयांचा खजिना आहे. विद्या व कला यांच्याबरोबर संगीतकलेविषयी देखील महत्वपूर्ण माहिती या ग्रंथात आढळते. पद्मचरितात अनेक ठिकाणी संगीत कलेचा उल्लेख केलेला असून, त्यात संगीत शास्त्रातील स्वर, वृत्ति, मूर्च्छना, लय, ताल, जाति, ग्राम इत्यादी शब्दांचा प्रयोग व त्यापैकी अनेकांचे विस्तृत वर्णन केले आहे.




षड्ज ऋषभ, गान्धार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद हे सात स्वर आहेत. भरतमुनीने सुद्धा यांचीच स्वरसंख्येत गणति केली आहे. स्वरशद्वाचा मूळ अर्थ या ग्रंथात दिला आहे तो असा.

**श्रुत्यन्तरभावी यः शद्वो अनुरणात्मकः । स्वतोरञ्जयते श्रोतुश्चित्तं स स्वर ईप्यते ॥**

या श्लोकात स्वरांचे लक्षण सांगितले आहे की, १) लागोपाठ श्रुतीला निर्माण केल्यामुळे स्वराची निर्मिती होते. २) शद्वांच्या गुंजनालाच स्वर म्हणतात. म्हणजे प्रत्येक शद्वातील आघातानंतर होणारा शद्व लहरींच्या क्रमाने उत्पन्न होऊन नंतर क्रमाने विलीन होतो. यालाच गुंजन ( अनुरणन ) म्हणतात. गुंजन हेच स्वरांचे मुख्य रूप आहे, कारण गुंजनात स्वर श्रुतीचे प्रकटीकरण घडते. ३) प्रत्येक स्वर हा दुसऱ्या स्वराच्या मदतीशिवाय स्वतःच उपरंजक आहे.

वृत्ति– पद्मचरितात द्रुता, मध्यमा आणि विलम्बिता या तीन वृत्तींच्या प्रयोगांचा उल्लेख केला आहे.

मूर्च्छना– क्रमयुक्त झाले तर सात स्वरांना मूर्च्छना म्हटले जाते. मूर्च्छना हा शद्व मूर्च्छ धातूपासून बनला आहे. त्याचा अर्थ मोह व समुच्छाय ( उत्सेध, उभार, चमकणे, व्यक्त होणे. ) असा आहे. मूर्च्छन धातूचा अर्थ चमकणे अथवा उभरणे. श्रुतीच्या मृदुत्वाला ( मंद– खालच्या अवस्थेला ) काही लोक मूर्च्छना म्हणतात. काही लोक म्हणतात की, रागरूपी अमृतसरोवरांत गायक व श्रोत्यांची मने पूर्णपणे अवगाहित होणे हीच मूर्च्छना होय. पण भरत संगीतात क्रमयुक्त सात स्वराच्या प्रयोगालाच मूर्च्छना म्हटले आहे. पद्मचारितात गंधर्वाकडून आलेल्या एकवीस मूर्च्छना आणि एकोणपन्नास ध्वनींच्या प्रयोगाचा उल्लेख आहे. या ठिकाणी एकवीस मूर्च्छनांना मतलब षड्जग्रामाच्या एकवीस ओडुव तानांशी तसेच एकोणपन्नास ध्वनींचा मतलब सर्व मूर्च्छनांत केल्या जाणाऱ्या एकोणपन्नास तानांशी आहे.

**षड्ज ग्रामाच्या एकवीस ओडुव ताना**

| | | |
|---|---|---|
| उत्तरमध्यमा | १ | × रे ग म × ध नि |
| | २ | – स × ग म × ध नि |
| | ३ | स रे × म प ध × |
| रजनी | ४ | नी × रे ग म × ध |
| | ५ | नी स × ग म × ध |
| | ६ | × स रे × म प ध |
| उत्तरायत्ता | ७ | ध नी × रे ग म × |
| | ८ | ध नी स × ग म × |
| | ९ | ध × स रे × म प |
| शुद्धषड्जा | १० | × ध नी × रे ग म |
| | ११ | × ध नी स × ग म |
| | १२ | प ध × स रे × म |
| मत्सरीकृता | १३ | म × ध नी × रे ग |
| | १४ | म × ध नी स × ग |
| | १५ | म प ध × स रे × |
| अश्वक्रांता | १६ | ग म × ध नी × रे |
| | १७ | ग म × ध नी स × |
| | १८ | × म प ध × स रे |





| | | |
|---|---|---|
| अभितद्रता | १९ | रे ग म × ध नी × |
| | २० | × ग म × ध नी म |
| | २१ | रे × म प ध × स |

सर्व मूर्च्छनात घेतल्या जाणाऱ्या एकोणपन्नास (षाड्व) ताना

| | | |
|---|---|---|
| उत्तरमन्द्रा | १ | × रे ग म प ध नी |
| | २ | म × ग म प ध नी |
| | ३ | ग रे ग म × ध नी |
| | ४ | स रे ग म प ध × |
| रजनी | ५ | नी × रे ग म प ध |
| | ६ | नी सा × ग म प ध |
| | ७ | नी सा रे ग म × ध |
| | ८ | × सा रे ग म प ध |
| उत्तरायता | ९ | ध नी × रे ग म प |
| | १० | ध नी स × ग म प |
| | ११ | ध नी स रे ग म × |
| | १२ | ध × स रे ग म प |
| शुद्धषड्जा | १३ | प ध नी × रे ग म |
| | १४ | प ध नी सा × ग म |
| | १५ | × ध नी सा रे ग म |
| मत्सरीकृता | १६ | प ध × सा रे ग म |
| | १७ | म प ध नी × रे ग |
| | १८ | म प ध नी सा × ग |
| | १९ | म × ध नी सा रे ग |
| | २० | म प ध × सा रे ग |
| अश्वक्रान्ता | २१ | ग म प ध नी × रे |
| | २२ | ग म प ध नी स × |
| | २३ | ग म × ध नी स रे |
| | २४ | ग म प ध × स रे |
| अभिरुद्गता | २५ | रे ग म प ध नी × |
| | २६ | × ग म प ध नी स |
| | २७ | रे ग म × ध नी स |
| | २८ | रे ग म प ध × स |
| सौवीरी | २९ | म प ध नी × रे ग |
| | ३० | म प ध नी स × ग |
| | ३१ | म प ध नी स रे × |
| हरिणाश्वा | ३२ | ग म प ध नी × रे |
| | ३३ | ग म प ध नी म × |
| | ३४ | × म प ध नी स रे |

| | | |
|---|---|---|
| कलोपनता | ३५ | रे ग म ध ध नी × |
| | ३६ | × ग म प ध नी स |
| | ३७ | रे × म प ध नी स |
| शुद्धमध्या | ३८ | × रे ग म प ध नी |
| | ३९ | स × ग म प ध नी |
| | ४० | स रे × म प ध नी |
| मार्गी | ४१ | नी ×. रे ग म प ध |
| | ४२ | नी सा × ग म प ध |
| | ४३ | नी सा रे × म प ध |
| पौरवी | ४४ | ध नी × रे ग म प |
| | ४५ | ध नी सा × ग म प |
| | ४६ | ध नी सा रे × म प |
| हृष्यका | ४७ | प ध नी × रे ग म |
| | ४८ | प ध नी स × ग म |
| | ४९ | प ध नी स रे × म |

लय– तालक्रियेनंतर, पुढील तालक्रियेच्या अगोदर केल्या जाणाऱ्या विश्रामाला लय असे म्हणतात. पद्मचरितात द्रुत, मध्य आणि विलम्बित असे लयाचे तीन भेद केले आहेत. शीघ्रतम लयाला द्रुत, त्याच्या दुप्पट मध्य आणि त्याहून दुप्पट विलंवित समजावा. चित्रवार्तिक आणि दक्षिणमार्गात विश्रांति कालाच्या प्रमाणात फरक असल्यामुळे क्रमशः लयामध्ये क्षिप्रभाव, मध्यभाव आणि चिरभाव यामुळे लयाचे अनेक भेद होतात. फलतः क्षिप्रभावात द्रुत, मध्य व विलंवित भेदांचे मध्यभावातील द्रुत, मध्य, विलंवित भेदांचे, त्याचप्रमाणे चिरभावातील द्रुत, मध्य विलंवित भेदांचे स्वरूप वेगवेगळे बनते.

तीनही मार्गामध्ये पाच लघुअक्षरांच्या उच्चारणका इतका काल एक मात्रेचा असतो. तरी देखील चित्र मार्गात दहा लघु अक्षरांच्या उच्चारणकालाइतक्या कालानंतर होणारा लय द्रुत म्हणविला जातो. वार्तिक मार्गात वीस लघु अक्षरांच्या उच्चारण कालानंतर होणारा लय मध्य म्हटला जातो. दक्षिण मार्गात चाळीस लघु अक्षरांच्या उच्चारणकाळानंतर होणाऱ्या लयाला विलंबित म्हटले जाते. मार्गभेदामुळे किंवा कालभेदामुळे लयभेदाचेही द्रुत, मध्य व विलंवित असे तीन विभाग पडतात. या लयाचा उपयोग अक्षर, शब्द किंवा वाक्यात होत नसतो. कारण बोलण्याच्या वेळी असणाऱ्या लयाचा संगीताशी कसलाच संबंध असत नाही.

ताल-प्रतिष्ठार्थक 'तल्' धातूला अधिकरणार्थक 'घ' प्रत्यक्ष लागून ताल असा शब्द बनला आहे. तालातच गीत, वाद्य व नृत्य यांचा समावेश होतो. लघुपासून गुरु आणि प्लुत अशा सशब्द व निशब्द क्रियाद्वारे गीत, वाद्य नृत्य यांना मर्यादित करणाऱ्यांना ताल म्हणतात. पाच निमेष अथवा पाच अक्षरांच्या उच्चारणकालाला भरतवर्णित तालात लघु अथवा मात्रा म्हटले आहे. दोन लघु आणि एक गुरूचा काल निर्माण केला जातो व तीन लघूनी एक प्लुत बनतो. हे लघु, गुरु व प्लुत छदशास्त्र अथवा व्याकरणशास्त्रातील ऱ्हस्व, दीर्घ व प्लुताहून वेगळे आहेत. कला देखील गुरूचा पर्याय आहे. निशब्द आणि सशब्द क्रियांना देखील कला म्हटले जाते. स्पंदन हे तालाचे स्वरूप आहे. स्पंदन रूपात जगातील सर्व शक्ति अवतरली आहे. तालाला शिवशक्ति म्हटले आहे. ( ता = शिव, ल = शक्ति ) पद्मचरितात अस्त्र आणि चतुरस्त्र या तालाच्या दोन योनी सांगितल्या आहेत. भरतोक्ततालात चतुरस्त्र म्हणजे चञ्चत्पुट आणि त्र्यस्त म्हणजे चापपुट मुख्य आहेत. या दोहोंचे यथाक्षर,

| | | |
|---|---|---|
| अभितद्वता | १९ | रे ग म × ध नी × |
| | २० | × ग म × ग नी म |
| | २१ | रे × म प ध × ग |

सर्व मूर्च्छनांत घेतल्या जाणाऱ्या एकोणपन्नास (षाडव) ताना

| | | |
|---|---|---|
| उत्तरमन्द्रा | १ | × रे ग म प ध नी |
| | २ | म × ग म प ध नी |
| | ३ | म रे ग म × ध नी |
| | ४ | म रे ग म प ध × |
| रजनी | ५ | नी × रे ग म प ध |
| | ६ | नी सा × ग म प ध |
| | ७ | नी सा रे ग म × ध |
| | ८ | × सा रे ग म प ध |
| उत्तरायता | ९ | ध नी × रे ग म प |
| | १० | ध नी स × ग म प |
| | ११ | ध नी स रे ग म × |
| | १२ | ध × स रे ग म प |
| शुद्धषड्जा | १३ | प ध नी × रे ग म |
| | १४ | प ध नी सा × ग म |
| | १५ | × ध नी सा रे ग म |
| मत्सरीकृता | १६ | प ध × सा रे ग म |
| | १७ | म प ध नी × रे ग |
| | १८ | म प ध नी सा × ग |
| | १९ | म × ध नी सा रे ग |
| | २० | म प ध × सा रे ग |
| अश्वक्रान्ता | २१ | ग म प ध नी × रे |
| | २२ | ग म प ध नी स × |
| | २३ | ग म × ध नी स रे |
| | २४ | ग म प ध × स रे |
| अभिरुद्गता | २५ | रे ग म प ध नी × |
| | २६ | × ग म प ध नी स |
| | २७ | रे ग म × ध नी स |
| | २८ | रे ग म प ध × स |
| सौवीरी | २९ | म प ध नी × रे ग |
| | ३० | म प ध नी स × ग |
| | ३१ | म प ध नी स रे × |
| हरिणाश्वा | ३२ | ग म प ध नी × रे |
| | ३३ | ग म प ध नी स × |
| | ३४ | × म प ध नी स रे |

| | | |
|---|---|---|
| कलोपनता | ३५ | रे ग म ध ध नी × |
| | ३६ | × ग म प ध नी स |
| | ३७ | रे × म प ध नी स |
| शुद्धमध्या | ३८ | × रे ग म प ध नी |
| | ३९ | स × ग म प ध नी |
| | ४० | स रे × म प ध नी |
| मार्गी | ४१ | नी × रे ग म प ध |
| | ४२ | नी सा × ग म प ध |
| | ४३ | नी सा रे × म प ध |
| पौरवी | ४४ | ध नी × रे ग म प |
| | ४५ | ध नी सा × ग म प |
| | ४६ | ध नी सा रे × म प |
| हृण्यका | ४७ | प ध नी × रे ग म |
| | ४८ | प ध नी स × ग म |
| | ४९ | प ध नी स रे × म |

लय– तालक्रियेनंतर, पुढील तालक्रियेच्या अगोदर केल्या जाणाऱ्या विश्रामाला लय असे म्हणतात. पद्मचरितात द्रुत, मध्य आणि विलम्बित असे लयाचे तीन भेद केले आहेत. शीघ्रतम लयाला द्रुत, त्याच्या दुप्पट मध्य आणि त्याहून दुप्पट विलंबित समजावा. चित्रवार्तिक आणि दक्षिणमार्गात विश्रांति कालाच्या प्रमाणात फरक असल्यामुळे क्रमशः लयामध्ये क्षिप्रभाव, मध्यभाव आणि चिरभाव यामुळे लयाचे अनेक भेद होतात. फलतः क्षिप्रभावात द्रुत, मध्य व विलंबित भेदांचे मध्यभावातील द्रुत, मध्य, विलंबित भेदाचे, त्याचप्रमाणे चिरभावातील द्रुत, मध्य विलंबित भेदांचे स्वरूप वेगवेगळे बनते.

तीनही मार्गामध्ये पाच लघुअक्षरांच्या उच्चारणका इतका काल एक मात्रेचा असतो. तरी देखील चित्र मार्गात दहा लघु अक्षरांच्या उच्चारणकालाइतक्या कालानंतर होणारा लय द्रुत म्हणविला जातो. वार्तिक मार्गात वीस लघु अक्षरांच्या उच्चारण कालानंतर होणारा लय मध्य म्हटला जातो. दक्षिण मार्गात चाळीस लघु अक्षरांच्या उच्चारणकाळानतर होणाऱ्या लयाला विलंबित म्हटले जाते. मार्गभेदामुळे किंवा कालभेदामुळे लयभेदाचेही द्रुत, मध्य व विलंबित असे तीन विभाग पडतात. या लयाचा उपयोग अक्षर, शब्द किंवा वाक्यात होत नसतो. कारण बोलण्याच्या वेळी असणाऱ्या लयाचा संगीताशी कसलाच संबंध असत नाही.

ताल-प्रतिष्ठार्थक 'तल्' धातूला अधिकरणार्थक 'घ' प्रत्यक्ष लागून ताल असा शब्द बनला आहे. तालातच गीत, वाद्य व नृत्य यांचा समावेश होतो. लघुपासून गुरु आणि प्लुत अशा सशब्द व निशब्द क्रियाद्वारे गीत, वाद्य नृत्य यांना मर्यादित करणाऱ्यांना ताल म्हणतात. पाच निमेष अथवा पाच अक्षरांच्या उच्चारणकालाला भरतवर्णित तालात लघु अथवा मात्रा म्हटले आहे. दोन लघु आणि एक गुरूचा काल निर्माण केला जातो व तीन लघूनी एक प्लुत बनतो. हे लघु, गुरु व प्लुत छंदशास्त्र अथवा व्याकरणशास्त्रातील ऱ्हस्व, दीर्घ व प्लुताहून वेगळे आहेत. कला देखील गुरूचा पर्याय आहे. निशब्द आणि सशब्द क्रियांना देखील कला म्हटले जाते. स्पंदन हे तालाचे स्वरूप आहे. स्पंदन रूपात जगातील सर्व शक्ति अवतरली आहे. तालाला शिवशक्ति म्हटले आहे. (ता = शिव, ल = शक्ति) पद्मचरितात अस्त्र आणि चतुरस्त्र या तालाच्या दोन योनी सांगितल्या आहेत. भरतोक्ततालात चतुरस्त्र म्हणजे चञ्चत्पुट आणि त्र्यस्त म्हणजे चाचपुट मुख्य आहेत. या दोहोंचे यथाक्षर,

द्विकल व चतुष्कल असे तीन भेद आहेत. यथाक्षराहून दुप्पट मात्रा असल्यामुळे द्विकल आणि चौपट मात्रा असल्यामुळे चतुष्कल रूपांची निर्मिती होते.

तालाच्या नावातील अक्षरावरून जेव्हा तालाचे रूप ठरविले जाते तेव्हा त्यांना यथाक्षर म्हटले जाते. यथाक्षर चञ्चत्पुटात अंतिम अक्षर ट प्लुत असते. चापपुटात असत नाही. जोडाक्षरापूर्वीचा वर्ण ऱ्हस्व असला तरी दीर्घ अथवा गुरु मानला जातो. फलतः चञ्चत्पुट शब्दातील अक्षरे क्रमशः गुरु, गुरु लघु आणि प्लुत आहेत. यथाक्षर चञ्चत्पुटात आठ आणि चाचपुटात सहा मात्रा आसतात.

**जाति–** रञ्जन व अदृष्ट अभ्युदयाला जन्म देत विशिष्ट स्वरच विशेष प्रकारच्या रचनेने युक्त झाल्यानंतर जाति म्हटले जातात. दहा लक्षणानी युक्त विशिष्ट स्वररचनेला जाति म्हणतात. श्रुति, ग्रह, स्वर इत्यादिकांच्या एकत्रीकरणाने जातींची निर्मिती होते. म्हणून त्यांना जाति म्हटले जाते. जातीमुळे रसाच्या अनुभवाला अथवा उत्पत्तीला सुरुवात होते. जाति, राग इत्यादींच्या उत्पत्तीला कारण असल्यामुळे विशिष्ट स्वररचना जाति हे नाव धारण करते. पद्मचरितात धैवती, आर्षभी, षड्ज, षड्जोदीच्या, निषादिनी, गांधारी, षड्जकैशकी, षड्जमध्यमा, गान्धारोदीच्या, मध्यमपंचमी, गांधारपंचमी, रक्तगांधारी, मध्यमा, आंध्री, मध्यमोदीच्या, कर्मारवी, नंदिनी आणि कौशिकी या अठरा जाती सांगितल्या आहेत. भरतमुनीने देखील जातीचे हेच अठरा भेद सांगितले आहेत.

**धैवती–** आरोहात षड्ज आणि पंचम लंघ्य म्हणजे वर्ज्य आहेत. रि ध बहुलस्वर आहेत. ताल पंचपाणी आहे. मार्ग, गीति, प्रयोग वगैरे षड्जजाती प्रमाणे असतात. बारा कला आहेत. या जातीत चोक्ष, कौशिकी, देशी, सिंहली इत्यादी रागांचे प्रतिबिंब आहे.

**आर्षभी–** या जातीत अन्य पाच स्वरावरोबरच गांधार व निषाद यांचा मिळून प्रयोग होतो. गांधार व निषाद बहुलस्वर या जातीत आहेत. पंचम अल्पस्वर आहे. पंचमाचे लंघन घडते. चंचपुट आहे. आठ कला आहेत. नैष्क्रामिक ध्रुवात प्रयोग केला जातो. या जातीत देशी मधुकरीचे प्रतिबिंब आहे.

**षड्ज–** याला षाड्जी असेही म्हणतात. या जातीत षड्व आणि औडव रहित पूर्णतया काकली स्वरांचा प्रयोग आहे. स गा स धा जोडून प्रयोग केला जातो. जेव्हा गांधार अंश असतो तेव्हा निषादाचा लोप केला जात नाही. या जातीच्या रचनेत ताल आहे. पचपाणीत, षट्पिता पूजक नावाचा जो ताल आहे तो येथेही आहे. ही एककला, द्विकला व चतुष्कला रूपात प्रयुक्त केली जाते. या तालाच्या मार्गात चित्रवार्तिक आणि दक्षिण यांचा प्रयोग केला जातो.

**गीति–** गीतीमध्ये मागधी, संभाविता आणि पृथुला या तिहींचा प्रयोग आहे. नाटकात या जातीचा प्रयोग नैष्कामिक ध्रुवात पहिल्या दृश्यात केला जात होता. संगीतरत्नाकार कालाच्या वरारी रागाचे प्रतिबिंब यात होते.

**षड्जोदीच्या–** स म नि आणि ग या चोहोत दोन दोन स्वरांचा प्रयोग एकदम होतो. मंद्र आणि गांधार बहुल स्वर आहेत. षड्ज व ऋषभ अतिबहुल स्वर आहेत. निषाद आणि गांधार अंश असल्यास निषादाचे अल्पत्व असत नाही. गीति, ताल, कला, विनियोग इत्यादी षाड्जीप्रमाणेच आहेत. याचा प्रयोग दुसऱ्या दृश्यांत ध्रुवगानात होत असे.

**निषादिनी–** स म प ध अल्पस्वर आहेत आणि नि रि ध बहुल स्वर आहेत. विनियोग षाड्जीप्रमाणेच होतो. ताल चञ्चपुट आहे. कला सोळा आहेत. चोक्ष साधारित देशी वोलावलीचे प्रतिबिंब या जातीत आढळते.

**गांधारी–** या जातीत न्यास स्वर आणि अंश स्वर अन्य स्वरांबरोबरच प्रयोग केले जातात. रि आणि ध चा बरोबर प्रयोग केला जातो. पंचमाचा अंश असताना जाति षड्व आणि औडव रहित अर्थात पूर्ण असते. नि सम




यात कोणताही एक स्वर अंश असेल तर तो औडव रूप नसतो पूर्ण व षाडवरूपच असतात. याचा ताल चन्चपुट आहे प्रत्येक अक्षराच्या कला सोळा आहेत. याचा प्रयोग तिसऱ्या दृश्यात ध्रुव गानात होत असे. गाधारपंचमी, देशी, वेलावली या दोन्ही रागांचे प्रतिबिंब या जातीत आहे.

**षड्ज कौशिकी–** ऋषभ व मध्यम अल्पत्व स्वर आहेत. ताल चन्चपुट आहे. कला सोळा आहेत. दुसऱ्या दृश्यात प्रावेशिकी ध्रुवात यांचा प्रयोग होत असे. या जातीत गांधारपंचम, हिंदोल व देशी वेलावलीची प्रतिबिंबे आहेत.

**षड्ज मध्यमा–** या जातीत सर्व अंश स्वरातील दोन दोन स्वरांचा प्रयोग एकदम होतो. या जातीत अंतरकाकिली स्वरांचा प्रयोग आहे. निषादांचे अल्पत्व आहे. गाधारांश नसताना षड्व-औडवात गांधार आणि निषाद विवादी स्वर आहेत. षड्जीप्रमाणेच गीती ताल व काल आहेत. याचा प्रयोग दुसऱ्या दृश्यात ध्रुवगानात होतो.

**गांधारोदीच्या–** पूर्ण स्वरूपात अंशाशिवाय अन्य स्वर अल्पत्वाचे आहेत. षाड्जात देखील नि ध प आणि ग चे अल्पत्व आहे. रि आणि ध बरोबरच येतात. ताल चन्चपुट आहे. कला सोळा आहेत. चौथ्या दृश्यात ध्रुवगानात याचा प्रयोग होतो.

**मध्यम पंचमी–** या जातीत स ग म अल्पस्वर आहेत. रि म आणि ग नि चे प्रयोग बरोबर होतात. या जातीत देखील अंतरकाकली स्वरांचा प्रयोग आहे. ऋषभ अंश असतो तेव्हा औडवरूप नसतो. पूर्ण आणि षाड्वच असतात. ताल चन्चपुट आहे. तिसऱ्या दृश्यात ध्रुवगानात याचा प्रयोग होत असे. चौस, पंचम आणि देशी आंध्रालीच्या रागछाया या जातीत उमटल्या आहेत.

**गांधार पंचमी–** या जातीत गांधारी आणि पंचमी दोन्ही जातीच्या समान स्वरांचा प्रयोग एक दुसऱ्यावरोवर होतो. ताल चन्चपुट आहे. कला सोळा आहेत. चवथ्या दृश्यात ध्रुवगानात याचा प्रयोग होत असे.

**रक्तगांधारी–** षड्ज आणि गांधारीचा प्रयोग मिळून होतो. धैवत व निषाद कुलस्वर आहेत. ताल, गीति व कला षाड्जी प्रमाणेच आहेत. तिसऱ्या दृश्यात ध्रुवगानात याचा प्रयोग होत असे.

**मध्यमा–** या जातीत षड्ज व मध्यम बहुलस्वर आहेत. या जातीत साधारण स्वर म्हणजे अंतरकाकनी स्वरांचा प्रयोग आहे. गांधार आणि निषाद अल्पस्वर आहेत. ताल चन्चपुट आहे. कला आठ आहेत. याचा प्रयोग दुसऱ्या दृश्यात ध्रुवगानात होत असे. चोस, षाड्व आणि देशी आंध्राली या दोहोंचे प्रतिबिंब या जातीत उमटले आहे.

**आंध्री–** या जातीत रि ग ध आणि नि हे स्वर मिसळून प्रयोग करावा लागतो. अंश स्वरापासून न्यास स्वराचा क्रम संचार आहे. बाकीचे स्वरूप गांधारपंचमी प्रमाणेच आहे.

**मध्यमोदीच्या–** या जातीत अल्पत्व, बहुत्व व स्वरसंगति गांधाररोदीच्या प्रमाणे आहे. ताल चन्चपुट आहे. कला सोळा आहेत. चौथ्या दृश्यात ध्रुवगानात याच प्रयोग होत असे.

**कर्मारवी–** या जातीत जे स्वर अंशाचे नाहीत ते अंतर मार्ग प्रयोगातील बहुलस्वर आहेत. गांधार अतिबहुलस्वर आहे. अंशस्वरातील दोन दोन स्वरांचा एका वेळी प्रयोग होतो. ताल चन्चपुट आहे. कला सोळा आहेत. पाचव्या दृश्यात ध्रुवगानात याचा प्रयोग होत असे.

**नंदनी–** या जातीत गांधार ग्रह स्वर आहे. काहींच्या मते पंचमदेखील ग्रहस्वर आहे. मन्द्र, ऋषभ, बहुलस्वर आहेत. ताल चन्चपुट आहे. कला बत्तीस आहेत. नाटकात पहिल्या दृश्यात ध्रुवगानात याचा प्रयोग होत असे.

**कौशिकी–** या जातीत निषाद व धैवत असतील तर पंचम न्यास असला पाहिजे. याविषयी मतभेदसुद्धा आहेत. नि आणि ग अंश असताना नि ग आणि प हे तीन न्यास स्वर असले पाहिजेत. ऋषभ अल्पस्वर आहे. निषाद व पंचम बहुल स्वर आहेत. सगळ्या अंश स्वरात म्हणजे स ग म प ध नि मध्ये दोन दोन स्वरांचा प्रयोग मिळून होतो. ताल, कला आणि गीत षड्‌जीप्रमाणेच आहेत. याचा प्रयोग पाचव्या दृश्यात ध्रुवगानात होत असे.

**संगीताची अभिव्यक्ति–** संगीताची अभिव्यक्ति कंठ, मस्तक व हृदयातून होते.

**संगीताचे चार पद–** स्थायी, संचारी, आरोही, आणि अवरोही या चार प्रकारच्या वर्णांनी युक्त असल्यामुळे पदे देखिल चार प्रकारची असतात. या चार पदात संगीत सामावले आहे.

**स्थायी पदातील अलंकार–** प्रसन्नादि, प्रसन्नान्त, मध्यप्रसाद व प्रसन्नाद्यवसान हे चार स्थायीपदाचे अलंकार होत.

**संचारी पदाचे अलंकार–** निर्वृत, अस्थित, बिन्दु, प्रेङ्खोलित तार, मंद्र आणि प्रसन्न हे सहा संचारी पदाचे अलंकार आहेत.

**आरोही पदाचे अलंकार–** प्रसन्नादी नावाचा आरोही पदाचा एकच अलंकार आहे.

**अवरोही पदाचे अलंकार–** प्रसन्नात व कुहर हे दोन अलकार अवरोही पदाचे आहेत.

**ग्राम–** संवादी स्वरांच्या समूहाला ग्राम म्हणतात. त्यात व्यवस्थित रूपाने श्रुती असतात आणि तो मूर्च्छना, तान, वर्ण, क्रम, अलंकार, इत्यादींकांचा आधार असतो.

**नृत्य, वाद्य व नाट्य इत्यादी कला–** प्राचीन भारतीय जैन समाजाने संगीताबरोबरच नृत्यकला, वाद्यकला व नाट्यकला इत्यादी मध्येही प्रगति केल्याची माहिती मिळते. उत्सव किंवा धार्मिक सणांच्या प्रसंगी स्त्री व पुरुष एकत्र नृत्य करीत असत. वाराणसी येथे मदनमहोत्सव मोठ्या आनंदाने, नाचून गाणे गाऊन साजरा केला जात होता अशी माहिती मिळते. वीणा वाजवीत, नाचत गात जाणाऱ्या या टोळ्याकडे पाहून समाज मंत्रमुग्ध होत असे. या उत्सवांच्या प्रसंगी नर्तिकांचेही नाच, गायन होत असे. कवी आपल्या काव्यांनी समाजाला मंत्रमुग्ध करून टाकीत. राजा उदय हा तर संगीतज्ञ मानला जात होता. आपल्या मधुर संगीताने तो माजलेल्या हत्तीलाही ताब्यात आणीत असे.

## मूर्ति-कला

**प्राचीनता–**

भारतीय प्राचीन संस्कृतीच्या अध्ययनासाठी जैनसाहित्य अवलोकन करावे, पण तेवढ्याने अभ्यास पूर्ण होत नाही असे जैन कलेकडे पहाता वाटते. कारण जैनकला म्हणजे आजकालची नव्हे तर वैदिक संस्कृतीच्याही पूर्वी प्रगल्भ होती. हृदयस्थ भावना प्रगट करण्याचे माध्यम म्हणून विशेषतः मूर्तिकला अवतरली-साकारली म्हणूनच जैन मूर्तीकला भारतीय कलेमध्ये वैशिष्ठ्यपूर्ण आहे. उत्कृष्ट मूर्तिकलेचे उदाहरण म्हणून श्रवणबेळगोळच्या विशालकाय व सुंदर गोमटेश्वरांच्या मूर्तीचे देता येईल. वास्तुकलेमध्ये वेरूळ, आबू पहाड इ. चे उदाहरण देता येईल. परमार्थ म्हणजे सर्वस्व, असे समजणारांनी ही कला जोपासली आहे आणि म्हणूनच ती प्राचीन आहे. पृथ्वीच्या पोटात अनेक कलाकृती असतील हे निःसंशय पण दृश्य स्वरूपात पृथ्वीवर ज्या कलाकृती उभ्या आहेत, त्यावरूनच जैनकलेची विशालता, बहुलता, प्राचीनता स्पष्ट होते. प्रस्तुत लेखामध्ये मूर्तिकला, वास्तुकला आणि चित्रकला यांचा थोडक्यात परामर्श घेण्याचा प्रयत्न केला आहे. परामर्श घेताना प्रकाशित ग्रंथ, मासिके इत्यादिकांचा आधार घेतला आहे.

## मूर्तिकला—

मोहोंजोदारो आणि हडप्पा येथील उत्खनन झाले आणि मूर्तिकलेचा इतिहासच बदलला. मूर्तिकलेला शेकडो वर्षापूर्वीची प्रामाणिकता मिळाली. त्या अगोदर विद्वानांची अशी समजूत होती की, मूर्तिकला इ. स. पूर्व पाचव्या शतकाच्या अगोदरची नसावी. कारण हाथीगुंफा येथील इ. स. पूर्व दुसऱ्या शतकातील शिलालेखामध्ये इ. स. पूर्व चौथ्या, पाचव्या शतकात जैन मूर्तींच्या प्रतिष्ठेचा उल्लेख आहे. सम्राट खारवेलाने नंदराजाशी युद्ध केले ते जैनमूर्तीसाठी, कुषाणकालीन मूर्ती मथुरेला सापडल्या आणि मौर्यकालीन मूर्तिकलेची छटा लोहानीपूरच्या उत्खननात सापडलेल्या मूर्तीवरून स्पष्ट दिसते पण तरीही या आधारे इतिहास परंपरा इ. स. पूर्व चवथ्या किंवा पाचव्या शतकाहून मागे जात नाही. हाच मूर्तिकलेचा इतिहास मोहोंजोदारो आणि हडप्पा येथील उत्खननाने हजारो वर्षे मागे नेला.

चोवीस तीर्थंकर, सामान्य केवली, त्रेसष्ट शलाका पुरुष यांच्या अगणित कायोत्सर्ग, पद्मासन, अर्धपद्मासन इ. आसनामध्ये दिगंबर मूर्ती आहेत. मूर्तीकलेसाठी तांबे, पितळ या धातूंचा जसा उपयोग केला तसाच चांदी, सोने अशा मौल्यवान धातूंचाही उपयोग केला आहे. दगडाच्या मूर्ती जशा आहेत तशा हिऱ्यांचाही उपयोग केला आहे. उत्तम प्रतीच्या दगडापासून केलेल्या प्रचंड मूर्ती आजही आपणास पहावयास मिळतात. बडवानीची मूर्ति तर ८४ फूट उंच आहे. श्रवणबेळगोळची मूर्ति ५८ फूट उंच आहे. लहान मूर्ति एक इंचा पेक्षाही कमी उंचीच्या आहेत.

मूर्तिकारांनी मूर्ति घडवताना एकच पद्धती अवलंबिली नाही. त्यात विविधता आहे. मूर्ती चतुर्मुखी आहेत. सर्वतोभद्र आहेत, स्तंभावर ( चारी दिशेला ) शिलाखंडावर आहेत, मानस्तंभावर आहेत. चोवीस तीर्थंकरांच्या मूर्तीमध्ये मूलनायक मध्यभागी असून बाकी २३ तीर्थंकर आजूबाजूला मूळ नायकाच्या आकारापेक्षा छोट्या असतात. काही ठिकाणी एका ओळीत आहेत.

मूर्ति तयार करताना छत्र, चामर, सिंहासन, भामंडल आदि अष्ट प्रातिहार्य, अष्टमंगल द्रव्ये, यक्ष यक्षिणी, लांछन अशा बऱ्याच गोष्टींचा उपयोग केलेला आढळतो. यांचा उपयोग करताना वैशिष्ट्यपूर्ण कलात्मकता प्रकर्षाने जाणवतो. त्यामुळे मूर्तीच्या शोभेमध्ये अधिकच भर पडते. सिंहासनावर सुंदर व बारीक नक्षीकाम केलेले आढळते.

## ऐतिहासिक दृष्टिकोण—

जैन मूर्ती भारतामध्ये सर्व प्रांतात आढळतात. त्याचा प्रतिष्ठाकाल आणि पुरुष यावरून त्यावेळच्या इतिहासावर प्रकाश पडतो. मथुरा येथील संग्रहालय या दृष्टीने फार महत्वाचे आहे. श्री स्मिथसाहेबांनी मथुरेतील जैन मूर्तिकलेचे फारच विस्तृत अध्ययन करून ग्रंथ प्रकाशित केला. त्यावरून मूर्तिकलेचे वैशिष्ठ्य, सौंदर्य पटते. मूर्तीवरील काही लेखातून कनिष्क, हुविष्क आणि वासुदेव या कुषाण कालीन राजाची नावे आढळतात. काल निर्णयासाठी सर्वत्र संवत्सराचा उपयोग केलेला आढळतो.

काही मूर्तीवर चंद्रगुप्त, कुमारगुप्त याचे नांव उत्कीर्ण केलेले आहे. दक्षिणेकडील मूर्तीवर दक्षिणेतील राजघराणे, आचार्य, परंपरा आदींचा उल्लेख आढळतो. तसाच उत्तर, पूर्व व पश्चिमेकडेही प्रकार आढळतो. या मूर्तीवरील लेखांचे ऐतिहासिक महत्व फार आहे. जैन संप्रदायांची मान्यता, जैन संस्कृतीची वैशिष्ट्ये, राजवंश, आचार्य परंपरा, गुरुपरंपरा इ. ठरवताना तर याच माध्यमाचा उपयोग करावा लागतो. याचे मूळ कारण असे की, जैन साहित्यापेक्षा जैन कलेचे अवशेष अधिक प्राचीन आहे. मूर्तीवरील लेख नागरी लिपीमध्ये असल्यामुळे तर त्या लिपीच्या क्रमिक अभ्यासासाठी या लेखाचा फारच उपयोग होतो. मूर्तिकलेचा इतिहास मूर्तीच्या वेगवेगळ्या रचनावरून कळतो. या दृष्टीने तर विकासाची वाटचाल कळण्यास मदत होते. याला अग्रक्रम तर द्यावाच लागतो, पण लोकांचे राहणीमान, घरे, इमारती, व्यवसाय, वेषभूषा इत्यादी कळण्याच्या दृष्टीने मूर्तिकलेचे कमी महत्व

नाही, एवढेच नव्हे तर मध्यकालीन भारतामध्ये महापुरुषांची मूर्तिरचना पद्धति, जैन मूर्तिकलेचीच देणगी आहे. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे जैन संस्कृति फार प्राचीन आहे हे सिद्ध होते, पटते ते मूर्तिकलेवरूनच.

**कांही महत्त्वाच्या मूर्तींचा अल्प परिचय–**

१) मोहोंजोदारो व हरप्पा येथील उत्खननात सापडलेली त्रिशृंगयुक्त पद्मासनस्थ मूर्ति जैन परंपरेचे अधिक अनुकरण करणारी आहे. या मूर्तीच्या आसपास हत्ती, बैल, सिंह, हरिण इ. पशू उत्कीर्ण आहेत. अलीकडील मूर्तीसारखी ही मूर्ति नसली तरी जैन मूर्तिकलेची प्राचीन परंपरा त्यासच स्पष्ट करणारी आहे. रानीगुम्फा येथील तोरणावरील त्रिशृंग आणि या मूर्तीवरील त्रिशृंगाची आकृति सारखीच आहे, त्रिशृंगावर धर्मचक्र देखील अंकित आहे.

२) श्रवणबेळगोळ येथील ५७ फूट उंचीची भ. बाहुबलीची कायोत्सर्ग मूर्ति अत्यंत प्रेक्षणीय आहे. मूर्ति इतकी कलापूर्ण आहे की, जगातील सर्व कलाकारांनी तिची मुक्तकंठाने स्तुती केली आहे. विन्ध्यगिरी टेकडीवर ही विशालकाय सुंदर मूर्ति एकाच दगडाची आहे. मूर्तीला आजूबाजूने कसलाच आधार नाही. मूर्तीवरील शिलालेख मराठी भाषेच्या विकासाच्या इतिहासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. ही मूर्ति म्हैसूर राज्यात हासन जिल्ह्यात आहे.

३) बडवानी येथील पर्वतावर कोरलेली ८४ फूट उंचीची विशालकाय मूर्ति देखील प्रेक्षणीय आहे. भ. ऋषभनाथांची ही मूर्ति एका प्रचंड शिलाखंडावर कोरलेली आहे. मूर्ति कायोत्सर्ग आसनात आहे

४) शिरपूर ( जि. अकोला ), नेमगिरी ( जि. परभणी ) व नवागड ( जि. परभणी ) येथील अनुक्रमे भ. पार्श्वनाथ, भ. पार्श्वनाथ व भ. नेमिनाथ या तीन पाषाणमूर्ती अधर आहेत. या तिन्ही मूर्ती पद्मासनस्थ आहेत. मूर्तीखालून आपल्या हाताचा तळवा सहज जाऊ शकतो. नेमगिरी येथील मूर्तीच्या डाव्या पायाखाली सुपारीएवढा पिवळा खडा दिसतो. असे म्हणतात की, याच खड्यावर मूर्तीचा भार केन्द्रित केला आहे. पाषाणाच्या विशालकायमूर्ती एका बारीक खड्याच्या आधारावर संतुलित राहू शकतात हे एक आश्चर्य आहे.

५) मथुरा येथील संग्रहालयात संवत्सर ८४ ची एक पद्मासनस्थ भ. ऋषभदेवाची मूर्ति आहे. प्रतिमा खंडित आहे. वक्षस्थळी श्रीवत्स चिन्ह, करतलावर व चरणावर चक्रचिन्ह आहे. आसनावर धर्मचक्र कोरलेले आहे.

६) भ. नेमिनाथाची एक मूर्ति अशी आहे, जिच्या उजवीकडे चतुर्भुज व सप्तफणायुक्त नागराजाची प्रतिमा आहे, हातातील नांगराच्या चिन्हावरून ही मूर्ति बलरामाची मानली जाते.

७) प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयात व वसंतगड ( राजस्थान ) येथील भ. ऋषभनाथाच्या मूर्ती सवस्त्र आहेत. पायावर धोतराच्या घड्या स्पष्ट दिसतात. या मूर्ती सातव्या शतकातील आहेत.

८) धातुप्रतिमेमध्ये जिवन्त स्वामीची मूर्ति उल्लेखनीय आहे. ब्रॉन्झ धातूची ही प्रतिमा अकोटा (बडोदा) येथे आहे. मूर्ति सातव्या शतकातील आहे. कायोत्सर्ग ध्यानात असलेल्या या मूर्तीवर राजकुमारोचित सर्व अलंकार ( मुकुट, हार, कुंडल, भुजबंध, कंकण, कटिबंध ) आहेत.

९) यक्ष, यक्षिणी, देवी, पद्मावती यांच्या मूर्ती अत्यंत आकर्षक व कलापूर्ण आहेत. मथुरा संग्रहालयामध्ये जवळ जवळ दोन फूट उंचीची अंबिका देवीची मूर्ति आहे. देवी एका वृक्षाखाली सिंहावर कमलासनावर बसलेली आहे. मांडीवर लहान मूल आहे, पाठीमागे प्रभावळ आहे, सर्व अलंकार शरीरावर आहेत.

१०) कंकाली टीला, मथुरा येथे एक सरस्वतीची मूर्ति सापडली आहे. डाव्या हातात पुस्तक, दुसऱ्या दोन हातात शस्त्रे व एका हाताची अभयमुद्रा आहे.

११) खंडगिरीतील पद्मावती मूर्ति सर्वात प्राचीन समजली जाते. ही मूर्ति अलंकार, शस्त्रयुक्त अत्यंत कलापूर्ण आहे.

१२) अलीकडेच प्रतिष्ठित झालेल्या बाहुबली (कुंभोज), कुंथलगिरी, मुंबई येथील मूर्तीही कलापूर्ण, विशालकाय आहेत.

अशा एक ना दोन, लाखो मूर्ति आहेत. त्या अत्यंत कलापूर्ण आहेत. तीर्थंकर, केवली आदींच्या मूर्तीमध्ये वीतराग भाव प्रकर्षाने दाखवण्याचा कलाकारांनी यशस्वी प्रयत्न केला आहे. नासाग्रदृष्टि, शांत मुद्रा, विलोभनीय स्मित याकडे पाहिले म्हणजे 'अहो आश्चर्यम्' असे म्हणून शिर नत व्हावे, हात आपोआप जुळले जावेत अशा या मूर्ती भारतीय मूर्तिकलेचे वैभव आहे.

यक्ष, यक्षिणी, पद्मावती इ. देवीच्या मूर्ती अलंकारांनी भरलेल्या, स्मितहास्ययुक्त आणि अत्यंत सूक्ष्म कलाकृतींनी सजलेल्या आहेत. मूर्तीभोवती नक्षीकाम उत्कृष्ट आढळते. नक्षीकाम सजवताना अनेक चिन्हांचा, पशुपक्ष्यांच्या मनोरम आकृत्या काढलेल्या आहेत.

थोडक्यात असे म्हणावे लागते की, मूर्तिकलेचे प्रदर्शन करताना जैनांनी भरपूर सौंदर्याची उपासना केली आहे. त्यामुळेच भारतात तर लाखो मूर्ती आहेतच पण भारताबाहेर देखील अनेक जैन मूर्तिकला वैभव दाखवीत उभ्या आहेत. पृथ्वीच्या पोटात त्या किती आहेत हे सांगणे तर अत्यंत कठीण आहे. त्या जर बाहेर निघाल्या तर वैभवात अतिशय भर पडणार आहे.

## वास्तुकला

जैनागमामध्ये ७२ कलांचा उल्लेख मिळतो. त्यामध्ये स्कंधावारमान, नगरमान, वास्तुमान, स्कंधावार निवेश, वास्तुनिवेश व नगरनिवेश या कलांचा संबंध वास्तुकलेशी आहे. तसा अनेक कलांचा संबंध येऊ शकतो पण प्रामुख्याने वरील कला संबंधित आहेत. जैन वास्तुकला एवढ्या विपुल प्रमाणात भारताच्या सर्व प्रदेशात आहे की, या लघुकाय लेखामध्ये सर्वांचा परामर्श घेणे अवघड आहे. पण तरी देखील महत्त्वाच्या कलाकृतींची माहिती संकलित करण्याचा छोटासा प्रयत्न मी करीत आहे.

स्थूलमानाने पाहिल्यास जैन धर्माची त्रिलोकाच्या रचनेची जी कल्पना आहे तिचा प्रभाव जैन वास्तुकलेवर पडलेला दिसतो. पण याहीपेक्षा निकटचा आणि महत्त्वाचा संबंध समवशरण रचनेशी आहे. स्वर्गातील देवांचे भवन, प्रासाद, वेदिका, जिनमंदिरे इत्यादीचे विस्ताराने वर्णन करणानुयोग ग्रंथातून आढळते. त्या वर्णनातील कल्पनांचा वास्तुकलेमध्ये मूर्त स्वरूप देण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. वास्तुकलेचे प्रेरणास्थान, श्रद्धास्थान तीर्थंकर, केवली, मोक्षगामी जीव, मुनी व क्वचित् ठिकाणी देवी, यक्ष, यक्षादि आहेत.

तीर्थंकराना केवलज्ञान प्राप्त झाल्यावर इन्द्राच्या आज्ञेवरून देव समवशरणाची रचना करतात. वास्तुकलेच्या दृष्टीने अनेक शास्त्रातून आलेले समवशरणाचे वर्णन अतिशय महत्त्वाचे आहे. वास्तुकलेच्या संबंधाने पुढीलप्रमाणे वर्णन होऊ शकते. समवशरणाची रचना गोलाकार व विस्ताराने १२ योजन प्रमाण असते. चारी दिशेकडून एक एक हात उंच अशा २००० पायऱ्या असतात. वीथीच्या दोन्हीकडून वेदिका असतात. बाहेरच्या कोटास धूलिशाल म्हणतात. चारी दिशांना गोपुरद्वार असतात. त्यामध्ये अष्टमंगल द्रव्ये, नवनिधी असतात. बाहेरून रत्नतोरण व आतून मकर तोरणांनी गोपुरे सजवलेली असतात. नाट्यशाळा, चैत्यप्रासाद असतात, जे वापिका आणि उपवनानी शोभायमान असतात. एका नाट्यशालेत ३२ रंगभूमी असतात. समवशरणात मानस्तंभाचे फार महत्त्व आहे. गोलाकार, उंच, चारी दिशेकडे चार, चतुर्मुख जिनप्रतिमांनी युक्त असे हे मानस्तंभ असतात. निर्मितीसाठी स्फटिक व वैडूर्य मण्यांचा उपयोग केलेला असतो. मानस्तंभाच्या चारी दिशेकडे वापिका असतात. मानस्तंभ पाहिल्याबरोबर दर्शकाचा मान, अहंकार नष्ट होऊन श्रद्धा निर्माण होते.

समवशरणातील वनभूमीमध्ये चैत्यवृक्ष असतात. याच्या चारी दिशेस अष्टप्रातिहार्ययुक्त जिनमूर्ती असतात. पार्श्वभागी उच स्तूप सजवलेले असतात. अगदी मध्यभागी (समवशरणाच्या) गंधकुटी असते. या गंधकुटीच्या बाजूने गोलाकार १२ कोठे असतात. ज्यामध्ये भव्य जीव उपदेश ऐकण्यास असतात याला श्रीमंडप म्हणतात. श्रीमंडपाच्या मध्यभागी (उंच) सिंहासन असते ज्यावर बसून तीर्थंकर उपदेश देतात. समवशरण रचनेची नीट कल्पना येण्यासाठी स. शिखरजी, जयपूर, कुंथलगिरी, इंदौर, बाहुबली (कुंभोज) इ. ठिकाणी समवशरण मंदिरे आहेत. त्यावरून समवशरणाचे सौंदर्य, कल्पकता व कलाचातुर्य दिसून येते.

## चैत्य आणि स्तूप–

जैन काव्य पुराणातून स्तूपाचे वर्णन कमी पण चैत्यांचे वर्णन फार आढळते. वास्तुकलेच्या संबंधात त्यांचे महत्त्व फार आहे. चैत्यवृक्षांचे वर्णन खूपच बहारदार पद्धतीने सर्वत्र आढळते. चैत्य छत्र, घंटा, ध्वज व पताका यांनी सजवलेले असतात. पुष्पमाला, चंदन, रंगीबेरंगी फुलांचे गुच्छ, कालागरू आदि धूप यांनी शोभित असतात. त्यामुळे प्रसन्नतेत अधिकच भर पडते. तीर्थंकरांच्या मूर्ती अत्यंत शोभायमान विराजमान असतात. तीर्थंकरांना ज्या वृक्षाखाली केवलज्ञान प्राप्त होते त्यास अशोकवृक्ष (त्याच तीर्थंकराचे) म्हणतात. यामुळेच वृक्षाखाली जिनप्रतिमा स्थापन करण्याची परंपरा सुरु झाली असावी. त्यासाठी वृक्षाभोवती पीठिका आणि वेदिका निर्माण करणे भाग पडले.

चैत्यस्तूपाचे वर्णन जंबूदीवपण्णत्तीमध्ये विस्ताराने आहे. तीर्थंकरांचे जेथे निर्वाण होते त्या ठिकाणी स्तूप उभारले जातात. हे स्तूप गोलाकार असतात. प्राचीन काळी महापुरुषांना जिथे अग्निसंस्कार दिला जाईल त्याठिकाणी स्तूप उभारण्याची प्रथा होती. काळाप्रमाणे आकारामध्ये वेगळेपणा आढळतो. स्तूपाभोवती प्रदक्षिणा घालण्यासाठी व्यवस्था केलेली आढळते. धवल टीकेचे कर्ते वीरसेनाचार्य यांनी स्वतःला पंचस्तूपान्वयी म्हणवून घेतले आहे. यावरून निदान त्याकाळी तरी स्तूप फार मोठ्या प्रमाणात असावेत. आजही सारनाथ, भरहुतसांची इ. ठिकाणी स्तूप आहेत. दुर्भाग्य असे की जैन स्तूपांची संख्या जास्त नाही. मथुरेचा स्तूप भग्नावस्थेत का होईना पण आजही पहावयास मिळतो. वास्तुकलेचा तो एक उत्कृष्ट नमुना आहे. हा ४७ फूट व्यास असलेला गोलाकार स्तूप आहे. निर्मितीसाठी विटांचा उपयोग केलेला आहे. बाह्य भागावर जिनप्रतिमा आहेत तोरणद्वारेही असावीत असे भग्नावशेषावरून वाटते. यक्ष, यक्षिणी, मुनी, स्त्री, पुरुष अशा अनेक आकृत्या आजही सुरक्षित आहेत. स्तूपाचा वरचा भाग घुमटाकार आहे. इथेच दोन आयाग पट्ट सापडले आहेत. त्यावर स्तूपाची पूर्णाकृती आहे. आयाग पट्टावर शिलालेख देखील आहे. तक्षशिलेच्या जवळ सरकॉप या ठिकाणी जो स्तूप आढळतो तो जैन स्तूप असावा असे मत पुरातत्व विभागाचे डायरेक्टर सर जॉन मार्शल यांनी व्यक्त केले आहे. आज उपलब्ध असलेल्या आयाग पट्टांचे महत्त्व त्यावरील स्तूपाचा आकार, आकृत्या, शिलालेख आणि जिनप्रतिमा यामुळे अधिक आहे.

## जैन गुंफा–

संसारापासून विरक्त झालेले मुनी आत्मसाधनेसाठी एकांत निर्जन स्थानाची निवड करतात. अशी स्थाने म्हणजे पर्वताच्या तळाशी असलेल्या गुफा–वनात देखील मुनिध्यान धारण करीत पण त्याचे स्मारक काय रहाणार ? म्हणून पर्वताच्या पायथ्याशी जिथे मुनींनी ध्यान धारणा सतत केली, तिथे गुंफा निर्माण झाल्या आणि तिथेच ध्यान वंदनेसाठी मूर्तींची स्थापना झाली तर आश्चर्य काय ? अशा अनेक गुफांपैकी राजगिरीच्या पहाडातील सोनभंडार जैनगुफा अति प्राचीन ठरतात येथे एक जैनमूर्ति व चतुर्मुख जिनप्रतिमा यांनी युक्त एक स्तंभ आहे. ब्राम्ही लिपीतील दुसऱ्या शतकातील लेख त्या गुफेमध्ये आहे.

सर्वात प्राचीन गुफा म्हणून बराबर व नागार्जुन पहाडावरील गुंफांचा निर्देश करता येईल. या गुफा अशोक आणि दशरथ यांनी आजीवक मुनींसाठी निर्माण केल्या आहेत. बराबर पहाडीपेक्षा नागार्जुन पहाडावरील

 

गुंफा मोठ्या आहेत. आकाराने लांब रुंद ३३' × २०' ( वराबर पहाडी ) व ४५' × १९' ( नागार्जुन पहाड ) आहेत. गुंफेमध्ये शिलालेख आहे.

ऐतिहासिक दृष्टिकोनातून उदयगिरीच्या हत्तीगुंफा फार महत्वाच्या आहेत. कारण या गुफेमध्ये सम्राट खारवेलाचे चरित्र प्राकृत भाषेमध्ये शिलाखंडावर कोरलेले आहे. खारवेलाने केलेली मगधावरची स्वारी, बृहस्पति मित्राचा पराभव आणि कलिंग जिनमूर्तीची पुनः प्राप्ती या सर्वांचा स्पष्ट उल्लेख शिलालेखात आहे. खारवेलाच्या पूर्वी ( इ. स. पू. पाचवे शतक ) मगधामध्ये जैन धर्माचा प्रचार होता हे ऐतिहासिक सत्य यामुळे सिद्ध होते. त्यामुळे भारतीय इतिहासाच्या दृष्टीनेही या गुंफेतील शिलालेख फार उपयुक्त आणि महत्वाचा आहे. आतल्या भागात रानी गुंफा ५२ फूट लांब, २८ फूट रुंद व ११ फुटाहून उंच आहे. गुंफा दोन मजली आहे. द्वारावर द्वारपालांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत. एका तोरण द्वारावर त्रिरत्नाचे चिन्ह आणि अशोक वृक्षाच्या पूजेचे चित्रण आहे. पौराणिक कथेवर आधारित काही चित्रेदेखील कोरलेली आहेत.

उदयगिरी आणि खंडगिरी येथे १९ गुंफा आहेत. दहाव्या शतकातील एक लेख खंडगिरीतील गुंफेमध्ये आहे.

जुनागढ येथील गुफा इ. स. पूर्व दुसऱ्या शतकातील असाव्यात. गुंफेमध्ये क्षत्रप राजवंशासंबंधी शिलालेख आहे. गुंफेमध्ये स्वस्तिक, भद्रासन, मीनयुगल असे जैन चिन्हे उत्कीर्ण केलेली आहेत. येथून जवळच कांही गुफा आहेत. त्यामध्ये ऋषभदेव, पार्श्वनाथ, महावीर, तीर्थंकरांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत.

विदिशा नगरी जवळच्या २० गुंफा जैन गुंफाच असाव्यात. कारण तेथील एका शिलालेखामध्ये सम्राट चंद्रगुप्ताचा उल्लेख आहे आणि श्री पार्श्वनाथ तीर्थंकरांची भव्य मूर्ति आहे.

दक्षिण भारतात सर्वात प्राचीन गुंफा भद्रबाहु गुफा आहे. ही गुफा श्रवणबेळगोळच्या चंद्रगिरीवर आहे. भद्रबाहू मुनींच्या चरण पादुकादेखील येथे आहेत. उस्मानाबादहून १२ मैलावर कांही गुंफा आहेत. त्यामध्ये एका गुंफेत पार्श्वनाथाची मूर्ति आहे. अजूनही कांही जिनप्रतिमा कोरलेल्या आहेत. सम्राट करकंडु याने येथे कांही गुंफा तयार केल्या असे अपभ्रंश काव्य ' करकंडुचरिउ ' मध्ये वर्णन आहे. त्यामुळे या गुफा इ. स. पूर्व नवव्या शतकातील असाव्यात. तामिळ प्रदेशातील 'सित्तन्नवासल' या ठिकाणच्या गुंफेमध्ये अशा अर्थाचा शिलालेख आहे की, गुंफाची निर्मिती जैनमुनींसाठी झालेली आहे. बादामी येथील गुफेमध्ये जिनमूर्ती कोरलेल्या आहेत. ऐहोळे गावी गुफा आहेत. येथील छतावर मकर, पुष्प यांच्या आकृती आहेत. विशेष म्हणजे सहस्रफणायुक्त पार्श्वनाथाची मूर्ति अत्यंत कलापूर्ण आहे.

सर्वात उल्लेखनीय गुंफा वेरूळच्या आहेत. गुंफा कलेच्या दृष्टीने सर्वात उच्च प्रतीच्या आहेत. येथे पाच जैन गुंफा आहेत. पैकी तीन फार महत्त्वाच्या आहेत. एक गुंफा म्हणजे कैलास लेण्याचे अनुकरण आहे. ही गुंफा ८० फूट रुंद व १३० फूट उंच आहे. दुसरी गुंफा इंद्रसभा आहे. येथील कला द्राविडी शैलीची आहे. येथे भरपूर चित्रे कोरलेली आहेत. भ. महावीरांच्या विशाल मूर्ती आणि कमठ–उपसर्गाचे चित्र कोरलेले आहे. इन्द्रसभेतील कलेविषयी पर्सी ब्राऊनसाहेब यांनी म्हटले आहे की, "याची रचना अशी सर्वांगपूर्ण आणि शिल्पकलेचे चातुर्य इतके उत्कृष्ट आहे की, जितके वेरूळच्या इतर कोणत्याच मंदिरात नाही. भिंतीवरील आकृत्यांचे उत्कीरण इतके सुंदर आणि स्तंभाविन्यास इतके कौशल्याचे आहे की, त्याला अन्यत्र कोठेच तोड नाही." जगन्नाथसभेतील कला-सौष्ठव इंद्रसभेसारखेच आहे.

वरील जैनगुंफेशिवाय अंकाई तंकाई गुंफा, ग्वाल्हेरच्या जैन गुफा, त्रावणकोरमधील जैन गुफा इत्यादी अनेक गुफा आहेत. त्या सर्वांचा परामर्श येथे घेणे शक्य नाही. शेवटी एवढेच म्हणावे लागते की, वास्तुकलेच्या दृष्टीने गुफांची रचना, सौष्ठव व सौंदर्य वाखाणण्यासारखे आहे. या गुंफा आत्मलीन मुनीश्वरांच्या निमित्ताने निर्माण झालेल्या आहेत. हे जसे खरे आहे तसेच हेही खरे आहे की, प्रेक्षक हे सर्व वीतराग वैभव पाहून अंतर्मुख होतो.







## जैन मन्दिर--

यापूर्वी आपण वास्तु, गुंफा याविषयी विचार केला. आता मंदिराचा विचार करावयाचा आहे. मन्दिरकला वास्तुकलेचाच भाग आहे. पण या कलेत जैन कलाकारानी परमसीमा गाठली आहे. म्हणून स्वतंत्रपणे विचार करावयाचा आहे.

जैन मंदिरे जी आज विद्यमान नाहीत मात्र ज्यांचे अवशेष सापडतात आणि जी विद्यमान आहेत, असे दोन भाग आपणास पाडावे लागतील. पहिल्या प्रकाराचे सर्वात जुने मंदिर ऐहोळेचे मेघुटी मंदिर समजावे लागेल. हे मंदिर महाकवि रविवर्मा ( सातवे शतक ) याने बनविले आहे. म्हणजेच रविवर्मा महाकवि आणि मंदिर योजनेत देखील निष्णात होता. या मंदिराचे तंत्र आणि स्थापत्य इतके वैशिष्ठपूर्ण आहे की, अशी कला इतरत्र सापडत नाही. लंबचतुष्कोणाकाराचे हे मंदिर दोन विभागात वाटले गेले आहे. १) गर्भगृह १) द्वारमंडप. स्तंभाची योजना वैशिष्ट्यपूर्ण आहे. शैली इतकी अलंकृत आहे की तिचे अनुकरण पुढे अनेकानी केलेले आहे.

या मंदिराशिवाय लोहानीपुराजवळ ( पटना ) जैन मंदिराचे काही अवशेष दिसतात. मंदिराच्या कामात उपयोगात आलेल्या विटा मौर्यकालीन आहेत असे सिद्ध झाले आहे. याशिवाय येथे एक मौर्यकालीन चांदीचे नाणे व दोन भंगलेल्या मूर्तीही सापडल्या आहेत. मेघुटी मंदिरासारखेच मंदिर पट्टदकल येथे आहे. ही मंदिरे द्राविडी शैलीची आहेत. हुंमच हे प्राचीन जैन केन्द्र असावे असे तेथील अनेक मंदिरावरून दिसते. मंदिरावरील चित्राकृति अभंग राहिल्या नाहीत पण दक्षिण भारतातील शैलीचे उत्तम दर्शन होते. ही मंदिरे ११ व्या शतकातील आहेत. हळेबीड येथील मंदिरामधील स्तंभावरील कोरीव काम प्रेक्षणीय आहे. स्तंभ इतके गुळगुळीत केलेले आहेत की, आपण त्यांचा आरशासारखा उपयोग करू शकतो. लक्कुंडी ( धारवाड ), मूडबिद्री येथील मंदिरेही प्रेक्षणीय आहेत.

बंगालमध्ये पहाडपूर येथील मंदिर विशाल आकाराचे आहे. चार विशाल प्रवेशद्वार, विशाल प्रांगण, ३५० फूट लांबीचे सर्वतोभद्र मंदिर हे सर्व पाहिले म्हणजे अद्भुत कलाकृती आहे असे वाटते.

मध्यप्रदेशामध्ये देवगढ येथील मंदिराची शिल्पकला विलोभनीय आहे. मंडपाची रचना, स्तंभांची सुसंबद्ध कलापूर्ण निर्मिती, मानस्तंभ आणि शिखरे प्रेक्षणीय आहेत. खजुराहो येथील गर्भगृहाच्या बाहेरील भितीवर अप्सरांच्या मूर्ती इतक्या सुंदर आहेत की, तशा इतरत्र आढळत नाहीत. लौकिक जीवनातील भाव दिग्दर्शन अत्युत्कृष्ट साधले आहे. येथील शिखरांच्या रचनेमध्ये वेगळेपणा आहे.. मुक्तागिरी सिद्धक्षेत्रावरील मंदिरे तर अतिसुदर आहेतच. पण निसर्गसौंदर्याची कलेला जी जोड दिसते तशी जोड इतर ठिकाणी नाही. जेम्स फर्ग्युसन म्हणूनच म्हणतात. "संपूर्ण भारतात यासारखे स्थळ मिळणार नाही, जिथे प्रकृति ( निसर्ग ) सौंदर्याची वास्तुकलेशी इतकी सुदर साथ आहे." कुंडलपूरचे क्षेत्र विशालता आणि प्राचीनता यासाठी प्रसिद्ध आहे.

मंदिरशैली तीन प्रकारच्या आहेत. १) नागर २) द्राविड व ३) वेसर. नागरशैली उत्तर भारतात, द्राविडशैली दक्षिण भारतात आहे व वेसरशैली मध्यभारतात अधिक प्रमाणात आहेत. प्रादेशिक विभाग ढोबळमानाने असले तरी त्या त्या प्रांतात विशिष्ट शैली कटाक्षाने पाळलेल्या नाहीत असे दिसते. शैली प्रामुख्याने शिखरांच्या रचनेवरून ओळखणे सुलभ जाते. येथील मंदिर निर्माण करण्यामध्ये मोगलशैलीचा प्रभाव पडलेला दिसतो.

अबू पहाडावरील जैन मंदिरे जैनकलेचेच नव्हे तर भारतीय वास्तुकलेचे सर्वोत्कृष्ट उदाहरण आहे. येथील मंदिराची रचना, मूर्तिकला, कोरीव काम यांची पूर्ण कल्पना येण्यासाठी वेगळाच ग्रंथ लिहावा लागेल. श्वेत संगमरवरी पाषाणामध्ये कला पुरेपूर ओतलेली आढळते. छतावरील कोरीव काम तर कलेच्या इतिहासामध्ये अद्वितीय समजावे लागेल. येथील कला पाहताना असा भास होतो की, आपण एका दिव्य लोकामध्ये आलो आहोत. म्हणूनच एक विद्वान म्हणतो की, "येथे संगमरवरी पाषाणावर ज्या परिपूर्णतेने, लालित्याने व सन्तुलित अलकरण




शैलीने कला चितारली आहे, त्याला अन्यत्र उपमा नाही. दुसरे एक विद्वान म्हणतात, "भवना ( मंदिरे ) नी अलंकाराचे रूप धारण केले आहे, जे शब्दानी समजाविणे अशक्य आहे."

राजस्थानमध्ये राणकपूर येथील मंदिराची शिखरे फारच आकर्षक आहेत. येथील खांबावरील कलाकृतीत्व, सौंदर्य आणि वैचित्र्य ( विविधता ) यांचा सुंदर संगम आहे.

सौराष्ट्रामध्ये शत्रुंजय क्षेत्रावर जितकी मंदिरे आहेत तितकी कुठेच नाहीत. गिरनार क्षेत्र श्री नेमिनाथ तीर्थंकरांची निर्वाण भूमि. येथे शिखरे अधिक प्रमाणात आहेत. मंदिरावर एका शिखराऐवजी अनेक शिखरांचा पुंज निर्माण केलेले आहेत त्यामुळे शोभेत विशेष भर पडली आहे.

राजस्थानमधील पद्मपुरी येथे संगमरवरी पाषाणाचे फारच सुंदर आणि विशाल मंदिर काही वर्षापूर्वीच पूर्ण झाले आहे. हे मंदिर चौकोनी आकाराचे नसून गोलाकार आहे हे याचे खास वैशिष्ठ्य आहे. तिसऱ्या मजल्यावर श्री पद्मप्रभ तीर्थंकरांची मूर्ति आहे. प्रवेशद्वारावर विशालकाय हत्ती ( पाषाणाचे ) अंबारी सहित आहेत.

मंदिर निर्माण करताना मानस्तंभाला बरेच प्राधान्य दिलेले सर्वत्र आढळून येते. अनेक ठिकाणी गगनचुंबी मानस्तंभ आहेत. त्यावरील कोरीव कामही कलापूर्ण आहे. दक्षिणेत परभणी जिल्ह्यामध्ये चारठाणा येथे असाच एक काळया पाषाणाचा ४० फूट उंचीचा कलापूर्ण मानस्तंभ आहे. याचे वैशिष्ठ्य असे की, बुडाशी १० फूट रुंद असलेला हा मानस्तंभ थोडीशी शक्ति लावून हलवल्यास बुडापर्यंत हलताना स्पष्ट दिसतो. येथे उत्खनन देखील झाले आहे. दुर्दैवाने उत्खनन अपूरे राहिले आहे.

थोडक्यात जैन मंदिरांची निर्मिती अत्यंत कलापूर्ण आहे. त्यामध्ये विविधता आहे, विशालता आहे आणि सौंदर्य तर खूपच आहे. मानवाने केलेल्या सौंदर्योपासनेचे मूर्त व दृश्य स्वरूप म्हणजे जैन मंदिरे आहेत. मागे मी म्हटल्याप्रमाणे जमिनीत अशा कलाकृति किती गाडल्या गेल्या असतील हे सांगणे जरी अशक्य असले तरी एवढे मात्र निश्चित सांगता येईल की, ज्या कालौघात दुर्दैवाने गाडल्या गेल्या आहेत त्या सुंदर असतीलच.

## जैन चित्रकला

जैन साहित्यात ठिकठिकाणी चित्रकलेचा उल्लेख येतो पण तितक्या विपुल प्रमाणात निदान आज तरी पहावयास मिळत नाही. अधिक सूक्ष्मतेने पाहिल्यास श्वेतांबर पंथियांनी जितकी चित्रकला सुरक्षित ठेवली तितकी दिगंबर पंथियांनी ठेवली नाही. एवढे मात्र खरे की, उपलब्ध कलाकृती पाहून असे वाटते की, ही कला एकाएकी विकसित झालेली नाही. तिला सुदूरवर्ती परंपरा आहे. गुप्त कालीन अजिंठ्या चित्रकलेवर भारतातील उत्कृष्ट चित्रकला पुरातन कालापासून जोपासलेली आहे हे पटते, मग त्यास जैनच कसे अपवाद असणार ? पाषाण कला, धातुकला यापेक्षा चित्रकला अल्पजीवी ठरते कारण चित्रकला प्रदर्शनाचे रंग हे प्रमुख माध्यम अल्पजीवी असते. ही एक नैसर्गिक आपत्ति आहे. ओढून ताणून महत्त्व पटवावे, प्राचीन परंपरा सिद्ध करावी हा हेतु नाही.

महेंद्रवर्मा प्रथम ( इ. ६२५ ) याला चित्रकलेचे इतके वेड होते की, त्याने जैनचित्र या नांवाचे शास्त्र संकलित केले. याने सित्त अवासल येथील गुंफेत चित्रे रंगविली. राजाराणी, कमल सरोवर, मेघात नृत्य करणाऱ्या अप्सरा, युगल (स्त्री व पुरुष) इ. चित्रे आजही तेथे सुरक्षित आहेत आणि सुंदर आहेत. वेरूळच्या कैलासमंदिरात या चित्रांचे अनुकरण दिसते. वेरूळच्याच इन्द्र सभेमध्ये काही चित्रांचे अवशेष आहेत पण ते छिन्नभिन्न आहेत.

श्रवणबेळगोळ येथील जैनमठात भिंतीवर अनेक चित्रे आहेत. भगवान पार्श्वनाथांचे समवशरण, भ. नेमिनाथाची दिव्यध्वनि, सहा लेश्यांचे चित्र आणि म्हैसूर नरेशाचे दसरा दरबार चित्र प्रेक्षणीय आहेत.





अकराव्या शतकापर्यंत भितीवर चित्रे काढण्याची कला विकसित झालेली दिसते. त्यानंतर चित्रकलेने ताडपत्राचा आधार घेतला. ताडपत्रावर सहस्रावधि ग्रंथ लिहिले गेले. चित्रांचा संबंध वर्ण्य विषयाशी नसेल पण कलेच्या दृष्टीने ही चित्रे महत्त्वाची आहेत. धवलग्रंथ मूळ ताडपत्रावरच लिहिलेले आहेत. त्यावरील चित्रकला विविध स्वरूपाची आहे. जिनमूर्ती, नृत्य करणाऱ्या स्त्रिया, वेली, चक्रे, वेलबुटी सुंदर आहेत. कुठे पत्राच्या वरच्या बाजूस, कुठे चारी बाजूस, कुठे मध्यभागी चित्रे आहेत. लाल, सेंदरी, पांढरा व हिरवा अशा रंगांचा उपयोग केलेला आहे. आकृत्या अति सूक्ष्म कौशल्याने काढलेल्या आहेत.

दिल्ली येथील शास्त्र भांडारात अपभ्रंश महापुराण सचित्र आहे. त्यात शेकडो चित्रे आहेत. नागौरच्या शास्त्रभांडारात यशोधरचरित्र सचित्र आहे. नागपूरच्या शास्त्रभांडारातील सचित्र सुगंधदशमीकथा सुंदर आहे. सचित्र भक्तामरस्तोत्र मुंबईला ऐ. पन्नालाल दि. जैन सरस्वती भवन येथे आहे. रविवार व्रत कथेच्या दोन सचित्र प्रती वालूर ता. पाथरी जि. परभणी येथे मी पाहिल्या आहेत. मोठ्या प्रतीपेक्षा लहान प्रतीतील चित्रे अधिक उठावदार आहेत. मोठी प्रत अंदाजे १४" × ८" व लहान प्रत ९" × ६" असेल. प्रत्येक प्रतीमध्ये २५ पेक्षा अधिक चित्रे आहेत. रेखांकन काळ्या शाईने आहे. लाल, हिरवा, निळा, पिवळा व गुलाबी हे रंग उपयोगात आणले आहेत. क्वचित् पांढरा रंग वापरला आहे.

चित्रकलेला कागदाचा आधार मिळाल्यावर तिच्यात विविधता आली. सोने व चांदीचे रंग उपयोगात येऊ लागले. लेखनसुद्धा सुवर्ण व चांदीच्या शाईने होऊ लागले. शास्त्राच्या सुरक्षिततेसाठी लाकडाच्या फळ्या वापरण्यात येत असल्यामुळे त्यावरही चित्रे रेखांकित केली गेली. त्यावर रंगाचाही उपयोग केलेला आढळतो. रंग पक्के आहेत. वस्त्र अल्पजीवी असले तरी त्यावर देखील चित्रकला आढळते. शिरपूर येथे प्रदर्शनामध्ये वस्त्रावरील पंचकल्याण पट मी पाहिला आहे. अंदाजे तीन फूट रुंद व शंभर फूट लांब अशा जाड वस्त्रावर रंगीबेरंगी चित्रे काढलेली आहेत. चिंतामणी पट ( १७" × २० " ) श्री. नाहटा यांचेजवळ आहे. अजूनही अशाच ( ताडपत्र, कागद, काष्ट व वस्त्रावरील ) कलाकृती संशोधकांची वाट पहात आहेत. श्वेतांबरांनी चित्रकला जास्त जोपासली हे मागे आलेच आहे. कांही प्रमुख कलाकृती खालीलप्रमाणे आहेत. नगीनदास भांडारातील ज्ञाताधर्मसूत्र, छाणीचो ओघनियुक्ति, सुबाहु कथादि कथा संग्रह, निशीय चूर्णि ( पाटन ), कल्पसूत्र ( ३७४ चित्रे ), कालक कथा संग्रह या ताडपत्रीय प्रती विशेष उल्लेखनीय आहेत. अजूनही बऱ्याच कलाकृती आहेत ज्यांचा येथे परामर्श घेणे अशक्य आहे.

**उपसंहार—**

वरीलप्रमाणे थोडक्यात परामर्श घेण्याचा प्रयत्न केला आहे. तो करताना प्रामुख्याने डॉ. हिरालाल जैन लिखित 'भारतीय संस्कृतिमें जैन धर्मका योगदान' या ग्रंथाचा उपयोग केला आहे. दिल्लीतील भारतीय ज्ञानपीठातर्फे निघालेले ३ ग्रंथ इंग्रजीत फार महत्वाचे आहेत. कांही मराठी, हिंदी, इंग्रजी मासिके व छोटे छोटे ग्रंथ यांचाही आधार घेतला आहे. सर्व लेखकांचे आभार मानणे कर्तव्य ठरते.

जैन संस्कृतीवर परधर्मीयांचे बरेच आघात झाले. त्या आघातामुळे कांही सुंदर कलाकृती डोंगरात दडल्या गेल्या, कांही जमीनीत गाडल्या गेल्या, कांही जलप्रवाहात वाहून गेल्या आणि काही अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडल्या, तरी देखील ज्या आज सुरक्षित आहेत, दृश्य स्वरूपात आहेत त्यामुळे भारतीय कलेला सौंदर्याचे लेणे आहे हे नि:संशय. विद्वानांनी, संस्थांनी, तसेच शासनाने याकडे लक्ष पुरवून उत्खनन केले, संशोधन केले, जीर्णोद्धार केला तर त्यामुळे भारतीय कलासौंदर्यात भर पडणारीच आहे. दृष्टिआड असलेल्या अमर कलाकृतींना कल्पनाद्वारे आठवल्याशिवाय-चितारल्याशिवाय-दुसरे काय करता येण्यासारखे आहे ?

# पूर्णार्घ्याची सांगता

## अर्घ्य ११ वा

भ. महावीरांची

- विश्वकल्याणाची मंगल भावना.
- विश्वधर्म संजीवनी.
- विश्वधर्म सभा ( समवशरण ).
- दिग्दिगन्तरीं जैनधर्माचा विश्वधर्म विहार ( आंतरराष्ट्रीय प्रसार ).
- सांगता.




या विचाराबाहेर पडावयास कोणी राजी नाही. या विचाराची कुंपणे प्रत्येकाने स्वतःहून लादून घेतली आहेत. कुंपण कशाचे हा फारसा महत्त्वाचा प्रश्न नसून ते बाहेर पडण्यास अडथळा करते हेच महत्त्वाचे आणि विशेष म्हणजे ते कुंपण आहे, तटबंदी आहे, बंधन आहे याची जाणीवच होत नाही. हेच वास्तविक चिंतेचे कारण. गुलाम गुलामीची जाणीव झाल्याखेरीज मुक्त होऊ शकणार नाही. यासाठीच या गुलामीचे स्वरूप पूर्णांशाने जाणून घेणे महत्त्वाचे ठरते.

एक विस्तार आत आहे. एक विस्तार बाहेर आहे. बाहेरच्या विस्तारास हात स्पर्श करू शकतात, बाहेरील विस्तारास कान ग्रहण करू शकतात, डोळे पाहू शकतात. पण आतील जो विस्तार न त्यास हात स्पर्श करू शकतात, न डोळे पाहू शकतात, न कान ग्रहण करू शकतात. आतील विस्तारास जाणण्यासाठी इंद्रियांची गरज नाही. इंद्रियांना त्यागण्याची गरज आहे. इंद्रियाकडील उपयोग थांबविण्याची गरज आहे.

नाण्याच्या एका बाजूचे ज्ञान म्हणजे समग्र ज्ञान नव्हे, ते एकांगी ज्ञान आहे, अपूर्ण ज्ञान आहे. कारण एकच बाजू म्हणजे नाणे नव्हे. एक बाजूचे ज्ञान समग्र नाण्याला, नाण्याच्या सत्यस्वरूपाला जाणू शकणार नाही. त्यामुळे पूर्ण वस्तूला जाणण्याचे समाधान मिळू शकणार नाही. ते अर्धवट ज्ञान समाधानही देऊ शकणार नाही. कारण अर्धवट ज्ञानात समाधान कधीच नसते. कारण त्याने मानल्याप्रमाणे वस्तूच नसते. त्याचे त्या वस्तूबद्दलचे सर्वच ज्ञान वास्तवाशी मेळ खात नाही. वास्तवाशी फरक म्हणजेच केवळ चुकलेले गणित.

चुकलेले गणित कधीच समाधान देऊ शकत नाही. केवळ मानल्याने दुपारी बाराचे पोटातील कावळे भूक थांबल्याचे सांगत नाहीत. तेव्हा वास्तवाशी विरोध, विसंगती कधीच समाधान देऊ शकत नाही.

बाहेरचा विस्तार जाणून केवळ तशीच वस्तु मानली तर आतील बाजू तू मानतोस तशी वस्तु नाही, हे दाखवून देतेच ! तेव्हा वैफल्य, निराशाच माथी येते !

म्हणून आतील विस्तारही जाणला पाहिजे. आतील विस्तार आपल्या अत्यंत निकटतम आहे. तेथेच केवळ आपला प्रवेश होऊ शकतो. आपण जे बाहेरच्या विस्ताराला जाणतो ते केवळ लांबून, दुरून. बाहेरील विस्तारात प्रवेश करता येत नाही. फक्त एकाच ठिकाणी प्रवेश होऊ शकतो व तो म्हणजे आपले स्वतत्त्व आणि म्हणूनच सत्याची प्राप्ती स्वतत्त्वाच्या प्रवेशावरोबर होते.

अतस्तत्त्वात तेव्हाच प्रवेश होतो जेव्हा शब्द, नि:शब्द होतात; मन-वचन-कायेचे व्यापार थांबतात. उरते केवळ एक राग-द्वेष, संकल्प-विकल्पानी शून्य अशी आत्ममय स्थिती. उरते केवळ एक विलक्षण शांती व विलक्षण सुखाची जाण. उरतो केवळ एक निराकुल, अनाकुल सुखाचा अनुभव. जेथे तहानेच्या वेदना नाहीत, जेथे इच्छांचा पाठशिवणीचा खेळ नाही, जेथे अनिष्टाचे सावट नाही, जेथे अशांतीची तडफड नाही– आहे एक प्रशांत पूर्ण सुखाचा अनुभव. आतील विस्ताराचे हे अल्प दर्शन.

आतील रूप जीवाचे स्वाभाविक रूप आहे, ती आत्ममय अवस्था आहे, पूर्ण आनंदी ही आतील दशा आहे. सुखाची इच्छा करणाऱ्या प्रत्येकाला उपादेय हीच अवस्था आहे.

आतील विस्तार शाश्वत आहे. बाहेरील विस्तार अशाश्वत आहे. बाहेरील विस्तार ज्या राग-द्वेष भावावर आधारित आहे, ते राग-द्वेषच अशाश्वत आहेत. त्यांच्या आधारावर असलेली शरीराची अवस्था पण अशाश्वतच आहे. प्रत्येक भवाबरोबर ते शरीर गळून पडते, ते रूप गळून पडणारे आहे. ते आत्मद्रव्यापासून वेगळेच आहे म्हणून गळूनही पडते.

तेव्हा स्वद्रव्यरूप अन्तस्तत्त्वात न राहता राग-द्वेष केल्याने मन-वचन-कायरूप बाहेरील विस्तार मिळाला आहे पण तो गळून पडत असल्याने ते आत्मद्रव्याचे वास्तविक स्वाभाविक रूप नाही हे जाणून केवळ आतील




आत्मरूप जाणणे आवश्यक आहे. तेच स्वतत्त्वाचे खरे ज्ञान. बाह्य विस्ताराचे स्वरूप व त्याचे जीवनातील स्थान अंत:स्तत्त्व व त्याचे जीवनातील स्थान जेथे समजते तेथे सत्याची उपलब्धी होते. नाण्याच्या दोन्ही बाजूंचे समग्र ज्ञान होते. म्हणून गळणारे शरीर म्हणजे आत्मा नव्हे, मन-वचन-कायेचे व्यापार म्हणजे आत्मा नव्हे, स्वीकारलेले विचार म्हणजेही आत्मा नव्हे. जेथे हे सर्व नाहीसे होते तेथे शुद्धात्म्याची उपलब्धी आहे.

म्हणून आत्मा न हिंदु आहे, न मुसलमान, न बौद्ध, न जैन, न चिनी, न भारतीय, न स्त्री, न पुरुष, न साधु, न संत !

पण सत्यावद्दल अनभिज्ञ राहून प्रत्येकाने आपणास कशात ना कशात बद्ध करून घेतले आहे. वैचारिक तटबंदी स्वीकारून त्या मान्यतेतच वद्ध होत आहोत. मान्य केलेल्या धर्मग्रंथाचीच तटबंदी निर्माण करून घेतली आहे. पंथ, संप्रदाय, जाती-पातीमध्येच अडकून राहिलो आहोत. त्या शब्दज्ञानात अडकून राहिलो आहोत. शब्द जेथे संपतात मग ते शब्द धर्मग्रंथाचे का असेनात, तेथेच अंत:स्तत्त्वाची प्राप्ती होते. खऱ्या जीवनास सुरुवात होते. पण शब्दाची तटबंदी करून स्वत: बंदीवान झालो आहोत. स्वतत्त्वाच्या उपलब्धीमध्ये आपणच भिंत उभी केली आहे, आपणच आपले प्रतिबंधक आहोत.

म्हणूनच अंत:स्तत्त्वाचा ज्यांना शोध लागला तेच सत्याप्रत पोहोचू शकतात. पोहोचले ज्यांनी या अंत:स्तत्त्वाची पूर्णपणे प्राप्ती करून घेतली, त्यांना अरिहंत सिद्ध म्हणतात. अनुकूल-निराकुल स्वरूप असलेल्या स्वतत्त्वाची उपलब्धी होणे यातच जीवनाची सार्थकता आहे, पूर्णता आहे. हे सौख्य प्रत्येक आत्म्याला उपलब्ध करून घेता येते. तो मार्ग कोणता त्याचाच उपदेश अधिकारसंपन्न अरिहंतांनी दिव्यध्वनीच्या द्वारे दिलेला आहे. संपूर्ण आत्म्यासाठी असलेला 'आत्मधर्म' अरिहंतांनी उपदेशिला आहे. बाहेरील विस्ताररूप जे अनात्मरूप होते ते पूर्णपणे त्यागण्यात ज्यांनी विजय प्राप्त केला त्यांना जिन व त्यांनी उपदेशलेल्या धर्मास जैनधर्म असेही म्हणतात. जैनधर्म हा आत्मधर्म, सार्वधर्म आहे. तो व्यक्ती, समाज, पंथ, राष्ट्र एवढाच मर्यादित स्वरूपाचा नसून विश्वधर्म आहे.

ज्याला अन्तस्तत्त्वाची उपलब्धी झाली त्याच्या जीवनाची मंगल प्रभात होते. त्याच्या जीवनाचे नवीन दालन उघडले जाते. एका अपूर्व जीवनास सुरुवात होते. एका नवीन जन्मास सुरुवात होते की त्या प्रकारचे जीवन यापूर्वी कधीच नव्हते.

अधिक श्रेष्ठ वस्तु हाती लागताच कनिष्ठ वस्तु सहज गळून पडते. परमवीतराग, विलक्षण शांती व विलक्षण सुखद अनुभवाबरोवर ती अवस्था सदैव प्राप्त व्हावी अशी सहजच इच्छा निर्माण होते. त्या सुखद अन्त:स्तत्त्वाची सदैव ओढ लागून राहते. पण आत्मस्थिरतेत राहता न आल्याने नाइलाजाने शुभभावात रुकतो. कारण शुभ भाव व अशुभ भाव यातील फरक स्वत: ते करूनच कळाला आहे.

अशुभ प्रवृत्तीरूप मायाचार लपविण्यातील आकुलता व परिश्रम तेव्हा जाणवतात जेव्हा दुसऱ्याला सुखविणारी सदाचाररूप, शुभभावरूप वृत्ति अफाट शक्ती, उत्साह, मन:शांती प्रदान करते.

तसेच शुभभाव व परम शांतरूप अन्त:स्तत्त्वातील फरक तेव्हाच कळून येतो, जेव्हा आत्मस्थिरतेतील अनाकुल सुखाचा अनुभव येतो.

तेव्हांच शुभभावातील आनंद ही अन्त:स्तत्त्वाच्या तुलनेत किती नगण्य आहे याची कल्पना येते.

हा बोधच सर्व आत्मे समान आहेत याचे ज्ञान करून देतो व या नंतर आत्मदर्शी व्यक्तीला चारी गतीतील विभिन्न शरीरातही एक परम वीतरागरूप, चैतन्य प्रभूचेच दर्शन व्हावयास लागते.




" माझ्याप्रमाणेच सर्वच प्राण्यांना सदैव सुखाची इच्छा असणारच, तेव्हां माझ्याकडून त्यांना त्रास होऊ नये म्हणून स्वतःच्या निर्मल प्रवृत्तीवर सहजच आळा बसला जातो. सर्वांचाच जगण्याचा हक्क स्वीकारला जातो. व त्या स्वरूपात अंतःकरणपूर्वक अहिंसा, सत्य, अस्तेय, परिग्रह-परिमाण, पर-स्त्री त्याग वृत्ति सहजच स्वीकारली जाते. अन्तर्दर्शन हेच उन्नत मनोदशेमागील, आत्मविकासातील प्रमुख कारण होय. नराचा नारायण करण्याची अपूर्व ताकत आत्मदर्शनाचीच !

परमशुद्ध अन्तःस्तत्त्वाचे स्वरूपच परिपूर्ण, स्वयंपूर्ण, विज्ञानघन, आनंदघन. त्यात सुखाच्या कमतरतेच्या निदर्शक इच्छेचाही अभाव आहे. पूर्णतेचे रूप अन्तःस्तत्त्व. त्यामुळे धन दौलतीची गरजच नाही. पूर्वपुण्याचे फलरूप हा धनाचा स्त्री-पुत्रांचा जुळलेला संयोग संबंध. बस्स्. यापेक्षा वेगळा अर्थ त्यांच्यात दिसत नाही. निरोगी शरीर, सुंदर काया, आज्ञाकारी पुत्र, सुशील पत्नी, भौतिक ऐश्वर्य, सर्व इष्ट संयोग हे प्रशस्त, शुभ भावनेचे फल आहे. रोगी शरीर, कुरूप काया, कलहप्रिय पुत्र-पत्नी, दारिद्र्य आणि सर्व अनिष्ट संयोग हे पूर्वी केलेल्या हिंसा असत्य, चोरी, कुशील, छळ, कपट, मायाचार याचे फल आहे.

शुभ प्रवृत्तीचे फल, अशुभ प्रवृत्तीच्या फलाच्या मानाने कमी दुःखाचे पण शुभ वा अशुभ दोन्हीही बाह्य विस्तार. या दोन्हीमुळे अनात्मरूप शरीराचीच प्राप्ती. अंतःस्तत्त्वाच्या प्राप्तीतील हाच अडसर. याची खात्री पटल्याने भौतिक ऐश्वर्याने मदांध होऊ शकत नाही. परम वीतरागरूप श्रेष्ठ रूपाची ओढ लागलेला अशुभाकडे प्रवृत्त होऊ शकत नाही.

तेव्हां सहजच शुभ प्रवृत्तीरूप व्यापार करताना आढळतो. पूर्व पुण्याईमुळे मिळालेल्या संपत्तीचा उपयोग गरजवंताना आहार, औषध, शास्त्र, शिक्षण, कपडालत्ता, आर्थिक मदत इ. रूपाने करतो. तेथे दीन-दारिद्री, अनाथ, अपंग, सर्व जीवाबाबत कारुण्याचा, वात्सल्याचा, महापूर दुथडी भरून वाहू लागतो. सर्व जीवाचे वास्तविक स्वरूप पूर्ण सुखाचे. तो त्यांचा जन्मसिद्ध हक्क. सुखासाठी अहोरात्र धडपड करणाऱ्या ज्या अज्ञजनांना अन्तःस्तत्त्वाचा बोध झालेला नाही, स्वतःच सुखमय असूनही ते प्राप्त करू शकले नाहीत, त्याबद्दल अनुकंपा निर्माण होते. सर्व जीवांना स्वतःच्या सुखमय स्थितीची प्राप्ती होवो अशा महान विश्वकल्याण भावनेचा उगम आत्मदर्शित झालेला असतो. केवढी ही विचारांची उदात्तता ! केवढा हा मनाचा मोठेपणा ! केवढी मनाची उत्तुंगता ! चराचर सृष्टीच्या कल्याणाचे केवढे हे हृदयंगम दर्शन !

चित् शक्तीचे संपूर्ण वैभव प्राप्त करून घेतलेल्या, पूर्ण शुद्ध आत्मरूप झालेल्या अरिहंत व सिद्धांच्या ठिकाणीच जीवनातील संपूर्ण निष्ठा समर्पित केली जाते. जे अजून पूर्णतेच्या मार्गाची वाटचाल करीत आहेत अशा निर्ग्रंथ साधूबद्दल विनय, भक्ती, श्रद्धा, बहुमान दाटतो व ती भक्ती, आहार, औषध, शास्त्र व अभयदान रूपे सहजच व्यक्त झालेली दिसून येते.

राग-द्वेष रूप भावनाच चतुर्गतीरूप संसार भ्रमणाची कारणें आहेत. याची जाण आल्यामुळे कषायांची मंदता निर्माण होते. परनिंदा व आत्मप्रशंसा टाळली जाते. शत्रूबाबतही क्षमाभावी राहण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. संसार, शरीर, भोग, उपभोग याविषयी उदासीनता, विरक्ती निर्माण होते. उरते केवळ एक अन्तःस्तत्त्वाची तीव्र ओढ.

या तीव्र ओढीची चढती कमान म्हणजेच गृहत्याग. क्षुल्लक वा ऐल्लक वा निर्ग्रंथ रूप !

हाच विवाद्य मुद्दा. येथेच अनेक जणांकडून विरोध दर्शविला जातो. कित्येकांच्या मते आत्मकेंद्रित होणारे हे जैन साधू पूर्ण स्वार्थी, जनसेवापराङ्मुख, व्यक्ती व समष्टी यातील नाते तोडणारे, समाजकल्याणास यत्किंचितही सहाय्यभूत न ठरणारे असतात. तसेच अजून कित्येकांचा सूर असा असतो की, "जैन धर्म केवळ निर्वृत्तिपर आहे, प्रवृत्तिपर नाही."




पण हे त्यांचे मत आहे; वास्तविक सत्य नव्हे. सूर्य स्वतःसाठी प्रकाशतो, पण विश्व सहजच प्रकाशित होते, फूल स्वतःसाठी सुगंधी आहे, पण आसमत सहजच दरवळून निघतो, झाड स्वतःसाठी डेरेदार आहे पण पांथस्थाला सहजच छाया मिळते. अगदी तसेच स्वतःसाठीच, अगदी स्वतःसाठीच जैन साधू मूर्तिमंत सद्‌गुणांचा पुतळा बनलेला असतो; पण तरी सुद्धा आसमंतात सत्‌गुण प्रेरणेची बरसात सहज होऊन जाते.

मुनी अगदी स्वतःसाठी, पापापासून स्वतःचा बचाव करण्यासाठी पंच महाव्रतांचे पालन करतात तरी पण सहजच अहिंसेने सर्व प्राणीमात्राचे रक्षण होऊन जाते. स्वकल्याणासाठी आचरिलेले सत्य महाव्रत जगाला सत्यपालनाची स्फूर्ति सहजच देऊन जाते. पाणी व माती ही दिल्याशिवाय घेतली जात नसल्याने पहाणाऱ्याला स्वतःच्या चौर्य कृतीबद्दल शरम वाटल्याखेरीज रहात नाही. यत्किंचित्‌ही बाह्य परिग्रहाखेरीज आनंदसागरात डुबता येते. याचा स्पष्ट पुरावा पाहून विचारी मन विचार केल्याशिवाय राहू शकत नाही. लैंगिकतेवर मिळविलेला अपूर्व विजय अत्यंत घातक अशा कामविकारापासून अलिप्त ठेवण्यास समाजास अनंत बलप्रदान करीत असतो.

कमनीय कामिनीच्या उत्तान अंग प्रदर्शनामुळे कामविकार जागृत होतात, बालकाच्या दर्शनाने निरागसता जागृत होते. तसेच संपूर्ण त्यागाचे प्रतीक असलेल्या जैन साधूच्या दर्शनाने त्याग भावना जागृत झाल्याखेरीज रहात नाहीत. अशी नग्नता स्वीकारण्यात धर्म कोणता? हे औत्सुक्य जागृत झाल्याखेरीजही रहात नाही. विचारांती त्या तपोमूर्तीला मानवंदना दिल्याखेरीजही चैन पडत नाही.

लाख प्रवचनापेक्षा एक मूक कृति अधिक काम करून जात असते. लाख प्रवचनांचे तितके मूल्य नाही की जितके एका कृतीचे आहे. जीझसच्या धर्माचा प्रसार त्याच्या जीवंतपणापेक्षा क्रॉस वरील शांत मृत्यूने अधिक केला. ' महात्मा गांधी ' तील महात्मा शब्दाला सजीवपणा तेव्हा आला, जेव्हा शत्रूबद्दलही क्षमाभाव पाहावयास मिळाला.

सदाचाराचा चालता बोलता पुतळा म्हणजे जैन साधु ! संयम, त्याग, क्षमा, तपस्या, सदाचार, सहिष्णुता यांचा उत्कृष्ट प्रचारक म्हणजे जैन साधु !

सुसंस्कृतपणा, उन्नतभावना, मंगलमयता, ज्ञानगामिता, समताभाव, आत्मोपम्य दृष्टी, सहकार प्रवृत्ति, सहनशीलता, विषयभोगातील साधुता, विश्वबंधुता या समाजसंस्थास आवश्यक असलेल्या गुणांची शिकवणूक जगास जैन साधू कडून मिळत असते. या चारित्र्यसंपन्न मुनीकडून समाजाला, नव्हे राष्ट्राला, नव्हे विश्वाला इतके मिळाले आहे की, त्याची किंमत करता येणार नाही. मुनीचे जीवनही स्वतःसाठी नसून विश्वसमर्पित असते.

राष्ट्राच्या प्रतिष्ठेचे, सुसंस्कृतीचे मापही चारित्र्यावरूनच ठरत असते. केवळ पैशाची किंमत करणाऱ्या अमेरिकेची किंमत परवाच्या न्यूयॉर्क शहरातील एका काळोख्या रात्रीने केलेली आहे.

जैनधर्म निवृत्तिप्रधान जरूर असेल पण प्रवृत्तिही कशी करावी हेही जैनधर्मानेच दाखवून दिले आहे. खरी प्रवृत्तीही स्व चे वास्तविक स्वरूप कळालेलाच करू शकतो. आत्मस्थिरतेलाच प्राधान्य पण जेव्हा आत्मस्थिरता रहात नाही तेव्हा ' मा फलेषु कदाचन ' रूप सदाचार, स्नेह, सहकार, परोपकार, दया, दान, क्षमा, मार्दव, आर्जव सत्य, सयम, तप, त्याग, आकिंचन्य, ब्रम्हचर्ययुक्त वर्तन करणे. मोक्ष प्राप्तीपर्यंत हा वर्तनक्रम....

त्याचा सूर्य प्रकाशा इतका स्पष्ट पुरावा म्हणजेच तीर्थंकर प्रकृतीच्या उदयात तीर्थंकरांचा सर्व देशभर झालेला स्वाभाविक विहार ! " संपूर्ण प्राणिमात्राना परम आनददायक अशा अंतःस्तत्वाचा लाभ व्हावा, संपूर्ण चराचर जीवसृष्टी आनंदात न्हाऊन निघावी " या छद्मस्थ अवस्थेत झालेल्या विश्वकल्याणकारी भावनेला आलेले फळ म्हणजे तीर्थंकर प्रकृति, अरिहंत दशा ! परम वीतराग दशा ! परम सुंदर दशा ! आकाशात ५००० दंडावरील अधांतरी अवस्था ! सर्व इच्छा मिटल्या आहेत म्हणूनच की काय, सर्व इच्छा एकदमच सफल झाल्या आहेत. स्वर्गीचे सर्व वैभव खर्चून केलेली समवसरण रचना ! श्रोत्यासाठी झालेली बारा सभेची रचना ! पशु—पक्ष्यापासून देव

मानवापर्यंत सर्वांसाठी विनामूल्य खुले ! सर्वांचा एकच दर्जा–केवळ एक आत्मा ! सर्वांना समान मानाचे स्थान ! पशु–मानवात भेद नाही तेथे स्पृश्य–अस्पृश्य मानवातील भेद कुठला ? भगवंतापासून समान अंतरावर सर्वांना स्थान ! तेथेही व्यक्त झालेले एक समतेचे दर्शन ! भगवंताचा विहारच मुळी जीवनातील एक अमूल्य संधी ! ज्यांना ज्याना त्याचा लाभ मिळाला त्यांचे जीवन उजळून निघते ! अंधास दृष्टी, पंगुस पाय, मुक्यास वाचा, बहिऱ्यास कानाची प्राप्ती होते. वीतरागतेच्या पवित्र सान्निध्यात स्वाभाविक, जन्मजात वैर असणारे प्राणी गुण्या गोविंदाने नांदू लागतात. १०० योजनाच्या परिसरातील वृक्ष वेलीपासून, कृमि कीटकापासून, तिर्यंचापासून ते सर्व मानवाना आनंददायी जीवनाचा लाभ होतो. सर्वत्र आनंदी आनंद ! कोणत्याच दुःखाचा लवलेश नाही.

प्रत्यक्ष वीतराग असूनही विश्वकल्याणाच्या उत्कट भावनेचे फळ म्हणून सर्वांगातून खिरणारी आश्चर्यकारक दिव्यध्वनी ! अखिल प्राणिमात्रांना सुखद अंतस्तत्वाचे रहस्य उलगडवून दाखविणारी दिव्यध्वनी ! सर्व आत्म्याचे निःसंशय हेच आत्मवैभव दाखवून देणारे जाहीर प्रात्यक्षिक म्हणजे अरिहंत रूप ! सर्व आत्म्यातील मंगलमयता जाहीरपणे व्यक्त करणारे हे अरिहंत रूप !

अखिल आत्म्याच्या मांगल्यतेचा हा साक्षात् पुरावा ! अखिल प्राणिमात्रांच्या सुप्त मांगल्याला जागृतीची प्रेरणा देणारे हे अरिहंत रूप ! 'जीवो मंगलमूचे' उच्च रवाने उद्‌घोषणा करणारे हे अरिहंत रूप !

हे रूपच मुळी विश्वकल्याणकारक आहे. मग प्रत्यक्ष अद्‌भुतरित्या खिरणाऱ्या दिव्यध्वनीद्वारे तर केवढ्या प्रचंड प्रमाणात सद्धर्म प्रवर्तनाचे काम होत असेल ? हे एक उदाहरणच मुळी प्रवृत्तिरूप जिनधर्माची कल्पना देण्यास समर्थ आहे. हे सर्व कार्य निरपेक्ष बुद्धीने होते.

अनात्मार्थं विना रागैः शास्ता शास्ति सतो हितम् । ध्वनन् शिल्पिकरस्पर्शान्मुरजः किमपेक्षते ।। ८ ।।

– रत्नकरंड श्रावकाचार

'जीवो मंगलम्'च्या उदात्त भावनेचे दर्शनही केवळ अरिहंतापुरते मर्यादित किंवा ग्रंथापुरते मर्यादित नसून ते सामान्यांच्या जीवनाचेही अंग बनते ते खालील श्लोकावरून दिसून येते. कृति आणि विचार यांची समांतर रेषाच नेहमी महत्त्वाची ठरत असते. विक्रम संवतच्या आठव्या शतकातील दिग्गज विद्वान हरिभद्रसूरीचा निष्पक्षपातीपणा आत्मदर्शीच्या उदात्त हृदयाचे दर्शन घडवितो.

पक्षपातो न मे वीरे न द्वेषः कपिलादिषु । युक्तिमद् वचनं यस्य, तस्य कार्यः परिग्रहः ।।

अर्थ– केवळ महावीराबद्दलच माझा पक्षपात नाही आणि कपिल इत्यादिकाबद्दल माझ्या मनात वैरभावही नाही. माझे तर हेच मत आहे की, ज्याचे मत युक्तीसंगत असेल ते ग्राह्य होय.

जैन तत्त्वज्ञान हे तत्त्वज्ञान नसून ते जीवनाचे रहस्य खोलणारे आहे. त्यामुळे आचारात एक व विचारात एक असा विरोध तेथे मुळीच येत नाही.

भव बीजांकुरजलदा रागाद्याः क्षयमुपागता यस्य । ब्रह्मा वा विष्णुर्वा हरो जिनो वा नमस्तस्मै ।।

अर्थ– संसाररूपी अंकुराला जोमाने फुटण्यास सहाय्य कराणारे राग-द्वेष इ. विकार ज्याचे नाहीसे झालेले आहेत त्याला माझा नमस्कार आहे. मग तो ब्रह्मा, विष्णू, शिव किंवा तीर्थंकर कोणीही असो !

केवढा हा प्रांजळपणा ! केवढा हा साम्यभाव ! आत्म्याचे हे सात्त्विक, शालीन मांगल्य हृदयाला हेलावून टाकल्याशिवाय राहात नाही. गगनाला भिडणारा हा उत्तुंग, उदात्त, पावन, व्यापक, मंगल दृष्टिकोन नीच, क्षुद्र, संकुचित दृष्टिकोनाला चिरडून टाकल्याशिवाय रहात नाही.

वास्तवाचे वर्णन ताठ मानेने करणाऱ्या या गाथा माथा नम्र करविल्याशिवाय रहात नाहीत. या गाथांच्या शब्दाशब्दातून मंगलमय भावना ओसंडून वहात आहे.

देह विभेदेन यः करोति जीवानां भेदं विचित्रम् । स नैव लक्षणं मनुते तेषां दर्शनं ज्ञानं चारित्रम् ।।
परमात्मप्रकाश गाथा १०२

जो शरीराश्रित भेदावरून जीवांचे नानारूप भेद करतो तो त्या जीवांचे दर्शन, ज्ञान, चारित्र हे लक्षण जाणीत नाही. अर्थात् त्याला गुणांची परीक्षा नाही.

आत्मा ब्राह्मणः वैश्यः नापि नापि क्षत्रियः नापि शेषः । पुरुष नपुंसक स्त्री नापि ज्ञानी मनुते अशेषम् ।।
परमात्मप्रकाश गाथा ८७

अर्थ– आत्मा ब्राह्मण, वैश्य, क्षत्रिय, पुरुष, नपुंसक, स्त्री इ. उरलेले भेदरूप नाही असे आत्मदर्शी मानतात (समजतात).

आत्मा मनुष्यः देवः नापि आत्मा तिर्यक् न भवति । आत्मा नारकः क्वापि नैव ज्ञानी जानाति योगी ।।
परमात्मप्रकाश गाथा ९०

अर्थ– आत्मा मनुष्य, देव, तिर्यंच, नारक यापैकी काहीही नाही असे ज्ञानी योगीजन जाणतात.

एहु धम्मु जो आयरइ, बम्हणु सुद्दु वि होई । सो साहू किं अण्णू, किं सिरि मणी होई ।।
सावयधम्म दोहा

या धर्माचे आचरण करणारा ब्राह्मण असो वा क्षुद्र काही फरक पडत नाही. काय साधूच्या डोक्याला मणी जडविलेले असतात ? भावार्थ– या धर्माचे आचरण करणारे सर्व समानच !

आत्मदर्शीच्या प्रवृत्तीतूनही ओसंडून वाहणाऱ्या मंगलमयतेच्या दर्शनाने इतरांचेही हृदय मांगल्याने दाटून येते, भरून येते.

सत्त्वेषु मैत्रीं गुणिषु प्रमोदं क्लिष्टेषु जीवेषु कृपापरत्वम् ।
माध्यस्थभावं विपरीतवृत्तौ, सदा ममात्मा विदधातु देव ! ।। १ ।।
भावना द्वात्रिंशतिका

हे देवा ! सर्व प्राण्याशी मैत्रीभाव, गुणीजनांच्या समागमाने आनंद, दुःखाने गांजलेल्या विषयी दयाभाव, विभिन्नता असणाऱ्याबाबत माध्यस्थ भाव किंवा तटस्थ वृत्ति माझी सतत राहो ! मांगल्याचा प्रखर प्रकाशी दीपस्तंभ म्हणजे **परस्परोपग्रहो जीवानाम्** हे सूत्र होय. अगरबत्तीची सार्थकता स्वतःसाठी सुगंधित राहूनही जाता जाता जगासही सुगंधित करण्यात आहे. तसेच जैनधर्म निवृत्तिमूलक असला तरी स्वकल्याणाबरोबर जाता जाता विश्वकल्याण साधतो यात आहे.

हे सूत्र अखिल मानवजातीला स्वकर्तव्याची जाण देते ! 'एकमेका साह्य करू, अवघे धरू सुपंथ !' जोपर्यंत जीवन आहे तोपर्यंत ते सदाचार, सहकार, न्याय, नीति, मानवता, समता, सहिष्णुता मार्गाने यापन करणे. एका व्यक्तीचे सत्शील अनेकांना सुधारण्यास उपयोगी पडत असते. समाजस्वास्थ्यास या सदाचरणाची अत्यंत गरज असते. म्हणून प्रत्येकाची आजची जबाबदारी भाषणाची नसून वृत्तीची आहे ! याच मांगल्याचा उपदेश सदैव परस्परोपग्रहो जीवानाम् हे सूत्र देत राहील !

विश्वकल्याणाच्या उत्कट भावनेचा शिगेला पोहोचलेला कळस म्हणजे–

क्षेमं सर्व प्रजानां प्रभवतु बलवान् धार्मिको भूमिपालः । काले काले च सम्यग्विकिरतु मघवा व्याधयो यांतु नाशम् ।।
दुर्भिक्ष्यं चौर्यमारि क्षणमपि जगतां मा स्म भूज्जीवलोके । जैनेन्द्रं धर्मचक्रं प्रभवतु सततं सर्वसौख्यप्रदायि ।।
विसर्जन ५

१०) विकल्पनय– विकल्पनयाने ( भेदनयाने ) एकच आत्मा अनेक अवस्थाभेदरूप कथन केला जातो. जसे एकच पुरुष हा बालक आहे, हा तरूण आहे, हा म्हातारा आहे याप्रमाणे भेदरूपाने कथन केला जातो.

११) अविकल्पनय– निर्विकल्पनयाने ( अभेदनयाने ) सर्व अवस्थांमध्ये आत्मा एक द्रव्यरूपाने कथन करणे. जसे बालक-तरुण-म्हातारा याना एक पुरुषरूपाने वर्णन करणे.

१२) नामनय– गुणाची अपेक्षा न करता केवळ सुरळीत व्यवहार चालण्यासाठी कोणते तरी नाव देणे तो नामनय होय. जसे– एखाद्या मुलाचे महावीर नाव ठेवले.

१३) स्थापनानय– गुणसाम्य-आकारसाम्य याची अपेक्षा ठेवून 'सोऽयं' तोच हा याप्रमाणे एकामध्ये दुसऱ्याची स्थापना करणे तो स्थापनानय होय. जसे– महावीराच्या मूर्तीमध्ये भगवान महावीराची स्थापना करणे.

१४) द्रव्यनय– अतीत-अनागत पर्यायाचा वर्तमान पर्यायात संकल्प करणे तो द्रव्यनय होय. जसे– राजकुमारला राजा म्हणणे.

१५) भावनय– वर्तमान पर्याय विशिष्ट द्रव्याला त्या नावाने संबोधणे याला भावनय म्हणतात. जसे– मनुष्य गतीतील जीवाला मनुष्य म्हणणे, देवगतीतील जीवाला देव म्हणणे.

१६) सामान्यनय– अनेक विशेषामध्ये जो सामान्य धर्म असतो त्यावरून त्या सर्व विशेषाना सामान्य नावाने संबोधणे. जसे– मनुष्य-तिर्यंच-देव-नारकी-या सर्वांना सामान्यनयाने 'जीव' म्हणणे.

१७) विशेषनय– विशिष्ट धर्मावरून विशेष नावाने संबोधणे. जसे– जीवाला मनुष्य-तिर्यंच-देव-नारकी म्हणणे.

१८) नित्यनय– वस्तूच्या ध्रुवधर्मावरून त्या नावाने संबोधणे. जसे–जीवाच्या सर्व अवस्थांमध्ये त्याला 'जीव' म्हणणे.

१९) अनित्यनय– अनित्य धर्मावरून वस्तूला त्या नावाने संबोधणे. जसे– जीवाला रागी-वीतरागी म्हणणे.

२०) सर्वगतनय– ज्ञान सर्व पदार्थांना युगपत् जाणते म्हणून ज्ञानाला सर्वगत– विश्वव्यापी म्हणणे, उघडया डोळयाला सर्वगत म्हणणे. आकाशाला सर्वव्यापी म्हणणे.

२१) असर्वगत– प्रत्येक द्रव्य स्वप्रदेशव्यापी आहे. परद्रव्यप्रदेशात प्रवेश करीत नाही म्हणून ज्ञानाला आत्मगत म्हणणे. झाकलेल्या डोळयाला आत्मगत म्हणणे.

२२) शून्यनय– एका द्रव्यात दुसऱ्या द्रव्याचा प्रवेश नाही. दुसऱ्या द्रव्याने तो शून्य ( रहित ) आहे. स्वद्रव्याच्या अपेक्षेने सर्व परद्रव्यमय जगत् शून्य म्हणणे. आत्मानुभूतीमध्ये केवळ एक आत्माच दिसतो. बाकी सर्व जग शून्य दिसते.

२३) अशून्यनय– जगातील सर्व पदार्थ 'सत्' ने सहित आहेत. म्हणून अशून्यनयाने सर्व जगत् सत् ब्रह्ममय पाहणे. अज्ञानी जगातील सर्व पदार्थामध्ये आत्मत्वबुद्धी ठेवतो.

२४) अद्वैतनय– ज्ञान-ज्ञेय सर्वांना एक अभेदरूपाने पाहणे हा अद्वैतनय होय. अद्वैतनयाने प्रत्येक द्रव्य आपल्या सर्व पर्यायामध्ये अद्वैत-अखंड-एकरूप असते. अग्नि दाह्याला दाह्यनिष्ट ( अद्वैत ) होऊन जाळतो.

२५) द्वैतनय– ज्ञान-ज्ञेयाला भेदरूपाने पाहणे. एक अद्वैत-अखंड आत्माच गुण-पर्यायभेदरूपाने द्वैतरूप धारण करतो दाह्यनिष्ठ अग्नि दाह्याला जाळत असताना देखील दाह्यरूप होत नाही. दाह्य व अग्नि दोन्ही भिन्न असतात. दर्पणात प्रतिबिंब पडते परंतु दर्पण प्रतिबिंबरूप होत नाही. दर्पण व प्रतिबिंब दोन्ही भिन्न भिन्नच असतात.





२६) **नियतिनय–** प्रत्येक द्रव्याचा स्वभाव नियत असतो. प्रत्येक द्रव्याचे प्रत्येक परिणमन आपल्या नियत स्वकाली नियत पुरुषार्थाने होते.

२७) **अनियतनय–** द्रव्याचा विभाव हा तावत्काल असतो. सर्वकाल नियत नसतो. पाण्याचा बुडबुडा सर्वकाल नियत नसतो. तावत्काल अनियत असतो. पर्यायाला सार्वकालिक नियत न मानता, असार्वकालिक-अनियत तावत्कालीन समजणे हा अनियतनय होय.



२८) **स्वभावनय–** स्वभावनयाने सर्व जीव शुद्ध जीवतत्त्व आहेत. स्वभाव हा कृत्रिम नसतो. स्वभावाचा कधीही अभाव होत नाही. विभावामध्ये देखील स्वभाव हा अन्तर्व्याप्त-सुप्त-ध्रुव असतो. काटा हा स्वभावतः निसर्गतः तीक्ष्ण असतो. त्याला तीक्ष्ण बनवावे लागत नाही. तो दुसऱ्याच्या संस्काराने तीक्ष्ण बनू शकत नाही. तुटलेला काटा कितीही घासण्याचे संस्कार केले तरी तीक्ष्ण बनू शकत नाही.

२९) **अस्वभावनय–** ( विभावनय )– कृत्रिम पदार्थावर केलेले संस्कार सार्थक होऊ शकतात. लोखंडाचा बाण अग्निसंस्काराने घणाने ठोकून तीक्ष्ण केला जातो.

त्याप्रमाणे रागादिक विभावभाव हे कृत्रिम-आगन्तुक असतात. जीवाचे अकृत्रिम स्वभाव नसतात. म्हणून त्याच्यावर ज्ञानाग्नीचे संस्कार केले तर ते सार्थक होतात. संस्काराने रागादिक विभावभाव वीतरागस्वभावरूप बनू शकतात.

३०) **कालनय–** प्रत्येक वस्तूचे परिणमन आपल्या नियत क्रमबद्ध स्वकालीच होते. झाडावर पिकणारा आंबा आपल्या नियत योग्य स्वकालीच पिकतो.

३१) **अकालनय–** कच्चा आंबा तोडून गवतात पिकू घातला तर तो अकाली देखील पिकू शकतो. परंतु ज्याचा नियत योग्य पक्वकाल आला आहे तोच आंबा पिकतो. ज्याचा योग्य पक्वकाल काल आला नाही तो आंबा पिकत नाही, सडतो.

जेव्हा स्थितिकाल व पर्यायभोगकाल समान नसतात तेव्हाच स्थितिकाल घटतो. त्यालाच अकालमरण म्हणतात. पण तो स्थितिकाल का घटला याचा जर विचार केला तर त्याचा पर्यायभोगकाल नियत होता म्हणून स्थितिकाल घटला असे अकालनयाने म्हटले जाते.

३२) **पुरुषार्थनय–** बुद्धी-इच्छा-प्रयत्नपूर्वक जेव्हा कार्य सिद्ध होते तेव्हा ते कार्य पुरुषार्थाने झाले असे म्हटले जाते. परंतु पुरुषार्थ हा केवल पुरुषार्थ सापेक्ष नसतो, दैवसापेक्ष असतो. सर्वच पुरुषार्थ सफल होत नाहीत. दैवसापेक्ष केलेला पुरुषार्थच सफल होतो. छद्मस्थ जीवाला दैवाचे ज्ञान होऊ शकत नाही म्हणून दैवावर भरवसा न ठेवता निरंतर पुरुषार्थ करीत राहावा असाच उपदेश केला जातो. तो नितांत आवश्यक आहे. दैववादी प्रायः प्रमादी बनतो म्हणून शास्त्रात दैववादाचा निषेध केला आहे. परंतु त्याचा अर्थ पुरुषार्थाने कार्यसिद्धि वाटेल तेव्हा मागे-पुढे करू शकतो असा त्याचा अर्थ नाही. कार्यसिद्धि पुरुषार्थपूर्वक आपल्या नियत दैवकालीच होते. खरा दैवज्ञ प्रमादी न बनता दैवकाल येईपर्यंत निरतर पुरुषार्थच करीत राहतो. ( न पर पौरुषापेक्षो, दैवापेक्षो हि पौरुषः )

३३) **दैवनय–** बुद्धि-इच्छा-प्रयत्न नसताना देखील जेव्हा अकल्पित इष्ट-अनिष्ट घटना घडते तेव्हा ते नियोगाने-दैवयोगाने झाले असे म्हटले जाते.

धन्यकुमाराने व्यापार करण्यासाठी पलंगाचे चार पाय विकत घेतले परंतु त्यामध्ये त्याला दैवयोगाने नवनिधि रत्नाची प्राप्ति झाली परंतु हा दैवनय बुद्धि-पुरुषार्थ सापेक्षच असतो. " बुद्धिः कर्मानुसारिणी "

तादृशी जायते बुद्धिः, व्यवसायश्च तादृशः । सहायास्तादृशाः सन्ति यादृशी भवितव्यता ॥





# विश्वधर्म सभा
## ( समवसरण )

आश्चर्य ! आश्चर्य ! आश्चर्य ! किती गोष्टींचं म्हणून आश्चर्य करणार ? या आश्चर्यांना सामावून घेण्यास हे हृदयही अपुरं पडूं लागलं वाटतं ! अंतरात अशी काही विलक्षण घालमेल होऊ लागली आहे, भावनांची इतकी काही गर्दी होऊन गेली आहे की, एक अक्षरही मुखावाटे बाहेर पडेल तर शपथ ! कशाचं म्हणून आधी आश्चर्य व्यक्त करणार ? कारण सर्वच मुळी एकापेक्षा एक अघटित !

आकाशात अधांतरी ५००० दंडावर त्रिलोकीनाथ परम वीतराग प्रभूचं विराजणं ! ते तरी किती लोक-विलक्षण ! वैभवाच्या चरमसीमेला पोहोचलेले तीन कटनींचे सिंहासन, त्यावर साक्षात् स्फटिकमणीमयी सिंह, त्यावर सुवर्णमय अत्यंत देदिप्यमान कमळ असूनही त्याच्यापासून अलिप्त चार अंगुल अधांतरी विराजणं ! परमरूप संपन्न दशा ! परम शांत दशा ! विस्मयकारी सर्वज्ञ दशा ! परम तेजस्वी काया ! त्या तेजामुळेच शरीराच्या पाठीमागे निर्माण झालेले चमत्कारिक आभामंडल, पाठीमागे अशोक वृक्ष, तीन छत्र, चौसष्ट चामर, असंख्यात प्रकारची दुंदुभी, अष्ट प्रतिहार्य, दहा अतिशयानी युक्त तेजोवलय ! त्यात प्रभूचे दर्शन करणाऱ्यास स्वत:चे सात भव दिसणं ! आपल्याच पाठीमागील तीन व पुढील तीन भवांचे व वर्तमान भवांचे जीवंतपणी दर्शन म्हणजे भलतंच विस्मयकारक ! प्रभूचं एकच मुख असूनही चारही दिशाना दिसणं ! आश्चर्यांनं थक्क करून सोडणारी ही समवसरण रचना ! रचना तरी किती कलापूर्ण–वैभवपूर्ण !

या समवसरणाच्या प्रवेशद्वाराच्या आजुबाजूला पसरलेला हा विविध रत्नचूर्णांचा धूलीशाल नामक कोट ! येथील धूळ जर रत्नांची तर मग बाकीच्या वस्तूची काय कथा !

चार दिशाना चार भव्य वैभवसंपन्न प्रवेशद्वारे ! प्रवेशानंतर आतील मार्गावर बऱ्याच दूर अंतरावर आपल्या अपूर्व वैभवाची साक्ष देत उभे असणारे मानस्तंभ ! पहिल्या सलामीतच चीतपट ! सौंदर्य, वैभव, कलाकृति, पूज्यता, पावित्र्य, मांगल्य सर्वच बाबतीत कंकणभर सरस किंवा वरचढ ! मानस्तंभाच्या दर्शनातच सर्वच क्षेत्रातील रथी-महारथींचा अभिमान चूर्ण चूर्ण होतो !

त्यानंतर लागणारा आश्चर्याने थक्क करून सोडणारा शीतल जलाने भरलेला सात भवांचे दर्शन घडविणारा अजब खंदक ! त्याच्या परिसरात होणारं बहारदार वनराजीचं दर्शन ! यानंतरचा जडावाच्या कलाकृतीचा अप्रतिम नमुना असलेला सुवर्णमयी गोपुरमंडित कोट ! मंगलमय वातावरणाची निर्मिति करणाऱ्या अष्टमंगल द्रव्यांचे व नवनिधीचे गोपुराच्या प्रवेशद्वारीच होणारे दर्शन !

नंतर होते चित्रविचित्र नाना आकाराना धारण करणाऱ्या विविध पाचूंच्या चमचमणाऱ्या ध्वजांचे दर्शन ! येथे ऐकू येतो मोत्यांच्या झालरी माळा, तोरणानी सुशोभित झालेल्या कर्णमधुर लयबद्ध घंटांचा नाद !

आणखी पुढे होते अर्जुन नावाच्या सुवर्णमयी दुसऱ्या कोटाचे दर्शन. पुढे लागतो सर्वात महत्त्वाचा व अत्यंत वैभवाचे प्रतीकरूप ठरलेला तिमरा मण्यांचा कोट ! येथेच आहे ती समवसरणातील केंद्र बिंदूरूप ठरलेली गंधकुटीची रचना ! येथेच आहे तो हार्दरूप ठरणारा श्रीमंडप ! आणि येथेच आहे लोकविलक्षण अशा बारा सभांचे स्थान ! छे, येथील सारंच अद्भुत ! चमत्कारिक ! पशुपक्ष्यानाही देव मानवांच्या मांडीला मांडी लावून बसण्याचा मान ! कानांची ओंजळ करून आतुरतेने उपदेशामृत प्राशन करणाऱ्या पशूपक्ष्यांचं दर्शन !

आश्चर्याने तोंडात बोट घालावयास भाग पाडणारी ती सर्वांगातून खिरणारी अजब दिव्यध्वनी ! कर्णपुटापर्यंत जाताच प्रत्येकाच्या भाषारूप परिणमणारी अगाध, विस्मयकारी दिव्यध्वनी ! कित्येक योजन






२६) **नियतिनय–** प्रत्येक द्रव्याचा स्वभाव नियत असतो. प्रत्येक द्रव्याचे प्रत्येक परिणमन आपल्या नियत स्वकाली नियत पुरुषार्थाने होते.

२७) **अनियतनय–** द्रव्याचा विभाव हा तावत्काल असतो. सर्वकाल नियत नसतो. पाण्याचा वुडवुडा सर्वकाल नियत नसतो. तावत्काल अनियत असतो. पर्यायाला सार्वकालिक नियत न मानता, असार्वकालिक-अनियत तावत्कालीन समजणे हा अनियतनय होय.

२८) **स्वभावनय–** स्वभावनयाने सर्व जीव शुद्ध जीवतत्त्व आहेत. स्वभाव हा कृत्रिम नसतो. स्वभावाचा कधीही अभाव होत नाही. विभावामध्ये देखील स्वभाव हा अन्तर्व्याप्त-सुप्त-ध्रुव असतो. काटा हा स्वभावतः निसर्गतः तीक्ष्ण असतो. त्याला तीक्ष्ण वनवावे लागत नाही. तो दुसऱ्याच्या संस्काराने तीक्ष्ण वनू शकत नाही. तुटलेला काटा कितीही घासण्याचे संस्कार केले तरी तीक्ष्ण वनू शकत नाही.

२९) **अस्वभावनय–** ( विभावनय )– कृत्रिम पदार्थावर केलेले संस्कार सार्थक होऊ शकतात. लोखंडाचा वाण अग्निसंस्काराने घणाने ठोकून तीक्ष्ण केला जातो.

त्याप्रमाणे रागादिक विभावभाव हे कृत्रिम-आगन्तुक असतात. जीवाचे अकृत्रिम स्वभाव नसतात. म्हणून त्याच्यावर ज्ञानाग्नीचे संस्कार केले तर ते सार्थक होतात. संस्काराने रागादिक विभावभाव वीतरागस्वभावरूप वनू शकतात.

३०) **कालनय–** प्रत्येक वस्तूचे परिणमन आपल्या नियत क्रमबद्ध स्वकालीच होते. झाडावर पिकणारा आंबा आपल्या नियत योग्य स्वकालीच पिकतो.

३१) **अकालनय–** कच्चा आंबा तोडून गवतात पिकू घातला तर तो अकाली देखील पिकू शकतो. परंतु ज्याचा नियत योग्य पक्वकाल आला आहे तोच आंबा पिकतो. ज्याचा योग्य पक्वकाल काल आला नाही तो आंबा पिकत नाही, सडतो.

जेव्हा स्थितिकाल व पर्यायभोगकाल समान नसतात तेव्हाच स्थितिकाल घटतो. त्यालाच अकालमरण म्हणतात. पण तो स्थितिकाल का घटला याचा जर विचार केला तर त्याचा पर्यायभोगकाल नियत होता म्हणून स्थितिकाल घटला असे अकालनयाने म्हटले जाते.

३२) **पुरुषार्थनय–** बुद्धी-इच्छा-प्रयत्नपूर्वक जेव्हा कार्य सिद्ध होते तेव्हा ते कार्य पुरुषार्थाने झाले असे म्हटले जाते. परंतु पुरुषार्थ हा केवल पुरुषार्थ सापेक्ष नसतो, दैवसापेक्ष असतो. सर्वच पुरुषार्थ सफल होत नाहीत. दैवसापेक्ष केलेला पुरुषार्थच सफल होतो. छद्मस्थ जीवाला दैवाचे ज्ञान होऊ शकत नाही म्हणून दैवावर भरवसा न ठेवता निरतर पुरुषार्थ करीत राहावा असाच उपदेश केला जातो. तो नितांत आवश्यक आहे. दैववादी प्रायः प्रमादी बनतो म्हणून शास्त्रात दैववादाचा निषेध केला आहे. परंतु त्याचा अर्थ पुरुषार्थाने कार्यसिद्धि वाटेल तेव्हा मागे-पुढे करू शकतो असा त्याचा अर्थ नाही. कार्यसिद्धि पुरुषार्थपूर्वक आपल्या नियत दैवकालीच होते. खरा दैवज्ञ प्रमादी न वनता दैवकाल येईपर्यंत निरंतर पुरुषार्थच करीत राहतो. ( न परं पौरुषापेक्षो, दैवापेक्षो हि पौरुषः )

३३) **दैवनय–** बुद्धि-इच्छा-प्रयत्न नसताना देखील जेव्हा अकल्पित इष्ट-अनिष्ट घटना घडते तेव्हा ते नियोगाने-दैवयोगाने झाले असे म्हटले जाते.

धन्यकुमाराने व्यापार करण्यासाठी पलंगाचे चार पाय विकत घेतले परंतु त्यामध्ये त्याला दैवयोगाने नवनिधि रत्नाची प्राप्ति झाली. परंतु हा दैवनय बुद्धि-पुरुषार्थ सापेक्षच असतो. " बुद्धिः कर्मानुसारिणी "

तादृशी जायते बुद्धिः, व्यवसायश्च तादृशः । सहायास्तादृशाः सन्ति यादृशी भवितव्यता ॥







ज्याप्रमाणे दर्पणात प्रतिबिंब पाहावयाचे असल्यास प्रथम आपणास दर्पण दिसतो नंतर त्यातील प्रतिबिंब दिसते. प्रथम दर्पण पाहिल्याशिवाय दर्पणातील प्रतिबिंब दिसू शकत नाही.

४) ज्ञानशक्ति– स्व प्रतिभासपूर्वक पदार्थाचा प्रतिभास होणे हे ज्ञानशक्तीचे कार्य होय. जेथे स्व व पराचे भेदविज्ञान होते किंवा हेय-उपादेय पदार्थाचे विज्ञान होते तेच खरे ज्ञान म्हटले जाते.

ज्याप्रमाणे दीपक प्रकाश्य पदार्थाला प्रकाशतो तथापि तो प्रकाश्य पदार्थरूप होत नाही. दीपक दीपकरूपच राहतो. त्याप्रमाणे ज्ञान ज्ञेयपदार्थाला जाणते तथापि ज्ञान ज्ञेयपदार्थरूप होत नाही, ज्ञान ज्ञानरूपच राहते. हे ज्ञानशक्तीचे कार्य होय.

५) सुखशक्ति– आकुलतेला दुःख म्हणतात. आकुलतेच्या अभावाला सुख म्हणतात. अज्ञानामुळे आकुलता उत्पन्न होते. ज्ञानामुळे आकुलतेचा अभाव होतो म्हणून ज्ञानाचे फल सुख आहे. ज्या ज्ञानामुळे निराकुलता, संतोष, समाधान, तृप्ति उत्पन्न होते तेच ज्ञान खरे ज्ञान म्हटले जाते. जेथे ज्ञान तेथेच खरे सुख.

६) वीर्यशक्ति– वीर्य म्हणजे सामर्थ्य. जीवाचा स्वभाव जाणणे हा आहे. जाणण्याकडे आपल्या वीर्यशक्तीचा उपयोग करणे, जाणण्यासाठी पुरुषार्थ करणे, आत्म्यात ( ज्ञानस्वभावात ) लीन होण्याचा पुरुषार्थ करणे हाच खरा पुरुषार्थ होय. जो ज्ञानात लीन राहण्याचा पुरुषार्थ न करता काही तरी क्रिया करण्याकडे आपल्या वीर्यशक्तीचा पुरुषार्थ लावण्याचा प्रयत्न करू इच्छितो तो पुरुषार्थी-बलवान्-सामर्थ्यवान् नसून पुरुषार्थहीन-निर्बल-नपुंसक-षंढ म्हटला जातो.

इंद्रियांच्याद्वारे विषयाकडे प्रवृत्ति करण्याकडे आपल्या वीर्यशक्तीचा उपयोग लावणे हे वीराचे, पुरुषार्थी पुरुषाचे कार्य नसून ते पुरुषार्थहीन, निर्बलाचे कार्य होय. आपली सर्व उपयोग–शक्ती आपल्या आत्मस्वभावाकडे लावणारा वीर, योगी, अनंतवीर्यवान्, अनंतशक्तिशाली म्हटला जातो. आत्म्याची अनंतवीर्यशक्तीच आत्म्याला आत्म्यात स्थिर करू शकते.

रागद्वेषरूप विभाव परिणमन कार्य हे जीवनाच्या निर्बलतेचे सूचक आहे. ज्ञानस्वभावरूप परिणमन हे जीवाच्या अनंतवीर्यशक्तीचे कार्य आहे.

७) प्रभुत्वशक्ति– जो स्वतंत्रपणे आपले परिणमन कार्य करण्यास प्रभु-समर्थ असतो, स्वाधीन असतो, पराधीन-परतंत्र नसतो तो प्रभु म्हटला जातो. प्रत्येक आत्मा, एवढेच नव्हे प्रत्येक पदार्थ आपले परिणमन कार्य करण्यास सर्वथा प्रभुस्वाधीन-समर्थ आहे, पराधीन-परतंत्र नाही. हे त्याच्या प्रभुत्वशक्तीचे सूचक आहे. एका द्रव्याचा दुसऱ्या द्रव्यावर काही तरी प्रभाव पडतो असे म्हणणे हा प्रभुत्वशक्तीचा अपलाप आहे.

८) विभुत्व शक्ति– प्रत्येक द्रव्य आपल्या द्रव्यगुण-पर्यायामध्ये व्यापक एकरूप आहे. आपली स्वद्रव्य-क्षेत्र-काल-भाव मर्यादा उल्लंघन करून परद्रव्य-क्षेत्र-काल-भावामध्ये प्रवेश करू शकत नाही. एका द्रव्याचा दुसऱ्या द्रव्याशी अत्यंत अभाव असल्यामुळे कोणताही संबंध नाही, व्याप्यव्यापकभाव नाही. एका द्रव्याचे दुसऱ्या द्रव्यावर नियंत्रण नाही. एक द्रव्य दुसऱ्या द्रव्याच्या परिणमनकार्यात किंचित् मात्रही ढवळाढवळ करू शकत नाही.

९) सर्वदर्शित्व शक्ति– सर्व पदार्थाकडे उपयोग दिल्याने सर्व पदार्थांचे दर्शन होत नाही. सर्व पदार्थांचा द्रष्टा होण्यासाठी आपल्या आत्मस्वभावाचे दर्शन घेणे आवश्यक आहे. आत्मस्वभावदर्शनामध्ये सर्व पदार्थांचे दर्शन सहजगत्या घडते. निश्चयाने आत्मद्रष्टाच व्यवहारनयाने सर्वद्रष्टा म्हटला जातो.

१०) सर्वज्ञत्व शक्ति– सर्व पदार्थाकडे उपयोग लावणारा सर्वज्ञ बनू शकत नाही. आत्मस्वभावाकडे उपयोग लावणारा निश्चयाने आत्मज्ञच व्यवहारनयाने सर्वज्ञ म्हटला जातो. आत्मज्ञानामध्ये सर्व पदार्थांचे ज्ञान सहजगत्या घडते.







**११) स्वच्छत्व शक्ति–** ज्ञानाचे एवढे सामर्थ्य आहे की ज्ञानाच्या स्वच्छ स्वभावात लोक-अलोकातील सर्व ज्ञेय पदार्थांचे प्रतिबिंब युगपत् आपोआप पडते.

ज्याप्रमाणे आपणास आपले मुख पाहावयाचे असेल तर मुखाकडे पाहावे लागत नाही. आरशात पाहिले की मुखाचे प्रतिबिंब आपोआप दिसते.

**१२) प्रकाश शक्ति–** ज्याप्रमाणे दीपक स्वत.सिद्ध स्वयं प्रकाशमान असतो, त्याच्या स्वयं प्रकाशात प्रकाश्य पदार्थ आपोआप प्रकाश्यमान होतात त्याप्रमाणे जीवाची ज्ञानज्योति स्वत:सिद्ध स्वयं प्रकाशमान असते. जीवाच्या स्वसंवेदन ज्ञान प्रकाशात सपूर्ण ज्ञेय पदार्थ स्वयं प्रकाश्यमान होतात.

**१३) असंकुचित विकास शक्ति–** जीवाच्या ज्ञानप्रकाशाचा विकास–विस्तार अमर्याद अनंतस्वरूप आहे. तो लोक–अलोकाएवढा मर्यादित–सकुचित नसून असे जर अनंत लोक–अलोक असले तरी त्या सर्व अनंत लोक–अलोकाना व्याप्त करण्याचे सामर्थ्य जीवाच्या असकुचित विकास शक्तीमध्ये आहे.

**१४) अकार्यकारणत्व शक्ति–** प्रत्येक द्रव्य आपले स्वकार्य करण्यास पूर्ण समर्थ आहे. दुसऱ्या द्रव्याचे परकार्य किंचित्मात्र देखील करीत नाही, करू शकत नाही.

**१५) परिणम्य परिणामकत्व शक्ति–** जेव्हा ज्ञेय पदार्थ आपला ज्ञेयाकार ज्ञानाला स्वय समर्पण करतो तेव्हा ज्ञान ज्ञेयाकार रूपाने परिणमन करून ज्ञेय पदार्थाला ग्रहण करते. जेव्हा ज्ञान पदार्थ आपला ज्ञानाकार ज्ञेय पदार्थाप्रत समर्पण करतो, जेव्हा ज्ञेयपदार्थ ज्ञानाकाराने व्याप्त होतो तेव्हा तो ज्ञेयपदार्थाचा ग्राहक बनतो. ज्ञान ज्ञेयाकाररूप परिणत झाल्याशिवाय ज्ञेय पदार्थ ग्राह्य होत नाही व ज्ञेय पदार्थ ज्ञानाकाराने व्याप्त झाल्याशिवाय ज्ञान ज्ञेयपदार्थाचा ग्राहक होऊ शकत नाही. ज्ञानाचे ज्ञेयाकाररूपाने परिणमन हेच ज्ञेयाचे ग्रहण होय. ज्ञेय पदार्थाचे ज्ञानाकाराकडून व्याप्त होणे हेच ज्ञानाचे ग्राहकत्व होय. येथे ग्राह्य–गाहक भावालाच परिणम्य–परिणामकभाव म्हटले आहे. ज्ञान ज्ञेयाकाररूप परिणमते तेव्हा ज्ञेय पदार्थ ग्राह्य होतो. ज्ञेयपदार्थ ज्ञानाकाराने व्याप्त होतो तेव्हा ज्ञानपदार्थ ज्ञेयपदार्थाचा ग्राहक बनतो.

**१६) त्यागोपादानशून्यत्वशक्ति–** जीव ज्याचा नित्य तादात्म्य संबंध आहे अशा आपल्या अनंतगुण वैभवाचा कदापि त्याग करीत नाही. ज्याचा जीवाशी तादात्म्य संबंध नाही अशा शरीरादि परद्रव्याचे व परभावाचे (रागादि विकारभावाचे) जीव कधीही ग्रहण करीत नाही. जीव आपल्या जीवत्वाचा–चेतनत्वाचा कधीही त्याग करीत नाही. जीव अजीवत्वाचा-अचेतनत्वाचा–१४ गुणस्थान- १४ मार्गणास्थान- १४ जीवसमास या अचेतनभावाचा-परभावाचा कधीही स्वीकार करीत नाही.

**१७) अगुरुलघुत्वशक्ति–** ज्याप्रमाणे ज्यामध्ये लाटा उराळतात असे पाणी निर्मळ स्वच्छ राहते त्याप्रमाणे आपले स्वरूप सुप्रतिष्ठित-सुव्यवस्थित निर्मल स्वच्छ राहण्यासाठी प्रत्येक गुणामध्ये षट्[1] स्थान पतित हानि-वृद्धि होत राहणे हे अगुरुलघुत्व शक्तीचे कार्य होय.

**१८) उत्पाद-व्यय-ध्रुवत्वशक्ति–** प्रत्येक वस्तु पर्यायरूपाने उत्पाद– व्ययरूपाने परिणमनशील आहे व गुणधर्म द्रव्यधर्मरूपाने ध्रुवरूप अपरिणमनशील आहे. याप्रमाणे वस्तूमध्ये उत्पाद-व्ययरूप अध्रुवअंश व ध्रुवरूप ध्रुवअंश असे परस्पर विरोधी अंश अविरोधरूपाने-अविनाभावरूपाने प्रत्येक वस्तूमध्ये असतात. प्रत्येक वस्तूचे अस्तित्व उत्पाद-व्यय-ध्रुवरूप या तीन अंशानी अथवा उत्पाद-व्ययरूप अध्रुवअंश व ध्रुवरूप ध्रुवअंश अशा परस्पर विरोधी दोन अंशानी, अनेकातात्मक-परस्पर विरोधी उभय धर्मात्मक आहे.

---

१. षट्स्थानपतित हानि– १) अनतगुण हानि २) असंख्यातगुण हानि ३) संख्यातगुण हानि ४) सख्यातभाग हानि ५) असख्यातभाग हानि ६) अनतभाग हानि या क्रमाने हानि होते.

षट्स्थानपतित वृद्धि– १) अनंतभाग वृद्धि २) असंख्यातभाग वृद्धि ३) संख्यातभाग वृद्धि ४) संख्यातगुण वृद्धि ५) असख्यातगुण वृद्धि ६) अनंतगुण वृद्धि. या क्रमाने वृद्धि होते.

ज्याप्रमाणे दर्पणात प्रतिबिंब पाहावयाचे असल्यास प्रथम आपणास दर्पण दिसतो नंतर त्यातील प्रतिबिंब दिसते. प्रथम दर्पण पाहिल्याशिवाय दर्पणातील प्रतिबिंब दिसू शकत नाही.

४) ज्ञानशक्ति– स्व प्रतिभासपूर्वक पदार्थाचा प्रतिभास होणे हे ज्ञानशक्तीचे कार्य होय. जेथे स्व व पराचे भेदविज्ञान होते किंवा हेय-उपादेय पदार्थाचे विज्ञान होते तेच खरे ज्ञान म्हटले जाते.

ज्याप्रमाणे दीपक प्रकाश्य पदार्थाला प्रकाशतो तथापि तो प्रकाश्य पदार्थरूप होत नाही. दीपक दीपकरूपच राहतो. त्याप्रमाणे ज्ञान ज्ञेयपदार्थाला जाणते तथापि ज्ञान ज्ञेयपदार्थरूप होत नाही, ज्ञान ज्ञानरूपच राहते. हे ज्ञानशक्तीचे कार्य होय.

५) सुखशक्ति– आकुलतेला दुःख म्हणतात. आकुलतेच्या अभावाला सुख म्हणतात. अज्ञानामुळे आकुलता उत्पन्न होते. ज्ञानामुळे आकुलतेचा अभाव होतो म्हणून ज्ञानाचे फल सुख आहे. ज्या ज्ञानामुळे निराकुलता, संतोष, समाधान, तृप्ति उत्पन्न होते तेच ज्ञान खरे ज्ञान म्हटले जाते. जेथे ज्ञान तेथेच खरे सुख.

६) वीर्यशक्ति– वीर्य म्हणजे सामर्थ्य. जीवाचा स्वभाव जाणणे हा आहे. जाणण्याकडे आपल्या वीर्यशक्तीचा उपयोग करणे, जाणण्यासाठी पुरुषार्थ करणे, आत्म्यात ( ज्ञानस्वभावात ) लीन होण्याचा पुरुषार्थ करणे हाच खरा पुरुषार्थ होय. जो ज्ञानात लीन राहण्याचा पुरुषार्थ न करता काही तरी क्रिया करण्याकडे आपल्या वीर्यशक्तीचा पुरुषार्थ लावण्याचा प्रयत्न करू इच्छितो तो पुरुषार्थी-बलवान्-सामर्थ्यवान् नसून पुरुषार्थहीन-निर्बल-नपुंसक-षंढ म्हटला जातो.

इंद्रियांच्याद्वारे विषयाकडे प्रवृत्ति करण्याकडे आपल्या वीर्यशक्तीचा उपयोग लावणे हे वीराचे, पुरुषार्थी पुरुषाचे कार्य नसून ते पुरुषार्थहीन, निर्बलाचे कार्य होय. आपली सर्व उपयोग-शक्ती आपल्या आत्मस्वभावाकडे लावणारा वीर, योगी, अनंतवीर्यवान्, अनंतशक्तिशाली म्हटला जातो. आत्म्याची अनंतवीर्यशक्तीच आत्म्याला आत्म्यात स्थिर करू शकते.

रागद्वेषरूप विभाव परिणमन कार्य हे जीवनाच्या निर्बलतेचे सूचक आहे. ज्ञानस्वभावरूप परिणमन हे जीवाच्या अनंतवीर्यशक्तीचे कार्य आहे.

७) प्रभुत्वशक्ति– जो स्वतंत्रपणे आपले परिणमन कार्य करण्यास प्रभु-समर्थ असतो, स्वाधीन असतो, पराधीन-परतंत्र नसतो तो प्रभु म्हटला जातो. प्रत्येक आत्मा, एवढेच नव्हे प्रत्येक पदार्थ आपले परिणमन कार्य करण्यास सर्वथा प्रभुस्वाधीन-समर्थ आहे, पराधीन-परतंत्र नाही. हे त्याच्या प्रभुत्वशक्तीचे सूचक आहे. एका द्रव्याचा दुसऱ्या द्रव्यावर काही तरी प्रभाव पडतो असे म्हणणे हा प्रभुत्वशक्तीचा अपलाप आहे.

८) विभुत्व शक्ति– प्रत्येक द्रव्य आपल्या द्रव्यगुण-पर्यायामध्ये व्यापक एकरूप आहे. आपली स्वद्रव्य-क्षेत्र-काल-भाव मर्यादा उल्लंघन करून परद्रव्य-क्षेत्र-काल-भावामध्ये प्रवेश करू शकत नाही. एका द्रव्याचा दुसऱ्या द्रव्याशी अत्यंत अभाव असल्यामुळे कोणताही संबंध नाही, व्याप्यव्यापकभाव नाही. एका द्रव्याचे दुसऱ्या द्रव्यावर नियंत्रण नाही. एक द्रव्य दुसऱ्या द्रव्याच्या परिणमनकार्यात किंचित् मात्रही ढवळाढवळ करू शकत नाही.

९) सर्वदर्शित्व शक्ति– सर्व पदार्थाकडे उपयोग दिल्याने सर्व पदार्थांचे दर्शन होत नाही. सर्व पदार्थांचा द्रष्टा होण्यासाठी आपल्या आत्मस्वभावाचे दर्शन घेणे आवश्यक आहे. आत्मस्वभावदर्शनामध्ये सर्व पदार्थांचे दर्शन सहजगत्या घडते. निश्चयाने आत्मद्रष्टाच व्यवहारनयाने सर्वद्रष्टा म्हटला जातो.

१०) सर्वज्ञत्व शक्ति– सर्व पदार्थाकडे उपयोग लावणारा सर्वज्ञ बनू शकत नाही. आत्मस्वभावाकडे उपयोग लावणारा निश्चयाने आत्मज्ञच व्यवहारनयाने सर्वज्ञ म्हटला जातो. आत्मज्ञानामध्ये सर्व पदार्थांचे ज्ञान सहजगत्या घडते.




११) **स्वच्छत्व शक्ति**– ज्ञानाचे एवढे सामर्थ्य आहे की ज्ञानाच्या स्वच्छ स्वभावात लोक-अलोकातील सर्व ज्ञेय पदार्थांचे प्रतिबिंब युगपत् आपोआप पडते.

ज्याप्रमाणे आपणास आपले मुख पाहावयाचे असेल तर मुखाकडे पाहावे लागत नाही. आरशात पाहिले की मुखाचे प्रतिबिंब आपोआप दिसते..

१२) **प्रकाश शक्ति**– ज्याप्रमाणे दीपक स्वतःसिद्ध स्वयं प्रकाशमान असतो, त्याच्या स्वयं प्रकाशात प्रकाश्य पदार्थ आपोआप प्रकाश्यमान होतात त्याप्रमाणे जीवाची ज्ञानज्योति स्वतःसिद्ध स्वयं प्रकाशमान असते. जीवाच्या स्वसंवेदन ज्ञान प्रकाशात सपूर्ण ज्ञेय पदार्थ स्वयं प्रकाश्यमान होतात.

१३) **असंकुचित विकास शक्ति**– जीवाच्या ज्ञानप्रकाशाचा विकास–विस्तार अमर्याद अनंतस्वरूप आहे. तो लोक–अलोकाएवढा मर्यादित–संकुचित नसून असे जर अनंत लोक–अलोक असले तरी त्या सर्व अनत लोक–अलोकाना व्याप्त करण्याचे सामर्थ्य जीवाच्या असकुचित विकास शक्तीमध्ये आहे.

१४) **अकार्यकारणत्व शक्ति**– प्रत्येक द्रव्य आपले स्वकार्य करण्यास पूर्ण समर्थ आहे. दुसऱ्या द्रव्याचे परकार्य किंचित्मात्र देखील करीत नाहो, करू शकत नाही.

१५) **परिणम्य परिणामकत्व शक्ति**– जेव्हा ज्ञेय पदार्थ आपला ज्ञेयाकार ज्ञानाला स्वयं समर्पण करतो तेव्हा ज्ञान ज्ञेयाकार रूपाने परिणमन करून ज्ञेय पदार्थाला ग्रहण करते. जेव्हा ज्ञान पदार्थ आपला ज्ञानाकार ज्ञेय पदार्थाप्रत समर्पण करतो, जेव्हा ज्ञेयपदार्थ ज्ञानाकाराने व्याप्त होतो तेव्हा तो ज्ञेयपदार्थाचा ग्राहक बनतो. ज्ञान ज्ञेयाकाररूप परिणत झाल्याशिवाय ज्ञेय पदार्थ ग्राह्य होत नाही व ज्ञेय पदार्थ ज्ञानाकाराने व्याप्त झाल्याशिवाय ज्ञान ज्ञेयपदार्थाचा ग्राहक होऊ शकत नाही. ज्ञानाचे ज्ञेयाकाररूपाने परिणमन हेच ज्ञेयाचे ग्रहण होय. ज्ञेय पदार्थाचे ज्ञानाकाराकडून व्याप्त होणे हेच ज्ञानाचे ग्राहकत्व होय. येथे ग्राह्य–गाहक भावालाच परिणम्य–परिणामकभाव म्हटले आहे. ज्ञान ज्ञेयाकाररूप परिणमते तेव्हा ज्ञेय पदार्थ ग्राह्य होतो. ज्ञेयपदार्थ ज्ञानाकाराने व्याप्त होतो तेव्हा ज्ञानपदार्थ ज्ञेयपदार्थाचा ग्राहक बनतो.

१६) **त्यागोपादानशून्यत्वशक्ति**– जीव ज्याचा नित्य तादात्म्य संबंध आहे अशा आपल्या अनंतगुण वैभवाचा कदापि त्याग करीत नाही. ज्याचा जीवाशी तादात्म्य संबंध नाही अशा शरीरादि परद्रव्याचे व परभावाचे (रागादि विकारभावाचे ) जीव कधीही ग्रहण करीत नाही. जीव आपल्या जीवत्वाचा–चेतनत्वाचा कधीही त्याग करीत नाही. जीव अजीवत्वाचा-अचेतनत्वाचा–१४ गुणस्थान- १४ मार्गणास्थान- १४ जीवसमास या अचेतनभावाचा-परभावाचा कधीही स्वीकार करीत नाही.

१७) **अगुरुलघुत्वशक्ति**– ज्याप्रमाणे ज्यामध्ये लाटा उसळतात असे पाणी निर्मळ स्वच्छ राहते त्याप्रमाणे आपले स्वरूप सुप्रतिष्ठित-सुव्यवस्थित निर्मल स्वच्छ राहण्यासाठी प्रत्येक गुणामध्ये षट्[1] स्थान पतित हानि-वृद्धि होत राहणे हे अगुरुलघुत्व शक्तीचे कार्य होय.

१८) **उत्पाद-व्यय-ध्रुवत्वशक्ति**– प्रत्येक वस्तु पर्यायरूपाने उत्पाद– व्ययरूपाने परिणमनशील आहे व गुणधर्म द्रव्यधर्मरूपाने ध्रुवरूप अपरिणमनशील आहे. याप्रमाणे वस्तूमध्ये उत्पाद-व्ययरूप अध्रुवअंश व ध्रुवरूप ध्रुवअंश असे परस्पर विरोधी अश अविरोधरूपाने-अविनाभावरूपाने प्रत्येक वस्तूमध्ये असतात. प्रत्येक वस्तूचे अस्तित्व उत्पाद-व्यय-ध्रुवरूप या तीन अंशानी अथवा उत्पाद-व्ययरूप अध्रुवअंश व ध्रुवरूप ध्रुवअंश अशा परस्पर विरोधी दोन अंशानी, अनेकांतात्मक-परस्पर विरोधी उभय धर्मात्मक आहे.

---

१. षट्स्थानपतित हानि– १) अनंतगुण हानि २) असंख्यातगुण हानि ३) संख्यातगुण हानि ४) संख्यातभाग हानि ५) असंख्यातभाग हानि ६) अनंतभाग हानि या क्रमाने हानि होते.
षट्स्थानपतित वृद्धि– १) अनंतभाग वृद्धि २) असंख्यातभाग वृद्धि ३) संख्यातभाग वृद्धि ४) संख्यातगुण वृद्धि ५) असंख्यातगुण वृद्धि ६) अनंतगुण वृद्धि. या क्रमाने वृद्धि होते.








१९) परिणामशक्ति– प्रत्येक वस्तूचे परिणमन पर्यायरूपाने उत्पाद-व्ययरूपाने विसदृशरूप व ध्रुवरूपाने सदृशरूप अशा परस्पर विरोधी अंशानी आलिंगित-युक्त होत आहे तथापि द्रव्यरूपाने एक अखंड अस्तित्वरूप परिणमन होत आहे. हे परिणमनशक्तीचे कार्य आहे.

२०) अमूर्तत्वशक्ति– आत्मा स्पर्श-रस-गंध-वर्ण या मूर्तिक गुणानी शून्य ( रहित ) असल्यामुळे आत्म्याच्या शुद्ध चैतन्य प्रदेशाशी मूर्त द्रव्याचा बंध किंवा स्पर्श देखील नसणे हे अमूर्तत्वशक्तीचे कार्य होय.

२१) अकर्तृत्वशक्ति– आत्मा केवळ जाणण्याची क्रियाच करू शकतो. त्याशिवाय अन्य शुभ–अशुभ बाह्य–अभ्यंतर क्रियेपासून विराम पावणे, कोणतीही क्रिया न करणे हे अकर्तृत्व शक्तीचे कार्य होय.

२२) अभोक्तृत्वशक्ति– आत्मा जाणणेरूप क्रियेचे फल निराकुल सुख त्याचाच भोक्ता आहे. त्याशिवाय बाह्य–अभ्यंतर शुभ–अशुभ क्रियेपासून विराम पावल्याने त्या क्रियेचे फल जे सांसारिक सुख–दु.ख ते न भोगणे हे अभोक्तृत्वशक्तीचे कार्य होय.

२३) निष्क्रियत्वशक्ति– कर्माच्या संयोगात हा जीव मन-वचन-काय यांच्या द्वारे योगशक्तीच्या द्वारे आत्म प्रदेशाचे हलनचलनरूप क्रिया व एका क्षेत्रावरून अन्य क्षेत्रात गमनरूप क्रिया करीत होता. सर्व कर्माच्या अभावात योगाचा अभाव झाल्यामुळे सर्व क्रिया बंद होऊन आत्म प्रदेश अचल-स्थिर-निष्क्रिय होणे हे निष्क्रियत्व शक्तीचे कार्य होय.

२४) नियतप्रदेशत्वशक्ति– कर्माच्या संयोगात जीवाचे आत्म प्रदेश संकोच-विस्तार शक्तीमुळे शरीरप्रमाण अनियत आकार-लहान-मोठ्या आकाराचे होत असत. पण कर्माच्या अभावात किंचित् न्यून अंतिम शरीरप्रमाण नियत आकाररूप नियत असंख्यात प्रमाण ( लोकाकाश प्रमाण ) प्रदेश राहतात. हे नियतप्रदेशत्व शक्तीचे कार्य होय.

२५) स्वधर्मव्यापकत्वशक्ति– अनेक शरीराचे आकार धारण करीत असताना देखील शरीराकाराशी व्याप्त न होता आपल्या आपल्या अनंत धर्मात्मक अखंड एकजीव स्वरूपाशी व्याप्त असणे, एकजीव स्वरूप राहणे हे स्वधर्मव्यापकत्वशक्तीचे कार्य होय.

२६) साधारण-असाधारण-साधारणासाधारणधर्मत्वशक्ति– स्व च्या अपेक्षेने आपले सर्व गुण आपल्या सर्व पर्यायामध्ये समान-सदृश-साधारणच असतात. पराच्या अपेक्षेने आपले सर्व गुण असमान-विसदृश-असाधारणच असतात. अस्तित्वादिक काही सामान्य गुण पराच्या अपेक्षेने देखील कथंचित् समान-साधारण असतात; परंतु प्रत्येकाचे अस्तित्व भिन्न भिन्न–असमान–असाधारण असते या अपेक्षेने स्व अस्तित्वाच्या अपेक्षेने कथंचित् असाधारण असतात. याप्रमाणे प्रत्येक द्रव्यामध्ये तिन्ही प्रकारचे धर्म आढळून येतात.

२७) अनंतधर्मत्वशक्ति– प्रत्येक शक्तीचे कार्य भिन्न भिन्न विलक्षणरूप असते. अशा विलक्षण अनंत शक्तीने युक्त, अनंतशक्तिसमुदायाचा अखंड एक पिंड रूप, एकधर्मीपणा असणे हे अनंत धर्मवान् एकधर्मित्व शक्तीचे कार्य होय.

२८) विरुद्धधर्मत्वशक्ति– प्रत्येक द्रव्यामध्ये सत्-असत्, नित्य-अनित्य, एक-अनेक, तत्-अतत् असे परस्पर विरोधी धर्म अविरोधरूपाने, अविनाभावरूपाने राहतात हे विरुद्धधर्मत्वशक्तीचे कार्य होय.

२९) तत्त्वशक्ति– वस्तु सदा द्रव्यरूपाने तत्-तत् रूप एक अन्वयरूप अद्वैतरूप असणे हे तत्त्वशक्तीचे कार्य होय.

३०) अतत्त्वशक्ति– वस्तु प्रत्येक समयाला पर्यायरूपाने अतत्-अतत् हा तो नव्हे याप्रमाणे व्यतिरेक रूपाने द्वैतरूप परिणमन करीत आहे ते अतत्त्वशक्तीचे कार्य होय.

३१) एकत्वशक्ति– वस्तु आपल्या सर्व पर्यायामध्ये एकद्रव्यरूपाने असणे हे एकत्वशक्तीचे कार्य होय.

३२) अनेकत्वशक्ती– प्रत्येक द्रव्य आपल्या अनेक पर्यायामध्ये अनेक रूपाने प्रगट होते हे अनेकत्व शक्तीचे कार्य होय.

३३) भावशक्ति– वस्तु आपल्या सर्व अवस्थेमध्ये द्रव्यरूपाने सदा भावरूप-अस्तिरूपच असते हे भावशक्तीचे कार्य होय.

३४) अभावशक्ति– वस्तूचा एक पर्याय हा दुसऱ्या पर्यायात अभावरूप नास्तिरूप असतो हे अभाव शक्तीचे कार्य होय.

३५) भावाभावशक्ति– वर्तमानकाळी भावरूप अस्तिरूप असणारा पर्याय हा पुढील समयात अभावरूप होणे हे भावाभावशक्तीचे कार्य होय.

३६) अभावभावशक्ति– वर्तमान पर्याय भूतकाळी अभावरूप होता तो वर्तमानकाळी भावरूप बनला हे अभावभावशक्तीचे कार्य होय.

३७) भावभावशक्ति– वर्तमान पर्याय वर्तमानकाळी भावरूप असणे हे भावभावशक्तीचे कार्य होय.

३८) अभाव-अभावशक्ति– अभवत् पर्याय– ( वर्तमानकाळी नसलेला पर्याय भूतपर्याय किंवा भाविपर्याय ) त्याचा वर्तमानकाळी अभाव असणे हे अभाव-अभाव-शक्तीचे कार्य होय.

३९) भावशक्ति– हा जीव संसार अवस्थेत कर्माच्या संयोगात कारकानुगत क्रिया करीत होता, आपल्या कर्माच्या अभावात कारकानुगत क्रियेपासून निष्क्रांत होऊन संपूर्ण क्रियेचा निरोध करून, निष्क्रिय होऊन केवळ भवनमात्र-अस्तित्वमात्र रूपाने राहणे हे भावशक्तीचे कार्य होय.

४०) क्रियाशक्ति– कारकानुगत हलनचलनरूप क्रियारूप परिणमन करणे हे क्रियाशक्तीचे कार्य होय.

४१) कर्मशक्ति–प्राप्यमाण (साध्यरूप) सिद्ध अवस्था धारण करणे हेच जीवाचे कर्मशक्तीचे कार्य होय.

४२) कर्तृत्वशक्ति– भवत्तारूप ( प्राप्त होणाऱ्या ) सिद्ध पर्यायाचा भावकरूप स्वयं स्वतंत्र कर्ता होणे हे कर्तृत्वशक्तीचे कार्य होय.

४३) करणशक्ति–प्राप्त होणाऱ्या सिद्धपर्यायाचे स्वयं साधकतम करण बनणे हे करणशक्तीचे कार्य होय.

४४) संप्रदानशक्ति– स्वतःच प्रदान केलेला सिद्ध पर्याय स्वतःसाठी धारण करणे हे संप्रदानशक्तीचे कार्य होय.

४५) अपादानशक्ति– संसार अवस्थेचा व्यय सिद्ध अवस्थेचा उत्पाद याने आलिंगित ( युक्त ) व त्या सिद्ध पर्यायापासून कधीही अपाय ( च्युत ) न होणेरूप ध्रुवत्व धारण करणे हे अपादानशक्तीचे कार्य होय.

४६) अधिकरणशक्ति–भाव्यमान सिद्धपर्याय त्याचा स्वयं आधार होणे हे अधिकरणशक्तीचे कार्य होय.

४७) सम्बन्धशक्ति– केवळ आपल्या स्वभावाचाच आपणाशी स्व-स्वामीसंबंध समजणे हे संबंध-शक्तीचे कार्य होय.

याप्रमाणे अनंत शक्तीनी संपन्न असणे हे जीवाचे वैभव फार मोठे आहे.

# विश्वधर्म सभा
## ( समवसरण )

आश्चर्य ! आश्चर्य ! आश्चर्य ! किती गोष्टींचं म्हणून आश्चर्य करणार ? या आश्चर्यांना सामावून घेण्यास हे हृदयही अपुरं पडूं लागलं वाटतं ! अंतरात अशी काही विलक्षण घालमेल होऊ लागली आहे, भावनांची इतकी काही गर्दी होऊन गेली आहे की, एक अक्षरही मुखावाटे बाहेर पडेल तर शपथ ! कशाचं म्हणून आधी आश्चर्य व्यक्त करणार ? कारण सर्वच मुळी एकापेक्षा एक अघटित !

आकाशात अधांतरी ५००० दंडावर त्रिलोकीनाथ परम वीतराग प्रभूचं विराजणं ! ते तरी किती लोक-विलक्षण ! वैभवाच्या चरमसीमेला पोहोचलेले तीन कटनीचे सिंहासन, त्यावर साक्षात् स्फटिकमणीमयी सिंह, त्यावर सुवर्णमय अत्यंत देदिप्यमान कमळ असूनही त्याच्यापासून अलिप्त चार अंगुल अधांतरी विराजणं ! परमरूप संपन्न दशा ! परम शांत दशा ! विस्मयकारी सर्वज्ञ दशा ! परम तेजस्वी काया ! त्या तेजामुळेच शरीराच्या पाठीमागे निर्माण झालेले चमत्कारिक आभामंडल, पाठीमागे अशोक वृक्ष, तीन छत्र, चौसष्ट चामर, असंख्यात प्रकारची दुंदुभी, अष्ट प्रतिहार्य, दहा अतिशयानी युक्त तेजोवलय ! त्यात प्रभूचे दर्शन करणाऱ्यास स्वतःचे सात भव दिसणं ! आपल्याच पाठीमागील तीन व पुढील तीन भवांचे व वर्तमान भवांचे जीवंतपणी दर्शन म्हणजे भलतंच विस्मयकारक ! प्रभूचं एकच मुख असूनही चारही दिशाना दिसणं ! आश्चर्यानं थक्क करून सोडणारी ही समवसरण रचना ! रचना तरी किती कलापूर्ण–वैभवपूर्ण !

या समवसरणाच्या प्रवेशद्वाराच्या आजुबाजूला पसरलेला हा विविध रत्नचूर्णांचा धूलीशाल नामक कोट ! येथील धूळ जर रत्नांची तर मग बाकीच्या वस्तूंची काय कथा !

चार दिशाना चार भव्य वैभवसंपन्न प्रवेशद्वारे ! प्रवेशानंतर आतील मार्गावर बऱ्याच दूर अंतरावर आपल्या अपूर्व वैभवाची साक्ष देत उभे असणारे मानस्तंभ ! पहिल्या सलामीतच चीतपट ! सौंदर्य, वैभव, कलाकृति, पूज्यता, पावित्र्य, मांगल्य सर्वच बाबतीत कंकणभर सरस किंवा वरचढ ! मानस्तंभाच्या दर्शनातच सर्व क्षेत्रातील रथी-महारथींचा अभिमान चूर्ण चूर्ण होतो !

त्यानंतर लागणारा आश्चर्याने थक्क करून सोडणारा शीतल जलाने भरलेला सात भवाचे दर्शन घडविणारा अजब खंदक ! त्याच्या परिसरात होणारं बहारदार वनराजींचं दर्शन ! यानंतरचा जडावाच्या कलाकृतीचा अप्रतिम नमुना असलेला सुवर्णमयी गोपुरमंडित कोट ! मंगलमय वातावरणाची निर्मिति करणाऱ्या अष्टमंगल द्रव्यांचे व नवनिधीचे गोपुराच्या प्रवेशद्वारीच होणारे दर्शन !

नंतर होते चित्रविचित्र नाना आकाराना धारण करणाऱ्या विविध पाचूंच्या चमचमणाऱ्या ध्वजांचे दर्शन ! येथे ऐकू येतो मोत्यांच्या झालरी माळा, तोरणानी सुशोभित झालेल्या कर्णमधुर लयबद्ध घंटांचा नाद !

आणखी पुढे होते अर्जुन नावाच्या सुवर्णमयी दुसऱ्या कोटाचे दर्शन. पुढे लागतो सर्वात महत्त्वाचा व अत्यंत वैभवाचे प्रतीकरूप ठरलेला तिसरा मण्यांचा कोट ! येथेच आहे ती समवसरणातील केंद्र बिंदूरूप ठरलेली गंधकुटीची रचना ! येथेच आहे तो हार्दरूप ठरणारा श्रीमंडप ! आणि येथेच आहे लोकविलक्षण अशा बारा सभांचे स्थान ! छे, येथील सारंच अद्भुत ! चमत्कारिक ! पशुपक्ष्यानाही देव मानवांच्या मांडीला मांडी लावून बसण्याचा मान ! कानांची ओंजळ करून आतुरतेने उपदेशामृत प्राशन करणाऱ्या पशूपक्ष्यांचं दर्शन !

आश्चर्याने तोंडात बोट घालावयास भाग पाडणारी ती सर्वांगातून खिरणारी अजब दिव्यध्वनी ! कर्णपुटापर्यंत जाताच प्रत्येकाच्या भाषारूप परिणमणारी अगाध, विस्मयकारी दिव्यध्वनी ! कित्येक योजन




विस्तीर्ण प्रदेशापर्यंत स्पष्ट शब्दात दिव्यध्वनी पोहोचविण्याचे काम करणारे मागधदेव ! लाऊड स्पीकरपेक्षाही अधिक कार्यक्षम ! वीज पुरवठा बंद पडण्याची, काम बंद पडण्याची भानगड नाही !

छे ! सारंच और ! बुद्धीपलीकडचं ! आश्चर्याने थक्क करून सोडणारं ! ध्यानी मनीही नसलेले प्रत्यक्ष चक्क उघडया डोळयानं दिसणारे दृश्य ! चिमटा घेऊन जागृतपणीची जाण घ्यावयास लावणार ते दृश्य ! सिंहिणीचा बछडा,गाईचं व गाईचा बछडा सिंहिणीचं स्तनपान करीत असलेलं विस्मयकारी दृश्य ! गरुडाचे सापाला स्नेहार्द्र दृष्टीनं पाहणं, मांजराचे उंदराला मदतीचा हात देणं ! छे ! पाहवं ते सार नवलच ! समवसरण सभेतील अंधास दृष्टिलाभ ! बहिऱ्यास कर्णलाभ ! रोग्यास आरोग्यलाभ ! समवसरणात जन्म-मरण, प्रसूति-पीडा, वेदना, रोगराई यांच्या शिरकावास पूर्ण मज्जाव ! सक्त बंदी ! सक्त मनाई !

डोळयाचं पारणं फेडणारं आल्हाददायक, मनोहर रमणीय निसर्गदर्शन ! सर्व ऋतूतील फळा फुलानी बहरलेले, डवरलेले वृक्ष-लता-वेली ! शीतल पाण्याने तुडुंब भरलेली जलाशये ! मंद सुगंधित शीतल वायु ! आनंदविभोर होऊन तालबद्ध नृत्य करणारा पशुवृंद ! कोकिळेचे कर्णमधुर सुस्वर संगीत ! निर्भय होऊन मुक्त संचार, स्वैर संचार करणारा विहंगम मेळा ! सर्वत्र आनंदी आनंद ! जणु संपूर्ण चराचर सृष्टीचं आनंदात न्हाऊन निघत आहे ! संपूर्ण निर्भय वातावरण !

डोक्यावरून फार मोठं ओझं उतरल्याप्रमाणं अगदी हलकं फुलकं, निश्चित वाटणारं वातावरण ! आश्चर्यमिश्रित पूज्यत्वानं, मांगल्यानं भारावून गेलेलं अंतःकरण ! फार कांही गवसल्यानं भरून गेलेलं अंतःकरण ! छे ! छे ! एक नाही अनेक भावनानी भारावून गेलेले, हेलावून गेलेलं हे अंतःकरण उघडून दाखविणं अगदी अशक्य झालं आहे ! छे मला तरी ते नाही जमत !

येथलं सगळंच आश्चर्यकारक ! . या आश्चर्यानेच डोळयात झणझणीत अंजन घातले आहे ! हे एक आत्मवैभवाचे चमत्कारिक प्रात्यक्षिक ! त्यावरून जीवमात्राला स्वतःच्या वीतराग स्वभावाचं ज्ञान करून देण्याचा एक अनोखा प्रकार ! मनोरंजनातून शिक्षणाचे केवढे हे सर्वोत्कृष्ट उदाहरण !

सर्व संसारी जीवाना स्वतत्त्वाची ओळख पटावी, त्याना प्रत्येक जीव सुखाचा अक्षयनिधि आहे. हे समजावे अशा छद्मस्थ दशेतील भावनेचे फळ म्हणजे तीर्थंकर प्रकृतीचा बंध होय.

या इच्छेची परिपूर्ति, पूर्तता म्हणजेच समवसरणाचा लाभ ! पशुपक्ष्यापासून देवमानवापर्यंत सर्वाना सुखाचे रहस्य उलगडून सांगण्यासाठी केलेली सभेची आयोजना म्हणजे समवसरण ! एक फिरते व्यासपीठ म्हणजे समवसरण ! परम वीतराग असूनही सर्वांगातून दिव्यध्वनी खिरून उपदेश होतो. केवढी प्रखर असेल ती विश्वकल्याणाची पूर्वीची भावना ! केवढी ज्वलंत असेल त्यात अंत.करणाची तळमळ !

प्रत्येक आत्माच मुळी मुळात परम पवित्र आहे, मंगल आहे. म्हणूनच परम वीतराग आत्म्याचे, परमशुद्ध अरिहंताचे स्वरूप पाहून चराचर सृष्टी पुलकित होऊन जाते, हर्षोल्हासित होऊन जाते ! आनंदाने न्हाऊन निघते. कारण समान आकाराच्या भांडयातील एक भांडे जर वरून खाली जमिनीवर पडले तर ती सर्व भांडी एकच आवाज करतात. एका सुरात बोलू लागतात ! जलतरंग वाद्य याच तत्त्वाचे उदाहरण आहे.

तेव्हा सर्वच आत्मे असंख्यात प्रदेशी, सर्वांचा एकच स्वभाव, सर्वांचे एकच अमूर्तिक रूप, सर्वांचे समान गुण, सर्वांची समान शक्ती ही सर्व समान आकाराची भांडी होत. मग एक परम वीतराग, परम शुद्ध स्वरूपाला उपादेय मानू लागल्याबरोबर इतर जीवद्रव्येही चक्षुर्वे सत्यंच्या पुराव्याने शुद्धात्मप्राप्तीस सहजच उपादेय मानू लागतात. एकाने स्वभावाची 'री' ओढल्याबरोबर सर्वच स्वभावाची 'री' ओढतात. परम मंगल आत्म्याने घातलेल्या सादीला दुसऱ्या आत्म्याचा प्रतिसाद मिळणारच ! कारण शेवटी ते सर्व समान स्वभावाचेच आहेत ना ? शेवटी जातीवर जाणारच की !

म्हणूनच परम वीतरागाच्या दर्शनाने स्वाभाविक, जन्मजात वैर असणारे प्राणीही वैर विसरतात ! व सौम्य स्वभावास प्राप्त होतात. परम वीतरागस्वभावाकडे आकर्षिले जातात. वास्तविक हे आकर्षण सदैव चालू असते. म्हणूनच चोरी करणारा लपून चोरी करीत असतो. चौर्यकर्म हे लज्जास्पद, अपमानास्पद आहे याची त्यास आतून सतत टोचणी लागलेली असते. आपल्या नीचकृतीची त्याची त्यालाच शरम वाटत असते. स्वतःचा नीचपणा स्वतःलाच सहन होऊ शकत नाही, म्हणूनच ते कृत्य लपविण्याचा प्रयत्न करीत असतो.

ज्याची चहाडी केली त्याच्या नजरेला नजर दिली जाऊ शकत नाही. तेथेही स्वभावशक्तीच अपराधाची तीव्र जाणीव करून देत असते. म्हणजेच अंतरंगात सत्प्रवृत्ति सदैव त्याला जागृत करीत असते, आपल्याकडे आकर्षित करीत असते.

तेच एखाद्यास जीवदान देऊ शकल्यास केवढा आनंद होतो ! आपल्या चांगल्या कृतीने इतरांचे मुख आनंदीत झाल्याचे पाहून केवढा अफाट उत्साह, शक्ति, बल, मनःशांति मिळत असते. तेव्हा प्रत्येक आत्मा सदाचारी आहे. सदाचाराची कमाल मर्यादा म्हणजेच वीतरागता !

म्हणूनच वैऱ्यालाही प्रेमाने जिंकता येते. जेथे सदाचाराचा कळस होतो तेथे विरोध गळून पडतो !

अहिंसाप्रतिष्ठायां तत् संनिधौ वैरत्यागः ।

अहिंसेने भारित झालेल्या क्षेत्रात वैरत्याग, क्रौर्यत्याग झालेला आढळतो.

प्रत्येकाच्या शरीरातून एक प्रकारच्या विद्युत् लहरी बाहेर पडत असतात. त्यामुळे व्यक्तीच्या भोवती एक विद्युत् भारित क्षेत्र बनत असते. तीव्र वा मंद प्रमाणातील दुष्ट प्रवृत्ति व सत् प्रवृत्तीवर कमी अधिक क्षेत्राची विद्युत् भारित होण्याची मर्यादा अवलंबून असते. एक प्रकारचे दडपण, श्वास गुदमरणे, मनःशांति ढळणे हेच शापित वातावरण, आपण दुष्ट प्रवृत्तीच्या व्यक्तीच्या सान्निध्यात आल्याची लगेच जाणीव करून देते. तेच जेव्हा उत्साह, आल्हाद, आनंद, पावित्र्य, मांगल्य, सात्विक वृत्ति, वातावरणात, परिसरात पाय ठेवल्याबरोबर वाढलेली असते तेव्हा भद्रप्रकृतीच्या पुरुषाच्या सान्निध्यात आल्याची सहजच जाणीव होऊन जात असते. अंगणावरूनच घराची परीक्षा होत असते. परिसरावरूनच मानवी मनाची परीक्षा होऊन जात असते.

पक्ष्यांना कोणत्या व्यक्तीपासून आपणास धोका आहे, कोणत्या व्यक्तीकडून धोका नाही याची जाणीव विद्युत् भारित क्षेत्रच करून देत असते.

तीव्र विद्युत् भारित क्षेत्रे स्वतःच्या सरहद्दीची मर्यादा व्यक्त करण्यातही समर्थ असतात—

एका अपरिचित जंगलात पोहोचलेल्या पांथस्थाला एका विशिष्ठ मर्यादेच्या पुढे पादत्राणासह जाण्याचे भावच होईनात. याचे कारण काय असावे याचा शोध घेता त्याला दिसून आले की, जवळच एक प्रशात, तेजस्वी उग्र तपस्वी नग्न मुनि आत्मध्यानात विराजमान आहेत.

भारतात आलेल्या सिकंदराने जेव्हा विचित्र भासणाऱ्या नग्न मुनीश्वरांना पाहिले तेव्हा या नग्नतेमागील हेतु जाणण्याची इच्छा होऊन त्याने आपल्या सेनापतीस त्या नग्न मुनींना दरबारात हजर करण्याची आज्ञा केली. युनान जगत्गुरू अरस्तूच्या तालमीत वाढलेल्या सिकंदराला ही नग्नता हास्यास्पद वाटत होती.

तेव्हा दरबारी जनात उपस्थित असलेल्या भारतीय आंभीने सिकंदरास रोकले. "ते विश्ववंद्य पूज्य तपस्वी साधु तुझ्या जबरदस्तीने कधीच येणार नाहीत, त्यांना येथे आणण्याचा मार्ग एकच, विनयशील नम्र होऊन दरबारात येण्याचे आमंत्रण देणे !

जर कदाचित् जबरदस्तीने उचलून आणलेस तरी शरीरालाच आणू शकशील ! कारण उपसर्ग समजून मौन धारण केले जाईल. मग कितीही नरक यातनाही त्यांचे मौन तोडू शकणार नाहीत !





पण सिकंदराच्या डोळ्यावर विजयाची धुंद होती. त्याची, युनानी गुरु अरस्तूवर पूर्ण श्रद्धा होती. इतराना कांही तथ्यपूर्ण ज्ञान असेल यावर त्याचा विश्वास बसत नव्हता ! त्याने आपला हेका सोडला नाही.

आंभीसह सेनापति डोंगरात पोहोचला. उघडे, बोडके डोंगर चांगलेच तापले होते. सेनापतीचे सुद्धा श्रमाने घामाने क्लांत झाले होते. मुनीच्या स्थानापासून दूर अंतरावरच आंभीने सेनापति व सैनिकांना पादत्राणे काढण्यास खुणविले. पादत्राणे काढण्याची इच्छा नसतानाही, कोणत्या तरी अनामिक शक्तीकडून ते काढणे भाग पडले ! पायात पादत्रणे राहू शकले नाहीत.

पादत्रणे काढून जमिनीवर उघडे पाऊल पडताच तेवढयाच तीव्रतेने पाय उचलला गेला होता. कारण खाली तापल्या तव्याचा अनुभव येत होता. तेव्हा सेनापतीच्या तोंडून आश्चर्योद्गार सहजच बाहेर पडले– 'ही नग्न माणसे इतक्या तप्त शिलेवर इतक्या शांततेनं कशी बसू शकतात ? ' त्याच वेळी मानवी मनाला त्यांच्यातील असामान्यत्व कुठे तरी जाणवलं गेलं ! अन् सर्वांच्या माना खाली घातल्या गेल्या.

विद्युत् भारित क्षेत्रांची उदाहरणे प्रथमानुयोगाच्या पानापानागणिक दिसून येतात.

सिद्धक्षेत्रे, अतिशय-क्षेत्रे, तीर्थक्षेत्रे ही विद्युत् भारित क्षेत्रांची उदाहरणे आहेत. त्या ठिकाणी अनेक संत-श्रेष्ठांची सतत मालिका चालू असल्याने पूर्वीची विद्युत् भारित शक्ति साधकाला व त्याची त्या विद्युत् भारित शक्तीत पडणारी भर पुढच्या साधकाला पावित्र्य, शांती, आत्मबल प्रदान करीत असते. म्हणूनच सर्वांनाच तीर्थक्षेत्राचे आकर्षण वाटत असते.

पूर्ण पावित्र्य, पूर्ण मांगल्यरूप परम वीतरागामुळे समवसरणच नव्हे तर समोवतालचा १०० योजनांचा परिसर विद्युत् भारित झालेला असतो. परिपूर्ण आनंदाच्या सान्निध्यात आलेली सर्व सृष्टीच आनंदात न्हाऊन निघते. १०० योजनात सर्वत्र मांगल्य पावित्र्य, निर्भयता, अमाप उत्साह व आनंदाला उधाण येते.

तेव्हा समवसरण म्हणजे एक आगळंच पिकनिक सेंटर ! देवदर्शनाबरोबर सुंदर, रमणीय, मनोहर अद्भुत, वैभवपूर्ण चमत्कारिक, भव्य-दिव्य-उदात्त-पावन अशा, डोळ्याचे पारणे फेडणाऱ्या गोष्टींचं दर्शन ! स्वर्गीचं वैभव जीवंतपणीच पहाण्याच्या इच्छेची झालेली पूर्णता ! भगवंताच्या सेवेत २४ तास असणाऱ्या स्वर्गीच्या देवांना जवळून न्याहाळण्याची उत्तम संधि ! आत्मजागृति होण्याचे उत्तम स्थळ ! देवदर्शनाबरोबर सर्वच फायद्याच्या गोष्टीचा पदरात पडणारा लाभ ! आखूड शिंगाची, पांढऱ्या रंगाची, भरपूर दूध देणाऱ्या गाईच्या गोष्टीसारखं सगळंच काही मनाजोगं मिळण्याचं स्थान !

म्हणून समवसरणास भेट म्हणजे

एक अपूर्व सुवर्ण संधि !
एक अपूर्व अवसर !
एक दुर्मिळ कपिलापष्ठीचा योग !
एक परम भाग्याचा क्षण !
भाग्याचा सितारा चमकण्याचा क्षण !
सर्व दुःखातून सुटण्याचा ओनामा !

म्हणूनच स्वामी समंतभद्राचार्यांनी भगवताचं केलेलं वर्णन सार्थ आहे–

देवाधिदेवचरणे परिचरणं सर्वदुःखनिर्हरणं । कामदुहि कामदाहिनि परिचिनुयादाहतो नित्यं ॥



# दिग्दिगन्तरी जैनधर्माचा विश्व – विहार

## ( आंतरराष्ट्रीय प्रसार )

भ. महावीरांचा तत्त्वज्ञानाचा चरणस्पर्श या शतकात इतक्यात विदेशात इतक्या मोठ्या प्रमाणात झाला की गेल्या अनेक शतकात असा प्रयत्न झाला नाही.

विसाव्या शतकात जैन धर्माचा प्रचार करणारे बॅरिस्टर चम्पतरायजी जैन यांचे नांव कोणीही विसरू शकत नाही. जैन साहित्याचा इंग्रजी भाषेमध्ये भाषांतर करून त्यांनी आंग्लवाचकांना जैन संस्कृतीचे मार्ग प्रगट केले. त्यांचे पुस्तक विदेशातले अनेक रसिकाना आवडले. त्यानी तत्वार्थसूत्र इ. महाग्रंथांचे आलोकन करून प्रस्तुत केले. त्यांनी लिहिलेले ग्रंथानी विदेशामध्ये अभ्यासूमध्ये जैनधर्माविषयी आस्था निर्माण केली. त्यासाठी बॅ. चंपतरायजी लंडनला कित्येक वर्षे होते.

श्री. कामताप्रसाद बाबूंचे नांव आदराने घेतले जाते. त्यानंतर मात्र जैनधर्माचा विहार समवशरणातील विहाराप्रमाणे ठिकठिकाणी होत गेला. आशिया, अमेरिका, युरोप, कॅनडा या जगातील महत्वपूर्ण प्रदेशात जैनधर्माचे बीजवपन झाले.

जैनधर्माची शिकवण विदेशात होण्यासाठी कांही देश पण कारणीभूत झाले. त्यात जर्मनी हा जैन-संस्कृतीवर प्रेम करणारा देश. डॉ. हरमन जेकोबी Sacred Books of the East च्या निमित्ताने जैन आगमांना जी प्रसिद्धी मिळाली ती औरच. डॉ. कार्लेबून, डॉ. शुंभ्रिग यांनी तर प्रत्यक्ष भारतात येऊन जैनसाहित्याचे अवलोकन केले.

The doctrine of the Jainas या ग्रंथामध्ये डॉ. शुम्रिग यांनी जैन सिद्धांताची, स्याद्वादाची, अनेकांताची मीमांसा केली ती अप्रतिम अशी आहे. जर्मनीतील डॉ. कार्लेबून यांनी जैन धर्मासाठी आपले आयुष्य वेचले व शेवटी सल्लेखनेने आपले देहत्याग केला. म्हणजे जैनांची सल्लेखना जर्मन राष्ट्रापर्यंत पोहोंचली आहे. सल्लेखना ही आत्मध्यानात आहे.

आस्ट्रेलियातील सुप्रसिद्ध विद्वान ए. एल. वाशम यांना तर जैनधर्म व जैन वस्तुसाराचे विशेष आकर्षण निर्माण झाले होते. आस्ट्रेलियाचे विद्वान प्रोफेसरानी जैनधर्माचे आगम व इतिहासावर नवीन योगदान केले आहे.

अमेरिकन लोकावर पण जैनधर्माचा प्रभाव उत्तरोत्तर वाढत आहे. वाशिंग्टन स्टेट युनिव्हर्सिटीचे प्रो. डोनाल्ड एच. बशिप यानी लिहिलेल्या The presuppositions of Non -Violence यात त्यानी जैनधर्माच्या अहिंसेवर मौलिक विचार मांडले. अहिंसेने शांति व समता कशी उत्पन्न होऊ शकते हे विस्तृत सांगितले. म्हणून जैनधर्माच्या अहिंसेने अमेरिकेतील संतुलन व निर्वाण करण्यास नवीन प्रेरणा दिली. प्रो. डोनाल्ड यांचा लेख राजकीय व सामाजिक वर्तुळात गाजला. अमेरिकेत जैन तत्वज्ञानाचे अध्ययन पण सुरू झाले. बर्कले हार्डवर्डटप्स् बोस्टन, मिशिगन, कोलंबिया या विद्यापीठात आज भगवंताचा विचार सुरू झाला. डॉ. लवान, डॉ. कारमन, डॉ. मार्टिन, डॉ. अलेक्स वेमन इ. विद्वानानी जैनधर्माची नवीन क्षितिजे उघडली. आज त्याचा विचार मात्र ठिकठिकाणी मोठ्या प्रमाणात प्रत्येक क्षेत्रात होत आहे.

जे कांही नवीन व उपादेय ते स्वीकारावे म्हणून न्यू मेक्सिकोचे अललडी, डॉ. वाह्य यांनी जैन धर्मावर अनेक लेख लिहिले. जैनसंस्कृतीचे स्याद्वाद, अनेकांत व जैन अपरिग्रहाचा विचार मौलिक कसा आहे हे त्यांनी दाखविले.

त्याचप्रमाणे डॉ. के. आर. मार्गन यांनी क्रियावाद व जैन आत्मत्व याबर जो प्रबंध लिहिला त्यावरून जैनधर्माचा आत्मत्वविचार प्रगट झाला व त्यांचा विचार अनेक ठिकाणी पोहोचला. भगवताच्या विचारांचा पगडा वाढत गेला. अमेरिकेतील कॅलिफोर्निया राज्यात जैनधर्माचा प्रसार फार जोरात चाललेला आहे. विद्यापीठ पण यासाठी प्रयत्नशील आहे.

जैनधर्माचा विचार पोहोचण्यासाठी समर्थशक्ति म्हणजे जैनाचार व विशेषत: जैन आहार. जैन अहिंसक शाकाहाराची घोषणा गेन विद्यापीठात अनेक ठिकाणी गाजली. डॉ. दिनशा, डॉ. नेलरम्हके, व्हेल्टन इ. विद्वानानी जैनधर्माचा शाकाहार विषयक दृष्टिकोन प्रगट केला. जीवदयेची तत्वे मांडणारी जैनधर्माची सूक्ष्मता आज जपान व आग्नेय आशियातील अनेक विद्वानाना पटली आहे. आज थाय जापानचे चिकित्सक लोकांना जैनधर्माची शाकाहर मीमांसान वीन वाटते. Live & let live चा सिद्धांत पटला आहे व यासाठी तत्वज्ञ शॉपेन होवर, डॉ. बर्नार्ड शा सारख्या विद्वान.जागतिक रसिकांना पण नवीन दिशा घेता आली.

एकूण जैनधर्माचे वारे दिग्‌दिगन्तरी पसरविताना अनेक पाश्चिमात्य विद्वानानी सहयोग दिला. *जैनधर्माचा विदेशी लोकांनी प्रगाढ अध्ययन करून तौलनिक दृष्ट्या ग्रंथसंपत्ति निर्माण केली.* रशियाचे डॉ. एन. आर. बुसेवा यांनी जैनधर्मावर संशोधनपर ग्रंथ लिहिला व त्यात जैनधर्माचे सिद्धांत अनेकात व अपरिग्रह हे आजच्या युगात कसे उपयुक्त आहेत हे निक्षून सांगितले. याशिवाय फ्रान्सच्या महिला प्राध्यापिका डॉ. कलियट यांनी हे पुस्तक लिहून जैनधर्माचे भ. महावीरांच्या उपदेशाची मौलिक मीमांसा केली. स्व. डॉ. उपाध्याय *यांनी या पुस्तकावर धन्योद्‌गार काढले. ऑस्ट्रेलियाची महिला प्रा. लुसे अन्नस हरक्युस,* अमेरिकेतील फिलाडेल्फियाचे प्रा. विलीयम नरमिन ब्राऊन, ईस्ट जर्मनीतील डॉ. जोसेफ अलबर्ट जपानातील हीरतसुकाचे प्रो. अटसुशी उनी, बर्लीनचे डॉ. व्ही. मीलर, रशियातील मास्को येथील प्रा. आय. डी. सेरेबिएको, वेस्ट जर्मनीतील डॉ. कलस आर. ब्रुंहन आस्ट्रेलियातील सार्यरिग येथील प्रो. इरीच प्रायवमनर नार्थ, युरोपातील टुरकू येथील डॉ. अनटो टेहतीनन केंब्रीज विद्यापीठातील डॉ. के. आर. नारमन या सर्व लोकांनी जैन साहित्याद्वारे जैन संस्कृतीचा प्रचार केला.

भगवंताची वाणी आज सर्व देशात दिव्य प्रकाशासारखी पसरली आहे. अमेरिकेत डॉ. कनगन, डॉ. माथर, डॉ. ओकनाल इ. विद्वान जैनधर्मातील विचारांचा समर्थन करीत आहेत. मांसाहारी प्रदेशात असणाऱ्या या विद्वानांना जैन संस्कृतीत आपला जन्म व्हावा असे वाटते.

लंडनमध्ये जैनधर्माचे कार्य करणाऱ्या ब्यूटी विदाऊट क्रुएल्टीचे संस्थापक लेडी डाउडिंग याचेशी भेट झाली असताना मोठा सुंदर अनुभव आला. प्राणिमात्राविषयी करुणा आल्याशिवाय जैनधर्म टिकणार नाही असा त्यांचा ठाम विचार आहे. *त्यांनी जीवदयेची फिल्म तयार केली. त्यांना प्राण्याविषयी प्रेम आहे हे दिसून येते.* अहिंसेशी प्रेम आहे. शाकाहाराशी नाते आहे. त्यांचा सिद्धांत आहे. Live & Let Live जैनधर्म वाढतो आहे. प्राणिमात्रात सूक्ष्मापासून स्थूलापर्यंत धर्म जातो आहे. विदेश संक्रातीवर आहे. बदल होत आहे. बदल कसा व्हावा ! जीव टिकले पाहिजे. अस्तित्व राहिले पाहिजे. अशा लोकांनी जैनधर्माची प्रभावना व्हावी म्हणून आज ठिकठिकाणी जैनधर्माचा विचार पोहोचला *आहे. लाय प्रेजिएक्ट कॅलिफोर्नियाला एक संगठन आहे. United* against Animal Cruelty अर्थात क्रूरतेशी युद्ध आहे. जैनधर्म केवळ शुष्क तत्वाने राहिले नाही तर जीवन झाले आहे. प्रत्यक्ष आचरण हाच धर्म आहे हा जैनधर्माचा विचार सर्वत्र पोहोचला आहे.

पंचवीसशे वर्षापूर्वी सुरू झालेले भगवंताचे समवसरण जगाच्या कोनाकोपऱ्यात पोहोचत आहे. दिग्‌दिगती व्यापत आहे. *त्यात पाश्चात्यांचा सहयोग व निष्ठा वाखाणण्यासारखी आहे.*



# पुष्पांजली

## (पूर्णार्घ्यांची सांगता)

'पूर्णार्घ्य' अर्पण करण्याच्या या संकल्पातून क्रमाने उदयाला आलेले हे अकरा अर्घ्य भक्तीच्या वेलीची फुलं आहेत. याला पूर्णार्घ्याचा संकल्प म्हणा की भक्तीचा भाव. एका मंगल सुप्रभाती पवित्र जलाने स्नान करून शुद्ध धौत केसरी वस्त्र परिधान करून प्रासुक अशा अष्ट द्रव्यासह जिनमंदिरात जाऊन वीतरागी जिनबिंबाच्या पावन दर्शनानं अत्यंत प्रसन्नचित्त होऊन भक्तिरूपी शुभ परिणामानं कुणी प्रभु चरणी अर्घ्य अर्पण करावेत, त्याच प्रमाणे भ. महावीर २५०० व्या निर्वाणमहोत्सवी वर्षाच्या शुभ प्रभाती परमभक्तीनं प्रेरित होऊन ही अकरा अर्घ्यांची रचना ग्रंथाच्या तवकात घेऊन भ. महावीराच्या चरणकमली सादर केली आहेत.

भक्तीनं शब्दांना आकार दिला. शब्दांनी ग्रंथाला साकार केले. धर्म व संस्कृती, भ. महावीर–जीवनगाथा, इतिहास, जैन आचार्य, जैनसाहित्य, आधुनिक विज्ञान आणि जैनधर्म, जैनतत्त्वज्ञान, समतोल तत्त्वदर्शन, जैन सामाजिक जीवन, जैन कला, पूर्णार्घ्यांची सांगता या अकरा अर्घ्यानंतर ही शब्दरूप पुष्पांजली उमलली आहे.

भक्ती हा राग आहे. रागाच्या माध्यमाने वीतरागतेची पूजा कशी बरी करू ? वीतरागतेची खरी पूजा रागाने होत नाही. कारण राग अपराध आहे. आणि अपराधच संसार आहे. मला तर या अपार संसारसागरातून पार व्हायचे आहे. म्हणूनच अंशतः प्रगट होणारी वीतरागताच वीतरागी भगवंतांची खरी भक्ती आहे. खरी भक्ती मोक्षमार्गाला प्रारंभ करते. त्या भक्तीची परिणामात श्रद्धा करून बाह्यतः प्रगट झालेली ही रागरूप भक्ती शब्दांकित करण्याचा हा अल्पसा प्रयत्न आहे.

या प्रयत्नाची सार्थकता वीतरागतेच्या प्रगट पर्यायातच आहे. म्हणून या पूर्णार्घ्यासोबत ही भक्तियुक्त भावपुष्पांजली वाहात आहे. इति पुष्पांजलिं क्षिपेत् !!!



# संदर्भ ग्रंथांची सूची


| अ. नं. | ग्रंथांचे नांव | लेखकाचे नांव |
|---|---|---|
| १ | षट्खंडागम भाग १ ते १६ | डॉ. हिरालाल जैन |
| २ | जयधवला भाग १ ते १२ | |
| ३ | महाधवल | |
| ४ | स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षा | ए. एन. उपाध्ये, (स्वामी कार्तिकेय विरचित) |
| | प्रवचनसार | कुंदकुंदाचार्य |
| | समयसार | कुंदकुंदाचार्य |
| | नियमसार | कुंदकुंदाचार्य |
| | पंचास्तिकाय | श्रीमत् जयसेनाचार्य |
| | अष्टपाहुड | पन्नालालजी जैन |
| | रयणसार | |
| | भगवती आराधना | |
| | तत्त्वार्थसूत्र | उमास्वामी आचार्य |
| | राजवार्तिक | |
| | श्लोकवार्तिक | |
| | सर्वार्थसिद्धि | पूज्यपादाचार्य |
| | रामायण | पं.जिनदास पा. फडकुले |
| | हरिवंशपुराण | लाला जैनीलाल जैन |
| | पाडवपुराण | श्री. ए. एन. उपाध्ये |
| | जैनेंद्र व्याकरण | महामहोपाध्याय विद्याप्रसाद |
| | सिद्धांत कौमुदी | श्री. चंद्र वासु |
| | जैनेंद्र सिद्धात कोष | |
| | परमात्मप्रकाश | योगीन्दु देव |
| | यशस्तिलक चम्पू | प. सुंदरलाल शास्त्री (श्री सोमदेव सूरि विरचित) |
| | ४५ आगम | |
| | अष्टसहस्री | गांधी श्रीनाथा |
| | प्रमेयकमलमार्तंड | |
| | न्यायकुमुदचंद्र | |
| | न्यायाविनिश्चय | |
| | न्यायदीपिका | |
| | लोकविभाग | श्री सिंहसूरर्षि विरचित |
| | सूर्यप्रज्ञप्ति | |

| अ. नं. | ग्रंथांचे नांव | लेखकाचे नांव |
|---|---|---|
| ३२ | चंद्रप्रज्ञप्ति | |
| ३३ | जीवराज जैन ग्रंथमाला | |
| ३४ | भारतीय ज्ञानपीठ | |
| ३५ | कुंदकुंदभारती | कुंदकुंदाचार्य |
| ३६ | त्रिलोकसार | पं. मनोहरलाल शास्त्री |
| ३७ | जम्बूप्रज्ञप्ति | डॉ. हिरालाल जैन |
| ३८ | वृहद्द्रव्यसंग्रह | |
| ३९ | जैनधर्मका प्राचीन इतिहास | डॉ. जगदीशचंद्र जैन |
| ४० | योगसार | |
| ४१ | कन्नड प्रांतीय, राजस्थान सर्व जैन इतिहास | पं. भुजबली शास्त्री |
| ४२ | सिंघी जैन ग्रंथमाला | |
| ४३ | राजस्थान जैन ग्रंथसूची | कस्तुरचंद कासलीवाल |
| ४४ | कषायपाहुड | श्री. फूलचन्द्र सिद्धान्त शास्त्री |
| ४५ | समाधिशतक | पूज्यपादाचार्य |
| ४६ | जैन तीर्थयात्रा दर्शन | |
| ४७ | विश्वतीर्थ श्रवणबेलगुल | |
| ४८ | क्षु. सहजानंद ग्रंथमाला | |
| ४९ | ज्ञानार्णव | श्री. पन्नालाल बाकलीवाल |
| ५० | आदिगीता | पं. सुमतिबाई शहा |
| ५१ | महापुराण | डॉ. पी. एन. वैद्य |
| ५२ | आदिपुराण | कविवर पं. तुलसीदासजी |
| ५३ | लब्धिसार | |
| ५४ | गोम्मटसार | |
| ५५ | शाकटायन व्याकरण | |
| ५६ | पद्मनंदी पंचविंशति | |
| ५७ | आत्मानुशासन | डॉ. हिरालाल जैन |
| ५८ | रत्नकरंडश्रावकाचार | पं. खूबचंदजी शास्त्री |
| ५९ | सागार धर्मामृत | |
| ६० | अनागार धर्मामृत | |
| ६१ | यज्ञोपवीत संस्कार | |
| ६२ | पंचस्तोत्र | |

| अ. नं. | ग्रंथांचे नांव | लेखकाचे नाव |
| --- | --- | --- |
| ६३ | अध्यात्मकमलमार्तंड | |
| ६४ | संस्कार आणि षट्कर्म | |
| ६५ | मूलाचार | |
| ६६ | द्वादशानुप्रेक्षा | |
| ६७ | इष्टोपदेश | |
| ६८ | पूजासंग्रह | |
| ६९ | शासनदेवता | |
| ७० | देवपूजा | |
| ७१ | द. भारत जैन व जैनधर्म | |
| ७२ | हिंदी जैन साहित्यका इतिहास | |
| ७३ | कुरल काव्य | |
| ७४ | महतिसागर यांचे अभंग | |
| ७५ | पार्श्वनाथ पुराण | अनंतराज बोपलकर |
| ७६ | जैन आणि सांख्य | |
| ७७ | षट्दर्शन | |
| ७८ | पद्मपुराण | क्षु. आदिसागर (आचार्य रविषेण) |
| ७९ | महावीर चरित्र | |
| ८० | कर्मप्रकृति | प्रा. हरि दामोदर वेलणकर |

| अ. नं. | ग्रंथांचे नांव | लेखकाचे नाव |
| --- | --- | --- |
| ८१ | पंचसंग्रह | पं. दरबारीलाल शास्त्री |
| ८२ | भरतेश वैभव | श्री. हिंमतलाल जैन |
| ८३ | दशभक्ति | श्री. सिद्धसेन गोयलीय |
| ८४ | पंचलब्धि | |
| ८५ | प्रायश्चित्तादि ग्रंथ | |
| ८६ | कल्याणकारक | |
| ८७ | तिलोयपण्णत्ति भाग १ ते २ | श्री. ए. एन. उपाध्ये |
| ८८ | महावीर चरित्र | |
| ८९ | शांतिसागर स्मृतिग्रंथ | वालचंद देवचंद शहा |
| ९० | शिवसागर स्मृतिग्रंथ | |
| ९१ | गणेशप्रसादवर्णी स्मृतिग्रंथ | |
| ९२ | तनसुखराय जैनग्रंथ | श्री. जैनेंद्रकुमार जैन |
| ९३ | श्री. हजारीमल मुनि स्मृतिग्रंथ | |
| ९४ | गुरु गोपालदास बरैया स्मृतिग्रंथ | जगन्मोहनलाल शास्त्री |
| ९५ | त्रिषष्टी स्मृति शास्त्रम् | |
| ९६ | वर्णी अभिनंदन ग्रंथ | श्री. खुशालचन्द्र गोरावला |
| ९७ | श्री. पं. चंदाबाई अभिनंदन ग्रंथ | सं. सुशीला जैन |
| ९८ | मुनिद्वय अभिनंदन ग्रंथ | श्रीचंद सुराणा 'सरस' |





# — शुद्धिपत्र —

| पृ. सं. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ३ | अरुहन्ताणं | अरहन्ताण ( सर्वत्र ) |
| ५५ | इति+ह+आस | इतिह+आस |
| ५८ | देवाचा वंध | देवगतीचा वध |
| ५९ | ग्रेसष्ठ | बासष्ठ |
| ५९ | चातुर्वर्ण्य | चतुर्विघ |
| ७७ | १५ ऑक्टोबर | वगळणे |
| | 'इतिहास' अर्घ्यामध्ये जेथे जेथे वसति किंवा धस्ती असेल तेथे तेथे | वसदि किंवा वस्ती वाचावे. |
| ८८–८९ | पुष्यमित्र नावाच्या टोळयांनी........ मिळविलेला असून. | पुष्यमित्र नावाच्या टोळयांनी मध्य भारतावर या काळात आक्रमण केले. पण कुमार स्कंद-गुप्तानी हे आक्रमण परतवून लावले. हूणांचे आक्रमणही या सम्राटाच्या कारकीर्दीच्या शेवटी सुरू झाले. गुप्तकाळातील सर्वात प्राचीन शिलालेख उदयगिरी पर्वतावर मिळविलेला असून |
| १०१ | Bombay Hunnanitauian | Bombay Humanitarian |
| १०३ | पद्मावत | पद्मावत |
| १०५ | सोन्यांची | सुवर्णाची |
| १०७ | मन्नादाई | पन्नादाई |
| ११० | १६३८ मध्ये कोटयावधी रुपये खर्चून भगवंताचे | १६३८ मध्ये कोटयावधी रुपये खर्चून पार्श्वनाथ भगवंताचे |
| ११२ | संपूर्ण संन्यासी वस्तूंचा त्याग करून | संसाराचा त्याग करून |
| १२८ | गंगकंदर्य | गंगकंदर्प |
| १२९ | मोक्षमार्गस्थ नेतारं | मोक्षमार्गस्य नेतारं |
| १३३ | तैल | तैलप |
| १३४ | जयत्तुंग | जगत्तुंग |
| १३५ | ना दंसणिस्स नाण नाणंण विना | नादंसणिस्स नाण नाणेण विना |
| १३७ | तोड्डु आराधना | वड्डाराधना |
| १३८ | रत्नकवि जातीने कासार होता | रत्नकवि जातीने कासार जैन होता. |
| १४३ | वंशगत देव | कुलदैवत |
| १४४ | वेणुह | वेणूर |
| १४५ | प्रतिकृती | प्रतिमा |
| १४५ | परमागतसार | परमागमसार |
| १४७ | पेतुगोंड | पेनुगोंडे |
| १५५ | आपला दाह करून | आपला दाह कमी करून |
| १५६ | अट्णरस | अट्टारस |
| १५८ | आचार्यांचा काल वीर निर्वाणानंतर ६१४ ते ६८३ | आचार्यांचा काल वीर निर्वाणानंतर ८७ ते १५६ |
| १६१ | कुंदकुंदाचा काल वि. स. २ रे शतक | इ. स. हवे |

| पृ. सं. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १६३ | प्राथमिक अभ्यासकाला योग्य नाही | प्राथमिक अभ्यासकाला समजत नाही |
| १६६ | तत्वार्थसूत्र | तत्त्वार्थसूत्र ( सर्वत्र ) |
| १६६ | ३५७ | ३५८ |
| १६६ | कर्त्तानुयोग, कर्मानुयोग | नकोत |
| १८० | परिसवसहं | परिसहं |
| १८१ | कत | कर्ते |
| १८२ | तात्काळ त्यानी विचार केला या ओळी | नकोत |
| १८३ | १६ देवेंद्र | १२ देवेंद्र |
| १९० | बौद्धाप्रमाणे | नको आहे |
| १९० | निकलंक | निष्कलंक |
| १९५ | प्रमुख ग्रंथ | प्रमुख पुराण ग्रंथ |
| २०१ | *मिटविण्यासाठी* | *मिळविण्यासाठी* |
| २०५ | वि. सं. ९०५, वि. सं. ८१० | वि. सं. ८४८, वि. सं. ७५३ |
| २१० | विजायतेयर्यैव | विजायते यर्यैव |
| २१० | तत्त्वार्थश्लोकवर्त्तिक | तत्त्वार्थश्लोकवार्तिक (सर्वत्र) |
| २११ | राजवर्त्तिक | राजवार्त्तिक असे सर्वत्र वाचावे. |
| २१२ | आ. नेमिचंद्र सिद्धान्त चक्रवर्ती<br>वि. संवत ११ व्या | आचार्य नेमिचंद्र सिद्धान्त चक्रवर्ती<br>वि सवत १० व्या |
| २१३ | त्याचा राज्यकाल वि. सं. १०३१ ते १०४१ | त्याचा राज्यकाल इ. स. ९७४ ते ९८४ |
| २१६ | चेदण कम्माणादा | चेदणकम्माणादा |
| २१६ | चेदणाजस्स | चेदणा जस्स |
| २१७ | *महावीर या तीन तीर्थकराचे मी स्तवन करतो.* | *महावीर इ. पाच तीर्थंकरांचे मी स्तवन करतो* |
| २१८ | क्रौचराजकृतोपसर्ग सोढ्वा | क्रौचराजकृतोपसर्गं सोड्ढ्वा |
| २२१ | त्याचे क्षेत्र ७ राजू घन आहे | त्याचे क्षेत्र १४ राजू घन आहे. |
| २२२ | कैवल्य म्हणजे बोधि | रत्नत्रय म्हणजे बोधि |
| २३१ | १४४ नं. ८०० ते ८४३ जिनसेन नं. ३ | ७५३ ते ८४८ जिनसेन नं. १ |
| २३३ | २१६ नं. इ. ११ पूर्व | १० वे शतक |
| २४४ | जैन मतानुसार | जैनधर्मानुसार |
| २४८ | तत्त्वार्थसूत्रात एकूण १० अध्याय असून सूत्रसंख्या ३५७ इतकी आहे. | १० अध्याय असून सूत्रसंख्या ३५८ |
| २५१ | क्षेत्रमास | क्षेत्रसमास |
| २५५ | घातकीखड | धातकीखंड |
| २७३ | वीर-निर्वाणानंतर सुमारे ७०० वर्षांनी | वीर-निर्वाणानंतर सुमारे ६१४ ते ६८३ वर्षांनी |
| २७६ | यावाकोई | नको |
| २७६ | जलाहं | जलोहं |
| ३०३ | भकइ | भणइ |
| ३०७ | सदेशदासक | संदेशरासक |
| ३१९ | सहकाची | सट्टकाची |
| ३६५ | पुराण स्यान | पुराणं स्यात्. |
| ३६५ | गत्वम्यान | गत्याख्यान |
| ३६९ | कांही कमठ देवांची क्षेत्रपाल इत्यादीची स्तुती | काही क्षेत्रपाल इत्यादी देवांची स्तुती |
| ३७१ | जैन पर्वाचा विषय | जैन स्तोत्रांचा विषय |